॥ श्रीसमर्थ ॥

# नवयुगधर्म

किंवा

## हिंदुस्थानांतील आधुनिक धार्मिक चळवळींचा विवेचक इतिहास

प्रथम खण्ड

## ब्राह्मसमाज व देवसमाज

ब्रह्मकृपाहि केवलम्।

ईश्वर करील तें खरें।

ग्रंथकार

सदाशिव कृष्ण फडके

प्रथमावृत्ति-१९२७

किंमत चार रुपये



श्रीमत् जगद्‌गुरु आद्यशंकराचार्य

॥ श्रीसमर्थ ॥

हा ग्रंथ

ज्या दृष्टींनें लिहिला आहे

त्या अद्वैत वेदान्तशास्त्राचे प्रणेते

स्वस्ति श्रीमत्समस्तसुरवरवृंदपूजितपादारविंद शिवप्रतिबिंबवर्य श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य पदवाक्यप्रमाणपारावारपारीण यमनियमासन-प्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टांग-योगानुष्ठाननिष्ठ तपश्चक्रवर्तीमन्वाद्यवि-च्छिन्नगुरुपरंपराप्राप्तषड्दर्शनसंस्थापना-चार्य व्याख्यानसिंहानाधीश्वर कलानि-गमागमासारहृदय सांख्यत्रयप्रति-पादक सकलनास्तिकमतोच्छेदन-पूर्वकसकलधर्मसंस्थापनैकधुरीण वैदिकमार्गप्रवर्तक सर्वतं-त्रस्वतंत्र

**श्रीमत् जगद्गुरु आद्यशंकराचार्य**

**यांच्या पुण्यस्मरणार्थ**

**जनीं-जनार्दन सेवेस**

**नम्रपणें सादर केला असे.**

सदाशिव कृष्ण फडके

# प्रस्तावना

आपल्या देशास जी कठीण परिस्थिति प्राप्त झाली आहे, तिचीं कारणें काय, व ती दूर करण्यास उपाय कोणते, यासंबधीं देशांतील सर्व आस्थेवाईक स्त्री-पुरुष आज विचारक्रांत झाले आहेत. शेती, उद्योगधंदे, शिक्षण, सामाजिक सुधारणा, राजकारण व धर्म असे हे विचारांचे वर्गीकरण आहे. त्यांतही राजकारण आणि धर्म हे प्रश्न जसे फार व्यापक स्वरूपाचे तसेच जिव्हाळ्याचे असल्यामुळें त्यांसच जास्त महत्त्व आले आहे. शेती, उद्योगधंदे व शिक्षण हे प्रश्न समाधानकारक रीतीने सुटणे हे राजकारणावरच अवलंबून आहे. तसेंच सामाजिक सुधारणांचा प्रश्नही अंशतः राजकारणांत व अंशतः धर्मकारणांत गुंतलेला आहे. अशा या दोन महत्त्वाच्या विषयांपैकीं राजकारणाचा विचार राजकीय पुढारी ज्याप्रमाणें करीत आहेत, त्याचप्रमाणे आपल्या देशांतील आधुनिक धार्मिक संस्थांनीं आपल्या नियतकालिक कार्याचे आढावे काढून आपआपले मार्ग सुधारण्याचे प्रयत्न चालविले आहेत. ह्या संस्थांच्या विचार मंथनांतून चालू क्रांतिकारक नवयुगासाठीं कोणतीं धर्मतत्त्वे बाहेर पडतात, तिकडे जिज्ञासूंचे लक्ष लागून राहिले आहे. यासाठीं आपल्या देशांतील आधुनिक धार्मिक चळवळींसंबंधीं मराठी वाचकांस विचार करतां यावा म्हणून हा "नवयुगधर्म अथवा हिंदुस्थानांतील आधुनिक धार्मिक चळवळींचा विवेचक इतिहास" हा ग्रंथ मीं मुद्दाम लिहिण्यास घेतला. ह्या ग्रंथांत आपल्या देशांतील गेल्या सुमारे शंभर वर्षांतील धर्ममतांचा विहंगम दृष्टीने विचार व्हावयाचा आहे.

हा ग्रंथ लिहिण्याची मूळ सूचना माझे मित्र रा० गणेश दामोदर टिल्लू, एम्.ए. ह्यांनीं केली; व पुढेही त्यांच्या विशेष आग्रहामुळें मी हा ग्रंथ लिहिण्यास प्रवृत्त झालों. तसेंच हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्यास लागणाऱ्या खर्चाची सोय लावण्याचें माझे दुसरे मित्र श्री० आत्मारामशेठ आटवणे, एम्.एल्. सी. यांनीं मनावर घेतलें. अशा रीतीनें ह्या दोघां सन्मित्रांच्या प्रोत्साहनामुळेंच हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. यामुळें या ग्रंथाचे बरेंच श्रेय त्यांसच आहे.

हा ग्रंथ लिहिण्यास जरूर ती माहिती कोठून व कशी मिळवावी, ह्याबद्दल महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध प्रार्थनासमाजी रा० द्वारकानाथ गोविंद वैद्य व रा०

विठ्ठल रामजी शिंदे, बी. ए. यांनीं आस्थापूर्वक सल्ला दिली व रा० वैद्य यांनीं कित्येक पुस्तकें बरेच दिवस वापरण्यास देऊन सक्रिय सहानुभूति दाखविली. त्याचप्रमाणें आदि-ब्राह्मसमाजाचे एक ट्रस्टी बाबू क्षितींद्रनाथ ठाकूर ह्यांनींही आपल्या पुस्तकसंग्रहांतील एक दुर्मिळ पुस्तक मजकडे पाठवून दिले व आदि-ब्राह्मसमाजाबद्दल विचारलेल्या प्रश्नांसंबंधीं माहितीही दिली. बाबू अनाथकृष्ण सील यांनीं या ग्रंथांतील बहुतेक चित्रांचे मूळ फोटो दिले. तसेच साधारण ब्राह्मसमाजाचे अध्यक्ष पंडित सीतानाथ तत्त्वभूषण, उपदेशक बाबू हेमचंद्र सरकार, एम्. ए. व चिटणीस आनंदचंद्र सेन, बी. ए. ह्यांनीं आणि नवविधान पंथाचे बाबू यामिनीकांत कोर ह्यांनीं विचारलेल्या प्रश्नाचीं आस्थापूर्वक उत्तरें पाठवून माहिती दिली, याबद्दल ह्या ब्राह्मपंथी विद्वानांचा मी फार फार आभारी आहें. माझे विचार व त्यांचे विचार जुळते नसल्यामुळें मीं त्यांच्या आवडत्या ब्राह्मपंथावर व ब्राह्म पुढाऱ्यांवर केलेली टीका त्यांस रुचणार नाहीं, हें मी जाणून आहे. तथापि मीं त्यांच्या पंथावर व पुढाऱ्यांवर जी थोडीफार टीका केली आहे, त्यास बहुतांशीं ब्राह्मलेखकांचाच आधार आहे. आणि ब्राह्मेतर लेखकांपैकींही विशेष भारदस्त अशा लेखकांच्या सबळ आधाराशिवाय मीं बेजबाबदारपणे कोणावरही टीका केली नाहीं, हे त्यांनीं व इतर वाचकांनींही कृपा करून लक्षांत ठेवावे. अशा रीतीने ह्या ग्रंथास मीं ज्या ज्या ग्रंथांचा विशेषेंकरून आधार घेतला आहे त्यांचा नामनिर्देश प्रत्येक भागाचे अखेर केला आहे. त्या सर्व ग्रंथकारांचा मी फार आभारी आहे. ज्या सद्गृहस्थांनीं माझ्या हस्तलिखित प्रतींतील मधून मधून काहीं भाग वाचून पाहिला व मला कांहीं सूचना करून ग्रंथप्रकाशनास प्रोत्साहन दिलें त्यांचाही मी फार आभारी आहें. शेवटीं माझे कनिष्ठ बंधु मुंबईचे चित्रकार चि० रघुनाथराव फडके यांच्या स्नेहभावामुळें 'विजय' व 'मनोरंजन' ह्या छापखान्यांनीं छपाईचें व चित्रांच्या ब्लाकचें काम विशेष काळजीपूर्वक करून दिलें याबद्दल मी त्या छापखान्यांचे मालकांचे आभार मानले पाहिजेत. त्यांतही 'विजय' प्रेसचे उत्साही मालक रा० अप्पासाहेब गोखले ह्यांनीं साहित्यसेवकाच्या सहानुभूतीची जी आस्था व कळकळ दाखविली ती व त्यांस जशी भूषणावह तशीच मला उपकारक झाली आहे.

ह्या ग्रंथांत कोठें कोठें जीं अशुद्धे राहिलीं आहेत, त्याचीं कारणें मुख्यतः

दोन आहेत. एक छापण्याकरितां शुद्ध व सुवाच्यप्रत लिहून देण्यास मला वेळ मिळाला नाहीं. व दुसरे छापखाना एकीकडे व मी दुसरीकडे असल्यामुळें प्रुफें तपासण्याच्या कामींही मला छापखान्यास जरूर ती मदत देतां आली नाहीं. तरी त्याबद्दल वाचकांनीं माफी करून जरूर तेथे शुद्धिपत्रावरून आपली प्रत शुद्ध करून घ्यावी. ह्या ग्रंथांत माझें व ब्राह्मांचें म्हणणें निरनिराळें लक्षांत यावें म्हणून ब्राह्मांचे विचार कोठे कोठें अवतरणचिन्हांत दिले आहेत. ते भावार्थ रूप आहेत असें समजावे.

ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज ह्या दोन्ही संस्था विचारसादृश्यानें अगदींच जवळच्या असल्यामुळे प्रार्थनासमाजाचाही समावेश ह्याच ग्रंथांत करावयाचा होता. परतु प्रार्थनासमाजाच्या इतिहासाचें स्वतंत्र पुस्तक नुकतेच प्रसिद्ध झाल्यामुळें तो भाग या प्रथम खंडांतून वगळला आहे. तसेच उलट देवसमाज ही संस्था ब्राह्मसमाजाहून अगदी भिन्न आहे, तरी तिचे उत्पादकही मूळचे साधारण ब्राह्मापैकींच एक प्रमुख गृहस्थ होते, ब्राह्मसमाजाच्या प्रमुख मंडळींतून असे फुटून बाहेर पडून स्वतंत्र धर्मसंस्था काढल्याचीं अनेक उदाहरणे आहेत, त्यांचाच एक नमुना म्हणून देवसमाजाचा त्रोटक वृत्तांत ह्याच खंडांत दिला आहे.

अलीकडील प्रागतिक म्हणविणाऱ्या संस्था व त्यांच्या धर्मसंबंधीं विचारांची मांडणी यांचा सांचा एक प्रकारे ठरून गेला आहे. त्याबरोबर हेही ठरल्यासारखेंच आहे कीं, ह्या प्रागतिक मंडळींनी जुन्या गोष्टींस तुच्छ लेखावे व उलट जुन्या विचारांच्या मंडळींनीं नवीन मंडळींस पढतमूर्खांत काढावे. असा हा प्रकार आज बरीच वर्षे चालत आल्यावर आतां विचारी त्रयस्थाला असे दिसून येतें कीं, जे आपल्याला प्रागतिक म्हणवितात त्यांची खरोखर प्रगति झालेली नसते. तर त्यांची गति चाप काढलेल्या मोटारीसारखी असते. इंजीनचा आवाज मोठा; पण त्या इंजीनचा संबंध चाकांशीं तुटलेला असतो. आणि उलटपक्षीं या नवीन मंडळींच्या पाखंडमतांबद्दल व भ्रष्टतेबद्दल जुन्या मंडळींत जो डांगोरा पिटला जातो, त्यांत बरेचसे अज्ञान व हटवादीपणाही असतो. तात्पर्य, प्रागतिकांनीं आपण खरे प्रागतिक नाहीं हें लवकरच जाणलें पाहिजे, आणि जुन्या मंडळींनीही त्यांचा अगदीं विटाळ नको असें मानण्याचें यापुढें सोडून दिलें पाहिजे. यासाठीं प्रागतिकांच्या धर्मसंबंधीं विचारांच्या खऱ्या व

निर्भीडपणानें लिहिलेल्या अशा इतिहासाची आज फार जरूर आहे; व तोच माझा प्रयत्न आहे.

एखादा प्रवासी प्रवास करीत असतां एकीकडे आपल्या झालेल्या प्रवासाचें वर्णनही प्रसिद्ध करतो, त्याप्रमाणें मी धर्मपंथारूढ होऊन शोध व अभ्यास करूं लागलो असतां मला ज्या गोष्टी आढळल्या त्या दुसऱ्यांस सांगितल्या असता मनोरंजक व मार्गदर्शक होतील व माझ्याही विचाराची उजळणी होईल असें वाटून मी ह्या ग्रंथाचा उपक्रम केला आहे. यांत मीं केलेल्या टीकेबद्दल जरी मतभेद झाला, तरी ब्राह्मपंथाच्या आजकालच्या पुढाऱ्याचे धार्मिक विचार या समग्र ग्रंथांत एके ठिकाणीं संकलित केलेले आहेत, ते वाचकांची विचारजागृति करण्यास मदत करतील अशी उमेद आहे.

ह्या ग्रंथाचे पहिले तीन भाग लिहून झाल्यावर त्यांत चरित्रात्मक भाग जास्त आहे असे एका मित्राने सुचविले. तेव्हां पुढील चवथ्या भागांत चरित्रात्मक भागाचा संक्षेप करून विवेचक भागच जास्त लिहिला आहे. शिवाय पहिल्या तीन भागातील चरित्रात्मक भागाचे महत्त्व पुढे राहिलेही नाहीं. ह्या प्रथम खंडांत ब्राह्मतांवर टीका न करता केवळ ब्राह्ममतदिग्दर्शन करावें असा माझा प्रथम इरादा होता; पण शेवटचा तुलनात्मक खंड प्रसिद्ध होण्यास बराच दिनावधि लागण्याचा संभव असल्यामुळें तोपर्यंत केवळ ब्राह्ममतांचेच वर्णन करून स्वस्थ राहणें बरे नाहीं असे वाटले; व तसेच एका विद्वान् गृहस्थाने सुचविल्यावरून पहिल्या तीन भागांपैकीं प्रत्येक भागाचे अखेर एक समारोपादाखल प्रकरण लिहून व चवथ्या भागाच्या बहुतेक प्रकरणांतून धार्मिक विचारांची पूर्वपीठिका कशी आहे, याचेंही थोडक्यांत दिग्दर्शन केलें आहे. ब्राह्ममतावर टीका करण्याचा माझा अधिकार नाहीं, हें मी जाणतों. तथापि, पुराणमताभिमानी लोक काय म्हणतात याचें किंचित् दिग्दर्शन करण्यापलीकडे मी ह्या खंडांत जास्त खोल विचारांत शिरलो नाहीं.

ह्या ग्रंथांत ज्या स्त्री-पुरुषांच्या चारित्र्याबद्दल व मतांबद्दल मला विचार-करावा लागला, त्या माणसांची योग्यता फार मोठी आहे यांत शंका नाहीं. इतकेंच काय, पण त्यांपैकीं कांहींच्या कीर्तीच्या धवलगिरीचीं गगनचुंबित शिखरें विवेचक बुद्धीच्या पुऱ्या नजरेत येण्यास नुसत्या संपादकीय खुर्चीची उंची किती अपुरी आहे याची मला जाणीव आहे. यास्तव जगद्गुरु श्रीशंकरा-

चार्य यांच्या श्रेष्ठतर वेदान्त भूमिकेचा मीं आधार घेतला आहे. तथापि संपादकाचें कर्तव्य प्रामाणिकपणें बजावीत असतां कोठें वेदान्त मतांबद्दल अभिनिवेश व त्यामुळें कोठें परमतांबद्दल निष्कारण अनादर लेखणींतून उतरला असला, किंवा टीकेच्या बोळलेल्या शाईत लेखणी जास्त बुडल्यामुळें थोरामोठ्यांच्या चारित्र्यावर अनाठायीं शिंतोडा उडाला असला तर ह्या हस्त-दोषांबद्दल त्या थोर स्त्री-पुरुषांची व त्यांच्याविषयीं अभिमान बाळगणाऱ्या वाचकांची मी मनःपूर्वक माफी मागतों.

अशा रीतीचा ग्रंथ मराठी वाङ्मयांत अद्याप कोणीं लिहिलेला नसावा असें वाटतें. ह्या अपूर्वतेशिवाय ह्या ग्रंथाची स्वतंत्र योग्यता व उपयुक्तता किती आहे हे भविष्यकालच ठरवील. ब्राह्मसमाज ही संस्था जरी विशेष लोकप्रिय नसली तरी या संस्थेशीं आजच्या एकंदर सुशिक्षित वर्गाचे बरेच विचारसादृश्य असण्याचा संभव आहे. या एकंदर कारणांस्तव आधुनिकांचे धार्मिक विचार ह्या दृष्टीनें हें पुस्तक मराठी वाचकांस उपयुक्त व मनोरंजक वाटेल अशी उमेद आहे. ती खरी ठरून योग्य प्रोत्साहन मिळाल्यास पुढील खंडांत प्रार्थनासमाज, आर्यसमाज व थिऑसफी या सुप्रसिद्ध संस्थाचा असाच विवेचक इतिहास देण्याचा माझा विचार आहे. त्याच्या पुढील खंडांत गेल्या शेंदीडशें वर्षांतच आपल्या देशांत झालेल्या सनातन वैदिक धर्माभिमानी अशा साधुसंतांचें चारित्र्य व विचार येतील; आणि अखेरच्या खंडांत धर्मा-संबंधीं अनेक महत्त्वाच्या मुद्द्यांवर तुलनात्मक विवेचन करून साधल्यास कांहीं विधायक सूचनाही करण्याचा संकल्प आहे. सत्यसंकल्पाचा दाता भगवान् आहे. तेव्हां ह्या संतोक्तीवर पूर्ण विश्वास ठेवून ही प्रस्तावना पुरी करतों.

वसई,<br>
श्रीशंकराचार्य पुण्यतिथि.<br>
मिति वैशाख शुद्ध १० शके १८४९.

**सदाशिव कृष्ण फडके**

ह्या ग्रंथासंबंधीं कोणास कांहीं पत्रव्यवहार करणें असेल तर त्यांनीं खालील पत्त्यावर करावा.

सदाशिव कृष्ण फडके, वकील.<br>
पोस्ट पनवेल, जिल्हा कुलाबा.

# अनुक्रमणिका

## भाग पहिला—पृष्ठें १-१४४

# पहिल्या भागांतील कांहीं ठळक अशुद्धे

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३२ | २८ | राधिकेचा | राधिकेला. |
| ५१ | ११ | स्पर्शास्पर्श | स्पृश्या स्पृश्य. |
| ६२ | १५।१६ | तें वरतीं दिलेंच आहे. | तें "परमेश्वर पिता मानव हे भ्राते ॥ येशु ख्रिस्त नेते सर्वांचेही" अशा अर्थानें आहे. |
| ६९ | १७ | व जातां एकेश्वरी प्रार्थना-मंदिरांतच जातो | न जातां एकेश्वरी प्रार्थना-मंदिरांतच जातो." |
| ९३ | ६ | रचाना | रचना |
| ९५ | ४।५ | कठीण जाणण्यास | जाणण्यास कठीण, |
| | १२ | प्रथम व्यास्याने ) | प्रथम व्याख्याने ) |
| १०२ | ३।४ | वरील......ते. | राजाराम मोहन यांच्या बद्दल न्या. रानडे |
| १०३ | मथळा | स्त्रीप्राविण्य | स्त्रीदाक्षिण्य. |
| १०५ | १९ | हुबळी | हुगळी. |
| ११३ | १८ | मोठा प्यारा होऊन राहिला होता. | मोठे प्यारे होऊन राहिले होते. |

---



# अनुक्रमणिका भाग दुसरा—पृष्ठें १४४–३५२

बांधवांशीं असहकारिता—वाङ्मयांतील स्वैर वृत्ति—शान्तिनिकेतनाचें भावनाप्राधान्य—महात्माजी व रवींद्र, रवींद्राचें मतवैचित्र्य—'तत्त्वज्ञान' रवींद्रांचें अनाचरणीय चारित्र्य—पुराणांबद्दल कवींची हास्यास्पद चिकित्सक वृत्ति—परशुरामांबद्दल भिन्न भिन्न कल्पना—रवींद्रांच्या कविकल्पनेनें भाविकांचा बुद्धिभेद—रवींद्रांचे उपनिषदांबद्दल विचार—रवींद्रांचे गुरुपद—त्यांचा स्वाभिमान—शुभाचिंतन.



---

## दुसऱ्या भागांतील कांहीं ठळक अशुद्धें

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२७ | २४ | आनंदरूपामृतं | आनंदरूपममृतं |
| १६७ | २ | त्यानीं | त्याना |
| १७९ | ९ | जो प्रसिद्ध झाला | जे प्रसिद्ध झाले |
| १८४ | २८ | खिस्ताचीं 'सर्मन्स ऑफ | खिस्ताच्या 'सर्मन्स ऑन |
| १९८ | ७ | अतथि | अतिथि |
| २०१ | ६ | इ. सन १८५७ | इ. सन १८५७ मध्ये |
| २१० | २३ | तामसी | तापसी |
| २११ | २७ | आपत्कालीं | संपत्कालीं |
| २१७ | ३ | अध्ययनाच्या | अध्यापनाच्या |
| २१९ | ११ | त्यांचा फा | त्यांचा फार |
| २२० | २५ | गेलीं होतीं. | गेले होते. |
| २२८ | २५ | ता क | तारक |
| २३२ | २८ | धर्मजविन | धर्मजीवन |
| २३८ | ८ | पुरोपूर | पुरापूर |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २३८ | ९ | 'ईशावास्य मिदं सर्वम् | 'ईशावास्यमिदंसर्वम् |
| २३८ | १९ | अवश्य | अशक्य |
| २३८ | २६ | स्नेहास | स्नेह्यास |
| २३९ | १६ | हे दुर्मिळ पदवी | ही दुर्मिळ पदवी प्राप्त |
| २४९ | २३ | ब्राह्म सृष्टींत | बाह्य सृष्टींत |
| २५३ | २ | ब्राह्मसमाजाच्या | ब्राह्म समाजाचे |
| २५३ | २ | तरी ते असे | तरी असें |
| २६७ | ५ | अगोदरच त्याचे जे भ्राते | अगोदरचे त्याचे भ्राते |
| २६९ | २५ | प्रकरणीं | खंडांत |
| २८४ | १६ | अमूर्त न निराकार | अमूर्त व निराकार |
| २८६ | ३ | नाही शब्दार्थावरून | नुसत्या शब्दार्थावरून |
| २९० | ३ | भजन चिंतन व | भजन व चिंतन |
| ३०० | ७ | अद्वैतीय | अद्वैती |
| ३०० | १२ | आकरादि | आकारादि |
| ३०५ | २६ | जा तो | जाणतो |
| ३०९ | १२ | सवाव्रत | सेवाव्रत |
| ३१० | १८ | त्या जन्माचें | त्याच्या जन्माचे |
| ३११ | २७ | मृत्योर्मानृतं | मृत्योर्मामृतं |
| ३१२ | १९ | गंगच्या | गंगेच्या |
| ३१३ | १३ | दिद्रदर्शन | दिग्दर्शन |
| ३१५ | २७ | भयाद स्याग्नि तपति | भयादस्याग्निस्तपति |
| ३१९ | ९।१० | बोल पूर एक | बोलपूर नांवाचें एक |
| ३२६ | २८ | ध्यये | ध्येय |
| ३३४ | ९ | संस्कृत विद्याशिक्षण | संस्कृत विद्याशिक्षक |
| ३३४ | २७ | मात्र त्यांना एका | मात्र एका |
| ३३८ | २८ | कविने | कवनें |
| ३३९ | १५ | आपणास न कां | आपणासही न का |

# अनुक्रमणिका भाग तिसरा—पृष्ठें ३५३–५२७

**प्रकरण तिसरें** पृष्ठें ३८६–३९८

**नवविधानाचें स्थूल स्वरूपः**—केशवचंद्रांचा हृद्रोग–भगवान् श्रीरामकृष्णांचा समागम व दृष्टिकोनांतील बदल–दुर्गापूजेच्या उत्सवांतील केशवचंद्रांचे व्याख्यान–मूर्तिपूजेचे तत्त्वज्ञान–केशवचंद्र शिष्य मंडळींत जम बसवितात–समाजाच्या गाड्यास गति आणण्यासाठीं केशवचंद्राचे प्रयत्न–नवविधानाची प्रचंड लाट–केशवचंद्रांची भावना–नवविधानाची आवश्यकता व स्थापना–ध्वजारोपणप्रसंगींच्या केशवचंद्रांच्या भाषणाचा सारांश–नवविधानांतील दोन गुणविशेष–संतसमागम–कुचबिहार प्रकरणाचा केशवचंद्राच्या मतें ब्राह्मसमाजावर परिणाम–नवविधानातील विविध कार्यक्रम–असतोष परिहाराचे प्रयत्न–नवविधानांच्या दुसऱ्या वार्षिक उत्सवातील थाटाचा समारंभ–पावित्र्यसंरक्षक अशा नवविधान धर्मांतील विशेष–ब्राह्मसमाजाच्या शाखांतील मतभेद–नवविधानोत्पत्तीचीं त्रिविध कारणें–हिंदु व खिस्ती या दोघांसही खूष ठेवण्याचे केशवचंद्रांचे प्रयत्न–नवविधानांतील खिस्तासंबंधीं अभिनिवेश–राष्ट्रीय स्वरूप देण्याचा प्रयत्न.

**प्रकरण चवथें** पृष्ठें ३९९–४१०

**नवविधाननिष्ठाः**—केशवचंद्रांनीं पुकारलेला ईशसंदेश–'मी आहें'–आमचें धर्मानुशासन–ब्राह्मसमाजाची हीन स्थिति–ब्राह्मदर्शन–केशवचंद्रांचीं व्याख्याने, ख्राइस्ट हा कोण आहे?–हिंदुस्थानचा जेता ख्राइस्ट–खिस्त महात्म्य–देवत्रयीवादाचा पुरस्कार–ख्राइस्ट हा आपला बांधव आहे–माझा खिस्त–खिस्त हा साधनाचा दर्शक आहे–'ईश्वरी साक्षात्कार' या व्याख्यानाचा सारांश–केशवचंद्रांच्या बोलण्याचा शाब्दिक व लाक्षणिक अर्थ–सहानुभूतीची प्रक्रिया.

**प्रकरण पांचवें** पृष्ठें ४११–४१८

**प्रार्थना व प्रेरणाः**—प्रार्थनेचें स्वरूप व महत्त्व–ईशप्रसादाशिवाय प्रार्थनेची पूर्तता होत नाहीं–सर्व देवमयत्वभाव–ईशप्रेरणेचा अनुभव मिळविणें कठीण नाहीं–ईशप्रेरणेचा प्रभाव-केशवचंद्रांचें आत्मनिरीक्षण

प्रयत्न—केशवचंद्रांच्या धर्मपत्नीचा वैवाहिक संन्यास—व्रतें—केशवचंद्रांचा आत्मविश्वास, नवविधानाचा जाहिरनामा—नवसंहिता—केशवचंद्रांचा योग—सांप्रदायिकांस सूचना—आयुष्याचा आढावा—केशवचंद्रांची औदासीन्यपूर्ण प्रार्थना—केशवचंद्रांचे कच्चे अनुयायी—त्यांची निराशा—केशवचंद्रांचा विलक्षण उत्साह—नवदेवालयास सुरवात.

**प्रकरण नववें** पृष्ठें ४५४–४६१

**श्रीरामकृष्णांची शेवटची भेट व अखेरः**—देवेंद्रनाथ, श्रीरामकृष्ण व कलकत्त्याचे लॉर्ड बिशप या तीन व्यक्तींशी केशवचंद्रांचा संबंध—श्रीरामकृष्ण व केशवचंद्र यांची शेवटली भेट; रामकृष्णांचे भावसमाधिस्थितीतील उद्गार—देह आणि आत्मा—ईशशक्ति व्यक्तीव्यक्तींत कमीजास्त प्रमाणाने व्यक्त झालेली असते—ब्रह्म व आद्यशक्ति साक्षात्कारानंतर ईशदर्शन सर्वत्र होते—परब्रह्म आणि माया—आई व मूल अथवा जगद्धात्री व मनुष्य—समाधिविसर्जन, ईश्वरास भक्तिवांचून दुसऱ्या कशाची किंमत नाहीं—केशवचंद्रांच्या आजाराचें रहस्य—केशवचद्रांसाठी श्रीरामकृष्णांचा नवस व शेवटचा उपदेश—देवेंद्रनाथ व केशवचंद्र यांची शेवटची भेट—नवदेवालयाचा अनावरण समारंभ—केशवचंद्राची शेवटची प्रार्थना—केशवचंद्राची हृदयद्रावक अखेर.

**प्रकरण दहावें** पृष्ठें ४६२–४७०

**जीवनरहस्यः**—दग्ध मनोभूमीवरील ईशप्रेमाचा अंकुर, ईशप्रेरणा-ईश्वराची अंतःप्रेरणा—गुलामगिरीचा तिटकारा अथवा मतस्वातंत्र्य—सदसद्विवेक बुद्धीवरील विश्वास—कठोर वैराग्याची प्रेमपूर्ण भक्तींत परिणति—भक्ति व योग—ईश्वरावर निस्सीम निष्ठा—केशवचंद्रांची चंचल मनोवृत्ति—केशवचंद्रांची निष्ठा व शासन पद्धति—बालोन्मत्त पिशाचवृत्ति—केशवचंद्र आणखी जगले असते तर—केशवचंद्रांचें अपूर्व यश—गैरसमजाचे प्रसंग—आयुष्याचे ध्येय—केशवचंद्रांची योग्यता.

---

# तिसऱ्या भागांतील कांहीं ठळक अशुद्धें

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३७० | ३ | विनोदपत्रांत | विनोदी पत्रांत. |
| ३७५ | २० | विवादास | विवाहास |
| ३७७ | ४ | मजूर | मंजूर |
| ३७७ | ७ | ‘भा कोणताच | ‘मी कोणताच |
| ३७७ | २३ | असच | असेच |
| ३८३ | २ | वाटला | वाटली |
| ३९१ | १९ | स्ववत्प्रधान | स्वत्वप्रधान |
| ३९१ | २६ | अशा ह्या अविद्यभान | अशा अविद्यमान |
| ३९३ | १४ | आदेश | आदर्श |
| ३९३ | १८ | ह्याच | ह्याचे |
| ३९९ | २४ | सर्व देवत्रयत्वभावा | सर्व देवमयत्वभावा |
| ४१३ | ५ | प्रश्नरचना | शब्दरचना |
| ४१७ | | पृष्ठांक ४२७ | ४१७ |
| ४२७ | १९ | पहा अननुभव | पहा अनुभव |
| ४३४ | १६ | कांहीं स | काहीसे |
| ४४३ | ६ | मिळावयाचा | मिळवावयाचा. |
| ४५८ | ९।१९ | आहे पुढील ,, | नाहींत यापुढें घालावे. |
| ५१२ | १७ | फरजी | बुरजी |
| ५१३ | ३ | अशावादी | आशावादी |
| ५१३ | १६ | तसेच | ...[ गाळावे ] |
| ५१५ | १५ | चाललें | चाळलें |
| ५१६ | हेडिंग | महाराष्ट्रीय | हिंदराष्ट्रीय. |
| ५२४ | २ | समजांपेक्षां | समाजापेक्षा |

---

# अनुक्रमाणिका–भाग चवथा–पृष्ठें ५३१–८८०

---

# चवथ्या भागांतील कांहीं ठळक अशुद्धें

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५३२ | ६ | साधारण ब्राह्मणांनी, | साधारण ब्राह्मांना |
| ५५१ | २२ | himself is | himself, his |
| ५५२ | २४ | ( जीव ईश्वर ) | ( जड जीव ) |
| ५५४ | १८ | ब्राह्माचे | ब्रह्माचे |
| ५५५ | शेवटली | दिक्कालादि | दिक्कालांचे |
| ५५६ | १० | ब्राह्मांचे | ब्रह्माचे |
| ५६२ | १० | सदासताचा | सतासताचा |
| ५७२ | ६ | त्यास | यास |
| ५७३ | ४ | ब्राह्मपद्धतीन | ब्राह्मपद्धतीने |
| ५७३ | ६ | टाळून व | टाळला |
| ५७३ | ८ | ज्ञानवृत्तेतून | ज्ञानवत्तेतून |
| ५७८ | १० | अवंडच | अखंडच |
| ५८० | १९ | मनोवेधक | मनोवेद्य |
| ५८४ | २१ | त्यांच्या वादाचा | त्यांच्या प्रामाण्यवादाचा |
| ५८८ | १९ | स्पष्ट | सृष्ट |
| ५८९ | २८ | त्या | ह्या |
| ५९१ | १९ | हा स्वभाव | हा देहस्वभाव |
| ५९९ | १५ | ( घटे ). | ( घट ) |
| ६०१ | २१ | असे हे | [ गाळावे ] |
| ६०३ | २१ | नेथाम्या | नेत्यात्मा |
| ६०५ | ७ | तप्रथा | तद्यथा |
| ६०६ | २३।२४ | यद्विजानीयात | यद्विजानीयात् |
| ६०६ | ५ | कामान्यस्तमात्मानुमविप्र | कामान्यस्तमात्मानमनुविद्य |
| ६०८ | ४ | स्वैभुंक्ते | स्वैरभुंक्ते |
| ६११ | ७ | कर्मबंधानं | कर्मबंधाने |
| ६११ | १९ | अप्राण | अग्राप |
| ६१६ | ६ | करण | करणे |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६१९ | ५ | ठिकाणीं अंशाच्या | अंशाच्या ठिकाणीं |
| ६२४ | २८ | तर्क पद्धति | तर्कपद्धति |
| ६२५ | २२ | निमाण | निर्माण |
| ६२६ | १९ | एक...म्हणतात. | [ कंसात घ्यावे ] |
| ६२८ | २१ | ज कित्येक | जे कित्येक |
| ६३६ | २२ | मुवेदेति | सुवेदेति |
| ६३६ | २३ | योनस्तद्वेव | योनस्तद्वेद |
| ६३८ | २२ | बहूनाम | बहूना |
| ६४१ | १६ | र्वजन्म | पूर्वजन्म |
| ६४६ | १८ | ब्रह्मलेखक | ब्राह्मलेखक |
| ६४९ | ७ | परममुग्व | परममुग्व |
| ६५५ | २२ | मजुरराचे | मजुरकराचे |
| ६६१ | १ | प्रकरण तेराव | प्रकरण तेरावे |
| ६६१ | २३ | त्याच्या आणि | [ गाळावे ] |
| ६६५ | १५ | का ण | कारण |
| ६६८ | १६ | तात्पर्य | " तात्पर्य, |
| ६७५ | २२ | विषपलोलुप | विषयलोलुप |
| ६७६ | २५ | नका | नको |
| ६७८ | १५ | जोडण्यांत | जोडण्यात |
| ६८० | २५ | स्वातंत्र्यशिक्षण | स्वातंत्र्य, शिक्षण |
| ७०१ | ११ | जन्तुरेक | जन्तुरेक एव |
| ७०२ | १५ | as | us |
| ७०९ | २१ | पूर्वसंस्कार | जुने संस्कार |
| ७१० | १४ | यत्प्रयत्ना | यत्प्रयत्न्य |
| ७१५ | २१ | परंपरापूजित | परंपरापूनित |
| ७२१ ते ७३० | हेडिंग | प्रकरण विसावे | प्रकरण एकविसावे |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७२३ | २९ | अनुभूतप्रकाश | अनुभवप्रकाश |
| ७३१ ते | हेडिंग | प्रकरण एकविसावें | प्रकरण बाविसावें |
| ७३१ | १९ | मनोवृत्यानुसारिणीम् | मनोवृत्तानुसारिणीम् |
| ७३३ | २२ | पुरस्कारावर | पुरुषकारावर |
| ७३५ | १४ | आत्मौपम्यन | आत्मौपम्येन |
| ७३५ | २२ | परहितदक्षेतेला | परहितदक्षतेला |
| ७३६ | ५ | स्वच्छेने | स्वेच्छेनें |
| ७३७ ते ७५२ | प्रकरण | २१।२२।२३ | २२।२३।२४ |
| ७६३ | १० | कांही मेळा | काहीं वेळ |
| ७४४ | १० | ते आणि इतर अज्ञानमूलक | आणि अज्ञानमूलक |
| ७७०टीप | ११ | Raga | Raja |
| ७७२टीप | १४ | वर्म | वर्ग |
| ७७७ | १३ | An | And |
| ७७७ | १५ | importial | impartal |
| ७८२टीप | ४ | Sanits | Saints |
| ७९५ | २८ | उपाधींच्या | उपाधींचा |
| ७९९टीप | ५ | ... | G. Y. Chitnis S. P. |
| ८२९ | ७ | व्रत कैवल्यें | व्रत वैकल्ये |
| ८३८ | २५ | मुच्चावच्चै | सुच्चावचै |
| ८४३टीप | ७ | ... | Sister Nivedita P. B. |
| ८४३ | २० | म्हणावें हे | म्हणावे हे म्हणणे |
| ८४५टीप | २ | Should to | Should be |
| ८४८ | १३ | काम | काय |

---

# चित्रांची अनुक्रमणिका

# करवीरपीठाचे जगद्‌गुरु श्रीशंकराचार्य
## ( डॉ॰ कुर्तकोटि )
## यांचा
# आशीर्वाद



ज्या ग्रंथाबद्दल आता अभिप्राय देण्यात येत आहे तो ग्रंथ अनेक दृष्टीनीं अपूर्व आहे म्हणूनच त्याबद्दल पुष्कळ लिहावयास पाहिजे: परतु जितके जास्त लिहावयास पाहिजे तितका कमी वेळ अभिप्राय देण्यासाठी मिळाल्यामुळे ग्रथाला अनुरूप अशी ही समालोचना नाहीं, हे प्रथमतः स्पष्टपणे कबूल करूनच पुढे चालणे भाग आहे.

२. हिंदुस्थान ही धर्मभूमि म्हणून प्रसिद्ध आहे. परंतु आपल्या पूर्वजांनीं धर्माबद्दल जितका आदर बाळगिला तितकाच अनादर अलीकडे आपण बाळगूं लागलो आहोत, हे आपल्या अवनतीच्या कारणापैकीं एक प्रधान-कारण आहे. सुदैवाने ही गोष्ट अलीकडे पुष्कळाच्या लक्षात यावयास लागली आहे; परंतु धर्म हा शब्द जितका लहान आणि सोपा दिसतो तितकाच त्याचा अर्थ मोठा व गहन आहे. परकीयांचे विचारसरणींत ज्याप्रमाणे धर्म व तत्त्वज्ञान हीं भिन्न आहेत, त्याप्रमाणें आर्यसंस्कृतींत हीं दोन्ही भिन्न नसून एकमेकांचीं पोषक इतकेंच नव्हे तर एकात्मक असल्यामुळे धर्म हा शब्द त्या अर्थीं वापरल्या जाणाऱ्या परभाषांतील शब्दापेक्षां अत्यंत भिन्न व अर्थगर्भित आहे. श्रीभगवत्पूज्यपादाचार्योंनीं गीताभाष्याच्या प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें वैदिकधर्म हा प्रवृत्तिरूप आणि निवृत्तिरूप असा द्विविध

आहे; आणि भगवद्गीतेने सयुक्तिकपणे सिद्ध करून दाखविल्याप्रमाणें "एकमप्यास्थितः सम्यगुभयो र्विन्दते फलम् ॥" इतकेंच नव्हे तर "यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि" ॥ अशी वस्तुस्थिति आहे.

३. अशा धर्माचे वास्तविक व व्यापक स्वरूप ज्या वेळी भारतवर्षाने ओळखिले नाहीं तेव्हांपासून त्याची अवनति सुरू झाली आणि जेथे गमाविले तेथेच कमाविले पाहिजे या न्यायानें ते धर्माचे स्वरूप ओळखल्यावांचून आपल्या देशाची उन्नति होणार नाहीं.

४. परिस्थिति कितीही बदलली तरी ज्याप्रमाणे कसल्याही उच्च किंवा नीच भूपृष्ठावर शरीराचा तोल सांभाळतां येतो, त्याप्रमाणे धर्म साधतां येतो. शरीराच्या आकृति भिन्न भिन्न दिसतील; परंतु समतोलपणा ज्याप्रमाणे एकच असतो, तद्वतच धर्माचे बाह्यस्वरूप बदललें तरी त्याचे आंतलें स्वरूप एकच असते म्हणूनच धर्म सनातन आहे.

५. धर्माचे खरे स्वरूप लक्षांत न आल्यामुळे बदललेल्या परिस्थितीतही धर्माचे बहिरंगदेखील तसेच राहिले पाहिजे असा आग्रह धरणारा एक पक्ष, आणि परिस्थित्यनुरूप धर्माच्या बहिरंगांत फरक करावा लागतो म्हणून बहिरंगाबरोबर धर्माचे अंतरंगही बदलले पाहिजे असा हट्ट धरणारा दुसरा पक्ष; असे दोन पक्ष झाल्याने मतमतांतरांचा गलबला होतो. असाच प्रकार हिंदुस्थानात विशेषतः पाश्चात्य शिक्षणपद्धति सुरू झाल्यापासून जोराने घडूं लागल्यामुळे हिंदुस्थानांत नवीन शेकडो पंथ व शेकडो संप्रदाय अस्तित्वात येणे, हे स्वाभाविक आहे. तेव्हां अशा वेळीं त्या सर्वांची ऐतिहासिक व विवेचक दृष्ट्या समालोचना केल्यावांचून आणि पूर्वजांच्या सिद्धान्तांशीं तुलना करून पाहिल्यावांचून आधुनिक सुशिक्षित वर्गाचे बौद्धिक समाधान होणार नाहीं.

६. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें हे काम कोणीतरी हातीं घ्यावयास पाहिजे होते. प्रो० रामचंद्र दत्तात्रय रानडे यांनीं हिंदुतत्त्वज्ञानाचा विस्तृत इतिहास तज्ज्ञ विद्वज्जनांच्या साहाय्याने लिहून प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला आहे, त्या इतिहासमालेच्या पुष्पांचा-एका दृष्टीनें

त्यांचा उपयोग होत असला तरी—त्यांचे भाषांतर केल्यावाचून या देशांत सार्वत्रिक उपयोग होण्यासारखा नाहीं, या दृष्टीनें श्री० सदाशिव कृष्ण फडके, वकील यांनीं हातीं घेतलेले काम महाराष्ट्रास खरोखर अत्यंत उपयुक्त असे होणार आहे.

७ श्री० फडके हे 'नवयुगधर्म' या नांवाचा हा जो ग्रंथ तयार करीत आहेत त्याचे किती प्रचंड व व्यापक स्वरूप आहे हे ग्रंथातील प्रस्तावनेवरून दिसून येईल. या पुस्तकाचे एकदर चार खंड प्रसिद्ध होणार असून प्रसिद्ध झालेल्या प्रथम खंडात ब्राह्मसमाज व देवसमाज यांचा विवेचक इतिहास दिलेला आहे. द्वितीय खंडांत प्रार्थनासमाज व थिऑसफी या संस्थाचा असाच विवेचक इतिहास येऊन तृतीय खंडात या देशांत झालेल्या सनातन वैदिक धर्माभिमानी साधुसंताचे विचार संकलित करण्यांत येणार आहेत, आणि अखेरच्या चतुर्थ खंडात धर्मासंबंधीं अनेक महत्त्वाच्या मुद्द्यावर विवेचन करून काहीं विधायक सूचनाही करण्याचा ग्रंथकर्त्याचा मानस आहे.

८. त्याचप्रमाणे या एकंदर ग्रंथांत वरील विवेचक इतिहासाखेरीज गेल्या शंभर वर्षांत आपल्या देशांत झालेल्या प्रमुख धार्मिक चळवळींचा इतिहास देऊन प्रामाण्यवाद, अधिकारवाद, द्वैताद्वैतवाद, मायावाद, ध्येयवाद, पुनर्जन्मवाद, पुरुषार्थप्रारब्धवाद, साधनवाद, वर्णाश्रमवाद, अवलोन्नतिवाद, धर्मैक्यवाद, इत्यादि अनेक महत्वाच्या विषयाचा ऊहापोह होणार आहे. याशिवाय आपल्या ग्रंथात ग्रंथकार आधुनिक काळांतील धर्मसंरक्षक, सुधारक व प्रवर्तक यांचे ग्रंथरूपानें संमेलन भरविणार असून त्या संमेलनासाठीं सनातनी हिंदु, ब्राह्मसमाजी, प्रार्थनासमाजी, आर्यसमाजी, श्रीरामकृष्ण-विवेकानंदी, थिऑसोफिस्ट, देवसमाजी इत्यादि प्रमुख अशा धर्मपंथांचे गत व विद्यमान प्रतिनिधि येणार आहेत. ग्रंथकाराच्या भाषेत सांगावयाचे असल्यास वाचकास महाजनांचा हा मेळा केवळ अपूर्व आहे असे खचित वाटेल.

९. प्रथम-खंडाचे चार भाग असून चौथ्या भागाच्या २१ व्या प्रकरणापर्यंत ब्राह्मसमाजाची अत्यंत सविस्तर व फारच मनोरंजक अशी माहिती दिलेली असून पुढे देवसमाजाची त्रोटक माहिती देऊन ब्राह्मधर्म व देवधर्म यांची तुलना केली आहे. ब्राह्मसमाज आणि सनातनधर्म यांत साम्यापेक्षां भेदच विशेष दिसून येईल. ब्राह्मसमाजाच्या तत्त्वज्ञानाचे थोडक्यांत वर्णन करणे झाल्यास त्यांत द्वैतवादाचा पुरस्कार केला असून मायावादाचा विरोध केला आहे. हेगेलच्या आयडियालिझमची त्या तत्त्वज्ञानावर छाया पडली असून सापेक्षवाद, विषय-विषयीभावाचे नित्य द्वैत, क्रमोत्कर्षवाद, जीवाची अनंत उन्नति, ईश्वर आणि ब्रह्म एकच, परोक्षज्ञान हाच सहजयोग, जीव आणि ईश्वर यांचें नित्यभिन्नत्व, प्रपंचाचा गौरव, वगैरे मुद्दे ब्राह्मसमाजाच्या तत्त्वज्ञानांत दिसून येतात. यांतील प्रत्येक मुद्द्याचा सविस्तर परामर्ष घेऊं लागल्यास त्याचा एक निराळाच ग्रंथ होईल.

१०. ब्राह्मसमाजाचे ब्रह्मसाधनाचे मार्गही असेच बहुतेक एकांगी आहेत. ते म्हणजे निराकाराची उपासना, प्रपंचासच परमार्थरूप मानून चालणे, सामुदायिक ध्यानधारणा, प्रेम आणि लोकसेवा, मूर्तिपूजाविरोध, ईश्वर हा सर्वांचा पिता आणि आपण सर्व जीव हे एकमेकांचे बंधु, ही भावना, वैराग्याची अनास्था, प्राचीन संप्रदाय व परंपरा यांची अमान्यता इत्यादि होत.

११. ब्राह्मांचे सामाजिक विचार हेही आपल्या परंपरागत विचारांशीं पुष्कळांशीं न जुळणारे आहेत. वर्णाश्रमसंस्थेचा विरोध, ब्राह्मणां-विषयीं तिरस्कार, मिश्रविवाह, प्रीतिविवाह, पूर्ण स्त्रीस्वातंत्र्य, स्त्री-पुरुषांच्या शिक्षणाची एकरूपता, सहभोजने वगैरे उपाय अमलांत आणल्याने समाजसुधारणा होईल असें ब्राह्मसमाजाचें मत आहे; इतकेंच नव्हे, तर कट्टे ब्राह्मसमाजिस्ट आपणांस हिंदुही म्हणवून घेण्यास तयार नाहींत. इतका दूरीभाव ब्राह्म व सनातनी यामध्ये झालेला आहे. मौज अशी कीं, प्रथमपासूनच ब्राह्मसमाजाचा पाश्चात्य तत्त्वज्ञानाकडे

विशेष ओढा असून त्या तत्त्वज्ञानाच्या आधारावर अगोदर आपल्या विचारांच्या दिशा ठरवून मग त्या दिशेला अनुकूल होईल असे उपनिषदादि ग्रंथांचे अर्थ लाविले जातात. म्हणजे पाश्चात्य तत्त्वज्ञानाला प्राधान्य देऊन ब्राह्मसमाजांत हिंदु तत्त्वज्ञानाला गौणस्थान दिलें गेले आहे; आणि अशा स्वरूपाचा ब्राह्मधर्म हाच सार्वत्रिक धर्म होऊं शकेल अशी महत्त्वाकांक्षा ते बाळगितात. आपल्या तत्त्वज्ञानाचे शिक्षणही पुष्कळसे ब्राह्मसमाजिस्ट आस्थापूर्वक घेत नाहीत; एवढेच नव्हे तर प्रस्थानत्रयीचा खोल अभ्यास न करतां हिंदुधर्माबद्दल विशिष्ट मतेदेखील बनविलीं जातात; मग तीं बरोबर असोत वा चुकीचीं असोत.

१२. ब्राह्मसमाजाबद्दल आणखी पुष्कळ विवेचन करितां येण्यासारखें आहे; परंतु ते कालाच्या अभावीं करता येणे शक्य नाहीं. ज्याला याबद्दल सविस्तर माहिती पाहिजे असेल त्याने 'नवयुगधर्म' हा ग्रंथच समग्र लक्षपूर्वक वाचला पाहिजे. तरी पण सामान्यतः कल्पना येण्यासाठीं खालील मुद्द्यांचें येथे दिग्दर्शन करणे इष्ट वाटते.

१३. ब्राह्मसमाजावर पाश्चात्य तत्त्वज्ञानाची छाप पडून कांहीं बाबतींत ख्रिस्ती मतेंच ब्राह्मसमाजाने उचललीं याचें कारण इंग्रजांशीं प्रथम संबंध झाला तेव्हां व तत्पूर्वी बंगाली लोकाची धार्मिक व सामाजिक स्थिति अगदीं खालावली होती व इंग्रजांसारखे सुसंघटित, मुत्सद्दी आणि स्वार्थी लोक शास्ते झाले त्यामुळे बंगाली लोकांचे डोळे दिपून पाश्चात्त्यांचे जेवढे असेल तेवढें ग्राह्य अशी साहजिक इंग्रजी शिकलेल्या लोकांची भावना झाली. बंगाली लोकांची त्या वेळीं धर्मदृष्ट्या किती हीन दशा झाली होती याचें मार्मिक वर्णन प्रथम-प्रकरणांत आढळून येईल. वंगीय लोकांतील धार्मिक आचारांचें निर्भेळ वैदिक स्वरूप जाऊन त्यांत बौद्ध, इस्लामी व हिंदी अशा धर्मांचा संकर झाला होता, भाविक लोकांचे तोंडीही गंगास्नानाचे वेळीं गंगाष्टकाऐवजीं दाराबगाझीचे दोहरे येऊं लागले; रामप्रसादाचे देवी-गीताबरोबर जानबालीखानाचे गजल सुरू झाले. जलाली फकीर हिंदूंचे गुरु

झाले. चहूंकडे सत्य-पीराच्या पूजा होऊं लागल्या वगैरे वर्णन वाचून वाचकांच्या मनांत अनेक विचार उत्पन्न होतात (पृष्ठ २५–२८). ब्राह्म-समाजाचे स्थापक राजा राममोहन राय हे पाश्चात्य तत्त्वज्ञानाच्या, ख्रिस्ती मताच्या व इंग्रजी चाली रीतींच्या प्रथम प्रथम तरी किती आहारीं गेले होते हे तर या ग्रथांत जागोजाग दिसून येईल (पहा–पृष्ठ ४२–४३, ४४–४५,५७–५८,७४ ते ८५). राजा राममोहन राय यांनीं स्थापिलेल्या हिंदु कॉलेजात डेरोझीयो या नांवाचा प्रोफेसर आला असता त्याच्या नादाने जी 'तत्त्वविचारमंडळ' नावाची संस्था स्थापिली गेली होती, त्या संस्थेतील सभासदानीं मत व विचारस्वातंत्र्याच्या गोडस नांवाखाली जे अनेक धार्मिक अत्याचार केले–विशेषत: ख्रिस्ती झालेल्या एका बानर्जी नांवाच्या इसमाच्या नेतृत्वाखालीं कांहीं हिंदु म्हणविणाऱ्या विद्यार्थ्यांनीं स्वतः यथेच्छ गोमास खाऊन हातांत गोमांसाचे तुकडे घेऊन भर रस्त्यांत धार्मिक हिंदूंचे घरांत ते तुकडे फेकून देण्याचा जो प्रकार वर्णन केलेला आहे, तोही वाचण्यासारखा आहे. मूर्तिपूजा-खंडनाचे चौथे प्रकरणही वाचण्यासारखे आहे. त्यावरून राममोहन राय याचे मूर्तिपूजेवरील विचार कळून येतात (पृष्ठ ४६–५५). ब्राह्मसमाजाचे अत्यंत विख्यात सभासद महर्षि देवेंद्रनाथ यांनी ब्राह्मधर्ममताचे १२ सिद्धान्त दिले आहेत (पान १८२). त्याच-प्रमाणे श्री० राजनारायण बोस यांनीं ब्राह्मधर्म म्हणजे काय या विषया-वर व्याख्यान दिले आहे (पृष्ठ १८६). त्यावरून ब्राह्मसमाजाची पुष्कळच कल्पना वाचकास येईल. लहानपणीं अत्यंत व्यसनी असतांही आपल्या दृढ प्रयत्नाने व्यसनांतून मुक्त होऊन पुढे थोर पदवीस चढलेल्या राजनारायण बोसांचा वृत्तान्त खरोखर वाचनीय आहे. सुधारणेच्या नांवाखालीं एकादी हुल्लड उठली असतां समजस लोकदेखील विक्षिप्त-पणाचीं कृत्ये करूं लागतात; व त्या योगाने जुन्या मतांच्या धर्मनिष्ठ लोकांच्या भावना कितीही दुखावल्या गेल्या तरी त्याची ते पर्वा करीत नाहींत, हें श्री० केशवचंद्र सेनांच्या 'ब्राह्मधर्मानुष्ठान' या पुस्तकाच्या

वाचनानें आपली जानवीं तोडून टाकण्याचे जे खूळ निघाले होतें व राखालदास हलधर या नांवाच्या एका इसमाने आपले जानवें तोडलेले पहातांच त्याच्या बापाने दुःखभरांत आत्महत्या करून घेतली याबद्दलचें वर्णन वाचून कळून येईल ( पृष्ठ २०६ ). पं० ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्यासारखा अत्यंत विद्वान्, प्रेमळ, उदार, चारित्र्यवान् व कोमल अंतःकरणाचा गृहस्थही एकाद्या मताचें वेड डोक्यांत शिरल्यावर काळजाला घरे पाडणारे शब्द कसे बोलूं शकतो याचे उत्तम उदाहरण पृष्ठ २१७-२१८ मध्ये 'बाळे तूं दीर्घायु होवोस, तुला चांगला पति मिळो; पण तुला वैधव्य येऊन तुझा पुनर्विवाह करण्याची संधि मला मिळो' असा एका मुलीस त्यानीं दिलेला आशीर्वाद (?) हे होय ! शास्त्रीय मर्यादा सोडून केवळ बुद्धिबलावरच सुधारणा करूं लागले असतां त्याला कसलाही धरबंध राहात नाहीं व एकापेक्षां एक वावदूक उत्पन्न होऊन त्या संस्थेत कशी फूट पडत जाते, हे महर्षि देवेंद्रनाथ व श्री० केशवचंद्र सेन यांच्या मतभेदावरून दिसून येईल. ब्राह्मसमाज स्थापन झाल्यावर बरींच वर्षेपावेतो, त्या समाजातील प्रमुखाचा खिस्ती मताकडेच कसा ओढा होता व आमच्या रामकृष्णादि विभूतींपेक्षां येशू खिस्त व बायबल यांजबद्दल त्याच्या मनांत विशेष आदर कसा वसत होता हे श्री० केशवचंद्र सेन याच्या १८६६ मधील 'येशू खिस्त, आशिया व युरोप' या व्याख्यानावरून स्पष्ट दिसून येईल (पृष्ठ२२९). हे सर्व लिहिण्याचा रोख राजा राममोहन राय, श्री० केशवचंद्र सेन वगैरे पुरुष केवळ सामान्यबुद्धीचे व परप्रत्ययनेय होते असा दाखविण्याचा नसून अत्यंत थोर, विचारी, स्वार्थत्यागी व कर्तबगार माणसांचीही पाश्चात्य तत्त्वज्ञानाने कशी दिशाभूल होते हे दाखविण्याचा आहे, येवढी गोष्ट सोडून दिली, तर उपरिनिर्दिष्ट पुरुषांचे शील, चारित्र्य, विद्वत्ता, स्वार्थत्याग, धैर्य, निस्पृहपणा वगैरे सद्‌गुण खरोखर वाखाणण्यासारखे असून सर्वांनीं या सद्‌गुणांत त्यांचे अनुकरण करावें असे आहेत. त्यांचीं कांहीं मतें जरी चमत्कारिक अशीं वाटलीं

तरी ते अत्यंत प्रामाणिक व आपल्या राष्ट्राचा उद्धार व्हावा अशी तळमळ लागलेले थोर पुरुष होते यांत शंका नाहीं व ही गोष्ट निरंतर डोळयापुढें ठेवूनच वाचकांनीं हा ग्रंथ वाचावा. कळविण्यास संतोष वाटतो कीं, श्री० फडके यांनीं हीच दृष्टि ठेवून ब्राह्मसमाजाचा इतिहास लिहिला आहे. असो. यांतील आणखी अशींच निवडक स्थळें देतां येतील; परंतु कालाभावामुळे तसे करणे अशक्य आहे. पुढे या ग्रंथांत कविसम्राट् रवींद्रनाथ टागोर यांची, त्यांच्या शांतिनिकेतनाची व गीताञ्जलि वगैरे काव्यांची फारच सुंदर माहिती दिली आहे. त्यानंतर चवथ्या भागात ब्राह्मांचे तत्त्वज्ञान, प्रामाण्यवाद, प्रामाण्यविचार, शास्त्रविचार, ब्राह्म-मतदर्शन, सुधारणा, ईश्वरपरायणता वगैरे प्रकरणें असून याच भागांत देवसमाजाची त्रोटक माहिती दिलेली आहे; व त्याची ब्राह्मसमाजाशीं तुलना केली आहे. पुढे समन्वय, ब्राह्ममत-समीक्षा, वगैरे प्रकरणे फारच सुंदर असून शेवटच्या प्रकरणांत या एकंदर खंडाचा उपसंहार केला आहे व पुढे श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या 'आतां विश्वात्मके देवें' वगैरे प्रासादिक काव्यमय भाषेंत हा ग्रंथ संपूर्ण केला असून परिशिष्टांमध्ये भाषांतरासह काहीं सुंदर ब्राह्मगीते दिलीं आहेत.

१४. येणेप्रमाणें या ग्रंथाचे थोडक्यांत स्वरूप आहे. ग्रंथांतील विवेचनावरून श्री० फडके यांची जिज्ञासा केवढी आहे व त्यांना ग्रंथांतील माहिती मिळविण्यास व ती साधक-बाधक विवेचनासह जनतेपुढे मांडण्यास किती परिश्रम पडले असतील याची हा ग्रंथ वाचल्यावाचून यथार्थ कल्पना येणार नाहीं. धर्मविवेचनासारखा रूक्ष विषय आणि त्याची ऐतिहासिक दृष्ट्या मांडणी करणे हें अत्यंत कठीण काम आहे; परंतु तें काम ग्रंथकार श्री० फडके यांनीं फारच यशस्वी रीतीनें पार पाडलें आहे यांत शंका नाहीं. शिवाय ग्रंथांतील भाषा अतिशय सुंदर व चित्ताकर्षक असून ग्रंथकाराचें वर्ण्य विषयाशीं अगदीं तादात्म्य झालें असल्यानें सर्वच ग्रंथ मनोरंजक झालेला आहे.

कांहीं स्थलें तर अत्यंत हृदयंगम झालेलीं आहेत व त्यांवरून ग्रंथकाराचें भाषाप्रभुत्व, वर्णन करण्याची चित्ताकर्षक शैली व चिकित्सक बुद्धि हे सद्‌गुण विशेष रीतीनें दिसून येतात. हा ग्रंथ खरोखर सर्व महाराष्ट्रीयांनीं एकवार तरी अवश्य वाचण्यासारखा आहे. सारांश, हा ग्रंथ लिहून श्री० फडके यांनीं महाराष्ट्र-वाङ्मयांत फार मोठी भर घातलेली आहे. या पुढील खंड असेच चित्ताकर्षक, उपयुक्त व जनतेच्या विचाराला इष्ट अशी चालना देणारे निघतील अशी हा प्रथम खंड वाचून आशा वाटते. महाराष्ट्रीय जनता अशा इष्ट कार्याला प्रोत्साहन देऊन ग्रंथकाराच्या परिश्रमाचें चीज करील व त्याला आपल्या ग्रंथाचे पुढील खंड लवकर प्रकाशित करण्यास उत्तेजन देईल अशी उमेद आहे.

१५. श्रीभगवत्पूज्यपादाचार्य श्रीचरणांच्या पुण्यस्मरणार्थ ग्रंथ अर्पण करितांना श्री० स. कृ. फडके यानीं “ हा ग्रंथ ज्या दृष्टीने लिहिला आहे त्या अद्वैत वेदान्तशास्त्राचे प्रणेते ” असे जे विशेषण दिलें आहे त्यावरून आणि प्रस्तावनेच्या शेवटीं “ श्रीशंकराचार्य पुण्यतिथि ” असा जो उल्लेख बुद्धिपुरःसर केला आहे त्यावरून ग्रंथकर्त्यांची श्रीचरणाविषयीं किती भावना आहे ती सहज व्यक्त होते. भक्ताभिमानी अशा त्या श्रीचरणांनीं ग्रंथकर्त्यावर पूर्ण कृपा करून त्यांचेकडून अशीच लोकोपयुक्त सेवा उत्तरोत्तर अधिकाधिक प्रमाणाने घ्यावी अशी प्रार्थना आहे.

वास्तव्य : नगर,<br>आश्विन शुद्ध १५ शके १८४९

**श्रीविद्याशंकर भारतीस्वामी**

वरीलप्रमाणें श्रींकडून आणि ग्रंथाच्या अखेरीस दिल्याप्रमाणें संतसज्जनांकडून झालेल्या कृपेच्या अमोघ वर्षावानें मी इतका गांगरून गेलों आहें कीं, ह्या किंकरानें श्रीसद्गुरूंच्या पादरजांत कोठें दडून बसावें तेंही सुचत नाहीं ! कारण श्रीसद्गुरुचरणांच्या आश्रयाचेंच हें सारें कर्तृत्व आहे. श्रीज्ञानेश्वरांनीं रेड्याकडूनही वेद बोलविले. तेव्हां श्रींच्या आशीर्वादाप्रमाणें श्रीभगवत्पूज्यपादाचार्य श्रीचरणांनीं श्रीसमर्थांचें लेंकरूं म्हणून ह्या पामरावर पूर्ण कृपा केल्यास अशक्य तें काय आहे ! खरोखर महतांच्या ह्या उपकारांतून शब्दांनीं उतराई कसें व्हावें ह्या बिकट प्रश्नांतूनच पुढील खंडाच्या उपोद्घाताचा प्रवाह प्रगट होऊं पहात आहे ! श्रीसद्गुरु काय घडवतील तें खरें !

हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यापूर्वीं ह्याच्यासंबंधीं विशेषेंकरून अब्राह्म अशा महाराष्ट्रीय विद्वानांचें काय मत पडतें व त्यांच्याकडून काय सूचना येतात तें अजमावून पाहण्याकरितां कित्येक विद्वानांकडे कांहीं प्रति पाठविल्या. त्यांतून ज्यांच्याकडून आशीर्वाद व अभिप्राय आले ते सर्व ग्रंथाच्या अखेरीस दिले आहेत. त्या अभिप्रायांत अनुकूल-प्रतिकूल अशी वगळ केली नाहीं. हेतु हा कीं, ह्या ग्रंथवर्णनांत मीं ज्याचा अभिमान धरला आहे तो पंथ उपोद्घाताच्या आरंभींच्या सिद्धान्तवाक्याप्रमाणें आजच्या महाराष्ट्रीय **महाजनां**ना कितपत मान्य आहे ह्याचाही या ग्रंथांतच दाखला राहावा. अशा रीतीनें केलेल्या योजनेंत कित्येक विद्वानांकडे बांधलेल्या प्रति संपल्यामुळें ग्रंथ पाठवितां आला नाहीं; आणि कित्येकांकडे पाठविला असूनही तो वाचून पाहण्यास त्यांना पुरेसा वेळ न मिळाल्यामुळें त्यांच्याकडून अभिप्राय आले नाहींत. तरी वरीलप्रमाणें ज्या थोर पुरुषांनीं आशीर्वाद पाठविण्याची कृपा केली व ज्या थोर विद्वानांनीं ग्रंथ वाचून आस्थापूर्वक अभिप्राय पाठविण्याची तसदी घेतली आणि प्रोत्साहन दिलें त्यांचा मी फार फार आभारी आहें. द्वितीयखंड प्रसिद्ध करण्याचा सुयोग येईल तेव्हां त्यांनीं केलेल्या सूचनांचा मी अवश्य विचार करीन.

—**ग्रंथकार**

॥ श्रीसमर्थ ॥

# उपोद्घात

तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्नाः ।
नैको ऋषिर्यस्य मतं प्रमाणम् ॥
धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां ।
महाजनो येन गतः स पन्थाः ॥ १ ॥



ग्रंथाच्या आरभी ग्रथ लिहिण्याचा प्रसग कोठचा, त्याचें प्रयोजन काय, त्याचे विशेष स्वरूप ते कोणते व त्यात अपूर्वता ती कोणती. इत्यादि गोष्टींचे दिग्दर्शन करण्याची रीत आहे. त्या रीतीस अनुसरून आज देशस्थिति कोणत्या प्रकारची आहे, लोकांची मने कोणत्या विषयांनी व्याप्त आहेत, चाल् काळाचे वैशिष्टय काय आहे, एका बाजूस जीवनार्थ कलह व दुसरे बाजूस मतामताचा गलबला सुरू असतां जिज्ञासूस युगधर्म जाणण्यास साधन कोणते, प्रामाण्य काय, धर्मसबधी आज लोकांच्या भावना कशा प्रकारच्या आहेत, आजकालचे ह्या देशांतील धर्मात्मे पुरुष व धर्मसंस्था ह्यांच्या शिकवणींत कितपत सगति दिसते, निरनिराळ्या पथांतील भेद व एकमेकाविषयीं असहकारित्व कसे वाढत आहे, ह्या सर्व गोंधळांतून पुढील मार्ग कसा काढावा, तो काढण्याची जबाबदारी हिंदुसमाजांत प्राधान्येकरून कोणावर येते व ती त्यांनी कशी पार पाडावी, अशा कित्येक चिंतनीय प्रश्नांचे ह्या उपोद्घातांत केवळ दिग्दर्शन करून त्याचेच विस्तृत विवेचन पुढें भागशः करावयाचें आहे.

अगदीं थोडक्यांत म्हणावयाचे तर " नवयुगधर्म " हें ह्या ग्रंथाचे नांव आहे. यावरून हिंदुस्थानांतील आधुनिक धार्मिक चळवळींचा इतिहास हा ह्यांतील विषय आहे हे उघड होय. व्यक्तीच्या किंवा राष्ट्राच्या प्रपंचांत गढलेल्या माणसांना ही माहिती मिळविण्यापुरतें स्वास्थ्य नाहीं, हेंच ह्या ग्रंथाचे प्रयोजन आहे आणि अशा प्रकारची माहिती एके ठिकाणी दिलेली निदान मराठींत तरी दुसरी कोठे नाहीं, हीच ह्याची अपूर्वता होय. तरी ह्याच गोष्टी वाचकाचे मनांत स्पष्टपणे याव्या ह्यासाठीं ह्यांचे थोडे अधिक विवेचन केलेले बरे.

सकृद्दर्शनी असे दिसते की, आजचा मनु राजकारणाचा आहे. यास्तव आपल्या देशातील सर्व समजस स्त्री-पुरुषानीं आपल्या बुद्धीचा व्यय दुसऱ्या कोणत्याही व्यवधानांत न करितां परकीयांच्या हाती गेलेला स्वराज्याचा किल्ला परत हस्तगत करून घेण्यासाठी सर्वांनी आपले बुद्धिसर्वस्व खर्च करावें. एकदां स्वराज्य मिळाले कीं, धार्मिक-विचारांचे घरगुती प्रश्न सावकाश सोडवितां येतील. जोपर्यंत राजशासन परधर्मीयांच्या हातीं आहे तोपर्यंत धर्मशासनाची सारी काथ्याकूट व्यर्थ होय. त्यांची अमलबजावणी कोण करणार? स्वराज्यावांचून स्वाराज्यसिद्धि कशी व्हावी ? भुकेल्या माणसापुढे वेदान्तचर्चा काय कामाची ! पारतंत्र्याच्या दैन्यांत खितपत पडलेल्या अभाग्यांनीं स्वानंद-साम्राज्याची आशा बाळगणे हास्यास्पद नाहीं काय ? मनःकल्पित भवबंध मनाच्या स्वास्थ्यानंतर केव्हांतरी सुटेल, पण आज साऱ्यांचे मनःस्वास्थ्य बिघडविणारी ही पारतंत्र्याची बेडी अगोदर तुटली पाहिजेना. जवळ जवळ अशाच विचारसरणीने नाना दर्जाचीं व विचारांची माणसे राजकारणाच्या आखाड्यांत आज नसलीं, तरी पाच वर्षांपूर्वी सन १९२०।२१ साली, उतरलेलीं दिसली. तेव्हां लक्ष्मीपुत्रांनी सुखलालसा सोडली, शारदोपासकांनीं विद्याव्यासंग सोडला, आचार्यांनी धर्मपीठे सोडली, संन्यस्तांनीं निवृत्तीचा त्याग केला, स्त्रियांनीं पडदा सोडला, आणि वंदेमातरंच्या युद्धघोषांबरोबर राजकीय रंगणांत एकच गर्दी झाली. पण ती गर्दी आज बरीच ओसरली आहे. आणि सारा हिंदी समाज आपल्या भवितव्यतेबद्दल पुन्हा दिङ्मूढ होऊन बसला आहे.

अशा स्थितींत धर्माच्या निशाणाखालीं आपआपलीं पथके संघटित करण्याचे

उद्योग कोठें कोठें सुरू झाले आहेत, तर कोठे धर्मावर वाग्बाण फेंकण्यांत सव्यसाची अर्जुनासही कांहीं लोक मागे टाकीत आहेत. राजकीय चळवळींत " होय, मी राजद्रोह केला व पुढेही करीन " असे छातीठोक सांगणारे ज्वलज्जहाल जरी फार थोडे असले तरी त्यांच्या असंतोषाची छाया बहुजनसमाजावर पसरलेली आहे हे जसे नाकबूल करतां येत नाही, त्याप्रमाणे धर्मपरंपरेची उघड निंदा करणारे जरी तुरळक दिसून आले, तरी त्यांची विचारसरणी आजच्या बहुजनसमाजास सर्वस्वी अमान्य आहे, असे म्हणतां येणार नाही. किंबहुना असेही म्हणता येईल कीं, धर्माच्या उघड वैऱ्यापेक्षां त्या प्रच्छन्न शत्रूंपासूनच धर्मराज्यास अधिक भय आहे. सरहद्दीवरील संशयात्म्याच्यापेक्षा खंबीर नास्तिक बरे. दुःख व दैन्य याचे सातत्याने चांगली चांगली विचारी व कर्तृत्ववान् माणसेही कित्येक वेळा नास्तिक बनतात, असेही आपण पाहतों. वणव्यांत सापडलेल्या टोळधाडीप्रमाणे परवाच्या महायुद्धात झालेली प्राणहानि पाहिली, किंवा त्या युद्धमथनातून निघालेल्या चौदा तत्त्वांचे उन्मत्त राष्ट्रांनीं बिनदिक्कत केलेले खून मनात आले की, सर्व अत्याचार उघड्या डोळ्यांनीं पाहाणाऱ्या सर्वज्ञ व सर्वशक्तिमान्, दयाळू व न्यायी, अशा परमेश्वराचा कोणास असंभव वाटल्यास त्यात नवल काय? तसेच देशो-देशीचे भूकंप, जलप्रलय, अग्निप्रलय, भयंकर जीवनकलह, महर्गता आणि चहूकडे माजलेले लढे ह्या संकटांमुळे जगिक अराजकत्वाच्या मताला ऊत येऊन त्या त्या संप्रदायांतील माणसे ईश्वरावरील निष्ठा सोडतात व स्वताचे हिंमतीवर लोकसंग्रहात्मक बुद्धीने एकाद्या महत्कार्यास लागतात; तेव्हां त्यांपैकीं कित्येकांस धर्म ही बाब अत्यंत तिरस्करणीय व घातुक अशी वाटूं लागते. अखिल मानवजातीच्या प्रगतीस धर्माने मोठाच धक्का दिला असे ते मानतात. मानवजातीच्या बंधुभावांत ह्या धर्मानेच वितुष्ट पाडले, ह्या धर्मांचे पायींच विद्वानांचा अनेक वेळां छळ झाला आणि मनुष्याच्या विचारस्वातंत्र्यावर घाला पडला. धर्मानेच स्त्रीवर्गाच्या अर्ध्या जगास दैन्य व अज्ञानांत डांबलें. ह्या धर्माच्या नावावर लाखो भिकारी व बैरागी परोपजीवि झाले, आणि कोट्यवधि अस्पृश्य साध्या माणुसकीसही मुकले. जगांतील मूर्खपणाच्या आचारांस कारण हे धर्मवेड आहे. त्यांतही हिंदुस्थानां-तील वेदान्त्यांचा मायावाद आणि वैष्णवांचा भक्तिमार्ग यांनीं तर लोकांस

निष्क्रिय आणि नादान करून टाकले आहे. सत्य, अहिंसादि अव्यवहार्य अशा धार्मिक तत्त्वांचीं पारायणें करून या जगांत आमचा निभाव कसा लागावा! येथे जशास तसें इतकेंच काय पण शेरास सव्वाशेर हाच एक न्याय उपयोगाचा आहे. जेथें बुद्धीच्या व पराक्रमाच्या जोरावर कांहीं लोक दुसऱ्या लोकांचा पाडाव करीत आहेत असें आपण प्रत्यक्ष पाहातो, तेथें नसत्या देवधर्माचे मार्गे न लागतां स्वप्रयत्नानें आपल्या आंगांत अतिमानुष शक्ति संपादित करणें हेंच खरें पौरुष आहे. बलावांचून कोणी कोणाला दबत नाहीं. येथे धर्माचरण काय करणार! आम्ही रोज संध्यावंदन केलें, जप केले, तप केलें, पंचयज्ञ केले किंवा भजन केलें, तर त्यायोगानें आम्ही स्वराज्यास पात्र झालों असें इंग्रजांचें पार्लमेंट थोडेंच म्हणणार आहे! उलटपक्षीं आम्हीं आपले भिन्न धर्मपंथ सोडले, वर्णभेद मोडून टाकले, मिश्र-विवाह जारीनें सुरू केले, खाद्यपेयांचे निर्बंध झुगारून दिले, तर भारतवर्षाची एकी होण्यास कितीसा वेळ लागेल आणि तशी एकी झाल्यावर स्वराज्य तें किती दूर? किंबहुना या अशा एकीहून स्वराज्य वेगळें तें काय?

परदेशातील लोकांच्या अभ्युदयाकडे पाहून अधीर झालेली मनें या अशा सुखापेक्षक कर्मवादांनीं भारून गेलीं आहेत. आणि खरोखर लोकांच्या मनानीं अधीर तरी कां न व्हावें? गेल्या हजार वर्षांच्या इंग्लंडच्या व हिंदुस्थानच्या इतिहासाकडे वरवर पाहिलें तर स्वातंत्र्यसूर्यानें पश्चिमेस नित्य उदित असावें, आणि पूर्वेकडील परप्रकाशित चंद्रानेंही कलाहीन होतां होतां अखेर अमावास्येच्या अंधारांत आम्हांस चाचपडत ठेवावें, असाच कांहींसा प्रकार आज दिसतो! मग निराशेच्या मसूर अंधारांत स्वातंत्र्यसूर्याच्या उदया-कडे लागलेले डोळे-'धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां'- अशा गूढ धर्मतत्त्वाकडे कसे लागणार! पांघरुणानीं गुरफटलेला मनुष्य जसा प्राणवायूसाठीं तडफडूं लागतो, तसा पारतंत्र्यानें झाकलेला हिंदी समाज आज एका अभ्युदयासाठीं तळमळत आहे!

परंतु या भारतवर्षातील क्रांतीचें केंद्र धर्मविचारांत आहे, राजकारणांत नाहीं, असेंही कित्येक विचारी पुरुषांचें मत आहे. महाराष्ट्रांतील सतराव्या शतकांतील स्वराज्याच्या चळवळीचे प्रवर्तक श्रीसमर्थ रामदास यांनीं सुद्धां चळवळीला भगवंताचें अधिष्ठान पाहिजे असेंच सांगितलें. आणि तत्पूर्वींही

भरतखंडांत अद्‌भुत क्रांति घडवून आणणाऱ्या आद्य शंकराचार्यांनींही 'जगतः स्थिति कारणं अभ्युदयनिःश्रेयससाधनो धर्मः'. असेंच धर्माचें लक्षण बांधलें. अर्वाचीन काळींही ब्राह्मसमाज, रामकृष्णमिशन, थिऑसफी इत्यादि आधुनिक संस्थांनीं धर्मविचारासच पहिलें स्थान दिलें आहे. आणि आजच्या बिकट प्रसंगीं वरील संस्थांनीं शतसांवत्सरिक, अर्धशत-सांवत्सरिक अशा समारंभाच्या मिषानें आपापल्या कार्यांचा आढावा काढण्याचा उपक्रम सुरू केला असून. त्या त्या संस्था आपलें धोरण निश्चित करीत आहेत. तसेंच पूर्वपरंपरेंतील हिंदु-महा-सभा, सनातन-धर्मो-ज्जीवनी सभा, ब्राह्मण्यसंरक्षक-सभा. वेदशास्त्रोत्तेजक सभा इत्यादि संस्थांचेंही धर्मविचार जोरानें सुरू आहेत. अशा रीतीनें या भरतखंडांतील विचारसागरा-वर एका बाजूस धर्मोदासिन्याचा खळगा पडलेला दिसत आहे, तर त्याच्या अलीकडे धर्मजागृतीची एक प्रचंड लाटही हळुहळू उभारत आहे, असें दिसतें. ही लाट आजपर्यंत कचऱ्याप्रमाणें तुच्छ लेखलेल्या अस्पृश्यांस पोटांत घेते कीं काय, ती जाती व पोटजाती यांच्यामधील मर्यादा वाळू-वरील रेघांप्रमाणें धुवून काढते कीं काय, ही हिंदु-मुसलमानांचे व ब्राह्मण-ब्राह्मणेतरांचें तट्याचे खडक झाकते कीं काय आणि अखेर हीच लाट हिंदी-अॅटलांटिक महासागरांची जोड करून रंगभेद, वर्णभेद, धर्मभेद, जित-जेते-भेद इत्यादि भेदांची आकाशभेदी उत्तुंग शिखरें आपल्यांत विरविते कीं काय, तें अद्याप पहाणें आहे.

भविष्यवाद्यापुढें पूर्वपश्चिमेच्या कुंडल्या बराच काळ पडलेल्या आहेत. कोणी त्यांत प्रीतिखडाष्टक येतें असें सांगतात, तर कोणाच्या नजरेंत त्यांचें मधुमीलन दिसतें. पौर्वात्यांची निरपेक्ष कर्तव्यबुद्धि तर पाश्चात्त्यांची जन्म-सिद्ध हक्कांची मागणी, एकाची साधु वृत्ति तर दुसऱ्याचा पुरुषार्थ, एकाची सदसद्‌विवेकबुद्धि तर दुसऱ्याचा मताधिकार. एकाची राजशाही तर दुसऱ्यां-ची लोकशाही, एकाची वर्णव्यवस्था तर दुसऱ्याचा वर्णविद्वेष, एकाची कष्टाची भाकर तर दुसऱ्यांची यांत्रिक माया. एकाच्या दिव्य स्मृति तर दुसऱ्याचा आशावाद, एकाची भावना तर दुसऱ्याचा उद्योग, एकाची देवपूजा तर दुसऱ्यांची राष्ट्रपूजा, अशा उभयतांच्या वृत्ति अत्यंत भिन्न दिसतात. पौर्वात्यांची आत्मदृष्टि, आत्मिक बल. आत्मसंयमन व आत्मानुभव ह्यांचा

पाश्चात्यांच्या देहदृष्टि, धूर्तता, अविद्योत्कर्ष व विषयात्मकता, ह्यांच्याशीं सांधा कसा जमावा? शास्त्रीय कर्म व लोकसंग्रह, सत्यान्वेषण व व्यवहारकौशल्य, आध्यात्मिक ज्ञान व पाशवी शक्ति ह्यांचे साधक एकाच वर्गांत कसे यावे? इतकेंच काय पण पौर्वात्य सिद्ध आणि पाश्चात्य धर्मवीर, तसेंच पौर्वात्य द्रष्टे व पाश्चात्य प्रेषित ह्यांचा आध्यात्मिक दर्जा एकच ठरेल काय? स्त्रियांसंबंधीं विचार करतांही आपल्याकडील आदिमायेपासून गृहिणीपर्यंत अनादिसिद्ध स्त्रीसहकारित्व व शक्तिमत्व हे युरोप-अमेरिकेतील अबलोन्नतिवादाशीं विसंगत आहे असेंच म्हणावें लागणार नाहीं काय?

अशा या भिन्न धर्मीयांचे मधुमीलनाचा प्रभातकाल समीप आला आहे. आणि या अद्भुत संगमाचें हिंदुस्थान हेंच प्रयागतीर्थ होय, असे कित्येक आशावादी म्हणत आहेत! इतकेंच काय पण 'निद्रावश सौंदर्य चुंबनानें जागें होऊन अधिकच खुलावें त्याप्रमाणे हिंददेवी या मधुमीलनाने जागी होऊन आपल्या दिव्यसौंदर्याचा अधिकच विकास करणार आहे', असेही त्यांच्या भविष्यकालीन दृष्टीस दिसत आहे! आजचा काल कितीही आपद्ग्रस्त असला तरी जगाची चाल एकंदरींत अभ्युदयाकडेच आहे, असे ते मानतात. असे सोन्याचे दिवस खरोखरच कधी उगवणार असतील तर कोणास नकोसे आहेत! परंतु क्रमोत्कर्षवाद्यांची ही सुखाची आशा खरी ठरते की निवृत्ति-वाद्यांचे निराशेचें सुखच ध्येय ठरतें, ही गोष्ट अद्याप वादग्रस्त आहे. आमची निवृत्ति व त्यांची प्रवृत्ति याची बेरीज म्हणजे वास्तविक वजाबाकीच आहे. व या वजाबाकीत शेवटीं प्रवृत्ति अगर निवृत्ति उरते हे ठरणें दीर्घकालाधीन आहे; किंबहुना ते जगाच्या अंतापर्यंतही कधीं निश्चित ठरेल की नाही, याचीही शंकाच वाटते. आमची निवृत्ति ही आमच्या संस्कृतीशीं एकरूप नसून ती परिस्थितीनें उत्पन्न केलेली एक तात्कालिक लहर आहे; आणि ती अंशतः वैष्णवाचे मधुरभावाने व विशेषतः इंग्रजांच्या संसर्गानें व आर्य-ब्राह्मसमाजाच्या प्रयत्नानें कमी होत असून लोक अधिकाधिक उत्साही, सुखी व कार्यक्षम होत आहेत, असे एक ववघवीत चित्र कित्येक आशावादी रंगवीत असतात व कित्येक निवृत्तिवादी ते पुसूनही टाकतात. तथापि एवढे खरें कीं, आज तरी प्रवृत्तीने निवृत्तीला गिळण्याचा घाट घातला आहे खास. गीता व दासबोध

ज्यांनीं सांगितला त्यांचा हेतु त्यांत काय असेल तो तेच जाणोत; परंतु आज त्या ग्रंथांचा अर्थ पूर्णपणे प्रवृत्तिपर करण्याकडेच आधुनिक विद्वानांचा कटाक्ष आहे, यांत शंका नाहीं. आणि उपरिनिर्दिष्ट केलेल्या अर्वाचीन संस्था प्रायः नवशिक्षितांच्या असल्यामुळे त्या सर्व प्रवृत्तिप्रधान आहेत असे दिसतें. तथापि आजपर्यंत म्हणजे निदान गेल्या शतकापर्यंत जो हिंदुधर्म निवृत्तिप्रधान म्हणून गणला जात असे, तो या राममोहन-युगांत प्रवृत्तिपर कसा झाला व तो प्रवृत्तिपरच मानावयाचा तर आधुनिकानी मानलेल्या कोणत्या प्रवृत्ति ऊर्फ आचार धार्मिक ठरतात व कोणते अधार्मिक ठरतात, या गोष्टीचा सावधानतया विचार होणे अगत्याचें आहे.

धर्म आचारानींच रचलेला असतो. आचारांस रूढीने स्थैर्य येते. चांगल्या पायावर रचलेल्या इमारतीसही, दीर्घ कालानतर दुरुस्ती ही लागतेच. त्याप्रमाणे पूर्वसस्कृतीवर उभारलेल्या रुढींचे मधून मधून संशोधन होणे इष्टच असते; परंतु आपल्या देशातील गेल्या एकोणिसाव्या शतकातील राज्यक्रांतीनंतर स्वराज्याचे वैभवाची साक्ष देणारे किल्ले व वाडे जमीनदोस्त केल्याने जे नुकसान झाले नाहीं, ते आपल्या परंपरागत रूढींच्या खाली इंग्रजीविद्येनें पेरलेल्या सुरुंगाने घडवून आणले आहे. आणि नवलाची गोष्ट ही की, या गोष्टीची जाणीव तत्कालीन इग्रज मुत्सद्दयास जितकी त्यावेळीं होती, तितकी अजूनही आम्हा सर्वांस झालेली नाही. तात्पर्य, इग्रज मुत्सद्दी, इग्रज प्राच्यविद्यासंशोधक व इग्रज मिशनरी, याच्या तार्किक बुद्धीच्या संसर्गाने जितके आमचे हित झाले असेल, त्यापेक्षां कितीतरी पटीने अहित झाले आहे. याबद्दल भगिनी निवेदिता व मिसेस बेझंटबाई यांच्यासारख्या विदुषी इग्रज स्त्रिया व महात्मा गांधी याच्यासारखे निःपक्षपाती वक्ते याच्या उद्गारांवरून सहज खात्री पटते. बऱ्यावाईटाचा निवाडा देणारी व त्याची ओळख पटविणारी अखेरची कसोटी म्हणजे आपलीच बुद्धि हे खरे; पण ती बुद्धि गुहेप्रमाणे खोल व निर्विकार अशी असावी लागते. आज पाश्चात्त्याच्या संसर्गामुळे पूर्वपरंपरेतून सुटलेली नवशिक्षिताची तर्कटी बुद्धि, एकाद्या शीलभ्रष्ट स्त्रीप्रमाणें सदाचाररूप धर्माशीं पराङ्मुख कशी झाली, तात्पर्य, मथळ्यावरील श्लोकांत म्हटल्याप्रमाणे तर्क अप्रतिष्ठित कसा ठरला, ते गेल्या शंभर वर्षांचा

आपला इतिहास आपणांस स्पष्ट सांगेल; आणि या ग्रंथांतही ही गोष्ट अप्रत्यक्ष रीतीनें सिद्ध होईल.

आतां श्रुति व स्मृति अथवा स्मृतिकार यांच्यातील परस्परविरोध हा या ग्रंथाचा विषय नसल्यामुळे त्यासबंधी मथळ्यावरील श्लोकास अनुसरून येथे विशेष कांही लिहिण्याचे प्रयोजन नाही. राजा राममोहनराय व स्वामी दयानंद या दोघानीही आपापले पथ वेदांवरच उभारले खरे: परतु याचा अर्थ त्याची वैदिक वाङ्मयावर खरी निष्ठा होती, असा मुळीच नसून आपल्या म्हणण्यास लोकांची अनुकूलता मिळविण्यासाटीं त्यांनी ती एक शक्कल लढविली, असे अलीकडे माहितगार लेखक उघड म्हणू लागले आहेत. शिवाय गेल्या शंभर वर्षांतील सामाजिक सुधारणा व कायदा यांचा इतिहास लक्षांत घेतला, तसेच षोडश सस्कार व इतर सामाजिक आणि कौटुंबिक लहानमोठी धर्मकृत्ये यात झपाट्याने होत चाललेला सकोच व विपर्यास पाहिला, म्हणजे श्रुतिस्मृति व धर्मशास्त्र याचे प्रामाण्य फारच कमी झाले आहे हे उघड दिसते. वेदांचे अमोघत्व नाशावीत ठरवून ब्राह्माची बुद्धि वेदविद्येच्या सासुरवासातून जेव्हा सुटली त्यावेळी ब्राह्माना मोठा आनद झाला ! जेथे श्रुति-स्मृतींचा दाब नाहींसा झाला, तेथे पुराणोक्त धर्माला अशिक्षित स्त्रिया व काही सत्यसमाजांतून सुटलेले शूद्र याच्या शिवाय कोण विचारतो ? अशाही स्थितीत वेदापैकी उपनिषद्भाग, स्मृतीपैकीं मनुस्मृति व पुराणांतील श्रीभगवद्गीता असल्या कित्येक दिव्य प्रकरणाचे माहात्म्य कमी होईल असे अजून तरी वाटत नाहीं. तथापि एवढे खरे की, वर्णाश्रमधर्म हे देशकालानुरूप कायद्याप्रमाणे बदलावे लागतात असे एका पक्षाचें म्हणणे असून प्रतिपक्षीयांचे असे म्हणणे आहे की, वेदप्रतिपादित कर्माला किंवा तज्जन्य अपूर्वालाच धर्मत्व आहे. ते अपूर्व केवळ शास्त्रांनाच ज्ञात असते. वर्णाश्रमधर्म हे ऐच्छिक नाहीत व ते देशकालानुसार बदलतां येणार नाहींत. तात्पर्य, धर्मानुशासन हे त्रिकालाबाधित आहे. असे आहे तरी आपल्या भारतवर्षांत सनातनधर्म व युगधर्म हा भेद आजचा नवीन नाहीं; परंपरागत आहेसा दिसतो. पण सनातनधर्म व युगधर्म ह्यांच्या मर्यादा असाव्या तितक्या स्पष्ट नाहींत.. तसेच सनातनधर्म व युगधर्म यांचे प्रणेते कोण ? उभयपक्षीं कोणाचे बचन लोकांनीं प्रमाण मानावें ? किंवा मथळ्या-

वरील श्लोकांत म्हटल्याप्रमाणे महाजन कोणास समजावे ? हा प्रश्न फार चिंतनीय आहे.

वरील श्लोक महाभारतांतील प्रसिद्ध यक्षप्रश्न प्रकरणांतील आहे. तेथील टीकाकारांनी महाजन याचा अर्थ बहुजन असा केला आहे. आणि त्याचाच अनुवाद प्रार्थनासमाजी डॉ० भांडारकर यांनी केला आहे. बहुमत हे पाश्चात्याचे एकच निर्णायक साधन आहे अथवा शासन आहे. आणि कोंटही सामाजिक व्यवस्थेत बहुमतासारखा सोयीचा असा दुसरा मार्ग सहसा सापडणार नाही हेही उघड आहे. नवीन पद्धतीने विचार करणारे एक विद्वान् शास्त्री असे सुचवितात की, पांचामुखी परमेश्वर असे आपण म्हणतो, मग बहुजनाचे मुखी तोच आहे असे का न म्हणावे ? कायद्याला जोपर्यंत व्यक्तीच्या सूचनाचे स्वरूप आहे तोपर्यंतच त्यात मतभेद व विरोध हे क्षम्य आहेत, नव्हे इष्टही आहेत; पण तो समष्टि पार्लमेंटने एकदा मजूर केला की त्याचे उल्लंघन हा गुन्हा ठरतो. तो समष्टिप्रणीत म्हणजेच ईश्वर-प्रणीत झाला असता अमोघ ठरतो. हा युक्तिवाद सर्वांसच मान्य होईल असे नाही. तथापि हा कोटिक्रम सोडला तरी दहाजणासारखे वागावे ही व्यवहारनीति खरी. राजा राममोहन, न्यायमूर्ति रानडे अथवा लोकमान्य टिळक हे कमीअधिक प्रमाणाने सुधारकच असता स्वतः बहुजनात मिसळून त्यांच्यासारखे वागण्याचे धोरण त्यांनीं ठेविले होते. राममोहन याच्या गळ्यातील जानवे आणि त्याचा शाकाहार ( अर्थात् बंगाली), माधवरावजीचे दुसरे लग्न व त्याची देवळातील प्रवचने, आणि लोकमान्याचे सोवळे व पंढरीस रंगशिळेवर नाचणे ही उदाहरणे अशांपैकीच आहेत. परंतु इतक्याही विवेचनावरून मथळ्यावरील श्लोकातील महाजन या शब्दाचा अर्थ बहुजन करावा हे कित्येकास पटणार नाही, नव्हे ह्यापूर्वीही पटले नाही. जे धर्मतत्त्व अत्यंत गूढ ते कळण्याकरितां, शास्त्र-प्रामाण्यही बाजूला ठेवून, अज्ञ असे जे बहुजन त्यांच्या मताप्रमाणे वागावे, असे धर्म यक्षास कसे सांगेल ? बहुमत हेच निर्णायक मानणे हे आपल्या संस्कृतीला मुळींच जमण्यासारखे नाही. याला उत्कृष्ट उदाहरण म्हणजे राष्ट्रीय सभा किंवा बहुतेक सर्व ठिकाणच्या म्युनिसिपालिट्या हे होय. या संस्थांतून मतदारांच्या किंवा प्रतिनिधींच्या बहुमताचा काय खेळखंडोबा

असतो हें सर्व जाणतच आहेत. तेव्हां या देशांतील बहुजनसमाजास अथवा अखिल जगांतील बहुजनसमाजास ज्या गोष्टी मान्य होतात तोच शाश्वत धर्म, तोच एक खरा पंथ, हे ठरविणे व मानणें या दोन्ही गोष्टी आपणांस दूरापास्तच आहेत. आणि त्यास बिनतोड प्रत्यतर पाहाणे असेल तर ज्या ब्राह्मप्रार्थनासमाजांत या मताचा प्रामुख्याने अनुवाद केला जातो, त्याच समाजांतील गृहस्थ, लोकापवादाची म्हणजेच बहुजनांची मुळींच परवा न करतां, आपणांस योग्य वाटेल तसेच निःशंक वागत असतात. तसेच त्या समाजांसबधी बहुजनसमाजही विरोधी नसला तरी अत्यत उदासीन असतो, हे निर्विवाद आहे. तेव्हा महाजन याचा सरळ अर्थ थोर विचारी पुरुष अथवा शिष्ट असाच घेणे बरें. प्राचीन कालाच्या देशस्थित्यनुरूप स्मृति रचणारे ऋषि देशकालभेदाने आज कदाचित् सामान्य जनास अचूक असे मार्गदर्शक ठरणार नाहीत. परतु ते स्मृतिकारच काय पण भिन्न भिन्न दिसणाऱ्या श्रुति व शास्त्रीय तर्क या सर्वांचा अवलंब करून प्रचलित कालचे धर्मप्रवर्तक किंवा धर्मसुधारक गुहेप्रमाणे खोल अशा त्यांच्या आत्मौपम्य बुद्धींत प्रतीत होणारा जो मार्ग दाखवितील तोच युगधर्म मानून लोकांनी स्वीकारावा, असे म्हणणे अधिक सयुक्तिक दिसते.

तथापि त्याही विचारसरणीत पुढे अडचण येते ती ही कीं, अशा अधिकारी महाजनांची जी आधुनिक विद्वानानी वर्णने व लक्षणे सांगितलीं आहेत, त्यांत जमीन-अस्मानाचा भेद आहे. कोणी धर्मसुधारकाचे परंपरासुधारक (उदा०—लो० टिळक), व्युत्पत्तिसुधारक (उदा०—स्वामी दयानंद), सारग्राही सुधारक ( उ. ब्राह्म ) व कायदेसुधारक ( उ० डॉ० गौर व मेसर्स बसू, मलबारी, बोले इ० ) असे धर्मसुधारकाचे चार वर्ग कोणी मानतात. पण ह्या बाबतीत कोणाही सामान्य प्रतीच्या बुद्धिमानाचा सहज समावेश होत असल्यामुळे त्यांच्यात कोणतेही अलौकिक व श्रद्धेय असे विभूतिमत्व मानलें जाईल असे नाहीं. दुसरे एक विद्वान् राममोहनांचे वर्णन करताना म्हणतात की, राष्ट्रीय संस्कृतीची पुनर्घटना करणे, राष्ट्रीय साधनांची पूर्तता करणे, ऐक्यसंवर्धक संजीवन आणणे, आणि राष्ट्राच्या नवीन गरजा व मागण्या पुऱ्या करण्याकडे लोकजागृतीचा उपयोग करणे, ही राष्ट्रोद्धारकांची लक्षणें राममोहन ह्यांचे ठिकाणीं होतीं. हें वर्णन मोठे मोहक आणि सुंदर आहे खरें; पण ह्यावरून 'महाजनां'चीं कांहीं विशिष्ट लक्षणे पटण्यासारखीं

बांधतां येतील असे वाटत नाहीं. ब्राह्मांचा येथवर विचार झाला; आतां गेल्या शतकांतील वेदसंहितेवर सर्व भिस्त ठेवणारे दयानद खरे मार्गदर्शक म्हणून ठरवावे, तर त्यांची वेदार्थ करण्याची यौगिक पद्धति कोणीच फारशी मान्य केलेली नाहीं. बरें, त्यांनीं आपल्या सत्यार्थप्रकाशांत ज्या ब्राह्मणांची मार्गदर्शक म्हणून वेदांतील तैत्तरीय उपनिषद् किंवा मनुस्मृतीवर हवाला ठेवून शिफारस केली, ते निष्ठावंत ब्राह्मण दुर्मिळ झाले असून जे आहेत ते उत्तरोत्तर अधिकच अवमानिले जात आहेत.

वरीलप्रमाणें ब्राह्म आणि आर्यसमाजसंस्थापकांचे विचार झाले. आतां गेल्या शतकांतील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीरामकृष्ण परमहंस ह्यांच्याविषयीं विचार करूं. ह्यांच्या उक्तींवर हिंदुसमाजाची पूर्ण श्रद्धा आहे खरी; पण त्यांच्या उक्ति धर्मशास्त्र या दृष्टीने अपुऱ्याच आहेत. आणि शिवाय या उक्ति सांगणारे व त्यांची स्वतांचे आचाराशीं संगति लावणारे त्यांचे अनुयायी फार वंद्य व विद्वान् असले तरी त्यांच्यावर श्रीरामकृष्णांच्या संस्काराबरोबर गौतमबुद्धादि इतर अनेक मतवाद्यांची व चालू राजकीय परिस्थितीची इतकी छाया पसरली आहे कीं, त्याच्या मुखाने श्रीरामकृष्णच आज बोलत आहेत, असें मानण्यास आज किती लोक तयार असतील, हा प्रश्नच आहे. शिवाय त्यांनींच आपल्या ग्रंथांतून युगधर्मप्रवर्तक अशा आधिकारिकांची जीं लक्षणें दिली आहेत, तीही बरीच दुर्मिळ आहेत, त्याच्या मताने मनुष्य कितीही बुद्धिमान् व विद्वान् असला तरी त्यांनीं ठरविलेले आचार युगधर्म ठरतील असें नाहीं. युगधर्मसंस्थापक अवतारी पुरुषच असावयास पाहिजे. जो पुरुष जीवन्मुक्त आहे, ज्याला पूर्वजन्माची स्मृति आहे, जो स्पर्शमात्रेकरून अथवा इच्छामात्रेकरून साधकास ज्ञान देऊं शकतो, ज्याला साधकाकडे पाहून त्याचे पूर्वसंस्कार जाणता येतात, ज्यास आपल्या अवतारकृत्याची पूर्ण जाणीव असते, असेच अधिकारी पुरुष देशकालानुसार नवीन युगधर्म संपादूं शकतात.

थिऑसफिस्टाचे धर्मप्रणेते मैत्रेयादि ऋषि हे तर आज वरील अवतारी संतांपेक्षांही अधिक दुर्लभ आहेत. बिशप लेडबिटर, जे. कृष्णमूर्ति इत्यादि त्यांच्यांतील कित्येक पुरुष आज अर्हत् पदवीला पोंचले आहेत, आणि लवकरच त्यांपैकीं जे. कृष्णमूर्ति यांच्या शरीरांत तर श्रीजगद्गुरूंचा आवेशा-

वतार व्हावयाचा आहे असे ते म्हणतात. तथापि लोकांची या गोष्टीवर जितकी श्रद्धा असावी तितकी अद्याप बसली नाही. तात्पर्य, ब्राह्मपंथाच्या उपदेशकापासून तो मैत्रेय ऋषीपर्यंत, नवयुगधर्म सांगणाऱ्या अधिकारिकाची श्रेणी नवशिक्षितानी लाविली आहे. याशिवाय केवळ पूर्वपरंपरेतील सनातन-धर्मीय व बहुजनसमाजानी सद्गुरुरूप मानलेला अशा धर्मवेत्त्याचा आणखी एक मोठा वर्ग आहे. तो अलीकडील साधुसंतांचा होय. आणि आजच्या राममोहनयुगांतही धर्माच्या बाबतीत बहुजनसमाजाची साधुसंतावर जी श्रद्धा आहे, ती राममोहन अथवा रानडे, लेडबिटर अथवा लालाजी, महात्मा श्रद्धानंद अथवा महात्मा गांधी यांच्यावर नाही. उलटपक्षी सांप्रदायिक गुरू-च्या बंडावर आजपर्यंत इतकी कडक टीका झाली आहे की, त्यांत सच्चे कोण आणि लुच्चे कोण, याबद्दलही कित्येक जिज्ञासु सहजच साशंक असतात. तसं-च आधुनिक विद्वान् जरी अलौकिक बुद्धीचे असले, तरी ते प्रायः ब्रह्मानुभव-शून्य असतात, असा ज्याप्रमाणे एका बाजूने आक्षेप येतो, त्याचप्रमाणे बहु-जन मानीत असलेले साधुसंत अनुभवाच्या बाजूनी जरी पुढे असले, तरी त्यांची दृष्टि देशकालानुसार असावी तितकी व्यापक व व्यवहार्य नसते, असा त्यांच्यावरही नवशिक्षितांचा आक्षेप असतो. अशा स्थितीत परमार्थतः खरे महाजन कोण, अध्यात्मदृष्टीने आपले खरे आप्त कोण, हे विचारपूर्वक ठरविणे जरूर आहे.

श्रीनिश्चलदासजींचा विचारसागर कीं केशवचंद्रांचे ब्रह्मगीतोपनिषद्, लेड-बिटर यांची ब्रह्मविद्या किंवा दयानंदांचा सत्यार्थप्रकाश, हंसराजांचा सदा-चार किंवा लोकमान्यांचे गीतारहस्य, रवींद्रनाथांची शांतिनिकेतनमाला कीं उपासनीमहाराजांची साईवाक्सुधा, रानड्यांची धर्मपर व्याख्याने किंवा कमली-बोवांचा अनुभूतिप्रकाश, देवेंद्रनाथांचा ब्राह्मधर्म किंवा श्रीजीवनमुक्तांचा सिद्धविनोद, पंडित सीतानाथ तत्त्वभूषणांचे धर्मसाधन की नारायणमहाराजां-चा ज्ञानसागर, कोणते ग्रंथ प्रमाण मानावे व ते का ? या अत्यंत जिव्हाळ्या-च्या बाबीचा वाचकास सांगोपांग विचार करतां यावा म्हणून फक्त गेल्या शे-सवाशे वर्षांत आपल्या देशात जे अनेक धर्मसंरक्षक व धर्मप्रवर्तक झाले, त्यापैकीं कित्येक ठळक पुरुषांचे चारित्र्य व शिकवण ह्यांचें विवेचन या ग्रंथांत करण्याचे योजिले आहे. ह्या आधुनिक धार्मिक चळवळीचा इतिहास देताना ज्या

र्कांचे चरित्र महाराष्ट्रीय वाचकांस दृढपरिचित आहे, किंवा ज्यांचे चरित्रपर ग्रंथ
ाराष्ट्रांत अनेक प्रसिद्ध झाले आहेत, त्यांच्या चरित्राची माहिती न देतां, फक्त
ा पुरुषांच्या चरित्रांची मराठी वाचकांस विशेष माहिती असण्याचा संभव
हीं, अशांच्याच चरित्राचा भाग मुख्य विषयास जरूर व पोषक तितकाच
याात येईल. याप्रमाणे पहिल्या काही भागात आधुनिक धार्मिक चळवळीचा
क्षिप्त इतिहास व अखेरच्या भागात सनातनधर्माभिमानी अशा अलीकडील
ही सत्पुरुषाची माहिती देऊन अखेर सर्वांच्या विचाराचा तुलनात्मक
ीने विस्तारपूर्वक विचार होईल; हाच या ग्रंथाचा विशेष आहे.

या देशातील बहुजनसमाज ज्यास सत्पुरुषमालिकेत आजपर्यंत गणीत आला
हे, असे अलौकिक साधुपुरुष गेल्या शेदीडशे वर्षात या देशात अनेक होऊन
े आणि आज कित्येक विद्यमानही आहेत. आमचे खरे मार्गदर्शक
तारक तेच आहेत, अशी हिंदुसमाजातील बहुतेकांची आज भावना आहे.
ा थोर पुरुषांपैकीं काहींची चरित्रे व वाङ्मय प्रसिद्ध म्हणजे छापलेले
हे; परंतु त्यांचा वाचकवर्ग आणि थिऑसफी, ब्राह्मधर्म इत्यादि आधुनिक
र्मसंस्थांच्या वाङ्मयाचा वाचकवर्ग हे प्रायः भिन्न आहेत आणि जरी कदाचित्
चकवर्गात असा निश्चित भेद काढता न आला, तरी हे खचित आहे की,
ा आधुनिक धर्मसंस्थांच्या वाङ्मयात या सत्पुरुषांचा अगर त्यांच्या धर्मसंरक्षक
ार्यांचा नामनिर्देशही केलेला आढळत नाहीं. क्वचित् मोघम उल्लेख आलाच
तो निंदाव्यंजकच असतो. ब्राह्मांची जी मुखपत्रे अस्पृश्योद्धारासंबंधी
हात्मा गांधींचा गौरव करीत असता त्यांच्या तीव्र वृत्तिभेद व मतभेदाकडे
क्ष करू शकतात, त्यास श्री उपासनीमहाराज व श्रीसिद्धारूढमहाराज या
द्यमान सत्पुरुषांचाही या बाबतीत उल्लेख करावा असे का वाटत नाही ?
ेच ज्या इंडियन मेसेंजरसारख्या ब्राह्मांच्या वृत्तपत्रात पाश्चात्त्य धर्मवेत्त्यांचे
ान्यावर उतारे नेहमी येत असतात, त्यातून स्वदेशातील विद्यमान
्पुरुषांच्या ग्रंथातील उतारे किंवा तोंडचे तात्त्विक बोल ह्यांचा अनुवाद
रवार कां येत नाहीं ?

एका ख्रिस्ती लेखकाने 'हिंदुस्थानातील अर्वाचीन धार्मिक चळवळी' या नांवा-
ा एक ग्रंथ लिहिला आहे. त्यांत त्यांनी ह्या देशांतील अलीकडील धर्मजागृतीचे
र्व श्रेय इंग्रजी सरकार, त्यांचे प्रॉटेस्टंट मिशनरी आणि प्राच्य-विद्यासंशोधक

अशा साहेबांसच दिले आहे. त्यांत येथील निरनिराळ्या धार्मिक पुढाऱ्यांपैकीं प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष इंग्रजी जाणणारांशीं ज्यांचा संबंध आहे व ज्यांचे वाङ्मय इंग्रजींत उपलब्ध आहे अशाच पुरुषांचा कसाबसा तरी उल्लेख आहे. पण इतर जुन्या परंपरेतील सत्पुरुषांचा नामनिर्देशही नाही. हीच पद्धति येथील आधुनिक धर्मसंस्थानींही उचललेली दिसते. स्वामी विवेकानंद म्हणतात तेंच खरें कीं, विसाव्या शतकांतील हिंदूंच्या कित्येक पंथानी आपल्या इंग्रज धन्यांस काय मानवेल हीच सत्याची कसोटी ठरविलेली दिसते !

धर्मासारख्या पवित्र क्षेत्रात अशी ही भाऊबंदकी असावी याचे नवलच वाटते. या भाऊबंदकीचा संबंध केवळ इंग्रजी शिक्षणाकडेच पोंचतो असेही म्हणवत नाहीं. एकादा पीएच्. डी. असो किंवा एकादा महामहोपाध्याय असो, संत म्हणून गणलेल्या पुरुषासंबंधी त्याचा सापत्नभाव सहजसिद्धच असतो. आतां आपल्या संस्कृत पंडितापेक्षा आपले इंग्रजी पंडित व साधुसंत यांच्यांतील भेद अधिक ठळक रीतीनें नजरेस येतो हें उघड आहे. पहा कीं, एकाची चिकित्सक बुद्धि दुसऱ्याचें वैराग्य, एकाचें पांडित्य दुसऱ्याचा स्वानुभव, एकाचें लोकसंग्रहाचें गांभीर्य दुसऱ्याची वत्सलता, एकाचा समन्वय दुसऱ्याचा व्यतिरेक, एकाची महत्त्वाकांक्षा दुसऱ्याचा संतोष, एकाचें व्याप दुसऱ्याची शांति, एक राजसी दुसरा सात्त्विक, दोघेही थोरच खरे, पण दोघांच्या गुणधर्मांची अशी ही वांटणी झाल्यामुळें दोघांचेंही सहकारित्व क्वचितच नजरेस येतें. तें या ग्रंथाचे द्वारें वाचकांचे प्रत्ययास आणून देण्याचें आम्हीं योजलें आहे.

वर जी आम्ही तुलना केली आहे ती केवळ स्थूल दृष्टीनें केलेली आहे, हे सुज्ञ वाचकांस सांगावयास पाहिजे असें नाही. कारण आधुनिक धर्मप्रवर्तक सारेच ब्रह्मानुभवरहित आहेत असें कोणीं सांगावें ? तसेंच अलीकडील साधु-संतांत ब्रह्मनिष्ठ असून श्रोत्रिय असे जाडे विद्वानही असल्याचें लोकप्रसिद्धच आहे. विशेष चिकित्सक मनुष्यापुढें जी अडचण येते ती अशी की, लोक-हितासाठीं अत्यंत दक्ष व जाडे विद्वान् अशा थोर पुरुषांसही आत्मानुभवा-ची जोड नाही अशी लोकांची समजूत असते, तेव्हां त्यांनीं विचारपूर्वक ठरविलेले पंथ व सिद्धान्त लोकांनीं कितपत मानावे; तसेंच ज्यांच्या ब्रह्म-निष्ठेबद्दल लोकांत ख्याति आहे अशा थोर बिभूति दिसण्यांत विक्षिप्त वृत्ती-

च्या किंवा अत्यंत मितभाषी असतात, तेव्हा त्यांच्या तोंडून क्वचित् बाहेर पडणाऱ्या सहजोद्गारांवरून शंकेखोर बनलेल्या मनांनीं आपला मार्ग कसा चोखाळावा ? तेव्हा या दोन्ही पथाचे पुरुष लौकिक दृष्टीने 'महाजन' या संज्ञेस पात्र असले तरी त्यांच्या पथाचे अनुकरण निःशंकपणे करणे कठीण जाते. यास्तव आधुनिक विद्वानाच्या विचारसरणीचे महत्त्व अजमावण्याकरितां त्यांची रहाणी व ब्रह्मनिष्ठाचे मनोगत जाणण्याकरितां त्यांची अमोघ वाणी यांचा बारकाईने विचार करणे जरूर आहे; हे जाणूनच त्यासंबंधी सविस्तर माहिती आम्ही प्रस्तुत ग्रंथात दिली आहे.

आतां मथळ्यावरील श्लोकातील शेवटला शब्द जो पथ त्याचाही थोडासा विचार करूं. या एकवचनी शब्दाप्रमाणे एकच एक असा पथ निश्चित ठरलेला आहे काय किंवा तसा तो यापुढे तरी ठरणे संभवनीय आहे काय ? तसे नसेल तर आज जे अनंत पथ अस्तित्वांत आहेत किंवा पुढे राहतील त्या सर्वांत गूढ रूपाने अनुस्यूत असणारा असा एकच पथ दाखवितां येईल काय, हा मोठा चिंतनीय प्रश्न आहे.

मार्गाबद्दल विचार करतांना जावयाचे कोठे हा प्रश्न सकृद्दर्शनीच पुढे येतो. सर्व धर्मपथ एकाच ठिकाणी जाऊन मिळतात असे म्हणतात. असे ते एकच अंतिम निधान अज्ञात असल्यामुळे, अबुद्धिपुरःसर सर्व जीव जरी तिकडेच जात असले, तरी बुद्धिपुरःसर प्रत्येकाने मानलेले अलीकडील साध्य भिन्न असू शकेल, नव्हे असतेच असे म्हणावे लागेल. व्यक्ति तितक्या प्रकृति ह्याचप्रमाणे व्यक्ति तितक्या प्रवृत्ति असेही म्हटले पाहिजे. मतभेदाबद्दल रणे माजतात, त्यावेळी ह्या स्वाभाविक साध्यभेदाचा जितका विचार व्हावा तितका होत नाहीं. आतां हे प्रत्येक व्यक्तीचे जे साध्य ते त्यास प्राप्त करून देणारे त्याचे सद्गुरू असतात, असे सनातनी हिंदुधर्म सांगतो. आधुनिक पद्धतीचा धर्मविचार एकाच जन्माने मर्यादित असतो. परंतु वास्तविक ती चूक आहे. जीवाचे साध्य त्यास एकाच जन्मीं मिळते असे नाही. यास्तव ह्या कामी मार्गदर्शक त्रिकालज्ञ सद्गुरुच लागतात असे हिंदुधर्म सांगतो. आतां ह्याप्रमाणे धर्माचा जो विचारात्मक भाग त्या भागांतील मार्गदर्शक महाजन म्हणजे सद्गुरु, व त्यांनीं दाखविलेला मार्ग, हे व्यक्तिपरत्वे भिन्न असू शकतील. अशा रीतीने कदाचित्

साध्याच्या अनेक श्रेणींतून प्रत्येक साधक अंतिम साध्याकडे जातही असेल; परंतु येथे विचाराची अशी एक बाजू आहे कीं, उपरिनिर्दिष्ट श्लोकांत जो धर्ममार्ग अभिप्रेत आहे तो मुख्यतः क्रियात्मक असावा, कारण त्यात महाजन ज्या मार्गाचा उपदेश करतात, असे न म्हणतां महाजन ज्या मार्गाने जातात, त्या मार्गाने जावे, असे म्हटले आहे. येथे महाजन म्हणजे अलौकिक सत्पुरुष मानल्यास त्याच्याप्रमाणे आपण वर्तन करावे असा अर्थ निघेल. तो अर्थ शिष्टसमत नाही. कारण सद्गुरूंचा उपदेश अनुकरणीय असला तरी त्याचे वर्तन व क्रिया अज्ञजनास अनुकरणीय असतातच असे नाहीं. यामुळे क्रियात्मक धर्माचे निर्णायक आपल्या प्रातातील बहुमत म्हणजे सदाचार, रूढि असे मानणेही एका अर्थी सयुक्तिक ठरेल. आता हे बहुमत आपल्या कुल, गांव, प्रात, देश, अशा मर्यादेतील पहावे, की सर्व जगातील बहुमत अजमावावे हाही एक विचार आहे. हिंदुस्थानदेश केवळ हिंदूचाच असता तर हिंदूना बहुमतानी समत असा जो पथ तोच प्रशस्त ठरला असता. परतु आजच्या कालमानाप्रमाणे दळणवळणाचे आतरराष्ट्रीय सबध लक्षात घेता, सर्व पृथ्वी हाच एक देश असे विचारविनिमयापुरते तरी मानण्याची वेळ आली आहे तेव्हा, बहुमत कोणाचे पहावयाचे, हा प्रश्न सहजच उभा राहतो. आणि ह्याच दृष्टीने ह्या जगातील झगड्यात जगावयाचे असेल तर हिंदूंनी आपली परपरा सोडून सर्वसंग्राहक व्हावे असे सुधारक मोठ्या कळकळीने सागतात. तर उलट कालगतीने हिंदु नामशेष झालेले पत्करले, पण त्यांनी आपल्या धर्मात इतर गोष्टींची भेसळ करून वैदिकधर्मनिष्ठा सोडू नये असे सनातनीही निग्रहाने बजावतात. ह्या दोन बाजूच्या दोन टोकात धर्मपथाबद्दल अनंत मतभेद होऊन राहिले आहेत.

पहा की, आज हिंदुस्थानात धर्माचे जे सशोधन चालले आहे ते सकृद्दर्शनीं इतक्या भिन्न व परस्परविरोधी मार्गांने चालले आहे की, साऱ्या जगातील सर्व धर्मांचे समेलन राहो, पण या हिंदी ( हिंदु नव्हे ) धर्माची तरी एकवाक्यता होऊन त्यांतून साऱ्या महाजनाचा एकच पथ निश्चित होईल हे दूरापास्तच दिसते. निराकार परमेश्वराची प्रार्थना हे ब्राह्माचे साधन आहे, गूढविद्यांचे सशोधन हा थिऑसफिस्टांचा हव्यास आहे, वेदार्थयत्न हा आर्यसमाजिस्टांचा बाणा आहे, संन्यासपूर्वक लोकसेवा हे रामकृष्ण-मिशनचें ब्रीदवाक्य आहे, श्रीदेव-

गुरूपासना हें देवसमाजाचें व्रत आहे, अहिंसा हा महात्माजींचा खुणेचा शब्द आहे, लोकसंग्रह हा लोकमान्यांचा दंडक आहे आणि त्याग ही सनातनीयाची गुरुकिल्ली आहे.

ह्याच मुद्द्याचा अधिक विस्तार करावयाचा तर धर्माधर्मांतील भेद-विशेष कायम ठेवून त्याचे संशोधन करण्याचें काम थिऑसफिस्टांनीं जोरानें सुरू केलें आहे. पण आंब्याची साल व बाठा टाकून एकच आंबरस करावा त्याप्रमाणें सर्व धर्मांचे विशेष व बाह्योपचार हे टाकून एक सार्वत्रिक धर्म-कषाय बनवावा अशी ब्राह्माची आकांक्षा आहे. अनंतपूजेच्या चवदा प्रकारा-प्रमाणें ब्राह्माची सारसंग्राहकपद्धति फारच फैलावली आहे, तर एकधान्याचें व्रत करणाऱ्या व्रतीप्रमाणें केवळ वैदिक संहितेवर आर्यांची भिस्त आहे. आर्यसमाजी व ब्राह्मसमाजी मिळून दोघांनीं पुराणाचा शिमगा केला आहे, तर बेझंटबाई वेदापेक्षाही पुराणांतून गूढ रहस्यें अधिक शोधीत आहेत. आणि श्रीरामकृष्ण विवेकानंद-जीवनचरित्रांत तर श्रीरघुवीर व श्रीहनुमान आणि श्री-राधा व श्रीकृष्ण या विभूतींचें त्यांना साक्षात् दर्शन झाल्याचें प्रसिद्ध आहे.

वरील भेद-दृष्टीनें आणखी थोडें बारकाईनें पाहिल्यास असें दिसतें कीं, भगिनी निवेदिता यास हिंदुधर्मांत चढाईची प्रवृत्ति दिसत आहे, तर त्यांचेच दुसरे सांप्रदायबंधु निवृत्ति, निवृत्ति, निवृत्ति, हें त्रिकालाबाधित एकच ध्येय म्हणून घोषणा करीत आहेत. वैदिकांचा याज्ञिक-धर्म बौद्धांनीं बुडविला. पुढें बौद्धधर्म आचार्यांनीं नामशेष केला. आचार्यांचा अद्वैतमायावाद नव्या विद्वानांनीं झिटकारला; त्यानंतर आतां पुन्हा मीमांसेचा अभ्यास सुरू होऊन बुजलेल्या यज्ञकुंडांचा पुनरुद्धार होतो कीं काय, असाही सुमार दिसत आहे. श्रीकृष्णकथा ज्यांस निंद्य वाटत आहेत, त्यांनीं गीता मस्तकीं धारण केली आहे; आणि रामायणांत ऐतिहासिक सत्य न मानणारे रामनामाचा अखंड जप करण्यास सांगत आहेत. भवभीति हें मनोदौर्बल्य आहे असें गृही विद्वान् सांगत आहेत, तर प्रपंचाचा मोह न सुटलेल्या आरामखुर्ची-वाल्यांची ही धूर्तता आहे असें विरागी आणि संन्यासी बजावीत आहेत; तसेंच देवपूजादि शास्त्रीय कर्में लोकसंग्रहात्मक लौकिक कर्मांत एकीकडे नामशेष होत असतां, अथवा कोठें धर्मवेड म्हणून तुच्छ मानली जात असतां. तिकडे लेड-बिटर व बेझंटबाई यांच्या विद्यमानें श्रीकृष्णमूर्ति " अपवित्रः पवित्रो वा "

करून पुरुषसूक्तादि वैदिक मंत्रांनीं हिंदूंच्या ज्योतिर्मंदिरांत सोंवळ्याने पूजा करीत आहेत व गायत्रीमंत्रपठणाचे दिव्य अनुभव घेत आहेत. गुरुसंप्रदायाचा नायनाट करण्याचे कंकण कोणी हाती बांधले आहे, तर कोठे जगद्गुरूंच्या आगमनाची मोठ्या आस्थेने तयारी चालली आहे. कोठे अहिंसेचे निरपवादित्व उपदेशिले जात आहे, तर उलट क्षात्रधर्माला जे मानीत नाहीत ते केवळ अहिंसावादी हिंदूच नव्हत असेही कोणी टासून म्हणत आहेत. कोठे परकीयाच्या घरात आपल्या मुली घालून सलोखा जोडण्याचा ऐन "अकबरी" धर्म पुकारीत आहेत! तर कोठे बाटलेल्यासच काय पण परधर्मीयासही हिंदु करून घ्या, असे मोठमोठे धर्माधिकारी सांगत आहेत! विदुषी बेझंटबाई आपणांस हिंदु म्हणविण्यात भूषण मानीत आहेत. परंतु ब्राह्मादिकास तेच हिंदुत्व तिरस्करणीय झाले आहे! 'हे जग झालेचि नाही' हे तत्त्व न मानणारे आधुनिक संशोधक, त्याच जगाच्या इतिहासातील राम-कृष्णादि अवतार मात्र 'झालेचि नाहीत,' असे निश्चयाने प्रतिपादीत आहेत! आणि त्याच वेळी श्रीरामकृष्णांची व श्रीदत्ताचीं नवीन नवीन मंदिरे बांधण्याचा खटाटोप ब्रह्मनिष्ठ सत्पुरुषही करीत आहेत.

आणखी, नपुंसक व संन्यासी दोघांसही स्त्री वर्ज्य व्हावी त्याप्रमाणे प्रपंचात हिरमुसलेले व प्रवृत्तीत जोरावलेले कनिष्ठ व श्रेष्ठ अकर्ते व कर्ते दोन्हीही वर्ग भक्तीस पारखे झाले आहेत! आर्यब्राह्माचा मूर्तिपूजाविरोध आणि चिकित्सकाचे पुराणसंशोधन यांनी सगुणभक्तीचा उच्छेद होण्याचा रंग आहे. भौतिकशास्त्र, व्यवहार व धर्म याचा समन्वय करण्याच्या प्रयत्नात धर्मनिष्ठेची हानी होत आहे. सार्वत्रिक धर्माच्या ध्येयांत देवावरील माया इतकी पातळ झाली आहे की, त्यांत सांप्रदायिकांची एकाग्रता सिद्ध होणे अशक्यप्रायच आहे. ते धर्मवेड परवडले; पण हे धर्मौदार्य नको असेही कदाचित् प्रत्ययास येण्याचा संभव आहे. सुलभ वेदांत घातकी झाला आहे. स्थितप्रज्ञांनींही कर्म केले पाहिजे, ह्या लोकमान्यांच्या सिद्धान्तावर पामर जीवांनीहि रणे माजविली आहेत. सिद्धांस विषय बाधत नाहीत, तेव्हां, संसार काय नडतो! असे म्हणून साधकही विषयांस बिलगले आहेत. राग आणि द्वेष ह्यांनीं विषम झालेली मने 'तस्मात् युद्धस्व' ह्या भगवदुक्तीच्या जोरावर झगडूं पाहात आहेत. महात्माजींच्या शब्दप्रामाण्याचे निमित्तानें दुर्बलानेही अहिंसेची ढाल धरली

आहे. वर्णाश्रमधर्माच्या वादांत तर गुण, जाति, स्वभाव व एककार असा चौरंगी सामना सुरू आहे. आणि एकीकडे तो वाद सुरू असतांच प्रत्येक जात व पोटजात आपापला समाज संघटित व अभेद्य करण्याच्या खटपटींत आहे. तसेच बाहेरून सघट्टन तर आंतून वर्णसकर होण्याचा सुमार आहे. असो. हे वर्णन कोठवर करावें. अशा या परिस्थितीत हिंदुधर्माचे भवितव्य काय आहे, तो कोणत्या पंथास लागेल हे अजमावणे फार कठिण आहे.

केवळ तारतम्यानेच विचार करावयाचा तर आज साऱ्याच त्रैवर्णिकांचा अधःपात झालेला दिसत असला, तरी त्यांतही क्षत्रिय व वैश्य जे आज विद्यमान असतील ते विद्यमान ब्राह्मणांपेक्षां वेदविद्येशीं अधिक पारखे झाले आहेत. मग त्याची कारणे कांहीं असोत. अर्थात् अशा परिस्थितीत श्रेष्ठत्वाच्या नात्याने कोणीं न मानले, तरी जबाबदारीच्या नात्याने, मार्गदर्शक म्हणून, आजच्या जातिब्राह्मणांनीच पुढे व्हावयाला पाहिजे. ह्यात इतरांची अपात्रता दर्शविण्याचा हेतु नसून आजच्या जातिब्राह्मणाच स्वार्थनिरपेक्षकर्तव्य कोणते तेच दाखविण्याचा हेतु आहे. शिवाय असे की, चातुर्वर्ण्याचा जोपर्यंत या देशांत अत्यंत लोप झाला नाहीं, तोपर्यंत हिंदुधर्माच्या दृष्टीने मार्गदर्शक ब्राह्मणांनी व्हावे, ही भाषा व कल्पना अपरिहार्यच आहे. याबद्दल कोणी वैषम्य मानणे व्यर्थ आहे. जातीजातींचे मार्गदर्शक वेगळे असोत, परंतु एकंदर हिंदुसमाजाचा विचार करता धार्मिक बाबींत ही जबाबदारी प्रथम द्विजांवर, व त्यातही आजच्या परिस्थितीत विशेषेकरून जातिब्राह्मणावर येते; मग, ते जर आपल्या खऱ्या ब्राह्मण्यास न जागले, आणि केवळ ब्राह्मण जातीच्या पोकळ अभिमानाने ब्राह्मणेतरांस तुच्छ लेखूं लागले, तर मग शूद्रच काय, धर्मव्याधाप्रमाणे अतिशूद्रही, आपले मार्गदर्शक मानणे ब्राह्मणास कालगतीमुळे अपरिहार्य होईल, हे निराळे सांगावयास नकोच! आज जातिब्राह्मणांची स्थिति अत्यंत चिंताजनक आहे ही गोष्ट खरी; पण आपत्ति हे सकट नसून सुसंधि आहे. ज्या सकटाकडे आपली नजर भिडली त्या सकटाची मग भीति ती काय! अनेक विरोध प्रथम भीतिदायक वाटतील, पण भेदाभेदांची एकदा संगति कळल्यावर मग सारें एकच आहे. विरोधकांचे तोफखान्याचे माऱ्याखाली आजच्या जातिब्राह्मणांस ब्राह्मण्यसंरक्षण व उपजीवन हे दोन बिकट प्रश्न सोडवावयाचे

आहेत खरे. पण स्वराज्याचे भोग कांहीकाळ ब्राह्मणांनीं भोगले असले, तरी अल्पसंतोष व विद्याव्यासंग हे त्यांचे शील अद्यापिही सुटले नाहीं, असे वाटते. लोकशिक्षणाचे व धर्मसंरक्षणाचे काम मुख्यत्वेकरून आजपर्यंत त्यांनी केलेच आहे. आणि निदान यापुढे तरी धर्मरक्षण व ब्राह्मणांचे उपजीवन या दोन गोष्टी अन्योन्याश्रित राहण्याचा, अलीकडे टीकास्पद झालेला, अनिष्ट योग बहुधा टळेल. अशा स्थितीत कांहीं देशाभिमानी पुढारी असे म्हणतात की, ज्यांना अभ्युदयाचा मोह सहज आंवरता येतो, त्यांनी आज नजरेपुढे नसलेल्या निःश्रेयसाची मुमुक्षाही आवरावी, निरपेक्ष लोकसेवा हीच संन्यासाची परमावधि मानावी, मोक्षाच्याही वासनेवरील विजय, यातच त्यांनीं खरे श्रेय भोगावे, गर्भाच्या उत्क्रान्तीसार मनुष्यास मच्छकच्छादि अवतार घेऊनच बटुरूपात जन्मास यावे लागते. पण त्यानंतर राम आणि कृष्ण या दोन महान् कर्मयोगी क्षत्रियाच्या भूमिकाचे काम केल्यावाचून बुद्धावस्थेत कोणासच जाता येणे कठीण आहे. ब्राह्मण्य ही एक द्विजांची दैवी शक्ति आहे व ती देशकालानुसार निरनिराळे रूप धारण करिते. ईश्वर करील तर यापुढे उदित होणाऱ्या ब्राह्मण्यातील, नराचे नारायणस्वरूप, आत्म्याचे स्वातंत्र्य, जीवाचे पौरुष, चित्ताची अहिंसा, बुद्धीचे शुद्धत्व, मनाचा दिलदारपणा आणि ईश्वराच्या पाइकत्वाचा अहंकार, याच भिन्न गुणादर्शात, या पुण्यभूमीत सामावलेल्या भिन्न भिन्न धर्माचे प्रतिबिंब जगास कदाचित् पाहण्यासही सांपडेल, आणि असा हा सुयोग आल्यास 'स पन्थाः', म्हणून वर म्हटले तो हाच पथ असेही लोक सहजच मानू लागतील.

ही धर्मजागृति होण्यासाठीच ह्या ग्रंथाची एक अल्पशी प्रवृत्ति आहे. पुढील मार्ग सापडण्यास आज आपण आहो कोठे, याचे ज्ञान असावयास पाहिजे व त्याचेच दिग्दर्शन पुढील भागात द्यावयाचे आहे. गेल्या शंभर वर्षात आपल्या देशात चाललेल्या प्रमुख धार्मिक चळवळीचा संक्षिप्त इतिहास या ग्रंथाच्या आरंभीच्या कांही भागात देऊन, पुढील भागांत प्रामाण्यवाद, अधिकारवाद, द्वैताद्वैतवाद, मायावाद, ध्येयवाद, पुनर्जन्मवाद, पुरुषार्थ-प्रारब्धवाद, साधनवाद, वर्णाश्रमवाद, अबलोन्नतिवाद आणि धर्मैक्यवाद इत्यादि अनेक वादग्रस्त विषयांवरील गेल्या शतकातील नव्याजुन्या पद्धतीने विचार करणाऱ्या 'महाजनां'च्या विचारांचें सार तुलनात्मक पद्धतीनें

मांडण्यांत येईल. हें काम मोठ्याच अधिकाराचें व जोखमाचें आहे हे खरें. तथापि होतां होईतो निराधार कांहीच लिहावयाचें नाहीं, असा प्रयत्न ठेवल्याने हे जोखम बरेच हलकें होईल. आणि लेखकाच्या अनधिकाराकडे पाहून वाचकांसही बुचकळ्यात पडण्याचें कारण उरणार नाहीं.

हिंदुस्थान ही धर्मभूमि आहे. येथें धर्मचर्चेकरिता आजपर्यंत अनेक सभा झाल्या असतील; परंतु आधुनिक कालातील धर्मसंरक्षक, सुधारक व प्रवर्तक ह्यांचें या ग्रंथरूपानें होणारें सम्मेलन वाचकास अपूर्व वाटेल असा भरवसा आहे. या सम्मेलनासाठीं सनातनी हिंदु, ब्राह्मसमाजी, प्रार्थनासमाजी, आर्यसमाजी, श्रीरामकृष्णविवेकानंदी, थिऑसफिस्ट, देवसमाजी इत्यादि प्रमुख अशा सर्व पंथांचे प्रतिनिधि यावयाचे आहेत. उदाहरणार्थ, या ग्रंथागारांत राजर्षि राममोहन, महर्षि देवेंद्रनाथ, कविवर्य रवींद्रनाथ, ब्रह्मानंद केशवचंद्र, पंडित शिवनाथशास्त्री, पंडित सीतानाथ तत्त्वभूषण इत्यादि ब्राह्म आपापल्या सहकारी मित्रांसह व अनुयायांसह येणार आहेत. येथें गुरुवर्य मोडक, डॉ० भांडारकर, न्यायमूर्ति रानडे, सर नारायणराव, रा० ब० गोपाळराव हरि, शेठ भोलानाथ साराभाई, सर वेंकटरत्न, दीनबंधु विठ्ठल रामजी शिंदे इत्यादि प्रार्थनासमाजीही दिसून येतील. तसेंच स्वामी दयानंद, स्वामी श्रद्धानंद, पंडित गुरुदत्त, श्रीयुत लजपतराय, पंडित नरदेवतीर्थ इत्यादि अनेक आर्यसमाजींचीही भेट होईल. त्याचप्रमाणें श्रीमती बेझंटबाई, बिशप लेडबिटर, हिंदु-मिशनरी-वैद्य, भावी जगद्गुरु श्रीकृष्णमूर्ति, धर्मजागृतिकार भागवत, पंडित जिनराजदास इत्यादि थिऑसफिस्टांशीही विचारविनिमय होईल. श्रीरामकृष्णपरमहंस आणि त्यांचे विवेकानंदप्रमुख प्रचंड अनुयायी यांचेंही दर्शन घडेल. शिवाय उत्तरेकडील महापंडित निश्चलदासजी, धर्मात्मे कबळीबाबा यांच्या वेदान्ताचा लाभ होईल. रामबादशहा यांची ओजस्वी वाणी उत्साह आणील. तसेंच श्रीवासुदेवानंदसरस्वती श्रीसिद्धारूढस्वामी, श्रीहंसराजस्वामी, श्रीजीवनमुक्तस्वामी, श्रीशंकराचार्य ( कुर्तकोटी ) इत्यादि नारायणस्वरूप झालेल्या स्वामींचा अल्प स्वल्प परिचय होईल. तसेंच श्रीमौनीबुवा, श्रीविष्णुबोवा, श्रीसखारामबोवा, श्रीसाईबाबा ह्या सत्पुरुषांच्या भेटी होतील. आणखी श्रीउपासनीमहाराज, श्रीनारायणमहाराज, श्रीगुलाबरावमहाराज, इत्यादि महापुरुषांशी विचारविनिमय होईल. लोकमान्य

भेटतील. महात्माजींचीही गांठ पडेल. असे कोण कोण म्हणून सांगावे. महाजनांचा हा मेळा केवळ अपूर्व आहे असे खचित वाटेल. जसजसे एकेक प्रतिनिधि दाखल होतील तसतसा जरुरीप्रमाणें कमीअधिक विस्तारपूर्वक त्यांतील प्रमुखांचा वाचकांशीं परिचय केला जाईल. आलेल्या सर्व प्रतिनिधीं-ची ओळख करून दिल्यावर कांहीं प्रास्ताविक विवेचन होऊन नंतर विचार-विनिमयाकरितां कोणते विषय घ्यावयाचे त्याचा निश्चय होऊन उपरिनिर्दिष्ट प्रतिनिधींचा अत्यंत मनोरंजक व उद्बोधक असा विचारविनिमय होईल. प्रतिनिधींच्या फार मोठ्या संख्येमुळे प्रत्येकाचे विचार फार थोडक्यांत व मुद्दे-सूदच मांडले जातील. अशा या नवयुगधर्म-महामंडळाचे काल्पनिक अधि-वेशनांत, लेखकानें आपल्या आवडीप्रमाणें सर्वाधिष्ठाते श्रीसद्गुरु यासच सभापति मानणें हेच त्यांच्या दृष्टीनें योग्य होईल.

वरीलप्रमाणें विचारविनिमय झाल्यानंतर चर्चेकरितां उपस्थित केलेल्या मुद्द्यांवर कांहीं ठराव सूचनारूपानें बहुजनांच्या संमतीकरितां पुढें मांडण्यांत येतील. आणि अखेर "अहो, ईश्वर काय करील ते खरें!" ह्या अध्यक्षां-च्या, निरहंकृति व तन्मयतादर्शक अत्यंत अर्थपूर्ण अशा वाक्यानें ह्या रूपका-त्मक सभेचा ग्रंथ समाप्त होईल.

ह्याप्रमाणें या ग्रंथाचे स्वरूप, प्रयोजन व संबंध हे तीन अनुबंध सांगितले, आतां या ग्रंथाची फलश्रुति काय ती लेखकानें आणखी वेगळी न सांगतां वाचकांनीच ठरवावी ते बरें.

---

*

# प्रकरण पहिलें

## भूमिका

**कलिचेनि योगें धर्म तो राहिला । अधर्म चालीला बहुसाल ।**
**शैव आणि शाक्त आगमादि जाण । आचरती जन बहुधा ते ॥**
**शब्दें ब्रह्मज्ञान बोलती सुंदर । होती शीष्णोदरपरायण ॥**
**आंगीं नाहीं पहातां वैराग्याचा लेश । वरी वरी वेष मिरविताती ।**
**कर्माचा तो लोप जनीं करऊन । यथेष्टाचरण करिताती ॥**

—हरिहर.

वरील उक्तींत हरिहरांनीं जे कलिकालाचें वर्णन केलें आहे, ते शंभर वर्षांपूर्वीच्या बंगाल प्रांताला बरोबर लागू होतें. ज्या बंगाल प्रांतीं पुढें श्रीरामकृष्ण-विवेकानंदासारखे संन्यासी, राममोहन, आनंदमोहनासारखे मुत्सद्दी, केशवचंद्र, प्रतापचंद्रासारखे वक्ते; ईश्वरचंद्र व सेवाव्रतासारखे सुधारक, बोस व रॉय यांच्यासारखे शास्त्रज्ञ, अरविंद व देवेंद्रासारखे योगी; रवींद्रनाथ व मायकेलदत्तासारखे कवि; नागमहाशय व द्विजेंद्रनाथासारखे साधु; सुरेंद्रनाथ व चित्तरंजनदासासारखे राजकारणी; बंकिमचंद्र व जदुनाथासारखे लेखक, आणि बोस व ठाकूर यांच्यासारखे चित्रकार, अशीं अनेक नररत्नें निर्माण झालीं, त्या बंगाल प्रांताची स्थिति शंभर वर्षांपूर्वी चांगली नव्हती.

आर्यांच्या प्राचीन संस्कृतीचे स्फटिकशिलेवर, ईश्वराच्या अचिंत्यनियतीमुळें, परधर्मीयांच्या निशाणांची छाया पडली, ह्यामुळें आमची मूळची शुद्ध संस्कृति नष्टच झाली कीं काय, असा भ्रांतिकृत चमत्कार आज कित्येक वर्षे होऊन राहिला आहे, आणि स्वधर्माची आस्था बाळगणाऱ्या कित्येक देशाभिमानी पुरुषांस हा स्फटिकास जडलेला नसता रंग कशानें धुऊन काढावा, असा मोठा प्रश्न पडला आहे. ह्या पाश्चात्य संस्कृतीच्या रंगांत तीन गुणांची भेसळ कशी झाली आहे हें समजण्यास प्रेसिडेन्ट विल्सन यांचा सरळपणा, कायसरची दंडुकेशाही व कर्झन, लॉईड जार्ज यांचा कावेबाजपणा, ह्या भिन्न गुणांनीं युक्त अशा त्यांच्या उद्गारांकडे पहावें. ह्या तीन विचार-

सरणी वरुण, अग्नि व इद्र ह्या तीन वैदिक देवतांच्या सत्तेप्रमाणे अगदीं भिन्न आहेत. वरुणाची निर्विकारता व अग्नीची प्रखरता यापेक्षा इद्राची धूर्तताच अधिक कार्यक्षम ठरल्याबद्दल पुराणेतिहास साक्ष देत आहेत. आपल्या सत्तेच्या शाश्वतीसाठी इद्राने प्रजेत नास्तिक मताचा फैलाव केला, तेजस्वी तपस्व्याचा तपोभग केला, प्रल्हादासारख्या सरळ स्वभावी महापुरुषाचे शील हरण केले, बलिष्ठाशी कपट केले, प्रतिस्पर्ध्यात झगडे लावले व बुद्धिमतासही मोह घातला. ह्या प्रकारे इंद्रसत्तेने पूर्वी कसकशी कारवाई केली, हे वाचकांच्या लक्षात असेलच. ह्याच जुन्यापुराण्या इतिहासाची अथवा पौराणिक कल्पनाची पुनरावृत्ति गेल्या एकोणिसाव्या शतकात घडून आलेली आपणांस पहावयास मिळते.

राजा राममोहन म्हणतात की, आमची सस्कृति एका काळी फाजील सुधारून राहिल्यामुळे आम्हांस परधर्मीयाचा असा हा जाच आज कित्येक शतके सोसावा लागला आहे. पुढे येणारी क्रांति प्रतिकारानी हटवून लावावी, हे आमचे जसे काही शीलच नाही. हिंदभूमीचा चूडामणि असा जो हिमाचल त्याच्या स्फटिकरूप प्रभेने बौद्धाचा पिवळा, महमदीयाचा हिरवा व इग्रजाचा तांबडा अशा अनेक रगास पोटात घेऊन पुन्हा ती आत्मप्रभा अतर्दृष्टीने पाहता अभग व अविकारी अशीच राहिली, हे तर हिंदूचे दिव्य यश आहे, यात शका नाही. तथापि कोणत्याही रगाचे किरण येवोत, त्याचा प्रतिकार म्हणून करावयाचा नाही, हा जो स्फटिकाचा सात्त्विक गुण, तो त्याच्या शुद्ध स्वरूपाची हानी करतो ही गोष्ट कित्येकाच्या लौकिकदृष्टीस सहजच उद्वेगजनक वाटते. उलटपक्षी स्फटिककुसुमाचे दृष्टान्तातील स्फटिकाची अलिप्तता आर्यधर्मात कधीच राहिलेली नाही. उलट ह्या ससर्गगुणानी आर्य-धर्म आजपर्यंत सपन्न होत आला आहे व याच प्रकारे तो पुढेही सुधारत जाणे इष्ट आहे, अशीही कित्येकाची विचासरणी आहे.

पूर्वी भारत-वर्षातून बौद्धधर्म गेला खरा; परतु त्याची छाप निदान बंगाल प्रांतावर जी पडली, ती पुढे तशीच राहिली. बगाली लोकांच्या आचार विचारात वैदिकधर्मापेक्षां बौद्धधर्माचाच अश अधिक राहिला. पुढे बौद्धधर्माच्या सस्कारामुळे जातींचीं व धर्माची बंधने अत्यंत शिथिल होऊन बंगाल प्रांतीं भिन्न वशांचा व वर्णांचा संकर कित्येक शतके सुरू राहिला.

बौद्धधर्मांतूनच निघालेल्या कित्येक तांत्रिक पथांत प्रत्येक शाक्तास चिनी, भुतानी, सयामी अशा अहिंदु मुलींशीं लग्न लावण्यास रूढीची परवानगी होती, इतकेंच नव्हे तर प्रत्येक शाक्ताची एक तरी शक्ति ( स्त्री ) अहिंदु असावी असा परिपाठ होता. राजा नंदकुमार याची शक्ति ( स्त्री ) पठाण जातीची होती. हा केवळ अपवाद नसून नियमच होता. आणि अशा प्रकारें पूर्वेकडील सर्व वंशांतील व वर्णांतील रक्त आमच्या अंगात खेळत आलें आहे, ह्या गोष्टी काहीं बंगाली लेखक आजही अभिमानपुरःसर सांगत असतात. बंगाल ही केवळ शाब्दिक नव्हे तर सक्रिय ऐक्यवर्धनाची भूमि असल्यामुळें भिन्न संस्कृतीच्या लोकांशीं संबंध आला असता त्यांच्याशीं रोटीबेटीव्यवहार करून त्यास आपलेंसे करून घेणें हे बंगाली लोक आपलें ब्रीद समजत. पठाणाच्या स्वाऱ्या बंगाल्यांत झाल्या; पण त्या शत्रुभावानें झाल्या नसून बंगाली लोकांनीं त्यास बोलावून घेतलें व त्यांशीं सोयरीक जमवून सलोखा करण्याचा उद्योग केला. पण त्यामुळें साहजिकच पूर्वबंगाल्च्या बऱ्याच भागांत इस्लामीधर्म सुरू झाला आणि जेथें प्रत्यक्ष धर्मांतर झालें नाहीं तेथेंही पठाणी रक्त खेळूं लागलें. पुढें हळुहळू याचा परिणाम असा झाला कीं, भाविक लोकांच्या तोंडीही गंगास्नानाचे वेळीं वाल्मीकमुनींचें गंगाष्टक जाऊन दाराब गाझी याचे दोहरे येऊं लागले. रामप्रसाद याच्या देवीगीताच्या बरोबरीनें जानबालीखान याचे गज्जल सुरू झाले. धार्मिक आचारांत बौद्ध, इस्लामी व हिंदी अशा धर्मांचा संकर झाला. जलाली फकीर हिंदूंचे गुरु झाले. सुफी तांत्रिक हजारों झाले. चोहोंकडे सत्यपीराची पूजा हिंदुधर्मिष्ठ बायाही करूं लागल्या. तात्पर्य, शाक्त व वैष्णव असाच काहीसा भेद हिंदु-मुसलमानांत राहिला. पूर्वीं सेन राजांनीं बंगाली लोकास आर्य-संस्कार देण्याचा व त्यास ब्राह्मण्याच्या अनुशासनांत ठेवण्याचा पुष्कळ प्रयत्न केला होता; परंतु बंगाली लोकांनीं तें न मानतां आपलें वैशिष्ट्य सोडलें नाहीं. आजही बंगालच्या ब्राह्मपंथाचे कट्टे अभिमानी आपणास हिंदु म्हणवून घेण्यास तयार नाहींत. आम्ही बंगाली आहोंत, आम्ही ब्राह्म आहोंत, अशा प्रकारचा त्यांचा अभिमान आहे. ह्याप्रमाणें आर्य, हिंदु, ब्राह्मण यांसंबंधी बंगाली लोकांनीं मानलेली परकीयता व परकीयांना घरांत घेण्यांत त्यांनीं दाखविलेली आतिथ्यशीलता या बंगाल्यांतही

आज सर्वमान्य असतील असें सांगवत नाहीं. आणि तशा त्या असल्या तरी महाराष्ट्रीय वाचकांस त्या कितपत मान्य होतील याबद्दल शकाच वाटते.

ते कांहीं असो; अशा आतिथ्यशील बंगाली लोकांची इंग्रजांशीं प्रथम गांठ पडली, त्या वेळीं म्हणजे सुमारे शभर वर्षापूर्वी बगालप्रांतांतील धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थिति शोचनीय झाली होती, ह्यांत शंका नाहीं. सनातन हिंदुधर्माचे अत्यत उज्ज्वल आणि उदात्त असे स्वरूप लुप्तप्राय होऊन अज्ञान आणि अधश्रद्धा ह्यांचे गोंडवगाल पसरले होते. एकमेवाद्वितीयम अशा परमात्म्याची ओळख बुजून, धातु, काष्ठ, पाषाणाच्या मूर्तीसच लोक परमेश्वर समजू लागले होते. मूर्तिपूजेतील ग्राह्यांश लक्षात न घेता, बाह्योपचाराचे दभापायीं अनेक पथभेद माजले होते. कित्येक वैष्णवांचा विषयीं मधुर प्रेमभाव, कित्येक तामसी शाक्तांचे घोर बलिदान आणि यथेच्छ मद्य-मांससेवन, तसेच कित्येक चकलेल्या तांत्रिकाचे अनीतिमय वामाचार इत्यादि प्रकारानी धर्माला अत्यंत विकृत स्वरूप प्राप्त झाले होते. प्रतापचद्र मुजुमदार लिहितात की, त्या वेळीं एका दुर्गादेवीनें बगालच्या सर्व देवदेवताचे हक्क हिरावून घेतले होते. साऱ्या बगालइलाख्यातील अर्धे बोकड एकट्या दुर्गादेवीलाच लागत! तत्कालीन एक सुप्रसिद्ध राजे कृष्णचंद्रराय हे एक जबरदस्त देवीउपासक असून मोठे गणिती होते! त्यानी एकदा आपल्या आराध्यदेवतेस त्रेसष्ट हजार पाचशें एकूणनव्वद बकरे गुणोत्तराढीनें बळी दिले! हिंदु असो की मुसलमान असो, नवरात्र असो की ईद असो, धर्मवेडास्तव असा जीवांचा होत असलेला संहार सारखाच असमर्थनीय ठरतो. असो. ह्याचप्रमाणे अग्निनारायणास सतीदान. गगानदीस अपत्यदान, प्रयागास करवत घेणें आणि जगन्नाथाचे रथाखाली देहसमर्पण, असले देहत्यागाचे अज्ञानमूलक व अतिरेकाचे प्रकार अत्यत श्रेयस्कर म्हणून गणले जात असत. खरी अध्यात्मविद्या अस्तंगत झाली होती संस्कृतवाङ्मयाची थोर पदवी आरबी व फारशी भाषांनीं बळकावली होती. वर्णव्यवस्था अनेक शतकांतील विधर्मी राज्यसत्तेखाली रसातळास गेली होती. दारिद्र्य व पारतंत्र्यांतील गुलामगिरी ह्यांमुळे ब्राह्मण शूद्रांचेही दासानुदास झाले होते. परकीय राज्ययंत्राचे जरबेमुळे वीरवृत्तीसही फारसा अवसर नव्हता. एतद्देशीयांपेक्षां अधिक साहसी अशा परकीयांनीं वैश्यवृत्तीसही बुडवीत आणिली होती.

सर व्यंकटरत्न आपल्या एका भाषणांत असे वर्णन करतात कीं, 'त्या काळीं विद्यासंपादनाकडे क्वचितच कोणाचे लक्ष असे. धार्मिक आणि आध्यात्मिक तेज नाहींसें होऊन त्याचे रूपांतर कांही अशीं निकृष्ट प्रकारच्या शिपाई-गिरींत राहिले होते. धर्म हा केवळ कांहीं विधींत राहिला होता. धर्मवेडापुढे बुद्धीस अवसर नव्हता. एक्या परमेश्वराची कल्पना शतावधि देवतारूपांत विभागली होती, जातीजातींत व धर्माधर्मांत भयंकर द्वेष माजला होता. कोमल मनोवृत्तींचा देहदंडणाच्या अघोरी पद्धतीनें ऱ्हास झाला होता. नीतिला अविचारी अशा रूढीचें कायमचे स्वरूप प्राप्त झाले होते. राज्ये पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणे उत्पन्न होऊन लयास जात होती. देश उध्वस्त करून लोकास जुलमानें बाटविणे हीच विजयाची चिन्हे मिरविलीं जात होती. अराजक स्थितीमुळें मालमत्तेस शाश्वति नव्हती. दळणवळणें बंद होती. राष्ट्राच्या अवयवाची शकलें झाली होती. मने परस्परांशी विन्मुख झाली होती व लोकांचे हात एकमेकाचा घात करण्यास सरसावले होते ! अशा रीतीनें हा प्राचीन भारतवर्ष त्या काली अत्यंत संकटावस्थेत व विपन्न स्थितीत येऊन पोचला होता'.

देशात दारिद्र्य वाढत चालले होतें व जे कांही थोडेफार जमिनदार व जहागिरदार होते, ते बेजबाबदारपणे नाचरंग व तमाशे ह्यात दंग झाले होते. कोणी नवकोटनारायण आपले पैसे कसे उधळावे, ह्या विवंचनेत पडून घरच्या मुलाच्या अभावी पाळीव माकडाचे लग्नसमारंभात लक्षावधि रुपये उडवीत होते, तर कोणी हरीचे लाल वेळ जाईनासा झाल्यामुळे, पतंग उडवीत किंवा कोंबड्याच्या झुंजी लावीत आपली कालक्रमणा करीत होते. कोणाचा पायपोस कोणाचे पायांत नाहीं. आपले पारमार्थिक अगर सामाजिक कर्तव्याची कोणास जाणीव नाहीं, अशी लज्जास्पद स्थिति चोहोंकडे दिसून येत होती. अशा वेळी स्त्रियांची स्थिति तर अत्यंत अनुकंपनीय झाली होती. स्त्रियांना कडक गोषा असे. जेथे प्रकाशाचे किरण गोषामुळे पोचूं शकत नसत, तेथें अज्ञानाचा अंधकार कशाने दूर होणार ! त्यातही त्या वेळी बहुपत्नीत्वपद्धति जारीने अमलांत होती. विधर्मी लोकांचे कित्येक शतकांचे जांचामुळे व सहवासामुळें कुलभ्रष्टता वाढून ब्राह्मणांमध्ये शुद्ध व कुलीन घराण्यांचे माहात्म्य अत्यंत वाढलें होते. जो तो आपली मुलगी हरप्रयत्नानें

अशा कुलीन घराण्यांत देण्यास पाही. ह्यामुळे अशा घराण्यांतील पुरुषांस पंधरापंधरा, वीसवीस, बायकाही कराव्या लागत ! परंतु ह्यापैकी कित्येक अभागी स्त्रियांना एकदा माळ पडल्यावर नवऱ्याचे मुखावलोकन करण्याचा योग साऱ्या हयातीत क्वचितच येत असे ! मग स्त्रियात अनाचार माजल्यास त्यात नवल काय ! शिवाय इतक्या बायका व त्यांची मुले ह्यास पोसणे, बहुतेकास अशक्यच असल्यामुळे, गरीब बिचाऱ्या अबला अन्नाला महाग होत. तशांतही दुर्दैवाने त्यास वैधव्य प्राप्त झाल्यास त्या उपासमारीत व विटंबनेत दिवस कंठण्यापेक्षा सच्छील व गरीब स्त्रियास नवऱ्याबरोबर सती जाऊन जिवाचा शेवट करून घेणेच बरे वाटे ! त्यातूनही ज्या दुर्दैवी स्त्रियास असे जिवतपणीच जाळून घेण्याचे साहस होत नसे, त्यास पोसण्यास कटाळलेले आप्त व त्यांचे अभावी इस्टटीवर वारसा सांगणारे दाईज, कित्येक ठिकाणी खुषीची सक्ति करून त्या गरीब गायास 'सती' या मोठ्या नावाखाली कोठे उघड जुलमाने, तर कोठे भांगेसारखे मादक पदार्थ पाजून, जिवत जाळून टाकीत असत ! आपल्या कोणत्याच कामना पुऱ्या झाल्या नाहीत, व आपली पोटची दीनवाणी पोरे पोरकी होऊन मागे राहिली, या अंतर्गाच्या असह्य दुःखाग्नीने व बाहेरच्या प्रत्यक्ष भडकलेल्या चिताग्नीने होरपळून जात असता, प्रतिवर्षी शेकडो तरुण स्त्रियांनी ज्या किंकाळ्या फोडल्या असतील, किंवा जग कसे ते अद्याप ज्यांनी डोळे उघडून पाहिलेही नाही, अशी कोमल अर्भके नदीत फेकली गेली असता प्राण सोडताना त्यांनी जे अखेरचे लहानसेच आचके दिले असतील, तेच हिंदुस्थानचे पुढील अधःपातास कारणीभूत झाले, असे कोणी म्हणू लागल्यास, ती केवळ अतिशयोक्ति आहे, असे म्हणतां येणार नाही.

धार्मिक व सामाजिक परिस्थिति ह्याप्रमाणे खालावलेली असतांना त्या वेळची राजकीय परिस्थितीही काही स्पृहणीय होती असे नाही. यात्रेकरूनीं भरलेल्या नौका नदीचे मध्यभागी बुडवून शेकडो यात्रेकरू कसे तडफडत वैकुंठास जातात, ती गम्मत पाहाणारे नराधम नबाब त्या वेळीही विद्यमान होते. तथापि एकंदरीत मुसलमानी राजसत्ता अस्तास गेली असून मराठेशाही अंतःकलहाने ग्रस्त झाली होती; आणि एका नवीन राजसत्तेचा उदय होऊं घातला होता. अशा संधिकालचे अंधुक प्रकाशात उदित होणाऱ्या राज-

सत्तेचे घवघवीत रागरंग पाहूनच लोक इतके थक्क झाले होते कीं, अशा संधीस कोणकोणाकडून काय लुबाडण्याची संधि पहात आहे, याची कोणा-सच शुद्धि राहिली नव्हती. जो तो आपली घरे मोकळी टाकून नूतनोदित सत्तेचा रंगीबेरंगी सधिप्रकाश पाहण्यास बाहेर पडला. लहानानी थोरांची मर्यादा सोडली ! पढतमूर्खांनी वारा प्यालेल्या गाईच्या पाडसांप्रमाणे उच्छृं-खलवृत्ति स्वीकारली ! धीट स्त्रियांनी पडद्याचा पदर व डोळ्यांची भीड सोडून दिली, आणि शेकडो भोळीभाबडी तर तेजाने दिपून जाऊन, पायाखालील जमीन गेल्याचाही सुमार न राहिल्यामुळे, खाचखळग्यात पडून कायमचीं जायबदी झाली.

येथे वाचकास एक इषारा देणे जरूर दिसते की, वर जे आम्ही तत्कालीन परिस्थितीचे वर्णन केले आहे ते सर्वस्वी ख्रिस्ती व ब्राह्म लेखकाचे आधारेच केले आहे. यामुळे त्यात वस्तुस्थितीचा विपर्यास व अतिशयोक्ति हे दोष थोडेफार असण्याचा संभव आहे. ख्रिस्ती लेखक सारेच अप्रामाणिक असतील असे नाही तरी त्यास त्या वेळी हिंदु-समाजस्थितीचे यथार्थ ज्ञान होणे अशक्यच होते आणि ब्राह्म लेखकाची दृष्टि आपले जुने ते प्रायः वाईट अशी काहीशी पूर्वग्रहदूषित दिसते. आमच्या ह्या म्हणण्यास प्रत्यतर राममोहन ह्याच्या लेखातच मिळते. ख्रिस्ती-पाद्र्यांनी तत्कालीन हिंदुसमाज ऐदी, असंस्कृत व नीतिभ्रष्ट असल्याबद्दल टीका केली त्यास प्रत्युत्तर देताना राममोहन ह्यांनी त्या शतकातील हिंदु-समाजाची नीतिमत्ता युरोपियनां-पेक्षा खचित कमी नव्हती असे स्पष्ट म्हटले आहे. तसेच त्या वेळच्या हिंदूंचा उद्योग व विद्याव्यासंग ह्याचीही तरफदारी त्यांनी केली आहे.

तथापि ही गोष्ट निर्विवाद आहे की, तो काळ क्रान्तीचा होता आणि अशा ह्या क्रान्तिसमयाचे वेळी बंगालचे नवयुगाची नौका विदेशी व विधर्मी खडकावर हापटून नामशेष होण्याचा संभव होता. अशा वेळी विरुद्ध वाऱ्याचा तोल संभाळून ज्या कोणी ही नौका बुडूं दिली नाही, माचणीवर माचणी घेत घेत आजवर ती शाबूद ठेवली, अशा थोर पुरुषाचा व त्याचे दीर्घोद्योगाचा विचार करावयाचा तर बंगालचे सुप्रसिद्ध नेते राजा राममोहन रॉय ह्यांचे चरित्राचा व त्यांनी स्थापन केलेल्या ब्राह्मसमाजसंस्थेचा प्रथम विचार केला पाहिजे.

कारण एकोणिसाव्या शतकांत आरंभ झालेल्या ह्या नवयुगास कित्येक राममोहनयुग असेंच म्हणतात.

ह्या युगाच्या आरंभीं पाश्चात्य शिक्षणाने, नास्तिक व पाखंडवादाची अशी भयंकर लाट ह्या देशांत उसळली होती कीं, तिनें कित्येकांचे मतांप्रमाणें लवकरच सर्व देश आक्रमून हिंदुधर्म आमूलाग्र उखळून काढला असता. परंतु ईश्वराच्या अचिंत्य नियतीमुळे त्या वेळीं राजा राममोहन हा एक अलौकिक पुरुष निर्माण झाला व त्याने एकेश्वरीपंथ नामक एक नवीन लाट उत्पन्न केली, त्यामुळे पुढे येणारी आपत्ति टळली. पाश्चात्य संस्कृतीतील पहिली लाट थोपविण्याचा राममोहन ह्याचा बुद्धिपुरःसर प्रयत्न असो अगर नसो; पण त्यांच्या व्यक्तिमाहात्म्याने व त्यांनीं स्थापन केलेल्या ब्राह्म-पंथाने सुशिक्षितांचीं मने आपल्याकडे वेधून घेतली, आणि नंतर मेकॉलेसाहेबां-सारख्या विघ्नसंतोषी मुत्सद्द्यांचे संस्कृति-विजयाचें सुखस्वप्न लवकरच मावळलें येवढे खरे. ते कसे तो भाग पुढे यथाक्रम येईलच.

---



राजा राममोहन राय

जन्म–इ. सन १७७२ मृत्यु–इ. सन १८३३

## प्रकरण दुसरें

# राजा राममोहन

सिद्धांची लक्षणे हीं साधकाची साधनें होत, हा सिद्धान्त सर्वमान्य आहे. हाच सिद्धान्त एखादा संस्थापक व त्यानें स्थापलेली संस्था ह्या जोडीस लावल्यास असें दिसून येईल की, संस्थापकाचें चरित्र हें त्याच्या भावी संस्थेचें आदर्श असतें. संस्थापकांतील गुणदोष, हेच त्यांच्या संस्थेत प्रतिबिंबित होतात. ह्या दृष्टीनें एखाद्या संस्थेचें खरें स्वरूप व त्याचा कार्यकारणभाव नीटसा समजण्यास, त्या संस्थेच्या संस्थापकाचें चरित्र समजावून घेणें अगत्याचें होतें. आणि म्हणूनच आम्ही यापुढे ज्या संस्थांचें दिग्दर्शन करणार आहोत, त्या संस्थासंबंधीं नीट समजूत होण्यासाठीं, आम्ही त्या त्या संस्थापकाचें चरित्रांतील महत्त्वाचे भाग थोड्याशा विस्तारानें देण्याचें योजिलें आहे.

त्या काळीं बंगाल्यांत शाक्त व वैष्णव, असे दोन विरोधी पंथ प्रचलित होते. शाक्तपंथाचे धर्मगुरु शामभट्टाचार्य ह्या नावाचे भंगकुलीनांपैकीं एक होते. एक दिवस ते शिवपूजा करीत बसले असतां, त्यांची मुलगी तारिणी, आपल्या लहान मुलास घेऊन तेथें उभी होती. आजोबांनीं नातवास कौतुकानें जवळ बोलाविलें व पार्थिव लिंगावर वाहण्यास एक बिल्वपत्र त्याचे हातीं दिलें. त्यानें तें शिवलिंगावर न वाहतां कुसकरून खाऊन टाकलें. ही सहज घडलेली बाललीला त्या तामसी उपासकास सहन झाली नाहीं. या मुलाची जन्मकथाही नवलाची आहे. आपली मुलगी कुलीन घराण्यांत पडावी, म्हणून शामभट्टाचार्य यांनीं वैष्णव-पंथविरोध विसरून, व्रजविनोद नामक एका कट्टया वैष्णवाचे घरीं तिला दिली होती. वृद्ध व्रजविनोद अंतकाळीं त्या काळचे देशाचाराप्रमाणें गंगातीरीं मृत्युशय्येवर पडले होते. अशा वेळीं शामभट्टाचार्य आपल्या मुलीचें कल्याण व्हावें, या हेतूनें आपला पंथाभिमान बाजूस सारून त्या महावैष्णवास भेटण्यास गेले "आणि मी मागणी करीन ती आपण द्यावी" अशाबद्दल श्रीगंगेच्या शपथपूर्वक त्यांचेकडून अगोदर वचनही घेतलें. आणि ते वचनबद्ध झाल्यावर आपली मुलगी सून करून घेण्याबद्दल

त्यांनीं त्यांचेजवळ मागणी केली. परंतु त्या वैष्णवाचे मुलगे त्या भंगकुलीन शाक्ताची मुलगी करण्यास कबूल होतना. शेवटीं वृद्ध पित्याला वचनांतून मोकळे करण्यासाठीं त्यांचा पांचवा मुलगा रामकांत ह्यांनी त्या शाक्तकन्या तारिणीदेवीशी विवाह केला. पुढे तिला लगेच वैष्णवपंथाची दीक्षा देण्यांत आली. अशा रीतीनें शाक्त व वैष्णव ह्या अत्यंत विरोधी पंथांची जोड ज्याचे ठिकाणी झाली, असला हा बालक जणुं काय वैष्णवपंथाचे अभिमानानेंच प्रेरित होऊन शिवपूजेचा अव्हेर करतो, ही गोष्ट त्या वृद्ध तापसास अगदी दुःसह झाली, आणि अत्यंत क्रोधावेशांत शामभट्टाचार्य ह्यांनी त्यास उद्देशून असा शाप दिला कीं, "हा मुलगा पुढे वैष्णवपंथाचाही शत्रूच होईल, प्रायः हा विधर्मी होईल." हा घोर शाप ऐकून तारिणीचें अंतःकरण करपून गेलें, "बाबा हे काय केलेत!" असें म्हणत ती भीतीनें कापूं लागली. तेव्हा आजोबाना तिची दया येऊन ते इतकेंच म्हणाले कीं, "माझी ही वाणी तर अन्यथा होणार नाहींच; पण इतकेंच म्हणतो की, हा मुलगा मोठा कर्तृत्वशाली निघून सरकारदरबारी मानमान्यता पावेल."

शामभट्टाचार्य हे तत्कालीन शाक्तांचे देशगुरूंपैकीं प्रमुख धर्मगुरु होते आणि व्रजविनोद तर वैष्णवशिरोमणि श्रीचैतन्य ह्यांचे खास शिष्यपरंपरेंतीलच होते. ह्याप्रमाणे ज्याचे ठिकाणी भिन्न व विरोधी पंथ सम्मीलन पावले, असा हा मुलगा म्हणजेच ब्राह्मसमाजाचा संस्थापक राजा राममोहन रॉय होय. ह्यांचा जन्म हुबळी जिल्ह्यांत राधानगर येथें तारीख २२ मे १७७२ रोजीं झाला.

राजा राममोहन ह्यांचे जनक व जननी रामकांत व तारिणीदेवी (हिलाच फुलठाकुराणी असें म्हणत) ह्या वैष्णव दंपत्याचें राधागोविंद हे कुळदैवत होतें. प्रातःकाळीं उठून देवास गंधफूल वाहिल्याशिवाय पाणीही प्यावयाचें नाहीं, अशी त्यांचे घरची कडक शिस्त होती. ह्या शिस्तींत राममोहन यांचे बाळपण गेलें. तेही आपले कुळदैवताची पूजा व भागवताचा पाठ झाल्यावांचून पाणीही पीत नसत. श्रीकृष्णाचे ठायीं त्यांचा बालभाव इतका उत्कट असे, कीं श्रीकृष्णाच्या जन्मोत्सवाचे ललितांतील मानभंजनाच्या प्रयोगांत, राधिकेचा राग आलेला पाहून, बाळकृष्णानें आपला सुंदर मोरमुगुट तिच्या पायीं नमवावा व आपण शोकाविव्हल व्हावें, हा देखावा

त्या मानी बालभक्तास पाहवत नसे ! तारिणीदेवीचें धर्मानुष्ठान तर फारच कडक होतें. ती वैष्णव तर खरीच; पण करारीपणांत व बाणेदारपणांत तिचे पितृगृहींचे जन्मसंस्कारच अखेरपर्यंत जागृत होते. घरची चांगली सुस्थिति असतांना तिनें आपली अखेरची जगन्नाथाची यात्रा एकटीनें पायीच केली. आणि मरणापूर्वी एक वर्ष जगन्नाथाचे मंदिरात दासीचें अगदी हलके काम करीत असतानाच तिनें देह ठेविला. रामकांत मनाचे कोमल असत. पण तारिणी ही अत्यंत करारी होती. अशा धर्मिष्ठ आईबापास आपला मुलगा धर्मभ्रष्ट होणार ह्या शापाची फारच भीति पडली असल्यास नवल नाहीं. त्यानी त्याचे शिक्षणाकडे लहानपणापासून विशेष लक्ष पुरविलें. राममोहन यांसही बालपणापासून शिक्षणाची अत्यंत आस्था असून ते फार बुद्धिमान् व एकपाठी होते. प्राथमिक शिक्षण झाल्यावर त्या कालचे राजभाषातील वाङ्मयाचा अभ्यास करण्यासाठी त्यास पाटणा येथे पाठविलें. यावनी विद्येचे मुख्य विद्यापीठ तेथे असे. त्या काळी राजदरबारी आरबी व फारशी या भाषास फार मान असे. राममोहन त्या भाषाचा अभ्यास करीत असता त्यांचे अवलोकनात इस्लामी धर्माचे कुराण, तार्ब्राज, हाफीज, व रूमी या सुफीपंथाच्या कवींचे ग्रंथ, ॲरिस्टॉटल व युक्लीड याची आरबी भाषेतील भाषांतरें असे ग्रंथ आले. त्या ग्रंथाचा त्यानी फार आस्थापूर्वक अभ्यास केला. विधर्मीयाचे सत्तेचे कुयोगामुळे स्वधर्मशास्त्राचे परिशीलन होण्यापूर्वीच परधर्मातील तत्त्वज्ञानाने त्यांचे ज्ञानोन्मुख कोवळे मनावर कायमचे दृढ संस्कार करून टाकले. राममोहन यास सुफीपंथाचे तत्त्वज्ञान फार आवडले. इस्लामी धर्मातील एकेश्वरीपंथानें त्यांची राधागोविंद या प्रिय कुलदेवतेवरील श्रद्धा नाहींशी केली आणि ॲरिस्टॉटल व युक्लीड याच्या अध्ययनानें त्यांचा भाविक श्रद्धाळू स्वभाव पालटून त्यांनी तार्किक विचारपद्धतीचा अंगिकार केला.

राममोहन यांचे घराणें कुलीन ब्राह्मणाचे होते. पांच पिढ्यांपूर्वी त्यांच्या घराण्यांत फार श्रेष्ठ दर्जाचे धर्मिष्ठ पुरुष होऊन गेले होते. राममोहन यांच्या आईचे कुल प्रसिद्ध याज्ञिकांचे होते. पण राममोहन यांचे हे आनुवंशिक संस्कार आणि त्यांचे बालपण ही त्यांच्या प्रौढदशेतील चारित्र्याशी अगदींच विसंगत दिसतात. रामकांत यांची निस्सीम रामभक्ति व फुलठाकुराणी ह्यांचें राधागोविंदावरील अतुल प्रेम, ह्यांस साजेशीच राममोहन यांची कृष्णभक्ति

होती. त्यांनीं आपल्याला विद्या प्राप्त व्हावी म्हणून आपल्या आराध्य-देवतेच्या नाममंत्राचीं पुरश्चरणें एक दोन वेळां नव्हे तर बावीस वेळां करविलीं होतीं. इष्टदेवतेप्रमाणें आईबापांवरही त्यांचे फार प्रेम असे व तेही त्यांचे फार लाडके होते. आईबापांनीं त्यांचे लग्न फारच बाळपणी केले. पण पहिली बायको लवकरच वारली. तेव्हां ( इ. सन १७८१-८२ ) एक वर्षाच्या आत त्यांनीं दुसऱ्या दोन बायका केल्या ! त्या वेळीं ते अवघे नऊ वर्षाचे होते. अशा परिवारांत व संस्कारांत वाढलेले राममोहन पुढे लवकरच आपल्या कुटुंबांतील ( कुलदेवतेसुद्धां ) प्रत्येकाच्या प्रेमास पारखे झाले, नव्हे, त्यांचे कांहीं काळ जवळजवळ वैरी बनले, हे मोठेच आश्चर्य होय !

रामकांत यांच्याजवळ त्यांनीं अगदी लहानपणीही अध्यात्मचर्चा करावी, वडिलाचे सर्व म्हणणे शांतपणे ऐकून घ्यावे, पण त्यापुढें ह्यांचे " किंतु " हे आपले ठराविक असावयाचेच ! ही संशयी वृत्ति प्रथम पाटणा येथे उत्पन्न झाली. व त्याचा परिणाम, त्यांस आपल्या आईबापांपासून व पुढे बायका-मुलांपासूनही दूर रहावे लागलें. त्याच्या बापाने त्यांस घरांतून कांहीं दिवस घालवून दिले, व पुढे कांहीं वर्षांनी तो घरी परत आल्यावर, त्यांनी एकदां डॉक्टरांचे सांगण्यावरून आजारीपणात मासरस घेतल्याचे कळल्यावरून तर त्यांच्या आईने मोठाच गहजब केला व त्यांस पुन्हा घरांतून हांकून लावले ! इतकेच नव्हे तर त्यांस त्यांच्या अधार्मिक मतांस्तव बेवारस ठरविण्यासाठी त्यांचे पुतण्याने त्यांच्या आईच्या मदतीने, कोर्टात दावा दिला, आणि त्यांस वडिलार्जित मिळकत मुळींच मिळूं दिली नाहीं. तेव्हां राममोहन गांवाबाहेरील एका स्मशानभूमीवर घर बांधून राहिले ! एका बाजूस धर्मवेड व दुसरे बाजूस मतस्वातंत्र्य यांच्या झगड्याचा अतिरेकच झाला ! परंतु यावरून राममोहन यांची मातृपितृभक्ति कमी होती असे मात्र कोणी समजूं नये. पुढें इ. सन १८०३ सालीं रामकांत यांच्या अंतकाळी राममोहन आपल्या वडिलांच्या सन्निध होते. प्राणोत्क्रमणाच्या वेळींही रामकांतांच्या मुखानें होणाऱ्या रामनामाच्या घोषाबरोबर दिसून येणारी त्यांची आपल्या दैवतावरील प्रबल निष्ठा व उत्कट प्रेम पाहून, रामकृष्णादि देवांस त्या वेळीं न मानणाऱ्या राममोहनांसही, त्यांच्याबद्दल अत्यंत आदर वाटला. तो ठसा पुढें केव्हांही गेला नाहीं. वडिलांची इतराजी आपलेवर झाली होती ही गोष्ट



३ राजा राममोहन यांचा तिबेटचा प्रवास.



४ राजा राममोहन यांचा कलकत्याचा वाडा.

त्यांच्या मनास नेहमीं डांचत असे. राममोहन यांच्या उत्तरवयात जेव्हां क्वचित् आजाराने किंवा औदासिन्याने ते खिन्न होत, त्या वेळी कपाळाला आंठ्या घालून आपल्याकडे क्रुद्ध मुद्रेने पहाणारी त्यांच्या वडिलांची मूर्ती त्यांचे मनापुढे हटकून येई !

ही पुढील हकीगत सोडून पूर्ववृत्ताताकडे वळता असे दिसतें की, राजा राममोहन यांच्यासारखे थोर पुरुष या भूलोकी काही विशिष्ट कार्य करण्याकरिताच जन्मास येत असतात, व ईश्वराच्या नियत्यनुसार त्या ठराविक कार्याची निकड लागल्यामुळेच कीं काय, ते लहानपणीच मोठे प्रौढ होतात. पाटणा येथील आपला विद्याभ्यास सपवून राममोहन घरीं परत आले तेव्हा ते पधरासतरा वर्षांचे असतील. तेवढयाही वयात त्याना जे काही समजले होते ते दुसऱ्यास समजावून सांगण्यास ते उतावीळ झाले. त्यांनी एक मूर्तिपूजानिषेधपर लहानसा ग्रथ फारशी भाषेत लिहिला. कुराणादि ग्रथाचे अध्ययनाने मूर्तिपूजेवरील त्याचा भाव नष्ट होताच इतराचीही मूर्तिपूजेवरील निष्ठा दूर करण्यासाठीं ते एक प्रकार उत्कंठित झाले. मूर्तिपूजानिषेधक असा त्याचा तो लेख त्याचे वडिलाचे नजरेस आला, तेव्हा त्यास आपल्या मुलाचा अतिशय राग आला. त्या आपत्कालींही धर्माभिमानाचा पारा इतका चढलेला होता की, ह्या त्याचे धर्मबाह्य विचाराबद्दल त्यास गृहत्यागाचे घोर प्रायश्चित्त भोगावे लागले ! राममोहनही काहीं कच्च्या दिलाचे नव्हते, त्यानीं ती शिक्षा धिम्मेपणाने अगिकारली. इतकेच नव्हे, तर मूर्तिपूजेसबधी बौद्धधर्मात काय सागितले आहे, याचा अभ्यास करण्याकरिता ते इतक्या अल्पवयातही, इ. सन १७८७ सालीं, हिमालयासारखा महापर्वत उलटून तिबेटात निघून गेले ! केवढी ही जबरदस्त धर्मजिज्ञासा ! तिबेटात जाऊन पाहतात तो तेथील लोक लामाला परमेश्वराप्रमाणे मानतात. एक लामा मेला तर त्याचे पश्चात् पाळण्यातील एखाद्या लहान मुलांसही तितकाच मान देतात, असे त्यांस आढळून आले. या त्याच्या धर्मभोळेपणाबद्दल राममोहनानी त्याचेसमोर कडक टीका केली. त्यामुळे ते धर्मवेडे तिबेटी लोक सतापून जाऊन राममोहन याचे जिवावरच उठले होते. परंतु त्या कुमाराचे भाषणकौशल्य व धिटाई पाहून तिबेटी स्त्रियांना त्यांचेबद्दल मोह उत्पन्न झाला होता. त्यांनीं राममोहन यांचे जिवावरील प्रसंगांतून त्यांची मोठ्या युक्तीनें सुटका केली. या प्रसंगी त्या स्त्रियांनीं

त्यांचेवर केलेले उपकार राममोहन पुढे कधीही विसरले नाहींत; उलट स्त्रियांचे कल्याणाकरितां इतउत्तर अहर्निश झटण्याचा त्यांनीं सकल्प केला.

तीन चार वर्षे तीर्थाटनांत घालविल्यावर इ. सन १७९०–९१ सालीं राममोहन श्रीक्षेत्र काशी येथे सहकुटुंब येऊन राहिले. तेथे त्यांनीं सस्कृत वाङ्मयाचा आणि आपल्या धर्मशास्त्राचा अभ्यास करण्यांत बरीच वर्षे घालविली. पुढे मि० डिग्वी नावाच्या एका कलेक्टराची शिरस्तेदारी त्यानीं पत्करली. या नोकरीच्या निमित्ताने रगपूर येथे असता ते आपल्या घरीं धर्मचर्चेकरितां फावल्या वेळी काहीं मंडळी जमवू लागले. काहीशी आश्चर्याची गोष्ट अशी की, प्रथम त्याग काही मारवाडी व्यापारी येऊन मिळाले. जमाबंदीचा नवीन जम बस वयाच असल्यामुळे, त्या वेळीं कलेक्टरच्या शिरस्तेदाराचे काम अत्यत दगदगीचे असे. पण दिवसभर ती दगदग करून सायंकाळचे फुरसतीचे वेळीं कित्येक हिदु, मुसलमान व जैन गृहस्थांबरोबर ते धर्मसंवाद करीत असत. हरिहरानंदतीर्थस्वामी नांवाच्या एका बंगाली विद्वान् तांत्रिकाकडून त्यानीं तत्राचाही अभ्यास केला. त्यांच्याकडे येणाऱ्या मारवाडी व्यापाऱ्याकरितां त्यानीं जैन-धर्मीयांची धर्मसूत्रे व त्याचे इतर धर्मग्रंथ याचे परिशीलन केले. इतकेच नव्हे, तर आपले वयाचे पचविशीत–इ. स. १७९६ सालीं–त्यांनीं इंग्रजी भाषेचा अभ्यास सुरू केला, आणि डिग्वीसाहेबांच्या पत्रव्यवहाराचे आधारे व पुढे पुढे त्याची वर्तमानपत्रे वाचून त्यांनीं इकुहळ इग्रजीवर इतके प्रभुत्व संपादन केले कीं, त्यांनी इ. सन १८१६ साली व त्यानतर इग्रजी भाषेत केलेले ग्रथ कोणाही युरोपियन पंडितास साजण्यासारखे आहेत, असे इंग्लडमधील विद्वान् म्हणू लागले.

याच वेळीं फ्रान्स देशात राज्यक्रान्ति सुरू होती. तत्संबंधीं लेख डिग्वीसाहेबांकडे येणाऱ्या वर्तमानपत्रांत राममोहन यांस वाचावयास मिळत. स्वातंत्र्याची त्याच्या जिवास इतकी तळमळ असे की, फ्रेंच लोकांच्या स्वातंत्र्यासाठीं चाललेल्या झगड्यांत त्याना अपयश आल्याची बातमी त्यांनीं वाचली, कीं त्यांचे डोळ्यांत आसवे उभीं रहात. पुढें एकदां इ. सन १८३१ सालीं विलायतची सफर करीत असतां केप ऑफ गुडहोप येथे एका फ्रेंच जहाजावर स्वातंत्र्याचे निशाण फडकत असलेले त्यांनीं पहातांच त्यांना इतका आनंद झाला कीं, शिडीवरून पडून पाय मोडल्याचेंही भान त्यांना राहिले

नाहीं. ते आपल्या बोटीवरून उतरून त्या स्वातंत्र्याचे निशाणाखालीं तसेच लंगडत लंगडत जाऊन फ्रान्सचा जयजयकार करून आले! स्पेन देशांतील अंदाधुंदी मोडून तेथे लोकसत्तात्मक राज्य स्थापन झाले तेव्हां तर, त्यानीं कलकत्त्याचे नगरभवनांत आनंददर्शक मेजवानीच दिली! हिंदुस्थानचे राजकीय अभ्युदयाकरिताही त्यानी देशकालमानाने बरेच प्रयत्न केले. जीस हल्ली सनदशीर चळवळ असे म्हणतात तिची जागृति त्यांनीच प्रथम उत्पन्न केली, आणि कित्येक कायदेकानूंचे बरेवाईटपणाबद्दल लेख लिहून पुष्कळ भवति न भवति केली. इंग्रजसरकारबद्दल प्रथम त्यास अत्यंत तिटकारा असे; पण पुढे त्यांचे संस्कृतीबद्दल त्यांचा फारच अनुकूल ग्रह झाला. त्यानी लोकशिक्षणाचे मिषाने ख्रिस्ती मिशनरी प्रथम बोलवेलावून हिंदुस्थानात आणले आणि पाश्चात्याचे सहवासावाचून आमची उन्नति होणार नाही, या समजुतीनें युरोपियनाच्या वसाहती येथे व्हाव्या, या मुद्दयाचाही त्यानी फार झटून पुरस्कार केला.

याप्रमाणे राममोहन रॉय याच्या आयुष्यांतील व्याप जरी अनेक होते, तरी त्याच्या चरित्राचे मुख्य उद्दिष्ट धार्मिक सुधारणा हेच होय. ज्या लोकाना ईश्वराचे खरे ज्ञान नाही, ते महत्त्वाला चढावयाचे नाहीत, असे त्यान वाटे. मनुष्यस्वभावाला धर्म हा एक आवश्यक विषय आहे, आणि त्यातच त्याचे खरे कल्याण आहे, असे त्याचे म्हणणे असे. परंतु धर्माचे बाबतीत खरी मार्गदर्शक श्रद्धा नसून बुद्धि आहे, असा त्याचा ग्रह झाला होता.

एकेश्वरीपंथाच्या लोकांस उद्देशून त्यानी तुहफतुल मुवाहिद्दीन या नावाचा जो पहिलाच फारशी ग्रथ लिहिला, त्याच्या प्रस्तावनेत ते म्हणतात की, "मी ह्या पृथ्वीवरील दूरदूरचे देश फिरून आलो आहे. डोंगरातील आणि शहरातील लोकास भेटलो आहे. त्यावरून मला असे आढळून आले आहे की, ज्याने हे जग उत्पन्न केले, व जो ह्याचे नियमन करीत आहे, अशा एका परमेश्वराबद्दल सर्वांची आस्तिक्यबुद्धि आहे. परंतु त्या परमेश्वराचे गुणधर्म व त्याने अनुशासित धर्मपथ ह्यांबद्दल मात्र चोहोकडे मतभेद व तीव्र विरोध दिसत आहे." परमेश्वर एकच आहे, हे मत त्यांनी विशेषकरून महमदी धर्मांतून घेतले. परंतु हिंदूंप्रमाणे मुसलमानांचीही त्या काळची ईश्वर-विषयक कल्पना राममोहन यांस मान्य नव्हती. ईश्वर म्हणजे स्वर्गीय साम्राज्याचा

स्वामी, महंमद पैगंबर हा याचा मुख्य प्रधान आणि इतर देवदूत ही त्यांची प्रभावळ इत्यादि मुसलमानांच्या ईश्वर-विषयक कल्पनांचा निषेध करण्याकरितांच त्यांनीं हा पहिला ग्रंथ लिहिला. ह्या त्यांच्या पहिल्या ग्रंथास पाटणा येथील फारशी व आरबी वाङ्मयाचा अभ्यासच कारणीभूत झाला हे उघड आहे.

ह्या ब्राह्मधर्म संस्थापकाच्या विचारांची वाढ प्रथम कशारीतीने झाली, हें बारकाईने पाहणें जरूर असल्यामुळे, त्यासबंधीं चर्चा येथे थोडी विस्तारानें करणे वावगे होणार नाहीं. कुराण वाचून एक अशी गोष्ट राममोहन यांच्या लक्षात आली कीं, महमद पैगंबर हा जर खरोखर ईशप्रेषित असेल, आणि त्याने स्थापन केलेला धर्म हा जर ईश्वरानेच सांगितलेला—अतएव सत्य असेल, तर तद्व्यतिरिक्त दुसरे सर्व धर्म खोटे, त्याज्य व निंद्य ठरतात. त्या दुसऱ्या धर्मांतील लोकांस सद्गति मिळणे किंवा त्यांचे ऐहिक अथवा पारमार्थिक कल्याण होणे, हे सर्वथा अशक्य ठरते. इतकेच नव्हे, तर त्या धर्मांप्रमाणे अशा निंद्य प्रकारचे हिंदुधर्मीय मूर्तिपूजकास, ते भेटतील तेथे जीवे मारावें, हे एक पवित्र कर्तव्य होते. परंतु याचबरोबर इतर धर्मांचे बाजूंनी विचार केला, तर त्यांचे संस्थापकही ईशप्रेषित व अतिमानुष शक्तीचे, आणि त्यांचे धर्मही ईशाचे संकेतानेच झालेले व म्हणून कल्याणकारक असे मानलेले आढळले. तेव्हा त्यास असे वाटले की, या परस्परविरोधी गोष्टींत कोणती तरी एक असत्य असलीच पाहिजे, आणि ज्याअर्थी त्यांपैकी अमुक एक असत्य असें निश्चयात्मक म्हणण्यास आधार नाहीं, त्याअर्थी ह्या प्रचलित विसंगत धर्ममतास शाश्वत सत्याचा मुळीच आधार नसून, निरनिराळ्या धर्मगुरूंनी आपापला संप्रदाय वाढविण्याकरितां ही माजविलेली थोतांडे आहेत. आणि त्यास अद्भुत चमत्कारासारख्या अनेक परंपरागत अशा आख्यायिकांचीं पुटें मिळून, श्रद्धाळु अशा समाजानें तीं सत्यस्वरूप मानली आहेत.

प्रत्येक धर्माचे प्रणेते, त्यांच्या आज्ञा व सिद्धान्त ह्याबद्दल शंका घेणें, हे त्या त्या धर्मांप्रमाणे पाप मानण्यांत येतें; कारण ते धर्मसंस्थापक दिव्य शक्तीचे असतात, असा समज असतो. यामुळे त्यांच्या कित्येक आज्ञा बुद्धीस विसंगत वाटल्या तरी तशाच अंधश्रद्धेने पाळण्यांत येतात. परंतु मृतास सजीव करणे, अंतराळांतून उडून जाणे इत्यादि असंभाव्य गोष्टी करतां येतात, असा दृढ-

विश्वास बाळगणें, हें एक दुसरें थोतांड आहे. असें जर होऊं लागलें तर संभाव्य आणि असंभाव्य ह्या शब्दांत भेद तो काय राहिला? इतरांची कथा काय, पण साक्षात् ईश्वरासही असंभाव्य गोष्ट घडवून आणतां येणार नाहीं. नाहींतर ते असंभाव्य तें काय! ज्याप्रमाणें युरोपियन लोकांनीं लावलेले शोध किंवा जादुगारांचे खेळ यांत पाहाणारास अद्भुत प्रकार वाटतो; पण वास्तविक त्यांत अतिमानुष शक्तीचे व सृष्टीनियमास अपवादक असे कांहींच प्रकार नसून इतर सामान्य व्यवहाराप्रमाणें त्यांतही विचाराअंती कार्यकारण-भाव दिसून येतो. तसाच सर्वत्र खरा प्रकार असता, कित्येक धर्मवेडे लोक सृष्टचमत्कारांचा खरा कार्यकारणभाव शोधून न काढता ते हे चमत्कार कोणातरी व्यक्तीच्या दिव्यशक्तीचे परिणाम आहेत असें मानून चकित होतात. यामुळे त्यांची धर्मनिष्ठा जास्त कडवी व हेकेखोर होत जाते. आपलाच धर्म अशा दिव्यशक्ति प्रसवणारा आहे, अशा अभिमानानें ते परधर्मीयांशीं विरोध करितात व अशा प्रकारच्या धर्मवेडानें मोटमोठीं रणकंदनेंही माजतात.

तात्पर्य, ह्या धर्मप्रकरणी एक भोंदू गुरूंचा असा वर्ग आहे कीं, ते आपापला सांप्रदाय वाढविण्यासाठीं नानामतें व पंथ उभे करतात व लोकांत नसते अभिमान उठवून यादवी माजवितात. दुसरा वर्ग भोळ्याभाबड्या लोकांचा असतो. ते सत्यान्वेषणाचा कांहींच प्रयत्न न करता आपल्या सांप्रदायिक गुरूंचे अनुयायी बनतात. तिसरा एक वर्ग स्वतः फसला जाऊन लाड्या कोल्ह्याप्रमाणें इतरांस फशीं पाडणाराचा असतो आणि चौथाही एक वर्ग खऱ्या धर्मप्रवर्तकांचा असा असतो कीं, ज्यांचे कुळांत ते स्वतः फसला जात नाहीं व इतरांसही फसवीत नाहीं. राममोहन प्रौढ दशेत आले असतां त्यांचे विचार वरील प्रकारचे होते. नुसते शुष्क विचार करून स्वस्थ बसणारे ते पुरुष नव्हते. ते मोठे मुत्सद्दी व कार्यकर्ते होते. यामुळे उपरिनिर्दिष्ट चार वर्गांपैकी पहिले तीन हळूहळू नामशेष करून चवथ्या वर्गाची संख्या वाढवावी अशी त्यांनी महत्त्वाकांक्षा धरली.

## प्रकरण तिसरें

# नवीन विचारांचें मूर्तस्वरूप

इ. सन १८१४ मध्ये राममोहन नोकरीचे बंधनांतून मोकळे होऊन कलकत्त्यास येऊन राहिले. त्या वेळीं ते चांगल्या संपन्न स्थितींत होते. शिवाय त्यांच्या रंगपूर येथील सभा व सभाषणे आणि त्यांनीं प्रसिद्ध केलेलीं एक दोन लहान पुस्तकें, ह्यांची वार्ता कलकत्त्यास येऊन पोंचली होती. यामुळे त्यांचे भोंवतीं फार मोठ्या बड्या घराण्यांतील मंडळी हळुहळू जमूं लागली. कलकत्त्याचें वातावरण त्यांच्या सुधारलेल्या विचारास जास्त अनुकूल होतें. कारण तेथें सर्वसामान्य फारशी शिक्षणाचे संस्कारांत आणखी इंग्रजी संस्कारांची भर पडत चालली होती. त्यामुळे सुशिक्षितांचा आत्मविश्वास नाहींसा होऊन, आपलें कोठें तरी बरेंचसें चुकलें आहे, ही भावना कित्येकांचे ठायीं जागृत झाली होती. अशा अनुकूल भूमींत राममोहन यांनीं धर्मविचाराकरितां **आत्मीय सभा** नामक संस्था सन १८१५ साली स्थापन केली. सुप्रसिद्ध कवि रवींद्रनाथ यांचे आजे द्वारकानाथ ठाकूर, जस्टिस मुकर्जी यांचे आजे बाबू विश्वनाथ, राजनारायण बोस यांचे वडील नंदकिशोर बोस अशी अनेक श्रीमान् व सुप्रसिद्ध मंडळी या सभेंत दाखल होती. अर्थात् सर्वांचीच धर्मजिज्ञासा सारख्याच दर्जाची होती, असें नव्हे. कांहीं केवळ राममोहन यांच्यासारख्या थोर पुरुषाची ओळख असावी म्हणून सभेस येत असत तर कांहीं राममोहन यांच्या अंगीकृत कार्यांत त्यांचे सहकारी मित्र असत. कांहीं तर शिष्यभावानें त्यांचेजवळ असत. आपले धर्मशास्त्रांतील गहन सिद्धान्तांचे उद्घाटन करण्याचे कामीं पंडित शिवप्रसाद मिश्र व हरिहरानंदतीर्थस्वामी यांचें राममोहन यांस बरेंच साह्य झालें. पुढे ह्याच हरिहरानंदतीर्थस्वामींचे बंधु रामचंद्र विद्यावागीश हे राममोहन यांचे ब्राह्मसमाजाचे पहिले आचार्य झाले.

आत्मीय सभेची बैठक प्रथम कांहीं वर्षे आठवड्यांतून एक दिवस राजा राममोहन यांचे घरीं होत असे. तेथें शिवप्रसाद मिश्र कांहीं वेदपाठ म्हणून

त्यांतील रहस्य सांगत असत आणि नंतर कलकत्त्यांतील एक सुप्रसिद्ध गोविंद-माला म्हणून गवई होते, ते राममोहननी केलेलीं काही प्रार्थनागीतें म्हणत असत. याच सभेत सन १८१९ साली सुब्रह्मण्यशास्त्री या नावाचे एक मद्रासी व राममोहन याचे दरम्यान मूर्तिपूजेसबंधी मोठा वादविवाद होऊन त्या वादात राममोहन यानीं आपल्या बुद्धिवैभवानें प्रतिस्पर्ध्यास चीत केले असे म्हणतात. या वादविवादाची कल्पना वाचकास स्पष्ट कळण्याकरिता त्यासंबंधीं पुढे एक स्वतंत्र प्रकरण लिहिले आहे.

आत्मीय सभेतील वादविवाद करूनच राममोहन थांबले नाहीत. वेदान्त-विद्यारूप गुप्तधन त्यानीं सरसहा सर्व जिज्ञासूस सुलभ करून दिलें. कोठें भाषांतररूपानें तर कोठें साररूपाने. इंग्रजी, बंगाली आणि हिंदी अशा भाषातून एकामागून एक ग्रंथ छापून, त्यानीं वेदान्तशास्त्राचा परिचय सरसहा सर्व वाचकास करून दिला. इ. सन १८१६ ते १८१९ ह्या साली त्यानी मंडुक, केन, कठ व ईश अशा उपनिषदाची व वेदान्तसूत्राची भाषांतरें प्रसिद्ध केलीं. आणि त्या भाषांतराचे प्रस्तावनेत त्यांनीं आपले स्वतःचे विचार ग्रथित केले.

राममोहन याचें म्हणणें असें कीं, हिंदुधर्मास आधारभूत जे वेद त्यात मूर्तिपूजा कोठें सांगितलेली नाहीं. उलट तिचा निषेधच केलेला आहे. पुढे पौराणिक ग्रंथातून मूर्तिपूजा कोठेकोठें सांगितली असली, तरी ती ज्यास परमात्मस्वरूपाचें आकलन करता येत नाहीं, अशा निर्बुद्ध लोकांकरिताच सांगितली आहे. श्रुति-स्मृति-पुराणें ह्याचा खरा लाक्षणिक अर्थ लक्षात घेतला तर मूर्तिपूजा ही त्यास अभिप्रेत नाहीं असें दिसून येईल. असें असता आज हिंदुलोकांत मूर्तिपूजेचा प्रचार सर्वत्र दिसतो, ह्याचे कारण त्यांस विचारल्यास त्याचे कोणासच समर्थन करता येत नाही. वाडवडील करीत आले म्हणून आम्ही करतो असेच सारे सांगतात. जी गोष्ट गर्ह्य आहे ती परंपरेने स्तुत्य कशी होईल ? शिवाय बंगाली लोकाच्या इतर आचारांत रघुनंदनानंतर प्राचीन परंपरेचें बंधन कोठेच राहिलेलें नसतांना, त्यानी मूर्तिपूजेपुरता परंपरेचाही धाक दाखविणें व्यर्थ होय असें राममोहन याचें म्हणणे पडलें.

काष्ठपाषाणादि वस्तूंची देव म्हणून पूजा करणें हे इतकें वेडगळपणाचें आहे कीं, हिंदूंसारखे सुसंस्कृत लोक अशा मूर्तींची पूजा करीत असतील ही गोष्ट युरोपियन लोकांस अशक्य वाटे. व ते मूर्तिपूजेचा अर्थ ईश्वराच्या गुण-

प्रतीकांची उपासना असाच करीत. परंतु खरा प्रकार तसा नसून हिंदुलोक देवदेवतांस स्वतंत्र अस्तित्व व अधिकार मानितात. इतकेंच काय, पण काष्ठपाषाणांच्या मूर्तींसही सर्व शक्तिमान् परमेश्वर मानून त्यांस मनुष्यमात्राप्रमाणे कनककांतादि सर्व भोग दिले जातात, इतकेंच नव्हे, तर अशा देवांच्या संतोषासाठी, नानाप्रकारचे उपासतापास, देहदंड व अंगिरा रघुनंदनादि स्मार्तांच्या विचारें व कूर्मनारसिंह पुराणांच्या मताने जीवाचें बलिदान व आत्महत्याही केल्या जातात. ह्या गोष्टी राममोहन ह्यांनीं आपल्या लेखांत वारंवार प्रसिद्ध केल्या.

ज्यांची परंपरा शुद्ध आहे, अशा निग्रही व सत्त्वशील हिंदुलोकांचे आचार व कर्तृत्व कितीतरी उज्ज्वल असावयास पाहिजेत, असे असतां त्यांनी अशा घोर अज्ञानांत रहावें ही गोष्ट राममोहन यांस पहावेना. मूर्तिपूजा, व्रतवैकल्यें व त्याचे अनुषंगानें उत्पन्न झालेल्या खाद्यपेयादि आचारांसंबंधी निरनिराळीं बंधनें व वेड्या समजुती ह्यांनीं हिंदुसमाज फार बिघडून गेला आहे, असें त्यांस वाटलें. मनुष्य कितीही विद्वान व नीतिमान् असो, त्याचेकडून खाण्यापिण्यासंबंधीं एखाद्या क्षुल्लक रूढीचें उल्लंघन होताच, तो जातिबहिष्कृत होतो, पण चोरजारादि पापी व गुन्हेगार मात्र तसेच जातींत शुद्ध म्हणून नांदूं शकतात अशा बाह्य प्रकाराची राममोहन ह्यास अत्यंत चीड आली. आणि त्या सर्व अनर्थावह परिस्थितीचें कारण राममोहन ह्यांनीं असें ठरविलें कीं, हिंदुसमाजास गुरुस्थानीं असलेला श्रेष्ठ वर्ग, आपली स्वतःची वृत्ति उत्तम रीतीनें चालावी, यासाठीं धर्माच्या नावाखालीं मूर्तिपूजादि निरनिराळीं विधीविधानांची खुळें उत्पन्न करून लोकांस खरी ज्ञानदृष्टि न येईल अशी काळजी घेत आला आहे. 'भोळा भाव हा तो अज्ञानाचा स्वभाव' ह्या न्यायानें धर्मगुरु सांगतील ती पूर्वदिशा. भूदेवच ते! त्यास असें का? असेंही विचारण्याची सोय नाहीं. अशी ही दुःस्थिति पाहून राममोहन म्हणतात कीं, त्यांच्यामधील खरें ब्राह्मण्य जागृत झालें, आणि कितीही लोकक्षोभ झाला तरी तो सहन करून हे लोकांचें अज्ञान दूर करण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्यानीं उपनिषदांपैकीं कांहीं लहान उपनिषदांचें बंगाली, हिंदी व इंग्रजी भाषांतर करून त्यांच्या शेंकडो प्रति आपल्या खर्चानें फुकट वांटल्या आणि एक्या परमात्म्याचें ज्ञान करून घेऊन त्याची उपासना करावी, हेंच सर्व वेदांचें सार आहे. वेदांत व

धर्मशास्त्रांत देवदेवतांच्या उपासना सांगितल्या असल्या तरी त्या गौण असल्याबद्दल वेदशास्त्रांनींच सांगितले आहे. अर्थात् चित्तशुद्धीसाठीं अगर दुसऱ्या कोणत्याही हेतूंनीं देवतार्चन करीत न बसतां एक्या परमपुरुषाची उपासना करावी. आणि तीही वैदिक मंत्रांनीच केली पाहिजे असे नाहीं, तर जशी येईल तशी स्वभाषेतही केली तरी ती अशास्त्रीय ठरत नाहीं. अशा प्रकारचा ज्ञानाचा प्रसार त्यांनीं केला व ह्याबरोबरच त्यांनीं विशेषेकरून साहेबलोकांच्या माहितीकरितां शिव, कृष्ण, काली, इत्यादि देवदेवतांच्या कथा व उपासना कशा बीभत्स व अनीतिमय आहेत, यांचेही त्यानीं आपल्या बुद्धीप्रमाणे उदघाटन केले! आणि एकदरीत देवतार्चने, जपतपादि साधने, यज्ञ, होम, हवने, शास्त्रीय मानलेली विधिविधाने, व्रतवैकल्ये, प्रायश्चित्ते, शास्त्रीय कर्माकर्मनिषेध, किंवा थोडक्यात वर्णाश्रमधर्म ही सर्व कमीअधिक प्रमाणांतील धर्मवेड आहेत, कनिष्ठप्रतीच्या अज्ञानी जीवांस त्यांचा उपयोग होतो असे असले तरी त्यांसही ती आवश्यक कर्तव्ये नाहीत, असेच त्यानी पुनः पुन्हा लोकांस जाणविले.

हे सर्व विचार राममोहन यानी आपल्या उपनिषदाच्या प्रस्तावनातून प्रगट केले आहेत. मद्रासच्या सरकारी कॉलेजातील शंकरशास्त्री, कलकत्याचे सरकारी कॉलेजांतील पंडित मृत्युंजय विद्यालंकार आणि दुसरे एक सुब्रह्मण्यशास्त्री, ह्यांच्या टीकास उत्तरादाखल म्हणून जी लेखमाला राममोहन ह्यानी प्रसिद्ध केली, त्यांतही अशा प्रकारचे व पुढील मूर्तिपूजाविरोध ह्या प्रकरणात दर्शविल्याप्रमाणे विचार त्यांनीं प्रगट केले. प्रत्येक लेखात त्यांचा कटाक्ष ब्राह्मणवर्गावर विशेष असे. तथापि पुढे मिशनऱ्याबरोबर वादविवाद करण्याकरितां त्यांनीं जी माला सुरू केली, त्यास त्यानीं "ब्रॅह्मॅनिकल मॅगेझिन" म्हणजे "ब्राह्मणधर्माची पत्रिका" असेच नाव दिले. व पुढे त्यानी आपल्या अल्प आत्मचरित्रांत मी ब्राह्मण्याचा विरोधी नसून त्यास जे विकृत स्वरूप प्राप्त झाले आहे, त्याचा विरोधी आहे असे म्हटले आहे.

लोकांत प्रचलित असलेल्या धर्मवेड्या समजुती कशा सुधाराव्या, लोकास सुजाण कसे करावे, ह्या गोष्टींचा आत्मीय सभेतही नेहमी खल होत असे. त्या वेळीं कलकत्त्यास डेव्हिड हेअर या नांवाचा एक सामान्य घड्याळजी राहत असे. त्याचें शिक्षण बेताचेच झालेले होते. धर्माचाही त्यास अभिमान

होता असे नाहीं. पण त्याचेमध्यें कामाची धडाडी फार मोठी असे. एक दिवस लोकांस सुसंस्कृत करण्याचा प्रश्न आत्मीय सभेत विचारास घेतला असतां, राजा राममोहन ह्यांनीं असे सुचविले कीं, उपनिषद् वगैरे ग्रंथांतून जे परम उदात्त असे धर्मविचार आहेत, त्याचा लोकात प्रसार करावा. डेव्हिड हेअर याचें म्हणणें इंग्रजी शिक्षणाचा चोहोकडे प्रसार झाल्याबाचून लोक सुज्ञ होणार नाहीत. या वादांत डेव्हिड हेअर यास यश येऊन, शेवटी उभयताचे ग्वटपटीने कलकत्ता येथे हिंदुकॉलेज स्थापन झालें. परंतु ह्या उद्योगाचा परिणाम प्रतिक्रियारूप झाला. लोकाच्या धर्मसमजुती व आचार खुळेपणाचे आहेत, ही गोष्ट गृहित धरूनच ज्या शिक्षणाची उभारणी, त्या शिक्षणाने अर्धवट तयार झालेले तरुणही अत्यंत नास्तिक व धर्मभ्रष्ट झाले. त्यांनी पाश्चात्त्याचे विद्येतील गुणापेक्षा दोषाचाच अंगिकार जलद केला. आणि ह्या विचारक्रान्तीच्या वावटळीत सापडलेल्या सुशिक्षित तरुणाची मनें पुन्हा सुस्थिर कशी करावी हाच पालकास मोठा बिकट प्रश्न पडला. इ. सन १८७२ साली मुंबईस दिलेल्या एका व्याख्यानात बाबू प्रतापचंद्र मुजुमदार म्हणतात की, " ह्या ज्ञानवृक्षाची फळे बंगाल प्रांताच्या नाशास कारण झाली. आपल्यापैकी उत्कृष्ट होतकरू माणसे दारूपायीं मृत्युमुखीं पडलीं नाहीत काय? आपल्या ज्ञानाची घमेंड मारणारे आपल्यातील पुष्कळ सुशिक्षित लोक-पाजी-दारुडे नाहींत काय? अशा रीतीने हिंदुधर्माचा सर्वस्वी नाश होण्याचा तो वेळ आला होता."

ह्याच सुमारास (सन १८२८) हिंदू कॉलेजात डेरोझिओ या नांवाचा एक वीस वर्षांचा तरुणबाड प्रोफेसरचे जागेवर आला. फ्रेंच राज्यक्रान्तीचे वारे त्याच्या गुरूपासून त्याच्या अंगात संचरले होते. तो मनाचा मोठा दिलदार व उमदा होता. त्याने हा हा म्हणता सर्व विद्यार्थ्यांवर विलक्षण छाप बसविली. डेरोझिओ ह्याचा एक शब्दही मुलांनी खाली पडू दिला नाही. विद्यार्थ्यांकडून असे उत्तेजन मिळताच त्याने इ.सन १८२९साली एक " तत्त्वविचारमंडळ " म्हणून संस्था काढली. त्या संस्थेत हरएक विषयासंबंधीं पूर्ण मत-स्वातंत्र्याच्या तत्त्वावर विचार केला जाई. वडिलांची मर्यादा, शास्त्रमर्यादा, रूढि, लोकापवाद इत्यादि लौकिक बंधनांना झुगारून देऊन, विचारस्वातंत्र्या-चे खूळ तेथें जबरदस्त माजले. धर्माज्ञा व कुलाचार ह्यांचा उघड उघड

उपहास होऊं लागला. डेरोझिओ यास धर्माची यत्किंचितही चाड नसे. तो हिंदूंतील ब्राह्मणवर्गावर व मूर्तिपूजेवर भयंकर टीका करी. जात-पात, देव-धर्म या सर्वांचा नायनाट करूं पाहणारा तो एक कलिपुरुषच होता. त्याच्या शिक्षणाने विद्यार्थिवर्ग अत्यंत बहकून गेला. संध्यावंदन, स्तोत्रपाठ वगैरे करण्याचे प्रसंगीं मुद्दाम उपहासबुद्धीने ते इलियड ह्या इंग्लिश काव्यातील कविता म्हणत. आम्हीं सर्व धर्मबंधनें झिडकारली हे दाखविण्याकरिता ते डेरोझिओबरोबर वाटेल ते खाद्यपेय सेवन करीत. एक दिवस तर या सुशिक्षित बंगाली तरुणांनीं आपला अत्याचार कळसास नेला. पुढे लवकरच खिस्ती पाद्री झालेल्या बानर्जी नांवाच्या एका बंगाली गृहस्थाच्या नेतृत्वाखालीं ते एका घरात शिरले व तेथे त्यांनी गोमांसावर यथेच्छ ताव दिला. इतकेही करून त्यांचा आचरटपणा थांबला नाहीं. अभक्ष्य भक्षणाने मस्त झालेले ते विद्यार्थी आपल्या हातात गोमांसाचे तुकडे घेऊन भररस्त्यांतून उद्दामपणे मिरवूं लागले, व कांहींनी तर ते गोमांसाचे तुकडे एका अत्यंत धर्मिष्ठाचे घरात मुद्दाम फेंकून दिले. ह्या अत्यंत निंद्य अशा अत्याचाराचा परिणाम फौजदाऱ्यात होऊन कित्येकांस शिक्षाही झाल्या. इंग्रजी विद्यावारुणीने उडवून दिलेला हा अनर्थ पाहून तत्कालिन पुढाऱ्यांनीं माना खाली घातल्या. कित्येकानी आपली मुलें भराभर शाळांतून काढून घेतली. अखेर याचा फारच गवगवा होऊन इ. सन १८३१ खाली डेरोझिओ ह्यास कॉलेजांतून काढून टाकले. तेव्हा काही दिवसांनी ही लाट किंचित् शांत झाली. तरी एके बाजूस जुने ते धर्मवेडे व दुसरे बाजूस नवे ते फाजील शहाणे असा उभयपक्षी लोकापवाद सुरूच होता.

---

## प्रकरण चवथें

# मूर्तिपूजाविरोध

अगोदरच मागील प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणे चिंताजनक परिस्थिति उत्पन्न झालेली व त्यात राजा राममोहन यांचे, जनदृष्टीने धर्मबाह्य असे, स्वतंत्र विचाराचे ग्रंथ जेव्हा प्रसिद्ध होऊं लागले, तेव्हा त्यांचेविरुद्ध मोठीच चळवळ उडून गेली. राममोहन ह्यांचे मतांचे खंडनपर लेख व ग्रंथ प्रसिद्ध होऊं लागले. पंडित गौरीकांत भट्टाचार्य यांनीं ज्ञान-चंद्रिका नामक पुस्तक प्रसिद्ध केलें, फार काय थेट मद्रासची पुराणमताभिमानी मंडळी वादाकरितां जागी होऊन पुढे सरसावली. राममोहन ह्याच्या शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं तर त्यांस नानाप्रकारें त्रास देण्याचा विडाच उचलिला. एका विक्षिप्त गृहस्थांनी अपरात्रीं त्यांच्या दाराशीं कोंबड्यासारखे ओरडून राममोहन हे कोंबडी बाळगतात असा लोकांचा गैरसमज करण्याचा व राममोहन यांची झोपमोड करण्याचा क्रम सुरू केला. त्यास घरांतल्या मंडळींनीं कंटाळून घरांतून हाकून लावावे म्हणून, दुसऱ्या एकाने गाईची हाडे त्याच्या घरांत रात्रीं टाकण्याचा उपद्व्याप केला. इतकेच काय, पण रस्त्यांनी राममोहन जात असता त्याची धुळवड करण्यासही टारग्या मुलानी कमी केले नाहीं. आणि गावांतील शिष्ट लोकांनी तर असेही उठविलें कीं, जेसुर व कासमबजार येथे उद्भवलेल्या वाख्याची सांथ राम-मोहन याच्या अधार्मिक कृत्याचाच परिणाम आहे. याच्याही पुढे जाऊन कांहीं मंडळींनीं त्यांच्या पुतण्याकडून राममोहनांस धर्मबाह्यवर्तनामुळे बेवारस ठरविण्या-बद्दल कोर्टात दावेही देवविले. त्याचा उल्लेख वर आलाच आहे. पुढे पुढें तर, कांहींनीं राममोहन यांचे मुलावर फौजदारी गुन्ह्याची भयंकर तोहमत आणिली; असे त्यांस पुरेपुरे सतावून सोडले. परंतु ते मनाचे खंबीर असल्यामुळें मुळींच डगमगले नाहींत. उलट अधिकच इर्षेस पेटले.

त्यांच्या हिंदुधर्मासंबंधीं वादविवादांतील मुख्य विषय म्हणजे मूर्तिपूजा हा होता. ख्रिस्ती व मुसलमानी धर्मांनीं ज्या कारणास्तव आपल्याला निंद्य मानलें, त्या मूर्तिपूजेला राममोहन ह्यांनीं कसून विरोध केला. सबब त्यासंबंधीं

सविस्तर माहिती कळण्याकरितां, त्यांच्या वादांतील कांहीं ठळक मुद्दे संवाद-रूपाने पुढे दिले आहेत. ह्या वादांत राजा राममोहन ह्यांचे प्रतिस्पर्धी प्रायः मद्रासी शास्त्री होते. त्यांचे समग्र विवेचन आम्हांस पाहाण्यास मिळाले नाही. तथापि त्यातील जीं विधाने राजा राममोहन यांनी आपल्या लेखांत निरनिराळ्या ठिकाणी उद्धृत केलीं आहेत, त्याच्या आधारे खालील संवाद रचला आहे. तो भाषांतररूप नसून भावरूप आहे, असे समजावे. त्यात विशेषकरून राममोहन ह्यांच्याच विचाराची दिशा अधिक स्पष्ट करण्याचा हेतु आहे. राम-मोहन ह्याचे उत्तरास त्याचे प्रतिस्पर्ध्यांनी प्रत्येक वेळी काय प्रत्युत्तर दिले, ते यांत दाखविले नाहीं. अर्थात् राममोहन याच्या प्रतिस्पर्ध्याच्या दृष्टीने खालील संवाद अपूर्ण आहे, हे वाचकानी लक्षात ठेवावे.

## मूर्तिपूजा

शास्त्रीः—आमचे वेद, शास्त्रे, पुराणे, आगम, तंत्रे, सूत्रे आणि इतिहास या सर्वांवरील टीका, भाष्ये व भाषांतरे ह्या सर्वात एका अद्वैत ब्रह्मस्वरूपाची उपासना सांगितली असता, हे एक नवीन तत्त्व आपण शोधून काढले, असे तुम्ही धर्मसुधारक म्हणविणारे समजतां हे आश्चर्य होय! पूर्वीं एकदा ह्या आर्यावर्तांत धर्माची घडी बिघडली असता, त्याची उत्कृष्ट व्यवस्थिति लावून देणारे श्रीजगद्गुरु आद्य शंकराचार्य ह्यांनीही ही अहंता धरली नव्हती.

राममोहनः—माझे हितशत्रु तसे भासवीत असल्यास न कळे. बाकी मी कांहीं नविन तत्त्व शोधून काढले, असे केव्हाच म्हटले नाहीं. उलट माझे तर असेच म्हणणे आहे की, आपल्या प्राचीन धर्मतत्त्वाप्रमाणे आदरणीय जी निराकार ब्रह्मोपासना ती सोडून आज लोक चोहोंकडे काष्ठपाषाणाच्या मूर्तींची उपासना करीत आहेत, हा आमच्या सनातन धर्माचा घोर अधःपात आहे.

शास्त्रीः—अहो, यांत अधःपात तो कसला? सगुणब्रह्माची उपासना करण्याचा तो एक राजमार्गच आहे. राजाची भेट घेण्यास जशी राजदरबारी मंडळींची मर्जी संपादावी लागते, त्याप्रमाणे षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवंताची कृपा संपादन करावयाची तर त्याचे भिन्न भिन्न गुणप्रतिकाची पूजा करणें योग्यच आहे. किंवा असे म्हणा कीं, समुद्राच्या एका भागाची पूजा केल्यानें सर्व सागराची पूजा केल्याप्रमाणें होतें.

राममोहनः—अहो, तुमचे हे दृष्टान्त विसंगत आहेत. एकांत अंशअंशीभाव दाखवितां, तर दुसऱ्यांत सेव्यसेवक असा भाव दाखवितां! मूर्तिपूजक आपल्या इष्ट मूर्तीस साक्षात् ब्रह्मस्वरूपच मानतात, राजसेवकांप्रमाणे राजाहून अत्यत हीन व भिन्न असे मानीत नाहींत. शिवाय मोहवश राजाची उपमा निर्विकार परमात्म्यास देणे योग्य नाहीं. आतां परमात्म्यापासून भिन्न असे प्रतीकांनीं दर्शित जे त्याचे गुण तुम्ही मानतां, ते शाश्वत की अशाश्वत? शाश्वत म्हणाल तर "एकमेवाद्वितीयम्" या परम सिद्धान्तास बाध येईल. बरें, ईश्वराचे गुण अशाश्वत म्हणाल, तर ईश्वराचे स्वरूप बदलणारे अतएव विकारी होईल. शिवाय तुम्ही मानलेले त्रिगुणाचे प्रतीक जे ब्रह्मा, विष्णु आणि महेश ह्यांच्या अत्यत अनीतिमय अवतारकथा मनात आल्या, म्हणजे निर्गुण व निर्विकार अशा परब्रह्माचे त्यास प्रतीक मानणे याहून साहस ते कोणते? तुम्हांला पाहिजे तर बडानगर किंवा कालीघाट येथील उपासनाप्रकार पाहून या! तेथे ईशाची शक्ति म्हणून ज्या कालीदेवीची उपासना करितात, तिचे ते विलक्षण रूप आणि तिच्यापुढे होत असलेल्या पशूचे व माणसाचेही बलि, तसेच तिच्या उपासकांनी तिच्यापुढे मद्यमांस व अनाचार यांचा चालविलेला नंगा नाच, पाहिला म्हणजे केवळ शुद्ध अशा परमेशाची ही शक्ति असे कोण म्हणेल? आणि जे तसे मानीत असतील, त्यांची नीतिमत्ता तरी काय किमतीची असणार?

शास्त्रीः—ईश्वराच्या या अचिंत्य त्रिगुणात्मक मायाशक्तीचा विचार थोडा गूढ म्हणून तूर्त बाजूला ठेवला तरी "आकाशात् पतित तोयं यथा गच्छति सागरम्" ह्या न्यायाने कोणत्याही सचेतन-अचेतन पदार्थाची ईशभावानें पूजा केली, तरी ती त्या एका परमात्म्यास पोचणार नाही काय?

राममोहनः—अहो, ह्या तुमच्या म्हणण्याने तुमचा श्रीकृष्ण व तो ज्या कदंबावर बसे तो वृक्ष, हे सारखेच पूजनीय झाले. मग देवळांतला देव व देवळाबाहेरील पायरी, यांत अंतर ते काय?

शास्त्रीः—पण अनंत, अमर्याद व व्यापक असा परमात्मा जर तुम्ही मानतां, तर तो, पाषाणमूर्तींतही आहे, असे मानावयास काय हरकत आहे?

राममोहनः—तुम्ही म्हणतां तसे एक व्यापक परब्रह्म आहे, असा आमचा दृढविश्वास आहे खरा; परंतु या आमच्या आस्तिक्यभावामुळे जड पदार्थांशींही

तो ईश्वर संलग्न आहे, अशी श्रद्धा असणें जरूर नाहीं. जडसृष्टीच्या सापेक्षतेनें परमात्म्याचे वास्तविक स्वरूप कसे ते आपणांस स्पष्ट कळत नाहीं, असें पाहिजे तर म्हणा.

शास्त्रीः—तुम्हांस त्याचे स्वरूप न कळो; पण कधीं न पाहिलेल्या राजाच्या भेटीस जाताना तुम्ही नजराणा बरोबर नेता ना, मग अज्ञात अशा परमेश्वराची कृपा संपादण्यासाठीं आम्हीं त्याची पूजा बांधली तर त्यात गैर काय झाले?

राममोहनः—गैर काय झाले? वाहवा! दंभलोभादि विकारयुक्त राजाचे बरोबरीस तुम्हीं निर्विकार व परिपूर्ण अशा परमात्म्यास बसविलेत, याहून आणखी गैर ते काय असावयाचे? ईश्वराचे अवतार माणसांप्रमाणे हाडामासाचे देहधारी असे मानण्यात तरी तुमची हीच चूक होते.

शास्त्रीः— अहो, ज्याप्रमाणे गरीब प्रजेची गाऱ्हाणीं समजावून घेण्याकरितां एकादा मोठा सम्राट्ही महारमागाचा गुप्तवेष घेऊन फिरत असतो, त्याप्रमाणें भक्तवत्सल परमेश्वराने दीनजनांच्या दुःखाचा परिहार करण्यासाठीं मानवदेह धारण केल्यास त्यांत असभवनीय ते काय?

राममोहनः—का बरे? सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् परमात्म्यास भक्तांचीं दुःखे समजावून घेण्यास अथवा निवारण करण्यास क्षुद्र मानवदेह धारण करणे भाग पडावे, हेच असभवनीय.

शास्त्रीः—पण तुमच्या आईबापांचे फोटो किंवा थोर पुरुषांच्या तसबिरी प्रत्यक्ष त्यांच्या अपेक्षेने कितीही तुच्छ असल्या तरी त्या उत्कृष्ट व प्रेममय अशा स्मृति जागृत करून तुम्हास आनद देतात ना? मग सगुणमूर्तीचे दर्शन हें त्याचप्रमाणे ईश्वरासंबधी स्मृति जागृत ठेवणार नाही काय? ही इष्टापत्तिच आहे.

राममोहनः—इष्टापत्ति वाटेल तर तुम्ही म्हणा; पण हत्तीचे तोंड लाविलेला गणपति, पुच्छधारी हनुमान्, राधेचे खांद्यावर हात टाकिलेला कृष्ण किंवा त्याहून निंद्य प्रकारचे प्रतीक जे शिवलिंग, हींच जर ब्रह्मस्मृतीचीं साधने असतील, तर ती अनिष्टापत्तिच म्हणायची! धड मानवी नाही व धड दैवीही नाहीं अशा विलक्षण गुणांचा आरोप तुम्हीं एखाद्या सृष्ट पदार्थावर केल्यानें त्यास एकदम सृष्टिकर्त्याची पदवी प्राप्त होते, हें तुमच्या मूर्तिपूजेतील मोठेंच ढोंग आहे!

शास्त्रीः—अहो, ईशाचें खरें स्वरूप न कळल्यामुळें भलत्याच प्रतीका-

वर जरी ईशाची भावना केली, तरी त्या ठिकाणींही ईशतत्त्व असल्यामुळे ईश्वरप्राप्ति झाल्यावाचून राहाणार नाहीं. स्वप्नस्थ पुरुषाने आपल्या कल्पनेने खोटाच वाघ उभा केला, तरी खरा वाघ पाहून भयकंपादि जे परिणाम होतात ते सर्व त्या खोट्या वाघानेही अनुभवास येतील. कारण त्याची भावना तशी आहे.

राममोहनः—ही स्वप्नातील भ्रमिष्ट स्थिति भटभिक्षुक व पुजारी यास आपली वृत्ति चालविण्याकरिता सोईची वाटत असेल तर वाटो; परंतु ज्यास सत्यान्वेषणाची यत्किंचित् चाड आहे, त्यास असली भ्रमिष्ट स्थिति कधीच स्पृहणीय वाटणार नाही.

शास्त्रीः—काष्ठपाषाणाची प्रार्थनामंदिरे, चर्चे, मशिदी, उपासनेस असाव्या हे तर तुम्हास स्पृहणीय—नव्हे आवश्यक वाटते ना? मग आम्ही तरी उपासनेला त्याच काष्ठपाषाणाच्या मूर्ति घेतो.

राममोहनः—भले, भले! पण महाराज, तुमच्या मूर्तीप्रमाणे मशिदीस कोणी पूजानैवेद्य अर्पण करीत नाहीत. मूर्तीचे अष्टभोग कोणी देवळास अर्पण करीत नाहीत. कालीदेवीपुढील रेडे व बोकड प्रार्थनामंदिराला बळी लागत नाहीत. काष्ठपाषाणातील उपासना व काष्ठपाषाणाची उपासना, यात महदंतर आहे. शिवाय अवतारमूर्तीप्रमाणे कोणत्याही चर्च-मशिदीची असभ्य व अनीतीची पुराणे, कथा व स्तोत्रे तयार होत नाहीत.

शास्त्रीः—काय हो, आमच्या पूजानैवेद्याची तुम्ही कुचेष्टा करता; पण समजा, आपला एकादा अत्यंत जिवलग मित्र आहे. तो घरी आला असता त्यास बसण्याला सुंदर कोच दिला, उपाहारास उत्तम फळे दिली, हारतुऱ्यानी त्यास मंडित केला व चार स्तुतिपर गोड शब्द त्याच्याबद्दल बोललो तर त्याचा अगदी अपमान झाला असेच होईल नाही?

राममोहनः—वाः! उदाहरण मोठे चांगले घेतलेत! तुमच्या या सन्माननीय मित्रावर, हे मच्छा, गड्या कासवा, अरे डुकरा, नाहीतर, अहो म्हसोबा, अशा संबोधनाचा तुम्ही वर्षाव केलात, आणि तू वक्रदंत असून लंबकर्ण आहेस, तू दुतोंड्याच काय पण तीन तोंडांचा आहेस, तुझे लांगूलचालन मोठे भयप्रद आहे, इत्यादि प्रकारे त्याची स्तुति केलीत, तर त्यास काय वाटेल बरे! शिवाय याहूनही मौजेचा प्रकार असा कीं, तुमचा जिवलग सखा साक्षात् सन्निध असतां जर तुमचे ते उपाहाराचे ताट त्याला समर्पण न करितां

तुम्हीं त्याचे फोटोपुढेंच नेऊन ठेवलेत, फुलांची माळ त्याचे फोटोवरच घातलीत आणि त्या सन्मित्राकडे पाठ फिरवून त्याचे तसबिरीपुढेंच हात जोडून, या, बसा, वगैरे प्रार्थना चालविलीत, तर तुमचे डोकें ठिकाणावर नाही असेच तो समजणार नाही काय? तुमचे जिवाचा कलिजा, तुमचे सन्निध सदासर्वदा हजर असता त्यास सोडून त्याचे (कल्पित) चित्राचे देव्हारे माजवणे, हे विचित्रच नव्हे काय?

शास्त्रीः—मग ग्रीक देवताचे देव्हारे माजविण्यांत पाश्चात्य विद्वानांनीं एवढा ग्रंथसभार खर्ची घातला, तेही खूळच नव्हे काय?

राममोहनः—होय, होय, तेही खूळच. परंतु त्यांनं समाजात तुमच्या मूर्तिपूजेइतका बखेडा घातला नाही. निरनिराळ्या मूर्तींच्या उपासनेत पथभेदानें घातलेली कुपणें आणि तन्निमित्त स्पर्शास्पर्श, भक्ष्याभक्ष्य इत्यादि विधिनिषेधाची गुफलेली जाळी, ह्यानीं आपला सर्व समाज विस्कळित होऊन जगापासून स्वयबहिष्कृत होऊन पडला आहे. ह्या विधिनिषेधाच्या संगोपनानें जीवाच्या सामान्य सुखातही माती घातली आहे!

शास्त्रीः—मग तुमचें म्हणणे, वाटेल ते वाटेल तेथें खावें, प्यावें व यथेच्छ मजा मारावी?

राममोहनः—नाही; असे नव्हे. आपले खाणें पिणें व वागणें ह्या-संबधीं शास्त्रमर्यादा पाळावी, ते बरे. ईश्वराचे ज्ञानसंपादनासाठीं प्रत्येकानें वर्णाश्रमानुसार शास्त्रविहित कर्म करणे, हे योग्य आहे, हे खरें, परंतु ते अपरिहार्य आहे असे मात्र आम्हास वाटत नाही. कारण वेदान्त आणि वेदान्त-दर्शनांत, रैक्व, वाचक्नवी, सुलभा, विदुर, धर्मव्याध इत्यादि वेदाध्ययनास अनधिकारी स्त्री पुरुष ज्ञानसंपन्न झाल्याची उदाहरणें आहेत.

शास्त्रीः—असतील. एकूण तुमची मतें त्या वेदबाह्य लोकांप्रमाणे—

राममोहनः—नाहीं, माझ्या मतास तुम्हाला वेदबाह्य म्हणता येणार नाही. वेदास सोडून मी कांहींच बोलत नाही. उलट, तुम्ही वैदिक म्हणविणारे लोकच, मूर्तिपूजा, सत्कीची सती, कन्याविक्रय, बहुपत्निकत्व, विद्यानिरपेक्ष-ब्राह्मणप्रतिष्ठा, इत्यादि कित्येक वेदबाह्य आचार रूढ करीत असता.

शास्त्रीः—तुम्हांस जर वेद मान्य आहे, तर त्यांत अनेक साकार देव-देवतांचीं वर्णनें नाहींत काय?

राममोहनः—ज्यांचीं वर्णनें आहेत ते देव तुम्हांआम्हांप्रमाणेंच विकारवश आहेत. परमात्मपदाची तेही आमच्याप्रमाणे आकांक्षा धरून आहेत. एकमेवाद्वितीयम् असा जो एक परमात्मा, तो अवर्णनीय आहे, त्याचे स्वरूप अनिर्देश्य आहे.

शास्त्रीः—अहो, ज्याचेबद्दल तुम्हांस कांहींच निर्देश करतां येत नाहीं, तो मग आहे म्हणून तरी कशाला म्हणतां? पुरे नास्तिकच कां बनाना!

राममोहनः—नाही, नाही. आम्ही नास्तिक कधीच होणार नाहीं. एकवेळ मूर्तिपूजा पत्करली; पण नास्तिकपणा त्यापेक्षां सहस्रपट घातक आहे. आता तुमच्या आक्षेपाला धरून इतकेच म्हणतो की, त्या ब्रह्माचे इंद्रियातीत असे गुणधर्म जरी आम्हांला न समजले, तरी असे एक सर्वव्यापि ब्रह्म आहे, असे भान सहज होते. एकादी क्षुल्लक गवताचे काडीची रचना पाहिली, तर ह्या सृष्टीचा कोणीतरी नियामक असला पाहिजे अशी सहज खात्री होते. तो कोण व कसा, हे आपणांस सांगवणार नाही, ही गोष्ट वेगळी.

शास्त्रीः—मग सगुणोपासनेशिवाय अशा निराकार, आणि अनिर्वचनीय परमात्म्याचे ज्ञान तरी कसे व्हावे बरे? ते अत्यंत दुर्घट नाहीं काय?

राममोहनः—होय. परमात्म्याचें स्वरूप पूर्णपणे जाणणे, हे दुर्घटच काय, प्रायः अशक्यच आहे. परंतु या अजब दुनियेची घडामोड जर एकादा चाणाक्ष मनुष्य पाहील, तर तो बघेल तेथे त्यास ब्रह्मसाक्षात्कार होईल.

शास्त्रीः—तसे म्हणाल, तर 'ब्रह्म सत्य जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' असा वेदान्तशास्त्राचा सिद्धान्त आहे. सृष्टीची घडामोड ही सर्व माया आहे, एक परमात्मवस्तु काय ती सत्य आहे, बाकी सर्व दृश्यजात हें मिथ्या आहे. ते बघून काय फळ!

राममोहनः—माया म्हणजे परमात्म्याची शक्ति व त्या शक्तीचा जगद्रूपाने परिणाम. एक परमात्मवस्तुच काय ती सत्य, याचा अर्थ इतकाच की, सर्व दृश्यजातास जी भावरूपता आहे, ती त्या परमात्म्याचीच आहे. सृष्टपदार्थांच्या सुंदर मांडणींत ईशदर्शन होऊं शकते ह्याचा अर्थ हांडा, भांडें वगैरे प्रत्येक जड वस्तु देव आहे, असा कोणीच करीत नाहीं. त्यांतील जो एक सदंश, तें ईशाचे स्वरूप आहे.

शास्त्रीः—पण तो सदंश प्रतीतीस येणे सुलभ व्हावें, म्हणून संस्कारांनीं

दिव्य व पारदर्शक केलेल्या प्रतीकांची पूजा आवश्यक नाहीं काय ? आपण पृथ्वीवरील माणसें पार्थिव शरीरधारी आहोंत तर आपला देवही पार्थिवच नको काय ? मानसपूजेस जसा मनोमय देव तसा बाह्य शारीरिक पूजेस स्थूल साकार देव आवश्यकच आहे. आपण जोपर्यंत व्यावहारिक सत्तेत आहोत, तोपर्यंत आपले देवासही व्यावहारिक सत्ता पाहिजे. आणि म्हणूनच तुम्ही जो सदंश म्हणतां, तो सदंश चिदंश, अगर दुसरा एकादा परमेशाचा गुण ह्याची, विवक्षित आकारवान् व संस्कारानीं पवित्र केलेल्या प्रतीकाचे द्वारें उपासना करावी, अशी धर्मशास्त्राची सर्वांस आज्ञा नाहीं काय ?

राममोहनः—नाहीं, खचित नाही. श्रुति, स्मृति, पुराणे व तंत्रे सर्व एक-मतानें एका निराकार ब्रह्माची उपास्ति सांगत आहेत. तुम्ही म्हणता ती मूर्तिपूजा केवळ अजाण साधकासच योग्य म्हणून तुच्छ गणली आहे. साधकांच्या अधिकारभेदांतच यासंबंधीं विरोधी शास्त्रवचनांचा मेळ घालतां येतो. शिवाय असें पहा की, महमदी, प्रॉटेस्टट खिस्ती लोकास तसेंच आपलेकडील नानक, कबीर, इत्यादींचे साम्प्रदायिकास मूर्तिपूजेची आवश्यकता कां भासत नाही ?

शास्त्रीः—भासत नाही असें तुम्हाला वाटत असेल, तर तो भ्रम आहे. कोणाचा ग्रंथसाहेब, कोणाची तसबी, कोणाचा क्रूस, अशीं नानाविध प्रतीकें असतातच. शिवाय येशू खिस्त, महमद पैगंबर इत्यादि विभूति, ते ईश्वरतुल्य मानीत नाहींत काय ? बहुसंख्याक असे रोमन कॅथलिक लोक तर मेरीला भजतात व तिला नवसही करतात. तात्पर्य तुम्ही कांही म्हणा, पण कोणाही पूजकास त्याची पूजनीय वस्तु दाखविल्यावाचून त्यास पूजा करण्यास सांगणे, हे अत्यंत अव्यवहार्य आहे ! अशक्यच आहे.

राममोहनः—पण तो अखिल चराचरव्यापी परमात्मा, ह्या सृष्टीतील अलौकिक योजना व दिव्य शक्ति इत्यादिरूपाने कसा व्यक्तदशेस आला आहे, याचें सूक्ष्म अवलोकन हेंच त्याचे दर्शन. आणि आपलें अस्तित्व, आपली जाणीव, व आपलें सुख, ह्यांस तोच एक आधार आहे, ही कृतज्ञतापूर्वक नम्र भावना हीच त्याची पूजा अशी उदात्त भावना ठेविल्यास निराकार अशा ब्रह्माची उपासना नुसती शक्यच नव्हे, तर अगदीं व्यवहार्य, इतकेंच नव्हे तर प्रत्येक विचारी जीवास अत्यंत आवश्यक आहे, असें आम्हांस वाटतें.

शास्त्रीः—तुमचे हे उदात्त विचार तुम्हांस लखलाभ होवोत. पण शेवटीं एकच विचारितो कीं, आज या आर्यावर्तांत दुसरे शेकडो नव्हे, कोट्यवधि भाविक लोक पदरच्या खर्चानें आपल्या इष्ट मूर्तींची आराधना व उत्सव करून त्यांत आपण धन्यता मानीत असतात. त्यात तुमचे काय बिघडतें ? तेव्हां यापुढें आमचे भाविक बहुजनसमाजाचा ह्याप्रमाणें विनाकारण बुद्धिभेद करण्याचा उपद्याप तुम्ही न कराल, तर मेहेरबानी होईल. मूर्तिपूजा कांहीं आजकालची नाहीं. रूढीनेंच तिची उपयुक्तता सिद्ध केली आहे.

राममोहनः—आपल्या या उपदेशाबद्दल मी आपला आभारी आहे. परन्तु मला त्याप्रमाणें स्वस्थ राहावत नाहीं, तेथें माझाही नाइलाज आहे. आपल्या बांधवांचें दैन्य, दुःख व अज्ञान पाहात असता जीव कळवळणें हे, केवळ आपमतलबी माणसाशिवाय, इतरास अपरिहार्य आहे शिवाय क्षुद्र माणसाप्रमाणें भोगप्रधान असे निंद्य व शास्त्रबाह्य असे देवाचे पूजाप्रकार व तदनुषंगानें प्राप्त झालेल्या अनीतिमय रूढी व समज, मला ब्राह्मणाला लज्जास्पद वाटणें स्वाभाविक आहे.*

अशा स्थितींत कित्येक आपमतलबी धर्माचार्यांनी स्वतःची वृत्ति अबाधित चालण्याकरिता सुरू ठेवलेल्या या रूढींचे जुलमातून जनतेची नीट समजुतीनें सोडवणूक करावी, आणि त्याना खरे श्रेयोन्मुख करावें, हे माझे एक कर्तव्य आहे असें मला वाटतें. केवळ पूर्वपरंपरेनेंच सर्व गोष्टी पुनीत ठरतात, असे नाहीं. शिवाय, आपण पूर्वपरंपरा सोडल्याची जेथें दुसरीं अनेक उदाहरणें घडत आहेत तेथें तरी ह्या बाबींपुरतेंच शास्त्राज्ञेपेक्षा रूढीचें अधिक स्तोम माजविण्याचें कांहींच कारण नाहीं.

तात्पर्य, आम्ही कृत्रिम, नैसर्गिक व काल्पनिक अशा सर्व प्रकारच्या मूर्ति-

---

*उदाहरणार्थ दुर्गामाहात्म्यः—नुसते दुर्गा नामोच्चारानें चोर, जार, व गुन्हेगारही पावन होतात.

भागवतः—"अजितनाम घडो भलत्या मिसें। सकल पातक भस्म करितसे" [ मूळाचे समानार्थी ]

महाभारतः—जो देतां घेतां, उठतां बसतां, कार्य करितां, गंगेचे स्मरण करितो तो सर्व पापांपासून मुक्त होतो.

पूजेचा निषेध करतों. आमची देवपूजा म्हणजे देवळांत अगर व्यासपीठावर बसून कांहीं तरी बडबडणे, अथवा दुसरे हातवारे वगैरे इंद्रियव्यापार करणे ह्यांत नाहीं. ती कोणत्याही काल्पनिक भावनेत नाहीं, तर एकमेकांशीं दया व परोपकारयुक्त वर्तन ठेवणे यातच ती आहे. ;

थोडा पाल्हाळिकपणाचा दोष पत्करूनही वरील संवाद इतका सविस्तर देण्याचे कारण मूर्तिपूजाविरोध हे ब्राह्मधर्माचें एक विशिष्ट लक्षण आहे. ह्याचेइतके महत्त्व दुसऱ्या कोणत्याही गोष्टीस ब्राह्मसमाज देत नाहीं असे आम्हास वाटते. सनातन हिंदुधर्माचे रूढ असलेले मार्गातून ब्राह्मधर्मपथ, जो फुटून बाजला वळला, त्याचे कारण मूर्तिपूजेवरून पुढे जाणारा पिपीलिकामार्ग, लांबीमुळे कंटाळवाणा, आणि वाटेतील मार्गदर्शक वनराजीमुळे कोंदट किंवा संकुचित असा त्याना वाटला. शिवाय त्याना असेही आढळले असावे की, या मार्गातील कित्येक पाथस्थ, वनश्री हेच आपले सुखाचे निधान मानुन मार्गातच मुक्काम करून राहिले. इतकेच नव्हे, तर त्याना असेही दिसून आले असेल की, त्यातील कित्येक विषयी जीवास वृक्षलताचे मधुमीलनाने विषयफंदात फशी पाडले, कित्येक पामर जीवास मोहाचे झाडानीं मोह उत्पन्न केला आणि कित्येक वाटसरूनी ताडदेवाचा आश्रय केला असता त्याचे तीर्थादिकाने त्यास उन्मत्त केले. तात्पर्य. मार्गारूढाचे ध्येय दूर राहून मधल्या मुक्कामावर आळस व अनीति मात्र बेसुमार चेकळली. तेव्हा ज्याने बुद्धीला मांद्य येतं, अशा मोहादि झाडाचे मोहापासून पाथस्थाचे रक्षण करावे, आणि ज्याच्या बुडाशी आळस, अहंकार आणि आसक्तीचे भुजंग राहात आहेत, अशा केतकीचंपकादिकाबद्दल मार्गस्थास स्पष्ट इशारा द्यावा, ही गोष्ट राममोहनसारख्या वाटाड्यास त्या काळी जरूरीची वाटली असावी. शिवाय हेही खरे की, त्यापूर्वी कित्येक दिवस आरबीसमुद्रावरून येणारे पश्चिमेकडील धर्माचे वारे अधिक खुले व आल्हादजनक वाटल्यामुळे, कित्येक पौर्वात्य त्या वेळीं पश्चिमाभिमुख होऊ लागले होते. असे होते तरी, खुद्द राजा राममोहन हे मूर्तिपूजेच्या द्वारे ईश्वरोपासना करणाराचा सरसहा विरोध करीत होते, असें नव्हे तर जड मूर्तीसच ईश्वर मानणाराशीं त्याचा तंटा होता, आणि तोही केवळ सुबुद्धापुरताच होता असे त्यांच्या इतर लेखांवरून दिसते.

## प्रकरण पांचवें

# राममोहन आणि ख्रिस्तीधर्म

इकडे राममोहन धर्मसंशोधनाचे कामास लागले असतां तिकडे अमेरिका व युरोप खंडात चॅनिंगप्रभृति मंडळी परधर्मीयास बाटविणाऱ्या जुन्या खिस्तीधर्माविरुद्ध चळवळ करीत होती. ह्याप्रमाणे प्रचलित खिस्ती-धर्माविरुद्ध जोराचे वादळ खास खिस्ती जगात सुरू असता, पुढील एका विनोदी लेखांत वर्णिल्याप्रमाणे हिंदूना खिस्ती करून त्याना पावन करण्याचा उपद्याप खिस्ती पाद्र्यांनी हिंदुस्थानात सुरू केला होता.

खिस्ती धर्मात अनेक पंथ आहेत, त्यांपैकी हिंदुस्थानात आलेले पाद्री जुन्या मताचे होते. मनुष्य खिस्ती न होईल, तर मरणोत्तर त्यास अक्षय नरकात राहावे लागेल, अशी त्यांची धार्मिक समजूत होती. आणि तसेंच सर्व जग खिस्तमय व्हावें, ही त्यांची महत्त्वाकांक्षा होती. प्रथम प्रथम मिशनरी हे कंपनीसरकारला विघ्नीभूत वाटले. धर्मासारख्या नाजूक बाबतीत ढवळाढवळ केल्यास आपले पाऊल येथे स्थिरावणे दुरापास्त होईल, असे जाणून मिशनऱ्याचा पाय येथे लागूं द्यावयाचा नाही, असा कंपनीसरकारचा कटाक्ष होता. परंतु पुढे ही दृष्टि मावळून, उलट आपले राज्य दृढमूल करण्यास पाद्रीलोक आपणांस उपयोगी पडतील असा सरकारचा ग्रह झाला असावा. आणि सूक्ष्मासूक्ष्म उपायांनीं येथील प्रजा बिनबोभाट बाटविता येईल, तर ती एक इष्टापत्तिच आहे असेही इंग्रज मुत्सद्द्यांस वाटले असावे. कारण पाद्र्यांचा कंपनीसरकारकडून होणारा प्रतिकार पुढें सरकारी सहकारांत परिणत झाला असें दिसते.

राममोहनांचे वेळीं कलकत्त्याजवळ श्रीरामपूर येथे बॅप्टिस्ट मिशनचा तळ होता. त्याच्यांतला प्रमुख धर्माध्यक्ष मूळचा एक अशिक्षित चांभार होता. इतरांस खिस्ती धर्माची जोड करून देण्याचे कामीं त्याचा उत्साह मोठा दांडगा होता. स्वधर्माचे बाबतीत स्वकीयांशीं भांडूनतंडून स्वयंबहिष्कृत झालेल्या राममोहन यांची चाल त्या इंगावाल्याच्या नजरेतून गेली नाहीं. इ. सन

१८१६च्या आपल्या अहवालांत राममोहन यांजबद्दल त्यांनीं उल्लेख केला आहे त्यांत असें म्हटले आहे कीं, "राममोहन हे मिशनला भेट देण्यास आले होते; बराच वेळ त्यांचा आमचा संवाद झाला. बोलतां बोलतां गोपाळकृष्णाने केलेल्या एका चोरीची हकीकत सांगून ते म्हणाले, 'माझा घरचा झाडूही असले कर्म करणार नाहीं, तेव्हां माझ्या घरच्या फरासापेक्षांही हलकट अशा देवाची उपासना कशी करावी!' असे म्हटल्यावर त्यांनी येशू खिस्ताची फार स्तुति केली. परंतु त्याना अद्याप खिस्ताचे पावनविधीचे रहस्य समजत नाहीसे दिसते. इ०" ह्यानंतर राममोहन यांच्या मिशनला वारंवार भेटी होऊ लागल्या, पाद्रीसाहेबांचे प्रार्थनेसही राममोहन हजर राहूं लागले. मग पाद्रीसाहेबानीं त्यास डॉ० वॅट ह्यांचे प्रार्थनागीत हे पुस्तक नजर केले. ते राममोहन ह्यास इतके गोड वाटले की, ते आजन्म हृदयाशी बाळगण्याचा त्यानी निश्चय केला, आणि तो अखेरपर्यंत पाळलाही. एतद्देशीय पंडिताशीं स्वधर्मासबंधी वाग्युद्ध खेळून श्रांत झालेल्या राममोहनास खिस्ती धर्माचे चिंतनाचा आणि खिस्ती लोकाच्या सगतीचा नवीनच व्यवसाय मिळाला. कांहीं माणसे परक्यास धाराजिणीं असतात, त्यांपैकीच आमचे हे राममोहन आहेत, असे त्यावेळचे लोकांस वाटले असल्यास नवल नाहीं. राममोहन यांनीं प्रसिद्ध केलेल्या धार्मिक वाङ्मयांत खिस्तीधर्मासबंधीं जितका कसोशिने व विस्तृत विचार केला आहे, तितका दुसरा कशाबद्दलही केलेला दिसत नाहीं. खिस्तीधर्माचे खरे रहस्य खिस्तीधर्मपुस्तकांच्या इंग्रजी भाषांतरावरून समजणार नाहीं, म्हणून त्यांनी हिब्रू व ग्रीक भाषाचा उत्कृष्ट अभ्यास केला. नंतर खिस्तीधर्मपुस्तकाचे अध्ययनाने त्यांचा असा ग्रह झाला कीं, बुद्धिमान् लोकांस नीतिधर्म शिकविणारा खिस्तीधर्मासारखा दुसरा धर्मच नाहीं.

खिस्तीधर्मासंबंधींची ही पक्षपातबुद्धि राममोहन यांनीं आपले मनाशींच ठेवली नाहीं. तर वेळोवेळीं तिला मूर्तस्वरूप देण्यास त्यांनीं कमी केले नाहीं. प्रचलित हिंदुधर्मासंबंधीं अनादर व खिस्तीधर्मासंबंधीं फाजील आदर, असें झाल्यामुळें हिंदूंचे खिस्ती करण्यांत त्यांस प्रथम तरी वावगें असे कांहींच वाटलें नाहीं. हिंदुलोकांस खिस्ती करावे कीं नाहीं व करणें इष्ट असल्यास त्यास कोणती उपाययोजना करावी यासंबंधीं अमेरिकन मिशननें राजा

राममोहन यांस इ. सन १८२४ सालीं एक लांबलचक प्रश्नावलि पाठविली होती. त्याचे उत्तर राममोहन यांनीं पाठविले त्याचा सारांश असा:—
"देवास भिऊन वागणारा प्रामाणिक मनुष्य कोणत्याही पंथाचा असला, तरी तो ईश्वरी कृपेस पात्र होऊं शकेल, असा जरी माझा भरंवसा आहे, तरी मानवजातीची विशेषकरून नैतिक व राजकीय उन्नति करण्याचें सामर्थ्य इतर कोणत्याही धर्मापेक्षां खिस्ती धर्मांत खचित अधिक आहे. परतु तुमच्या पाद्री लोकांनी खिस्तीधर्माचे महत्त्व इंग्रजी शिक्षणद्वारा आमचे लोकावर बिबविले पाहिजे. आमच्या पुराणातील भाकड कथानीच आम्ही इतके विटलो आहोत, की, तशाच अद्भुत चमत्काराच्या असंभाव्य कथा आम्हास सागून उपयोग नाही. तसेंच तुमचे पाद्रीलोक दुसऱ्यानं बाटावे, म्हणून भलत्याच आशा लावून त्यास फसवितात व गोरगरिबांचे अज्ञानाचा, व बिकट परिस्थितीचा फायदा घेतात ते बरोबर नाही. फार कशाला, दरमहा आठ रुपयेप्रमाणे मजुरी देण्याचे जर मला अभिवचन द्याल, तर मी लागतील तेवढे नेटिव्ह खिस्ती होण्यास तुमचेकडे पाठवितो, असे मी श्रीरामपूर येथील पाद्री लोकास कळविले आहे. तुमच्यांतील चागले विद्वान् पाद्री येथे येऊन इंग्रजी विद्येचा फैलाव करतील तर त्याचा फार उपयोग होईल. तुमचे धर्मप्रसारास कलकत्ता हे शहर योग्य आहे. कारण तेथील लोकांचेच अनुकरण इतर शहरीं व खेडेगावी इतर लोक करीत असतात." वगैरे.

साहेबलोकाच्या सगतीशिवाय सामाजिक व राजकीय दृष्ट्या आपली देशोन्नति होणार नाही, याबद्दल राममोहन याची बालबाल ग्वात्री झाली होती. त्यानी विस्तृत पत्रव्यवहार करून अमेरिकन व स्कॉच मिशनचे मिशनरी येथे लोकशिक्षणासाठी आणविले. युरोपियन लोकाची वसाहत हिंदुस्तानात व्हावी, ह्या मुद्द्याचाही त्यानी फारच जोराने पुरस्कार केला. हरएक मिशनऱ्यांचे संस्थेस मनापासून शक्य ती मदत केली. त्या काळी इंग्रज सरकारपेक्षा इंग्रज मिशनऱ्याबद्दल लोकास स्वाभाविकच जास्त तिटकारा असल्यामुळे त्यास कोणीही आसरा देत नसे. मिशनऱ्यांचे आद्य गुरु अलेक्झँडर डफ यांच्यासारख्या बड्या उपद्यापी गृहस्थाची डाळही येथे शिजेना. तेव्हां राममोहन यांनीं आपली भाड्याची जागा त्यांचे शाळेला दिली. त्यांत कोणी विद्यार्थी येईनात. ते राममोहन यांनीं स्वतांचें वजन खर्च करून मिळवून दिले. तेथें डफ-

साहेबांनीं बायबलचें गाणें सुरू केलें. व प्रत्येक विद्यार्थ्यास बायबल वाचावयास दिलें. तेव्हां आपण धर्मभ्रष्ट होऊं असे वाटून सर्व मुले बिथरलीं. पण राममोहन यानीं त्यांची समजूत पाडली कीं, "मी कुराण पुष्कळ वेळां पढलो आहे, पण मी मुसलमान झालो नाहीं. तसेच डॉ० विल्सन हिंदुशास्त्रांचा अभ्यास करूनही अद्याप कट्टे खिस्ती आहेत. तेव्हा बायबल वाचण्यास तुम्ही भिऊ नका. ते वाचा व त्यातील सार ग्रहण करा."

खिस्तीधर्मशास्त्रांत ईश्वरासंबधी व समाजासंबधी मानवी कर्तव्ये ठरवितांना देश, वर्ण, जाति, पेशा, वय अगर सामाजिक दर्जा इत्यादि भेदाभेद मुळीच मानलेले नाहीत, सर्वास सारख्याच रीतीने लेखले आहे, ही गोष्ट राममोहन यास पसंत पडली आणि त्यानी जरी विधिपूर्वक धर्मांतर केले नव्हते, तरी बडेबडे साहेबलोक राममोहन खिस्ती झाले आहेत असेच समजत होते. आणि धर्मतः ते खिस्ती नव्हते तरी खिस्तीधर्माप्रमाणे प्रार्थना करणे, हे त्यास फार आवडत असे आणि अखेर अखेर विलायतेत असता तर खिस्ती संप्रदायाची प्रार्थना हे त्याचे नित्य कर्मच बनून गेले होते. असो. ह्याप्रमाणे खिस्ती मिशनरी व राममोहन यांचा ऋणानुबंध चांगलाच जमला होता. राममोहन याजकडे साहेबलोकास खाने होत व मिशनऱ्याकडे प्रसंगविशेषी (बोभाटा होऊ नये म्हणून फार तर नोकरास बाहेर घालवून) राममोहन याचा उपहारही होई. आणि राममोहनसारखा फारच मोठा देवमासा आपल्या जाळ्यात सांपडणार अशी कलकत्त्याच्या खिस्ती धर्माध्यक्षास मोठीच आशा लागून राहिली. त्यानी राममोहन यास एक दिवस आपले बंगल्यावर बोलाविले आणि त्यास असे सांगितले की, सत्यप्रीति, धर्मश्रद्धा, आत्मोद्धार अगर लोकसंग्रह, या कोणत्याही कारणासाठी नव्हे, तर तुम्हाला तेणेकरून मोठेपणा मिळेल व तुमचा नावलौकिक वाढेल, यासाठी तरी तुम्ही खिस्तीधर्माची दीक्षा अवश्य घ्या. बिशपसाहेबाच्या या धिटाईचा राममोहन यास फार संताप आला व मोठेपणाची लालूच दाखवून बाटवूं पाहाणाऱ्या ह्या बड्या बिशपचा त्यास तिटकारा येऊन त्यांनी त्याचे पुन्हा तोंड पाहिले नाही.

ह्याच सुमारास खिस्तीधर्मशास्त्राचें मंथन करून येशूच्या आज्ञा किंवा शांतिसुखाचा मार्ग ह्या नांवाचा एक विस्तृत निबंध त्यांनीं प्रसिद्ध केला.

होता. वस्तुतः तो एक नवीन वादाचा विषय होईल, अशी त्यांची अटकळ नव्हती. हिंदु-पंडितांशीं वाद करून ते वादाला कंटाळले होते. परंतु या त्यांच्या निबंधामुळें हिंदुधर्माभिमान्यांनीं राममोहन आतां खिस्ती झाले अशी तर ओरड केलीच; पण त्याहीपेक्षां श्रीरामपूरचे मिशनऱ्यांनी वादाचे मोठेच रण माजविलें; ह्या वादविवादांत राजा राममोहन ह्यांचा पहिला निबंध निनांवीच होता. परतु श्रीरामपूरमिशनकडून जेव्हां वादास सुरुवात झाली तेव्हां राजा राममोहन ह्यांनी आपला दुसरा लेख आपले सहीनेच प्रसिद्ध केला. त्यांत त्यांनीं आपल्या मताचें दिग्दर्शन केलें होते. सदर निबंधांत खिस्ती पिता. पुत्र व पवित्र आत्मा या त्र्यींचा निषेध करून येशू खिस्त हा ईश्वर किंवा ईशपुत्र नसून सामान्य मनुष्य होता, असे म्हटले होते. आणि पिता, पुत्र व पवित्र आत्मा अशी परमेश्वराची तीन रूपे नसून ईश्वर एकच आहे असे प्रतिपादिले होते. हे एकेश्वरी (Unitarian) पथाचे विचार बॅप्टिस्टमिशनला बिलकुल मान्य नव्हते. कारण ते "ट्रिनिटेरियन्" पंथाचे कट्टे अभिमानी होते. हा विषय चांगला समजण्याकरितां एकेश्वरी-पंथाचीं मते कोणतीं व त्यांचा ह्या ग्रथांतील प्रकृत विषयाशीं संबंध काय, याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

---



अमेरिकेंतील एकेश्वरी पंथाचे अध्वर्यू विल्यम एलरी चॅनिंग यांचा
५ बोस्टन येथील पुतळा.

*

## प्रकरण सहावें

# ख्रिस्ती एकेश्वरी पंथ

ख्रिस्ती एकेश्वरी पंथाची मतें व ब्राह्मसमाजाचीं मते यांत कांहीं कार्य-कारण भाव असो वा नसो, परंतु ती आमच्या मते बहुतांशीं जुळतीं असल्यामुळे आणि राजा राममोहन ह्यांचा त्या पंथाशी निकट संबंध असल्यामुळे, ख्रिस्ती एकेश्वरी समाजासंबंधीं त्रोटक माहिती येथे देणे जरूर आहे.

पाश्चात्य देशांत आधिभौतिक शास्त्राची वाढ होत चालली, निरनिराळे धर्मांचा तुलनात्मक अभ्यास सुरू झाला आणि समाजनीतीचा विकास होऊं लागला, त्याबरोबर विशिष्ट धर्मपंथाचे संकुचित कोंडीत, दुरभिमानी धर्माध्यक्षांच्या नजरकैदेत, अंधश्रद्धेनें नजरबंद करून दिवस कठणे कित्येकास दुःसह वाटूं लागले. धर्ममतांचा तुरुंग फोडून मोकळ्या मैदानावरील खेळती हवा घ्यावी म्हणून कित्येकांनीं उघड बंडखोरी केली, आणि त्याबद्दल देहांत-प्रायश्चित्तही आनंदाने पत्करिले, परंतु धर्ममतांच्या कोटाला त्यानी पाडलेलीं भगदाडे तशीच राहिली. त्यामुळे पुढे कित्येक स्वेच्छाचारी लोकांना त्यांतून पळवाट काढणे सुगम झालें.

असा हा चोरटा प्रकार ख्रिस्तीसन सोळाव्या शतकापासून एकोणिसावे शतकापर्यंत हंगेरी, पोलंड, इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांत सुरू होता. ह्या तुरळक आणि फुटकळ प्रयत्नांचे एकीकरण इ. सन १८२५ साली होऊन इंग्लंड व अमेरिका येथे ख्रिस्ती एकेश्वरी पंथाची स्थापना झाली आणि आज फक्त अमेरिकेंतच या पंथाचीं सुमारे पांचशे चर्चेस् आणि मिशन्स् आहेत. इतकी गेल्या शतकांत या पंथाची वाढ झाली असून, लोकशिक्षणाचीं व परोपकाराचीं कृत्ये करणारे कित्येक श्रीमान् आणि विद्वान् लोकांनीं या पंथास आजवर भूषणभूत केलें आहे. यामुळे जगांतील सुशिक्षित समाजावर ह्या पंथाचे मताची बरीच छाया पसरली आहे.

ख्रिस्तीधर्मांतील पिता, पुत्र, आणि पवित्र आत्मा हा त्रयीवाद, पापविमोचन-विधि, ख्रिस्ती मृतात्म्यांचा उद्धार व तदितर जीवात्म्यांस अक्षय्य नरकवास इत्यादि

सिद्धान्त ह्या नवीन पंथाचे आद्यप्रवर्तकांस प्रथम पटेनासे झाले. बायबलांतील सृष्टीच्या उत्पत्तीची मीमांसा आधिभौतिक शोधांनी अजीबात खोटी पाडली. अशा रीतीने चिकित्सक बुद्धीने संशोधन करतां करता ख्रिस्तीधर्मग्रंथात कित्येक खोट्या, असंभाव्य व खुळेपणाच्या कल्पना आहेत, असे त्यास आढळून आले. त्यामुळे बायबलचे अमोघत्व नष्ट झाले. आणि चिकित्सक बुद्धीच्या निरीक्षणाखाली बायबल येताच त्यांतील नायक जो येशूख्रिस्त तो सर्वज्ञ व परिपूर्ण असा ईश्वर नसून, चुकीस पात्र अशा मानवकोटींतिलच एक मनुष्य होता, असें मानण्याची पाळी आली. ह्या विचारक्रांतीमुळे कित्येक पूर्णपणें अधार्मिक व नास्तिक बनले. परंतु दुसऱ्या कित्येक विचारी पुरुषांस समाजाच्या व्यवस्थितीस धर्माचे बंधनाची आवश्यकता वाटूं लागली. कोंडलेल्या जागेतून बाहेर मोकळ्यावर गेल्यामुळे प्रथम काही काळ उत्साह व आनंद वाटला खरा; परंतु बाहेरच्या निष्प्रतिबंध अशा वाऱ्याने लवकरच त्याची अंतःकरणे गारठून कठोर झालीं. आणि प्रेमाच्या उबेसाठी निवाऱ्याचे स्थळ मिळावे म्हणून त्यास पुन्हा स्वतंत्र धर्ममंदिरे बांधणे भाग पडले.

अशा या मंदिरांच्या निशाणकाठीवर जे ब्रीदवाक्य लिहिले, ते वरती दिलेच आहे. त्याशिवाय ह्या पंथाचीं आणखी विशिष्ट मते आहेत, तीं अशीः—मनुष्यप्राणी हा प्रगमनशील असल्यामुळे एका काळीं ठरविलेले धर्मसिद्धान्त व विधि हे त्रिकालाबाधित सत्य नव्हत व म्हणून ते सदोदित जसेच्या तसे लागू करणे त्यास मान्य नाहीं. दुसरे त्यांचे असे म्हणणे की, ईश्वरासंबंधीं आस्तिक्यबुद्धि असण्यास ईश्वराचे स्वरूपाबद्दल कांहीं निश्चित माहिती असण्याचे मुळीच कारण नाही. ईश्वराचे व्यक्तित्वाबद्दल ते निश्चित असे कांहींच सांगत नाहींत. त्यांचे मताप्रमाणे मानवबुद्धीचा अनंत कालपर्यंत अव्याहत विकास होत जाणार आहे. अर्थात् त्याबरोबर ईश्वराचे खरे स्वरूप क्रमाक्रमाने अधिकाधिक व्यक्तदशेला येत जाईल. ईश्वराचे स्वरूप शब्दानें सांगतां येण्यासारखे नाहीं. वस्तुतः ईश्वराचे रूपदर्शन हा एक अनुभव आहे आणि प्रत्येक शास्त्रीय शोधाबरोबर हे रूप उत्तरोत्तर अधिक उघड होणार असल्यामुळे आपल्याला ईश्वरस्वरूपाबद्दल निश्चित मत केव्हांच बाळगतां येणार नाहीं. आपण फार तर ईश्वरस्वरूपाबद्दल विचार करूं शकूं. जीसस हा कांहीं ईश्वर नव्हे. व्यापक परमात्मा हाडामांसाचे मानवी

देहांत कसा सामावेल ? शिवाय येशूखिस्त यास अतिमानुष कोटींत घातल्याने आम्हां सामान्य मानवास तो अनुकरण करण्याचे मर्यादेबाहेर जातो, आणि त्यायोगे ते दिव्य चरित्र निरर्थक होऊन मानवी जातीची अपरिमित हानि होते. सूर्यावरील काळे डाग शोधून काढल्याने सूर्याची तेजस्विता जशी सर्वस्वी अमान्य ठरत नाही, त्याचप्रमाणे येशूने सांगितलेले धर्मप्रवचनांतील काही गोष्टी मान्य नसल्या, तरी त्यात माननीय असा पुष्कळ भाग आहे. किंबहुना जगातील सर्व धर्मग्रथात बायबल हें परमश्रेष्ठ आहे, ही गोष्ट कबूल करावी लागेल. आणि म्हणून त्या ऐतिहासिक थोर पुरुषास आपला मार्गदर्शक मानणे योग्य आहे. दैवी हा गुण हाडामासात नसून तो चारित्र्यात आहे. आणि दैवी चारित्र्य खिस्तामध्ये असल्यामुळे खिस्त वंदनीय आहे. खिस्तीधर्मपुस्तकात अलौकिक पावनत्व मानणे गैर असून, ज्यात सत्य सिद्धान्त आहे असे कोणतेही पुस्तक बायबलाप्रमाणेच मान्य असावे. उलटपक्षी खिस्ती पुस्तकातील कित्येक कल्पना ग्राह्य होण्या-सारख्या नाहीत; उदाहरणार्थ, खिस्तीधर्मातील मुक्तीची कल्पना हितकारक वाटत नाहीं. पाप म्हणजे काही ईश्वरविरुद्ध गुन्हा नव्हे. पापाचा संबंध ईश्वराशी मुळीच नसून, एका व्यक्तीने दुसऱ्या व्यक्तीसंबंधी कायावाचामनाने बुद्धिपुरस्सर केलेला अपराध म्हणजे पाप होय. आणि त्या त्या पापाचे फळ भोगणे, हे केवळ अपरिहार्य आहे. त्यातून सुटकाच नाही. ज्याचे त्याचे कर्मच त्यास तारकमारक होते, कोणीही मध्यस्थ पुरुष कोणाचा तारक होऊ शकत नाही. वस्तुतः विवेक आणि मनोनिग्रह हींच मुक्तीची साधने आहेत. पूर्णपणे मुक्त झालेले जीवात्मे प्रायः नाहीतच. वस्तुतः मुक्त होऊन दुसरे कोठे स्वर्गवास मिळावयाचा नसतो. कर्माधिक आत्मशुद्धि, हेच पुण्याचरणाचे फळ. स्वर्गाप्रमाणे नरकाची कल्पनाही भ्रामक आहे.

एकेश्वरी लोक पुनर्जन्माचा विचार करीत नाहीत. त्यास तो विचार अनवश्यक वाटतो. मरणोत्तरस्थितीचा विचार न करतां, ते आपले सर्व लक्ष याच जन्माचे हिताहिताकडे लावितात. ह्या ऐहिक दृष्टीने धर्मपंथ व सांप्रदाय हे क्वचित् उपकारक असले तरी मनुष्यास पावन करण्याची जादू कोणत्याही पंथांत नसून, ते माहात्म्य त्या पथांचे माणसांत आहे, तोपर्यंतच तो पंथ उपकारक होतो. पवित्र भोजनादि विधींची आवश्यकता त्यांस विशेष

वाटत नाहीं. सृष्टीचे नियम अबाधित असल्यामुळें कोणत्याही ऐहिक गोष्टींबद्दल ईश्वरापाशीं याचना करणें व्यर्थ आहे असे ते मानतात. तसेंच प्रत्येक मनुष्यास त्याच्या बुद्ध्यनुसार विचारस्वातंत्र्य असल्यामुळें परधर्मीयांस बाटवून आपल्या धर्मांत घेणें, ही धर्मप्रसाराची कल्पना त्यांस पटत नाहीं. तात्पर्य, ईश्वरावर अहेतुक प्रेम करावे, त्याची मनोभावें सश्रद्ध अंतःकरणानें अहर्निश प्रार्थना करावी, नीतिन्यायानें वागावे, विवेक आणि मनोनिग्रह करावा, तसेंच लोकशिक्षणादि परोपकाराची व लोकसंग्रहाची कामे करून सर्व मानवजातीशीं बंधुभावानें वागावे, यातच प्रत्येकाचे जीवितसाफल्य आहे, असे ते मानतात. ग्रंथारंभी वरुणसत्तेची उपमा दिल्याप्रमाणे हा पंथ आकाशासारखा रंगरूपहीन व सर्वसंग्राहक आहे, त्यांत निषेध करण्यासारखे काही नसले तरी एक गोष्ट चिंतनीय आहे, ती ही कीं, ज्या मानानें या पंथाच्या पीठांची संख्या वाढत आहे, त्या मानानें मानवजातींतील धर्मश्रद्धा व बंधुभाव वाढत नसून त्याच्या व्यस्त प्रमाणांत तो कमी होत चालला आहे. ईश्वराची नियतीच तशी असल्यास इलाज काय! असो. येथें या बाबतींत अधिक विस्तार न करितां राजा राममोहन यांचा या संप्रदायाशीं काय संबंध होता, ह्यासंबंधी विचार पुढील प्रकरणांत करू.



## प्रकरण सातवें

# राममोहन आणि एकेश्वरीसमाज

मागील प्रकरणांत दाखविल्याप्रमाणे इ. सन १८२५ सालीं इंग्लंड व अमेरिका येथें एकेश्वरीसंप्रदायास मूर्तस्वरूप येण्याचे पूर्वींच चार वर्षे अगोदर राजा राममोहन यांनी कलकत्ता येथें एकेश्वरीपंथाचे पीठ स्थापन केले. त्या वेळची राममोहन यांची मानसिक स्थिति बरीच चिंतनीय आहे. एका बाजूस डेव्हिड हेअरसारखे कट्टे जडवादी साहेब व त्यांचे जातभाई आणि दुसरे बाजूस हरिहरानंदासारखे पौर्वात्य स्वामी आणि देशबंधूंचा समाज, अशा कैचींत सापडून ते बरेच हताश झाले होते. सगुणाचा उच्छेद केल्यामुळे, भाविक हिंदूंच्या मनास जो विसावा असतो, तो त्यास नाहींसा झाला होता. येशूच्या आज्ञा व शांतिसुखाचा मार्ग ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत राममोहन असें म्हणतात की, निराकार परब्रह्मस्वरूपाचे संबंधी मनुष्याच्या मनाचे ठिकाणी गाढ अज्ञान आणि आत्मस्वरूपासंबंधीही त्याची अत्यंत साशंक वृत्ति, तेव्हां त्यांचे पूर्णपणे निराकरण करून ह्या अत्यंत जिव्हाळ्याचे प्रश्नावर प्रकाश पाडण्यास बुद्धीची मदत घ्यावी, तर मनुष्याची मर्यादित बुद्धि ही पंगू पडते. यामुळे मनुष्य निराश होतो. उलटपक्षीं ह्या सुयंत्रित ब्रह्मांडाच्या रचनेचा कोणीतरी नियामक आहे; त्याचे सृष्टींतील नियम अवलोकन करून, आपणांशीं दुसऱ्यांनीं जसे वागावेसे वाटते, तसेंच आपण दुसऱ्यांशी वागावें इत्यादि नीतिमर्यादांनीं आपलें व इतरांचे जीवित आपणास सुखी करतां येईल, असा विचार मनांत आला कीं चित्तास आनंद व शांति वाटते. यास्तव अत्यंत गहन अशा तत्त्व-विचारापेक्षां, ज्यात कौटुंबिक अगर सामाजिक प्रपंच, सुखाचा कसा करावा, तो नीतिपथविशेषें करून दाखविला आहे, तो ख्रिस्तीधर्मच अधिक व्यवहारोपयोगी आहे तेव्हां तो लोकांसही कळावा, म्हणून वरील नांवाचा एक विस्तृत निबंध इंग्रजींत लिहून, त्यांनीं त्याची संस्कृत व बंगालींतही भाषांतरे केलीं. ह्या निबंधांत त्यांनीं मागे दिलेलीं एकेश्वरीपंथाचीच मते प्रतिपादिलीं आहेत. परंतु ही गोष्ट येथील पाद्री मंडळीस सहन झाली नाहीं. त्यांचें म्हणणें येशू-

ख्रिस्ताचें लोकोत्तर चरित्र न सांगतां जर कोणी त्याचे उपदेशांतील वेचेच प्रसिद्ध करील तर ते व्यर्थ आहे; इतकेच नव्हे तर तो धर्मद्रोह होईल. राममोहन याचे म्हणणे असे कीं, येशूच्या आज्ञा मानण्यास बायबलातील सृष्ट्युत्पत्तीची उपपत्ति व दुसरे लोकोत्तर चमत्कार अथवा वादग्रस्त ऐतिहासिक भाग, इकडे लक्ष देण्याचे मुळीच कारण नाही. वास्तविक खरा एकच देव असतां ख्रिस्तीधर्माने पिता, पुत्र व पवित्र आत्मा हे तीन देव मानले काय च हिंदूंनी तेहतीस कोटि मानले काय, दोघेही सारखेच अज्ञानी ठरतात. शिवाय त्यांनी आपल्या लेखाचे असे समर्थन केले की, एकाद्या क्षुल्लक दृश्यमान वस्तूचेही पुरे गुणधर्म शोधून काढण्यास जर आपली बुद्धि समर्थ नाहीं, तर कित्येक शतकांपूर्वीच्या येशूचे स्वरूपाबद्दल वाटाघाट करीत न बसता त्यांच्या खऱ्या अनुयायानी त्याच्या आज्ञापालनाकडे अधिक लक्ष द्यावे, हेच योग्य आहे. एरवी येशूच्या लोकोत्तर कथांत हिंदूस त्यांच्या अठरा पुराणांत आढळले नाही, असे काय अद्भुत सांपडणार आहे ! हा वादविवाद पुढे पुष्कळच माजला, त्याची तपशीलवार माहिती येथे देणे अप्रस्तुत होईल. तथापि राममोहन यांच्या एकेश्वरीसमाजाचे स्थापनेस आणखी एकदोन लहानशा गोष्टी कारण झाल्या, त्याचा थोडक्यात उल्लेख करणे जरूर दिसतें.

बॅप्टिस्टमिशनच्या कांहीं मिशनऱ्यांनी बायबलाचे बंगालीत भाषांतर करण्यास घेतले होते. त्या कामी त्यांनीं राममोहन यांची मदत घेतली. भाषांतर करतांना सर्व सृष्टि ईशतत्त्वांतून व्यक्त झाली, कीं ती ईश्वराने निर्माण केली, असा वादग्रस्त प्रश्न निघाला. राममोहन पडले वेदान्ती, त्यांनीं ईशतत्त्वांतून असा अर्थ घेतला, अर्थात् यात अद्वैतसिद्धान्ताचा वास आल्यामुळे बाकीचे पाद्री बिथरले. परतु राममोहन ह्यांनी त्यांतील एकास आपल्या युक्तिवादाने आपलेकडे ओढून घेतले. तोच रे० आदमसाहेब पुढे राममोहन यांच्या एकेश्वरीसमाजाचा मुख्य मिशनरी झाला व त्याला दुसरे पाद्री हा दुसरा पतित आदाम म्हणून चिडवूं लागले. त्याचप्रमाणे मागील एका प्रकरणांत राममोहन यांस लौकिकाचे लालचीने बाटवण्याचा प्रयत्न झाल्याचे सांगितले तेंही प्रकरण बरेच चिरडीवर गेले. अशा कारणांमुळे बॅप्टिस्टमिशनशीं राममोहन यांचा बेबनाव होऊन इ. सन १८२१ चे सप्टेंबरांत राममोहन यांनीं कलकत्ता एकेश्वरीसमाज स्थापन केला. या समाजांत कांहीं रकॉच

गृहस्थांशिवाय राममोहन, द्वारकानाथ ठाकूर ( देवेंद्रनाथांचे वडील ) प्रसन्नकुमार ठाकूर व राधाप्रसाद राय, असे हिंदी गृहस्थ होते. या समाजाचे विद्यमाने एक युनिटेरिअन छापखाना आणि एक ॲंग्लोहिंदु शाळा सुरू झाली. तसेच या संस्थेच्या निमित्ताने इंग्लंड व अमेरिका येथील एकेश्वरी समाजाशी राममोहन यांचे पत्रोपत्री दळणवळण सुरू झाले. उद्या आपले जिवावर बितली तरी बेहेत्तर, परंतु एकेश्वरी पंथाचा पुरस्कार करण्याचा माझा निर्धार मी सोडणार नाही, अशी राममोहन यांनी आपले पत्रांतून त्यास अभिवचने दिलीं. आणि खरोखरच त्यांनी आपले नवीन एकेश्वरीपंथाचे मंदिरात खिस्तीधर्मप्रमाणे प्रार्थनादि उपासना सुरू केली. राममोहन यांच्या अशा वृत्तीमुळे ते खिस्तजमा झाले, असा बऱ्याच लोकांचा ग्रह झाला.

विविधधर्ममतांचे माहेरघर अशी हिंदुस्थानची प्रसिद्ध आहे. षड्दर्शनासारखीं भिन्न दर्शनें येथे एका हिंदुधर्मातच सामावतात. लिंगायत, शीख व जैनासारखे पंथही व्यवहारतः हिंदूतच गणले जातात. असे धर्मौदार्य जेथे अनादिकालापासून नांदत आहे, तेथही कुलिन ब्राह्मणकुलांत जन्म घेणाऱ्या या महापंडितानें (मनवाणीनें) खिस्तानुयायी व्हावें, ही गोष्ट कित्येकास दुःसह झाली. ती इतकी की, राममोहन यास जीवें मारण्याचा दोनतीन वेळा प्रयत्न झाला. त्यामुळे राममोहन यास नेहमी हत्यारबंद राहावे लागे. शिवाय त्यांचे एक अनुयायी मार्टिनसाहेबही त्यांच्या संरक्षकाचें काम करीत असत.

राममोहन यांचेबद्दल लोकांना इतका त्वेष आला, ह्याचे कारण त्यांची परधर्मासंबंधी पक्षपातबुद्धि हेच केवळ नसून, स्वधर्मातील देवाच्या मूर्ति व अवतार आणि तसेंच कित्येक पुरातन रूढीवर राममोहन यांनी जे टीकेचें हत्यार उचलले होते, तेंच असावे असे वाटते. राममोहन वाग्युद्धांत मोठे पटाईत होते असे म्हणतात. एका बाजूस ट्रिनिटेरिअन खिस्ती व दुसऱ्या बाजूस मूर्तिपूजक हिंदु, अशा दोन प्रतिपक्षांवर एकाच वेळीं वाग्बाण फेकण्यांत त्यांनी आपले सव्यसाचित्व सिद्ध केले आहे. तथापि त्यांची वादविवादपद्धत सर्वांसच मान्य होईल, असे वाटत नाहीं. एक तर ती विधायक नसून विघातक स्वरूपाची असे. प्रतिपक्षाचे आक्षेपांस सरळ उत्तर न देतां उलट तसेच आक्षेप प्रतिपक्षाबद्दलही घेतां येतात, असे दाखवून वाद खुंटविण्याची रीत

तात्पुरती परिणामकारक होत असली, तरी तत्त्वनिश्चयाचे दृष्टीनें अशा पद्धतीचा फारसा उपयोग होत नसे. तसेंच, आपल्या स्वतःच्या नांवाने वादविवाद न करिता शिवप्रसाद, रामदास, अशा दुसऱ्यांच्या नांवांनी वाद करण्याचे त्यांच्यासारख्या विद्वान् पंडितास काय कारण होते, ते कळत नाही. असिधारेप्रमाणे केवळ सत्यप्रीतीपेक्षा त्यांचे वादविवादांत वकिलीबाणा जास्त दिसून येतो. कदाचित् त्या वेळी हीच पद्धत शिष्टसंमतही असेल.

राममोहन ह्यांच्या वादविवादाचा आणखी एक प्रकार म्हणजे एखादा प्रश्न बुद्धया उपस्थित करून त्याचे उत्तर आपल्या एकाद्या शिष्याच्या नांवाने ते प्रसिद्ध करीत. दुसरीं अनेक प्रसिद्ध देवळे व ख्रिस्तीमंदिरे असताना एकेश्वरीप्रार्थनामंदिरातच तुम्ही का जातां असा प्रश्न उपस्थित करून त्याचें राममोहनानीं चंद्रशेखर देव याचे सहीनें उत्तर दिले आहे ते असें:—"(१) इतर ठिकाणी एका परमपुरुषाबरोबर दुसऱ्याही कांहीं व्यक्ति सर्वज्ञ व सर्वव्यापक मानण्यात येतात, परंतु एकेश्वरीमंदिरांतील प्रार्थना, आराधना व प्रवचन ह्या अमर्याद विश्वाच्या अत्यंत चतुर अशा नियामकाची आठवण करून देतात; (२) मानवी शरीराची अजब रचना व त्याच्या गरजांची तरतूद ही पाहून एकेश्वरी उपासनेत ईश्वराच्या अकारण व अमोघ अशा दयालुत्वाची साक्ष पटते व त्याची दया येशूख्रिस्ताचा बळी मागत नाहीं असे दिसून येते. तसेंच (३) तो परमपुरुष एखाद्या कुमारिकेच्या गर्भात राहणारा अथवा आईबापाच्या निगेत तरी सामान्य शरीरधर्मानें वागणारा असा नाहीं; तर आकाशस्थ गोलांच्या गतीचे नियंत्रण करतो आणि वनस्पतिकोटि व जीवकोटि याचे पोषण करतो, तो जगत्सूत्रधार सर्वव्यापक कसा आहे ते कळून येते. (४) एकेश्वरी प्रार्थनामंदिरांत जाण्याचे आणखी कारण असें की, रामदत्तात्रेयादि देवांसारखीं माणसें व माणसासारखे देव ह्या दुष्ट कल्पनांचा आम्हांस इतका वीट आला आहे कीं त्याच कल्पना जेत्यांपैकीं बूटपाटलोणवाल्या एकाद्या धर्मगुरूंनी सांगितल्याने आमची जिज्ञासा वाढणे शक्य नाहीं. (५) हे धर्मवेडे लोक नास्तिकाची निंदा करतात पण ईश्वरास खबूतराचें हास्यास्पद रूप देणारे नास्तिकांपेक्षां जास्त सन्माननीय कसे ते समजत नाही! (६) ख्रिस्त्यांचा अर्धवट देव व अर्धवट माणूस यांत आम्हाला कांहींच नवलाई वाटत नाहीं. कारण आम्हांला बाळपणींच नरसिंहदेवाचें त्रिविधरूप असल्याचे

आईबापांनीं सांगितले आहे. (७) हिंदूंच्या त्रिमूर्तींची कल्पना क्षणभर चिंतनीय तरी आहे, पण खिस्त्यांचा त्रयीवाद त्याचा त्यासच उकलत नाही."

दुसऱ्या एका ठिकाणीं ते लिहितात कीं, "ज्याप्रमाणे तीन बाजवा मिळून एक त्रिकोण असतो त्याप्रमाणे देवत्रयी मिळून एक देव असतो. ह्याप्रमाणे कित्येक पंडित त्रयीवादाला त्रिकोणाचा मोठा समर्थक म्हणून दृष्टान्त देत असतात.पण तसें करण्यात ते सर्वस्वींच चुकतात. कारण एकतर त्रिकोणाच्या तीन रेषा कल्पनामात्र असून त्यास वास्तविक अस्तित्वच नसते, तशीच देवत्रयी कल्पनामात्र उरेल. दुसरें, तीन रेषा परस्पर भिन्न असल्यामुळे त्यावरून देवत्रयी एकरूप ठरणार नाहीं. तिसरें, त्या प्रत्येक रेषेस बाजू असें म्हणतां येईल; पण कोणत्याही रेषेस त्रिकोण म्हणजे परमेश्वर म्हणता येणार नाही. चवथें, त्रिकोण मानावयाचा मग हिंदूंच्या चतुर्व्यूहात्मक उपासनेस चौकोन कां न घ्यावा ? पांचवें, अशा रीतीनें दृष्टान्तातील आकृतीच्या बाजवा वाढवून हिंदूंच्या तेहतीस कोटि देवांचीही सिद्धि होईल; आणि मग एखाद्या पूर्तानें ज्यास कोन व बाजवाच नाहीत असें वर्तुल दृष्टान्तास घेतल्यास त्या वर्तुलाप्रमाणेच ईश्वराचेही वाटोळें होईल ! तात्पर्य, इतर देवळांतून अनेक देव मानण्याचा मिथ्याचार असतो, आणि एकेश्वरीमंदिरात फक्त एक्याच परमात्म्याची आराधना केली जाते, म्हणून मी इतर देवळात न जाता एकेश्वरीप्रार्थनामंदिरांतच जातों.

ह्या एकंदर वाग्युद्धांत राममोहन जे डाव खेळत, ते पाहात असता हे खरोखर कोणत्या मताचे व धर्माचे अभिमानी आहेत हे ठरविणे कठीण होई. ते हिंदु असूनही त्यांनीं हिंदुधर्मावर कडक टीका केली. त्याचप्रमाणे येशूच्या आज्ञा व शांतिसुखाचा मार्ग ह्या विषयावरील वादविवादांत त्यांनीं आपण खिस्तानुयायी असल्याचें अभिमानपुरःसर सांगूनही त्यांनी स्वतां धर्मांतर करून खिस्तीधर्माचा स्वीकार केला नाही. उलट खिस्ती मिशनऱ्यांचे डोळ्यांत त्यांच्या धर्मवेडाबद्दल चांगलेच अंजन घातले. हिंदुलोकांच्या मूर्तिपूजेप्रमाणें खिस्तीलोकांचा त्रयीवाद हेही एक खूळ आहे, असें त्यांस वाटे. तसेंच आत्मकल्याणार्थ बुद्धिपुरःसर धर्मांतर करण्यास जरी त्यांची ना नसली तरी येशूखिस्ताच्या धर्मावांचून जीवास सद्गति नाहीं अशा धर्मवेडाने

प्रेरित होऊन अजाण लोकांस भुलीनें बाटवणें ही गोष्टही त्यांस निंद्य वाटे.*

* ह्या मुद्द्यासबधीं राममोहन ह्यानीं " ख्रिस्ती पाद्री व तीन चिनी बाटे " या नांवाचा एक विनोदी लेख लिहिला आहे. त्याच्याच आधारें खालील संवाद रचला आहे.

[ स्थळः—महारवाड्यांतील एक चर्च ]

पाद्री—आमी टुमचे पापांची क्षमा होण्यासाठी पच्छाटापाचा बाप्तिस्म गाजवीत योहानपरमाने फार दुरून परगट येथे आलो. टर टुमी लोक टुमच्या पुस्कल देवांला विसरा आणि आमच्या खऱ्या डेवाला भजा, समजला.-टर मग खरे डेव किती ? बोला.

तुकनाक – तीन, साहेब.

धोंडनाक्—हट ल्येका, तीन कुठचं दोनुच.

हरनाक्—आन् तू पन असा कसा. देव मुदलांत आतां राहिलाय् कुठं ? मुळीच नइ.

पाद्री—( मनांत ) हॉरिड. धी आन्सर्स आर फ्रॉम धी डेव्हील. ( रागानें ) टुमी सैतान लोक आहां !

तुकनाक—आन् साब तुमीच नव्ह का बोलला कीं येक आभाळांतला बाप. येक त्येचा लेक नाझरेकऱ्या येशु, आणि येक पवितर आत्मा. मग मग योक, येक आन यक- समद किती झाल ? तीन नव्ह का ?

पाद्री—टुमी लोक थोडा थोडा कशासाठी ध्यानांत ठेवतां ? तीन मजे एकच, अशा पण आमी टुमाला सांगितलं ते टुमी विशरता !

तुकनाक्—तीन मंजी यक ! ठीक ! हें शिकवायला इलायतीतून इतक दूर इथ आला व्हय !

पाद्रीः—धोंडनाक्, टुमी डेव दोन कशे म्हणटा !

धोंडनाकः—मुळच तीन, आन त्येतला येक गमावला—

हरनाक्—अर पन् गाढवाच्या घसा, साब मनतो तीन मंजी येक, आन् त्योतर फासावर का खुरसावर लटकला, मग आतां देव कोणचा आणतुस बाकडला !

खिस्तीधर्म इतरांपेक्षां श्रेष्ठ आहे असे युक्तिवादानें सिद्ध करून वाटेल तर सुबुद्धांस धर्मांतर करण्यास लावावें; पण खिस्तीधर्म हा जेत्यांचा धर्म आहे, तो सत्ता व संपत्ति ह्यांनी समृद्ध आहे, अशा गोष्टींचा गैरफायदा घेऊन किंवा भूल देऊन लोकांस बाटविणे गर्हणीय आहे अशी त्यांची तक्रार होती. आणि अशाच कारणांस्तव खिस्तासंबधीं त्यांस आदर असला तरी ते येथील खिस्ती पाद्र्यांचे कधीं साहाय्यकारी तर कधीं विरोधी असे दिसतात. ह्याचें अधिक स्पष्टीकरण पुढील एका प्रकरणात होईल. असो.

त्रयीवादी विरुद्ध एकेश्वरी असा सामना सुरु झाल्यावर, त्रयीवादी खिस्ती लोकांनीं वड्याचे तेल वाग्यावर काढण्याचे मिषाने हिंदु-धर्मावर व त्याचे षड्दर्शनांवर मनसोक्त टीका सुरू केली. तेव्हा हिंदूचे वकीलपत्र घेऊन राममोहन यानी हिंदूच्या सांख्यमीमासादि दर्शनांचे आणि मूर्तिपूजा, अवतारवाद इत्यादि मताचे व रूढीचे समर्थन करण्यास मागे पाहिले नाही. तसेच डॉ० टायटलर, एक त्रयीवादी खिस्ती, एकेश्वरी-पंथाविरुद्ध वाद करण्यास उभा राहिला असतां राममोहन यांनी रामदास ह्या एका मूर्तिपूजकाचे नावाने त्याचे जोडीस उभे राहून असा बहाणा केला की, त्रयीवादी खिस्ती तीन देव मानतात, तसेच हिंदूही अनेक देव मानतात;

---

पाद्रीः—( निराशेने प्रार्थना करतो ) आकाशातल्या बापा ! ह्या पाप्याना दया कर. आनी टेच्या अडण्यानासाठी त्याना पच्छाटाप दे !

[ जाऊ लागतो.

तुकनाकः —पन साब, तुमचा पच्छाटाप राहुद्या. अदुगर आमी भुके मरतु त्येची वाट काय !

धोंडनाकः —आमच्या जातगंगेन आमास्नी गावाबाहेर लावल, आतां आमची इनामी कवा देणार ?

हरनाकः—अाञ् आमची किरिस्तावीण नवी घरधनीण कवा येणार ?

पाद्रीः—( पाय काढीत ) टुमी लोक, उटावीळ होटा कामा नये. आमी सांगू तशा राहिल पाहिजे. टुमाला आतां पुन्हा हिंदु होतां येणार नाही. खूब समजा. [ जातो.

[ बिचारे भुकेबंगाली बाटेनाक् पस्ताव्याने एकमेकांचे तोंडाकडे पाहतात.]

तेव्हां या नवीन एकेश्वरीपंथाशीं विरोध करण्यास दोघेही समानधर्मी आहेत. रामदास यांच्या या विधानाने मुख्य वाद बाजूलाच राहून विजयशाली खिस्ती धर्माशीं दुबळ्या हिंदु मूर्तिपूजक धर्माची त्याने बरोबरी केली म्हणूनच वाद उपस्थित झाला. राममोहन यास तेच पाहिजे होते. त्यानी रामदास या नांवाने वर्तमानपत्रात पत्रे छापवून एवढेच दाखविले की, डॉ० टायटलर हिंदुमूर्तिपूजकाचा धर्म ज्या कारणास्तव निंद्य मानतात, ती सर्व कारणे प्रचलित ख्रिस्तीधर्मातही आहेत. अर्थात् या विवादपद्धतीत हिंदुधर्माचा कैवार घेण्याचा राममोहन याचा मुळीच हेतु नसून डॉ० टायटलर यास तुम्ही मूर्तिपूजकच आहात, असे म्हणून खजिल करावे व पर्यायाने एकेश्वरीपंथाची महती सिद्ध करावी, असाच त्याचा डाव होता. खिस्ती मिशनऱ्याशी जे त्याचे कडाक्याचे वाद झाले, त्यांत त्यानीं हिंदुधर्माची तरफदारी करण्याची हीच पद्धति अंगिकारली आहे. ती कोणाही हिंदुधर्माभिमान्यास भूषणावह अगर समाधानकारक वाटेल, असे नाही.

साराश, एकाच फटक्याने त्रयीवादी खिस्ती व मूर्तिपूजक हिंदु यांस चीत करून, एकेश्वरीपंथ बद्धमूल करण्याचा जो त्यांचा खटाटोप सुरू होता, तो मुख्यत्वे विघातक व अंशतः विधायक अशा स्वरूपाचा होता. त्यापैकी त्याचे विघातक टीकेचा जरी कांही परिणाम झाला, तरी त्याचे हातून विधायक स्वरूपाचे काहीच जमेना. त्याच्या विघातक कार्यातही अनेक विघ्ने आली. पूर्वी त्यांचे लेख मिशनऱ्याचे छापखान्यांत छापले जात. परंतु पुढे मिशनऱ्यांशीं विरोध येतांच मिशनने राममोहन यांचे लेख छापण्यांच नाकारले. मिशनऱ्यांचे "समाचारदर्पण" आणि "फ्रेंड ऑफ् इंडिया" यांत हल्ले सुरू असतां त्यावेवर फेरहल्ले चढविण्याकरितां ब्रॅहॅनिकल मॅगेझीन या नावाचे एक नियतकालिक व आपले मालकीचा छापखाना राममोहन यांस काढावा लागला. व मग मुख्यत्वेकरून सदर ब्राह्मणधर्माच्या पत्रिकेच्या द्वारे त्यांनीं जो वादविवाद केला त्याचा सारांश पुढील प्रकरणांत दिला आहे.

ह्याप्रमाणे राममोहन ह्यांची विघातक चळवळ व तिचे परिणाम यांतच त्यांचें सर्व लक्ष वेधून गेलें. एकेश्वरीसमाजाचे घटनेकडे त्यांस जरूर तितके लक्ष देतां आले नाहीं. यामुळे त्यांची नूतन संस्था बाळसे न धरतां रोडावत चालली. आदम साहेबाचे प्रार्थनेस हळूहळू कोणी येईनासें झालें.

प्रथम राममोहन हे आपले कांहीं आप्तइष्टांस घेऊन जात असत. पण पुढे पुढे तेही जाण्याचे बंद झाले. अखेर या बालसंस्थेच्या सत्तेची व्यापकता वाढवावी, म्हणून राममोहन यानीं तिचें नांव "धि ब्रिटिश इंडियन युनिटेरिअन असोसिएशन" असें घवघवीत ठेवून एकदा प्रयत्न करून पाहिला. परंतु व्यर्थ. कांहींच जमेना. शेवटीं त्यांच्या एका मार्मिक शिष्याचे प्रयत्नानें एक गोष्ट राममोहन यांचे लक्षात आली कीं, हिंदु कितीही नादान झाले असले, तरी परमार्थप्राप्तिकरिता पतित आदमला आपला आचार्य करण्याइतके दीन व स्वाभिमानशून्य ते अद्याप झाले नाहीत!

---

# प्रकरण आठवें

# खंडनमंडन

मागील प्रकरणापर्यंत हकीकत आल्यानंतर राजा राममोहन ह्याने ब्राह्म-सभा स्थापन केली हेंच ह्यापुढे सांगावयाचे आहे. परंतु त्यापूर्वी थोडे मागें वळून राममोहन ह्यांच्या चरित्राचा आढावा घेणे जरूर आहे. ब्राह्मसभा स्थापन होईपर्यंतच्या राममोहन याच्या चरित्राचे स्थूल मानाने चवदा चवदा वर्षांचे सारखे चार भाग पडतात. राममोहन यांची पहिलीं चवदा वर्षे बालपणांत कांहीं घरी देवपूजेत व कांही पुढे पाटणा येथे विद्यार्जनांत गेली आणि ह्या भागाची अखेर धार्मिक मतभेदास्तव देशत्यागात झाली ! त्यानतरचीं चवदा वर्षे इस्लामी, बौद्ध, जैन, व वैदिक धर्मांच्या अध्ययनांत बहुतेक काशीक्षेत्रांत गेली व त्याची अखेर पुत्रप्राप्ति होऊन गृहप्रपंचास आरंभ झाला. त्यानतरच्या चवदा वर्षांत डिग्बी साहेबांचे आश्रयाने द्रव्यप्राप्ति व इंग्रजी संस्कृतीशी परिचय झाला. व ह्या विभागाची अखेर नोकरी सोडून पुढील कार्यास्तव कलकत्ता येथे जाऊन राहण्यात झाला. ह्यापुढील चवथा चवदा वर्षांचा विभाग धर्मचर्चेच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. ह्या विभागाला आरंभ आत्मीयसभेत, मध्यावसान एकेश्वरीप्रार्थनामंदिरांत आणि अखेर ब्राह्मसभेच्या संस्थापनेत झाली. ह्या चवदा वर्षांत राममोहन ह्यांनी जी धर्मचर्चा केली ती बारकाईने लक्षात घेतली असतां राममोहन ह्यांच्या विचारांनी घेतलेली आंदोलने लक्षात येतात. ह्या चवदा वर्षांतही सन १८२० ते २४ हीं चार वर्षे म्हणजे वाग्युद्धाचा कहरच होय. ह्या कहरांत राजे राममोहन कधी सनातनीयांचे सेनानी तर कधी खिस्त्याचे सरदार म्हणून वाग्बाण फेकीत असलेले पाहून हे धर्मवीर कोणाच्या बाजूचे हा विस्मयच पडतो; व चरित्रकाराकडे विसंगतीचाही दोष येऊं पहातो. तसेंच राममोहन यांच्या लेखांपैकी त्यांचे आत्मचरित्र, त्यांचीं कांही पत्रे व ब्राह्मणपत्रिकेतील व इतर ठिकाणचे लेख हे त्यांचेच असल्या-बद्दल एकमत नाहीं, त्यांचे समकालीन लेखकांत त्यासंबंधीं सर्वतोपरी एक-वाक्यता नव्हती. आणि आज शंभर वर्षांनी राममोहन ह्यांचे सांप्रदायी

राममोहन ह्यांचे मतांस स्वानुकूल असा जो पेहराव चढवीत आहेत तोही निरपवाद नाही. अशा स्थितींत तत्संबंधीं ह्या लेखकाचीं अनुमानेही टीकेस पात्र होण्याचा संभव आहे. यास्तव राममोहन ह्यांनीं ब्राह्मसभा स्थापन करण्याच्या पूर्वीं विशेषेकरून हिंदु व ख्रिस्ती धर्मासंबंधी, परस्पर विरोधि व अविरोधि असे जे विचार प्रगट केले, त्यांपैकी काही महत्त्वाचे उद्गार ह्या प्रकरणात क्वचित् द्विरुक्तीचा दोष पत्करून संकलित केले आहेत.

राममोहन यांचे वरिष्ठ डिग्बीसाहेब हे विलायतेस परत गेल्यावर त्यांस राममोहन असे लिहितात की, "धर्मतत्वाचें मी जे सतत पुष्कळ संशोधन केले त्यात ख्रिस्तानुशासन हेंच साऱ्या धर्मांत विशेष नीतिसवर्धक व बौद्धिक जगास अधिक उपयोगी असे मला आढळले. आणखी मला असेंही आढळले की, (धार्मिक आचार व गृहप्रपंच यात हिंदूंच्या इतके धर्मवेडे व दीनवाणे पृथ्वीच्या पाठीवर दुसरे कोणीही नाहीत.) तेव्हा इतउत्तर त्यांनीं आनंदी व सुखी असावे म्हणून त्यांच्या मूर्तिपूजेच्या मिथ्याचाराविरुद्ध मी पुष्कळ वादविवाद केला; व त्या बाबतीत आमच्याच शास्त्राधारें त्याचा असमजसपणा दाखविण्याकरिता आणि ईश्वर 'एकमेवाद्वितीय' आहे हे सिद्ध करण्याकरिता वेदान्तसूत्राची व वेदांपैकी दुसऱ्या कित्येक प्रकरणांची बंगालीत व हिंदीत भाषांतरेंही प्रसिद्ध केलीं. त्या कामी मला आरंभी आपमतलबी धर्मगुरु जे ब्राह्मण त्यांच्याकडून फारच विरोध सहन करावा लागला. मला माझ्या निकटच्या नातेवाईकांनीही सोडले. त्यामुळे मी अत्यंत खिन्न झालो. अशा ऐन कठीण प्रसंगी माझ्या युरोपियन—विशेषेकरून इंग्रज व स्कॉच—मित्राच्या सांत्वनकारक बुद्धिवादातूनच मला काय तो आनंदाचा लाभ झाला." राममोहन दुसरे एके ठिकाणी म्हणतात कीं, "हिंदूंच्या जातिधर्मांनीं त्यांच्या सामान्य सुखांतही माती कालविली आहे. त्यांना सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत फक्त एकदाच अन्नग्रहण करतां येते, शिजलेले अन्न बोटीत खातां येत नाही, कपडे घालून जेवतां येत नाही, हाटेलांत जातां येत नाही, विजातीयाने शिवलेले अन्न चालत नाही, इतकेंच काय पण जेवतांना उठले असता पुन्हा पानावर बसतां येत नाही."

हिंदूंच्या उपासनेबद्दल राममोहन असे वर्णन करतात की, "प्रत्येक हिंदु आपल्या उपासनेकरितां देव व त्यांच्या देवता अशा मूर्ति तयार करतो.

त्या देवदेवतांच्या जन्मकर्मांचे चिंतन व कथन करण्याचा त्यांस बालाभ्यासच असतो. मग त्या जन्मकथा, जारकर्म, विषयासक्ति, सत्यापलाप, कृतघ्नता, विश्वासघात व मित्रद्रोह ह्यांनींच भरलेल्या असल्या तरी चालतात! अशा देवदेवतांच्या ठिकाणी भक्तिभाव ठेवून त्यांचे नामस्मरण किंवा कथाश्रवण करण्याने, तसेंच त्या देवतांस व त्यांचे भक्तांस किंचिन्मात्र दान केल्याने, चित्तशुद्धि व सर्व पापांचे निरसन होऊन अंती मोक्ष प्राप्त होतो. असें ज्यास बालपणापासून शिकविलें जातें, त्याची नीतिमत्ता काय दर्जाची असेल ह्याबद्दल दुमत होणें शक्य नाही." जो ब्रह्माव्यतिरिक्त इतर देवाची पूजा करतो आणि आपणास त्या देवापेक्षा कनिष्ठ लेखतो, तो मूर्ख असून त्या देवांच्याकरितां राबणारा पशुच समजावा. वास्तविक मोक्षप्राप्तीला ब्राह्मण-धर्मातील विधिविधानाची मुळींच जरूरी नाही. आणि खरोखर ज्या देशांत केवळ जन्मावर श्रेष्ठ जातीची मान्यता ठरवितात, त्या आमच्या ह्या देशांत ज्ञानार्जन व नीतिधर्म ह्याचा ऱ्हास झपाट्याने झाल्यास त्यांत नवल काय!"

असो. ह्याप्रमाणे प्रचलित हिंदुधर्माचें वर्णन ज्याप्रमाणे राममोहन ह्यांनीं केलें त्याचप्रमाणे ते खिस्तीधर्मासंबंधीं येशूच्या आज्ञा या पुस्तकाच्या प्रस्तावनेत असें म्हणतात की, "ज्या ईश्वराने वर्ण, दर्जा किंवा संपत्ति असे भेद न मानतां सर्व जीवास दुःख, मृत्यु, निराशा व विकार ह्यांस सारखेच पात्र केलें आहे, तसेंच जगावर तो करीत असलेल्या कृपेच्या वर्षावास ज्याने सारेच विभागी केले आहेत, त्या ईश्वरासंबंधीं श्रेष्ठ व उदात्त भावना फार उत्तम प्रकारें जागृत करणारें असें धर्म व नीतीचें एक खिस्ती अनुशासन आहे. मनुष्यमात्राच्या स्वतःविषयींच्या व समाजाविषयींच्या नानाविध कर्तव्यांत हे खिस्तानुशासन इतकें उत्कृष्ट मार्गदर्शक आहे की, त्याच्या प्रसारापासून अत्यंत फायदे होतील अशी मला खात्री वाटते."

राममोहन आणखी असें म्हणतात, "ह्या देशांतील पाद्रीलोकांचे संबंधीं माझे मनांत अढी आहे असें कोणी समजूं नये. उलट त्यांच्या संस्थेचा विस्तार व्हावा आणि युरोपियन शरीरप्रकृतीला न मानवणाऱ्या आमच्या ह्या देशांतील हवापाणी त्यांस सुखावह व्हावें अशी माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे. कारण त्यांची संख्या आमच्या देशांत ज्या मानाने वाढेल त्यामानानें

त्यांच्या संगतीनें, संभाषणानें व त्यांच्या उदाहरणांनीं आमच्यांत गांभीर्य, संयम, नेमस्तपणा व सद्वर्तन याची वाढ होईल."

तात्पर्य, राममोहन यांचे म्हणणे असे होते की, खिस्तीधर्म जर योग्य रीतीनें लोकांच्या मनात चांगला बिंबवला तर मनुष्यजातीची नैतिक, सामाजिक व राजकीय स्थिति सुधारण्याचें धोरण इतर कोणत्याही धर्मापेक्षां खिस्तीधर्मात अधिक आहे. हिंदुस्थानांतील सुशिक्षित लोकांनी प्रत्यक्ष धर्मांतर न केलें तरी खिस्तीधर्माचा पुरस्कार ते आनंदानें करतील. ह्यासाठीं हिंदी लोकास अगोदर इंग्रजी विद्या शिकवली पाहिजे. आणि त्या इंग्रजी विद्ये-बरोबरच थोडथोडे खिस्तीधर्माचे शिक्षण देणे अगदी योग्य होईल. मात्र, त्यांत इतरास न समजण्यासारखीं जी खिस्तीधर्माचीं गूढ रहस्ये असतील, त्याची माहिती प्रथम अगदी थोडी देऊन खिस्तनीतीवर अधिक भर द्यावा, हेच सुशिक्षितास अधिक संमत होईल. आज इंग्रजी शिक्षणासाठीं सारी हिंदी प्रजा अत्यंत उत्सुक झाली आहे. ह्या विचारास अनुसरून राममोहन ह्यांनीं आपल्या वेदांतविद्यालयांतसुद्धा इंग्रजी शिक्षण व खिस्तानुशासन ह्याची पुस्ती जोडलीच होती. असो, ह्याप्रमाणे हिंदुधर्माचा उपहास व खिस्तीधर्माचा प्रस्ताव राममोहन ह्यांनी केला खरा, पण त्यानंतर खिस्ती पाद्र्याशी राममोहन याचे जे कडाक्याचे वाद झाले त्या वादांचे वेळी हिंदु-धर्मास पाठीशी घेऊन राममोहनानीं खिस्तीधर्मावर जे फेरहल्ले चढविले, त्यांची थोडक्यात कल्पना येण्याकरितां पाद्री व राममोहन ह्याच्या विस्तृत वादाचे संवादरूपाने संक्षिप्त विवेचन खाली केले आहे.

पाद्री—वेदांत जर असे सांगितले आहे कीं, ईश्वराचे ज्ञान मानवी बुद्धीस अगम्य आहे, तर मग तुम्ही दुसऱ्या कोणत्या तरी धर्माच्या द्वारें ईश्वरविषयक ज्ञान संपादून मगच उपदेश करायला लागावे ते बरे.

राममोहन—हा वेदांताचा विपर्यास आहे. ब्रह्माचे यथातथ्य ज्ञान बुद्धीस अगोचर असले तरी ईश्वराचे अस्तित्व बुद्धीस कार्यानुमेय आहे असे वेदान्तांत सांगितले आहे.

पाद्री—तुम्ही परमेश्वराला तर निर्गुण मानतां. मग बरे आणि वाईट हा भेदच राहिला नाहीं. परमेश्वराला निर्गुण म्हटल्यावर नास्तिकांत व तुमच्यात भेद तो काय?

राममोहन—पदार्थास चिकटलेले जसे त्याचे गुण असतात तसे ब्रह्म-वस्तूस चिकटलेले असे गुण वेदान्त मानीत नाहीं. दृष्टि, अक्कल, दया, राग इत्यादि गुण पाहिले तर ते कधीं असतात तर कधीं लय पावतात, तसेच ते एकमेकांनी आच्छादितही होतात, आणि शिवाय ते नेत्र, मेंदु, अंतःकरण, अशा एकदेशींच काय ते असूं शकतात. असे हे परिच्छिन्न गुण पूर्ण ब्रह्माचे ठिकाणी मानतां येत नाहीत. जगाची उत्पत्ति, स्थिति व लय होण्यास जे अनंत कल्याण गुण कारणीभूत होत असतील, तेच त्या परमपुरुषाचे स्वरूप केवळ अचिन्त्य व अपरिच्छिन्न असते इतकाच वेदान्ताचा भाव आहे. असे आहे, तरी मानव कोटींतील अत्युच्च गुण सत्य, क्षमा, न्याय इत्यादि जेव्हा परमपुरुषास लावतात तेव्हा ते परमार्थाचे साधकास परमपुरुषाचे स्वरूप प्रथम आकलन करतां यावें म्हणूनच होय. सारांश, कर्ता, भर्ता व मोक्षदाता अशा तीन गुणाचे पिता, पवित्र आत्मा व पुत्र असे तीन पृथक् देव मानण्यापेक्षा वरील वेदान्ताची विचारसरणीच श्रेष्ठ दर्जाची ठरते.

पाद्री—तुम्ही वेदान्ती मनालाच ब्रह्म मानता तेव्हा तुमचे मन पाप-पुण्याबद्दल जी स्फूर्ति देईल तीच ईशप्रणीत झाली. तुम्हास आमच्या-प्रमाणें ईशप्रणीत नियंत्रणच नको असे झाले.

राममोहनः—हाही वेदार्थाचा विपर्यासच आहे. वेदांत मन, अन्न, आकाश, पशु इत्यादि पदार्थास ब्रह्म म्हटले आहे त्यातील हेतु ब्रह्म हे व्यापक आहे, इतकेच दर्शविण्याचा आहे. तसेच वेदात जी देवदेवतांची पूजा-विधानें सांगितली आहेत तीं ब्रह्मोपासनेस जे अनधिकारी असतील, त्यांच्या मनास काहींतरी आलंबन असावें इतक्याच हेतूस्तव सांगितलीं आहेत. पवित्र आत्मा कबूतराचे रूपानें संचार करून जर मेरीचे ठिकाणीं पुत्रोत्पत्ति करूं शकतो, तर मच्छकच्छादि अवतारांत असंभव तो कोणता ? आणि गाईला गोमाता म्हटले ह्यांत खिस्त्यांनीं हंसावें असे काय आहे ? ह्यावर पाद्री म्हणतील की, आम्ही देहधारी येशूची आराधना करतो, तीं त्या जड-शरीराची नसून आंतील चित्कलेची करतो. तरी त्यांस कोणत्याही धर्मातील मूर्तिपूजेवर टीका करण्याचा हक्कच पोचत नाहीं. कारण हिंदु जे रामकृष्णांची उपासना करतात, ती त्यांच्यांतील ब्रह्मांश सोडून करतात असें कोण म्हणेल ? उलटपक्षीं रामकृष्णादिकांच्या मूर्तींत प्राणप्रतिष्ठादि संस्कार केल्याबांचून

हिंदु मूर्तिपूजक केवळ मूर्तीसच देव मानून कधीं पूजीत नाहींत. मूर्तिपूजेसंबंधीं हिंदुधर्माची अशी मर्यादा आहे की, वर्णाश्रमविहित शास्त्रीय कर्मे प्रत्येकानें करीत असता दरम्यान फुरसुतीचे वेळीं मूर्तीची उपासनाही करावी. ती सर्वांच्या अंतर्यामी ईश्वर आहे अशी जाणीव होईपर्यंत करावी. अहं ब्रह्मास्मि ही अद्वैत्यांची श्रेष्ठप्रकारची उपासना आहे. त्याच्या खालोखाल द्वैत्यांची सगुणोपासना असून त्यानीं श्रेष्ठाचा बहुमान, बरोबरीच्याची मैत्री, कनिष्ठास प्रियवस्तूंचे दान आणि सर्वत्र समदृष्टि ठेवून सर्वभूताच्या अंतर्यामी जो परमेश्वर त्याचे पूजन करावे, असे भागवतात कपिलानें सांगितले आहे. त्याचेहून कनिष्ठ मूर्तिपूजा होय.

पाद्रीः—वेदान्त्याच्या मायावादानें ईश्वरास कमीपणा येतो. तसेंच त्यायोगानें ईश्वर आणि त्याची माया हीं दोघेही श्रेष्ठ व अनाद्यंत ठरतात.

राममोहनः—ईश्वरास कमीपणा कसा येतो ते तुम्ही सांगत नाहीं. माया ही ईश्वराची शक्ति आहे. तिला स्वतंत्र अस्तित्व नाहीं. जसे ईश्वराचे स्वरूप अनाद्यंत आहे, तसेंच त्याचे शक्तीचे स्वरूप असणे स्वाभाविक आहे. प्रत्येक धर्मांत ईश्वराचे गुण ईश्वराइतकेच शाश्वत मानलेले आहेत. गुणरूप जी माया त्याच्यापेक्षा गुणी जो परमेश्वर त्याची योग्यता वेदान्तानें अधिकच मानली आहे.

पाद्रीः—जीवात्मा व परमात्मा जर एकरूप आहेत तर जीवात्म्याच्या बऱ्यावाईट कर्माबद्दल त्यास बरेवाईट फळ भोगावे लागते, असे म्हणणे म्हणजे ईश्वरासच फळे भोगावी लागतात, असे म्हणण्यासारखे होते. तसेंच जीवात्म्याच्या अस्तित्वामुळे परमात्म्याच्या पूर्णत्वास बाध येतो.

राममोहनः—ईश्वर बिंबरूप असून जीवात्मा हा प्रतिबिंबरूप आहे. अर्थात् जीवात्म्याचे अनेकत्व, मलिनत्व, व चांचल्य हे उपाधिभूत असलेल्या पाण्याच्या म्हणजे मायेच्या स्वरूपावर अवलंबून आहे, ती उपाधि गेली, की प्रतिबिंबरूप जीवात्म्याचे बिंबरूप परमात्म्याहून भिन्न अस्तित्व नाहींसे होतें. आणि ते भिन्न अस्तित्व असते, तेव्हाही प्रतिबिंबाचे मालिन्य, चांचल्यादि गुणदोष बिंबाचे ठिकाणीं लागत नाहींत. तसेंच प्रतिबिंबाच्या पृथक् भासणाऱ्या अस्तित्वामुळे बिंबाच्या पूर्णत्वास उणेपणाही येत नाहीं. दृष्टान्त नेहमीं एकदेशी असतात. उदाहरणार्थ, सृष्टि पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें आहे, असें सांगण्यांत येतें, तेव्हां इतकेंच दर्शवावयाचे असते, कीं ज्याप्रमाणे बुडबुड्याला

पाण्याचा आधार त्याप्रमाणें सृष्टीला ब्रह्माचा आधार आहे. आणि ती बुडबुड्या-प्रमाणेंच अशाश्वत आहे. वारा बुडबुडा उत्पन्न करतो, त्याअर्थीं मायेचेंही ब्रह्मावर नियंत्रण चालते असा त्याचा अर्थ नव्हे. ईश्वराची शक्ति म्हटली म्हणून ती त्याच्यावर हुकमत चालवते असे नाहीं. पश्चात्ताप झालेल्या जीवा-वर ईश्वर दया करतो असे म्हटले म्हणजे दयेची ईश्वरावर सत्ता चालते, असा त्याचा अर्थ नव्हे. परमात्म्याच्या शुद्ध स्वरूपाचे ज्ञान होतांच ज्या मायेने आत्मा-परमात्मा इत्यादि भेद दाखविले, ती नाहीशीच होते. ज्ञान हे मायेचे विरोधि आहे. माया या शब्दांत ईश्वराची सृजनशक्ति व तिचे कार्य ह्या दोहोंचा अंत-र्भाव होतो. सर्परज्जूच्या दृष्टान्तावरून इतकेंच घ्यावयाचे कीं, सर्पाला स्वतंत्र अस्तित्व नाही. त्याचे अस्तित्व त्याला दोरीकडूनच मिळते. वास्तविक दोरी-शिवाय दुसरे कांहींच नाही. त्याचप्रमाणे सर्व सृष्ट पदार्थांस अस्तित्व ब्रह्मा-कडून मिळते. एक ब्रह्म वस्तु मात्र आहे. वास्तविक दुसरे कांहींच नाही पण ह्याचा अर्थ सारीं हंडीमडकी म्हणजेच ब्रह्म असा नव्हे. ब्रह्म हे परमपुरुष-वाचक असून जडसृष्टि ही प्रकृति आहे. प्रतिबिंबाचा बिंबांत लय होतो, त्याचप्रमाणे प्रकृति आपल्या मूळ ब्रह्मस्वरूपांत लय पावते. जोपर्यंत ज्योतींचा मेणबत्त्यांशीं संबंध आहे, तोपर्यंत ज्योतिज्योतीत भेद दिसतो, पण तो संबंध सपला म्हणजे साऱ्या ज्योति अव्यक्ततेजांत विलीन होतात. त्याचप्रमाणें जीवात्म्यांचे आहे. असे न मानतां हे सर्व जग व जीव शून्यांतून निर्माण झाले, असे जे मानतात त्यांस ईश्वराचे अस्तित्वच सिद्ध करणे अशक्य होईल.

असो. ह्याप्रमाणे वेदान्तदर्शनांतील मायावादाचा पुरस्कार केल्यानंतर त्याच लेखांत अनुक्रमाने न्याय, मीमांसा, पातंजल व सांख्यदर्शन ह्यांचेही समर्थन 'राममोहन' ह्यांनीं केले आहे. नंतर पुराणे व तंत्रे ह्यांचा विचार ते करतात तो असा.

पाद्रीः—तुमचीं पुराणे, देव अनेक असून ते इहलोकीचे भोग भोगतात असे सांगतात. तुमचा नामरूपात्मक देव विश्वव्यापक कसा असेल? तसेंच कित्येक देवांचीं नामरूपे शास्त्रांत वर्णिलेलीं असून तीं माणसांना कळत नाहींत हें कसे?

राममोहन—पुराणांनीं वेदान्ताला धरून परमेश्वर अचिंत्य व निराकार आहे असेंच सांगितलें आहे. परंतु अप्रबुद्ध माणसांचें जीवन अज्ञानामुळें धर्महीन

किंवा पापात्मक होऊं नये म्हणून त्यांच्यासाठीं नामरूपांचे देव कल्पून त्यांस मनुष्यांप्रमाणेंच भावना असतात असे सांगितले आहे. हेतु हा की, त्या-योगानें त्यांचा देवाच्या ठिकाणीं भाव जडावा व हळूहळू त्यांनीं ईश्वराच्या सत्यज्ञानास अधिकारी व्हावे. परमेश्वर हा वास्तविक नामरूपहीन असून त्यास कर्तृत्व व भोक्तृत्व हीं नाहींत, असेच जी सर्वमान्य व वेदानुकूल पुराणें आहेत त्यांत पुनः पुन्हा स्पष्टपणें सांगितले आहे. ते न पाहतां तुम्ही पाद्री-लोक कोणत्या तरी वेदविरोधि भाकड कथाची भाषांतरें प्रसिद्ध करून हिंदु-धर्मास हिडिस स्वरूप देण्याचा नेहमी प्रयत्न करतां हे अश्लाघ्य होय.

आता आमचे देव देहधारी असून त्यास बायकामुले असतात, तरी आम्ही त्यास व्यापक असे ईश्वर कसे मानतो, ह्या गोष्टीचा, पुराणांतील आणि तत्रातील चुका दाखविण्याचे हेतूनें तुम्ही उपहास करता, पण त्यावर मी असे विचारतो की, मानवदेहधारी येशुख्रिस्त आणि खबूतराचे शरीर धारण करणारा पवित्र आत्मा यांस तुम्ही पूर्ण परमेश्वररूप कसे मानतां? मग येशुख्रिस्तास तुमच्याआमच्यासारखेच इंद्रियज्ञान, रागलोभादि मनो-विकार व जन्ममृत्यू नव्हते काय? तसाच खबूतर झालेला पवित्र आत्मा या ठिकाणाहून त्या ठिकाणी जात असून त्याच्याचपासून मेरीच्या पोटीं तिचे लग्नापूर्वीच येशुख्रिस्ताचा गर्भ राहिला असे तुम्ही मानतांना? मग आमच्या पुराणांस का दोष देतां? उलट आम्ही असे दाखवितो की, आमच्या शास्त्रांनी व पुराणांनी असें ठिकठिकाणीं सांगितले आहे कीं, ह्या देवकथा कोठे रूपकात्मक तर कोठे काल्पनिक आहेत असे समजावे. ईश्वर वास्तविक तसा नाहीं. पण तुमच्या बायबलांत ह्या येशूच्या व पवित्र आत्म्याच्या सर्व कथा अक्षरशः खऱ्याच आहेत असे सागितले आहे. तेव्हा आतां नाम-रूपात्मक अनेक देव आणि त्यांचे इंद्रियजन्य भोग व विकार हे दोष फक्त तुमच्याच पथांत आहेत, असे उघड होते. शिवाय आमच्यामधील पुराणे आम्ही काहीं वेदतुल्य मानीत नाही. पण तुमचे बायबल मात्र तुम्हास अमोघ वाटते.

पाद्रीः—बरे, ते असो. पण तुमच्या धर्मात तुमच्या कर्मांचीं फळ कांहीं येथेच मिळतात असे लिहितात व कांही मरणोत्तर मिळतात असे लिहितात. तसेच तुमची पूर्वमीमांसा पाहतां हिंदुस्थानच्या लोकांशिवाय इतरांना कर्म-फळांची प्राप्तीच नाहीं असें दिसतें, हे कसे?

राममोहनः—ह्याच जन्मीं कर्माचीं फळे मिळूं शकतात, असे तुमचें शास्त्रही सांगतेच. आता जीं वेदविहित कर्मे वेदांनीं तुम्हाला सांगितलींच नाहीत त्याची फळेही तुम्हांला मिळणार नाहींत, असे म्हणण्यात शास्त्र कोठे चुकलें ? आमच्या धर्माप्रमाणे ज्याने त्याने आपल्या वर्णाश्रमाप्रमाणे वेद-विहित कर्म करणे हे योग्यच आहे. परंतु ज्ञानाचे अधिकारी होण्यास किंवा अमृतत्वाची प्राप्ति होण्यास वेदाध्ययन व वैदिककर्मपरिपालन आवश्यकच आहे असें नाहीं. स्मृति आणि आगम ही ज्ञानाधिकार देण्यास समर्थ आहेत.

पाद्रीः—तुमच्या श्रुति, स्मृति आणि आगम पाहिजेत कशाला ? येशु-ख्रिस्ताने आत्मयज्ञ करून अखिल ख्रिस्ती मानवसमाजाचे पापक्षालन केलें; पण ते तुम्हास मान्य नाहीं, मग मानवजातीच्या अनंत पापांचे निरसन होण्यास तुमच्या म्हणण्याप्रमाणे उपाय काय ?

राममोहनः—वेदांताप्रमाणे शम, दम, तितिक्षा, उपरति, ध्यान हेच पापक्षालनाचे खरे उपाय आहेत. आमच्या धर्माप्रमाणे आमच्या पापक्षालनास ख्रिस्ती धर्मातील अखेरच्या निवाड्यापर्यंत थांबावे लागत नाहीं. इतकेंच काय, पण आम्ही आमच्या कर्माची बरी वाईट फळे या जन्मांही भोगूं शकतो.

असो. ह्याप्रमाणे प्रश्नोत्तरे झाल्यानंतर प्रचलित ख्रिस्ती मतावर मात करण्याच्या हेतूने राममोहन ह्यांनी त्यास असे सवाल केले कीं, " येशुख्रिस्ताला तुम्ही ईशपुत्र म्हणून, पुन्हा त्यासच ईश्वर कसे मानतां ? येशुख्रिस्ताला कधीं मानवपुत्र असेंही म्हणतां व पुन्हा कोणीही मानव त्याचा जनक नव्हता असे म्हणता, ते कसे ? ईश्वर एकच आहे असे म्हणतां तर पिता, पुत्र व पवित्र आत्मा हे सारेच देव कसे ? ईशचैतन्यच काय ते पूजनीय आहे असे मानून पुन्हा जडदेहधारी येशुख्रिस्ताला देव म्हणणे विसंगत नाही काय ? तसेच पुत्र व पिता तत्त्वतः एकच आहेत, असे मानल्यावर पुत्र पित्यासमान आहे असे द्वैतसूचक कसे म्हणतां येईल. आतां मनुष्याचा पुत्र तोही मनुष्यच, ह्याप्रमाणे ईश्वराचा मुलगा तोही ईश्वर म्हणावा, तर तो आपल्या पित्याप्रमाणे अनाद्यनंत कसा असेल ? ईश्वर हें कांहीं जातिवाचक सामान्यनाम नव्हे, तें विशेषनाम आहे. पण त्या विशेषनामांत जर तीन देव येत असतील तर त्यांत व सामान्यनामांत फरक तो काय राहिला. एक्या ईश्वर ह्या नामनिर्देशांत जर नाम, रूप व क्रिया ह्यांनीं भिन्न असलेल्या

पिता, पुत्र व पवित्र आत्मा ह्या तीन व्यक्तींचा समावेश खिस्ती करतात, तर हिंदूंच्या त्रिमूर्तींचा उपहास करण्याचा त्यांना काय हक्क आहे ? खिस्ती म्हणतील कीं, आमचे तीन देव एकरूप कसे हे गूढ रहस्य आम्हांला न सांगतां आले तरी परंपरागत संस्कारांमुळे आम्हाला त्याची प्रचीति येते. तर त्यावर हिंदूसही असेच ठासून सांगता येईल की, आमचे देवतापंचायतन एक परमेश्वररूप आहे, याचा आम्हालाही पूर्वसंस्कार व अभ्यास ह्यांच्यायोगे साक्षात्कार आहे.

आतां सामान्य जनतेचा बुद्धिभेद न व्हावा म्हणून मोठमोठ्या रोमन व ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीही या असंबद्ध मतांचा आरंभी अनुवाद केला असे कोणाचें म्हणणे असेल तर आज ही मते खिस्ती जगात इतकीं दृढमूल झाली आहेत कीं, त्याविरुद्ध विवेचकबुद्धीने कोणी ब्र काढण्याचीही सोय राहिली नाही. असा जर खिस्ती धर्मावर गुरूंच्या परंपरेचा जबरदस्त पगडा आहे तर खिस्ती लोकांनीं ब्राह्मणाच्या नांवाने खडे फोडण्यात अर्थ काय ? ज्या धर्मग्रंथात पिता, पुत्र व पवित्र आत्मा यांचा केवळ भिन्न नामनिर्देशच नव्हे तर त्यांच्या निरनिराळ्या भावना व कार्येही वर्णिली आहेत, त्याच ग्रंथाने पुन्हा परमपुरुष एकच असल्याचे प्रतिपादणे, हे ज्यांचे इंद्रियज्ञान व बुद्धि शाबूद आहे, असा कोणीही मानणार नाही. प्रचलित हिंदुधर्मांत याहून अधिक विसंगतपणा कोठे आहे तो खिस्त्यानीं दाखवावा.

दुसरें असे कीं, एक " पिता "— परमेश्वर, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् व अत्यंत दयाळु असतांनाही त्याच्या एकत्वाच्याने न भागून सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् व अत्यंत दयाळू असे पूर्णत्वाने युक्त पिता, ईशपुत्र, पवित्र आत्मा ह्याप्रमाणे जर तीन मानता येतात तर मग तीनच का, तेहतीस कोटी अथवा प्रत्येक आकाशस्थ गोलागणिक एकेक असाच ईश्वर मानण्यास काय हरकत असावी? आणखी पाद्रीलोक असे म्हणतात की, येशू हा ईशपुत्र असतांही त्यानें आपल्याला मानवपुत्र म्हणणें हे त्याचें केवळ लाघव आहे, ते कांहीं खरें नव्हे. मग असे आहे तर हिंदूच्या पुराणांतून अशा लाघव-गौरवाचा रूपकात्मक जो भाग आहे तेवढाच उचलून धरून साऱ्या हिंदुधर्माची त्यानीं निंदा करणे अत्यंत गर्ह्य नाहीं काय ? तात्पर्य हिंदुलोकांचा धर्म, त्यांचे शिक्षण, त्यांची नीति इत्यादींवर खिस्ती लोकांनी बेगुमानपणाने टीका करण्या-

पूर्वी पुष्कळच विचार केला पाहिजे व शोधही केला पाहिजे. हिंदु हे अज्ञानतमांत पडले आहेत, त्यांचा नैतिक अधःपात झाला आहे वगैरे कल्पना करणारांनी एक्या बंगालप्रांतांत गेल्या थोड्याच वर्षांत, अध्यात्म, कायदा, न्याय, व्याकरण आणि ज्योतिष अशा विषयांवर शेकडो नवीन ग्रंथ निर्माण झाले आहेत, ह्याची पुसतपासही केलेली नसावी ही लांछनास्पद गोष्ट आहे. तसेंच हिंदूच्या आचाराशीं युरोपियनांच्या आचारांची तुलना केल्यास अत्यंत हिणकसपणा कोठें आहे हेही सिद्ध करणे कठीण नाहीं.

तात्पर्य, उद्यां जर कोणी हिंदु अगर मुसलमान खिस्ती झाला, आणि नंतर त्याने खिस्ती धर्मातील ही खुळें व त्रयीवादावर निरनिराळ्या खिस्ती पंडितानीं व धर्माधिकाऱ्यानी तोडलेले तारे पाहिले, तर आपण धर्मांतर केल्याबद्दल त्याला अत्यंत पस्तावा झाल्यावांचून खचित राहणार नाही. ब्रिटिशांसारख्या विजयशाली व उदयोन्मुख राष्ट्राने आपला धर्म धर्मगुरूंच्या असंबद्ध सिद्धान्तांवर अवलंबून ठेवावा हे मोटेंच आश्चर्य होय. संपत्ति, सत्ता, विजय इत्यादि शब्दावडंबराशी व चिन्हांशी सद्धर्माचा क्वचितच संबंध असतो हेंच ऐतिहासिक सत्य दिसते. अशा स्थितीत पाश्चात्य देशांतील सुज्ञ लोकांचा खिस्तीधर्ममतांवरील विश्वास उडत चालला असता हिंदुस्थानातील लोक त्या धर्माचा आश्रय करतील ही गोष्ट असंभवनीयच दिसते.

सर्वशक्तिमान् व शाश्वत अशा परमेश्वराने मनुष्यकोटींत जन्माला यावें, वाढावें, हालअपेष्टा भोगाव्या आणि अखेर लज्जास्पद मरण पावावें, असे परमपुरुषाचें जन्मकर्म साधू पहाणे म्हणजे मनुष्याच्या अगदीं सामान्य बुद्धीचाही उपमर्द करण्यासारखे आहे. तसेंच खिस्ती लोकांनी चोऱ्या, दरोडे, दगाबाजी करून केलेल्या पापांचें प्रायश्चित्त येशुखिस्तास त्याचे इच्छेविरुद्ध देहांतशासन देऊन भोगण्यास लावावें ह्या मतात एक्या येशुखिस्ताचाच काय पण एकंदर न्याय, नीति, मर्यादा ह्या सर्वांचाच अमानुष रीतीनें खून होतो.

तेव्हां बंगालप्रांतीं लोकसंख्या वाढत असून दारिद्र्यही वाढत आहे अशा गोष्टीचा फायदा घेऊन येथे खिस्तीधर्ममतांचा प्रसार करण्याचा उद्योग ब्रिटिश पाद्र्यांनीं करणे ही गोष्ट फार गैर आहे. जे देश स्वतंत्र आहेत त्या देशांत त्यांनीं वाटल्यास आपल्या धर्ममतांचा प्रसार करण्याचा प्रयत्न करावा. पण

हिंदुस्थान हें जित राष्ट्र आहे व ब्रिटिश लोक हे जेते आहेत, यास्तव त्यांनीं असा प्रयत्न येथें करणें मात्र अन्यायाचें होईल.

ह्या प्रकरणांतील विरोध काहीं अंशीं अपरिहार्यच आहे. कारण त्यांत राममोहन ह्याच्या मनाचा पालटच प्रतिबिंबित झाला आहे. तथापि ह्या सर्व विवेचनांत एक गोष्ट लक्षात येते, ती ही कीं येशुख्रिस्तानी सांगितलेले नीतिधर्म राममोहन ह्यास जितके आवडले तितकीच बायबलांतील त्याचे जन्मकर्म व इतर गूढ म्हणून सांगितलेलीं मते त्यास नापसंत झालीं. भगवद्गीतेचा स्मृति म्हणून त्यानीं अनुवाद केला; पण श्रीकृष्णचरित्र त्यांस अत्यंत निंद्य वाटलें. ते काहीं असो. वादविवादात सहज उत्पन्न होणाऱ्या अभिनिवेशामुळे राममोहन यांच्या मनाचे ठिकाणीं जे विचारसंक्रमण झाले त्याचाच परिणाम एकेश्वरीप्रार्थनामंदिराची ब्राह्मसभा ह्या रूपातरात लवकरच घडून आला. हे रूपांतर होता होतां विचाराचे वर्तुळ पुरे होऊन, ते कदाचित् सनातनधर्माच्या पूर्वपदावरच यावयाचे, परंतु त्यापूर्वीच त्याचे आयुष्य संपले. असो. याबद्दल विवेचन पुढे येईल.

---

# प्रकरण नववें

# ब्राह्मसभा

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे आदमसाहेबांच्या एकेश्वरीप्रार्थनासमाजाला प्रथम कांहीं दिवस कित्येक हिंदु व युरोपियन येत असत. परंतु पुढें प्रार्थना करण्यास येणाऱ्यांची संख्या कमी होत चालली. एक दिवस या नूतन प्रार्थना-मंदिरांतून प्रार्थना आटोपून परत येत असतां, राममोहन यांचे तरुण शिष्य ताराचंद चक्रवर्ती आणि चंद्रशेखर देव या दोघांनीं असें सुचविलें कीं, ह्या परकी पाद्रयाचे चर्चमध्यें जाण्यापेक्षां आपले विचारास पूर्ण संमत होईल, असा आपणच एक एकेश्वरीसमाज स्थापन करावा. ही गोष्ट राममोहन यांसही पटली. राममोहन यांचे कित्येक श्रीमान् स्नेह्यांनी प्राथमिक खर्चाची जबाबदारी आपलेवर घेतली. असा सर्व योग जुळून आल्यामुळे तारीख २० आगस्ट सन १८२८ रोजी फिरंगी कमळ बोस यांचे घरी पहिली ब्राह्म-समाज सभा स्थापन झाली. या ब्राह्मसभेचे जनकत्व राममोहन यांस द्या किंवा एखाद्या उद्भिज्ज कोटीप्रमाणे तत्कालीन परिस्थितीनेच सदर संस्था निर्माण केली असें म्हणा. परंतु आदमसाहेबाचे खिस्ती एकेश्वरीसंस्थेस ब्राह्मसभेच्या मातृपदाचा मान देतां येणार नाही. फारतर इतकेंच म्हणतां येईल कीं, ह्या युनिटेरियन दाईनें वेळेवर येऊन ब्रह्मोपासनेची लवकर सुटका केली. दोन्ही संस्थांचे जन्मादारभ्य जातिधर्मच वेगळे होते. एक निव्वळ खिस्ती तर दुसरी केवळ हिंदु असें म्हणता येईल. ईश्वरप्रणीत अशा वेदांचे आधारें ब्रह्मोपासना करावी हेच ब्राह्मसभेचे ध्येय होतें. यामुळे प्रार्थनांचे बहिरंगांत जरी खिस्ताचे अनुकरण करण्यांत आलें, तरी बायबलनें जे हिंदूंचें धर्मपीठ बळकावण्याचा घाट घातला होता, तो फसून शेवटी 'प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु' हें हिंदूंचें ब्रीदच कायम राहिलें. तत्कालीन मिशनऱ्यांचे प्रसिद्ध पुढारी डॉ॰ डफ ह्यांनीं राजा राममोहन ह्यांस हिंदूंचा लूथर ठरविलें. तर डॉ॰ विल्सन दुसरे बडे मिशनरी त्यांस आद्य शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचे पुनरुद्धारक असें मानूं लागले.

युनिटेरिअन लेखक व वक्ते, लेखांत आणि भाषणांत किती उदार अगर अघळपघळ दिसले, तरी ते हाडाचे खिस्तीच, त्यांचा स्वधर्मासंबंधीं अभिमान किंवा दुरभिमान पुरा जागृत असतो. यामुळें कलकत्त्याचे खिस्ती एकेश्वरी-समाजाचे, हिंदी ब्राह्मसभेत रूपांतर झालेले, आदमप्रभृति युरोपिअनास आवडले नाहीं. जॉनबुलच्या रागाच्या डुरकावण्या सुरू झाल्या. पण राम-मोहन ह्यांनी त्यास दाद दिली नाहीं. उलटपक्षी ह्या रूपांतराने राममोहन यांनी हिंदूंची सहानुभूति थोडीबहुत तरी संपादन केली. ब्राह्ममंदिराचे अनावरणसमारंभास पांचशे हिंदु हजर होते. त्यांत कित्येक भिक्षुक ब्राह्मणही होते. पुढें राममोहन याचे विषयींच्या आदराने अनुयायाची संख्या दिवसें-दिवस वाढत चालली ते त्यास आदराने दिवाणजी असे म्हणत. उलट राममोहन त्यास बरोबरीचे नात्याने " बिरादर " असे म्हणत. ते व त्याचे अनुयायी यांचेमध्ये चांगले प्रेम व सलोखा नांदूं लागला. राममोहन मनाचे फार प्रेमळ व दिलदार होते. एखादी चांगली गोष्ट घडून आली की, त्यास असा हर्ष लोटे की, त्या भरांत ते आपलेजवळ असलेल्या शिष्यास प्रेमाने पोटाशीं धरीत. एखादी अनिष्ट गोष्ट घडली तरी ते त्याबद्दल आपले शिष्यवर्गास बोलत नसत. उलट ती राममोहन याच्या हातून घडली तर त्याचे अनुयायी क्वचित् त्यांचा स्पष्ट निषेध करीत; त्याचाही त्यास राग येत नसे. एक दिवस राममोहन यांची स्वारी स्नान केल्यानंतर आपले आरशासमोर उभी राहून बराच वेळ आपले सुंदर लांब केस विंचरीत व कपड्यांची ठाकठीक करीत उभी होती. ते पाहून त्याचा अनुयायी ताराचंद चक्रवर्ती म्हणाला, " महाशय ! आरशांत चेहरा पाहाण्यांत वेळ घालवू नये, हा उपदेश लोकांनाच सांगण्य.करिता असतो काय ? " हे अंजन मिळताच राममोहन चपापले. त्यांनी आपली चूक कबूल केली. एकंदरींत राममोहन यांची राहणी श्रीमंतांची व दरबारी थाटाची असे त्यांना मुसलमानी पेहराव मनापासून आवडे आणि तोच त्यांनीं आपले सांप्रदायिकांत सुरू केला होता. देवाचे दरबारीं बसतांना माणसांनीं सुंदर पोषाख करावा, असा त्यांचा कटाक्ष असे. उलटपक्षी, नेहमीं गाड्याघोड्यांतून हिंडणारे राममोहन रोज ब्राह्म-समाजास जातांना अनवाणी पायांनीं जात, इतका त्यांचा साधेपणा होता. एकदां राममोहन रस्त्याने जात असतां एका भाजीवाल्यास त्याची जड पाटी

उचलून देण्यास कोणी पाहिजे आहे, असें पाहून त्यांनीं सहज त्याची पाटी त्याच्या डोईवर उचलून दिली. ह्या ब्राह्मसभेचे पहिले चिटणीस वरील ताराचंद चक्रवर्ती हे होते. ब्राह्मसभेचे सभासद दर शनिवारी सायकाळी सात ते नऊ वाजता एकत्र जमत असत. त्या वेळीं प्रथम दोन तेलगू ब्राह्मण एका पडदा लाविलेल्या बाजूचे खोलीतून वेदपाठ म्हणत. त्या खोलींत ब्राह्मणेतरांस जाण्याची मनाई असे. वेदपाठ झाल्यावर उत्सवानंद विद्यावागीश हे काही उपनिषदांतील भाग वाचून दाखवीत व त्याचा भावार्थ पंडित रामचद्र विद्यावागीश हे बगालींत समजावून सांगत. नंतर राममोहनांनीं तयार केलेले उपदेशपाठ वाचले जात. शेवटी गोविदमाला यांचे प्रार्थनासंगीत होऊन कार्यक्रम पुरा होत असे. ह्या ब्राह्मसभेत जाणारांची संख्या जशी हळुहळू वाढूं लागली, तसा विरोधिपक्षाचा प्रयत्नही अधिक संघटित होऊं लागला. कलकत्त्यांतील पुराणमताभिमानी पुढाऱ्यांनी सभा भरून, धर्मसभा या नांवाची एक विरोधी सस्था निर्माण केली. भवानीचरण बानर्जी नामक एक विद्वान् ब्राह्मण ह्या धर्मसंस्थेचा अध्यक्ष होता. आणि राजा राधाकात देव हा या सभेचा सेक्रेटरी झाला. त्यांची समाचारचंद्रिका ह्या दैनिकांतून ब्राह्मसभेवर टीका येऊ लागली. त्यास राममोहन यांजकडून संवादकौमुदीनामक पत्रांतून उलट जशास तसे जबाब मिळूं लागले. अशा रीतीने हा वादविवाद एक लहानमोठयांच्या तोंडचा रोजचाच विषय होऊन बसला. नदीचे घाटावर जा, बाजारांत जा, थोरामोठयांच्या घरीं जा, जिकडे तिकडे हाच विषय. त्यांतही ब्राह्मसभेचे स्थापनेचे वेळीं कित्येक ब्राह्मणांनीं दक्षणा घेतल्या होत्या. ते आढळून येतांच त्यांस ब्राह्मणसमाजाकडून जातिबहिष्कृत करण्यांत आले. तेव्हां त्यांचे चरितार्थ चालविण्याची जबाबदारी ब्राह्मसभेचे सभासदांनीं आपलेवर घेतली व बाबू द्वारकानाथ ठाकूर, कालीनाथ मुनशी व मधुरनाथ मलीक ह्या मुख्य तीन गृहस्थांनी ती जबाबदारी पार पाडली. अशा रीतीने उभयपक्षामध्ये वादविवादाचे रण माजले असतां तारीख २३ जानेवारी सन १८३० रोजीं माघी एकादशीचे दिवशीं राजा राममोहन ह्यांनी आपलें नवीन ब्राह्मसमाज-मंदिर उघडले व ते तारीख ८ जानेवारी सन १८३० च्या ट्रस्टडीडने ट्रस्टीच्या ताब्यांत दिले. त्या नंतर ब्राह्मसमाजाचा वार्षिक उत्सव तारीख २३ जानेवारी रोजीं पाळला जाऊं लागला.

ब्राह्मसभेच्या ट्रस्ट-डीडमध्यें असे जाहीर करण्यांत आले कीं, ब्राह्मसभेच्या उपासनामंदिरात, या विश्वाचा जनिता व रक्षणकर्ता अशा एका शाश्वत, निर्विकार व अतर्क्य अशा परमात्म्याचीच उपासना केली जाईल. कोणत्याही समाजांत एकाद्या विवक्षित नांवाने प्रचलित असलेल्या देवाची येथे उपासना होणार नाहीं. तसेच, येथे कोणतीही मूर्ति, चित्र अगर पुतळा अगर असेच कोणतेही प्रतीक ठेवण्यांत येणार नाहीं. पूजेचे निमित्ताने अगर खाण्यासाठीं येथे कोणत्याही जीवाची हत्त्या होणार नाही. किंवा इतर खाद्यपेयादि व्यवहार होणार नाहींत. तसेच कोणाही पंथाच्या अगर व्यक्तीच्या उपासना-मूर्तीसंबधीं अगर पद्धतीसंबंधी येथे निंदाव्यंजक असे भाषण केले जाणार नाहीं. तर, जेणेकरून नीति, भूतदया, पावित्र्य, परोपकार इत्यादि सद्गुणाचा विकास होईल व सर्व धर्मांचे व पंथाचे लोकांत सलोखा वाढेल, असाच उपदेश व संवाद केला जाईल.

एकेश्वरीपंथाचे प्रार्थनामंदिर स्थापन करणे, हेच राममोहन यांचे अंतिम ध्येय होते. देशाची खरी उन्नति होण्याला सर्वांत धर्मालाच प्राधान्य दिले पाहिजे असे त्यांचे मत असे, त्यासाठीच त्यांची सर्व आयुष्यभर धडपड सुरू होती, त्यापायीं त्यांनी पुष्कळ विरोध व छळ सहन केला. वडिलार्जित इष्टेटी-तील वारसा गमावून त्याकरितां प्रत्यक्ष भावाबरोबर व आईबरोबरही त्यांस कोर्टांत दावे भांडावे लागले. त्यांचे या धर्मविरोधास्तव त्यांस कित्येकदां त्यांच्या आईबापानीं घरांतून घालवून दिले; इतकेच काय पण त्यांच्या दोघी बायका व मुले यांनींही त्यांचेजवळ राहण्याचें नाकारले. अगदी बाळपणी राधा-गोविंदाची मोठ्या मनोभावाने पूजा करणाऱ्या राममोहन यांस पुढे प्रौढवयात मूर्तिपूजेचा अत्यंत तिटकारा आला होता, असे दिसते. एखाद्या देवाचे मूर्तीची मिरवणूक रस्त्यावरून जात असतांना लोकांचे धर्मवेडेपणाची कींव येऊन, त्यांचे डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागत. एकदां नोकरीवर असतांना आपले गावाशेजारी ते आले असतां, आईच्या भेटीसाठीं उत्सुक होऊन ते तिचेकडे गेले. धर्मविरोधास्तव त्या मायलेकांची ताटातूट होऊन, पुष्कळच काळ लोटला होता. तरीपण त्या निग्रही बाईने पुत्रप्रेमाचे मोहास बळी न पडतां आपल्या मुलाचें मुखावलोकनही करण्याचे साफ नाकारले. राम-मोहनही हट्टास पेटले, परंतु त्यांची आई ऐकेना. शेवटीं 'आपल्या राधा-

गोविंदाचे पायां पडशील, तरच मी तुझी भेट घेईन.' असा आईचा निर्वाणीचा निरोप ऐकून ते मातृवत्सल राममोहन गहिवरून म्हणाले, "हा पहा मी माझ्या आईच्या देवाला नमस्कार घालतो" असे म्हणून जेव्हां कुल-देवतेला त्यांनीं साष्टांग नमस्कार घातला, तेव्हांच त्यांना आपल्या आईची भेट घेतां आली!

राममोहन यांनीं आपल्या रघुनाथपूर येथील घराच्यासमोर एक मंच ( ओटा ) बांधला होता. व त्या वेदीचे चारी बाजूस ॐ तत्सत्, एकमेवा-द्वितीयम् इत्यादि महावाक्ये लिहिलीं होती. तेथे ते उपासना करीत असत. तसेंच प्रवासाला जातांना व प्रवासाहून आल्यावर ते त्या वेदीस प्रदक्षणा घालून नमस्कार करीत असत. असे करीत असतां एक दिवस त्यांची पत्नी उमादेवी, हिने त्यांस प्रश्न विचारिला की, 'आपल्या मते उत्कृष्ट धर्म कोणता?' त्यावर राममोहन यांनीं उत्तर केले कीं, " गाई निरनिराळ्या रंगाच्या असल्या तरी त्यांचे दूध एकच रंगी असते, त्याचप्रमाणे धर्माचे बाबतीत निरनिराळ्या ऋषींनीं प्रणीत निरनिराळे धर्ममार्ग असले तरी सत्यधर्माचे परिपालन, हेंच सर्वांतील सार आहे."

राजा राममोहन यांच्या मताने ईश्वराच्या भक्तीचा खरा मार्ग म्हणजे मनुष्य-मात्राचे उपयोगीं पडणे हा होय. " परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् " हा महा सिद्धान्त पूर्वींच भारतकार सांगून गेले, हे खरे. तथापि तेवढ्यानें हिंदुधर्मीयांचा प्रवृत्तीपेक्षां निवृत्तीकडील ओढा कमी झाला नाहीं. आतां एकोणीस अगर विसावे शतकातील हिंदुधर्माचा लोकसंग्रह, हा एक विशेष बनला आहे. हिंदुधर्माचे कर्मकांडातील शास्त्रीय विधीचे व व्रतवैकल्यांचें महत्त्व कमी करून, त्या ठिकाणीं धार्मिक, सामाजिक, अगर राजकीय क्षेत्रांत लोकसेवेच्या एकाच व्रताचा पुरस्कार आधुनिक कालांत राजा राममोहन यांनीच प्रथम केला, असे वाटते, आणि ब्राह्मसमाज हे त्याचेच एक दृश्य फल होय.

---

# प्रकरण दहावें

# सार्वत्रिक धर्म

राजा राममोहन ह्यांच्या धर्मनिष्ठेचे सर व्यंकटरत्न ह्यांनीं आपल्या भाषणांत जे चित्र रेखाटलें आहे ते फारच बहारीचे आहे यांत शंका नाहीं. परंतु पुष्कळ वेळा वक्तृत्वाचा ओघ सत्याला झांकून टाकतो व काढलेले चित्र मूळापेक्षांही मोहक दिसते. ते कांही असो, ते म्हणतात की, " राजा राममोहन ह्यांची निष्ठा जाज्वल्य होती. ती सगविवर्जित होऊन एखाद्या मठांत कोंडलेली नव्हती, फावल्या वेळेत चटकन् उरकलेल्या पूजेप्रमाणे ती दगदगलेली व चिंताग्रस्त नव्हती, अतराळीं भटकणाऱ्या ह्या सूर्यमालेवर नजर ठेवणारा कोणी बाहेरचा देव तिने आणला नव्हता, किंवा अत्यंत नियमबद्ध अशा सृष्टीचा कोणी नियामक असला पाहिजे असा तार्किक देवही तिने मानला नव्हता; तर त्यांच्या धर्मनिष्ठेने त्या अंतर्यामीचे ऐश्वर्य प्रत्यक्ष पाहिले होते, त्या चिदात्म्याशी त्यांचा साक्षात् सबंध होता, त्या जगत्सूत्रधारावर त्याची पूर्ण श्रद्धा होती, अखिल विश्वावरील हुकमतीत हेतुभूत असणाऱ्या तत्त्वावर त्यांची मनोभावाने भक्ति होती, सर्वनियामक अशा ईशेच्छेस ते आनदाने शरण होते, जगदुद्धारक अशा परमेशाच्या दयामयत्वाची त्यांस साक्ष होती, परमात्म्याच्या दिव्य सौंदर्याचा अत्यानंद त्यानीं अनुभविला होता. अशा ह्या त्यांच्या धर्मनिष्ठेस अखिल विश्व हेच परमेशमदिर, हृदय हेच पवित्र संपुट, सदसद्विवेकबुद्धि हीच देववाणी, कर्तव्यबुद्धि हेच ईश्वरी शासन, सत्य हेच अविनाशी शास्त्र, प्रेम हाच निरपवाद नियम, जीवन हीच प्रगमनशील यात्रा आणि मानवजात हीच विश्वशोभा होय. तात्पर्य ईश्वराच्या प्रेमाप्रमाणे उदात्त, व मनुष्याचे गरजांप्रमाणे विस्तृत अशी राममोहन यांची धर्मनिष्ठा फार जिव्हाळ्याची व मोठी समृद्ध होती."

सार्वत्रिक धर्म, हें राजा राममोहन यांचें परमध्येय होतें. तथापि, देशभेदानें ग्रंथप्रामाण्यभेद आणि आचारभेद, हा राहणे अपरिहार्य आहे, ही गोष्ट त्यांस अमान्य नव्हती. हिंदूंस प्रमाणभूत अशा ग्रंथांच्या आधारे, त्यांनीं

आपले सार्वत्रिक धर्माचीं कांहीं मूलतत्त्वें ठरविलीं आहेत, तीं राममोहन आणि जिज्ञासु यांचे संवादरूपानें पुढे दिली आहेत.

जिज्ञासु—ज्या निर्गुणनिराकाराची कल्पनाही करवत नाहीं, त्याचें मनुष्यमात्रानें भजनपूजन कसें करावें ?

राममोहन—पूजा म्हणजे गंधाक्षता, पत्रपुष्प, धूपदीप इत्यादि षोडश-प्रकारेंच करावयाची, तर निराकाराची करतां येणें अशक्य आहे, ही गोष्ट उघड आहे.

जिज्ञासु—मग तुम्ही तरी पूजेचा अर्थ काय समजतां ?

राममोहन—पूजा म्हणजे सामान्यतः दुसऱ्याला प्रसन्न करण्याचें एक साधन, हे खरें; पण परब्रह्माची पूजा म्हणजे त्याचे कल्याणगुणाचें चिंतन होय.*

जिज्ञासु—पण त्याचें म्हणजे कुणाचें ? तुम्हीतर ईश्वर सगुण साकार मानीत नाहीं.

राममोहन—ही अखिल सृष्टि ज्यानें निर्माण केली, ह्या सृष्टीचें अवाढव्य यंत्र, ज्याचे हुकमतीनें चाललें आहे त्याचीच उपासना करावी.×

---

* आत्मेत्येवोपासीत (बृहदारण्यक श्रुतिः) न स वेदेतिविज्ञानं प्रस्तुत्य आत्मेत्येवोपासीतेत्यभिधानाद् वेदोपासनशब्दयोरेकार्थताऽवगम्यते ( भाष्यम्) आत्मानमेव लोकमुपासीत ( बृहदारण्यक श्रुतिः)

सारांशः—आत्मा म्हणूनच त्याची उपासना करावी. तो ( अज्ञानी ) जाणत नाहीं इत्यादि श्रुतीनें विज्ञानाची प्रस्तावना करून आत्मा म्हणूनच त्याची उपासना करावी असें सांगितलें. ह्यावरून वेदन आणि उपासन हे दोन्ही शब्द एकार्थक आहेत, असा बोध होतो. आत्म्याचीच लोक ( तेज ) रूपानें उपासना करावी.

× जन्माद्यस्य यतः ( वेदान्तदर्शन द्वितीयसूत्रम्) यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत् प्रयन्त्यभिसंविशन्ति तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्मेति. ( तैत्तिरीय श्रुतिः )

यः सर्वज्ञः सर्ववित् यस्य ज्ञानमयं तपः। तस्मादेतद् ब्रह्मनामरूपमन्नञ्च जायते। ( मुण्डकश्रुतिः ) यत्तत् कारणमव्यक्तं नित्यं सदसदात्मकम्। तद्विसृष्टःस पुरुषो लोके ब्रह्मेति कीर्त्यते॥ ( मनुवचनम् ) यतो विश्व समुद्भूतं येन जातञ्च

जिज्ञासु—असा तो कोण आणि कसा आहे ?

राममोहन—तो अतर्क्य आहे, त्याचे वर्णन करतांना वेदही मौनावले.*

---

तिष्ठति। यस्मिन् सर्वाणि लीयन्ते तज्ज्ञेयं ब्रह्मलक्षणम् ॥ कालं कलयते काले मृत्योर्मृत्युर्भियो भयम्। वेदान्तवेद्यं चिद्रूपं यत्तच्छब्दोपलक्षितम् ॥ (महानिर्वाणतन्त्रवचनम्) अस्य जगतो नामरूपाभ्यां व्याकृतस्यानेककर्तृभोक्तृसंयुक्तस्य प्रतिनियतदेशकालनिमित्त क्रियाफलाश्रयस्य मनसाप्यचिन्त्य रचानारूपस्य जन्मस्थितिभङ्गं यतः सर्वज्ञात् सर्वशक्तेः कारणाद्भवति तद्ब्रह्मेति वाक्यशेषः। (पूर्वोक्त वेदान्तसूत्रभाष्यम्)

सारांश:—जगाची उत्पति, स्थिति व विनाश ज्यापासून होतात ते ब्रह्म होय. ज्यापासून ही सर्वही भूतें निश्चयेंकरून उत्पन्न होतात, ज्याचे योगें उत्पन्न झालेली रक्षिली जातात व ज्यात ती जाऊन एकरूप होतात ते तूं जाण. ते परब्रह्म होय. जो सर्वज्ञ व विशेषरूपाने सर्व जाणणारा, ज्याचा विचार ज्ञानमय आहे, त्यापासून हे ब्रह्म, नाम, रूप व अन्न हीं उत्पन्न होतात. जे ते अव्यक्त नित्य व स्थूलसूक्ष्मरूप कारण त्यापासून उत्पन्न झालेला जो पुरुष तो लोकांत ब्रह्मा म्हणून सांगितला जातो.

ज्यापासून जग उत्पन्न झाले, ज्या योगे उत्पन्न झालेलें स्थित झाले, ज्याच्या ठिकाणी सर्व लीन होतात, ते ब्रह्मलक्षण जाणावे. जो कालाचाही काल, मृत्यूचा मृत्यु, व भयाचे भय, असा वेदान्ताने ज्ञात होणारा ज्ञानस्वरूप यत् तत् शब्दांनी जाणावा.

जे नाम आणि रूप ह्यांनीं प्रगट झालेले आहे, अनेक कर्ते व भोक्ते ह्यांनीं जे युक्त आहे, देश, काल व निमित्त ही ज्या कर्मफलांची ठरींव आहेत, त्यांना जें आश्रयभूत आहे, आणि ज्याच्या रचनेच्या रूपाविषयीं मनानेही कल्पना होणें शक्य नाहीं, अशा जगताची उत्पत्ति, स्थिति व नाश ही ज्या सर्वज्ञ व सर्वशक्तिसंपन्न कारणापासून होतात ते ब्रह्म.

* यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह। (तैत्तिरीय श्रुतिः) यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम्। तदेव ब्रह्म त्व विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ (केनश्रुतिः)

सारांश:—ज्यापासून वाणी व मन आकलन न झाल्यामुळें परत फिरतात

जिज्ञासु—त्याची व्याख्या करण्यास दुसरें कांहींच साधन नाहीं काय ?

राममोहन—तो मन आणि वाणीस अगोचर आहे, असें शास्त्रें वारंवार सांगत आहेत. जे विश्व आपणांस प्रत्यक्ष आहे, त्याचाही आपणांस ठाव लागत नाहीं. मग त्याचे जनकाची व नियामकाची आपणांस कल्पना कशी करतां येईल ? *

जिज्ञासु—पण अशा त्या अचिंत्य जगन्नायकाची पूजा करावी, हे तरी सर्वसंमत आहे काय ? किंवा यासही कोणी विरोध करणारे आहेत ?

राममोहन—नाहीं आमच्या या म्हणण्यास कोणीच विरोध करण्याचे कारण नाहीं. कारण लोक कोणत्याही पंथाचे अगर धर्माचे असोत, ते ज्यास देव म्हणून मानतात, त्यासच ते सृष्टिकर्ता व सृष्टिभर्ता मानतात. बरे, जे कोणी देवासच मानीत नाहींत, ते तरी सर्वकर्तेपणा सृष्टि अगर काल अशा कोणास तरी देतातच. तात्पर्य, तुम्ही चीन, तार्तरी अगर युरोपमध्ये जा, सर्वांचे मते सृष्टिजनक व चालक अशी एक सत्ता आहेच. तिचीच आम्ही उपासना केल्यास आमचा कोणीच विरोध करणार नाहीं.×

---

( ते ब्रह्म ). जे मनाने चिंतिले जात नाहीं तर ज्याने मन विचार करण्यास समर्थ बनते तेच ब्रह्म असे तूं जाण. जे हे उपासिले जाते ते ब्रह्म नव्हे.

* अथात आदेशो नेति नेति ( बृहदारण्यक श्रुतिः ) न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो न विद्मो न विजानीमो यथैतदनु–शिष्यात् अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि । ( केनश्रुतिः ) इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः । मनसस्तु पराबुद्धिर्योबुद्धेः परतस्तुसः ( गीतास्मृतिः )

साराशः—म्हणून हे नव्हे हे नव्हे असा उपदेश आहे. त्या ठिकाणीं दृष्टि पोचत नाहीं, ज्याचे वाणी विवेचन करू शकत नाहीं, मनही ज्यास जाणूं शकत नाही, ज्यायोगाने हे जाणतां येईल असा उपाय आम्ही जाणत नाहीं व जाणूंही शकणार नाहीं, असे ते जाणणे व न जाणणे याहून निराळे आहे. इंद्रियें हीं श्रेष्ठ ( विषयापेक्षां ) होत, इंद्रियांहून मन, मनाहूनही बुद्धि श्रेष्ठ आहे. व तो बुद्धीहूनही श्रेष्ठ आहे.

× आत्मा ह्येषां स भवति । एवं वित् सर्वेषां भूतानामात्मा भवति । ( बृहदारण्यक श्रुतिः ) नामरूपादि निर्देशैर्विभिन्नानामुपासकाः । परस्परं

जिज्ञासुः—अशी जी तुम्ही ब्रह्मसत्ता सांगतां तिचें स्वरूप अगम्य व अतर्क्य आहे म्हणून शास्त्रांत म्हटले आहे, ते अज्ञेय आहे असे तर शास्त्र म्हणत नाहीं. ह्य विरोधाचा परिहार कसा करावा ?

राममोहनः—त्यास जेथे अतर्क्य म्हटले आहे तेथे त्याचा अर्थ, कठीण जाणण्यास इंद्रियातीत असा आहे. ते कसे आहे हे सागतां येणार नाही इतकाच आहे. पण जेथे परब्रह्मास ज्ञेय म्हटले आहे तेथ त्याचे केवळ अस्तित्वाचे भानच अभिप्रेत आहे. उदाहरणार्थ आपले आत्म्याचे स्वरूप जरी आपल्याला सांगता न आले तरी, अंतरात्म्याचे आस्तिक्यभान आपल्याला निश्चित असतेच ×

जिज्ञासुः—दुसऱ्या कोणाचे उपासनापद्धतीशी तुमचा विरोध आहे काय ?

राममोहनः—विरोध असण्याचे कारण काय? कोणी कशाची कां उपासना

---

विरुंध्यन्ति न तैरेतद्विरुद्यते ॥ ( गौडपादाचार्यकारिका ) विस्तारितमिदं प्रथमव्याख्याने )

साराशः—ह्यांचा तो आत्मा होय, असे जाणणारा सर्व भूतांचा आत्मा होतो. नाम व रूप ह्याच्या या निराळेपणामुळे पृथक् उपासक बनलेले परस्परात विरोध करतात; परंतु त्या भिन्नपणामुळे हे परब्रह्म निरनिराळे बनत नाहीं.

× नैव वाचा न मनसा प्राप्तुं शक्यो न चक्षुषा । अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र कथं तदुपलभ्यते । अस्तीत्येवोपलब्धव्यस्तत्त्वभावेन चोभयोः । अस्तित्वेनोपलब्धस्य तत्त्वभावः प्रसीदति ॥ (कठश्रुति.)

नामरूपादि-निर्देश-विशेषण-विवर्जितः। अपक्षय विनाशाभ्या परिणामार्त्ति-जन्मभिः । वर्जितः शक्यते वक्तुं यः सदास्तीति केवलम् ॥ ( विष्णुपुराणम् ) द्वादश व्याख्याने विस्तरेणाभिहितम् ।

साराशः—वाणी, मन व डोळे ह्यांनीं तो जाणणें शक्य नाहीं. त्याचें अस्तित्व मान्य करणाराला तो त्याच्याहून अन्यत्र ठिकाणी कसा बरे मिळावा ? अस्तित्व व खरेपणा, ह्यानी तो युक्त आहेच असे समजावे. अस्तित्व कळल्यानंतर तत्त्वभाव स्पष्ट होईल. नामरूपादि निर्देश करणाऱ्या विशेषणांनीं रहित, क्षय, नाश, वाढ, दुःख, जन्म ह्यांनीं रहित व जो केवळ 'आहे' ह्या पदानेच जाणला जातो तो परमात्मा.

करीना, जोंपर्यंत तो आपले पूजनीय वस्तूचे अगर व्यक्तीचे द्वारें त्या एका जगच्चालकाचीच उपासना करीत आहे, तोपर्यंत आम्हीं त्याशीं विरोध कां करावा ?*

जिज्ञासुः—पण तुमच्या व त्यांच्या ईश्वराराधनेचा विधि अगदीं भिन्न असेल तर तुमच्या आणि त्यांच्या निष्ठेत असा भिन्नतादर्शक फरक तो कोणता ?

राममोहनः—तसा फरक म्हणाल तर दोन तऱ्हांनी दिसेल. उदाहरणार्थ, मूर्तिपूजक मूर्तीसच जगच्चालक मानतात, आम्ही तसे मानीत नाही. शिवाय त्यांचेप्रमाणे आमचे उपासनेस विशिष्ट स्थल अगर विधि याचे बंधन नाहीं; दुसरे असे की, ज्याचीं आराध्यदैवते वेगळीं असतात ते तन्निमित्त एकमेकांशीं भांडतात. पण आमच्याशीं तसा विरोध करण्याचे कोणासच कारण नाहीं.×

जिज्ञासुः—मग तुमच्या मते उपासनेचीं अंगे कोणतीं ?

राममोहन—ईश्वर हा जगच्चालक आहे, ही भावना जागृत ठेवावी.

---

* तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति। (कठश्रुतिः) ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात् (वेदान्तसूत्रम्) ब्रह्मदृष्टिरादित्यादिषु स्यात् कस्मात् उत्कर्षात् एवमुत्कर्षेणादित्यादयो दृष्टा भवन्ति उत्कृष्टदृष्टिस्तेष्वध्यासात् (तत्सूत्रभाष्यम्) येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः। तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् (गितास्मृतिः) अ. ९ श्लोक २३

सारांश—सर्व उपासना जे सांगतात (ते ब्रह्म मी तुला सांगेन) प्रतीकाच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि करावी, कारण ते श्रेष्ठ होय. ब्रह्मदृष्टि आदित्यादिकांच्या ठिकाणीं करावी. कारण अशा रीतीनें आदित्यादि अधिक उत्कर्षानें दिसूं लागतील. त्यांच्या ठिकाणीं हा उत्कर्ष अध्यासानेंच उत्पन्न करावा. जे अन्य देवतांचे भक्त श्रद्धेने त्यांची पूजा करितात तेहि, हे अर्जुना, अविधिपूर्वक माझेच पूजन करीत असतात.

× यत्र नान्यत् पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमा अथ यत्रान्यत्पश्यति अन्यच्छृणोति अन्यद्विजानाति तदल्पम् (छान्दोग्योपनिषत्) पञ्चमोत्तरोक्त प्रमाणमपि द्रष्टव्यम् ।

सारांशः—ज्या ठिकाणीं दुसरें पाहिले जात नाहीं, ऐकलें जात नाहीं अगर जाणले जात नाहीं, तो भूमा (महान्) होय. आणि ज्या ठिकाणीं दुसरें पाहिले जातें अगर ऐकले जाते अगर विचारात घेतले जाते, ते अल्प होय.

त्यासाठी शास्त्रश्रवण, स्तोत्रादि पाठ यांचें साह्य घ्यावें, विवेकानें मनोनिग्रह करावा, परोपकारानें वागावें, उदक, अग्नि, वायु, सूर्य, त्याचप्रमाणे भौम-पदार्थांचे धान्यादि प्रकार हे सर्व ईश्वराचे स्वाधीन आहेत, त्याचे सत्तेत आहेत, ही भावना अखंड ठेवावी, आणि सत्यधर्मानें वागावें *

---

* अथ परमेश्वरचिन्तनप्रकारः- ऊर्ध्वमूलोऽवाक्‌शाख एषोऽश्वत्थः सनातनः। तदेव शुक्रं तद्ब्रह्म तदेवामृतमुच्यते (कठोपनिषत्) तस्मादृचः साम यजूंषि दीक्षायज्ञाश्च सर्वे क्रतवो दक्षिणाश्च। संवत्सरश्च यजमानश्च लोकाः सोमो यत्र पवते यत्र सूर्यः। तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः साध्या मनुष्याः पशवो वयांसि। प्राणापानौ व्रीहियवौ तपश्च श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च। अतः समुद्रा गिरयश्च सर्वे तस्मात् स्यन्दन्ते सिन्धवः सर्वरूपाः। अतश्च सर्वा ओषधयो रसश्च येनैष भूतैस्तिष्ठते ह्यन्तरात्मा॥ (इति मुण्डकोपनिषत्) ज्ञानेनैवापरे विप्रा यजन्ते तैर्मखैः सदा। ज्ञानमूला क्रियामेषां पश्यन्तो ज्ञान-चक्षुषा॥ (चतुर्थाध्याये मनुवचनम्) भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः। भयादिन्द्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पञ्चमः॥ (इति मुण्डकोपनिषत्) एत-दुपासनाया अन्तरंगसाधनप्रकारः। यथोक्तान्यपि कर्म्माणि परिहाय द्विजोत्तमः। आत्मज्ञाने शमे च स्याद्वेदाभ्यासे च यत्नवान्॥ (द्वादशाध्याये मनुवचनम्) यथैवात्मा-परस्तद्वद् द्रष्टव्यः शुभमिच्छता। सुखदुःखानि तुल्यानि यथात्मनि तथापरे॥ इति स्मार्त्तधृत-दक्षवचनम् सर्वव्यवहारनिदानम्। सत्यमायतनम् (केनश्रुतिः)

साराश—परमेश्वराच्या चिंतनाचा प्रकार येणेप्रमाणे—ज्याचें मूळ वर असून फांद्या खाली आहेत असा हा (संसार) सनातन अश्वत्थ वृक्ष आहे. व त्यालाच शुक्र, ब्रह्म व अमृत असे म्हणतात.

त्यापासून ऋग्वेद, साम, यजु, दीक्षा, यज्ञ, सर्वक्रतु, दक्षिणा, संवत्सर, यजमान, व ज्या ठिकाणीं चंद्रसूर्य प्रकाशतात असे लोक, उत्पन्न होतात. त्यापासून पुष्कळ देव उत्पन्न झाले, साध्य गण, मनुष्य, पशु व पक्षी निर्माण झाले, प्राण, अपान, धान्यें, तप, श्रद्धा, सत्य, ब्रह्मचर्य, विधि, निर्माण झाले, त्यापासून समुद्र व सर्व पर्वत व वाहणाऱ्या सर्व प्रकारच्या नद्या उत्पन्न झाल्या, त्यापासून सर्व ओषधि आणि रस निर्माण झाले. ज्यामुळें हा अंतरात्मा, भूतांसह राहतो, तें ब्रह्म होय.

जिज्ञासुः—या उपासनापद्धतीप्रमाणे खाणे, पिणे व सदाचार यांसंबंधीं कांहीं निर्बंध आहेत काय ?

राममोहनः—आपला आहार आणि विहार शास्त्रानुसारच असावा.*

---

कांही ब्राह्मण नेहमी पूर्वोक्त यज्ञानी ज्ञानमूलकच यजन करितात. कारण ते क्रियाज्ञानमूलक आहे हे ज्ञानदृष्टीने ते जाणत असतात.

ह्याच्याच भयाने अग्नि तापतो आहे, सूर्य प्रकाशत आहे, इंद्र व वायु वर्तत आहेत व पाचवा मृत्यु धावत आहे.

ह्या उपासनाच्या अतरंग साधनाचा प्रकार असाः—ब्राह्मणश्रेष्ठाने यथोक्तही कर्मांचा त्याग करून आत्मज्ञान व शम साध्य करीत वेदाभ्यासाचा प्रयत्न करावा. आपले कल्याण व्हावे असे इच्छिणाराने जसा आपला आत्मा तसाच दुसऱ्याचा आहे असे जाणावे, सुखदुःखे आपल्याला जशी होतात तशीच तीं दुसऱ्यालाही होत असतात असे पहावे.

* शास्त्रमेव क्रियानियामक यथा चातुर्वर्ण्य त्रयो लोकाश्चत्वार आश्रमाः पृथक् भूत भव्य भविष्यञ्च सर्व वेदात् प्रसिध्यति ॥ ( ६० ) सेनापत्यंच राज्यञ्च दण्डनेतृत्वमेव च । सर्वलोकाधिपत्यञ्च वेदशास्त्र विदर्हति ॥ ( १०० ) मनुस्मृतौ द्वादशाध्याये ।

दशमोक्तरोक्त-स्वेच्छाचार-निन्दाश्रवणम् । क्रियाहीनस्य मूर्खस्य महारोगिण-एवच । यथेष्टाचरणस्याहुर्मरणान्तमशौचकम् ॥ उदरपवित्रतापेक्षया मनः शुद्धौ यत्न आवश्यकः । तथा हि तन्त्रे । मले परिणते शस्यं शस्ये परिणते मलम् । द्रव्यशुद्धिः कथ देवि मनःशुद्धि समाचरेत् ॥

साराशः शास्त्रे हीच क्रियानियामक आहेत. जसेः—चातुर्वर्ण्य, तिन्ही लोक, चारी आश्रम, तसेच मागे होऊन गेलेल्या, घडत असलेल्या, व पुढें होणाऱ्या सर्व गोष्टी वेदावरून कळतात.

वेदशास्त्रवेत्ता हा सेनापत्य, राज्य, न्यायाधीशपणा व सर्व लोकांवरील स्वामित्व यांना योग्य आहे.

क्रियाहीन, मूर्ख व महारोगी यांच्याकडून होणाऱ्या यथेष्टाचरणामुळें त्यांना मरेपर्यंत अशौच आहे.

अन्नाचा परिणाम मल व मलाचा परिणाम अन्न असे असल्यामुळें, देवि, द्रव्यशुद्धि कशी संभवेल ? म्हणून मनःशुद्धि आचरणांत आणावी.

स्वैराचार निंद्य आहे. त्याने समाजांत बखेडे उत्पन्न होतात. मात्र इतके खरें कीं, सत्यधर्माचा विचार न करितां खाद्यपेयाची अधिक चिकित्सा करीत बसणें योग्य नाही. कसलेही अन्न खाल्ले, तरी त्याचे रूपांतर लवकरच मलांत होतें; आणि तो मल पुन्हा जीवनाधार, जे धान्यादि पीक, त्यास पोषक होतो. तेव्हां कोठ्याचे शुद्धीपेक्षां मनाचे शुद्धीकडे अधिक लक्ष ठेवावे ते बरें *

जिज्ञासुः—तुमच्या त्या उपासनापद्धतींत कांही स्थलकालादि निर्बंध आहेत काय ?

राममोहनः—उपासनेची जागा योग्य असेल तितकी बरी परंतु ती तशी असणें अवश्यच आहे असे नाही. कोणत्याही स्थलीं व कोणत्याही काळीं जेव्हां मन प्रसन्न असेल तेव्हा उपासना करावी.×

---

* हिंदुस्तानांतील जनतेनें बलसंवर्धनाकरितां भक्ष्याभक्ष्य निर्बंध सोडावा, असें राममोहन यांचे मत होतें. माफक मद्यपान करणें हे शास्त्रविहित आहे, असें ते मानीत आणि तदनुसार त्यांचे वर्तन असे. तसेंच घरीं बड्या लोकांचे पाहुणचार होत, तेव्हां प्रत्येक दालनांतून नायकिणींचे नाच सुरू असत. आहारविहारांचे दृष्टीनें राममोहन हे एक राजविलासी होते. तथापि राजा भर्तृहरीच्या तीन शतकांप्रमाणें एका वाड्यात राजविलास तर दुसऱ्या मठांत वैराग्यदीक्षा, अशा त्यांचे आचारभिन्नतेप्रमाणें त्यांची निवासस्थानें वेगळी होती. बंगाल्यांत शाक्तधर्माचें प्राबल्य असल्यामुळे वरील सर्व प्रकार तिकडे ब्राह्मणसमाजांतही थोड्याफार फरकानें रूढ होते, असें राममोहन यांच्या पथ्यप्रदान नामक लेखांवरून दिसतें.

× शुचि देशादेः प्राशस्त्ये। कुटुम्बे शुचौ देशे स्वाध्यायमधीयानो धार्म्मिकान् विदधदित्यादि ( छान्दोग्यश्रुतिः )

शुचि देशादीनामत्यन्त नियमस्याभावः। यथा। यत्रैकाग्रता तत्रा विशेषात् ( वेदान्तदर्शनसूत्रम् ) ४।१।११। यत्रैवास्य दिने काले वा मनसः सौकर्येणैकाग्रता भवति तत्रैवोपासीत प्राचीदिक् पूर्वाह्ण प्राचीप्रवणादिवत् विशेषाश्रवणात् ( भाष्यम्.)

सारांशः कुटुंबांत असणारानें शुद्धदेशीं स्वाध्यायाध्ययन करून ज्या ठिकाणीं एकाग्रता होईल तेंच स्थळ योग्य. उपासकाची ज्या स्थळीं व काळीं मनाची

जिज्ञासुः—तुम्ही जी उपासनापद्धति सांगतां, ही कोणास शिकवावी ?

राममोहनः—ही सरसहा सर्वांसच सांगावी. अर्थात् प्रत्येकाची मानसिक तयारी असेल, त्याप्रमाणे ती कमीअधिक फलदायी होईल.*

राममोहन याचे वरील विचार केवळ सूचकस्वरूपाचे दिसतात; सामान्यजनांचे दृष्टीने शक्याशक्यतेचा त्यांत पूर्ण विचार केलेला दिसत नाही. तसेच आध्यात्मिक इष्टप्राप्तीचें एक साधन या दृष्टीने वरील सार्वत्रिक धर्म व साप्रदायिक धर्म याचे उपयुक्ततेतील तारतम्याचा बारकाईने विचार झालेला नाहीं. उत्तरप्रमाणे म्हणून ज्या वाक्यांचा राममोहन यानीं सग्रह केला आहे, तीं सर्व हिंदूचे धर्मग्रथातील आहेत. त्यावरून हिंदुधर्माचे स्वरूप किती व्यापक व सर्वसग्राहक आहे, हच दाखविण्याचा राममोहनाचा कदाचित् हेतु असेल.

---

सुलभतेन एकाग्रता होते, ते स्थळ व काळ उपासनेस योग्य आहेत. विशेष नियम श्रुतीने सांगितले नाहीत. जसे प्राची प्रवण कर्माचे ठिकाणी पूर्व दिशा व पूर्वाह्ण यांचा नियम सांगितला आहे.

* प्रजापतेः सकाशादिन्द्रविरोचनाभ्यां प्राप्तेऽपि तुल्योपदेशे असुरस्वभावाद्विरोचनस्तदुपदेशफलं न लेभे। तथाहि स हि शांतहृदय एव विरोचनोऽसुरान् जगाम तेभ्यो हैतामुपनिषद प्रोवाच आत्मैवेहमहय्य आत्मा परिचर्य्य आत्मानमेवेहमहायन् आत्मानं परिचरन् उभौ लोकाववाप्नोति इमञ्चामुञ्चेति। (छान्दोग्योपनिषत्) इन्द्रस्तु क्रमसाधनेन कृतार्थोऽभवत् यथा। अश्व इव रोमाणि विधूयपापचंद्र इव राहोर्मुखात् प्रमुच्य धूत्वा शरीर सकृतं कृतात्मा इत्यादि ( छान्दोग्योपनिषत् ) अनुष्ठानं सपूर्णम्

सारांशः—प्रजापतीपासून इद्र व विरोचन ह्यांना समान उपदेश मिळाला असतांही असुरस्वभावामुळे विरोचनास उपदेशाचें फल प्राप्त झाले नाहीं; हें सांगणारी श्रुतिः—तो शांत हृदय असा विरोचन असुरांकडे जाता झाला. व त्यांना अशी श्रुति सागता झालाः—ह्या लोकी देहच पूजनीय आहे व देहच सेव्य आहे. कारण शरीररूपी आत्म्याची पूजा व परिचय करणारा दोन्ही लोकांस प्राप्त होतो.

इंद्र हा क्रमसाधनानें कृतार्थ झाला. घोड्यांच्या रोमपाताप्रमाणें पापें दूर करून राहुमुखातून चंद्राप्रमाणे सुटून, शरीर पवित्र करून, तो कृतकृत्य झाला.

ह्यासंबंधीं लिओनार्डसाहेबांचे म्हणण्यांतील आशय असा दिसतो कीं, राजा राममोहन ह्यांनीं केलेल्या ट्रस्टडीडवरून पाहतां त्यांत ईश्वरविषयक केवळ आस्तिक्यभाव मात्र दिसतो. त्यांत कोणत्याही धर्माची विशिष्ट अशी छटा नाहीं. पाश्चात्य कवि थॉमस मूर ह्यास त्यांनीं आपल्या ब्राह्मसभेचें जें वर्णन सांगितलेलें सदर कवीच्या रोजनिशींत आढळतें, त्यावरूनही ब्राह्मसभेंत सर्व धर्मांचे लोकांचा संग्रह असून ईशप्रार्थनेचे वेळीं पृथक् पृथक् धर्मांतील खिस्त, महमद अशा विभूतींचीं नांवें न घेतां जिहोवा, ब्रह्म अशीं एकच परमपुरुषवाचक नांवें ते घेत असत असें दिसतें. असें होतें तरी धर्मप्रसाराचे कामीं ते हिंदूंस वेदान्तदर्शन, मुसलमानांस कुराण व खिस्ती लोकांस बायबल ह्यांतीलच आधार देत, आणि असें करीत असतां 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः' ही व्यासोक्ति आपणास मान्य असल्याचें ते दर्शवीत असत. तें कांहीं असलें तरी सार्वत्रिकधर्माचें स्वरूप ठरवितांना राजा राममोहन यांचे दृष्टीपुढें हिंदुधर्माचेंच परम उदात्त स्वरूप ध्येयरूपानें होतें यांत शंका नाहीं.

---

## प्रकरण अकरावें

# अवांतर कार्यक्षेत्र

वरील अवतरणाप्रमाणे न्या० रानडे यांचेही राममोहन यांच्याबद्दलचे उद्गार मननीय आहेत. ते म्हणतात की 'सन १८१४ पासून तो १८३३ पर्यंतचा काल राममोहन ह्यांनीं सतत उद्योगात घालविला. ह्या एवढ्या काळांत त्यांनीं जे काम केले त्याच्याशीं तुमच्या आमच्या सारख्या शेकडों लोकाच्या कामाची तुलना केली तर त्यांनी केलेले काम फारच अधिक आहे असे म्हणावे लागते. ते एकाच काळीं सामाजिक सुधारक होते व एका थोर धर्मसंस्थेचे संस्थापक होते व तसेच ते महान् राजकारणी पुरुषही होते. हे तिन्ही प्रकारचे उद्योग त्यांच्या ठिकाणी अशा रीतीनें एकवटून चालत असत की, सध्या आपल्यात जे श्रेष्ठ पुरुष आहेत त्यांना आपल्या कर्तृत्वाकडे पाहून लाजच वाटली पाहिजे.' सर व्यंकट रत्न तर असे म्हणतात की, 'दूरदृष्टि, भ्रातृभाव अष्टपैलूपणा, विविध कार्यक्षमता, भिन्नहितसंबंध व ध्येयें याचे संगतीकरण व सर्वसंग्राहक बुद्धि इत्यादि गुणांनी अलंकृत अशी राममोहन ही व्यक्ति हिंदुस्थानच्या इतिहासात किंबहुना आर्यवंशात केवळ अद्वितीय होय.' यातील अतिशयोक्तीचा भाग सोडला तरी हे खरे की, लोकसेवेच्या दृष्टीने राजा राममोहन याचे कार्यक्षेत्र फारच मोठे होते. त्यांनीं बहुतेक साऱ्या हिंदुस्थानांत प्रवास करून लोकस्थितीचें सूक्ष्मावलोकन केले होते. शारीरिक व सांपत्तिक या उभयदृष्टींनी जनतेची खालावलेली स्थिति, तसेच जुन्यानव्या राज्यपद्धतींतील न्याय व जमीन-महसूल याची तुलना आणि लेखनस्वातंत्र्य इत्यादि फार महत्त्वाच्या मुद्द्यांसंबंधी त्यांनीं सरकारास वेळोवेळी सल्ला दिली होती, 'पण आम्हांला तुम्ही कोण सांगणार ! तुम्ही सांगतां म्हणून ऐकावे, तर त्यांत आमचे अनियंत्रित सत्तेची जरब कमी होते !' अशी प्रथमपासून इंग्रजांची राजनीति असल्यामुळे त्या अव्वल इंग्रजींतही राममोहन यांच्या राजकीय चळवळीस यश आले नाहीं. शेवटीं दिल्लीश्वर दुसरे अकबर बादशहा ह्याच्या मसनदीच्या हक्कांची दाद लावण्यासाठीं, व

तेथील लोकांच्या रीतिभातींचे अवलोकनासाठीं राममोहन इंग्लंडांत गेले त्यावेळीं हिंदुस्थानच्या राजकारभाराच्या सुधारणेचा कायदा घडत होता. त्या कामीं त्यांनीं इष्ट सुधारणा घडवून आणण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केला. पण व्यर्थ.

असो; राममोहन यांचे इतर व्याप कितीही मोठे असले, तरी त्यांसंबंधीं अधिक विस्तार करणे या पुस्तकांत अप्रस्तुत होईल. तथापि ब्राह्मसभेच्या ध्येयाशीं किंवा ब्राह्मसमाजाचे आजपर्यंतचे सप्रदायाशीं अत्यत सन्निकट अशा दोन विषयांचा येथे थोडा परामर्श घेणे, जरूर दिसते. ते दोन विषय म्हणजे अबलोन्नति व लोकशिक्षण हे होत. राममोहन यांचे ठिकाणी एकंदर स्त्रीजातीसबधी फार आदर वसत असे. तो इतका की, कोणत्याही स्त्रीसमोर ते सहसा बसत नसत. महमद पैगबर आपली मुलगी फतीमा भेटावयास आली तर उभे रहात. त्यांच्या अनुकरणानेच कीं काय राममोहन हेही स्त्रियांसमोर उभे रहात. बुद्धिमत्ता, नीतिमत्ता, धैर्य इत्यादि गुणांत स्त्रिया पुरुषाची सहज बरोबरी करू शकतील, पुरुषानीं मात्र त्यांची योग्यता ओळखून त्यांस त्याप्रमाणें वागविले पाहिजे, असे त्याचे म्हणणे असे. स्त्रियाना आपण योग्य मान देत नाही व त्यांचे गुणाचा विकास होण्यास पूर्ण अवसर देत नाहीं, हें पाहून त्याचे अंतःकरण दुःखी होई. त्याचे स्वताचे धर्मविचार कसेही असले तरी ते आपल्या आईवर अथवा आपल्या बायकांवर लादण्याचा त्यानीं कधींच प्रयत्न केला नाही. त्याची आई शेवटीं जगन्नाथाचे यात्रेस निघाली तेव्हां तिची सर्व तरतूद त्यांनी लावून दिली. त्याची दुसरी बायको श्रीमती उमादेवी मरण पावली, तेव्हा तिचे दहनसंस्कार झाले, त्या ठिकाणीं तिचे स्मरणार्थ त्यांनी एक समाधी बाधली.

स्त्रियांना इष्टेटींत वारसाचा हक्क पुरुषाप्रमाणे मिळावा, तसेच बहुपत्नीकत्व कायद्याने बंद करावे, म्हणूनही त्यांनी पुष्कळ खटपट केली. पण त्यांत त्यास यश आले नाहीं. ह्या सर्व गोष्टींपेक्षां ज्याचे योगाने त्याचे नांव अजरामर झाले, अशी गोष्ट म्हटली म्हणजे सती जाण्याबद्दलची चाल बंद करण्याबद्दल त्यांनीं केलेली चळवळ ही होय. त्यांचा वडील भाऊ जगमोहन हा मृत्यु पावला, तेव्हां त्याची स्त्री देशरिवाजास अनुसरून सती जाऊं लागली. त्या साध्वी स्त्रीबद्दल राममोहन यांचे मनांत विशेष आदर असे. तिने सती जाऊं नये म्हणून राममोहन यांनीं तिची फार विनवणी

केली. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पुढे चितेचे ज्वाळांनीं ती जेव्हा होरपळू लागली, तेव्हां तिने किंकाळी फोडून चितेबाहेर येण्याचा प्रयत्न केला. पण तिच्या आप्तेष्टानीं तिला तसे करूं दिलें नाहीं. उलट बांबूचे काठ्यांनीं तिला आंत ढकलून तिच्या हृदयभेदी आरोळ्या कानीं येऊ नयेत, म्हणून ढोलकी वगैरे वाद्ये सुरू केली. हा सर्व प्रकार राममोहन यांचे नजरेसमोर झाला. त्याने त्याचे मनाला जबर धक्का बसला व ही दुष्ट चाल बंद होईपर्यंत आपण स्वस्थ बसावयाचे नाही, असा त्यानीं दृढ संकल्प केला. ह्या कामीही त्यास लोकांचे सहानुभूतिपेक्षा लोकक्षोभच जास्त सहन करावा लागला. या निष्ठुर चालीविरुद्ध लोकमत तयार करण्याकरिता त्यानी शक्य ते प्रयत्न केले. त्यासंबंधी शास्त्रमर्यादा काय आहे, ते लोकास समजावून दिले एका कलकत्ता प्रांतात दरसाल शेकडो स्त्रिया रूढीचे सक्तीमुळे, सती म्हणून जिवंत जाळल्या जात आहेत, ही गोष्ट लोकाचे व सरकारचे निदर्शनास त्यानी आणली. ही धर्माची बाब म्हणून सरकार प्रथम यात हात घालीना. कारण ब्रिटिशांचे राज्याची घडी त्या वेळी नवीनच बसत असून, त्यांस लोकक्षोभाची सहजच भीति वाटे. सरकार मदत करीत नाही असे पाहून, राममोहनानी आपल्या सहकारी मित्रांचे साहाय्याने जेथे जेथे सतीचा प्रसंग असेल तेथे जाऊन तो प्रसंग टाळण्याचा दीर्घोद्योग चालविला.

एकदा एका अशाच प्रसंगी एका मृत गृहस्थाच्या दोन स्त्रिया सती जाण्यास सिद्ध झाल्या होत्या. सती न जाण्याविषयी त्यांचे मन वळवण्यासाठीं राममोहन वगैरे मंडळी तेथे गेली. त्यांचे देखत मृताची वडील स्त्री सती गेली. तेव्हा तिचे मागोमाग धाकटीनेही आपली तयारी केली. तिचे ते तरुण वय पाहून राममोहन यांस तिची करुणा आली. त्यांनीं तिला सती जाण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. तेव्हां त्या निष्ठावंत तरुण स्त्रीनें राजा राममोहन यांस खडखडीत जबाब दिला कीं, "पतीबरोबर सती जाणें हे आम्हां पतिव्रतांचे कर्तव्य आहे. माझी वडील सवत पतिसान्निध गेली. मलाही त्याच मार्गाने गेले पाहिजे. आतां या सतीचे अखेरचे तुम्हांला इतकेंच निक्षून सांगणें आहे कीं, आमचे स्त्रीधर्माचे परिपालनांत तुम्हीं ह्यापुढें पुन्हा केव्हांही ढवळाढवळ करूं नये. ती तुम्हांस श्रेयस्कर होणार नाहीं."

असे म्हणून धर्मतेजाने प्रज्वलित झालेली ती साध्वी अखंड पतिसान्निध्यास्तव मोठ्या शांतचित्ताने त्या भडकलेल्या चितेत शिरली. अशा तेजस्वी स्त्रिया पतीमागे राहिल्या तरी त्या सतीच आहेत. त्यांनी देहाचा अंत करण्याचा असा अट्टाहास न धरतां, आपल्या समदुःखी भगिनींनी पतीचे मागे आपले शीलसरक्षण कसे करावे ह्याचा उज्ज्वल धडा दाखविण्याकरितां जीवमान राहणेच किती उपयोगाचे व योग्य होईल, असेच विचार त्या वेळीं राममोहन याचे मनात आले असतील ! असो. पुढे त्याच्या इच्छेप्रमाणे इ. सन १८३३ सालीं सतीनिषेधक कायदाच झाला. तो पाहाण्यास राममोहन हयात नव्हते. तथापि तो कायदा होण्यास विशेषेकरून राजा राममोहनाचेच परिश्रम कारणीभूत झाले हे प्रसिद्ध आहे.

अबलोन्नतीप्रमाणे राममोहन याचा दुसरा आवडीचा विषय लोकशिक्षण हा होय. लोक-शिक्षण या सामासिक शब्दाचा रूढार्थ इग्रजी विद्येचे शिक्षण असाच होऊन बसला आहे. आज इग्रजी विद्येचा बाजारभाव कसाही असो, त्या वेळी इंग्रजी विद्या म्हणजे एक अपूर्वाई होती. एकतर ती राजकर्त्यांची भाषा म्हणून शिकणे स्पृहणीय, नव्हे आवश्यकच होते. आणि शिवाय जिचे-मध्ये नानाविध शास्त्रीय शोध कोंदणाप्रमाणे बसवले आहेत, अशी इग्रजी विद्या त्या काळीं त्रिखंडीं विराजमान झालेली होती. अशा इंग्रजीचा हिंदुस्थानात मात्र अद्यापि पायडाही पडला नव्हता. इग्रजांचा हिदुस्थानाशी पहिला संबध वैश्यवृत्तीचा होता. हुबळी नदीत त्यांच्या बोटी येत, तेव्हां त्याना दुभाषाची जरूरी वाटे. एकदा त्यानी एक दुभाषा पाठवा असा बंगाली अडत्याकडे निरोप पाठविला. त्या निरोपांत दुभाषाचा “ धोबाशा ” होऊन बंगालचे शेठ लोकांनीं साहेबाना “ धोबी ” पाहिजे असे समजून एक परीट बोटीवर पाठवून दिला. हे परीटदादा जेव्हां काही दिवसानीं परत आले तेव्हां बोटीवरील विलायती मालाबरोबर कांहीं विलायती शब्दही घेऊन आले. हेच बंगालचे पहिले आंग्लभाषाभिज्ञ होत !

बरं जुन्या संस्कृत-पाठशाळा पाहाव्या तर त्यांत प्रायः व्याकरण, न्याय, ज्योतिष असे विषय शिकवीत. अशा स्थितीत लोकशिक्षणाचा प्रश्न जेव्हां पुढें येई तेव्हां सरकार हिंदु लोकांची मने संतुष्ट राखण्याकरितां निरुपद्रवी अशा संस्कृत विद्येचाच पुरस्कार करीत असे. हिंदी रयतेस इंग्रजी शिक्षण द्यावें कीं

न द्यावें आणि दिलें तर कशा पद्धतीचें दिलें असतां आपले राज्यकारभारास मदत व बळकटी येईल, ह्याबद्दल इंग्रजांचे राजनीतीने अद्याप आपला अखेरचा निर्णय दिला नव्हता. पुढे लवकरच लॉर्ड मेकॉले, लॉर्ड विल्यम बेंटिंक अशा बड्या राजकारणी पुरुषांची वजनें पाडून इंग्रजी शिक्षणाचे पारडे कायमचे झुकले खरें; पण ती स्थिति राममोहन यांचे वेळीं नव्हती. इंग्रजी शिक्षण देणारी एकही सार्वजनिक संस्था त्या वेळीं साऱ्या बंगाल्यांत नव्हती. एक लाख रुपये खर्च करून एक संस्कृत कॉलेज काढण्याचे त्या वेळी सरकारांत घाटत होतें. परंतु हा विचार चुकीचा असल्याबद्दल राममोहन यांनी त्या वेळचे व्हॉईसरॉयसाहेबास एक मुद्देसूद पत्र लिहून कळविलें. त्यांत त्यांनी वेदान्त, न्याय, मीमांसा, व्याकरण, इत्यादि संस्कृतविद्येचा देशस्थिति सुधारण्याच्या कामीं कांहींच उपयोग होणार नाहीं; उलट लोकांत अज्ञान वाढेल असें सुचवून आधिभौतिक शास्त्रशिक्षण देशाचे प्रगतीस कसें जरूर आहे तें सांगितलें आहे. ह्या पत्रांत त्यांनीं जुन्या संस्कृतविद्येची बरीच नालस्ती केली आहे; कदाचित् ती निंदा सहेतुक नसून इंग्रजी शिक्षणाचा पुरस्कार करण्यापुरतीच होती असेंही असेल. कारण राममोहन इकडे इंग्रजी विद्येचा उदो उदो करीत असतां संस्कृतविद्येसही योग्य प्रकारें उत्तेजन देण्यास चुकले नाहींत. ह्या बाबतींत कित्येकांचें असेंही म्हणणें आहे कीं, राममोहन हे पाश्चात्य संस्कृतीचे व शिक्षणाचेच खरे भोक्ते होते. उत्तम नागरिक बनविण्यास वेदान्त निरुपयोगी आहे. हिंदुस्थानास अज्ञानांधकारांत डांबून ठेवण्यासमात्र संस्कृतविद्या बेमालूम उपयोगी पडेल, असेंच राममोहन यांचे मत होतें. पण लोकमत संभाळण्याकरितां व लोकांस एकेश्वरीपंथांत आणण्यास साधनीभूत म्हणून त्यांनी संस्कृतविद्येचा वरकातीं पुरस्कार केला. तें कांहीं असो. पण इ. सन १८१९ सालीं कलकत्ता येथे त्यांचे व डेव्हिड हेअर यांचे खटपटीनें इंग्रजी शिक्षणासाठीं जसें हिंदुकॉलेज स्थापन झालें तसेंच संस्कृत-शिक्षणाकरितां वेदान्त कॉलेज व दुसरें एक संस्कृतकॉलेज राममोहनाचे खटपटीमुळेंच स्थापन झालें. त्या कामीं त्यांस बरीच पदरमोडही करावी लागली. त्या वेळीं संस्कृत-शिक्षणापेक्षां इंग्रजी शिक्षणाचें काम बरेंच दुर्घट होतें, इंग्रजी शिक्षणास जनतेचा विरोध, सरकारी सहानुभूतीचा अभाव आणि शिक्षकांची उणीव, अशी त्रिविध अडचण होती. ती दूर करण्यासाठीं राममोहनांनीं अमेरिकन व स्कॉच

मिशनांकडे पत्रव्यवहार सुरू करून इकडे चांगले, मताने उदार व बुद्धीनें हुशार असे मिशनरी शिक्षक आणविण्याची तजवीज केली अशा रीतीने रे० अलेक्झॅडर डफ्प्रभृति मिशनऱ्यांच्या शिक्षणसंस्थांचा पाया राममोहनांनींच घातला असे म्हणण्यास हरकत नाही. तिकडून येणाऱ्या मिशनरी शिक्षकांनीं आपलीं धार्मिक मते मुलांस सांगत बसू नये, असे राममोहनांचे म्हणणे होते. तथापि धर्मशिक्षणाचे महत्त्व ते पूर्णपणे जाणून होते. हिंदूंच्या मुलांस इंग्रजी शिक्षण फुकट मिळावे म्हणून त्यांनी दरमहा दोनतीनशे रुपये पदरचा खर्च सोसून एक शाळा चालविली होती. त्या शाळेत फुकट शिक्षणाशिवाय धर्म व नीतिशिक्षणाची सोय हाच विशेष होता. महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर यांचे प्राथमिक इग्रजी शिक्षण ह्याच शाळेत झाले, ही गोष्टही पुढील परंपरेचे दृष्टीने लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

ह्याप्रमाणे शिक्षणसस्थाचे द्वारे त्यांनी जे कार्य केले त्यापेक्षां त्यांची वाङ्मय-सेवा लोकोत्तर आहे. साम्राज्यातील प्रचंड घडामोडीपर्यंत आणि भूगोलापासून भूमितीपर्यंत नानाविध विषयांवर त्यानीं ग्रथ लिहिले. ग्रीक, हिब्रू, इग्रजी, फारशी, आरबी, संस्कृत, पाली, हिदी, बगाली वगैरे सतरा भाषात त्याची बुद्धि अप्रतिहत सचार करीत असे. भिन्न संस्कृतीचे समेलनात इग्रजास भाषाभेद आडवा येऊ नये म्हणून त्यांनी बगाली भाषेचे पहिलेच व्याकरण इग्रजीत प्रसिद्ध केले. त्याच्या काळीं साऱ्या हिंदुस्थानांत त्यांच्यासारखा बहुश्रुत आणि विद्वान् दुसरा कोणी नव्हता असे म्हणतात. विशेषेकरून धार्मिक विषयांवर त्यानी निरनिराळ्या भाषांतून इतकी ग्रथरचना केली आहे की, इतर अनेक व्यवसाय सांभाळून एका मनुष्यास इतके लिहिता येणे कोणासही अशक्य वाटेल.

राजा राममोहन राय यास बंगाली गद्याचा आद्यप्रवर्तक म्हणतात. त्यापूर्वी एतद्देशीय सर्व वाङ्मय पद्यात्मक असे. गद्याप्रमाणे त्याचे पद्यही लोकोत्तर असे. त्यांचीं प्रार्थनागीते ब्राह्मसमाजांत अत्यंत लोकप्रिय झाली आहेत. उपासनेस संगीताची जोड त्यांनीच करून दिली. ती ब्राह्मोपासनेत रूढ आहे. तसेच बगाली वर्तमानपत्रकारांचे ते आद्यमार्गदर्शक होते. त्यांचे संवादकौमुदी हे पहिलेच बंगाली पत्र. ह्याशिवाय, मिरतअल अखबार, ब्रॅह्मॅनिकल मॅगॅझीन, बंगाली हेरल्ड अशा निरनिराळ्या भाषेत ते नियतकालिके चालवीत असत.

तात्पर्य, धार्मिक मंडळ्या स्थापून, शाळा काढून, वादविवाद करून, पुस्तकें व लेख लिहून त्यांनीं आपल्या मतांचा व विचारांचा प्रसार केला आणि लोकशिक्षणाचे कामही साधले. राहणी मुसलमानी, मन हिंदूचे आणि विचार कांही सुफी व कांही खिस्ती एकेश्वरी पंथाचे, असे त्याचे ठिकाणी अनेक धर्मांचे मिश्रण होते. ते असे म्हणत की, मी मेल्यावर, हिंदु, खिस्ती व मुसलमान मला आपापल्या धर्मांचा मानतील आणि शेवटी खरोखर तसेंच झाले. तथापि ज्याना त्यांचा दृढपरिचय झाला असेल त्यांना ते अंतःकरणाचे खरे खरे हिंदु होते हे सहज कळून आले असेल. सहकारिता हे त्याचे जीवनाचे रहस्य दिसते. खिस्ती, मुसलमानी व हिंदी मुलास एकत्र करून ते त्यासह ब्राह्मदिरांत प्रार्थनागीत म्हणत बसत. अखिल मानवकोटीत बंधुभाव कसा नांदल हा त्याचेपुढे एक बिकट प्रश्न होता. आणि तो सोडवीत असता, घरीदारी जेथे जेथ त्यास भेदाची गांठ पडे, तेथे ती तोडून टाकण्याचा त्यांचा खटाटोप असे. भेदातील न्यूनाधिक-भाव हाच त्या भेदातील प्राण असतो. त्याचा घात करणे हेच त्याचे जीवितकार्य होते. मग तो न्यूनाधिक-भाव स्त्री-पुरुष ह्या भिन्न कोटीत, जातीजातींत अगर निरनिराळे धर्मात कोठेही पोसलेला असो, त्याचा शक्य तो नायनाट करावा अशा स्वरूपाचे ह्या आद्यप्रवर्तकाचे कार्य होते.

हिंदुधर्मासंबधीं त्यांचे विचारास निश्चित स्वरूप येऊन त्यांनीं कांही घटनात्मक विधायक कार्य करावे, इतका त्यास अवसरच मिळाला नाहीं. तथापि राजा राममोहन सारखे बडे सावज आपल्याला सांपडणार म्हणून पाद्रीलोक आशेत होते, त्यांची या ब्राह्मसभेचे संस्थापनेने निराशा झाली. आणि राममोहन केव्हा कांही बोलले असले तरी ते हाडाचे हिंदु व मनाचेही हिंदु होते; आणि हिंदूचे मन एवढे जबरदस्त व्यापक असते कीं, सर्व जगांतील धर्म आत्मसात् करूनही हिंदु पुन्हा हिंदूचा हिंदूच, कायम राहूं शकतो, ही गोष्ट त्यांनीं अखेर सनातन वैदिकधर्माचेच अधिष्ठानावर आपली एकेश्वरी ब्राह्मसंस्था स्थापून विधर्मीयांस चांगली पटविली; आणि आम्हांला तर असे वाटते कीं, ते आणखी दहा वर्षें जगते तर त्यांचे धार्मिक विचारांत पुढे खातरीनें आणखी थोडा इष्ट बदलही पडला असता.

राममोहन इंग्लंडांत गेल्यावर एकेश्वरीपंथाचे रूक्ष वादाचा त्यांस वीट

आला. ज्यांत श्रद्धा व भावना यांस अवसर नाही, तो पथ काय कामाचा? वांझ व रूक्ष अशी बुद्धि, तसेच अंतःकरण गारठवून टाकणारे नपुंसक तत्त्वज्ञान, निष्फळ म्हणून त्यास तिरस्करणीय वाटले. इंग्लडांत असताना ते एकेश्वरी-पंथाचे देवळात न जातां जुन्या पथाचेच देवळात जाऊ लागले. व तेथेच त्याच्या प्रेमळ अंतःकरणास अधिक शांति मिळू लागली. त्यांनी आपला तेथील धर्मोपदेशक जुन्याच पथाचा पसंत केला होता. आमचे सुदैवाने ते स्वदेशी परत येऊन काही दिवस विद्यमान असते तर त्यांचे आगचे लोकोत्तर प्रतिभेमुळे त्यांनी भागवत-ब्राह्मधर्माचा सगम मुबईचे अगोदरच कलकत्त्यास घडवून आणला असता. तथापि ईशसंकेत तसा नव्हता. कर्मधर्मसंयोगानें ज्या विधर्मी संस्कृतीशी आपला योग आला, त्या सर्वांस परस्पर सहिष्णु कसे करावे हा जो त्याचे मनांतील उदात्त हेतु, तो ह्या व्यक्तिरूपाने ज्या सालीं अंतर्धान पावला, त्याच सालीं (इ. सन १८३३) श्रीरामकृष्ण परमहंस या दिव्य व्यक्तीचे रूपाने तो अधिक शुद्ध होऊन बंगाल्यात त्याचे कार्यभूमीतच पुन्हा उदयास आला ही मोठीच भाग्याची गोष्ट होय.



## प्रकरण बारावें

# विलायतेची सफर व अखेर

येथवर वर्णन केल्याप्रमाणे राममोहन यांचे हिंदुस्थानांतील चरित्र संपले. त्यांच्या विलायतेतील उद्योगाचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहे. राजा राममोहनानीं एकेश्वरीपथाची मुहूर्तमेढ हिंदुस्थानांत कायमची रोवली, लोकशिक्षणाचे कार्य मार्गास लावले, राजकीय व सामाजिक चळवळींची दिशा लोकांस दाखविली. मृतावस्थेत घोरत पडलेल्या बंगाल्यास जागृत केले, परतु एक महत्त्वाचे कार्य करावयाचे राहिले होते. राज्यक्रांतीचे तुफानी वाऱ्याने इंग्लिश चॅनलमधील प्रवाहाची लाट बंगालचे उपसागरास येऊन मिळाली होती. परंतु उलट गंगेच्या पवित्रोदकाची गोडी व महती तमसा नदीस मिळाली नव्हती. पश्चिमेकडून आलेल्या जहाजांनी व्यापार व उद्योग यांचे माप हिंदुस्थानात टाकले; परतु " नाही वाटतां सरले। आहे तैसेंच भरले। तुका म्हणे गेले। वार्‍याविण न घेतां॥ " असले हिंदभूमीतील अमूल्य केणें इंग्रजाचे पदरीं बाधावयाचे होते.

पाश्चात्य संस्कृति हिंदबाळासाठी जडवादाची नकली खेळणीं घेऊन आली असता, हिंददेवीसही आपले मुलांबरोबर संतांचे घरची शाश्वत सुखाची परत-भेट पाठविणे प्राप्त होते. राजकारणाचे पटांत इंग्रजांची प्यादी पुढे चालून आली असतां हिंदभूमीसही आपला विजयाश्व, सनातनधर्माची अजिंक्य पत्रिका शिरावर लावून देशांतरी पाठविणे जरूरच होते. हिंदुधर्म व हिंदभूमि यांचे दरवाजे उलटसुलट होते. हिंदुधर्मात बाहेरच्यांस येण्यास मज्जाव होता; परंतु हिंदभूमीत परक्यांस येण्यास मुक्तद्वार होते; उलट हिंदुस्तानांतून देशांतर करण्यास स्वकीयांस मात्र आडकाठी होती हिंदुस्थान हिंदूकरितांच अशी परीस्थिति होती, तोपर्यंत त्या रूढीचा दुष्परिणाम जाणवला नाहीं. परतु पुढे दुर्दैवानें हिंदुस्थान फक्त हिंदूंशिवाय इतरांकरितांच अशी बारी आली, तेव्हां ह्या दरवाजांची उघडझांप बदलण्याची वेळ येऊन ठेपली! ही गोष्ट राममोहन यांच्या प्रथम लक्षांत आली. कूपमंडुकाप्रमाणे इतउत्तर घरांत डांबून राहून

चालणार नाहीं, असे त्यांनीं जाणले. हिंदुस्थान म्हणजे कांहीं शिकारी लोकांकरितां राखलेला जंगली प्राण्यांचा मुलूख नाहीं. हिंदुस्थान माणुसकीने खचून भरलेला आहे. आणि येथील नरपुंगव ब्रिटिशांचेपेक्षांही शरीर, मन, आणि बुद्धि यांनीं मोठा असूं शकतो, हे पाश्चिमात्याचे नजरेस आणण्याचे कार्य प्रथम या आर्यपुत्राने केले. केशवचंद्र, प्रतापचंद्र, हे हिंदी मिशनरी किंवा विवेकानंद, रामतीर्थ हे गाढे धर्मवीर ह्यांचे सीमोल्लंघनाचा पायंडा राजा राममोहनांनीं पाडला. एका हातात सनद व दुसरे हातात हिंदी ब्राह्मपंथाचें निशाण, असे घेऊन ह्या बहाद्दरानी सात समुद्र ओलांडून विलायत गांठली. राजकारण व धर्मकारण असे दुटप्पी कारणानीं ते तेथे गेले. मुत्सद्दी व धर्मप्रचारक अशी त्याचीं दोन प्रकारचीं नाती होती. राजा आणि ब्राह्मण, हे त्याचे दोन हुद्दे होते. आणि राजकर्त्यांनी ते न मानले तरी इंग्लंडच्या जनतेने त्याचे हे दोन्ही हुद्दे मनापासून मान्य केले, हे पुढील त्रोटक हकीकतीवरून दिसून येईल.

हिंदुस्थानांतला एक बडा तत्त्वज्ञ ब्राह्मण लंडनशहरीं आला आहे असे समजताच इंग्लंडमधील अत्यंत प्रतिष्ठित, दरबारी आणि विद्वान् मंडळीची त्याचे बिऱ्हाडाशी सारखी रीघ लागून राहिली होती. इंग्लंडमधील अगदीं पहिल्या वर्गाचें लक्ष जसं त्यांनीं आपलेकडे वेधून घेतले, त्याप्रमाणे अगदीं खालच्या वर्गाचे लोकांसही त्यांनी वेड लावले. त्यांचे ते भव्य शरीर, रुबाबदार पेहराव, विनय, विनोद आणि विद्वत्ता ह्याचा आदर्शभूत असा त्याचा चित्ताकर्षक चेहरा, आणि राममोहन म्हणजे हिंदुस्थानांतून अगदीं प्रथमच विलायतेत गेलेला अत्यंत विद्वान् ब्राह्मण, ह्या सर्व कारणामुळे रावापासून रंक आणि स्त्रियाप्रमाणे पुरुष अशा सर्वच समाजावर त्यांनी विलक्षण छाप बसविली. त्याचे वर्णन वाचून आजकालचे कोणाही पुढाऱ्यास त्याचा हेवा वाटल्यास नवल नाहीं.

राममोहन याच्या चरित्राचा पाल्हाळ अधिक करणे येथे अप्रस्तुत असले तरी राममोहन यांच्या रूपाने आर्यसंस्कृतीचेच प्रथम स्वागत पाश्चात्य संस्कृति त्या वेळी करीत होती, या दृष्टीने ते महत्त्वाचे आहे. ह्या सुमारास अमेरिका व युरोप खंडांत गुलामगिरीच्या विरुद्ध जोराची चळवळ सुरू होती. ह्यामुळे इंग्रजांचें औदार्य व सहानुभूति हीं ह्या काळीं सुलभ होतीं; तसेच

यंत्रशक्तीच्या वाढीबरोबर वाढीस लागलेली आसुरी महात्त्वाकांक्षाही ह्या वेळीं उमेदींत आली नव्हती. तात्पर्य, त्या वेळीं इंग्रज लोक आजच्याइतके लोभ, महत्त्वाकांक्षा इत्यादि विकारांनीं ग्रासलले नसून अधिक उदार व गुणग्राही होते असे दिसते. तसे नसतें तर जिंत राष्ट्रांतील या काळ्या आदमीचा तेथे इतका उदोउदो झाला नसता. दरबारी बहुमानाप्रमाणें अकृत्रिम प्रेमाचीही त्यास तेथे अपूर्व अशी जोड मिळाली. खुद्द इंग्लंडचे सार्वभौम बादशाहांचे राज्यारोहणप्रसंगी जणु काय हिंदुस्थानचे वकील म्हणून ज्याप्रमाणें राजदरबारांत त्यांना अत्यंत श्रेष्ठ मान मिळाला, त्याचप्रमाणे इंग्लंडचें प्रसिद्ध उद्योगभवन जे मॅंचेस्टर त्या गावचे कारखान्यात ते गेले असतां त्याचे लोकांस मोठे कौतुक वाटलें. त्या वेळी राममोहनांच्या दर्शनासाठीं उत्सुक झालल्या मजुरांनी काम बंद पाडले, आणि मग ज्या झुंडीच्या झुंडी बाहेर पडल्या त्यात राममोहनांचे हस्तांदोलन करण्यास पुढे सरसावलेल्या मंडळीस आपले हात कोळसा व तेल यानी किती माखलेले आहेत, याचेही भान राहिले नाहीं ! आणि गिरणीतल्या बायांनीं त्यास देशरिवाजाप्रमाणें प्रेमाने मिठ्या मारण्याकरिता उत्सुकता दाखविली, तेव्हा आपल्या विसकटलेल्या केशांत पिंजारलेल्या कापसाने काय शोभा आणली आहे, याची त्यांनीं कांहींच क्षिती बाळगली नाहीं !

त्याहीपेक्षां संस्मरणीय प्रसंग म्हटला तर राममोहन यांचा सन्मान करण्याकरितां तेथील एकेश्वरीसमाजाने मुद्दाम भरवलेली सभा होय. सदर सभेत अध्यक्षानीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत या पौर्वात्य पाहुण्यांचा गौरवपूर्वक उल्लेख केल्यावर डॉ. ब्राऊनिंग हे आपल्या मुख्य भाषणांत म्हणाले कीं, "भूतकालाचा पडदा बाजूला सारून आपलेमध्ये प्लेटो, सॉक्रेटीस, मिल्टन, न्यूटन असे महापुरुष एकाएकीं प्रादुर्भूत झाले, तर आपल्या मनाची किती विलक्षण स्थिति होईल, याचो कल्पना कित्येक कवि आपले काव्यांत करीत असतात. तशाच प्रकारच्या भावनेने मी आज राजा राममोहन यांचे आपल्या सर्वांचे वतीने स्वागत करीत आहे. अत्यंत श्रेष्ठ अशा वैदिक–ब्राह्मण–समाजांतील राजा राममोहन हे एक प्रमुख गृहस्थ आहेत; त्यांनीं आपल्या येथें येण्यांत केवढे साहस केलें आहे, याची खरी कल्पना आपणांस होणे शक्य नाहीं. राजा राममोहन यांच्या हिंदुस्तानांतील अपूर्व कामगिरीबद्दल ज्यांस

येथें माहिती मिळत होती, त्यांस राममोहनांच्या प्रत्यक्ष स्वागताचा लाभ हें एक मोठे आनंददायक स्वप्न वाटत होते. ते स्वप्न आज खरें ठरलें आणि तो लोकोत्तर विद्वान् ब्राह्मण आपल्या स्वागताचा आणि आपल्या सहकारितेच्या अभिवचनाचा स्वीकार करण्यास आज येथे आपणांमध्ये खुद्द हजर आहे; तेव्हां आजचा दिवस आपल्या इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा म्हणून सुवर्णाक्षरांनीं लिहिण्यासारखा आहे." अशा आशयाचें त्याचें भाषण झाल्यावर अमेरिकेचे हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या अध्यक्षांनीं मोठे विनयपूर्वक त्यांस अनुमोदन दिले आणि नतर अध्यक्षाचे सूचनेवरून तो ठराव सर्वांनी उभें राहून मंजूर केला. आजपर्यंतच्या लौकिकदृष्टीने पाहिले तर ब्राह्मणांच्या उत्कर्षाचा हा कळसच झाला म्हणावयाचा !

राममोहनाच्या स्त्रीदाक्षिण्याने इंग्रज स्त्रियांना तर मोहित करून सोडले. एका धर्माध्यक्षाच्या सुशील स्त्रीने असे म्हणून दाखविले कीं, राममोहन माझ्याबद्दल आदर दर्शवितात, तितका मी इग्लंडची महाराणी असते तरी मला कोणीं दाखविला नसता. तेथे त्यांचा घरोबा इतका वाढला कीं, तिने आपल्या नूतन अर्भकाचे नावही राममोहन असेच ठेविले. इंग्लंडमधील मध्यम वर्गातील ह्या उदाहरणांप्रमाणेच इग्लंडांतील नरेद्रांच्या समाजांत केंद्रीभूत झालेल्या डचेस आणि काउटेस अशा स्त्रियांपासून उघड्या रंगभूमीवर चमकणाऱ्या नटीपर्यंत सर्वांना राममोहन मोठा प्यारा होऊन राहिला होता. मिस् हेअर, मिस् कॉलेट, मिस् कार्पेटर, मिस् किडल आणि मिस कॅसल इत्यादि कित्येक स्त्रियानीं राममोहन ह्यांचे अतिशय प्रेमादरपूर्वक आतिथ्य केलें.

मिस् सोफिआ कॉलेट हिने राममोहन यांस प्रथम इग्लंडांतील एका चर्चमध्यें प्रार्थनेच्या वेळीं पाहिलें. तेव्हां त्या उदारधी पुरुषाचे रुबाबाने ती इतकी आकर्षित झाली कीं, पुढे ती मोठी झाल्यावर राममोहन यांचा ब्राह्मसमाज हा एक तिच्या दृढाभ्यासाचा विषयच आजन्म होऊन बसला. ती साऱ्या जन्मभर अनेक दुर्धर रोगांनीं पिडलेली होती. तरी अशा स्थितींत हजारो मैलांवरून ब्राह्मसमाजासंबंधीं तिनें पत्रद्वारें जी तपशीलवार खडान्खडा माहिती संग्रहित करून वेळोवेळीं प्रसिद्ध केली, ती पाहून तिच्या आस्थेवाईकपणाबद्दल अतिशय आश्चर्य वाटते. ब्राह्मसमाजाचे चळवळीची साग्र हकीकत समजावी म्हणून मिस् कॉलेट बंगालीसुद्धां शिकली. आपल्या ह्यातींत

राममोहनांचें चरित्र लिहून पुरें करावें अशी तिची फार इच्छा होती. त्याप्रमाणे तिनें बराचसा भाग लिहिलाही. परंतु अखेर मरतांना तिला तें काम दुसऱ्यावर सोपवावे लागले. “ माझा अंतकाल समीप आला. राममोहन यांचे चरित्र माझे हातून पुरे होत नाही. तरी मी परलोकी जाऊन राममोहन यांस भेटेन तेव्हां त्यांचे चरित्र प्रसिद्ध केल्याचे सांगतां यावें अशी माझी इच्छा आहे. ती आपण पुरी कराल काय ? ” अशी तिची अखेरची इच्छा तिने त्या लेखकास कळविली आणि त्यानेही ती पुरी करण्याचा शक्य तो प्रयत्न केला.

पाश्चात्य देशांतील निराळ्या विवाहपद्धतीमुळे तेथील अनेक स्त्रिया निरनिराळ्या कारणास्तव अविवाहित राहतात आणि त्यांपैकीं कित्येक आपल्या जीवनास वाङ्मयसेवा अथवा लोकसेवा असा एकादा व्यवसाय लावून घेतात. अशाच स्त्रियापैकीं मिस् मेरी कार्पेटर ही एक बाई होती. तिने आपले सर्व आयुष्य इंग्लंडातील विशेषेकरून हीन समाजाचे उद्धाराकरितां खर्च केलें. ‘राममोहन यांचे इग्लंडांतील अखेरचे दिवस’ या नांवाचे एक पुस्तक तिनें प्रसिद्ध केले आहे. ब्राह्मसमाजाशीं तिचा बराच निकट संबंध होता. लोकशिक्षण हा तिचा मुख्य विषय होता. त्या निमित्ताने ती दोनतीन वेळां हिंदुस्थानांतही येऊन गेली. मुंबईच्या प्रार्थनासमाजाच्या संस्थापनेशीं तिचा थोडाफार संबध पोचतो. त्यावेळी ती मुंबईस होती. व तिचे प्रार्थनापद्धतीमुळें मुंबईकर काही प्रार्थनासमाजी मंडळी मूळची नास्तिकाची आस्तिक बनली, असे सांगतात. तिच्या परोपकारी स्वभावाबद्दल महाराणी व्हिक्टोरिआ हिने आपले हातांतील कंकण आपले नांव त्यावर घालून तिला नजर केलें. महाराणीसाहेब मोठ्या मुत्सद्दी व दयाळू होत्या असे दिसते. त्यांनीं पुढे केशवचंद्रसेनाचाही आपल्या राजवाड्यांत चागला सत्कार केल्याचे प्रसिद्ध आहे, त्याचा उल्लेख पुढे येईलच. तिसऱ्या एका इंग्रज कुमारिकेबद्दल येथे उल्लेख करणें जरूर आहे. कारण राममोहनांच्या लोकशिक्षणाचे उद्योगांतील पहिले मदतगार डेव्हिड हेअर यांची ती मुलगी (?) होय. राममोहन विलायतेंत गेल्यावर विशेषेकरून त्यांच्या शेवटच्या दुखण्यांत तिनें रात्रंदिवस डोळ्यांत तेल घालून त्यांची जी सेवा केली ती त्यांच्या पोटच्या मुलीनेही केली नसती, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.



राजर्षि राजा राममोहन राय यांची इंग्लंडांतील कार्नोव्हेल येथील समाधी.

राममोहनांचे ऋणानुबंधच असे विलक्षण होते की, स्वगृहींचे शत्रु व्हावेत आणि रिपुस्थानीं मित्रग्रह असावेत. त्यांच्या धर्मसंबंधीं मताबद्दल त्यांच्या आईबापांनीं त्याचा धिक्कार केला व बायकामुलांनीही त्यास बहिष्कार घातला; उलटपक्षी कोठें इंग्लंडचे बेट आणि कोठें तिबेट! पण इतक्या दूरस्थ स्त्रियांच्या ठिकाणीं राममोहनाबद्दल मोह उत्पन्न होण्यास त्याची भिन्नधर्ममतें आडवीं आली नाहींत. शेवटीं ज्या पाश्चात्यांचे संस्कृतींत त्यांचे मन बहुतकाल वावरत होतें, त्यांचेच देशांत त्यांच्या देहाचें विसर्जन व्हावें असा योग आला. इ. सन १८३३ चे सप्टेंबरांत राममोहन ब्रिस्टल येथें मिस् कॅसल यांच्या घरीं हवापालट करण्यास गेले. तेथेंच अनेक विद्वान् इंग्रजांच्या भेटी घेत असतां पुढें त्यांची प्रकृति जास्तच बिघडत चालली. अखेर त्यांचा मानलेला मुलगा राजाराम त्यांचेजवळ होता. ता. २७ सप्टेंबर रोजी जेव्हां त्यांच्या जीविताची आशा सुटली, तेव्हां त्या लोकोत्तर पुरुषाच्या पायाशीं त्यांची अहर्निश शुश्रूषा करणारी मिस् हेअर स्फुदून स्फुदून रडूं लागली. परंतु असल्या निष्कपट प्रेमाचीही निर्घृण काळास दया आली नाहीं आणि अखेर त्याच रात्रीं राजा राममोहन यांचा अंत झाला! शेवटीं फार महत्त्वाची गोष्ट घडून आली ती ही कीं, त्यांचें प्राणोत्क्रमण, सर्व वेदांचें सार अशा प्रणवाचे उच्चाराबरोबर झालें! राजा रामामोहन यांच्या पूर्व चरित्रावरून ज्यांस त्यांच्या धर्मनिष्ठेबद्दल शंका वाटली असेल, त्यांचे ह्या एका गोष्टीनें बरेंच समाधान होईल. अंते मतिः सा गतिः।

---

# प्रकरण तेरावें

# निष्कर्ष

येथपर्यंत एकोणिसाव्या शतकांतील हिंदुस्थानांतील सुशिक्षितांच्या विचारांस गति देणाऱ्या एका बड्या विद्वान् मुत्सद्याचें चरित्र संपलें. राममोहन यांच्यामध्यें सर्वांत श्रेष्ठ असा कोणता गुण असेल तर तो मुत्सद्दीपणा हा होय. ते आपणांस धर्मसंस्थापकच काय पण धर्मसुधारकही म्हणवीत नसत. तथापि अगदीं बाळपणापासून अखेरपर्यंत धर्मचिंतनाचा हव्यास त्यांच्या मनास होता. ईश्वराच्या अचिंत्य नियतीमुळें इस्लामी, हिंदी व खिस्ती अशा तीन भिन्न संस्कृति एकत्र आल्या असतां त्यांतील विरोध कमी करण्यास काय करावें, हें त्यांनीं मोठ्या चातुर्यानें शोधून काढलें. बौद्ध, जैन, इस्लामी, खिस्ती इत्यादि धर्मांतील वाङ्मयांत त्यांचें मन इतकें मुरलें होतें कीं, कोणत्याही एकाच धर्माचा अभिमान धरणें त्यास अशक्य झालें होतें. उलट धर्मांतील परस्पर विरोध पाहून त्यांचें मन विथरलें. त्यामुळें बाळपणाचा भाविकपणा नष्ट झाला. पुढें त्यांनीं अशी महत्त्वाकांक्षा धरली कीं, धर्मविरोधानें उत्पन्न झालेली अशांति हा आपला व्यक्तिपुरताच प्रश्न नसून एकंदर जनतेकरितांही हा प्रश्न सोडविला पाहिजे. अपक्व बुद्धीचा बंडखोरपणा कमी झाल्यावर त्यांची बुद्धि सारसग्राहक बनली. महंमदी धर्मांत त्यांना एका निराकार ईश्वरावरील निष्ठा ही विशेषेंकरून आढळली. मुसलमानी धर्म व बौद्धधर्म यांचा अभ्यास विद्यार्थिदशेंत होऊन गेल्यामुळें हिंदुधर्मांतील कर्मकांड, मूर्तिपूजा वगैरे प्रकार ह्यांच्यावरील त्यांचें मन उडालें. तथापि हिंदूंच्या अध्यात्माइतकें उच्च व निस्संदेह करणारें तत्त्वज्ञान त्यास दुसरें कोठेंही आढळलें नाहीं. विशेषेंकरून शंकराचार्यांचें तत्त्वज्ञान त्यास पटलें, असें आम्हास वाटतें.

कोणी असेंही म्हणतात कीं, "त्यांच्या वेदान्तांत न्याय व वैशेषिक दर्शनांचाही अंतर्भाव होत होता. आणि त्यांच्या ब्रह्मविद्येंत विशिष्टाद्वैत व द्वैत यांचाही समावेश झाला होता. ते ईश्वरवादी होते. त्यांची ब्रह्मोपासनेची शतपदी पाहिली तर ते निर्गुणाप्रमाणेंच सगुणाचेही उपासक होते. शून्य-

वादांत न जातां त्यांनीं निर्गुणोपासना केली व सत्काराचा आश्रय न करितां सगुणोपासना केली. ती अशी कीं, ते परमेश्वराच्या गुणचिंतनांत सहज तादात्म पावत." ह्या टीकाकारांचे आणखी असे म्हणणे आहे की, शंकराचार्यांच्या मायावादांत ईश्वराराधनेस जागाच नाही. कारण भ्रांतजीवानें भ्रमिष्टपणें ईश्वराची म्हणून प्रार्थना केली, तरी स्वप्नस्थ पुरुषाची प्रार्थना ज्याप्रमाणें शेजारच्या जागृतींतील पुरुषास कळतही नाहीं, त्याप्रमाणे जीवाची प्रार्थना एकमेवाद्वितीय अशा परब्रह्मास स्पर्शही करणार नाहीं. म्हणून ती व्यर्थ होईल. (?) परंतु राजर्षि राममोहन याच्या ब्राह्मपथाची सर्व भिस्त प्रार्थनेवरच होती. सामुदायिक उपासकाचे प्रार्थनामंदिर म्हणजे प्रतिवृंदावनच, राममोहन ह्यांनीं निर्माण केले होते, असे त्याचे म्हणणे असल्यामुळे आचार्यांच्या मायावादाचा जरी शाब्दिक अंगिकार राजा राममोहन यानी केला असला, तरी तो वाद त्यास मुळीच मान्य नव्हता, असा ह्या लेखकाचा अभिप्राय आहे. ह्याप्रमाणे हे अलीकडील टीकाकार आपले विचार राममोहन याच्यावर लादीत आहेत किंवा खरोखरीच त्यांचे विचार असेच होते, हे निश्चित ठरविणे दुरापास्तच आहे. शंकराचार्य, रामानुज, निंबार्क इत्यादि तत्त्ववेत्त्याच्या किंवा षड्दर्शनकाराच्या सिद्धान्ताचा विशेष बारकाईने विचार राममोहन यानी केलेला आमच्या वाचनात नाहीं. कदाचित् त्यास त्याची आवश्यकता भासली नसेल. अथवा त्यासंबधीं त्याचे अध्ययन बरेच अपुरेही असेल. वैदिक वाङ्मयाचाही त्यांचा अभ्यास बेताचाच असावा. निरनिराळ्या धर्मांचा त्यानी स्थूल व व्यापक दृष्टीने विचार केला त्या मानाने सूक्ष्म विचार केला नाही असे दिसते. ह्या मुद्याचा विचार करतां राजा राममोहन याच्याशीं तुलना करण्यास श्रीरामकृष्ण यांची मूर्ति डोळ्यासमोर येते. दोघांनाही हिंदु, ख्रिस्ती व इस्लामी धर्मांचा अभ्यास केला; तो परधर्मासंबंधी सहानुभूतिपूर्वकच केला, आणि दोघांचीही या तिन्ही धर्मांबद्दल आदरबुद्धि कायम राहिली व तीच जगापुढे मांडण्याचें महत्कृत्य ह्या उभयतांनीही केले. त्यातही ही गोष्ट राममोहनांनींच अगोदर लोकांचे निदर्शनास आणली. यामुळे एकतऱ्हेने राजा राममोहन यास विशेषच महत्त्व प्राप्त होते. परंतु त्याहूनही फार महत्त्वाची गोष्ट लक्षांत घ्यावयाची ती अशी कीं, राजा राममोहन ह्या अनेक भाषाकोविदांनीं तिन्ही धर्मांचे कांहीं प्रमुख ग्रंथ वाचून धर्मज्ञान संपादन केले.

आणि श्रीरामकृष्ण ह्या निरक्षर पुरुषांनीं ह्या तिन्ही धर्मांच्या अंतरंगसाधनांची तज्ज्ञांकडून दीक्षा घेऊन, साधनांचा अभ्यास करून धर्मतत्त्वांचा साक्षात् अनुभव घेतला. ह्याप्रमाणे एकाचे पुस्तकीज्ञान तर दुसऱ्यांचे अनुभविक ज्ञान, एकाची बहिर्दृष्टि तर दुसऱ्याची अंतर्दृष्टि, एकाचा विरोध काढून समन्वयाचा प्रयत्न तर दुसऱ्याचे साधनात भेद कायम ठेवून फलांत भेद नाहीं, असे अनुभवाने सांगणे, असे दोघांत महदंतर दिसते. परधर्मांच्याच काय पण स्वधर्माच्याही अंतरगसाधनाचें अनुष्ठान करून राममोहनांनीं ब्रह्मस्थिति अनुभविल्याचे ऐकिवात नाहीं. दुसरे असे की, श्रीरामकृष्णाची साधनांची निष्ठा राममोहन यास नव्हती, याचे कारण श्रीरामकृष्णांचे वैराग्यही त्यांचे ठिकाणीं नव्हते. यामुळे साकार ईश्वर व निराकार ब्रह्म ह्यांचा उपासनावाद, मायावाद, अद्वैतवाद यातील रहस्ये श्रीरामकृष्णांनीं केवळ अनुभविक ज्ञानाच्या जोरावर जितक्या निःसंदेहपणे सांगितली, तशीं ती राममोहन ह्याना न जाणता आल्यामुळे, त्याना बरोबर सांगताही आलीं नाहीत, असेच कित्येकाचे मत झाले आहे. अनेक मतांची त्यानीं खिचडी केली; ज्यांवर दयानंदसरस्वतींची विशेष भिस्त त्या वेदसंहितेकडे तर राजा राममोहन ह्यांनीं मुळीच लक्ष दिले नसावे. इतकेच काय पण औपनिषदिक वेदान्तापेक्षा ख्रिस्ती धर्मातील नीतिधर्म त्यांस अधिक व्यवहारयुक्त वाटला. ख्रिस्ती व महमदी धर्म हे ईशपुत्राचे अगर प्रेषिताचे धर्म या दृष्टीने व्यक्तिनिष्ठ आहेत, आणि हिंदुधर्म मुळांत तसा नसला तरी मूर्तिपूजा व अवतारवाद ह्यानी त्यांसही तेच स्वरूप प्राप्त झाले होते. अर्थात् प्रत्येक धर्माचे शिरोभागी असलेले हे विभूतिमत कायम आहे, तोपर्यंत धर्मभेदांतील कडवेपणा कमी होणे संभवनीय नाही ही गोष्ट लक्षात घेऊन धर्मातील त्या अत्यंत जिव्हाळ्याच्या मर्मस्थानींच त्यानी हात घातला; त्याबरोबर तिन्ही धर्मातील पुराणमताभिमानी लोकाचे हल्ले त्याचेवर सुरू झाले. परंतु राजा राममोहन यांनी तत्कालिक प्रचलित असलेल्या इतर मुख्य धर्मांच्या वाङ्मयाचा अभ्यास केला होता, त्यामुळे त्या त्या धर्मांतील लोकही त्यांच्यापुढे चकित होत. वाग्युद्धांतील ते एक महारथीच होते. शिवाय त्यांच्या उंच, भव्य व धिप्पाड शरीरामुळे न बोलतांही त्यांची दुसऱ्यावर सहज छाप बसे. तसेच त्यांचें व्यवहारचातुर्य व मनमिळाऊपणा यांच्या योगानें, जे त्यांच्याजवळ जात ते

ांच्याकडून उपकृत होऊन त्यांचे मिंधे होत. भिन्न भिन्न मताचे माणसांतही
.कमत करण्याच्या कलेत राजा राममोहन हे पुरे वाकबगार होते. उत्तरे-
.डील कबीर, नानक, दादु व रामायत पथांचे अनुयायाशी त्यांचा विशेष
लोखा असे.

असो. वरीलप्रमाणे तिन्ही बाजूंच्या हल्लयास तोंड देत असतां त्यानीं
.कीकडे वैदिकज्ञानप्रसारासाठी वेदान्त व उपनिषदे यांची बंगाली, हिंदी,
। इग्रजी भाषांतरे प्रसिद्ध करण्याचा उपक्रम सुरू केला. ख्रिस्ती-
र्माचे मंथन करून त्यांतून जीझसचा नीतिधर्म शोधून काढला; आणि
.सलमानाच्या पैगंबराचेही चरित्र लिहिण्यास घेतले. तात्पर्य, आडवे येईल
। तोडावे व जरूर ते जोडावे असे दुहेरी डावपेच त्यानी सुरू केले. सार्वत्रिक
.क धर्म करणे हे त्यांचे अत्युच्च ध्येय होते. त्या दृष्टीने त्यांनी हे टाकलेले
.व समजसपणाचे होते. आणि त्यात त्यास थोडफार यशही आले. त्यांचे
.कट्या व्यक्तीपुरतेच पहावयाचे तर विरोध करूनही अखेर मुसलमानाचा
ौलवी, हिंदूचा राजर्षि व पाश्चिमात्यांचा ख्रिस्तानुयायी, असे भिन्न धर्मीया-
.डून म्हणवून घेण्यांत त्यानी मोठाच विजय संपादन केला उलटपक्षीं
यांच्या वेदान्तशास्त्रावरील निष्ठेमुळे त्यानी कट्टर सुधारकास नाराज केले.
ैराग्य आणि तप यांच्या अभावामुळे हिंदूच्या बहुजनसमाजावर त्यांची छाप
.सली नाही. आणि जुन्या ख्रिस्त्यांचा त्रयीवाद व नवीन एकेश्वऱ्यांचा रूक्ष
ौद्धिकवाद या दोघास कटाळून अखेर ते कोणासच चिकटून राहिले नाहीत.
.ढे त्यानीं जो ब्राह्मसमाज स्थापन केला त्याची गुरुकिल्ली परधर्मविरोधात
.सून परमतसहिष्णुतेत होती. मूर्तिपूजेवर ते जरी अतिशय जहाल टीका
.रीत तरी सामान्य लोकास मूर्तिपूजेची उपयुक्तता आहे, हे त्याना मान्य होते.
.शपुत्र या कल्पनेचा त्यांनी जरी तीव्र निषेध केला, तरी महमद पैगंबर व
.ीझस ख्राइस्ट याच्याबद्दल अत्यत पूज्यभाव ते व्यक्त करीत. आणि त्यांनीं
.शप्रेरणेनुसारच आपआपले धर्म सांगितले ही गोष्टही त्यास मान्य होती.

तसेच हिंदूतील जाति व पोटजाति अशा भेदानीं कोणतेही सामाजिक
.ार्य सहकारितेने घडणे अशक्य होऊन देशाभिमान नष्ट झाला आहे, असे ते
.हणत. तसेच मृत्युंजयाचार्य ह्यांच्या वज्रसूचीचे बंगालीत भाषांतर त्यानी केले होते
असे कित्येक म्हणतात. आणि त्यावरून त्यांस जातिभेद मान्य नव्हता असे-

ही अनुमान काढतात. चातुर्वर्ण्य हे जाति व संस्कार ह्यांवरच मुख्यत्वे अवलंबून आहे. ( भगकुलीन ) शाक्त व वैष्णव या दोन विरोधि पंथांचा संकर त्यांच्या जन्मांत झाला होता, त्याचप्रमाणे त्यांच्या पुढील आयुष्यक्रमाकडे पाहिल्यास ते वैदिकसंस्कारहीनच गेले असल्याचा बराच संभव होता. त्यांचे विवाहही वैदिकपद्धतीने झाले नाहींत असे दिसते. पण ह्या सर्वांचे कारण पूर्वी बंगालप्रांती बौद्धधर्म इतका दृढमूल झाला होता, की त्यायोगाने वेदविद्येला व शुद्ध वैदिक आचारांना त्या प्रांतांत कायमचेच मालिन्य आले होते. ज्या वज्रसूचिनामक ग्रंथाचे राममोहन ह्यांनी भाषांतर केले असे म्हणतात, तो बुद्धघोष नामक एका बुद्धाने लिहिलेला ग्रंथ होता असेही कोणी सांगतात. धर्मोज्जीवनी सभेने अलीकडे प्रसिद्ध केलेल्या ग्रंथात असे आढळते कीं, वज्रसूचिनामक एक उपनिषद् आहे. पण त्यातील तात्पर्य इतकेच आहे कीं, अभ्युदय व निश्रेयस् ह्यांच्या प्राप्तीला जातिनिष्ठ श्रेष्ठतेची आवश्यकता नाही. प्रत्येक मनुष्याला आपल्या उत्कर्षाचा मार्ग मोकळा आहे. पण ह्याचा अर्थ ब्राह्मणजातिनिष्ठ वैदिक धर्माला शूद्र अधिकारी ठरतो असा नव्हे. तसेच अवधूतो गृहस्थो वा ब्राह्मणोऽब्राह्मणोऽपिवा। तन्त्रोक्तेष्वेषु मन्त्रेषु सर्व्वेस्युरधिकारिणः ॥ हे एक तांत्रिक वचन राममोहन ह्यांच्या तोंडीं घालून गायत्रीमंत्राचे अधिकारी स्त्री व शूद्रही आहेत असे राममोहन ह्यांचे मत असल्याचे कोणी सांगतात. परंतु वेदोक्तमंत्र असा अर्थ वरील वचनांतून निघत नाही हे उघड आहे. तसेच गायत्रीमंत्र व त्यावरील भाष्य यांचे जरी राममोहन ह्यांनी इंग्रजींत भाषांतर केले आहे तरी वेदपाठ जातिब्राह्मणांनीच म्हणावे इतकेच काय पण ते अब्राह्मणांनी ऐकूही नयेत अशी व्यवस्था खास ब्राह्मप्रार्थनामंदिरांतही राममोहन ह्यांनी ठेवली होती. ही गोष्ट निर्विवाद आहे. तेव्हा चातुर्वर्ण्याचे विरोधी राममोहन होते, असे म्हणणे कठीण आहे. निदान समाजात राहूनच समाजसुधारणा केली पाहिजे, या कारणास्तव तरी त्यांनी स्वतः ब्राह्मणजातीचा अभिमान कधीच सोडला नाहीं असे म्हणावे लागते. त्यासंबंधीं ब्राह्मसमाजाचे इतिहासकार लिओनार्ड यांचे असे म्हणणे आहे कीं, राजा राममोहन यांच्या ठिकाणी त्यांच्या जातीसंबंधीं आस्था दिसते, त्यावरून त्यांस जातिभेद मान्य होता असे मुळींच नसून हिंदुधर्मशास्त्र व हिंदुरिवाज ह्याप्रमाणे जातिबहिष्कृताचा मिळकतीवरील हक्क नष्ट होतो, आणि समाजांतील त्याचे वजनही

नाहींसे होते; म्हणून त्यांना आपली जात सोडतां आली नाहीं. कारण त्या वेळीं त्यांनीं जर आपली जात साडली असती तर त्यांचे स्नेही व अनुयायी हेही त्याचे थाऱ्यास उभे राहातेना. अर्थात् धर्मसुधारणा घडवून आणणे त्या-योगे अशक्य झाले असते.

राजा राममोहन ह्यांची औपनिषद विषयक वेदान्तावरील निष्ठाही अशीच लोकसंग्राहक बुद्धीनें त्यांनी अंगिकारलेली असून ती केवळ दिग्वाऊ होती, खरी नव्हती, असेंही कित्येक म्हणतात. पण हेही म्हणणें आम्हास सर्वांशीं ग्राह्य वाटत नाही. राजा राममोहन यांनी अखेर तीन वर्षे ग्वास विलायतेत काढलीं. त्या वेळी त्यांनी आपल्याबरोबर ब्राह्मण व दुभत्या गाई वगैरे तयारी नेलीच होती. परधर्मीयाबरोबर त्यानी उघड उघड तरी सहभोजनाचे प्रकार कधींही केले नाहीत. इग्लंडात असता ईस्ट इंडिया कंपनीच्या कोर्ट ऑफ डिरेक्टर्सनीं त्यास मेजवानी दिली, त्यावेळी आणि तसेच फ्रान्सचा राजा लुई फिलीफ यानें त्यांचे सन्मानार्थ दोनदां दरबारी खान्याचा समारंभ केला, त्या वेळी, त्यांनी भात व पाणी या दोन पदार्थास स्पर्शमात्र केला; पण कशाचेंही सेवन केले नाही. अशा रीतीनें त्यांनी परदेशीही दरबारी थाटाच्या मोहास वश न होता आपल्या धर्मातील जातिनिर्बंध फार कडक रीतीने पाळले. शेवटीं युरोपि-अन स्त्री-पुरुषाच्या परिवारात इंग्लंडात त्याचे देहावसान झाले, तेव्हां त्याचे गळ्यात यज्ञोपवीत शाबूत होतें. इतकेंच नव्हे तर सर्व वेदाचें सार अशा प्रणवाचा उच्चार करून अखेर त्यांचे प्राणोत्क्रमण झाले. आणि त्यांच्या इच्छे-प्रमाणें त्यांचे सर्व और्ध्वदेहिकही शक्य तो हिंदूंच्याच रिवाजाप्रमाणे रामरतन यानें केलें हीही गोष्ट प्रसिद्धच आहे.

तात्पर्य, शक्य तो हिंदुधर्मासच धरून वागण्याचा त्यांचा विशेष कटाक्ष असे, असें दिसते. शास्त्राचा खरा आशय काय आहे तो आपल्या बुद्धीने ठरवून त्याप्रमाणें देशकालानुरूप आचारास जरूर तेथे नवीन वळण देण्याचा त्यांचा प्रयत्न असे. परदेशगमन ही अशीच एक बाब होती. त्या कामीं लोकापवादास न जुमानतां परंतु शक्य तितकी शास्त्रमर्यादा संभाळून परदेश-गमन करण्याचा धडा पुढील पिढीस त्यानी घालून दिला. असे सांगतात कीं, विलायतच्या जलपर्यटनाची पूर्वतयारी म्हणून ते नेहमी खुर्चीवर न बसतां झोपाळ्यावर बसत, व झाडाला दोर टांगून मुलांबरोबर पुष्कळ झोके घेत.

समुद्रांतून परदेशगमन करणारा हाच पहिला ब्राह्मण होय. त्यांच्या मागून त्यांचे मित्र द्वारकानाथ बाबू यांनी इंग्लडात जाऊन आपल्या मित्राच्या अस्थि कार्नोज व्हेल येथे नेऊन त्यांवर एक सुंदर स्मारक उभारले. त्यावरील शिलालेख अद्यापही राममोहनांचे चरित्रातील रहस्य सांप्रदायिक जगास सांगत आहे. तो शिलालेख असाः—

" ह्या शिलेखाली ज्यांच्या अस्थि आहेत त्या राजा राममोहन रायबहादूर ह्याची एक्या परमेश्वरावर अचल निष्ठा होती. त्या परमेश्वराची निस्सीम-भावाने आराधना करण्यात त्यानीं आपले जीवित अर्पण केले होते. त्यांच्या आंगच्या विशाल बुद्धिमत्तेस अनेक भाषावरील प्रभुत्वाची जोड मिळाली होती. त्यामुळे त्याच्या काळातील फार जाड्या विद्वानात त्यांची लवकरच गणना होऊं लागली. हिंदुस्थानांतील लोकाची सामाजिक, नैतिक व शारीरिक स्थिति सुधारावी म्हणून त्यानी घेतलेले अविश्रांत श्रम, सतीची रूढि व मूर्तिपूजा बंद करण्याकरितां त्यांनीं केलेले कळकळीचे प्रयत्न आणि ईश्वराचे वैभव व मनुष्यमात्राचे कल्याण जेणेकरून वाढेल अशा गोष्टींचा त्यानी उत्साहपूर्वक केलेला पुरस्कार, ह्याची त्याच्या देशबांधवास कृतज्ञतापूर्वक स्मृति आहे. त्यांच्या वंशजाची त्याजबद्दलची स्मृति दुःखाने आणि अभिमानाने जागृत आहे, ह्या गोष्टीचे हा शिलालेख हे एक द्योतक आहे."

हिंदुस्थानातील सुधारकांचे अग्रणी या दृष्टीने राममोहन याच्या चरित्रास फार महत्त्व येते. कित्येकाचे म्हणणे असेही आहे कीं, राममोहन यांची खरी किंमत निदान त्याच्या हयातींत तरी तत्कालीन हिंदुलोकापेक्षां युरोपियन लोकासच जास्त समजली; किंबहुना त्याच्या देशबंधूकडून त्याचा छळ व अनादरच झाला व पाश्चात्यानी त्याना बहुमानाने झेलून धरिले. फार काय पण त्याचे कट्टे वादी श्रीरामपूरचे मिशनरी डॉ० मार्शमन् यांनीही त्यांच्या अचाट बुद्धिमत्तेबद्दल धन्योद्गारच काढले.

इंग्लंडांत तर त्याचा जो सत्कार झाला तसा सत्कार आजपर्यंत कोणत्याही भारतीयाचा झाला असेल असें वाटत नाहीं. त्यांनी आपल्या विशाल बुद्धीनें व मनमिळाऊ स्वभावाने इंग्लंडांतील कित्येक स्त्री-पुरुषांस चटका लावून सोडला व अमेरिकेसारख्या दूर देशच्या लोकांचे लक्ष आपल्याकडे ओढून

घेतले. व पुढें हीच परंपरा स्वामी विवेकानंद, श्रीरामतीर्थ, बाबू प्रतापचंद्र, इत्यादि भारतीय धर्मवीरांनीं आजपर्यंत चालविली. आश्चर्याची गोष्ट ही कीं, अशा या युगधारी मानलेल्या थोर भारतपुत्राच्या चरित्रांतील कची हकीकत व त्यांच्या विविध व्यापाचा तपशील आम्हांस मिस कार्लेट व मिस् कार्पेंटर-सारख्या ख्रिस्ती विदुषी स्त्रिया व मिस्तर अॅडमसारखे पाद्री याच्या लेखांतूनच मिळविणे भाग झाले आहे.

इंग्रजाबद्दल राजा राममोहन राय याच्या ठिकाणीं विशेष आदर असे. इंग्लंड-चे राजे चवथे जॉर्ज यांच्याबद्दल राममोहन यानीं सर्वलोपरी अत्यंत गौरवपर उद्गार काढले आहेत. एकंदरीत इंग्रजी राज्यकर्ते जरी परकीय आहेत, तरी त्याच्यामुळे आपल्या देशाची स्थिति लवकरच सुधारेल, असा त्याचा विशेष भरंवसा होता. त्यांचे सामाजिक अगर राजकीय चळवळीत सरकारनी त्याच्या हातीं मुळींच यश लागू दिले नाहीं. परभारें शेवटच्या मोगल बादशहानीं राम-मोहन यास दिलेली 'राजा' ही पदवीही सरकारनी त्यांस स्वीकारूं दिली नाहीं. मोगल बादशहायतीच्या वकिलायतीचे श्रेयही त्यांच्या पदरात न पडेल अशी सरकारने काळजी घेतली. इत्यादि अनेक निराशाजनक प्रसंग आल्या-मुळे त्याच्या विचारांत शेवटीं काय फरक पडला असेल, ते समजण्यास आज साधन नाहीं. त्याच्या विचाराचा पूर्ण परिपाक होऊन त्यास स्वदेशीं आल्या-वर व्यवस्थित व मूर्तस्वरूप येण्याच्यापूर्वींच त्याची अवतारसमाप्ति झाली. समाजाचे दुर्दैवाने पुष्कळ थोर पुरुषाचे असेच होते. ते कांहींही असो. एकोणिसाव्या शतकातील हिंदुस्तानच्या नवशिक्षितास धर्माच्या व राजकारणाच्या बाबतींत नवीन वळण लावून देण्याच्या कार्यास राजा राममोहन ह्याजपासून सुरुवात झाली ही गोष्ट खरी. त्यामुळेच या युगास कित्येक 'राममोहनयुग' असे म्हणतात.

राजा राममोहन हा ऋषींचा आनुवंशिक, ख्रिस्ताचा चेला, एकमेवाद्वितीय अशा ब्रह्माचा निष्ठावंत उपासक, स्वातंत्र्याचा कट्टा भक्त, दुःखी जनांचा सहृदय मित्र, संकटग्रस्तांचा शूर कैवारी, मुलांचा आनंदी सवंगडी, मुत्सद्द्यांचा पोक्त सल्लागार, विश्वाची छबी प्रतिबिंबित करणारा असा आगामी वंशाचा एक आदर्शच होता; असे तत्सांप्रदायी मानतात हे ठीकच आहे. कारण त्यांनीं वैदिक वाङ्मयाचा उद्धार केला, त्यास बायबल व कुराणाची जोड

करून घेतली, एकेश्वरी उपासनेचा नवीन पंथ रूढ केला आणि अकबराच्या सुखस्वप्नाला ध्येयरूपांत आणलें; अशा रीतीनें नवभारताचा जीवनप्रवाह उत्तरोत्तर अधिकाधिक व्यापक व सुखाचा करणारा राममोहन हा एक आधुनिक भगीरथच होय, असेंही मानण्यांत येते. कित्येक म्हणतात कीं, राजा राममोहन यानी परिस्थितीस वश न होता त्यांनीं परिस्थितीशी झगडा करून आपणास अनुकूल असे वातावरण तयार केलें. परकीय राजसत्ता व स्वकीय धर्मसत्ता याजपुढे वांकून न राहतां त्यानी आपलें व्यक्तिमाहात्म्य उघड रीतीनें प्रगट केलें. देशी वाङ्मय, धर्म व राजकारण ह्यांस आपल्या तीक्ष्ण बुद्धीनें भट्टीत तावून त्याचें स्वरूप त्यानी उज्ज्वल केलें, त्याच्याइतका विद्वान् व कार्यकर्ता पुरुष त्याच्या काळीं बंगाल्यात किंबहुना हिंदुस्थानात दुसरा क्वचितच झाला असेल. आम्हास अभिमानास्पद असे आमचें हिंदभूमीचें अमोलिक शिरोभूषण हरपलें म्हणून त्याचे कट्टे प्रतिस्पर्धीही त्यांच्या पश्चात् हळहळू लागले. ज्यास ते पूर्वी कलिपुरुषाप्रमाणे निंद्य वाटले अशा कांहींनी शंकराचार्यांचे पश्चात् असा बुद्धिमान् पुरुष झाला नाही असेंही कबूल केलें. राजकीय, धार्मिक आणि आर्थिक दृष्टीनें आपल्या देशबांधवांची झालेली हीन स्थिति पाहून राममोहनाचें अंतःकरण करपून जाई. इंग्लंडमध्ये एका रविवारी प्रार्थनेस ते गेले असता एकाएकीं त्यांचे डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या, ते पाहून शेजाऱ्यानें त्यास कारण विचारता माझ्या देशबांधवाच्या हीन स्थितीचें स्मरण होऊन माझें अंतःकरण भरून आलें असें त्यानी सांगितलें. राममोहन यांचें मन जसें कोमल होतें तसेंच मोठें होतें. आजच्या विश्वकुटुंबाचे पुढारी रवींद्रनाथ व महात्मा गांधी यांच्याप्रमाणे त्याच्याही अभिमानास देशमर्यादा नव्हती.

वर्णभेदाप्रमाणे स्वधर्म व स्वदेश ह्याच्याशींही तादात्म्य न पावतां अखिल मानवजात बंधुभावानें कशी नांदेल, इकडे त्याचें लक्ष होतें. सर्व जगाचा नियंता असा जो एकच ईश्वर त्यास प्रार्थनादि साधनांनी प्रसन्न करणे हेंच सर्व धर्मांचें रहस्य आहे, अशा भावनेनें जगांतील धर्मविरोध कसे नाहींसे होतील, हा एक फार मोठा व्यापक प्रश्न हिंदी लोकांपुढेंच काय पण ख्रिस्ती जगापुढेंही राममोहन ह्यांनीं प्रथमच मांडला.

**सारेच धर्म खरे आहेत. व त्या सर्वांचे पर्यवसानही एकच आहे. यास्तव**

ज्यांनीं त्यांनीं आपापल्या धर्माप्रमाणे एकनिष्ठेने वागावें हे तत्त्व अगदींच वेगळें असून ह्याचा पुरस्कार श्रीरामकृष्ण परमहंस यांनी केला, त्याचा विचार पुढे येईलच; परंतु सर्व धर्मांतील सामान्य तत्त्वास प्रामाण्य देऊन त्या तत्त्वांचा एक शाश्वत सार्वत्रिक धर्म रूढ करणे व प्रत्येक धर्मातील इतर भागास गौण लेखून त्याचा क्रमशः त्याग करणे ह्या तत्त्वाचा पुरस्कार ब्राह्मसमाजानें केला. आणि त्याचा पाया राजा राममोहन ह्यानींच प्रथम घातला. ह्याच मुद्द्यास अनुलक्षून न्या० रानडे राजा राममोहन याच्यावरील एका व्याख्यानात असे म्हणतात कीं, "आपल्या आत्म्याचा द्विधाभाव जाऊन एकनिष्ठा फिरून प्राप्त होईल असा निर्णय किंवा उपाय आपण शोधून काढाल अशी मी आशा करितो. आणि आपले अंतःकरण व बुद्धि यात एकवाक्यता उत्पन्न झाली व आपले आचारविचार यांत अविरोध असला म्हणजे आपल्या पचवीस कोट प्रजेत कधीं न भंगणारे असे ऐक्य होऊन, आपल्या भागवत धर्मास सामर्थ्य प्राप्त होईल. ख्रिस्ती, मुसलमान व आर्य धर्मामधील इतिहासपरत्वे जे भेद आहेत ते राहातील पण ते इमारत बांधण्याच्या ज्या नाना तऱ्हा आहेत त्या रूपाने राहतील; ख्रिस्ती चर्च, ब्राह्ममंदिररूपानें, महमदी मशिदीप्रमाणे किंवा आर्य देवळाप्रमाणे दिसणार नाही, हे खरे. तरी बाह्य स्वरूपात व पद्धतीत भेद असले तरी त्यामुळे सर्वाचा धार्मिक जो उद्देश त्यास विरोध येणार नाहीं. व ही गोष्ट सिद्ध झाली म्हणजे सर्व धर्मांचे ऐक्य व्हावे ही जी थोर कल्पना राजा राम-मोहन राय याच्या हृदयात सतत वागत असे, ज्याविषयी त्यास निदिध्यास होता, तीही सफळ होईल व मग सर्व देशातील लोकाना एकवाणीने असे म्हणता येईल कीं, "ईश्वराचे राज्य आले व स्वर्ग आता पृथ्वीवर अवतरला." ही उदात्त कल्पना राममोहन याच्या ट्रस्टडीडमध्ये बीजरूपाने आहे. पण "त्या उदात्त कल्पनेचे रहस्य त्याच्या अनुयायाना देखील अजून पुरतेपणी कळलें नाही, आणि त्या कल्पनेचा पूर्णभाव आपल्या सर्व लोकाच्या ध्यानात येण्यास अद्याप बरीच शतके लागतील." असे न्यायमूर्तीस त्यावेळी वाटत होते. ते खरे नाही असे आज तरी कोण म्हणेल ? जी कल्पना शंभर वर्षांनतरही लोकाच्या अंतःकरणांत बाणली नाही, ती राममोहन याच्या काळी अगर तत्पूर्वी लोकाच्या अंतःकरणांत वागत होती असे तरी कसे म्हणावे? समष्टीची तीव्र वासना हीच थोर पुरुषाच्या जन्मास कारण होत असते, असे कित्येक

समजतात. परतु ब्राह्मलेखकांच्या म्हणण्याप्रमाणे राममोहन यांच्या जन्मकाळीं हिंदी समाज इतका विस्काळित, बेजबाबदार व शीलभ्रष्ट झाला होता की, त्या वेळीं सर्वांनी एक समाईक अशी शुचि व तीव्र वासना धरावी हीच गोष्ट दुरापास्त दिसते. अशा परिस्थितींत जन्मास आलेले राजा राममोहन, हा एक लोकोत्तर चमत्कारच होय.

राममोहन यांच्या वडिलांचे कुल वैष्णव तर आईचे कुल शाक्त होते. राममोहन याचा विवाह ब्राह्मप्रकाराचा नसून शैवप्रकारचा होता. ह्या तत्कालीन शैव विवाहांतील शक्ति (स्त्री) बहुधा अहिंदूच असे. राममोहन हे शेवटपर्यंत यज्ञोपवीत धारण करणारे ब्राह्मण होते. पण त्यानी एका मुसलमान मुलास दत्तक घेतलें होतें. तसेच ते एका खिस्ती मुलाचे धर्मपिते होते.

राममोहन याचा दिनक्रमही आपल्याला थोडा विलक्षणच वाटेल. ते रोज नेमाने पहाटे उठून फिरायला जात. नतर अभ्यगस्नान करीत. याच्या अगाला तेल लावून मर्दन करावयास दोन पेहलवान लागत. हं चपींचे काम सुरू आहे तो एकीकडे ते मुग्धबोध व्याकरणाचा पाठ म्हणत. व कोणी त्यांस त्या दिवसाचीं वर्तमानपत्रे वाचून दाखवीत. नतर बंगाली ब्राह्मणी थाटांत खालीं बसून दूधभात व मासे याची न्याहारी होत असे; मागून तालीम होत असे. पुढे दहा वाजता जेवण, दोन वाजेतो साहेबांच्या भेटी, तीन वाजतां चहा, पाच वाजतां फराळ, नंतर सायंकाळची सहल, रात्रीं इग्रजी थाटांत मुसलमानी खाना व पुढे मध्यरात्रीपर्यंत लेखन, असा त्यांचा दिनक्रम असे. ते घरी नेहमी मुसलमानी पेहरावातच असत. घरांतही बोडके बसत नसत. अशा या लोकविलक्षण पुरुषास आजपर्यंत कोणी राजा तर कोणी राजर्षि म्हणून संबोधितात. कोणी मौलवी किंवा जबरदस्त म्हणतात, तर कोणी भविष्यवादी व कोणी त्रिकालज्ञ म्हणतात. असा युगधारी पुरुष निदान हजार वर्षांत तरी झाला नाही असा कोणी गौरव करतात. तर कोणी शंकराचार्य, चैतन्य, नानक, कबीर अशांच्या ते पासंगासही पुरणार नाहींत असेही सांगतात. कोणाच्या मते हिंदु, खिस्ती व महंमदी धर्मांचे ते खरे शास्ते होते, तर दुसऱ्या कोणाच्या म्हणण्याप्रमाणे वेद, कुराण व बायबल यांवर त्यांचा काडीचाही भरंवसा नव्हता. उलट शास्त्र, गुरु व ईशप्रेषित या त्रयीविरुद्ध त्यांचें उघड बंड होतें.

हिंदी लोकांना पौर्वात्य पद्धतीचें अगर पश्चिमेकडील शिक्षण द्यावें, ह्या कित्येक दिवसाच्या लढ्यांत पाश्चात्य शिक्षण इंग्रजींतून द्यावें, असें सरकारनें ठरविण्यात राममोहन प्रमुखत्वानें कारणीभूत झाले, म्हणून त्यांस अर्वाचीन हिंदुस्थानचे जनक ठरवून त्याचे कोणी धन्यवाद गातात, तर कोणी ही त्यांनीं फारच मोठी घोडचूक करून हिंदुस्थानच्या प्रगतींत त्यास निदान शेपन्नास वर्षे मागें ओढलें असा त्यास दोष देतात. राममोहन ह्याच्या खाजगी वर्तनाबद्दलही लोकांनीं आक्षेप घेण्यास कमी केलें नाहीं. त्यांनीं वाढविलेला मुलगा त्यांचाच दासीपुत्र असावा. सालीना दहाहजार रुपये उत्पन्नाची जिंदगी राममोहन यांनीं अवघ्या दहा वर्षांच्या शिरस्तेदारींत मिळविली ती प्रामाणिकपणानें मिळविली नसावी, वगैरे शिंतोडे लोकापवादानें उडविलेच, परंतु ते आरोप निराधार व द्वेषमूलक आहेत, अशाबद्दल राममोहनाच्या चरित्रकारांचें एकमत दिसतें.

तात्पर्य, राजा राममोहन यांच्याइतका व्यापकबुद्धीचा पुरुष आपल्या प्राचीन ऋषींत अथवा पूर्वाचार्यांत आजपर्यंत कोणीही झाला नाहीं, असें त्यांचे अनुयायी ज्याप्रमाणें आजही ठासून सांगतील, त्याचप्रमाणें कोणी पुराणमताभिमानी लोक असेंही म्हणतील कीं, स्वराज्यसूर्याच्या अस्ताचे राक्षसी वेळीं व्यामोहित झालेल्या बंगाली जनतेस झालेली विपरीत कामना राममोहनरूप विष्णुद्वेष्ट्या हिरण्यकश्यपूच्या रूपानें फळास आली! तसें मानलें तरी त्यांच्या पुढल्या पिढींत प्रल्हादरूप केशवचंद्रांचे चरित्रांत वैष्णव ऊर्फ भागवतधर्माचें सुंदर मूर्तस्वरूप नजरेस पडेल, अशी आशा करण्यास पुष्कळच जागा होती! परंतु त्या भक्त प्रल्हादाचेंही शील अकालींच हरण करणाऱ्या इंद्रसत्तेस नमस्कार असो!

आज हिंदी जनतेपुढें हिरण्यकश्यपू नाहीं, आणि प्रल्हादही नाहीं. तर बलिष्ठांकडून त्रिपादभूमि मागण्यासारखा आजचा प्रसंग कित्येकास दिसतो आहे. व लोकांचे डोळे तिकडेच लागले आहेत. 'स्वराज्य' हीं तीन अक्षरें हेच ते त्रिपाद होत. हे त्रिपाद त्रैलोक्यव्यापि नसून केवळ स्वदेशानेंच मर्यादित आहेत. परंतु दृष्टान्तातील मागणाऱ्याचा अधिकार व देणाऱ्याचें दातृत्व ह्या दोन्ही गोष्टींचा दार्ष्टांताच्या ठिकाणीं अभाव असल्यामुळे दृष्टान्ताची पूर्तता होत नाहीं. ह्या बाबतींत दात्याचें औदार्य परस्वाधीन असलें तरी

मागणींतला ओजस्वीपणा आपल्या स्वाधीनचा आहे. राममोहन हे सनदशीर चळवळीचे आद्यप्रवर्तक खरे. पण त्यांचा काल म्हणजे परकीय सत्तेच्या स्वागताचा होता. निदान राममोहन यांनीं तसा तो मानला होता. आणि म्हणून त्याच्या कित्येक धार्मिक लेखाच्या शेवटीं ब्रिटिशांची सत्ता हिंदुस्थानात प्रस्थापित झाल्याबद्दल धन्योद्गार व तीच पुढे शेकडो वर्षे हिंदुस्थानात सुखाने नांदो, अशी अगदी मनोभावाने केलेली 'शांति' आढळते.

राममोहन यांचीं राजकीय धोरणे कशा प्रकारचीं होतीं, ह्याचा विचार ह्या ग्रंथांत करणे अप्रस्तुत आहे, म्हणून त्यासंबंधीं अधिक कांहीं न लिहिता, हिंदुधर्माचे सुधारक किंवा नवयुगधर्माचे एक संस्थापक ह्या दृष्टीने त्यांच्या चरित्राचा विचार करता, त्यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेच्या मानाने त्यांना यश यावे तसें आलें नाहीं असें उघड दिसते. ह्या अपयशाची मीमांसा निरनिराळ्या तऱ्हांनी होणे संभवनीय आहे. एखादा प्रांत काबीज करावयाचा असला म्हणजे चढाई करून जाणारा सेनानी पांच मैलाचा टप्पा पदरांत पाडण्यास एकदम धडाडीने दहा मैल प्रतिपक्षाच्या अंगावर जातो, व मग कुशलतेने प्रतिपक्षाला गुंतवीत एकीकडे थोडथोडी माघार घेत असता दुसरीकडे आपल्या इष्ट मर्यादेपर्यंतचा मुलूख बंदोबस्तानें पुरा पचनीं पाडतो, त्याप्रमाणे राममोहनसारख्या क्रांतिकारक सुधारकांचेही डावपेच असूं शकतील व ह्याप्रकारें पाहता राममोहन हे पुरे यशस्वी झाले असेंही कोणी म्हणेल, शिवाय समष्टिरूप जनतेत नैतिक अगर धार्मिक क्रांति घडवून आणणे किंवा त्या बाजूनी विशेष प्रगति घडविणे हे काम इतके अवघड आहे कीं, ते घडवून आणणे एखाद्या व्यक्तीच्या शक्तीच्या बाहेरच असते. मग ती व्यक्ति श्रीजगद्गुरूंचीच असली तर गोष्ट वेगळी; असेंही कोणी म्हणतील! पण ह्या युक्तिवादाने वाचकांचे समाधान होईल असें वाटत नाहीं. कारण राममोहनांच्या पूर्वचरित्राकडे पाहतां त्यांच्या अपयशाचे कारण दुसऱ्याही तऱ्हेने दाखवितां येण्यासारखे आहे.

राममोहन यांनीं इ. सन १८२८सालीं म्हणजे आपल्या वयाच्या ५६व्या वर्षी ब्राह्मसमाज स्थापन केला, तोपर्यंतच्या काळाचे चवदा चवदा वर्षांचे चार सारखे भाग आम्हीं पूर्वी कल्पिले आहेत, त्यापैकीं ते आपल्या वयाच्या चवदावे

वर्षानंतर घराचे बाहेर पडून कलकत्त्यास स्थाईक होईपर्यंतचा २८ वर्षांचा काळ फार चिंतनीय आहे. ते चवदावे वर्षी घराच्या बाहेर पडल्यानंतर त्यांच्यावर कोणाचेच नियंत्रण राहिले नाही. त्यांच्या बालभावाने त्याच्या धर्मशीलाचे रक्षण करावे तर तोही तर्कटी शिक्षणानें नष्ट झाला होता. अशा स्थितींत एके बाजूस अत्यंत बेजबाबदारपणा, तर दुसरे बाजूस पोटाची पंचाईत, अशा समयीं निरंकुशवृत्ति व आचारशैथिल्य ही दोन्ही अगदीं सहज प्राप्त, नव्हे जवळ जवळ अपरिहार्यच होती. त्यातही आणखी स्वकीयांकडून बहिष्कृति व परधर्मीयांची उपकारक संगति, असा योग आल्यामुळे त्याच्या चारित्र्याची भवितव्यता ठरूनच गेली होती असेही म्हणतां येईल. त्यांनी काशीस राहून संस्कृतविद्येचे अध्ययन केले असे म्हणतात. पण त्या काळची त्यांची रहाणी व त्याची गुरुपरंपरा याबद्दल तपशीलवार माहिती आम्हांस उपलब्ध झाली नाहीं. ब्राह्म व ख्रिस्ती इंग्रजी लेखकांनीं जी माहिती प्रसिद्ध केली आहे, त्यावरून त्यांच्या क्षेत्रवासातील चरित्राबद्दल कांहींच कल्पना होत नाहीं. तेव्हां तो अज्ञात काळ सोडून ठळक रीतीनें त्याच्या चरित्राकडे पाहतां कोणी टीकाकार असेही म्हणतील की, परिस्थितीमुळे क्रियाहीन राहिलेल्या मनुष्याने शास्त्रीय कर्मांची अनावश्यकता सांगावी, शिस्तीचे अभावामुळें उत्पन्न झालेल्या स्वैर मनोवृत्तीला ज्ञाननिष्ठा मानावे, स्वार्थप्रेरणेने परधर्मीयांशीं सहकारित्व प्राप्त झाले असतां, परमतसहिष्णुता दाखवावी, शिरस्तेदारीच्या ओळखीवर श्रीमान् मारवाडी व दुसरे बडे जमीनदार आकर्षित करून त्यास आत्मीय सभा म्हणावे, ह्या वरवर भूषणावह म्हणून दिसणाऱ्या गोष्टी खरोखर तशाच आहेत असे का मानावे ? ऐन पंचविशींतील त्यांची स्वैरवृत्ति, पुढील शिरस्तेदारी, त्यानतरचा राजविलासी दिनक्रम, स्वकीयाची तिरस्कृति, आडून केलेले घरसोडीचे 'निनामी' वादविवाद आणि अखेरची धंदेवाईक वकिलायत, इत्यादि त्याच्या चरित्रातील अगदी ठळक गोष्टी लक्षांत घेतल्या तर त्यांच्या योगाने, त्यांची कामाची धडाडी, बुद्धिमत्ता, अष्टपैलूपणा, मुत्सद्दीगिरी, इत्यादि अनेक गुणांत कमतरता न आली, तरी इतकेही करून ते धर्मवेडे अथवा देवपिसे होते असे तरी कोण म्हणेल ! आपले निवृत्तिशील धर्मात्मे साधुसंत तर असोतच, पण अत्यंत प्रवृत्तीचे राजकारणी लो० टिळक व म० गांधी, ह्यांची देहगेहादिक स्वास्थ्यासंबंधीं सहज असलेली

अनास्था व कार्यावरील असिधारेप्रमाणे तीव्र असलेली निष्ठा पाहिली, म्हणजे लोकाग्रणींचे माहात्म्य कशांत आहे ते कळून येतें.

आतां कित्येक सत्पुरुष रंगनाथासारखे राजयोगीही असतात हे खरें. पण येथे केवळ राजयोग कीं वैराग्ययोग हा एकच विचार नाहीं. ज्यास तीव्र धर्म-जिज्ञासा उत्पन्न झाली, तो असले विविध व्यवसाय व नाचरंग करीत बसेल काय, हा तर प्रश्न आहेच. पण याहीपेक्षा ज्यांनीं शास्त्रीय कर्म व सगुणोपासना ( मूर्तीची ) ह्यांचा पुरा अनुभव घेतला नाही, त्याच्या तत्संबधीं निषेधास तरी कोण महत्त्व देईल ? स्वमतनिष्ठा असल्याशिवाय परमतसहिष्णुता कशी मानावी. स्वमत स्वाभिमानपूर्वक असेल तरच धर्मौदार्याचे भूषण; एरव्हीं मनाचा लवचिकपणा काय कामाचा ! वामनपंडित म्हणतातः—आपला एक सिद्धांत धरावा। तेव्हां वादी यासी वाद करावा। अन्यथा त्या वादास परावा। वितंडवाद म्हणे ॥ १ ॥ राममोहन यांच्या अपयशाची अशीही एक मीमांसा होऊं शकते. हिंदुधर्मातील साधनांची विविधता व उपास्यांची अनेकता, ह्यांचा राममोहन ह्यांनी निषेध केला आणि वेदप्रामाण्यही ( कित्येकांच्या मताप्रमाणे ) केवळ बाह्यतः मात्र मानले. निदान सनातनीयाप्रमाणे समग्र वेद त्यानीं प्रमाणभूत मानिले होते असे दिसत नाहीं. अशा रीतीने ( लोकमान्यांच्या ) हिंदुधर्माच्या व्याख्येतूनच स्वय-बहिष्कृत झाल्यामुळे हिंदु समाजाच्या विश्वासाला ते पात्र झाले नाहींत, यांत नवल नाहीं. आतां त्याची जन्मभूमि व पुण्यभूमि हिंदुस्थान हेच असल्यामुळे त्यांस व त्यांच्या अनुयायांस हिंदु मानणे ही देशकालानुसार उत्पन्न झालेली अलीकडील नवीन दृष्टि वेगळी आहे. पण ह्या दृष्टीचा फायदा घ्यावा अशा-बद्दल त्यांच्या अनुयायांतही अद्याप एकमत नाहीं ! असो.

केवळ धार्मिक दृष्टीने पाहतां हिंदूंच्या परंपरागत चालत आलेले व अनु-भवाने सिद्ध झालेले निरनिराळे संस्कार, साधनें व उपासना यांचा असा निषेध करण्यांत राममोहन ह्यांनीं अविचार केला, असेच आम्हांस वाटते. ह्या गोष्टीचे प्रत्यंतरास एक श्रीरामकृष्णपरमहंसांचे चरित्र पुरेसे आहे. तसेंच देवघरांतील राधागोविंदास स्थानभ्रष्ट करून दारच्या 'मंचाला' ( वेदीला ) तिन्हीत्रिकाळ प्रदक्षिणा घालीत बसण्यांतही त्यांची विवेकबुद्धि दिसून येत नाहीं. पंडित मृत्युंजय-विद्यालंकार किंवा शंकरशास्त्री यांच्या

बरोबर वादविवाद करीत असतां हिंदुधर्मातील ज्या गोष्टींचा त्यांनीं अत्यंत उपहास केला, त्या व त्याही पलीकडल्या कित्येक षड्दर्शनकारांच्या मतांचा त्यांनीं मिशनऱ्यांशीं भांडतांना, शिवप्रसाद हे नांव धारण करून जोरानें पुरस्कार केला. यांत वकिलीशिवाय आम्हास दुसरें काहींच दिसत नाहीं. आम्ही घरांत शंभरांविरुद्ध पाच असलों तरी परक्याविरुद्ध एकशेपांच आहोत, ह्या पांडवाच्या उक्तीचाच राममोहन यानी अनुवाद केला असल्यास न कळे. पण ख्रिस्ती मिशनऱ्यास ते इतके परके लेखीत असावेत असे आम्हांस वाटत नाहीं.

राममोहन ह्यानी हिंदूच्या धर्मगुरूंवर सरसहा टीका करताना, हिंदूच्या धर्मगुरूंनीं धर्माचे रक्षण केले का घात केला, ह्याचा पुष्कळच गभीरपणानें विचार करावयास पाहिजे होता. आणि अवघ्या दहा वर्षात दरसाल दहा हजार रुपये उत्पन्नाची मिळकत शिरस्तेदारीवर मिळविणाऱ्या राममोहन यांनीं हिंदूच्या व्रतवैकल्यात भटाभिक्षुकांस मिळणाऱ्या शिध्यावर किंवा दक्षिणेच्या चार पैशावर इतकी करडी नजर करावयास नको होती ! निदान हे बरे होते की, त्याच्या वादविवादातील मुख्य प्रतिस्पर्धि शंकरशास्त्री व मृत्यंजयविद्यालकार हे लोकाच्या शिध्यावरच पोसलेले नसून सरकारी विद्यालयातील अध्यापक होते !

राममोहनसारख्या थोर पुरुषावर टीका करणें म्हणजे संपादकीय हक्काचा आम्ही दुरुपयोग करणे, असे कदाचित् कोणी म्हणतील ! तरी त्याच्या समकालीन त्याच्या बरोबरीच्या थोर पुरुषाची दृष्टि अंगिकारुन काय म्हणावे लागते ते पाहू.

श्रीशंकर, श्रीरघुवीर, श्रीहनुमान श्रीकृष्ण, श्रीकाली इत्यादि निरनिराळ्या उपास्यांची मूर्तिपूजा करणारे व हिंदूंचे चतुर्विध योग, तंत्रे व त्याचप्रमाणे इस्लामी व ख्रिस्तीधर्मातील साधने या सर्वांचा अनुभव घेऊन त्याच्या सत्यतेबद्दल व अमोघत्वाबद्दल ग्वाही देणारे श्रीरामकृष्णपरमहंस व त्याचे विवेकानंदापासून तो राजेंद्र कॉलेजच्या आजच्या प्रिन्सिपॉलसाहेबापर्यंत सर्व अनुयायांच्या दृष्टीने राममोहन याची दृष्टि चकली असेच ठरते. अग्निउपासना करणारे दयानंद यांसही ह्याचीं मते मान्य नव्हती हे उघड होते. मॅडम् ब्लॅव्हाटस्की व कर्नल आल्काट यांना ज्या महात्म्याचे दर्शन होऊन गूढ रहस्याचें

ज्ञान झालें तीं गूढरहस्यें राममोहनांस पारखींच होतीं. किंबहुना त्यांच्या त्रयी-वादावरील विवेचनांत धर्मांतील गूढरहस्यावरील त्यांचा अविश्वासच प्रगट होतो.

आतां अखेर केवळ ब्राह्मांच्या दृष्टीने विचार केला तर त्यांतही राममोहन ह्यांच्या अनुकरणापेक्षां विरोधच अधिक दिसतो. राममोहन ह्यांच्या पहिल्या एकेश्वरी प्रार्थना-मंदिरांस त्यांचे शिष्य ताराचंद्र, चक्रवर्ती व चंद्रशेखर देव ह्यानीच विरोध केला. त्यानंतर त्यांचे विदेशी शिष्य पंडित आदम हे फुटून वेगळे झाले. त्यापुढील त्यांचे महनीय शिष्य देवेंद्रनाथ, ह्यांनीं राममोहन यांचे वेदान्तप्रामाण्य सोडून दिले, येशुख्रिस्ताच्या आज्ञाही बिलकुल मानल्या नाहींत. जात्यभिमान टाकला व यज्ञोपवीताचा त्याग केला. पुढे तिसरे जबरदस्त अनुयायी केशवचंद्र ह्यांनीं त्रिकोणावर आधारलेला त्रयीवाद किंबहुना ख्रिस्तीधर्मांतील राममोहन ह्यांस मान्य नसलेल्या सर्व गूढ मतांचा जोराने पुनरुद्धार केला, शंकराचार्यांस अगदींच बाजूला सारून कृष्णभक्त चैतन्य यास ध्येयरूप मानले, आणि वेदशास्त्रांचा आधार सोडून आत्मप्रचीति व आदेश ह्यांवर धर्माधर्माची कसोटी आणून ठेवली.

राममोहन ह्यांच्यासंबंधीं त्यांच्या आजच्या अनुयायांच्या विचारांतसुद्धां महत्त्वाचा फरक आहे. कांहींच्या मताप्रमाणे ब्राह्मधर्माचे खरे शुद्ध स्वरूप राममोहन यांच्या मतप्रतिपादनांत प्रगट झालेच नाहीं. तसेच, ते धर्मसंवाद करूं लागण्यापूर्वीं त्यांच्या धार्मिक विचारांस निश्चित स्वरूप आलेले होते, ते देवेंद्रनाथ किंवा केशवचंद्रसेन ह्यांच्याप्रमाणे आरंभीं कच्चे नव्हते, असे पंडित सीतानाथ म्हणतात, पण ती गोष्ट राममोहन यांचे चरित्रकार हेमचंद्र सरकार ह्यांस कबूल नाहीशी दिसते. त्यांचे म्हणणे राममोहन यांचे विचारसंक्रमण सारखे सुरूच होते व ते अखेर अपूर्णच राहिले. आम्हालाही हेच खरे दिसते. चिकित्सकबुद्धीच्या तीक्ष्ण शस्त्राने प्रचलित धर्मांतील दोषाविष्करण करण्यांतच त्यांचे आयुष्य गेलें. आणि अखेर ह्या निषेधात्मक चिकित्साबुद्धीचे परिणाम किती भयंकर होतात, ते त्यांस फार उशीरां कळून आलें. ह्या चिकित्सकबुद्धीचे पर्यवसान नास्तिकवादांत झालेलें त्यांस कलकत्ता व पॅरिस येथे आढळलें. त्याचा त्यांनीं निषेध केला. एकेश्वरी-पंथाचा बौद्धिकवाद त्यांस रूक्ष व निष्फळ असा वाटूं लागला. इतर कोणत्याही धर्मापेक्षां एकेश्वरीमत तर्कशुद्ध असेल, परंतु त्यांत धर्मशील

नाहीं, धार्मिक भावनांस वाव नाहीं. केवळ बुद्धिवाद वेगळा व धर्म वेगळा. रूक्ष तत्त्वज्ञान वेगळे, व धर्मशील वेगळे. हें राममोहन ह्यांस अखेर कळून आलें. प्रथम आनंदाने ते ज्या बुद्धिवादास शरण गेले होते, त्याचाच जुलूम पुढे त्यांस दुःसह झाला. व त्यांतून आपले धर्मशील मोकळे होईल तर बरे असे त्यांस वाटू लागले. खास इंग्लडांत गेल्यावरही तेथील एकेश्वरी-प्रार्थनामंदिरांत न जातां जुन्यापुराण्या मंदिरांतच जुन्यापुराण्या धर्मगुरूंचीं प्रवचनें आणि प्रार्थना त्यास गोड वाटूं लागल्या त्यांतील रहस्य हेच. स्वदेशी असताना त्याना आपल्या धर्मबांधवाबद्दल कितीही कळकळ वाटत असली तरी त्याच्याबद्दल सरसहा अनादरच वाटत होता. त्यांना हिंदूच्या धर्मगुरूपेक्षा तर्कच अधिक प्रतिष्ठित वाटला. आणि स्वदेशांतील महाजनांचा शोध करून त्यांच्या मार्गाने जाण्याचा त्यांनी प्रयत्नच केला नाहीं. त्यांचा ब्रिटिशांबद्दल मोठा आदर होता: आणि त्यांतही येथें दुसऱ्यास बाटवण्याकरिता येणारे पाद्री व तेथें विलायतेंत स्वधर्मरत असलेले धर्मगुरु ह्यांच्या शीलांत पुष्कळच फरक असल्यामुळे, तेथील कित्येक सच्छील धर्मगुरूंच्या सहवासांत खऱ्या धर्मशीलाचें उज्ज्वल स्वरूप त्यांस अंशतः कळून आलें असावे. आणि ते जर आणखी कांही वर्षे जगते तर कदाचित् "निहितं गुहायां" असें जे धर्मतत्त्व त्याचा निश्चय करण्याकरितां ते एकाद्या तपोवनांत जाऊन बसले असते. किंवा तसें न करते तरी सनातन-धर्म व ख्रिस्तीधर्म ह्यांतील गूढ रहस्यांचा उपहास न करितां सर्व लोकांस बरोबर घेऊन सद्धर्माचा जयजयकारच त्यानीं केला असता. परंतु हे सर्व व्हावयाचें ते अखेर झाले नाहीं. हिंदु धर्मातील वेदान्त, ख्रिस्ती धर्मातील एकेश्वरीपंथ व मुसलमानी धर्मांतील मोहिद्दीन पथ यांचे किंचित् दिग्दर्शन करूनच ते थांबले—नव्हे—ते गेले! फळांना पक्वतेचा रंग चढूं लागल्यावर त्यांनीं वृक्षावर फार दिवस राहूं नये अशीच ईश्वराची नियति दिसते. त्याच-प्रमाणे राममोहन हे रसभरित सुंदरफळ पूर्ण परिपक्व होण्याच्या अगोदरच तें हिंदी जनतेच्या दुर्दैवाच्या आढींत गळून पडलें; आणि त्यांच्या सार्वत्रिक धर्मकल्पनेची कळी तर न उमलतांच कोमेजून गेली! हाच आमचा निष्कर्ष आहे. तात्पर्य इतकेच कीं, राममोहन ह्यांच्या बुद्धिवैभवाच्या मानाने धर्म-संशोधक म्हणून त्यांस जे महत्त्व यावयास पाहिजे होतें, तें, त्यांची धर्मबुद्धि

प्रथम प्रतिकूल परिस्थितीमुळें भ्रष्ट झाल्यामुळें व पुढें त्यांची दृष्टि कार्य-व्याप्तत्वानें विभागली गेल्यामुळे, त्यांस प्राप्त करून घेतां आलें नाहीं. त्या काळीं अमेरिका व युरोप या दोन्ही खंडांत धार्मिक, सामाजिक, व राजकीय स्वातंत्र्याचे चाललेले लढे चित्ताकर्षक होते. तिकडेही राममोहन यांचें लक्ष वेधलें होतें. त्यामुळे दृष्टि फांकून स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान ह्यांचा पारा खालीं उतरणे स्वाभाविक होते. तसेच त्यांनीं इंग्रजी विद्येचा अंगीकार केला, त्यामुळे त्यांची त्रिखंडीं कीर्ति होणे सुलभ झाले असले, तरी त्यांना त्याप्रमाणे परकीय संस्कृतीचा उपसर्ग न होता तर ते कदाचित् प्रतिशंकराचार्य झाले असते, असे महात्मा गांधीसारखे दर्शवितात तेच आम्हांसही खरे वाटते. राममोहन ह्यांचा काळ धर्मग्लानीचा होता. आणि त्या वेळीं हिंदुसमाजांत सुधारणा करण्यासारख्या पुष्कळ गोष्टी होत्या; त्यांचे वर्णन पूर्वीं केलेंच आहे. अशा स्थितींत त्यांच्या चळवळीची प्रतिक्रिया म्हणून जी धर्मजागृति झाली तीं देशास फार उपकारक झाली, ह्यांत शंका नाही. तसेच मिशनऱ्यांना परतविण्याचे त्यांच्या मनांत नसतांही त्याच्या त्रयींवादाच्या कडाक्याने सुशिक्षित लोक भानावर येऊन धर्मांतराच्या संकटास बराच आळा पडला. अशा रीतीनें धर्मरक्षणाच्या कामीं राजा राममोहन ह्यांच्या चरित्रापासून जे अप्रत्यक्ष फायदे झाले, त्यांचें महत्त्व फार आहे हेही विसरतां कामा नये.

राममोहन यांचे जे वर्णन आम्ही येथवर केले त्यांत क्वचित् पूर्वापर विरोधाचाही भास होईल. त्याचे कारण निरनिराळ्या विचारी माणसांच्या मतांचा त्यांत अनुवाद केला आहे, तो परस्पर भिन्नही आहे. राममोहन ह्यांचे चरित्र आम्ही प्रायः तत्सांप्रदायिकांच्या लेखांचे आधारेंच लिहिलें, पण राममोहन यांच्या चरित्राचे गुणदोषविवेचन करीत असतां अखेर आम्ही आपले स्वतांचें मत प्रांजलपणें न सांगणे शिष्टाचारास योग्य दिसणार नाहीं; म्हणूनच ते उघड करण्याचे साहस आम्हीं वर केले आहे. पुष्कळांस ते पटणार नाहीं हेही आम्ही जाणून आहों. श्रीजगद्गुरु शंकराचार्यांच्या तोडीचे किंबहुना त्यांच्याहूनही अधिक, महत्त्व त्यांस देणारे त्यांचे अनुयायी आहेत. परंतु आचार्यांस होऊन आज इतकीं शतकें लोटलीं तरी त्यांच्या मतांची छाप पधरा वीस कोटि लोकांवर आज असली तर अवघ्या पंधरा वीस व्यक्तींवरही राममोहन यांची छाप त्यांच्या पुढल्या पिढीपर्यंतसुद्धां राहिली नाहीं, हें पुढील प्रकरणावरून त्यांनीं पहावें.



महर्षि देवेंद्रनाथांचे वडील राजा द्वारकानाथ टाकूर.

## प्रकरण चवदावें

# नंतरची स्थिति

राजा राममोहन राय ह्यांच्या कारकीर्दीचे रहस्य जे आम्हांस समजलें तें येथवर सांगितले. 'स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती' ॥ ही मोरोपंतांची उक्ति श्रेष्ठ पुरुषांचे चरित्रासही लावतां येईल. थोरांचे चरित्र थोरच जाणोत. राजा राममोहन ह्यांचे लहानमोठे चरित्रग्रंथ देशभाषांतून अनेक झाले आहेत; तथापि त्या सर्वांस बहुतांशीं आधार तत्कालीन ख्रिस्ती लेखकांचे लेखांचाच आहे. हे लेखक कितीही कळकळीचे व प्रामाणिक असले तरी त्यांच्या विचारांचा दृष्टिकोन आपल्याहून भिन्न असणे अपरिहार्य आहे. तसेच ब्राह्मलेखकांचीही दृष्टि निर्विकार व बिनचूकच असेल असे कोणी सांगावे ? अर्थात् एक शतकापूर्वी होऊन गेलेल्या राजा राममोहनांच्या चरित्राकडे आपण पाहतांना हे लेखक जो चष्मा आपणास घालावयास देतात, त्याच्या रंगाची छाया सर्व चरित्रभर पसरून राहणे अगदी स्वाभाविक आहे. तथापि प्रकृत ग्रंथापुरती स्थूलमानाने कल्पना येण्यास राजा राममोहन ह्याच्यासंबंधीं झाले हे विवेचन पुरेसे आहे असे वाटते.

धर्मसुधारणेच्या कामीं राजा राममोहन ह्यांचे लक्ष समाजाच्या वरिष्ठ वर्गांतच गुतून न राहतां सुधारणेचा प्रसार सर्वत्र व्हावा म्हणून त्यांनीं आपले लेख इंग्रजी किंवा संस्कृत भाषापेक्षां बंगाली, हिंदी, फारशी, अशा चालू देशी भाषांतूनच जास्त प्रसिद्ध केले. तथापि धर्माभिमानी जनतेचा विरोध अत्यंत तीव्र असल्यामुळे त्यांनीं आपले संस्थेस स्थायिकपणा येण्याकरिता आपल्या नूतन विचारास अनेक बड्या गृहस्थाची सहानुभूति प्रथम संपादन केली असे दिसते. त्यापैकीं बाबू द्वारकानाथ ठाकूर, प्रसन्नकुमार ठाकूर, कालीनाथ राय मुनशी आणि मथुरानाथ मलीक, हे अत्यंत श्रीमान् गृहस्थ, त्यांच्या संस्थेचे मुख्य आधारस्तंभ होते. पुढे राजा राममोहन ह्यांनीं विलायतेस जाण्यापूर्वीं जे ट्रस्टडीड करून ठेवले, त्यांत महाराजा रामनाथ ठाकूर, कालीनाथ मुनशी हे अत्यंत वजनदार व श्रीमान् गृहस्थ ट्रस्टीज् नेमले असून तिसरे ट्रस्टी यांचे वडील चिरंजीव राधाप्रसाद राय हे होते.

आणि विश्वंभरदास ह्या नांवाचे एक सेक्रेटरी होते. त्याशिवाय सभासदांतही कलकत्त्याचे कित्येक प्रमुख नागरिक होते. ह्याप्रमाणें राजा राममोहन ह्यांच्या अनुयायांची रत्नमाला जरी ठसठशीत आणि वजनदार होती, तरी त्या माळेचा मेरुमणि नाहींसा होतांच त्यांतील एकसूत्रीपणा नाहींसा होऊन एकेक मणि घरंगळूं लागला. समाजाच्या कमानीच्या मुख्य माथ्यावरील चिराच गळून पडल्यामुळे समाजाची केलेली उभारणी फुकट जाण्याची वेळ आली. मधला तुंबाच गेल्यामुळे सभोंवारचे नुसते आरे समाजाचे गाडे चालू ठेवण्यास असमर्थ झाले. राजा राममोहन यांचे केवळ व्यक्तिमाहात्म्यामुळें एकत्र संकलित झालेले जमीनदार, रॉय, चौधरी, मुनशी, मलीक आणि सिंग, ती व्यक्ति नाहीशी होतांच, समाजांत हळुहळू येत नाहींसे झाले. आणि प्रसन्नकुमार ठाकूर, कलकत्त्याचे नामांकित पुढारी व समाजाचे ट्रस्टीज् महाराजा रामनाथ ठाकूर ह्यासही इतर व्यवसाय व्यापृतत्वामुळे समाजाकडे लक्ष देतां आले नाही. राजा राममोहनांचे पट्टशिष्य ताराचंद चक्रवर्ती आणि चंद्रशेखर देव हे दोघे अत्यंत लायक गृहस्थ बरद्वानच्या राजाचे कारभारी होऊन निघून गेले. खुद्द राजा राममोहन यांचे दोघे चिरंजीव राधाप्रसाद आणि रामप्रसाद हे वडिलांना शोभण्यासारखेच बुद्धिमान् आणि कार्यकर्ते होते. त्यांपैकी राधाप्रसाद हे प्रथम व रामप्रसाद हे नंतर समाजाचे ट्रस्टीही होते. आणि त्यांनीं धर्मसुधारणेच्या उत्कटतेने नसले, तरी वडिलांची आज्ञा म्हणून समाजाची व्यवस्था पाहण्याचे मनावर घेतले होतें. परंतु ह्या नैतिक पितृऋणापेक्षां प्रत्यक्ष सांपत्तिक पितृऋणच त्यांस इतके जाचक झाले कीं, त्यासाठीं राधाप्रसाद यांस दिल्लीचे नामधारी बादशहाकडे जाऊन वडिलांची पूर्वीची वकिलीची बाकी वसूल करण्याकरितां तेथेच अडकून रहावे लागले. रामप्रसाद हे श्रेयापेक्षां प्रेयाचे मागेच अधिक होते. त्यांत त्यांस बरेंच यश येऊन डेप्युटी कलेक्टरपासून वाढतां वाढतां सदरकोर्टाच्या जज्जाचा पहिलाच मान त्यांस मिळाला. त्यांना पैसाही विपुल मिळाला. परंतु दरसाल दहा हजार रुपये निव्वळ उत्पन्नाची स्वसंपादित मिळकत ज्यांनीं धर्म व परोपकाराचीं कामे ह्यांत घालवली, त्यांच्या चिरंजीवांना धर्मकार्यासंबंधीं ती आस्था मुळींच राहिली नाहीं. ते ब्राह्मसमाजाचे सभासद तरी किती दिवस होते ते समजत नाहीं. ह्याप्रमाणें ब्राह्मसमाजाच्या ह्या पडत्या काळांत ह्या नूतन संस्थेचें संगोपन

करणारे बाबू द्वारकानाथ ठाकूर यांच्या घराण्याचा ब्राह्मसमाजाशीं अत्यंत निकट संबंध असे. त्यामुळें त्यांच्यासंबधीं थोडी सविस्तर माहिती देणे जरूर दिसते.

एका काळीं बंगाल्यांत बौद्धधर्माचें अंमलामुळे वेदविद्या लुप्तप्राय झाली होती. ह्यामुळे इसवी सनाचे दहाव्या शतकाचे अखेरीस बंगालचा राजा आदिसूर यास एका यज्ञाचे सांगतेकरितां कनोजचे पांच वेदविद्याविशारद ब्राह्मण बोलवावे लागले. ह्यांतच सुप्रसिद्ध वेणीसहार नाटकाचे कर्ते भट्ट-नारायण बंद्योपाध्याय हे एक होते. त्यांचाच वंशविस्तार पुढे बंगाल-प्रांतीं वाढला. त्यापैकीं एक शाखा पुराणमताभिमानी व दुसरी शाखा ब्राह्मसमाजी निघाली. बाबू द्वारकानाथ ठाकूर हे अर्थात् दुसऱ्या शाखेपैकी होत. ठाकूर हें उपनांव त्यांच्या कुलदेवतेवरून त्यांनीं धारण केले. टागोर हे इंग्रजांनीं भ्रष्ट केलेलें ठाकूर यांचेच रूप आहे. आजत्या घराण्यातील पुरुष आपल्याला टागोर असेंच म्हणवून घेत असले, तरी आम्ही त्याचा ठाकूर या नांवानेच उल्लेख करण्याचे ठरविले आहे. असो. वरीलप्रमाणे ह्या ठाकुरांच्या उच्चप्रतीच्या कुलीन ब्राह्मणकुटुंबास एका राजानें आश्रय दिला, तर दुसरे पाळींत माकडांच्या लग्नांत लाखो रुपये उधळणारे व सतत कांहीं दिवस गणितश्रेढीने देवीस बोकडांचे बलिदान करणारे विक्षिप्त राजे कृष्णनगरचे कृष्णचंद्रराय ह्यांनीं त्यांस जातिबहिष्कृत केले. ह्याचे कारण असें सांगतात कीं, एका यावनी बादशाहीखान्याचे वेळी दिल्लीपतीचे शब्दाचा अवमान न व्हावा म्हणून (पीर अल्ली याचे सांगण्यावरून) द्वारकानाथ यांचे एका पूर्वजाने मुसलमानी खान्याचे एकदां फक्त अवघ्राण केलें होते; यामुळे ते घराणे "पीर अल्ली ब्राह्मण" या नांवाने पतित गणले जात असे.

ठाकूर घराणे हे जरी ह्याप्रमाणे बहिष्कृत होते, तरी आचारविचारांत त्यांनीं आपल्या धर्माचा अभिमान कधींच सोडला नाहीं. यामुळे लोकापवाद व राजाचा रोष ह्या निष्कारण उपस्थित होणाऱ्या संकटांनी ठाकूर घराण्याचे तादृश कांहीच नुकसान झाले नाही. उलटपक्षीं संतति, संपत्ति व सरस्वती असा अलौकिक त्रिवेणीसगम कित्येक पिढ्यांपासून ह्या घराण्यांत चिरस्थायी होऊन राहिला आहे. हे ईश्वराच्या महत्कृपेचे फल होय.

बाबू द्वारकानाथ ठाकूर हे एक नवकोटनारायण होते. ते केवळ श्रीमानच नव्हत तर मोठे धर्मात्मे होते. असें सांगतात कीं, ते दरमहा

एक लाख रुपये धर्मादाय करीत. त्यांच्या तोडीचा धर्मात्मा त्या वेळीं बंगालप्रांतीं दुसरा कोणी नव्हता. त्यांच्या ह्या औदार्यामुळे त्यांस राजा (Prince) अशी पदवी लोकांनी दिली होती. त्या वेळची हिंदुस्थानची बादशाहीण क्वीन व्हिक्टोरिया हिचीही बाबूमहाशयांवर फार मर्जी होती. ते जसे श्रीमान् तसे विद्या-व्यासंगीही होते. तत्त्वज्ञान, गायन, साहित्य इत्यादि विषयांची त्यांस फार आवड असे. ती आवड त्यांच्या पुत्रपौत्रांत आजही अत्यंत उत्कटतेने दिसून येत आहे. त्यांचे वडील चिरंजीव महर्षि देवेंद्रनाथ व देवेंद्रनाथाचे कनिष्ठ चिरंजीव सुप्रसिद्ध कवि रवींद्रनाथ यांचे-बद्दल पुढे सविस्तर हकीकत येणारच आहे. बाबू द्वारकानाथांचे नातवंडांत सत्येंद्रनाथ हे हिंदुस्थानांतील पहिलेच आय. सी. एस्. असून हे मोठे वाङ्मयप्रेमी आहेत. ह्यांनी महाराष्ट्र सत्कवि श्रीतुकाराम यांच्या अभंगांचें बंगाली भाषांतर केले आहे. यांचीं स्वतांचीं ब्राह्मगीतें अत्यंत प्रसादयुक्त आहेत असे म्हणतात. दुसरे द्विजेंद्रनाथ हे जाडे तत्त्ववेत्ते असून त्यांची साधुवृत्ति ईशसृष्टीशीं इतकी तादात्म्य पावली होती कीं, लहान पशुपक्षी त्यांचेजवळ त्यांच्या आंगाखांद्यावर निर्भय चित्ताने खेळतबागडत असत असे म्हणतात ! बाबूमहाशयांचे दुसरे पौत्र उत्तम चित्रकार आहेत. ललितकलांचे ठाकूर घराणे हे तर केवळ माहेरघर आहे. आणि त्या कामी पुरुषांप्रमाणे स्त्रियाही फार निष्णात आहेत. स्वर्णकुमारी देवी व श्रीमती सरलादेवी चौधराणी ह्या सुप्रसिद्ध विदुषी यांच्याच कुटुंबातील होत. 'भारती' हे यांच्याच कुटुंबांतील स्त्रियांनी चालविलेले एक सुप्रसिद्ध मासिक आहे, असो.

बाबू द्वारकानाथ ठाकूर हे दरएक सार्वजनिक कामांत पुढाकार घेत असत. ह्यांचा व राजा राममोहन ह्यांचा फार जिव्हाळ्याचा असा स्नेह-संबंध होता. द्वारकानाथ ठाकूर हे समाजाचा बराच खर्च स्वतांच चालवीत असत. त्यांनीं आपला वडील मुलगा देवेंद्रनाथ ह्यास मुद्दाम राजा राममोहन यांच्या नूतन शाळेत घातले. आणि राजा राममोहन ह्यांचा इंग्लडांत असतां अंत झाल्याचे ऐकून द्वारकानाथ यास इतके वाईट वाटले कीं, त्यांच्या शेवटच्या दुखण्याचे वेळीं अखेरची निद्रा आपले मित्रासान्निधच घ्यावी म्हणून ते विलायतेस निघून गेले व त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांनी आपल्या सन्मित्राचें स्मारक तेथे उभारून आपलाही देह इ. स. १८४६ सालीं तेथेंच ठेवला.

ह्याप्रमाणें ब्राह्मसभेचा शेवटला आधारस्तंभ नाहींसा झाला असतां, ज्यांच्या अविश्रांत मेहनतीनें व निष्ठेनें समाज नामशेष न होतां कसा तरी जीव धरून राहिला ते समाजाचे अध्यक्ष व प्रधान आचार्य पंडित रामचंद्र विद्यावागीश हेच काय ते राहिले. पूर्वी ह्याचे वडील बंधु हरिहरानंदतीर्थ स्वामी हे विरक्त होऊन फिरत असतां कर्मधर्मसंयोगानें त्यांची व राजा राममोहन ह्यांची गांठ पडली होती. लवकरच ते एकमेकाचे सहकारी मित्र झाले. त्यांच्यामुळें पंडित रामचंद्र विद्यावागीश हेही राजा राममोहन ह्याचे आश्रयाला येऊन राहिले. राजा राममोहन यांचे पंडित शिवप्रसाद मिश्र ह्यांच्याजवळ त्यांनी चार शास्त्रांचे अध्ययन केलें आणि ते फार विद्वान् असे तयार होऊन हरएक कामी त्यांचा राजा राममोहन यास विशेष उपयोग होऊं लागला. पुढे राजा राममोहन यांच्या पश्चात् जेव्हां वरीलप्रमाणे बिकट परिस्थिति निर्माण झाली, तेव्हांही त्यांनी ऊन नाही, पाऊस नाही, घरचे अगर दारचे व्यापाची सबब नाहीं, इतकेच काय पण स्वताच्या शरीरस्वास्थ्याचीही परवा नाही, अशा निर्धारानें आपलें आचार्यपदाचे काम नेटानें चालविलें. पंडित रामचंद्र विद्यावागीश हे जाडे विद्वान् होते. बंगाली पहिला कोश त्यांनीच केला. तसेच ह्यांची विद्वत्तापूर्ण अशीं सतरा व्याख्यानें प्रसिद्ध झालेली आहेत. परंतु त्यांना इंग्रजीचा गंधही नव्हता. आणि धर्मसुधारणा चाहू इच्छिणाऱ्या सुशिक्षितांचें वातावरण इंग्रजी विद्येच्या संस्कारानें भारत चाललें होतें. अशा स्थितीत पंडित विद्यावागीश ह्यांचीं न्यायघटित आणि वेदान्ताच्या शास्त्रीय प्रक्रियेनें सुसंबद्ध अशीं व्याख्यानें आंग्लविद्याविशारदांस आवडतना; आणि श्रोत्याचे आवडते कॅन्ट, कझॅन, ह्यूम अथवा बर्क्ले अशा युरोपियन पंडिताची विचारसरणी आचार्य विद्यावागीश ह्यांस अनुसरता येईना. अशा विलक्षण परिस्थितीचे परंपरेमुळें हळुहळू सर्वच श्रोत्यावक्त्यांनी समाज सोडून दिला. अशा स्थितीत ही ब्राह्मसभेची संस्था नामशेष होण्यास विशेष कालावधि नको होता. परंतु ईश्वराच्या अचिंत्य नियतीमुळें एका थोर पुरुषाची अशा वेळीं (इ० सन १८४३) समाजास जोड मिळाली. ह्यामुळें अधोगतीचे मार्गास लागलेली ही संस्था पुन्हा उन्नतदशेला आली, ती हकीगत बरीच विस्तृत व महत्त्वाची असल्यामुळें त्याचा विचार पुढील भागांत करू.

---

# राजा राममोहनांचा पद्यात्मक संदेश.

[ १ ]

**मने कर शेषेरा से दिन भयङ्कर**
**अन्ये बाक्य कबे किन्तु तुमि रबे निरुत्तर**
**यार प्रति यत माया कि बा पुत्र कि बा जाया**
**तारा मुख चेये तत हइबे कातर**
**गृहाय हाय शब्द सम्मुख स्वजन स्तब्ध**
**दृष्टिहीन नरे क्षीण हिम कलेबर**
**अतएब सावधान त्यज दंभ अभिमान**
**बैराग्य अभ्यास कर सत्ये ते निर्भर.**

**भावार्थ**—तो शेवटचा भयंकर दिवस लक्षात आण. दुसरे लोक बोलतील, पण तूं निरुत्तर राहशील. स्त्री किंवा पुत्र यांच्यावर तुझें जितकें प्रेम असेल त्या मानानें तीं तुझ्या मुखाकडे पाहून विव्हल होतील. घरांत 'हाय! हाय!' असा आक्रोश चाललेला, समोर इष्टमित्र स्तब्ध बसलेले, पाहण्याची शक्ति नाहीं असा क्षीण व थंडगार पडलेला देह! म्हणून सावध हो; दंभ आणि अभिमान यांचा त्याग कर; आणि सत्यावर निर्भर राहून वैराग्याचा अभ्यास कर.

[ २ ]

**हे मन कर आत्मानुसंधान**
**रविज भय रबे ना रबे ना**
**पङ्कजदलजल इव जीबन चञ्चल**
**धन जन चपलासमान रबे ना रबे ना.**
**मोहपाशबन्धन ज्ञानास्त्रे कर छेदन**
**सत्य कर प्रीति पाइबे परित्राण**
**एखनि हइबे सुखी आत्मोत आत्मार देखि**
**कथा मान प्रबीन अज्ञान भुल ना भुल ना.**

**भावार्थ**—हे मना! आत्मानुसधान कर; (म्हणजे) शनीचे (दुर्दैवाच्या फेऱ्याचें) भय राहणार नाहीं, राहणार नाहीं. कमलपत्रावरील जलाप्रमाणे जीवन हें चंचल आहे. धन आणि जन हीं विद्युल्लतेप्रमाणे आहेत. हीं टिकणारी नाहींत,

टिकणारीं नाहींत. ज्ञानशस्त्र हातांत घेऊन त्याने मोहपाशबंधन तोडून टाक; सत्यावर प्रेम कर; त्याने तुला तारण मिळेल. आत्म्याची आत्म्याशीं दृष्टादृष्ट होतांच सुखी होशील. मी सांगतो ते ऐक; मोठमोठे ज्ञानी म्हणविणारेसुद्धां अजाण असतात; ही गोष्ट विसरूं नकोस, विसरू नकोस.

[ ३ ]

**भय करिले याँरे ना थाके अन्येर भय**
**याँ हाते करिले प्रीति जगतेर प्रिय हय.**
**जवमात्र छिले ज्ञान ये दिल तोमाय**
**सकल इन्द्रिय दिल तोमार सहाय**
**किन्तु तुमि भुल ताँरे ए तो भाल नय.**

**भावार्थ**—त्याचे ( परमेश्वराचे ) भय बाळगल्यास दुसऱ्या कशाचेंही भय उरणार नाही. त्याच्यावर ( परमेश्वरावर ) प्रेम केल्यास जगाचे कल्याण होईल ( किंवा तूं जगाला प्रिय होशील ). तुला दिलेलें ज्ञान तिळमात्र होते. तुझ्या मदतीला सगळीं इंद्रिये देण्यात आलीं आहेत. पण तूं त्याला ( परमेश्वराला ) विसरलास हे चांगले नाहीं.

[ ४ ]

**कि स्वदेश कि बिदेश यथायतथाय था कि**
**तोमार स्वना मध्ये तोमाके देखिया डाकि**
**देशभेदे कलाभेदे रचना असीमा**
**प्रतिक्षणे साक्ष्य देय तोमार महिमा**
**तोमार प्रभाब देखिना थाकि एकाकी**

**भावार्थ**—स्वदेशांत काय किंवा परदेशात काय तूं ठेवशील तसा मी राहतो आणि तुझ्या या सृष्टींत तुला पाहून मी तुझा धावा करतो. देशकालभेदपरत्वें तुझी रचना अनंत आहे. क्षणोक्षणी ती तुझ्या महिम्याची साक्ष देत आहे. तुझा प्रभाव पाहिल्यावर माझ्याच्यानें एकलकोंडेपणाने राहवत नाहीं.

---

**टीप**:—हीं गीते आदि ब्राह्मसमाजाचे सेक्रेटरी श्री० क्षितेंद्रनाथ ठाकूर यांनीं कृपा करून आम्हांस लिहून कळविलीं व ह्यांचें भाषांतर श्री० वासुदेव गोविंद आपटे ह्यांनीं मेहेरबानीने करून दिले, त्याबद्दल उभयताचे आम्ही आभारी आहोंत.

भाग १–परिशिष्ट ब

# कांहीं महत्त्वाच्या गोष्टींची कालानुक्रमणिका

१७७२ ( तारीख २२ मे ) राममोहन यांचा राधानगर येथें जन्म.

१७८० अमेरिकेतील एकेश्वरीसमाजसंस्थापक चॅनिंगसाहेब यांचा जन्म.

१७८१।८२ राममोहन यांचा दुसरा व तिसरा विवाह.

१७८३ अमेरिका स्वतंत्र होते.

१७८७ बौद्धधर्माच्या अभ्यासासाठीं राममोहन तिबेटला जातात.

१७९०।९१ राममोहन स्वदेशी परत येऊन श्रीक्षेत्र काशी येथें राहतात.

१७९३ श्रीरामपूरचे प्रसिद्ध पाद्री कॅरे हे कलकत्त्यास येतात.

१८०० राममोहन यांचे ज्येष्ठ चिरंजीव राधाप्रसाद यांचा जन्म.

१८०१ डिग्बीसाहेबांशी राममोहनांचा प्रथम परिचय.

१८०३ तुह फतुल मुवाहिद्दीन राममोहनांचें पहिलें प्रकाशन.

१८०३ राममोहनांचे वडिलांचा मृत्यु. सुप्रसिद्ध इमरसन यांचा जन्म.

१८०९ सुप्रसिद्ध विकासवादी डार्विनसाहेब यांचा जन्म.

१८१० सुप्रसिद्ध अमेरिकन एकेश्वरी थिओडर पार्कर यांचा जन्म.

१८११ राममोहनांचे बंधु जगमोहन यांचा मृत्यु. त्यांची स्त्री सती जाते.

१८१३ पार्लमेंटच्या कायद्यानें पाद्र्यांचे पाय हिंदुस्थानांत रुजतात.

१८१४ राममोहन कलकत्त्यास येऊन स्थायिक होतात.

१८१५ नेपोलिअन बोनापार्ट याचा पाडाव. फ्रान्सची राज्यक्रान्ति.

१८१५ आत्मीय सभा स्थापना. वेदान्तसूत्रांचें बंगालींत भाषांतर.

१८१६।१७ हिंदूंच्या ईश्वरवादाचा पुरस्कार. राममोहनांचें उपनिषदांचें बंगाली इंग्रजी भाषांतर. वेदांतसार प्रकाशन देवेंद्रनाथांचा जन्म.

१८१८ राममोहन यांचा सतीविरुद्ध पहिला लेख.

१८१९ आत्मीय सभेंत सुब्रह्मण्यशास्त्री यांच्याशीं वादविवाद. अमेरिकेत चॅनिंगसाहेब यांचे एकेश्वरीपंथावर सुप्रसिद्ध व्याख्यान.

१८२० राममोहनांचा सतीविरुद्ध दुसरा लेख. येशूंच्या आज्ञा आणि शांतिसुखाचा मार्ग ह्या लेखाचे समर्थनपर पहिला खुलासा.

१८२१ दुसरा खुलासा. ब्राह्मणपत्रिका सुरू होते. कलकत्ता-एकेश्वरी-समाजाची स्थापना. सवादकौमुदी सुरू होते.
१८२२ मिरत-अल अखबर पत्र सुरू होतें. इंग्रजी शाळेची स्थापना.
१८२३ ख्रिस्ती लोकांस तिसरा शेवटला खुलासा. रामदास सहीनें पत्रव्यवहार. पथ्यप्रदान. टायटलरशीं वादविवाद.
१८२४ ख्रिस्तीधर्मप्रसाराबद्दल राममोहनांचें रे० एच्. वेअर यांस पत्र.
१८२५ अमेरिकेंत एकेश्वरीसमाजाची स्थापना–तारीख २९ मे.
१८२६ राममोहनाचें इंग्रजीबंगाली व्याकरण. वेदान्त कॉलेज स्थापना.
१८२७ गायत्रीमंत्रानें उपासना. हिंदुस्थान एकेश्वरीसमाज स्थापना.
१८२८ इंग्रजी एकेश्वरी उपासना सुटते. आदमसाहेब राजीनामा देतात. ब्राह्मसमाजाची स्थापना. पहिली सभा ता. २० ऑगष्ट.
१८२९ सतीविरुद्ध सरकारी ठराव.
१८३० डफसाहेब कलकत्त्यास येतात. सतीबंदीबद्दल सरकारचें अभिनंदन. सनातनीयधर्मसभा-स्थापना. ता. २३ जानेवारी ब्राह्मंदिरअनावरणसमारंभ. राममोहनांची विलायतेस सफर.
१८३१ ब्रिटिशएकेश्वरी-समाजात राममोहनस्वागत. बादशहांची भेट.
१८३२ राममोहनांचें पॅरिस येथें स्वागत.
१८३३ गुलामगिरीविरुद्ध कायदा. ता. १७।९ रोजी स्टेपल्टनहिल येथें **राममोहनांचें देहावसान.** श्रीरामकृष्णपरमहंस यांचा जन्म.
१८३८ केशवचंद्रांचा जन्म. देवेंद्रनाथास ईशोपनिषदांतील वैदिक सदेश.
१८३८।३९ देवेंद्रनाथ ब्राह्म-समाजांत दाखल होतात.
१८३९।४० तत्त्वरंजनी सभेची व तत्त्वबोधिनी पाठशाळेची स्थापना.
१८४३ ब्राह्म-समाजाचा पुनरुद्धार. नवीन सांप्रदायिक दीक्षाविधि.
१८४४ पंडित रामचंद्र विद्यावागीश यांचा मृत्यु.

---

भाग १–परिशिष्ट क

# या भागाच्या आधारग्रंथांची यादी

१ चरित्रेः—राजा राममोहन यांचीं चरित्रें, मिस् कॉलेट, श्री० सरकार, रामानद चतर्जी, केसकर यांनी लिहिलेलीं. देवेंद्रनाथ यांचें आत्मचरित्र. रवींद्रनाथ यांचे चरित्र.
२ इतिहासः—ब्राह्म-समाजाचे इतिहास. पं० शिवनाथशास्त्री व लिओनार्ड साहेब ह्यांनीं लिहिलेले.
३ समग्र ग्रंथः—राजा राममोहन यांचे.
४ " हिंदुस्थानांतील आधुनिक धार्मिक चळवळी "वर फर्कुहार यांचा ग्रंथ.
५ स्वामी विवेकानद यांची व्याख्याने.
६ जिनराजदास यांचे पूर्वपश्चिमभेट.
७ सिस्टर निवेदिता ह्यांचे लेख.
८ राजेंद्र कॉलेजाचे प्रिन्सिपाल कामाख्यनाथ मित्र यांचें पेसीमिझम्.
९ न्या० महादेव गोविंद रानडे यांचीं व्याख्यानें.
१० सर व्यंकटरत्न यांचीं व्याख्याने व उपदेश.
११ पं० सीतानाथ तत्त्वभूपण यांचा ब्राह्मांचे तत्त्वज्ञानावर ग्रंथ.
१२ अमेरिकन एकेश्वरी पथाचीं चोपडीं.
१३ धी इंडियन मेसेंजरमधील लेख.
१४ प्रतापचंद्र मुजुमदार यांचीं व्याख्यानें.
१५ सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचीं व्याख्यानें.
१६ गीतारहस्य, यंग इंडिया, प्रबुद्धभारत इ० इ०.

**भाग पहिला समाप्त.**

॥ श्री ॥

# नवयुगधर्म

## खंड पहिला—भाग दुसरा

---

# आदि ब्राह्मसमाज

किंवा

# देवेंद्रनाथ आणि रवींद्रनाथ

[ इ. स. १८४३ ते १९२६ ]

---



महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर.

जन्म–इ. सन १८१७ मृत्यु- इ. सन १९०५

## प्रकरण पहिलें

# देवेंद्रनाथ

कलकत्त्यास एका कोट्यधीशाच्या वाड्यांतील एक आजीबाई स्वतांच कांहीं काम करीत बसल्या होत्या. खानदानीच्या श्रीमतींत वार्धक्यही सौंदर्याची हानि करूं शकत नाहीं, हे या आजीबाईकडे पाहिले कीं सहज पटले असते. आजीबाई म्हटल्या कीं, तेथे लाडात वाढलेला नातू जवळ चिकटून बसलेला असायचाच!—सुप्रभातचा समय, आजीबाई गच्चीवर निवांतपणीं तोंडाने स्तोत्रपाठ म्हणत व हातांनीं श्रीगोपीनाथ ठाकुरजीसाठीं हार गुंफीत बसल्या होत्या. आजीबाईंचा स्तोत्रपाठ संपत आला. इतक्यांत पूर्वेकडे बालसूर्याची प्रभा फांकूं लागली. "बाळ, सूर्यनारायणाला नमस्कार कर" असे अंगाशी बिलगलेल्या नातवाला म्हणत आजीबाईनीं सूर्याला तीन वेळां नमस्कार केला आणि आपल्या गोड गंभीर आवाजात खालील श्लोक आपल्या लाडक्या नातवास शिकविलाः—

> जपाकुसुमसंकाशं काश्यपेयं महद्द्युतिम् ।
> ध्वान्तारिं सर्वपापघ्नं प्रणतोऽस्मि दिवाकरम् ॥

नातवानेंही कांहींशा बोबड्या आवाजांत तो श्लोक म्हटला व उभे राहून भगवान् सूर्यनारायणाला नमस्कार केला. "आजी, आता गोपीनाथजींचे दर्शनाला आपल्या मोठ्या घरीं चलतेस ना?" असे नातवाचे गोड शब्द ऐकून आजीबाई त्याला घेऊन खाली आल्या व त्यांनीं नातवास देवघरांतील शालिग्रामापुढे नाक घांसण्यास लाविले. आणि नंतर नित्याप्रमाणे ठाकुरजींचे दर्शन घेण्यासही त्यास नेले. जेथे आजीबाई तेथे नातू. एकमेकांवांचून त्यांना चैन पडावयाचे नाहीं. रात्रभर कथाकीर्तन सुरू असो, आजीबाई-जवळ नातू आहेच. अपराह्णकाळी आजीबाईंचा नैवेद्य झाला की हविष्यान्ना-चा गोड घांस घ्यायला, कमरेच्या घागऱ्या वाजवीत ही नातवाची स्वारी दुडदुड धावत आलीच.

असो. याप्रमाणें बालपणीं अजाणपणे श्रीशालिग्राम आणि श्रीगोपीनाथ

ठाकुरजी यांस रोज सांजसकाळ नमस्कार करणारा व आजीच्या हविष्यान्नां-तील साधा दूधभाताचा प्रसाद पंचपक्वान्नांपेक्षांही अधिक गोडीने खाणारा हा लहान बालकच पुढें मोठेपणीं ब्राह्मसमाजांत महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर या नांवाने प्रसिद्धीस आला. ह्याला धर्मकार्यासाठींच परमेश्वराने या लोकीं ( इ. सन १८१७ ) पाठविलें आहे, असा राजा राममोहन ह्याचा समज होता. त्याच्या नामकरणाच्या वेळीं देवेंद्रनाथ हे नांवही त्यांनींच ठेविले. ते एका कोट्यधीशाचे ज्येष्ठ चिरंजीव असल्यामुळे त्यांस ऐहिक सुखसाधनांत कांहींच कमतरता नव्हती. लहानपणापासून श्रीमंतीच्या ऐष-आरामांत व मिजाशींत त्याचा काळ एखाद्या राजपुत्राप्रमाणे गेला होता. बाळपणीं आजीबाईना त्याचा फार लळा असे, हे वर लिहिलेच आहे. आणि देवेंद्रनाथासही आपली आजी म्हणजेच सर्वस्व होऊन बसले होते. त्यांची आजी जुन्या चालीची अत्यंत भाविक बाई होती. आणि देवेंद्रनाथ तिच्याच संगतींत वाढल्यामुळे पूर्ववयांत तेही कालीमातेचे उपासक असत. त्यांची ब्रह्मकर्मावर अत्यंत निष्ठा असे. ते एकदां पूजेला बसले म्हणजे त्यांत इतके निमग्न होत असत की, त्या वेळीं कोणीं शंभर हांका मारल्या तरी त्यांना दाद लागत नसे. लहानपणी शाळेत जाताना शाळेतील अभ्यासात चूक होऊं नये म्हणून सिद्धेश्वरी कालीमातेचे दर्शन घेण्यास ते कधींच चुकत नसत. ते पुढे मूर्तिपूजेचा तीव्रतेने निषेध करतील असे कोणासही त्या वेळीं वाटले नसते. देवेंद्रनाथ ज्या हिंदू कॉलेजांत शिकत होते, त्या कॉलेजात प्रो० डेराझिओ यांचा नास्तिकवाद पूर्णपणे बोकळला होता. परंतु देवेंद्रनाथ त्या कॉलेजांत खालच्या वर्गांत होते आणि ते कॉलेजांत गेल्यावर प्रोपेसर-साहेब यांस लवकरच बडतर्फी मिळाली, यामुळे देवेंद्रनाथांवर त्याच्या घातक शिक्षणाचे कांहीं परिणाम झाले नाहीत. तथापि तत्कालीन शिक्षणाने त्याच्या मूळच्या भाविक बुद्धीस चिकित्सक बनविल्यावांचून सोडले नाहीं. त्याचा अनुभव त्यांस लवकरच आला; तो असाः—

आपल्या वयाच्या १८व्या वर्षीं एके रात्रीं देवेंद्रनाथ सहज आकाशस्थ ज्योतींकडे एकटेच पहात बसले असतां, त्यांचे अंतःकरण आश्चर्यचकित झालें. आणि एकाएकीं त्यांच्या मनांत असा विचार स्फुरला कीं, या दिव्य आणि अपरंपार विश्वाचा कर्ता कोणी साकार देहधारी ईश्वर असणे शक्य

नाहीं. हा एक साधा विचारतरंग त्यांचे अंतःकरणांत क्षणमात्र येऊन गेला. पण त्याने त्यांचे अंतःकरण पुढें कित्येक दिवस अस्वस्थ करून सोडले. सर्व विश्वाचा आधार म्हणजे श्रीकालीमाता अशी जी त्यांची बालपणापासूनची श्रद्धा ती आता डळमळूं लागली. ह्याच सुमारास त्यांच्या घरच्या सर्व सुखाचा आधार अशी त्यांची परमप्रिय आजी परलोकवासी झाली. मरणाच्या पूर्वी कांहीं दिवस देशरिवाजाप्रमाणे तिला गंगातटाकीं नेऊन ठेविले होते. तिचे देहावसान होईपर्यंत देवेंद्रनाथही तिच्यासन्निध बसून होते. तिच्या मरणाच्या पूर्वरात्रीं निमतोळा घांटावर मृत्युपथास लागलेल्या आपल्या अत्यंत आवडत्या आजीच्या शेजारीं देवेंद्रनाथ सचित बसले होते. पौर्णिमेच्या चंद्राचे स्वच्छ चादणे पडले होते. "हरि बोला, हरि बोला" आणि "गगानारायण ब्रह्म" असा भजनीमंडळीचा नामघोष सुरू होता. गंगेच्या घाटावर भडकलेल्या चितांतून मोकळे झालेले कित्येक जीवात्मे आपल्याकडे वस्ती करण्यास येतील या भीतीनेच कीं काय चंद्र ढगामागे लपून आसमतभाग अधिकच भेसूर करीत होता. अशा उद्वेगजनक परिस्थितीत देवेंद्रनाथाने आपल्या लाडक्या आजीचे अति खोल गेलेल्या आवाजातून खालील शब्द ऐकले. "बाळा, असे तोंडाने हरिनाम घेतां घेता देह ठेवण्याचा सोन्याचा दिवस कधीं येईल काय?" आजीची ही दीनवाणी ऐकून नश्वरतेच्या विचारांनी देवेंद्र-नाथाच्या मनात काहूर उत्पन्न केले.

ह्या जीवाची अखेर परमगति ती कोणती हे गूढ कळण्यासाठीं अत्यत आर्त झालेले देवेंद्रनाथ कठोपनिषदांतील नचिकेताप्रमाणे, आपल्या आजीस नेण्यासाठीं आलेल्या यमाच्या सन्मुख विचारक्रान्त होऊन बसले होते. इतक्यांत जणुं काय त्या अमूर्त यमधर्माच्या वरप्रसादामुळच कीं काय, मनाच्या अशा उद्विग्न स्थितींत असतां त्यांस एकाएकीं अकल्पित दिव्य आनंदाचा साक्षा-त्कार झाला. तो अपूर्व व अलौकिक असा सहजानंद त्यांच्या अंतःकरणांत मावेना! केवळ अनिर्वचनीय अशा त्या आनदाच्या भरात ते मध्यरात्रीं घरीं परत आले. जणुंकाय बोधचंद्रोदयाने अंतःकरण व्याप्त केल्यामुळे तमोरूप निद्रा त्यांस पारखी झाली! परंतु अल्पकाळांतच तो आनंद मावळला. दुसरे दिवशीं त्यांच्या डोळ्यांसमोरच त्यांच्या परम प्रिय आजीनें हरीचे नामस्मरण करीत देह ठेवला! त्या दुःखद प्रसंगाने ते पूर्वभानावर आले! परतु आदल्या

रात्रींच्या त्या दिव्य आनंदानें त्यांचे जीवास फारच चटका लागला होता. क्षणमात्र दर्शन देऊन अदृश्य होणाऱ्या भगवंतांच्या पुनर्दर्शनार्थ श्रीनारद जसे व्याकुळ झाले होते तशी कांहीशी देवेंद्रनाथांच्या मनाची स्थिति झाली. जगाची क्षणभंगुरता त्यांचे अंतःकरणांत बाणलीच होती. त्यांच्या श्रीमंतीच्या ऐश्वर्याचा त्यांस एकाएकीं वीट उत्पन्न झाला. कोण्या उपायानें तो आनद मी मिळवीन ह्या विचारांनीं त्यांचें चित्त आतुर झालें. नित्यव्यवसायांकडे त्यांचे मन लागेना. ऐहिक सुखलालसेवरून त्यांचे मन उडालें. जगाचें गूढ रहस्य कसे समजेल या गोष्टीचा त्यांस ध्यास लागला. सृष्टिनियमांचा कठोरपणा त्यांचे जीवास जाचूं लागला. या पांचभौतिक विश्वाच्या अनियंत्रित जुलमाखालीं आम्हीं जन्मभर गुलामाप्रमाणे राबावयाचे काय? ह्या विचाराने त्यांचे जीवित दुःखमय केलें. थोडक्यांत सांगावयाचे तर पाश्चिमात्य धर्मसुधारक लूथर अथवा आपल्याकडील, गौतम बुद्ध यांचे चरित्राशीं देवेंद्रनाथांच्या आयुष्यांतील या भागाचे बरेच सादृश्य दिसू लागले.

देवेंद्रनाथांचे वय त्या वेळीं अवघे अठरा वर्षांचें होते, हे वर आलेच आहे. सर्व सुखसपत्ति त्यांच्या पायाशीं लोळत होती. त्यांचा शब्द झेलण्यास सभोंवारची मंडळी सदा तत्पर असे; तथापि ह्या सुखलालसेवरून मन काढून वैराग्याचा पहिला धडा घेण्यासाठीच कीं काय, देवेंद्रनाथ एक दिवस आपल्या बैठकखान्यात बसले असतां त्यांनीं आपल्या आसपास असलेले आश्रितास जवळ बोलावून त्यांस सांगितले कीं, आज मी कल्पतरु झालो आहे, कोणास काय पाहिजे ते त्यानें मागून घ्यावें. असें म्हणून खरोखरच त्यांनी तेथील बहुमोलाच्या तसबिरा व अनेक दुसऱ्या मौल्यवान् वस्तु जो मागेल त्यास देऊन टाकल्या. याप्रमाणे त्यांचे स्वतांचे वापरण्याच्या व उपयोगाच्या सर्व वस्तु त्यांनीं वांटून टाकल्या. पण अशानेही त्यांचे समाधान झालें नाहीं. भ्रमिष्टासारखे ते घरांत वावरूं लागले. त्यांस जेवण्याखाण्याचीही शुद्ध राहिली नाहीं. दिवस आला केव्हां व गेला केव्हां याचेही त्यांस भान नव्हतें. भर दोनप्रहरीं ते शिवपूर येथील वनस्पत्योद्यानांत एकान्तीं एका थडग्यावर जाऊन बसत. मग त्याच्या अन्तःकरणांत प्रखर वैराग्याचा संचार होई व सर्व जग स्मशानवत् वाटे; इतकेच काय पण मध्यान्हीं तळपणाऱ्या सूर्याचा प्रकाशही त्यांस अंधकारमय दिसूं लागे. अशा विलक्षण समयी त्यांच्या तोंडून सहज एक

पद्य बाहेर पडलें. त्याचा सारांश असाः " जों ज्ञानरवि उदेला नाहीं। दिनमणिची न महती कांहीं! ॥" त्या थडग्यावर बसून देवेंद्रनाथ रोजच्या रोज हाच एक चरण आपल्याशींच मोठ्यानें म्हणत असत. 'जपाकुसुमसंकाशं' इत्यादि स्तोत्रपाठांनीं ते बाळपणी ज्या सूर्यनारायणास नित्यशः वंदन करीत असत त्या सूर्याचाही प्रकाशक, अथवा त्याचा जनिता कोण असावा ह्या विचारांत त्यांचें चित्त मग्न झालें.

त्या ज्ञानरवीचा अन्तःकरणांत उदय व्हावा म्हणून प्रथम संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास करण्याचे त्यांनी मनांत आणलें. भाग्यशाली साधकांस ईश्वर प्रथमपासूनच साह्यकारी होतो, असे देवेंद्रनाथांच्या चरित्रावरून स्पष्ट दिसून येतें. त्यांचे मनोरथ सिद्ध होण्यासारखी अनुकूल परिस्थिति आपोआपच जुळून येऊं लागली. पंडित कमलाकांत चूडामणि या नावाचे एक विद्वान् शास्त्री देवेंद्रनाथांच्या वडिलांचे घरी त्यांचे आश्रयाला असत. देवेंद्रनाथांवर बाळपणापासून या पंडितांचे मोठे प्रेम असे. एक दिवस या वृद्ध पंडितानीं एक चिठी देवेंद्रनाथांपुढे ठेवून त्यावर सही करण्यास त्यांस सांगितलें. देवेंद्रनाथांचाही पंडिताबद्दल फार आदर असे. त्यांनीं त्या चिठीवर काय लिहिले आहे तेही न पाहतां सही केली. त्या चिठींत इतकेच होतें कीं, "तुमचा मुलगा श्यामचरण यास त्याचे हयातींत मी कधीही अंतर देणार नाहीं." ही गोष्ट त्या वेळीं तशीच राहून गेली. परंतु पुढे पंडित कमलाकांतांचे पश्चात् त्यांचा मुलगा पंडित श्यामचरण याने या चिठीचा उपयोग केला. तेव्हां देवेंद्रनाथांनी आपले वचन पाळलें. आणि पंडित श्यामचरण यानीही देवेंद्रनाथांची उपनिषदादि संस्कृत ग्रंथांच्या अध्ययनाची हौस पुरविली. इतकेच नव्हे तर ब्राह्मधर्माचे विधिविधान व स्तोत्रपाठ ठरविण्याच्या कामी पंडित श्यामचरण तत्त्ववागीश ह्यांचे देवेंद्रनाथांस पुढे वेळोवेळीं फार साह्य झाले.

असो. पंडित श्यामचरण यांच्या साहाय्याने देवेंद्रनाथांनीं संस्कृतवाङ्मयाचा अभ्यास चालविला. त्यांना भाषाशास्त्र शिकावयाचे नव्हतें. त्यांची तहान कांहीं वेगळ्या प्रकारची होती. त्यांनीं महाभारत वाचावयास घेतलें आणि त्यांना खालील श्लोकाने पुन्हा पूर्ववत् विचारारूढ केलें. तो श्लोक असाः—

धर्मेमतिर्भवतु नः सततोत्थितानां। सह्येक एव परलोक-गतस्य बन्धुः।
अर्था स्त्रियश्च निपुणैरपि सेव्यमाना। नैवाप्तभावमुपयन्ति न च स्थिरत्वम्॥*

धर्माच्या अगोदर देवाची निश्चित भावना असावी लागते. परंतु या अनन्त विश्वाचा नियामक एक साकार व सगुण परमेश्वर आहे असे म्हणणें मूर्खपणाचे आहे. अर्थात् देवाची मूर्तरूपानें उपासना करणें हें अज्ञान आहे, अशी त्यांचे मनाची दृढभावना झाली. घरीं दुर्गापूजेचा महोत्सव असला तर वडीलमाणसें काय म्हणतील याची परवा न करतां, जगदंबेचे मूर्तीपुढे ईशभावाने नमावयाचें नाहीं, अशी त्यांची वृत्ति बडखोर बनूं लागली, आणि आपलीं सर्व शास्त्रे मूर्तिपूजामयच आहेत, अशी कल्पना झाल्यामुळें स्वधर्मासंबधी त्यांचे मन निराश व उदासीन झाले. त्या वेळीं त्यांचे वय वीस वर्षांचे असेल. अशा मनःस्थितींत ते प्रथम कांहीं दिवस असतांना एक दिवस ते आपल्या खोलींत येरझाऱ्या घालीत होते. इतक्यांत पोथीचे एक सुटे पान वाऱ्याने उडत उडत त्याचे पुढून गेले. देवेंद्रनाथांनी ते सहज उचलून पाहिलें तो तें संस्कृतमध्यें लिहिलेलें आढळलें. या यदृच्छेने उडून आलेल्या पानावर काय लिहिले असावे, ते जाणण्याची त्यांस जिज्ञासा झाली. लगेच पंडित रामचंद्र विद्यावागीश यास त्यांनीं बोलवून घेतलें. बुडत्या माणसाने काडीच्या आधारासाठीं धडपडावे, त्याप्रमाणे संशयसमुद्रांत गटंगळ्या खात असलेल्या देवेंद्रनाथांनीं त्या पानाचा आधार मिळेल काय अशा आतुरतेने त्यावर काय लिहिले आहे, असें पंडितास विचारलें. कर्मधर्मसंयोगाने त्या पृष्ठावर ईशोपनिषदांतील पहिलाच श्लोक होता. तो असाः—

ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत्।
तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम्॥×

---

* नेहमीं जागृत असलेले जे तुम्ही त्या आपली मति धर्माचे ठिकाणीं सदैव असो. कारण तो धर्मच परलोकीं गेलेल्यांचा प्रत्युपकारानपेक्षी मित्र असतो. एरव्हीं मोठ्या चतुरांकडूनही सेविलेले नाना उपभोग (अर्थाः) आणि स्त्रिया हे कधीं खरे खरे आप्तही होत नाहींत आणि स्थिरही रहात नाहींत.

× भावार्थः—या पृथ्वींत जें काहीं जगत् आहे ते हे सर्व ईश्वरानें आच्छादित करावे ( परमार्थ सत्यरूपानें हें सर्व चराचर झांकून टाकावें सर्व

त्या वेदवाणीचा देवेंद्रनाथांच्या मनावर असा विलक्षण परिणाम झाला की, तेव्हांपासून त्यांचे चरित्रास निराळेच वळण लागलें. ईश्वरावर त्याची अढळ श्रद्धा बसली. ऐहिक सुखावरून मन उडून आत्मानंदाची चटक त्यांचे जीवास लागून गेली. आपल्या संशयग्रस्त मनाचे समाधान होण्यासाठी साक्षात् परमेशानेंच हा संदेश पाठविला असे त्यांच्या मनाने घेतले. त्या संदेशात सांगितल्याप्रमाणे ईश्वर मानवाप्रमाणे देहधारी नसून तो चिद्घन परमात्मा सर्व चराचर सृष्टीत संचरला आहे, ही भावना अखंड जागृत ठेवून जगात अनासक्त व असंग वृत्तीने राहावें, आणि जे दुसऱ्याचे आहे त्याचा अभिलाष धरू नये, हे तीन सिद्धान्त अंगीं पुरे बाणून घेण्याचा त्यानी दृढसंकल्प केला; आणि ज्यांत असले दिव्य संदेश सांठवलेले आहेत, अशा उपनिषदांचे ज्ञान संपादन करण्याकरिता श्यामचरण तत्त्ववागीश ह्याच्या साहाय्याने प्रमुख उपनिषदाचा अभ्यास केला.

अशी मनाची ही अनुकूल परिस्थिति मिळतांच त्याचे लहानपणचे दुसरे कांही संस्कार जागृत झाले. देवेंद्रनाथाचे वडील द्वारकानाथ हे राजा राम-मोहनरायाचे परममित्र, अनुयायी व एक प्रमुख सहाय्यकारी होते, हे सर्व मागील भागात आलेच आहे. राजा राममोहन यास देवेंद्रनाथानी आपल्या बालपणीं आपल्या घरी हमेशा पाहिले होते. देवेंद्रनाथांचे प्राथमिक शिक्षण राममोहन याच्याच शाळेत झाले होते. आपल्या एका श्रीमान् मित्राचा मुलगा म्हणून राममोहनाचे त्यांच्यावर फार प्रेम असे. राममोहन ह्याचा मुलगा देवेंद्रनाथाचा बालपणीचा शाळेतील दोस्त होता. हे दोघेही राममोहन यांच्या बागेत खेळावयास जात तेव्हा राममोहन आणि देवेंद्रनाथ झाक्यावर बसून एकमेकांस झोके देत. अशा पूर्वापारच्या घरोब्याच्या संबंधामुळे पुढें देवेंद्रनाथाच्या ठिकाणी तत्त्वजिज्ञासा उत्पन्न झाली असता राजा राममोहन यांचे आचार व विचार यांच्यासंबंधी त्यांची पूर्वस्मृति जागृत झाली.

---

विकारजात आत्मरूप आहे. अशी भावना करावी तशी भावना केली असतां हे सर्व सांडल्यासारखे होते) त्या योगानें तूं आपले पालन कर (आणि ज्याने अशा रीतीने त्याग केला आहे असा) तूं कोणाच्याही धनाची आकांक्षा करूं नको.

मूर्तिपूजेसंबंधीं राममोहनांचे विचारांची त्यांस थोडीबहुत कल्पना पूर्वींच झाली होती. एकदां दुर्गापूजेच्या उत्सवाच्या वेळीं देवेंद्रनाथ त्यांस बोलावण्यास गेले असतां 'दुर्गापूजेच्या उत्सवाला मी कसा येईन' असे म्हणून राममोहनांनीं येण्याचे कसे साफ नाकारिले, ते त्यांस स्मरत होते. इतकेंच काय पण विलायतेस जाण्यास निघतांना जेव्हां राममोहन द्वारकानाथ टाकूर यांचेकडे निरोप घेण्यास आले, तेव्हां देवेंद्रनाथ कोठे बाहेर गेले होते, त्यांस मुद्दाम बोलावून " मी माझे गादीचा वारसा आतां तुजकडे देऊन जातो " असे बाल देवेंद्रनाथास राममोहन सहज कौतुकाने कसे बोलून गेले, इत्यादि पूर्वस्मृति एकामागून एक जागृत होऊन, राजा राममोहन यांचेबद्दल त्यांचे ठायीं वसत असलेला आदर वृद्धिंगत झाला. आणि त्या थोर पुरुषाचे अंगीकृत कार्य पुरे करण्याकरिता सारे आयुष्य खर्चीं घालण्याचा त्यांनीं निश्चय केला.

प्रथम त्यांनीं आपले बंधु व इतर आप्त यांचेसमवेत तत्त्वरंजिनी सभा नामक एक संस्था आपल्या वयाच्या २२ वे वर्षीं इ. सन १८३९ सालीं स्थापन केली. याच संस्थेस पुढे पं. रामचंद्र विद्यावागीश यांचे सूचनेवरून तत्त्वबोधिनी सभा असे नाव पडले. उपनिषदांतील ज्ञानाचा प्रसार व्हावा व धर्मजिज्ञासा वाढवावी असे या संस्थेचे हेतु होते. या संस्थेच्या सभा साप्ताहिक व मासिक भरत असत. प्रथम सभेचे सभासद म्हणजे घरचींच दहा तरुण माणसे होती. परंतु अवघ्या दोन वर्षांत सभासदांची संख्या पांचशेपर्यंत गेली. इतकेंच काय, पण या संस्थेत बंगाल्यांतील कांहीं मोठमोठे राजे, महाराजे व जमीनदार, तसेंच कित्येक विद्वान् पंडित सामील झाले. तथापि या संस्थेचा आत्मा म्हणजे देवेंद्रनाथ हे होते. या संस्थेचे आचार्यपद पंडित रामचंद्र विद्यावागीश यांस देण्यात आले. ते आचार्यपीठावरून प्रवचन करीत. प्रवचनाचे सुरवातीस ते खालील श्लोक म्हणत.

रूपं रूपविवर्जितस्य भवतो ध्यानेन यद्वर्णितम् ।
स्तुत्या निर्व्वचनीयताखिलगुरो दूरीकृता यन्मया ॥
व्यापित्वञ्च विनाशितं भगवतो यत्तीर्थ-यात्रादिना ।
क्षन्तव्यं जगदीश तद्विकलता दोषत्रय मत्कृतम्* ॥ १ ॥

---

*भावार्थः—भगवन्, अरूप असे जे आपण त्या आपल्या ध्यानमिषाने मीं

दुसऱ्याही सभासदांचीं यथोचित भाषणें होत. पुढें लवकरच या संस्थेस तत्त्वबोधिनी संस्था जोडण्यांत आली व त्याचें अध्यापकत्व अक्षय्यकुमार दत्त नामक एका विद्वानाकडे देण्यांत आले. याशिवाय त्यांनीं एक वैदिक शाळाही सुरू केली.

याप्रमाणे या संस्थेचा क्रमशः उत्कर्ष होत असतां देवेंद्रनाथांचें लक्ष ब्राह्मसमाजाच्या तत्कालीन परिस्थितीकडे वेधले. त्या वेळीं पंडित ईश्वरचंद्र न्यायरत्नासारखे ब्रह्मसमाजी प्रवचनकार ब्राह्मपीठावरून अयोध्येचा राजा राम हा ईश्वराचा अवतार होता असे सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत. शूद्रांच्या समोर वेदपाठ करण्याची ब्राह्ममंदिरांत मनाई होती. ब्राह्मसमाजांत येणाऱ्या माणसांत, निष्ठा व शिस्त मुळींच नव्हती. ब्राह्मसमाजी लोकांनीं मूर्तिपूजा-निषेध स्वतांचे आचरणांत आणलाच पाहिजे, असा कडक निर्बंध नव्हता. त्यामुळे कित्येक ब्राह्मसमाजी स्वतः मूर्तिपूजक असत. समाजाला संप्रदायाचे बंधन अथवा एखाद्या निश्चित ध्येयाचे नियंत्रण असे नव्हते. अशी निष्ठाहीन व गैरशिस्त पद्धति पाहून ती मोडण्याचे देवेंद्रनाथांनीं मनावर घेतले. ते ब्राह्मसमाजांत इ. सन १८४३ साली सामील झाले; इतकेंच नव्हे, तर लगेच ब्राह्मसमाजाचे चालकत्वही त्यांनी आपल्या तत्वबोधिनी संस्थेकडे घेतले.

ब्राह्मसमाजाचे इतिहासकार लिओनार्डसाहेब असे म्हणतात कीं, ब्राह्म-समाजाच्या इतिहासात देवेंद्रनाथ ही एक असामान्य व्यक्ति होऊन गेली. त्यांनी ब्राह्मसमाजाचे तत्त्वज्ञान, अनुष्ठानपद्धति व विधिविधाने यांचे संशोधन केले, ब्राह्मसमाजाचा पुनरुद्धार केला आणि त्याच्या उत्कर्षास शाश्वती आणली. ती कशी आणली ते पुढील प्रकरणांतून यथाक्रम कळून येईल.

---

रूपाचे वर्णन केले; (त्याचप्रमाणे) सकलांचे गुरो! आपली स्तुति करून मीं आपल्या अनिर्वचनीयतेला बाध आणिला; (तद्वत्‌च) तीर्थयात्रादि करून आपल्या सर्वव्यापित्वाची हानि केली. एकंदरीने माझ्या हातून घडलेल्या ह्या तीन दोषांबद्दल हे जगदीशा मला क्षमा करावी.

## प्रकरण दुसरें

# पुनर्घटना

धार्मिक बाबतींत देवेंद्रनाथांचें धोरण विशेषकरून विधायक स्वरूपाचे व जुन्याचे साभिमानी अशा स्वरूपाचें असे. धर्मशीलाचा विकास आंतूनच होत असतो. कोणत्याही धर्ममतास बौद्धिकसमाति म्हणजे धर्मशील नव्हे असे त्यांचे म्हणणे असे. त्यांचा विचार व आचारसरणी पौर्वात्यपद्धतीची असे. सामुदायिक उपासनापद्धति ही मात्र त्यांनी पाश्चात्यांकडून घेतली असे दिसते.

देवेंद्रनाथ हे शिस्त आणि व्यवस्थितपणा ह्याचे पराकाष्ठेचे भोक्ते होते. त्यांनीं समाजांत दाखल झाल्यानतर समाजी लोकांचे आचारातील असबद्धपणा मोडून टाकण्याचें मनावर घेतलें. तसेच वेदपाठ, उपनिषदांतील कांहीं भागांचे प्रवचन, उपदेश आणि स्तोत्रपाठ, अथवा प्रार्थनासगीत अशी जी पूर्वीची पद्धत होती त्या ठिकाणीं त्यांनी ब्रह्मोपासनेची नवीन व्यवस्थित पद्धत सुरू केली. प्रथम त्यांत आभारप्रदर्शन, स्तवन आणि प्रार्थना असे भाग असत. पुढें, ब्रह्मोपासनेत प्रार्थना (Prayer), वदन (Salutation), चिंतन अथवा धारणा (Communion), ध्यान (Meditation)स्तोत्र अथवा संगीत (Hymn) पुन्हा प्रार्थना (Prayer), पाठ (Recitation)व शेवटची प्रार्थना (Concluding prayer) असा अनुक्रम असे. उपासनेवर देवेंद्रनाथांचा फार कटाक्ष असे. जे रोज नेमाने उपासना करीत नाहींत, त्यास ब्राह्म म्हणवून घेण्याचा हक्क पोचत नाहीं असे ते म्हणत. त्याप्रमाणे त्यांनी एक नवीन शिस्त समाजांत सुरू केली. "मी रोज भोजनापूर्वी गायत्रीमंत्राने ब्रह्मोपासना करीन; मूर्तिपूजा करणार नाहीं, समाजास वर्गणी देईन, आणि एकदरींत राजा राममोहन ह्यांनीं उपदेशिलेल्या वेदान्ततत्त्वानुसार धर्माचरण ठेवीन." अशा प्रतिज्ञालेखावर प्रत्येक सांप्रदायिकास आचार्यासमोर सही करून दीक्षा घ्यावी लागे. हा नवीन सप्रदाय सुरू केला त्याच्या आरंभीच्या पहिल्या दिवशीं ब्राह्मसमाजापैकीं एकवीस तरुण सभासद दीक्षा घेण्याच्या उद्देशाने योग्य पोषाख करून वृद्ध आचार्य पंडित रामचंद्र विद्यावागीश यांच्यापुढें उभे

राहिले. आणि तेथें मोठ्या गंभीरपणानें व आदरभावाने त्यांचा पहिला शपथविधि झाला. त्या वेळचे तें गांभीर्य, आणि उत्साही तरुणांचा तो धर्मभाव ह्यांच्या योगानें वृद्ध विद्यावागीश अत्यंत सद्गदित झाले! आईबापांचे मागे पोरक्या अर्भकाला मोठ्या कष्टाने संभाळून तो लहानाचा सुजाण झाल्यावर त्याच्या प्रेमळ दाईस जसा प्रेमाचा पान्हा फुटावा, तशी त्यांची स्थिति झाली! त्यांचा कंठ दाटून आला! त्या महत्त्वाच्या दिवशीं दीक्षेच्या सुप्रसंगीं त्यांनीं जें कांही सांगावयाचे म्हणून योजले होते ते सागता येणे त्यास अशक्य झाले; ते प्रेमभरात इतकेच म्हणाले कीं "आजचा हा सोन्याचा दिवस पाहण्यास राजा राममोहन जिवत असते तर त्यांस केवढी धन्यता वाटली असती!" राजा राममोहनांची ही ब्राह्मसंस्थेची अमोलिक ठेव दहा वर्षे त्यांनीं मोठ्या शिकस्तीने जतन करून ठेवली होती. ती आतां संभाळण्यास देवेंद्रनाथ हे योग्य पुढारी मिळाले, असे पाहून ती त्यांनीं त्यांचे स्वाधीन केली आणि त्याच सालीं (इ. स. १८४३) आपले कार्य संपलें असे समजून त्या निष्ठावंत आद्य आचार्याने देह ठेविला! असो.

वर सांगितल्याप्रमाणे देवेंद्रनाथांनीं सुरू केलेली दीक्षेची पद्धत महानिर्वाण-तंत्राला अगदीं धरून असे. दीक्षेच्या वेळीं शिखासूत्राचा त्याग करावा लागे. दीक्षेनंतर पुन्हा त्यांचा अंगिकार करण्यास हरकत नसे. कधीं कधीं तर दीक्षेचे वेळीं एक कुंड घेऊन जावे लागे, व त्या कुंडात अग्नि प्रज्वलित करून त्यांत यज्ञोपवीताची आहुति देण्यांत येई. नंतर दीक्षा घेणारास 'ॐतत्सत्' अशीं अक्षरे खोदलेली एक सांप्रदायिक आंगठी देण्यांत येई. तसेच त्या वेळीं कांही ब्रह्ममंत्रही देण्यांत येत. प्रथम कित्येक वर्षे स्त्रियांनाही मंत्रोपदेश देण्यांत येई. परंतु पुढे तो बंद केला. गायत्रीमंत्र सर्वांस म्हणतां येण्यासारखा नाहीं, असे वाटून देवेंद्रनाथांनीं "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म आनंदरूपामृतं यद्विभाति" असा उपनिषदातून एक नवीन मत्र सरसहा सर्व ब्राह्मांकरितां तयार केला. ह्यासच पुढे आणखी तीन मंत्रांची जोड करून दिली. ते मंत्र असेः—

(१) स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरं शुद्धमपापविद्धम् कविर्मनीषी परिभूः स्वयंभूर्याथातथ्यतोऽर्थान्व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥८॥ —ईशोपनिषद्.†

†भावार्थः—तो आत्मा सभोवार पसरलेला आहे. जो शुद्ध, लिंगशरीर-

(२) एतस्माज्जायते प्राणो मनः सर्वेंद्रियाणि च। खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी ॥‡ —मुंडकोपनिषद्.

(३) भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः॥ भयादिन्द्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पञ्चमः ॥* —काठकोपनिषद्.

ह्या ब्रह्ममंत्रांप्रमाणें त्यांनीं महानिर्वाणतंत्रांतील पंचरत्नस्तोत्राचे आधारें एक ब्रह्मस्तोत्र तयार केले ते असेः—

ॐ नमस्ते सते ते जगत्कारणाय नमस्ते चिते सर्व लोकाश्रयाय। नमोऽद्वैततत्त्वाय मुक्तिप्रदाय नमो ब्रह्मणे व्यापिने शाश्वताय ॥ त्वमेकं शरण्यं त्वमेकं वरेण्यं त्वमेकं जगत् पालकं स्वप्रकाशकम्। त्वमेकं जगत् कर्तृ पातृ प्रहर्तृ त्वमेकं पर निश्चलं निर्विकल्पम् ॥ भयानां भयं भीषण भीषणानाम् गतिः प्राणिनां पावन पावनानाम्। महोच्चैः पदानां नियंतृ त्वमेकं परेषां पर रक्षण रक्षणानाम् ॥ वयन्त्वां स्मरामो वयन्त्वाम्भजामो वयन्त्वां जगत् साक्षिरूपं नमामः। सदेकं निधान निरालम्बमीशं भवाम्भोऽधिपं त्वां शरण्यं व्रजामः ॥

ह्याप्रमाणें उपासनामंत्रांत त्यांनीं जरी बदल केला तरी त्यांनीं स्वतां गायत्रीमंत्राने दीक्षा घेतली असल्यामुळे रोज गायत्रीमंत्रानेच उपासना करण्याची प्रतिज्ञा त्यांनीं अखेरपर्यंत एकनिष्ठेने अखड चालविली.

देवेंद्रनाथांनीं ठरविलेल्या सांप्रदायिक प्रतिज्ञेत प्रथम वेदान्ततत्त्वानुसार वागण्याची शपथ असे. परंतु वेदान्त ह्या शब्दांच्या ठिकाणीं पुढे लवकरच ब्राह्मधर्म हे शब्द घालण्यांत आले. ह्या प्रतिज्ञेप्रमाणे वागणे हे स्वतां देवेंद्र-नाथांसही कांहीं सोपे नव्हतें. एकाद्या राजघराण्याप्रमाणें त्यांच्या जुन्या

---

रहित, अक्षत, शिरांनीं रहित ( म्हणजे स्थूल शरीरशून्य ) अविद्यामलरहित, धर्माधर्मादि पापरहित, सर्व द्रष्टा, सर्वज्ञ, सर्वांहून श्रेष्ठ असणारा व स्वयंभू आहे तो नित्यमुक्त ईश्वर अगदी जसें पाहिजे तसें म्हणजे कर्म, फल व साधन यांच्या अनुसार नित्य प्रजापतींना कर्तव्यांचा विभाग करून देता झाला.

‡ भावार्थः—या पुरुषापासून प्राण, मन, सर्व इंद्रियें, आकाश, वायु ज्योति आप व सर्व चराचराला धारण करणारी पृथ्वी उत्पन्न होते.

* भावार्थः—या परमेश्वराच्या भयानें अग्नि तापतो, याच्या भयानेंच सूर्य प्रकाशमान् होतो, याच्या भयाने इंद्र, वायु, व पांचवा मृत्यु धावतो.

खानदानीच्या प्रतिष्ठित घराण्यांत व्रतवैकल्ये आणि देवादिकांच्या अर्चा व पूजा असे समारंभ वरचेवर होत असत. त्यांत दुर्गापूजेचा वार्षिक महोत्सव अत्यंत श्रेष्ठ असे. अशा प्रकारच्या मूर्तिपूजेच्या उत्सवांत कोणताही भाग घ्यावयाचा नाहीं, इतकेंच नव्हे तर त्या वेळी तेथे हजरही असावयाचें नाहीं, असा आदिब्राह्म राममोहनराय ह्यांचा बाणा असे. आणि त्याच बाण्याने आपण स्वतः वागून सर्व ब्राह्मास वागावयास लाविले पाहिजे, असा देवेंद्रनाथांनीं निश्चय केला होता. त्याप्रमाणे पहिल्याच सालच्या दुर्गापूजेच्या महोत्सव-प्रसंगीं घरांतील लहानमोठ्या माणसांच्या मनास दुःख होईल, ह्याची कांहीं-एक पर्वा न करितां ते बहुतेक घराबाहेरच राहिले; आणि त्यानतर कित्येक वर्षे घरच्या दुर्गापूजेच्या महोत्सवप्रसगीं तो टाळण्यासाठी देवेंद्रनाथ कोठतरी प्रवासाला बाहेर पडत असत. अशा वेळीं प्रवासांत उन्हातान्हांत हिंडत असतां त्या वेळीं घरची मंडळी कोणत्या समारंभात गुंतली असतील ह्याचे चित्र त्यांच्या डोळ्यांसमोर येई. निराकार आणि अनंत अशा परमेश्वराचे सत्यस्वरूप न जाणतां अज्ञानमूलक अशा धर्माचारात सर्व मडळी गढलेली आहेत हे मनात येऊन त्याचे नेत्रांतून अश्रुधारा वाहू लागत. आणि हे अज्ञान दूर करण्याबद्दल ते ईश्वराची करुणा भाकीत. अशा रीतीने देवेंद्रनाथांनी आपल्या स्वतःच्या आचर-णाने सस्थेत निष्ठेचे नवजीवन उत्पन्न केल्यावर ब्राह्मसमाजाचे धर्माचा सर्वत्र प्रसार करण्याचे कार्य तत्त्वबोधिनी सभेने मोठ्या उमेदीने सुरू केले. सदर सभेस एकाने आपला छापखाना दिला. त्या छापखान्यातून राममोहन यांचे कित्येक विवादी लेख प्रसिद्ध होऊं लागले. शिवाय त्यांनी तत्त्वबोधिनीपत्रिका नामक एक मासिक सुरू केले. अक्षयकुमार दत्त हे उत्साही विद्वान् गृहस्थ त्याचे पहिले संपादक होत. शिवाय पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, डॉ० राजेंद्र-लाल मित्र (L. L. D.), प्रसन्नकुमार सर्वाधिकारी, आनद कृष्ण बोस, राजनारायण बोस आणि आनंदचद्र वेदान्तवागीश अशा जाड्या विद्वानांचे तत्त्वबोधिनीसभेत एक मडळ असे. प्रत्येक लेख ह्या मंडळाचे नजरेखालीं घालून त्यांचे संमतीने प्रसिद्ध व्हावा असा प्रथम कांहीं दिवस निर्बंध असे. वरील मडळाचे सभासद हेही मधून मधून लेख लिहीत असत. पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर ह्यांची महाभारतावरील लेखमाला राज-नारायण बोस ह्यांचीं उपनिषदांचीं इंग्रजी भाषांतरें, ह्याचप्रमाणें

डॉ० राजेंद्रलाल मित्र ह्यांच्यासारख्या विद्वानांचे लेख, पत्रिकेत येऊं लागल्यामुळें त्यांतील गंभीर विचारांनी आणि भारदस्त भाषेच्या योगाने तत्त्वबोधिनी पत्रिकेने तत्कालीन बंगाली नियतकालिकांत बरीच क्रांति घडवून आणली आणि वाचकवर्गासही विचार-प्रवण केलें. आतांपर्यंत ब्राह्मधर्माचा प्रसार कलकत्ता शहरापलीकडे फारसा झाला नव्हता. इतकेंच नव्हे तर ब्राह्म हे खिस्ती झालेले बाटे लोक आहेत असे खेड्यांतील लोक समजत. ह्यास्तव प्रचारकांच्या द्वारें चोहोंकडे आपल्या वास्तविक धर्ममतांचा प्रसार करण्याचें देवेंद्रनाथांनीं मनावर घेतलें. आणि त्यांच्या उत्साही अनुयायांच्या परिश्रमानें लवकरच बन्सबारिआ, सुखसागर, मणिरामपूर, पानीहत्ती, मिदनापूर, बरद्वान, डाका आणि रंगपूर अशा अनेक ठिकाणीं एकामागून एक ब्राह्मसमाजाच्या शाखा स्थापन झाल्या. त्या कामीं कोठें मुनसफ, कोठें डेप्युटी कलेक्टर, कोठें हेडमास्तर, अशा ठिकठिकाणच्या सुशिक्षित स्थानिक अधिकाऱ्यांनीं पुढाकार घेतल्यामुळे हें संप्रदायवृद्धीचें काम सुकर झालें. त्याचप्रमाणे राममोहन यांनीं मोठमोठ्या घराण्यांतून आपल्या मतांचा प्रवेश पूर्वींपासूनच केलेला असल्यामुळे त्यांचे अनुषंगाने त्यांचे आश्रित व आप्तेष्ट ह्यांच्या सहानुभूतीचा ओघ साहजिकच तिकडे वळला. ह्या कार्यासाठीं स्वतां देवेंद्रनाथांनींही, लाहोर, मुलतान, अमृतसर वगैरे अनेक ठिकाणी आपला दौरा फिरविला. ठिकठिकाणी स्थापन होणाऱ्या ब्राह्मसमाजाच्या शाखेकरितां धर्मप्रचारक आणि उपदेशक पुरविण्याचें काम तत्त्वबोधिनी पाठशाळेने केलें. तत्त्वबोधिनी पाठशाळेंत उपनिषदांचे शिक्षण देण्यात येत असे. परंतु पुढें वेदांचे साग्र अध्ययनाची जरूर भासूं लागली. कारण त्या काळीं बंगाल्यांत वेदविद्या बहुतेक नामशेष झाली होती म्हणून वेदाध्ययन करण्याकरितां एक हुशार विद्यार्थी मुद्दाम काशीस पाठविला. ब्राह्मधर्मप्रसाराकरितां प्रथम पंडित श्रीधर न्यायरत्न पं० व्रजनाथ चतर्जी, कृष्णकमल गोस्वामी आणि लाला हजारीलाल अशा गृहस्थांची योजना झाली. त्यांपैकीं आद्य प्रचारकाचा मान लाला हजारीलाल नामक इंदूरच्या एका कायस्थाला देण्यांत आला. ह्या प्रचारकाचें पूर्ववृत्त जरी स्पृहणीय नव्हतें, तरी पुढें देवेंद्रनाथाच्या उज्ज्वल चरित्रानें अंतरांत प्रकाश पडून मूळचा दुर्वृत्त असतां पुढें सुवृत्त होऊन ब्राह्मधर्माच्या प्रचारकाचे कामीं त्यांनीं अविश्रान्त मेहनत घेतली. ती इतकी कीं, बहुतांशीं ह्यांच्या एकट्याच्या खटपटीनें

अल्पकाळांत ब्राह्मसमाजाचे पांचसातशें सभासद झाले ! लाला हजारीलाल यांच्यापेक्षांही ज्याचे नांव आदिब्राह्मसमाजांत अधिक आदरास पात्र झालें असे दुसरे गृहस्थ म्हणजे राजनारायण बोस होत. यांच्याबद्दल पुढें एका प्रकरणांत सविस्तर हकीकत येणारच आहे. येथे इतकेच सांगितले म्हणजे पुरे की देवेंद्रनाथांच्या ब्राह्मधर्मात प्रेमलक्षणाभक्तीला फारसा अवसर नव्हता. ईश्वराचे अनंतत्व आणि ह्या विश्वघटनेत दिसून येणारे ईश्वराचे चातुर्य, योजना आणि अघटित घटनापटुत्व, इत्यादि गुणांचे स्तवन व चिंतन हाच त्यांचे पंथांतील विशेष होता. त्यास प्रेमलक्षणाभक्तीची जोड राजनारायण बोस यांनी करून दिली. वेदान्तांत "रसो वै सः" किंवा "आत्मानमेव प्रियमुपासीत" इत्यादि वचनांनीं भक्तीचे स्वरूप दिग्दर्शित केले आहे. आणि त्याचाच अनुवाद पुढे साधुसंतांनींही आपल्या गोड वाणीने केला आहे. तथापि राजनारायण बोस ह्यांनीं ही जी भक्तीची जोड ब्राह्मधर्मास करून दिली त्यास आधार विशेषकरून एका फ्रेंच धर्माधिकाऱ्याने केलेल्या सुप्रसिद्ध प्रार्थनेचा होता असे दिसते.

ह्यानंतर आदिब्राह्मसमाजास एक संप्रदायी ग्रंथ असावा, अशी उणीव भासूं लागली आणि तीही देवेंद्रनाथांनी राजनारायण बोस, अक्षयकुमार दत्त आणि अयोध्यानाथ पक्राशी ह्यांचे साहाय्याने भरून काढली. त्या चारी गृहस्थांच्या विचारांचे ओढे एकचित्त होऊन जो ब्राह्मधर्माचा प्रवाह सुरू झाला,—त्यांत प्रत्येकाचा अंश किती हे समजणे शक्य नाही. तथापि त्या प्रवाहांत वैदिकवाङ्मयावरील निस्सीम श्रद्धेची झिलई निघून गेली. शंकराचार्यांचे वेदान्त, मायावाद, अवतारवाद वगैरे साफ धुऊन गेले आणि त्या ठिकाणी ज्याला इंग्रजींत 'थिईझम' म्हणतात तेवढें तत्त्व काय ते उरले. ईश्वर एक आणि अद्वितीय आहे. त्याचे अनंत कल्याणगुण आहेत. त्यानेच सर्व चराचर निर्माण केलें. त्याच्या उपासनेत सर्व ऐहिक व पारलौकिक सुख आहे. त्याच्यावर प्रेम करणे व त्यास प्रिय होतील अशा सत्कर्मीं रत होणें हीच त्याची उपासना होय. हेंच त्या थिईझम ऊर्फ ब्राह्मधर्माचे बीज होय. तें कबूल असेल त्यास ब्राह्मसंप्रदायी होतां येई. सांप्रदायिकांस देश व जात यांचा निर्बंध नव्हता. ईश्वरोपासना केव्हां आणि कोठें करावी त्याबद्दलही कांहीं बंधन नव्हतें. पठणासाठीं एकादा ठरीव ग्रंथ नव्हता. व्यसनांपासून परावृत्त होण्यापलीकडे कोणतेंही विधान नव्हते.

अरण्यवास नको होता. कर्मकांडाचे विधि नव्हते. तीर्थयात्रांची आवश्यकता नव्हती. शुद्ध अंतःकरण ह्यासच तीर्थराज मानीत. पापक्षालनास खराखरा पश्चात्ताप आणि पापाची पुनरावृत्ति न होण्याविषयीं निर्धार, हेच काय ते उपाय मानले होते. वेदविद्येच्या ऐवजीं, अशा प्रकारचा जो ब्राह्मधर्म, त्याचें तरुणांस शिक्षण देण्याकडे विशेष लक्ष देण्यांत येत असे. तत्त्वबोधिनी पत्रिकेच्या मथळयावरील पूर्वीचे ब्रीदवाक्य बदलण्यांत आले. आणि त्या ठिकाणीं मांडूक्य-उपनिषदांतील एक वाक्य घालण्यांत आले. त्याचा भावार्थ असा कीं, " वेद आणि वेदांगे यांचे ज्ञान हे गौण असून शाश्वत परमात्म्याचे ज्ञान हेंच श्रेष्ठ होय." ह्याप्रमाणे नियमित ईश्वरोपासना, सांप्रदायिकांनीं करावयाचा शपथविधि आणि सांप्रदायिक ब्राह्मधर्मग्रंथ ह्या तीन महत्त्वाच्या सुधारणा राममोहनांच्या नंतर देवेंद्रनाथानीं इ.सन १८४७ते५० ह्या सालात घडवून आणल्या.

आतांपर्यंत सृष्टचमत्कार हाच काय तो ईश्वराचा साक्षात्कार असे मानण्याकडे ब्राह्मांचा कल होता; परंतु पुढे अक्षयकुमार दत्त यांचे धर्मतत्त्वविवेक आणि राजनारायण ह्यांची धर्मतत्त्वदीपिका ह्या लेखांतून असे प्रतिपादन येऊं लागले कीं, बाह्यसृष्टीचे घडामोडींत ईश्वराच्या चातुर्यादि गुणांचे जरी दर्शन होते, तरी मनुष्याची उपजतबुद्धि ( Intuition ) किंवा आत्मप्रत्यय हाच धर्माला जास्त निश्चित असा आधार आहे. ह्या मतांतराचे वेळीं देवेंद्रनाथ हिमालयांत एकान्तवासासाठीं गेले होते. त्यांच्या गैरहजेरींत महाराजा रामनाथ ठाकूर ( एके ठिकाणीं देवेंद्रनाथांचे नांव आहे ) व रामप्रसाद राय ( राममोहन यांचे द्वितीय चिरंजीव ) यांस ह्याच सुमारास आदिब्राह्मसमाजाचे ट्रस्टी नेमण्यांत आले. ब्राह्मसमाज संस्था चांगली ऊर्जितावस्थेस येत चालल्यामुळे तत्त्वबोधिनी सभेचे वेगळे कारण राहिले नाहीं. ती सभा समाजांतच अंतर्धान पावली. ह्यानंतर ब्राह्मविद्यालयनामक एक संस्था ब्राह्मधर्मशिक्षणाकरितां संस्थापित केली. त्यांत ब्राह्मधर्ममतविश्वास ह्या नांवाचे पुस्तकावरून देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन हे व्याख्याने देत. व्याख्यानाचे विषय ईश्वराचें अस्तित्व व त्याचे गुण; सृष्टीचा उत्पत्तिस्थितिलयकर्ता ईश्वर; ईश्वराचें सुखमय स्वरूप; ईश्वराचें सद्रूप; ईशप्रेम आणि विषयसौख्य; प्रेय व श्रेय; भवितव्यता; स्वर्ग आणि पाताळ आणि मोक्षाचें स्वरूप असे असत. ह्याशिवाय केशवचंद्र सेनांचीं इंग्रजी व्याख्यानें व लहान चोपडीं प्रसिद्ध होतच

होतीं. आणि ह्या सर्वांस देवेंद्रनाथ ठाकूर ह्यांचे द्वितीय चिरंजीव सत्येंद्रनाथ ह्यांच्या अत्यंत प्रासादिक गीतांची अमोलिक जोड मिळाली होती.

ब्राह्मधर्माची शब्दसंपत्ति अशा रीतीनें वाढीस लागली असतां, विचाराबरोबर आचार ठेवण्याकडेही देवेंद्रनाथांनीं आपले लक्ष पुरविले. जातकर्म, नामकरण, उपनयन, ब्राह्मदीक्षा, विवाह, अंत्येष्टि आणि श्राद्ध असे संस्कार ब्राह्मधर्माप्रमाणे मूर्तिपूजाविरहित कसे करावे, ते प्रथम देवेंद्रनाथांनी ठरविले. आणि त्याप्रमाणे स्वतां आचरण ठेवून त्यांनी इतरांस कित्ता घालून दिला. वडिलांचे वर्षश्राद्धाची गोष्ट पुढे येणारच आहे. त्यांनी आपल्या मुलीचा विवाहही ब्राह्मपद्धतीप्रमाणे केला. त्यांनीं आपले घराण्यात तर ब्राह्मधर्माची छाप हळुहळू इतकी बसवली की, त्यानी आपल्या वाडवडिलांच्या जुन्या राहत्या घरांतून त्यांच्या खास कुलदेवतेचे मूर्तीसच रजा दिली. आणि दुर्गापूजेच्या विस्तृत दालनांत ब्रह्मोपासना सुरू केली. मूर्तिपूजेचाच एक प्रकार म्हणून देवेंद्रनाथांनीं गळ्यांतील यज्ञोपवीताचाही त्याग केला. या त्याच्या कृत्यामुळे त्यांस जातिबहिष्कृत रहावे लागले. पण ते त्यानी सहन केले. त्यांच्या ब्राह्मधर्मांतील उपनयनांतही यज्ञोपवीतधारणविधि आहे. परंतु उपनयनानंतर ते काढून टाकण्यास प्रत्यवाय नाही इतकी सुधारणा आहे. एकंदरीत मूर्तिपूजाविरोधांत देवेंद्रनाथांनीं राजा राममोहन ह्यांसही मागे टाकले. आणि शिवाय राजा राममोहन यांचे प्रारंभीचे कार्य बहुतांशी विघातक स्वरूपाचे होते; पण देवेन्द्रनाथांचे कार्य विधायक स्वरूपाचे झाले. सनातनधर्मरूप पुराणपुरुषाचे शरीरांतील मूर्तिपूजादि अत्यंत मर्मस्थाने नासलीं आहेत, अशाबद्दल त्याची एकदां खात्री होतांच त्यावर सौम्य बाह्योपचार करूनच न थांबता देवेंद्रनाथांनीं हातीं नस्तर घेऊन एकदम काळजाला हात घातला; यात त्यांचें मनोधैर्य व आत्मविश्वास दिसून येतो. पण ह्याबरोबरच दुसरा एक विशेष त्यांचे ठिकाणी प्रामुख्याने दिसतो, तो हा कीं, जुंने मोडीत असतां किंबहुना ते मोडण्याचे पूर्वींच त्यानीं नवीन संप्रदायाची उभारणी करण्यास पद्धतशीर आरंभ केला. राजा राममोहन दीर्घायु झाले असते तर हे कार्य त्यांनीही कदाचित् केले असते; परंतु अंगीकृत कार्य अपुरेंच टाकून ते गेल्यामुळे त्यांचे पश्चात् अगदींच विस्कळीत झालेल्या ब्राह्मसंस्थेचे देवेंद्रनाथांनी वरीलप्रमाणे पुनरुज्जीवन केले.

---

## प्रकरण तिसरें

# सत्त्वपरीक्षा

मागील प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणे ब्राह्मसमाजाच्या मतास कांहीं विशिष्ट स्वरूप येत असतांना मिशनऱ्याचे पुढारी अलेक्झांडर डफ ह्यांनी कलकत्त्यांत ख्रिस्तीकरणाचा उपव्याप बराच जोराने चालविला होता. त्यासंबंधी त्यांचे भाईबंद फर्कुहारसाहेब 'आधुनिक धार्मिक चळवळी' नामक आपल्या पुस्तकांत असे वर्णन करतात कीं, "डफसाहेबांचे कर्तृत्वानें हिंदुस्थानांत ख्रिस्तीकरणाच्या एका नवीन युगास आरंभ झाला. त्याची शाळा विलक्षण लोकप्रिय झाली. शहरातील अत्यंत होतकरू तरुण विद्यार्थी त्याच्याजवळ गोळा झाले. आणि त्यानी दिलेले शिक्षणही फार परिणामकारक झालें. पाश्चिमात्य विचारांनी विद्यार्थ्यांच्या मनांत अतिशय खळबळ करून सोडली. त्यामुळे जुने विचार व जुन्या समजुती भराभर नाहीशा होऊं लागल्या, आणि रोजच्या बायबलच्या धड्याने त्यांची मने ख्रिस्ती विचारानी भारून गेलीं. त्यामुळे लवकरच चांगल्या हुशार व होतकरू तरुणांचा प्रवाह हिंदु-धर्मातून ख्रिस्तीधर्मात जाऊ लागला आणि अशा रीतीने डफसाहेबांचे पराक्रम व ख्रिस्तीधर्म हा एकच मोठा चित्ताकर्षक विषय हिंदुसमाजांत ज्याच्या त्याच्या तोंडी येऊ लागला." असो. ह्याप्रकारें डफप्रभृति पाद्री लोकांनी केलेल्या उद्योगाचे अनिष्ट परिणाम हिंदुस्थान अजूनही भोगीत आहे. परंतु त्या वेळी त्याच्या ह्या उपद्यापी क्रियेचे प्रतिक्रियारूप जें फळ उत्पन्न झाले, त्यामुळे एकंदर ब्राह्मसमाजाची नसली, तरी देवेंद्रनाथ-प्रभृति आदिब्राह्मसमाजीयाची दृष्टि बरीच निवळली यांत शंका नाहीं. हीच गोष्ट पुढील हकीकतीवरून दिसून येईल.

इ. सन १८४५ च्या उन्हाळ्यांतील एका सकाळीं देवेंद्रनाथ नित्या-प्रमाणे वर्तमानपत्र वाचीत असतां त्यांच्या घरांतील 'सरकार' राजेंद्रनाथ त्यांचेकडे घाईघाईने आला. त्याचा चेहरा उतरला होता व डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या होत्या. आपलें दुःख क्षणभर आंवरून तो म्हणाला,

"गेल्या रविवारीं माझी बायको आणि माझा धाकटा भाऊ उमेशचंद्र याची बायको, गाडींत बसून कोठे चालल्या असतां उमेशचंद्र कोठून येऊन त्याने ती गाडी गांठली व त्या गाडीतून आपले अल्पवयी बायकोस जबरदस्तीने काढून दोघेही डॉ० अलेक्झॅंडर डफ या पाद्र्याकडे गेलीं. माझा भाऊ त्या पाद्र्याचे शाळेतील विद्यार्थी आहे. माझे वडिलांनी त्यांना परत आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण व्यर्थ. मग आम्ही सुप्रीम कोर्टात फिर्याद दिली, तीही काढून टाकली. माझा भाऊ अवघा चवदा वर्षांचा असून त्याची बायको अकरा वर्षांची लहान मुलगी आहे. अशा आमच्या अजाण व अल्पवयी मुलास तुम्ही बाटवू नका, अशी त्या पाद्र्याची आम्ही पुष्कळ विनवणी केली; पण आमचे काहीएक न ऐकता त्याने काल सध्याकाळी शेवटीं दोघास बाप्तिस्मा दिला !" असे सांगून तो रडू लागला. ती त्याची हकीकत ऐकून देवेंद्रनाथासारख्या साधुवृत्तीच्या व उदारमताच्या गृहस्थासही अत्यंत त्वेष आला. ज्या ह्या गोऱ्या पाद्रीभटाचे पाय जमिनीस लागतना, म्हणून राममोहनांनी त्यांस आपली 'ओसरी' दिली तोच अलेक्झांडर पुढे शिकंदर बनून हिंदूच्या घरातील शील व पावित्र्यास खुशाल बाटवू लागला, ही गोष्ट, डफचे पुरस्कर्ते राममोहन हयात असते तर त्यासही, सहन झाली नसती. नाराज विद्यार्थ्यांस बळेच डफचे शाळेत लोटून त्यास बायबल वाचण्यास भाग पाडणारे राजा राममोहन याचा आत्मा ह्या वेळीं जेथे असेल तेथ ह्या विश्वासघाताने तो अनुतप्तच झाला असेल. ब्राह्मसमाजाचे ख्रिस्ती इतिहासकार ह्या निंद्य प्रकाराचा कोठही निषेधच काय पण उल्लेखही करीत नाहींत. एका कुलीन घराण्यांतील एक अल्पवयी विद्यार्थी व त्याची लहान बायको ह्यास त्यांचे वडिलाचे मनाईस न जुमानता केवळ राजसत्तेच्या अप्रत्यक्ष जोरावर परधर्मीयांनी बाटविणे, यात हिंदुसमाजाची सत्त्वहरणाचीच वेळ आली होती; परतु सुदैवाने त्या वेळीं कलकत्त्यांतील अखिल हिंदुसमाज खडबडून जागा झाला.

तत्त्वबोधिनीसभेच्या धर्माभिमानासही त्या वेळीं तेज चढले. ह्या पाद्री लोकानी बंगाली तरुणांचीं मने भ्रष्ट केलीं होती. त्यासाठी ख्रिस्ती मिशनरी लोकांशी आपल्या मुलांचा यापुढे कधी संबध येऊं नये, व असे प्रकार पुन्हा घडूं नयेत म्हणून त्यांनी फार मोठा खटाटोप केला. त्यासाठीं ब्राह्मसमाज व

धर्मसभा हें आपले मतभेद विसरून एक झाले. आणि त्यांचे प्रयत्नानें बंगाल्यांतील ही धर्मांतराची लाट बरीच थोपविली गेली. त्या वेळीं देवेंद्रनाथप्रभृति कलकत्त्याचे पुढाऱ्यांची सभा होऊन फार मोठी रक्कम गोळा करण्यांत आली. व त्यातून हिंदुहितार्थि विद्यालय नामक संस्था स्थापण्यांत आली ह्या विद्यालयाचा दरमहाचा खर्च एक हजार रुपये होता. भूदेव मुखोपाध्याय हे त्यावरील मुख्य अध्यापक होते. ह्या कामीं देवेंद्रनाथांस चाळीस हजार रुपये खर्च आला असे म्हणतात.

त्यानंतर डॉ० डफ यांच्या हिंदुस्थान व हिंदुस्थानचे मिशनरी या ग्रंथावर तत्त्वबोधिनीपत्रिकेतून कडक टीका येऊं लागली. त्याचे उत्तरादाखल ब्राह्मसमाजाचे तत्त्वांवर डॉ० डफ् यानेंही खूप टीका चालविली. व त्यांत हिंदूंचे वेद स्खलनशील नाहींत ह्या तत्त्वावर त्यानें फार झोड उठविली. अर्थात् त्यास प्रत्युत्तर म्हणून ब्राह्मसमाजाच्या वतीनें राजनारायण बोस यांस आपलें सर्व शास्त्रांस आधारभूत म्हणून वेद व वेदान्त यांचा जोरानें पुरस्कार करणें ओघास आले. वेदांतील तत्त्वज्ञान त्रिकालाबाधित आहे असे सिद्ध करण्याकरितां झाडून सारे मुद्दे पत्रिकेचे द्वारे पुढे मांडण्यांत आले. परंतु ह्याप्रमाणे वेदांची तरफदारी हट्टास पेटून पक्षाभिमानानें सुरू असतां, खुद्द पत्रिकेच्या संपादकमंडळांतच त्याबद्दल तीव्र मतभेद उत्पन्न झाला होता. आणि मिशनऱ्यांशीं दोन हात खेळून झाल्यानंतर या मतभेदास तोंड फुटून पत्रिकेतून त्याची उघड भवति न भवति सुरू झाली. देवेंद्रनाथ व पत्रिकेचे संपादक अक्षयकुमार दत्त यांचे दरम्यान या बाबतींत तीव्र मतभेद उत्पन्न झाला. अक्षयकुमार दत्त हे अत्यंत चिकित्सक बुद्धिवादी होते. वेद हे अपौरुषेय किंवा प्रमादातीत आहेत हा सिद्धान्त त्यांस मान्य नव्हता.

अक्षयकुमार दत्त यांस त्यांचे सहकारी संपादक आणि सामान्यतः सुशिक्षित तरुण बंगाली यांचे पाठबळ होतें. तेव्हां याचा एकदा कायमचा शहानिशा लावणे देवेंद्रनाथांस भाग पडलें. एकेपरी श्रुति-माउलीच्या इज्जतीचा तो प्रश्न होता. देवेंद्रनाथांस वैदिकवाङ्मय अत्यंत पूज्य वाटत होतें; परंतु तत्त्वबोधिनीसभासदांतच असा बुद्धिवादाचा बखेडा माजल्यामुळें पुन्हा सत्त्व-परीक्षेची वेळ आली. तेव्हां इ. सन १८४५ देवेंद्रनाथांनीं चार चांगले हुषार विद्यार्थी काशीस वेदाभ्यास करण्याकरितां मुद्दाम पाठविले. पंडित आनंदचंद्र वेदान्त-

वागीश, पंडित रामनाथ, पं० बनेश्वर आणि तारकनाथ हे ते चार विद्यार्थी होत. यांपैकी पं० आनंदचंद्र हे पुढे ग्रंथकार म्हणून प्रसिद्धीस आले. त्यांनीं अथर्ववेद आणि उपनिषदे यांचा अभ्यास करण्यास पाठविले होते. आणि बाकीच्यांस दुसऱ्या तीन वेदाचा अभ्यास करावयाचा होता. हे परत आल्यावर ब्राह्मसमाजांत आचार्य म्हणून दाखल झाले. पंडित आनंदचंद्र यांची पंचदशी, वेदान्तसार, भगवद्गीता, तसेच श्रौत आणि गृह्यसूत्रे इत्यादि टीका-ग्रंथ प्रसिद्ध आहेत. या चार विद्यार्थ्यांचा वेदाभ्यास पुरा होण्यापूर्वींच दुर्दैवानें त्यांस परत यावें लागलें. देवेंद्रनाथ स्वतांही, थोडे दिवसांनी इ. सन १८४७ साली, या गोष्टीचे निर्णयासाठीं काशी येथे गेले. त्यांची धर्मजिज्ञासा बलवत्तर होती, आणि शिवाय ब्राह्मसमाजाचे मुख्य मार्गदर्शक, ही त्यांचेवर मोठी जबाबदारी होती आणि त्या बाबतीत तत्त्वबोधिनी पत्रिकेचे संपादकमंडळ बहुतांशी त्यांचेविरुद्ध होतें. म्हणून ही त्यांचे परीक्षेचीच वेळ होती असें आम्ही म्हणतों.

इ.सन १८४७ साली देवेंद्रनाथावर संकटपरंपरेचा गहजब सुरू झाला. त्यांचे वडील द्वारकानाथ ठाकूर विलायतेस गेले होते, तेथेंच इ.सन १८४६ साली त्यांचा अंत झाला. त्यांच्या अतिशय उदार व खर्चिक स्वभावामुळे त्यांनी आपल्या मागें इस्टेटीवर एक कोट रुपये कर्ज करून ठेवलें होतें. या कर्जाची भीति पूर्वी-पासूनच डोळ्यापुढें असल्यामुळें द्वारकानाथबाबूंनी आपलें काही इस्टेट मुलांचे नांवें ट्रस्ट करून ते सावकाराचे तगाद्यापासून निर्बंध करून ठेवले होते. परंतु सावकारास बुडवून या गोष्टीचा फायदा घेणें देवेंद्रनाथांस आवडलें नाही. त्यांची आजी वारली त्याच प्रसंगी त्यांचे ठिकाणी वैराग्याचा अंकुर उद्भवला होता. ईश्वरीकृपा संपादण्यासाठीं ऐहिक ऐश्वर्यावरची ममत्वबुद्धि सोडावी असें मनांत येऊन त्यांनी कित्येक बहुमोल वस्तूंची मागें एकदा खैरातही करून टाकली होती. परंतु निस्संग होण्याचें साहस त्या वेळीं पुरें साधलें नाही; म्हणूनच ईश्वरानें हा बळेंच योग घडवून आणला असावा असेंही त्यांच्या मनांत आल्यावांचून राहिलें नाहीं. शिवाय जें दुसऱ्याचें आहे त्याचा अभिलाष धरू नको, अशी ईशावास्योपनिषदाच्या द्वारें ईश्वराची त्यास स्पष्ट आज्ञा होती. आणि ती आज्ञापालनाची अत्यंत कसोटीची वेळ आली होती. इस्टेटीवर तर दुपटीहून अधिक कर्जाचा बोजा होता.

तेव्हां जोपर्यंत कर्ज फिटले नाही तोपर्यंत ती मालमत्ता आपली नाहीं, परक्याची आहे, असा त्यांनीं निर्धार केला. आणि कर्जाचे फेडीसाठीं सर्व इस्टेट सावकाराचे स्वाधीन करण्याचे ठरवून त्यांनी सर्व इस्टेटीच्या यादी तयार केल्या, व त्या अर्जासोबत कोर्टात हजर करण्याचे त्यानी ठरविले. या गोष्टीस त्यांचा चुलता महाराजा रामनाथ ठाकूर व घरची मंडळी अत्यंत प्रतिकूल होती. परंतु या कामी कोणाचे ऐकावयाचे नाही असे त्यांनी ठरविले होते. कर्जाचे फेडीकरितां कां होईना; पण आपल्या पन्नास लाखांच्या इस्टेटीवर पाणी सोडण्याचे निश्चयाने ते जेव्हां घराचे बाहेर पडले, तेव्हा श्रीमतीत वाढलेल्या घरच्या स्त्रियांनीं भावी दैन्य डोळ्यांसमोर येऊन, रडून रडून आकांत केला ! चुलते रामनाथ तर अत्यंत संतापून घर सोडून चालते झाले.

ती देवेंद्रनाथाची पुन्हा सत्त्वपरीक्षेची वेळ आली होती. जगाचे रीतीप्रमाणे त्यांनी आपल्या घराण्याची अब्रू रक्षण करण्याचे कांही आडधोरण ठेवले असते, तर लोकांनी त्यास नावे ठेवली असती असे नाही. परंतु ईशोपनिषदांतील ती दिव्य देववाणी त्याचे कानात घुमून राहिली होती. सुदैवाने त्याचे धाकटे बधु त्याच्या विचाराबाहेर नव्हते. थोर चुलत्याचा संताप आणि प्रिय गृहलक्ष्मींचा आकाशभेदी विलाप, ह्यांनी न खचता, आणि भावी दैन्याचे भेसूर चित्रास न घाबरता, त्यांनी सर्व इस्टेटीची यादी लिलावाकरिता सावकारापुढे हजर केली. ह्या त्याच्या निस्सीम प्रामाणिकपणाकडे पाहून लोकानी आश्चर्याने तोडात बोटे घातली ! सावकारांचीही मने विरघळली. एक सावकार तर त्या तरुणाच्या ह्या स्वार्थत्यागाने अत्यंत गहिवरून भरकोर्टात एकाद्या लहान मुलाप्रमाणे ओक्साबोक्शी रडू लागला ! ह्या शीलसंपन्न श्रीमान् घराण्याचे इस्टेट विकू द्यावयाचे नाही, असा सर्व सावकारांनी निर्धार केला. मग त्यांपैकी कांही इस्टेट हप्तेबंदीने कर्जफेडीकरितां त्यांनी आपल्या ताब्यांत घेण्याचे ठरविले. परंतु पुढे तेही त्यांनी देवेंद्रनाथाच्याच ताब्यांत राहू दिले. देवेंद्रनाथांनी यथावकाश त्याची पैनपै चुकती केली. इतकेच काय पण त्याचे वडिलांनीं देऊं केलेल्या कित्येक धर्मार्थ देणग्याही त्यांनीं चुकत्या केल्या. त्यांत डिस्ट्रिक्ट चॅरिटेबल सोसायटी नामक एका लोकोपयोगी संस्थेस एक लाख रुपये देणगी देण्याचे द्वारकानाथांनीं कबूल केले होते. परंतु तेच एकाएकी वारल्यामुळे देणगीची आशाच खुंटली

होती. असें असतां देवेंद्रनाथांनी ती सर्व रक्कमच नव्हे तर देणगीचे तारखे-पासून तीवरील पुढील व्याजसुद्धा तीही चुकती केली. ही हकीकत थोडी सविस्तर लिहिली आहे; कारण ह्या एका गोष्टीत जे धर्मरहस्य आहे तें तसेंच महत्त्वाचे आहे.

असो. अशा रीतीनें प्रथम उतावीळ झालेल्या सावकरास शांत करण्यासाठी एक प्रकारें विश्वजित्-यज्ञच करून देवेंद्रनाथ मोकळे होत आहेत तों ( इ. सन १८४७ ) त्यांच्या सत्त्वपरीक्षेची आणखी एक वेळ आली. राजा ( Prince ) द्वारकानाथ ठाकूर विलायतेंत वारल्याची खबर इकडे आली. तेव्हा त्याचे इभ्रतीप्रमाणे त्याचें श्राद्ध करण्याचें आप्तेष्टांनीं ठरविलें. तेव्हा ज्येष्ठपुत्र या नात्यानें त्यांचें श्राद्ध करण्याचें कर्तव्य देवेंद्रनाथाकडे आलें. घराण्याच्या कुलाचाराप्रमाणे श्राद्धविधि करावयाचा म्हणजे त्यात शालिग्रामादि कुलदेवताची पूजा करणें प्राप्त होतें. परंतु ब्राह्मसमाजाच्या आपणच सुरू केलेल्या प्रतिज्ञे-प्रमाणें त्यास मूर्तिपूजा करण्यास प्रत्यवाय होता. याप्रमाणे एके बाजूस त्याचें समाजास दिलेलें वचन, आणि दुसऱ्या बाजूस त्याच्यासारख्या श्रीमान खान-दानीचे घराण्याचा पूर्वापार चालत आलेला कुलाचार. अशा कैचींत ते सापडले.

ह्या प्रसंगीं देवेंद्रनाथाचा त्यांच्या सर्व आप्तेष्टांनी तीव्र निषेध करून त्याचा परित्याग करण्याचा धाक घातला. अशा वेळी त्याच्या आश्रयावर वाढलेला लाला हजारीलाल हा एकटा त्याच्या कर्तव्यनिष्ठेस धीर देण्यास जागला. धर्म-पालनाचे कामीं एका ईश्वरास भ्यावें, इतरास भिण्याचें काहीच कारण नाहीं, असा त्यांनी देवेंद्रनाथास सल्ला दिला तों आणीबाणीचा दिवस जवळ येत चालला तसें स्वकीयांनीं घातलेल्या कडक बहिष्काराच्या धाकामुळे देवेंद्रनाथाचें मनःस्वास्थ्य नाहींसें झालें. अशा विचारक्रांत स्थितींत ते काळ काढीत असतां त्यास एक दिव्य स्वप्न पडलें. त्या स्वप्नात एका देवदूतानें देवेंद्रनाथांस तारागणातून आकाशमार्गानें एका दिव्यलोकीं नेलें. तेथें एका भव्य प्रासादांतील एका शृंगारलेल्या मंदिरात त्यांना त्याची मृत झालेली आई भेटली. ती त्यांस म्हणाली, "बाळा देवेंद्रा, तू खरोखरीच ब्रह्मज्ञानी का झाला आहेस?" त्यानीं होय असें उत्तर दिल्यावर ती म्हणाली तर मग "कुलं पवित्रं जननी कृतार्था" अशा प्रकारचे आईच्या तोंडचे आश्वासनपर धन्योद्गार कानी पडतांच देवेंद्रनाथांस फार आनंद

झाला व मोठा धीर आला. पुढे लवकरच तो वर्षश्राद्धाचा दिवस आला, तेव्हां देवेंद्रनाथांनीं मूर्तिपूजादि प्रकार न करण्याची आपली प्रतिज्ञा पुरी करण्याचा निर्धार केला. त्यामुळे त्यांस घरच्या व बाहेरच्या सर्व आप्तेष्टांकडून झालेली अत्यंत निर्भर्त्सना सहन करावी लागली. त्यांचा धाकटा भाऊ गिरींद्रनाथ ह्यांनी कुलाचाराप्रमाणे श्राद्धविधि पुरा केला. तेव्हां अखेरीस देवेंद्रनाथांनीं कांहीं मंत्र म्हणून व कठोपनिषदाचा पाठ करून श्राद्धविधीची आपले मताप्रमाणे सांगता केली. अर्थात् त्यांचेवर बहिष्कार घालण्याची प्रतिज्ञाही त्यांच्या आप्तेष्टांनी पुरी केल्यावांचून सोडली नाहीं. तथापि आपणच सुरू केलेल्या नूतन संप्रदायास आपण वेळीं जागलों याबद्दल त्यांस समाधान वाटले. सर्वांनी आपणास सोडले तरी ईश्वराने आपणास सन्निध केले असा त्यांस भरवसा होता. असो. ब्राह्मसमाजात ब्राह्म-पद्धतीने केलेले हे पहिलेच अनुष्ठान होय.

ह्याप्रमाणे कौटुंबिक आपत्तींतून ते कसेबसे बाहेर पडले तो त्यांच्या आवडत्या समाजात वेदान्ताच्या अमोघत्वाबद्दल मोठें रण माजून राहिले होते. तें शांत करण्याची जबाबदारी त्यांचेवरच येऊन पडली. जे चार विद्यार्थी काशी-क्षेत्रीं शिकण्यास पाठविले होते, त्यांस पैशाच्या अभावी परत बोलावणे देवेंद्र-नाथास भाग पडले. वेदांत काय आहे याबद्दल त्यांनी त्यांचेकडून थोडीफार माहिती मिळविली. आणि काशीचे पंडितांशीही बहुतकाल शहानिशा केली. तेव्हां वेद हे प्रमादातीत आहेत हा त्यांचा पूर्वग्रह डळमळू लागला.

बाबू अक्षयकुमार दत्त यास हा आपल्या मताचा मोठाच विजय झाला असे वाटून आनंद झाला. या आनंदाचे भरांत इ. सन १८५० सालचा वार्षिकोत्सव मोठ्या थाटात साजरा झाला. त्या सालीं ब्राह्ममंदिरांतही बरीच सुधारणा झाली होती. तेव्हां प्रार्थनामंदिर नवीन, त्यांतील संगमरवरी वेदी नवीन, प्रार्थनापद्धति नवीन, संगीत नवीन, अशा सर्व नाविन्यांतच सन १८५१ हे नवीन वर्ष सुरू झाले. आणि त्याच सालीं राजनारायण बोस यांनीं उपासनेस आणखी भक्तिप्रेमाची अपूर्व जोड करून दिली. असा सर्व तऱ्हांनी बाह्यतः उत्कर्ष होत असतां देवेंद्रनाथांचे मन विचारमग्न होतें. "ईशावास्यमिदं सर्वं इ०" हा चिंतामणि त्यांस ज्या वेदराशींत सांपडला, तो वेदाचा सनातन आधारच ब्राह्मसमाजीयांनीं बिनदिक्कत झिटकारला. ह्या

गोष्टीनें त्यांस सचिंत करून सोडलें. ते जुन्याचे मोठे अभिमानी होते. उपनिषदांतील अमृत त्यांनीं चाखले होते. तेव्हां अश्रद्धेचे वावटळींत आपल्या समाजधर्माचे मनोरे आर्यसंस्कृतीच्या मालमसाल्याने सर्वसंमत असे कसे बांधून काढावे हा त्यांचेपुढे बिकट प्रश्न होता. समाजांतील बाकीची मंडळी कांहींसे विघातक कार्य करीत होतीं; परंतु देवेंद्रनाथांस ब्राह्मधर्माचे विधान रचावयाचे होते. सुदैवाने ते याही परीक्षेतून यश घेऊन बाहेर आले, म्हणून तीही हकीकत आम्ही ह्या सत्त्वपरीक्षा-प्रकरणांत देत आहोत.

वेद हे प्रमादशील आहेत, असें समजल्यानतर आपण आपला ब्राह्मधर्म उपनिषद्-ग्रंथांवर रचावा असे देवेंद्रनाथांनी मनात आणले. प्रथम त्याना मुख्य दहाअकरा उपनिषदेच ठाऊक होतीं; परंतु पुढे अधिक शोध करतां उपनिषदे एकशेसत्तेचाळीस आहेत, आणि त्यांतही गोपाळतापनी-उपनिषद्, गोपीचंद-उपनिषद्, स्कंदोपनिषद, सुदर्शनतापनी-उपनिषद्, देवी उपनिषद् इत्यादि निरनिराळ्या सगुणोपासकांची निरनिराळी उपनिषदे आहेत. इतकेच काय पण अकबर बादशहाने एक अल्लोपनिषद्ही तयार करविलें आहे, असे पाहून उपनिषद्ग्रंथांबद्दल त्याच्या ठायीं वसत असलेला आदर बराच कमी झाला. वाटेल त्याने वाटेल ते लिहावे, व त्यास उपनिषद् म्हणावे असा सर्व सावळागोंधळ दिसून आल्यामुळें आपले ब्राह्मधर्मास उपनिषदाचा आधार त्यांस अगदींच बेभरंवशाचा वाटूं लागला. बरें, वेदान्तशास्त्र पहावे तर परमात्मस्वरूपाशी आमचा वास्तविक संबंध देव आणि भक्त, पूज्य आणि पूजक असा आहे; हे जे ब्राह्मसमाजाचें आदितत्त्व त्यास शंकराचार्यांचे शारीरमीमांसा, वेदान्तदर्शन इत्यादि ग्रंथांतील अद्वैतवाद अत्यंत विरोधि दिसू लगला. तेव्हां कांही ठळक उपनिषदेच आधारग्रथ मानावे तर त्यातही "सोऽहमस्ति" "तत्त्वमसि" इत्यादि अद्वैतपर महावाक्ये आहेतच. अशा स्थितींत शेवटीं निराश होऊन शास्त्रप्रचीतीचा आधार देवेंद्रनाथांस सोडून द्यावासा वाटला. गुरुप्रचीति हा शब्दही ब्राह्मसमाजास खपण्यासारखा नव्हता. तेव्हां शेवटीं आत्मप्रचीतीशिवाय कांहींच आधार न राहिल्यानें त्यांनीं असे ठराविले कीं, आपले सदसद्विवेक-बुद्धीस जो शास्त्रसिद्धान्त पटेल तेवढाच सिद्धान्त आपण मानावा. देवेंद्रनाथांचे चरित्रकार असें म्हणतात कीं, देवेंद्रनाथ हे प्रथमपासूनच कट्टे बुद्धिवादी

होते. आपल्या बुद्धीस पटणार नाहीं असे कांही वेदांत असेल याची त्यांस पूर्वी कल्पना नसल्यामुळें ते वेदास चिकटून होते; परंतु पुढे त्यांस न पटणाऱ्या अशा कित्येक गोष्टी वेदात असल्याचे त्यास आढळून आले, तेव्हां त्यास वेदांचा आधार सोडणे भाग पडले. त्यांची वेदावरील पहिली श्रद्धा जशी अज्ञानमूलक होती, तसा वेदान्ताचा अव्हेरही कांहीसा अज्ञानमूलकच होता. आपले मतानुकूल वेदार्थ करण्याइतके पांडित्य त्याचे ठायी नव्हते, आणि अद्वैती शंकराचार्यांशिवाय रामानुज, मध्वाचार्य, निंबार्क इत्यादि द्वैती भाष्यकाराची व टीकाकाराची त्यास मुळींच माहिती नव्हती. ते एक शंकराचार्यच जाणत होते. परंतु त्याचे निर्वाण आणि ह्याची आत्म्याची पृथक्त्वाने अखंड उत्क्रान्ति यांत महदतर असल्यामुळे, वेदान्तातून युक्तीला व आपल्या सदसद्विवेकबुद्धीला पटेल तेवढेच घ्यावें, अशी, हिंदूनी ईश्वरप्रणीत मानलेल्या वेदाशी, देवेंद्रनाथांनी तडजोड केली. "ज्ञान-प्रसादेन विशुद्धसत्त्वस्ततस्तुतं पश्यते निष्कल ध्यायमानः"* हा जो पूर्वाचार्यांचा अनुभव तोच अनुभव आपणासही येईल असा देवेंद्रनाथास आत्मविश्वास होता. साराश, स्वतांचे शुद्धबुद्धीचे कसोटीवर जो शास्त्रीय सिद्धान्त टिकेल तितकाच ग्राह्य मानावा आणि अशा रीतीनें आपण आपल्या स्वय-प्रेरणेने अथवा दुसऱ्या तऱ्हेने बोलावयाचे तर ईश्वर आपणास बुद्धि देईल त्याप्रमाणे आपण आपला धर्म ठरवावा, असे त्याचे निश्चित मत होत गेले. या पद्धतीस अनुसरून जीवात्म्याचे निरनिराळ्या कोटींतून व लोकांतून होत जाणाऱ्या उत्क्रान्तीचा शास्त्रांतील इतिहास खरा न मानता उपनिषदांतील सिद्धान्ताप्रमाणे त्यांनी असे ठरविले की, गुरूची योग्य सेवा करून व गुरु-गृही वेदाभ्यास सपवून घरी परत यावें, नंतर विवाह करावा. पवित्र स्थळीं वेदपाठ करावा. विद्यार्थि व आपले भाविक पुत्र यास विद्या शिकवावी. तसेच कोणाही प्राण्याला न दुखविता, उत्तम व्यवहाराने धन मिळवून आणि इंद्रियाचा पूर्ण संयम करून प्रपच चालवावा. जो इहलोकी ह्याप्रमाणे आपले

---

* **भावार्थ**-ज्ञानाच्या प्रसादाने त्याचे अंतःकरण शुद्ध होते आणि तेथपासून पुढे (म्हणजे चित्तशुधि झाल्यानंतर) कल्पनातीत असे जे परब्रह्मवस्तु त्याचे ध्यान करीत असतां (स्वसुखासाठीं) प्रज्ञाचक्षूने साधक त्याला पाहतो.

सारे आयुष्य व्यतीत करतो, तो मरणोत्तर ब्रह्मलोकीं जातो. तो पुन्हा इस लोकीं परत येत नाही. स्वर्गलोकात भय नाही कारण तेथें मृत्यु व जरा नाही. तेथे क्षुधा व तृषा नाही आणि तेथे दुःखही पोचूं शकत नाहीं. पुण्याने पुण्यलोक मिळतो. पापाने नरकाची प्राप्ति होते तसेच ह्या लोकीं ईश्वराच्या आज्ञेप्रमाणे पुण्यकर्मे करून ज्याने आत्मशुद्धि करून घेतली आहे त्यास इहलोक सोडल्यावर पुण्यलोकाची व दिव्य शरीराची प्राप्ति होते. ह्याप्रमाणे उत्तरोत्तर श्रेष्ठ तर अवस्था मिळून जीवात्म्याची अखंड उत्क्रान्ति होत जाणार ही गोष्ट त्यांना मान्य होती. पण जीवात्मा अखेर परमात्म्यात अथवा ब्रह्मस्वरूपांत लीन होणार ही आत्मनाशाची आपत्ति त्यांस कबूल नव्हती. देव-भक्त हे द्वैत अखंड कायम राहून ब्रह्मलोक-प्राप्ति होणे त्यांस समत होते. आणि तशी आपल्याला ब्रह्मलोकप्राप्ति होईल असा परमेश्वराचा आपणाला आशीर्वाद झाला असल्याचा त्याना विश्वास होता. किंबहुना इहलोकी असून ब्रह्मलोकीचा अनुभव मला घेतां येतो असे ते निःसदेहवृत्तीने म्हणत. जशी तुम्हाला समोर भिंत स्पष्ट दिसते, त्याहूनही अधिक स्पष्ट रीतीने त्या सर्वव्यापक परमात्म्याचे अखड भान मला आहे, असा ते आपला अनुभव सागत.

'ईशावास्यमिदं सर्व' या दिव्य सदेशाची प्रचीति त्याना येऊ लागली होती. त्यासाठी ते वरचेवर एकान्त मिळावा म्हणून कधी कधी गगानदीत नौकेत जाऊन रहात. कधी अत्यंत निर्जन प्रदेशी वास करीत. कधी हिमा-लयातील पुण्यभूमीचा आश्रय करीत. खरे म्हटले तर त्याचे उर्वरित सर्व आयुष्य याच अनुभवाच्या दिव्य आनदांत गेले. परंतु 'सोऽहं' हा एकरूपाचा अद्वैता-तील सिद्धान्तमात्र त्यांना पटला नाही असे दिसते.

असो. हे त्यांचे विचार दृढ झाल्यावर तद्दर्शक वर्णनात्मक मथळा त्यांचे तत्त्वबोधिनी पत्रिकेवर येऊं लागला. ब्राह्मसमाजात जरी पुढे अनेक मतभेद झाले, तरी ह्या मथळ्यांत वर्णन केलेल्या समत्वाबद्दल मतभेद राहिला नाहीं. सबब ते सर्वमान्य तत्त्व खालीं देत आहोः

"ब्रह्म वा एकमिदमग्रं आसीत् नान्यत् किञ्चनासीत् तदिदं सर्वमसृजत्। तदेव नित्यं ज्ञानमनन्तं शिवं स्वतंत्रं निरवयवमेकाद्वितीयं सर्वव्यापि सर्व नियन्तृ सर्वाश्रय सर्ववित् सर्वशक्तिमद्ध्रुव पूर्णमप्रतिममिति। एकस्य तस्यै-

बोपासनया पारत्रिकमैहिकञ्च शुभं भवति। तस्मिन् प्रीतिस्तस्य प्रियकार्यसाधनं च तदुपासनमेव।*

देवेंद्रनाथांस आपल्या ब्राह्मसमाजाचा मोठा अभिमान असे. त्यांचा देशाभिमान पंथाभिमानापुढे फिका पडे. ते असे म्हणत की, माझी देशभूमि मला प्रिय आहे. त्याहूनही हिंदुधर्म प्रिय आहे. आणि आमचा ब्राह्मपंथ सर्वांत प्रिय आहे. धर्मासंबंधी त्यांची आस्था विशेष असे. ज्याप्रमाणे शरीररक्षणास अन्न पाहिजे, त्याचप्रमाणे आत्मपुष्टीस ईशोपासनेची आवश्यकता त्यांस वाटे. ईश्वरास आवडेल अशीं सत्कृत्यें करणें हीच देवपूजा होय असें त्यांचें म्हणणें असे. शिवाय ते असे समजत कीं, परमात्मविषयक ज्ञानाचें मूळ आपले ठायींच आहे. आत्म्याचे साहाय्यानेच परमात्म्याचें ज्ञान होईल.

असो. देवेंद्रनाथावर जे अनेक तऱ्हेचे आणीबाणीचे प्रसंग आले त्यांतून ते आपली तेजोहानि न होऊं देतां कसे बाहेर पडले तें येथवर सांगितलें; आतां त्यांनी संस्थापिलेला जो ब्राह्मधर्म त्यासंबंधी विशेष विस्तारपूर्वक विचार पुढील प्रकरणीं करूं.

---

* **भावार्थ**— प्रथम हें एकच ब्रह्म अस्तित्वांत होतें दुसरें कांहींही नव्हतें. त्यानें हें सर्व निर्माण केलें! तेंच फक्त नित्य, ज्ञानरूप, अनन्त, कल्याणकारक, स्वतंत्र, अवयवरहित, एक अद्वितीय, सर्वव्यापि, सर्वांवर सत्ता गाजविणारें सर्वांचा आश्रय, सर्व जाणणारें, सर्वशक्तिमान्, अढळ, पूर्ण व अप्रतिम असें आहे. केवळ त्याच्याच उपासनेनें ऐहिक व पारमार्थिक कल्याण होतें. त्याच्यावर प्रीति करणें व त्याला ज्या गोष्टी प्रिय आहेत त्या करणें हीच त्याची उपासना होय.

# प्रकरण चवथें

## ब्राह्मधर्म

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सर्व ब्राह्मांना उपयोगी पडेल अशी ब्राह्मधर्माची एक समानभूमिका कशी ठरवावी, हा देवेंद्रनाथांपुढे विचार येऊन पडला. त्याच्या दृष्टीने तंत्र, पुराणे, वेद, वेदान्त, उपनिषदे ह्यांपैकीं कोणतेच ब्राह्मधर्मास पूर्णपणे आधारभूत होऊं शकेना. तेव्हां अशा मनाच्या क्लिष्ट स्थितीत सत्यज्ञानाचा अंतरांत प्रकाश पडावा म्हणून त्यांनी ईश्वराची करुणा भाकली. ईश्वराने कृपा केली आणि ब्राह्मधर्मबीज त्यांच्या अंतःकरणात प्रगट झाले. ते लगेच त्यांनीं एका कागदावर टिपून तो कागद पेटींत ठेवून दिला. अशा रीतीने ईशाचे समष्टि मनाची तार देवेंद्रनाथांचे मनाशीं काहीं काळ जोडली गेली असतां, देवेंद्रनाथांनीं सुप्रसिद्ध लेखक अक्षयकुमार दत्त ह्यास आपण काय म्हणतो ते चटकन् टिपून घेण्यास सांगितले. आणि लगेच "ब्रह्मवादिनो वदंति" असा प्रारभ करून त्यानी सिद्धान्तवत् खालील वाक्ये एकामागून एक लिहून घेण्यास सांगितलीः—

**"यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत् प्रयन्त्यभिसंविशन्ति तद् विजिज्ञासस्व तद्ब्रह्म।**—तैत्तिरीय भृगुवल्ली.

**आनन्दाध्येव खल्विमानिभूतानि जायन्ते आनन्देन जातानि जीवन्ति आनन्दं प्रयन्त्यभिसंविशन्ति।** —तैत्तिरीय भृगुवल्ली.

**इदं वा अग्रेत्वैव किंचिदासीत् सदैवसौम्येदमग्र आसीत् एकमेवाद्वितीयम्।** — छांदोग्य सप्तमोध्यायः—द्वितीय खंड.

**सतपोऽतयप्त स तपस्तप्त्वा इदं सर्वमसृजत यदिदं किंञ। एतस्माज्जायते प्राणी मनः सर्वेंद्रियाणि च। खं वायुर्ज्योतिरापः पृथिवी विश्वस्य धारिणी।** —मुंडक.

**भयादस्याग्निस्तपति भयात्तपति सूर्यः । भयादिन्द्रश्च वायुश्च मृत्युर्धावति पञ्चमः ‡** —तैत्तिरीय.

असो. ह्याप्रमाणें एकेक सिद्धान्त सांगतां सांगतां त्यांनीं शेवटी असे सांगितले:—

**यश्चायमस्मिन्नाकाशे तेजोमयोऽमृतमयः पुरुषः सर्वानुभूः ।**
**यश्चायमस्मिन्नात्मनि तेजोमयऽमृतमया पुरुषः सर्वानुभूः ।**
**तमेव विदित्वाति मृत्युमेतिनान्याः पन्था विद्यतेऽयनाय ॥ ***

अशा रीतीनें अवघ्या तीन तासाचे एकाच बैठकींत देवेंद्रनाथांनीं आत्मपणीत ब्राह्मधर्म सांगून टाकला. ही गोष्ट इ. सन १८४८ सालीं झाली.

हा धर्म मी सांगितला नसून ईश्वराने माझे मुखाने सांगितला अशी देवेंद्रनाथांची भावना होती. 'धियोयो नः प्रचोदयात्' ह्या महावाक्यावर त्यांची श्रद्धा होती माझे अढळ निष्ठेनें ईश्वराच्या पदाचे रजःकणाचा लाभ मला झाला व ते रजःकण माझे नेत्रांस दिव्यांजनरूप होऊन सत्य मला दृग्गोचर झाले असे ते म्हणत. त्यांनीं आपल्या ब्राह्मधर्मास ब्राह्मी उपनिषत् असे नांव दिले. वेदाचे सार-ग्रंथ अशी जीं उपनिषदे त्या उपनिषदांचेही सार-

---

‡ भावार्थ—ज्याच्यापासून प्राणिमात्र निर्माण होतात. निर्माण झाल्यावर राहतात, ज्याच्याकडे त्यांचा ओघ असतो, आणि ज्यांत ते प्रविष्ट होतात, ते तूं जाण. तेच ब्रह्म.

खरोखर आनंदापासूनच हीं सर्व भूतें निर्माण होतात, आनंदाच्या योगानेच तीं राहतात, आणि आनंदांतच शेवटीं प्रविष्ट होतात.

हे मित्रा, हेंच एक अद्वितीय असें ब्रह्म सर्वांच्या अगोदर सत्स्वरूपांत होतें. हे जे काहीं दिसते तें सर्व त्याने तपाचे आचरण करून निर्माण केलें.

ह्याच्यापासूनच विश्वाचे धारण करणारी पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, प्राण, मन व इंद्रियकलाप हीं सर्व निर्माण झाली. ह्याच्या भयाने अग्नि तप्त होतो, सूर्य प्रकाशतो, इंद्र, वायु व मृत्यु हे प्रेरिले जातात.

* **भावार्थ**—जो हा आकाशामध्ये तेजोमय, अमृतमय, सर्वव्यापि आहे तसेच जो ह्या आत्म्यामध्ये तेजोमय, अमृतमय, पुरुष आहे, त्यालाच जाणून मृत्यूच्या पलीकडे जातां येते. दुसरा मार्ग नाहीं.

सर्वस्व म्हणजे हें ब्राह्मीउपनिषद् आहे असें ते मानीत. ह्या त्यांच्या ब्राह्मधर्माचे त्यांनीं दोन भाग केले होते. एक उपनिषत् व दुसरा नीतिधर्म. ब्राह्मी-उपनिषत् तयार झाल्यावर महाभारत, गीता, मनुस्मृति व कांहीं तंत्र यांचे मंथन करून त्यांनीं ब्राह्मधर्माचा दुसरा भाग जो नीतिधर्म तो तयार केला. त्यांतील धर्मांशेचे कांहीं नमुने खाली दिले आहेत: —

**ब्रह्मनिष्ठो गृहस्थः स्यात् तत्त्वज्ञानपरायणः। यद्यत् कर्म प्रकुर्वीत तद्ब्रह्मणि समर्पयेत्।**

**मातरं पितरं चैव साक्षात् प्रत्यक्ष देवताम्। मत्वा गृही निषेवेत सदा सर्वप्रयत्नतः॥**

**भ्राता ज्येष्ठः समः पित्रा भार्या पुत्रः स्वकातनुः। छाया? स्वदासवर्गश्च दुहिता कृपणं परम्। तस्मादेतैरधिक्षिप्तः सहेतासंज्वरः सदा॥***

**अति वादांस्तितिक्षेत नावमन्येत कश्चन। नचेमं देहमाश्रित्य वैरं कुर्वीत केनचित्।‡** —मनुस्मृति अ. ६ श्लो. ४७

शेवटच्या दोन आज्ञा अशा आहेत:—

**मृतं शरीरमुत्सृज्य काष्ठलोष्ठसमं क्षितौ। विमुखा बान्धवा यान्ति धर्मस्तमनुगच्छाति। तस्माद्धर्मं साहाय्यार्थं नित्यं सञ्चिनुयाच्छनैः। धर्मेण हि सहायेन तमस्तरति दुस्तरम्।†**

—मनुस्मृति अ. ४ श्लोक २४१, २४२.

---

* गृहस्थाश्रमी पुरुषाने नेहमी ब्रह्मनिष्ठ राहून तत्त्वज्ञानांत गढून जावें. आणि जें जे कर्म करावयाचें ते ते सर्व ब्रह्मार्पण करावे.

गृहस्थानें आपली पराकाष्ठा करून आईबाप व प्रत्यक्ष देवता यांची नेहमीं सेवा करावी.

ज्येष्ठभ्राता हा पित्यासारखा आहे. भार्या व पुत्र हीं तर स्वशरीररूपच आहेत. दासवर्ग हे आपले छायारूप आहेत; कन्या परमकृपेचें स्थान आहे. यास्तव यांनीं जरी आपला तिरस्कार केला तरी तो यत्किंचितही दुःख न होतां सहन करावा. —मनु. अ. ४ श्लोक १८४।१८५

‡ दुसऱ्याने अपमानकारक शब्द बोलल्यास ते सहन करावे आपण स्वतः कोणाचाही अवमान करूं नये. ह्या देहामध्यें राहून कोणाशीही वैर ठेवूं नये.

† भावार्थ—आप्त व संबंधी मृत शरीरास काष्ठाप्रमाणें किंवा मातीच्या

ह्याप्रमाणें इ०सन १८७० सालीं ब्राह्मधर्मग्रंथ तयार झाला. वेदान्तांतील अद्वैतवाद, अवतारवाद आणि मायावाद ह्यांस ह्या धर्मग्रंथांत थारा नाहीं.

द्वासुपर्णा सयुजा सखाया
समान वृक्षं परिषस्वजाते।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्व—
त्यनश्नन्यो अभिचाकशीति॥ ६ ॥ —श्वेताश्वतर अ. ४.

भावार्थः—दोन पक्षी, जवळ राहणारे, एकमेकांचे मित्र, समान वृक्षाला मिठी मारून आहेत. त्यांपैकीं एक गोड फळ खातो; दुसरा न खातां बघतो.

ह्या श्रुतीने देवेंद्रनाथांनीं अद्वैतवाद उडविला.

न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित्।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे॥ १८
—काठक अ. १. व. २.

भावार्थः—हा मेधावी-ज्ञानी आत्मा जन्मत नाही व मरत नाहीं. हा आत्मा कोणत्याही दुसऱ्या कारणापासून झालेला नाहीं व स्वतांपासूनही निराळा पदार्थ झालेला नाहीं. म्हणून हा अज, नित्य, शाश्वत व पुराण आहे. शरीर जरी मारले जात असले तरी तो मारला जात नाहीं.

ह्या श्रुतींतील " न बभूव कश्चित् " या शब्दांनीं अवतारवादाचा त्यांनीं निषेध मानला.

**स तपोऽतप्यत स तपस्तप्त्वा इदं सर्वमसृजत यदिदं किञ्च।**

भावार्थ—त्याने तपाचे आचरण केले आणि तपःसामर्थ्यानें हें जे कांहीं सर्व दिसते तें निर्माण केल.

ह्या उपनिषद्वाक्याने मायावादाचा निरास केला. जग हें स्वप्नसृष्टीप्रमाणें मिथ्या नाहीं, तें सत्स्वरूप आहे, मात्र ते सत्स्वरूप सापेक्ष आहे. परमेश्वररूप हें एकच निरपेक्ष केवळ सत्य आहे, असे त्यांनीं ठरविलें.

---

ढेकुळाप्रमाणे भूमीवर टाकून पराङ्मुख होऊन जातात. त्यांच्या मागोमाग कधीं जात नाहींत. पण धर्म त्याच्याबरोबर जातो यास्तव साहाय्याकरितां धर्माचा नित्य व हळुहळू संग्रह करावा. कारण धर्म साहाय्य झाला असतां प्राणी दुस्तर तमाचें उल्लंघन करितो.

देवेंद्रनाथांचा तत्त्वविचार थोडा विस्तृतपणें लिहिण्याचे कारण हे कीं, यापूर्वीं ब्राह्मसमाजाचे धर्मास कोणीं मूर्तस्वरूप दिले नव्हते. ते देण्याचा ह्या ब्राह्मधर्मग्रंथानें प्रथमच प्रयत्न केला. आणि यापुढें वैदिक वाङ्मयाऐवजीं ब्राह्मधर्मपुस्तकाचें पठण ब्राह्ममंदिरांत सुरू झाले. यामुळें ह्या पुस्तकाचें महत्त्व विशेष आहे.

ह्याप्रमाणे ब्राह्मधर्माची कल्पना कशी वाढीस लागली त्याचे थोडेंसे दिग्दर्शन वरती केले आहे, व पुढेही यासबंधी अधिक वर्णन यथाक्रम येणारच आहे. ह्या ब्राह्मसंप्रदायाचीं तत्त्वे व संस्कारविधि तत्त्वबोधिनी पत्रिकेंत जो प्रसिद्ध झाला त्याची रूपरेषा अशीः—

( १ ) प्रारंभीं एक परमेश्वर होता. दुसरे कोणी नव्हतें. सर्व वस्तूंच्या ह्या कर्त्याशिवाय कांहींच नव्हते.

( २ ) तो सत्, चित्, अनंत आहे. तो सनातन जगदीश्वर आहे. तो सर्वज्ञ, विभु, सर्वनियंता, सर्वशक्तिमान्, असा आहे. तो निराकार, निर्विकार, स्वयंपूर्ण व्यापक आणि अव्यंग आहे. तो एकच केवळ आहे तत्सम कोणीही नाही.

( ३ ) त्याच्या उपासनेत आपलें इहपरलोकींचे कल्याण आहे.

( ४ ) त्यावर प्रेम करणे व त्याच्या इच्छेप्रमाणे वर्तणें हीच त्याची खरी उपासना आहे.

## ब्राह्मधर्मदीक्षा

मी ब्राह्मधर्मानुशासनाचा आत्मीय भावाने स्वीकार करतों आणि ब्राह्मपथात समाविष्ट होतो.

( १ ) जो सृष्टि निर्माण करतो, तिचें धारण करतो, व संहार करतो, जो इहपरलोकींचे परमश्रेयाची प्राप्ति करून देतो, जो सर्वज्ञ, सर्वान्तर्यामी, निराकार व परोपकारी आहे, असा जो केवळ परब्रह्मस्वरूप परमपुरुष त्याचे-वर प्रेम करून व त्याच्या इच्छेनुरूप वर्तन ठेवून मी त्याची उपासना करीन.

( २ ) कोणत्याही सृष्टपदार्थास परब्रह्म समजून मी त्याची पूजा करणार नाहीं.

( ३ ) आजारीपणा किंवा असाच एखादा अडथळा आडवा न आल्यास मी परब्रह्माचे रोज प्रेमादराने ध्यान करीन.

( ४ ) सत्कर्म करण्याचा मी प्रयत्न करीन.

( ५ ) दुष्कर्मापासून परावृत्त राहाण्यास मी झटेन.

( ६ ) मी मोहवश होऊन पापकर्मास प्रवृत्त झाल्यास, खऱ्या अनुतापपूर्वक ते मी टाळीन.

( ७ ) ब्राह्मपंथाचा उत्कर्ष व्हावा म्हणून मी माझ्या प्राप्तींतील कांहीं अंश दरसाल ब्राह्मसमाजास देत जाईन.

हे प्रभो, ह्या पंथाच्या पवित्र तत्त्वाप्रमाणे वागण्याचे मला सामर्थ्य दे.

—एकमेवाद्वितीयम् ।

राजा राममोहन यांच्या सार्वत्रिक धर्माच्या कल्पनेचे हे एक संक्षिप्त रूप आहे असे जरी मानले तरी त्याबरोबर ही पण गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे की, राजा राममोहन यांची धर्मप्रतिपादनपद्धति देवेंद्रनाथाहून भिन्न होती. दोघांचे कार्यक्षेत्र, उद्देश आणि परिस्थितिही काहींशी भिन्न होती. राममोहन हिंदूंशीं वेदान्ताचे भाषेत बोलत, कडव्या मुसलमानाशी कुराण हातात घेऊन वाग्युद्ध खेळत आणि खिस्ती-पाद्र्यांशीं बायबलाचे साह्यानेच सामना देत. अशा रीतीने ते परधर्मीयांशी झुजत असताही त्यांचे त्या त्या धर्माशीं अत्यंत साहचर्य आहे असे दिसून येई. परधर्माशी हा मिलाफ देवेंद्रनाथाचे वेळी तितका राहिला नाही. परकीयाच्या धर्मग्रंथांचे त्यांनी परिशीलन केलेच नव्हते असे नव्हे. उलटपक्षी कित्येक युरोपियन ग्रंथकार त्यांस गुरुस्थानी होते, आणि सुफी ग्रंथावर तर त्यांचे इतकें प्रेम होते, की सुप्रसिद्ध फारशी कवि हाफीज ह्यांचे काव्यांत ते अगदीं तल्लीन होऊन जात. त्या तादात्म्याचे स्थितींत असता आपण स्वताच हाफीज आहों, असे त्यांस काहीं काळ वाटे, आणि त्याशी अंतर्बाह्य साहचर्य रहावे म्हणून ते मुद्दाम हाफीजसारखाच पेहराव नेहमीं करीत असत. असे होते तरी त्यांची आपल्या धार्मिक वाङ्मयावरील निष्ठा कायम होती. परंतु वैदिकधर्मापैकीं प्रचलित असलेल्या कोणत्याच संप्रदायाचीं मते त्यांस सर्वस्वीं मान्य नव्हतीं. किंबहुना त्यांना आद्य शंकराचार्यांशिवाय इतर आचार्यांचे व भाष्यकारांचे मतांची विशेष माहितीच नव्हती. आणि आपल्या भरतभूमींत बहुजनसमाजाने ग्राह्य मानलेलें शांकरमत

जितके राजा राममोहन यांस मान्य होते, तितकेही देवेंद्रनाथांस मान्य नव्हते. तथापि तत्कालीन इतिहासकार लिओनार्डसाहेब असे म्हणतात, की वेदांतील ब्रह्मविद्या सृष्टिनियमाप्रमाणे हळुहळू विकास पावत जाऊन तिची परिणति आधुनिक ब्राह्मधर्मांत झाली. अशा रीतीनें ब्राह्मधर्म हा जरी पूर्णपणे ऋग्वेदी धर्म नसला, तरी ऋग्वेदीधर्मास हिंदुधर्म म्हणवून घेण्याचा जो हक्क आहे तोच हक्क ब्राह्मधर्मासही आहे.

असो. ह्याप्रमाणे परकीय धर्मासबंधी देवेंद्रनाथाच्या दृष्टिकोनाचे बदलामुळें देवेंद्रनाथ हिंदुजनतेस अधिक प्रिय व्हावे, परंतु तसे ते झाले नाहीत; कारण हिंदुधर्मातील लोकांस पटलेली अशी, वेदांचे अपौरुषयत्व, गुरुप्रचीति, अवतारवाद, पुनर्जन्म, अद्वैत, मोक्ष इत्यादि मूलतत्त्वे त्यास मान्य नव्हतीं. आणि उलटपक्षी त्यास जीं तत्त्वे मान्य होतीं, त्याप्रमाणे उघड आचार ठेवण्याचे कामी रूढीचीं बधनें तोडण्यात त्याची राजा राममोहनांवरही कडी होती. यामुळे देवेंद्रासही जनतेचा व आप्तेष्टाचा विरोध सहन करावा लागला. आणि परधर्माशी राममोहनांनी जोडलेले सख्यत्वाचे नातें त्यांनीं अज्जीच मोडल्यामुळे, परधर्मीयाचेही जोराचे हल्ले यांचे समाजावर सुरू झाले. ह्या परकीय आक्षेपकांचे मुद्दे असे होते कीं, धर्मतत्त्व हे अत्यंत गूढ आहे, ते मानवबुद्धीला समजणे शक्य नाही. ह्यास्तव देवाने आपला मुलगा येशुख्रिस्त ह्यास मुद्दाम धर्मोपदेश करण्यासाठी पृथ्वीवर धाडला होता. अर्थात् ख्रिस्तप्रणीत जो धर्म तोच खरा धर्म; त्याहून इतर व्यर्थ वाग्प्रलाप आहेत. सदर टीकाकारांचे दुसरे म्हणणे असे होते की, ब्राह्मसमाजास निश्चित असा कोणताच धर्म नसल्यामुळे तो वस्तुतः अधार्मिकच आहे. तिसरे त्यांचे म्हणणे असे की, ब्राह्मांचीं कांही धर्ममते निश्चित असलीच तरी ती स्वकपोलकल्पित आहेत. त्यास कोणत्याच ईशप्रणीतधर्माचा आधार नाही. मनुष्याच्या सहजबुद्धीचे कसोटीवर धर्ममतें पारखून घेण्याची त्याची पद्धति भ्रामक आहे. आणि त्यामुळेच ब्राह्मांचे धर्ममतांत अत्यंत गैरमेळ व गोंधळ आहे. त्यांनीं राममोहनबरोबर वेदांताला तिलाञ्जली दिली. त्यानतर युक्तिवाद पुढे आला. आणि नंतर तोही निकामी ठरून उपजतबुद्धीचे प्रामाण्य निश्चित म्हणून ब्राह्म मानूं लागले. परतु मनुष्यप्राणी अत्यंत अल्पधी असल्यामुळे हें प्रामाण्यही अखेर व्यर्थच ठरणार ! ह्याप्रमाणे ब्राह्मसमाजावर आक्षेपकांची सरबत्ती सुरू झाली.

असतां, त्यांस तोंड देणें देवेंद्रनाथप्रभृति ब्राह्ममंडळीस भाग झालें. तें कार्य कांहीं अंशीं तत्त्वबोधिनीपत्रिकेच्या द्वारें, कांहीं व्याख्यानरूपानें, आणि कांहीं स्वतंत्र लेख छापून त्यांस साधावें लागलें.

देवेंद्रनाथांनीं वरील कारणांस्तव ब्राह्मधर्ममतविश्वास ह्या नांवाचा दुसरा एक लेख प्रसिद्ध केला. त्यांत त्यांनीं ब्राह्मधर्माचे मुख्य बारा सिद्धान्त सांगितले आहेत, ते थोडक्यांत असेः—

(१) स्वभावसिद्ध धर्मज्ञान; (२) ईश्वराचें आस्तिक्य; (३) ईश्वराचें अनतत्व; (४) ईश्वराची वत्सलता अथवा सख्यभाव; (५) मनुष्यमात्राशीं ईश्वराचें सांनिध्य; (६) मनुष्याचें बुद्धिस्वातंत्र्य; (७) ईशप्रेम आणि तदनुकूल कर्मप्रवृत्ति; (८) मरणोत्तर स्थिति; (९) त्या स्थितींत पुण्यपापाचा फलभोग; (१०) शुभभावनेचे योगानें होणारी आत्मतृप्ति हाच स्वर्ग, आणि उलट अनुताप हाच नरक; (११) ईश्वरी कोप हाही जीवाचा उद्धारक, विनाशक नाहीं; आणि (१२) मनुष्यप्राण्याचा अक्षय्य आत्मविकास. ह्याप्रमाणें देवेंद्रनाथांनीं आपले धर्ममतांस निश्चित स्वरूप देऊन त्याचा खुलासा करण्याचा प्रयत्न केला. देवेंद्रनाथांचें व्यक्तिमाहात्म्य फारच मोठें असल्यामुळें त्यांचे ठिकाणीं सर्वांचा अत्यंत आदर असे. परंतु कित्येक महत्त्वाचे तपशिलांचे बाबतींत त्यांचे संप्रदायबंधूंचा मतभेद होतच होता. तथापि त्यांचे मतांशीं बऱ्याच अंशीं एकतानता पावणारे आदिब्राह्मसमाजाचे दुसरे अध्यक्ष राजनारायण बोस हे वरील सूत्रवत् सिद्धान्ताचा कसा खुलासा करतात हे पहाणें बरेंच बोधप्रद होईल. पण तसें करण्यापूर्वीं थोडें विषयांतर पत्करूनही बाबू राजनारायण ह्याच्याशीं वाचकाचा थोडा अधिक परिचय करून देणें जरूर आहे.

---



८ राजनारायण बसु.



आदि-ब्राह्मसमाज मंदिराचा आंतील भाग.



११ पं० अक्षयकुमार दत्त.

## प्रकरण पांचवें

# राजनारायण बोस

राजनारायण बोस ह्यांचे वडील नंदकिशोर हे राममोहन ह्यांचे एक प्रीतींतील अनुयायी होते. राममोहन ह्यानी इतर बऱ्याच सद्गुणांबरोबर त्या वेळच्या सुशिक्षित बंगाली पिढीला मद्यपानाचीही दीक्षा दिली होती असे म्हणतात. एक घास मामाचा व एक घांस काकाचा ह्या बालरीतीप्रमाणे त्यांचे एक जेवण वैष्णवी ब्राह्मणी थाटाचे लाट-पाटावर तर दुसरं रात्रीचे जेवण साहेबांचे थाटावर असे. अर्थात् त्यात मद्य हे एक महत्त्वाचे पेय असे. राममोहन यांच्यापासून हे व्यसन त्यांचे बडे स्नेही व छोटे अनुयायी ह्यास जडले, किंबहुना-कोणाकडून का होईना पण-ते त्या काळचे कलकत्त्याच्या सुशिक्षित पिढीने घेतले आणि त्यांबरोबरच ते नंदकिशोरनेही उचलले. राजनारायण ह्यांनी तर अगदीं बालपणापासूनच बापसे बेटा सवाई म्हणजे कांहींच नाहीं, अशी त्या कामीं प्रगति केली ! वडिलांचीही त्यांच्या मद्यपानास हरकत होती असे नाही. पण जरा बेताने घ्यावे इतकेच त्यांचे म्हणणे होते. पण तेही राजनारायण यानीं ऐकले नाही आणि ते व कविवर्य मायकेल मधुसूदन दत्तासारखे त्यांचे सहाध्यायी अट्टल दारुडे बनले ! तेव्हा विद्या आणि वारुणि यांचे असे साहचर्य झाल्यामुळे मोठेपणी ते एका शाळेचे हेडमास्तर झाले तरी त्यांचे मद्यपान कमी झाले नाहीं. पुढे ह्या घोर व्यसनाचा ह्यांचे प्रकृतीवर व्हावयाचा तो परिणाम झालाच. आणि त्याना आपली नोकरी सोडावी लागली ! पण मग त्यांनी दुसरी स्वयंसेवा पत्करली ती हीच कीं, त्या घोर व्यसनास बळी पडलेली आपली जर्जर तनु लोकांस दाखवून त्यांस त्या व्यसनापासून परावृत्त करावे. कालाचा महिमा काय आहे पहा, की लुंगेसुंगे बहकलेले सुधारक नव्हे तर राममोहनासारखे धर्मसंशोधक, राजनारायणासारखे देवमाणूस, शिवनाथशास्त्र्यांसारखे पंडित, अथवा मायकेल मधुसूदन दत्तासारखे कविवर्य स्वतः मद्यपी होऊन त्यांनी स्वोदाहरणाने लोकांसही मद्यपी करावें ! असो. आपल्याला राजनारायणपुरतेच पहावयाचें तर अजाणतपणी त्यांस

जडलेले व्यसन त्यांनीं पुढे सोडलें व इतरांसही ते सोडावयास लावलें ह्यांतच त्याचा मोठेपणा आहे. पुढे देवेंद्रनाथांचे आश्रमात मद्य आणि मांस ह्या दोहोंसही पूर्णपणे बंदी करण्यात आली. तेव्हाच्या कालमहिम्यातील मद्यपानाचा हा भयंकर प्रकार सोडून दिला, तर राजनारायण बोस ही एक असामान्य व्यक्ति होऊन गेली ह्यांत संशय नाहीं. ते तरुण बंगालचे एक खऱ्या खऱ्या जिव्हाळ्याचे राष्ट्रीय गुरु होते. स्वदेशाप्रमाणे स्वभाषा आणि स्वधर्म ह्यांचेसंबंधी त्यांचे ठायी जाज्वल्य अभिमान वास करीत होता. इंग्रजी विद्येने त्या काळी इतकी भुरळ पाडली होती की स्वभाषेत बोलणे व लिहिणे तत्कालीन सुशिक्षितास अत्यंत लज्जास्पद वाटे. कोणत्याही विषयावरील प्रगल्भ विचार देशी भाषेत प्रगट करता येणे शक्यच नाही अशी त्या काळी विद्वानांची प्रामाणिक समजूत असे. बंगाली भाषा म्हणजे बायकांची व गावढ्यांची बोली, त्यात सुशिक्षितांनीं काय बोलावे, असे लोक म्हणत; इतकेंच काय पण ब्राह्ममंदिरातील उपासना, अथवा त्याच्याही पुढे सांगावयाचे तर विद्वानांचे डोक्यातील विचारपरंपरा, ही सारी इंग्रजीतच चालत असत ! ही लज्जास्पद आत्मवंचना दूर करण्यास ज्या थोरपुरुषांचे प्रयत्न कारणीभूत झाले त्यात बाबू राजनारायण बोस ह्यांची प्रामुख्याने गणना होते. इंग्रजी शिक्षणाचे आद्यप्रवर्तक डेव्हिड हेअर यांच्या नावाच्या एका संस्थेचे वार्षिक समारंभांत एकदा त्यास मुख्य वक्त्याचे काम सांगितले असता, त्यांनीं ते बंगालीतच करण्याचा आग्रह धरला. तेव्हा लोकांकडून हसें करून घेण्यासारखा हा विक्षिप्तपणा (!) त्यांनी करू नये म्हणून त्यांची चार शहाण्यांनी कानउघाडणी केली ! पण बाबू राज नारायण आपला हेका सोडीनात. तेव्हां संभावित लोकांचे समाजापुढे बंगाली देशी भाषेत होणाऱ्या वक्तृत्वाचा आचरटपणा पहाण्यापेक्षा तेथे न बसणे बरे असा पोक्त विचार करून कित्येक विद्वान् सभागृह सोडून चालते झाले ! स्वाभिमानशून्यतेचे असे उद्वेगजनक प्रकार अव्वल इंग्रजींत चोहोंकडे होत होते ! राजनारायण बोस ह्यांनी नुसता बंगालींत बोलण्याचा उपक्रम सुरू केला इतकेंच नव्हे, तर ह्यांनी बंगालींतील आपल्या वक्तृत्वाची अशी विलक्षण छाप बसविली कीं, ख्रिस्ताच्या गोपगिरीवरील अत्यंत प्रतिभासंपन्न प्रवचनांनीं ख्रिस्ताची ‘सर्मन्स आफ धी माउन्ट’नीं वेडावलेला अर्धशिक्षित समाज कांहींसा ताळ्यावर आला व केशवचंद्रसेनासारखा

स्वतंत्र विचाराचा एक बडा पिढीजाद वैष्णव त्यांचेच प्रभावानें ब्राह्मसमाजी बनला. आजचे जगद्विख्यात हिंदपुत्र रवींद्रनाथ ठाकूर यांचे मोठेपणास त्यांचे वांडलांप्रमाणे बाबू राजनारायण बोस यांचेही संस्कार कारण झाले. नवयुगकार एके ठिकाणी असें म्हणतात की, " बाबू राजनारायण बोस ह्यांचा जाज्वल्य देशाभिमान, त्यांची प्रखर सत्यनिष्ठा, त्यांची स्वावलंबनपरता, स्वदेशीसंबंधाचा त्यांचा सक्रिय अभिमान, आपले हक्क व आपलीं कर्तव्यें ह्याविषयींची त्यांची जागृति, आर्यसंस्कृति, आर्यज्ञान, धर्माचे उदात्त स्वरूप ह्याविषयींचे त्यांचे विचार, त्यांचा तिखटपणा, अन्याय, अधर्म, अनीति व अनौदार्य ह्यासंबंधानें त्यांचा तिरस्कार ह्या सर्व गुणांचा लहानपणींच तरुण रवींद्रावर अत्यंत इष्ट असा परिणाम झालेला होता." राजनारायण यांचें अंतःकरण इतकें शुद्ध व पवित्र, मन इतकें साधें व मोकळें, स्वभाव इतका गोड व उमदा, आणि वागणें इतकें सरळ व निगर्वी असें की, हा पुरुष मनुष्यकोटींतील नसून देवमाणूस आहे, असें नव्याजुन्या सर्वच मतांचे लोक म्हणत. त्यांची ईश्वरावरील निष्ठा अढळ होती. एकदा एका पालीनें एका कोळ्यावर झेप घालून त्यास धरलें असतां, एक पाखंडी गृहस्थ त्यांस म्हणाला " काय बाबू, त्या गरीब प्राण्याचा ह्या पालीनें नाहक फडशा पाडावा हाच का तुमच्या देवाचा चांगुलपणा !" त्यावर बाबू राजनारायण मनापासून पोट धरधरून हासले व म्हणाले, " तुम्हा पाखंड्यांचे परीक्षित उत्तरावयाची जबाबदारी जर ईश्वरावर असेल तर तो आम्हा मर्त्य जीवांपेक्षाही अधिक दुर्दैवी म्हणावयाचा ! ईश्वराच्या दयालुत्वाविरुद्ध हें एक बिनतोड उदाहरण दाखवलें असें तुम्ही पाहिजे तर म्हणा; पण अशा हजारों पालींनीं हजारों कोळी खाल्ले तरी ईश्वराचे भलेपणावरील माझी निष्ठा तिळमात्र कमी होणार नाही."

राजनारायण यांचें कोठें मंडळींत नांव निघतांच वृद्धांनीही आपले हात जोडावे, श्रीक्षेत्र वैद्यनाथाच्या केवळ द्रव्यदृष्टि तीर्थोपाध्यायांनीही राजनारायणांचे पाहुणे भेटले की तो साक्षात् दुसरा वैद्यनाथ आहे, असें म्हणून त्यांचे वाटेस जाऊं नये. सुप्रसिद्ध बंगाली लेखक बाबू भूदेव मुकरजी ह्यांनीं म्हणावें की, " आम्ही कसचे यज्ञोपवीतधारी ब्राह्मण ! यज्ञोपवीताचा खरा अधिकारी हा ( राजनारायण ) शूद्र आहे; यांचे पावित्र्य आमच्यांत कोठें आहे !" ह्या-

प्रमाणें ब्राह्मांचे आचार्यांपासून तो देवळांतील पड्यापर्यंत, शाळेंतील पंतोजी-पासून तपोहारावरील तापसीमुनीपर्यंत सर्वांस राजनारायण बोस म्हणजे एक देवमाणूस वाटे. ते आपले आयुष्याचे अखेरीस देवगड येथे राहूं लागले तेव्हां देवगडास एखाद्या यात्रेचे स्थानाप्रमाणे महत्त्व प्राप्त झाले होते. त्यांच्या नुसत्या हास्यांत त्याचे अत्यंत निर्मळ अंतःकरण प्रकाशित होत असे. नव-गोपाळ ह्यांचा राष्ट्रीय मेळा त्याचप्रमाणे हिंदुधर्ममहामंडळ यांच्या कल्पनेचा उगम राजनारायण यांचेपासूनच झाला. त्यांच्या उद्योगशीलतेमुळे बंगाल्यात इतक्या निरनिराळ्या संस्था निर्माण झाल्या, की आतां एखादी सभा-निवारिणी-समिति काढावी की काय असे लोक बोलूं लागले! राजनारायण बोस हे तत्त्वबोधिनी पत्रिकेचे संपादक आणि आदिब्राह्म-समाजाचे दुसरे अध्यक्ष होते. ख्रिस्ती व इतर आक्षेपकास उत्तर म्हणून त्यांनी दिलेलीं काहीं व्याख्यानें व लेख प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं "ब्राह्मधर्म म्हणजे काय" ह्या नावाचे व्याख्यानांतील काहीं भाग साराशरूपाने खालीं दिला आहे.

ईश्वर हा अखिल सृष्टीचा कर्ता व नियंता आहे. तो सर्वगत, शाश्वत, निरा-कार, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् आहे. आपली माता, पिता, बंधु, सखा, आपला उद्धा-रक तोच एक आहे. मनुष्याचा उद्धार होण्यास साक्षात् ईश्वरावर निष्ठा असली म्हणजे पुरे. आणखी एकाद्या ईशप्रेषितावर निष्ठा ठेवण्याची जरूर काय? मनुष्याच्या अंतर्गतच देवाची साक्ष पटते. त्यास शास्त्रप्रचीति आणि गुरु-प्रचीति कशाला? एकाद्या शास्त्रामध्ये खोटे बोलावे व चोरी करावी असे असले तर ते शास्त्र म्हणून कोणी मानील काय? अर्थात् मनुष्याच्या विवेचक बुद्धीला जे सयुक्तिक वाटेल तेच खरे तोच सत्य धर्म. ज्याने आमच्या खाण्या-पिण्याची नैसर्गिक तजवीज लावली, त्याने आमच्या धर्मजिज्ञासेची तहान भागविण्याची तितकीच नैसर्गिक तजवीज लावली नसेल काय? ज्ञान हे त्याने गूढ किंवा परावलंबी ठेवले नाहीं. ते उघड व सर्वांस सहज प्राप्त आहे. आपण केलेल्या प्रार्थना ऐकून त्यास योग्य वाटतील तीं आपली गाऱ्हाणी तो दूर करतो. मनुष्याची बुद्धि स्वतंत्र असल्यामुळे तो आपल्या कर्माबद्दल ईश्वरास जबाबदार आहे. प्रेम हेच एक ईशोपासनेचं आयतन आहे. देवास रुजू होतील अशीं कर्मे करणें हीच त्याची पूजा. आपल्या कर्माबद्दल आपल्याला मरणोत्तर बरे-वाईट फळ भोगलेच पाहिजे. आपल्याला दुःख भोगावे लागले तर तें

आपला आत्मविकास व्हावा ह्यासाठींच असतें. केवळ अनुताप हाच नरक व आत्मतृप्ति हाच स्वर्ग होय. जीवाच्या आत्मविकासाला मर्यादा नाहीं. ईश्वरविषयक प्रेम आणि ज्ञान हीं एकसारखी निरंतर वाढतच जाणार. ईश्वराशीं केव्हां तरी एकरूप होऊन ही वाढ कधीं खुंटेल असें नाहीं. उत्क्रांतीचे नियम धर्मासही लागू आहेत. जुनेपुराणे धर्म हे अशोधित धातूप्रमाणें सुधारणेस पात्र आहेत. ब्राह्मधर्माची एका शब्दात व्याख्या करावयाची तर तो शब्द प्रेम हा होय. ईश्वराचे मनुष्यमात्रावरील प्रेम हरघडीस दिसून येते. उलटपक्षी मनुष्यही स्वाभाविकच ज्याअर्थी ईश्वरावर प्रेम करतो, त्याअर्थी ईश्वराचे कल्याणगुणाचे ज्ञान त्यास स्वभावसिद्धच असते. कारण अज्ञात वस्तूवर कोणी प्रेम करणार नाहीं. अशा रीतीने ईशप्रेमात ईश्वरविषयक ज्ञानही सामावते. ह्या वरील गोष्टी इतक्या साध्या, ठळक आणि उघड आहेत, कीं, कोणत्याही धर्मातील इसमास त्याची सहजच प्रचीति असते. आणि अशा रीतीने अखिल मानवजातीची सहजीच श्रद्धा बसणे हीच सत्यधर्माची खरी कसोटी आहे. ब्राह्मधर्मांत इतर सर्व धर्माचे सार ग्रथित झाले असल्यामुळे सर्वमान्यतेचा त्यासही आधार आहे. स्वकपोलकल्पित आणि निराधार असे त्यास म्हणता येणार नाहीं. इतकेच नव्हे तर ब्राह्मधर्माची योग्यता अखिल जगाचा सार्वत्रिक धर्म होण्याइतकी आहे. कारण मूलग्राही मतात ऐक्य, गौण मतात विविधता आणि सर्व मताबद्दल सहिष्णुता हेच ब्राह्माचे ब्रीद आहे.

वरीलप्रमाणे ब्राह्मधर्माची स्थूलमानाने रूपरेषा आखून राजनारायण बोस ह्यांनीं त्याची बारा विशिष्ट लक्षणे सांगितली आहेत. सत्य हे पहिले लक्षण आहे. हा धर्म कोणा एकाद्या धर्मसंस्थापकाच्या मतावर अथवा एकाद्या शास्त्रग्रंथावर उभारलेला नाहीं. वेदांत गायलेले सत्याचेही सत्य तोच हा मूर्तिमत धर्म आहे. अखिल सृष्टि हाच ब्राह्माचा धर्मग्रंथ. साक्षात् ईश्वर हाच त्याचा गुरु आणि अखिल मानवजातीची समष्टिबुद्धि हाच ह्या धर्माचा उघड आणि अभेद्य असा आधार होय. दुसरें लक्षण ह्या धर्माचे साधे व सुबोध स्वरूप. मनुष्यमात्राचे केवळ उपजत बुद्धीस सहज पटण्यासारखीं ह्या धर्माची तत्त्वे आहेत. ती समजावून घेण्यास सद्गुरु, अवतारादि मध्यस्थांची जरूरी नाहीं. तिसरें लक्षण ह्याचें व्यापकत्व. देश, वर्ण, जाति, पंथ इत्यादि भेद हा धर्म

मानीत नाहीं. सत्यधर्म कोणा एका विशिष्ट देशांतच कांहीं व्यक्ति अगर समाजापुरताच संस्थापित झाला, असें नसून अखिल मानवजात या धर्माची अधिकारी आहे. चवथें लक्षण ह्या ब्राह्मधर्माची आध्यात्मिकता होय. ह्या धर्मांप्रमाणे ईश्वराचे उपासनेस देशकालादि बंधनें नाहीत. ज्या ठिकाणी व ज्या वेळीं मन प्रसन्न व एकाग्र होईल, तीच ईशोपासनेची जागा व वेळ. तसेंच सत्संगतीपरतें तीर्थक्षेत्र नाहीं; प्रेम, आदर आणि शुभ कर्मांची फळें ह्यापरतें देवपूजेचे उपचार नाहीत. परोपकारापेक्षा अधिक श्रेष्ठ धर्मविधि नाहीं. षड्रिपुदमनाहून अन्य तप नाहीं, पश्चात्तापापेक्षा पापक्षालनास समर्थ दुसरें प्रायश्चित्त नाहीं. आणि ईशप्रेम-ज्योतींत स्वार्थबुद्धीची आहुति देण्यापेक्षा अधिक पुण्यकारक यज्ञ नाहीं. समता हें ब्राह्मधर्माचें पांचवें लक्षण आहे. ह्याचा अर्थ असा कीं, ह्यांत धर्मवेडाचा उन्माद नाहीं, किंवा विरक्ताचा उदासवाणा स्तिमितभाव नाहीं; ह्यांत आळसांत मुरलेला भोळा भाव नाहीं किंवा श्रद्धाहीन कर्मप्रवृत्ति नाहीं; ह्यांत लोकसंग्रहादि उद्योग सोडून नुसतीच ध्यानधारणा करावयाची नाहीं, तसेंच ध्यानादि साधनाकडे दुर्लक्ष्य करून केवळ रूक्ष कर्मासक्ति नाहीं. ह्यांत संन्यस्तवृत्ति नाहीं, तशी प्रपंचासक्तिही नाहीं. ह्यांत केवळ बुद्धिवाद नाहीं, तशी अंधश्रद्धाही नाहीं. ह्यांत तपाचे कष्ट नाहीत, तसें ऐषआरामही इष्ट नाहीत. ह्यांत कर्मकांडाचें बंधन नाहीं, तशी निरंकुशवृत्तिही अभिप्रेत नाहीं. परमार्थप्राप्तीचे कामीं येथें केवळ दैववाद सांगितला नाहीं, तसा पुरुषार्थाचाही अभिमान ठेवला नाहीं. सत-सद्गुरूसंबंधीं ब्राह्मधर्मांत अवास्तव पूज्यभाव मान्य नाहीं, तथापि त्याचे-संबंधीं अनादरही नाहीं. असो. अशीं हीं द्वंद्वें अनेक लिहितां येतील. तात्पर्य इतकेंच कीं, ब्राह्मधर्म कोणत्याही बाजूस झुकलेला नसून त्याची नजर सम-तोल आहे. सहावी गोष्ट अशी कीं, ब्राह्मधर्माची परमपुरुषाची कल्पना ख्रिस्ती अगर महमदीधर्मापेक्षा अत्यंत उदात्त आणि व्यापक आहे. आणखी असें कीं, ब्राह्मधर्म हा मोठा गोड आहे. ईश्वरविषयक प्रेम हेंच ह्या धर्माचें सर्वस्व आहे. परमात्मा सर्वगत असल्यामुळें यांत प्रेमाची अखंड व्याप्ति आहे आणि ह्या धर्मानें ईश्वराचे ठिकाणीं समता व दयाळुत्व हे दोन्हीही गुण मानले आहेत. ह्या कारणास्तव हा धर्म अत्यंत आकर्षक झाला आहे. ह्यांत ईश्वराची न्यायनिष्ठुरता आणि त्याचें अमर्याद दयाळुत्व यांची संगति उत्कृष्ट लावली

आहे. म्हणून हा धर्म इतर धर्मांहून अधिक प्रिय होण्यालायक आहे. अज्ञानमूलक वाईट चालीरीति मोडून योग्य शिक्षणाने मनुष्यास पूर्णत्वास पोचाविण्याचे ध्येय ब्राह्मधर्माने स्वीकारले असल्यामुळे उपयुक्तता हे त्याचे आठवे लक्षण आहे. ब्राह्मधर्माचे नववे लक्षण त्यातील विनीतभाव हे होय. ह्या धर्माची मांडणी इतर कोणत्याही धर्मापेक्षा श्रेष्ठ असली, तरी इतरांपेक्षां आम्हास अधिक समजतें अशा अहंकारबुद्धीस ब्राह्मधर्मात थारा नाहीं; उलट जें ब्राह्मधर्मात सांगितले आहे, तें सुशिक्षित अशिक्षित प्रत्येक मनुष्यमात्रास सहज समजण्यासारखे आहे, असा त्या धर्माचा सिद्धान्त आहे. इतकेंच काय, पण ह्या जगन्नाटकाचे पडद्याचे मागील गूढरहस्य उकलीत बसणे हे व्यर्थ आहे; ज्या गोष्टी आपणास समजावयास पाहिजेत त्याचें ज्ञान ईश्वराने आपणांस दिले आहे; उलट मरणोत्तर स्थितीसारख्या ज्या कित्येक गोष्टी ईश्वराने आपणापासून गुप्त ठेवल्या आहेत, त्या तशा अज्ञात ठेवण्यातच आपलें हित आहे; असे ब्राह्मधर्माचे मत आहे.

ब्राह्मधर्माचा दहावा गुण त्यातील विकासवाद हा होय. ईश्वर हा अनंत आहे, तसेंच त्याचेवर प्रेम करणे हीच त्याची खरी पूजा होय, इत्यादि कित्येक धर्मतत्त्वाचा विकास होणे जरी शक्य नसले, तरी ब्राह्मधर्माची नानाविध तत्त्वे भौतिक शास्त्रादिकाचे आधारे यापुढे अधिक स्पष्ट होत जाणे शक्य आहे. तसेंच ब्राह्मधर्माची व्यवहार्यता एकदर समाजाचे उत्क्रांतीबरोबर वाढणारी व बदलणारी आहे. त्रिकालाबाधित सत्य अशा नावाखाली ब्राह्मधर्माची वाढ सर्वतोपरी खुंटवलेली नाही. परधर्मसहिष्णुता हा ब्राह्मधर्माचा अकरावा विशेष भाव आहे. प्रत्येक धर्मात सत्याचा अंश आहे, असे ब्राह्मधर्म मानीत असल्यामुळे सर्व धर्माबद्दल त्यांत आदरभाव आहे.

सामान्यतः राजनारायण याचे म्हणणे असे की, उपजतबुद्धि किंवा आत्मप्रचीति हा धर्माचा पाया असून त्यावर विवेचकबुद्धीने धर्माची इमारत उभारलेली असते. वास्तविक व्यावहारिक ज्ञान आणि तत्त्वज्ञान, विवेक आणि साक्षात्कार, अध्यात्म आणि भौतिकशास्त्र, यांत काहीच गैरमेळ नसून उलट ईश्वरवादाची ही भव्य इमारत पुरी होण्यांत प्रत्येकाचे नियत कार्य असते. राजनारायण यांचा आणखी असा उपदेश आहे कीं, धर्माचे बाबींत आपण नव्याचा द्वेष न करतां जुन्याचे साभिमानी असावे, आणि विघातक न होता प्रागतिक व्हावे.

वरील एकंदर विवेचन वाचून ह्या ब्राह्मधर्माचें गौडबंगाली स्वरूप भगवें घातलेल्या एकाद्या मुक्तिफौजेतील सैनिकाप्रमाणे कोणास विलक्षण वाटल्यास नवल नाहीं. देवेंद्रनाथ, राजनारायण, अक्षयकुमार दत्त इत्यादि विविध वृत्तींच्या पुरुषांनीं कोठकोठून मिळविलेल्या डाळतांदूळांचें हे एक कडबोळेच आहे. हे दिसण्यांत सुबक असले तरी निष्ठेच्या मिठावांचून ते अळणी असेच कित्येकास वाटेल. अंडें घातलेली गव्हाची रोटी शाकाहार म्हणून सेवन करणारे आजकाल पुष्कळ असले, तरी मांसाहार म्हणून त्यास निषिद्ध मानणारेही कित्येक आहेतच. अशा सोंवळ्या वृत्तीच्या लोकास वरील विचारसरणींत विदेशी मतपरिवर्तनाचा वास आल्यावाचून राहाणार नाहीं. त्या काळीं नास्तिक, धर्मविरोधि, स्वतंत्र बुद्धीचे, एकेश्वरपंथी, विकासवादी इत्यादि लोकाकडून ख्रिस्तीधर्मास जोराचे धक्के मिळत होते. त्यामुळें कित्येक प्रबुद्ध लेखक ख्रिस्तीधर्मावर उदारमतवादी म्हणून जी मखलाशी करीत असत, त्याचाच अनुवाद वरील विचारसरणींत दिसून येतो. बाबू केशवचंद्रसेन ह्यांच्या नवविधानाइतके हिंदी विचाराचें ख्रिस्तीकरण मात्र ब्राह्मसमाजांत अद्याप झालें नव्हते. तथापि केशवचंद्राचे हे आदिब्राह्मगुरु ख्रिस्ती संसर्गापासून अलिप्त होते असें खास नव्हे. राजनारायण ह्याचे गोंपगिरीवरील उपदेश व फ्रेंच प्रार्थनांचे अनुवाद. यांतच त्याच्या शिकवणीचा उगम दिसत होता. परंतु त्यांच्या देशाभिमानास, अलेक्झांडर डफच्या बाटवेगिरीमुळें प्रतिक्रियारूप धर्माभिमानाची कृत्रिम जोड मिळताच हिंदी विचाराचें ख्रिस्तीकरण कमी होऊन ख्रिस्ती विचाराचें हिंदीकरण करण्याकडे राजनारायण याचा जास्त ओढा दिसूं लागला. पुढें कित्येक वर्षांनीं राजनारायण ह्यांनी प्रेमधर्म ह्या नावाचें एक इंग्रजी लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें ते जरी सार्वत्रिक उपयोगाकरितां होतें, तरी तें विशेषेकरून " हिंदुशास्त्रान्वये तयार केलेलें " असें मुखपृष्ठावर लिहिलें असून त्या पानावर ऋग्वेदापासून तों महिम्नस्तोत्रापर्यंत संस्कृत वाङ्मयांतील कित्येक वचनें दिलीं आहेत. ह्या पुस्तकांतील राजनारायणांचीं काहीं सुभाषितें आम्ही खालीं देत आहोत.

" अनंत कल्याणगुणयुक्त असा एक परमपुरुष आहे. इतकी श्रद्धा प्रेमधर्माला पुरेशी आहे. अतर्क्य अशा परमात्मस्वरूपाबद्दल मतमतांतरांचा कीस काढीत न बसतां प्रेमपूर्वक व्यावहारिक धर्म आचरणें हेच खरे जीवन आहे;

आणि त्यासाठी प्रथम देहाच्या आरोग्याचा विचार केला पाहिजे. (२) आहार-विहारात मितपणा ठेवणे यासच ब्रह्मचर्य म्हणतात. ते आरोग्यास आवश्यक आहे. मांसाहार व शाकाहार यासंबंधी अद्याप निर्णय लागला नाही त्याअर्थी मिश्र आहार ठेवावा हे उत्तम. तंबाखूसुद्धा सर्व मादक पदार्थांचा निषेध करावा. ( ३ ) अमानुषपणातून माणूसपणात येणे यांचेच नाव धर्म. प्रकृतीवर ताबा असणे हीच माणुसकी व प्रकृतीचे गुलाम होणे ही गैरमाणुसकी. दृश्याची अदृश्याबद्दल किंवा समर्यादाची अमर्यादाबद्दल उत्कंठा तो धर्म, असेही म्हणता येईल. दीर्घशोकाकुल विरहानंतर झालेली प्रियतम वल्लभाची ती भेट होय! ईश्वराशी साधर्म्य ( Communion ) हीच धर्माची आदि, मध्य व अखेर आहे. परमात्म्याशी आत्म्याने पत्नीभावाने प्रेम करणे हा आराधनेचा सर्वोत्कृष्ट प्रकार होय. ह्या प्रेममार्गास व्यवहार आडवा येत नाहीं. डोक्यावर पाण्याचा घडा घेऊन तालसुरात गाऊन नृत्य करणाऱ्या नर्तकीप्रमाणे प्रेममय वृत्ति असताही अबाधित रीतीने प्रपंच करता येतो. ( ४ ) परमात्म-दर्शनास चित्त शुद्ध व शांत व्हावे लागते. निर्वात दीपाप्रमाणे चित्तवृत्ति अशी स्थिर होण्यास जगिक व्यवहार आडवे येत नाहीत. ( ५ ) फुलाने फुलणे हे जितके स्वाभाविक आहे तितकेच मनुष्याने ईश्वराची प्रार्थना करणे हे सहज आहे. ईश्वर आपल्या ऐहिक आकांक्षा कधी पुऱ्या करील किंवा करणारही नाही. परंतु पारमार्थिक ज्ञानासाठीं त्याची मनोभावाने प्रार्थना केल्यास ती कधी वायां जात नाहीं. परंतु ईश्वराची अखंड प्रार्थना करीत राहणे हाच केवळ धर्म नसून धर्माचे स्वरूप त्याहून गूढ व महत्त्वाचे आहे. ( ६ ) मनाचा मोठेपणा हा फार स्पृहणीय आहे. पण परमात्मयोगास अगदी निष्पापच असले पाहिजे असे नाही. ( ७ ) कोणीतरी बाहेरच्याने बोलावे असे शब्द अंतरांतही ऐकूं येतात. ज्यास आपल्या अंतर्यामीकडून असा आदेश मिळत नसेल, त्यास धिक्कार असो. तो बाप असूनही पोरका समजावा! कारण ही आत्मवाणी सर्वांतरांत असते. आणि ह्या नीतिमर्यादे-मुळेच जगाचे धारण होते. तसेच कित्येक वेळां ही विवेकवाणी-नव्हे गर्जनाही मनुष्य दाबून टाकतो तेव्हां जगांत अन्याय व अत्याचार होऊं लागतात. आज ज्यास पाश्चात्य सुधारणा म्हणतात तो तसलाच एक निंद्य प्रकार आहे. भौतिक उत्कर्षास भुलणाऱ्या लोकांहून मूर्ख ते कोणते?

( ८ ) धार्मिक शिस्तीचें कडक परिपालन हें अत्यंत आवश्यक आहे. दुर्वासना झाडणे, त्या न गेल्यास त्यांस तुडवणे, मनास दाबणे, भवसागर पोहून जाणे आणि परमात्मचिंतनांत उडी मारणे असे धार्मिक व नैतिक शिस्तीच्या तालमेचे प्रकार आहेत. हे प्रथम कठीण वाटतात. कारण सत्य हें भ्रमापेक्षांही परके वाटते. ( ९ ) परंतु सदसद्विवेकबुद्धीच्या अंतःप्रेरणेप्रमाणे वागले असता मनुष्य निष्पाप व निरिच्छ होतो. तोच परमार्थतः त्याचा पुनर्जन्म होय. तेच त्याचे इहलोकीचे निर्वाण किंवा आत्म्याचा परमात्म्यांत लय होय. (१०) प्रेमधर्मात ईशप्रेम व मनुष्यप्रेम हे दोन मुख्य भाग आहेत. यास्तव ईश्वराच्या ध्यानयोगाच्या मोहाने कर्महीन राहण्यापेक्षा कर्म करीत राहणे हे चांगले. फार कशाला, राजकारणांतही धर्म व नीतीचा जो समावेश करतो तोच खरा राजकारणी जाणावा. (११) प्रेमाची ठिणगी पेटून त्याची ज्योत झाली तेच हे विश्व. यास्तव धर्म म्हणजे प्रेमावांचून दुसरें काहीच नाहीं. चांगलेच काय पण वाईटावरही प्रेम करणे हा श्रेष्ठ धर्म होय. चित्तशुद्धि, ईशचिंतन आणि त्याचबरोबर व्यावहारिक बारीकसारीक गोष्टीसंबधीही दक्षता हीच गंभीर धर्मवृत्ति होय. हे काही न करिता नुसत्या भजन-कथांत दंग होणे हा एक घातुक धर्मविलास आहे. (१२) उलट, आत्मप्रीतीचा सर्वस्वीं लय हीच अत्युच्च धार्मिक अवस्था होय. आपली स्वताची काहींच इच्छा अथवा प्रेरणा न राहणे हेच योग्य. संकट आले तरी त्याचा आपले व्यक्तीकडे संबंध न लावतां, तो एक विश्वयंत्राचा भाग आहे, असे समजून आपली व्यक्ति सोडून समष्टीशी तादात्म्य पावावे. परमात्मस्वरूपात आत्मा विलीन करणे—नाहीसा करणे हेच निर्वाण होय. हे प्रेमधर्माचे अंतिम ध्येय आहे. (१३) प्रेम हाच स्वर्ग व द्वेष हाच नरक आहे. (१४) परमात्मा अनंत आहे. मनुष्य किंचिज्ज्ञ आहे. यास्तव मूर्तिपूजा हे पाप नसून निर्गुणोपासनेची ती एक पायरी आहे. अधार्मिकापेक्षा मूर्तिपूजक बरे. परंतु ते साधन आहे, साध्य नव्हे. धर्माचे स्वरूप प्रागतिक आहे. धर्ममतांपेक्षां धर्मजीवन श्रेष्ठ आहे. धर्ममतांनीं कधीं कोणाचा उद्धार होत नाहीं. मतमतांतरे व पंथभेद दुनियेंत असावयाचेच. तरी आपण परमतसहिष्णुता ठेवणे हे आपले कर्तव्य आहे. (१५) क्वचित् ईशस्फूर्तीने एकादा जीव काहीं काळ उच्चकोटींत जातो, व अशा वेळी त्याने प्रगट केलेले मात्र विचार अगदीं निर्दोष असून ते

तिन्ही काळीं व साऱ्या देशांतील लोकांचे बुद्धीस व अंतःकरणास पटतात. ह्या अनुभविक बोलांत सर्वत्र साम्यता दिसून येते. ते बोल सूत्ररूपाने असे, (१) निष्पाप हो. (२) ईश्वर सर्वत्र सचरला आहे ह्याची सदैव जाणीव असू दे; (३) सर्वतोपरी ईश्वरावर प्रेम कर; (४) ईश्वराशीं तुझें सदा ऐक्य असू दे; (५) सर्व जीवावर प्रेम कर; (६) सर्वावर उपकार कर. (७) ज्याने त्यानें आपआपल्या मार्गानें ईशसान्निध्य गाठावें हा प्रत्येकाच्या मतस्वातंत्र्याचा पहिला हक्क आहे. यास्तव तत्त्वविरोधाबद्दल सहिष्णुता असू दे.

शिवाय राजनारायण बोस ह्यांचे म्हणणे असें होतें कीं. आमच्या धर्माचा उद्धार करणारा पुरुष अंतःकरणाचा खराखरा हिंदुच पाहिजे. ख्रिस्ती मिशनऱ्यापेक्षा आपल्याच शास्त्री व भट्टाचार्य ह्या मंडळींत चळवळ उत्पन्न होईल अशी त्याची आस्था पाहिजे. कलकत्ता, मुंबई. लंडन अथवा एडिंबरो अशा स्वकीय परकीय सुधारलेल्या शहरापेक्षा मिथिला अथवा बनारस अशा पुरातन विद्यापीठाचे ठिकाणीं ब्राह्मधर्माची स्थापन करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा पाहिजे. आमचे ब्राह्ममंदिरात व्हॉइसराय अथवा लॉर्ड बिशप येण्यापेक्षां आमचे संतसाधु व शंकराचार्य हे यावेत यासाठीं त्यानीं प्रयत्न केला पाहिजे. धर्मप्रचारासंबंधी त्याचे हे असे विचार होते.

हे प्रकरण इतके विस्तृत लिहिण्याचे कारण ह्या भागाचा मुख्य विषय जो ब्राह्मधर्म त्यासंबंधीं देवेंद्रनाथ आणि त्यांच्यामागें राजनारायण बोस ह्यानींच प्रथम इतका सविस्तर विचार केलेला दिसतो. हे दोघे पुरुष आदि-ब्राह्मसमाजाचे आदर्श होत. अर्थात् पुढे बनणाऱ्या भारतवर्षीय ब्राह्मसमाजाचे ते आदर्श नव्हत हेही पुढील विवेचनावरून स्पष्ट करून येईल.

राजनारायण यांच्या ज्या व्याख्यानाचा व लेखांचा थोडासा आशय वर दिला आहे, ते वाङ्मय कालानुक्रमाने बरेच पुढचे म्हणजे सन १८७० ते १८९४ ह्या दरम्यानचे आहे. राजनारायण यांचे विचार एकदम वाचावयास मिळावे म्हणून ते ह्याच प्रकरणांत घेतले आहेत. त्यांतील बहुतेक मुद्दे त्या उभयतांनीं पूर्वीच विचारपूर्वक सिद्ध केलेले होते. त्यांच्या ब्राह्मधर्म ग्रंथातील व ब्राह्मधर्ममतविश्वास इत्यादि लेखांतील विचारसरणीचा उगम कसाही असो, पण त्यांची उभारणी बाह्यतः आपल्या राष्ट्रीय ग्रंथांचें आधारावरच केलेली दिसते. ईश्वर त्यांचेजवळ ज्या मुखानें बोलला, तीं

उपनिषद्वाणी त्यांनी सामान्यतः मान्य केली. परंतु हीच भावना सर्वांचे ठिकाणीं सारखी जागृत नव्हती. उलट ह्यानंतरचा कांहीं काळ म्हणजे ब्राह्म-समाजाचे जुन्या विचारपरंपरेतील क्रान्तीचाच काळ होय. अक्षय्यकुमार दत्त प्रभृति नवीन मंडळींनीं वेदास झुगारून दिल्यावर ते आपल्या धर्मात स्त्रीशिक्षण, विधवाविवाह इत्यादि सामाजिक सुधारणाचा अंतर्भाव करू लागले, आणि धर्मश्रद्धेचे मूलभूत सिद्धान्तही ते आपल्या बुद्धीच्या कसोटीवरून तपासून घेऊं लागले. अशा प्रकारच्या वादविवादासाठीं अक्षय्यकुमार ह्यानीं 'आत्मीय-सभा' नामक संस्था स्थापन केली. आणि ह्या सभातून सगुण परमेश्वराच्या ठायीं आनंद-ऐश्वर्यादि गुण आहेत कीं नाहींत, हे सभासदांचे बहुमताप्रमाणे ते ठरवू लागले. हा बुद्धिवादाचा होत चाललेला अतिरेक देवेंद्रनाथास रुचला नाहीं. शेवटीं ते ह्या रूक्ष बुद्धिवादास विटून हिमालयात एकांतवासासाठीं निघून गेले. नवीन मंडळींचे सामाजिक-सुधारणासंबंधी विचारही देवेंद्रनाथांस सर्वस्वी पटण्यासारखे नव्हते. कांहीं काल एकान्तवासात पौर्वात्य व पाश्चिमात्य अनेक ग्रंथाचे परिशीलन करून त्यांचा असा ग्रह झाला की, खरी धर्मप्रचीति असेल तरच धर्मशास्त्राचे रहस्य कळेल. उलट अनेक धर्मशास्त्रग्रंथाचे अव-लोकनानें धर्माचे गूढतत्त्व समजणार नाहीं.

देवेंद्रनाथ हे एकांतवासाचे अत्यंत शोकी असत. त्यानीं ह्या वेळीं हिमालयांत सबंध दीड वर्ष ब्रह्मचिंतनात घालविले. ते डोंगरातून अगदीं आडमार्गानें अत्यंत निर्जन अशा प्रदेशात हिंडत. तपोनिधि व योगी अशा महात्म्यांचे माहेरघर अशा हिमाचलांतील निसर्गसिद्ध सौंदर्यात जेथे मनुष्यानी आपली पाऊलवाट पाडूनही कृत्रिमपणा आणला नाहीं, अशा एकांत ठिकाणी बसून ते सृष्टिमाते-शी हितगुज करीत असत. पुढे एकदा हिमालयाचे पहाडांतून एके ठिकाणीं स्फटिकाप्रमाणे स्वच्छ असा नदीचा प्रवाह वेगानें उड्या घेत खालीं वहात चाललेला त्यानीं पाहिला. त्या प्रचंड प्रवाहाचा तो दिमाख आणि मोत्यांप्रमाणें तुषार फेकणारे त्याचे वेगवान् निर्मळ पाणी पाहताच देवेंद्रनाथांची चित्तवृत्ति प्रसन्न झाली. परंतु उत्तरक्षणीच त्यांना असा विषाद वाटला कीं, हा शुद्धोदकाचा पवित्र ओघ धुळींत व घाणींत मिसळायला खालीं कशाला चालला आहे ! थोड्याच विचाराअंती त्यास कळून आलें कीं, हा प्रवाह कितीही दिव्य व तेजस्वी दिसला, तरी त्याने खालीं जावे, कीं न जावें ह्याचा



१२ हिमालयांतील धबधब्याचा महर्षींस लोकसंग्रहाचा संदेश.



१३ महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर यांचा वाडा.

नुसता विचार करण्यासही ईश्वराने त्यास स्वातंत्र्य दिले नाही. त्याने आपले ऐश्वर्य व दिमाग्व चटसारे विसरून देवाचे अलम दुनियेतील वनस्पति व जीवकोटीस अन्नपाण्याचा पुरवठा करण्याकरिता प्रांताप्रांतातून जमीन सुपीक करीत व तृषार्तांची तहान भागवीत हिंडलेच पाहिजे. अशी ईश्वरी नियति आहे. त्यास गत्यंतर नाही ! हा विचार देवेंद्राचे मनात येत आहे तोंच त्याचे शुद्ध अंतःकरणात विवेकवाणी उत्पन्न झाली. तिने त्यास असे सांगितले की, बाबारे, पहाडात ब्रह्मचिंतन करीत बसण्याची ही महती सोडून, तुला जो काही सत्याचा व ईश्वरी प्रेमाचा प्रत्यय येथे आला असेल, तो खाली जाऊन जगास विदित करणे हेंच तुझे कर्तव्य आहे. ह्या प्रेमनदीच्या दृष्टान्तपूर्वक झालेल्या ह्या आदेशामुळे देवेंद्रनाथास आपला एकांतवासाचा परम मोह आवरून लोकसंग्रहासाठी कलकत्त्यास परत येऊन आपल्या ब्राह्मसमाजांत पुन्हा सामील होणे भाग पडले.

देवेंद्रनाथ हिमालयात जाण्यापूर्वी ब्राह्मसमाजाची हळूहळू वाढ होत चालली होती. ठिकठिकाणी ब्राह्मसमाजसंस्था स्थापन झाल्या होत्या. मोठमोठ्या श्रीमान् व वजनदार गृहस्थांचे लक्षही ह्या संस्थेकडे वेधले होते. परंतु पुढे ते हिमालयात निघून गेले व इकडे तरुण पिढीचे अध्वर्यु अक्षय्यकुमार दत्त हे इ. सन १८५५ साली एकाएकी शारीरिक व्याधीने निकामी झाले. अशा काहीशा आपत्काली समाजाला एका असामान्य व्यक्तीचा लाभ झाला. ती व्यक्ति म्हणजे केशवचंद्र सेन ही होय. त्याच्या चरित्रास पुढील प्रकरणी सुरवात करू

---

## प्रकरण सहावें

# केशवचंद्र सेन

केशवचंद्र सेन ह्याचा जन्म इ. सन १८३८ साली बंगाल्यांतील एका सुप्रसिद्ध वैद्यकुळांत झाला. बंगाल्यात मिश्रविवाह सुरू असता ब्राह्मण पिता व वैश्य माता ह्यांच्या संततीस वैद्य म्हणत असत. ह्या वैद्य जातीचा मान बंगाल्यांत ब्राह्मणाचे खालोखाल असे. ब्राह्मणेतर जातीत फक्त वैद्याचे पोट-जातीसच यज्ञोपवीत धारण करण्याचा अधिकार असे. मागे एका प्रकरणांत लिहिल्याप्रमाणे ठाकूर घराण्यास आश्रय देणारा बंगालचा राजा आदिसूर हा जातीनें वैद्यच होता. अर्थात् "राजा कालस्य कारणम्" ह्या न्यायाने वैद्य-जात ही बंगाल्यांत अतिशय बुद्धिमान व इभ्रतदार अशी गणली जात असे. राजा राममोहनप्रमाणें केशवचंद्र सेनाचे घराणे कट्टे वैष्णव होते. अव्वल इंग्रजीच्या प्रथम संस्कारानें बंगाल्यांत जी राजा राममोहनप्रमाणें चारदोन माणसे आपल्या विशेष बुद्धिवैभवानें चमकलीं, त्यांत केशवचंद्र याचे आजे रामकमल याची गणना होते. त्या काळची शिक्षणाची अनास्था व घरची गरिबी यामुळें रामकमल सेन हे कलकत्त्याचे रॉयल एशिॲटिक सोसायटीत आठ रुपये पगारावर "टाइप सेटर" म्हणून राहिले. परंतु तेथे राहून त्यांनीं आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्यानें इतका विद्याव्यासंग वाढविला कीं, लवकरच ते डॉ० एच. एच्. विल्सन् याचे सहकारी मित्र होऊन संस्थेचे एक प्रमुख आधारस्तंभ झाले. पुढे ते एका बँकेचे दिवाण होऊन त्यांस दरमहा आठाचे ठिकाणीं दोन हजारांवर पगार मिळूं लागला. आणि कलकत्ता राजधानीचे मध्यभागीं त्यांचा वाडा झळकूं लागला. राजा राममोहनप्रभृति पुढाऱ्यांच्या खटपटीनें स्थापन झालले हिंदुकॉलेज, संस्कृतकॉलेज, इतकेंच काय पण केवळ युरोपिअन व युरेशिअनांचे डव्हटन कॉलेज इत्यादि शिक्षणसंस्थांत रामकमल सेन ह्यांचे प्रमुखत्वानें अंग होतें. केवळ स्वतःचे बुद्धीनें विद्या संपादन करून रामकमल ह्यांनी बंगाली व इंग्रजी भाषांवर इतकें प्रभुत्व मिळविलें कीं, त्यांनीं

बंगाली व इंग्रजीचा पहिलाच मोठा कोश तयार केला. रामकमल हे जरी राजा राममोहनाचे समकालीन, इतकेच काय पण सहकारी मित्र होते, तरी राममोहन यांच्या धार्मिक चळवळीच्या कामी रामकमल यांची त्यास मदत न होतां विरोधच सहन करावा लागला असेल. डिस्ट्रिक्ट चॅरिटेबल सोसायटी-सारख्या परोपकारी संस्थेत द्वारकानाथ ठाकूर व रामकमल ह्यांचेही सहकार्य होत असे. रामकमलाचे एक चिरंजीव म्हणजे केशवचंद्र सेन यांचे वडील बंधु प्यारीमोहन हे देवेंद्रनाथाचे सहाध्यायी होते. तसेच देवेंद्रनाथाचे चिरंजीव सत्येंद्र-नाथ आणि केशवचंद्र सेन हे हिंदु कॉलेजातील वर्गबंधु होते. तात्पर्य ब्राह्मसमाजाचे संस्थापकाच्या घराण्याचे असे लागेबांधे होते. बहुतेक सर्व थोर पुरुषाप्रमाणे केशवचंद्र यांचेबद्दल "हा आमचा वंशच काय तो आमच्या कुटुंबाचे नांव राखील" असे उद्गार तो तीनचार वर्षांचा असतानाच रामकमल यांनी काढले होते. रामकमलसेन यांची सर्व कारकीर्द डॉ० विल्सन, डॉ० मार्शमन अशा ख्रिस्ती मिशनरी विद्वानांच्या सगतीत गेली. ते संस्कार पुढे केशव-चंद्रांच्या ठिकाणी उदित झाले की काय नकळे. केशवचंद्र यांच्या ठिकाणी ख्रिस्ती व वैष्णवपंथी अशा संस्कारांचे विलक्षण मिश्रण दिसून येते. त्यांचा स्वभाव म्हणजे कोणासही न उकलणारे एक कोडेच आहे. त्यांचे वडील हे मोठे सुस्वभावी वैष्णवभक्त होते. परंतु केशवचंद्र हे दहा वर्षांचे असतानाच ते वारल्यामुळे पितृसमागमाचा त्यांना फारसा लाभ घडला नाही. केवळ आईच्या निगेत मुलगा वाढणे हे दुर्दैव तर खरेच. परंतु पुष्कळ अलौकिक पुरुषांचे भाग्योदयास त्यांच्या आईच्या कृपेची पाखरच कारण झालेली आहे, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. राममोहन यांची आई व देवेंद्र-नाथ ह्यांची आजी ह्यांच्याहीपेक्षा केशवचंद्र सेन यांच्या मातोश्रींची योग्यता,— निदान केशवचंद्राच्या चारित्र्याच्या दृष्टीने उपयुक्तता,—फार अधिक होती असे दिसते. केशवचंद्रांचे नजीकचे नातेवाईक व सहकारी बालमित्र भाई प्रतापचंद्र मुजुमदार हे आपल्या गोड भाषेत केशवचंद्राची आई शारदा-सुंदरी यांचे वर्णन करितात, ते ब्राह्मसमाजापैकी जुन्या चालीच्या स्त्रीचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून अवश्य वाचनीय आहे. शारदासुंदरी हे त्यांचे नाव अन्वर्थक होते. शारदेची संस्कृति (विद्वत्ता नव्हे) व शालीन्य आणि सुंदरी म्हणण्यासारखे रेखींव रूप त्यांच्या ठिकाणी होते. गावच्या तरुण युवतींना

शारदासुंदरी यांच्या चांगुलपणाबद्दल एक प्रकारचा सात्त्विक हेवा वाटे. अशा सुंदर, सुशील, साध्वी, स्त्रीचे मोठेच दुर्भाग्य कीं तिच्यावरील सौभाग्यसूर्य तिच्या ऐन तारुण्यात पर्चाविसावे वर्षीच मावळला. संकटे एकामागून एक येत असतात, ह्याप्रमाणे त्याच्या एकदर कुटुंबासही पडितकाळ प्राप्त झाला. त्या वेळी प्रख्यात रामकमल सेन यांची ही विधवा तरुण सून म्हणजे घरांत एक वैराग्य व पावित्र्य याची मूर्तिच शोभूं लागली. घरचे सारे देवतार्चन तिचे स्वाधीन होते. कुलोपाध्याय व अतिथि-अभ्यागत या सर्वांची व्यवस्था शारदा-देवीच पहात असे. घरातील जुने नोकर व खालावलेले आप्तइष्ट ह्यांनी त्याच्याकडूनच समाधान मिळविले. आपल्या खानदानीच्या आढ्यतेत घरातच न राहता कोणचीही जवळची अगर लांबची तीर्थयात्रा त्यांनी करावयाची ठेवली नाही. कोणतीही खडतर व्रते, उपासतापास, जागरणे, त्याची करा-वयाची राहिली नाहीत. जुन्या चालीचे सारे नेमधर्म त्यांनी केले, परंतु अशाही अकाली वैधव्याच्या खडतर वैराग्यांत त्यांच्या मनाच्या अत्यत प्रेमळपणाचा लाभ सर्वांना सारखाच मिळत होता. त्याचे व्यवहारचातुर्य, त्याची विलक्षण धर्मनिष्ठा, आणि साधा स्वभाव, यामुळे अर्धवट शिकलेल्या तरुण स्त्रियांना ज्या गोष्टी कळणे केवळ अशक्य, अशाचे गूढरहस्य त्यांस सहज कळत असे. त्याच्या अमर्याद दयाळू स्वभावामुळे त्या जुन्या व नव्या (ब्राह्मसमाजांतील) मडळीस सारख्याच प्रिय होत्या. बाबू प्रतापचद्र मुझुमदार पुढे असे म्हणतात की, "ह्या आदर्शभूत महासाध्वीचे केलेले हे वर्णन काहीच नाही, त्याच्या ठिकाणी आणखी नवलाची गोष्ट ही होती की त्या कट्ट्या जुन्या चालीरीतीच्या असताही त्याना आपल्या सुधारक मुलाच्या पुढारलेल्या विचाराशी अगदी जुळते घतले होते. आणि म्हणून त्या काळच्या कांहींशा भ्रष्ट झालेल्या बगाली स्त्रीवर्गास शारदासुदरी म्हणजे एक खरोखरीची मार्गदर्शक देवताच होती, अशी त्याची फारफार वर्षे आठवण राहील." असो.

राममोहन याचे आपल्या आईशी फारसे कधीच जमले नाही. आणि देवेंद्राची आजी त्यास बालपणीच सोडून गेली. तसे केशव सेन ह्यांचे झाले नाहीं. त्याची आई शारदासुंदरी त्याच्याहीपेक्षां दीर्घायु होऊन तिचे चारित्र्य केशवसेनाच्या चरित्रास कोंदणाप्रमाणे आधारभूत झाले. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, दोघा मायलेकाचे आचारविचारांत फारसे साम्य नसतांही

त्यांचें परस्परांवरील प्रेम व आदर सारखा वाढतच गेला. शारदासुंदरी आपल्या मुलास दैवी पुरुष मानी, तर केशवचंद्र आपले आईच्या पायाची धूळ मस्तकीं धारण करीत. पुष्कळ दिवस ते आईबरोबर एका ताटात जेवीत असत. या तापसी माउलीचे बरोबर सहभोजन केल्याने केशवचंद्र सेनांस सहजच साध्या शाकाहाराची सवय लागली. ह्या तिघांही स्त्रियांचे ठिकाणी बालविवाह व आजकालचे शिक्षणाचा पूर्ण अभाव, अशी आजकालच्या दृष्टीनें वैगुण्ये असताही त्यांचा आयुर्दाय व त्यांच्या पुत्राची थोरवी ह्यांत यत्किंचितही कमतरता दिसली नाहीं. सच्छील, सद्भावना व शिस्त याच्या त्या केवळ मूर्तिच होत्या, ही गोष्ट चिंतनीय आहे असे वाटते. ब्राह्म-समाजाच्या थोर पुरुषाचा इतिहास लिहीत असतां, त्यांच्या शीलसंपन्न स्त्रिया व आया, ह्यांचे स्वभाव, आचार व विचार हेही समजतील तितके लक्षात घेतले पाहिजेत. म्हणून आमचे माहितीप्रमाणे आम्ही ठिकठिकाणीं त्यांचा निर्देश करणार आहोत.

राममोहन व देवेंद्रनाथ ह्यांच्या मनास तारुण्याच्या भराच्या अवसरातच एकाएकी प्रौढ व गंभीर करून सोडणाऱ्या काही सामान्य गोष्टी निमित्तमात्र झाल्या त्याचप्रमाणे केशवचंद्र सेन हे ऐन विशीच्या भरात असता एका विलक्षण गोष्टीने त्यांच्या सर्व चारित्र्याची दिशा बदलून टाकली. ते लहानपणीं जसे विचारी व महत्त्वाकांक्षी तसेच मोठे विनोदी व खेळाडूही होते. परंतु पुढे ते एका परीक्षेस बसले होते, तेव्हा गणिताचे प्रश्न सोडवीत असता. शेजारच्या विद्यार्थ्याजवळ कांही बोलत असल्याचे आढळून आल्यावरून त्यास परीक्षेचे मंडपातून घालवून लावण्यात आले. ह्या लज्जास्पद प्रसंगाचा त्यांचे मानी मनावर विलक्षण परिणाम झाला. त्यांची वृत्ति खिन्न व उदासीन झाली. पुढे तरुण व सुशील अशा स्त्रीच्या सहवासात न रमता त्यांच्या मनाने संन्यस्तवृत्ति अंगिकारली; त्यांचे घर त्यांना स्मशानवत् भासू लागले. व त्यांच्या सभोंवार ऐकू येणारा गलबला त्याना श्वापदांच्या वल्गनेप्रमाणे वाटू लागला. त्यांचे ध्येय त्यास ठरवितां येईना. मनांतील आनंद मावळला. त्यांनी मानसशास्त्राचा व नीतिशास्त्राचा अभ्यास चालविला. वेवर आणि चामर ह्यांच्या प्रार्थना ते मनोभावानें वाचूं लागले. केशवचंद्र यांचे मनोभूमिकेवरील इ. सन १८५७सालच्या ह्या विचारांच्या बंडाची शांति अखेर खिस्तविजयात झाली, असे म्हणण्यास हरकत नाहीं.

ते प्रत्यक्ष ख्रिस्ती झाले नाहींत, तसे मनाने हिंदूही राहिले नाहींत. त्यांचे लहानपणी त्यास धर्मनिष्ठेचा आधारच नव्हता. त्यामुळे त्याचे अंतःकरण अनुताधान नुसत रूक्ष व निराश झाले. कुळांतील वैष्णव संप्रदायाप्रमाणे गोपीचंदनाच्या मुद्रा केवळ दिखाऊपणासाठी काही काळ ते करीत असत. परंतु त्याच्या अंतर्गत हरिप्रेमाचा ओलावा नव्हता. ते वैष्णवाचे नास्तिक होण्याचा रंग दिसू लागला. त्याचे पाप त्याना खात होते. ह्या पापापासून माझे कोणी रक्षण करील काय ? अशी तीव्र उत्कंठा त्याच्या ठिकाणी उत्पन्न झाली. अशा वेळी ईश्वराने एक दिवस स्पष्ट शब्दात त्यास त्याचे हितगुज सांगितले; त्यायोगे त्याचे अंतःकरणात प्रकाश पडला आणि मनाच्या संतोषाकरिता व आत्मोन्नतीकरिता (Prayer) देवाची करुणा भाकणे अत्यंत आवश्यक आहे हे त्यास कळून आले, असा ते आपला अनुभव सांगतात. अशा ह्या विचारसंक्रमणाच्या वेळी राममोहन याच्यापुढे कुराणादि आरबी व फारसी ग्रंथ आले, देवेंद्रनाथाचे हाती उपनिषद् आले, व केशवचंद्रांस इंग्रजी काव्यग्रंथ व बायबल मिळाले. अर्थात् त्याच्या पुढील सर्व आचारविचारावर ह्या त्याच्या प्रथम संस्काराचा अंशतः निरनिराळा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही. तथापि फारशी, संस्कृत व इंग्रजी धर्मग्रंथ जरी वेगळे, तरी त्याच्या संस्कारानी तिघाच्याही ठिकाणीं प्रचलित धर्माचार व रूढी याच्यासंबंधी तिरस्कार हे एकच फळ निर्माण झाले. केशवचंद्र ब्राह्म झाल्यावर लवकरच त्याच्या कुळाच्या वैष्णवसंप्रदायाप्रमाणे त्यास गुरुदीक्षा घेण्याचा प्रसंग आला. तेव्हा कुलाचार व स्वकौटुंबिकाची आज्ञा यांची भीड न धरता त्यानी संप्रदायदीक्षा घेण्याचे साफ नाकारले; व स्वकीय जनांत अत्यंत सखेदाश्चर्य उत्पन्न केले.

केशवचंद्र सेन हे लहानपणापासून मोठे नाट्यप्रिय होते. त्यांचा स्वभाव अत्यंत भावनाप्रधान असे. ते शेक्सपीअरच्या नाटकातील हॅम्लेटची भूमिका उत्कृष्ट करीत असत. तसेच पुढे विधवाविवाह नाटक व नववृंदावन हे त्याच्या आवडीचे खेळ होते. कोणचीही गोष्ट असो, लहानपणच्या खेळापासून तों अखेर धर्मसंस्थापनेच्या कार्यापर्यंत सर्व लहानमोठ्या चळवळींत सतत केंद्रीभूत राहण्याइतके व्यक्तिमाहात्म्य त्याचे ठायीं होते. असामान्य वक्तृत्व, तेजोमय भावना, इंद्रियसुखविराग आणि जबरदस्त महत्त्वाकांक्षा इत्यादि

गुणांच्या योगाने केशवचंद्र सेन लवकरच तरुण बंगालचे जीव की प्राण होऊन गेले. केशवचंद्र सेन ह्यास धर्मविचाराची आवड उत्पन्न होण्यापूर्वीच ते नीतिशास्त्राचे प्रणेते झाले. त्याची महत्त्वाकांक्षा त्याच्या उदास मनासही स्वस्थ बसूं देईना. ते रेव्हरंड पाद्र्याचे दोस्त बनले. शास्त्र आणि वाङ्मय यांच्या जोपासनेकरिता त्यांनी ब्रिटिश इंडिया सोसायटी नामक संस्था स्थापन केली. त्यानंतर इ. सन १८५७ त्याची "Good will Fraternity" ही संस्था अस्तित्वात आली. त्या संस्थेत केशवचंद्र यांची थिओडर पार्कर, डॉ॰ चामर वगैरे आंग्ल एकेश्वरीपंथाचे ग्रंथावरून व्याख्यानें होत. प्रतापचंद्र म्हणतात, "एकदा एका उदासवाण्या रात्रीं केशवचंद्राच्या घरीं एकीकडच्या एका खोलींत आम्ही पांचसहा तरुण एकत्र झालों. खोलीचें दार लावून घेतलें. खोलींत अगदीं मंद प्रकाश ठेवला होता. अशा वेळीं आम्ही आमच्या भावनाप्रधान मनांनीं अत्यंत वळवळ्याने प्रार्थना करण्यास सुरवात केली. केशवचंद्र घसा कोरडा पडेपर्यंत जीव तोडून भाषण करीत होता आणि आम्ही सर्व धाय मोकलून सारखे रडत होतों!" असे हे उत्कट परंतु अविचारी भावनेचे अत्याचार ब्राह्मसमाजाच्या आरंभ काळीं वरचेवर दिसून येत. परंतु अशी ही अंतःकरणाची बळेंच कालवाकालव करून घेण्यांत अरण्यरोदनाहून फारसा अधिक फायदा नाहीं, असें त्यास लवकरच वाटूं लागलें असावें. आपल्याला कोणी मार्गदर्शक पाहिजे, ईशप्राप्तीच्या परमध्येयाकडे जाणाऱ्या पांथस्थाचा एखादा मेळा आपण गांठावा हें बरें, असें त्यास वाटूं लागलें. नुसता ईश्वराचा आस्तिक्यभाव काय कामाचा? त्या ईश्वराच्या प्राप्तीसाठीं पंथारूढ होणें अवश्य आहे असें त्याच्या मनानें घेतलें. अशा समयास राजनारायण बोस यांची गोपागिरीवरील प्रवचनें, प्रार्थना व त्यांचे लेख यांनी केशवचंद्र यांचे चित्त आकर्षित केलें. व इ. सन १८५७ साली ते गुपचूप ब्राह्मसमाजाचे सभासद झाले. त्या वेळीं धर्मासंबधींच काय पण ईश्वरासंबंधींही त्याची निश्चित अशी भावना नव्हती. ख्रिस्ती वाङ्मयाच्या संस्काराने ईश्वर हा सर्वांचा पिता व मनुष्यमात्र हे बंधु हें तत्त्व त्यास पटलें होतें. वैष्णवादि प्रचलित संप्रदायाची माहिती मिळविण्याचा त्यांनी प्रयत्नच केला नव्हता. केवळ इंग्रजी शिक्षणाच्या दर्पानें प्रचलित समाजरीतींस त्यांनीं तुच्छ ठरविलें होतें. कोणत्याही धर्मग्रंथांनीं आपल्या विवेकबुद्धीवर ताबा चालविता कामा नये, असा त्याचा मनोनिग्रह होता.

अशा स्थितींत त्यांस ब्राह्मसमाजाचीं मतें सहजच ग्राह्य वाटलीं. आणि म्हणून ते वर लिहिल्याप्रमाणे ब्राह्मसमाजांत दाखल झाले. देवेंद्रनाथ आपला एकांतवास संपवून परत आले, तेव्हां एका जुन्या प्रसिद्ध वैष्णवकुळांतील असलेले हे केशवचंद्र सेन ब्राह्मसमाजास मिळाल्याचें पाहून त्यांस फार आनंद झाला. वजनदार कुटुंबांतील तरुणांचीं मनें ब्राह्मसमाजाकडे वळविण्यासंबधीं त्यांचा फार कटाक्ष असे. लवकरच त्यांचें एकमेकांवर विलक्षण प्रेम जडलें. आणि त्याच्या उभयतांच्या सहकारितेनें ब्राह्मसमाजाचे उत्कर्षास मोठीच भरती आल्यासारखें झालें. शेकडो लोकांचें लक्ष समाजाच्या चळवळीकडे वेधलें. नवीन सुशिक्षित पदवीधर समवयस्क व एकविचाराचे असल्यामुळें, मोठ्या उत्साहानें समाजास येऊन मिळूं लागले. समाजाचें चालकत्व तत्वबोधिनी सभेकडे येथपर्यंत होतें, तें ब्राह्मसमाजानें ह्यापुढें आपल्याकडेच घेतलें; आणि देवेंद्रनाथ व केशवचंद्र हेच समाजाचे चालक बनले पुढें त्यांनीं ब्राह्मस्कूल नांवाची एक सुप्रसिद्ध संस्था काढून त्यांत मागें लिहिल्याप्रमाणें ब्राह्मधर्मावर साप्ताहिक व्याख्यानमाला व वार्षिक परीक्षा सुरू केल्या. ह्यापुढील ब्राह्मसमाज संस्थेचे चळवळींत केशवचंद्र ह्यांच्याच कामाची धडाडी व उत्साह विशेष दिसून येतो. राजा राममोहनाप्रमाणें केशवचंद्र ह्यांचाही ख्रिस्ती मिशनऱ्यांशीं जरी क्वचित् प्रसंगीं खटका उडाला, तरी एकंदरींत दोघांनींही ख्रिस्ती मिशनऱ्यांचें प्रेमच अधिक संपादन केलें. असें दिसतें. केशवचंद्र सेन व त्यांचे सहकारी तरुण बंगाली यांनीं वैदिक वाङ्मयापेक्षां ख्रिस्ती वाङ्मयाचाच अधिक आस्थापूर्वक अभ्यास केला होता. त्यामुळें त्यांच्या सर्व चळवळींत ख्रिस्त्यांचेंच अनुकरण बहुतांशीं केलेलें दिसतें. केशवचंद्र सेनानें धर्मसंबधीं पहिला विचारविनिमय ख्रिस्ती मिशनऱ्यांशींच केलेला दिसतो. पुढें ख्रिस्ती व शीखधर्मीयांचें अनुकरण करून केशवचंद्र यांनीं आपलें सांप्रदायिक बंधूंची एक संगतसभा नामक संस्था निर्माण केली. त्यांत ख्रिस्ती बायबल आणि त्याचप्रमाणें थिओडर पार्कर, प्रो० न्यूमन, मिस कॉब, हॅमिल्टन, व्हिक्टर कझिन इत्यादि पाश्चात्य ग्रंथकारांचें फार काळजीपूर्वक अध्ययन सुरू झालें. त्यांतच केशवचंद्र सेन ह्यांनीं 'बायबल ट्रॅक्ट' प्रमाणें बंगाली तरुणांस उद्देशून लहान लहान चोपडीं प्रसिद्ध केलीं!

इ. सन १८६० सालीं त्यांनीं तरुण बंगालला उद्देशून पहिलें चोपडें

प्रसिद्ध केलें. आणि त्यानंतर निरनिराळी बारातेरा चोपडीं त्यांनी लागोपाठ प्रसिद्ध केली. त्याच्या पहिल्याच चोपड्यात सरकारी शाळांतून मिळणाऱ्या धर्महीन व नास्तिक्यविचारप्रवण अशा शिक्षणावर कडक टीका केली आहे. तसेंच सुशिक्षितांचा देशाभिमान नुसत्या पोकळ वक्तृत्वांत व लेखातच राहिला आहे व त्यास खऱ्या धर्मजीवनाचा पाठिंबा नाही या गोष्टीकडेही त्यांनी तरुण पिढीचें लक्ष वळविलें. धर्मसंबंधी त्यांच्या उपदेशाचें सारसर्वस्व 'प्रार्थना' ह्या एका शब्दांत आहे. ज्या प्रार्थनापद्धतीने त्यांना शांति प्राप्त झाली, ती ईशप्रार्थना म्हणजे भवरोगावरील एक त्रैलोक्यचिंतामणीची मात्रा आहे असा त्यांचा दृढतर विश्वास होता. ते म्हणत की, प्रार्थनेची उपयुक्तता सिद्ध करावयाला तर्क काय कामाचा ? शरीराची भूक भागविण्याकरिता अन्न मिळवणे जितके अगत्याचें, तितकीच अंतरात्म्याची भूक भागविण्याकरितां ईशप्रसादार्थ त्याची प्रार्थना करणें हे अपरिहार्यच आहे. येथे शंकाकुशंकास अवसरच नाही.

केशवचंद्राच्या या लहान लहान चोपड्यात त्यांनी ब्राह्मधर्मावर ब्राह्म-शाळेत दिलेल्या सर्व व्याख्यानाचें सार आहे. प्रार्थनेप्रमाणेच केशवचंद्राचा विशेष ज़ोर सहज उपजतबुद्धि व ईश्वरीप्रेरणा यावर अधिक दिसतो. कोणत्याही प्रश्नासंबंधी विचार करूं लागण्याच्या प्रथमक्षणींच किंबहुना पूर्व-क्षणींच त्यासंबंधी मनाचा जो अनायासेंच ग्रह असतो, त्यास ते उपजतबुद्धि असें म्हणतात. ही बुद्धि अचूक मार्गदर्शक असते अशी त्यांची समजूत होती. शिवाय प्रार्थनेच्या वेळीं जेव्हां आपण ईश्वरासन्मुख होतो, त्या वेळीं होणाऱ्या एकाग्रचित्तांत ईश्वरी प्रेरणा होते. अशा प्रेरणेप्रमाणे निःशंकपणे वागण्यास मनुष्य सहजच तयार होतो. इतकेंच काय पण अशा ईश्वरी प्रेरणेच्या द्वारें त्याचा साक्षात् ईश्वराशी परिचय होऊन ईश्वर म्हणजे केवळ कल्पनामात्र असें ब्रह्मतत्त्व नाही, अथवा तो कोणी ऐतिहासिक पुरुषही नाही, तर ईश्वर म्हणजे नित्य, शुद्ध, बुद्ध स्वभाववान् असा परमपुरुष आहे ही गोष्ट पटून त्याचे अगाध ज्ञान, अनंत शक्ति, अमर्याद प्रेम इत्यादि अलौकिक गुणांचा आपल्याला साक्षात्कार होऊं शकतो. ईशस्वरूप आपण आपल्या सन्मुख पाहूं शकतो असें ते म्हणत. ब्राह्मधर्माच्या मूळ एकेश्वरी तत्त्वा-संबंधी राममोहनप्रभृति सर्व ब्राह्म पुढाऱ्याचें एकमत असलें, तरी राजा

राममोहन, देवेंद्रनाथ, राजनारायण बोस आणि केशवचंद्र सेन यांच्या विचारां-च्या मांडणीमध्ये व्यक्तिभेदाप्रमाणे फरक दिसून येतो. त्यासंबंधी पुढे सविस्तर विवेचन येणारच आहे. असो.

केशवचंद्र सेन यांच्या असामान्य स्फूर्तीमुळे त्या काळचे सुशिक्षित बंगाली तरुण, धर्मसुधारणेच्या उत्साहाने बेहोष होऊन गेले. वर्णसंस्था मोडावी, यज्ञोपवीताचा त्याग करावा, कुलगुरूकडून दीक्षा घेऊ नये, मूर्तिपूजकाकडे कोणत्याही समारंभास जाऊ नये, नाचरंग तमाशे यास आळा घालावा, स्त्रियास पुरुषासमान हक्क द्यावे, सत्य न्यायनीति ह्यांच्या मर्यादा कडक रीतीनें पाळाव्या, असे ठराव संगतसभेत एकामागून एक होऊ लागले. ह्या विचारविनिमयांत सभासदांच्या रात्रीच्या रात्री जाऊं लागल्या. सभा विसर्जन करून घरीं येत असतांना देखील रस्त्यांतील कंदिलाचे खालीं परतणाऱ्या सभासदांची त्रिकुटें आणि चौकडे पुन्हा जमून त्यांची तासन्तास उभ्याउभ्याच चर्चा सुरू राही. याप्रमाणे तरुण सुधारकांचीं मनें सुधारणाविषयानीं भारून गेलीं होतीं. कोठें कोठें नीतिनियमांचे परिपालनांत कर्मठाप्रमाणें कडक शिस्तीचा अवलंब होऊं लागला होता. उदाहरणार्थः—आपले पदरीं असत्याचा दोष येऊं नये म्हणून संगतसभेचे खास सांप्रदायिक, "अमुक एक गोष्ट अशी आहे" असें निश्चित विधान न करतां, "ती तशी आहे असें वाटतें," असें म्हणत. "अमुक गोष्ट मी करीन" असें न म्हणतां "ती गोष्ट करण्याचा मी प्रयत्न करीन," अशी भाषा वापरण्याची ते फार काळजी घेत. ह्या सर्व विचारक्रांतीचे ओघांत ब्राह्ममंदिरांतील प्रार्थनेचें रूपांतही पालट झाला. देवेंद्रनाथांच्या स्तोत्रांतून व प्रार्थनांतून परमात्म्याचें सदैव सान्निध्य, त्याच्या कृपेविषयीं आत्मविश्वास आणि तन्निमित्त धन्योद्गार असा प्रकार दिसतो. तर केशवचंद्र सेनाच्या प्रार्थना, अनुताप आणि करुणा, अशा वृत्तींच्या दर्शक दिसून येतात. एकंदरींत हिंदी पद्धतीपेक्षां ख्रिस्ती प्रार्थनापद्धतीचेंच त्यांनीं अनु-करण केलेलें दिसतें. अशाच अनुकरणाची दुसरी बाब म्हटली तर ख्रिस्ती मिशनऱ्याप्रमाणें ब्राह्मधर्मप्रसारार्थ केशवचंद्र सेनानें मिशनरी तयार केले ही होय. आणि ह्यापुढे केशवचंद्र सेनानें आपली नोकरी सोडून आपणांस सर्वस्वीं ह्याच कार्यास वाहून घेतलें. ब्राह्मसभेतील चर्चात्मक 'ब्राह्मधर्मानुष्ठान' ह्या

नांवाचा एक महत्त्वाचा ग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध केला. आपल्या पक्षाचे मतदर्शक म्हणून " इंडियन मिरर " नावाचे पाक्षिक इंग्रजी पत्र त्यानी सुरू केले. आणि आपल्या मताची छाप चोहोंकडे बसविण्यास त्यांनीं सुरवात केली.

त्यांची ही असामान्य कार्यक्षमता पाहून देवेंद्रनाथानी फार मोठ्या समारंभाने केशवचंद्र सेन यांस ब्राह्मसमाजाचे आचार्य ही पदवी प्रथमच इ.स. १८६२ सालीं दिली. साक्षात् ईश्वराकडूनच आपणांस तशी चालना मिळाली असे ते म्हणत. केशवचंद्र सेनाचे त्या वेळीं त्यांनी ब्रह्मानंद असे नामाभिधान ठेवले. हा अपूर्व समारंभ पहाण्यासाठीच केशवचंद्रानी व त्याचे समवयस्क तरुण ब्राह्ममंडळीनीं आपल्या अल्पवयस्क बायका बरोबर नेण्याचे ठरविले. केशवचंद्राची बायको त्या वेळीं अवघी पधरा वर्षांची होती. बाबू प्रतापचंद्र मुझुमदार यांचीही तितक्याच वयाची होती. त्या वेळीं बंगाल्यांत स्त्रियांची पडद्याची वगैरे शिस्त फारच कडक रीतीने पाळली जात असे. केशवचंद्राचे घरचे मंडळींनी तिला देवेंद्रनाथांकडे पाठविण्याचे साफ नाकारले. ठाकूरघराणे बहिष्कृत होते हे पूर्वीं आलेच आहे. अशा घरीं आमची मुलगी येणार नाही, असा घरच्या मंडळीचा स्वच्छ जबाब मिळतांच, ती कशी येत नाही ते पाहू, असा केशवचंद्रांनीं आग्रह धरिला. ती कशी नेतोस ती तरी पाहू, असे घरच्या मंडळींनी मनांत आणले, तेव्हां पोलीसची मदत मागण्यापर्यंत केशवचंद्रांची मजल गेली. एक दिवस सुप्रभातीं एक मोठाच प्रसंग झाला. केशवचंद्र आपल्या बायकोस नेण्यास घरात गेले. घरांतील झाडून सारे पुरुष, नोकरलोक, शेजारीपाजारी, पहारेकरी हा मुलीला कसा नेतो, ते पहाण्यासाठीं दुतर्फा ठिकठिकाणी उभे राहिले. इतक्यांत केशवांची स्वारी बाहेर पडली. त्यांचे मागोमाग त्यांची अल्पवयी धर्मपत्नी लज्जारक्षणार्थ तोंडावर पदर ओढून पति हेच आपले निधान ह्या निस्सीम भावनेने धीराने पावले टाकीत त्याच्या मागोमाग जाऊं लागली. तेव्हा कोणी केशव सेनांचे साहस तर कोणी त्याच्या लहान बायकोची पतिनिष्ठा ह्या गुणांकडे पाहून तोंडांत बोटे घातलीं! शेवटच्या दरवाजाशीं ही वरातीची मिरवणूक जातांच पहारेकऱ्यानीं त्यांस पुढे जाण्यास अटकाव करून पाहिला. परंतु केशवचंद्रानी दरडावतांच दरवाजा खुला झाला व आपले बायकोस डोलीत घालून विजयी केशवचंद्र देवेंद्रनाथांकडे निघून गेले. त्यानंतर त्याचा पदवीदानसमारंभ झाला नाहीं तोच त्यांच्या

घराहून त्यांस खलिता आला. त्यांत इतउत्तर सेनाच्या जुन्या कुलीन घराण्यांतून तुम्हांस कायमचे बहिष्कृत केलें आहे, पुन्हा घरांत पाऊल ठेवूं नये, असा मजकूर होता. ह्याप्रमाणे ज्या घरीं त्याचें पूर्व आयुष्य गेले, जेथे ते लहानाचे मोठे झाले, जेथे त्यांची जीव की प्राण अशी आई रहात होती, त्या गृहाचा कायमचा वियोग झाला असतां, देवेंद्रनाथांनी त्यास कायमचा आसरा देऊन त्याचे पुत्रवत् पालन केले. किंबहुना पोटच्या मुलापेक्षाही त्यास अधिक प्रेमाने वागविले. प्रतापचंद्र बाबूसही केशवचंद्राप्रमाणे घरचा मनाईहुकूम लागला होता, परंतु तो त्यांनी मानला नाही. व ते धिटाईने घरच्या छळाची पर्वा न करता बायकोसह परत घरी जाऊन राहूं लागले.

ह्याप्रमाणे केशवचंद्र सेन आपल्या बायकोसह देवेंद्रनाथाच्या घरीच राहू लागले. केशवचंद्र सेनाप्रमाणे त्याच्या सहकारी मित्रांचाही अशाच प्रकारच्या अपराधास्तव त्यांच्या जुन्या चालीच्या आतेष्टांकडून व गावकऱ्यांकडून फार छळ होऊ लागला. परंतु तो सर्व छळ सहन करून त्यांनी आपले अंगीकृत कार्य तसेंच उत्साहाने पुढे चालविले. केशवचंद्राचे साहस व स्वार्थत्याग ह्याचे वारे सहजच इतर सुशिक्षित तरुणांत भरले. लढाईतील वीराप्रमाणे कौटुंबिक छळ व आपत्ति ही तरुणास स्पृहणीय वाटू लागली. केशवचंद्रांचें तेज बीजेच्या चंद्राप्रमाणे वाढू लागले. ते पाहून देवेंद्रनाथ त्यांच्यावर फारच प्रसन्न झाले. " शकुंतलेच्या बालभरताने दुष्यंताला आश्चर्यचकित केले नसेल इतके ह्या तरुण केशवाने मला थक्क करून सोडले आहे " असे ते प्रेमादराने म्हणत. त्याच सुमारास केशवचंद्र सेनांनी 'ब्राह्मधर्मानुष्ठान' नावाचे एक पुस्तक लिहिले; ह्याचा तर देवेंद्रनाथावर इतका परिणाम झाला की, त्यांनीं त्यानंतर आपले यज्ञोपवीताचा त्याग केला. मग काय विचारता! ती एक तरुणांच्या नवीन मानसिक धैर्याची टूम होऊन राहिली! राखलदास हलदार ह्या नांवाच्या एका ब्राह्मण जातीचे ब्राह्माने ब्राह्मसमाजांत असा विचार पुढे आणला की, जर सर्व ईश्वराची सारख्यांच दर्जाचीं लेकरे आहेत, तर कांहींनीं भिन्नजातिदर्शक यज्ञोपवीत का घालावे ? असे म्हणून त्याने आपल्या यज्ञोपवीताचा त्याग केला. ही गोष्ट त्याच्या वृद्ध पित्यास कळतांच त्याला ती ऐकून इतके दुःख झाले कीं, त्याने तत्काल सुरीने आपली मान कापून आत्मघात करून घेतला!



१४ केशवचंद्रांचे बंधु, आईबाप व आजे.



१५ महर्षि देवेंद्रनाथ व केशवचंद्र यांच्या स्त्रिया.

देवेंद्रनाथांच्या घरातील इतर मंडळींचे संतोषाकरितां मूर्तिपूजेचा थोडा अवशेष घरात शिल्लक होता, तोही त्यांनी अगदीं बंद केला. स्वताचे मुलीचे लग्न पूर्वपरंपरेच्या सम्काराप्रमाणे न करता नवीन ब्राह्मविधीने केले. केशव-चंद्रांनी आपल्या पहिल्या मुलाचे नामकरणही नवीन ब्राह्मविधीप्रमाणे आपल्या मोठ्या रहात्या घरी केले. दरम्यान ते अतिशय आजारी झाल्यामुळे त्यास त्याचे घरच्या मंडळींनी घरात घतले होते. परतु पुन्हा हा कुलाचार भंग होण्याचा वेळ आला, तेव्हा पूर्ववत् बखेडा पडण्याचा प्रसंग आला होता. परंतु त्याच्या घरच्या मंडळींनी केशवचंद्राचा हट्टी स्वभाव जाणून त्या वेळी त्याचा प्रतिकार न करता त्या मोठ्या घराण्यातील फक्त त्याच्या आईशिवाय बाकीची लहानथोर सर्व मंडळी राहते घरच सोडून चालती झाली! मग अशा त्या स्वकीयांनी टाकलेल्या घरी केशवांनी आपल्या मुलाचा जातकर्मसमारंभ फारच मोठ्या थाटाने (इ.सन १८६३) ब्राह्मविधीप्रमाणे केला. मतस्वातंत्र्याच्या त्या वेळच्या अव्वल अमदानीत तरुण सुधारक आपल्या मनःपूत आचारामुळे स्वकीयांची मने किती दुखविली जातील, अथवा आपले ज्ञातिबांधवाचा केवढा उपमर्द होईल, ह्याची प्रायः पर्वा करीत नसत.

अशा रीतीने ब्राह्म पुढाऱ्यांचे पुढारलेले विचार उत्तरोत्तर आचरणातही उतरूं लागले. अंगीकृत कार्याच्या हुरुपेने तरुण ब्राह्ममंडळी तर जुन्या ब्राह्म पुढाऱ्यांच्या दहा पावले पुढेच गेली होती. त्यांनी संस्थेची अधिकारसूत्रे हळूहळू आपल्या हातीं घेतलीं, आणि ब्राह्मधर्मप्रसाराचे काम मोठ्या उत्साहाने चालवले. केशवचंद्र सेनाच्या खिस्ती विचाराशीच नव्हे, तर इंग्रजी भाषेशीं त्याचे इतके तादात्म्य झाले होते, की कित्येक आधुनिक विद्वानां-प्रमाणे त्यास इंग्रजीप्रमाणें बंगालींत प्रथम प्रथम बोलताच येत नसे. त्यामुळें त्याना बंगालींत बोलण्याचा मनस्वी कंटाळा येई. देवेंद्रनाथांच्या गंभीर व ओजस्वी वाणीपुढे केशवचंद्राच्या वक्तृत्वाचे आविर्भाव फिक्के पडत. तेव्हां तो मानी पुरुष निराश होऊन आचार्यपद सोडण्याच्याही विचारांत होता. त्याच्या उपासनेस जुन्या पठडीतील ब्राह्मगृहस्थ येत नाहीसे झाले. तेव्हां ही फजीती टाळून आपली इंग्रजीची हौस पुरवण्याकरितांच की काय त्या कल्पकाने धर्म-प्रसाराची एक नवीन योजना तयार करून ते इ. सन १८६४ सालीं त्यासाठीं मुंबईमद्रासकडे धर्मप्रसाराकरितां निघून आले. दोन्हीही

ठिकाणीं त्यांस बोलावणीं होतीं. तेथे त्यांचें उत्कृष्ट स्वागत झालें. इकडील श्रोत्यांवर त्यांच्या अश्रुतपूर्व अशा इंग्रजी व्याख्यानांची छाप बसूं लागली. त्यामुळे सहजींच उत्तेजन मिळून आपला एकेश्वरी पंथ केवळ कलकत्त्याच्या सीमितच न ठेवतां त्याचा सर्व हिंदुस्थानात प्रसार करावा ही कल्पना त्यांच्या अंतःकरणांत प्रथमच उदित झाली. अखिल भारत-एकेश्वरी-समाज हे एक मोठे मोहक ध्येय त्यानी आपल्यापुढे ठेवले. त्यानतरच्या परिस्थितीच्या अनुकूलतेने अगर निमित्ताने केशवचंद्र सेन ह्यांनीं आपले हे ध्येय कसे सिद्ध करून घेतले, हे सांगण्यापूर्वी त्या वेळी धर्मविचारांस समाजसुधारणेची पुस्ती जोडण्यास परिस्थिति कशी कारण होत होती ते पाहणे जरूर आहे, म्हणून त्याचा अगोदर विचार करूं.



## प्रकरण सातवें

# सुधारणेचा मनु

इ. सनाच्या एकोणिसाव्या शतकात हिंदुस्थानात सुधारणेच्या नवीन मनूस सुरुवात झाली असे म्हणता येईल. दोन भिन्न संस्कृतींच्या गुणदोषांचा संकर ह्या मनूत झालेला आढळतो. हिंदुस्थानातील आद्य सुधारकांचे दृष्टि-कोन भिन्न असोत, तसेंच त्यांनी सुधारणेकरितां हातीं घेतलेले विषय भिन्न असोत, तथापि एकंदरीत सुधारणेची दृष्टि उघडण्याचें सर्व श्रेय, ख्रिस्ती-सरकार, ख्रिस्ती पाद्री आणि ख्रिस्ती प्राच्यविद्याविशारद यांच्याकडेच आहे, असें त्यांचे संस्कृतीचे साभिमानी इतिहासकार म्हणत असतात. आणि तें सर्वस्वी खरें मानून ह्या सुसंस्कृत ख्रिस्ती सरकारशीं आमचा पारतंत्र्याचा दुवा जोडल्याबद्दल आमचे कित्येक विद्वान् सुधारक ईश्वराचे धन्यवाद गात असतात. ह्यांत एक पक्षाचा कावेबाजपणा आणि दुसऱ्या पक्षाचें फाजील सौजन्य ह्यांचेंच दिग्दर्शन होतें, असें आम्हास वाटतें. ज्या पुरुषाची दृष्टि राष्ट्रीयत्वाची भावना ओलांडून अखिल मानवजातीला व्यापून उरते, त्याच्या ठिकाणीं, हे श्रेयाचें माप कोणाच्या पदरांत किती टाकावें, याची चिकित्सा करीत बसण्याइतकी आस्था व अभिमान नसतोच. एकदर मानवजातीबद्दल त्याची भावना इतकी उच्च प्रकारची असते कीं, कट्टया शत्रूबद्दलही दुष्मानगिरीची भाषा न वापरतां माणुसकीच्या भलेपणाचीच भाषा ते नेहमीं बोलतात. ही असामान्य व अलौकिक साधुदृष्टि आजच्या जगाच्या कुटिल व्यवहारांत अंगीकारणें ज्यास अव्यावहारिक वाटतें अशा तीव्र राष्ट्रीय भावनेच्या पुरुषास, हिंदुस्थान पारतंत्र्याच्या यातना भोगीत असतां, ह्या ॲंग्लो-इंडियन ग्रंथीबद्दल राज्यकर्त्यांचे अगर ईश्वराचे धन्यवाद गावे असें वाटणें आज तरी शक्य दिसत नाहीं. कारण हें उघड आहे कीं, आजचे जगांतील आंतरराष्ट्रीय दळणवळण लक्षांत घेतां, हिंदुस्थान एका विदेशी साम्राज्यसत्तेत सरकारजमा झालें नसतें, तर तें आजच्या जगांतील उत्कृष्ट संस्कारांस आंचवलें असतें, असें खास नव्हे. इतकेंच नव्हे तर ही

पारतंत्र्याची धोंड जर आमच्या गळ्यांत नसती, तर गेल्या शेदीडशे वर्षांत, पौर्वात्य जपानच काय, पण पाश्चिमात्य इंग्लंडच्या पुढेही, दहा पावले निघून जाण्याचे कर्तृत्व हिंदुस्थानने दाखविणे काही असंभवनीय नव्हते. ज्या पाश्चिमात्य संस्काराच्या उपकाराबद्दल आम्हांस ऋणकरी लेखण्यात खिस्ती लेखक मोठेपण मानतात, त्या संस्कारांत जो चांगुलपणा असेल तो आम्ही स्वतंत्र असतो तर आपल्या स्वेच्छेने निवडून व पारखून घेतलाच असता. आज फरक इतकाच झाला की, ती निवड व पारख करण्याची स्वतंत्र बुद्धि आमच्यात राहिली नाही. दुसऱ्याच्या उपकाराच्या राईचा डोंगर मानून घ्यावा ही सुजनरीति कबूल आहे. परंतु असे करीत असताना दुसऱ्याचे अपकाराच्या डोंगराची राई करूनही ती डोळ्यात सलून व झोंबून घळघळ पाणी काढते हेही अपरिहार्यच आहे! मोगलाईतील झनान्यात सापडलेल्या एखाद्या अभागी हिंदु राजस्त्रियेच्या अंगावर बादशहानीं अगदी रत्नजडित यावनी पेहराव चढविला, आणि हे पहा, तुला आमच्या सरकारने कसे रत्नखचित केले आहे, म्हणून त्या बादशहाचे खुषमस्करे त्या बाईस वेळीं अवेळी बजावूं लागले, तर त्या दुर्दैवी स्त्रीच्या अंतःकरणाची जी स्थिति होईल, त्याप्रमाणे ह्या खिस्ती लेखकाची आत्मप्रौढी वाचून हिंदभूमीचे मन लज्जित व दुःखित होणे स्वाभाविक आहे. वरील दृष्टान्तात त्या खुषमस्कऱ्यांच्या सरकारने त्या अभागी स्त्रीला रत्नखचित केल्याचे गृहीत धरले आहे. पण ह्या हलाख झालेल्या सुवर्णभूमीच्या ठिकाणी तोही प्रकार विपर्यस्तच झालेला असताही, त्या मिशनरी भाटांनीं वाटेल ते गावे, आणि आम्ही त्यास मान तुकवावी, हे आम्हास तरी अनुकरणीय वाटत नाहीं. अठराशे सत्तावन सालच्या बंडात हिंदुस्थानातील उरल्या सुरल्या स्वाभिमानाची राख झाली असता, ती राख अंगाला फासून एखाद्या तामसी पुरुषाप्रमाणे त्या भारतवर्षाने आंग्लसंस्कृतीशी तरी तेखाने फटकून राहावयास पाहिजे होते, असे आज कित्येक उद्वेगाने म्हणत आहेत, पण तोही योग आला नाही. ह्या प्राथमिक मुद्द्यासंबंधीं इतका विस्तार करण्याचे कारण असे की, जी विचारसरणी असमंत म्हणून वर दर्शविली, ती केवळ खिस्ती लेखकांनींच अंगीकारली नसून कित्याच ब्राह्म लेखकांनींही स्वीकारलेली दिसते. आतां त्यांपैकीं कित्येकांनीं पांचपन्नास वर्षांच्या पूर्वी ह्यासंबंधी जे उद्गार काढले, ते उद्गार त्याच शब्दांत

आजची स्थिति अनुभवून त्यांनीही कदाचित् काढले नसते, असे जरी मानले, तरी आम्हा पौर्वात्यावर अशा कोणत्या अपूर्व संस्काराची व उपकाराची खैरात पाश्चिमात्यांनी केली कीं, त्यामुळे शेपन्नास वर्षांच्या पूर्वीही आम्हास इतके हुरळून गेल्यासारखे व्हावे! हा प्रश्न रहातोच. "कृतघ्ने नास्ति निष्कृया" मनुष्याने कृतज्ञ असावे, कृतघ्न होऊं नये, हे ठीक. पण कृतज्ञ होण्याच्या भरांत स्वतास नादान ठरवून स्वाभिमानशून्य होणे, जरूर व इष्टही नाही. हे उघड आहे.

आमचा व खिस्ती लेखकाचा मतभेदाचा हा भाग ह्या ग्रंथांत अखेर-पर्यंत राहण्याचा संभव असल्यामुळे त्यासंबंधी थोडाअधिक खुलासा आताच एकदा केलेला बरा. राजकारण, समाजकारण व धर्मकारण यांचे संबंध निगडित असल्यामुळे, आम्हास हा ग्रंथ लिहीत असता, निदान मनाने तरी, प्रस्तुत राजकारणाशी जरी अगदींच फारकत करता येणे शक्य नसले, तरी वरील विवेचनांतील आमचा कटाक्ष केवळ विदेशी राजसत्तेकडे नसून, सामान्यत्वे आमच्यासंबंधी विदेशीयांचे ग्रंथ व संस्था ह्यास अनलक्षून आहे. हे सांगणे जरूर आहे. ख्रिस्ती मिशनरी व ख्रिस्ती प्राच्यविद्याविशारद यांची ग्रंथसंपत्ति, व त्यांच्या अनेक लोकोपयोगी संस्थांचा व्याप व इतिहास पाहिला म्हणजे त्यांचे बुद्धिवैभव व उद्योगशीलता याबद्दल कोणासही उत्कृष्ट साक्ष पटेल ह्यांत शंका नाही. हे त्यांचे गुण त्यांच्या स्वातंत्र्यास पुरेसे नसले तरी साजेसे आहेत हे खरे. पण धाकटा भाऊ बापाचा खांदा उभे रहावयास मिळाल्या-मुळे उंच दिसतो आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन थोरल्या भावाने जसे दुर्मुखलेले राहण्याचे कारण नाही, तसे परकीयांप्रमाणे आमच्यांत, शाळा, दवाखाने, इत्यादि उपयुक्त संस्था काढून त्या यशस्वी करून दाखविण्याची धडाडी नाही; आमच्यात कोणी कोलब्रुक, विल्सन, मॅक्समुल्लर निपजत नाहीत. ज्ञान-विज्ञानाची वृद्धि नाही, समाजांत सुधारणा नाहीत, परोपकारी संस्था नाहीत, लोकसंग्रहाचा हुरूप नाहीं, इत्यादि अनेक खऱ्या व काल्पनिक वैगुण्यास कारण आमची प्रतिकूल परिस्थिति आहे, हे ध्यानी ठेवून सुज्ञांनी विनाकारण आत्मनिंदा करून जनतेत निरुत्साहादि आत्मघातकी दोष पसरवू नये, हेही योग्य आहे. आपत्कालीं आत्मनिरीक्षणाकडे दोषैकदृष्टि राहील तर ती भूषणा-वह व सुखावह होईल. पण आपत्कालीं अशी दृष्टि 'बुडत्याचा पाय खोलांत' या न्यायाने कधीं कधीं आत्मघातकी होण्याचा फार संभव असतो.

आतां ह्या ख्रिस्ती लेखकाचे ग्रंथांतून आमच्या संस्कृतीबद्दल, इतिहासाबद्दल व परिस्थितीबद्दल जे वर्णन केलेले आढळते, त्यांत लेखकांचे परिश्रम व भाषावैभव हीं जरी उत्कृष्ट दिसून आलीं, तरी त्यांचा दृष्टिकोन अचूक चुकलेला, आणि विवेचनपद्धति निरपवाद स्वार्थप्रेरित असल्यामुळे त्यांच्या ग्रंथसंपत्तीनें त्यांना श्रीमान् केले असले, तरी आम्हांस नाहक दरिद्री केले आहे. परंतु हे सहज वाचकाचे नजरेंत येतेच असे नाही. कारण त्या ग्रंथातून आमची बारीकसारीक व खरीखोटी माहिती देऊन क्वचित् स्तुतिही केलेली आढळते. आणि शिवाय केवळ निर्विकार मनानें, किंबहुना सहानुभूतिपूर्ण दृष्टीनें, आम्ही ग्रथास आरभ करीत आहों अशी त्यांत प्रतिज्ञाही असते. आम्हीही त्या सर्वांसच खोट्या प्रतिज्ञेत आणतो असे नव्हे, परतु त्याच्या प्रतिज्ञेस काय किंमत द्यावयाची याचा आपण विचार केला पाहिजे. कोणी परपुरुष आपल्या मायबहिणीची-निंदा नव्हे—सौंदर्याची स्तुति करू लागला, तर त्यात वाटल्यास कोणी संतोष मानावा; परतु त्या पुरुषाची नजर पापी आहे, हे कळून आल्यावर त्याचे स्तावक शब्दही आपल्या मुखास अगर आदरास पात्र होतील काय? हरिदासाचे वैराग्याचे निरूपण शेवटल्या बिदागीच्या मागणीमुळे जसे फिके पडते, जादुगाराची मातीची चांदी करण्याची विद्या जशी शेवटी तो टोपी काढून पै-पैसा मागू लागला, म्हणजे लबाडी ठरते, नाटकांतील राजा उपांत्य अंकाच्या शेवटी लोकाश्रयाची याचना करूं लागला कीं उघड नाटकी ठरतो, त्याप्रमाणे ख्रिस्ती लेखकाचे आमच्यासंबंधी लेख त्यातील अखेरचे खरे रहस्य कळले, तर भ्रामक ठरतात. ज्याप्रमाणे आपल्या शेजारच्या सर्व शिप्याच्या दुकानांवर कोणी एका शिप्यानें 'या गावातील प्रमुख', 'ह्या प्रांतातील श्रेष्ठ', 'ह्या देशातील सर्वोत्कृष्ट शिंपी' अशा पाट्या लटकावून शेवट त्या परोपकारी शिप्यानें आपले दुकानावर 'ह्या आळीतील पहिल्या प्रतीचा शिंपी' अशी दिसण्यात साधी पाटी लावून सर्वांच्या पाट्या उघळून लावल्या, त्याप्रमाणे ख्रिस्ती लेखकाचा जेथे तेथे स्वतांच्या धर्माचे व राष्ट्रीयत्वाचे वगैरे वर्चस्व प्रस्थापित करण्याचा डाव जेव्हा उघडकीस येतो, तेव्हां त्यांच्या सर्व परोपकारी ग्रंथांवर सहजच पाणी पडते. तेथे वाचकानीं केवळ सारसंग्राहक दृष्टि ठेवून चालणेही धोक्याचे आहे असे वाटूं लागते. मग ही पण सारग्रहणबुद्धि न ठेवतां ते ग्रंथ सर्वथा मान्य करून त्या

अधिष्ठानावर सुधारणेचे मनोरे उभे करूं पहाणे. किती अनर्थावह होईल हे निराळें सांगावयास नको. आपल्या भूत आणि भावी स्थितीबद्दल परकीयानीं लिहिलेले लेख, त्यांनी आपल्याकडून प्रामाणिक बुद्धीने लिहिलेले असले, तरी ते विचाराअंतीं आणि अनुभवाअंतीं जसे भ्रामक ठरतात, त्याचप्रमाणे परकीयांचा धर्म व समाजनीति यांचे अध्ययन आणि नंतर जसेच्या तसे त्याचे अनुकरण हेदेखील स्वोन्नतीस पोषक न होता विघातकच होते. अशा स्थितीत ज्या परकीय संस्कृतीच्या लोकाशीं आपला संबंध आला आहे, ते संस्कृतिधारक, जेते ह्या वर्गात येत असून, ते सत्ताधारी, यशस्वी व ऐश्वर्यवान असे असल्यामुळे, आपण आपल्या स्वत्त्वाबद्दल निभ्रान्त चित्ताने खबरदार राहणे, जितके जरूर तितकेच कठिण झाले आहे. तात्पर्य, प्रथम दर्शविल्याप्रमाणे खिस्ती राजसत्ता, खिस्ती मिशनरी, खिस्ती शास्त्रीय संस्कृति, आणि खिस्ती प्राच्यविद्याविशारदांचे उद्योग व संशोधन, असे चतुर्विध पुरुषार्थांचे प्रकार एकदम नजरेपुढे आले असता, त्यांशीं त्या काळीं सहज परिचित होणारा जो सुशिक्षित हिंदी वर्ग, त्या वर्गात बुद्धिभेद झपाट्याने सुरू होऊन हरएक बाबतीत "सुधारणा, सुधारणा" ही एकच घोषणा सुरू होणे अगदीं स्वाभाविक होते. ब्राह्मसमाज हा मुख्यत्वेकरून सुशिक्षितांचाच एक संघ असल्यामुळे ह्यांत सुधारणेसंबधीं खळबळ वरचेवर होऊ लागली. राजकीय प्रश्नांच्या चर्चेस राजा राममोहन ह्यानीं पूर्वीच सुरुवात केली होती. तथापि राजकीय सुधारणेची चळवळ अद्याप सुरू झाली नव्हती. औद्योगिक चळवळीचा तर मागमूसही नव्हता. राहता राहिल्या धार्मिक व सामाजिक सुधारणा. त्यापैकी धार्मिक सुधारणा हाच ब्राह्मसमाजाचा मुख्य उद्देश म्हणून राजा राममोहन आणि देवेंद्रनाथ यांच्या आदि-ब्राह्मसमाजाने धार्मिक सुधारणांपलीकडे आपले लक्ष फारसे जाऊ दिले नाही. धार्मिक सुधारणांतील मतभेदांस व विरोधांस पुरून उरण्याइतके आणि उपस्थित प्रश्नांची योग्य ती वासलात लावण्याइतके कर्तृत्व दोघांनीही दाखविले. परंतु धार्मिक बाबीप्रमाणे सामाजिक सुधारणांचा सांगोपांग विचार करून ती चळवळ सुरू करण्यास देवेंद्रनाथ तयार नसल्यामुळे त्यांची आदि-ब्राह्म-समाज-संस्था विशेषेंकरून तरुण सभासदांच्या महत्त्वाकांक्षेस अपुरी वाटूं लागली. मनुष्यकृत भेद व मनुष्यकृत शास्त्ररूढीचीं बंधने नाहींशीं करून

मनुष्याला स्वतंत्र करावयाचा, यांतच बहुतेक सर्व सुधारणांचा अंतर्भाव होईल. समान हक्क आणि आचारस्वातंत्र्य हेच समाजसुधारणेचे अत्यंत इष्ट गणलेले दोन प्रकार होत. अर्थात् या सुधारणांचे विषयीभूत होणारे वर्ग म्हणजे समाजांत कनिष्ठ म्हणून गणलेले ब्राह्मणेतर, गरीब आणि स्त्रिया हेच होत. त्यांची उन्नति करून सर्वांस समान दर्जा व हक्क प्राप्त करून घेण्यास मोकळे व समर्थ करणे, हेच समाजसुधारकांचे ध्येय होते. वरील वर्गांपैकीं सर्वांशी सन्निकट व संख्येने सर्वांत मोठा व आवडीने सर्वांत प्रिय असा स्त्रीवर्गच असल्यामुळे अबलोन्नतीचा प्रश्न त्यांतही प्रामुख्यानें पुढे येणे स्वाभाविक होते. शिवाय प्रतिबंधाचे प्रमाणांतच प्रतिकारांचा जोर असल्यामुळे बंगाल्यांतील गोषाच्या कडक प्रतिबंधामुळे तो पडदा दूर करून स्त्रियाना पुरुषाप्रमाणे स्वतंत्र व मोकळ्या करण्याचा प्रयत्नही जोराचा सुरू झाला. हीं सुधारणांचीं सर्व बीजें पश्चिमेच्या वाऱ्याने प्रथम इकडे आलेलीं असोत अगर नसोत. महाराष्ट्राने तीं बंगालपासूनच उचलल्यामुळे महाराष्ट्रास तीं पूर्वेकडीलच आहेत. धर्म-कारणाप्रमाणे समाजकारणींही, बंगालच महाराष्ट्रीय सुधारक वर्गास मार्गदर्शक झाला असल्यामुळे, देवेंद्रनाथांचे आदि-ब्राह्मसमाजात कांहीं काळ वागणाऱ्या ठळक बंगाली सुधारकाचा अल्प परिचय करून देणे जरूर दिसते. शिवाय त्यायोगें धर्म-सुधारणांप्रमाणे समाजसुधारणात साक्षात् खिस्ती प्रेरणेचे अंग किती आहे, ह्याचेही आपणांस अनुमान करतां येईल.

# प्रकरण आठवें

# बंगालचे कांहीं आद्य सुधारक

राजा राममोहनराय ह्या चौरस पुरुषाने सर्वांगीण सुधारणेस आरंभ केला हे खरे, पण त्यांच्या ब्राह्मसभेचा भर एकेश्वरी उपासना ह्या गोष्टीवरच अधिक होता. तेच एकेश्वरी उपासनेचे व्रत पुढे देवेंद्रनाथानीही एकनिष्ठेने चालविले. परंतु पहिल्या ब्राह्मसभेच्या बुद्धिस्थानी जशी राजा राममोहन ही एकच प्रेरक शक्ति होती; तशी स्थिति आदि-ब्राह्मसमाजाच्या अमदानीत फार काळ राहिली नाहीं. आदि-ब्राह्मसभेचे बुद्धिस्थान तत्त्वबोधिनी सभेकडे होते. कोणा एकाच व्यक्तीकडे नव्हते. तत्त्वबोधिनी सभेचे सभासदांत तत्कालीन विद्वानापैकीं फार बडी बडी धेंडे होती. 'व्यक्ति तितक्या प्रकृति' या न्यायाने मतभेदाचे अनेक प्रसग उत्पन्न होत. त्या वेळी फारकरून मताधिक्याची प्रतिकूलताच देवेंद्रनाथांच्या नजरेस येई. अशा प्रसगापैकी धर्मप्रामाण्याच्या बखेड्याचा निकाल देवेंद्रनाथांनी कसाबसा लावला. परंतु धर्म आणि समाजनीति यांच्या सरहद्दीवरील कित्येक वादग्रस्त प्रश्न उपस्थित होत होते, तिकडे देवेंद्रनाथ आपले मन घालीनात. ब्रह्मोपासना आणि तीहि प्रायः एकांतिक हा एकच विषय त्यांच्या अत्यंत जिव्हाळ्याचा होऊन बसला होता. त्यानेच त्यांचे सारे अंतःकरण व्याप्त करून सोडले होते. देवेंद्रनाथांचे व्यवसाय फार मोठे, आणि त्यांचा विद्याव्यासंगही बहुविध प्रकारचा होता. तरी त्यांच्या दीर्घ आयुष्यांतील बहुतेक सर्वकाळ त्यांनीं जनसंमर्दापासून अलग अशा एकांत स्थळीं, ब्रह्मचिंतनाचे अनुपम आनंदांत घालविला, हे खरे.

देवेंद्रनाथांची ब्रह्मनिष्ठा त्यांच्या सर्वत्र सहकारी विद्वानांस सुलभ नव्हती. शिवाय ब्रह्मानुभवाबद्दल इतकी उत्कटता क्वचितच कोणाचे ठिकाणीं दिसून येते. यामुळे देवेंद्रनाथ आत्मचिंतनार्थ एकांतवास सेवूं लागले, म्हणजे कुटुंबांतील करारी कर्त्या पुरुषांच्या गैरहजिरींत इतरांस आपले आवडीचे व्यवसाय पहाण्यास जसे स्वातंत्र्य मिळतें, त्याप्रमाणे ब्राह्मसमाजाची स्थिति झाली असावी असे वाटतें. शिवाय ह्या वेळीं मतस्वातंत्र्याच्या ममूस प्रारंभ

झालेलाच होता. तेव्हां देवेंद्रनाथांच्या मतास योग्य तो मान देऊनही ब्राह्मसमाजाचें कार्यक्षेत्र बहुमताप्रमाणें वाढवितां येणें त्या वेळी अशक्य नव्हतें.

राजा राममोहन राय यांनीं धर्मकार्याप्रमाणें जें समाज-सुधारणेचें कार्य हातीं घेतलें; त्यांतील अतिशय महत्त्वाची सुधारणा म्हणजे सतीची चाल बंद पाडणें ही होय. ह्याप्रमाणें विधवांच्या जिवावरील एक आरंभीचें प्राण-संकट त्यांनीं दूर केल्यावर पुढें त्या विधवांच्या सुस्थितीबद्दल तजवीज लावणें हें एक तऱ्हेनें क्रमप्राप्तच कार्य होतें. विधवांस जीवदान दिलें, येथेंच तें कार्य संपलें नव्हतें; त्यांची पुढची तरतूद लावणें कित्येकांस अत्यंत आवश्यक वाटलें. क्वचित् एखादी बालविधवा तरुणपणच्या देहधर्मास वश होऊन दुराचारी पुरुषाच्या मोहास बळी पडावी, आणि ती गोष्ट उघडकीस आल्यामुळें जनतेनें तिचा अत्यंत छळ करावा, अशी हृदयद्रावक उदाहरणें मधून मधून घडत असत. चिताग्नीतून सोडविलेल्या त्या तरुणी, कामाग्नीत होरपळत राहून, अखेर जनतेच्या द्वेषाग्नीनें त्यांची राख होण्याचा दुर्घर प्रसंग कित्येक वेळां येई. अशा ह्या अनर्थपरंपरेस आळा घालण्याकरितां विधवा-विवाह व स्त्रीशिक्षण इत्यादि अबलोन्नतिकारक सुधारणांचे बंगाल्यांतील आद्य प्रवर्तक म्हटले तर पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर व बाबू शशिपाद बानर्जी हे होत.

पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर हे एक अलौकिक बुद्धिमान् पुरुष अव्वल इंग्रजींत बंगाल्यांत होऊन गेले. ह्यांचा जन्म इ. सन १८२० मध्यें विरसिंघ येथें झाला. त्यांची आई भगवती देवी हिचे पोटीं हे विद्वद्रत्न जन्मास येणार असें भाकीत तत्कालीन प्रसिद्ध ज्योतिषी भावानंद भट्टाचार्य ह्यांनीं केलें होतें. ईश्वरचंद्रांचे वडील रामजय यांसही साक्षात् तसा दृष्टान्त झाला होता. विद्यासागरांचे घरचें अठराविस्वे दारिद्र्य होतें. ईश्वरचंद्रांच्या वडिलांना दरमहा फक्त आठ रुपये पगार होता. अशा विपन्न स्थितीत असामान्य बुद्धिमत्ता व अविश्रांत उद्योग यांच्या जोरावर ते इतक्या मोठेपणास चढले कीं, तारानाथ तर्कवाचस्पतीसारख्यांनी त्यासंबधीं असे उद्गार काढले कीं " विद्यासागर तुमचा जयजयकार असो! तुम्ही मनुष्य नसून मानवदेहधारी ईश्वरच आहांत ! " मातृपितृसेवेंत ते एक पुंडलीकच होते. पूर्ववयांत घरांतील मोलकरणीचें, स्वयंपाक्याचें, वगैरे हरएक प्रकारचें हलकेंसलकें चटसारें काम ते

स्वतः करीत असत. रात्री १० ते १२ इतकीच काय ती त्यांना विश्रान्ति ठाऊक होती. पुढे मोठेपणी ते स्वतः जाडे संस्कृत पंडित झाले. संस्कृत अध्ययनाच्या कामीं तर ते परमप्रमाणात होते. त्यानीं लोकशिक्षणाच्या कामीं भगीरथ प्रयत्न केले. कलकत्त्याच्या संस्कृत कॉलेजातील संस्कृत शिक्षण द्विजेतरास देत नसत, तो निर्बंध ह्याच्या खटपटीनें दूर झाला. बंगाली भाषेत ग्रंथसंपत्ति निर्माण करून त्यानीं व अक्षयकुमार दत्त यानीं मातृभाषेस तेज चढविले. तत्त्वबोधिनी पत्राचे हे दोघेही संपादक होते हें वरती आलेंच आहे. आपल्या प्रांताच्या बाहेर खर्च करून यानीं मोफत शिक्षणाच्या शाळा काढल्या. आणि स्त्रीशिक्षणाच्या कामीं तर प्रसिद्ध असलेले मि० बेथ्यून याचे विद्यासागर उजवे हातच होते. तथापि याचे सर्वात मोठें कार्य, म्हणजे विधवा-विवाह व तज्जन्य संतति कायदेशीर ठरवून घेणें, हें होय. कलकत्त्याच्या हिंदुकॉलेजातील डेरोझिओप्रमाणे ह्या सुधारकानें संस्कृत कॉलेजात त्या काळीं मोठीच खळबळ उडवून दिली. त्यामुळे पंडित शिवनाथशास्त्री, पंडित योगेंद्रनाथ विद्याभूषण, असे कित्येक त्या वेळचे संस्कृत कॉलेजातील विद्यार्थी विधवाविवाहांचे कट्टे पुरस्कर्ते बनले. विद्यासागर महाशयानी इ. सन १८५६ साली बाबू राजकृष्ण बानर्जी यांच्या घरीं पहिला विधवाविवाह घडवून आणला. त्या वेळी पुनर्विवाहित दंपतीची मिरवणूक पाहण्यास सर्व कलकत्ता शहर लोटले होते. त्याच्या अंगच्या विद्वत्तेनें नसले, तरी या विवाहप्रसंगानें विद्यासागराचे नांव सर्वतोमुखी झाले. विद्यासागर चिरायु होवोत, अशा धन्योद्गारांच्या अक्षरांनी विणलेले कांठ स्त्रियांच्या लुगड्यांस कृतज्ञबुद्धीने झळकू लागले. ह्याप्रमाणे सौभाग्यवतींस वैधव्यसूचक आणि विधवांस पुनर्विवाहसंमतिसूचक अशी लुगडी तयार करण्यांत कोष्टयांकडून कांहींसा औचित्यभंग व्हावा, इतका त्यावेळीं ह्या विषयास ऊत आला होता ! ब्राह्म-पुढाऱ्यापैकीं पंडित शिवनाथशास्त्री, बाबू राजनारायण बोस इत्यादि कित्येक पुढाऱ्यांची त्यांस सक्रिय सहानुभूति होती.

एकदां एका विधवाविवाहप्रसंगीं विद्यासागरांचे एक स्नेही आपल्या नऊदहा वर्षांच्या मुलीस घेऊन त्यांचेकडे आले, आणि त्यानीं रीतीप्रमाणे विद्यासागरांस नमस्कार करण्यास मुलीला सांगितले. मुलीने नमस्कार केला, तेव्हां महाशयांनीं आशीर्वाद दिला की, "बाळे, तूं दीर्घायु होवोस, तुला

चांगला पति मिळो. पण तुला वैधव्य प्राप्त होऊन तुझा पुनर्विवाह करण्याची संधि मला मिळो !" असला हा विचित्र आशीर्वाद देऊन पंडितजी हंसत हंसत म्हणाले, की विधवाविवाहास आज जनता इतकी प्रतिकूल आहे कीं, माझ्या स्नेह्यांच्याच मुली जर विधवा न होतील तर माझी ही आवडती सुधारणा मला जगांत रूढ कशी करतां येईल ?

एकदां त्यांच्या कॉलेजांतील विद्यार्थी पंडित शिवनाथशास्त्री (ब्राह्मसमाजाचे प्रसिद्ध इतिहासकार) यांच्या मांडीवर लडिवाळपणे खेळत असलेली सातआठ वर्षांची एक सुंदर मुलगी त्यांनी पाहिली. ही कोण म्हणून त्यांस विचारतां विद्यासागर यांस समजले कीं, ती शेजारच्या न्हाव्याची मुलगी असून बिचारी बालविधवा आहे ! हे समजतांच त्या थोर पुरुषाच्या अंतःकरणास गहिंवर आला. त्यांच्या डोळ्यांत अश्रुबिंदु उभे राहिले. त्यांनी तिला लगेच उचलून आपल्या पोटाशी धरले. तिला आपल्या खर्चाने वेथ्यून स्कूलमध्ये घालण्याचे त्यांनी ठरविले आणि आपल्या आईचे भेटीस त्या मुलीला घेऊन येण्यासाठीं त्यांनी मुद्दाम तिच्या आईकडे मेणा पाठविला.

विद्यासागर यांचे अंतःकरण मेणाहून मृदु होते. पुनर्विवाहामुळे लोकांच्या छळास पात्र झालेल्या दंपतीला तो एक आसरा होता. ते परम मातृभक्त होते. इतके कीं, त्यांच्या आईचे पश्चात् तिचे स्मरण होण्यास यत्किंचितही निमित्त होतांच ते अगदीं उतारवयांतही लहान मुलाप्रमाणे रडूं लागत. कोणत्याही सबबीवर आईबापांचे अंतःकरण दुखावणे त्यांस आवडत नसे. आपल्या आईबापाचे मन दुखवून पंडित शिवनाथशास्त्री ब्राह्मसमाजी झाले ही गोष्ट त्यांस मुळींच आवडली नाहीं. स्वकीयांच्याबद्दलही कोमलवृत्ति महाराष्ट्रीय सुधारकांत न्या० रानडे यांच्या ठिकाणीं उत्कटपणें दिसून येते. ईश्वरचंद्रांनीं ज्यास आपलें म्हटलें त्यांसाठीं ते वाटेल ती तसदी घेत. एका शूद्राच्या मुलीवर त्यांचा बाळपणापासून लोभ असे. पुढें मोठेपणीं तिचे डोकें फिरलें आणि त्या वेडाचे भरांत, मी पंडितजीशिवाय कोणाच्याच हातचें जेवणार नाहीं, असा तिनें हट्ट धरला. तेव्हां पंडित विद्यासागर यांनी, आपले सर्व व्यवसाय संभाळून दोन वेळां तिचे घरीं जाऊन, तिला भरविण्याचें काम कित्येक दिवस चालविले होतें ! गरीब अनाथांस साह्य करण्याकरितां त्यांच्या पिशवीचें तोंड सदा मोकळें असे. त्या सुधारणेच्या चळवळींत त्यांनीं आपल्याला

पुष्कळ कर्ज करून घेतलें. त्यांस श्रीमंती कशी ती ठाऊक नसतां त्यांनीं आपल्या औदार्यानें श्रीमंतासही लाजविल्याची साक्ष बंगालचे सुप्रसिद्ध कवि मायकेल मधुसूदन दत्त हे देतात.

दत्तकवि म्हणतात कीं, विद्यासागर हे बुद्धि आणि शहाणपण यांत प्राचीन ऋषीप्रमाणे, उद्योगशीलतेत इंग्रजांप्रमाणे असून त्यांचे अंतःकरण बंगाली मातांप्रमाणे अत्यंत कोमल असे. विद्यासागराची सत्त्वसंपत्ति इतकी श्रेष्ठ प्रतीची होती कीं, त्यांस शोधीत श्रीरामकृष्ण परमहंसांसारखे सिद्धपुरुष त्यांच्या घरीं चालून आले, आणि त्यांनी, ज्ञान, कर्म, भक्ति, सगुणोपासना, द्वैताद्वैत इत्यादि धर्मातील सर्व महत्त्वाचे मुद्द्यांवर फारच थोडक्यांत, अत्यंत मार्मिक व सुबोध असे त्यांच्याजवळ विवेचन केले. श्रीरामकृष्ण परमहंस हे सत्पात्राचे शोधांत असत. ब्राह्मसमाजी मंडळीशीं त्यांचा फार जिव्हाळ्याचा संबंध असे. त्यांच्या खास शिष्यवर्गाच्या बाहेर त्यांनी ज्यांस बोधामृताचे आकंठपान करविले, त्यांत पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर आणि केशवचंद्र सेन हेच प्रामुख्यानें येतात. ईश्वरचंद्र विद्यासागर ब्राह्मसमाजाचे चिटणीसही कांहीं काळ होते असे म्हणतात. ते तत्त्वबोधिनी सभेचे चिटणीस आणि तत्त्वबोधिनीपत्रिकेचे एक उपसंपादक बरेच दिवस होते. पुढे केशवचंद्र प्रभृति तरुण मंडळीचे माहात्म्य ब्राह्मसमाजांत वाढत चालले, त्या वेळीं पंडित ईश्वरचंद्रानीं आपला समाजाशीं असलेला संबंध साफ सोडून दिला. इतकेच नव्हे तर त्यांनीं एक स्वतंत्र " उपासनासमाज " या नांवाची संस्था कांहीं मित्रांच्या साह्यानें अस्तित्वांत आणली. ह्यांनी विधवांच्या विवाहाकरितां जशी चळवळ केली, त्याचप्रमाणे विधवांची संख्या वाढविण्यास कारण जी बंगाल्यांतील बहुपत्नीकत्वपद्धति, ती कायद्यानें बंद करण्याकरितांही त्यांनी प्रचंड चळवळ केली. त्यांस यश आले नाहीं ही गोष्ट वेगळी. पुढें संमतिवयाच्या कायद्याच्या वेळीं मात्र ते पुराणमताचे अभिमानी म्हणून भांडत होते. त्यांचे म्हणणे, उष्णकटिबंधांत अल्प वयांतही ऋतु प्राप्त होण्याचा संभव असतो; आणि ऋतु प्राप्त झाल्यावर धर्मशास्त्राप्रमाणे व्हावयाचे ते सर्व संस्कार झालेच पाहिजेत, त्यास कायद्याने बंधन घालणें योग्य होणार नाहीं.

पंडित ईश्वरचंद्र यांचे सर्व तरुणपण युरोपियन सिव्हिलिअन्स यांचेच सहवासांत गेले. ते व्हॉईसराय लॉर्ड हार्डिंज (पहिले) यांचे मसलतगार

होते. याप्रमाणें सहेयांशीं जरी त्याचे चांगले सलोख्याचे नाते होते, तरी खिस्ती मिशनऱ्यांची लुडबुड त्यास मुळींच पसंत नव्हती असे दिसते.. ते त्याची मनापासून कुचेष्टाच करीत.

ह्या काळचे दुसरे एक कट्टे समाजसुधारक म्हणजे शशिपाद बानर्जी हे होत. ह्याचा जन्म इ. सन १८४० सालीं बडानगर येथील एका कुलीन ब्राह्मणकुलांत झाला. ह्यांचे वडील राजकुमार मास्तर या नावानें प्रसिद्ध होते. कलकत्त्यांतील पहिल्या इंग्रजी शाळेच्या संस्थापकांपैकीं ते एक होते. ते वारले तेव्हा शशिपाद अवघे पाच वर्षांचे होते. त्यांची आई त्या काळच्या स्त्रियांप्रमाणे निरक्षर तर खरीच पण मोठी समंजस व व्यवहारदक्ष होती. शशिपाद ह्यांनी सामाजिक सुधारणाची इतकी विविध कार्ये केली आहेत, कीं ह्या त्याच्या लोकसेवेबद्दल कित्येक पंडितांनी त्यांस " सेवाव्रत " ही पदवी दिली. शशिपाद बाबू हे मजूरवर्गाचे मोठेच पुरस्कर्ते होते. त्यांच्या प्रांतातील मजूरवर्गाकरिता त्यांनी रात्रीच्या शाळा काढल्या. मद्यपाननिषेध, काटकसर, इत्यादि गोष्टी त्यास शिकविण्याकरितां मॅजिकलॅन्टर्नच्या साह्यानें व्याख्यानमाला सुरू केल्या. 'भारतश्रमजीवी' आणि 'बडानगर समाचार' इत्यादि वर्तमानपत्रे सुरू केली. मजुराच्या कामाच्या तासाचे सरकारात खटपट करून नियमन केले. लवकरच ते मजूरवर्गास प्रिय झाले. ते लोक त्यांस प्रेमादरानें 'आमचे बाबा' असे म्हणत असत. गरीब मजूरवर्गाबद्दल त्यांच्या ठिकाणी अत्यंत आस्था व कळकळ असे. त्याच्या आजारीपणांत त्यांस दवापाणी देऊन, आनंदाच्या प्रसंगीं त्यांस मेवामिठाई वांटून, अंत्यजांचे भजनी मंडळ्यांतही सामील होऊन, ते गरिबांचे एक वाली झाले होते. धर्मानें ते कट्टे ब्राह्म होते. त्यांनीं जातिनिर्बंध सोडले होते. तसे केल्यावांचून खालच्या वर्गाचा उद्धार करतां येणार नाहीं, असा त्यांचा निश्चय होता. एकदां एका झोपड्यांत एक मूल रडत असतांना त्यांनीं ऐकले. त्या मुलाचे आईबाप पोटाकरितां मजुरीवर गेलीं होतीं. शशिपादांनीं लगेच त्या मुलास कडेवर घेतलें, आणि त्याच्या आईबापांचा शोध करून तें जेव्हां त्याच्या स्वाधीन केले, तेव्हां त्यांस बरे वाटलें. एकोणिसाव्या शतकांत गरीब अनाथ मजूरवर्गाची दाद घेणारा हिंदुस्थानांतील हा पहिलाच परोपकारी पुरुष होय.

त्या काळीं पाश्चात्यांचे संसर्गानें बंगाल्यांत मद्यपानास ऊत आला होता.

ह्या बाबतींत विशेषेकरून सुशिक्षितांची स्थिति अत्यंत लज्जास्पद झाली होती. त्या व्यसनास आळा घालण्यासाठीं शशिपाद बाबूंनी फार परिश्रम घेतले. त्यांनी कित्येक तरुणांस दारूच्या खाईतून सोडविले व कांहीं मद्य-पानालयाचे आपल्या वजनाने व उपदेशाने वाचनालयात रूपांतर घडवून आणले. ह्याप्रमाणे शशिपाद बाबूंची सर्वच परोपकारी कृत्ये येथे सांगणे अप्रस्तुत होईल. शिवाय ह्यापैकीं कित्येक गोष्टी कालानुक्रमाने ह्या पुढच्या आहेत. तथापि त्यांच्या सर्वांत आवडत्या सुधारणेबद्दल येथे थोडी माहिती देणे जरूर आहे. ती सुधारणा म्हणजे अबलोन्नति ही होय. ह्या सुधारणेला प्रारंभ त्यांनी आपल्या घरीच केला. एका अगदी जुन्या चालीच्या घराण्यां-तील अगदी अल्पवयी व निरक्षर अशा कुमारिकेशीं त्यांनी आपला पहिला विवाह केला होता. पण आपल्या कुटुंबाने समाजोन्नतीच्या कार्यांत सहकारी व्हावे ही त्यांची महत्त्वाकांक्षा प्रथमपासून होती. परंतु झनान्याचे चालीमुळे स्वताच्या बायकोशी दिवसाचे बोलण्याचीही पंचाईत, मग शिक्षण कसे द्यावे, अशी अडचण होती. पण तीस न जुमानता त्यांनीं आपल्या बायकोस शिक्षण देण्यास सुरुवात केली. अर्थात् घरच्या मंडळीकडून छळ व कुचेष्टा ह्यास सुरुवात झाली. ती हकीकत वाचीत असतां श्रीमती रमाबाई रानडे ह्यांच्या आठवणींची आठवण होते.

या उभयतांनी आपल्या सौजन्याने व अंगीकृत कार्याच्या उत्साहाने, कुटुंबांतील व जवळच्या नातेवाईकांतील जुन्या चालीच्या स्त्रियांत, मतपरि-वर्तन घडवून आणले. हळुहळू नातेवाईक व ओळखीच्या मुलींची खासगी शाळा सुरू झाली. असे होता होता स्त्रियांत शिक्षणप्रसार हळुहळू सुरू झाला. त्या कामीं त्यांस जनतेकडून अतिशय विरोध व छळ सोसावा लागला. मुलींनीं शिकायला यावे म्हणून त्यांनी कोणास शिधा तर कोणास बक्षिसे देऊं केली. त्या वेळी ख्रिस्ती मिशनऱ्याकडून स्त्रीशिक्षणाचे जरी प्रयत्न होत होते, तरी स्त्री-शिक्षण म्हणजे नवरा मेल्यावरची पोट भरण्याची तजवीज, असे त्याचे अमंगल लक्षण करण्यात येई. तसेच मुली शिकल्या म्हणजे त्या चवचाल होतात व नवऱ्याच्या कह्यांत रहात नाहीत, असा लोकांचा समज होता.

शशिबाबूंनीं स्त्रियांच्या माहितीकरितां एक फिरती लायब्ररी व 'अंतःपुर'

या नांवाचें केवळ स्त्रियांनींच चालवावयाचें असे मासिक सुरू केलें. त्यांच्या मुली उषाबाला, बनलता व इंदूबाला यांस त्यांनीं चांगले सुशिक्षित केलें होतें. अंतःपुराचे संपादकत्व ह्यांचेकडेच होते. परंतु या सुशिक्षित मुली फार दिवस जगल्या नाहींत. हाही शिक्षणाचाच एक अप्रत्यक्ष परिणाम कीं काय न कळे! शशिबाबूंची पहिली बालविवाहित बायको मूळची निरक्षर होती, तरी पतिनिष्ठेच्या जोरावर तिने त्यांच्याबरोबर शिक्षणसंस्था चालवून ब्राह्मसमाजांत जाऊनही उत्कृष्ट सहकार्य केलें. ते इतकें कीं, ती मरतांच शशिबाबूंनीं लगेच दुसऱ्या एका विधवेशीं पुनर्विवाह करावा, हे त्या साध्वीच्या पुण्यस्मरणास वैगुण्य आणणारे वाटते. मग एका अनाथ झालेल्या विधवेस सनाथ करण्याची आलेली संधि वायां दवडणे त्यांस बरे वाटले नसल्यास नकळे. किंवा कदाचित् त्यांच्या पहिल्या बायकोचीं मरणसमयींची तशी इच्छाही असूं शकेल.

विधवांचे कैवारी हें शशिबाबूंचे विशिष्ट गुणवर्णन होईल. त्यासही प्रारंभ त्यांनीं आपल्या घरीच केला. त्यांच्या चुलतबहिणीची मुलगी कुसुम हिचा विवाह पांचव्या वर्षीं होऊन ती दुर्दैवाने एक वर्षाच्या आंतच विधवा झाली होती. ते त्यांच्या कोमल अंतःकरणांत मोठें शल्य झाले होते. शिवाय ते आठ वर्षांचे असतां एका बालविधवेचे पाऊल वांकडे पडल्यामुळे तिचा कसा अमानुष छळ करण्यांत आला, व त्यापायीं तिने आपल्या जिवाचा कसा शेवट करून घेतला ते चित्र त्यांच्या नजरेसमोर होते. यामुळे विधवांच्या पुनर्विवाहाचा कायदा पसार झाला तेव्हां त्यांना फार आनंद झाला. आणि त्यांनीं आपल्या कुसुमचा पुनर्विवाह करण्याचे ठरवून, पुढे पुनर्विवाहच काय, पण एका वैश्य जातीच्या पुरुषाशीं तिचा प्रतिलोम विवाह त्यांनी लावून दिला. त्या पायीं त्यांचा अमानुष छळ झाला. त्यांच्या घरावर गांवकऱ्यांनीं दगडांचा वर्षाव केला व त्यांच्या घराच्या खिडक्या व दरवाजे फोडले. कुसुम व तिची आई यांना बनारस येथे पळवून नेऊन त्यांस एका घरांत कोंडून ठेवलें. पण या सर्व विरोधांतून ते धिम्मेपणाने पार पडले. आणि त्यांच्या एका कुसुमचाच काय, पण चांगल्या संभावित अशा तीस-पसतीस कुटुंबांतील विधवांचे त्यांनीं पुनर्विवाह लावले. आणि पुढें महाराष्ट्रांतील शारदासदन, सेवासदन, अनाथ बालिकाश्रम इत्यादि संस्थांस नमुन्यादाखल होणारी अशी एक विधवा-साहाय्यक संस्था निर्माण केली.

तात्पर्य "फादरहुड ऑफ गॉड अॅंड ब्रदरहुड ऑफ मॅन" ईश्वर जनक, मानव हे बंधु। ह्या एकेश्वरी पंथाचे ब्रीदवाक्यांपैकीं, ईश्वर-जनकत्व (फादरहुड ऑफ गॉड) ह्यात, ईश्वरोपासनेचे स्वरूप येऊन (ब्रदरहुड ऑफ मॅन) ह्यांत स्त्रीपुरुष आणि भिन्न जाति व वर्ण यातील भेद नाहींसे करणे त्यांचा अंतर्भाव करावा असे मनात येऊन कित्येक ब्राह्म-समाजी मंडळी झटून ह्या कार्यास लागली. किंबहुना असेही म्हणतां येईल कीं, ईश्वरोपासनेच्या पहिल्या कार्यापेक्षा समाजोन्नतीचे दुसरे कार्य तत्कालीन तरुण सुशिक्षितास अधिक सुलभ, व्यवहार्य व चित्ताकर्षक असे वाटू लागले. शिवाय असे कीं, विदेशीय लोकांनी हिंदुस्थानांत हा हां म्हणतां जो मायेचा बाजार सुरू केला, तो पाहण्यास आपल्याबरोबर आपल्या धर्मपत्नीनें, अथवा आपल्या लेकीबहिणींनीं पडद्यांतून बाहेर यावें व जगाचे पुस्तकातील उलटलेल्या नवीन पानावरील मौजा पाहण्यास व वाचण्यास शिकावें असे सुशिक्षितास वाटणे स्वाभाविक होतें. मिस मेरी कार्पेंटरसारख्या विदेशी आणि विदुषी प्रौढ कुमारिका, मोकळेपणानें हातांत हात घालून हिंडणारीं साहेबमडमाचीं जोडपी, आपल्या इकडील दैन्याचा वाराही न लागलेल्या त्यांच्यांतील पुनर्विवाहित विधवा अशा प्रकारचे अदृष्टपूर्व चित्र त्याच्या डोळ्यासमोर होतें. आणि आमची सुधारणा करण्याच्या प्रामाणिक हेतूनीं असो, अगर आमचा आत्मविश्वास आणि स्वाभिमान ह्यांस पुरे खच्ची करण्याच्या प्रच्छन्न दुष्ट हेतूनी असो, आमचा धर्म व चालीरीति यांतील बिंग काढण्यांत कित्येक हलके मिशनरी, व जाडे प्राच्यविद्याविशारद, काक-दृष्टीने निंदकाचे व बुद्धिभेदाचे काम करीत होते. अशामुळे ब्रह्मोपासना हा एक औपचारिक प्रकार, पण खरें जिव्हाळ्याचे कार्य म्हणजे अबलोन्नति व जातिनिरसन यांसारख्या सुधारणा, असा कित्येक ब्राह्माचे अंतःकरणात पालट पडत गेला असल्यास नवल काय!

## प्रकरण नववें

# मतभेद व दुफळी

सामाजिक सुधारणांस ब्राह्मसमाजांत मिळत चाललेले प्राधान्य जसें मतभेदास कारण झाले, तसेंच अधिकारसूत्रे कोणाच्या हातीं रहावी, हाही मतभेदाचा दुसरा एक महत्त्वाचा मुद्दा होता. केशवचंद्रांसारखे कित्येक उत्साही तरुण आपले सारे आयुष्य ब्राह्मसमाजाकरितां खर्ची घालण्यास तयार झाले. केशवचंद्राच्या मागून त्याचा स्नेही विजयकृष्ण गोस्वामी, हा खास चैतन्याच्या वैष्णवसंप्रदायापैकी एक अत्यंत उत्साही तरुण, मेडिकल कॉलेजांतील आपला अभ्यास सोडून ब्राह्मसमाजांत सामील झाला व लवकरच त्यानें सुधारणेची प्रचंड चळवळ सुरू केली. त्याच्या अनुकरणानें बाबू आनंदप्रसाद चतर्जी, अघोरनाथ गुप्त, उमानाथ गुप्त, महेंद्रनाथ बोस, जदुनाथ चक्रवर्ती वगैरे अनेक तरुण, उत्साहानें ब्राह्मसमाजांत सामील झाले. केशवचंद्र सेनांच्या सैन्यांतील बिनीचे सरदार ते हेच होत. केशवचंद्र हे आचार्यपदारूढ होतांच ह्या मंडळीसही मोठा उत्साह व जोम आला. त्यांनी जातिबंधनें कमी करण्यास झपाट्यानें सुरुवात केली. प्रथम त्यांनीं आपल्याचपैकीं एकास कनिष्ठ शूद्र जातींतील एका मुलीशीं विवाहास तयार केले. नंतर विजयकृष्ण गोस्वामी ह्यांनी जेसूर जिल्ह्यांत आपला दौरा फिरवून त्या प्रांतांतील मागे सांगितलेल्या पीराल्ली नामक पतित ब्राह्मणजातींतील वीस-पंचवीस कुटुंबांस ब्राह्मदीक्षा देऊन त्यास समाजांत सामील करून घेतले.

त्याच सुमारास मुंबईचे अव्वल इंग्रजींतील सुप्रसिद्ध डॉक्टर भाऊ दाजी हे कलकत्त्यास गेले होते. ते एकदा ब्राह्मोपासनेस हजर होते. तेथील एकंदर प्रकार पाहून त्यांनीं असे सुचविले, कीं ब्राह्मसमाजानें बौद्ध भिक्षूंप्रमाणे ध्यानधारणेवर सर्व भार टाकावा आणि प्रत्यक्ष परोपकारी कृत्यें करण्याकडे विशेष लक्ष ठेवूं नये, हें बरे दिसत नाहीं. मग त्यांच्याच सूचनेवरून एकेश्वरी मित्रसमाज (Society of Theistic friends) नामक एक संस्था केशवचंद्रांनीं स्थापन केली. आणि अबलोन्नतीचा प्रश्न त्यांनीं प्रथम

हातीं घेतला. त्या काळचे तरुण ब्राह्म म्हणजे एक प्रचंड शक्ति होती. त्यांच्यापुढे जे काम ठेवावे त्यांत ते मोठ्या उत्साहाने खटपट करीत. असा त्यांचा उ साह पाहून देवेंद्रनाथांस त्यांस हळुहळू अधिकारदानही करणे भाग झाले. विजयकृष्ण हे ब्राह्मसमाजाचे अधिकृत प्रचारक झाले. केशवचंद्र हे चिटणीस व प्रतापचंद्र दुय्यम चिटणीस झाले, शिवाय तत्त्वबोधिनी मासिकेचें संपादकत्व पंडित आनंदचंद्र वेदांतवागीश यांचेकडे होते, तेही प्रतापचंद्र मुजुमदार यांच्या हाती गेले. अद्याप ब्राह्मसमाजांत जुन्या मंडळीचेंच मताधिक्य होते. अशा स्थितीत देवेंद्रनाथांनी नवीन तरुणाचे माजविलेले स्तोम जुन्या मंडळींस आवडले नाहीं. आणि पंडित अक्षयकुमार यांच्या पक्षांतील कित्येक मंडळी समाजातून बाहेर पडून त्यानी पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर याच्या साह्याने " उपासनासमाज " नामक स्वतंत्र संस्था निर्माण केली.

ज्यास जे पटले त्याप्रमाणे त्याने वागून दाखवावे हा नवीन होतकरू मंडळीचा विशेष बाणा होता. पूर्वसंस्काराचे बंधन वृद्धांपेक्षां तरुणांत कमी, आणि सामान्य हिंदुसमाजाच्या नियंत्रणाची भीड तरुणांपेक्षां वृद्धांत जास्त, यामुळे वृद्ध-तरुणपक्षांच्या आचारांत स्पष्ट फरक दिसूं लागला. विचाराप्रमाणे आचार हेंच तरुणांचे ब्रीदवाक्य झाले होते. त्यामुळे कित्येक इभ्रतदार व खानदानीच्या ब्राह्मण-कुटुंबांतील तरुणांनी भराभर यज्ञोपवीताचा त्याग करून मूर्तिपूजेचा जोराने निषेध आरंभिला. ह्याची प्रतिक्रिया म्हणून तरुणांची ही धर्मबाह्य चळवळ मूळांतच उखडून काढण्याचे जुन्या पक्षानेही मनावर घेतले. विजयकृष्ण गोस्वामी जेथे जेथे जात, तेथे तेथे प्रचंड उत्साह आणि अनान्वित छळ हें क्रिया प्रतिक्रियारूप दृश्य पहाण्यास सांपडे. धर्मरक्षकांच्या जाचाने समाजाची चळवळ न थांबतां उलट तिने सर्व जनतेंचे लक्ष आपल्याकडे ओढून घेतले. निस्सीम स्वार्थत्याग हा कोणासही लोकादरास पात्र करितो. मग तो स्वार्थत्याग कशासाठीं आहे याची चिकित्सा फारसे कोणी करीत बसत नाहींत. त्यावेळची तरुणांची वृत्ति अंशतः अविचारमूलक होती असे मानले, तरी त्यांचा स्वार्थत्याग आणि उत्साह निःसंशय प्रशंसनीय होता. ब्राह्मसमाजाचे एक प्रच्छन्न शत्रु डॉ० डफ ह्यांनींही येथून शेवटचे प्रयाण करितांना ब्राह्मसमाज ही एक असामान्य शक्ति आहे असें बोलून दाखविले. बाबू राजनारायण बोस, विजयकृष्ण गोस्वामी, अघोरनाथ गुप्त, असे कित्येक

ब्राह्म मोठे परोपकारी व साधुवृत्तीचे होते. ह्यामुळें ते जात तेथे त्यांचे वजन पडे आणि हेच जेव्हां हिंदुसंस्कारांचे रूपांतर ब्राह्मसंस्कारांत करण्यास झटून पडत, तेव्हा लोकातही मोठी खळबळ उडून जाई. बाबू राजनारायण यांनीं आपल्या मुलीचा विवाह ब्राह्मविधीप्रमाणेच केला. गोविंदपूर येथे कोणी एकाने आपल्या वडिलाचे श्राद्ध ब्राह्मविधीने केल्यावरून त्याचा अमानुष छळ झाला. आणि अखेर इ० सन १८६४ साली नवीन ब्राह्मसमाजी मंडळींनीं आणखी एक जो विवाह घडवून आणला, त्यात ब्राह्मविवाह, विधवा-विवाह आणि तोही मिश्रविवाह (भिन्न जातीतील) असा तिहेरी सुधारणेचा वार उडविल्यामुळे समाजाच्या बाहेरच नव्हे तर समाजाच्या आतही मोठाच धक्का बसला. आणखी ह्यातच विजयकृष्ण याच्या जोराच्या तक्रारी-वरून, ब्राह्मसमाजात यज्ञोपवीत धारण करणारे जे पक्राशी प्रभृति जुने आचार्य होते, त्यास आचार्यपदावरून दूर करून, जानवीं टाकलेले विजय-कृष्ण व आनंदप्रसाद याची त्या ठिकाणी नेमणूक झाली. त्याबरोबर समाजातील जुना पक्ष फारच खवळला, आणि त्यानी देवेंद्रनाथावर आपले वजन टाकून नवीन पक्षास पुन्हा अधिकारच्युत केले, व समाजनियंत्रण सर्वस्वीं आपल्या हातीं घेतले. ह्याच सुमारास तरुण मंडळीनी आपली प्रतिनिधि-संस्था नामक एक पक्ष निर्माण करून जुन्या पक्षांतील कलकत्तेकर बड्या धेंडावर बाहेरचा मताधिक्याचा दाब टाकण्याकरिता त्यानी धर्म-प्रसाराचें काम नुसते बंगाल्यातच नव्हे तर बंगालच्या बाहेर मुंबई, मद्रास वगैरे ठिकाणीं जोराने सुरू केले. आणि ठिकठिकाणी आपल्या मताच्या समाजसंस्था निर्माण केल्या. केशवचंद्रांची मुंबईस पहिली भेट ह्याच वेळी झाली.

नव्या-जुन्या मंडळींच्या विचारांतील अंतर उत्तरोत्तर वाढत चालले होते. इंग्रजी शिक्षणसंस्कारामुळे सुशिक्षितांनीं हिंदुधर्माशीं कधींच फारकत करून टाकली होती. इतकेच नव्हे तर केशवचंद्रांच्याप्रमाणे ख्रिस्तीधर्माचे संस्कारही त्याच्या ठिकाणीं दृढमूल झाले होते. ब्राह्मधर्मावरील संस्कृत उप-निषदादि ग्रथांची छाप त्यांस पसंत नव्हती. ब्राह्मधर्माचे सांप्रदायिक आवरण दूर करून तो सर्वांसच सुलभ व सुबोध होईल, असा साधा प्राकृत धर्म करण्याकडे त्यांचा कटाक्ष होता. राजा राममोहनराय यांच्या धर्ममतांवर जी हिंदुधर्माची छाया आहे. त्यांतून ते बाहेर पडण्यास पहात होते. पूर्वीच्यास

चिकटून न राहणें हे धर्मसुधारकांचे लक्षणच आहे, आणि ते त्यांस भूषणावह आहे, असें ते मानीत; आणि अशा रीतीने राजा राममोहन यांच्या व ह्याच्या मतांतील विरोधाचा परिहार करीत. धर्मविचाराप्रमाणें आचारांतही ह्याची धाव फार जोराची होती. सुधारणेसाठी ते इतके उतावीळ झाले होते, की फार लांबवर गोष्टीचा विचार करीत बसण्याइतका त्यास धीर व विवेक नव्हता. उलटपक्षीं जुना पक्ष कालाच्या ओघाबरोबर दोन पावलेही पुढे जाण्यास तयार नव्हता. अशा ह्या दोन परस्पर भिन्न पक्षातील, सध्यां काहीं काळ तरी, जुळविणारा दुवा म्हटला म्हणजे देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन ही जोडी होय. दोघेही एकमेकांची योग्यता ओळखून होते. केशवचंद्रांच्या पक्षाचे पुढारलेले विचार देवेंद्रनाथास बिलकुल पसत नव्हते. ब्राह्मसमाजानें समाजसुधारणेत लक्ष घालू नये, समाजसुधारणा व्यक्तिस्वातंत्र्यावर ठेवावी, असे त्याचें मत होते. विधवाविवाह, मिश्रविवाह इत्यादि सुधारणास ते मुळींच अनुकूल नव्हते. केशवचद्राचे खिस्तीसस्कार तर बिभीषिकेप्रमाणे ब्राह्मसमाजास ग्रासून नाहींसे करतील, असे त्याचे स्पष्ट भाकीत होते. देवेंद्रनाथाच्या थोरपणाची छाप केशवचंद्रास अगदींच झुगारता येईना. दोघेही फूट पडूं नये म्हणून झटत होते. त्यासाठीच देवेंद्रनाथानीं नवीन पक्षास मतभेद विसरूनही उत्तेजन दिले. तथापि हे एक्य पुढे टिकलें नाही. तरुणाचे चालीनें वृद्ध कधींच चालू शकत नाहींत, यामुळे केशवचंद्राच्या नव्या व देवेंद्रनाथाच्या जुन्या पक्षांत हळुहळू फूट वाढतच चालली. केशवचंद्र सेनानी आपल्या पक्षाच्या मतप्रतिपादनासाठीं 'इंडियन मिरर' पत्र मोठ्या कारवाईने आपल्या ताब्यांत घेतले, आणि त्या पत्रांतून त्याचा पुरस्कर्ता देवेंद्रनाथ याचेवरही झोड उठविण्यास मागेपुढें पाहिले नाही. पुरुषाप्रमाणे स्त्रियाचा एक ब्राह्मिकासमाज त्यांनीं स्थापन केला. कुलीन घराण्यांतील कित्येक स्त्रियाना त्यांच्या पूर्वापारच्या गोषांतून काढून, केशवचंद्र सेनानी त्यास एक दिवस काहीं युरोपियन मित्रांच्या भेटीसाठीं एका खिस्ती मिशनऱ्याच्या घरी नेले. यामुळें जुना पक्ष खवळून गेला, आणि उलट नवा तरुण पक्ष तर ह्यापुढेही पाऊल टाकण्यासाठीं उतावीळ झाला. त्यांचे म्हणणे पुरुषांप्रमाणे स्त्रियांस पूर्ण स्वातंत्र्य दिले पाहिजे. त्यांस आपल्या बरोबरीने वागविले पाहिजे. त्या वेळीं खुद्द केशवचंद्र सेनांचे विचारही पूर्वसंस्कारग्रस्त असल्यामुळें

इतके पुढे गेलेले नव्हते. परंतु त्यांनींच निर्माण केलेल्या नवीन पक्षास त्यांस पुढे आंवरून धरितां आले नाहीं. ब्राह्मसमाजात अजूनही आचार व विचार त्यांत असावा तसा मेळ नव्हता. कित्येक सुधारकी ब्राह्मांच्या घरचे आचार जुन्या पद्धतीनेच चालू होते. ही गोष्ट नवीन धाडसी मंडळीस रुचेना. त्यानी मुख्य आचार्य देवेंद्रनाथ ह्यांस स्पष्ट कळाविले कीं, ब्राह्मसमाजातील आचार्य, उपाचार्य, अध्येता इत्यादि अधिकाऱ्यानी जातिपंथ-निदर्शक कोणतीही चिन्हे धारण करता कामा नये. तसे न होईल तर नव्या विचाराच्य मंडळीस प्रार्थनेस वेगळा स्वतंत्र दिवस द्यावा लागेल. केशव-चद्र सेनप्रभृति नवीन मंडळीच्या विचारांबद्दल देवेंद्रनाथाच्या ठिकाणी जरी सहानुभूति वसत होती, तरी त्याच्या मोहास वश होऊन, जुन्या सहकारी मित्र-मंडळीची मने दुखविणे त्यास योग्य वाटले नाही. त्यांनीं नवीन पक्षाचे म्हणणे मान्य केले नाही. तेव्हा येथून मतभेदास आणि पंथभेदास सुरुवात झाली. देवेंद्रनाथ समाजाचे ट्रस्टी असल्यामुळे संस्था आपल्या ताब्यांत घेणे केशव-चंद्र सेनास शक्य नव्हते. तेव्हा केशवचद्र व त्यांचे सहकारी ह्यांनी ब्राह्मधर्म-प्रसाराचे कार्य हाती घेतले. आणि अनेक लेख व व्याख्याने ह्यांच्या द्वारे आपल्या विशिष्ट धर्मविचाराचा फैलाव त्यांनी सुरू केला. त्याचे दिग्दर्शन थोडसे पुढे केले आहे.

त्यानीं सत्यनिष्ठा True Faith ह्या नांवाचे सुप्रसिद्ध पुस्तक प्रसिद्ध केले. या पुस्तकात साधक-बाधक विवेचनपद्धतीला (Prudence) पढत-मूर्खांचे हिशेबी वागणे (arithmetic of fools) असे म्हटले आहे. कारण खरी निष्ठा उद्यांचा विचार करीत नाही. भावी काळचे तरतुदीचे धोरण ठेवणे म्हणजे ईश्वरावर निष्ठा नसल्याप्रमाणेच आहे. पुढचा मागचा विचार न करितां ईश्वरावर पूर्णपणे विसंबणे ही खरी निष्ठा, असे त्यांचे म्हणणे आहे. अशा प्रकारच्या निर्वावत भावावर केशवचंद्रांचा विशेष भर असे. निष्ठा ही एकच मनुष्यास तारक आहे असे ते म्हणत. निष्ठेने भगवन्नाम घेत गेल्यास त्या नांवांत दिव्यशक्ति उत्पन्न होते. उलट श्रद्धेवांचून जपतप वगैरे कोणतीही क्रिया फोल आहे, असे त्यांच्या सांगण्यांतील तात्पर्य आहे. ईश्वरासंबधीं नुसता आस्तिक्यभाव असणे ही खरी निष्ठा नव्हे. ईश्वर अगदीं आपल्या सन्निध आहे, नव्हे तो आपले अंतरीं विराजमान असून उलट आपणही त्याच्याच पोटांत

सामावलों आहों. तो आपल्याला सदा अंतर्बाह्य व्यापून आहे, एक निमिषमात्रही दूर नाहीं, अशी जी मनाची निःसंदेह श्रद्धा, तीच निष्ठा होय. आणि ईश्वराच्या अस्तित्वाचा वास्तविक तोच एक निःसंशय पुरावा होय. सत्यनिष्ठेची व्याख्या करावयाची, तर ती अदृष्टाची साक्ष व मुमुक्षूची महत्त्वाकांक्षा होय, असें म्हणतां येईल. निष्ठा हा प्रत्यक्षाचा पुरावा आहे. निगमआगम, इतिहास, पुराणे, तसेंच योग, समाधि, यापैकीं कशाचाच आधार न घेता ही निष्ठा सात्त्विक 'अहं' या वृत्तींतच पोसली जाते, प्राणापेक्षाही प्रिय अशा परमपुरुषाची जोड ती करून देते. परमेश्वर हा येथे आताही आहे असें ती प्रत्यक्ष दाखविते. आत्म्याचें अमृतत्व केवळ निष्ठेनेंच सिद्ध होतें. क्षुद्र पामर जीवानें आपल्या शहाणपणाच्या व सामर्थ्याच्या जोरावर साधनांच्या उतरंडी रचून मोक्ष मिळवूं पहाणें, हेंच तें पढतमूर्खाचें गणित, असें केशवचंद्र म्हणत. ईश्वरासंबंधी खरी निष्ठा असेल तर त्या योगानें एखाद्या अजाण लंगोट्याचाही उद्धार होईल. ती निष्ठा नसेल तर पंडिताचें सर्व शहाणपण व्यर्थ आहे. निष्ठा हा जीवात्म्याचा नेत्र आहे. त्या नेत्रानें ईश्वराचें साक्षात् दर्शन झालें पाहिजे. नुसतें ईशतत्त्व बुद्धिग्राह्य होऊन उपयोगी नाहीं. आत्म्याचें अमृतत्व चित्ताचें पावित्र्य आणि ईश्वराचें सान्निध्य, हे निष्ठेचे मुख्य प्रकार आहेत. येथें निष्ठा हेंच शहाणपण, निष्ठा हीच शक्ति, निष्ठा हेंच साधनांचें सर्वस्व होय. ज्यास संकल्प-विकल्पात्मक मन म्हणतात, ज्यास सारासार बुद्धि म्हणतात, ती निष्ठेची कसोटी नव्हे. ज्या चित्तास अशुद्ध विचार शिवणारच नाहीत, असें जें अत्यंत पवित्र अंतःकरण, तीच सत्यनिष्ठेची कसोटी होय. अनुतापानें शुद्ध झालेल्या मनानें ईश्वराशीं अनन्यगतिक होणें, हेंच निष्ठेचें स्वरूप. ह्यासाठीं केशवचंद्र सेन, आपले निरनिराळे लेख व व्याख्यानें यांच्याद्वारें आपल्या देशबांधवांस असें सांगतात, की आपला उद्धार व्हावा अशी इच्छा असेल, तर एक सत्यनिष्ठ व्हा

इ. सन १८६६ च्या मे महिन्यांत केशवचंद्राचें 'जीजस ख्राईस्ट—आशिया व युरोप' या विषयावर एक बरेंच वाजलें गाजलेलें असें व्याख्यान झालें. ह्यांत ख्रिस्त, ख्रिस्ती मिशनरी व ख्रिस्ती राज्यकर्ते यांच्यासंबंधीं यथास्थित गौरव, व स्वदेश, स्वधर्म व स्वबांधव ह्यांच्यासंबंधीं अनादर, ठिकठिकाणीं दिसून येतो. जीजस ख्राईस्टाचें माहात्म्य आपल्या देशबांधवांस पटलें नाहीं, तें पटावें

व त्याच्या धर्माचा सर्व जगभर प्रसार व्हावा, असा ह्या व्याख्यानांत अत्यंत कळकळीने उपदेश केला आहे, व हेच काम हिंदुस्थानांत करणाऱ्या खिस्ती पाद्र्यांचे परोपरीने गोडवे गायिले आहेत. त्यांच्या हिंदुस्थानातील अविश्रांत उद्योगाचा आढावा देतांना केशवचंद्र म्हणतात, त्याचा सारांश असा:— "सिरामपूरचे सुप्रसिद्ध पाद्री कॅरे व मार्शमन हे हिंदुस्थानांत आल्यापासून त्यांच्या पद्धतशीर उद्योगास विलक्षण यश येऊ लागले. आपल्या देशांत बाटलेल्या लोकांची सख्या आज दीड लाखावर गेली आहे. आज एकंदर बत्तीस मिशन संस्था हे काम करीत आहेत. त्यांपैकी बारा ब्रिटिश आहेत. सुमारे पांचशे सव्वापांचशे पाद्रीलोक मिशनचे काम येथे करीत असून त्यासाठीं त्यांचा सालीना खर्च अडीच लाख पौंड आहे...." असा खिस्ती मिशनचा इतिहास सांगितल्यावर पुढे केशवचंद्र सेन म्हणतात:—" अशा त्या अत्यंत निःस्वार्थी, परोपकारी व उदारमनस्क खिस्तानुयायांनीं आमच्या देशांत जी अनेक थोर परोपकाराची कृत्ये केलीं व आमची बौद्धिक, सामाजिक आणि नैतिक सुधारणा परोपरीने घडवून आणली, त्याबद्दल आमचा हा देश त्यांचा अत्यंत ऋणी राहील, यांत कोणासच शंका नाही. खरोखर ही मोठी आमच्या भाग्याचीच गोष्ट की, हे मिशनरी जगदुद्धारकरितां खिस्तधर्म शिकविण्यास निघाले, तेव्हां ह्या हिंदुस्थानचा त्यांना विसर पडला नाहीं !" अर्थात् हा योग ज्या ब्रिटिश राजसत्तेमुळे जमून आला त्या राजसत्तेचे व राज्यकर्त्यांचेही केशवचंद्रांनी मुक्त कंठाने फार फार आभार मानले. ते म्हणाले कीं, "(आमच्या ह्या देशांतील) छळ व झोटिंग बादशाही, अंधार आणि आपत्ति, अज्ञान आणि धर्मवेड, ह्यांतून आमची सोडवणूक ह्या ब्रिटिश सत्तेनें केली. (तसेंच) ज्या प्रबुद्ध कल्पनांनीं, आमच्या राष्ट्राचें जीवनच बदलून टाकले आणि आमच्या (Native) देशी समाजांत हळुहळू विलक्षण सुधारणा घडवून आणली, त्याही ह्या ब्रिटिश सत्तेच्याच देणग्या होत. आणि ज्याचें महत्त्व आज आपण वास्तविकपणे जाणतों त्या विचार व आचार-स्वातंत्र्याची अमूल्य देणगीही त्या सत्तेमुळेच आम्हांस मिळाली ! त्या महाराणीचे (क्वीन व्हिक्टोरिआ) दयाळू खिस्ती राजशासन हा आमच्यावर केवळ राजकीयच नव्हे तर सामाजिक व नैतिकही प्रसाद झाला आहे. आणि त्यानें आमच्या राष्ट्रीय उन्नतीचा व मोठेपणाचा पाया घातला आहे." इत्यादि

वर्णन करून नंतर त्यांनीं बरेंचसें पाल्हाळिक आत्मनिरीक्षणही केलें आहे. त्यांत अपवादभूत असा वाईट वर्ग सोडून देऊनही, ते स्वकीय बांधवांचे वर्णन करतांना म्हणतातः —" आम्हां नेटिवांचे अतःकरण अत्यंत संकुचित व स्वार्थी आहे. त्यांच्या विचार, भावना व आकांक्षा अत्यंत कुरठया असतात. XXX आमच्या ह्या देशांत प्रतिज्ञेवर खोटी साक्ष देणे, खोटे दस्तऐवज तयार करणे, व्यवहारात मिथ्याचार व मिथ्याभाषण आणि अप्रमाणिकपणा, हे सर्व दुर्गुण भयंकर प्रमाणांत आहेत, ही गोष्ट मला नाकबूल करतां येणार नाहीं. परतु आमची राष्ट्रीय मनोरचनाच अशी असेल, असे मला म्हणवत नाही. (तथापि) सामाजिक आणि धार्मिक दृष्टया आमची स्थिति केवळ गुलामगिरीचीच आहे. आम्ही बंगाली लोक तर महा आळशी, निरुत्साही, अत्यंत भेकड असे आहोत. कोठे धोक्याचा प्रसग आला तर तेथून युक्तीने पाय काढून घेण्यात बगाली पुरे हुशार! कोठें कांही सुधारणेची गोष्ट काढा, कीं झाला बंगाल्याचा थरकाप! आपले जुने ते चांगले. तें जुने घर कुजून अगावर कोसळून का पडेना, आमचा बंगाली कांहीं केल्या तेथून हलणार नाहीं!" इ० इ०

ह्या कटु तिक्त कषायांत केशवचंद्रांनीं गुळीसाखरही चिमुटभर पेरली आहे. परंतु एकंदरींत पाहतां 'खिस्त व खिस्तानुयायी याचे मनःपूर्वक धन्यवाद व त्यास आत्मनिंदेची मळकट भूमिका, असेच शब्दचित्र त्यानी आपल्या वक्तृत्वपूर्ण अशा व्याख्यानांत रेखाटले, व त्यास पदोपदीं 'हीअर' 'हीअर' 'अप्लॉज' असेंही उत्तेजन मिळत गेले. ह्या व्याख्यानांत प्रोफेसर सिली ह्यांच्या "Ecce Homo" नामक सुप्रसिद्ध पुस्तकांतील विचारांचा केशवचद्रांनीं अनुवाद केला होता. त्यांच्या व्याख्यानास इंग्रजी ग्रंथांचाच प्रायः आधार असे. असे हे चमचमीत व्याख्यान तात्पुरते कित्येकांस रुचिकर झाले असले, तरी एकंदरीत ते पचनीं पडण्यास फारच जड गेले.

खिस्तदेवावरील ह्या व्याख्यानाने केशवचंद्र ह्यांची कीर्ति दिगंत पसरली. आतां केशवचंद्र आपल्या अनुयायांसह आपले कळपांत येणार, अशी खिस्ती मिशनऱ्यास आशा उत्पन्न झाली. ब्राह्मसमाजाचे खिस्तीकरण करण्याकरितां विलायतेतून रसाळ वाणीचे मिशनरी मुद्दाम इकडे धाडण्यांत येऊं लागले, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड लॉरेन्सपर्यंत बड्या साहेबांचा त्यास धन्यवाद मिळाला! परतु ह्याबरोबरच त्यांच्या समाजांतील जुन्या पक्षाचा अत्यंत प्रखर

क्रोधावेशही त्यांस सहन करावा लागला. केशवचंद्र हा जातीने अनधिकारी असता त्यास आचार्यपद दिले, तेव्हांपासूनच जुन्या पक्षाचा याच्यावर रोष होता. आणि आतां जेव्हां ह्या ब्राह्मसमाजाचे कातडें पांघरणाऱ्या जणू एका मिशनऱ्याचे कंठरव स्पष्ट कानीं येऊ लागले, तेव्हा त्यास एकदम बहिष्कृत करण्याची उतावळी जुन्या समाजीमंडळींत दिसूं लागली.

अशा रीतीने आपल्या अंगावर बाजू येते, असे केशवचंद्रास लवकरच दिसून आले. त्याचे नेहमीचे स्तुतिपाठकही ह्या त्याच्या व्याख्यानाने नाराज झालेसे दिसले. तेव्हां त्या धूर्तानीं पुढील सप्टेंबर महिन्यात व्हिक्टर कझन नामक एका ग्रंथकाराचे विचारास अनुसरून 'थोर महात्मे' ह्या विषयावर दुसरे एक व्याख्यान दिले. ह्या व्याख्यानाचा अंतस्थ हेतु असा होता की, मागील व्याख्यानांत केशवचंद्रानी हिंदुस्थानांतील कोणत्याही महापुरुषाचे अगर अवतारी म्हणून गणलेल्या पुरुषाचे नावही न घेतां, केवळ एका येशूख्रिस्तास ईश्वरतुल्य पदावर नेऊन बसविले. ह्या गोष्टीचे हिंदुधर्माभिमानी लोकांस सहजच वैषम्य वाटले. ह्यास्तव 'थोर महात्मे' असा सामान्य विषय घेऊन झालेला गैरसमज दूर करावा, असा त्याचा हेतु होता. परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. कारण सर्वच महात्म्यास त्यानीं दैवी अवतारी पुरुषांत गणल्याने ख्रिस्ताचे वैशिष्ट्य नाहींसे होऊन, मागील व्याख्यानांत त्यांनीच उभारलेला ख्रिस्तविजयाचा डोलारा कोसळून टाकल्यामुळे, ख्रिस्ती लेखक गरम झाले. आणि त्यांस शांत करण्याकरिता, तुलनात्मक विचार करून सर्व महापुरुषावर ख्रिस्ताचेच श्रेष्ठत्व केशवचंद्रांनीं पुन्हा प्रस्थापित केल्याने, हा केवळ वक्त्याचा कावेबाजपणा आहे, असे लोक उघड बोलूं लागले. तात्पर्य, "बूंदसे गई तो हौदसे नही आती" असे होऊन उभय पक्ष केशवचंद्रावर अत्यंत रुष्ट झाले. हीं दोन प्रसिद्ध व्याख्याने पुढे ब्राह्मसमाजात मोठी क्रान्ति घडवून आणण्यास तात्कालिक कारणीभूत झाल्यामुळे, ह्या दुसऱ्या व्याख्यानातील कांहीं मुद्दे सारांशरूपाने पुढे देत आहो.

"एके बाजूस परंपरागत पंथांचा हटवादीपणा, तर दुसऱ्या बाजूस रूक्ष व निःसत्त्व असा केवळ कल्पनामय बुद्धिवाद, अशा रीतीने एकोणिसाव्या शतकांतील धर्मजीवन मोक्षप्रद अशा खऱ्या आध्यात्म दृष्टीवांचून आंधळे झाले आहे. आधुनिक सुधारणा ती हीच!

"मनुष्यमात्रास ईश्वराची प्रचीति प्रथम सृष्टींत दिसून आली. सृष्टीवरून सृष्टिकर्त्याची कल्पना मनांत येऊं लागली. हिमाचलासारखा गगनचुंबित पर्वत अॅटलॅन्टिकसारखे अफाट व खोल सागर, त्यास येऊन मिळणारे नद्यांचे प्रवाह इत्यादि भूमीवरील व त्याचप्रमाणे आकाशस्थ परिस्थिति, विश्वकर्म्याचें वैभव दाखवीत होती; व सहृदय माणसाच्या अंतःकरणांत भक्ति-भाव उत्पन्न करीत होती. भाविक मनुष्यापुढे तरूस वाचा फुटली, वाहत्या झऱ्यात सृष्टि ग्रथाची पाने उलटत चालल्य प्रमाणे वाटलें दगडही त्याच्याशी बोलूं लागले. सर्वत्र त्यास मंगलमय दिसू लागले. मग असा प्रश्न निघाला कीं, घड्याळजी घड्याळ तयार करून मोकळा होतो, तसें विश्वयत्र तयार करून तो महायांत्रिक कोठे वाजला झाला काय ? तर असें नव्हे, जगास जे आस्तित्व व सत्यत्व दिसत आहे, त्याचें कारण त्यात ईशसत्ता ओतप्रोत संचरली आहे. सृष्टि हेंच केवळ ईश्वराचें व्यक्त स्वरूप नसून जगाच्या इति-हासातही त्यांचें स्वरूप व्यक्ततेस आलेले दिसतें. राजकारण व लढाया याच्या शुष्क घडामोडीचा जो इतिहास आपण वाचतो, तो जगाचा खरा इतिहास नव्हे. थोर महात्म्यांच्या दिव्य चारित्र्यांनी जो अलंकृत झाला आहे, तो तो इतिहास होय. असे थोर महात्मे म्हणजे कोणी तरी मोठ्या ऐतिहासिक व्यक्ति होऊन गेल्या, इतकेंच आपण म्हणून चालणार नाही. वास्तविक ईश्वरच त्याच्या रूपानें व्यक्तित्वाला आला, असें म्हणून आपण आपलें अंतःकरण त्याच्या पुढे मोकळे करून, त्याच्यांत जी काही थोर व उदात्त अशी दैवी संपत्ति असेल, तिचें आपण ग्रहण केलें पाहिजे ती काही सामान्य माणसे नव्हत. तीं दैवी माणसे होत, ईश्वराचे अवतार होत. याचा अर्थ अनंत असा परमात्मा सूक्ष्म देहधारी झाला, असा नव्हे. ईश्वराचा मनुष्य झाला नाही, तरी मानव-शरीरातील ईश्वर त्यांच्या ठायी व्यक्तत्वास आला. कारण मनुष्यशरीर हेंच देवाचें सर्वोत्कृष्ट मंदिर आहे. अशा दैवी पुरुषाचें चरित्र धुमकेतूप्रमाणे लोक-विलक्षण असते. मानवकोटीच्या काही विशिष्ट कार्यास्तव त्यांचे अवतार होत असतात. त्यांचें थोर चरित्र जसें देशकालाचे दर्शक, तसेच एखाद्या विशिष्ट तत्त्वाचें द्योतक असते. एक अर्थी ते लोकसेवक असतात, म्हणूनच उलट त्यांची लोकांवर सत्ता चालते. त्यांचा निःस्वार्थीपणा, त्यांची लोककल्याणाबद्दल खरी कळकळ, त्यांच्या बोधांतील नाविन्य, त्याचें उपजत अनुभवजन्य ज्ञान,

त्यांची अचिंत्य शक्ति आणि त्याचबरोबर त्याच्या ठायीं दिसून येणारी साधी बालवृत्ति—हीं सर्व त्यांचे थोरपणाचीं लक्षणे होत. असे महात्मे कोठेही व केव्हांही झालेले असोत, त्या सर्वांस, धर्मपंथादि भेद विसरून, आपण पूज्य लेखले पाहिजे.आणि जीजस ख्राईस्ट हा अशा सर्व महापुरुषाचा शिरोमणि असून, त्यांनीं अद्‌भुत चमत्कार करून, इतरांपेक्षां जगाचे अनंत परीने अधिक कल्याण केले आहे. यामुळें तो जरी आपले अत्यत आदरास पात्र आहे, तरी तो जगांत अवतरण्यापूर्वी त्याच्या स्वागतास जग योग्य करण्यासाठीं जे अनेक थोर पुरुष होऊन गेले, त्याचप्रमाणे जगदुद्धाराचे त्याचे महाकार्य पुढे करण्याकरितां त्याचे मागून जे कित्येक महात्मे जन्मास आले, त्यापैकी कोणाकडेही आपण दुर्लक्ष करून चालणार नाहीं.

"अशा रीतीने सृष्टीच्या देखाव्यांत व ऐतिहासिक पुरुषांचे चरित्रांत ईश्वराचे स्वरूप जसे प्रतीतीला येते, त्याचप्रमाणे ते आपल्या अतरात्म्याच्या ठिकाणीहीं प्रतीतीस येते. ते स्वरूप अंतरनिष्ठास त्याच्या निस्सीम निष्ठेचे नेत्रांस दृष्टीस पडते. येथे चतुरांची व्यवहारोपयोगी दृष्टि उपयोगी पडत नाहीं, तार्किकांची बुद्धि फुकट जाते, नैतिक सुधारकाचे धोरण अपुरे पडते, कर्मठांचा खटाटोप कामास येत नाही. यथाक्रम धीराधीराने सपादन करण्याची ही गोष्ट नव्हे. ईश्वरीप्रेरणा एका क्षणार्धात होऊं शकते. ईशकृपेने साधकाचे सर्व दुर्गुण व दुरित एका क्षणांत लयास जातात. ईशप्रेरणेबद्दल उत्कठा पाहिजे, परम उत्साह पाहिजे; उत्साह म्हणजे कांहीं एक बुद्धीचा अगर वासनेचा प्रकार नाहीं. हा उत्साह अखंड जागृत असलेला उत्कट निदिध्यास होय. ह्यांत ज्ञान, भक्ति व कर्म ह्या सर्वांतील उत्तमांश आला. पाप आणि अधःपतन यांपासून तारक हाच एक उपाय आहे."

ह्या व्याख्यानांत केशवचद्रांनी आपले विचार फार सुंदर रीतीने गुंफले आहेत. परंतु शंकरास पांढरे आवडतें म्हणून त्यास पाढरे आणि विष्णूस तांबडें प्रिय म्हणून त्यासाठीं तसें, अशीं फुले गुंफून त्यांनीं दोन्ही दैवतें असतुष्टच केलीं. फूट पडण्यास पूर्वी अनेक कारणे घडत आलींच होतीं. ख्रिस्तविजयव्याख्यान हे एक शेवटले निमित्त कारण झाले. आणि पुढें जुन्यानव्या मंडळींत मेळ घालीत बसणे दुरापास्त होऊन केशवचंद्रांनीं शेवटीं स्वतंत्र होण्याचें ठरविले. आणि तारीख ११ नोव्हेंबर सन १८६६

रोजीं भारतवर्षीय ब्राह्मसमाज स्थापून त्यांच्या अंत:करणांत अलीकडे उदित झालेली महत्त्वाकांक्षा त्यांनीं पुरी केली. अथवा ती पुरी करण्याचे मार्गास ते लागले. त्याचा विचार विस्तृत रीतीने पुढील भागांत करूं.

---

## प्रकरण दहावें

# महर्षींची कारकीर्द

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे ब्राह्मसमाजात दुफळी होऊन केशवचंद्र सेनाच्या पक्षाने 'भारतवर्षीय ब्राह्मसमाज' हे नांव धारण करून स्वतंत्र संस्था काढली. तेव्हा मूळच्या समाजास आदि-ब्राह्मसमाज हे भिन्नतादर्शक नाव प्राप्त झाले. दुफळीची कारणे मागील प्रकरणात सविस्तर सांगितलीच आहेत. तथापि दुफळी झाल्यानंतर मतभेदाचे मुख्य मुद्दे दर्शविण्यात येत, ते असे की, (१) ब्राह्मधर्म हा हिंदुधर्मच आहे असे आदि-ब्राह्म म्हणत; त्यावर भारत-वर्षीयांचे म्हणणे ब्राह्मधर्म हा सार्वत्रिक आहे (Catholic and Universal). (२) दुसरा मुद्दा असा की, मूर्तिपूजानिषेधाइतकेच जातिभेदाच्या निषेधाला भारतवर्षीय अत्यंत आवश्यक कर्तव्य म्हणून महत्त्व देत. तितके आदि-ब्राह्म देत नसत.

भारतवर्षीय समाज निर्माण झाला, तेव्हां बंगाल्यांत पन्नास, वायव्य प्रांतांत दोन, पंजाबांत एक आणि मद्रासेस एक; याप्रमाणे ब्राह्मसमाज स्थापन झालेले होते. त्यानी मुलामुलींच्या कित्येक शिक्षणसंस्था चालविल्या होत्या. ब्राह्मधर्मप्रसाराकरितां वाहिलेलीं अशी सदतीस वर्तमानपत्रे सुरू होतीं. वर लिहिल्याप्रमाणे समाजात दुफळी झाल्यानंतर, वरील संस्था बहुतांशी नवीन ब्राह्मसमाजाच्या पक्षांतच दाखल झाल्या. देवेंद्रनाथांचा जुना समाज आदि-ब्राह्मसमाज ह्या नांवाने तटस्थच राहिला. केशवचंद्र सेनांकडे देवेंद्रनाथांचा विलक्षण ओढा होता. केशवचंद्र सेन आपल्या समानशील मित्रांसह देवेंद्रनाथांस सोडून गेले, तेव्हां त्यांस इतके वाईट वाटले, कीं त्यांनींही ब्राह्मसमाजाचीं सूत्रे त्यानंतर सोडून दिली. आपल्या समाजाची व्यवस्था आपला मुलगा द्विजेंद्रनाथ आणि बाबू राजनारायण बोस ह्यांच्या स्वाधीन करून ते जुन्या चालीप्रमाणें जणुं काय वानप्रस्थाश्रम स्वीकारते झाले. देवेंद्रनाथांनीं आपलें उर्वरित आयुष्य बहुशः देशाटनांतच घालविलें. ह्या मुदतींत त्यांनीं बंगालींत कांहीं ग्रंथ रचले. प्रसंगोपात्त निरनिराळ्या ब्राह्म-

समाजांना स्वतांच्या सल्लामसलतीनें व कित्येक वेळां हजारों रुपयांच्या देणग्या देऊनही मदत केली. केशवचंद्रावरील त्यांचे अकृत्रिम प्रेम अखेरपर्यंत कायम राहिले. केशवचंद्रांचे आचारविचार जरी त्यांस मान्य नव्हते तरी त्यांस व त्याच्या समाजास त्यानीं अगदीं खुल्या दिलाने मदत केली. ते मनाने इतके थोर होते, की मतभेदाचे वैषम्य त्याच्या मनास कधीच शिवत नसे. त्यांच्या विरोधी समाजांतील पुढारी मंडळीस देवेंद्रनाथांनीं आपल्या मनाच्या थोरपणाने हरघडीं लाजविले. आणि त्यांच्याकडून धन्यवाद करून घेतले. आदि-ब्राह्म-समाज सोडून जातांना केशवचंद्रांनी देवेंद्रनाथास जे मानपत्र लिहिले त्यात प्रारंभीच त्यास 'हे तात' (Father), असे संबोधन असून पुढे त्यांच्या अनेक गुणांचा गौरव करून त्यांस महर्षि हे बहुमानाचे पद त्यांनीच लावले. तात्पर्य, देवेंद्रनाथानीं केशवचंद्रास पूर्वी आचार्यपद देतेवेळीं 'ब्रह्मानंद' ही पदवी दिली. तसेच केशवचंद्रांनी उलट त्यांस 'महर्षि' ही पदवी दिली; व ती तत्सांप्रदायिकांस सार्थ वाटली.

देवेंद्रनाथानीं आपल्या आयुष्यातील भर उमेदीचा तीस वर्षांचा काल ह्या संस्थेकरितां खर्ची घातला. आणि एका काळी अगदी नामशेष होण्याच्या बेतास आलेल्या ह्या संस्थेस त्यानीं अत्यंत भरभराटीस आणून लोकप्रिय केले. घरीदारी चोहोकडे तीव्र प्रतिकूलता असता, आणि पूर्ववयांत श्रीमंती-सुखाचा मोह आणि पुढे पितृनिधनाचा आघात, आणि डोईजड कर्जाचा बोजा, अशा सर्व पेचातून आपली प्रपचनौका सुरक्षित पैलतीरास नेऊन, शिवाय त्यानीं हे समाजकार्य केले. हे त्याची अलौकिक बुद्धिमत्ता व मनोधैर्य याचे उत्कृष्ट स्मारक आहे. त्यानी मनात आणले असते तर ते महाराजा देवेंद्रनाथ झाले असते. परंतु ते राजपद त्यानी तुच्छ मानून आपले खरें ब्राह्मण्य जगास दाखविले. मग जगही त्यांस महर्षि म्हणू लागले यात नवल काय!

कर्मठ ब्राह्मणधर्माने आपल्या अंगाबाहेर फेंकलेला हा ब्राह्मसमाजाचा उमदा चेंडू, खिस्ती पाद्र्यांच्या जाळ्यात सांपडतो कीं काय, असा स्वाभाविक प्रश्न होता. देवेंद्रनाथांची सत्त्वपरीक्षा त्यांतच व्हावयाची होती. ब्रह्मानंदाशीं स्पर्धा करण्याइतकी घरी विषयानंदाची अनुकूलता, चार्वाकासही लाजविणारे डेरोझीओसारखे प्रोफेसर; मिल, ह्यूम, स्पेन्सर असल्यांचा ग्रंथपरिचय, चांगल्या

चांगल्या सुशिक्षितांसही आपल्या कळपांत ओढणारे डॉ० अलेक्झांडर डफ-सारखे उपद्व्यापी पाद्री, आणि केशवचंद्र प्रभृति अर्ध ख्रिस्ती झालेले अनुयायी, अशी परिस्थिति असतां, हे राममोहनांचे अनुयायी, पुढे कोणत्या थरास जातात, हा प्रश्नच होता. ईश्वरीयोजना अशी होती, कीं ब्राह्मसमाजाचे प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष धुरीणत्व बहुत काळ देवेंद्रनाथांकडेच रहावे ! परंतु तत्पूर्वी धार्मिक पुढाऱ्यास अत्यंत अवश्य असा स्वार्थत्याग आणि स्वधर्मनिष्ठा अशा गुणांत ते कितपत उतरतात, त्याबद्दल त्याची सत्त्वपरीक्षा घेण्याचे देवाने मनांत आणले व ह्या परीक्षेत ते पुरोपूर उतरले.

'ईशवास्य मिदं सर्वम्' इ०. ह्या वेदवाणीने त्यांना जो आरंभीं उपदेश झाला, तो त्यानीं दृढ प्रयत्नाने आत्मसात् करून टाकला. तो इतका कीं, ते उपनिषद्वाक्य हेच देवेंद्रनाथांच्या आयुष्याचे सार होय. असे सागतात कीं, ब्रह्मज्ञान, ब्रह्मध्यान आणि ब्रह्मानंदरसपान, हे त्यांचे अत्यंत आवडीचे शब्द व अनुभवाचे विषय होते. ते आत्मसाक्षात्कारी पुरुष होते. भगवंताच्या सच्चिदानदरूपाचा त्यांना नित्य प्रत्यय होता. ते ईशदर्शन प्रथम त्यांस बाहेरच्या विश्वमंदिरांत होऊं लागले, आणि नंतर तें त्यांच्या अतरीं प्रतीत होऊन, तेथे देवभक्तांचे हितगुज सुरू झाले. ते म्हणत कीं, 'सत्, चित्, आनद हे शब्द लोक सहज उच्चारतात. ते कित्येकांस जुनाट व अर्थहीन वाटत असतील. परंतु ह्या एकेका शब्दांत काय दिव्य अनुभव सांठविला आहे ते शब्दाने सांगणे अवश्य आहे'. हे अनुभवाचे बोल ते उच्चारीत तेव्हा त्यांच्या चेहऱ्यावर अलोट तेज लोटे, त्याच्या आंगावर रोमांच उभे रहात, आणि त्या वेळचे ते त्यांचे लोकोत्तर गांभीर्य त्यांच्या दिव्य अनुभवाची साक्ष पटवी. त्यांना एकान्त अत्यंत प्रिय असे. त्यांनीं आपल्या आयुष्याचा बराचसा काळ एकान्तासाठीं घराबाहेरच काढला. परंतु ते घरीं असले तरी त्यांस एकान्ताची इच्छा उत्पन्न झाली म्हणजे त्या वेळीं ते आपल्या जीवश्च कंठश्च स्नेहास अगर घरांतील नातेवाईकांसही आपल्याजवळ बसूं देत नसत.

ते जरी असे एकांतप्रिय होते, तरी त्यांचा प्रपंचाचा व्याप व विद्याव्यासंग फार दांडगा होता आणि त्या सर्वांमध्ये त्यांची विलक्षण शिस्त व उत्साह दिसून येई. त्यांचे आचरण भगद्गीतेंतील ह्या श्लोकाप्रमाणें तंतोतंत असेः—

दुःखेष्वनुद्विग्नमनाः। सुखेषु विगतस्पृहः।
वीतरागभयक्रोधः। स्थितधीर्मुनिरुच्यते।
—गीता, अ. २, श्लो. ५६.

**भावार्थः**— दुःखांत ज्याच्या मनाला खेद होत नाही, सुखाचे ठायीं ज्याची आसक्ति नाही, आणि प्रीति, भय व क्रोध ही ज्याची सुटली त्यास स्थितप्रज्ञ मुनि म्हणतात.

ईश्वरी इच्छेशी त्यांचे अत्यंत साहचर्य होत असे. कोणतीही महत्त्वाची गोष्ट करावयाची म्हणजे ते उतावळी न करता काही वेळ तटस्थ बसून ईश्वरीइच्छा काय असावी ह्याचा अंदाज घेत. आणि एकदां ईश-संकल्पानुसार त्याचा सूर लागला, म्हणजे मग ते जे ठरवीत, ते कोणाच्याही सांगण्याने मागून फिरवीत नसत. प्रेम आणि औदार्य ह्याची ते केवळ मूर्तीच होत. त्यांचे कनिष्ठ चिरंजीव प्रसिद्ध कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर ह्यांचे बोलपूर येथील शांतिनिकेतन ही त्यांचे वडिलांची एकेश्वरीपंथातील भक्तास एकांत-वासासाठी दिलेली शेवटची देणगी होय. अशा रीतीने अगदी तरुणपणा-पासून अखेरपर्यंत त्यांनी आपल्या आवडत्या एकेश्वरी पंथाची अमोलिक सेवा केली. आणि महर्षि देवेंद्रनाथ हे दुर्मिळ पदवी करून घेऊन, लौकिकदृष्ट्या ते इ. सन १९०५चे जानेवारी महिन्यात हा लोक सोडून गेले.

त्यांनी आपले साधकावस्थेतील आत्मचरित्र लिहून ठेविले आहे, ते वाचनीय आहे. ते त्यांनी इ. सन १८५८सालपर्यंतच लिहिले आहे. पुढे कां लिहिले नाही, असे त्यांस कोणी विचारल्यावरून ते म्हणाले की, ‘यापुढे माझे चरित्र संपले. माझ्या केशवाचे चरित्र सुरू झाले.’ केशवचंद्रावरील त्यांचे हे अलौकिक प्रेम पाहिले, म्हणजे केशवचंद्रासारख्या योग्यतेचा पुरुषही त्यांच्या त्या प्रेमास खरोखर पात्र होता काय अशी शंका येते. केशवचंद्रांचे ख्रिस्तीवळणाबद्दल त्यांनीं त्यांची चांगलीच कानउघाडणी केली. आणि आम्हाला तर असे वाटते की, देवेंद्रनाथ व श्रीरामकृष्ण अशा बड्या महात्म्यांचे त्यांचेवर दडपण नसते तर केशवचंद्र व त्यांचे अनुयायी ख्रिस्ती होणेही असंभवनीय नव्हतें.

देवेंद्रनाथ हे ब्राह्म असून अखेरपर्यंत हिंदुधर्माचे कट्टे अभिमानी होते. ते रोज प्रातःकाळीं वेद व उपनिषदे यांचा पाठ नित्यनेमाने करीत. त्यांचा ख्रिस्तीधर्माकडे यत्किंचित्‌ही ओढा नव्हता. इतकेच नव्हे, तर राममोहन अगर

केशवचंद्र ह्यांच्याप्रमाणें त्यांचा त्या धर्मासंबंधीं विशेष आदरही नव्हता. ख्रिस्तीधर्मांतील ईश्वर, स्वर्ग व मुक्ति इत्यादि कल्पना त्यांस समत नव्हत्या. धर्माचे बाबतींत आम्हास पाश्चात्यांजवळ शिकण्यासारखे कांहीच नाही, उलट त्यांनींच आम्हाजवळ शिकावे असे असता आमच्यातीलच कित्येक समजस माणसांचे स्वधर्मासंबंधी औदासिन्य व परधर्माकडे ओढा दिसून येतो, याचे कारण वेदान्तशास्त्राविषयी त्याचे अज्ञान होय. ह्यासाठी वेदान्तशास्त्राचा सर्वत्र प्रसार केला पाहिजे, असे त्याचे म्हणणे असे. ब्राह्मसमाजासबंधी त्याचे मतवैशिष्ट्य लक्षांत घेण्यासारखे आहे, त्याचे पहिले तत्त्व असे असे कीं, ब्राह्मसमाज ही केवळ हिंदूंची सस्था असून ब्राह्मधर्म म्हणजे हिंदुधर्माचाच एक अत्यत उदात्त पंथ आहे. त्याचे दुसरे तत्त्व असे असे कीं, ब्राह्मसमाजाचे कार्यक्षेत्र केवळ धर्मापुरतेच आहे. सामाजिक सुधारणाचा प्रश्न व्यक्तींचे आवडीनावडीवर अवलबून असून सामाजिक सुधारणा ब्राह्मसमाजाचे कार्यक्षेत्रात येऊ शकत नाहीत. ह्याच त्याच्या मतवैशिष्ट्यामुळे नूतन ब्राह्मसमाजी मंडळीस फुटून बाहेर पडावे लागले. देवेंद्रनाथाचे पश्चात् आदि-ब्राह्मसमाजाचे अध्यक्ष राजनारायण बोस यांनींही वरिल मताचाच पुरस्कार केला. त्या उभयताच्या मतांत स्वतांच्या विचाराने, अनुभवाने किंवा क्रिया प्रतिक्रियारूपाने फरक पडत गेला, व अखेर अखेर त्यांचे मन हिदुधर्मांत अधिक रमू लागले असे दिसते. पुढे पुढे राजनारायण ह्यांचे म्हणणे असे असे की, ब्राह्मधर्म हा जरी तत्त्वतः सर्वसंग्राहक असला, तरी आचारतः तो तसा राहणे शक्य नाही. देशभेदाने त्याचे बाह्यस्वरूप भिन्नच राहील आणि म्हणून आम्ही आमच्या विशिष्ट ब्राह्मतत्त्वांस बाध न येईल अशा धोरणाने आचारांत हिंदुधर्मशास्त्राचाच अंगिकार केला आहे. जो जातीने हिदू नाहीं किंवा जो हिदुधर्म मानीत नाहीं तो ब्राह्मसमाजाचा सभासद होऊ शकणार नाहीं. वर्णसंस्था का मानावी असे कोणीं विचारल्यास त्यावर त्याचे म्हणणे असे की, वर्णसस्था सोडून सर्वांस समान धर्माचे व वर्णाचे मानण्याइतकी जगाची आज तयारी नाही. वरीलप्रमाणे आदि-ब्राह्मसमाज आपल्या पूर्वपदावर अधिष्ठित झाल्यानंतर मध्यंतरीं नष्टप्राय झालेले कांहीं धर्मविधि त्यांनीं पुन्हा सुरू केले. उदाहरणार्थः–ब्राह्मण मुलांचे उपनयन व यज्ञोपवीतधारण, तसेच लग्नांतील सप्तपदीप्रमाणें आवश्यक विधि, त्यांनीं पुन्हा सुरू केले.

तत्त्वतः आदि-ब्राह्मसमाजाची वैदिकधर्मावरील निष्ठा राजा राममोहन यांच्याइतकी कधींच नव्हती. तसेंच त्यांस ख्रिस्ती धर्माचाही मोह राजा राम-मोहन अगर केशवचंद्र यांच्याइतका कधींच पडला नाही. उलट ख्रिस्ती-धर्माचा संसर्ग बिभीषिकेप्रमाणे त्यांनीं भयप्रदच मानला. ख्रिस्तधर्माभिमानी लेखकांस ह्या गोष्टीचें साहाजिकच वैषम्य वाटलें. 'धी हेरिटेज् ऑफ इंडिया सीरीज' ह्या गोड नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या मालेचे एक प्रमुख संपादक मि० जे. एन्. फर्कुहार हे आपल्या हिंदुस्थानांतील 'आधुनिक धार्मिक चळवळी' या नांवाच्या पुस्तकांत ब्राह्मसमाजाच्या ह्या काळाबद्दल टीका करितात, त्याचें तात्पर्य असें:—

" देवेंद्रनाथ हिंदुधर्माचे व केशवचंद्र ख्रिस्तीधर्माचे अभिमानी खरे; पण दोघांनीही त्या त्या धर्मांतील खरें रहस्य न जाणल्यामुळे, किंवा त्यांतील कित्येक मूलतत्त्वें न पाळल्यामुळे ते धर्मसंस्थापक अथवा प्रचारक ह्या दृष्टीनें अखेर अपयशी झाले. देवेंद्रनाथांनीं ख्रिस्ताचें अनुकरण करण्याचें नाकारलें, व हिंदुधर्माचें आधारभूत जे वेद त्यांचें प्रामाण्य नाकबूल केलें. आणि हिंदु-धर्मांतील पुनर्जन्म, कर्मविपाक, इत्यादि मूलभूत सिद्धान्त मानले नाहींत. उभयधर्मांचा आधार अशा रीतीनें त्यांनीं सोडल्यामुळें आधुनिक कालांतील तीव्र विचारसंग्रामांत त्यांचा टिकाव लागला नाहीं."

एक सहानुभूतीची दृष्टि असेल, तर इंग्रज लेखकांतही किती मतभेद होतो, ह्याचें प्रत्यंतर लिओनार्ड यांचा ब्राह्मसमाजाचा इतिहास वाचतां सहज पटतें. हे इतिहासकार सुमारें पन्नास वर्षांपूर्वीं लिहिलेल्या आपल्या ग्रंथांत असें म्हणतात कीं, " ब्राह्मसमाज स्थापन होऊन अर्ध शतक झालें असलें, तरी ही संस्था अद्याप बाल्यावस्थेंत आहे असेंच म्हटलें पाहिजे. राष्ट्रोद्धाराच्या कार्यांत शतकें म्हणजे दिवसांप्रमाणें गणलीं पाहिजेत. अखिल मानवजातीचा जनक, आणि ऋग्वेद कालापासूनचा आर्यावर्ताचा राष्ट्रीय देव असा जो ब्रह्मपुरुष त्याचीच उपासना अखिल भारतवर्षीय लोक करूं लागतील, असा दिवस हिंदुस्थानांत आल्यावांचून राहणार नाही. हिंदूंच्या धर्म व समाजरचनेंत कितीही फेरफार होवोत, ही गोष्ट निश्चित आहे कीं, हिंदुलोक युरोपचा धर्म अगर चालीरीति यांचें सर्वस्वीं अनुकरण करणार नाहींत. ते आपली स्वतंत्र संस्कृति बनवतील, आणि त्यांच्या मूळ आर्यधर्मांत स्वतां जरूर ते फेरफार

करून ते आपल्या धर्मासच चिकटून राहतील. अशा रीतीने सत्धर्माच्या मार्गानें हिंदुस्थानचे पाऊल पुढे पडत असता बाकीचे धर्मही मागे राहणार नाहीत. तर ते ते धर्मही विचारपूर्वक खऱ्या एकेश्वरी पथासच येऊन मिळतील. आणि अशा रीतीने अखिल जगाचा जनक अशा त्या एकाच परमपुरुषाची सर्व राष्ट्रे भक्ति करू लागतील, ह्याप्रमाणे त्या थोर राममोहनाची महत्त्वाकांक्षा खचित फलद्रूप होईल."

एक कडवा ख्रिस्तभक्त व एक ऋग्वेदाचा चहाता अशा दोघा ख्रिस्ती लेखकाचे वरील विचार मननीय आहेत. देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन ह्यांचे दृष्टिकोन असेच विभागलेले होते. देवेंद्रनाथास आम्हास धर्मसंबंधी शिक्षण युरोपकडून घ्यावयास नको असे वाटे, आणि केशवचंद्राचा सर्व भार ख्रिस्तीधर्माच्या प्रभावावर होता. ख्रिस्त आमच्या आशियातील असल्यामुळे तो आम्हास युरोपियनापेक्षाही जवळचा आहे असे त्यांस वाटे.

देवेंद्रनाथाचे थोरवीबद्दल आधुनिकात फारसे कोणाचे दुमत नाही. ब्राह्मसमाजाबद्दल ख्रिस्ती लोकांसही बराच आदर दिसतो. हिंदुस्थानातील आधुनिक धार्मिक चळवळीत ब्राह्मसमाजाइतकी कर्तृत्ववान् संस्था दुसरी झाली नाही, असे ते मानतात. आणि ह्या प्रभावशाली संस्थेत देवेंद्रनाथ ही एक मध्यवर्ती मोठीच व्यक्ति होऊन गेली ह्यात शंका नाही. ब्राह्मसमाजी मंडळींत ब्रह्मानुभवी पुरुष कित्येक होऊन गेले असे म्हणतात, आणि अशा महापुरुषांची कित्येक नावेही सांगतात. आम्हास इतरांची विशेष माहिती नाहीं, पण आमच्या माहितीप्रमाणे महर्षि देवेंद्रनाथ यांच्या योग्यतेचे पुरुष ब्राह्म-संप्रदायात दुसरे क्वचितच झालेले असतील. असे आहे तरी अशा थोर पुरुषाच्या चारित्र्याचा सामान्य जनतेवर श्रीचैतन्य, कबीर, तुकोबा इत्यादि ब्राह्मांस मान्य असलेल्या साधुवर्यांचे चारित्र्याइतका उपकारक परिणाम झाला नाही. याच्या अनेक कारणांपैकी ठाकूर यांच्या घराण्याच्या खानदानीचा दर्प हे एक कारण कदाचित् असूं शकेल. देवेंद्रनाथांचा ब्राह्मसमाजाशीं असलेला संबंध सुटल्यावर, काहीं वर्षांनीं ते वानप्रस्थ आश्रम स्वीकारते झाले. त्या सुमारास ते पन्नाशीच्या घरांत आले असतां त्यांचा घेतलेला फोटो त्यांच्या आत्मचरित्रात पाहिला म्हणजे त्यांना महर्षि न म्हणतां राजर्षि म्हणावे असेच वाटते. केवढा तो नबाबी थाट व कसली ती रुबाबदार भव्य मूर्ति ! महर्षींचे चिरंजीव द्विजेंद्रनाथ यांच्या आंगाखांद्यांवर

चिमण्या, पारवे आणि खारी निर्भयतेने येऊन बसत असत असें म्हणतात. पण त्यांच्या वडिलांपुढे लहानगे जीवच काय पण पुरुषासारखे पुरुषही जाण्यास चचकत असतील असे वाटते! ह्या दृष्टीने पाहतां मिस्टर ॲंड्रयूज ह्यानीं त्यांस जनकाची उपमा दिली आहे, तीच अधिक सम्यक् दिसते.

ब्राह्मसमाजाच्या यशापयशाच्या मीमांसेत बाबू राजनारायण बोस, डॉ० भांडारकर, अशा कित्येक ब्राह्म-पुढाऱ्यांच्या ही गोष्ट लक्षात आली आहे कीं, ब्राह्म पुढारी हे सामान्य जनतेपासून नेहमी दूरच राहिले. ह्या गोष्टीचें प्रत्यंतर महर्षि देवेंद्रनाथ याच्या चरित्रांतही येते. त्याची श्रीमान् खानदानी आणि त्यांचा एकांतवास हीं दोन्हीही लोकसंग्रहाचे कार्यास प्रतिकूलच झाली. तेच काय, पण त्यांचे लहानसे आत्मचरित्र गरिबांनीं वाचावे तर किंमतीच्या दृष्टीने तेही त्याच्या आटोक्याच्या बाहेर आहे. डॉ०रवींद्रनाथ याच्या विदेशी कंपनीने छापण्याचा मक्ता घेतलेल्या पुस्तकाचीही हीच तऱ्हा आहे. जितक्या आण्यांत तीं छापलीं जातील तितक्या रुपयांत तीं विकली जातात! आपले मराठीतील कै० जोगाचे सार्थ गाथेचे दोन भाग, लोकमान्यांचे गीता-रहस्य, व डॉ० भांडारकर ह्यांचा लेखसंग्रह इत्यादि उदाहरणे देऊन श्रीमान् रवींद्रनाथांनी आपले वाङ्मय बहुतेक छपाईच्या किंमतींतच विकावें, अशी आम्हीं त्यास एकदां पत्राने प्रार्थना केली होती. पण त्याचा जाब आम्हास मिळाला नाहीं. त्यांचे समकालीन कौंट टाल्स्टॉय ह्यानीही आपले लेख स्वदेशबांधवांस अत्यंत सुलभ केले आहेत. तात्पर्य इतकेच की, राजाज्ञेचे जाहीरनामे लोकास वाचता येणार नाहीत इतके उंच लावल्यावर त्याचा परिणाम झाला नाहीं, तर त्यांत काय नवल आहे! साम्राज्याच्या महाराज्ञी, त्यांचे व्हाइसरॉय, आणि संस्थानिक यांच्या कृपेत पोसलेले ब्रह्मानंद केशवचंद्र सेन ह्यांसही अशिक्षित गोरगरीबांची दाद घेण्यास क्वचितच फावले असेल! थोर ते थोरच. त्यांस आम्हीं काय म्हणावे? पण हे खरे की, साऱ्या थोरांचाही थोर गोरगरिबाच्याही हृदयस्थ होऊन राहिला आहे. त्या ईश्वराची लीला कशी ती पहा, कीं त्याने कोणास (केशवचंद्र) वैष्णवपंथी, तर कोणास (रवींद्रनाथ) बाउलपंथी भिकारी, कोणास (न्या० रानडे) निरक्षर वारकरी तर कोणास (न्या०चंदावरकर) महार आणि भंगी पोर्टर, अशा तुच्छ आणि भिकार गणलेल्या लोकांच्या गांठी पाडून, धर्मोपदेशकाचा अभिमान मोडून नम्र केले, आणि

श्रीमान् सुशिक्षितांप्रमाणे गरीब अशिक्षितांस देवानें आंगाबाहेर टाकलें नाहीं याची साक्ष पटवली ! असो.

देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन ह्यांचे एकमेकांवर कितीही प्रेम असलें, तरी त्यांच्या स्वभावाची रचना अत्यंत भिन्न होती. तसेंच त्यांची धार्मिक व सामाजिक सुधारणेचीं ध्येयेंही वेगळी होतीं. दोघांच्या विचारांस आधारभूत झालेल्या संस्कृतीही भिन्न होत्या, आणि परस्परांचे सहकारी मित्र व अनुयायी हेही अगदींच निराळ्या प्रकारचे होते. देवेंद्रांच्या प्रार्थनेत आत्मविश्वासानें भरलेले उपनिषदांतील वजनदार शब्द व गंभीर कल्पना असत, तर केशवाच्या प्रार्थनेचे सार " मी दीन पतित आहे, माझा उद्धार करा " असें दीनवाणें असे. एकाचा भर ज्ञानावर, तर दुसऱ्याचा, श्रद्धा व भक्ति यांवर. भिन्न जातींतीलच विवाह काय, पण एकाच जातींतील विधवाविवाहही देवेंद्रनाथांस सम्मत नसे. शिवाय अशा प्रकारच्या सामाजिक सुधारणा कालगतीवर सोपविण्याकडे त्यांचा कल असे. उपनिषद् ग्रंथावरील निष्ठेमुळें देवेंद्रनाथांचे धर्मसंबधीं विचार निश्चित स्वरूपाचे होते. केशवचंद्रांनीं अद्याप धर्मसंबंधीं कांहींच निश्चय केलेला नव्हता. देवेंद्रनाथ हिंदुधर्माचे अभिमानी होते. त्यांना हिंदुधर्मांतले वैशिष्ट्य कायम ठेवून त्यांत सावकाश सुधारणा घडवून आणावयाची होती. केशवचंद्रांची चळवळ क्रांतिकारक होती. राजा राममोहनपासून ब्राह्मसमाजांत ब्राह्मण्याचा अभिमान असे. ब्राह्मधर्म म्हणजे सुधारलेला वैदिकधर्म; आणि वैदिकधर्माच्या आचार्यपदाचे अधिकारी म्हटले म्हणजे ब्राह्मणच असावेत, असा आदिब्राह्मसमाजाचा संप्रदाय असे. त्यांस देवेंद्रनाथांनीं केशवचंद्र सेन यांस आचार्यपद देऊन पहिला अपवाद उत्पन्न केला. ही गोष्ट नव्यांस आवडली; पण जुन्या मंडळीस अत्यंत नापसंत झाली. दोघांचे अनुयायांत एक पिढीचें अंतर होतें. अशा विसंगत परिस्थितींत देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन ह्यांनी एकमेकांचे भिडेत सुमारें सहा वर्षे कशीं तरी काढलीं. परंतु हे असेंच अव्याहत चालणें शक्य नव्हतें. शिवाय देवेंद्रनाथांच्या छापेंत नेहमीं राहणें केशवचंद्रांसारख्या महत्त्वाकांक्षी पुरुषास फार दिवस शक्य नव्हतें. अखिल भारतीय ब्राह्मसमाज स्थापन करण्याची त्यांस नवीन ईर्षा उत्पन्न झाली होती. अशा अनेक कारणांनीं आंतले आंत धुमसत असलेली फूट पुढें उघड झाली. त्यांत वर दर्शविल्याप्रमाणें धर्मसुधारणेच्या उत्कंठेपेक्षां केशवचंद्रांच्या

महत्त्वाकांक्षेनेच जास्त जोर केला, असें इतिहासकार म्हणतात. मग काय! एकमेकांचीं भवितव्यें एकमेकांनीं सांगून टाकली. नवीन पक्षानें अविचारानें सुरू केलेली समाजक्रांति सर्व पवित्र भावनाचा आणि भक्तीचा उच्छेद करून अराष्ट्रीय व आचरट चळवळ म्हणून लोकनिंदेस पात्र होईल, असें जुन्या पक्षाचें भविष्य होतें. त्यास उत्तरादाखल नवीन पक्षानें जुन्या समाजास हत्तीच्या मढ्याप्रमाणें भावी इतिहाससंशोधकांचा एक संशोधनाचा रूक्ष विषय ठरविलें. आपआपसांत वर्तविलेलीं हीं भविष्यें ध्यानीं घेऊनच देवेंद्रनाथ व केशवचंद्र ह्यांनीं त्यापुढें आपआपल्या समाजाचे उत्कर्षासाठीं अवश्य ती सावधगिरी ठेविली. त्यास पुढें कितपत इष्ट फळ आलें, हें आजच्या समाजस्थितीवरून थोडें फार ठरविता येईल. असो.

---

## प्रकरण अकरावें

# आदि-ब्राह्मसमाज

आदि ब्राह्मसमाज ही संस्था आजपर्यंत बिनबोभाट चालली आहे. देवेंद्र-नाथांनीं आपलीं अधिकारसूत्रें सोडल्यानंतर थोडे दिवस बाबू राजनारायण बोस हे समाजाचे अध्यक्ष झाले, परतु आजारीपणामुळे त्यांना ते काम लवकरच सोडावे लागले. बाबू राजनारायण हे हिंदुधर्माचे पक्षपाती होते. केशवचंद्र ह्यांस ब्राह्मसमाजांत ओढण्यास जरी तेच कारण झाले, तरी पुढे पुढे केशवचंद्रांच्या व त्यांच्या विचारात व आचारांत मेळ राहिला नाही. ब्राह्मोत्सव, नगर-संकीर्तन वगैरे प्रचंड चळवळीचे प्रकार, भावनेचा पारा कृत्रिम रीतीने वाढविण्याकरिता, केशवचंद्र यांस जितके आवश्यक वाटत, तितकेच ते धर्माचें गांभीर्य कमी करतात, म्हणून बाबू राजनारायण ह्यांस नापसंत असत. आध्यात्मिक उन्नतीकरितां अशा प्रकारच्या कृत्रिम चळवळीची जरूर वाटावी, हा त्यास ब्राह्मसमाजातील एक दोष वाटत असे. मंद होत चाललेल्या समाजयंत्रांत आध्यात्मिक भावनांची फुगलेली वाफ भरण्याकरितां 'आम्ही ह्या वार्षिक महोत्सवाची मोठ्या उत्कंठेने वाट पहात असतो' असे त्यांचें उपरोधिक म्हणणे असे. प्रवचने, व्याख्याने, मिरवणुकी आणि उत्सव ह्या व्यतिरिक्त ब्राह्मसमाजात कांहीच तथ्य राहिले नाही, असे न व्हावे असे ते म्हणत. तसेच खिस्तप्रभृति थोर महात्म्यांचा उदो उदो करण्याचाही अतिरेक झाला. आतां देहधारी देवांचे अथवा दैवी पुरुषांचे देव्हारे अधिक न माजवितां, आणि बाह्य साधनावर अवलंबून न राहतां, त्या एका परमपुरुषाची कृपा संपादण्यासाठी ज्याने त्याने स्वतांच्या आत्मिक बळावरच जास्त विसंबावे, असा त्यांचा उपदेश असे. उलटपक्षीं त्या वेळीं कित्येक ब्राह्मसंपादक अशी संपादणी करीत की, ब्राह्मपंथांतील सर्व सांप्रदायिकांचा उद्धार झाल्यावांचून कोणाही एका व्यक्तीचा उद्धार होणे शक्य नाहीं. अशा प्रकारचे आचारविचारांचे अतिरेक केशवचंद्र व त्यांचे अनुयायी ह्यांत त्यांस दिसून आले. विभूतिपूजा, पश्चात्तापाचे भलतेच दुखणें, सहानुभूति,

बंधुप्रेम इत्यादींचा पोकळ शाब्दिक पाल्हाळ, हिंदुधर्म व सामान्य हिंदी जनता यांच्यापासून तुटक राहण्याची प्रवृत्ति, अनेक धर्ममतांचा संकर, बड्या इंग्रजांचें अवास्तव स्तोम इत्यादि केशवचंद्रांच्या चळवळीतील अनेक प्रकार त्यांस आवडत नसत. त्यांचा त्यांनीं आपल्या व्याख्यानांत उघड निषेधही केला आहे. आदि-ब्राह्मसमाजाचे इतर ब्राह्मपंथांशीं न पटणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या बाबी म्हटल्या म्हणजे आदिब्राह्म हे आपणास हिंदु म्हणवीत, व मूर्तिपूजेच्या व्यतिरिक्त हिंदूचे बहुतेक सर्व संस्कार व आचार पाळीत. आदि-ब्राह्मांच्या घरातून मूर्तिपूजेचा बहिष्कारही विशेष रीतीने पाळला जात नसे. इतर पथांचे ब्राह्म आपण कोणत्याच प्रचलित धर्मापैकी नाही असे म्हणत. ते हिंदुशास्त्राप्रमाणे धर्मसंस्कार पाळीत नसत. उलट हिंदूच्या अत्यंत महत्त्वाच्या विवाहसंस्काराऐवजी ते आपले लग्नाचे करार ख्रिस्ती लोकांप्रमाणें रजिस्टरापुढे ( सिव्हिल मॅरेज ॲक्टअन्वये ) नोंदवून मोकळे होत. तसेच जातिसंस्था मोडणे हे आदि-ब्राह्म आपलें ब्राह्मधर्मबीज मानीत नाहीत. साधारण ब्राह्म ते एक आवश्यक मूलतत्त्व मानतात. त्याचप्रमाणे भारतवर्षीय ब्राह्म राजनिष्ठा हे ब्राह्मधर्माचे एक आवश्यक मूलतत्त्व मानतात. आदिब्राह्म हेही जरी राजनिष्ठच आहेत. तरी राजनिष्ठेचा ते ब्राह्मधर्माशी असा अन्योन्य संबध जोडीत नाहींत. तसेच सामाजिक सुधारणांसबंधींही याचा इतरांइतका आग्रह नाही. आदि-ब्राह्मसमाजाची सर्व सूत्रे अद्याप देवेंद्रनाथांचे घराण्यातच आहेत. देवेंद्रनाथाचें विस्तृत घराणे हा आदि-ब्राह्मसमाजांतील अत्यंत महत्त्वाचा घटक आहे. आदि-ब्राह्मसमाजांत सुमारे शंभर अनुष्ठानिक सांप्रदायी आहेत. ते बहुतेक सर्व देवेंद्रनाथ याचेच संबंधी आहेत. याशिवाय ब्राह्मविधि न पाळणारे असे तीनचारशे सांप्रदायी आहेत. आदि ब्राह्मांनीं आपला संप्रदाय वाढावा, असा विशेष प्रयत्न कधींच केलेला नाही. ख्रिस्ती मिशनऱ्यांचे अनुकरण केशवचंद्राप्रमाणे त्यांनीं केले नाहीं. तसेच त्यांच्याप्रमाणे लोकात खळबळ उडवून देणारी व नाविन्याचा मोह उत्पन्न करणारी कोणतीच चळवळ त्यानी हातीं घेतली नाहीं. ह्यामुळे सदर संस्थेचा बोलबाला पृथकत्वाने फारसा झाला नाहीं; व त्या संस्थेचा शाखाविस्तारही पसरला नाहीं. आदि-ब्राह्म हा एक स्वतंत्र पंथ आहे, असा अभिमान न बाळगतां हिंदुधर्माचीच ती एक शुद्ध केलेली आवृत्ति आहे, असे मानण्यात ते भूषण मानतात. ब्राह्मसमाजाचे इतिहासकार

मि० लिओनार्ड हेही आपल्या इतिहासास एखाद्या विवक्षित पंथाचा इतिहास असें न मानतां आध्यात्मिक, सामाजिक व नैतिक बाबींत सर्वसामान्य हिंदुसमाजसुधारणेचें इतिवृत्त असेंच म्हणतात. आदिब्राह्मासंबंधी हें म्हणणें कांहीं अंशीं बरोबर दिसतें. त्यामुळेंच कांहीं इतर ब्राह्मपंथाप्रमाणें ह्या संस्थेचे सालोसालचे इंग्रजी अहवाल वगैरे प्रसिद्ध करण्याची त्यास आवश्यकता वाटत नाहीं. प्रसंगविशेषीं बंगालींत अहवाल प्रसिद्ध होतात, असें ऐकतों. 'तत्त्वबोधिनी पत्रिका' हें त्याचें पूर्वीचें मुखपत्र अद्यापही चालू आहे. तथापि त्या पत्रांत इतर समाजाच्या आचारविचाराबद्दल अथवा मतभेदाबद्दल प्रायः तटस्थवृत्तिच स्वीकारलेली असते.

आदि-ब्राह्मसमाजाचा सांप्रदायी हिंदूशिवाय इतरासही होतां येतें, तथापि अद्यापि तसा कोणी झालेला मात्र नाहीं. आदि-ब्राह्मसमाजात दैनिक प्रार्थना व चर्चा तिसरे प्रहरीं होते. दर आठवड्यास एक दिवस सायंकाळीं आठवड्याची उपासना होते. त्याचप्रमाणें मासिक उपासना सकाळीं होते. ह्याशिवाय वैशाखी प्रतिपदा व माघी एकादशी हे त्यांचे उत्सवाचे दिवस आहेत. अनुष्ठानिक ब्राह्मांकरितां देवेंद्रनाथांनीं कांहीं संस्कारप्रयोग बसविले आहेत. त्यांत फक्त मूर्तिपूजाप्रकार वगळण्याकडे कटाक्ष आहे. बाकी हिंदुधर्मशास्त्रास धरून त्यांचे सर्व विधि आहेत. देशकालानुसार त्यांत अल्पस्वल्प फेरफार करीत असतात. आदि-ब्राह्मसमाजाचीं कलकत्ता व धारवाड येथें दोन रुग्णालयें आहेत. ह्याशिवाय कविवर्य रवींद्रनाथांमुळे जगप्रसिद्ध झालेला शांतिनिकेतन आश्रम आणि विश्वभारती संस्था ह्याही आदि-ब्राह्मसमाजाच्या उपसंस्था आहेत, असें अभिमानपुरःसर मानण्यात येतें कविवर्य रवींद्रनाथ व त्यांच्या संस्था यांच्याबद्दल पुढें स्वतंत्र प्रकरणातून सविस्तर विचार करावयाचा असल्यामुळे, त्यासंबंधीं येथें अधिक लिहिण्याचें कारण नाहीं.

आदि-ब्राह्मसमाजाचे आजचे ट्रस्टी श्री० क्षितींद्रनाथ ठाकूर व श्री० रतींद्रनाथ ठाकूर ( रवींद्रनाथांचे चिरंजीव ) हे आहेत. समाजाच्या नियंत्रणासाठीं एक सल्लागारमंडळ आहे. तथापि वस्तुतः समाजाचा सर्व कारभार समाजाचे अत्यंत आस्थेवाईक चिटणीस श्री० क्षितींद्रनाथ हेच पाहतात. ते मोठे विनयशील व सुस्वभावी आहेत. बाबू राजनारायण बोस यांचे पश्चात् समाजाचे अध्यक्षपद अनुक्रमें बाबू सत्येंद्रनाथ ठाकूर ( देवेंद्रनाथांचे द्वितीय

चिरंजीव) व त्यांचे मागून सर आशुतोष चौधरी ह्या दोघां सुप्रसिद्ध पुरुषां-कडे होते. बाबू सत्येंद्रनाथ ठाकूर हे पाहिले हिंदी सिव्हिलियन होत. ते बरीच वर्षे मुंबई इलाख्यांत न्यायखात्यात अमलदार होते. त्या वेळी त्यांचा अहमदा-बाद, नाशिक, सातारा वगैरे ठिकाणच्या प्रार्थना-समाजांशी संबध आला होता. त्यांना मराठी चांगले येत असून त्यांनी श्रीतुकोबाच्या गाथ्याचे बगालीत भाषांतर केले आहे. ते स्वतः नामांकित कवि असून त्यांची ब्राह्मगीते सुप्रसिद्ध आहेत.

बाबू सत्येंद्रनाथ ठाकूर ह्या इलाख्यात अनेक ठिकाणीं डिस्ट्रिक्ट जज्ज असल्यामुळे दक्षिणी व गुजराथी ब्राह्मांशी त्याचा आणि त्याच्यामुळे त्याच्या घराण्याच्या दृढ परिचय होता. अहमदाबादचे सुप्रसिद्ध ब्राह्म-पुढारी प० भोलानाथ साराभाई यांचा व त्यांचा चागला स्नेह होता. त्यामुळे देवेंद्र-नाथांनीही अहमदाबादच्या प्रार्थनासमाजास भेट देऊन आपल्या गंभीर उपासनेचा त्यांस लाभ दिला होता. साताऱ्च्या 'सनातनधर्म प्रार्थना-समाजा'च्या संस्थापनेशी सत्येंद्रनाथ ठाकूर यांचा विशेष संबध पोचतो. सदर संस्थेच्या पहिल्याच वार्षिकोत्सवाच्या वेळी अध्यक्ष ह्या नात्याने सत्येंद्रनाथ ह्यांचे 'धर्मवासना' ह्या विषयावर मुद्देसूद व्याख्यान झाले. त्यात त्यांनी असे सांगितले कीं:—"जगामध्ये आपल्याला दोन प्रकार दृष्टीस पडतात: एक आधिभौतिक व दुसरा आध्यात्मिक. वैदिक ऋषि प्रथम आधिभौतिक जगांत ईश्वराचे स्वरूप पहात. पुढे उपनिषदांच्या वेळी ते बहिर्विषयांपासून निवृत्त होऊन अंतर्दृष्टिद्वारा परमात्म्याची आपल्या आत्म्यामध्ये उपलब्धि करून ब्रह्मानंदसुखाचा उपभोग घेऊं लागले. आत्म्याच्या ठायी जे परमात्म्याचे दर्शन तेच उत्कृष्ट दर्शन होय, व तेच ब्राह्मधर्माचे उपदेश्य तत्त्व आहे. ब्राह्मसृष्टींत ईश्वर स्वरूप पाहणे हे दुरून बघण्यासारखे आहे. मुसल-मान लोक महमदाला रसूल म्हणजे ईश्वर प्रेषित म्हणतात. ख्रिस्ती लोक ख्रिस्तास ईश्वराचा अवतार समजतात, आणि मुक्तिलाभासाठीं त्याची मध्यस्थी अवश्य पाहिजे असे सांगतात. परंतु आमचे म्हणणें तसे नाहीं. ते फक्त मार्गदर्शक; त्यांस फार झाले तर गुरुस्थानीं मानावे, त्यांच्या ठायीं ईश्वरत्व कांहीं नाहीं. ईश्वराच्या स्थानीं गुरूला बसविणें योग्य होणार नाहीं.... वैदिक काळीं देवतांच्या प्रतिमा अगर मूर्ति करीत नसत. "न

तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद्यशः" असें उपनिषदांत म्हटलें आहे. आपल्यास पूजनीय जी ब्रह्म वस्तु तिची मूर्तिपूजादि प्रकाराने ज्या मानानें अवनति होईल त्या मानानें आपल्या आत्म्याचाही अधःपात समजला पाहिजे. जे लोक ब्रह्मज्ञानाचे अधिकारी नाहीत, त्यांच्याकरितां साकार उपासना आहे, हे म्हणणेसुद्धां खरें आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. त्याच्या उलट मात्र स्थिति नजरेस येते. मुसलमान लोक सर्व अप्रतिम ईश्वराचीच उपासना करितात. यहुदी लोक एका निराकार परमेश्वराची पूजा करितात. सत्यास खाली ओढून आपल्या दर्जास आणता येत नाही. आपणच उन्नत होऊन त्यास गांठण्याचा यत्न केला पाहिजे. सत्यास प्रिय वाटण्याकरिता असत्याचे रूप देता कामा नये. कारण ज्ञान्यास तसें करण्याची जरूर नाही. व अडाण्यास तसें केल्यानें उलट अनिष्ट परिणाम मात्र होणार...कित्येक पंडित म्हणतात कीं, उपनिषदांचा मुख्य उपदेश अद्वैतवाद आहे. परंतु हे खरे नाही. उदाहरणार्थः— 'तमीश्वराणां परमं महेश्वरं। तं देवतानां परमंच दैवतम्। पतिं पतीनां परमं परस्ता।—श्वेताश्वतर, अ. ६, ऋ. ७.

**भावार्थः**— ईश्वराचा सर्वश्रेष्ठ महेश्वर, देवतांचे श्रेष्ठ दैवत, पतीचा श्रेष्ठपति, विश्वाचा स्वामी व पूजनीय अशा त्या देवाला आम्ही प्राप्त करून घ्यावें. 'द्विपात्र देव भुवनेश मीड्यम्' ह्यात जी विशेषणे आहेत, ती फक्त परमात्म्यासच लागतात, जीवात्म्यास कधीही लागू पडणार नाहीत. तसेंच—

> द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिष स्वजाते।
> तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्न्यो अभिचाकशीति ॥ १ ॥
> समाने वृक्षे पुरुषो निमग्नोऽनीशया शोचति मुह्यमानः।
> जुष्टं यदा पश्यत्यन्यमीशमस्यमहिमानामिति वीतशोकः ॥ २ ॥
> —मुंडकोपनिषद, मु. ३, खं. १, मं. १-२.

**भावार्थः**—दोन सुपर्ण ( म्हणजे समानभावास प्राप्त होणारे किंवा पक्षी ) सदा एकत्र राहणारे, समान आख्याताचे ( ज्याच्या अभिव्यक्तीचे कारण समान आहे ) असे ते दोघे समान वृक्षाच्या आश्रयानें राहतात. त्यांतील एकजण मधुर कर्मफळ खातो, आणि दुसरा स्वतः फळ न चाखतांच केवळ पाहतो. त्याच समान वृक्षामध्ये निमग्न झालेला पुरुष अनीशेनें ( दैन्याने ) मोहित

होत्साता शोक करतो. पण तो जेव्हां शांतचित्त होऊन योगी व कर्मी ह्यांच्याकडून सेविल्या जाणाऱ्या त्या दुसऱ्या ईशाला पाहतो, व सर्व जगत् हा त्याचाच महिमा आहे, असा निश्चय करतो, तेव्हां तो शोकरहित होतो."

"वरील मंत्रांत द्वैतभाव अगदी उघड आहे. अद्वैतवादापेक्षां कनिष्ठ जो मायावाद त्याची उत्पत्ति पुढे झाली. ब्राह्मधर्मास हे मत पसत नाहीं. हें सर्व जग व संसार जर मायामय आहे, तर मग आपल्या अस्तित्वाचे व या जगांत वांचण्याचे काय फळ?...एके बाजूस मूर्तिपूजा व दुसरे बाजूस अद्वैत व मायावाद ह्या दोन्ही खडकांवर आपले ब्राह्मधर्माचें तारूं थडकू न देतां मधोमध सरळ चालविले पाहिजे... ज्याचा उपदेश वेदांत व उपनिषदामध्यें उपलब्ध आहे; असा जो आजचा सनातन आर्यधर्म त्याचे ब्राह्मधर्म हे फक्त नामांतर आहे."

इंग्रजांच्या कलकत्ता ह्या नव्या राजधानींतील आदि ब्राह्मसमाजाचे अध्यक्ष ह्यांनीं मराठ्यांच्या सातारा ह्या जुन्या राजधानीच्या प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष होऊन दिलेलें हे व्याख्यान फार सुबोध व मुद्देसूद वाटल्यावरून त्याचा सारांश थोडा विस्तृत दिला आहे. एकदरींत सत्येंद्रनाथांनीं आपल्या परमपूज्य वडिलांच्या केवळ आत्मचरित्राचे भाषांतरच करून नव्हे तर त्यांच्या उपदेशाचे अनुकरण करून देवेंद्रनाथांचे यश वाढविलें यांत शंका नाहीं.

साधुवर्य द्विजेंद्रनाथ ठाकूर ( देवेंद्रनाथांचे ज्येष्ठ चिरंजीव ) ह्यांचाही आदिब्राह्मसमाजाशी पूर्वीपासून निकट संबंध चालत आलेला आहे. हे 'बडे दादा' व महात्मा गांधी ह्यांचा परस्परांसंबंधीं फार प्रेमभाव होता. महात्माजींच्या असहकारितेचे तत्त्वाशी डॉ० रवींद्रनाथांचा विरोध तर त्यांच्या ह्या वडील बंधूंची अत्यंत सहानुभूति, असा योगायोग दिसतो. असो. राजा राममोहन, राजा द्वारकानाथ, महर्षि देवेंद्रनाथ, साधुवर्य द्विजेंद्रनाथ, कविवर्य सत्येंद्रनाथ, डॉ० रवींद्रनाथ, सर आशुतोष चौधरी अशा नररत्नांनीं ही संस्था विभूषित झालेली आहे. ब्राह्मसमाजाच्या वंशवृक्षाच्या आज शाखा साऱ्या हिंदुस्थानांत पसरल्या आहेत. त्यांतील कित्येक शाखा वठलेल्या असतील तर कित्येक विशेष पल्लवित असतील. परंतु सर्वांचा मूलाधार आदि-ब्राह्मसमाजच आहे. आणि इतर शाखांच्या विस्तारांत किलबिल करणारा व

स्वैर भराऱ्या मारणारा पक्षीसमुदाय मोठा असला तरी ह्या मूलाधार स्थाणूच्या ढोलींत विराजमान झालेली ही बडीं बडी धेंडे पाहिलीं म्हणजे ह्या संस्थेसंबंधी कोणाचाही विनम्रभाव झाल्यावाचून रहात नाही.

भारतवर्षीय ब्राह्मसमाज स्थापन झाल्यानतरचा आदिसमाजाचा संकलित असा इतिहास प्रसिद्ध नाही. आम्ही ह्यासबंधी विशेष तपास करितां आदि-ब्राह्मसमाजाचे ट्रस्टी व सेक्रेटरी श्रीयत क्षितींद्रनाथ ठाकूर याच्याकडून आम्हांस थोडीशी माहिती मिळाली, ती वरती दिलीच आहे. त्याहून अधिक माहिती मिळाली नाही. प्रसिद्ध ब्राह्मइतिहासकार पंडित शिवनाथशास्त्री ह्यानी आदि ब्राह्मसमाजाचा इतिहास इ. सन १८६६ नंतरचा कांहीच दिलेला नाहीं. त्यापुढील सर्व कारकीर्द केशवचंद्राची आहे, असें म्हणून देवेंद्रनाथानीं आपले आत्मचरित्र तेथेच ग्युंटवले आहे. देवेंद्रनाथाचे चिरंजीव डॉ० रवींद्रनाथ ह्यांनी आपली कीर्ति दिगतीं पोचविली खरी; पण ती आदिब्राह्मसमाजाचे चालक म्हणून नव्हे. उलटपक्षी फर्कुहार ह्याचे म्हणणे असें आहे कीं, ब्राह्मधर्माचे पुढारी म्हणून देवेंद्रनाथांचा जो अधिकार होता, तो रवींद्रनाथास मिळाला नाहीं. किंवा त्यानीं तो मिळविण्याची आस्थाच बाळगली नाही. कारण रवींद्रनाथांचे असें म्हणणे आहे की, हिंदुस्थानांत जे नवजीवन उत्पन्न व्हावयाचे, ते ब्राह्मसमाजासारख्या तुटक संस्थाकडून होणारे नसून हिंदुधर्माचे अंतर्गत जरूर ती सुधारणा यथावकाश होत जाऊन त्या योगाने भरतभूमीचा उद्धार होईल.

इ. सन १९१० साली रवींद्रनाथांनी ब्राह्मसमाजांत ऐक्य घडवून आणण्याचा प्रयत्न केला होता. त्यानीं आदि ब्राह्म, भारतवर्षीय ब्राह्म व साधारण ब्राह्म अशा तिन्ही शाखांच्या पुढाऱ्यांची सभा भरवून पंडित शिवनाथशास्त्री, विनयेंद्रनाथ सेन, अजितकुमार चक्रवर्ती, अशा कित्येक गृहस्थांच्या साह्याने एक नवीन संस्था स्थापन केली. आपल्या शान्तिनिकेतनांतून क्षितिमोहनसेन ह्यांस बोलावून त्यांची आदि-ब्राह्मसमाजाच्या आचार्यपदावर नेमणूक केली. तत्पूर्वी त्यांनीं ते पद कृष्णकुमार मित्र ह्या सुप्रसिद्ध गृहस्थांकडे दिले होते. अशा रीतीने केशवचंद्र सेनांपासून आदि-ब्राह्मसमाजाचें आचार्यपद ब्राह्मणेतरांस मिळण्याबद्दल जो लढा होता तो मिटविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. व कांहीं काल समाजाचे कार्यही जोरांत चालविलें.

परंतु जुन्या पक्षाच्या विरोधास कंटाळून त्यांस तें लवकरच सोडून द्यावे लागले. आज पूर्वपरंपरेने ते जरी आदि-ब्राह्मसमाजाच्या सभासद आहेत तरी ते असे म्हणतात कीं, त्यांचा कल ब्राह्मसमाजाचे साधारण ब्राह्मसमाज ह्या वजनदार शाखेकडेच जास्त आहे, व त्या शाखेचे ते एक सन्माननीय सभासदही आहेत.

रवींद्रनाथ एकेश्वरी मताचे खरे; पण त्यांस आपण एका वेगळ्या पथाचे असें म्हणवून घेणे बिलकूल पसंत नाहीं. निरनिराळे पंथ, संप्रदाय किंवा संस्था ह्यांचा ते मनापासून तिट्कारा करतात धर्मप्रचारकांच्याद्वारे धर्मप्रसार करणे त्यांस मुळींच आवडत नाहीं. ते स्वतः उत्कृष्ट धर्मोपदेशक आहेत. परंतु सांप्रदायिक उपासनेस क्वचितच हजर असतात. अलीकडे ते मुंबईस आल्या वेळीं मुंबईतील प्रार्थनासमाजाची उपासना त्यांनीं एकदां चालवावी असा प्रयत्न झाला होता; परंतु तो योग आला नाहीं. त्यांच्या कोणत्याही व्याख्यानांत अगर लेखांत ब्राह्मसमाज-संस्थेचा कधीच उल्लेख येत नाही. अशा स्थितींत ह्या नामधारी ब्राह्माचा व त्याच्या कार्यव्यापृत्वाचा अगर विचारांचा ह्या ग्रंथांत अधिक उल्लेख करण्याचे काहीच कारण नव्हते. परंतु ह्यासंबंधीं आजचे आदि-ब्राह्मसमाजाचे एक प्रमुख चालक श्रीयुत क्षितींद्रनाथ ठाकूर, यास मुद्दाम पत्रद्वारे विचारतां वरील विचारसरणी गैरसमजूत करणारीं आहे, असे ते कळवितात. त्याच्या म्हणण्याप्रमाणे आदि-ब्राह्मसमाजाशीं रवींद्रनाथांनी आपला संबंध कधींच सोडलेला नाही; व तसा तो तुटण अशक्यच आहे. ते ब्राह्मकुटुंबांतच जन्मास आले व लहानाचे मोठे झाले. त्याचे चिरंजीव रथींद्रनाथ हे आदि-ब्राह्मसमाजाचे आज एक ट्रस्टी आहेत. रवींद्रनाथ हे स्वताही ब्रह्मोपासना अनेक प्रसंगी चालवितात. ब्राह्मसमाजाच्या शतसांवत्सरिक उत्सवाचे वेळीं (१९१६) त्यांनीं केलेली अत्यंत सुश्राव्य उपासना लोक अद्यापही विसरले नाहींत. अशा रीतीने रवींद्रनाथ व त्यांची संस्था ह्यांचा अंतर्भाव आदि-ब्राह्मसमाजांतच होतो, अशी त्यांनी खातरजमा केल्यावरून त्यासंबंधीं सविस्तर माहिती आम्ही पुढील प्रकरणांत देत आहोत.

---

## प्रकरण बारावें

# रवींद्रनाथ-दर्शन

रवींद्रनाथांचा जन्म इ. सन १८६१ सालीं झाला. देवेंद्रनाथाचे ते सर्वांत धाकटे चिरंजीव होत.

पौराणिक काळातील जडभरत, अथवा ऐतिहासिक काळातील श्रीसमर्थ रामदास किंवा आधुनिक काळातील श्रीरामकृष्ण परमहंस, ह्या महात्म्यां-प्रमाणे रवींद्रनाथास शाळेतील शिक्षणाचा मनापासून कंटाळा असे. देवेंद्र-नाथाच्या घरी विषयागणिक वेगवेगळ्या शिक्षकाची व्यवस्था असे, परंतु रवींद्र-नाथानीं अभ्यासाबद्दल कधीच आस्था बाळगली नाहीं. असे सांगतात की, ते लहानपणी आपल्या पायातले बूट मुद्दाम वरचेवर पाण्यात भिजवून थंडीच्या तापास आमंत्रण देत, आणि मग रोग पाहुणा घरी आला, म्हणजे शिष्टागमने अनाध्यायाचा त्यास हटकून लाभ घडे ! मुलाचे बालस्वभावाप्रमाणे लहानपणी "शाळा शाळा" हा खेळ म्हणून तेही खेळत असत. आपल्या खोलीजवळील सज्जाचे कठड्याची शाळा करून कठड्यांच्या गजाना मुले समजून बेदम ठोकणें, हीच त्यांची शाळेची कल्पना होती. शिक्षणाच्या निमित्ताने पुढे ते इंग्लंडचेही पाणी पिऊन आले, पण व्यर्थ. ज्या परीक्षा उतरण्यावर हल्लीची विद्वत्ता मापली जाते, अशी एकही परीक्षा ते उतरले नाहीत. तथापि त्यांच्यामध्ये एक गुण होता, तो गाण्याचा, व एक अवगुण होता, तो पोरकेपणाचा. त्यांची आई त्याच्या लहानपणींच वारली. ह्या विशिष्ट गुणावगुणांमुळे वडिलांचें त्याच्यावर अधिक प्रेम असावें असें वाटते, ते आपले देशपर्यटनांत रवींद्रांस नेहमी बरोबर घेत.

रवींद्रनाथ आपल्या अतिशय मधुर वाणीने ईशस्तवपर पदे म्हणू लागले, म्हणजे तीं एकून देवेंद्रनाथांची वृत्ति तन्मय होऊन जाई. गारुड्याच्या पुंगीने नाग ज्याप्रमाणे डोलूं लागतो, तसे रवींद्रांच्या गोड आलापांनीं देवेंद्रनाथ आत्मा-नंदानें डोलूं लागत. देवेंद्रनाथांच्या हिमालयांतील एकांतवासांत रवींद्रनाथ हे हमेश त्यांच्याबरोबर असत. ह्या बालरवींद्राने आपणांस ब्रह्मभावाचा अनुभव,



रवींद्रनाथ टागोर

सुलभ करून दिला, असें देवेंद्रास वाटून ते त्यांजवर जणुं काय गोपाळकृष्णा-प्रमाणे अलौकिक प्रेम करीत. उलटपक्षीं वडिलाचे निरुपाधिक भावानंदाचे संस्कार बालरवींद्राच्या मनावर होऊं लागले. हिमालयातील निर्जन प्रदेशीं महर्षि समाधिसुखांत मग्न असता आईवाचून पोरक्या झालेल्या बाल-रवींद्रांवर निसर्गदेवता प्रेम करू लागली. आणि लवकरच त्या दोघांमध्यें मोठीच गट्टी जमली महर्षि हे भूदेव, निसर्ग देवता भूदेवी आणि रवींद्रनाथ हे उभयताचे मूकभक्त असे हे त्रिकूट जमले.

खिस्ती अगर मुसलमानी गृहस्थाच्या मुलास मूर्तिपूजेचा निषेध जसा उपजतच प्राप्त असतो, तशीच रवींद्रानाथाची स्थिति होती. त्याच्या जन्मापूर्वी त्याच्या घरच्या देव्हाऱ्यातील श्रीगोपीनाथ ठाकुरजी अतर्धान पावले होते. देव्हाऱ्यातून देव गेले. मग त्याच्या कथास कोण पुसतो ? देवीची स्तोत्रे, गोपीगीते, अथवा रामाचे पाळणे लहान मुलाच्या कानी पडावयाचे, ते बंद झाले, व उपनिषदाचे पाठ रोज सुरू झाले. ह्या परिस्थितीचा परिणाम रविंद्रनाथावर सहजच घडला असला पाहिजे. त्यात लहानपणीच त्याना एकदा दिव्यदर्शन झाले होते ! त्याचा प्रकार असा:—एक दिवस सकाळीं रवींद्रनाथ आपल्या घराच्या सज्जात उभे राहून पुढील रस्ता व घरे याजकडे शून्य दृष्टीने पहात होते. त्या पुढील देखाव्यांत प्रेक्षणीय अथवा स्फूर्तिदायक असे काहीच नव्हते. नुकतेच सूर्याचे किरण समोरील झाडींतून वर येत होते; अशा वेळी त्याची दृष्टि सहज तिकडे लागली असतां, कर्मधर्मसंयोगाने असा प्रकार घडला की, जणु काय त्यांच्या दृष्टीवरील एक पडदाच दूर झाला. आणि त्याना सर्व सृष्टि एक विलक्षण तेजाने न्हाल्यासारखी दिसू लागली ! जिकडे तिकडे सौंदर्याच्या व आनंदाच्या लाटा उसळू लागल्या ! ते तेज रवींद्रांच्या अतःकरणात शिरून त्याने त्याच्या चित्ताचे औदासीन्य व निराशा तत्काळ घालविली; आणि सार्वत्रिक दिव्य प्रकाशाने त्याचे चित्त व्याप्त झाले. त्या आनदाच्या ऊर्मीतच धबधब्याची जागृति ( Awakening of the water-fall ) ही त्याची कविता निर्माण झाली.

मागपासून चालत आलेला विचाराचा मूर्तिमंत ओघ कविकल्पनेच्या उंच कड्यावरून जेव्हां उडी घेतो, तेव्हां त्याचे पूर्वीचे जिज्ञासारूप तहान भागविण्याचें रूप पालटून त्याचे तुषारांचे मेघ बनतात, व त्यांत नसलेलीं

इंद्रधनुष्यें चमकूं लागतात. रवींद्रनाथांच्या बुद्धिप्रवाहाचें एक टोंक धबधब्यांत तुषारमय झाले आहे, आनंदमय झाले आहे, तर दुसरें उगमाचे टोक त्यांच्या जीवनदेवतेच्या संचाराने चिन्मय झाले आहे. निसर्गाच्या पुस्तकाशिवाय बालरवींद्रांनी मनापासून कसला अभ्यास केला असेल तर तो वैष्णव कवींच्या वाङ्मयाचा होय.

अशा रीतीने ह्या बाल साधकाचे पुढे बालकवि झाले. थोड्या प्रौढवयांत आल्यानंतर देवेंद्रनाथानी आपल्या विस्तीर्ण इस्टेटीपैकीं एक गांवचा कारभार रवींद्राच्या स्वाधीन केला. गंगेच्या कांठावरील त्या खेडवळ गांवांत रवींद्र-नाथांनीं पुष्कळ वर्षे काव्यानंदांत घालविली. तेथे निसर्गाशी मनमुराद विचारविनिमय सुरू असतां निसर्गदेवतेच्या गरीब व खेडवळ प्रजेशी त्यांचा दृढ परिचय झाला. आणि त्या गर्भश्रीमंत कवीच्या काव्यांत श्रीमंतीच्या राजविलासापेक्षां गरीबाची झोपडीच वारंवार येऊं लागली. लोकसंग्रहाच्या शाळेतील कांहीं यत्ताचा अभ्यास तेथे झाल्यावर लोकसंग्रहाची अधिक जबाब-दारीची कामे करण्याची महत्त्वाकांक्षा वाढून ते बंगालच्या फाळणीसारख्या राजकीय चळवळीत जोराने सामील झाले. परंतु लवकरच त्या धकाधकीस कंटाळून त्यांना पुन्हां शान्तिनिकेतनाची आठवण झाली. ते तेथे परत गेले महर्षींच्या सल्ल्याने त्यांनी इ. सन १९०१ सालीं तेथे एक ब्रह्मचर्याश्रम-व शाळा अशी एक जोड-संस्था काढली होती.

रवींद्रनाथांची ग्रंथसंपत्ति इतकी दांडगी आहे कीं, त्यांच्याच ग्रंथांनीं एक लहानसें कपाट भरेल असें म्हणतात. त्यांचे एक चरित्रकार लिहितात कीं, रवींद्रनाथांचे वाङ्मय जितकें जलद बाहेर पडत आहे, तितकें जलद ते वाचण्यासही वेळ पुरत नाही. एकांतवासांत बसून विचार करण्याचा त्यांना फार शौक असल्यामुळे त्यानी आपले निवासस्थान बोलपूर ह्या खेडेगांवीं ठरविले आहे. तेथे बसून त्यांनीं कविता, गोष्टी, नाटकें, कादंबऱ्या, निबंध, प्रवचने, व्याख्याने इत्यादि अनेक रूपानी फार चित्ताकर्षक असें वाङ्मय प्रसिद्ध केलें आहे. इतकें विविध व विपुल वाङ्मय दुसऱ्या कोणत्याही पाश्चात्य ग्रंथकाराने प्रसिद्ध केले नसेल.

रवींद्रनाथ आपल्या बालपणीं वडिलांच्या सहवासांत आत्मोन्नतीचा धडा शिकले, पुढे आपल्या गावढे गांवास राहून स्वकीयांच्या उन्नतीचा धडा

त्यांनीं तयार केला, त्यानंतर ते राष्ट्रोन्नतीकडे वळले, आणि अखेर हल्लीं अखिल मानवकोटीची उन्नति व्हावी ही महत्त्वाकांक्षा त्यांनी धरली आहे. ह्या त्याच्या चारित्र्याच्या अनेकविध टप्प्यांत ब्राह्मसमाजोन्नतीस त्यांनीं स्वतंत्र स्थान दिले नाही. धर्माकडे ते अगदीं अखेरीस वळले, तरी पण त्यानीं ब्राह्मसमाजाबद्दल विशेष अभिमान बाळगला नाही. धार्मिक विचाराच्या प्रवाहात धार्मिक सस्थाचे अवडंबर माजविणे म्हणजे वाळवटाने नदीचा जिवंत व स्वच्छ प्रवाह आडवून कुजविण्यासारखेच आहे, असे त्याचे मत दिसतें. ते अंतःकरणाचे खरे ब्राह्मच आहेत, आणि त्याच्या ब्राह्मोपासना शान्तिनिकेतनमालेत प्रसिद्धही झाल्या आहेत.

तथापि आमच्या मते त्यानी अलीकडे एका व्याख्यानात आपल्या पुराणेतिहासाचे जे रहस्य सागण्याचा प्रयत्न केला आहे, त्यायोगाने अप्रत्यक्ष रीतिने हिंदूच्या मूर्तिपूजेवर व जुन्या धर्मभावनावर जो परिणाम होईल, तसा परिणाम त्याच्या अगर इतर ब्राह्मलेखकांच्या दुसऱ्या कोणत्याही लेखांनी आजपर्यंत क्वचितच झाला असेल. वेदराशीतून आधिभौतिकशास्त्राचे अर्वाचीन शोध आर्यसमाजानीं काढून दाखविले, तर ज्याप्रमाणे आधिभौतिक शास्त्रज्ञांस पटणार नाहीत, त्याचप्रमाणे पुराणग्रंथांतून रवीद्रनाथांनीं काढलेली कित्येक अनुमाने पुराणमताभिमानी लोकास सहसा पटणार नाहीत, हे उघड आहे. परंतु आजकाल व उद्या सुशिक्षित वर्गात मोडल्या जाणाऱ्या समाजात रवींद्रनाथांचा वरील निबध बुद्धिभेद केल्यावाचून राहणार नाही, हेही निश्चित आहे. महाराष्ट्रीय लेखकांत असे विचिकित्सेचे प्रयत्न कित्येक विद्वानानीं यापूर्वी केलेले लोकांस मुळीच पटले नाहींत. परतु रवीद्रनाथाचे कल्पनाचातुर्य अलौकिक असल्यामुळे प्रकृत विषयावरील त्यांचे विचार अधिक परिणामकारक होण्याचा सभव आहे. ह्यास्तव आम्ही त्या महत्त्वाच्या विषयाचे खालीं थोडक्यांत दिग्दर्शन करीत आहोंत.

भिन्न वंशाच्या व संस्कृतीच्या समाजांस जेव्हां एका देशांत राहण्याचा काळ येतो, तेव्हां त्यांच्यामध्ये एकीकरण करण्याचे पहिले प्रयत्न अगदी कृत्रिमपणाचे असतात. त्यांत जिवंतपणाची जोड नसते. हिंदुसमाजांत सस्थिति व विकास ह्या दोन तत्त्वांचा झगडा फार प्राचीनकाळापासून सुरू आहे. जनमेजयाच्या क्रूरपणाच्या सर्पसत्रांत आर्य व अनार्य ह्यांच्या पहिल्या लढ्यांत

नागवंशाचा निःपात झाल्याचे आढळते. त्या जनमेजयाचे आज कोणीच नांव काढीत नसून ज्यांनी आर्य व अनार्य यांच्यांत सलोखा घडवून आणला अशा पुरुषांस मात्र ईश्वरी अवतार समजलें जाते. हा मिलाफ घडवून आणण्याच्या महत्कार्यात जनक, विश्वामित्र व रामचंद्र ह्या तीन व्यक्ति म्हणून प्रसिद्ध आहेत. ह्या व्यक्ति समकालीन असतील असे नाही. किंबहुना त्या व्यक्तिच नसून प्राचीन भिन्न समाजाची ती मूर्तिमत ध्येयें आहेत. आपल्या पुराणांतील इतिहास म्हणजे क्षात्रतेज व ब्रह्मतेज ह्यांच्या झगड्याचा इतिहास होय.

चतुर्मुख ब्रह्मदेव म्हणजे मूर्तिमंत चतुर्विध वेदोराशी होत. आणि तत्कुलोत्पन्न भृगु म्हणजे वैदिक याज्ञिकांचा एक काल्पनिक प्रतिनिधिच जाणावा. त्याचाच वंशज जमदग्नि. ह्या जमदग्नीच्या धेनुहरणाच्या निमित्ताने पुढे परशुरामाकडून होणारा क्षत्रियांचा दारुण संहार हे ब्रह्मक्षत्र-युद्धाचे एक रूपक आहे. ह्या युद्धाचा शेवट अखेर क्षत्रिय कुलाचा प्रतिनिधि जो रामचंद्र त्याच्या दिग्विजयांत झाला. त्या कामीं त्यास जनकरूप कर्मवीराचे अत्यंत साह्य झाले. "कर्मणैवहि संसिद्धिमास्थिता जनकादयः" ह्या वाक्यांत याज्ञिक ब्राह्मणांचे विरोधी तत्त्व दर्शित केले आहे. समाजाची सस्थिति राखण्याचे काम ब्राह्मणाकडे असे. त्याच्याकडून समाजाच्या स्वातंत्र्यास व विकासास प्रतिबंध होई. निरनिराळ्या वैदिक देवता व त्याच्यानिमित्त होणाऱ्या यज्ञयागाचे कर्मकांड ह्यांच्या योगाने ब्राह्मण-वर्ग समाजास नियंत्रण घालीत असे. व क्षत्रियवर्ग स्वातंत्र्यप्रिय, विकसनशील, व एकाच देवास भजणारा असा असे. तो एक देव म्हणजे सूर्य व त्याचे वंशांतील रामचंद्रादि हे विष्णूचे अवतार म्हणवितात. चार वेदाचा द्योतक जसा चतुर्मुख ब्रह्मा, त्याचप्रमाणे एका ईश्वराची सत्ता पुकारणारा, एकीच्या वर्तुलाची कक्षा वाढविणारा, कायद्याचा राजदंड मिरविणारा, आणि सौंदर्य व विपुलता ह्यांची वृद्धि करणारा, असा शंखचक्रगदापद्मधारी विष्णु, म्हणजे लोकसंग्रहात्मक कर्मयोगाची एक प्रतिमा होय.

आर्यांची ब्रह्मविद्या ही अरण्यांतच उदयास आली खरी; पण त्यांत पुढे द्वैती व अद्वैती असे दोन पंथ निघाले. द्वैत न मानावे तर उपासना संभवत नाहीं. अद्वैत न मानावे तर उपासनेंत प्रेमपूर्वक तादात्म्य सिद्ध होत नाहीं. परंतु असा हा सूक्ष्म भेद असला तरी पूर्वीचे वैदिक देव जीवांहून भिन्न मानण्यांत येत. तो भिन्नभाव दूर होऊन जीवशिव हे युग्म प्रेमाने जोडलें

गेले. ह्या भक्तिमार्गाचा पुरस्कार विष्णुमार्गी वैष्णवांनींच केला. कर्मकांडाचें नियंत्रण तोडून क्षात्रतेज बाहेर पडले. विष्णूने आपल्या वक्षःस्थलावर भृगूचे पदलांछन मिरविणे हे ब्रह्मक्षत्रयुद्धाचे प्राथमिक स्वरूप होय. परतु पुढे विष्णूचा अवतार व वैष्णवांचा इष्ट देव जो कृष्ण, त्याने भगवद्गीतेत वैदिक कर्मकाडाचा उपहासच केला आहे. राम व कृष्ण ह्यास विष्णूचे मानव-देहधारी अवतार मानीत असून ते दोघेही क्षत्रिय आहेत.

कृष्णाने उपदेशलेली भगवद्गीता ही राजर्षींच्या परंपरेने प्राप्त झालेली असून वरील क्षात्रपंथाचाच धर्म दर्शविते, आणि भारतीय युद्ध हे भावाभावाच्या तंट्यात उपस्थित झालेले नसून, ते याज्ञिकी ब्राह्मणधर्म, व भागवत क्षात्रधर्म यांमधील दारुण झगड्याचे एक दर्शक आहे. आणि म्हणूनच क्षात्रधर्माचा प्रतिनिधि जो पार्थ त्याचा सारथी कृष्ण होता, असे वर्णिले आहे. हे कृष्णाचे सारथ्य अथवा पुढारीपण द्रोणाचार्य, कृपाचार्य इत्यादि ब्राह्मणास व तत्पक्षीयास मान्य नव्हते. अध्यात्मविद्येचे प्रणेते विशेषकरून याज्ञवल्क्यादि ब्राह्मण होते. तरी नीति व प्रीति ही समाजोन्नतीची ध्येये क्षत्रियांनी अंगिकारली होती. आणि महत्त्वाची गोष्ट अशी की, मन्वादिकापासून तो रामकृष्णापर्यंत सर्व क्षत्रिय पुढाऱ्याच्या ठिकाणी ईश्वराचा आदेश अगर अंश मानण्याचा संप्रदाय सर्व-मान्य झाला आहे. ब्राह्मणाचा प्रतिनिधि परशुराम ह्यासही जरी विष्णूचा अवतार म्हणत असले तरी ते केवळ औपचारिक आहे. रामकृष्णाप्रमाणे त्यांनी भक्तांचे अंतःकरण कधीच व्याप्त केले नाही. ह्याचे कारण असे दिसते, की भिन्न समाजावर जबरदस्तीची सत्ता गाजविण्यापेक्षा सहानुभूतीच्या नैतिक बंधनांनी भिन्न लोकात सलोखा घडवून आणण्यातच ईश्वराची नियति बरोबर व्यक्त होते, असे आपण मानीत आलो आहोत, आणि रामकथेला आज जे भलतेच रूप आले आहे, ते तसे देण्यात आले नसते, तर रामायणाचा वास्तविक भावार्थ हाच आहे, हे आपणास सहज कळून आले असते. हनुमानचिन्हांकित अशा अनार्य व पतित समाजास रामचंद्राने आपल्या उदार सहानुभूतीने आपलेसे केले, हेच अखिल रामायणाचे सार आहे. विष्णूचा मानलेला तिसरा मानवी अवतार बुद्ध, हाही बुद्धीचे स्वातंत्र्य, मनाचे औदार्य, सहानुभूतीची व्यापकता, व स्वार्थत्याग, ह्याच क्षात्रध्येयाचा पुतळा होय.

ब्रह्मक्षत्रद्वंद्वांत ब्राह्मणांच्या नांवाने खडे फोडण्याचा कित्येक टीकाकारांचा

पेशा आहे, परंतु ती चूक आहे. ह्या विरोधी वाटणाऱ्या शक्ति वस्तुतः परस्पर पूरक व पोषक असून त्यांतच इतिहासाची उत्क्रांति होत असते. शेतात बी पेरणारा आपले शेत धरून बसतो, परंतु मालाचा व्यापार करणारा आपल्या स्वातंत्र्याने धान्याचा चोहोंकडे दूर फैलाव करतो. ह्या दोन वृत्ति विरोधी दिसल्या तरी एकाची सार्थकता दुसऱ्यांत आहे. गति ही स्थायीभावावरच अवलंबून आहे, हे विसरता कामा नये.

अरण्यवासी ब्राह्मण व शहरे वसविणारे क्षत्रिय, ह्यांची चुरस वसिष्ठ-विश्वामित्र कथेत ग्रथित केलेली आहे. तथापि हे लक्षांत घेण्यासारखे आहे कीं, ब्राह्मण आणि त्यांची विद्या यांचे महत्त्व जाणणारे व त्यांचा पुरस्कार करणारे हरिश्चंद्र, जरासंध, कर्ण, शिशुपाल इत्यादि क्षत्रिय वीर होतेच. ब्रह्मविद्याकुमारीचे रक्षण हरिश्चंद्राने केले. जरासंधाच्या राज्यांत जातांना कृष्णास व पांडवास ब्राह्मणाचा वेष घ्यावा लागला. वैदिक देव जो इंद्र त्याचा निषेध करून कृष्णाने अभीरांचा चरणीचा गोवर्धन डोंगर राखला, इत्यादि अनेक कथातूनही ब्रह्मक्षत्रपथांची चुरसच स्पष्ट होत आहे. ह्यांतील सर्व व्यक्ति ऐतिहासिक असतील असे नाहीं. उदाहरणार्थ, रामायण आणि महाभारत काळात महदंतर असतां रामायणाच्या व भारताच्या आरंभी परशुराम ही एक व्यक्ति प्रामुख्याने पुढे येते. भारती युद्धांतील अर्जुनाचे प्रतिस्पर्धी द्रोणाचार्य व कर्ण हे दोघेही स्वतःस परशुरामाचेच शिष्य म्हणवितात. अर्थात् परशुराम ही व्यक्ति नसून क्षत्रियविरोधि अशा तेजाची ती एक मानलेली मूर्ति आहे आहे हे उघड होते. कविकंकणचंदी या बंगाली काव्यांतही शिव आणि चंदी ह्या दोन व्यक्तींच्या मागे आर्य व अनार्य ( व्याध ) यांच्या पंथांचा असाच एक झगडा आहे.

वसिष्ठ-विश्वामित्रांचे पुराणप्रसिद्ध वैर हे ब्रह्मक्षत्रविरोधाचेच द्योतक आहे रामचंद्र प्रथम वसिष्ठ पुरोहिताचे दीक्षित वाढला खरा; परतु त्याचे बालपणींच विश्वामित्रानें त्यास तेथून काढून क्षात्रधर्मास प्रवृत्त केले. त्यापुढील रामाचे कार्य द्विविध होते. विश्वामित्र आणि राजा जनक हे त्याचे मार्गदर्शक होते जनक हा आर्यांचा अत्यंत श्रेष्ठप्रतीचा राजा होय. तो ब्रह्मवेत्ता असूनही त्याने आर्यांची हिंदुस्थानांत वसाहत करण्याच्या कामीं पुढाकार घेतला होता. तो मिथिलेचा राजा होता. त्याच्या कारकीर्दींत आर्यांची वसाहत विंध्याद्रीच्य

उत्तरेपर्यंत झाली होती. परंतु पुढे विंध्याद्रीची अभेद्य रांग ओलांडून आर्यांची वस्ती पलीकडे पसरविण्याचे कार्य त्याने रामचंद्राकडे सोपविले होते. वसाहत करण्यासाठी जंगले तोडून जमीन लागवडीत आणणे जरूर होते. तसे करतांना अरण्यांतील रानटी लोकांशी झगडल्यावाचून गत्यंतर नव्हते. आणि तेंच काम करण्यासाठीं विश्वामित्राने रामलक्ष्मणास आपल्या बरोबर नेले होते. पूर्वी गौतम नामक आर्यांनी दक्षिणेत वस्ती करण्याचा प्रयत्न केला होता. परंतु त्याने संपादन केलेल्या जमिनीने अखेर दगा दिला. तेव्हा त्या विश्वासघात करणाऱ्या कठीण भूमीचा त्यास त्याग करावा लागला. ती खडकाप्रमाणे अत्यंत कठीण भूमि रामाने लागवडीस आणली. त्याचेंच पुढे आहिल्योद्धार ह्या कथेत रूपक झाले. रामचंद्राने पुढे अरण्यातील राक्षसांचा वध केला, आणि नंतर ब्रह्मतेजाशीही झुंज घेऊन परशुरामास हतबल करून टाकले.

सीतास्वयंवर ही कथाही एका दीर्घकाल चाललेल्या प्रचंड उद्योगाचे रूपक आहे. सीता म्हणजे शेती. ती रामास मिळवावयाची होती. परंतु वाटेत आडवी विंध्याद्रीची प्रचंड रांग होती. विंध्याद्रीचे पाठीशीं अनार्य द्रवीड लोकांची वस्ती असून त्यांचे शिव हे दैवत होते. तेव्हा शिव दैवत असलेला तो विंध्य म्हणजेच शिवधनु; त्याचा भंग केल्यावाचून सीता म्हणजे शेती संपादन करणे अशक्य होते. प्राचीन आर्यांच्या उपजीविकेचें पहिले साधन गोधन हे होते, परंतु पुढे जनकाने शेती उत्पन्न केली. जनकास भूमींत सांपडलेली सीता ती तीच होय. ब्रह्मवेत्त्या जनकास विदेही म्हणण्यातील तात्पर्य तरी ह्यांतच आहे. समाजाच्या स्थैर्यास व संगोपनास शेती हे नवीन साधन त्यास उपलब्ध झाले. आणि विंध्यारूप शिवधनूचा रामाने भंग केल्यामुळे जनकाची आवडती सीता म्हणजे शेती त्यास संपादन करता आली. पुढील रामाचे वनाभिगमन हेही वसिष्ठ-विश्वामित्रद्वंद्वात विश्वामित्राच्या ध्येयाचेंच विजयसूचक आहे. जमदग्नीचें धेनुहरण, कौरवांची भाऊबंदकी व जुगार, तसेंच कैकयीचा हट्ट, अशी क्षुद्र कारणे निमित्तास पुढे करून पुराण-कारांनीं इतिहासांतील अत्यंत गंभीर प्रसंगांच्या रहस्याची भयंकर हानि केली आहे.

सीतास्वयंवराप्रमाणें द्रौपदीस्वयंवराचा कथाप्रसंग हा रूपकादाखलच

आहे. सीतास्वयंवराचे वेळीं अहिल्योद्धार, राक्षसांचा वध व शिवधनुभंग इत्यादि रूपकात्मक परीक्षेचे प्रसंग जसे रामावर आले, त्याचप्रमाणे महाभारताचा नायक जो अर्जुन त्याच्यावरही द्रौपदीस्वयंवराच्या निमित्तानें अत्यंत बिकट अशा परीक्षेची वेळ आली. पांचाळ देश हा क्षात्रतेजाचें एक स्थान होते. पांचाळ देशीचा क्षत्रिय राजा द्रुपद व द्रोणाचार्य याच्यामधील समान हक्कांचे भाडगच पुढे महायुद्धापर्यंत विकोपास गेले. क्षत्रिय हे सूर्याचे उपासक. सूर्याच्या उपासनेतून त्यानी एकेश्वरी उपासना उचलली. एका सूर्याच्या ठिकाणींच–त्याचे पोटातच–सत्य आहे. अत्यत चंचल अशा वासनात्मक संसारात असता, चित्त एकाग्र करून त्या अतर्यामिन् सत्याचा वेध घेणे, हेच गीतेतील योगाचे सार होय ही जी कृष्णप्रणीत योगसिद्धि तीच कृष्णा ऊर्फ द्रौपदी होय. सूर्योपासनेची फलश्रुति त्याच कृष्णेचे ठिकाणी झाली आहे. कितीही वाटले तरी न सपणाऱ्या ज्ञानामृताची थाली जिला मिळाली तीच ही योगसिद्धि कृष्णा होय. ह्या कृष्णेच्या प्राप्तीकरिता मत्स्यभेदाचे दिव्य अर्जुनास करावे लागले. तो मत्स्यभेद म्हणजे ह्या ससारपरिभ्रमणात मध्यवर्ति गूढ असलेल्या सद्रूप ब्रह्माचे अन्वेषण होय, किंवा मत्स्यचक्र हे सूर्यबिंबाचेही रूपक असेल. कारण सूर्य हा देवाचा देव आहे. तोच सर्वाचा प्रकाशक आहे, आणि सत्य हे त्याचेच ठिकाणी आहे. असे उपनिषदातून गाइलेले आहे; सूर्योपासनेचे महत्त्व इराण, इजिप्त वगैरे देशातूनही फार प्राचीनकाळापासून मानलेले आहे; आणि ह्या सूर्योपासनेतच ब्रह्मोपासनेचे मूळ असावे.* असो. ह्या कृष्णारूप तत्त्वाचा अंगिकार पाची पाडवानी केला हे सगळच झाले. सदर कथेतील हे रहस्य लक्षांत घेतले म्हणजे पांडव हे बहुपतित्व मानणाऱ्या एखाद्या रानटी टोळीपैकी होते इत्यादि तर्क करण्याचे कारण नाही. आणि कर्णासारख्या क्षत्रिय वीरानेही आपल्याला वरावे हा कृष्णेच्या मनात आलेला विकल्पही भूषणावहच ठरतो.‡ पांचाळ देश मथुरेच्या जवळच असल्यामुळे कृष्णाने प्रतिपादिलेली गीता ही तेथेही मान्य होती. अर्थात् कृष्णाची गीता तीच द्रुपदाची द्रौपदी होय.

---

*प्रणवो धनुः शारो ह्यात्मा ब्रह्म तल्लक्ष्यमुच्यते.

‡ ही कल्पना मूळ निबंधांत नाहीं. मूळ कल्पनांस पोषक अशा ज्या आम्हाला कल्पना सुचल्या त्याचाही संग्रह ह्या लेखांत केला आहे.

औपनिषदिक धेनूचें दोहन करून कृष्णानें काढलेली जी सुधा तीच कृष्णा होय. त्यांचा असा हा अत्यंत निकटचा संबंध असल्यामुळे तिच्या तोंडीं कृष्णाचा धावा आला, आणि कृष्णकृपेनें तिचें सत्त्वरक्षण झालें. ह्या कथेचें रहस्य अशानें नीट समजतें. तात्पर्य, सीता व द्रौपदी ( म्हणजे कृष्णा ) ह्या व्यक्ति नसून ह्या दोन जबरदस्त शक्ति आहेत. हीं दोन ध्येयें आहेत. द्रोणाचार्य हे अनेक विश्वदेव मानणाऱ्या वेदविद्येचे प्रतिनिधि असल्यामुळे त्यांचे पक्षपाति कौरव ह्यांनीं गीतातत्त्वरूप कृष्णेचा उपमर्द केला. तसेंच रावणासारख्या रानटी राक्षसानें ( अथवा ब्राह्मणानें पाहिजे तर म्हणा ) खरी खरी जगज्जननी जी सीता तिचेंही सत्त्वहरण करण्याचा प्रयत्न केला. परंतु कृष्णानें व रामचंद्रानें प्रतिपक्षाचा पाडाव करून उभय ध्येयाचा विजय केला. म्हणून त्यास ईश्वरी अवतार असें मानण्यांत आलें.

ब्राह्मण हे धर्मसंरक्षक तर क्षत्रिय हे धर्मप्रसारक झाल्यामुळे ब्राह्मणापेक्षां क्षत्रियाचें कार्यक्षेत्र वाढलें, व त्याचा पंथ अधिक व्यापक व संग्राहक झाला. कृष्णानें अभीरादि हलक्या जातींस आपल्या पंथांत घेतलें. आणि रामानें तर हनुमान, जांबुवान् इत्यादि चिन्हांकित अनार्य रानटी लोकांस आपलेसें केलें. इतकेंच नव्हे तर गुहकासारख्या अस्पृश्य चांडाळाशींही सहानुभूतीनें वागून त्याशीं सख्यत्व जोडलें, आणि अशा रीतीनें अनार्यांवर प्रेमाचा विजय मिळवून आर्य व अनार्य यांच्यामध्यें सहानुभूतीचा सेतु बांधला. ह्याप्रमाणें ब्राह्मण व क्षत्रिय ह्यांच्या आत्मसंरक्षण व आत्मविकास ह्या दोन विरोधी तत्त्वांच्या दरम्यान हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाचें आंदोलन झालें आहे.

त्यानंतर कांहीं काळानें जनकराजाच्या पुण्यभूमींतच बुद्ध व महावीर हे दोन क्षत्रिय संन्यासी निर्माण होऊन, त्यांनीं वैदिकाच्या वर्णाश्रमधर्माचा विरोध व लोकसंग्रह, हे क्षत्रियाचें उभयविध ध्येय पुढें चालविलें; आणि दोघांनींही आपल्या ध्येयाची छाप फारच चांगल्या रीतीनें बसविली. परंतु त्यानंतरच्या काळांत ब्राह्मणांनीं धर्मसंरक्षणाचें कार्य अबाधित चालविलें असलें, तरी क्षात्र-तेजाचा लोप झाल्यानें सर्वत्र अनवस्थाप्रसंग येऊन ठेपला. अशा अनवस्थेंत कित्येक वर्षें लोटल्यावर आपला देश पुन्हा खडबडून जागा झाला. आणि आपण कोणाचे कोण हा विचार सुरू होऊन पूर्वेतिहासाचें व तत्त्वज्ञानाचें

धागेदोरे जुळविण्याचा प्रचंड उद्योग सुरू झाला. मग कोणी ऋषींनीं वेद संकलित केले व भारत-रामायणादि पुराणेही रचण्यांत आलीं. अशा रीतीने भारतवर्षांतील आर्यांचा इतिहास, संस्कृति व तत्त्वज्ञान यांची एक भव्य वाङ्मयमूर्ति ज्यांनी रचली त्यांस आपण व्यास असे म्हणतों. वस्तुतः ते एका व्यक्तीचे काम असेल असे नाहीं.

भारतवर्षांतील भिन्नभिन्न घटकांत एकसूत्रीपणा आणून त्यास स्थायिकपणा देण्याकरिता भारतवर्षाच्या इतिहासाचे एक महाकाव्य निर्माण करण्याची कवीस त्या वेळी आवश्यकता भासली. मग तसे करताना मूळ कथेचा धागा चारी दिशाकडून गोळा केलेल्या विचित्र कथाकुसुमात लुप्त होऊन गेला असल्यास नवल नाही. त्यामुळे महाभारतास कोणी आधुनिक पाश्चात्य व्याख्येप्रमाणे इतिहास म्हणून न मानले, तरी आपल्या पूर्वजाच्या स्मृति-पटलात गुंतलेला खऱ्या इतिहासाचा धागा त्यात आहे, यात शंका नाही. ह्या ग्रंथांतून ब्राह्मणधर्मास श्रेष्ठत्व दिलेले जे आढळते, त्याचे कारण बौद्ध-कालात भारतवर्षातील अनार्यच काय, पण विदेशी म्लेच्छही आर्यांचे गोटांत शिरू लागले. तेव्हां देशांतील संघटनेचा उच्छेद न व्हावा म्हणून ब्राह्मणाच्या धर्मसंरक्षक तत्त्वास अधिक महत्त्व देणे भाग झाले. परंतु आर्यांचे अध्यात्म व द्रविडांची भावना व कल्पना ह्यांच्या दरम्यान बेटीव्यवहार पूर्वीच झाल्यामुळे आर्यांचा द्रविडांशी सोयरसंबंध होऊन उभय कुलांचे वंशज पुढे आपणांस हिंदु म्हणवूं लागले.

हा आर्य व अनार्यांचा मिलाफ प्राचीन असला तरी गंगा-यमुनाजलाच्या संयोगाप्रमाणे त्यांच्यातील भिन्न गुणावगुण अद्यापि प्रत्ययास येतच आहेत. ब्रह्मा-विष्णु-महेश ही त्रयी ह्या आर्यानार्यसंयोगानंतरच निर्माण झाली. ब्रह्मा हा ब्राह्मणविद्येचा प्रतिनिधि होता. विष्णु ह्याचा उगम वैदिक सूर्योपासनेत होऊन, तो वैदिक कर्मकांडातून निघून, पुराणातील मानवी व्यवहारांत आवि-र्भूत झाला; आणि शिव हा अनार्यांनी आपला इष्ट देव म्हणून पुढे केला. ह्या शिवविष्णूंची चुरस महाभारतांत दर्शविलीच आहे. परंतु पुढे वैदिक रुद्र व अनार्यांचा शिव हे तादात्म्य पावून हा आर्यानार्यांचा लढा बहुतेक मिटला. तथापि दोघांनीं आपल्या पूर्वसंस्कारानुरूप शिवस्वरूपाचे ध्यान भिन्न तऱ्हेनें केलें. आर्यांचे शिवस्वरूप विरागी, निग्रही, निर्वाणसुखमग्न आणि वासनारूप—

वस्त्राच्छादनरहित असे आहे; तर अनार्यांचे शिवस्वरूप भीषण, गजचर्मधारी व भगट असे आहे. आर्यांचा शिव म्हणजे बुद्धाचीच एक नक्कल आहे. व त्यानीं बुद्धाचीच मंदिरे व्यापिली आहेत. परंतु अनार्यांचा शिव हा स्मशानवासी भूत, प्रेत, पिशाचादिकांचा स्वामी असून तो लिंगपूजा करणारे व सर्पपक्ष्यादि चिन्हांकित अशा रानटी लोकांचा देव आहे. शिवस्वरूपाप्रमाणे कृष्णस्वरूपातही रुचिभेदाप्रमाणे व्यभिचार झाला आहे. आर्यांचा कृष्ण म्हणजे द्वारकेचा शूर व प्रतापी राजा, अर्जुनाचा सखा व एक मोठा तत्त्वज्ञ असा होता; पण अत्यंत श्रेष्ठ व गहन असे गीताशास्त्र सांगणाऱ्या कृष्णास अनार्यांनी गोकुळांतील गवळ्याचे पोरांत आणून सोडले आहे.

ह्या आर्यानार्यसंकरात अनार्यांचा अंश वाढत गेल्यामुळे, त्यांच्या निरनिराळ्या समजुती व चालीरीति हिंदुधर्मात घुसूं लागल्या आणि ज्यांनी त्यांनी आपल्या चालीरीतीप्रमाणे व पूर्वपरंपरेप्रमाणे वागण्यांतच प्रत्येकाचे कल्याण आहे, अशी समजूत बळावत जाऊन हिंदीसमाजात पंथभेद करणाऱ्या पूर्वपरंपरा व रूढि ह्यांस धर्माचारांत फारच मोठे महत्त्व प्राप्त झाले. धर्मसंरक्षकाचीं ही कुंपणे मोडून टाकण्याचे काम पूर्वी क्षत्रियाकडे असे. परंतु तो क्षत्रियवर्गच नामशेष होण्याची वेळ आली, तेव्हा कोष्टी व चांभार अशा खालच्या जातीतून धर्मसुधारक निपजूं लागले. आणि आपल्या देशाच्या अत्यंत अवनत कालातही सत्याचे स्वरूप ऐक्यात व समभावात आहे, हे तत्त्व त्यांनी प्रस्थापित केले. आजमुद्धा त्याच सत्याच्या शोधात आपण आहों. आपण आपले सत्त्व न गमाविता आपली आत्मीय भावना विश्वव्यापक करणे हे आपले कर्तव्य आहे.

पाश्चिमात्य लोकांशीं जेव्हां इतर जातींचे समाजाचा प्रसंग आला, त्या वेळीं त्यानी, त्यांचा निःपात करून अगर त्याची हकालपट्टी करून, आपणास सवता सुभा मिळविला. इतकेंच काय, पण युरोप खंडांतील एका संस्कृतीचे परंतु भिन्नदेशी लोकांत आजमुद्धां परस्परासंबंधी अत्यंत गैरविश्वास माजला असून त्यांतून मुत्सद्द्याच्या कुटिल नीतीचे व निर्लज्जपणाचे अनेक प्रकार दिसून येत आहेत. भारतवर्षाची नीति अशी नाहीं. देशांत वाटेल तेवढे वादळ उत्पन्न झाले, तरी सद्धर्माचा दिवा प्रज्वलित ठेवण्याचें काम ब्राह्मणांनीं केले आहे. ह्या सृष्टीच्या अनंत घडामोडींच्या बुडाशी असलेलें

विश्वाचे खरे रहस्य फार गूढ आहे, आणि ते रहस्य जाणण्यांतच मानवी प्राण्यांस ऐक्य व शांति याचा लाभ मिळणार आहे. सुधारणेचे अंतिम ध्येय सामर्थ्य व संपत्ति यांत नसून अध्यात्मांत आहे. तथापि हेही लक्षांत ठेवलें पाहिजे की, अन्नब्रह्म ह्या तत्त्वाची आपण आजपर्यंत जास्त उपेक्षा केल्याचे फळ आज आपणास भोगावे लागत आहे.

रवींद्रनाथ शेवटी म्हणतात की, भारतवर्षावर मी प्रेम करतो, ते त्याच्या विशिष्ट भौगोलिक रूपामुळे अथवा माझा जन्म येथे झाला म्हणून नव्हे, तर आज अनंत कालाच्या जीवनकलहात त्यानी सत्यं, ज्ञान, अनत ब्रह्म; किंवा शातं, शिवं, अद्वैतम् ह्या सत्याची अखड जागृति ठेवली म्हणून होय. त्या योगाने धर्मसरक्षक ब्राह्मणानीं सर्व जगास उपकृत करण्याचे सामर्थ्य दाखविले आहे. गृहस्थाश्रमी पुरुषाने ब्रह्मनिष्ठ आणि तत्त्वज्ञानपरायण असावे, आणि त्यानी आपलीं सर्व कर्मे ब्रह्मार्पण करावीत, हे आमचे ध्येय आहे. आमच्या मातृभूमीची प्रार्थना अशी आहे.

य एकोऽवर्णो बहुधा शक्ति योगात् ।
वर्णान् अनेकान् निहितार्थो दधाति ॥
विचैति चान्ते विश्वमादौ स देवः
स नो बुद्ध्या शुभया सयुनक्तु ॥ —श्वेताश्वतर, अ. ४।१.

**भावार्थ**—जो एक आहे–व ज्याला काहीं अर्थ साधावयाचा नाही, असा स्वतः अवर्ण ( किंवा अरूप असता ) आपल्या शक्तीच्या योगाने अनेक वर्ण ( किंवा रूपे ) धारण करतो, आणि आरभी व अती ज्याच्यामध्ये विश्व जाते तोच देव. तो आम्हांस शुभ बुद्धीने युक्त करो.

भारतवर्षाच्या इतिहासाच्या वरील दर्शनात अपूर्वता आहे ह्यांत शंका नाही. आर्याच्या हिंदुस्थानातील वसाहती, अनार्याचा निःपात न करितां त्यांस आत्मसात् करून घेण्याची आर्याची हातोटी, समाजस्थैर्य व सगोपन यासाठीं शेतीसारख्या उत्पादक धंद्याचा प्रसार, आणि धनधान्यसमृद्धीच्या रामराज्या-अंती कृष्णाने उपदेशलेली गीता, आणि रामकृष्णांची लोकसंग्राहक बुद्धि, इत्यादि अनुमानपरंपरेत चिंतनीय भाग बराच आहे, ह्यात संशय नाहीं. रामराज्याचे स्वास्थ्याअंती वेदान्त सुचतो व रुचतोही, अगोदर नाहीं. ह्या सिद्धान्ताचा अनुभव घेण्याचा पुन्हां काळ आला आहे. पश्चिमेकडील

संपन्न देशांत वेदान्तदर्शनाची आवश्यकता भासत आहे, आणि अध्यात्मांत फाजील गढलेल्या आम्हांस अन्नब्रह्म हा धडा पुनः शिकावयास पाहिजे आहे. आधीं पोटोबा मग विठोबा हे व्यवहारशास्त्र आम्ही विसरलों आहोत. सीताराम जसे कृष्णाचे अगोदर तसेच हलधरबळराम हेही कृष्णाचे अगोदरच त्याचे जे भ्राते होत त्यांचे हलधर नावात रामाचे ध्येय दर्शित होतच आहे. अन्नोदकाची तजवीज हे मनुष्यमात्राचे पहिले कर्तव्य आहे. शरीरस्वास्थ्य हे पहिले साधन आहे. ह्या अन्नब्रह्माचा धडा जसा रामराज्यात तयार केला तसा आर्य-अनार्यांचे दरम्यान सेतुबंधनाचा धडाही रामचंद्रानेंच प्रथम घालून दिला आहे. आज पूर्वपश्चिमेत तसा एक पूल बांधण्याची आवश्यकता अत्यंत भासूं लागली आहे. व त्या पुलाचे राजा राममोहन व रवींद्रनाथ हे दोन आधारस्तंभ होऊं पहात आहेत. राजा राममोहन याच्या एकेश्वरीमताचा पुकारा युरोप व अमेरिका ह्या खंडापर्यंत जाऊन पोचला; आणि रवींद्रनाथाच्या गीताजलीच्या वेणुनादाने तर पश्चिमेकडील जडवाद्यास मोहित करून सोडले आहे. रवींद्रनाथाची विश्वभारती ही नूतन संस्था म्हणजे होऊ घातलेल्या पुलाची एक भव्य कमानच होय.

रवींद्रनाथांच्या दिव्यदर्शनांत जशी ही व्यापक दृष्टि आहे, त्याचप्रमाणे त्यांच्या पुराणनिरीक्षणाने आपल्या प्राचीन इतिहासावर काही वेगळाच प्रकाश पाडला आहे. रवींद्रनाथाची ही दृष्टि अंगिकारल्यावर एखादा कल्पक व्युत्पत्तीच्या जोरावर पौराणिक सर्व लहान मोठ्या व्यक्तींत रूपांतर घडवून आणील, असा संभव दिसूं लागतो. ह्या रूपांतरांत पौराणिक व्यक्तीचे विभूतितत्त्वात जो फरक पडेल, त्याचा आपल्या धर्मभावनांवर काय परिणाम होईल, हा मात्र एक चिंतनीय प्रश्न आहे. रवींद्रनाथाचे रूपांतरांत रामकृष्णांचे पौराणिक पुढारीपण कायम असून सीता माई ही "जगज्जननी जानकी" कशी ते अधिक उघड होते. तसेच महाभारतातील नायिका द्रौपदी ऊर्फ कृष्णा हिचेंही ब्रह्मविद्येचे तेज अधिकच शोभूं लागते. रामायण-भारतातील कित्येक क्रान्तिकारक गंभीर प्रसंगास, परशुरामाचा आततायीपणा, दशरथाचा बाईलवेडेपणा, युधिष्ठिराचा जुगार, गाईवरून भांडणे, इत्यादि कारणीभूत होणाऱ्या विचित्र गोष्टींचा निरास होऊन, त्यांतील रहस्य अधिक सम्यक् दिसूं लागते. कृष्णेने पांच पांडवांस कसे वरिले, इतकेच नाहीं तर तत्सम क्षत्रियवीर, जो

कर्ण त्यांनेही तिचा अंगीकार करावा असे तिजला कसे वाटत होतें, ह्या सर्व प्रकाराचा चागला अर्थ लागतो. प्रपंचाचे मृगजळास भुललेल्या दुर्योधनाचा कृष्णेने का उपहास केला, ते अधिक चागले समजते. द्रौपदीवस्त्रहरण म्हणजे गीताशास्त्राची पोरकट व असभ्य चिकित्सा, आणि दुर्योधन दुःशासनासारख्या वावदूकांपासून शास्त्रगुह्याच्या परिस्फोटनचा प्रयत्न, असा अर्थ लागून पुराणातील एक ओंगळ प्रकार काल्पनिक ठरून द्रोणाचार्य व तत्पक्ष आणि भीष्माचार्यादि पुरुषाचे मौनाचे त्याने पूर्ववत् आश्चर्य वाटत नाही. तसेच जरासंध, शिशुपाळ व रवण याच्या विरोधिभक्तीचा अर्थ लागतो. विराटाचे राज्यांत वाढलेला कीचकरूप (पोकळ बाबू) पोकळ अहकार ह्याचे कृष्णावशीकरणातील साहस व त्यात अखेर त्याचा म्हणजे अहंकाराचा नाश हे तत्त्व कळूं लागते. तात्पर्य, अशा दृष्टीने विचार करता सर्व पौराणिक कथांचा अर्थ चपृकारां-पेक्षाही अधिक सरस व बोधप्रद लावता येईल. परतु त्या विचारसरणीने अहल्या ( अ+हल=नागर ) ( खडकाळ जमीन ), द्रौपदी ( रानटी जमीन ), सीता ( लागवडीस योग्य जमीन ), तारा ( नदीकाठची सुपीक जमीन ), मंदोदरी ( भुसभुशीत जमीन ) ह्या पचकन्या उत्तरेपासून कन्याकुमारीपर्यंत-च्या निरनिराळ्या अक्षत भूमि ठरविल्या. सीताशुद्धि म्हणजे जमिनीचा राव-रहाट ठरविला, तसेच प्रभु रामचद्र हे एक वसाहतकार थोरले वॉशिंग्टन आणि श्रीकृष्ण परमात्मा म्हणजे एक सवाई प्लेटो, असे मानले, तर केवढा अनर्थ गुदरेल, ह्याची कल्पना होत नाही ! निर्गुण व निराकार परमात्मस्वरूप हे कोणी पाहिले आहे ! पण आज हजारो वर्षे आपले भाविक लोकाचे हृदयसिंहासनावर प्रभु रामचद्र विराजमान आहेत, आणि त्याचे नयन-गोपुरांत कृष्णबळराम बसले आहेत अशा स्थितींत वरील चिकित्सक पद्धतीने पुराणमताभिमानी बहुजनसमाजाचे काळजावर दुःसह वार केल्या-प्रमाणेच होईल ! आकाशातील स्वयप्रभ तारकांप्रमाणे भरतभूमीवर पसरलेल्या श्रीरामकृष्णमंदिराचे खाली सुरुग पेरल्याप्रमाणे होईल. शकर, मारुती व देवी हीं खेडोखेडी असलेली ग्रामदैवते अधिकारच्युत होतील. धर्मभावनेचे नाजूक तंतु तुटून जातील आणि दोरी तुटलेल्या पतगाप्रमाणे भाविकाच्या मनांची वाताहात होईल. ही सर्व संकटपरपरा पचनीं पाडण्याचें सामर्थ्य आज तरी बहुजनसमाजांत नाहीं. ती त्यांची तयारी व्हावी, हा ब्राह्म-

समाजाच्या कदाचित् एक हेतु असेल. तसेंच एका संस्कृतिसूत्रांत सर्व जातींचें एकीकरण करण्याचाही त्यांचा प्रयत्न आहे. ह्या दुसऱ्या प्रयत्नास वरील निबंध जरी विशेष उत्तेजक न झाला, तरी मूर्तिपूजानिरासाचा पहिला हेतु सिद्ध होण्यास वरील निबंधाइतका परिणामकारक लेख ब्राह्मवाङ्मयांत दुसरा क्वचितच असेल असे वाटते. गोपीकृष्णलीला आणि रामरावण-युद्ध या कथातून अध्यात्मरहस्य काढण्याचा प्रयत्न ह्यापूर्वी अनेक आस्तिकानीं केलेला आहे, परतु त्यायोगाने सदर कथातील ऐतिहासिक सत्यास बाध आला नाहीं. तसेच कृष्णलीला जीजस ख्राइस्तच्या चरित्रावरून व रामायण काही विदेशी कथावरून रचले असावे, अशाही विलक्षण कल्पना पूर्वी येऊन गेल्या कित्येक ब्राह्म विद्वानानी पुराणास शिमगा ठरवून त्यांची बेसुमार निंदाही केली; परंतु त्या सर्वांपेक्षां रवींद्रनाथाची वरील विचारसरणी अधिक सयुक्तिक व चितनीय असल्यामुळे ती बहुतांचा बुद्धिभेद करीलच करील असा पूर्ण सभव दिसतो. त्याचे योगाने कित्येक विचारप्रवण होतील, कित्येक उदास व संशयग्रस्त होऊन रहातील, कित्येक नास्तिक स्वैराचारी बनतील, तर कित्येक दुःखी होतील त्यात शंका नाही. कोणी एकाने साखरेच्या रमकड्यातील (चित्रातील) खरे रहस्य केवळ शर्करामय आहे, असे ठरविण्याकरितां त्यास विच्छिन्न करून खाऊन व पचनी पाडून मधुर रसास्वादाच्या साक्षात् अनुभवाने आपल्या सिद्धान्ताची सत्यता दुसऱ्यांचे गळीं उतरविण्याचा प्रयत्न केला; परंतु हा प्रकार पाहून कित्येकास खेद वाटला, कीं मधुर रसास्वाद चाखण्याकरितां साखरेचे असंख्य गोण भरलेले असता ह्या अरसिकाच्या चिकित्सक बुद्धीने त्या मनोवेधक चित्राचा उच्छेद करावा ही केवढी संतापदायक गोष्ट आहे! चित्रे मोडली तरी शर्करेचें सत्यस्वरूपच प्रगट होते, हे खरे, परंतु त्या योगानें सौंदर्याची हानि होऊन सच्चिदानंदाच्या आनंदभावास भाविक जीव कायमचा मुकतो. असो. विस्तारभयास्तव ह्यासंबंधीं अधिक विचार येथे न करतां पुढ शेवटल्या प्रकरणीं करू.



## प्रकरण तेरावें

# नवयुग

भारतवर्षाच्या इतिहासाचे रवींद्रनाथांनी केलेले सिंहावलोकन मागील प्रकरणांत दिले आहे. आता चालू नवयुगाबद्दल रवींद्रनाथाचे काय विचार आहेत ते थोडक्यात पाहू. आदि-ब्राह्मसमाजाचे आद्य प्रतिनिधि राजा राममोहन ह्यानी आपल्या चिकित्सक बुद्धीचे 'क्ष' किरण वैदिक-वाङ्मयावर टाकून त्यांतील तत्त्वज्ञानाचा सागाडा त्यानी हुडकून काढला. रवींद्राचे किरणांनी आपल्या पुराणेतिहासावर अद्भुत प्रकाश पाडला. पूर्वपश्चिमेचा साधा कसा जोडावा, हा बिकट प्रश्न दोघांनीही सोडविण्यास घेतला. राममोहन ह्याच्यापुढे धर्म हा विषय प्रामुख्याने होता. सर्वांचा सार्वत्रिक धर्म बनविण्याच्या आशेने त्यानी वेद-पुराणे आणि बायबल, कुराणे याचे संशोधन केले. प्रत्येक धर्मातले दैवी पुरुषाचे विभूतिमत्व आपआपल्या अलौकिक व्यक्तिमहात्म्याने त्याच्या त्याच्या अनुयायास परस्पर भिन्न ठेवीत आहे, हे त्यांनी लक्षात घेतले, आणि यास्तव त्यानीं हिंदूंच्या अवतारमूर्ति, तसेंच जीझस खाईस्ट व महमद पैगंबर ह्यास देवकोटीतून काढून प्रमादशील अशा सर्वसाधारण मानवकोटीत आणून ठेवले. आणि ईश्वर त्या सर्वाहून श्रेष्ठ व स्वतंत्र असून तो एकच आहे असा एकेश्वरी पथ त्याने निर्माण केला. एकेश्वरी पंथ खिस्ती लोकातही होता व आहे; पण मानवकोटीचे नेतृत्व त्यानी जीझसकडेच ठेविले आहे. अर्थात् तो राममोहन याच्या उद्देशाप्रमाणे सर्वसंग्राहक नाहीं.

आदि-ब्राह्मसमाजाच्या जनकाची ही दृष्टि सांगितली. त्यानंतरच्या शतसंवत्सरांत हिंदुस्थानचीच काय, पण सर्व जगाची स्थिति पालटली. राम, रहीम आणि खाइस्ट यांस कोणी फारसे विचारीनासे झाले; आणि त्या ठिकाणी एका अमूर्त अशा राष्ट्रपुरुषाचे देशोदेशी देव्हारे माजून राहिले. बिचाऱ्या कालीदेवीची बोकडावरच समजूत होत असे; पण ह्या राष्ट्रदेवाचे शान्तीकरितां लाखो लोकांचे बळी पडूं लागले. व कोट्यवधि लोकांचे रक्तशोषण होऊ लागले. अर्थात् आदि-ब्राह्मसमाजाचे आजचे प्रमुख प्रतिनिधि

जे रवींद्रनाथ त्यांचे लक्ष राम, रहीम व जीझस यांच्यापेक्षां ह्या अगडबंब राष्ट्रदेवाने अधिक वेधून घेतले. मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे राम-कृष्णादि देवांना देवकोटीतून काढून प्रथम मानवी आणि नंतर काल्पनिक कोटीत त्यांनी घातल्यावर त्यांनी ह्या राष्ट्रपुरुषाविरुद्ध युद्ध पुकारले, आणि त्याचा खरपूस समाचार घेतला. निरनिराळ्या देशांतील समाजास केंद्रीभूत होऊन राहिलेल्या राम, रहीम व ख्राइस्ट ह्या मूर्ति हलविल्यावर एकाच समाजात असलेले जातीचे भेद मोडण्याचे हलके काम राममोहन ह्यांनी पुढल्या पिढीवर टाकले. परंतु रवींद्रनाथांनी असे पाहिले की, हिंदुस्थानांतील वर्णव्यवस्थेच्या मोडक्यातोडक्या भिंताडापेक्षा राष्ट्रांनी आप-आपल्या भोंवती उभारलेली तटबंदी, कोट्याधीशांनी गरिबांसभोंवती उभारलेले तुरुंग, जेत्यांनी जितांच्या गळ्यास लावलेला फास, काळा आणि पांढरा, पौर्वात्य आणि पाश्चिमात्य, इतकेंच काय पण सुशिक्षित आणि अशिक्षित, स्त्रिया आणि पुरुष, यांच्यामध्ये वाढत चाललेले भेदजनक खंदक व बांधारे, ह्यांच्याकडेच अगोदर लक्ष दिले पाहिजे. ह्यासाठी त्यांनी आपली तोफ ह्या भेदावर डागण्यास सुरुवात केली. त्यांच्या काव्यकुसुमातून हॉवित्झर तोफे-पेक्षांही प्रचंड ध्वनि निघू लागले, त्यांची लेखणीची फेंक मशिनगनपेक्षा जास्त काम करू लागली. अशा रीतीने जगांत देवाचें एकसूत्री व शांततेचे साम्राज्य नांदावें ह्या राममोहन यांच्या इच्छेस अनुसरून त्यांची जी कामगिरी चालली आहे असे म्हणतात त्याची वाचकांस नीटशी कल्पना येण्याकरितां त्यांच्या अनेक लेखांतील सार आम्ही प्रकरणशः थोडें सविस्तर देण्याचे योजले आहे. रवींद्रनाथ असे म्हणतातः

" आज जगिक व्यवहार अतिलोभाने प्रेरित झाल्यामुळे त्यांतील नीति-मर्यादा सुटली आहे. बुद्धिवैभव आणि दैवी संपत्ति यांचा स्वयंभू थोरपणा आज बाजारभावाच्या लाटांबरोबर हेलकावे खात आहे. ह्या अधःपातास आधिभौतिक शास्त्रें, आणि राष्ट्रविस्ताराचे स्वार्थमूलक धर्मवेड, हीं कारणी-भूत आहेत. ह्या परंपरेत होणाऱ्या भयंकर संहारांत उघड उघड रक्ताच्या नद्या वाहात नसल्या, तरी जीवनाची मुळेंच खणली जात आहेत. जबाबदार राज्य-पद्धतीच्या नांवाखालीं रक्ताचें शोषण व भयंकर लूट चालली आहे! आणि मुत्सद्देगिरीच्या पेशांत असत्य हे मोठ्या दिमाखाने वावरत आहे!

"आजकाल संपत्तीच्या अभावापेक्षांही साध्या माणुसकीच्या अभावानें लोक हवालदील झाले आहेत. मानवकोटीच्या ऐक्यभावाची कल्पना विलयास जाऊन माणसातील निरनिराळे घटक आपआपले सामर्थ्य वाढविण्याकरितां झगडत आहेत. मजूरवर्ग ही एक शक्ति आहे, तर भांडवल ही दुसरी शक्ति आहे. त्याचप्रमाणे सरकार व प्रजा, पुरुष व स्त्री, हीं निरनिराळीं द्वंद्वे आहेत. ह्या निरनिराळ्या घटकांतील एकसूत्रीपणा सुटल्यामुळे हे बेजबाबदार घटक आपल्या अनियंत्रित सामर्थ्यानें कोणता अनर्थ ओढवतील ते सांगवत नाहीं. शक्तिमंतांना शक्तिवानांशीं झुंज खेळतांना जितके सावध रहावे लागते, तितकेच अशक्तांशीं वागतानाही तोल संभाळणे कठीण जाते. रुपणीची पुळण हत्तीला टेकीस आणते, अथवा त्याहूनही सूक्ष्म वाटणारा वारा जेव्हां वादळ उठवितो, तेव्हां सारीच दाणादाण होते. तोंड दाबून बुक्क्यांच्या माराची प्रतिक्रिया ईश्वरी नियतीकडून झाल्यावाचून रहात नाहीं.

"आजकालचे राजकारण व व्यापार माणसांची माणुसकी हिरावून घेत आहे आणि त्या व्यापारी राज्ययंत्राच्या वेणातून एक बलाढ्य व बुभुक्षित असा हा राष्ट्र-पुरुष जन्मास आला आहे. या पुरुषाचे पंजे व सुळे अत्यंत तीक्ष्ण असून त्याचे लोहमय हस्त चारी दिशांचे टोकास भिडले आहेत. त्याच्या खादाड पोटाचें भगदाड आकाशाएवढे अफाट आहे! पण त्यास अंतःकरण हे इंद्रियच नाहीं! ह्या भयंकर राक्षसाच्या खाईत नैतिक व धार्मिक माणसाचा नायनाट झाला आहे. राष्ट्रीय सेवक आणि तागडीवाले ह्यांचाच काय तो आजकाल मनु राहिला आहे. मी आणि माझे राष्ट्र ह्यांच्या दरम्यान एखाद्या चिटपांखरासही न येऊं देण्यासाठीं आजकालच्या राष्ट्रीय मनाने संत्री-पहारा ठेवला आहे. राष्ट्राभिमानाच्या आवेशाने मुठी वळलेल्या आहेत! व डोळे लालबुंद झाले आहेत! अत्याचाराच्या धमक्या सुरू आहेत आणि असे हे बेहोष झालेले देशोदेशींचे लोक आपणांस देशाभिमानी म्हणवून मोठ्या दिमाखानें छाती वर काढून नीतीची पायमल्ली करीत भररस्त्यांतून हिंडत आहेत. अतिलोभरूप एका प्रचंड ग्रहाच्या आकर्षणात सांपडल्यामुळें मानवी जगाची गति नीतीच्या कक्षेतून झुकली आहे!

साम्राज्यवाद हें राष्ट्राभिमानाचें स्थूल स्वरूप आहे. त्याचें मांस लोंबू

लागण्याइतक्या स्थूलपणांत खरोखर कांहीं थोरवी आहे काय ? साम्राज्यवादी आपले दडपणाखालीं गोरगरिबांस चिरडतील, परतु त्यांचे आत्मिक बळ वाढवतील काय ? शांततेच्या तहांवर ते सह्या ठोकतील, पण शांतता देणें त्यांच्या हातून घडेल काय ? व्यापार व राजकारण ह्या नांवांखाली मनुष्यांनीं मनुष्यांना खाण्याचा हा अघोरी धंदा प्रथम किफायतशीर वाटला, तरी अखेर तो त्यांचा त्यांनाच भोवणार, ह्याचे त्या बलिष्ठांना आपले मस्तीत भान असेल काय?

हिंदुस्थानने ह्या राष्ट्रीय भावनेची जोपासना पूर्वी कधीच केलेली नाहीं. हल्लींच देवाविषयीं व एकंदर मानवकोटीविषयीं आदर बाळगण्यापेक्षाही राष्ट्रपूजा ही अधिक महत्त्वाची गोष्ट, असे लोक समजतात; पण ते व्यर्थ आहे. मनुष्यजातीच्या आदर्शापेक्षां देशाचे महत्त्व अधिक मानणे ही चूक आहे. राष्ट्रीय-भावना मनुष्याचे ध्येय सकुचित करते, नीतीपासून अधःपात करते, बुद्धिमांद्य आणते, व लोभ आणि दंभ यांचे भलतेच स्तोम माजविते. राष्ट्राभिमान हा जरी एक मेदूचा दुर्धर रोग असला, तरी तो आपलेकडे फार वेळ टिकणार नाहीं. हिंदुस्थानातील राष्ट्राभिमानाची ही लाट कांही काळाने शांत होईल, आणि नंतर स्वातंत्र्य व समता ह्यांचेच साम्राज्य चोहोकडे नांदू लागेल.

'आर्यलोक', 'चिनीलोक', 'तुर्की लोक', अशी ही पूर्वेकडील भाषा आहे. राष्ट्र ही कल्पना पश्चिमेकडील आहे. पश्चिमेकडील राष्ट्र हे एक विनाशक यंत्र आहे. मनुष्यमात्रास आपल्या उच्चतर भावना सोडून त्या राष्ट्रयंत्राच्या जुलमाखालीं गुलामाप्रमाणे राबावे लागते. मनुष्यसमाज हा एक जिवंत घटक आहे. त्यानीं राष्ट्रीय यंत्रारूढ होऊन आयुष्य कंठणे हे भूषणास्पद नाही. प्रचंड यांत्रिक सामर्थ्य संपादण्यापेक्षां पूर्णत्व संपादणे, हेच मनुष्यमात्राचें वास्तविक ध्येय आहे. आतां आपण आपली राष्ट्रीय भावना सोडावयाची म्हणजे स्वत्व गमवायाचे असे नाही. तर व्यापक दृष्टीने आपण आपला व्यक्तिभाव पूर्णत्वास पोचवावयाचा आहे. संपत्ति हें सुधारणेचे खरे माप नसून शील हें आहे. संपत्ति अमूप मिळवणे, व तिचा व्यय करणे, हा अव्याहत क्रम एखाद्या अमर्याद सरळ रेषेप्रमाणे कधींही न संपणारा आहे. रूळ आहेत, परतु स्टेशने नाहींत; अशा आगगाडीच्या व्यापाराप्रमाणे हा व्यापार होईल. मानवी समाजाची रचना व हेतु, जीवाचा विकास होऊन त्याचे दैवीगुण प्रगट व्हावे, यास्तव आहे. हे पूर्णत्वाचें ध्येय अस्पष्ट झाले कीं, मनुष्याची महत्त्वाकांक्षा

क्षुद्र यशःप्राप्तीपलीकडे जाऊं शकत नाही. जीवाची महत्त्वाकाक्षा ही त्याची काम करण्याची कचेरी असेल, पण त्याची ब्रह्मनिष्ठा हे त्याचे विसाव्याचे घर आहे. आजकाल कृत्रिम गरजांच्या बेसुमार वाढीमुळे त्या कचेरीचा व्याप इतका वाढला आहे की, घराचेच लोढणे वाहून ते नको, असे जीवास झाले आहे ! परतु आपले शील हे नव्हे. बुद्धीच्या अगर धनसपदेच्या वाढीत जीवित-सार्थक नाही, तर आपली असीम सहानुभूति जातिवर्णादि मर्यादा ओलाडून पार जाईल, असा मनोविकास होण्यातच जीवितसाफल्य आहे. विद्वत्ता आणि कौशल्य याची सपन्नता वाढली आहे, त्याअर्थी जग सुधारले असे म्हणता येत नाही. कारण ती केवळ पोटभरू विद्या आहे. खाणावळींतल्या जेवणात पोट भरेल, परंतु प्रेमाचा यजमान तेथे नसल्यामुळे खरा पाहुणचार तेथे घडणार नाहीं ! प्रेमात अनंताशी एकरूप होण्याचे आर्यांचे तत्त्व पाश्चात्यास अद्याप पटले नाहीं. आणि उलट त्यांचे राष्ट्रीय भावनेचे ध्येय हिंदी स्वभावास पटणार नाही.

आज आपणांस जी दुर्दशा प्राप्त झाली आहे, त्यास राज्यकर्त्यांइतकेच आपण जबाबदार आहोत. सर्वसाधारण हिंदी माणसाची संकुचित दृष्टि, जातिभेद, आणि पथभेद, आपसातील द्वेष आणि वैमनस्य, अनाथ व पतित अशा समाजाबद्दल औदासीन्य, वेदान्ताचा दुरुपयोग, मृतप्राय झालेल्या प्राचीन गोष्टीबद्दल माजलेली रणे, इत्यादि गोष्टींनी हिंदुस्थानची अवनति झाली आहे. आपल्या प्रगतीस जे खरे अडथळे आहेत, तेथे राजकर्त्यांच्या सत्तेचा संपर्क-ही नाही. अधश्रद्धा, रूढीचे देव्हारे, आपसात भिन्नभाव उत्पन्न करणाऱ्या जुन्या चाली, ह्यानीच आपला अधःपात झाला आहे. आपण आपल्यातील खालच्या वर्गास जसे वागवितो तसेच आपले राज्यकर्ते आपणांस वागवतील. त्याच्याशीं आपला तूर्त सबध आला आहे, ही एक समाधानाचीच गोष्ट आहे. कारण त्यायोगाने आपले दोष आपणास कळूं लागून, आपल्या ठिकाणीं जागृति उत्पन्न झाली आहे. परतु त्याच्या संसर्गाने त्याची सुधारणा आपण अगिकारणे याच्याइतकी संतापदायक दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं. जगांत आपले श्रेष्ठस्थान आपल्याला पुन्हा मिळवावयाचे असेल तर साधी राहणी, आत्मीयभावाचे औदार्य, चित्ताची शुद्धि, सृष्टीशी समभाव, आणि भूतमात्रीं भगवद्भाव इत्यादि आर्यांचे प्राचीन संस्कार आपण जागृत केले पाहिजेत.

" हिंदुस्थानांतल्या हल्लींच्या राष्ट्रीय पक्षांतल्या बऱ्याचशा मंडळींचे मत असे दिसते कीं, समाजासबंधाचे विधायक कार्य आपण जन्मास येण्यापूर्वी हजारो वर्षे अगोदर करून टाकण्यांत आले असल्यामुळे, आता आपण सगळा उत्साह राजकारणासंबंधाच्या चळवळीत खर्च करण्यास मोकळे झालो आहोत. सध्यां जी आपली निराश्रित स्थिति झालेली आहे, तिच्याबद्दलचा दोष आपल्या समाजांतल्या व्यगांकडे आहे, ही गोष्ट आपल्या स्वप्नातसुद्धा कधीं येत नाही. आपले पूर्वज त्रिकालज्ञानी होते, त्यानी घालून दिलेल्या समाज-पद्धतीत व्यंग राहणे असभवनीय आहे, हीच आपली समजूत आहे. अर्थात् आपणास भोगावी लागणारीं दुःखे आणि दिसून येणारी न्यूने, याना कारण आपणावर बाहेरून जे छापे आले ते होत, असे आपण समजतो. म्हणून सामाजिक गुलामगिरीच्या वाळूवर ही राजकीय स्वातंत्र्याची इमारत उभारण्याचे आपले काम आहे असे आपणांस वाटते." परतु ही आपली चूक आहे. आज आपल्यापुढे, इतकेच काय पण साऱ्या जगापुढे, सोडवावयाचा प्रश्न राजकीय नसून सामाजिक आहे.

प्रचलित राजकारणाचा रवींद्रनाथांना मनस्वी तिटकारा आहे. ते म्हणतात कीं, राजकारणापेक्षा अधिक जिव्हाळ्याचे असे अनेक प्रश्न आपणास सोड-वावयाचे आहेत. असे हे त्याचे विचार होण्याच्या पूर्वी कित्येक प्रसंगीं राजकीय चळवळीचे आखाड्यांत ते उतरलेले होते, व त्या वेळच्या त्याच्या बाणेदार व स्फूर्तिदायक भाषणांनीं त्यांनीं बगालच्या तरुणांवर परिणामही केला. त्यामुळे वस्तुतः अराजक चळवळीच्या ते उघड उघड विरुद्ध असताही, तरुण बगालच्या ज्वलज्जहाल पक्षाशी परपरेने त्याचा सबध जोडण्यासही कित्येकानी कमी केले नाहीं. परंतु हाडाचे ते जहाल नसून साधुवृत्तीचे आहेत. असे अनेक गोष्टीवरून दिसून येते. इ० सन १९२० सालीं सरकारी अम्मलदारांकडून पंजाबांत घडलेल्या घोर अत्याचाराबद्दल रवींद्र-नाथांस अत्यंत संताप आला खरा, व त्या सतापाच्या अग्नींत त्यानी आपल्या 'सर'कीचीही आहुति दिली. परंतु त्यासबधी आपल्या देशबाधवास " उपदेश करतांना, झाल्या गोष्टी विसरून जा, असेच त्यांनी सागितलें. "भावाने भावाचे रक्त सांडले तर ते रक्ताचे डाग झाकण्याकरितां ईश्वर त्या भूमीवर हिरवळ उत्पन्न करतो. तसेच तुम्ही त्या उन्मत्ताच्या

दुष्ट कृत्यांवर क्षमेचें झांकण टाका. आणि आत्म्याच्या अमृतत्वावर भरंवसा ठेवून निर्भय असा" अशा अर्थाचा त्यांनीं उपदेश केला. देशभक्तीने प्रेरित झालेल्या बंगाली तरुणांची त्यांना कींव येत असे. अशा मुलांचे मागे पोलिसांचा ससेमिरा लागतो, आणि मग गुरांनीं तोंड लावलेल्या गवताची वाढ ज्याप्रमाणे खुंटते, किंवा सापाने खाल्लेले फळ ज्याप्रमाणे कोणी हाती घेत नाही, त्याप्रमाणे पोलिसांच्या नजरेतल्या तरुणाची गति होते! अखेर तो उत्साही तरुण निकामी होऊन त्याचे आयुष्य व्यर्थ जातें. असे प्रकार त्यांचे नजरेस पडत. त्यामुळेच की काय, पण त्यांनीं पुढे राजकारण हा विषय सोडून दिला. इतकेंच काय, ते राजकारणाचा तिट्कारा करूं लागले.

इंग्रजांबद्दल त्याचा अभिप्राय अजूनही चांगला असेल, पण इंग्रजाच्या राष्ट्राबद्दल त्यांस तिट्काराच आहे, ह्यात शंका नाहीं. इंग्रजराष्ट्राकडून आपल्या पदरीं कांहींच पडणार नाही. त्याच्याकडून आपणांस खऱ्या सुधारणेचे शिक्षण मिळणे अशक्य आहे. कसे तरी जिवंत राहण्यापुरते शिक्षणाचे चार घास ते आपल्यापुढे टाकतील. ते जेते व आपण जित असल्यामुळे, आपल्याबद्दल त्यांच्या ठिकाणीं आदर व सहानुभूति उत्पन्न होणे दुरापास्त आहे. आजपर्यंत हिंदुस्थान म्हणजे एक व्यापाराची जागा आहे, असे समजले जात असे. येथे माणसे आहेत, हे कोणाच्या लक्षांत आले नाहीं! हे एक चरण्याचें कुरण आहे, असेंच समजत! आपल्या उच्च संस्कृतीचा पश्चिमेत कोणीं आस्थापूर्वक अभ्यास केला असेल, तर तो जर्मन व फ्रेंच तत्त्वज्ञांनीं केला. इंग्रजाकडून ते काम होणार नाही. आपला आपणच उद्धार करून घेतला पाहिजे. भिक्षावृत्तीनें कांहींच मिळाव-याचे नाहीं, अशी त्याची ठाम समजूत आहे. सामाजिक उन्नतीचीं साधने म्हणून शेती व शिक्षण हे दोन विषय त्यांनीं प्रयोगादाखल घेतले आहेत. एकांगी शिक्षणाचे ते विरोधी आहेत. नुसते बौद्धिक शिक्षण उपयोगाचे नाहीं असे ते म्हणतात. नैतिक बल नसेल, तर एखाद्या कल्पनातीत जिराफाच्या मानेप्रमाणे आमचे चिकित्सक डोके धडाचे वर शेकडो ताड उंच वाढूनही, आणि जगातील सुविचारवृक्षाच्या अत्युच्च शेंड्यावरील अगदी नवीन पालवी खाऊनही, तिचा अन्नरस खालीं उतरून, ती पचनीं पडण्याचे पूर्वीच उपासमारीने आमची हृदयक्रिया थांबण्याची वेळ यावयाची! यास्तव आपले उद्योग एकांगी होऊन चालणार

नाहीं. आकाशांत संचार करणाऱ्या विहंगमाने अनंताचा ठाव घेण्याच्या प्रयत्नांत केवळ आपल्या पंखावरच विसबून उपयोगी नाही. ईश्वराच्या अचिंत्यनियमामुळे प्रसंगी पंख थकतील. यास्तव त्यांनी आपल्या जाति-धर्मानुसार विश्रांतीचे घरटे बांधण्यासही शिकले पाहिजे. मनाच्या उड्या अनेक असतात, पण त्यास शरीरसामर्थ्यादि उपांगांचीही जरुरी आहे. मनाच्या तुष्टीबरोबर शरीराच्या पुष्टीकडेही पाहिले पाहिजे. शील व बल संवर्धक असेल तेच शिक्षण. यास्तव रवींद्रनाथाचे सुरूल नामक ठिकाणी शेतीचे प्रयोग सुरू आहेत व शान्तिनिकेतन येथे त्याचें मुख्य विद्यापीठ आहे. तेथे पूर्व-प्रकरणातील राम-कृष्णाचे ध्येय गाठण्याचा त्याचा प्रयत्न चालू आहे.

आपल्याकडे इंग्रज सरकारने सुरू केलेल्या शिक्षणपद्धतीचे रवींद्रनाथ हे कट्टे शत्रु आहेत. इंग्रजी शिक्षणास ब्राह्मसमाजाचे कार्यक्रमात धर्माचे खालोखाल, क्वचित् धर्मापेक्षांही अधिक महत्त्वाचे स्थान देण्यात आलेले आहे. तथापि राजा राममोहनपासून आजपर्यंत बहुतेक सर्व ब्राह्म पुढाऱ्यांनी ज्या शिक्षणपद्धतीचा पुरस्कार केला, त्या शिक्षणपद्धतीबद्दल रवींद्रनाथांची मते बरीच भिन्न असल्यामुळे त्याचे थोडे विस्ताराने दिग्दर्शन करणे जरूर आहे.

असा एक काळ होता की, ज्या वेळीं आपण आपल्या मनाचे व बुद्धीचे स्वामी होतो. त्या वेळच्या आपल्या बुद्धीचा जिवतपणा व कल्पकता आज-कालच्या शिक्षणाच्या अवडंबराने चिरडून गेली आहे. पूर्वीची बुद्धीची ओजस्विता जाऊन आज आमच्या बुद्धीच्या पोकळ दालनात पाश्चात्य विद्येचा आडगिऱ्हाइकी पुस्तकी माल खेचून भरला आहे. संपत्तीची विपुलता व बुद्धीची कल्पकता वेचून, ज्यास सरकार शिक्षण म्हणते, त्याने आमची पोकळ डोकीं भारून टाकली आहेत. डोळे घालवून चष्मा मिळविण्यासारखाच हा प्रकार आहे! आजकाल आपले विद्यार्थी परीक्षा पास होण्याच्या वेडास बळी पडत आहेत. शक्य तितक्या तुटपुज्या ज्ञानांवर जास्तीत जास्त मार्क मिळविणे, हीच परीक्षा पास होण्याची आजकालची कला होय. हे परीक्षेचे यंत्र म्हणजे जाणूनबुजून सत्याचा अपलाप, आपल्याच बुद्धीशी दगलबाजी, आणि पढतमूर्खांची एक आत्मवंचना आहे! आणि अशा परीक्षा देऊन कोठे कारकुनी कोठे वकिली, कोठे पोलिस इन्स्पेक्टरी संपादून ऐन तारुण्याच्या मध्यान्हींच धापा टाकून प्राण सोडावा, हे आजच्या सुशिक्षिताचे जीवनचरित्र

आहे ! आपल्याकडील आजकालचा सुशिक्षित म्हणजे पाश्चात्य सुशिक्षिताचें एक बनावट सोंग आहे. पश्चिमेकडे जो ध्वनि निघेल त्याचा अस्पष्ट प्रति-ध्वनि यानी करावा, पश्चिमेकडे डोळे लावून, त्यांच्या आयुष्याची साधेल तशी नक्कल करावी, आणि निस्तेज झालेल्या बुद्धीलाच आत्मा समजून, परिस्थितीचे गुलाम होऊन रहावें, ह्यास काय म्हणावे ! ह्या आधुनिक शिक्षणाच्या काळांत माणसाच्या डोक्यांतली कला प्राचीनवस्तूंच्या संग्रहालयांत जाऊन दडाली आहे ! विद्येनें आपलें बिऱ्हाडबाजलें ग्रंथ-संग्रहालयात अथवा पुस्तकविक्याच्या दुकानी नेऊन टाकले आहे, धर्म रविवारच्या प्रार्थनेतच काय तो उरला आहे, आणि गाणें ग्रामोफोनच्या पेटीत अडकून पडले आहे ! अशा स्थितींत शिक्षणाच्या प्रगतीचा पाल्हाळ सरकारी निळया बुकात कितीही असला, तरी खऱ्या आत्म-विकासाच्या नांवानें पूज्यच ! आजचा विद्वान् म्हणजे मुळांतच तोडलेल्या फुलाप्रमाणे आहे. अंधानुकरणाने मिळविलेली भिकेची शिदोरी किती दिवस पुरणार ? वडिलार्जित संस्कृतीची संपत्ति गमावली, आणि हातीं सर्टिफिकिटांचे कपटे आले, ते काय कामाचे ! पाश्चात्यांचे अनुकरण करून आम्हीं धंद्यातील कला सोडली, आणि जीविनाची व धर्माची फारकत करून घेतली. आतां काय ते, तेथील आसुरी संप, मारामाऱ्या, भिकार बेकारी व गुत्तेबाजी, येथें पुरी बोकळावयाची राहिली आहे ! पश्चिमेच्या एखाद्या ताऱ्याने थोडा प्रकाश दिला, तरी त्यानें उजाडल्यासारखें वाटेल काय ? फुलबाजांच्या आगपेटीनें थोडा वेळ करमणूक केली व उजेड दिला, तरी सूर्यप्रकाशाचे काम ती कसे भागवील ! ह्यासाठी खास आपला संस्कृतीचा वडिलार्जित ज्ञाननिधि आतां बाहेर काढण्याची वेळ आली आहे. दुसऱ्याच्या दारच्या उकिरड्यावरील चिंध्या वेचीत बसणे, सुवर्णभूमीच्या लेकरांना शोभत नाहीं ! आपला भविष्यकाळ उज्ज्वल करण्यास आपणच कमर बांधली पाहिजे. सरकारावर विसंबून उपयोगी नाहीं.

आमच्या सरकारनीं ऐतिहासिक प्रेक्षणीय स्थळांचे रक्षण करण्याचे दीर्घ प्रयत्न चालविले आहेत. परंतु जडांचे रक्षण करीत असतां, ज्या कल्पक बुद्धींतून तीं दृश्ये निर्माण झालीं, त्या आमच्या हिंदी बुद्धीस ते धुळीस मिळवीत आहेत, ही केवढी शोचनीय गोष्ट आहे. झगझगीत अग्नि विझवावा, आणि त्याची राख पदार्थ-संग्रहालयांत ठेवण्याची आस्था दाखवावी, तसा

हा प्रकार आहे ! आणि मोठ्या दुःखाची गोष्ट ही आहे कीं, ह्या आमच्या शिक्षणाच्या अनास्थेस जे सरकार खरेखुरे जबाबदार आहे, तेच सरकार आम्ही स्वराज्यास अपात्र आहो, आमच्या ठिकाणीं शिक्षणाची हौस व आस्था नाहीं, अतएव आम्ही मूर्ख आहोत म्हणून आम्हांस हिणवीत आहे ! दाडीसे बांधलेल्या चंडोलास तुझे हे पंख उंच भराऱ्या मारण्यासाठी आहेत, म्हणून शिकविणे व्यर्थ आहे. त्यापेक्षां त्याचा पायबंद कायमचा तोडून त्यास मोकळे करणे हाच खऱ्या शिक्षणाचा प्रारंभ आहे. परंतु ते काहीच घडत नसून, उलट आपल्यात लाजीरवाणा प्रकार असा झाला आहे की, त्या पांखराच्या पायांत, तुटपुंज्या इग्रजीप्रमाणे, खुळखुळत असलेली साखळी तोडावी. असे त्या पांखरालाही अद्याप वाटत नाहीं, उलट तो एक भूषणास्पद दागिनाचं आहे, असे मानून ती तो मिरवीत आहे ! आधुनिक शिक्षणाची अशी ही भुलभुलाई आहे !

शिक्षणाचा देखावा सर्व ठीक आहे. पाश्चात्य युनिव्हर्सिटींत असलेलीच खुर्च्या. टेबलं, व कपाटे येथे आहेत. परंतु अध्यापकाचे खुर्चीवर मात्र विद्यार्थ्या-संबंधीं खरी खरी हितबुद्धि विराजमान नाही. त्या खुर्चीवरचा विलायती प्रोफेसर म्हणजे, एखाद्या चिंध्यांच्या मोठ्या बाहुल्यात " नोटाच्या " प्लेटी लाविलेला फोनोग्राफ बसविलेला असावा, असा सारा निर्जीव प्रकार आहे ! खरोखर, आज हिंदुस्थानात प्राचीन आर्यांची तपोवने पुन्हा निर्माण झालीं पाहिजेत. विद्यार्थ्यांच्या अंतःकरणात ईश्वर आपल्या सन्निकट आहे, ही भावना प्रत्येक श्वासोच्छ्वासागणिक अखंड जागृत पाहिजे, पूर्वीच्या आश्रमातून ही गोष्ट सहज साधत असे. कारण, ते आश्रम म्हणजे केवळ वसतिगृहे नव्हत, तर अध्यात्मपीठे होतीं, केवळ तपोवने नव्हत, तर देवालयेच होती. तेथे क्षितिजाच्या पडद्यातून रोज होणारे सूर्याचे उदयास्त, तसेच प्रशांत आकाशात चमकणारा तारकासमूह, ह्याचा केव्हांही विसर पडणे शक्यच नव्हते. तसेच निसर्गाने ठायीं ठायीं तयार केलेले अनेक सुंदर फुलाचे गुच्छ, व मधुर फळाचे घोस परमेश्वराची योजना व दयालुत्व याची साक्ष सदैव देत असत.

केवळ व्याकरणशाळा आणि रसायनशाळानीं मानवी जीवनाचा खरा सौंदर्यभाव व खरी माधुरी लोपून जाते. ह्यासाठी शिक्षणांत गायन व चित्र-कला यांचा प्रमुखत्वाने समावेश केला पाहिजे. तसेच आपण परकीय भाषाच्या

नादीं लागून जर आपल्या संस्कृतादि पवित्र मातृभाषांची हरएक तऱ्हेने योग्य जोपासना न केली, तर आपण आपल्या आत्मविकासाचे झरेच आटविल्या-प्रमाणे होईल. यास्तव आपण आपल्या आनुवंशिक पौर्वात्य संस्कृतीचा अगोदर पुरा अभ्यास केला पाहिजे; आणि पाश्चात्य विद्येस जरूर तर त्यानंतरचे स्थान दिले पाहिजे. वास्तविक आपली संस्कृति आपण पुरी जाणल्यावांचून, पाश्चात्य विद्येतून आपण काय शिकावयाचे, ते आपणास कळून आपल्या पचनींही पडणार नाही. आपलेपणाच्या मर्यादेत जोपर्यंत नदीचा प्रवाह वाहात आहे, तोपर्यंत त्यात दुसरे ओढेही मिळाले तरी चालतील. परंतु ही स्वत्वाची मर्यादा एकदां सुटली म्हणजे मग तो प्रवाह कसचा ! जलप्रलयच तो ! त्यांत जीविताची आशा कशाला !

सामाजिक सुधारणा हा ब्राह्मसमाजाचा दुसरा एक जिव्हाळ्याचा विषय आहे, ह्यासंबंधीही रवींद्रनाथाचे विचार विशेषेकरून प्रागतिक ब्राह्माशी फारसे जुळते असतील, असे वाटत नाहीं. युरोप व अमेरिकेसारख्या अत्यंत सुधारलेल्या देशांतील समाजात निरनिराळ्या वर्गांत माजलेले बखेडे त्यास अद्यापिही उलगडता आले नाहीत. परंतु हेच एकीकरणाचे अत्यंत बिकट कार्य हिंदूच्या वर्णव्यवस्थेने एका कालीं फारच उत्तम रीतीने घडवून आणले. ते असे की, त्यापासून आजही पाश्चिमात्यानी धडा घ्यावा, असे रवींद्र-नाथांचे म्हणणे आहे. तसेच राष्ट्राच्या अनेक घडामोडींत हिंदु-संस्कृतीचे रक्षण करण्याचे काम ब्राह्मण जातीकडे स्वाभाविकच आले, व ते त्यानीं चांगल्या रीतीने बजावले, असाही त्याचा अभिप्राय आहे. परंतु त्यांचे असे म्हणणे आहे की, आपल्या जातिसंस्थेने पूर्वी उत्कृष्ट कामगिरी बजावली असली, तरी आज ती जाति-संस्था देशाच्या प्रगतीस प्रतिबंधक होत आहे. कालांतराने वर्णव्यवस्थेतील खरे रहस्य जाऊन नुसता निर्जीव सांगाडा मात्र राहिला आहे. ब्राह्मणानी पूर्वकालीं देशाचे मोठेच कार्य केले खरे, पण आज त्याच्यांतील स्वार्थत्याग व खरे आध्यात्मिक तेज लोपले असतां, त्यांनीं आपले वर्चस्व दुसऱ्यावर स्थापूं पाहण्यांतच आपली मानहानि करून घेतली आहे. गाईने दूध द्यावयाचे सोडले, पण लाथ झाडण्याची खोड मात्र कायम आहे, असे लोक सहज म्हणू लागले. जातिभेद अभेद्य मानण्यांत मनुष्य हा विकास पावणारा

जिवंत प्राणी आहे, ही गोष्ट विसरली जाते. शिवाय जातिभेदाने सारे धंदे कायमचे आनुवंशिक केल्याने बुद्धीचे स्वातंत्र्य व कल्पकता ह्यास पुरेसा अवसर मिळत नाही. यास्तव जातिभेद हे पर्वतप्राय अभेद्य न मानतां, ते प्रवाहाप्रमाणे थोडे लवचिक मानले पाहिजेत, आणि त्यासाठी त्यात इष्ट त्या सुधारणा घडवून आणल्या पाहिजेत, असे त्यांचे म्हणणे आहे. त्या सुधारणा कोणत्या ह्याचा स्पष्ट निर्देश मात्र त्यांनी केलेला कोठे आढळत नाही. तथापि रोटी-बेटीव्यवहारात त्यांची मते बरीच पुढारलेली असावीत, असें दिसते. त्यामुळे त्यांच्या विचारसरणीत संगति लावणे बरेच कठीण होते.

सामाजिक सुधारणांतील दुसरी महत्त्वाची बाब, म्हणजे अबलोन्नति होय. जातीजातींत, त्याचप्रमाणे स्त्रीपुरुषात, मनुष्यांनीं केलेला कृत्रिम भेद मुळीच न मानता, समाजात सर्वांचा सारखाच दर्जा आहे, असे मानण्याकडे प्रागतिकाचा कल आहे. केवळ शारीरिक भेदापलीकडे त्यांच्यात कसलाच भेद नाही, असे ते लेखतात. परंतु ही गोष्ट रवींद्रनाथास मुळीच कबूल नाही. स्त्रीपुरुषांचे जीवितकार्य ते अगदी भिन्न समजतात. पुरुषांचे स्वातंत्र्य व प्रवृत्तिपर उद्योग, स्त्रियांच्या ठायीं त्यांस अस्वाभाविक वाटतात. त्यांचे म्हणणे असे कीं, स्त्रियांच्या खऱ्या कर्तव्याची जाणीव आजकालच्या सुधारक स्त्री-पुरुषास न राहिल्यामुळे, आज चोहोकडे स्त्री-पुरुषात चुरस व तेढ वाढत चालली आहे. सत्तेच्या मदाने आजकाल स्त्रियासही पछाडले आहे. स्त्रिया म्हणजे गृहिणी. घर हीच त्यांची कर्तव्यभूमि, ह्याचे त्यास भान राहिले नाहीं. पुरुषांप्रमाणे त्यांचीही चळवळ सुरूच आहे. विवाह आणि मातृपद यांची त्यांस मोठी दहशत वाटत आहे. पुरुषानींच सर्व धंदे बळकावून बसावें, याचे त्यास वैषम्य वाटू लागले आहे. दुकानात, कारखान्यात व कचेरीत पुरुषांशी चढाओढीने काम करू इच्छिणाऱ्या पुरुषी-बायका चोहोकडे दिसूं लागल्या आहेत!

"तुम्ही केवळ मातृपदाचा मान मिळवावा, बालसंगोपन करावे, शुश्रूषा करावी, गृहकृत्ये चालवावी, घरात प्रेमभावाचा परिपोष करून कुटुंबाच्या आध्यात्मिक उन्नतीस मदत करावी, इत्यादि फार महत्त्वाची पण नाजूक अशी तुमची कामे आहेत," असे म्हटल्यास आजच्या शिकलेल्या बायास ते म्हणणे खपत नाही. हे सर्व सुशिक्षिताचे घोर अज्ञान आहे. याने सर्व

सुधारलेल्या देशांत गृहसौख्याची हानि होत आहे. मानवी जीवितांतील खरें सत्य व सौंदर्य एकीकरणाच्या अथवा समान हक्कांच्या अतिशयांत नसून, सलोखा व प्रेमभाव ह्यात आहे. ऐक्याचे पूर्णत्व एकरूप अथवा समान होण्यात नसून प्रेमरूप होण्यात आहे. ही गोष्ट स्त्रियांस पुरुषांप्रमाणेच लेखणाऱ्या सुधारक स्त्री-पुरुषांनीं लक्षांत ठेवावी, असे त्यांच्या सांगण्यांतील रहस्य आहे, व ते चिंतनीय नाहीं असे कोण म्हणेल ?

---

## प्रकरण चौदावें

# संत-कवि

ब्राह्मपंथास संगीताची जोड राजा राममोहन यांच्यापासूनच मिळालेली आहे. आद्य ब्राह्मसंस्थेचे गोविंदमाला व भारतवर्षीय संस्थेचे त्रैलोक्यनाथ हे ब्राह्मपंथांतील सुप्रसिद्ध गायक होत. तसेंच राजा राममोहन व सत्येंद्रनाथ ठाकूर, यांची ब्राह्मगीतेंही सुप्रसिद्ध आहेत. ख्रिस्तीधर्मापेक्षां वैष्णवपंथाचेंच अनुकरण यांत जास्त केलेलें असावें. विशेषेकरून केशवचंद्रसेनावर ह्या बाबतींत ख्रिस्तीधर्मापेक्षांही वैष्णवधर्माची छाप कांकणभर जास्तच पडली असावी. त्याचप्रमाणे रवींद्रनाथांच्या काव्यस्फूर्तीस वैष्णवांचें वाङ्मय हेंच कारण झालें. एकदां काव्यस्फूर्ति उत्पन्न झाल्यावर मग मात्र त्यांनी कवि-कुलगुरु कालिदास यांसच गुरुस्थानीं मानलेलें दिसतें. आता हें खरें कीं, कालिदासानें कालीदेवीची उपासना केली, तर ठाकुरांचे घराण्याकडून देवीच्या नशिबी अर्धचंद्र आला ! तथापि कालिदास यास कोणी साधुकोटींत गणीत नसतील, पण रवींद्रनाथांस संत-कवि असें कित्येक मानतात. महाराष्ट्रांत संत व कवि हे शब्द जवळ जवळ पर्यायवाचकच झाले आहेत. महाराष्ट्रांतीलच काय, पण हिंदुस्थानांतील तुलसीदास, सूरदास, कबीर, नरसी मेहता, मीराबाई इत्यादि अत्यंत सुप्रसिद्ध व्यक्तींस संत व कवि ही दोन्ही विशेषणें सारखी-च लागूं पडतात. धर्मभावनाचें वाहन गद्यापेक्षां पद्यच असलेलें सार्वत्रिक दिसून येतें. कालानुक्रमानेंसुद्धां गद्यापेक्षा पद्यासच वडीलपणाचा मान आहे. देवाजवळ बोलावयाची भाषा पद्यात्मकच असते; आणि उलट देव आपले भक्तास स्फूर्ति देतो, तीही पद्यात्मकच असते. कालिदासास अशी स्फूर्ति देणारी कालीदेवी होती. तर रवींद्रनाथांस तीच स्फूर्ति देणारी त्यांची 'जीवनदेवता' आहे. त्यांचे चित्त जेव्हा प्रसन्न असतें, त्या वेळीं त्यास आपल्याहून भिन्न असें कोणी तरी आंतून सूचना करीत आहे, असें स्पष्ट कळून येतें. त्या शक्तीस ते 'जीवनदेवता' असें म्हणतात. आणि त्यांच्या काव्यांत जी विशेष प्रसादयुक्त वाणी आहे, ती त्या देवतेची आहे व जी

तशी नाही, तेथे तिची सूचकवाणी न जाणल्यामुळे त्यांचेकडून प्रमाद झाला आहे, असे ते म्हणतात. या त्यांच्या भावनेस कित्येक आत्मप्रौढी तर कित्येक औपचारिक भाषा, असे आरोप करितात. परंतु ते आरोप वास्तविक नसून आपल्याला असा खरोखरीच अनुभव येतो, आणि तो तसा इतर कवींसही येत असला पाहिजे, असे त्यांचे म्हणणे आहे.

कालिदास व रवींद्रनाथ हे दोघेही साकारसगुणाचेच उपासक आहेत, असे म्हणावयास हरकत नाही. रवींद्रनाथांचे जन्मापूर्वीच त्यांच्या घराण्यातील मूर्तिपूजा नाहीशी झाली होती, यामुळे मूर्तिपूजा करण्याचा किंवा तिचा निषेध करण्याचा प्रसंग राजा राममोहन अगर देवेंद्रनाथ यांच्याप्रमाणे त्यांच्यावर आलाच नाही. आता रवींद्रनाथांनी साक्षात् मूर्तिपूजेचा जरी कधीच पुरस्कार केला नाही, तरी त्यांच्या काव्यातील वर्ण्यविषय निर्गुण निराकारापेक्षां सगुण-साकारच आहे, हे सहज दिसून येईल. तथापि केवळ मूर्तिपूजेचे संस्कार घेऊन ते जन्मास आले नसल्यामुळे, कालिदास व रवींद्रनाथ यांना अल्पवयांत घडलेले ईश्वरी साक्षात्काराचे प्रकार त्या मानाने भिन्न होते. कालिदासास कालीदेवीच्या सगुणसाकार मूर्तीचा साक्षात्कार झाला, तर रवींद्रनाथाचा चित्प्रत्यय अमूर्त न निराकार अशा प्रकारचा होता. कालिदास व रवींद्रनाथ हे दोघेही निसर्गाचे भोक्ते खरे, पण कालिदासाच्या नजरेपुढे प्रायः पर्वतावरील वनश्री असे, पण रवींद्रनाथ यांची विशेष आवडती त्यांचे गांवची पद्मावती नदी आहे. रवींद्रनाथांच्या काव्यात मुख्यत्वेकरून दिसून येणारा लीन व उत्कंठित भाव, सागराच्या भेटीस जाणाऱ्या नदींतच अधिक प्रतिबिंबित दिसतो. आधुनिक साधु-कवींत तुलनाच करावयाची, तर राम-बादशहाच्या भूमिकेवरील रामतीर्थाची दिमाखदार वाणी, संन्याशाच्या पेशांतले विवेकानंदांचे गंभीर गाणे, आणि रवींद्रनाथांची गीतांजलि, हे अगदीं भिन्न वृत्तीचे परिणाम दिसून येतात. देवेंद्रनाथ, केशवचंद्र सेन व रवींद्रनाथ ह्या ब्राह्मांच्याच प्रार्थना जुन्या कवींच्या वृत्तांत बसवाव्या, असे म्हटले, तर त्यांस अनुक्रमे स्रग्धरा, हरिणी व अंजनीगीत ही वृत्ते त्यांचे वृत्तीस अधिक अनुकूल होतील असे वाटते. केशवचंद्रांचा अनुताप, दुःख, उद्वेग इत्यादि मनोवृत्तींची छाया रवींद्रनाथांच्या वाङ्मयांत नसली, तरी देवेंद्रनाथांचे गांभीर्य व त्यांच्या वाणींतील शक्तिपातही रवींद्रांचे गीतांत नसावा असे दिसते,

रवींद्रनाथांच्या भाषाप्रभुत्वाबद्दलही अत्यंत विरुद्ध अशीं विधाने त्यांच्या चरित्रग्रंथात आढळतात. कोणी त्यांस बंगाली भाषेचे शिरोमणि ठरवितात, तर कोणी त्यास तिच्या पायाशींही बसून देत नाहींत. मायकेल मधुसूदन दत्त ह्यांस बंगाली कवि म्हणून जो मान आहे, तो रवींद्रनाथास कोणी देत नाहीं. त्यास बंगाली भाषा नीट येत नाहीं, म्हणून साध्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेतदेखील त्यांस बंगाली भाषेचे परीक्षक नेमण्याचे कलकत्ता युनिव्हर्सिटीनें नाकारले! इतकेच नव्हे, तर त्याचे ग्रथातील उतारे दुरुस्त करून शुद्ध बंगालींत लिहिण्यास परीक्षेत उघड रीतीने घालीत असत; असे त्याचे चरित्रकार लिहितात, ह्याचे थोडे नवलच वाटते. व आपल्याकडील लोकमान्यांच्या सर्व मान्य रहस्यग्रथावरील एका मराठी व्याकरणकाराच्या टीकेचे स्मरण होते. रवींद्रनाथ हे स्वभावतः कसेही असोत, पण त्यास ज्वलजहाल असे सरकारपक्ष पूर्वी तरी मानीत असे, आणि तेही त्याच्या अप्रतिष्ठेस कारण असावे. रवींद्रनाथाच्या बंगालीतील गीताञ्जलीच्या इंग्रजी भाषांतरावर त्याची जगप्रसिद्धि होऊन, त्यास इ. सन १९१३ साली उत्कृष्ट वाङ्मयाबद्दल नोबेल प्राइज मिळाले.पण इकडे बंगालप्रांती त्याचा काहीच बोलबाला नव्हता. कलकत्ता युनिव्हर्सिटीने त्यास मागून डॉक्टर (भाषाकोविद) ही जी पदवी दिली, ती केवळ निरुपायानेच दिली असे दिसते. तरी पण रवींद्रनाथांचे ग्रह लोकमान्यापेक्षा ह्या बाबतींत वरचढच ठरले म्हणावयाचे. बाकी रवींद्रनाथास ह्या पदवीची मुळींच किमत नव्हती; इतकेच नव्हे तर ती त्यानीं मोठ्या नाखुषीनेच स्वीकारली. तसेच नोबेल प्राइज त्यास दिल्याची तार त्याच्या हाती पडली, तेव्हा शान्तिनिकेतनात चोहोकडे आनद उसळला, परंतु खुद्द रवींद्रनाथ अतिशय उदास झाले! व "इतःपर आपण स्वास्थ्याला कायमचे मुकलो!" असे उद्गार याच्या तोंडून निघाले. "जया अंगी मोठेपण। तया यातना कठीण!"

त्यांच्या काव्यांचीं इंग्रजी भाषांतरें ज्या मानाने जगप्रसिद्ध झाली आहेत, त्या मानाने त्यांची गीताञ्जलीसारखी बंगाली काव्ये खास बंगालप्रांती लोकप्रिय झालेली नाहींत, असे कोणी म्हणतात. भाषातराच्या अनेक आवृत्त्या झाल्या, तरी मूळ गीताजलीची इ. सन १९२१ पर्यंत तरी दुसरीही आवृत्ति निघाली नव्हती, असे थॉमसन् ह्यानीं लिहिलेल्या चरित्रावरून

दिसते! ह्याचे कारण कदाचित् दुर्बोधत्वही असूं शकेल. कवीचें रहस्य गूढ ठेवण्यास स्वभाषा जितकी सोयीची असते, तितकी परभाषा सोयीची होणार नाहीं. आणि कवीचे हृद्गत समजल्यावांचून, नाहीं शब्दार्थावरून काव्याचा बोध होऊं शकत नाहीं. रवींद्रनाथाचें हृद्गत खरें पुरें समजणें, बरेंच गूढ असतें. तात्पर्य, सतारीच्या मेंगकामीप्रमाणें रवींद्राच्या गीतांतील कोमल व खोल भाव जवळच्या चार तज्ज्ञांस समजला, तरी बहुजनसमाजापर्यंत तो पोंचून त्याच्यावर त्याचा परिणाम होणें दुरापास्तच आहे.

रवींद्रनाथाची शिकवण हिंदुस्थानाच्या अगदीं दूरच्या काना-कोपऱ्यापर्यंत पोंचली आहे, असें कोणी म्हणतात, ती आम्हांस आज तरी अतिशयोक्तीच वाटते. त्याची पद्यावली बंगाल्यांत मात्र ज्याच्या त्याच्या तोंडीं झाली आहे, असें कवीच्याच उद्गारावरून दिसतें. रवींद्रनाथाचें बाळपण श्रीमती शिस्तीच्या जरबेंत एकांतांतच गेलें. वडिलाच्याबरोबर राहून त्यांनीं मनमुराद एकांतवासच सेवन केला, आणि त्याच्या आयुष्याचीं ऐन तारुण्याचीं वीसपंचवीस वर्षे त्याच्या गांवढ्यावर एकांतवासातच गेलीं. त्यामुळें त्याची अशी समजूत दिसते कीं, कविता हें एक लाजाळू व भीरु पांखरूं आहे, आणि तें आपलें घरटें जनसंमर्दापासून अति दूर अशा एकांतांत घालतें. पण भोजराजाच्या भरसभेंत, पृथ्वीराजाच्या दरबारांत, मराठे सैनिकाच्या तळावर, वाळवंटावरील कीर्तनगजरांत व सद्गुरु व संत-श्रोते यांच्या समोरही, उत्कृष्ट कविता रचणारे कित्येक शीघ्र कवि, भाट, शाहीर, वैष्णव कीर्तनकार किंवा अध्यात्म-प्रवचनकार असतात, असें आपण पहातो. आणि त्यांच्याच काव्याची श्रोतृसमाजावर अधिक छाप पडते, असेंही आपणास आढळतें. ह्याचें कारण तें काव्य अधिक ओजस्वी असून त्यांत लोकसंग्रहबुद्धिही अधिक असावी असें वाटतें. सूर्य साऱ्या पृथ्वीला प्रकाशित करतो, पण कोणत्याही घराच्या उंबऱ्याच्या आंत पाऊल टाकीत नाहीं. त्याचप्रमाणें रवींद्रनाथ वारी खड हिंडून आले खरें; पण वैष्णव संतांप्रमाणें ते आपल्या देश-बांधवांतही फारसे कधी मिसळून वागलेले दिसत नाहींत. परमार्थमार्गांत, कर्मयोगाचें माहात्म्य सांगून, एकांतवासाची अनवश्यकता ठासून सांगणारे, कित्येक तत्त्वज्ञानी, स्वतः एकांतवासाचेच फार भोक्ते असतात, त्यांपैकींच

देवेंद्र व रवींद्र ही जोडी दिसते. आणि त्यामुळेच लोकसंग्रहाचें काम, त्यांच्या वास्तविक योग्यतेच्या व अधिकाराच्या मानानें, त्यांच्या हातून झालें नाही. रवींद्रनाथ आपल्या शाळेतील मुलांबरोबर मिळून मिसळून वागतात असें म्हणतात; पण वाघिणीची पिलें तिच्या अंगावर बागडलीं, तरी त्यायोगानें इतराचा तिच्याबद्दलचा वचक कमी होत नाहीं. रवींद्रनाथ हे गरिबांचे मोठे कनवाळू आहेत असें ऐकतों, पण राजवाड्याच्या गच्चीवर बसून, वाटेनें जाणाऱ्या गोरगरिबांस, खैरात करणाऱ्या उदारधी राजाप्रमाणें, हा एक सहानुभूतीचा प्रकार असतो! गोकुळांतल्या बाळगोपाळासह खेळणाऱ्या गीताप्रवचनकार श्रीगोपाळ-कृष्णाचें उदाहरण पौराणिक म्हणून सोडून दिलें, तरी बंगालचे प्रसिद्ध वैष्णव श्रीचैतन्य, किंवा आपल्याकडील श्रीतुकोबा प्रभृति वैष्णव संत, ह्यांनीं सामान्य लोकाशी केलेली दिलजमाई, किंवा जगद्गुरु श्रीशंकराचार्य ह्यांनी केलेला दिग्विजय, आज का घडून येत नाही? रवींद्रनाथ तत्त्वतः शंकराचार्यापेक्षां बुद्धाचेच अनुयायी खरे, असें कित्येक मानतात. आणि आधुनिक विद्वानांचे हे बहुतेक सर्वसाधारणच लक्षण मानता येईल. पण आसेतुहिमाचल क्रांति घडवून आणणाऱ्या बुद्धाची छाप, ह्याचे अनुयायावर ह्याची का दिसत नाही? ह्याचे कारण त्यातच हुडकून काढण्याचा आजच्या आधुनिक धर्मप्रवर्तकांनी प्रयत्न केला पाहिजे. इतकेंच सुचविण्याकरिता वर 'लहान तोंडी मोठा घास' घेण्याचें आम्ही हे साहस केलें आहे. काही असलें तरी इतकी गोष्ट निर्विवाद आहे की, आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या ब्राह्मवाङ्मयांत रवींद्रनाथाचें वाङ्मय अधिक काल टिकणारें व अधिक लोकप्रिय असेंच होईल. ह्याचें एक तर कारण असें की, गद्यापेक्षा पद्य हें धर्मप्रकरणीं लोकसंग्रहाचें एक चिरस्थायी व बलवत्तर असें साधन बनू शकतें. आणि ह्या साधनाचें अवलंबन रवींद्रनाथाइतकें इतर ब्राह्मानीं केलें नाही. शिवाय पुराणमताभिमानी लोकास अप्रिय झालेल्या, ब्राह्मपंथाच्या विशिष्ट गंधाचा भपकारा त्याच्या काव्यात उघड येत नसल्यामुळें तें जुन्यानव्या मताच्या सर्व रसिकास सारखेंच सग्राह्य वाटेल यात शंका नाहीं. इतर कित्येक कवीप्रमाणें रविंद्रनाथांच्या काव्यात तत्त्वज्ञानाच्या शास्त्रीय प्रक्रियेपेक्षां कल्पनाचातुर्य व शब्दवैचित्र्य ह्याचेवरच विशेष भर असल्यामुळें तार्किकास त्यांच्या विचारांत संगति अगर काटेतोलपणा दिसणार नाहीं. तसेंच त्याच्या

कांहीं कल्पना कित्येकांस समजण्यास कठीण, तर कित्येकांस साबूच्या फेंसाच्या फुग्याप्रमाणे फोल वाटतील. पण एकंदरीत त्यांची कविता ज्यांस समजेल, त्यांच्या चित्तास चटका लावील यांत शंका नाहीं. रवींद्राचे किरण विषयकर्दमांत गढलेल्या प्रापंचिकाच्या मनास चिखलांतून बाहेर पडलेल्या कमळाप्रमाणें प्रफुल्लित करतील. त्यांचे काव्यांत सत्य हे सौंदर्यात नटले आहे. मनुष्याची दृष्टि अध्यात्माकडे वळविण्याचे त्यांच्या काव्यात सामर्थ्य आहे. त्याची अत्यंत लोकप्रिय झालेली पद्यावली सत्याच्या जीवनाने जिवंत, व प्रज्वलित विचारानें तेजस्वी, अशी दिसते. त्याचे शब्द कर्णमधुर व कल्पना हृदयस्पर्शी असते. ज्यानीं त्याच्या काव्याचा पूर्ण आस्वाद घेतला आहे, त्यांच्या म्हणण्याप्रमाणे रवींद्रनाथाच्या काव्याचे असे सामर्थ्य आहे कीं, "त्यांनीं अंतःकरणात प्रकाश पाडावा, रक्त खळबळावे, व चित्त हलवून सोडावे!" व्यवहारात सहज नजरेपुढे येणारे पदार्थ व घडणाऱ्या गोष्टी ह्यांचीच जलतरंगाच्या पात्राप्रमाणे विचित्र मांडणी करून, त्यातून त्यानीं जो मधुर ध्वनि काढला आहे. तो पाहून मन चकित होते. हिंदुस्थानांतील संतकवींत रवींद्राइतके निसर्गदेवतेचे कट्टे भक्त दुसरे क्वचितच आढळतील. निसर्गाची फुले अध्यात्मसूत्रात गुंफण्याची त्याची हातोटी फार अजब आहे. लौकिक प्रेमास अलौकिक आनंदाचा उठाव देण्याची त्याना मोठी हौस दिसते. भक्तियोगातील अनिर्वचनीय असे कित्येक गूढ भाव काव्यात उतरविण्याची त्यांची शिकस्त आहे. सृष्ट पदार्थांच्या जडतेमुळे ते खडकाप्रमाणे रूक्ष दिसले, तरी कुशाग्र कल्पकतेने त्या खडकाचाही भेद करून, त्यातून आनंदाचा निर्झर उत्पन्न करण्याचे सामर्थ्य त्याच्या लेखणींत आहे. अशा अनेक गुणामुळे ब्राह्माच्या एकदर वाङ्मयात रवींद्राची जीवंत व ओजस्वी वाणी जिज्ञासूंस दीर्घकाल चेतवीत राहील, असा संभव दिसतो. त्यांच्या धर्मभावनेसबंधी गद्यात 'साधना' व पद्यात 'गीतांजलि' हे दोन ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. पैकीं 'साधना' ग्रंथातील कित्येक विचार पुढे एका स्वतंत्र प्रकरणात दिग्दर्शित केले आहेत. भाषांतराच्या योगाने 'गीतांजलि' मराठी वाचकास सुलभ झाली आहे, परंतु ती तितकीच सुबोध झाली आहे, असे म्हणवत नाहीं. काव्य हा लाखेवरचा दागिना भाषांतराच्या भट्टींत पडतांच खराब होतो. रवींद्राचे किरण ज्या शब्दजालातून प्रकाशित झाले आहेत,

ते शब्दजाल गॅस बत्तीच्या मॅन्टलप्रमाणे नाजूक आहे. त्याला अम्मळ धक्का लावण्याची सोय नाही. पुष्कळ ठिकाणीं त्यानीं केलेली शब्दयोजना विचारपूर्वक असेल, असेही वाटत नाहीं. पुष्कळ वेळा त्याच्या अंतरातील भाव त्यांना न विचारतांच बाहेर पडतो, आणि तो बाहेर पडल्याची वर्दी देण्याकरिता कांहीं निवडक शब्द उगाच धावत सुटतात. परके भाषांतरकार ह्या भावानंद महाराजाची चवकशी ललकारणाऱ्या शब्दाजवळ करतात, तशाने खरी ओळख कशी होणार ! काव्यरसायन म्हणजे निरनिराळ्या शब्दसंयोगाचे रासायनिक मिश्रण होय. त्याच शब्दांचे पर्याय एकत्र झाले, तर खिचडी बनते. ह्या कारणास्तव गीतांजलीचा सारांश सांगण्याचा प्रयत्न करणे निष्फल आहे, हे दिसून येईल.

रवींद्रनाथास ब्रह्मानंदापेक्षाही गानानंद अधिक प्रिय असेल, इतके गाण्याचे ते शोकी आहेत. पहाटे एकदा गाण्यास सुरुवात झाली की, मध्यंतरीं जेवण्यास घडीभर उठतील तेवढेच, नाहीतर रात्रीपर्यंत सारखे गाण्यातच रंगून जातात. त्याच्या गीतांजलीत निरनिराळे ऋतु व अहोरात्रीच्या निरनिराळ्या प्रहरांचे वर्णन आले आहे. तथापि सर्व चिजांची रागदारी एकसारखीच दिसते. त्याच्या काव्यात दीन करुणरस भरलेला दिसतो. समर्थांच्या करुणाष्टकाप्रमाणे त्याचीही करुणाष्टके काही सुबोध तर काही दुर्बोध आहेत. कित्येक गीतात वैदिक प्रार्थनांची सुधारून काढलेली आवृत्तिच दिसते. निसर्गाचे चमत्कारासंबंधी व्यक्तिभावाचा उल्लेख त्याच्या काव्यात ठिकठिकाणी दिसतो. ठायीं ठायीं चित्कलेची चाहूल लागल्याची साक्ष त्याचीं कित्येक गीते देत आहेत. "गरुडावरि बैसोनि माझा कैवारी आला!" असे सद्गदित कंठाने अडखळत व साश्रुनयनांनी अरुणोदयाकडे पहात म्हणणाऱ्या वैष्णव भक्ताप्रमाणे, रवींद्रनाथाची उत्कंठा ठिकठिकाणी भासते. मात्र त्यात भक्ताच्या निर्व्याज प्रेमोत्कंठेपेक्षा कवीच्या शब्दलाघवाची छटा अधिक दिसते. ईश्वर हा दीनाचा कैवारी आहे. सावत्यामाळ्याची भाजी खुडीत असलेलाच तो आढळेल. जीवाने अहंता व ममता सोडली पाहिजे. सर्वात्मभावाने खरी शरणागति झाली पाहिजे. सुखःदुख ह्या विकासाच्या पायऱ्या आहेत. जीवाची जन्मपरंपरा अनंतकाल चालणारी आहे. लोकसेवा हे ईशभक्तीचे साधन आहे. मोडक्या देवळातील देवाच्या पूजेचे दिवस

आतां संपले, डोळे मिटून जपजाप्य करीत बसण्यात खरा लाभ नाही, इत्यादि विचार ह्यांत आहेत. तरी पण दुसरे कोणतेही व्यवसाय न करितां ईश्वराचे एकसारखे भजन चिंतन व करीत बसण्याचीच कवींची बैठक दिसते. ह्यांच्या इष्ट देवतेचीं दृश्ये मोठीं विलक्षण आहेत. ते देवास बहुधा सख्यत्वाच्या (मित्राच्या) नात्यानें पाहतात; पत्नीभावानें एका मृत्यूसच त्यांनीं वरिले आहे. बाप अत्यंत कठोरपणानें ताडण करीत असतां. केवळ दयेची मूर्ति अशा, अश्रु ढाळीत उभ्या असलेल्या आईप्रमाणें 'देवा, तूं मला दर्शन दे' असे एके ठिकाणीं त्यांनीं मागणें केलें आहे. तर दुसऱ्या ठिकाणी जगदात्री देवीचा बंदा बागवान बनून तिनें, तुला काय बक्षीस पाहिजे ? म्हणून विचारतां, कवि म्हणतातः—" हे देवि ! कमळाचे कळीप्रमाणें तुझे हे सुकुमार हात हातात धरून त्यावर कुंदाचे गजरे मला घालूं दे, अशोकाच्या गुलाबी रंगानें तुझीं पाउलें मला रंगवूं दे, आणि तुझ्या पदकमलांवर चुकून रेंगाळत राहिलेला एखादा रजःकण गोडशा चुंबनानें मला टिपून घेऊं दे !" त्या रसिक व धीट बागवानाचें हे चातुर्य पाहून देवी प्रसन्न झाली, व तिनें त्यास आपल्या खास फुलबागेवरील माळी नेमला; हें सांगावयास नकोच. युवयुवतींचे प्रेम हेंही शाखाचंद्र न्यायानें त्यांनीं ध्येयरूप मानलें आहे. कवि म्हणतात, आपकमापुकप्रेमाहून लोकोत्तर असा दुसरा कोणताच पदार्थ ह्या जगतीतलावर नाहीं. प्रियेच्या प्रेमोत्सवांत गेलेल्या चार घटका, कालातीत अशा अमृतत्वाचा अनुभव करून देतात. अशा रीतीनें विषयानंदास त्यांनी ब्रह्मानंदाचें एक प्रतीक मानलें आहे. स्त्रीच्या ह्या राजसी प्रेमाप्रमाणें सात्त्विक मातृप्रेमासही ते अगदींच विसरले नाहींत. रवींद्रनाथ म्हणतात, " मी लहानपणी एक दिवस गंगेच्या घाटावरील आमच्या एका वाड्यावरून जात होतो. वाड्यांत न शिरतां मी नादानादानें आमच्या गांवांतील घरीं गेलो. तेथे गेल्यावर माझ्या लक्षांत आलें कीं, आपली आई गंगेवरील वाड्यांत होती. पण आपण आंत मुळींच वळलों नाहीं. मग मी पुन्हा परत फिरलो, आणि त्या आमच्या वाड्यांत थेट आईजवळ गेलो. आईनें मजकडे पाहिलें व माझे पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत ती म्हणाली, 'बाळा, आलास ?' त्या दोनच अमृतोपम शब्दानीं मी गार झालो. आणि मला वाटलें कीं, आई जवळ असतांही तिला विसरून मी चाललों होतो. आणि 'बाळा आलास'

ह्या प्रेमपूर्ण संजीवनमंत्रास मी मुकत होतो! सारे जग त्या परमात्म-माउलीला असेच विसरून पुढे चालले आहे." हेच कवींचे हृद्गत होय!

काव्यपरीक्षक एकंदरींत असे म्हणतात कीं, रवींद्रांचे काव्यांत नीतीस भावनेची जोड मिळाली आहे; देशाभिमानाने विश्वबंधुत्वाशीं सख्य साधले आहे; गृहमंगल, जंगलाचे विरागावर अधिष्ठित असून, दैवी व मानवी गुणाचा सुंदर मिलाफ झाला आहे, आणि इहलोकचे भूवैकुंठ बनविले आहे. त्याच्या गीतांत स्वानुभूतीचा सभवही ठिकठिकाणी दिसतो. आतां चलनी नाण्याप्रमाणे अथवा वीण्याच्या तारेप्रमाणे त्यांत सत्त्वाबरोबर राजसाची भेसळही आहे, हे वरील काही कल्पनांवरून दिसून येईल. रवींद्रनाथांनीं बंगाली वैष्णव कवींप्रमाणे बाऊल पंथी व महाराष्ट्रीय वारकरी पथी कवींशींही कदाचित् परिचय केला असावा असे दिसते. ह्या निरक्षर कवीच्या काव्यानी ते चकित झालेले दिसतात. तार्किक तत्त्वज्ञान्यांच्या बर्फाच्छादित शैलशिखरापेक्षा, खेडोपाडी वाहणारे हे जिवंत झरेच, भरतभूमीच्या धर्मभावनेचे खरे पोषक व द्योतक आहेत, अशी त्यांची खातरी झाली आहे. तसेच हेंही खरे की, राजकवींच्या पदरीं असलेल्या सोन्याचांदीच्या चलनी नाण्याच्या बिट्टयापेक्षा गरीब कवीच्या गांठीं असलेल्या कवड्या-बदामांचे गडे अधिक एकजिनसी, साधे, स्वभावसिद्ध सर्वांस ओळखूं येणारे आणि ढोंगी बनावटीस अवसर न देणारे, असे असतात. देवापुढे कोणी खोटा पैसा ठेवील, पण बदाम ठेवील तो कसा असो, पण खराच असणार. त्यावर दुसरा कोणाचा शिक्का नसला, तरी भगवंताची अस्सल प्रेममुद्रा त्यावर असू शकते. तात्पर्य इतकेंच की, महाराष्ट्रातील तुकोबा व बंगाली रवींद्र दोघासही पाहिजे तर संतकवि म्हणा, परंतु एकाने पहिल्या संत पदावर तर दुसऱ्याने कवि-पदावर जास्त जोर दिला आहे. त्यामुळें पहिले संतराज तर दुसरे कविराज ह्या अन्वर्थक नावानी प्रसिद्ध आहेत. लोकमान्य टिळक कांहीं देशकार्याकरितां रवींद्रनाथास भेटण्यास एकदा मुंबई मुक्कामी गेले होते. भेट घेऊन आल्यावर रवींद्रनाथांबद्दल आपले काय मत झाले, असे एकाने त्यांस विचारतां लोकमान्य म्हणाले. "ते एक श्रीमंत कवि आहेत, झाले!" हे खाजगी उद्गार प्रसिद्ध करण्यांत कोणास कदाचित् औचित्यभंग वाटेल; पण श्रीमंत कवि ह्या दोनच शब्दात लोकमान्यानीं रवींद्रनाथांचे संपूर्ण वर्णन फार मार्मिकपणाने केले, असे आम्हास वाटते.

———

## प्रकरण पंधरावें

# रवींद्रांचे किरण

रवींद्रनाथाचे कोणी चरित्रकार असे म्हणतात की, रवींद्रांच्या ठिकाणीं साधुपुरुषाची बुद्धि, कवीची प्रतिभा, प्रणयीजनाची तन्मयता आणि बालाचें हृदय आढळतें! तरी त्याच्या आणखी कांहीं विचारतरंगांवरून त्याच्या अंतरींची काय साक्ष पटते, ते यापुढें पहावयाचें आहे.

केशवचंद्रांचे किरण उघड उघड परप्रकाशित दिसत असले, तरी रवींद्रांचे तसे उघड दिसत नाहीत. देवेंद्रनाथ व रवींद्रनाथ ह्याच्यावर इंग्रजी वाङ्मयाचा परिणाम झालाच आहे, पण ख्रिस्तीधर्माचा परिणाम ह्याच्यावर मुळींच झालेला दिसत नाही. जीझस ख्राइस्टबद्दल त्याचा अत्यंत आदरभाव दिसतो. परंतु जीझस ख्राइस्ट यांस जी गोष्ट साध्य झाली, ती इतरास अशक्य आहे, असे मात्र त्यांस मुळींच वाटत नाही. तसेंच ख्रिस्तीधर्माचा प्रसार सर्वत्र झाला आहे म्हणून ख्रिस्तीधर्मच श्रेष्ठ मानला पाहिजे, ही विचारसरणीही त्यांस कबूल नाही. रवींद्रनाथ असे म्हणतात की, दरोडेखोराचा धर्म, त्यांच्या जवळच्या संपत्तीचे प्रमाणावर श्रेष्ठ ठरविण्यापैकीच हा वेडेपणाचा प्रकार आहे. त्याच्या विश्वभारती संस्थेमध्ये सर्व धर्माचा व धर्मीयाचा संग्रह आहे. परंतु त्याचा असा भरंवसा आहे कीं, पुढेमागे सर्व धर्मांचे एकीकरण झाल्यास त्याच्यावर हिंदुधर्माचीच छाप राहील. असे जरी त्याचे स्पष्ट उद्गार असले, तरी त्याच्या चरित्रकारास ते हिंदूपेक्षां बौद्धभिक्षूसारखेच अधिक वाटतात, आणि कोणास तर त्याच्या विचारांवर ख्रिस्तीधर्माचेही संस्कार झालेले दिसतात. रवींद्रनाथाची गीतांजलि हें ख्रिस्ती संस्कारांचेच एक रूपांतर आहे, असें कांहींचें म्हणणे आहे. कोणी सनातनधर्माभिमानी असे निक्षून सांगतात कीं, रवींद्रनाथ हे एकेश्वरी पंथाचे व मधुकरी वृत्तीचे एक सुधारकच आहेत त्याची दृष्टि सृष्टिसौंदर्यापलीकडे गेलेली नाहीं. संन्यासाचे महत्त्व त्यांनी जाणले नाहीं, "देवळात ईश्वर कोठे आहे, तो माध्यान्हकाळच्या टळटळीत उन्हात घामाघूम होऊनही शेतांत राबत आहे! त्याच्याकडे पहा."

अशा प्रकारच्या त्यांच्या उद्गारात व्यावहारिक कळवळा दिसून येत असला, तरी त्यांनीं वेदान्ताचे गूढतम रहस्य आत्मसात् केले आहे, असे होत नाहीं. नैराश्याचे वैराग्य त्यानी अनुभाविले नाही. व त्याचे महत्त्वही त्यांनी जाणले नाही. अर्थात् हिंदी तत्त्वज्ञानाचे प्रतिनिधि असे त्यास मानता येणार नाहीं. असो. ह्याप्रमाणे टीकाकारांच्या दृष्टिभेदामुळे मतामतात असे हे फरक दिसत असले, तरी खुद्द रवींद्रनाथाच्या अनेक लेखावरून व उद्गारावरून रवींद्रनाथाची भिस्त उपनिषदावरच जास्त दिसते. मग त्यानी आपले विचार उपनिषदाच्या अध्ययनाने बनविले किंवा त्यांच्या नवयुगानुसार बनलेल्या विचारास त्यांनीं युक्तीने सोइस्कर अशा उपनिषद्-वाक्याची पुष्टि दिली, हे ठरविताना एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, बालपणापासून उपनिषदाचा पाठ त्यांनीं आपल्या घरी प्रत्यहीं ऐकलेला होता.

मनुष्याचा ईश्वराशी जो संबंध त्यासच आपण स्थूलमानाने धर्म असे म्हणतो आणि ह्या अत्यंत जिव्हाळ्याच्या संबंधावर ख्रिस्ती व हिंदी धर्माचे मुळीच एकमत नाही. ख्रिस्तीधर्माप्रमाणे मनुष्य हा स्वभावतः पातकी आहे. आणि केवळ ईश्वराच्या कृपेनेच त्याचा उद्धार व्हावयाचा आहे. ह्याचा अर्थ असा की, बीजास अंकुर फुटून त्याचा वृक्ष बनणे हा जसा काही एक लोकोत्तर चमत्कारच आहे. एरव्ही बीजाचा धर्म वरच्या टरफलात अडकून रहाणे हाच आहे. आपल्या धर्माची दृष्टि ह्याहून भिन्न आहे. क्रुद्ध झालेल्या देवाला, आळवून त्याची कृपा कोठून बाहेरून संपादन करावयाची नसून, आपल्याला फक्त अज्ञान अथवा अविद्या यांचे आवरण दूर करावयाच आहे; मायाममतेच्या बंधातून आपल्याला फक्त मोकळे व्हावयाचे आहे, म्हणजे आपण आपल्या उज्ज्वल रूपाने सिद्धच आहोत. मूर्ति पाषाणात असतेच फक्त तिचेवरील दगडाचे थर काढून मूर्तिकार तिला व्यक्त रूपात आणतो. तात्पर्य, जीवाचे स्वरूपतः जे ब्रह्माशीं ऐक्य आहे, ते पाश्चात्यास पटत नाहीं. ब्रह्मविदांनी ब्रह्म व्हावे ही कल्पना त्यांस अशक्य व अधार्मिक वाटते. परंतु रवींद्रनाथांस तसे वाटत नाही. ह्याप्रमाणे ख्रिस्तीधर्माशीं त्यांचा मूळांतच मतभेद आहे.

धर्माधर्मांतील विरोधाचा परिहार करून सर्व विश्वव्यापी असा एक सार्वत्रिक धर्म बनविणे, हे राजा राममोहनाचे ध्येय रवींद्रनाथानी आपल्यापुढे

ठेवलेले दिसत नाहीं. मूळचें ऐक्यच भिन्नतेला प्राप्त झालें आहे, हे जाणून भिन्नभावाचा निरास करीत न बसता, भेदाच्या मूळाशीं असलेलें ऐक्य पहावें, अशी रवींद्रनाथाची दृष्टि आहे. गुलाबाच्या कळ्याने फुलून आपल्या पाकळ्या स्पष्ट व विलग कराव्या, हा त्याचा धर्मच आहे. त्या पाकळ्या प्रेमरसाने जो-पर्यंत देठाला चिकटून आहेत, तोंपर्यंत त्यांच्या भिन्नपणाने फुलाच्या एकत्वाची व सौंदर्याची काहींच हानि होत नाही. दुसऱ्या भाषेत बोलावयाचें तर रवींद्र-नाथाचा सिद्धान्त असा दिसतो कीं, स्वत्वाच्या विकासांतच व्यापकत्वाची गुरु-किल्ली आहे, आणि उलट व्यापकदृष्टि हीच सत्त्वाच्या विकासास खरी मार्ग-दर्शक आहे. यास्तव आपण आपली संस्कृति गमावून परकीयाचें अनुकरण करणं, ही भिक्षावृत्ति जशी नादानपणाची आहे, त्याचप्रमाणे परकीय तेवढे त्याज्य मानून चालणें, हेंही आत्मघातकीपणाचें आहे. तसेंच बाहेरून विलायती रोपें आणून तीं रुजविण्याकरितां अगर आंतली असलेली राखण्याकरितां संप्रदायाचीं कुपणें घातलेली; त्यास मुळीच आवडत नाहींत. घडीव नियमबद्ध संस्थापेक्षां शीलसंपन्न व्यक्तीवरच त्याची जास्त मदार आहे. धर्ममंदिराच्या शिल्पकामापेक्षा स्वयंप्रेरणेने विस्तारलेल्या बोध ( अश्वत्थ )वृक्षाची छाया त्यांस अधिक उपकारक व स्वाभाविक वाटते.

ह्याप्रमाणे रवींद्रनाथ घडीव संप्रदायाच्या जरी विरुद्ध आहेत, तरी सद्गुरूंचे माहात्म्य त्यांस मान्य आहे, असे दिसते. अशा अधिकारी माणसांच्या वाणींत दुसऱ्याचा प्रतिध्वनि नसतो, ती स्वयंप्रेरित असते. ईश्वर अशा विशेषस्थानींच प्रगट झालेला असतो. एके अर्थी गुरु हे ईश्वराचे दूत होत. अशाच्या प्राप्तीसाठी आपण तप केले पाहिजे, असे त्यांचे उद्गार आहेत. पण स्वतः रवींद्रनाथानी निसर्गाचेच शिष्यत्व पत्करलेलें दिसते. अहंकाराच्या ग्रंथींतून जीवात्म्याची मुक्तता करून, व विश्वांत भरलेल्या आनंदाशी समरस होऊन, तद्द्वारा परमात्म्याशी एकरूप होणे, हें त्यांनीं आपल्या धर्माचें ध्येय ठरविलें आहे. त्यांचें म्हणणे असे कीं, क्षणभंगुर संसाराच्या बुडाशी असलेल्या शाश्वत सत्तेशी आपला काय संबंध पोचतो, ह्यासंबंधी अखंड सावधानता राहिली पाहिजे, आणि ती राहण्यास साधकानी सदा निसर्गाशी संलग्न असावयास पाहिजे. सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं रति बाळगली असतां, तरुलतांची जोपासना करीत असतां, पशुपक्ष्यादिकाचे संगोपन होत असतां,

तसेंच आपल्या सभोंवार पंचमहाभूतांनी चालविलेल्या अद्भुत खेळाचें निरीक्षण करीत असतां, ही आत्मपरमात्मरूपातील संबंधाची जाणीव वाढीस लागते, म्हणून निसर्ग हेच त्यानी खरें विद्यापीठ मानले आहे. सभोवारच्या विश्वाशी असलेला आपला ऐक्यभाव न जाणल्यामुळेच प्रतिबंधक भिंतींनी कोंडलेल्या तुरुंगाप्रमाणे जीवास हा भवबंध वाटत असतो. परंतु वास्तविक ह्या सभोवारच्या निसर्गाच्या चिंतनातच मुरून जाणें, हाच आत्मस्फूर्तीचा उत्तम उपाय आहे. आज आपल्याला पूजेकरिता देवळाची जरूरी नाही, किंवा कोणत्याही विधिविधानाची गरज नाहीं. आपल्याला आज असा आश्रम पाहिजे आहे कीं, जेथें निसर्गाचें सौंदर्य व मनुष्याची उद्योगशीलता, यांचा सुंदर मिलाफ झाला आहे.

रवींद्रनाथाच्या ह्या अशा विचारसरणीमुळे देह, गेह अथवा हे अखिल नामरूपात्मक विश्व यापासून जीवात्म्यास आपली सुटका करून घ्यावयाची आहे, असें ते मानीत नाहींत. सृष्टि हे ईश्वराचें निषेधात्मक स्वरूप नसून उलट व्यक्त स्वरूप आहे. परमात्मा जर सर्वत्रच संचरला आहे तर आपल्या देहास आपणास तुच्छ कसे लेखता येईल. देहेंद्रियाचा विनाकारण कोंडमारा न करितां, त्याच्या द्वारा भगवताच्या आनंदाचा अनुभव घेत असावें, हेच योग्य आहे. ह्या विश्वाच्या द्वारेच आपल्याला आपल्या परमपदाची मिरास मिळवावयाची आहे. हे विश्व म्हणजे जीवात्म्याची प्रगतिपर खेळ खेळावयाची रंगभूमि आहे. येथील सर्व सृष्ट पदार्थ अपूर्ण आहेत, हेच फार बरें आहे; कारण त्यामुळेच हा प्रगतिपर खेळ एकसारखा सुरू राहू शकतो. सोपाधिक वस्तूची आपले मूळचे निरुपाधिक स्वरूप व्यक्त करण्याची जी अखंड धडपड तेच हे विश्व होय. सृष्ट पदार्थांचे लहान मोठे आकार अथवा त्याची प्रचंड संख्या, ह्यांत विश्वाचें सत्यस्वरूप नाही, तर त्यांच्यातील अमोघ व अगणित असे जे एक सापेक्ष दर्शन, तेंच विश्व होय. हा संसार आपल्या नजरेपुढे एखाद्या अश्वत्थवृक्षाप्रमाणे एकत्ररूपाने येतो. आपण वृक्षाकडे पाहतो तेव्हां फांद्या, फळें, फुलें, साली, मुळे वगैरे त्याचे नानाविध प्रकार आपण भिन्नत्वाने पहात नाही, एकच एक वृक्ष पाहतो. तैलचित्र तयार होण्यास अनेक कारखान्यात तयार झालेल्या अनेक वस्तु लागतात. परंतु अखेर जे सौंदर्यदर्शन होतें, ते कोणत्याही कारखान्यात घडलेल्या जडवस्तूं-

पैकी नसते. कोणी ह्यास भास अगर माया म्हणो; परंतु वास्तविक चित्र तयार करण्यासाठी सर्व जमविलेल्या वस्तूंची सार्थकता त्यांतच आहे. नाटकाची रंगभूमि, पात्रे व देखाव्याची सर्व सामग्री खरी वाटली, तरी ती वस्तुतः नाशवंत आहे. परंतु ती सर्व नाश पावली, तरी त्या नाटकाची कल्पना शाश्वतच राहील; कारण सर्व कल्पनांचा कल्पक जो सूत्रकार तो शाश्वत आहे. तात्पर्य, अशाश्वत अशा जड वस्तु, त्यांच्याठायीं अनुस्यूत असलेल्या एका शाश्वत सत्याचा जोपर्यंत बोध करून देत आहेत, तोपर्यंत त्या जडवस्तुजातापासून आपली कांहींच हानि नाहीं. अनंत आणि पूर्ण अशा ब्रह्माचे अखंडित असे व्यक्तीभवन, हेंच सृष्टीचें सत्यस्वरूप जाणावे, हेंच ते रहस्य होय.

एखाद्या व्यक्तीनें, समाजानें अगर राष्ट्रानें पुष्कळ संपत्ति, शक्ति, अगर प्रदेश मिळविणें ही कांहीं खरी सुधारणा नव्हे. अनेक अपूर्ण वस्तूंच्या संग्रहानें एका पूर्ण वस्तूची प्राप्ति झाली, असें होत नाहीं. उलटपक्षीं मूल कितीही लहान असलें, तरी त्याच्या आकाराच्या लहानपणामुळें त्यास अपुरें म्हणता येत नाहीं. तें स्वांगानें पूर्णत्वाचेंच दर्शन देतें. तात्पर्य, पूर्णत्वाच्या दर्शनांत संख्येचा अगर आकाराचा लहानमोठेपणा, तसेंच बरेवाईट गुण, हे कांहींच फरक करीत नाहींत. कित्येक एकेश्वरीपंथाचे गृहस्थ फक्त चांगल्या गुणांतच ईश्वरास ओळखतात. परंतु तें बरोबर नाहीं. अशा रीतीनें जगांतील वाईटास सैतानी स्वातंत्र्य मिळतें तसें असणें शक्य नाहीं. परब्रह्मवस्तु अखिल विश्वास व्यापून राहिलेली आहे. सृष्टींतील अनंत नामरूपें व गुण ह्यांच्यातील नानात्वाचा अथवा विरोधाचा त्या विश्वरूप परमात्मदर्शनांत मिलाफ होऊन जातो. आणि अशी ही दृष्टि असल्यामुळें आपल्या प्राचीनकाळच्या ऋषींस ह्या अफाट सृष्टीचा कधींच बाऊ वाटला नाहीं. सृष्टीच्या उपभोगांत इंद्रियलोलुप होऊं नये, इतकेंच त्यांनी सांगितलें. परंतु पुढें बुद्धानें संसाराचा त्याग करणें, हेंच परमध्येय ठरविलें. आणि वेदान्ती जे शंकराचार्य त्यांनी वेदांचें खरें रहस्य न सांगता, बौद्धांच्या क्षणिकवादाचा व मायावादाचाच आपल्या वेदान्तशास्त्रांत अंगीकार करून घेतला. ह्या त्यांच्या विसंगतीचें कारण त्यास जुने वेदान्ती व नवे बौद्ध ह्या उभय मतवाद्यांवर आपल्या मताची छाप टाकायची होती, हेंच असावें, असें रवींद्रनाथाचें अनुमान आहे.

शंकराचार्यांचा संन्यास व मायावाद रवींद्रनाथास कबूल नाहीं, असे

म्हणतात. ब्रह्म हे विश्वाहून पर आहे, विश्वरूप हा एक भ्रम आहे. तीव्र वैराग्यपूर्वक नैष्कर्म्यसिद्धि व योग यानींच मोक्ष प्राप्त होतो. मोक्ष म्हणजे परब्रह्मस्वरूपात आत्म्याचें लीन होणें. पृथकत्वानें न उरणें असा मोक्ष, हेंच परमध्येय होय. तें साधेपर्यंत कर्मविपाकशास्त्राप्रमाणें जीवामागें प्रारब्धभोग व जन्ममरणपरंपरा हीं लागलीं आहेत, इत्यादि सिद्धान्त रवींद्रनाथास मान्य नाहीत, असेही सांगण्यात येतें. किंबहुना खऱ्या वैदिक धर्माचे हे सिद्धान्तच नव्हत, असेंही प्रतिपादन ब्राह्मलेखकाकडून होत असतें. रवींद्रनाथापुरताच विचार करतां, त्यांनीं वरील सर्व गोष्टी अर्धवट तरी मान्य केल्या आहेत, असें वाटतें. कवीच्या कल्पनेच्या दाट पालवींत त्यांच्या विचाराचा ताणा कसा फिरला आहे, हे पुष्कळ ठिकाणीं स्पष्ट दृग्गोचर होत नाहीं. यामुळेच रवींद्रनाथाचें मतदिग्दर्शन निरनिराळ्या ग्रंथकारांनीं भिन्न तऱ्हेनें केलेलें दिसतें. प्रो० राधाकृष्ण एक म्हणतात, तर थॉमसनसाहेब वेगळेंच सांगतात.

कोणी कांहीं म्हणोत, रवींद्रनाथाच्या मनाची ओढ स्वतापुरती तरी कर्मप्रवृत्तीपेक्षां कर्मनिवृत्तीकडेच अधिक आहे, असें आम्हास वाटतें. जनसमर्दापेक्षां एकांत हा त्यांना अत्यंत प्रिय आहे. लोकसंग्रहार्थ म्हणून चाललेले कोणतेही उद्योग त्यास मानवत नाहीत. धार्मिक, सामाजिक, राजकीय अथवा औद्योगिक, कोणत्याही संस्थेत काम करणें त्यास नकोसें होतें. नदीच्या कांठीं गवतावर स्वस्थ पडून राहणें, हेंच त्यास ईशचिंतनाला अधिक अनुकूल वाटतें. अशा स्थितींत, महात्मा गांधी अथवा लोकमान्य टिळक, ह्यांच्याप्रमाणें रवींद्रनाथास कर्मयोगी म्हणतां येईल, असें आम्हास वाटत नाहीं. आतां ही गोष्ट खरी कीं, बाल रवींद्र, पद्मावतीचे कांठीं काव्य गुणगुणणारे एकांतवासी, बंगालच्या फाळणीनंतर राजकारणाच्या आखाड्यांत उतरलेले ज्वलज्जहाल, नोबल प्राईज मिळविलेले कविसम्राट् आणि विश्वभारतीच्या द्वारें संस्कृतिसम्मेलन करणारे विश्वपुरुष, ह्या रवींद्रनाथाच्या अनेक चढत्या स्वरूपाच्या दर्शनांत लोकसंग्रहात्मक कर्माची आस्था व व्याप वाढत्या प्रमाणांत आहे. पण हे सारे व्याप त्यांनीं स्वेच्छेनें व हौसेनें अंगीकारले आहेत, असें म्हणण्यापेक्षां त्यांना अनपेक्षित रीतीनें प्राप्त झालेल्या मोठेपणामुळें त्यांच्या वाढत्या महत्त्वाकांक्षेच्या पोटीं हें अवडंबर निर्माण झालें आहे, असेंच म्हणावेंसें वाटतें. ह्या मोठेपणाच्या वेणा आहेत, कीं लोकसंग्रहाची तळमळ आहे, हें ठरविणें सुज्ञ

वाचकांवर सोपविणे बरे. नोबेल प्राईज मिळालेले ऐकताच इतःपर आपण आपल्या स्वास्थ्याला कायमचे मुकलो, ह्या त्याच्या औदासीन्याच्या उद्गारांत त्यांचे स्वभावचित्र बरोबर दिसते.

विश्व ही ईश्वराची केवळ भ्रामक माया नाही, अथवा सैतानाचे ते एक जाळे नाहीं. तर आत्मविकास करून घेण्याची ती एक कर्मभूमि आहे, असे रवींद्रनाथ म्हणतात खरे; परंतु ते असेंही म्हणतात की, प्रत्येक वस्तूत सत्य आणि माया हे द्वंद्व आहेच. जीव आपणास सोपाधिक पृथकत्वाने पाहतो ते त्याचे स्वरूप म्हणजे माया होय. आणि ब्रह्माधिष्ठानाशीं तो आपल्य ला एकरूप पाहतो, ते त्याचे सत्यस्वरूप होय. तात्पर्य, दिसते ते सत्य असे रवींद्रनाथ म्हणत नाहीत. असणे व दिसणे यांपैकीं दुसऱ्या असत्य पदाची प्रतिष्ठा वाढणे, हीच ईश्वराची माया. ती अनिर्वचनीय आहे असे तेही म्हणतात.

तसेच रवींद्रनाथांनी उपदेशिलेला स्वार्थत्याग वैराग्यदर्शकच आहे. रवींद्रनाथानी अहकाराला जरी कामापुरता हाताशी घेतला आहे, तरी अहंता व ममता यांचा त्यानी स्पष्ट शब्दांत निषेधच केला आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे 'मी' हे नदीप्रमाणे प्रवाहरूप आहे. 'मी'चा प्रवाह एका तीरास दुसऱ्या तीरापासून दूर करतो, तसा तो दोन्ही तीराचा समन्वयही करतो. त्याच्यात ऐक्य साधून उभय तीरांची तो सार्थकता करतो. स्वतःच्या 'मी'त इतराच्या 'मी'चे जे ऐक्य झालेले पाहतात तेच महात्मे होत. ह्यातच अहकाराची सार्थकता आहे. नदीवर जाऊन पाणी पी, असे दुसऱ्यास सांगितल्याने तृषार्तास पाणी पाजल्यासारखे होत नाही. आपल्याजवळच्या भाड्यातले घोटभर पाणी त्यास दिले, तरच ते दिल्यासारखे होते. वनांतले फूल देवासमोर उमलत असते, पण ते आपल्या परडीत काढून घेऊन देवाला वाहिले. तरच ती देवपूजा होते. या प्रमाणे 'अह' ही आपली पाण्याची घागर अथवा फुलाची परडी आहे; परंतु परडीचा धर्म केवळ सग्रह करणे हा नव्हे. तसे केल्यास परडीत फुले सुकून जातील; तीं वेळीच देवाचे पायांवर वाहिली पाहिजेत. दानादि शुभकर्मे करण्यापुरताच ह्या अहंकाराचा उपयोग आहे, असे रवींद्रनाथाचे म्हणणे दिसते. धनुष्य ओढते वेळीं बाण जो आपले आंगावर प्रथम ओढून घ्यावयाचा तो स्वतांला जखम करण्यासाठी नव्हे, तर त्या बाणाला दूर फेकण्यासाठी. आणि अखेर 'अहं'ची कामटीही फेकूनच द्यावयाची असते. अहं हे मृत्यूचे

खाद्य आहे. त्याचा त्याग केल्यावांचून आत्मरूप प्रगट होत नाहीं. तात्पर्य, अहंता, ममता सुटली मग त्यापरते वैराग्य ते कोणते ! रवींद्र-नाथाची मोक्षाचीही कल्पना नदीसमुद्राचा संगम इत्यादि दृष्टान्तात दिसून येते. अहंकाराच्या नाशांत प्रेमाची मूर्ति आहे. त्यायोगे जीवनाचा केंद्र अहं हा नाहींसा होऊन त्या ठिकाणीं ईश्वर हाच मध्यबिंदु होतो. ही परमानंदाची स्थिति म्हणजे आत्मनाश नव्हे, आत्मपूर्ति आहे. हा सूर्याचा लोप नसून, रात्री मिणमिणणाऱ्या दिव्याचा हा सकाळच्या सूर्यप्रभेत झालेला लोप होय. जीवनसंकोचाचा मृत्यु म्हणजे पूर्णत्वाची प्राप्ति होय, असे रवींद्र म्हणतात. तसेंच ते पूर्वकर्म मानीत नाहीत, असे नाहीं. तर कर्मगतीपेक्षा जीवनशक्ति अधिक प्रबल आहे, असा त्यांचा पुरुषार्थवाद आहे. ह्याप्रमाणे त्यांच्या मतभेदाचे म्हणून मानलेल्या काही मुद्द्याचे दिग्दर्शन झाले.

प्राचीन तत्त्वज्ञानाच्या शुष्क झालेल्या सांगाड्यास रवींद्रनाथाच्या प्रेरणेने नवजीवन प्राप्त झाले, असे म्हणतात. ह्या म्हणण्यातील तात्पर्य इतकेंच दिसते कीं, प्राचीन ऋषींनीं आपल्या वैराग्याच्या प्रखर अग्नीत संसार भस्मसात् करून त्याचा शिवनिवास अथवा स्मशान बनविलें होतें तर ह्या कवींनी आपल्या प्रतिभेने संसाराचा स्वर्ग खुलवून, येथेंच भूवैकुंठ निर्माण केले. काम आणि कांचन हेच साधकाचे पुढील जबरदस्त प्रतिबंध, असें मानले तर ऋषींनी कामास जाळून रुद्रावतार धारण केला होता. तर उलट कवींच्या कवितेने विरहिणीप्रमाणे "मी तुझा शत्रु शंकर नव्हे," "जटा नोहे वेणी. पतिविरहदुःखे धवलता।" इत्यादि लाडीगोडी लावून त्याशी प्रेम संपादन करून त्यास निरुपद्रवी करण्याचा आविर्भाव दाखविला आहे. कांचनास मृत्तिके-समान मानून संन्याशाने फेकून दिले, तर कवींनी त्यास लोकसंग्रहाच्या वेठीस धरले. सृष्टीचा अथवा वनश्रीचा तोच सांगाडा ऋषींनी ग्रीष्मात तर कवींनी वसंतात पाहिला ! संन्यस्त तत्त्वज्ञानी व संत-कवि ह्यांच्यात इतका फरक राहणारच.

प्राचीन ऋषि किंवा अर्वाचीन शंकराचार्य हे तत्त्वज्ञानी होते. रवींद्रनाथ आपणास तत्त्वज्ञानी म्हणवीत नाहीत, आणि जगही त्यास कवि म्हणूनच मानते. तथापि ही गोष्ट खरी की, आर्यधर्म व आर्यांचे तत्त्वज्ञान यांचा उपहास करणे, हे अलीकडे कित्येक आर्यपुत्रच आपल्या विद्वत्तेचे लक्षण समजूं लागले होते, अशा काळीं तीच तत्त्वे रवींद्रनाथाच्या सुंदर काव्यप्रतिभेने

आपली शिरोभूषणें व कंठभूषणें म्हणून धारण केल्यामुळें, आज अपूर्व व नवीनशीं भासू लागली आहेत. त्यात ह्या कवीची मोठीच थोरवी दिसून येते. आणि त्याच कारणास्तव आधुनिक कालातील बंगालच्या दोन राजकवींत आमच्या मते दक्षिणोत्तर ध्रुवाइतके अंतर पडले आहे. रवींद्रनाथानीं आपल्या पूर्ववयात धर्म व तत्त्वज्ञान ह्यांचा आस्थापूर्वक विचार केला नसला, तरी अलीकडे त्यांची दृष्टि बहुतांशी तिकडेच वळल्यासारखी दिसते, यात शंका नाही.

रवींद्रनाथ हे अद्वैतीय आहेत. आत्मसमर्पणात आणि प्रेमाच्या परिपाकात परमपुरुषाशी ऐक्य, हेच त्यांचे ध्येय आहे. ते म्हणतात, प्रेमाची व्यक्त आणि अव्यक्त अशी दोन टोकें आहेत. द्वैतावाचून उपासना ( पूजा ) संभवत नाहीं, आणि अद्वैताशिवाय भक्तीची पूर्णता नाही. द्वैत आणि अद्वैत शिव आणि शिवानी ही सर्व सापेक्ष आहेत. निरुपाधिक ब्रह्म सोपाधिक जीवाकरिता आकारादि उपाधि धारण करते. अज्ञ व अपूर्ण अशा जीवाच्या प्रेमसोहळ्यासाठी पूर्ण सनातन ब्रह्म नयनमनोहर दिसू लागते. मग जीवाचे जिज्ञासेस ते सत्य, भावनेस सुंदर, आणि वासनेस शुभ असे ते वाटू लागते.

ह्याप्रमाणे ब्रह्माची व्यक्तरूपे अनेक असली तरी वस्तुतः ते एकरूपच आहे. ते बुद्धिगम्य नसल्यामुळें केवळ निषेधमुखानेच त्याचे वर्णन होणे संभवनीय आहे. मनुष्य कितीही नीतिमान् असो, त्यानं आपला सोपाधिक जीवभाव जोपर्यंत सोडला नाही. तोपर्यंत अनंत जन्ममरणपरंपरेतून अथवा अमर्यादित अशा उत्क्रान्तीच्या प्रवाहातून तो कधीच सुटणार नाही. यासाठी जीवात्म्याने सर्वभावेकरून परमात्म्याला शरण जाऊन पूर्णत्वाने आत्मसमर्पण करून त्याशीं ऐक्य जोडावे, तरच त्यास अमृतत्त्व प्राप्त होईल.

आता ही गोष्ट खरी की, रवींद्रनाथाच्या व इतर ब्राह्माच्या अद्वैतात द्वैतभावनेचा अंश कायमच असतो. हे विश्वगीत गाणाराहून भिन्न नाहीं, असे हे अद्वैत आहे. गाणारा व गीत ही भिन्न मानली, तर केवळ वंध्यापुत्राप्रमाणे कल्पना मात्र रहाते. सत्य दोहोंच्या ऐक्यात आहे. ईश्वराचे ऐक्य अनेकांतच प्रत्ययास येऊं शकते. ईश्वर अनेकांहून भिन्न नसून तो अनेकांतच आहे. ह्याचा अर्थ एकाचे प्रथम अनेक तुकडे करावेत, आणि नंतर ते तुकडे जोडून ती वस्तु एकरूप झालेली पहावी असे नव्हे. अशाने ती वस्तु समग्र अथवा अखंड बघितली, असे म्हणतां येणार नाहीं. तुकड्यांचा समूह

पाहिला, असे फार तर म्हणतां येईल. पंचमहाभूते व त्यांचे अनंत प्रकार अथवा नाम आणि रूप इत्यादि सृष्टीतील भेद पाहून त्याचे एकीकरण करण्यांत परमेश्वराचे खरे स्वरूप समजणार नाही. अनेकांची बेरीज करून एक वस्तु होत नाही. ब्रह्म ही अनत वस्तूंची बेरीज नाही. सत्यस्वरूपाच्या ठिकाणीं लहान आणि मोठेपणा नाही. आपण जे कागदावर एखाद्या देखाव्याचे बरोबर चित्र काढतो, ते त्याच्या वास्तविक स्वरूपाच्या मानाने फारच लहान असते, परंतु आपल्या मनातील सूक्ष्म संस्कारचित्रापेक्षा ते फारच विस्तृत असते. तथापि तिन्ही ठिकाणी सत्य एकच आहे. समग्र म्हणजे आपणासह सर्वांचे स्मरण होय. आत्म्याचे बंधनात आध्यात्मिक आणि प्राकृतिक दोन्हीही येतात. ह्या परस्परातील प्रेमबंधनाचा विसर पडल्यामुळें आध्यात्मिक व प्राकृतिक याच्यामध्ये कर्णार्जुनाप्रमाणे युद्ध जुंपले आहे. आम्ही अध्यात्माचे मागे लागून प्राकृतिकाकडे दुर्लक्ष केले, ह्यामुळे आपल्या देशात कलाकौशल्याची वाण पडून देश भिकारी आणि देह क्षीण झाले आहेत. तात्पर्य, द्वैतात ऐक्यभाव पाहणे हेच शास्त्ररहस्य आहे, आणि ते ऐक्य अनुभविण्याकरिताच द्वैत खडे आहे. "एकोऽहं बहुस्याम" ह्या स्फूर्तीनेच परमपुरुषाची जागृति आहे. गाणारा स्वयंस्फूर्तीने गाऊ लागतो व आपणच श्रोता बनून त्या गाण्याचा आनंद भोगतो. मूल आईच्या उदरातून बाहेर पडते. तेव्हाच त्यास मातृदर्शनाचा लाभ घडतो. देवाला भक्तानीच देवपण दिले. ऐक्यदर्शनाचा आनंद वाटावा.म्हणूनच परमात्म्याने अनेक भेद व त्याच्या ऐक्यभावात प्रतिबंध उत्पन्न केले आहेत ह्या विचारसरणीप्रमाणे ज्यास आपण प्रतिबंध म्हणतो ते तसे नसून आपल्या प्रगतीस साहाय्यकच आहेत. नाव पैलतीरास नेते खरी, पण तत्पूर्वी आपल्याला तिच्याशी बद्ध व्हावे लागते.

ब्रह्म हे निष्क्रिय मानून कर्मास आपण बंध समजतो. कर्मक्षेत्रात वसून प्राकृतिक मार्गाचा उच्छेद करण्याचा हा उलटा रोजगार आहे. ब्रह्माला जर निष्क्रिय म्हणावयाचे तर मग क्रियावान् काय जड जगत आहे ? ते तसे ठरत नाही, म्हणून मायावादाने पुन्हा त्याचा अस्वीकार करावयाचा; असा हा वितंडवाद सुरू होतो. वास्तविक पाहता क्रियेला आधार ब्रह्मच आहे. उपवास काय किंवा अभक्ष्य भक्षण काय, दोन्हीही अपायकारकच आहेत. नैष्कर्म्य व निषिद्धकर्म हीं दोन्ही नकोत. निष्कामकर्म हेच मुक्तिप्रद आहे. कर्म, ज्ञान आणि भक्ति

हा त्रिवेणीसंगम होय. ज्ञान आणि शक्ति यांचा संगम म्हणजे आनंदतीर्थ होय. आमची शक्ति कर्मातच खिळून राहिली आहे. कर्म हेच तिचे व्यक्त स्वरूप आहे. जनसेवा हे कर्म, ही एक ब्रह्मोपासनाच होय. कर्मत्याग नव्हे, तर स्वार्थत्याग हाच प्रगतिकारक आहे. जग अशाश्वत आहे, म्हणून जगिक कर्म टाकून चालणार नाहीं. कर्माचा वांटा आपण दिलाच पाहिजे. आग-गाडीचा डबा म्हणजे घटकेचे घर: पण तसें असले तरी भाडें दिल्यावाचून सुटका नाहीं. न देण्यात स्वातंत्र्य नाहीं, अधिक अडकून बसावें लागेल. तसेंच स्वार्थत्यागाचे आहे. फूल फुलावे म्हणून कळा नाहीसा होतो. पुढे फळ धरावे म्हणून फूल सुगंध व सौंदर्याचा लोभ सोडून आपल्या पाकळ्याही टाकून देते, पुढे बियाकरिता फळही पिकून गळून पडते, आणि झाड व्हावे म्हणून बीज तर मातींत नाहींसारखेंच होते. त्याचप्रमाणे कुटुंबाकरिता व्यक्तीचा, समाजाकरितां कुटुंबाचा, देशाकरिता समाजाचा आणि आत्मोन्नती-करितां जगाचा, त्याग करावा लागला तरी तो केला पाहिजे.

वरील विवेचनावरून कर्म हे ध्येय नव्हे हे उघड झाले. आधी शिक्षण आणि नंतर धंदा यांतच पाश्चात्यांची इतिकर्तव्यता संपते. शर्यतीच्या घोड्या-प्रमाणे कर्माचे दौडीत मरण येणें, हेंच त्याचे ध्येय असते. परंतु आपले ध्येय तसें नाहीं. कर्माचा शेवट करणें हे आपले साध्य आहे. खरें स्वातंत्र्य ह्यांत आहे. आणि सर्व प्रकारच्या पूर्व नियंत्रणाची सार्थकता ह्या स्वातंत्र्यप्राप्तींत आहे. प्राचीन भारतवर्षानें प्रथम चातुर्वर्ण्याचे जे नियंत्रण पत्करले, ते अखेर साऱ्या सामाजिकबंधनाच्या पार होण्यासाठींच. घोड्याला लगाम आणि स्वाराला रिकीब ही बंधनें पत्करण्यांत, ध्येय लवकर गाठण्यासाठीं घोड्यानें जास्त दौड करावी हाच हेतु असतो. सरोवर जितकें विशाल तितकेंच ते कोरडे पडले तर त्याची पोकळीही मोठी. त्याचप्रमाणे कर्मातील मूळ हेतु जितके उदात्त व मोठे असतील, त्या मानानेच तो हेतु सोडून तीं कर्मे केल्यास, तीं पोकळ व निरर्थक ठरतात. तात्पर्य, ध्येयावरील दृष्टि सोडून केलेले सारे कर्मकांड मात्र अज्ञानमूलक आहे. तसेंच कर्मासक्तीच्या मोहांत मनुष्य चांगलीं शुभकर्मे करीत असतांही चांगल्या बाह्य कर्माप्रमाणे आपण स्वतांही चांगलें म्हणजे शिवरूप झाले पाहिजे, हे तो विसरतो. साऱ्या जन्मभर नुसतीं चांगलीं कर्में करीत राहण्यातही तात्पर्य नाहीं. त्या मानानें आपणही सुधारत

गेले पाहिजे. हेच ध्येय डोळ्यांसमोर ठेवून शास्त्रकारानी वयपरत्वे कर्मांची मांडणी करून ठेवली आहे.

दिवसा प्रकाशाचे ज्याप्रमाणे उदयास्त असतात; त्याचप्रमाणें मनुष्याच्या आयुष्यात शक्तीचा विकास व क्षय याचा अनुक्रम असतो. आणि त्या अनुक्रमानुसारच ब्रह्मचर्यादि चार आश्रम, व त्या त्या आश्रमास योग्य तीं कर्मे शास्त्रकारांनीं ठरविली आहेत. एका आश्रमाचा त्याग करून योग्यसमयीं दुसऱ्या आश्रमांत जाणे ही बढती आहे बडतर्फी नव्हे. हे जाणून बालपण सोडून तारुण्याची जबाबदारी घेताना, तारुण्य सोडून वार्धक्यदशा भोगतांना, त्याचप्रमाणे तीही स्थिति सोडून मृत्यूचा अंगीकार करताना, आपण संतोष बाळगला पाहिजे. ह्या प्रत्येक आश्रमाचे विशेष महत्त्व आहे. कोणताही आश्रम व्यर्थ अगर वगळण्यासारखा नाही. सर्व आश्रमाचे अनुभविक ज्ञान तेच खरे ज्ञान होय. ईश्वराच्या नियतीचे प्रेमाने स्वागत करण्यास आपण तयार नसतो, यामुळे यक्षिणीच्या कांडीप्रमाणे तिचा जुलमाचा छापा आपल्यावर बसल्यासारखा वाटतो. परंतु ती आपली भूल आहे. घरांतील सासुरवाशीण एका पतिनिष्ठेमुळे सकाळपासून सायंकाळपर्यंत सर्वांसाठीं राबत असते; पण अखेर सायंकाळ झाली की घरातील काम संपवून पतीच्या सान्निध्यसुखात आराम पावते. कर्मांची परिसमाप्ति हेच ध्येय आहे. फळ मृत्यूत प्राप्त होऊं शकते. फळें अनेक आहेत, पण देवापुढे ठेवलेल्या फळाला प्रसाद म्हणतात. इतके अंतर जीवन व मृत्यु यामध्ये आहे. मृत्यूच्या योगाने आपण देवाचे होतो. या प्रमाणे मृत्यूचा प्रसाद हा ब्रह्माचा अनुग्रह आहे. ती दीक्षा स्वीकारतांना प्रेमच उत्पन्न व्हावे हे ठीक आहे. पुनर्जन्माची परंपरा ही कल्पित कथा आहे, असे देवेंद्रनाथ मानीत. परंतु रवींद्रनाथ पुनर्जन्म मानीत होते, असे दिसते. ते म्हणतात की, आत्म्याच्या दीर्घ जीवनवृत्तांतातील जन्म व मृत्यु हे दोन टप्पे आहेत. मृत्यु हा जीवनाचा शेवट नव्हे. एक पाऊल उचलणे व दुसरे टेकणे ह्या दोन्ही मिळून पायाची गति होते. मुलाला आईने एका स्तनापासून काढले, तर ते रडूं लागते, पण त्याची माउली त्यास लगेच दुसऱ्या स्तनाशी लावते, तेव्हा त्यास संतोष होतो. अशा अनेक उद्गारांवरून त्यांस पुनर्जन्म मान्य आहे, असे वाटते.

आत्मा अमर आहे हे सर्वच ब्राह्म मानतात. तसच आतां कित्येक ठिकाणीं

त्यांचे विचार पुनर्जन्माच्या कल्पनेस सोडून आहेत असे त्यांचे चरित्रकार म्हणतात तेही खोटे नाही. रवींद्रनाथ म्हणतात कीं, जीवात्मा जेव्हां जीर्ण झालेली कुडी सोडून जातो, तेव्हा तो बंध तो सहज तोडतो. त्याचा त्यास मुळींच खेद वाटत नाही. कारण, आपला पुढील जन्म अनतत्वांत होणार असे त्यास माहीत असते. दुसऱ्या एके ठिकाणी ते म्हणतात की, व्यक्तींतून समाज, समाजापुढे विश्व व विश्वातून अनतत्व, अशी जीवात्म्याची सामान्यतः प्रगति असते. परमात्म्याशी ऐक्य हे ध्येय म्हणूनही कित्येकास मान्य आहे. परंतु ते गाठण्यास आत्म्यास अनतकालही पुरणार नाहीं, असे त्याचे म्हणणे आहे. रवींद्रनाथाचे म्हणणे केवळ नीतीच्या मार्गाने आत्मोन्नति साधू पाहणाऱ्याची उत्क्रान्ति कधीही पूर्ण होणारी नव्हे, परतु जीव जेव्हां अध्यात्माचा आश्रय करून परमात्म्याशी ऐक्य संपादन करतो. तेव्हां त्यास अखेरच्या अमृतत्वाच्या ध्येयाचा लाभ होऊन, त्याच्या कर्मगतीची परिसमाप्ति होते. निश्रेयसाच्या प्राप्तीशिवाय अभ्युदयास अत नाही. प्रवृत्तीची प्रबलता हीच आत्मप्रकाशनास प्रतिबधक होते. देशाभिमान, परोपकार, लोकसग्रह इत्यादि बड्या बड्या नावाखाली मोडणारी प्रवृत्तीही अखेर अवसानघातच करते. भर्तृहरीच्या शब्दात रवींद्रनाथ म्हणतात कीं, अभ्युदयाची परमावधि झाली, तरी पुढे काय? "ततः किम् ?" हा प्रश्न शिल्लक रहातोच. उपयुक्ततावाद रवींद्रनाथास पटत नाही उपयुक्ततेपेक्षा सौंदर्याचे ते अधिक चहाते आहेत. सौंदर्यात सत्य आणि स्वातत्र्य याची जोड त्यास मिळते. उपयुक्तता कार्य-कारणभावानी बाधलेली रहाते. मेघदूत काव्याच्या विवेचनाच्या अखेरीस ते कवि अशी प्रार्थना करतात की, हे चतुरानना, जे अकारण व अनवश्यक, ते रसयुक्त काव्यात रसिक वाचकासाठीच झाकून ठेव. जे अवश्यक आणि हितकर असेल, त्याच्या प्रासिद्धीला व गिऱ्हाइकांना वाण पडणार नाहीं. रवींद्रनाथ स्वातंत्र्याचे परमभोक्ते आहेत. सगीतातील सप्तसुराप्रमाणे त्याना व्यक्तिस्वातत्र्य पाहिजे असून त्यांचा मिलाफही पाहिजे आहे. किंबहुना उत्कृष्ट मिलाफ व्हावा, यातच त्या त्या सुराच्या स्वतंत्र व्यक्तिमाहात्म्याची सार्थकता आहे, असे त्याचे म्हणणे आहे. व्यक्ति-विकासाच्या आड धर्माने येऊन विघ्न उभे केले, आणि समंजसपणा किंवा युक्तता याचा प्रात बळकावून बसण्याचा हट्ट धरला, तर मात्र प्रगतीचा मार्ग

खुंटतो. मग सत्याचा प्रकाश आंत येऊं नये, म्हणून धर्म त्याच्या आड उंच भिंत घालतो. अशा शक्तीपुढे माना वाकविणाराची खरोखर कींव येते. धर्माने आपली सत्ता आध्यात्मिक आणि शाश्वत बाबतीपुरती अबाधित ठेवावी. व्यवहाराच्या बाबतीत प्रत्यक्ष हात न घालता मनुष्याच्या जीवनाला विवेकबुद्धीच्या देखरेखीखाली वाढण्याची व विकास पावण्याची स्वतंत्रता ठेवावी. धर्माने माणसाला परमेश्वराच्या अमर्याद राज्यात स्वतंत्रपणे वावरण्याची मोकळीक ठेवणे, हे त्याचे कर्तव्यच आहे, असे ते म्हणतात. तथापि रवींद्रनाथास ही पण गोष्ट पटली आहे, कीं योग्य नियत्रणाचे बंधन स्वातंत्र्याला विरोधी नसून उलट उपकारकच आहे. कित्येक बंधनाचा हेतु बंधमोक्ष हाच असतो. तात्पर्य, धर्मनियंत्रण व जीवन्मुक्ति, प्रपंच व परमार्थ, अव्यक्त ब्रह्म व व्यक्त सृष्टि, हीं द्वंद्वे एकमेकांचा विरोध अथवा निषेध करीत नसून, उलट परस्पर साहाय्यक व पूरक अशीच आहेत. आणि ज्यानी ही दोन्ही साधलीं, त्यानीच सत्य जाणले, व तेच खरे धन्य होत, असा रवींद्रनाथांचा मथितार्थ आहे ! ह्या अभिप्रायाच्या आधारास रवींद्रनाथ खालील मंत्र घेतातः—

अन्धं तमः प्रविशन्ति ये अविद्यामुपासते ।
ततो भूय इव ते तमो य उ विद्याया रताः ॥
विद्यां च अविद्यां च यस्तद्वेदोभयं सह ।
अविद्यया मृत्यु तीर्त्वा विद्ययाऽमृतमश्नुते ॥*

—ईशोपनिषद्, मंत्र ९।११.

*भावार्थः—जे कर्मामध्ये रत असतात, ते अविद्येमध्ये प्रवेश करतात. पण जे कर्म सोडून नुसत्या विद्येमध्ये म्हणजे उपासनेमध्ये रत असतात, ते त्याहूनही अधिक अविद्येमध्ये प्रवेश करतात. (९).

ज्या अर्थी असे आहे, त्या अर्थी विद्या व अविद्या म्हणजे देवताज्ञान व कर्म याना सह-अनुष्ठेय म्हणजे एकाच पुरुषाकडून एकाच वेळी अनुष्ठान केले जाण्यास योग्य, असे जो जाणतो तो अगोदर कर्माच्या योगाने स्वाभाविक कर्म व ज्ञान याचे उल्लंघन करून देवताज्ञानाने अमृतभावास म्हणजे देवतारूपास प्राप्त होतो. (११).

वरील मंत्राचा श्रीमत् शंकराचार्यांनीं जो अर्थ केला आहे, त्यावरून पाहतां रवींद्रनाथांना अभिप्रेत असलेला सर्व अर्थ वरील मंत्रातून निष्पन्न होईल कीं काय, याबद्दल शंकाच वाटते.

प्रपंच आणि परमार्थ, ज्ञान आणि कर्म यांचा समन्वय दाखविण्याकडे अलीकडील विद्वानांची विशेष प्रवृत्ति दिसते. रवींद्रनाथांसारखें सारें आयुष्य आरामांत व सुखांत घालवूनही परमार्थलाभ साधतां येतो, ही विचारसरणी मोठी मोहक व सोइस्कर वाटते. भारतीय तत्त्वज्ञानाच्या रूक्ष सांगाड्यात रवींद्रनाथांनीं आपल्या प्रतिभेनें जीवन घातलें, असें म्हणतात, तें वरील रोचक पद्धतीच्या विचारसरणीलाच अनुलक्षून होय. ह्या विचारसरणीस ख्रिस्ती संस्कृति कारणीभूत झालेली असो वा नसो; पण ती केवळ आमची स्वकपोलकल्पित नसून त्यास श्रुतीचाही आधार आहे, असें जेव्हां सांगण्यांत येतें, तेव्हां या स्वाभिमानी वृत्तीबद्दल जसा आदर वाटतो, त्याचप्रमाणें यांत साधकाचा बुद्धिभेद होण्याचाही संभव आहे ह्याची भीति वाटते. ‘प्रपंच साधुनि परमार्थाचा जेणें लाहो केला, तो नर भला भला!’ ह्या गोडशा उपदेशास व्यवहार्य म्हणावें कीं अव्यवहार्य म्हणावें, हा साधकास उपकारक असेल तसाच अपकारकही होईल कीं नाहीं, हे प्रश्न चिंतनीय आहेत. असो. ह्याप्रमाणें श्रुतिवाक्यावर उभारलेली अथवा श्रुतिवाक्याच्या आधारांत मांडलेली, रवींद्रनाथांची एक सुसंगत विचारमाला, साधना ह्या नावानें प्रसिद्ध आहे. त्यासंबंधीं विचार पुढील प्रकरणीं करूं.

---

# प्रकरण सोळावें

## साधना

रवींद्रनाथांनी इंग्लंड व अमेरिका येथे दिलेल्या काहीं व्याख्यानाचा साराश 'साधना' या पुस्तकात दिलेला आहे. वर लिहिल्याप्रमाणे औपनिषदिक वाङ्मयावरच सदर संवादांची उभारणी आहे. त्यात त्यांनी मानवी जीवितांचे रहस्य व ध्येय सांगितले आहे. आर्यांची आत्मौपम्यबुद्धि, त्यांची आत्म-जागृति, त्यांचा सुखदुःखविवेक व स्वार्थत्याग, इत्यादि गोष्टींचे त्यात सुंदर प्रतिबिंब पडलेले दिसते. तसेच प्रेम आणि कर्म, सौंदर्य आणि सौकर्य, ह्यांच्या शुद्ध व उज्ज्वल स्वरूपात अनंताचे दर्शन कसे होते, ह्याचेही त्यात थोडक्यांत दिग्दर्शन केले आहे. तात्पर्य, कर्त्यांनी आपल्या गोड भाषेत औप-निषदिक तत्त्वे गोवून साधकांनी तीं कंठी धारण करावीं, अशासाठी ही विचारमाला तयार केली आहे. त्यातील कित्येक विचार पूर्वी येऊन गेले आहेत. तरी शक्य तो द्विरुक्ति टाळून त्यातील साराश पुढे दिला आहे.

जगाकडे नेति नेति ह्या व्यतिरेक पद्धतीने न पाहता अन्वयपद्धतीने पाहण्याचा रवींद्रनाथाचा आग्रह आहे. गाणे व गाणारा ह्या द्वंद्वाप्रमाणे हे विश्व व विश्वात्मा ह्या द्वैतात अद्वैत आहे, असे ते म्हणतात. शंकराचार्यांच्या मायावादा-पासून रवींद्रनाथ जितके दूर आहेत, त्यापेक्षा ते पाश्चात्यांच्या विचारसरणी-पासून अधिक दूर आहेत. पाश्चात्यांची भेदनीति त्यास तिरस्करणीय वाटते. निसर्गाकडे पाहण्याची पाश्चात्यांची दृष्टि ते चुकीचीच मानतात. निसर्गावर सत्ता गाजविण्यासाठी जी पाश्चात्यांची धडपड सुरू आहे, त्यावरून ते निसर्गास आपला विरोधी समजतात. परंतु वस्तुतः सृष्ट पदार्थ जर आपल्या-हून परके असते, तर त्यांचे आपणास ज्ञानही झाले नसते, असे आपले-कडील तत्त्वज्ञान सांगते. एकच रस्ता भिन्न दिशेने पाहिल्यामुळे एकास ध्येया-कडे पोचविणारा असा साधनीभूत वाटतो तर दुसऱ्यास आपल्या ध्येयाच्या आड येऊन आडव्या पडलेल्या विघ्नाप्रमाणे वाटतो. ह्यामुळे जीवशिवाच्या मध्यवर्ती असलेल्या ह्या विश्वाची दोघे निरनिराळ्या रीतीने वासलात लावतात. ध्येयाच्या आड आलीं, असे मानून एक मार्गावरील झाडे तोडूं लागतो, व दुसरा त्याच झाडांच्या छायेखालीं विसावा घेत घेत, व जणुं त्याच झाडाना मार्ग पुसत पुसत, आपले ध्येय गांठतो.

आधिभौतिक शास्त्रांच्या शोधांनीं सृष्टीच्या संबंधीं जे ज्ञान होईल, त्यानें मनुष्याचे सामर्थ्य वाढल्यासारखे वाटेल. परंतु विश्वाशीं सख्यत्व जोडून, त्यांत जो ऐक्याचा आनंद आहे, त्याचा अनुभव त्यास येणार नाहीं. साऱ्या जगांत हिंदुस्थानानेंच मांसाहार बंद केला, ह्याचें कारण त्याची ही सख्यत्वाची भावनाच होय. जीवाचें विश्रामस्थान, अशा त्या जगाशीं फारकत करून जीव आपल्या मनुष्यकोटीच्या अहंकारावरच चालू लागला, म्हणजे त्याचें जिणें तारेवरच्या नाचाप्रमाणेंच अत्यंत कष्टप्रद होतें. आणि सृष्टिक्रमाशीं रुसव्या फुगव्याचे त्यास अनेक प्रसंग येतात. ह्या भरतभूमींतील नैमिषारण्य, दंडकारण्य, ब्रह्मारण्य अशा अरण्यांत आर्यऋषींनीं वसाहती केल्या, आणि त्या अरण्यांची तपोवनें करून, त्या पुण्यभूमि अध्यात्मविचारांनीं भारून टाकल्या. पाश्चात्यांनीं अमेरिकेच्या अरण्यांत प्रवेश केला. त्या अरण्याचा अत्यंत श्रीमान् असा देश बनविला. परंतु तेथील गगनचुंबित हवेल्यांच्या पायाखालीं गडदलेलीं लाखो स्वदेशीयांचीं हाडें वंशच्छेदाच्या घोर कथा अजूनही सांगतील ! जें पुढें दिसेल तें कापून काढावें ही पाश्चात्यांची भेदनीति कोठें, आणि जें दिसेल त्यास ब्रह्मरूप मानून वंदन करावें, ही आपली अध्यात्मदृष्टि कोठें !*

---

*(१) संप्राप्यैनमृषयो ज्ञानतृप्ताः कृतात्मानो वीतरागाः प्रशान्ताः ।
ते सर्वगं सर्वतः प्राप्य धीरा युक्तात्मानः सर्वमेवाऽऽविशन्ति ॥
—मुंडक, ३ २।५.

**भावार्थः** – (१) या आत्म्याला यथार्थपणें जाणून ऋषि त्याच ज्ञानानें तृप्त कृतात्मे, तृष्णारहित व शांत होतात. ते सर्वगामी ब्रह्माला सर्वत्र प्राप्त होऊन ते अत्यंत विवेकी युक्तात्मे मरणसमयींही सर्व ब्रह्मामध्येंच प्रवेश करितात.

(२) ईशावास्यमिदं सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् । —ईश, १.

(२) या पृथ्वींत जें काहीं जगत् आहे तें हें सर्व ईश्वरानें आच्छादित करावें.

(३) यो देवोऽग्नौ यो अप्सु. यो विश्वंभुवनमाविवेश, ।
य ओषधीषु यो वनस्पतिषु तस्मै देवाय नमो नमः ॥१७॥
—श्वेताश्वतर, २।१७.

(३) जो देव अग्नीमध्यें आहे, उदकामध्यें आहे, ज्यानें सर्व भुवनामध्यें प्रवेश केलेला आहे, जो औषधींत आहे, जो वनस्पतींत आहे, त्या देवाला नमस्कार असो.

मनुष्याची घोर विनाशक शक्ति, त्याची लुटालूट करण्याची अपूर्व हिताफी, धनसंपादनाचे त्याचे अतर्क्य सामर्थ्य, किंवा संचयाची त्याची अमर्याद हाव, ह्या कशातही त्याचा मोठेपणा नसून. खरा मोठेपणा एका आत्मौपम्य जाणीवेत आहे. सर्व जग ब्रह्मरूप पाहण्यात आहे. ह्याचा अर्थ असा नव्हे की, बाह्य वस्तूंतच आपल्याला परमात्मस्वरूप शोधावयाचे आहे. नुसत्या आकृतीच्या रेषा अगर चित्राचे रंग एकत्र जमविले तर त्यात त्या आकृतीतील अगर चित्रातील सौंदर्यदर्शन कोठून मिळेल! परंतु सौंदर्याने जसे चित्र व्याप्त आहे, तसेच ब्रह्माने सर्व विश्व व्याप्त आहे. ब्रह्म म्हणजे विश्वाचा अभाव असे नव्हे.* "त्यक्तेनभुंजीथा" किंवा "मागृधः" ह्या वाक्यात सृष्टीची तुच्छता अगर मिथ्यात्व अभिप्रेत नाही. असद्रूप संसारात नाही ते केवळ ममत्व-बुद्धीत आहे. ह्याप्रमाणे विश्वाचे सत्यज्ञान, सर्वभूतरति आणि प्राणिमात्राशी संबंधित अशा साधनांनी सर्वगत जो भगवान् त्याच्या ठायी आत्मरूप पाहणे हे औपनिषदिक धर्माचे सार आहे. हा ब्राह्मणाचा जन्मसिद्ध हक्क आहे. ह्यात

* इह चेदवेदीदथ सत्यमस्ति न चेदिहावेदीन्महती विनष्टिः।
भूतेषु भूतेषु विचित्य [ धीराः प्रेत्यास्माल्लोकादमृता भवन्ति ॥ ]
—केन, २।५।१३.

**भावार्थः**—येथेच अधिकारी मनुष्याने जर आत्म्याला जाणले तरच ते सत्य आहे. (तरच त्याचा जन्म सफळ आहे.) पण त्याने जर येथे (या जन्मी) न जाणले तर मोठा विनाश ( मरणपरंपरा ) आहे. बुद्धिमान लोक प्रत्येक भूतामध्ये एकात्म तत्त्वास शोधून ( व या शरीरलक्षण लोकापासून निवृत्त होऊन अमृत होतात.)

मूळ अवतरणात विचित्य ह्या ठिकाणी विचिन्त्य असे असून त्यापुढील भाग गाळला आहे.

( सर्वानन शिरोग्रीवः सर्वभूत गुहाशयः । )
सर्व व्यापी स भगवास्तस्मात्सर्वगतः शिवः ॥

( कंसांतील मूळ अवतरणात नाही.) —श्वेताश्वतर, ३।११.

**भावार्थः**—( सर्वांचे मुख, सर्वांचे मस्तक, सर्वांचा मान, सर्व प्राण्यांच्या बुद्धीचे ठिकाणी राहिलेला ) सर्व व्यापणारा असा तो भगवान् आहे. म्हणून सर्वत्र स्थित व कल्याणकारक आहे.

खिस्ती लोक मानतात त्याप्रमाणे परमपुरुषाची अमर्यादा नाहीं. दुसऱ्या दृष्टीने विचार करता, सान्तत्व हे अनंताचे ऐश्वर्य व तोच त्याचा आनंद आहे.

गोष्टी अनेक असल्या तरी त्यांतले सत्य एकच असते. अक्षरे निराळेपणाने निरर्थक आहेत, परतु त्याच्या एकीकरणांत अर्थ प्रगट होतो. सृष्टीच्या घडामोडीच्या बुडाशी असलेल्या ईशसकल्पाहून जीव आपली अहंबुद्धि जोपर्यंत वेगळी मानतो, तोपर्यंत जगातील द्वैत त्यास भयप्रद होऊन त्याचे जिणे कष्टप्रद होते. परतु विश्वघटनेत त्यास जेव्हा आत्मीयभाव प्रगट होतो, तेव्हां सारे कष्ट व भीति नाहींशी होऊन तो आनंदी होतो. विश्वाचे नुसते ज्ञान दुर्जेयपणामुळे अपुरेच रहाते. परंतु विश्वप्रेमात समूळ भेदभाव नष्ट होऊन जीवात्म्यास आपले खरे ऐश्वर्य कळून येते. नराचा नारायण होतो. स्वकीयांचे सुखदुःख क्वचित् त्यांच्यापेक्षाही आपल्याला जाणवते, ह्याचे कारण एक आत्मीयभावना होय * ह्या प्रेमज्योतीवर ममत्वाचे झांकण घातल्याने ती कांही काळाने नाश पावते. तसे अविद्येचे आवरण आत्मप्रकाशास प्रतिबंधक होते. खरी प्रतिबंधक जीवसृष्टि आहे, ईशसृष्टि नाहीं कोणतेही विषयीभूत पदार्थ आम्हांवर आसक्ति करा. अशी सक्ति जीवावर करीत नाहीत. परंतु जीवानेच आपल्या सुखलालसेने त्यांस फाजील महत्त्व दिल्यामुळे, जीवशिवाचा पदोपदीं गैरमेळ पडतो. जीवाने जोपर्यंत आपल्या आत्म्याचे खरे ऐश्वर्य जाणले नाहीं, तोपर्यंत त्या जन्माचे दारिद्र्य कधी फिटावयाचे नाहीं.+ ह्यास्तव आपल्यावरील अज्ञानाचे आवरण दूर करण्याबद्दल वेदांत प्रार्थना आहेत.

---

* न वा अरे पुत्रस्य कामाय पुत्रः प्रियो भवति,
आत्मनस्तुकामाय पुत्रः प्रियोभवति । —बृहदारण्यक, अ. २, प्रा. ४.

**भावार्थ**—पुत्राच्या प्रयोजनासाठी पुत्र आईबापाना प्रिय होत नाही. तर तो त्याच्या स्वतःच्या प्रयोजनासाठीं प्रिय होतो.

\+ एष देवो विश्वकर्मा महात्मा सदा जनानां हृदये सन्निविष्टः ॥
हृदा मनीषा मनसाऽभिक्लृप्तो य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ।
—श्वेताश्वतर, ४।१७.

**भावार्थः**—हा देव, विश्व हे ज्याचे कर्म, महात्मा, सर्वदा जनांच्या हृदयांत बसलेला, हृदयाने, बुद्धीने व मनाने काल्पिलेला असा हा. जे जाणतात ते मरणरहित होतात.

जगांत दुःख तरी कां असावे, असे म्हणणे, म्हणजे आम्ही असे अपूर्ण कां? असेच विचारण्यासारखें आहे. ते तसेंच असावयाचे, मात्र ते तसेंच रहावयाचे असे नव्हे. नदीचे तीर नदीच्या पाण्यास पसरूं देत नाहीं! म्हणून त्यांस दुःखरूप उपाधि म्हणावे तर त्यांचेच योगानें नदीचा प्रवाह, व तिचे सागरास जाऊन मिळणे हे घडून येते. आधिभौतिक शास्त्राची प्रगति अनेक चुकांचे धक्के खात पुढे जात असते. शहाणे लोक प्रगतीकडे पाहतात; चुकांची बेरीज करून कोणी दुःखाश्रु गाळीत बसत नाहीत. एखादा आंकडेमोड्या जगांत आजपर्यंत झालेली मृत्युसंख्या ठरवू लागेल, तर सारें जगही मसणवट्याला पुरणार नाही! एखादा गुप्त पोलिस, गुन्हे कसे होतात, हे वर्णन करूं लागला, तर तो जगाला हिडीस स्वरूप आणून देईल. परंतु वस्तुतः जग तसे नसते, संसार हा प्रवाहरूप आहे, हे विसरतां कामा नये.

डोळे मिटले की, सारांच अंधेर खरा, पण प्रत्येक निमिषास आपण डोळे मिटीत असूनही, जग निर्वेधपणे पहातच असतो. डोळ्याच्या उघड झापी-बद्दल कधीं त्रासत नाही. वस्त्राचे छिद्र सूक्ष्मदर्शक यंत्राने पाहिले की, ते जाळ्यातील भोकांसारखे मोठे दिसते. परंतु सर्व वस्त्राकडे पाहिले, तर त्याचा प्रमाणशीर विणींत कोठेच बिघाड दिसत नाही. तसा एक मृत्यु आपल्याला भयप्रद वाटतो, याचे कारण त्या वेळीं जीवयात्रेचा सारा दीर्घकाळ आपल्या नजरेपुढे आपण आणीत नाही. अगदी लहान मूल चालण्याच्या प्रथम प्रयत्नाच्या वेळीं पदोपदी पडते; तितकेंच आपण पाहिले, तर आपल्याला त्याचे वाईट वाटून दया येईल. परंतु त्या मुलाचे लक्ष पडण्याकडे मुळीच नसते. क्षणमात्र तरी उभें राहता येते. या आनंदातच ते हळूहळू चालण्याची कला शिकून जाते. त्याचप्रमाणे संसारांतील दुःखे व अडचणी न मोजता जीवाने आपल्या प्रगतीकडे लक्ष ठेवले पाहिजे.

जगात सुखापेक्षा संकटपरंपरेचाच संभव अधिक असला, तरी जीव हा आशावादी आहे, तो दुःखाची संभाव्यता सहसा मनात देखील आणीत नाही.

---

[मागील पानावरून पुढे चालू.]

असतो मा सद्गमय, तमसोमा ज्योतिर्गमय, मृत्योर्माऽमृतं गमय।

**भावार्थः**—मला असतापासून सताकडे, अंधकारांतून प्रकाशाकडे व मृत्यूपासून अमृतत्वाकडे ने.

सतारीला लावलेल्या तारा कर्कश बदसुरात वाजविण्याकरिताच लावल्या आहेत, असें कोण म्हणेल ? पण आकडेमोडीनें संभाव्यताच पाहिली तर तशीच जास्त. कारण हजारात एखादा तज्ज्ञ असला, तरी बाकीचे अजाणच. आणि तज्ज्ञाचे हातांत आहे,तात्पुरताच ततुवाद्याचा बाज लागलेला. एरव्हीं सारा वेळ गैरमेळच. तात्पर्य, ह्या विचारसरणीप्रमाणे संसार जरी खडतर ठरला, तरी समजून अगर न समजून एका परमध्येयाकडे जाण्याची जीवाची धाव थाबत नाही. जीवन जर खरोखर दुःखमय असेल, तर जिवंत कोण राहील? दृष्टि व्यापक झाली, की सुखदुःखासंबंधी हेयदेयत्वबुद्धि बदलते. निरहंकारी अगर स्वार्थत्यागी पुरुषाला दुःखाची जाणीव इतराप्रमाणें होत नाहीं. पाण्याचा घडा भरून डोकीवर घेतला तर त्याचे ओझें वाटते, पण समुद्रात बुडी मारली, तर लाखो घड्याचे पाण्याचा दाब भासत देखील नाही. अनतार्शी समरस होणें हाच दुःखाला कायमची तिलाजलि देण्याचा खरा उपाय. आपण आपल्या एका व्यक्तीपुरताच विचार करूं लागलो, की दुःख ठेवलेलेंच. जर शरीरच शरीराचे भक्ष्य झाले, तर तो मृत्युच· डोळा जर केवळ आपणा स्वतांलाच पाहूं लागला, तर आंधळेपण। तो वेगळा काय ? सृष्टीचे आघात कधी कधी भयंकर निष्ठुरपणाचे वाटतात. आणि आम्हा गरीबाना नाडून सृष्टीनें काय मिळविलें असें वाटते ! परतु ती चूक आहे. व्यक्तीच्या सुखसोयीकरिता जर सृष्टि आपले नियम बदलू लागेल,तर सृष्टिनियमांवर कोणी भरंवसाच ठेवणार नाहींत. आणि व्यवहार अशक्य होईल. एकदां गंगेच्या पुलाखालून रवींद्रनाथाचा मचवा जात असता,डोलकाठीचे थोडें टोक पुलाचे बहालांवर आदळून मचवा उलथला. त्या वेळीं कुबड काढणाऱ्या मांजराप्रमाणे पुलानें आपली पाठ किंचित् उचलली असती, अथवा गगामाईनें आपलें पाणी जरा नमतें घेतलें असते, तर सकट सहज टळत होतें. परंतु तसें होणें शक्य असतें,तर त्या लहरी नदीच्या लहरींवर कोणी सफऱ्यानीं विश्वास टाकला नसता; किंवा पुलावरून निर्भयपणानें कोणी आपली गाडी हाकली नसती ! तात्पर्य, निसर्गाच्या सार्वत्रिक नियमांशीं आपल्या इच्छेनें विरोध करणें फुकट आहे. त्यांनींच दुःख प्राप्त होतें, आणि क्वचित् कोणाच्या अशा विरोधी इच्छांसही यश येत गेलेलें दिसलें, तरी तें यश अखेरीस अपयशापेक्षांही अधिक घातुक ठरतें. तीं खास भिवेचीच लक्षणें म्हणून समजावें. सृष्टिक्रमात दुःख व अपयश पदोपदीं दिसत असले, तरी दुःख

हे अंतिम सुखाचे साधनीभूत करता येते, आणि अपयशाच्या पायऱ्या चढूनच यशाचा झेंडा हातीं येतो, हे विसरता कामा नये. आणि खरें पाहिलें तर ईशाची समष्टिसत्ता आपल्याला सुखाचे सिंहासनावर बसविण्यास तयार आहे, पण आपणच अहंतेच्या गुणानीं कंटकमय संकटात पडलों आहोत.

आपल्या वारशाच्या व्याप्तीत समग्र समष्टीचा अंतर्भाव करणे, हे जसे जीवाचें ध्येय आहे, तशीच समष्टीची फलश्रुति एका केंद्रीभूत व्यक्तीभवनात आहे. हा व्यक्तिभाव हीच आपली खरी मिरास ती आपण गमावली म्हणजे आपण सर्वच गमावल्यासारखे आहे. जीवानें आपला व्यक्तिभाव शुद्ध व केवळ अशा ब्रह्मात लीन करणे, नाहींसा करणे, हेच अध्यात्मशास्त्राचे अंतिम ध्येय आहे, असें कित्येक समजतात, परंतु ती चूक आहे. शास्त्रकाराचा खरा आशय शब्दशः अर्थ करून कळत नसतो. अध्यात्मासारख्या अत्यंत गहन विषयात शब्द म्हणजे केवळ मुक्याच्या खुणा होत. शब्द हे विचाराचे दिग्दर्शन मात्र करतात. पण शास्त्ररहस्य केवळ शब्दानीं व्यक्त होऊ शकत नाहीं. जीवभाव हा प्रवाहरूप आहे. जीवाचा धर्म आत्मविकास हा आहे, आत्मनाश नव्हे. बीजाचें खरें स्वातंत्र्य वृक्षरूपाने विकास पावण्यात आहे. ह्यात बीजाच्या व्यक्तित्वाची हानि नसून विकास आहे. कवचाचे आत अडकून रहाण, ह्यात स्वातंत्र्य कसलें? कवचाचा भेद करून, नाश करून, बाहेर पडणे हेच स्वातंत्र्य. येथें नाश अहंकाररूप कवचाचा आहे, बीजाच्या व्यक्तित्वाचा नव्हे. दीपाचें प्रज्वलन हा नाश नव्हे प्रकाश आहे. दीपाच्या व्यक्तित्वाचें त्यातच सार्थक आहे. क्षुद्र अहंकाराच्या व स्वार्थाच्या त्यागांत जीवनाचे रहस्य आहे. अर्थात् तो त्याग जुलमाचा नसून प्रेमपूर्वक पाहिजे. उलटपक्षीं क्षुद्र स्वार्थाच्या त्यागातच अमर्याद प्रेमाची जोड आहे. नुसती बॅंकनोट जवळ जोपासून काय उपयोग? ती बॅंकेत नेऊन वटावली तरच तिची खरी किंमत प्रत्ययास येईल. अहंकाराच्या गांठीत जीवात्म्याची नोट पडली आहे, तोपर्यंत ती असून नसून सारखीच, ती ज्या बॅंकेची आहे, तेथे ती हवाली केली पाहिजे, म्हणजे त्या बॅंकेशी आपला असलेला संबंध प्रत्ययास येतो. नुसत्या बॅंकनोटींत श्रीमंती नाही, ती वटावण्यात आहे. बॅंकनोट हातची गेल्यासारखी झाली, पण तिच्यातील अव्यक्त शक्ति अधिक व्यक्तरूपाला आली, हे त्या शक्तीचे स्वातंत्र्य, हेच तिचे खरे वैभव. बॅंकनोट

जोपर्यंत नोटीचेच रूपांत आहे, तोपर्यंत ती केवळ माया आहे. आणि तिलाच जोपाळून ठेवणे ही अविद्या आहे, अज्ञान आहे. बॅकेतील संपत्ति कांही काळ नोटीचे मायावी रूपांत राहिली, व पुन्हा मूळ खजिन्याकडे जाऊन तिने आपले खरे आनंदरूप प्रगट केले. बॅक आपल्याच कायद्यांनी आपल्या संपत्तीस कागदाच्या कपट्याचे वेगळे रूप देते. नोटा खजिन्यांतून बाहेर पडतात, व पुन्हा खजिन्यात येऊन मिळतात. अशी ही कैवल्यलीला रूढ आहे. बॅकनोट पुन्हा खजिन्यात जाण्याचे नाकारील, तर ती मातीमोल होईल. मोठ्यात मोठ्या लाभाकरिता क्षुद्रलोभ सोडणे, हाच जीवाचा खरा धर्म आहे.

वरील दृष्टान्ताप्रमाणे आनंदातूनच सर्व जीव निर्माण होत आहेत व आनंदातच त्यांचे पर्यवसान आहे. प्रेम हा आनंदवाचकच शब्द आहे. प्रेमासाठीच सर्व द्वंद्वे उभी राहिली आहेत. आणि ह्या प्रेमातच द्वैताचा निरास आहे. ब्रह्मविहार म्हणतात तो हाच. प्रेमाच्या व्यवहारांत सर्व आयव्यय जमेकडच्या एकाच बाजूस मांडला जातो. प्रेमासाठी जे जे खर्चावे ते सारे उलट जमाच होत जाते. प्रेमाची व्यक्त अव्यक्त ही दोन टोके आहेत. अव्यक्त परमात्म्याने आपल्याच कायद्यांनी आपणास मर्यादित केले आहे. प्रेमाइतके स्वतंत्र दुसरे कोण ? उलट प्रेमात जे आत्मसमर्पण आहे,—पारतंत्र्य आहे— तसे दुसऱ्या कोठे आहे ! प्रेमाचे स्वातंत्र्यांत—प्रेमाने बद्ध-होणे हीच मौज आहे. बॅक जशी आपल्या स्वातंत्र्याने आपल्या नोटीत आपल्याला बांधून घेते, त्याप्रमाणे ईश्वर जीवास प्रेमाने बांधला गेला आहे. प्रेम केव्हाच कोणावर सक्ति करीत नाही. परंतु जो जीव प्रेमवश होत नाही तो मूढ नव्हे काय ?

ज्याप्रमाणे प्रेमात त्याप्रमाणे कर्मातही आत्मप्रत्यय आहे. नियतीचे बंधनात जसे प्रेम आहे, तसे कर्मबंधनातही प्रेम आहे. कर्मप्रवृत्तीतच खरे स्वातंत्र्य आहे, खरा आनंद आहे. म्हणूनच कर्माचा खरा अधिकारी मनुष्यच आहे. ब्रह्मानुभव केवळ अंतरातच घ्यावयाचा, बाह्य कर्मप्रवृत्तीतून तेवढा वगळावयाचा असे करून चालणार नाही.* त्या आनंदरूपातच सर्व सृष्टपदार्थ निर्माण

---

* कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेत् शतम् समाः । —ईश. २.

**भावार्थः**—ह्या लोकी ( अग्निहोत्रादि ) कर्मे करीतच शंभर वर्षे जिवंत राहण्याची इच्छा करावी.

झाले, हें जसे खरे, तसे त्याचे भयाने अग्नि दहन करतो, वारा वाहतो इत्यादि हेही सत्य आहे, त्या जगच्चालकाचे हुकुमावाचून हा मानवी व्यवहाराचा प्रचंड रथोत्सव सुरू राहील काय ? त्या मिरवणुकीत आनंदाने सामील न होतां घरकोंबड्यासारखे निष्क्रिय बसून ईश्वराचा लाभ कसा होणार ? त्या जगड्व्याळ समारंभास कोणता आस्तिक पुरुष थोतांड म्हणूं शकेल ? जगास टाळून जीव कोठें जाईल ? असे नामर्द न होता जीवाने कर्मवीर व्हावें. हेच त्यास भूषणावह आहे.

ईशप्राप्तीत जीवितसाफल्य आहे, आणि त्यावांचून रहाणे हे महापाप आहे. ईशप्राप्ति ही, आपला पदार्थसंग्रह एका वस्तूने वाढविणारी, अशी गोष्ट नाहीं. सूर्यप्रकाशासाठीं वाण्याचे दुकान धुंडावयास नको. डोळे उघडले की तो स्वयंसिद्धच आहे. क्षुधा आहे तोंपर्यंत प्रत्येक घासाला आनंदाचा अनुभव घडत असतो, परंतु क्षुधेची इच्छा संपली की, आनंदही मावळला. एक वैष्णव भक्त म्हणतो. "देवा, तुझा हा नयनमनोहर चेहरा मी बाळपणापासून पहात आहे, पण अद्याप माझ्या डोळ्याची भूक शमली नाही. अनंतकाल तुला हृदयात साठवूनही माझे अंतःकरणाची अद्याप तृप्ति झाली नाहीं." जीवाची वासना कधीच तृप्त होत नाहीं. मिळवावयाचे थांबत नाहीं; परंतु परमार्थात मिळवावयाची इच्छा सुटून, अनुभवावयाची इच्छा उदित होते. जगाच्या व्यवहारात प्राप्तीने मनुष्य मोठा होतो. परमार्थात आत्मसमर्पणाने मोठा होतो. ब्रह्मानुभव घेणे, जीवब्रह्मैक्य संपादणे हेच जीवाचे अंतिम ध्येय आहे. जीव-ब्रह्मात भेद नाही, असे नाहीं, भेद उघड आहे. मग त्यास कोणी माया किंवा भ्रम का म्हणेना ! भ्रम झाला तरी तो आपल्यापुरता

---

[ मागील पानावरून पुढे चालू ]

माहंम् ब्रह्म निराकुर्याम मा मा ब्रह्म निराकरोत् । — छांदोग्य–शांति.

**भावार्थः**—मी ब्रह्माचे निराकरण न करावे व ब्रह्माने माझे निराकरण न करावे.

आनंदाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते । — तैत्तिरीय, ३।६.

**भावार्थः**—आनंदापासूनच खरोखर ही भूतें उत्पन्न होतात.

भयादस्याग्नि तपति इत्यादि. आत्मक्रीडः आत्मरतिः क्रियावान् बहुधाशक्तियोगात् वर्णाननेकान् निहितार्थो दधाति.

खराच असतो. ब्रह्म ते ब्रह्म. ते अनंत व पूर्ण आहे. परंतु आपण जसे दिसतो ते आपले वास्तविक स्वरूप नाही. आपणा जीवाचा ब्रह्मरूपाप्रत जाण्याचा हा प्रेमाचा खेळ असाच निरंतर चालावयाचा आहे. 'मी समुद्ररूप होईन' असे गीत गात नदी जी डोंगरातून निघते, ती वाटेत कितीही वळणे घेवो, अरण्ये, शेते व गावे यात लोकोपयोगार्थ कितीही रमो; परंतु ती डोंगर, अरण्ये, शेते, अगर गावे, याशी केव्हाही तद्रूप न होतां ती आपले समुद्ररूप होण्याचे अखेरचे ध्येय गाठीलच गाठील. असेच जीवन-प्रवाहाचे अखेरचे ब्रह्मप्राप्तीचे ध्येय ठरलेले आहे; व त्यामुळे त्याचे गतीस महत्त्व व सौंदर्य प्राप्त झाले आहे. एखाद्या काव्यातील कवीचे हृदय एकदां कळले म्हणजे सारी कविता सुंदर लागते. त्याप्रमाणे आपले जीवनरहस्य कळले, म्हणजे संसार कष्टप्रद वाटत नाही. नाहीं तर बहिऱ्या माणसापुढील गाणारणीचे हावभावांप्रमाणे संसारचेष्टा जीवास फोल व निरर्थक वाटतात नदीला उगमा-पासून मुखापर्यंत आपले जीवितकर्तव्य एकदा समजले, तिचे माहेरसासर एकदा लक्षात आले, म्हणजे मग तिच्या वाटेतील खडे, खडक आणि वळणे ह्यांनी ती अडकल्याप्रमाणे होत नाही. आता ह्या समृतिनदीचा प्रवाह कित्येकांस कंटाळवाणा व कष्टप्रद वाटेल; पण दृष्टान्तातील हे कष्ट नाहीसे करण्यास एक सुंदर तोड आहे. केवळ घर सोडले म्हणजे काशी गाठते, असे नव्हे. कर्मत्याग करून स्वस्थ बसले की, भगवताचे सख्य जडते, असे थोडेच आहे. तेव्हा भक्त म्हणता की, "हे घर माझे नव्हे, तुझेच आहे. असे घडेल तरच तुझ्या भेटीची आशा ! जे मी काबाडकष्ट करीत आहे, तेही माझे काम नसून, देवा, तुझेच आहे. असे पटेल तरच तुझी सहकारिता व सख्य मी जोडूं शकेन." संसारी जीवास खऱ्या सुखाचा मार्ग हाच आहे.

ह्याप्रमाणे रवींद्रनाथांच्या साधना ह्या पुस्तकांतील काहीं नमुनेदार विचार, क्वचित् रवींद्रनाथांनी दिलेल्या श्रुतीच्या आधारांसह वर दिले आहेत. मात्र श्रुतिवचनांचा जो भावार्थ दिला आहे तो आचार्यांच्या पूर्वपरंपरेस धरून दिला आहे. त्यावरून पाहतां रवींद्रनाथांचा मथितार्थ श्रुतिवचनांतून प्रत्येक ठिकाणी निघतोच असे वाटत नाहीं. कित्येक ठिकाणी त्यांनी आपल्या विचारांस अनुकूल, असा सोयीचा अर्थ लावून घेतला आहे, असे दिसते.

———

## प्रकरण सतरावें

# शान्तिनिकेतन व विश्वभारती

एका अर्थी पूर्व ही पश्चिमेपासून फारच दूर असल्यामुळे, त्याचा संयोग लोकांस विस्मयकारक किंबहुना क्रांतिकारक वाटणे स्वाभाविक आहे. अलीकडे हा योग जेव्हा घडून आला, तेव्हा पाश्चिमात्य संस्कृतीने पौर्वात्य लोक प्रथम अगदीं दबून गेले; परंतु लवकरच स्वाभिमानाची प्रतिक्रिया सुरू होऊन, उभय संस्कृतींपैकी कोणती कोणास पचनी पाडते, हा प्रश्न उभा राहिला. अशा वेळचे विद्वानांचे उद्गार उभयविध आहेत. पौर्वात्य लोक पाश्चिमात्य संस्कृतीची स्तुति करूं लागले. तर पाश्चिमात्य पौर्वात्यांच्या संस्कृतीने चकित होऊन, तिच्या संशोधनाच्या कामास लागले. धर्म आणि कर्म ह्याप्रमाणे एकेक एकेकीचा स्तुत्य विषय ठरला. ह्या संयोगाच्या निमित्तानें एकमेकास आपआपले अवगुण कळूं लागून, सर्व जगच सर्व तऱ्हेने सुधारण्याचा संभव कित्येकास दिसू लागला. परंतु ह्या संयोगानंतर इतका काळ लोटला, तरी पूर्वपश्चिमेची सहकारिता अद्याप जमून आली नाही. आणि पुढे केव्हांही ती जमून येईल कीं नाहीं, याबद्दल कित्येकास शंकाच आहे. इतकेंच नव्हे, तर ह्या संयोगाचीं जी काही दृश्य फळे प्रथम प्रथम दिसून आलीं, ती उभयपक्षी इतकी तिरस्करणीय ठरली कीं, हा संयोग शुभदायीच होईल, ह्याबद्दल अजूनही साऱ्या जगाचे एकमत होईल, असे वाटत नाहीं. उदाहरणार्थ, थिऑसॉफिस्टांची हिंदु व बौद्ध धर्मासंबधीं पक्षपातबुद्धि ख्रिस्ती मिशनऱ्यांस आज पाहवत नाहीं, तर ब्राह्म व यांचे आपल्यातीलच वडील बंधु यांचा ख्रिस्ती धर्माकडे झालेला कल हिंदी लोकांच्या पारतंत्र्याचे दुःख दुणावीत आहे. अशा स्थितींत पूर्वपश्चिमेनें एकमेकांपासून पुष्कळ शिकण्यासारखे आहे, हा तज्ज्ञांचा सिद्धान्त प्रयोगावस्थेच्या पलीकडे अद्याप फारसा जाऊं शकला नाहीं. ह्याचे एक प्रबळ कारण असे दिसतें कीं, पूर्व अध्ययनार्थ समित्पाणि होऊन सिद्ध असली, तरी पश्चिमेच्या कपटी स्वार्थबुद्धीने अध्ययनाचें खरें फळ तिच्या हातीं पडूं दिलें नाहीं. आणि उलटपक्षीं, पूर्वेच्या जित राष्ट्रांच्या

दाबलेल्या गळ्यांतून अध्यापनाचें ठणठणीत काम तें काय होणार, अशा तुच्छताबुद्धीनें व स्वास्थ्याच्या उन्मादानें, पश्चिम शिष्यवृत्ति पत्करण्यास तयार झाली नाहीं, इतकेंच काय पण दुर्बल झालेल्या पूर्व देशांस अध्यापनास जरूर तो आत्मविश्वासही उत्पन्न झाला नाही. अशी ही झालेली कोंडी फोडण्यास प्रारंभ राजा राममोहन राय, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ, डॉ० अॅनीबेझंट, अशा कित्येक कर्तृत्वशाली थोर व्यक्तींनी केला. तथापि अंधकार पडल्यावांचून आकाशस्थ तारकाचे दर्शन होत नाहीं, किंवा त्रिविधतापाने पोळल्यावाचून जीव परमार्थास अधिकारी होत नाही, हेंच खरे आज अशी ही स्थिति बहुतेक साऱ्या जगास प्राप्त झाली आहे. अज्ञान, आळस, पारतंत्र्य इत्यादि कारणानी हिंदुस्थानात जसे जीवन कष्टप्रद व लाजिरवाणे झाले आहे; त्याचप्रमाणे आसुरी संपत्ति, उन्माद व लोभ इत्यादि कारणानीं पश्चिमेकडील जीवनकलहासही दुःसह व हिडीस रूप येऊन पोचले आहे. अशा दुःस्थितीत निरनिराळ्या कारणांनीं सचिंत झालेल्या पश्चिमेस व पूर्वेस मार्गदर्शक अशा लौकिकाचे जे पुरुष आज विद्यमान आहेत, त्यांत रवींद्रनाथांची प्रमुखत्वाने गणना होते.

ब्राह्मसमाजास पाश्चिमात्य संस्कृतीबद्दल पडलेला अनिवार मोह दूर करण्याचा प्रयत्न ब्राह्मापैकीच रवींद्रनाथाइतका पूर्वी कोणीं केलेला दिसत नाही. मुदतीच्या तापाप्रमाणें कर्मासक्तीनें पाश्चिमात्यांस घेरलेले आहे. कर्माचा ताप त्यांस तर भासत नाहींच; पण उलट फणफणलेल्या तापात होणारी धावपळ खऱ्या ताकतीची दर्शक आहे असे ते मानतात. आजकालच्या कर्मभूमीपैकीं अमेरिका म्हणजे उत्तर ध्रुवातून सुटलेला एक नायगाऱ्याचा धबधबाच आहे. धबधब्याप्रमाणे उगाच वारेमाप धावत सुटलेली, निरर्थक दणदणाट ( वाग्प्रलाप ) करणारी आणि शक्तीचा अपव्यय करणारी अशी ही सारी अमेरिका आहे. उलटपक्षीं हिंदुस्थानातले भावनाप्रधान, अव्यवहारी व बशे लोक समाजाचे नेते व कर्मयोगाचे प्रणेते होण्यास सर्वथा असमर्थ झाले आहेत. एकीकडे अद्वातद्वा उद्योगधंद्यांच्या घडामोडी तर दुसरीकडे पुरा कर्मसंन्यास; अशा रीतीनें कोठेच खरें जीवितसाफल्य नाहीं. तिकडे देहतुष्टीपायीं आत्म्याची उपासमार तर इकडे आत्मोद्धाराकरितां देहनाश. असा हा अतिरेक आणि विरोध दूर व्हावा, आणि जगांत शांतता व समता नांदावी, म्हणून

रवींद्रनाथाचे प्रयत्न सुरू आहेत, असे म्हणतात. त्या दृष्टीने त्यांची पूर्वी सांगितल्याप्रमाणे वाङ्मयसेवा सुरू असून शिवाय ते युरोप, अमेरिका व आशिया खंडातील चीन, जपान अशा निरनिराळ्या देशी हिंडून व्याख्यानद्वारा आपले विचार प्रकट करीतच आहेत. आणि ह्याच हेतूनीं आपल्या जुन्या शांतिनिकेतन संस्थेला अलीकडे विश्वभारती हे परिणत स्वरूप त्यानी दिले आहे.

शान्तिनिकेतन— महर्षि देवेंद्रनाथाच्या आयुष्याचे पूर्वार्ध उलटून गेल्यावर त्यानी वानप्रस्थ आश्रम स्वीकारण्याचे मनात आणले. त्यासाठीं योग्य असे स्थळ पाहण्याकरिता ते हिमालयांत हिंडले, पण त्यास तेथे मनाजोगे स्थळ मिळेना. पुढे एक दिवस कलकत्त्याच्या उत्तरेस सुमारे शंभर मैलावर, बोलपूर एक खेडे आहे त्या खेड्यातून ते सञ्चारार्थ बाहेर पडले. बालरवींद्र हा नेहमीप्रमाणे त्या वेळीही त्याच्याबरोबर होता. दोघेही पितापुत्र जेथे फिरत होते, तो एक ओसाड व रेताड असा विस्तीर्ण मुलूख होता. क्वचित् एखाद दुसऱ्या ताडाच्या झाडाशिवाय तेथे झाडी नव्हती. अशा त्या मैदानात हिंडता हिंडता सायंकाळ झाला. त्यांच्या समोरच काही अंतरावर एक लांबच लांब असा उचवटा दिसत असून त्यावर दोनच गर्द छायेचीं झाडे त्यास दिसली. त्या झाडाखाली ते जाऊन बसले. आणि त्या अत्यंत निर्जन प्रदेशी, रम्य व प्रशांत अशा संध्यासमयी, देवेंद्रनाथ स्थानमहात्म्य जाणण्याच्या त्यांच्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे ध्यानधारणेस बसले. असे ते ध्यानावस्थित असताना, एकाएकी त्यांच्या अंतरात्म्यास अपूर्व शांतीचा लाभ होऊन, त्या आनंदात त्यानीं आपले डोळे मिटले. त्यांनी ती सर्व रात्र तेथेच आनंदात काढली. आणि ईश्वरानी आणून दिलेल्या ह्या दिव्य अनुभवाबद्दल प्रातःकाळीं ईश्वराचे गुणानुवाद गात असतां, त्यांनी मनाशी असे ठरविले, की हेच आपले शान्तिनिकेतन. त्यानंतर त्यांनी आपल्या आयुष्याची चाळीस वर्षे बहुधा त्याच ठिकाणी ध्यानधारणेत घालविलीं. त्यांच्या व्यक्तिमाहात्म्यामुळे व आध्यात्मिक अनुभवामुळे त्या ठिकाणास एखाद्या तीर्थक्षेत्राचे महत्त्व प्राप्त झाले. असे सांगतात कीं, महर्षींच्या उपासनेच्या ह्या दोन सप्तपर्ण वृक्षाच्या खालीं नरकपालाची रास पुरलेली आहे. मग ती एखाद्या तांत्रिकाने मुद्दाम एखादे साधन करण्याकरितां तयार केलेली जागाच देवेंद्रनाथांस लाभली की काय, कोणास ठाऊक. तसेच पूर्वी याच ठिकाणीं या प्रांतांतले दरोडेखोर आपण

चोरून आणलेली संपत्ति पुरून ठेवीत असावेत असे वाटतें. कारण एकदां महर्षि तेथे ध्यानस्थ बसले असतां आपली गुप्तधनाची जागा त्यांस सांपडली अशी शंका येऊन ते सुरा घेऊन त्यांस मारण्यास आले होते. परंतु त्यांची ध्यानमग्न तेजःपुंज मूर्ति पाहून ते चकित झाले व त्या चोराचा नायक महर्षींस शरण जाऊन त्यांचा शिष्य झाला. असे ते ठिकाण महर्षींस फारच आवडलें. त्यांनीं तेथील आजूबाजूच्या जमिनी खरेदी करून इ.सन १८८७सालीं ती सर्व जागा पंचांच्या स्वाधीन केली. आतां ते ठिकाण मोठे रम्य झाले आहे. त्या ठिकाणीं आतां पुष्कळ इमारती झाल्या आहेत. तेथील ब्राह्म-मंदिराच्या भिंतीवर उपनिषदांतील गंभीर उतारे लिहिलेले आहेत. वनराई, फुलझाडांच्या कुंड्या, वृंदावनें इत्यादि प्रकारांनी त्या जागेला आता रमणीयता आली आहे.

ज्या सप्तपर्णी वृक्षाच्याखाली महर्षि देवेंद्रनाथ प्रथम ध्यानमग्न झाले असतां त्यांस परमशांतीचा लाभ झाला. तो वृक्ष अद्याप महर्षींच्या विश्रांति-स्थानावर आपली गर्द छाया पसरून पाहणाऱ्याच्या मनास प्रसन्नता आणीत आहे माझ्यामागे माझी समाधि वगैरे कांहीच बांधू नये अशी त्या मूर्तिपूजा-विरोधकाची अखेरची इच्छा असल्यामुळे राममोहन, केशवचंद्र सेन वगैरे प्रमुख ब्राह्मांप्रमाणे देवेंद्रनाथांचे तशा प्रकारचे पूजनीय स्मारक जरी कांहीं केले नाही, तरी त्यांच्या ध्यान करण्याच्या जागेवर चित्रविचित्र संगमरवरी दगडांचा चबुतरा बांधला असून त्याच्यामागे “ तिनि आमार प्राणेर आराम, मनेर आराम, आत्मार शांति, वगैरे महर्षींचीं आवडतीं वचनें कोरली आहेत. तसेंच एका फांदीवर “ करतॉर नामगान ” अशीं अक्षरें खोदलीं आहेत. असें सांगतात कीं, अद्याप त्या शांतिनिकेतनाच्या घनदाट वृक्षराजीमध्ये शांतिसुखाचा आनंद अनुभवीत असतां, महर्षींची ती पवित्र मूर्ति डोळ्यापुढे उभी राहिल्यावांचून राहात नाहीं. बंगाल प्रांतीं ह्या पवित्रस्थानाबद्दल सर्वांच्या मनांत आदर वसत आहे. इतकेंच नव्हे तर रोमन रोलंडसारख्या परदेशीय विद्वान् गृहस्थांच्या तोंडूनही “मी या सप्तपर्णीच्या पवित्र छायेत उभा राहून केव्हां धन्य होईन ? ” असे उद्गार निघतात.

असो. अशा त्या पवित्र ठिकाणीं रवींद्रनाथांच्या धर्मभावनेला वडिलांच्या सत्संगतीच्या लाभानें पुष्टि मिळाली आणि त्यांच्या हातून वडिलांच्या शांति-निकेतन ह्या बीजभूत कल्पनेची योग्य रीतीनें जोपासना झाली. ती हकीगत

त्यांच्याच शब्दांत पुढें देत आहों. ह्या शांतिनिकेतन आश्रमासंबंधीं रवींद्रनाथ असें म्हणतातः—

" कलकत्त्यापासून कांहीं अंतरावर गंगानदीच्या पद्मघाटावर माझ्या आयुष्यांतील बराच काळ मी लेखनव्यवसायांत घालविला. पद्मघाट हा गंगानदीच्या तीरावरील एक भाग आहे. ह्या ठिकाणीं खेडवळ वस्ती आहे; पण मी तेथेच रहात असे. बराच काळ तेथे राहिल्यामुळे, ह्या एकांतिक अवस्थेचा मला कंटाळा येऊन, जगात फिरावेसे वाटले.

" मध्यंतरीं मला असे वाटले कीं, आपण एक विद्यालय काढावे, पण हे विद्यालय मी ज्या विद्यालयात शिकलो, त्यापेक्षा वेगळ्या धर्तीवर काढण्याचा माझा विचार होता. मीं ज्या विद्यालयांत दिवस काढले, त्या विद्यालयात मला मुळींच चित्ताकर्षकता वाटली नाहीं, आणि एवढ्याचसाठीं मीं विद्यालयाचा कटाळा करीत असें, व खेळण्यास बाहेर जात असे. माझ्या वडिलानीही असले विद्यालय सोडून देण्याबद्दल मला सांगितले. विद्यालयांत जाऊनही त्याजपासून व्हावयाचे ते लाभ होऊं नयेत, या गोष्टीची मला चीड आली. आणि आपण स्वतत्र पायावर उभे राहावे, असे मला वाटू लागले. इकडील विद्यालयात अभ्यास चालतात, त्याहून निराळे अभ्यास इतर देशात चालू असतात. तेव्हां आपणही आपल्या शान्तिनिकेतन आश्रमात एक स्वतत्र विद्यालय उघडावे, असे मला वाटले.

" शिक्षक कसा पाहिजे, याची मला कल्पना नव्हती. व माझी एखादी परीक्षाही पण उतरली नव्हती. यामुळे मला असे वाटले कीं, विद्यालय स्थापन करणे, हे आपल्या शक्तीबाहेरचे काम आहे; परंतु या कार्यात वाकबगार असलेलीं एक-दोन माणसे मजजवळ होती. त्यांनी या कामीं मला मदत करण्याचे कबूल केले होते. ब्रह्मबांधव व रेवाचंद हे शांतिनिकेतनमधील पहिले शिक्षक होत.

" आम्हीं आमचे विद्यालय इ०सन १९०१ सालीं उघडले, तेव्हां त्यात केवळ पाचच विद्यार्थी होते. ही सख्या फार लहान असल्यामुळे, मी मुलाचा अभ्यास घेऊन त्याच्याबरोबर खेळतही असे, आणि संध्याकाळच्या वेळी त्यांना मी महाभारत व रामायण यांतल्या गोष्टी सांगत असे. तसेच त्यांनी स्वतः एकमेकांना गोष्टी सांगाव्यात, असाही क्रम ठेविला होता. अशा प्रकारे

सहजासहजीं अभ्यास, शिक्षण, खेळ व मौज वगैरे प्रकार शिक्षक व विद्यार्थी यांमध्ये चाललेले पाहून आमचें विद्यालय वाढले, व अधिक विद्यार्थी येऊं लागले. मी मुलांना नेहमी आनंदित ठेवण्याचा यत्न करीत होतो, व मुलांना पुष्कळ स्वातंत्र्यही देऊं लागलो. 'हे करा आणि ते करूं नका' असें मुलांना मीं कधीं म्हटलें नाही. त्याचप्रमाणे त्याना केव्हांही झाडांवर चढूं नका, अगर बाहेर जाऊं नका, असा हुकूमही केला नाहीं. त्यांना हवे तसे मी करूं देत असे. मी त्यांच्यावर विश्वास टाकल्यामुळे, त्यांनींही मजवर विश्वास टाकला. अशा प्रकारें विद्यालयांत हसत खेळत शिक्षण होत असलेलें पाहून बेरड मुलांच्या आईबापांनीही आपलीं मुलें आमच्या विद्यालयांत आणून घातलीं; परंतु माझ्या या स्वतंत्र हवेत आल्य ने, मुलांना वेडेवांकडे वागण्याची बुद्धि होत नसे. मी मुलाना कदापि शिक्षा करीत नसे, व कोणा मुलाचा अपराध झाल्यास त्यांच्यांतलाच कोणी न्यायाधीश नेमून तंट्याचा निकाल लावला जात असे. असा आमच्या विद्यालयाचा कार्यक्रम चालल्या-मुळे प्रथम जेथे पाच विद्यार्थी होते, तेथे आता दोनशे झाले आहेत."

हरिद्वारचे गुरुकुल व ऋषिकुल तसेच तळेगांवचे श्रीसमर्थविद्यालय, या सर्व शाळा प्रचलित शिक्षणपद्धतींच्या निषेधपूर्वकच स्थापन झाल्या, पण त्या सर्वांच्या पूर्वींची रवींद्रनाथांची ही शाळा होती. शाळेतील विद्यार्थ्यांची राहण्याची व्यवस्था तेथेच होती. जवळच रवींद्रनाथांचे निवासस्थान उत्तरायण नामक असून, त्याच्या शेजारीं त्यांचे सहकारी मि० सी. एफ. ॲंड्रूज यांचा वेणुकुंज नामक आश्रम आहे. ह्याप्रमाणे विद्यार्थी व अध्यापक हे सारे एके ठिकाणीच रहात असल्यामुळे, पहांटे ४॥ वाजल्यापासून तो रात्रीं ९ वाजे-पर्यंत विद्यार्थ्यांचा कार्यक्रम शिक्षकांच्या नजरेखालीं पुरा होत असतो. रवींद्र-नाथांना आश्रमांतील सर्व लहानथोर गुरुदेव असे म्हणतात. व त्यांच्या पाया पडतात. साधुवृत्तींतही रवींद्रनाथांहून वडील असे त्यांचे ज्येष्ठ बंधु द्विजेंद्र-नाथ ऊर्फ बरोदादा तेथेच स्वतंत्र रहात असत; व तेही सर्वांना वंदनीय वाटत असत. अशा सत्संगतींत विद्यार्थ्यांचीं प्रातःस्मरण व स्नानसंध्यादि नित्यकर्में बिनचूक होत असतील, हे उघड आहे. स्नान केल्यानंतर दहा मिनिटें प्रत्येक मुलास प्रार्थनामंदिरांत अगर दुसऱ्या कोठेही बसून चित्त एकाग्र करून ईश्वरचिंतन करावें लागतें. नंतर वसतिगृहांतील सर्व मुलें एकत्र

जमून खालील प्रार्थना मोठ्याने म्हणतातः—

ॐ पिता नोऽसि। पिता नो बोधि। नमस्तेऽस्तु। मा मा हिंसी।
विश्वानिदेवसवितुर्दुरितानि परासुव यद्भद्रं तन्न आसुव।
नमः शंभवाय च मनोभवाय च। नमः शंकराय च मयस्कराय च।
नमः शिवाय च शिवतरायच। ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

रोजची सायंकाळची प्रार्थना पुढीलप्रमाणे असतेः—

ॐ यो देवोऽग्नौ योप्सु। यो विश्व भुवनमाविवेश। य औषधिषु यो वनस्पतिषु। तस्मै देवाय नमो नमः।
ॐ शांतिः शांतिः शांतिः ॥

रोज सायंकाळी भोजनोत्तर विद्यार्थी एकत्र जमून एखाद्या आवडत्या विषयावर संभाषण किंवा वाचन होते. त्या वेळी तेथील शिक्षकही कांहीं मनोरंजक माहिती सांगतात. दर गुरुवारीं मंदिरात कोणातरी विद्वानाचे प्रवचन होते. रवींद्रनाथ असले म्हणजे तेच एखाद्या धार्मिक विषयावर प्रवचन देतात. अशा त्यांच्या प्रवचनांचे बारा भाग शांतिनिकेतनमाला या नांवानें प्रसिद्ध झाले आहेत. सुटीच्या दिवशीं रवींद्रनाथांनीं रचलेल्या लहान लहान ( मुकुट, वसंतोत्सव, फाल्गुनी इ० ) नाटकाचे प्रयोग मुले उघड्या मैदानावर झाडाखालीं करतात. कधीं कधीं रवींद्रनाथही त्यात एखादी भूमिका घेतात.

विद्यालयांत अगदीं प्राथमिक वर्गापासून सरकारी विश्वविद्यालयाच्या प्रवेशपरीक्षेपर्यंत अभ्यासक्रम आखलेला आहे. येथे विद्यार्थ्यांना संस्कृत, प्राकृत, पाली, बंगाली, मराठी, इंग्रजी इत्यादि भाषांचे शिक्षण देण्यात येते. प्रचलित राजकीय व सामाजिक प्रश्नांचाही विद्यार्थ्यांना परिचय करून देण्यांत येतो. विद्यार्थ्यांच्या शीलसंवर्धनासाठीं प्राचीन आर्यसंस्कृतीची त्यांना माहिती देण्यांत येते, असे सांगतात. तसेंच येथे चित्रकला, गायन व शेती ह्याच्याही शिक्षणाची व्यवस्था असून विद्यार्थ्यांनीं मातृभाषेचा आस्थापूर्वक अभ्यास करावा, खेडेगांवांतील अजाण लोकांत फिरून त्यांनीं शिक्षणप्रसाराचेही काम करावें, शेतीसारखीं कामें अंगमेहनतीने थोडीफार करावीं, अशी विविध तऱ्हेची शिक्षणाची व्यवस्था आहे, असे समजतें.

प्राचीनकालच्या अरण्यांतील ऋषींच्या आश्रमांप्रमाणें येथे शिक्षण शक्य तों

उघड्यावरच देण्यांत येते. आणि मुलांच्या स्वातंत्र्याची मर्यादा इतकी असते कीं, वर्ग सुरू असतां एखादा विद्यार्थी लहर लागल्यास झाडावरही बसून राहतो. सुदैवाने रवींद्रनाथांस शिक्षकवर्ग फारच चांगला लाभला. साधुवर्य द्विजेंद्रनाथासारखे तत्त्ववेत्ते, मि० सी. एफ्. ॲंड्र्यूजसारखे व मि० पीअरसन-सारखे इंग्रज, बाबू अजितकुमार चक्रवर्ती आणि सतीशचंद्र रे सारखे लेखक, आणि बाबू नंदलाल बोस आणि आसितकुमार हलधरासारखे कलाभिज्ञ, शान्तिनिकेतनास लाभले. परंतु रवींद्रनाथांच्या कल्पनेप्रमाणे खरे शिक्षक म्हटले तर लताकुंजांचे सभोवार पसरलेली उद्याने व वनराई, देशपर्यटन करीत येणारे वारे, आकाशांतून होणारा मेघवर्षाव, रात्रीचा चंद्रप्रकाश, तर प्रभातकालचा अरुणोदय हेच होत. त्यांनीं स्वतः ज्या निसर्गाशी शिष्यभाव ठेवला, तोच त्यांनीं आपल्या शाळेवर मुख्य अध्यापक नेमला, हे सरळ झाले.

एकंदरींत बोलपूर येथील आपली शान्तिनिकेतन शाळा अगदीच नवीन धर्तीवर वीसबावीस वर्षे रवींद्रनाथांनीं चालविली. सर्व विषयात धर्म हाच जरी त्यांचा आवडता विषय आहे, तरी धर्मशिक्षण शाळेंत शिकवण्याकडे त्याचा कटाक्ष नाही. विद्यार्थ्यांच्या सभोवारची परिस्थितीच जर शुद्ध आणि उदात्त असेल, तर त्यायोगे विद्यार्थ्यांचे चित्तांत पवित्र धर्मभावनांचा उदय आपोआपच होतो, असा त्यांचा ग्रह झालेला आहे, आणि शान्तिनिकेतनांत जाऊन येणारे गृहस्थ अशी साक्ष देतात कीं, तेथे गेल्यावर तेथील सर्व वातावरण महर्षींच्या पुण्यस्मृतीने व एकंदरीत पवित्र विचाराने भारलेलें आहे, असे वाटून जाणारास मोठा आल्हाद होतो. अशा ह्या लहानशा विद्यापीठाची माहिती सन १९१० पर्यंत बाहेर फारशी कोणासच नव्हती. परंतु अलीकडे रवींद्रनाथांच्या वाढत्या लौकिकाबरोबर जेव्हां ह्या त्यांच्या आवडत्या संस्थेसही जगप्रसिद्धि प्राप्त झाली, तेव्हां तिची व्यापकताही वाढवावी असे रवींद्रनाथानीं मनांत आणले, व आज बोलपूरच्या लहानशा शाळेची " विश्वभारती " नामक संस्थेत परिणति झाली आहे.

पूर्वीपासून ह्या शान्तिनिकेतन सस्थेचा सर्व खर्च रवींद्रनाथांनींच चालविला. इतकेच नव्हे, तर पुढे त्यांस कविराज म्हणून गीतांजलीबद्दल मिळालेल्या नोबेल प्राईझची रक्कम रुपये सव्वा लाख त्यांनीं ह्याच त्यांच्या आवडत्या संस्थेस अर्पण केली आहे. आतां मात्र ह्या विस्तार पावलेल्या विश्वभारतीय

संस्थेस श्रीमान् राजेरजवाडे यांचे पुष्कळच साहाय्य मिळाले आहे. त्या संस्थेची सविस्तर माहिती पुढे देत आहोत.

**विश्वभारती**:—शान्तिनिकेतनासारखी लहानशी शाळा चालवून रवींद्रनाथांसारख्या मोठ्या पुरुषाची भूक भागण्यासारखी नव्हती. त्याच्या मनांतील महत्त्वाकांक्षेने म्हणा, अगर ईश्वराच्या नियतीने म्हणा, त्यास कांहीं वर्षानंतर स्वस्थ बसूं दिले नाहीं. शरीराच्या अस्वास्थ्याच्या निमित्ताने ते विलायतेस गेले. तेथे कर्मधर्मसंयोगाने त्यांच्या गीतांजलीचे इंग्रजी भाषांतर एक दोघां तज्ज्ञाचे हातीं पडले. ही सहज घडलेली गोष्ट, पुढे त्यास नोबेल प्राईझ मिळून त्याची जगप्रसिद्धि होण्यास कारण झाली. त्यावेळी एन्ड्रल-कोड्याप्रमाणे इंग्लंडांत राहणाऱ्या रवींद्रनाथाबरोबर पाश्चात्य पंडित आपला परिचय करून घेऊं लागले. त्यानंतर युरोपांत जर्मन महायुद्ध सुरू झाले. ह्या पेटलेल्या भयंकर वणव्याच्या धगीमुळे, शांतिजलासाठीं लोक अत्यंत तृषार्त झाले. अशा समयीं कवीच्या प्रतिभेनें उत्पन्न केलेल्या मृगजळाने लोकास आकर्षित करणे सहज संभवनीय होते. मग वडिलाच्या पुण्याईने गर्भश्रीमंत असलेल्या रवींद्रनाथांनीं श्रुतिमाउलीच्या मांडीवर बसून उच्चारलेले इंग्रजी बोल लोकास कौतुकास्पद वाटले असल्यास नवल नाहीं. अंतरराष्ट्रीय प्रेमाचाच त्यावेळीं दुष्काळ पडला होता. अशा वेळीं राब भाजलेल्या जमिनीवर बी पेरावे, त्या-प्रमाणे रवींद्रनाथांनीं विश्वभारती त्या संस्थेचे बीजारोपण केले.

युरोपच्या रणभूमीवर हे जे युद्धाचे महासत्र कित्येक वर्षें चालले, त्यांत चारी खंडांतील लोक आपल्या भौगोलिक मर्यादा ओलांडून एकत्रित झाले होते. ह्याप्रमाणे पृथ्वीवरील दुस्तर सागर व अनुल्लंघनीय पर्वत, ह्यांनीं जरी आपले प्रतिबंध दूर केले, तरी मनुष्यांनीं आपले राजकीय, सामाजिक व धार्मिक भेदांचे कृत्रिम तट उभारून अखिल मानवजातींत पूर्वींपेक्षांही अधिक वैरभाव उत्पन्न करून ठेवला आहे. ही स्थिति त्यांच्या लक्षांत आली. नानाविध राष्ट्रें व त्यांतील लोक त्यांच्यांतील अंतर आधिभौतिक शास्त्राने कमी केलें खरें; पण त्या मानाने त्यांच्या मनांतील भेदभाव कमी करण्यास काय करावे, हा विचारी माणसांपुढे प्रश्न होता.

ह्या सार्वत्रिक प्रश्नाप्रमाणें मायभूमीच्या उद्धाराचाही अत्यंत बिकट प्रश्न यांस सोडवावयाचा होता. राजकीय चळवळींच्या थोड्याबहुत अनुभवाने

त्यांच्या वैयर्थाबद्दल त्यांची खात्री झाली होती. तो धकाधकीचा मामला त्यांस उरकण्यासारखाही नव्हता. शिवाय मागून कांहीं मिळावयाचें नाहीं. ह्यासाठीं आपण गमावलेल्या आपल्या पूर्वसंस्कृतीचें वैभव पुन्हा प्राप्त करून घेतल्या-वांचून जगांत आपणांस कोणी विचारणार नाहीं, अशी त्यांची दृढ समजूत झाली होती. युरोप खंडांतील कोणत्याही देशांत जा, तेथे युरोपीय संस्कृति केंद्रीभूत झालेली दिसते. तसेच पूर्वेकडील कोणत्याही देशांत नाहीं. यामुळें पूर्वेकडील संस्कृतीचे खरे ज्ञान संपादण्यास आम्हांस जर्मनी, फ्रान्ससारख्या युरोपिअन देशांत जावें लागतें. ह्याचे कारण पारतंत्र्याच्या विपरीत परिस्थिती-मुळे आम्ही आमच्या संस्कृतीचा पुरा अभ्यास करण्यापूर्वींच पाश्चात्य संस्कृती-च्या अध्ययनांत गर्क होतो. आणि पुढे जो थोडाफार आमच्या पौर्वात्य विद्ये-चा आम्ही अभ्यास करतों, तोही त्या त्या आमच्या पौर्वात्य भाषेतून न करतां इंग्रजी भाषेतून करू लागतो. ही आपत्ति दूर करण्याकरितां विशेषें-करून सर्व पौर्वात्य विद्यांचे आदिपीठ ही महत्त्वाकांक्षा विश्वभारतीने धरली आहे. हिंदुस्थानांत जन्मलेल्या अगर बाहेर जन्मून हिंदुस्थानांत संचरलेल्या सर्व सस्कृतींचा, त्यांच्या मूल भाषांच्या व ग्रंथांच्या द्वारे, अभ्यास करणे, हें विश्वभारतीचे आद्य कर्तव्य आहे. प्राचीनकाळीं निरनिराळ्या वंशांचे अगर उपवंशांचे व धर्मपंथांचे लोक ह्या सुवर्णभूमीत वसाहत करून राहिले असतां, सर्वांचा हिंदूंच्या वर्णव्यवस्थेत अंतर्भाव करण्याचे कठीण काम आर्यभूने पूर्वी केले आहे, व आज तोच प्रसंग पुनः आला असतां, निर-निराळे मानववंश-उपवंश व त्यांचे भिन्न भिन्न धर्म, यांच्या समन्वयाचें काम करण्यास सर्व देशांत आर्यभूमि हीच पूर्व-सस्कारबलाने अधिक लायक व समर्थ आहे, असा रवींद्रनाथांस आत्मविश्वास आहे. इतर देशांतील इतिहासा-प्रमाणे राजकीय उलाढाली करणाऱ्या राजांच्या नांवापेक्षां, भिन्न संस्कृतींच्या लोकांत सलोखा घडवून आणणाऱ्या नानक, कबीर सारख्यांची नांवे ज्या देशांत अजरामर होतात, त्याच देशावर वरील आपत्ति दूर करण्याची जबाब-दारी येते, असे म्हणून रवींद्रनाथांनीं अखिल मानवकोटीस केंद्रीभूत होणारें असें एक बडें अध्यात्मपीठ बनविण्याचें महत्कार्य हातीं घेतले आहे. आपल्या देशांतील प्राचीनकाळच्या नालंदा व तक्षशिला ह्या विद्यापीठांचें अस्पष्ट ध्येये त्यांनीं आपल्या पुढें ठेवलें आहे. सुदैवानें त्यांस आपल्या देशांतील तसेंच युरोप व

अमेरिका येथील निरनिराळ्या देशांतील तज्ज्ञ अध्यापकांचे साहाय्य मिळत चाललें आहे. त्या विद्यापीठांत इतर शाळा अगर कॉलेजांप्रमाणें शिक्षण मिळावयाचें नसून सुशिक्षित विद्यार्थ्यांस पुढील विद्यार्जन व संशोधन ह्या कामास जरूर ते सर्व ग्रंथ व तज्ज्ञांचा सल्ला मिळण्याची तजवीज तेथे आहे. तसेच विदेशी अध्यापकांप्रमाणे किंबहुना त्याहून विशेष रीतीने विदेशी विद्यार्थ्यांनीं येथें येऊन पौर्वात्य संस्कृतीचे ज्ञान व त्याबरोबरच परस्पर प्रेमभाव संपादन करून जावे, अशी रवींद्रनाथांची फार इच्छा आहे; व त्यासाठीही त्यांचे प्रयत्न सुरू आहेत.

" विशेषेकरून, (१) सृष्टीच्या अवलोकनाने सत्याचा शोध करावा. (२) अखिल जगामध्ये विश्वबंधुत्वाची कल्पना रूढ व्हावी. (३)पौर्वात्य आणि पाश्चात्य संस्कृतींचा सुंदर मिलाफ व्हावा, आणि (४) जगामध्ये शांतता प्रस्थापित करण्यासारखी परिस्थिति उत्पन्न करावी, असे विश्वभारतीच्या हेतूंचे थोडक्यांत वर्णन करता येईल. ह्या विद्यापीठाचे पथभवन, शिक्षाभवन, विद्याभवन, व विश्वभारतीसंमीलनी अशा एकापेक्षां एक श्रेष्ठ अशा पांच शाखा आहेत. संस्थेच्या नियामकमंडळाचे अध्यक्ष रवींद्रनाथ आहेत. यापुढे विश्वभारतींत प्रत्येक धर्माच्या अनुयायांचा मठ स्थापण्यांत येत असून, त्या त्या धर्माच्या वाङ्मयाच्या पुस्तकालयाचीही सोय करण्यांत येणार आहे.

" सदर विद्यापीठाचा लाभ घेण्यासाठी पाश्चात्य देशांतील विद्वान् लोक येत आहेत. प्रेग विद्यापीठाचे संस्कृत पंडित विटरनिटझ्, पॅरिसचे डॉ० सिलव्हन लेव्ही, व्हिएन्ना विद्यापीठाचे डॉ० जीजर, तसेच चीन व तिबेट येथील कांही पंडित, विश्वभारतींत येऊन गेले, व त्यांच्या विद्वत्तेचा व विचारविनिमयाचा फायदा तेथील प्रौढ विद्यार्थ्यांस चांगलाच मिळाला. विश्वभारतीतील अभ्यासक्रमांत (१) खेड्यांची पुनर्घटना; (२) संस्कृत वाङ्मय व इतर तदंगभूत विषय; (३) बौद्ध तत्त्वज्ञान, इतिहास आणि पालीचा अभ्यास; (४) मध्ययुगीन भारत आणि हिंदुस्थानांतील प्रमुख भाषांचे वाङ्मय; (५) कला आणि संगीत; (६) आंग्ल वाङ्मय आणि युरोपिअन संस्कृतीची रूपरेषा; अशा विषयांचा समावेश असून विद्यार्थ्यांच्या बुद्धिमत्तेप्रमाणें संशोधनकार्यासही येथें उत्तेजन मिळते. या संस्थेंत नारी-विभाग म्हणून स्त्रीशिक्षणाचीही एक स्वतंत्र शाखा आहे.

तसेंच सुरूल येथे श्रीनिकेतन नामक एक कृषिविषयक प्रयोगांची व शिक्षणाची फार मोठी सस्था रवींद्रनाथांनी निर्माण केली आहे. व ती आज सार्वजनिक मालकीची करून टाकली आहे. श्रीनिकेतन व शांतिनिकेतन ह्या दोन्ही सस्थांचा अतर्भाव विश्वभारती ह्या विराट संस्थेत होतो. आजपर्यंत ह्या संस्थेत लक्षावधि रुपये खर्च झाले आहेत !"

तारीख २४ सप्टेंबर सन १९२२ रोजी विश्वभारतीची रूपरेषा ह्या विषयावर रवींद्रनाथाचे पुण्यास व्याख्यान झाले. त्यात ते म्हणाले, "आपले जुने मानसिक स्वातंत्र्य अत्यंत मौल्यवान् होते. पण सरकारी शिक्षणाच्या नव्या मनूंत हिंदी लोकाना स्वतःचे मन म्हणून काही आहे, ही गोष्ट पूर्णपणे विसरली गेली आहे. हल्लींही शिक्षण मिळते, पण त्याचे वर्णन काय करावे ! आमच्या तेजस्वी नेत्रांतील स्वयंभु दृष्टिशक्ति फुकट गेली, व आम्ही आंधळे बनलो ! डोळे विकले आणि त्यांचे चष्मे खरेदी केले. अशी आमची स्थिति झाली आहे. परीक्षेत यश मिळविणे हे एकच वेड सर्वांना लागून राहिलेले आहे. जास्तींत जास्त मार्क व कमीत कमी ज्ञान, असा अपूर्व सुंदर मेळ, ह्या शिक्षणांत सांपडतो ! पाश्चात्य शिक्षण कां होईना, पण ते तरी उत्कृष्ट देणारी युनिव्हर्सिटी इकडे एकही नाही. आमच्याकडील शाळा म्हणजे केवळ भिक्षापात्रें होत. खरी विद्या मिळवावयाला फ्रान्स-जर्मनीकडे जावे लागते. गळून पडलेलीं मोरपिसें जमवून त्यांचे मुकुट शाळांतून बनवितात, पण त्याने जिवत पिसाऱ्यासारखी शोभा कशी येईल ? पागळेपणा जावयाचा तर मेहनतीने पाय सुदृढ केले पाहिजेत. परदेशी लाकडी पाय लावले तर ते आवाज मात्र खूप करतील ! झाडाच्या डाहाळ्यांवरून वानर कसा उड्या मारतो, याचा शोध लावण्याकरितां समुद्रांतील माशांनी आपल्यांतला एक शास्त्रज्ञ पाठविला; त्याने झाडांचा भव्य विस्तार पाहून उड्या मारण्याचा गुण जिवत वानरांत नसून, तो झाडांच्या फांद्यात आहे असे कळविले ! युरोपांत शिक्षणसंस्थांचा विस्तार दिसतो, पण ह्या संस्था निर्जीव असून त्यांतून वावरणारा मनुष्य जिवंत आहे, ही गोष्ट आपण विसरतो.

"हिंदुस्थानांत निरनिराळ्या भाषा असल्या, तरी बुद्धीचे राष्ट्रीय ऐक्य निर्माण होण्यास हरकत नाही. परकी भाषेवर अवलंबून राहून खऱ्या विद्येची उपेक्षा करणारा मनुष्य हास्यास्पद होय. जुन्या विद्येत आतां काय उरले आहे,

असे कोणी म्हणतात; पण ही त्यांची चूक आहे. परदेशातील कचऱ्याच्या पेट्यांतील चिंध्या चिवडण्यापेक्षां आपल्या जुन्या वाड्यांतील तळघरेंच दिवा घेऊन शोधिलीं, तर हाताला कांहीं तरी अधिक सांपडेल! लांकडाच्या व्यापाऱ्याला वाटते की, झाडाची पालवी व फुले कशाला उगवतात? त्या योगाने तितकें इमारतीचे लांकूड कमी पडते. पण ही चूक आहे. ही पालवी आणि फुलें जर नाहींत, तर त्यामागून झाडही शिल्लक नाहीं, असा अनुभव त्याला लवकरच येईल. आयुष्यातील गरजा कमी करणे, म्हणजे एक प्रकारें संस्कृतीचा संकोच करणेंच होय. शिक्षण व सुसंस्कृति याची संगति अभेद्य आहे. नित्यनैमित्तिक पाठ व प्रत्यक्ष सदाचार हेंच पूर्वीचें धार्मिक शिक्षण असे."

ह्या शान्तिनिकेतन आश्रमासंबंधी महर्षि देवेंद्रनाथांनी पूर्वीपासूनच कांहीं निर्बंध घालून ठेविले आहेत, ते असेः (१) आश्रमात कोणी मूर्तिपूजा करूं नये; (२) कोणत्याही धर्ममतांसंबंधी टीका करूं नये; (३) पशुपक्ष्यांची हिंसा करूं नये, तसेंच (४) मद्यमांसाचें सेवन करूं नये. हे नियम अद्यापिही पाळले जात आहेत.

आज ह्या विद्यालयांत खिस्ती, पारशी, चिनी, तिबेटी, सिंहली व हिंदी, अशा निरनिराळ्या संस्कृतीच्या अभ्यासाची तरतूद केलेली पाहून महर्षि देवेंद्रनाथांपेक्षांही राजा राममोहन यांच्या आत्म्यास अधिक संतोष वाटेल, ह्यांत शंका नाहीं. राजा राममोहन बहुतांशानें श्रीशंकराचार्यांचेच अनुयायी होते. सगुणोपासकांत मेळ घालण्याकरितां श्रीशंकराचार्यांनी पंचप्रतीकांची पंचायतनपूजा रूढ केली. त्याप्रमाणे आदिब्राह्मसमाजाचे मूळ संस्थापक राजा राममोहन, हे आपल्या ब्राह्ममंदिरांत निरनिराळ्या धर्मांची मुलें घेऊन त्यांसह प्रेमानें ब्राह्मगीत गात. ती त्यांची एक पंचायतनपूजाच होती. आणि तीच पूजा आज रवींद्रनाथांच्या विश्वभारतींत विकास पावलेली, अथवा पावत असलेली त्यांस दिसून येईल.

ह्या दृष्टीने पाहतां आद्यसंस्थापकाच्या अंतरांतील रहस्य रवींद्रनाथांइतके कोणींच जाणलें नाहीं असेही म्हणतां येईल. आतां ही धर्मसंमेलनाची वाढीस लागलेली कल्पना फलद्रूप केव्हां होते, ते आदि-ब्राह्मसमाजाचा पुढील इतिहासकारच सांगूं शकेल.

---

## प्रकरण अठरावें

# समारोप

आदि-ब्राह्मसमाजापैकीं रवींद्रनाथ ह्या एका मोठ्या प्रकरणाची हकीगत येथपर्यंत सांगितली. आतां आपल्याला ह्या दुसऱ्या एकंदर भागाचा समारोप करावयाचा आहे. राजा राममोहन यांच्यानंतर आदि-ब्राह्मसमाजाशीं ज्यांचा निकट संबंध आला ते महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर, भक्तश्रेष्ठ राजनारायण बोस, सुप्रसिद्ध निबंधकार अक्षयकुमार दत्त, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, प्राचीन इतिहास संशोधक डॉ० राजेंद्रलाल मित्र, वे० शा० सं० पंडित आनंदचंद्र विद्यावागीश, येशुदास केशवचंद्र सेन, सर जस्टिस आशुतोष चौधरी, साधुश्रेष्ठ द्विजेंद्रनाथ ठाकूर, कविवर्य सत्येंद्रनाथ ठाकूर व कविसम्राट् रवींद्रनाथ ठाकूर इत्यादि पुरुषश्रेष्ठांची विशाल बुद्धिमत्ता व असामान्य विद्वत्ता लक्षात घेतली कीं, कोणाचेंही मस्तक आदराने नम्र झाल्यावाचून राहणार नाहीं. अशा बड्या बड्या मंडळींनीं ज्या गोष्टी विचारपूर्वक केल्या, त्यांच्याकडे दोषदृष्टीने नुसतें पाहणेंही धाडसाचें होईल. हा लहान तोंडीं मोठा घास घेतांना आपलें क्षुद्रत्व आपल्या आड आल्यावांचून राहणार नाहीं. तथापि चित्रकाराने चित्र काढीत असतां, चित्रांत विषयीभूत झालेल्या महाव्यक्तीच्या पुढे आपण किती क्षुद्र आहों, हें मनांत आणून चित्रित मूर्तीच्या मुखास किंचित् विद्रूप करणारे व्रण जसे त्यास विनयाने लपवितां येत नाहीत, त्याचप्रमाणे आम्हीं टीकाकाराची दृष्टि एकदां अंगिकारल्यावर आम्हांस जे गुणदोष दिसतील, ते निर्भिडपणे पुढे मांडल्यावांचून आम्हांस गत्यंतरच नाहीं. तरी हे कटुकर्तव्य बजावीत असतां दृष्टिदोषामुळे कोठे अतिप्रसंग झालासा वाटल्यास सुज्ञ वाचकांनी त्याबद्दल आम्हांस क्षमा करावी.

झाडाच्या बुंध्याला पान, फूल किंवा फळ कांहीच येत नाहींसे झाल्यामुळे तो जरी चित्ताकर्षक राहिला नाहीं तरी ज्यास पत्र, पुष्पे व फळें येतात त्या खांद्यांना मूळचा तोच आधार असल्यामुळे त्याचे महत्त्व फार असतें, किंवा मंदिराचा पाया विस्मृतीच्या भूमींत गडदला तरी इमल्याला आधार त्याचा आहे हे जसे विसरतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच आदि-ब्राह्मसमाजाचे वैशिष्ट्य असें आज

जरी कांहीं राहिलें नाहीं, तरी ब्राह्मसमाजाच्या इतिहासांतील त्याचे महत्त्व कमी होत नाहीं. राजा राममोहन यांस स्वराज्यसंस्थापक श्रीशिवछत्रपतींची उपमा दिली तर मधला अनास्थेचा ( सभाजीचा ) काळ जातां, आदि-ब्राह्मसमाजाच्या कर्तृत्वाशीं राजारामाच्या वेळेचें साम्य येते. शिवाजीमहाराजांची कारकीर्द अत्यंत ओजस्वी, तर शाहूमहाराजांची अति भव्य झाली. पण खरा आणी-बाणीचा काळ राजारामाच्याच वेळीं येऊन गेला. तीच स्थिति आदि-ब्राह्म-समाजाची विशेषेंकरून इ. सन १८४३ ते १८६६ या काळांत होती.

इ. सन १८४३ च्या पूर्वी सुमारें एक तप पंडित रामचद्र विद्यावागीश व राजा द्वारकानाथ ह्यांनींच समाजाची परंपरा कशीबशी जिवंत ठेविली. पंडित हे बहुतांशीं जुन्याच पठडींतले होते, त्यांना हे काम म्हणजे स्मशानभूमींत रोज जाऊन पणती लावण्यासारखे उदासवाणें झाले होते. द्वारकानाथ तर नांवाचे राजेच ! त्यांचा व्यापही फार मोठा. तेव्हां त्यांनीं समाजाच्या खर्चाची तरतूद लावली व इतर व्यवस्था पाहण्याचे काम आपल्या दिवाणजीवर सोपवून ते मोकळे झाले. त्यांची धर्मजिज्ञासा त्यांच्या श्रीमंतीस शोभेल इतपतच होती. आपला मुलगा देवेंद्रनाथ विद्यावागीश यांच्याजवळ वेदान्ताचा अभ्यास करतो आहे, हें त्यांना समजतांच, त्यानी त्याबद्दल त्यास एकदम बंदी केली. पण ती बदी मनावर न घेतां देवेंद्रनाथानीं या धार्मिक चळवळीत फारच जोर धरला. त्यामुळे ब्राह्मसमाज हें नांव अजूनही लोक आदराने घेत आहेत.

देवेंद्रनाथांचे सहकारी मित्र डॉ० राजेंद्रलाल, पंडित ईश्वरचंद्र, अक्षय-कुमार दत्त व राजनारायण ह्यांनी तत्त्वबोधिनी पत्रिकेच्या द्वारे बंगाली भाषेस ऊर्जितावस्थेस आणून, वैदिक संशोधनाचे कार्यासही पाश्चात्यांच्या पूर्वींच आरंभ केला, व ऋग्वेदाचें आणि उपनिषदांचे भाषांतर, महाभारतावर लेख वगैरे वाङ्मय त्यांनीं प्रसिद्ध केले. डॉ०राजेंद्रलाल व ईश्वरचंद्र हे जाडे विद्वान् खरे; पण शुद्ध धार्मिक चळवळीकडे त्यांचें विशेष लक्ष असावे, असे दिसत नाहीं. अक्षयकुमार दत्त यांच्या आवडीचा विषय जीवशिवसंबंध हा नसून जीवसृष्टिसंबंध हा होता. यामुळे त्यांचें व देवेंद्रनाथ यांचे फारसे पटले नाही. देवेंद्रनाथांचे आवडते आनंदचंद्र ऊर्फ बुकेश हे पुढें वेदशास्त्रसंपन्न होऊन ब्राह्मसमाजाचे उपाचार्य झाले होते. पण केशवचंद्रांच्या नवीन मंडळींनीं त्यांस स्थानभ्रष्ट केल्यावर, त्यांनीं ब्राह्मसमाजाच्या चळवळींत विशेष भाग घेतल्याचे दिसत

नाहीं. राजनारायण हे देवेंद्रनाथांचे एक हस्तक होते. त्यांनींही देवेंद्रनाथ समाजकार्यातून निवृत्त झाल्यावर फार दिवस समाजकार्य केले नाहीं. तेही प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे निवृत्त झाले. सत्येंद्रनाथ ठाकूर व सर आशुतोष चौधरी हे दोघेही सरकारी नोकरीत गुंतल्यामुळे त्यांच्याकडून स्वतंत्रपणे विशेष कांहींच होण्यासारखे नव्हते. राहतां राहिले देवेंद्रनाथ व केशवचंद्र. ह्यांपैकीं देवेंद्रनाथ ह्यांनी समाजास व्यवस्थित स्वरूप दिले, आणि केशवचंद्रानी त्यांत विलक्षण चैतन्य उत्पन्न केले. त्याच्या एकंदर कार्याची हजेरी घेतली तर ती फार मोठी आहे. (१) तत्त्वबोधिनी पत्रिका, (२) तत्त्वबोधिनी सभा, (३) पाठशाळा, (४) कलकत्ता कॉलेज, (५) वैदिक वाङ्मयप्रसार, (६) धर्मोपदेशक मंडळी, (७) फेनेलोची नवीन प्रार्थना, (८) सत्येंद्रनाथांची स्तोत्रे, (९) लहान धार्मिक पुस्तकें, (१०) संगतसभा, (११) नगरकीर्तन, (१२) प्रतिनिधिसभा, (१३) ब्राह्मधर्मअनुष्ठान, (१४) मिश्रविवाह व (१५) एकेश्वरी मित्रसमाज, इत्यादि कित्येक परिणामकारक चळवळी काहीं उभयतांनी व काहीं केशवचंद्रानी घडवून आणल्या. तसेंच भारतीय ब्राह्मसमाज, उपासनासमाज, देवालयसमाज, वेदसमाज, प्रार्थनासमाज, इत्यादि ठिकठिकाणच्या धार्मिक संस्थाही आदि-ब्राह्मसमाजानेंच परंपरेने अस्तित्वांत आणल्या. मुंबईच्या डॉ० भाऊदाजींनी ब्राह्म-समाजाच्या द्वारेच कलकत्त्याचा एकेश्वरी मित्रसमाज घडवून आणला; व उलट कलकत्त्याच्या केशवचंद्र सेनांनीं मुंबईचा प्रार्थनासमाज व मद्रासचा वेदसमाज याच्या स्थापनेस हातभार लावला. अशा रीतीने ही ब्राह्मसमाजाची लाट बहुतेक साऱ्या हिंदुस्थानभर आदि ब्राह्मसमाजानेंच पसरविली. ह्या समाजाच्या केन्द्रीभूत असलेल्या दोन व्यक्ति म्हणजे देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन. ह्यापैकीं देवेंद्रनाथाचें वर्णन पूर्वी येऊन गेलेलेच आहे, व केशवचंद्रांचे वर्णन पुढील भागांत सविस्तर येईलच. तूर्त समारोपादाखल इतकेंच म्हणावयाचे की, दोन मध्यबिंदु असलेलें वर्तुल ज्याप्रमाणें लांबट होते, व त्यामुळे परिघापासून मध्यबिंदूचे अंतर जसें विषम राहते, त्याप्रमाणे ह्या दोघां व्यक्तींचे प्रकार झाले. अपरोक्षानुभूति आणि सामाजिक सुधारणा हीं दोन ध्येयरूप क्षितिजे कोणास निकट तर कोणास दूर अशीं परस्पर वाटूं लागलीं, आणि त्यामुळेच ह्या लंबवर्तुळाचीं पुढे दोन स्वतंत्र वर्तुळें पाडणें भाग पडले.

धार्मिक विचारांतही या ब्राह्म पुढाऱ्यांच्या विचारांत असावा तसा सांप्रदायिक मेळ नव्हता. जीवात्मा, परमात्मा व विश्वात्मा ही देवेंद्रनाथांची त्रयी; तर पुत्र, पिता व पवित्र आत्मा, ही केशवचंद्रांची त्रयी होती. राममोहनाचा ईश्वर सद्‌घन तर देवेंद्रनाथाचा चिद्‌घन, आणि केशवचंद्रांचा पतितपावन. असा त्यांच्या प्रार्थनाभेदांवरून सहज फरक दिसतो. राममोहनाची उपासनेची भाषा शुद्ध वैदिक, देवेंद्रनाथांची शोधित वैदिक, आणि केशवचंद्राची प्राकृत किंवा इंग्रजी असे. देवेंद्रांची प्रार्थना परंपरापुनीत, तर केशवचंद्रांची रोज नवी असे. एकाचे वेदामृतपान, दुसऱ्याची सर्वधर्मोच्छिष्ट मधुकरी. एक अंतर्ज्ञानाने आत्मतृप्त, दुसरे अंतर्ज्ञानामुळे महत्त्वाकांक्षी असे होते. एक परमात्म्याशीं ऐक्य ( अद्वैत नव्हे ) वांच्छिणारे तर दुसरे ईशेच्छेशीं अविरोध मानून आपले मनोरथ रचणारे, असे दिसतात. असा देवेंद्रनाथ व केशवचंद्र याच्या मनोवृत्तींमध्ये मूलग्राही फरक होता.

इ. सन १८५६ साली देवेंद्रनाथ हिमालयावर गेले, ते सुमारे दीडदोन वर्षांनीं तेथून परतले. ते कृतार्थ होऊन परत आले असे सांगतात. त्यांची धर्मजिज्ञासेची कळी त्यांच्या ऐन तारुण्याबरोबरच फुलूं लागली, व सुमारे दोन तपांचें अवधीनंतर ती पूर्ण फुलली; आणि त्याचे फुललेले सुमन त्यांनीं हिमालयावरील एकांतांत ब्रह्मपदीं समर्पण केले. त्यानंतर त्यांना लोकसंग्रहात्मक उद्योग करण्याबद्दल ईश्वराची अनुज्ञा झाली, असे म्हणतात. पण तसे म्हणावे, तर त्यानंतर अवघ्या सात आठ वर्षांतच ते प्रपंच व समाजकार्य यांस विटून पुन्हा एकांतांत निवृत्त झाले. ते अखेरपर्यंत सतत चाळीस वर्षें एकान्तांतच आत्मतृप्तींत रंगून राहिले, असे आपण पाहतो. ते ईश्वराशीं ऐक्य पावल्यावर त्यांचें स्वतंत्र असे चरित्र कांहींच राहिले नाहीं. यामुळेंच त्यांनीं आपलें आत्मचरित्र सन १८५८ नंतरचे लिहिले नसावे. तसे करणे एका अर्थी अयथार्थच झाले असते. इतकेच काय पण त्यांच्या आत्मचरित्राच्या पूर्वार्धांत जी विचारांची वाढ दिसते, त्यावर त्यांच्या उत्तरार्धांतील प्रवासवर्णनांच्या पाल्हाळांनीं व क्वाचित् भीतिग्रस्त झालेल्या चरित्रांतील भागाने विरजणच पडतें. असो. स्थूलमानाने पाहतां देवेंद्रनाथांचे चरित्र व त्यांची उपदेशपद्धति यांच्याशीं महाराष्ट्रांतील प्रसिद्ध प्रार्थना-

समाजी डॉ० भांडारकर यांचे बरेच साम्य दिसतें. त्यांच्या उपदेशांत केशव-चंद्रांप्रमाणें भावनांची खळबळ नाहीं व सरळ सुबोधपणा कोठेही सुटलेला नाहीं.

पण सनातनधर्मीयांच्या दृष्टीने अधिक मार्मिकपणे पाहूं गेल्यास असें दिसते कीं, देवेंद्रनाथ जुन्या खानदानी श्रीमंतीच्या धार्मिक परंपरेत वाढलेले खरे; पण पुढें त्याना समाजसुधारकांशिवाय दुसऱ्या कोणत्याही सत्संगतीचा लाभ घडलेला ( ऐकिवांत ) नाहीं. ते वैदिक सस्कृतीचे चहाते खरे; पण त्यांचे विशेष परिशीलन कॅन्ट, ह्यूम, हॅमिल्टन, न्यूमन, कझिन, स्पायनोझा, मिल्ल, स्पेन्सर, तसेच बाबा नानक व हाफीज ह्यांच्या ग्रंथांवरच झालेलें. त्यांचे संस्कृतविद्याशिक्षण तांत्रिकच खरें; पण ते स्वतः कर्मकांडाचे द्वेष्टेच होते. गायत्रीमंत्राच्या जपयज्ञाने त्यांचे अपरिमित कल्याण झाले, हे त्यांस कबूल; पण यज्ञोपवीतमात्र त्यानीं टाकलेले होते. ब्राह्मसमाजाचे पूर्वाचार्य ब्राह्मणच, वेद-विद्येच्या अभ्यासाकरिता पाठविलेले विद्यार्थी ब्राह्मणच, देवेंद्रांचे संस्कृतशिक्षक विद्यावागीश आणि वेदान्तवागीश ब्राह्मणच, वेदमंत्रोच्चाराचा पाठ आपल्याला शुद्ध शिकण्याकरितां त्यांनीं बोलाविले ते द्राविडी ब्राह्मणच; पण असें असून-ही आचार्यपदाचा मान ब्राह्मणाकडेच ठेवणें, हे मात्र त्यांनी गैर ठरविले. त्यांनीं वडिलांच्या मरणोत्तर शास्त्रविहित कडक व्रताचरण करून देहदंड सहन केला, श्राद्धतिथिही पाळली; पण शालिग्रामपूजा मात्र हट्टाने टाळली! माझ्या पाठीमागे माझ्या रक्षेचे अथवा अस्थींचे देव्हारे करूं नयेत, व समाधि बांधूं नये, असें सांगणारे देवेंद्रनाथ केशवांच्या समाधिपाशीं दर्शनाला व प्रार्थनेला अगत्यपूर्वक जात ! आणि आजही सप्तपर्णीखालील त्यांची वेदि लोकांनाही तितकीच वंदनीय आहे. अलेक्झांडर डफ ह्यांचा विरोध करण्याकरितां त्यानीं स्वधर्माभिमानाच्या मोठ्या तेखानें स्वतंत्र शाळा काढली, आणि पुढे ब्राह्मपाठशाळेची नदीकांठची सुंदर इमारत, शाळा चालेना म्हणून डफसाहेबांसच विकून टाकली ! त्यांनीं ब्राह्म अनुष्ठान ठरविलें खरें; पण ते जुन्या व नव्या अनुयायांकडूनच बहुधा अवमानिलेलेच त्यांनीं पाहिलें ! ते आर्यसंस्कृतीचे व वैदिक-मंत्राचे मोठे अभिमानी असतील; पण ईशप्रार्थना मात्र त्यांना एका फ्रेंच अधिकाऱ्याची त्यांना घ्यावी लागली. ते स्वतः एकांताचे भोक्ते होते; पण लोकांत ते सामाजिक प्रार्थनेचे प्रणेते झाले. ईश्वरनिष्ठा त्यांनीं परधर्मातून घेतली, असें त्यांचे इतिहासकार सांगतात. मग त्यांनीं

बिचाऱ्या स्वधर्मांतून काय घेतले, हरि जाणे! आत्म्याच्या ठायी ईश्वराचे दर्शन झालें असतां, सर्वत्र त्याचे दर्शन होते, असा ते आपला अनुभव सांगत, पण सृष्टिसौंदर्यदर्शनाच्या हव्यासामुळे सदा त्यांचा वनवास असे. केवळ एका त्यागानेच अमृतत्व लाभेल, अशी विरक्ताची भाषा ते बोलत, पण वैरागी साधूंचे ते द्वेष्टे होते. स्वतःच्या नेमस्तपणापलीकडे त्यांची विरक्ति गेली नाहीं. आणि सदा दरबारी पोषाख आणि श्रीमंती रहाणी यांस कधीच अंतर पडले नाही. हिमालयांतील त्याच्या वानप्रस्थांत एकदां दरोड्याची हूल येतांच त्यांची उडालेली गाळण त्याच्या स्थितप्रज्ञतेची साक्ष देत नाहीं. त्यांस सत्य-प्रत्यय होत असे, असे ते सांगतात. पण अद्वैत आणि मायावाद हा मात्र त्यांस मुळीच पटला नाहीं. ब्रह्माशी झालेल्या ऐक्यभावाच्या (Union) जीवनांतून ब्रह्माशी समरसत्व पावलेल्या ( Unity ) जीवनात पोचले होते, असे त्यांचे चरित्रकार सांगतात. पण त्यांतही त्यांचे द्वैत सदैव खडेच होते. त्यांचें क्रममुक्तीचे परिवर्तन सायुज्यांत होणे कधीच शक्य नव्हते. ते इहलोकी असूनही ब्रह्मलोकांचा अनुभव घेत असल्याचे सांगतात. पण त्यांना सनातनीयांचा अवतारवाद, थिऑसफीस्टांचा जगद्गुरुवाद, परलोकविद्येतील महात्म्यांचा वाद किंवा पुनर्जन्मवाद याचा मागमूसही लागला नाहीं. श्रीरामकृष्णास भेटलेले नर-नारायण यास भेटले नाहीत. इतकेच काय पण सत्संगतीचा महिमा विशेष गाणाऱ्या देवेंद्रनाथांनीं हिमालयासारख्या योग्यांच्या तपोभूमीत राहूनही सिद्धसंघाचे अथवा कोणा तापसी भूदेवाचे तरी दर्शन घेतल्याबद्दलही कोठे उल्लेख नाहीं! हे सारे नवलच होय!

वरील विरोधात्मक व निषेधात्मक वर्णन केवळ दोषैकदृष्टीनेच केलेले आहे. त्याच वर्णनांतील वाक्यरचना उलट केल्यास म्हणजे तसे नव्हते तरी असे होते, असें विधायक वर्णन केल्यास, तेंच शब्द स्तावक स्वरूपाचे दिसू लागतील. ते कांहीं झाले तरी सनातनधर्मी देवेंद्रनाथांस पूर्ण मानणार नाहींत हे उघड आहे. पण तत्वतः विचार केल्यास तसा पूर्णांक एकच आहे. बाकीचे सारेच अपूर्णांक आहेत. पण सारे एका अर्थी जसे अपूर्णांक आहेत तसे दुसऱ्या अर्थी अल्पांशानें अथवा बहुतांशाने ते पूर्णांक आहेत, असेंही म्हणतां येईल. तात्पर्य, अपूर्णांकांतही तरतमभाव आहेच. आणि अशा सापेक्ष दृष्टीनें पाहतां ब्राह्मसमाजांत देवेंद्रनाथांस महर्षि मानलें ते योग्यच

होतें, असे म्हटले पाहिजे. अशा ह्या महर्षींनी आपली एकांत उपासनेची पुण्यभूमि जी शान्तिनिकेतन, ती अखेर आपल्या दिग्विजयी चिरंजीवास ठेव म्हणून दिली. त्या देणगीचे व त्याहून बहुमोल अशा वडिलाच्या आध्यात्मिक संस्काराचे त्याचे चिरंजीव कवि रवींद्रनाथ ह्यांनी कसे सार्थक केले, तेवढेच आता प्रामुख्याने पहावयाचे राहिले आहे. तत्संबंधीं सविस्तर विवेचन केल्यावांचून हा समारोप अपुराच राहील हे उघड आहे. आदि ब्राह्मसमाज ह्या धार्मिक संस्थेचा जो अवशेष आज राहिला आहे तो प्रामुख्याने रवींद्रनाथांच्या शान्तिनिकेतन किंवा विश्वभारती या रूपानींच आहे. ह्यास्तव रवींद्रनाथ व त्याची संस्था ह्यासंबंधींच आम्ही आता पुढे विचार करीत आहोत.

ख्रिश्चन रजिस्टरमध्ये डॉ० संडरलंड असे म्हणतात कीं, धर्म आणि मानवी जीवन ह्या बाबतीत उपस्थित होणाऱ्या हरएक प्रश्नांसंबंधी प्राचीन आर्यावर्तातील तत्त्ववेत्त्यानी जितका खोल विचार केला आहे, त्याहून अधिक खोलवर विचार आजवर कोणत्याही देशात झालेला नाहीं. आणि आमच्यातील जे कांहीं घेण्यासारखे असेल, ते घेण्यास उत्सुक व आपल्या प्राचीन आर्यावर्तातील जे आम्हास देण्यासारखे असेल, ते देण्यास समर्थ असा सुज्ञ, दयाळू व उदारधि शिक्षक आजच्या भारतवर्षात रवींद्रनाथाहून दुसरा कोणी नाहीं. प्रो० राधाकृष्णन् असे म्हणतात कीं, रवींद्रनाथाच्या वाङ्मयतपानें आपल्या समाजाची उन्नति व नैतिक पुनर्घटना किती विलक्षण घडून येईल, हें आज अजमावणे केवळ अशक्य आहे. हिंदुस्थानच्या लोकास ईश्वरीसंदेश घेऊन आलेले, ते एक महापुरुषच आहेत !

रोमन हॉलंडसारखे कित्येक पाश्चात्य लेखक रवींद्रनाथांबरोबर महात्मा गाधी यांचाही पृथ्वीवरील दोन अलौकिक पुरुष, म्हणून उल्लेख करितात. मिस्टर सी. एफ्. अॅड्र्यूज यांच्या त्रिमूर्तींत नुकतेच परलोकवासी झालेले धर्मवीर स्वामी श्रद्धानंद याचाही समावेश होतो. आणि याहूनही अधिक व्यापक दृष्टीनें लोकमत पाहिल्यास मायावतीचा श्रीरामकृष्ण—विवेकानंदांचा अद्वैताश्रम, श्रीक्षेत्र काशीतील मालवीयांचे हिंदू विद्यापिठ, हरिद्वार येथील श्रद्धानंदजींचे गुरुकुल, साबरमतीचा महात्माजींचा सत्याग्रहाश्रम, अड्यार येथील पूर्वतारक संघ आणि बंगाल्यातील कविसम्राटांची विश्वभारती संस्था, हे आजच्या नवयुगांतील आंग्लविद्या-विभूषित भारत तरुणांचे प्रमुख धाम आहेत, असे

म्हटल्यास चालेल. ह्या दृष्टीने आदि-ब्राह्मांच्या ह्या विश्वभारतीधामाच्या भवितव्यासंबंधीं विचार करताना, त्यांच्या केंद्रीभूत असलेल्या रवींद्रनाथ या व्यक्तीसंबंधी गुणदोषविवेचन करणे प्राप्त आहे.

आदि-ब्राह्मसमाजाशीं संबंध आलेल्या काहीं प्रमुख पुरुषांची जी वर आरंभींच नामावळी दिली आहे, त्यात विद्वत्तेच्या दृष्टीने रवींद्रनाथ सर्वांत कनिष्ठ ठरतील यात शंका नाहीं. इतकेच काय; पण पांडित्य, बहुश्रुतपणा, लेखनशुद्धि, लोकहितबुद्धि, अशा दुसऱ्या अनेक गुणात वरील मंडळी रवींद्रनाथापेक्षा कांकणभर श्रेष्ठच ठरतील. असे असतां वरील नरश्रेष्ठांपैकी कोणासही न लाभलेला असा त्रिखंडी अद्वितीय कीर्तीचा लाभ रवींद्रनाथास त्यांच्या कोणत्या गुणांमुळे मिळाला हे ठरविणे कठिणच आहे. सन १९१३ सालीं जगातील शांतताक्षम अशा 'गीतांजली'बद्दल त्यांस नोबेल प्राईज मिळाले. त्यापूर्वी रवींद्रनाथ हे परदेशीच काय, पण स्वदेशींही अप्रसिद्धच होते. ही शेदीडशे गीतांची अञ्जलि त्यांनीं सन १९०९ साली ईश्वरास वाहिली. आणि त्यांची—किंबहुना त्यांच्या इंग्रजी भाषांतराची फलश्रुति म्हणून सन १९१३ साली आशियाचे कविसम्राट् ही लोकोत्तर पदवी त्यास मिळाली. इतकेच नव्हे, तर पुढे अखिल विश्वांतील शांतिमंत्राचे प्रणेते म्हणून त्यांचा साऱ्या युध्यमान जगात लौकिक झाला. आणि गेल्या महायुद्धानंतर ह्या भीष्माचार्यांनी आपल्या उत्तरायण नामक निवासातून आपल्या शांतिपर्वास सुरुवात केली आहे, असे कोणी मानतात. तेव्हां आमच्या सनातनधर्मराजावर त्याचा काय परिणाम होतो, तेच आता मुख्यत्वे पाहणे आहे.

आद्य कवि वाल्मीकींचे मूळ रामायण लोकादराच्या अभावीं बहुतांशीं लुप्त झाले, गुणाढ्याचे महाकाव्य रसिकाभावीं त्यास जाळून टाकावे लागलें, भवभूति कवीस रसज्ञाची वाट पाहण्यासाठी अनंत अशा भविष्यकालावर विसंबावें लागलें, ज्ञानदेवांची ज्ञानेश्वरी संन्याशाच्या मुलावरील गांवचा बहिष्कार उठविण्यासही पुरी पडली नाहीं, एकनाथांना भागवत लिहून पैठणकरांची प्रीति लाभली नाहीं. आणि तुकोबांना लोकक्षोभासाठीं आपले अभंग इंद्रायणींत बुडवावे लागले. पण रवींद्रनाथांच्या अवघ्या एकशे तीन गीतांनी परकीय राष्ट्रांकडूनही चारच वर्षांचे आंत यीट्‌सरूप नारदाच्या प्रसादानें कीर्तीचे ध्रुवपद मिळविलें. हा सुरुचीचा महिमा नसून त्यांच्या भाग्याचा व कालाचा महिमा

होय. अंगांत गुण नसतांही ते कांचनाच्या आश्रयाने भासतात. मग कवि असूनही तो श्रीमान् असेल तर गुणग्राहकतेला काय वाण ! दुसरे असे कीं, खऱ्या धनोत्पादक धंद्यापेक्षा नुसत्या सराफीचा, दलालीचा, नाहीं तर सट्टयाचा धंदा, जसा आजकाल बेसुमार वाढला आहे, किंवा टेंभुरणीच्या पानापासून रत्नाच्या खाणींतील अशोधित मातीपर्यंत सर्वांचा बाजारभाव करण्यास राजसेवक जसे टपून बसले आहेत, त्याप्रमाणे सर्व लहानमोठ्या गोष्टींची नोंद व चिकित्सा करण्याकरितां नियतकालिकें आजकाल अगदीं तत्परतेने तयार आहेत. आपले खाद्य पृष्ठभागावर येतांच ते धरण्यासाठी चोंची सरसावलेल्या बगळ्यांच्या रांगांप्रमाणे नियतकालिकांतील लेखकांच्या पुढे सरसावलेल्या बुभुक्षित लेखण्यांच्या तोंडाला जणुं कांहीं अक्षयी पाणी सुटले आहे. अशा रीतीने गुणीजनांच्या निपजेपेक्षां परीक्षकाची भूक अनिवार वाढल्यामुळे कोड्याचा मांडा करूनही खाण्याच्या वेळा कधीं कधीं येतात. अशा वेळी गुणग्राहकता हे शब्द फोल ठरतात. ग्रंथप्रकाशक मॅक्मिलन कंपनीची गुणदृष्टि ती कसली ! द्रव्यदृष्टीच खरी. गीतांजलीची बंगालींत दुसरी आवृत्तीही निघाली नाही, तो त्या गीतांजलीच्या भाषांतराच्या परदेशांत आवृत्त्यांवर आवृत्त्या निघाव्या, ही एक सुधारलेल्या काळातील कुतूहलाची विचित्र वृत्तिच म्हणावी; अथवा हा केवळ सुधारलेला धंदेवाईकपणाच म्हणावा, दुसरे काय ? ह्या आमच्या लिहिण्यावरून जगत्प्रसिद्ध रवींद्रनाथांचा आम्ही भलताच अनादर करीत आहो असे कदाचित् कोणास वाटेल तर तसा आमचा मुळींच हेतु नाहीं. ते कविसम्राट् तर खरेच; पण 'नेपाळेश्वर भाललग्न चिखला कस्तूरिका मानिती !' हेच आश्चर्य होय ! कवींची प्रतिभा विद्युत्‌शलाकेसारखी स्पष्ट आहे. पण प्रश्न इतकाच की, जगांत शांततेची स्फूर्ति व्हावी, अशी त्यांत कोणती जादू आहे ? किंवा आपल्या महाराष्ट्रीय संतांच्या स्तोत्रांत अगर एखाद्या पद्यांत जी वेदान्ताची सुंदर मांडणी आढळते, तशी धर्मानुशासनाची सुसंगत प्रणालिका तरी त्यात कोठे आढळते ? साधूंचीच गोष्ट कशाला; पण मीराबाई, बहिणाबाई यांच्यासारख्या अशिक्षित स्त्रियांच्या पदसंग्रहांत गीतांजलीपेक्षां अर्थपूर्ण व सरस अशीं पद्यें कितीतरी सांपडतील ! इतकेंच काय, पण त्यांच्याहीपेक्षां अप्रसिद्ध कवींचीं अत्यंत प्रतिभासंपन्न व रहस्योद्ग्राही अशीं कविनें भणंगभिकाऱ्यांचे तोंडूनही फुकट ऐकण्यास मिळतात ! त्यास मॅक्मिलन कंपनीची तिजोरी शिलिंगांनीं भरावी

लागत नाही! हा अनुभव खास रवींद्रनाथांनाही आहे. व असल्या कित्येक गीतांत असलेली माधुरी आपणांसही अद्याप साधली नाहीं, असे खुद्द रवींद्रनाथही कबूल करतील. तात्पर्य, रवींद्रनाथ यांचा कवि म्हणून दर्जा जरी फार मोठा असला, नव्हे आहे; तरी त्यास आज सुशिक्षित जगानें देऊं केलेल्या अद्वितीय अशा पुढारीपणास, ते कारण पुरेंसे आहे, असे आम्हांस वाटत नाहीं. कवींच्या कल्पनाप्राचुर्यांत व्यवहारोपयोगिता असतेच असे नाहीं. तसेच पारमार्थिक सत्यही त्यात शुद्ध स्वरूपांत सांपडणे कठिणच. रात्रीच्या काळ्या फळ्यावर खद्योतांनीं इतस्ततः केलेले प्रकाशलेखन, मानवी व्यवहारास अथवा सत्यदर्शनास, जसे निरर्थक व निरुपयोगीच ठरते, त्याचप्रमाणे आज संकटाचे ढग आलेल्या दुर्दिनाच्या माध्यान्हकाळी कवींच्या प्रतिभेने विजेच्या चमकेप्रमाणे क्षणभर आश्चर्यचकित केले, तरी त्यांतून सत्यार्थसूर्यप्रकाशाचे शाश्वत कार्य होईल, असे नाहीं. किंवा सतांच्या अमोघवाणीच्या मेघवृष्टीप्रमाणे सर्वत्र शांतता लाभेल असेही नाहीं. एकदां 'निर्वीरं उर्वीतलम्' अशी भावना करून घेतल्यावर कल्पनेचे मनसोक्त फवारे सोडण्यास अडचण कोणती? मग ते आपणास न का समजेनात! आम्हांस तर हा काव्यसंपत्तीचा केवळ धूर असेच कधीं कधीं म्हणावेसे वाटते अशा अनाकलनीय धुराच्या लोटांतून गरीब तृषार्तांनीं सतांच्या मेघवृष्टीची आशा करणेंच फुकट आहे! किंवा जिज्ञासूंची तत्त्वदृष्टि यानें साफ होईल, असाही संभव दिसत नाही. काव्याकरितांच काव्य करणारे चपुकार किंवा कूटकार वेगळे; पण रवींद्रनाथांसारख्या प्रासादिक कवींनीं त्यांच्यावर वळलेल्या ईश्वरी-कृपामेघाची वृष्टि आम्हां गरीब अजाणांवर सोडण्याच्या आविर्भावांत दगडाहूनही कठिण अशा गारांचा पाऊस पाडावा, ह्यांत चातकाची तृषा शांत न होतां क्वचित् कोठे फलोन्मुख होणाऱ्या पिकांवरील फलाची मात्र नासाडी आहे, हे आम्हीं अनभिज्ञांनीं थोरांस काय सांगावें?

रवींद्रनाथांच्या आचारविचारांकडे सूक्ष्म निरीक्षण केले असतां तेथेंही असेच अनेक विलक्षण प्रकार आढळून येतात. नाटकीपणा व शब्दलाघव यांत केशवचंद्रांशीं त्यांचें बरेंच साम्य दिसतें. परंतु केशवचंद्रांतील वैराग्याची आवड रवींद्रनाथांत नाहीं, आणि रवींद्रनाथांचा देशाभिमान केशवचंद्रांत नाहीं. आजपर्यंतच्या शास्त्रीय शोधांस वेदांचा आधार देण्यांत

श्रद्धानंदांच्या आर्यसमाजींनीं जी ओढाताण केली आहे, तशीच ओढाताण आजच्या सुधारलेल्या आरामखुर्चीवरील सुलभ वेदान्ताला उपनिषदांचा आधार देण्यांत रवींद्रनाथांनींही केलेली दिसते. परंतु श्रद्धानंदांची वैदिक कर्मावरील निष्ठा रवींद्रनाथांत दिसत नाहीं. वेदार्थयत्नांत देश-कालाचा मोह पुष्कळ वेळां सत्यनिरपेक्ष व आत्मवचक होतो. असो. महात्मा गांधी रवींद्रनाथांच्या बरोबरीचे आहेत, असे कोणी म्हणतात; परंतु महात्माजींची यम-नियमाची कडक शिस्त रवींद्रनाथास कधींच मानवणे शक्य नाहीं. रवींद्रनाथ सृष्टिसौंदर्यावर लुब्ध झाले आहेत, तर महात्माजी सत्य-शोधनांत गढून गेलेले आहेत. एकांचा राजयोग असला, तर दुसऱ्यांचा कडक वैराग्ययोग आहे. महात्माजीचा सूत-चरखा व असहकारिता रवींद्रनाथांस मुळींच मान्य नाही. त्याना सूत-चरख्याचे दारिद्य नको आहे, मग खायला भाकर नसेल, तर खुशाल तूपसाखरेवर रहावे, असाच महाशयांचा आशय दिसतो ! ते सहकारितेचे मोठे भोक्ते आहेत. परंतु सहकारिता मागण्याकरितां त्यांचा हात इतका दूरवर पसरला आहे कीं, तो जर्मनी व जपान, इंग्लंड व अमेरिका, येथपर्यंत पोंचला असेल, तरी स्वदेशातील पुढाऱ्यांच्या हाती तो अद्याप क्वचितच लागला असेल ! लोकमान्यासारखे राष्ट्रबंधु, दासासारखे देशबंधु, मालवीयासारखे धर्मबंधु, श्रद्धानंदांसारखे व्यवसायबंधु किंवा महात्माजींसारखे दीनबंधु, इतकेच काय, पण शिवनाथशास्त्र्यासारखे संप्रदाय-बंधु, यांच्याशी सहकारितेने त्यांनी क्वचितच काम केले असेल. इतकेच नव्हे तर स्वदेशांतील धार्मिक, सामाजिक व राजकीय पुढाऱ्यांबद्दल रवींद्रनाथाचा अभिप्राय अनुकूल असेल, असेंही आम्हास वाटत नाही. ह्या पुढाऱ्यांपासून आमचें रक्षण व्हावें, असे मागण्याची आज जगास वेळ आली आहे, असेच ते एके ठिकाणीं म्हणतात. भूमीवरील पद्मा व आकाशस्थ गंगा यांमधील अंतरिक्ष ज्याप्रमाणे कविकल्पनेस शून्यवत् वाटून उपेक्षणीय व्हावे, त्याप्रमाणें रवींद्रनाथांच्या पायाशी लागलेले बंगाली स्वकीय व स्वातंत्र्याच्या यानांतून सहल करीत येणारे परदेशचे परकीय, ह्या दोन वर्गांपलीकडे बाकीचे जग त्यांस उपेक्षणीयच वाटत असावें असे दिसते. बंध, नियमन, मर्यादापालन ह्यांचें त्यांनीं ठिकठिकाणीं फार महत्त्व वर्णन केलेलें आहे; पण अमर्यादाच्या नादीं लागलेले ते स्वतां कोणत्याही नियमनाचे कट्टे

द्वेष्टे असावे असे दिसतें. रूढि, देशाचार, नित्यनैमित्तिक कर्मांचे शास्त्रनिर्बंध, जातिमर्यादा, हे तर राहोत; पण वाङ्मयसेवेच्या त्यांच्या अगदीं राखींव खात्यांतही त्यांची स्वैरवृत्तिच दिसून येते. ते जीं पद्ये करतील व राग गातील ते ऐकून त्यांस शास्त्रशुद्ध मानण्याकरिता त्याच्या भक्ताना छंद आणि संगीतशास्त्र यांत शिष्टांना असमत असे बरेच फेरफार करावे लागतील, असे वाटते. इंग्रज महाराज्ञीचा झगा सावरून धरण्याकरिता त्यांच्या परिचारिका जशा मागोमाग चालतात, त्याप्रमाणे ह्या कविसम्राटाच्या मागे पाउलें टाकीत वृत्तशास्त्र व संगीतशास्त्र ह्यांस नवीन पाऊलवाट पाडल्यावाचून गति नाहीं! त्याच्या नवीन पद्यांस जुने कोणतेच वृत्त लागले नाही, तर त्यास नूतन वंगाङ्लमिश्र वृत्तकार म्हणून वाखाणावे व त्याच्या गाण्यात कोणत्याही एका रागाचे 'सा री ग म' न जमले तर त्याच्या गाण्यास मिश्ररागदारी म्हणून त्याची वाहवा करावी, यावांचून गत्यंतर नाही. इतकेच काय, पण त्याच्या बंगाली गद्यातील शब्दयोजनाही तज्ज्ञानी गवंढळ व अप्रशस्त ठरविल्याचीं उदाहरणे उत्तरोत्तर अधिकच ऐकिवात येत आहेत. तसेच त्याचे दुसरं राखींव खाते म्हणजे त्यांचा खास ब्राह्मसंप्रदाय. त्याचेही निर्बंध ते पाळीत असतीलच, असे आम्हास वाटत नाही. उदाहरणार्थ, ब्राह्मपथ हा गुरुसंप्रदायाचा कट्टा विरोधी आहे. पण शांतिनिकेतनात खुद्द रवींद्रनाथ हेच उघड उघड गुरुदेव म्हणून मानले जात आहेत. आणि आबालवृद्धाकडून या गुरुदेवाचे वंदन पादसेवनाचे भक्तिप्रकार तेथे अष्टौप्रहर सुरूच आहेत, असे समजते. तात्पर्य, रवींद्रनाथांसारखे थोर पुरुष बोलतात काय, ते ऐकण्यांतच खरी मौज आहे. ते वागतात कसे ह्याची चिकित्सा करणे, म्हणजे आपल्या अधिकाराचा अतिक्रम होतो असेच मानलेलें बरे!

रवींद्रनाथ जसे श्रीमान् आहेत तसेच ते मोठे बुद्धिमान्ही आहेत. आणि जेथे लक्ष्मी व सरस्वती ह्या दोन देवींचा वास आहे, तेथे तिसरी शक्तिही आज नाही उद्यां कदाचित् विराजमान होईल. आणि अशा ह्या तीन आदिमाया एकत्र झाल्यावर शान्तिनिकेतनांत कोणते चमत्कार घडणे कठिण आहे! पण विशेषकरून धार्मिक चळवळ याच दृष्टीने रवींद्रनाथांच्या चळवळीकडे आम्हांस पहावयाचे आहे, व तसे पाहतां वर निर्दिष्ट केलेल्या अनेक धामांत हे शान्तिनिकेतन धाम विशेष भावनाप्रधान आहे, इतकेच

म्हणतां येईल. शान्तिनिकेतनांतील आश्रमवासी, कवींच्या काल्पनिक वातावरणांत अधातरीं तरंगण्यांत धन्यता मानीत आहेत, तर साबरमतीचे सत्याग्रही भूमातेच्या पदावरील रजःकणाप्रमाणे नम्र झाले आहेत. वर्णाश्रमधर्मावर श्रद्धा ठेवणारे महात्माजी अत्यजांच्या मेळ्यांत बसले आहेत, तर आजच्या वर्णाश्रमधर्माची हेटाळणी करणारे हे सुधारक कवि अस्पृश्यांपासून अति दूर असावेत असे वाटते! आधिभौतिक सुधारणांचे द्वेष्टे महात्माजी तिला तिलांजलि देण्यास सिद्ध आहेत; परतु कविसम्राटाच्या विरोधि-भक्तीने तिला उलट शाश्वतपद दिले आहे. इंद्रियविरागी महात्माजींनी आपल्या मनाचे मुडण केले आहे, तर ह्या कविवर्याच्या भोगप्रधान चंचल बुद्धीचे कुतलकलाप वारा येईल तसे नाचत आहेत. एक कर्मयोगी, सत्याच्या शोधात कष्टत आहेत, तर दुसरे भोगी सृष्टिदेवीची परोपरीने पूजा बांधण्यांत दंग झाले आहेत. साऱ्या जगांतील अर्धी संपत्ति लुबाडणाऱ्या एकट्या अमेरिकेतीलही शेकडा पचाण्णवांची संपत्ति राहिलेल्या अवघ्या पांचांजवळ एकवटली आहे! असे हे सुधारलेल्या जगातील वैषम्य पाहून, दीनदयाळ महात्माजींनी सत्याग्रहाचा असा दंडक घातला कीं, जीवनार्थ जरूरीहून अधिक संग्रह करणे म्हणजे इतरांची चोरी होय! महात्माजींच्या आस्तेय, अपरिग्रह ह्यांच्या विलक्षण व्याख्यांनीं साधकांचा संग्रह अत्यंत सपुष्टांत आणला आहे, तर संस्कृतीचे परम भोक्ते हे श्रीमान् कवि अतिरक्तता हीच सौंदर्याची खाण, म्हणून ध्येयरूप मानीत आहेत. 'स्थिरचर व्यापुनि अवघा तो जगदात्मा दशांगुळे उरला।' असे महाराष्ट्रकवि म्हणतात, तर हे बंगाली कवि त्या उलट असे म्हणतात कीं, 'ब्रह्माची अमर्याद अतिरिक्तता हीच सृष्टिरूपानें व्यक्तत्वास येत आहे'. 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वं' असे एका अर्थाने संस्कृत कवि म्हणतात, तर हे वंगकवि जगतांतील उत्कृष्ट गुणाना 'ब्रह्मोच्छिष्ट' म्हणतात. यासंबंधीं त्यांची विचारसरणी मोठी मनोरंजक आहे. ती अशीः—वेदाने यज्ञाचा हुतशिष्ट हाच दिव्य प्रसाद मानला आहे. मानवी प्राण्यात जीवन व मानसिक शक्ति यांचा गरजेपेक्षां जो अतिशय आहे, त्यामुळेच मनुष्य, केवळ जीवनास आवश्यक अशा निरनिराळ्या उद्योगांत व कलाकुशलतेत आनंद मानून एकेपरी ईश्वराचें अनुकरण करूं शकतो. केवळ जीवनव्यवहारापुरतीच देवाने माणसास वाचा दिली असती, तर गरजेपुरता तो बोलता व ओरडता; पण वाक्शक्तीच्या अतिशयामुळेंच त्यास मधुर गाण्याचा

आनंद भोगतां येतो. केवळ अस्तिभावांतच मर्यादित असलेली सृष्टि जडरूप असते, विशेष चैतन्याच्या अतिशयांतच आनंद-सौंदर्यादि जीवनाचें खरे ऐश्वर्य व्यक्त होते. आतां आनंदाच्या उद्रेकांतच विश्व संभवते हे जसे खरे; तसें ब्रह्माने आपल्या तपस्येच्या नियत्रणानेच अव्यक्त व्यक्तत्वास आणले हेही खरें आहे. अमर्याद अशा ब्रह्मातिरेकास व्यक्तत्वांत येतांना मर्यादेच्या व्याख्येत यावेंच लागते. अमर्याद जेव्हां समर्याद होते, तेव्हांच सत्यास खरेपण येते. उलटपक्षीं नकलेत अगर चित्रांत एकाद्या गुणाच्या उठावाचा जो अतिशय त्यांतच मूळचे सत्यदर्शन होते. तात्पर्य, ब्रह्माच्या व्यक्तिभवनांत स्वैर आनंदास तपस्येच्या बंधनाचीही जोड लागते. तेच ईश्वराचे स्वरूप होय. ईश्वर आपल्याच कायद्यांनीं आपण बांधला जातो, ह्या तात्त्विक विवेचनाचा धागा आणखी न लांबविता मुद्द्यास धरून थोडक्यात इतके म्हणतां येईल कीं, मनुष्यांनीं आपल्या गरजा वाढविण्यांत संस्कृतीचा परिपोष होतो, यास्तव रवींद्रनाथास गरजा संपुष्टात आणण्याचे दैन्य नजरे समोरही नको आहे. ज्यांचे सारे आयुष्य पुष्पातील मधुपाप्रमाणे निष्कंटक सुखांत गेले, त्यास 'नैराश्य.म् परमं सुखम्' हा सिद्धान्त पटावा तरी कसा ! रवींद्रनाथ निश्चल ब्रह्माचे उपासक नसून चंचल ब्रह्माचे उपासक आहेत. अविश्रांत कर्मासक्ति हे जीवाचे दैन्य आहे, असे कोणी मानतात. पण रवींद्रनाथाचे ब्रह्मच अत्यंत गतिमान आहे. त्याच्या आश्रमांत गेलेल्या तिऱ्हाइतास, आपण स्वप्नसृष्टींतून सत्यसृष्टींत व सत्यसृष्टींतून स्वप्नसृष्टींत एकसारख्या येरझाऱ्या घालीत आहोत, असा भास होतो, असें कोणी म्हणतात; व रवींद्रनाथाच्या व्यक्तिमाहात्म्याचे मोठे कौतुक करतात.

हिंदुस्थानातील आधुनिक तत्त्वज्ञांच्या अलीकडील एका सभेत अध्यक्ष ह्या नात्यानें रवींद्रनाथांनी आपले 'तत्त्वज्ञान' या विषयावर जे व्याख्यान दिले, तें त्यांनी विशेष विचारपूर्वक व आपल्या अध्यक्षपदाची जबाबदारी ओळखून दिले असले पाहिजे, हे उघड आहे. ह्या व्याख्यानात महाभारताची थोरवी किती अवर्णनीय आहे, हिंदी संत कवींनी समाजशिक्षणाचे कार्य कसे दृढमूल केले आहे, पूर्वपरंपरेनें पुनीत अशीं तीर्थे व शास्त्रे यांचे अगत्य काय आहे, भक्ति व तत्त्वज्ञान याचा मिलाफ हिंदी संस्कृतीत कसा साधला आहे, अशा ह्या उत्कृष्ट धर्मशीलाचे रक्षण करण्याकरिता सामाजिक व कौटुंबिक, शास्त्रीय कर्में व विधाने यांची योजना किती स्वाभाविक केली आहे, इत्यादि गोष्टींचें

जें संक्षेपानें दिग्दर्शन केले आहे, त्यापासून इतरापेक्षां ब्राह्मसांप्रदायिकांनींच पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. अशा रीतीचा थोडासा प्रास्ताविक ऊहापोह करून रवींद्रनाथ पुन्हा आपल्या वळणावर गेले आहेत. त्याचा आशय असा कीं, मुमुक्षूनें आतुर होणें, अथवा उतावळीनें विहगम-मार्गाचा अवलंब करू पाहणें व्यर्थ आहे. आत्मस्वातंत्र्यार्थ अशी घिसाडघाई कामाची नाहीं. मोक्षफलाच्या आसक्तीनें जवळचा मार्ग सापडणार नाहीं. वास्तविक मुक्तावस्था ही हळुहळू यथावकाश प्राप्त होणारी प्रगति आहे. ती निवृत्तिरूप नाहीं किंवा निषेधरूपही नाहीं. अन्योन्याश्रयातच स्वातंत्र्याचें बीज आहे. जगिक जबाबदाऱ्यातून निवृत्त झालेले मुनि हे धुरातच गुरफटून राहणाऱ्या स्फुल्लिंगाप्रमाणें पूर्ण विकास न पावलेले रानटी जीव होत. जीवाजीवातील सापेक्ष संबंध व सहकारिता यांच्या पूर्णतेंत आत्मस्वातंत्र्याचा इतिहास साठविला आहे. स्वार्थपारायणता ही स्वाभाविक सृजनप्रेरणेच्या विरोधी आहे. संग्रहाचा अतिलोभ, जीव आणि जग यांत बखेडा उत्पन्न करतो. उभयतांत सलोखा पाहिजे- मिलाफ पाहिजे. व्याकृत आणि अव्याकृत, ज्ञान आणि कर्म, सान्त आणि अनंत, विद्या ( देवताज्ञान नव्हे तर ब्रह्मविद्या ) व अविद्या ( कर्म नव्हे तर भौतिकशास्त्र ) या द्वंद्वाच्या साहचर्यांत, संमेलनांत सत्य आहे-स्वातंत्र्य आहे. ह्या सापेक्ष भावातच सारें कल्याण आहे. त्यातून मुक्तता शक्यच नाहीं. किंबहुना हा भाव सोडू पाहणें, म्हणजे पक्ष्यानें एकाच पंखानें उडू पाहण्यासारखें व्यर्थ कष्टप्रद आहे. हें हृत्पुंडरीक अनंतकाळ अधिकाधिक फुलतच जाणार, आणि त्यांतील प्रेमरसावर लुब्ध झालेले नरनारायण द्विरेफाप्रमाणें तसेंच तेथें सदैव प्रेमबद्ध होऊन राहणार, त्यांस मुक्तता कोठची ! असें हे त्यांनीं दिग्दर्शित केलेल्या विचारांचें स्वरूप आहे.

रवींद्रनाथांसारख्या प्रतिभासंपन्न तेजस्वी पुरुषाची केव्हांही व कोठेही अपूर्वाईच वाटणार. मग अशी असामान्य व्यक्ति आपल्या देशाच्या ह्या पडत्या काळांत आपल्याला लाभल्याबद्दल ईश्वराचे आपण धन्यवाद गावे तितके थोडेच आहेत. परंतु दारावरून चाललेली रथोत्सवाची मिरवणूक उपासकाच्या उपासनेंत जशी व्यत्यय आणते, त्याप्रमाणें ह्या बड्या पुरुषाचें चारित्र्य पूर्वीपासून चालत आलेल्या शास्त्रशुद्ध परंपरेचा विघात करतें, याबद्दल सावध राहणें जरूर आहे. रवींद्रांच्या बुद्धीचा ऐरावत गरीब भाविकांच्या लहानशा

पर्णकुटींत शिरला तर त्यांत त्यांच्या भाग्योदयापेक्षां ( संशयात्मा विनश्यति ) असाच संभव अधिक !

त्यांची वरील विचारसरणी जरी भव्य व मोहक दिसत असली, तरी ती येथील पूर्वपरंपरेतील तत्त्वज्ञासही कितपत पटली असेल, याची शंकाच आहे. शिवाय असें की, ज्यानीं कृत्तिवासाचें रामायण बालपणापासून ऐकले, त्यांनीं प्रभुरामचंद्रास विध्याद्रींतील एकादा रॉकफेल्लर बनवावें ! हे आश्चर्य नव्हे काय ? " जे झालेंचि नाहीं, त्याची वार्ता पुससी काई ! " असें म्हणण्यापर्यंत ज्यांची तत्त्वदृष्टि गेली होती, त्या श्रीसमर्थ रामदासांनी रामायण लिहितांना त्याच्या ऐतिहासिक सत्याला धक्का लाविला नाही. अखेरचा अमृतानुभव सांगणारे व ऐकणारे ज्ञानदेव, निवृत्तिनाथ हे बालगोपालाच्या कथा निश्चितबुद्धीनें सांगण्यात मनसोक्त रंगले. तेव्हां व्यास वाल्मीकांपासून कृत्तिवास–तुळसीदासांपर्यंत; व वशिष्ठ-वामदेवांपासून ज्ञानदेवांपर्यंत सारे तत्त्वज्ञ व सारे पौराणिक कवि मूर्ख असें आतां विसाव्या शतकांतील एका ब्राह्मकवीच्या दिव्य दर्शनावरून ठरविणे फारच धाडसाचें होणार नाहीं काय ? तुलसीदास व रामदास ह्यांना श्रीरामाचें साक्षात् दर्शन झालें असतां, त्याचे सांप्रदायी प्रभुरामचंद्रास लिप्टनसारख्या एकाद्या दीर्घोद्योगी प्लँटरच्या पंक्तीस आणून बसवतील काय ? रवींद्रनाथाच्या गुरुस्थानी असलेले कबीरसाहेब " सो राम कुछ और है " असें म्हणाले असतील; पण म्हणजे कबीरसाहेबांचा राम कांहीं रवींद्रनाथाच्या रामाप्रमाणें एकाद्या शेतकीखात्याचा उत्पादक नव्हे, हे खास आहे. वैद्यकातील स्त्रीरोगचिकित्साप्रकरण अथवा वेदान्तातील वैराग्यप्रकरण, यांत केलेलें स्त्रीशरीरवर्णन जरी सत्यास धरून असलें, तरी ते इतकें अमंगल असतें कीं, व्यवहारांत त्याचा उच्चार करणेंही योग्य होणार नाहीं. त्याप्रमाणें रवींद्रनाथानी केलेली श्रीराम-कृष्णाच्या चरित्राची विचिकित्सा सत्यास धरून आहे, असें मानलें, तरी तीही इतकी रूक्ष व निरुपयोगी आहे कीं, त्या रहस्याची पुराणकारांनीं आपल्या कविकल्पनेत हानि केली, अशी ह्या सौंदर्यप्रेमी कविसम्राटानी तक्रार करणें फारच विलक्षण वाटतें. रामलीलेचें नाटक का म्हणाना, पण तें कवि वाल्मीकींनीं जे रंगविलें, व ज्याचें श्रवण-मनन करून आजपर्यंत अगणित साधक कृतार्थ झाले, त्या नाटकांत आपण न रंगतां व दुसऱ्यासही न रंगवितां, रामाच्या व हनुमाना-

ऱ्या भूमिका घेणाऱ्या नटांची खाजगी वंशावळ चाळीत बसणाऱ्या एकाद्या पढतमूर्खाप्रमाणें, ही ह्या महाकवीची चिकित्सक वृत्ति हास्यास्पदच ठरते.

भारतकार श्रीव्यास ह्यांची पौराणिक कथानके ज्यांस अत्यंत असत्य व अप्रयोजक वाटतात, तेच रवींद्रनाथ दुसऱ्या एका व्याख्यानात महाभारताची थोरवी गातात, ह्या विसंगतीचा उलगडा आम्हांस होत नाहीं. तसेच दुसरे एक उदाहरण घ्यावयाचे, तर कोणी उत्क्रान्तिवादी परशुराम हा इतिहास पूर्व-कालाच्या रानटी अवस्थेतून माणुसकीत आलेला एक पुरुष असे मानतात, दुसरे त्यास ब्रह्मक्षत्रवादाची मूर्ति कल्पितात, तर तिसरे 'विश्वभारती' त्यास इसवी सनाच्या दुसऱ्या शतकाच्याही अलीकडे आणून सोडतात! आणि महाराष्ट्राचे आध्यात्मिक व राजकीय गुरु श्रीरामदास हे ह्या आपल्या जामदग्न्य बंधूंस चिरंजीव मानून, सतराव्या शतकात, पोर्तुगीजानी कोंकणास जांच केल्याबद्दल, त्यांस प्रेमाचा जाब विचारतात. तेव्हा ह्या साऱ्या कल्पनां-तून, आम्हीं आपली चिकित्साबुद्धि सोडूनही, श्रीसमर्थांचीच करुणावाणी खरी मानली, तर त्यात आमचे व सर्वांचे अधिक हित आहे, असे आम्हांस वाटते.

तात्पर्य, व्यास-वाल्मिकानी पौराणिक कथानकांतील रहस्यगोपन केले व पुराणास निंद्य व विकृत स्वरूप दिले, आणि शंकराचार्योनी तर ईशोपनिषदां-तील मंत्रही फिरवून टाकले, आणि भलताच वेदार्थ केला. अशा रीतीने सारे सत्यद्रोही व मूर्ख ठरले. परशुराम हा त्रेतायुगांतील सहस्रार्जुनाचा समकालीन नसून शालिवाहनाचा समकालीन ठरूं लागला! राम दक्षिणेतील शेतकरी ठरले, आणि श्रीकृष्ण फक्त गीतेपुरतेच कसेबसे उरले! अशी भारतीय संस्कृतीची विटंबना करणे, हेंच विश्वभारतीचे अवतारचारित्र्य असेल, तर ह्या बुद्धिमंत कल्पकांस उगे बसण्यास काय घ्याल, असेच विचारण्याची भाविक हिंदी जनतेस वेळ येईल. थोराचा विद्याविनोदही निदान अर्धवटाचा, बुद्धिभेद करण्यास पुरेसा होतो. आणि या अर्धवटांत केवळ अशिक्षितच नव्हे तर कित्येक सुशिक्षितांचाही समावेश करणे गैर होणार नाहीं. यास्तव ह्या चिकित्सक बुद्धीचा गौरव न करतां स्पष्ट शब्दात निषेधच करणे, आम्हास जरूर झाले आहे. कालभेदामुळे व प्राचीन वाङ्मयाचा लोप झाल्यामुळे, पुराणांतील कांहीं व्यक्तींची व प्रसंगांची संगति लागावी, तशी आज लागत नाहीं हें खरे; पण समूलश्च विनश्यति ही कांहीं संगति नव्हे. त्यापेक्षां आपलें अज्ञान कबूल

केलेलें फार बरें, असें आम्हांस वाटतें. हरीचीं सगुण व पवित्र चरित्रे हींच आमच्या धार्मिक जीवनास आधार आहेत. यास्तव लोकहित-बुद्धीची जबाबदारी कळते, अशांनी त्यास धक्का लावण्यापूर्वी फारच विचार केला पाहिजे. कारण ज्यांच्या पायाच्या धुळीची आपल्याला योग्यता नाहीं, अशा थोर पूर्वाचार्यांनी व ब्रह्मानुभवी संतांनीं परमात्म्याच्या ह्या सुंदर बांधलेल्या पूजेस धक्का लावण्याचे धाडस सहसा केलेले नाहीं.

केशवचंद्राची भक्तिभावना आदि-ब्राह्मांत नाहीं, हेच त्या समाजाच्या अपकर्षाचे प्रमुख कारण असे कोणी मानतात. देवेंद्रनाथ, राजनारायण, रवींद्रनाथ याच्यांत भक्तिभाव नाहीच, असे आम्हांस म्हणवत नाहीं; पण सामान्य हिंदुजनतेचा भक्तिभाव रामकृष्णादिकाच्या चरित्राच्या सत्यतेवरच उभारलेला असतो. अर्थात् तो आधार काढून घेण्यांत, त्याचा अधःपात होईल हे उघड आहे. असो. ह्याप्रमाणे पौराणिक कथांच्या ऐतिहासिक सत्याला पूर्णपणे हरताळ फांसल्यामुळे वैष्णव काय व शैव काय, साऱ्याच सगुणभक्ताच्या मनांतून रवींद्रनाथांच्याबद्दल आदर राहणे शक्य नाही. आता पुराणाहून अधिक गंभीर अशा उपनिषदांचा अर्थ लावतानाही त्यांनी तत्त्वज्ञांची अथवा शास्त्रज्ञांची दृष्टि ठेविली नाहीं, आणि पूर्वपरंपरेस त्यानीं विचारलेले नाही. हे वर दिलेल्या त्यांच्या विचारांच्या गोषवाऱ्यावरून सुज्ञ वाचकाच्या सहजच ध्यानीं येईल. त्यांचे म्हणणे असे दिसते कीं, श्रुति-सिद्धान्ताचा अर्थनिधि अगाध आहे, तरी प्रत्येक व्यक्तीने आपल्या ओंजळीत येईल तेच खरे व पुरे असे मानून आपली तृष्णा भागवावी हेच योग्य आहे. दुसरे त्यांचे म्हणणे असे की, देशकाल व व्यक्ति यांस योग्य तो अर्थ देण्यास जर ह्या श्रुतिमाता सिद्ध नसतील तर त्या प्राचीन श्रुति मिठात खारलेल्या पूर्वजाच्या प्रेताप्रमाणे निरर्थकच ठरतील. तात्पर्य, प्रत्येकाने आपण केलेल्या श्रुत्यर्थाचा पडताळा आपल्या मनाशीच आहे की नाहीं तो पहावा, असे त्याचे म्हणणे दिसते. देशकाल व व्यक्ति यांच्या मानाने श्रुतीचे अर्थ वाटतील तेवढे निघतील, व ते सर्व खरेही असतील, हा त्यांचा सिद्धान्त आम्हांला अपूर्वच वाटतो. पण तो खरा मानला तरी त्याप्रमाणे उपनिषद्वाक्यांवर रवींद्रनाथांनीं आपल्या अनुभवाच्या अपेक्षेप्रमाणे दिलेलीं व्याख्याने इतरांस निर्णायक न होतां, क्वचित् बुद्धिभेद करणारींही होतील, असें ओघानेंच प्राप्त होते.

रवींद्रनाथ हे एक अंतर्ज्ञानी असे संत कवि आहेत, असे सांगण्यांत येतें. ते भक्त आहेत यांत शंका नाही; पण त्यांच्या भक्तीला निसर्गाचे सौंदर्य मानवते तसे हरीचें परम पवित्र असे सगुणचरित्र भावत नाही. आणि त्या-वरच तर सामान्यत्वे हिंदु जीवनाचा आधार आहे. तसेच भावनाप्रधान जीव निसर्गाचा भक्त बनेल, व निसर्गप्रेमाच्या अतिरेकांत घडीभर बेहोषही होऊन जाईल. पण ती काही अंतर्ज्ञान्याची समाधि अवस्था खचित नव्हे. भक्तीला वैराग्याचे बळ असल्यावाचून अतर्ज्ञान संभवेल काय ? अमृतत्व त्यागावांचून लाभेल काय? मग हरीची सगुणभक्ति व वैराग्य ह्या दोहोंचेही जेथे निदान आचारांत वावडे आहे, त्या शान्तिनिकेतनांतील अधिकारी, अपरोक्षानुभूति ही काय चीज अगर अवस्था मानतात ती तेच जाणोत! पण सनातनधर्मी हिंदु-जनतेची तेथे निष्ठा बसणे दुरापास्त आहे. असो; अशा रीतीने वेद, पुराणे, सदाचार इत्यादि कोणत्याही ठळक बाबतीत हे ब्राह्माश्रमींचे गुरुदेव हिंदुजनतेला निर्णायक उपदेष्टे म्हणून मानता येतील असे वाटत नाही. आतां राहतां राहिले त्यांचे संस्कृति-समेलनाचे महत्कार्य. तेही पूर्णतया सिद्धीस जाणे आम्हांस हल्ली तरी कठिणच दिसते. कारण, राष्ट्राभिमानाचे बंधारे उडवूं पाहणारे रवींद्रनाथ मायभूमीचे कट्टे अभिमानी आहेत. त्याच्याइतके जहाल पुरुष ब्राह्मसमाजांत क्वचितच झाले असतील, ही गोष्ट संस्कृतिसंमेलनासाठीं येणाऱ्या पाश्चात्य पंडितासही कळून चुकली आहे. रवींद्रनाथाच्या ब्राह्म-पूर्वजात विदेशी वाङ्मयाबद्दल सक्रिय आदर थोडाफार तरी दिसतो. फार काय पण महर्षि देवेंद्रनाथ व राजनारायण बोस ह्यासही कॅट, ह्यूम, कझन्स, नाहीतर हाफीझ, इत्यादि विदेशीय पंडितांचे चेले म्हटले, तरी शोभेल. पण रवींद्रनाथांच्या गुरुस्थानीं, उपनिषदे व चैतन्य, कबीर, विद्यापति, चंडिदास इत्यादि पूर्व-हिंदुस्थानातील कवींचीं काव्ये हीच येतील. त्यांच्या कोणत्याही व्याख्यानांत अगर लेखात इतर लेखकांचे अवतरण बहुधा आढळणार नाहीं. ही गोष्टही सहज लक्षांत येण्यासारखी आहे. तात्पर्य स्वकीय सस्कृतीबद्दल आस्था, व त्या मानाने परकीय, किंबहुना परप्रांतीय, संस्कृतीबद्दल व सुधारणांबद्दल अनास्था, व स्वैरवृत्तीची आवड ह्या गोष्टी इतक्या ठळक रीतीने दिसण्यासारख्या आहेत, कीं फ्रान्समधील सिल्व्हन लेव्हीच काय, पण आपल्याकडील हिंदु विद्या-पीठाचे मालवीय, राजेंद्रकॉलेजचे कामाख्यनाथ मित्र, गुरुकुलाचे प्रो॰रामदेव,

रामकृष्ण मिशनचे स्वामी शर्वानंद, टिळक विद्यापीठाचे डॉ० कुर्तकोटी अथवा धर्मोज्जीवनी सभेचे श्री० संतोजीराव इत्यादि विद्वान् त्यांच्याशी हस्तांदोलन करण्यास कितपत तयार होतील, ही शंकाच आहे. आज विश्वभारती ह्या मासिकाचे अंक मोठमोठ्या शहरींही शोधू गेले तरी मिळत नाहीत, हे एक प्रतिसहकारी लोकमताचे गमकच आहे. तथापि ते कांहीं असले, तरी विश्व-भारतीचे त्यानीं आरंभिलेले कार्य फारच मोठें आहे, व ते पार पाडण्याची धमक व आस्था त्यांच्याइतकी हिंदुस्थानात दुसऱ्या कोणात नाहीं, ही गोष्टही अगदी खरी आहे. शिवाय आज जरी प्राच्यविद्याविशारदाच्या विशाल-बुद्धीचे हे बौद्धमंदिरच तयार होत असलें, तरी ह्या सरस्वतीमदिरात पुढे-मागे केव्हातरी गणपतीचेही आगमन होणार नाहीं, हे तरी काय सांगावे! कारण बौद्धमंदिराची पुढे देवालये झाल्याचे दाखले भारतवर्षाच्या इतिहासात अनेक आहेत. आणि तसे न झाले, तरी केवळ सरस्वतीमंदिरही दर्शनीय नाही असे कोण म्हणेल? तेव्हां रवीद्रनाथानी अंगीकारलेल्या विश्व-भारतीच्या ह्या महत्कार्यात ईश्वराने त्यास पूर्ण यश द्यावे, अशीच सर्वांनी मनोभावाने इच्छा करणे स्वाभाविक आणि जरूर आहे. आणि खरोखर आदि-ब्राह्मसमाजाचे हेच एक उत्कृष्ट स्मारक होणार आहे. आम्ही जी वर टीका केली आहे, ती बहुतांशी सनातनधर्मीयाच्या दृष्टीनेच केली आहे. अर्थात् शान्तिनिकेतन ही संस्था आदि-ब्राह्माच्या धार्मिक चळवळीचे एक प्रधान अंग आहे, असेच त्यांत मानले आहे. तसे न मानता वाङ्मय व ललितकला यांचे संशोधन व शिक्षण इतकेच ह्या संस्थेचे ध्येय मानल्यास, आम्हास ह्या ग्रंथात त्यासंबंधी अधिक लिहिण्याचे काहीच प्रयोजन राहणार नाही.



# दुसऱ्या भागाची कालानुक्रमणिका

इ० सन

१८१७ देवेंद्रनाथांचा जन्म.

१८२८ ब्राह्मसमाजस्थापना.

१८३१ देवेंद्रनाथ राममोहनांच्या शाळेतून कॉलेजांत जातात.

१८३३ राजा राममोहन यांचा मृत्यु.

१८३५ देवेंद्रनाथाच्या आजीचा मृत्यु.

१८३८ देवेंद्रनाथांस ईशोपनिषदांतील संदेश. केशवचंद्रांचा जन्म.

१८३९ देवेंद्रनाथ तत्त्वबोधिनी सभेची स्थापना करतात.

१८४१ तत्त्वबोधिनी सभेचा वार्षिक महोत्सव.

१८४२ देवेंद्रनाथ ब्राह्मसमाजात सामील होतात.

१८४३ तत्त्वबोधिनी पत्रिका सुरू होते. नवीन ब्राह्मदीक्षा.

१८४४ तत्त्वबोधिनी पाठशाळास्थापना.

१८४५ पाचशे सभासद ब्राह्मसमाजांत दाखल होतात. नवीन ब्राह्मप्रार्थना.

१८४५ डफसाहेबांकडून लहान विद्यार्थ्यांस बाप्तिस्मा. खिस्ती मिशनऱ्यांविरुद्ध हिंदुधर्माचा पुरस्कार. राजनारायण बोस ब्राह्मसमाजांत दाखल होतात. वेदाध्ययनास चार विद्यार्थी काशीस पाठवितात.

१८४६ द्वारकानाथांचा मृत्यु.

१८४७ देवेंद्रनाथाचा विश्वजित-यज्ञ. ऋग्वेदाच्या भाषांतरास आरंभ.

१८४८ देवेंद्रनाथ ब्राह्मधर्म सांगतात.

१८५० ब्राह्ममतांतील क्रांति.

१८५६ देवेंद्रनाथांस हिमालयांत ईशसंदेश मिळतो. केशवचंद्रांचा विवाह. त्यांचा परीक्षेतून बहिष्कार.

१८५७ केशवचंद्र ब्राह्मसमाजांत दाखल होतात. गुडविल फ्रॅटरनिटी.

१८५९ देवेंद्रनाथ व केशवचंद्र यांची सीलोनची सफर. ब्राह्मशाळा स्थापना.

१८६० केशवचंद्रांचीं लहान धार्मिक चोपडीं प्रसिद्ध होतात. संगतसभेची स्थापना. पाहिले नगरकीर्तन.

१८६१ देवेंद्रनाथांची मुलगी सुकुमारीचा ब्राह्मपद्धतीने विवाह. ब्राह्मधर्मानुष्ठान प्रसिद्ध होते. ता. ६ मे रवींद्रनाथांचा जन्म.

१८६२ केशवचंद्र सहकुटुंब देवेंद्रांकडे येतात. केशवचंद्रांस आचार्यपदप्राप्ति.

१८६३ केशवचंद्रांनी लाविलेला पहिलाच ब्राह्म मिश्रविवाह. उपासनासमाज स्वतंत्र स्थापन होतो. ब्राह्मधर्माप्रमाणे केशवचद्राचे पहिलेच जातकर्म. एकेश्वरी मित्रसमाजाची स्थापना. पिराअली ब्राह्मणकुटुंबाची विजयकृष्णाने केलेली शुद्धि.

१८६४ केशवचंद्र सेन मुबई मद्रासकडे ब्राह्मधर्मप्रसारार्थ जातात. ब्राह्माचा दुसरा मिश्रविवाह. आचार्यांच्या ठिकाणी यज्ञोपवीतत्यक्तांची उपाचार्य म्हणून नेमणूक. नव्या मडळींची ब्राह्मप्रतिनिधिसभा. मोठे वादळ.

१८६६ आदि ब्राह्मसमाजांतून केशवचंद्र फुटून बाहेर पडतात. अर्ध खिस्तीपद्धतीने आणखी एक मिश्रविवाह. ता. ११ नोव्हेंबर रोजीं भारतवर्षीय ब्राह्मसमाज स्थापन होतो.

१८६८।६९ भारतवर्षीय ब्राह्मसमाजमंदिर.

१८७२ लग्न रजिस्टर करण्याचा कायदा.

१८७७ रवींद्रनाथांची इंग्लंडची पहिली सफर.

१८८१ केशवचद्रांचे नवविधान प्रगट होते.

१८८७ शान्तिनिकेतनचा ट्रस्ट.

१८९९ राजनारायण बोस ह्यांचा मृत्यु.

१९०१ शान्तिनिकेतन आश्रमस्थापना.

१९०५ ता. १९ जानेवारी–देवेंद्रनाथांचा मृत्यु. रवींद्रनाथांचें खेया काव्य.

१९०६ बंगालची फाळणी–रवींद्रांचे राजकारण.

१९०९ रवींद्रनाथांची बंगाली गीताञ्जलि.

१९१२ रवींद्रनाथांची युरोपची सफर.

१९१३ गीताञ्जलीस नोबेल प्राईज मिळते.

१९२१ विश्वभारतीची स्थापना.

---

# दुसऱ्या भागाच्या आधारग्रंथांची यादी

१ देवेंद्रनाथ ठाकूर:—आत्मचरित्र, लेख व प्रार्थना.
२ केशवचंद्र सेन:—व्याख्यानें.
३ प्रतापचद्र सेन:—केशवचंद्राचे चरित्र.
४ शिवनाथशास्त्री—ब्राह्मसमाजाचा इतिहास. मीं पाहिलेले पुरुष.
५ हेमचंद्र सरकार:—ब्राह्मसमाजाचा धर्म.
६ रवींद्रनाथ ठाकूर:—क्रिएटिव्ह युनिटी. नॅशनॅलिझम्. साधना, गीताञ्जलि ( मराठी ), शांतिनिकेतनमाला ( मराठी ), विश्वभारती, मॉडर्न रिव्ह्यू यांतील लेख इत्यादि.
७ फर्कुहार—आधुनिक धार्मिक चळवळी.
८ लिओनार्ड:—ब्राह्मसमाजाचा इतिहास.
९ सर व्यंकटरत्न:—व्याख्याने.
१० प्रि० कामाख्यनाथ मित्र:—नैराश्यवाद.
११ जी. ए. नटेसन:—देवेंद्रनाथ, रवींद्रनाथ, ईश्वरचंद्र विद्यासागर, शशिपाद बानर्जी, प्रतापचंद्र मुझुमदार, यांचीं चरित्रे.
१२ सत्येंद्रनाथ ठाकूर:—धर्मवासना.
१३ प्रो० राधाकृष्ण:—रवींद्रनाथांचे तत्त्वज्ञान.
१४ थॉमसन:—रवींद्रनाथांचे चरित्र.
१५ रामचंद्र गोविंद कानडे:—रवींद्रनाथांचे चरित्र.
१६ न्या० चंदावरकर:—व्याख्याने.
१७ वामन आबाजी मोडक:—लेखसंग्रह.
१८ अष्टेकर मंडळी:—सार्थ उपनिषदे.
१९ वे० शा० स० विष्णुशास्त्री बापट:—सभाष्य उपनिषदें.
२० राजनारायण बोस:—प्रेमधर्म व इतर निबंध आणि व्याख्यानें.
मनुस्मृति, प्रबुद्ध-भारत, यंग इंडिआ, मॉडर्न रिव्ह्यू इत्यादि.

॥ श्री ॥

# नवयुगधर्म

## खंड पहिला—भाग तिसरा

---

# केशवचंद्र सेन

किंवा

# भारतवर्षीय ब्राह्मसमाज

---



जन्म–इ. सन १८३८] ब्रह्मानंद केशवचंद्र सेन. [मृत्यु–इ. सन १८८४

## प्रकरण पहिलें

# भारतवर्षीय ब्राह्मसमाज

मागील भागांत लिहिल्याप्रमाणें तारीख ११ नोव्हेंबर सन १८६६ रोजीं भारत-वर्षीय ब्राह्मसमाज ही स्वतंत्र संस्था केशवचंद्रप्रभृति नवीन मंडळींनी स्थापन केली; आणि देवेंद्रनाथ प्रभृति वडील मडळीच्या सासुरवासांतून ही नूतन मंडळी एकदांची बाहेर पडली. मग काय, हौसेने नवीन संसाराची जमवा-जमव व मांडामाड करण्यास लगेच सुरुवात झाली. प्रौढ व सुग्रण सूनबाईच्या टापटिपीप्रमाणे ह्या तरुण विद्वानांच्या वसुधैव कुटुंबाचा संसार मोठ्या अकलेने सजूं लागला.

सुविशालमिदं विश्वं पवित्रं ब्रह्ममन्दिरम् ।
चेतः सुनिर्म्मलंतीर्थं सत्य शास्त्रमनश्वरम् ॥
विश्वासो धर्म्ममूलं हि प्रीतिः परमसाधनम् ।
स्वार्थ नाशन्तु वैराग्यं ब्राह्मैरेव प्रकीर्त्तते ॥ १ ॥

**भावार्थः**—"हे विशाल विश्व हेच ईश्वराचे मंदिर, शुद्धचित्त हेच पुण्यक्षेत्र, सत्य हेच शाश्वत धर्मशास्त्र, श्रद्धा हेच धर्ममूल, प्रेम हीच श्रेष्ठ अध्यात्मसंस्कृति व स्वार्थत्याग हेच वैराग्य" अशी नवदीक्षित गौरगोविंदराय यानी रचलेली बिरुदावली त्याच्या द्वारीं झळकूं लागली! बायबल, कुराण, झेंदावेस्ता, चिनी व हिंदुलोकांचे ग्रंथ, यांतील सुभाषितांच्या श्लोकसंग्रहाचे सदर उपाध्यायांनीं गुंफलेले लेणे ज्याच्या त्याच्या हातीं पविश्रकाप्रमाणे शोभूं लागले. व्यक्ति-स्वातंत्र्याच्या यज्ञास आरभ झाला. ठिकठिकाणच्या ब्राह्मसमाजांस संघटने-साठीं निमत्रणें गेलीं. ब्राह्मसमाजाचा अनियंत्रित कारभार आम्ही आतां सुसंघटित करूं. ब्राह्मसमाजाची सारी मिळकत आदि-ब्राह्मसमाजाचे ट्रस्टींनीं आपल्या ताब्यांत घेतली; परंतु यापुढें अशी अरेरावी चालणार नाही. तर लोकांच्या वर्गणीनें जमा झालेला निधि, त्यांच्या मतानेच वापरला जाईल. त्याचप्रमाणें प्रागतिक ब्राह्मांचें अध्यक्षपद इतःपर कोणाही मनुष्याकडे न

राहतां जगदीश्वर हाच त्यांचा अध्यक्ष मानला जाईल. अशा प्रकारें केशवचंद्रांनीं आपल्या कार्याचा प्रस्तावही केला. ठिकठिकाणचे अनेक उत्साही व स्वार्थत्यागी तरुण त्यांस येऊन मिळूं लागले, आणि अशा पर्वणीच्या वेळीं मिस् मेरी कार्पेंटर नामक एक सुप्रसिद्ध आंग्लविदुषीही कलकत्त्यास येऊन दाखल झाल्या.

त्या बंगाली तरुणांनीं मुख्यत्वेकरून स्त्रीस्वातंत्र्याकरिता आरंभिलेल्या या महत्कार्यांत, कार्पेंटरबाईंचे आगमन म्हणजे एक मोठाच शकुन झाला. बंगाली ब्राह्मीका तरुणींनीं बाईचे मोठे गौरवपूर्वक स्वागत केले. त्याच्या सन्मानार्थ कोणा एका एस्. गुडीव्ह नामक डॉक्टरकडे रात्रीचा बंगाली तरुण दांपत्य सहभोजनाचा अपूर्व समारंभ झाला. केशवचंद्राच्या घरी हिंदु व खिस्ती अशा मिश्र स्त्री-पुरुषाच्या समाजापुढें खिस्तीप्रार्थना झाली ! इतक्यांत नाताळ येऊन ठेपला. मग काय विचारतां ! केशवचंद्रांच्या घरीं कार्पेंटरबाईनी केलेल्या खिस्ती प्रार्थनेस बंगाली तरुण दंपत्यांची गर्दी उडाली. बंगाली तरुणानीं आपल्या पडद्यातील लहान लहान बायकाची खिस्ती रिवाजाप्रमाणे आपल्या स्नेही मंडळींशीं ओळख करून दिली. तो स्त्री-स्वातंत्र्याचा आनंद गगनांत मावेना. मोठमोठ्या जुन्या खानदानींतील जमीनदारांच्या घरचे तरुण, आपल्या बायकांस उघड उघड बाहेर आपल्याबरोबर घेऊन, इंग्रजी अंमलदाराकडे मेजवानीस जाऊं लागले. स्त्रियांचा गोशा तर गेलाच; पण त्याबरोबर अर्धखिस्ती पोषाखही आला. नवीन रिवाजांत जुना पेहराव त्यास कसासाच वाटूं लागला ! इंग्रज मित्रास काय गोड वाटेल, ह्याची त्यांनीं विशेष काळजी घेतली, पण गावकुटाळ व वात्रट पोरे यांचा उपहास मात्र बंगाली तरुणींनी जागा केला. असो.

ह्याप्रमाणें बाह्यांगाच्या शृंगाराप्रमाणे अंतरंगांतील संस्कृतींतही क्रान्ति घडवून आणण्यासाठीं प्रौढ विवाहित स्त्रियांसही खाजगी शिकवण्या सुरू झाल्या. अशा ह्या सुधारलेल्या संसारांतील लग्नकारणेही, हिंदुविधि सर्वस्वी गाळून, खिस्तीलोकांप्रमाणे करारमदाराने होऊं लागलीं. धर्मोन्नतीकरितां बायबलाचे अध्ययन, व सत्संगतीकरितां खिस्ती मिशनऱ्यांशीं विशेष संघटन ब्राह्मभारतांनीं सुरू केलें. जीझस ख्राइस्टच्या गुणांनी त्यांची अंतःकरणे पूर्णपणें व्याप्त केलीं. मात्र त्यांचा ख्राइस्ट ऐतिहासिक नसून, ऐतिहासिक मानलेल्या ख्राइस्टांतील केवळ कल्याणगुणमयमात्र होता.

अर्थात् ह्या सूक्ष्म शाब्दिक भेद उपासनेत संभाळणें त्यांस बहुतांशीं अशक्यच झाल्यामुळे, परिणामीं ऐतिहासिक खाइस्टशींच त्यांचें विलक्षण सख्यत्व जडले. त्यामुळें साहजिकच हिंदी सणाऐवजीं नाताळसारखे खिस्ती सण ते अगदीं मनोभावे पाळूं लागले; व खिस्तावरच मुद्दाम रचलेलीं नवीन नवीन गीते व स्तोत्रे मोठ्या भक्तिभावाने म्हणण्यात येऊं लागलीं. तात्पर्य, प्रत्यक्ष धर्मांतर न करितां आचारविचारांत खिस्तीलोकांचे जेवढे अनुकरण करणे शक्य होतें, तेवढे मोठ्या उत्साहाने व अहमहमिकेने नवीन ब्राह्मसमाजांत सुरू झाले.

अशा रीतीने खिस्तमय झालेल्या त्या बंगाली तरुणांच्या भावनाप्रधान मनांनीं दोन प्रमुख अशा खिस्ती प्रचारांचा अंगीकार केला, एक पापाची भावना व दुसरी प्रार्थना. आपण पापी आहों व त्यासाठीं आपण ईश्वराची प्रार्थना केली पाहिजे. ह्या विचारांनी त्यांना इतके उदास केले की, रस्त्यात, सभेत, अथवा विद्यालयांत एखादा तरुण, त्याच्या उदास व विचारक्रांत अशा चेहऱ्यावरून, हा ब्राह्म आहे, असे सहज ओळखूं येई. ह्या औदासीन्याबरोबर थोडी विरक्तीची छटाही साहजिकच आली. सुखलालसेवरून त्याचे मन उडाले. गरिबीच बरी, असे त्यांस वाटूं लागले. उद्याची काळजी करू नकोस, ही खिस्ताची आज्ञा त्यांनीं शिरसावंद्य मानली, व लोकांकडून होणारा छळ शांतपणे सहन करण्यांतही त्यांनीं त्यांचेच अनुकरण केले. द्रव्याभाव व लोकक्षोभ यामुळे त्यांनीं फारच हालात दिवस काढले. खायला पोटभर साधे अन्न नाहीं, पायांत कांही नाहीं, अंगावर नीट कपडे नाहीत, अशा व्यावहारिक दैन्यांतही त्यांनीं ब्राह्मधर्मप्रसाराचे काम मोठ्या उत्साहाने व अहमहमिकेने चालविले. "मी पापी आहें, आणि ईश्वराने दया केली, तरच माझा तरणोपाय आहे!" या भावनेबरोबर ओघानेच दुसरी एक भावना त्यानी उचलली. ती अशी कीं, माझ्याप्रमाणे माझे ग्रामबधु व देशबंधु हेही दीन व पापी आहेत, यास्तव त्यांच्या उद्धारासाठीं आपण झटले पाहिजे. नव्याण्णव मेंढरांस मार्गावर सोडून चुकलेल्या शंभराव्याकरितां धाव घेणाऱ्या खिस्तधर्मशास्त्रांतील भल्या धनगराचे उदात्त शील हिंदुधर्मवेत्त्यांनीं कधींच जाणले नाही, याचें त्यांस फार वाईट वाटे! उपकारांपुरतेच उरलेले तुकोबांसारखे वैष्णव-संत, जगदुद्धाराकरितां आसेतुहिमाचल संचार करणारे श्रीशंकराचार्यांसारखे आचार्य, अज्ञानाने किंवा

कंठचामीकर न्यायाने, त्यांच्या स्वसंस्कारहीन दृष्टीस दिसले नाहींत, असे दिसते. कारण ब्राह्म-इतिहासकार असें म्हणतात कीं, ही लोकोद्धाराची भावना आम्हीं ख्रिस्ती धर्मांतून घेतली. अखिल जगास पावन करणें हें आपले कर्तव्य आहे, असे हिंदु सिद्ध अगर साधक मानीत नाहींत. पाप्याचे उद्धाराकरितां धावणे ही वृत्ति ख्रिस्तीधर्मांतच आहे. हिंदुधर्माप्रमाणें, साधक आपले पारमार्थिक कल्याण साधून मोकळा होता. जगदुद्धाराच्या उठाठेवींत तो पडत नाहीं. आत्मकल्याणाच्या इच्छेने कोणी आपल्यापाशीं आलाच तर त्याचा अधिकार पाहून त्यास कृतार्थ करावे, अशी एकांतवासी हिंदु साधूंचीं पूर्वपद्धत होती. ती सोडून जीझस ख्राइस्ट अथवा त्याचे अनुयायी पाद्री यांचे अनुकरण करून, पापीजनांचे उद्धाराकरितां चोहोकडे संचार करणे, हे आपले कर्तव्य आहे, असे हे प्रागतिक ब्राह्म मानूं लागले. मग वरील भावनेने प्रेरित होऊन पुष्कळ तरुण विद्यार्थी लोकापवादाची व सुखसोयीची परवा न करितां, लोकसेवा करण्यास तयार झाले. असे म्हणतात कीं, त्या वेळीं त्यांच्या ठिकाणीं दिसून येणारे वैराग्य व लोककल्याणासाठी त्यांनीं केलेले आत्मसमर्पण, ह्यानीं सर्व लोक आश्चर्यचकित झाले. एके बाजूने त्यांचा स्वार्थत्याग, व दुसऱ्या बाजूने जनतेकडून होत असलेली त्यांची अवहेलना व छळ हे पाहून, त्यांच्या पंधरापंधरा वीसवीस वर्षांच्या तरुण बायका, लोकनिंदित अशा सर्व विटंबना सोसण्यास आनंदाने तयार झाल्या! ब्राह्मसमाजाच्या इतिहासांत हा काळ चिरस्मरणीय राहील, असे ब्राह्म-इतिहासकार म्हणतात. इकडे विजय कृष्ण, अघोरनाथ, जदुनाथ वगैरे अनेक ब्राह्म-मिशनऱ्यांनीं आपले धर्मप्रसाराचे काम जोराने सुरू केले. ठिकठिकाणीं समाजस्थापना होऊन ब्राह्मांची ५६०पर्यंत संख्या वाढली. त्यांतही ब्राह्मस्त्रिया किती, ब्राह्मविवाह किती, आणि त्यात पुन्हा मिश्रविवाह किती, या संख्येवर समाजाच्या उत्कर्षाचे मान ठरविले जात असे. तेव्हां ह्या वेळपर्यंत १९ ब्राह्म-विवाहांपैकीं ९ मिश्रविवाह झाले, हे येथे मुद्दाम सांगितले पाहिजे. असो. मिस् मेरी कार्पेंटर यांस अत्याग्रहाचे बोलावणें आल्यावरून केशवचंद्र त्यांस घेऊन कृष्णनगरास गेले. तेथून बरद्वान, भागलपूर, बांकीपूर, अलाहाबाद, कानपूर, या शहरांस भेटी देत ते पंजाबांत गेले. इकडे हे ब्राह्म अगदीं ख्रिस्ती होण्याच्या मार्गांत आहेत, असें जाणून विलायतेंतून मिस्तर तिनालिंगसारखे

मोठें बोलके खिस्ती उपदेशक इकडे येऊन दाखल झाले. आपल्या समाजांतही ब्राह्मप्रचारकांची वाण पडूं नये, म्हणून केशवचंद्रांनीं ब्राह्मविद्यालय पुन्हा सुरू केलें.

अशा रीतीनें जणुंकाय देवाचें राज्य पृथ्वीवर सुरू करण्याचें सर्वांनीं अवसान आणलें असतां, तरुण ब्राह्मप्रचारकांना हळुहळू औदासीन्यानें घेरलें. व केशवचंद्रांचा अवसानघात होण्याचाच वेळ आला! मी पापी आहे व हें सारें जगही पापी आहे, ह्या पाप्यांचा उद्धार कसा व्हावा! ही त्यांच्या जीवास तळमळ लागली. ह्या विकत घेतलेल्या दुखण्याने ते अगदीं हताश झाले. आणि धर्मप्रचाराच्या बाह्य खटाटोपाने त्यांच्या मनाची मुळींच शांति होईना! तेव्हां त्यांचे पुढारी केशवचंद्र यांच्यापुढे हा मोठाच बिकट प्रश्न येऊन पडला. गरजेच्या वेणा कल्पनेला प्रसवतात; अथवा मनुष्य अनन्यगतिक झाला, म्हणजे ईश्वरही त्याचा साहाय्यकारी होतो, असें म्हणतात. ह्याचा अनुभव केशवचंद्रांस ह्या वेळीं आला.

आपल्या व्याख्यानांनी देशबांधवात अपकीर्ति व अविश्वास वाढलेला, जगांत आपले कोठे वजन नाहीं, वशिला नाहीं, पैसा नाहीं, उपासनेला चांगलीशी स्वतंत्र जागा नाहीं, अनुयायांतही एकोपा आणि धीर नाहीं, अशा स्थितींत त्यांचे दौर्बल्य त्यांच्यापुढे उभे राहिले. अशा असहाय स्थितींत त्यांचे पोक्त व अनुभवी सल्लागार देवेंद्रनाथ यांच्याकडे जावें, तर तो मार्ग त्यानीं आपल्या वर्तनाने आपणच बंद केलेला. अशा बिकट परिस्थितींत केशवचंद्रांचा अहंकार तात्पुरता तरी विरघळला! आणि आतां एका परमेश्वरावांचून आपली अब्रू रक्षण करणारा कोणी नाहीं, हे त्यांनींच अनेकदां प्रतिपादिलेले तत्त्व अनुभवाने त्यांच्या पुरे गळीं उतरले. तेव्हां आपल्या निवडक अनुयायांसह रोज त्या भगवंताचा धावा करण्यास त्यांनीं आरंभ केला. त्या रोजच्या प्रार्थनांनीं त्यांच्या चित्तास थोडासा आराम वाटूं लागला, मनास थोडथोडा धीर येऊं लागला. तेव्हां पुढे सहजच प्रार्थना हे केशवचंद्रांच्या पंथाचे एक विशिष्ट लक्षण झाले.

केशवचंद्र व त्यांचा उजवा हात विजयकृष्ण गोस्वामी ह्या दोघांचाही जन्म वैष्णवकुळांत झालेला होता. बंगाल्यांतील महावैष्णव श्रीचैतन्यदेव ह्यांचा सखा अद्वैत ह्याच्याच वंशांत विजयकृष्ण गोस्वामी याचा जन्म झाला होता.

त्यांच्या ठिकाणचे कुलधर्माचे संस्कार लुप्त झाले होते, ते एकाएकीं पुन्हा उदित झाले. मग केशवविजय प्रभृति ब्राह्मांच्या अंतरंगांतील प्रभावळींत जीझस खाइस्टाशेजारीं श्रीगौरंग प्रभुही विराजमान झाले, आणि वैष्णवांच्या भक्ति-मार्गाचा अवलंब करून करताळ व एकतारी घेऊन, त्यांनीं भजनसंकीर्तनाचा क्रम सुरू केला. खोल, एकतारी व करताळ यांच्या साथींत होणाऱ्या वैष्णवी भजनाचा बंगाल्यांतील प्रतिष्ठित गणलेल्या समाजांत अनादरच असे, खुद्द केशवचंद्रासही पूर्वी त्याचा अत्यंत तिटकारा असे. परंतु ख्रिस्ताप्रमाणें बंगाल्यांतील लोकप्रिय श्रीचैतन्यप्रभूचे अनुकरण करण्याच्या भरांत त्यांनीं वैष्णवी भजनाचा उपकरणांसह अंगीकार केला, आणि ब्रह्मसंकीर्तन या नांवाची ही नवीन टूम ब्राह्मसमाजांत सुरू झाली. त्याने ब्राह्मसमाजाच्या संप्रदायांत मोठीच क्रान्ति घडवून आणली. ह्या कामी विजयकृष्ण गोस्वामी व त्रैलोक्यनाथ संन्याळ ह्यांचे फारच मोठें साह्य झाले. विजयकृष्ण हे स्वभावतःच भक्तिमार्गी होते. शिवाय त्याचे बंधु हे सनातनधर्माभिमानी वैष्णव असून, त्यांचेही ह्या कामीं विशेष साहाय्य असे. त्रैलोक्यनाथ संन्याळ हे उत्तम गायक व शीघ्रकवि, ह्या गुणांमुळें चिरंजीव म्हटले जात. अशा योगामुळे ह्या ब्राह्मसंकीर्तनास अपूर्व रंग चढूं लागला. आणि दरसाल नोव्हेंबरांत ब्राह्मोत्सव ह्या नावानें भजनाचे मोठे चित्ताकर्षक उत्सव ब्राह्म समाजांत होऊं लागले. ज्यांच्या अंत:करणास भक्तिप्रेमाचा ह्यापूर्वी ओलावा नव्हता व ज्यांचा स्वभाव फार लाजाळू व भिडस्त होता, त्या केशवचंद्रांस अशा रीतीनें भजनाचे अगदी वेड लागले ते लोकलाज सोडून मोठमोठ्याने भजन करीत नाचूं गाऊं लागले ! आणि त्या भजनानंदानें कंठ सद्गदित होऊन, त्यांच्या नेत्रातून प्रेमाश्रूंचे लोट वाहूं लागले !

रोगार्त मनुष्य रोगनिवृत्तीकरितां जसा एकदम अनेक उपायांचा अवलंब करितो, तसा केशवचंद्रांनीं आपल्या अनुयायांच्या मनोविकारांवर आणखीही एक इलाज केला. भजनाच्या प्रेमांत निरहंकृति सहज आली असतां, आपण देवेंद्रनाथांकडे परत कसें जावें, हा त्यांच्या मनाचा संकोच कमी झाला. ते नम्रपणें देवेंद्रनाथांकडे गेले, व आपल्या मंडळीस चार उपदेशाच्या गोष्टी सांगा, असें त्यांनीं त्यांस सांगितले, त्या पुरुषानेंही तें मान्य केलें. त्यानंतर लवकरच म्हणजे ता. २२ आक्टोबर १८६७ रोजीं भारतवर्षीय ब्राह्मांची सभा होऊन त्यांत देवेंद्रनाथांस मानपत्र देण्यांत आलें. व ह्याच वेळीं त्यांस महर्षि



पं० विजयकृष्ण गोस्वामी.



२० चिरंजीव त्रैलोक्यनाथ सन्याळ.



२१ साधु अघोरनाथ.

हें बहुमानाचें विशेषण प्रथमच केशवचंद्रांनीं लावलें. ह्याच सभेत भारतवर्षीय ब्राह्मसमाजाचें अध्यक्षपद परमेश्वराकडे सोपविण्यांत आलें.

अशा रीतीनें केशवचंद्रांच्या अनुयायांचे निराश व उदासीन झालेले चेहरे प्रफुल्लित झाले असतां, आदल्या वर्षी ज्या दिवशीं मिस् मेरी कार्पेंटरबाईचें ब्राह्म तरुणांनीं व तरुणींनीं मोठ्या मनोभावानें स्वागत केलें होतें, तोच तारीख २४ नोव्हेंबरचा मंगलदिन अहोरात्र उत्सव करून साजरा करण्याची नवीन टूम केशवचंद्रांनीं काढली. सारा दिवस निरनिराळ्या चित्ताकर्षक कार्यक्रमानें खचून भरला होता. मंदिरांतील कित्येक प्रेक्षक मंडळी जी एकदां सकाळीं ठाणें देऊन जागा धरून बसली, ती सारा दिवस जागची हललीच नाहीं! भूक नाहीं, तहान नाहीं, सारा एकच वैष्णवसंकीर्तनाचा आनंद! त्यांत सायंकाळच्या सुमारास महर्षि देवेंद्रनाथही मुद्दाम निमंत्रणावरून प्रार्थनेकरितां आले. मग काय विचारता! महर्षींच्या सभोंवारच त्या तरुण सुशिक्षित ब्राह्मांनीं घेर धरून अडाणी गणलेल्या वैष्णवाप्रमाणें नाचण्यास सुरुवात केली! आणि मग शिवगणांत शोभणाऱ्या महेश्वरांप्रमाणें महर्षिही त्यांत आनंदानें नाचूं लागले!

पुढें इसवी सन १८६८च्या प्रारंभीच ता. २४ जानेवारी रोजीं केशवचंद्रांनीं आपल्या भारतीय ब्राह्ममंदिराच्या पायाचा दगड बसविला. ईश्वर आपणांस साहाय्यकारी आहे, अशी दृढ भावना झाल्यामुळें, एवढ्या मोठ्या मंदिरास पैसे कसे मिळतील, त्याचा कांहीं एक विचार करीत न बसतां त्यांनीं आपलें मंदिर अगोदर मनोमय उभारलें, आणि मग लगेच पायास सुरुवात केली. ह्या मंदिराचा पाया म्हणजे केशवचंद्रांच्या पुढील सर्व कारकीर्दीचाच पाया होय. हा समारंभ केशवचंद्रांनीं फार थाटानें साजरा केला. त्याच दिवशीं नगरसंकीर्तन नामक एका नवीन संप्रदायास सुरुवात झाली.

ता. २४ रोजीं प्रातःकाळीं ब्राह्ममंदिराचे ठिकाणीं जाण्याकरितां केशवचंद्रांनीं मोठी थाटाची मिरवणूक काढली. ह्या मिरवणुकींत सुशिक्षित व अशिक्षित असा उभयविध फारच मोठा समाज सामील झाला. एकेश्वरी पंथाचीं ब्रीदवाक्यें लिहिलेल्या पताका घेऊन उत्साही तरुण मंडळी पुढें झाली. केशवचंद्र व त्यांचे स्नेही आणि अनुयायी बोडके, अनवाणी बंगाली वैष्णवांच्या मेळ्याप्रमाणें भजनाचा गजर करीत चालले. त्यांच्यापुढें त्रैलोक्यनाथ संन्याळ व विजयकृष्ण गोस्वामी हे आघाडीस भजन सांगत चालले होते.

त्या भजनाचा सारांश असा कीं, "बंधू हो! चला, आपल्या दुःखाच्या रात्रीचा शेवट जवळ आला. ईश्वराच्या नामाचा गजर शहरांत दुमदुमून राहिला आहे. सर्वजण आनंदाने ईश्वराचा नामघोष करूं या. त्याने दुःखाचा निरास होऊन शांतीचा लाभ घडेल. गरीब व श्रीमंत, अजाण व सुजाण, स्त्री व पुरुष, जे जे ईश्वराची खरी भक्ति करीत असतील, त्यांचा उद्धार करण्याकरितां दयाळू परमेश्वराने हा ब्राह्मधर्म, पंथ, वर्ण, जाति इत्यादि भेदाभेद न मानतां, सर्वांस सारखाच मोकळा केला आहे. भवसागरांतून तरून जाण्याचा हा सुलभ मार्ग आहे. येथे उद्धार करणारा साक्षात् परमेश्वरच आहे. यासाठीं अशाश्वत सुखाच्या नादीं न लागतां, ह्या स्वर्गीय पंथाचा अवलंब करा. त्वरा करा, त्वरा करा. विलंब करूं नका. ईश्वराचा आश्रय करा. त्यास अंतःकरणात विराजमान होऊं द्या. तो गरिबांचा वाली आहे. त्याच्या कृपेने तुमचे दुःख नाश पावून, तुम्ही सुखी व सुरक्षित व्हाल."

ह्या अपूर्व मिरवणुकीने सर्व कलकत्ता शहर दुमदुमून गेले. ब्राह्मविरोधि वर्तमानपत्रांनीं व ब्राह्मांपैकीही बाबू राजनारायणप्रभृति आदि-ब्राह्मांनीं ह्या देवभक्तीच्या अतिरेकाची व वैष्णवी अनुकरणाची कडक निंदा चालविली. तथापि लोकांचे थवेच्या थवे मिरवणूक पाहण्यास जमूं लागले. ठिकाणी गेल्यावर व्याख्याने, प्रवचने, भजने असे विविध कार्यक्रम सुरू झाले. सायंकाळीं फार मोठ्या मिश्रसमाजापुढे संजीवनी निष्ठा "Regenerating Faith" ह्या विषयावर केशवचंद्राचे विचारवक्तृत्वपूर्ण असे व्याख्यान झाले. त्याचा सारांश पुढे दिला आहेः—

"मनुष्याचा धर्म व देवाचा धर्म, अथवा नीति आणि अध्यात्म, किंवा जुना करार व नवा करार असे धर्मात दोन पोटभेद होतात. त्यात पहिल्यापेक्षां दुसऱ्याचे महत्त्व फार जास्त आहे. नीतिधर्म जीवाचे उद्धारास पुरा पडत नाहीं. नीतिधर्माच्या आज्ञा कितीही चागल्या असल्या, व त्याप्रमाणे आपल्या वर्तनाचे नियंत्रण करण्याचा प्रत्येकाच्या सदसद्विवेकबुद्धीस हक्क असला, तरी ते सामर्थ्य मानवी बुद्धींत नाहीं. विषयांचा मोह इतका कठीण आहे, व इंद्रियें इतकीं उच्छृंखल आहेत कीं, मनुष्यास नीतिमर्यादा समजत असूनही त्यांचें पालन होणें, केव्हां केव्हां त्यास अशक्यप्राय होते. शिवाय कडक नीतिधर्मानें वागणाराही मनुष्य तेवढ्यानें कृतार्थ होतो, असे नाहीं. त्यास प्राप्तव्य असें

कांहीं तरी राहतेंच. तें प्राप्त होण्यासाठीं ब्रह्मनिष्ठा पाहिजे, सत्यनिष्ठा पाहिजे, अमृतत्वावर निष्ठा पाहिजे; आणि ती पाहिजे असेल, तर हे सारे समाजनीतीचे पोकळ वादविवाद बंद झाले पाहिजे. नीतिधर्म सांगणाऱ्याचा व ते पाळणाऱ्याचा अहंकार नाहींसा झाला पाहिजे. पश्चात्तापाने चित्तशुद्धि झाली पाहिजेत. आणि त्याही पश्चात्तापास निष्ठावंत प्रार्थनेची जोड पाहिजे. अशी ही जोड मिळाली कीं, मनुष्यास नवजीवन प्राप्त होते. मोहमय अशा जगिक दृष्टीने तो मृतप्राय होतो, पण परमात्म्याच्या सत्तत्वात त्याचे सजीवन होते. विषयलालसा देहाला जशी सहज आहे, तसेंच हे आध्यात्मिक जीवन आत्म्यास सहज आणि सुखावह आहे. लहान मुलाची निष्पाप व निर्विकार वृत्ति ही सहज आहे, विवेकबुद्धीच्या खड्या पाहऱ्यात संभाळलेल्या सद्गुणांप्रमाणे ती जरबेत राखलेली नाहीं, व त्या वृत्तीबद्दल त्याचे ठायीं अहंकाराचा लेशही नाही, तशीच ही ब्रह्मनिष्ठा सहज आहे. म्हणूनच ईशप्राप्तीकरितां बालवृत्ति धारण करण्यास जीझस ख्राइस्टानीं अनेकदां सांगितले आहे."

आपल्या कर्तृत्वाच्या घमेंडीत न राहतां ईशकृपेवर सर्वस्वीं विसंबणे, आणि पश्चात्तापपूर्वक त्याची प्रार्थना करून त्याशी अनन्यगातिक होणे, आणि सबाह्यांतर सर्व परमात्माच आहे, अशी दृढश्रद्धा बाळगणे, ह्यासच केशवचंद्र (Regenerating Faith) सजीवनीनिष्ठा असे म्हणतात.

केशवचंद्राच्या ह्या सुप्रसिद्ध व्याख्यानास व्हाइसरॉय लॉर्ड लॉरेन्सप्रभृति बडे बडे इंग्रज अंमलदारही आले होते. त्यापैकीं कित्येकास तर जागा न मिळाल्यामुळे सारा वेळ उभेच रहावे लागले. अशा रीतीने हिंदुस्थानच्या त्या वेळच्या राजधानीच्या शहरीं केशवचंद्रानीं आपली छाप बसविल्यावर, त्या विजयानंदांत त्यांनीं वायव्यप्रांत व मुंबई ह्या प्रांतांतून धर्मप्रसारार्थ आपला दौरा काढला. मुंबईस ही त्यांची दुसरी भेट होती. त्या वेळीं त्यांच्याच प्रेरणेनें तेथे प्रार्थनासमाज नुकताच स्थापन झाला होता. मुंबईस थोडे दिवस राहून ते मोंगीर येथे परत आले. तेथे रेल्वेनोकरांची एक मोठीच वसाहत होती. त्या ठिकाणीं केशवचंद्रांच्या व्यक्तिमाहात्म्याचा कळस झाला! भक्त्यानंदानें तेथील सर्व लोक बेहोष झाले. मोंगीर म्हणजे एक अलौकिक जत्रेचें स्थानच बनून राहिले. केशवचंद्रांनीं तेथील आबालवृद्धांस व स्त्री-

पुरुषांस इतकें वेड लावलें कीं, ते आपली स्वतःची अक्कलहुषारी साफ विसरले. व्यसनी माणसं व्यसनापायी जशीं नादान बनतात, तशी मोंगीरची भोळीभाबडी मंडळी केशवचंद्रांच्या पायाशी अगदी दीन बनून राहिली! परक्या ठिकाणीं येऊन राहिलेल्या मंडळीत स्वार्थनिरपेक्ष प्रेमभाव सहजीच असतो त्यांत केवळ पोटाच्या धद्यात चूर झालेल्या ह्या मंडळीवर, आळशावर गंगा यावी त्याप्रमाणे ईश्वराचा मोठाच अनुग्रह झाला, असे त्यांस वाटणेंही स्वाभाविक होतें. यामुळे मोंगीर ही काहीं काळ ब्राह्माची पंढरीच झाली!

ह्यापुढे केशवचंद्र सेन ह्याच्या व्याख्यानात भक्ति हाच विषय प्राधान्येकरून येऊ लागला. केशवचंद्र सेनासारखा अलौकिक वक्ता, भक्तीसारखा प्रेमळ विषय, आणि बंगाली लोकासारखे भावनाप्रधान श्रोते, असा त्रिवेणीसंगम झाल्यावर मग काय विचारता! जिकडे तिकडे भक्ति हाच विषय होऊन बसला. भजनोत्सवात सबंध दिवस मंडळी रगूं लागली. भक्तीच्या समुद्राला एकाएकी मोठीच भरती आली. तेथील समाजातील स्त्रीपुरुषमंडळी भक्तिभावानें अगदी वेडावून गेली. प्रेमभावनेनें विनम्र होऊन जो तो एकमेकांच्या पायां पडूं लागला. "आम्हां पाप्याचा उद्धार करा!" असें दीनवाणीनें विनवीत लोक केशवचंद्र सेनापुढे लोटांगणे घालून व्याकुळतेनें गडबडा लोळू लागले! जीझस खाइस्टचा हा धाकटा भाऊच जगदुद्धाराकरितां भूलोकीं अवतरला आहे, असे लोक म्हणू लागले! मग केशवावर निरनिराळी गीतें होऊन, तीं लोकाच्या तोंडीं बसलीं. "अहो शेजारी, बंधु हो! जागे व्हा, तुमच्यामध्ये हा पहा एक अत्यत दयाळू असा ब्रह्मनिष्ठ योगी अवतरला आहे. तो आपल्या कळवानें हरीचे गुणानुवाद गात आहे. त्याचें अतःकरण हेच परमपुरुषाचे अधिष्ठान आहे." अशा अर्थाचीं पदें लोक गाऊ लागले!

"बंधुहो, तुमचा उद्धार व्हावा असें वाटत असेल तर केशवचंद्रांचे पाय धरा, त्यावाचून अन्य तरणोपाय नाही" असे ब्राह्मपीठावरुन प्रतापचंद्रांसारखे उपदेशक उपदेश करूं लागले "हे दयामय प्रभू, हे पतितउद्धारका! मज गरिबाला विसबूं नका बरें. आपल्या अवतारसमाप्तीपूर्वी माझा उद्धार करा. भो गुरुदेव, ह्या आपल्या अधम शिष्याचे स्मरण असूं द्या. हे प्रधान, प्रभु, मी महापातकी, त्या पावित्र्यपीठाजवळ (the throne of holiness) कसा जाऊं शकेन! त्या परमपुरुषाची (The most high) प्रार्थना

करण्यास मी असमर्थ आहे. म्हणून माझी आपणांस विनवणी आहे कीं, मजकरितां आपण आपल्या तातांस अवश्य भीड घाला!" अशा मजकुराचीं पत्रें केशवचंद्रांस येऊं लागलीं. सर्व ब्राह्मांच्या वतीने कित्येक भाविक सांप्रदायी केशवचंद्रांची अशी प्रार्थना करूं लागले कीं, "आपल्या पायांवर लोटांगण घेण्याची एकदा आपण आम्हांला संधि दिल्यावर तो आमचा हक्क आपण हिरावून घेऊं नये. आमच्या अंतरींचा असा दृढविश्वास आहे कीं, आपल्या पायांच्या पुण्यप्रतापाने आमचा उद्धार होईल. आम्हासारख्या महापाप्याना आपल्या पायाची धूळ हाच एक आधार आणि शांतीचे साधन आहे. आम्ही आपल्या हातीं आपले हे पाय सदैव धारण करू, व त्याचीच उपासना करू. आणि आमच्या वतीने आपल्या पित्याची आपण अवश्य प्रार्थना करा." (You shall pray to thy father on my behalf.)

अशा प्रकारच्या प्रार्थना ब्राह्मसांप्रदायास सर्वथा अयोग्य असल्या, तरी त्यास अप्रत्यक्ष रीतीने केशवचंद्र याच्याकडून स्फूर्ति मिळत गेली, असे ब्राह्म-इतिहासकार सांगतात. ह्या अखिल विश्वात मानवी शरीर हे एकच सुंदर देवालय आहे. ह्यापरते सुंदर दुसरे कांहीं नाही. एखाद्या पुरुषा ुढे नमणे म्हणजे देहरूपाने व्यक्त झालेल्या परमपुरुषाचेच ते वंदन आहे. मनुष्य-देहाचा स्पर्श म्हणजे आपण देवाच्या स्वर्गासच हात लावल्याप्रमाणे आहे. अशा प्रकारे नरदेहाचे गोडवे गाऊन आणि श्रीचैतन्य, नानक असले धर्म-संस्थापक हे दैवी पुरुष (God men) होते, असे वारंवार सांगून, विभूति-पूजेचें माहात्म्य त्यानीच प्रस्थापित केले होते. केशवचंद्रांच्या वाणीत अजब मोहिनी होती, त्याच्या वृत्तीत विरक्तीची छटा होती, खिस्तचैतन्यधर्माचे एक नवीनच रसायन त्यांनीं बनविले होते. व सद्‌गुरूंस शरण जाण्याचा संप्रदाय हिंदूंच्या हाडींमांसीं खिळलेला होता, असे असल्यामुळे एके बाजूस केशव-चंद्राचे व्यक्तिमाहात्म्य व दुसरे बाजूस तरुणांची उद्दीपित भावना असा योग घडून आला. मग काय, गुरुभक्तीस पूर लोटला. ब्राह्ममंदिरातील सार्वजनिक प्रार्थना, पश्चात्ताप पावलेल्या पापी भाविकांच्या स्फुंदस्फुंदून रडण्याने व हुंदक्याने, बंद पडू लागल्या. श्रीगौरंगप्रभूप्रमाणे केशवचंद्र सेन हा पापी जनांचे उद्धाराकरिता ईश्वरानें घेतलेला एक अवतारच होय, असें कित्येक म्हणत. तर दुसरे कित्येक, अहो, हा येशु खिस्ताचा बंधूच आमच्या तारणाकरितां

ईश्वरानें इकडे पाठविला आहे, असें म्हणत. मूर्तिपूजेचा निषेध करणाऱ्या ह्या ब्राह्म सुधारकांत हा विभूतिपूजेचा प्रकार इतक्या थरास गेला कीं, एकदां एका भाविक ब्राह्मानें केशवचंद्र सेनांचे पाय आपल्या हातांनीं धुतले; इतकेंच नव्हे, तर ते आपल्या बायकोच्या लांब केशकलापांनीं पुसून घेतले !

केशवचंद्र सेनांचे हें वाढत चाललेले व्यक्तिमाहात्म्य कित्येकांस रुचलें नाहीं. आपल्या उपदेशकाचे ठिकाणीं अमानुषत्व मानणे, मनुष्यमात्राप्रमाणे तो चुकीस पात्र नाहीं, असे समजणे, त्यांच्या आचारविचारांत दोष असणे अशक्य आहे, असें कल्पिणे, म्हणजे हा मूर्तिपूजेचाच एक निंद्य प्रकार आहे, असें ते म्हणूं लागले. मतस्वातंत्र्य हा ब्राह्माचा एक अमोलिक हक्क आहे. जो उपदेशक आपल्या छापेनें शिष्याचा तो हक्क नष्टप्राय करतो, तो उपदेशक दुसऱ्याचा गुरु होण्यास सर्वथा अपात्र आहे, असे ते बोलूं लागले. ह्याप्रमाणे आदि-ब्राह्मसमाज व भारतीय ब्राह्मसमाज ह्यांत मोठी खळबळ उडून गेली. वर्तमान-पत्रांत केशवचंद्र सेनांवर ब्राह्मांकडूनच टीका येऊं लागली. केशवचंद्र सेनांनीं आपले स्तोम अशा प्रकारें कां माजवून घ्यावे, असा उघड उघड सवाल त्यांस होऊं लागला. भाविकांचा बुद्धिभेद करण्याचा मला काय हक्क आहे, असा केशवचंद्र सेनांनीं आपल्याकडून त्याचा खुलासा केला. पण त्याने सर्वांचे समाधान झाले नाहीं. त्यामुळे कित्येकांनी तर ब्राह्मसमाज कायमचाच सोडला. आणि जे त्यानंतर ब्राह्मसमाजात राहिले, त्यांतही काहीं केशवचंद्रांचे अंधभक्त तर कांहीं त्याचे निंदक, असे दोन पक्ष उभे राहिले.

ब्राह्मसंप्रदायांतील हे गैरसमज दूर करण्याकरितां केशवचंद्रांनीं पारमार्थिक गुरूसंबंधीं आपले विचार अशा रीतीनें मांडले कीं, " कोणीही पुरुष पूर्णत्वाने कोणाचा गुरु होऊं शकत नाहीं. तसेंच उलटपक्षीं कोणीही मनुष्य दुसऱ्याचा अंशत: गुरु होऊं शकतो. ज्यांना माझ्यापासून फायदा होतो, त्यानीं मला मान देणे हे योग्यच आहे; परंतु माझीं चार-दोन व्याख्याने ऐकल्यानें ते माझे शिष्य झाले, असें म्हणतां येणार नाहीं. ईश्वरापेक्षांही गुरूस अधिक मान देणें, हें मनुष्याच्या मनाचें दौर्बल्य आहे. वास्तविक गुरु शिष्यास कोणतेंच धर्मतत्त्व शिकवीत नाहीं. तर तो फक्त साधकास ईश्वरासन्निध नेत असतो, व मग त्याच्या बुद्धींत धर्मप्रेरणा करणारा साक्षात् ईश्वरच असतो. गुरु हा ईश्वर व भक्त यांच्या दरम्यान येऊं शकत नाहीं. गुरु हा परमपुरुषाची गांठ घालून

देणारा एक द्वारपाल आहे. अथवा अस्पष्ट स्वरूपास स्पष्ट करणारा तो एक उपनेत्र आहे." अशा प्रकारे साधक-बाधक संवादानें दोन्ही पक्षांस संभाळून धरण्याचा त्यांनीं प्रयत्न चालविला.

ब्राह्मण उपदेशकांनी यज्ञोपवीत धारण करण्याबद्दल आदि-ब्राह्मसमाजाचे उपाचार्य पंडित अयोध्यानाथ पक्राशी व त्यांस पाठीशीं घालणारे प्रधान आचार्य देवेंद्रनाथ, या उभयतांच्यावर मागे आग पाखडणारे विजयकृष्ण गोस्वामी ह्यांनीच, या वेळी केशवचंद्रांवर टीकास्त्र उगारण्यांत पुढाकार घेतला. केशवचद्रांनीं आपले स्तोम अशा रीतीने माजूं दिले, म्हणून कित्येक कट्ट ब्राह्म ज्याप्रमाणे समाज सोडून गेले, त्याचप्रमाणे केशवचद्रांनीं सांप्रदायिकांच्या गुरुभक्तीचा दंभपरिस्फोट केला, तेव्हां कित्येक भाविकांचा बुद्धिभेद होऊन निराशेने तेही केशवचंद्रांस सोडून गेले. केशवचद्रांचे समाजापैकी भाविक अभाविक अशा ह्या विरोधकांची संख्या सुदैवाने वाढली नाहीं. शिवाय ह्या थोड्याफार असंतोषाने त्यांस नाउमेद न करितां, त्या असतोषास कारण जे अनुयायाचे अलौकिक प्रेम, त्या योगाने त्यांचा आत्मविश्वास उलट वाढविला. अनुयायांच्या प्रीतींत त्यांस ईश्वराची अनुकूलताच दिसून आली आणि आपली चळवळ यशस्वी करण्याची गुरुकिल्लीच आपल्याला सांपडली, असे त्यांस वाटले. तात्पर्य, सांप्रदायाच्या भक्त्युद्रेकांतील थोडाफार अत्याचार सोडून दिला, तर होत असलेला विभूतिपूजेचा प्रकार अनिष्ट नसून इष्टच आहे, असे त्यांनी मानले असावे, असे दिसतें. पुढे केशवचद्र ह्यांच्या अनुयायांत वर लिहिल्याप्रमाणे कांहीं अंधभक्त व कांहीं उदासीन, असे पक्ष उत्पन्न झाले, तेव्हां केशवचद्रानी आपल्या भक्तांचाच नेहमी उघड उघड पुरस्कार करण्यास कमी केले नाहीं. खिस्ताचे व्यक्तिमाहात्म्यच खिस्ती धर्मास कसे आधारभूत झाले आहे, ही गोष्ट त्यांच्या नजरेसमोर अक्षय्य होतीच.

३० सन १८६९ सालीं भारतवर्षीय ब्राह्मसमाजाच्या मंदिराच्या कामास फार जोराने सुरुवात झाली. मदिर जसजसें उभारू लागले, तसतसें त्या मंदिरांत पुढे उपदेशिल्या जाणाऱ्या धर्माचे स्वरूपही केशवचंद्र अधिकाधिक स्पष्ट करूं लागले. हातीं घेतलेली चळवळ चित्ताकर्षक कशी करावी, हें केशवचंद्र सेन पूर्णपणें जाणत होते. त्यांचा आत्मविश्वास दांडगा होता.

इ. सन १८६९चे जानेवारी महिन्यांत वार्षिकोत्सवाच्या वेळीं, आमचा भावी पंथ (Future church) या विषयावर त्यांनीं एक व्याख्यान दिलें. त्याचा थोडक्यांत साराश असा कीं, " मनुष्यमात्राच्या गरजा, महत्त्वाकांक्षा व धर्मभावना ह्या स्थूल मानानें सारख्याच असल्यामुळे, सर्व धर्मांचीं मूलतत्त्वे एकसारखींच दिसतात. मानवी मनात धर्मबीज पेरलेलेच आहे. ते जसे पूर्वाचार्यांच्या मनांत होते, तसे आमच्याही मनांत आहे. निरनिराळी मतमतांतरें, उपासनापद्धति व धर्मसंस्था यांच्या कल्पना बीजरूपानें मानवी बुद्धींत असतातच. त्या कितीही दाबल्या तरी दबल्या जात नाहींत. तर देशकालानुसार प्रगट होतात. त्यांत ठिकठिकाणीं भेद होण्याचे कारण इतकेंच कीं, जड सृष्टि, मन व ईश्वर हीं जीं तीन सत्ये आहेत, त्याचे भिन्नत्व न जाणतां त्यांपैकीं कोणत्या तरी एकाच तत्त्वास सत्यत्व देण्यांत येते. जड सृष्टीचे भोक्ते पुढे पुढे इतके वाहवतात कीं, जड पदार्थ हे ईश्वरनिर्मित आहेत, हे विसरून जड पदार्थांसच ते ईश्वर मानूं लागतात. अशा रीतीने मूर्तिपूजेचे अनेक पंथ उत्पन्न होतात. तसेंच कित्येक मन अथवा जीवात्मा यांच्या द्वारें परमात्म्याची उपासना करण्याचें सोडून ईशनिर्मित जो आत्मा त्याचे परमात्म्याशीं तादात्म्य भावून सोहं (I am god) ही अहंकाराची उपमर्दकारक भावना रूढ करितात. अशा रीतीने पूज्यपूजकांचें ऐक्य मानणाऱ्या भ्रमिष्टांचा एक पंथ तयार होतो. वास्तविक ब्रह्मतत्त्व हे एकच एक खरें, पण ते त्रिविध रूपाने व्यक्त झालेले आहे, असे आमचे धर्ममत आहे, व त्यांत कोणत्याही पंथास अमान्य होण्यासारखे कांही नाही. इतकेच नव्हे, तर हे तत्त्व सर्व भिन्न पथांचा सग्रह करणारे आहे. ईश्वरावर बापाप्रमाणे सर्वतोपरी प्रेम करणे, व मनुष्याशीं बंधूप्रमाणें वागणे, हेच धर्माचे सार आहे, कोणतेही धर्मग्रंथ, कोणतेही महात्मे, कोणतेही धार्मिक आचार आणि कसलेही धर्मविचार, हे खरे तारक नसून ईश्वराची अमर्याद व परम समर्थ अशी कृपा हीच एक उद्धारक आहे, असें हा पंथ अखिल मनुष्यमात्रास व सर्व राष्ट्रास सांगेल. अशा रीतीनें हिंदु व मुसलमानी धर्मासारखे विरोधी धर्म एकरूप होतील. हिंदु योग्याची ध्यानधारणा व इस्लामी धर्मवीराची कर्मासक्ति, यांचा योग्य मिलाफ होईल, आणि खिस्ती धर्माच्या प्रभावाने जगांतील सर्व पंथांतील उच्च तत्त्वांचा समन्वय झालेलाच आमच्या ब्राह्मधर्मांत आढळून येईल. हे सर्व



भारतवर्षीय ब्राह्मसमाज मंदिर.

होत असतां, आम्ही आपली राष्ट्रीय भावना सोडणार नाहीं. वास्तविक हिंदुस्थानावर बाहेरचा एकादा धर्म लादावयाचा नसून, हिंदुस्थानांतील एकंदर धर्मविचारांचा वरीलप्रमाणें आंतूनच विकास वाढून येईल.

ह्यानंतर ऑगस्ट महिन्याचे बाविसावे तारखेस भारतवर्षीय ब्राह्ममंदिराचा अनावरण समारंभ मोठ्या थाटाने साजरा केला. त्या वेळीं सर्व मतभेदांचा निरास व्हावा, व सर्वत्र बंधुभाव नांदावा, म्हणून हे मंदिर स्थापण्यांत येत आहे, असे केशवचंद्रांनीं जाहीर केले. तसेच असेही सांगण्यात आलें कीं, या ठिकाणीं पीठावरून जे आचार्य प्रार्थना व उपदेश करतील ते पामर जीव ( Sinful men ) आहेत, असेच सर्वांनीं मानावें. जी स्तुति ईश्वरासच लावावयाची ती ह्या मंदिरांतील कोणाही व्यक्तीबद्दल करण्यांत येणार नाहीं. ह्याशिवाय त्या दिवशीं वाचलेल्या जाहीरनाम्यांतील बाकीचा सर्व मजकूर राजा राममोहन यांच्या ट्रस्टडीडच्या भाषेसच धरून आहे. ह्या महोत्सवाच्या दिवशीं, उत्कृष्ट विद्वान् असे कित्येक तरुण, केशवचंद्रांचे अनुयायी बनले. आणि अशा रीतीने केशवचंद्राच्या निंदकांची तोंडे आपोआप मिटलीं. विजयकृष्ण गोस्वामी, यांच्यासारखे जे अलीकडे फटकून राहिले होते, त्यांनीं आपला गैरसमज उघड जाहीर करून, तेही केशवचंद्रास पुन्हा येऊन मिळाले. भारतवर्षीय समाजास स्वतंत्र व सुंदर मंदिराची जोड मिळाल्यामुळे, त्यास अधिक स्थायिकता येऊन तत्संप्रदायी मंडळींचा उत्साह द्विगुणित झाला. आपल्या विजयाची ध्वजा फडकावीत प्रतापचंद्र मुजुमदार, गौरगोविंदराय, आणि अमृतलाल बोस, हे प्रचारक दक्षिणेकडे वळले. बाबू प्रतापचंद्रांच्या वक्तृत्वाने मद्रास व मुंबईवर बरीच छाप टाकली. दोन्ही ठिकाणीं ब्राह्म-संप्रदाय जोराने सुरू झाले. सुप्रसिद्ध ब्राह्मप्रचारक अघोरनाथ गुप्त हे तर आसामच्या अभेद्य अरण्यांतून वाट काढीत पलीकडे गेले, व तेथील अडाणी आणि रानटी लोकातही आपल्या नवीन धर्माचा प्रसार करण्यात ते यशस्वी झाले. अशा रीतीने भारतवर्षीय ब्राह्मसमाज अखिल भारतवर्षात दुमदुमून राहिला.

---

# प्रकरण दुसरें

# दुसरी फूट

इ. सन १८७० साली केशवचंद्र विलायतेस गेले असतां, तेथील विनोद पत्रांत त्यांच्याबद्दल एक कविता छापली. त्याचा भावार्थ असा:—

पाहुणा कोण हा आला। न जाणो की बुरा भला॥
बाबू सेन म्हणो त्याला। पोळ की टोळ धाकुला!॥

केशवचंद्राच्या कित्येक प्रार्थनातील त्याच्या स्वताबद्दलची क्षुद्रबुद्धि आणि त्यांच्या आचरणांतील अगडबंब महत्त्वाकाक्षा, हा विजोड वरील अनुष्टुभातील विजोडाप्रमाणेच विस्मयकारक होता. केशवचंद्र म्हणजे जित राष्ट्रातील एक क्षुद्र काळा कीटक, कीं त्याच्या मुलखातील "जॉन बुल"! हा खरोखरीच केव्हा केव्हां प्रश्न पडे. त्याच्या विचार आणि आचारांतही कोठे कोठे हीच विसंगति दिसून येते. समुद्रासारख्या पसरलेल्या श्रोतृसमुदायापुढे व्याख्यात्याच्या पीठावरून सिंहगर्जना करणारे केशवचंद्र खाजगी मुलाखतीत अगदींच गर्भगळीत होत. भणंग-भिकारी अशा वैष्णवांच्या मेळ्यात रंगणारे केशवचंद्र कधी राजदरबारच्या मानाचे मानकरी होत. त्या वेळीही अनुकूल वारा मिळाला. तसतसा केशवचंद्र सन ह्याच्या महत्त्वाकांक्षेचा पतंग अधिकच भराऱ्या मारूं लागला, किंवा कदाचित् असेंही म्हणतां येईल कीं, त्यांच्या महत्त्वाकांक्षेची भूक भागण्याइतका सहानुभूतीचा सुकाळ स्वदेशी न लाभल्यामुळे, इंग्रज जनतेच्या ठिकाणीं आपल्या राजकीय, सामाजिक आणि धार्मिक परिस्थितीसंबधीं हितबुद्धि उत्पन्न करावी, म्हणून राजा राममोहन याच्याप्रमाणे आपणही विलायतची सफर करावी, अशी कल्पना ह्यांच्या डोक्यांत आली.

केशवचंद्राचा प्रत्येक कार्यक्रम चमत्कृतिजनक असे, किंवा तसा तो व्हावा, असा त्यांचा बुद्धिपुरःसर प्रयत्न असे. पुष्कळ वेळां ते आपल्या बेताचा अगोदर कोणास मागमूसही लागू देत नसत. त्यांच्या अनुयायांस ह्या बेताचा अगोदर वासही नव्हता. त्यांस हा बेत कळतांच मोठे आश्चर्य वाटले. व केशवचंद्रांच्या गैरहजेरींत आपली संस्था कशी चालेल, ह्याबद्दल अवघडही

वाटलें. आपल्या गैरहजेरींत समाजांत बखेडा व मतभेद माजूं नये, म्हणून केशवचंद्रांनीं व्यक्तींचे व्यक्तिशः माहात्म्य समाजांत आपल्यामागे ठेवले नाहीं. कारण व्यक्तींचे देव्हारे माजविण्यांत संप्रदायभेदाचे मूळ असते. हे त्यांनीं जाणले होते. तसेंच गुरुभक्ति, वैराग्य, प्रपंचत्याग, पश्चात्ताप, भक्ति, ईश-कृपा इत्यादि कित्येक वादग्रस्त मुद्द्यांवर मतभेद होणे. अपरिहार्य असल्या-मुळे, अशा मतभेदामुळे कोणीही भारतवर्षीय ब्राह्मसमाज सोडण्याचे कारण नाहीं, असेंही त्यांनी सांगून ठेवले. आणि आपल्या अधिकाराची सूत्रे आपले सहकारी बालमित्र बाबू प्रतापचंद्र मुजुमदार यांच्या स्वाधीन करून केशव-चंद्र, बरोबर बरेच तरुण विद्यार्थी घेऊन विलायतची सफर करण्यास निघून गेले. खिस्तीलोक व खिस्तीधर्म ह्यांत असावा तसा मेळ त्यास येथें दिसला नाहीं. तेव्हा थेट इंग्लंडातील समाजांत तो कसा आचरला जातो, हेंही पाहण्याची त्यास उत्कंठा होती. बायबल आणि शेक्सपीअरचे ग्रंथ हे त्याचे अत्यंत आवडीचे ग्रंथ होते. बायबल आणि शेक्सपीअर हे आत्मसात् केल्याने मनुष्य केवळ अलौकिक होतो, असें ते वारंवार म्हणत. तेव्हां त्या दृष्टीने ह्या त्यांच्या प्रयाणास भाविकाच्या यात्रेचेंच स्वरूप आलें होतें.

अशा रीतीने, त्याच्या ध्येयरूप झालेल्या विलायतेस ते गेल्यावर, तेथें त्यांचा अत्यंत गौरव झाला. त्यावेळच्या अँग्लो-इंडियनाचे पुढारी व पूर्वीचे येथील व्हॉइसरॉय लॉर्ड लॉरेन्स, हे केशवचंद्राचे मोठे चहाते असल्यामुळे, विलायतेत केशवचंद्राच्या आतिथ्याचा त्यांनी पत्कर घेतला. विलायतेतील एकेश्वरीपंथाचे एक उत्साही चिटणीस, ह्या भारतीय ब्राह्म-पुढाऱ्याच्या पाहुण-चारात सारखे तत्पर राहिले. कित्येक तरुण सामाजिक (friendly) स्त्रिया तर केशवचंद्र सेन रहातात कसे, ते चहा केव्हां घेतात, काय खातात, केव्हां खातात, त्यांच्या आवडी कोणत्या, त्यांचा दिनक्रम कसा ह्यांबद्दलची हस्त-पत्रके छापून, तीं केशवचंद्र ज्या गांवी जावयाचे असतील, त्या त्या गांवीं अगोदर पाठवीत असत. इंग्लंडात गेल्यावर तेथील बडे बडे तत्त्ववेत्ते मॅक्स्-मुल्लर, जॉन स्टुअर्ट मिल्ल, प्रो० न्यूमन, जेम्स मार्टिनो अशानी त्यांच्या भेटी घेतल्या, ग्लॅडस्टनसारख्या थोर मुत्सद्द्यांनीं त्यास उपाहारास बोलाविलें. इतकेंच काय, पण त्या वेळची सार्वभौम बादशाहीण महाराणी व्हिक्टोरिआ ह्यांनींही खुद्द राजवाड्यांत त्यांचा पाहुणचार केला. तेव्हां केशवचंद्र सेनांनीं

आपल्या बायकोचा फोटो राणी सरकारांस नजर केला. त्यांनींही त्याचा मेहरबानीने स्वीकार करून शिवाय केशवचंद्र सेनांचाही फोटो मागून घेतला. व शिवाय महाराणीनें आपली दोन पुस्तकें केशवचंद्रांस, स्वतांचे सहीनिशी, नजर केलीं.

ह्या मानमान्यतेच्या गहजबाने केशवचंद्र सेन इंग्रजांचे कायमचे शरमिंधे झाले. त्यामुळे पुढे पुढे त्याच्या स्वामिभक्तीस इतका ऊत आला कीं, आज त्यांचे तत्संबंधीं उद्गार कोणासही हास्यास्पद वाटल्यावांचून राहणार नाहीत. खिस्त, खिस्तीधर्म आणि एकेश्वरी ब्राह्मसमाज ह्यांसंबधी इग्लंडांत त्यांनी जी व्याख्यानाची झोड उडविली, त्यावरून सर्व हिंदुस्थान व नंतर सारा आशिया लवकरच खिस्ती होणार, अशी इग्लंडांतील पोक्त व विचारी माणसासही फार आशा वाटूं लागली. खिस्तभक्त राजा राममोहन काय, किंवा येशुदास केशवचंद्र काय, ह्यांचे जें इंग्लंडांत अपूर्व आदरातिथ्य झाले, त्यातील रहस्य हेच असावे कारण, त्याच केशवचंद्रानी जेव्हां हिंदुस्थानासंबधी इग्लडचे कर्तव्य, ह्या विषयासबंधीं दोन केवळ सामोपचाराच्या गोष्टी इंग्लडातील एका व्याख्यानांत सांगितल्या, तेव्हा त्यांच्यावर टीकाचा नुसता भडीमार झाला ! इतकेच नव्हे. तर एका इंग्रज बहाद्दराने तर उद्दामपणानें असे जाहीर केले कीं, माझ्या हातात हंटर (चाबूक) असतां, केशवचंद्रांचे ते व्याख्यान कोणाची हिम्मत असेल, त्याने मजपुढे वाचून दाखवावे ! त्यास पाचशे रुपये इनाम मिळेल !

असो. याप्रमाणे केशवचद्रांस इंग्लंडांत असतां, तेथेही भल्याबुऱ्या माणसांचे अनुभव येऊन गेले. तथापि एकंदरीत त्यांचा तेथे गौरवच झाला, यांत शंका नाहीं. ह्याप्रमाणें थोरा-मोठ्यांकडून मानमान्यता मिळवून केशवचंद्र सेन सुमारे नऊ महिन्यांनीं स्वदेशीं परत आले. तेथून परत येताना एकेश्वरी समाजाचे पुढारी चॅनिंगसाहेब यांस त्यांनीं असे कळविले कीं, पूर्व पश्चिमयोग व्हावा, असाच ईश्वराचा संकेत मला दिसतो, कालाची मला अनुकूलता आढळते. आणि माझ्या ह्या विलायतेच्या सफरीनें तर माझी अशी खात्री झाली आहे कीं, साऱ्या विश्वासच आपले घर समजून सर्वांवर बंधुभगिनीप्रमाणे प्रेम करणें, ही गोष्ट अगदीं शक्य आहे. ह्या उद्गारांत औपचारिक भाग बराच असावा, असें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

केशवचंद्रांचें स्वदेशी स्वागत करण्याचा पहिला मान मुंबईच्या प्रार्थना-समाजास लाभला. केशवचंद्रांनीं इंग्लंडमधील आपले अनुभव प्रथम मुंबई-करांस निवेदन केले. त्यावरून येशू ख्रिस्ताचा पश्चिमनिवास त्यांस कांहीं बाबतींत स्पृहणीय तर कांहीं बाबतीत तिरस्करणीय वाटला असावा, असें दिसते. इंग्लंडांत ख्रिस्तीधर्माचा उत्कर्ष पहावयास मिळेल, असे त्यांस वाटले होते, त्यांत वास्तविक त्यांची पूर्ण निराशा झाली होती ! हिंदुस्थानातील पंथभेदाला विटलेल्या केशवचद्रास बारीकशा इंग्लड देशांत ख्रिस्तीधर्माचे अडीचशे पोटभेद आढळले ! आणि इंग्लडपासून काही तरी शिकण्याच्या बुद्धीनें जे तेथे गेले, ते खास इंग्लंडच, धर्म, आचार, आणि विचार ह्या बाबतींत अद्याप जवळ जवळ रानटी स्थितीत आहे, असे पाहून परत फिरले ! नाही म्हणायला, इंग्लंड राष्ट्रीयदृष्ट्या आमचें कल्याण करीलच करील, ही एकच भावना त्यांनीं आपल्या उराशी धरली होती परतु त्यासंबंधीही ते आज हयात असते, तर त्यांनी काय उद्गार काढले असते, हे त्याच्या त्या वेळच्या उद्गारावरून दिसून येईल. केशवचद्र म्हणतात कीं, ‘लोकाचा आतां असा समज होऊं लागला आहे की, हिंदुस्थान ही एक पवित्र ठेव आहे. ह्या देशाचें कल्याण व्हावे, म्हणून ईश्वराने ही ठेव केवळ भरवशाचे पालक म्हणून इग्रजांचे ताब्यांत दिली आहे. व ते त्याबद्दल ईश्वरास जबाब-दार आहेत...... पण हिंदी जनतेशी दळणवळण ठेवून त्यांच्यावर राजकीय सत्ता गाजविण्यांत जर इंग्लंडची केवळ द्रव्यदृष्टिच असेल, आणि (केशवचद्र पुढे म्हणतात) आध्यात्मिक जीवनाच्या महत्त्वाच्या सुधारणा जर इंग्लंड हिंदी लोकांवरच सोंपवीत असेल, तर मी असे म्हणेन की, ब्रिटशाचा ह्या क्षणीं नायनाट झालेला पत्करला !’ वरील उद्गारांत वक्त्याचे इंग्लंडसंबंधीं विलक्षण आशावादित्व दिसून येते. आधिभौतिक आणि आध्यात्मिक दोन्ही दृष्टींनी इंग्लंड आम्हांस तारक होईल, अशी त्यांस उमेद होती. Onward, Forward, Heavenward, पुढे व्हा, प्रगति करा आणि स्वर्ग गांठा ! हा पाश्चात्यांचा निरोप त्यांनी हिंदुस्थानवासीयांस प्रथम मुंबईस सांगितला. आणि आपल्या बगालप्रांतीं गेल्यावर, त्यांनीं सामाजिक सुधारणांचीं कित्येक विलायती रोपें तेथे रुजविण्याचा खटाटोप चालविला.

केशवचंद्रांच्या विलायतच्या यशस्वी सफरीने त्यांच्या येथील लौकिकांतही

स्वाभाविक भर पडली, आणि त्या योगानें त्यांचा कार्याचा उत्साह द्विगुणित झाला. विलायतेतून आल्यानंतर केशवचंद्रांनीं तेथील अनुभवाचा फायदा घेऊन एक भारत-सुधारक-मंडळ (Indian Reform association) ह्या नांवाची संस्था इ. सन १८७० च्या आक्टोबरांत निर्माण केली. ह्या संस्थेचे सारे उत्पादक ब्राह्म असून, अध्यक्ष खुद्द केशवचंद्र सेन हेच होते. तरी ही संस्था ब्राह्मसंप्रदायापेक्षां अधिक व्यापक असल्यामुळे, ह्या संस्थेने सर्व धर्मांच्या लोकांची सहानुभूति संपादन केली. हिच्या पहिल्याच वार्षिक समारभाचे वेळी पहिला ठराव कलकत्याचे बिशप डॉ० मिलमन ह्यांनी पुढे आणला, व त्यास अनुमोदन दुसरे एक नेटिव ख्रिश्चन डॉ० मूरे ह्यांनीं दिले. ह्या संस्थेने भूत-दयेचीं कामे, स्त्री-शिक्षण, उच्च शिक्षण, औद्योगिक शिक्षण, मद्यपाननिषेध आणि सुलभ-वाङ्मयप्रसार ही कार्यें हाती घेतलीं. इ. सन १८७० सालीं केशवचंद्रांचा 'सुलभ समाचार' सुरू झाला, व तो विशेष लोकप्रियही झाला. केशवचंद्रांचे प्रतिष्ठित स्नेही व शिष्य जनलज्जा सोडून रस्तोरस्तीं 'सुलभ समाचार' घेऊन विक्रीकरिता हिंडूं लागले. पंडित शिवनाथशास्त्री ह्या अनुभविक विद्वानाच्या संपादकत्वाखाली 'मद्य की गरल' ह्या नांवाचें एक मासिक सुरू झाले. स्त्रियांच्या 'वामाहितैषिणी' सभा निर्माण झाल्या. सुतार व लोहार कामांच्या वर्गांत खुद्द केशवचंद्र काम करूं लागले. आणि इतके सर्व खटाटोप सुरू असतांच, केशवचंद्रांनीं आपले योगावरील एक नवीन पुस्तक प्रसिद्ध केलें.

ह्याप्रमाणें केशवचंद्र सेन इकडे लोकोपयोगी कामांत गढले असतां, देवेंद्रनाथ ठाकूर हे आपली हिमालयाची सफर पुरी करून स्वगृहीं परत आले. केशवचंद्रांच्या भारतीय ब्राह्मसमाजाचा उत्कर्ष होत असलेला पाहून त्यांस आनंद झाला. केशवचंद्र सेनांशीं त्यांचे मतभेद होते, तरी त्यांच्या नवीन समाजमंदिरास देवेंद्रनाथांनीं मोकळ्या मनाने मदत केली होती. हिमालयांतून परत आल्यावर, त्यांच्या वारवार भेटी होत. त्या वेळीं दोन्ही समाज कांहीं शर्तीवर एकत्र करण्याचीही वाटाघाट सुरू झाली. परंतु दोन्ही समाजांच्या सभासदांचीं मनें एकमेकांविषयीं असावीं तितकीं आदरयुक्त नव्हतीं. अशा स्थितींत समेटाचा देखावा करण्यांत कांहीं अर्थ नाही; असें आदि-ब्राह्मसमाजी मंडळीचे मत पडले. दोन्ही समाज वेगळे पडल्यास सात वर्षें होऊन गेलीं होतीं. तेव्हां दोन्ही समाजांत पुन्हा सलोखा होण्यासाठीं दोन्ही समाजांनीं आपले वार्षिक

उत्सव माघी एकादशीच्या दिवशीं न करितां, आदि-ब्राह्मसमाजाने एकादशीचे दिवशीं व भारतवर्षीय समाजानें दुसऱ्या एखादे दिवशीं, याप्रमाणे साजरे करावे, म्हणजे उभय समाजांतील सभासदांस एक दिवस तरी एकत्र जमतां येईल. असे देवेंद्रनाथांनी सुचविले, परंतु तोही योग जमला नाहीं. पण इ. सन १८७१ सालीं देवेंद्रनाथांनीं भारतवर्षीय समाजांत येऊन व्याख्यान द्यावे, अशी केशवचंद्रानी विनंति केली देवेंद्रनाथ त्याप्रमाणे गेलेही. आणि आता त्यांच्या गंभीर व ओजस्वी वाणींतून आपल्याला काही ऐक्यवर्धक असा बोध ऐकण्यास मिळेल, अशा उत्सुकतेने केशवचंद्र व त्याचे अनुयायी जमले असतां, देवेंद्रनाथांनी आपल्या अधिकारयुक्तवाणीने केशवचंद्र व त्याचे अनुयायी याच्या खिस्त व खिस्तीधर्म ह्याकडे असलेल्या ओढ्याबद्दल त्याची कानउघडणी केली. 'तुम्ही एकतर खरे खरे ब्राह्म असा, नाहीं तर उघड खिस्ती व्हा. दोन्ही पंथाचा सावळागोंधळ करण्याच्या भरीस पडूं नका', असें त्यांनीं सर्वांस बजावून सागितले हे त्याचे व्याख्यान केशवचंद्रप्रभृति मंडळीस आवडले नाहीं. आणि एकी न साधता त्या व्याख्यानाने बेकी मात्र कायमची झाली. गरम रक्ताच्या सुमारे साठ ब्राह्मानीं तर महर्षीचा उघड लेखी निषेध प्रसिद्ध केला! तथापि त्याने दोन्ही पुढाऱ्याच्या एकमेकांवरील प्रेमांत शेवटपर्यंत अंतर पडले नाही, असे पुढील अनुभवावरून दिसते.

वरीलप्रमाणे भारतवर्षीय समाजाची कमीअधिक प्रमाणाने महत्त्वाची कामें सुरू असतां, ब्राह्मसमाजांत एक अत्यंत वादग्रस्त प्रश्न उपस्थित झाला. ब्राह्मसमाजात दुफळी होण्याच्या पूर्वींपासूनच भिन्न जातींतील विवादास सुरुवात झाली होती. त्यानतर कट्टर सुधारकांचा जेव्हां नवीन ब्राह्मसमाज अलग पडला, तेव्हा तर त्यांनीं लग्नकार्यातील सर्व आवश्यक हिंदुसस्कारास व विधीस फांटा दिला. परतु ह्या आपल्या स्वैराचाराचा परिणाम, आपली भावी प्रजा बेकायदेशीर ठरण्यात होणार आहे, ह्या गोष्टीचा विचार त्या उत्साहभरांत कोणीं केला नाही. परतु पुढे सर्व कायदे-पंडिताच्या विचारें हे ब्राह्माचे लग्नविधि बाष्कळपणाचे व गैरकायदेशीर ठरून, अशा विवाहाची संतति कायदेशीर वारस ठरत नाहीं, असे निश्चित झाले. तेव्हां ब्राह्ममंडळींत मोठीच गडबड उडाली. तेव्हां धर्मसंस्कारविहीन इतकेच काय, पण धर्माज्ञेविरुद्ध भिन्न जातींतील ब्राह्मांचे लागलेले प्रीतिविवाह, कायदेशीर ठरवून घेण्याकरितां

नवीन कायदा घडविण्याच्या खटपटीस केशवचंद्र सेनांस लागावे लागले. त्यांचे हिंदुस्थानसरकारापाशीं बरेंच वजन होते. यामुळे सरकारची जरी त्यांस मदत होती, तरी ह्या कामी प्रथम सनातनधर्मीयांकडून व मागून आदि-ब्राह्मसमाजाकडून त्यांस तीव्र विरोध झाला. सरसहा सर्व हिंदु समाजांत असे अशास्त्रीय विवाह कायदेशीर ठरल्यास त्या योगाने वर्णसंकर होऊन समाजाचा व्यवस्थितपणा बिघडून जाईल, हा सनातनधर्मीयांचा आक्षेप होता. तो सर्व स्थानिक सरकारांनी हिंदुस्थानसरकाराकडे कळविला. आणि त्यांस तो योग्य दिसून आल्यावरून, नवीन कायदा 'ब्राह्म मॅरेज ॲक्ट' या नांवाने फक्त ब्राह्म-लोकांसच लागू व्हावा, अशी योजना करण्यांत आली. परंतु आम्ही ब्राह्म असूनही आमचे विवाह अशास्त्रीय नाहीत, असे आम्हास वाटते. आणि रजिस्ट्रारपुढे जाऊन लग्नाची नोंद करणे, ही पद्धत आम्हास अप्रशस्त वाटते. आम्हास ह्या कायद्याची जरूर नसल्याने कायद्याची अतिव्याप्ति होऊन आमची लग्ने, हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे कायदेशीर असूनही, ह्या ब्राह्म कायद्याप्रमाणे गैरकायदेशीर ठरतील, अशी आपत्ति येऊ नये, असे आदि-ब्राह्मसमाजाचे म्हणणे पडले. आदि-ब्राह्मसमाजाची मंडळी आपल्याकडील लग्नविधींत सप्तपदी आदिकरून हिंदुधर्मशास्त्रातील विधि मुख्याशाने पाळीत असत. आणि ब्राह्म असूनही, आपण हिंदु आहोत, ह्या गोष्टीचा अभिमान सोडण्यास ते तयार नव्हते. ब्राह्म-मॅरेज-बिलांतील लग्नविधींत ईश्वराचे नावही नव्हते. रजिस्ट्रार नावाच्या माणसाच्या साक्षीने लग्न लावण्यापेक्षा ईश्वरसाक्ष लग्न लावणे हेच खरे पवित्र आहे, असे आदि-ब्राह्मांचे मत होते. तेव्हा ब्राह्म मॅरेज ॲक्टाने त्यांच्या विवाहांस बाध येऊ नये, ही त्यांस काळजी होती. लक्षात घेण्यासारखी गोष्ट ही कीं, ब्राह्म मॅरेजबिल आणणारे कायदेपंडित फिट्स् जेम्स् स्टीफन्ससाहेब ह्यांसही हिंदुविवाहपद्धतीतील सप्तपदीगमन हा विधि इतका मार्मिक वाटला कीं, तो खिस्ती लोकांनींही पाळावा, असे त्यांनी सुचविले. उलटपक्षी सप्तपदी, कन्यादान वगैरे हिंदूंचे सारे शास्त्रीय विधि वर्जून हिंदुसुधारक मुंबई, मद्रास, लखनौ वगैरे ठिकाणीं आपले विवाह करीत होते !

असो. शेवटीं पुष्कळ वादविवाद व फेरबदल झाल्यानंतर सन १८७२ चा तिसरा नेटिव्ह मॅरेज ॲक्ट पसार झाला. त्याने दुसऱ्या कायद्याप्रमाणें व

रूढीप्रमाणे होणारे विवाह गैरकायदा न ठरवितां त्या कायद्याप्रमाणें होणारे विवाह मात्र कायदेशीर ठरविले. चवदा वर्षांपर्यंत मुलीची* व अठरा वर्षांपर्यंत मुलाची विवाहमर्यादा वाढविली. बहुभार्याविवाह गैरकायदा ठरविले. घटस्फोट कायदेशीर केला. विधवाविवाह व भिन्न जातींतील विवाह मंजूर केले, व अप्रत्यक्ष रीतीनें हिंदुविवाहसंस्कारांतील धार्मिक विधीस फांटा दिला. यामुळे ब्राह्म सुधारकास आपण मोठाच विजय संपादन केल्याप्रमाणे वाटले. परंतु त्या कायद्याच्या अमलाखालीं जाणाऱ्या इसमानें 'मी कोणताच धर्म मानीत नाहीं'. अशी प्रतिज्ञा करावी लागे. त्यामुळें ते लोक सनातन हिंदुधर्माला कायमचे मुकले. हे पाहून हिंदुधर्माभिमान्यास व कित्येक ब्राह्मासही दुःख झालें! उभयतामधील दुफळी ह्यापुढें कायद्यानें कायमची केली! हल्लीं पुन्हा ह्या कायद्याच्या दुरुस्तीची वाटाघाट सुरू आहे त्यासंबंधी उल्लेख पुढें येईल.

वरील रीतीनें हिंदुधर्म-बहिष्कृत झालेल्या ह्या मंडळींनीं लवकरच भारताश्रम ह्या नावाची एक नवीन संस्था अस्तित्वात आणली. ब्राह्मसमाजाच्या अनेक सभासदांनी सहकुटुंब सहपरिवार एकत्र राहून सर्वांचें मिळून एक मोठें एकत्र कुटुंब करावें; सर्वांनी जेवणखाण, बसणंउठणें, एके ठिकाणी करावें, एका शिस्तींत सर्वांनी राहावें, आश्रमातील विद्वान पुरुषांनी आश्रमातील लहानमोठ्या स्त्रियास सुशिक्षित करावें, व पुरुषांनी श्रमविभाग करून आपल्या कुटुंबाच्या खर्चाच्या मानानें हिस्सेरशीनें पैसे पुरवावे, अशी ह्या आश्रमाची कल्पना होती. स्वेच्छेनें सर्व धर्मसंस्थास सोडून बाहेर पडलेल्या अल्पसंख्याक व समानशील कुटुंबात, संघटनेबद्दल अशी उत्सुकता वाटणें, साहजिक होतें. ह्याप्रमाणें केशवचंद्र सेनाच्या छत्राखालीं सुमारें पंचवीस ब्राह्मकुटुंबें एकत्र नांदू लागलीं. परंतु ही व्यवस्था फार दिवस टिकली नाही. लवकरच आतल्या आत धुसपूस व भांडणें सुरू झालीं. आणि असेच काही निंद्य व अनिष्ट प्रकार घडून आल्यामुळे, किंवा निदान तसे आरोप उघड उघड होत गेल्यामुळे, भांडणाची

---

* ह्या कामीं भारतसुधारकमंडळानें निरनिराळ्या डॉक्टरांचे अभिप्राय मागविले. मुंबई प्रार्थनासमाजाचे अध्यक्ष डॉ० आत्माराम पांडुरंग यांनीं मुलीचे वय लग्नाच्या वेळीं कमींत कमी वीस वर्षांचे असावें, असें कळविलें. प्रौढपणाची इतकी मर्यादा दुसरी कोणीच वाढविली नाहीं.

मजल कोर्टदरबारापर्यंत गेली. यामुळें हा नूतनआश्रम सुमारें पांच वर्षांच्या अनुभवानंतर नामशेष झाला.

केशवचंद्र सेन ह्यांना नवीन नवीन संस्था काढण्याचे वेडच होतें म्हणा; अथवा सांप्रदायिकांचा उत्साह कायम ठेवून, चोहोंकडे आपल्या समाजाचा बोलबाला वाढता ठेवण्याकरितां जरूर वाटले म्हणून म्हणा, एकामागून एक संस्थेच्या उतरंडी रचण्याचा त्यांचा क्रम अव्याहत सुरूच होता. आतां काय ब्राह्म-शाळेचा पुनरुद्धार करून त्यांत "Tolloch's Theism, Morell's Philosophy of Religion, MacCosh's Intuitions, Cousins history of Philosophy, Butler's Analogy and the New Testament." अशा सर्वथैव विदेशीय ग्रंथांतून परीक्षा सुरू केल्या. आतां काय संगतसभा पुन्हा जिवंत करून तिचे 'धर्मसाधन' नांवाचे नियतकालिक सुरू केले. त्यानंतर इ. सन १८७२ सालीं आपल्या अध्यक्षतेखालीं प्रचारकाच्या परिषदेची संघटना केली. पुन्हा एकेश्वरी मित्रसमाज अस्तित्वांत आणला. तसेच भारत आश्रमाप्रमाणे ब्राह्म विद्यार्थ्यांकरितां ब्राह्मनिकेतन संस्था काढली. ह्याशिवाय दैनिकापासून तों वार्षिकापर्यंत कित्येक नियतकालिकपत्रे व लहान पत्रकें, कॅलेंडर्स, डायरी, वगैरे काढलीं ती वेगळींच. अशा रीतीने आपल्या अनुयायांच्या उत्साहात वरचेवर भर टाकीत असताही, तरुण मंडळीत केशवचंद्र सेनांसंबंधीं आदर हळुहळू कमीच होत चालला.

ब्राह्म-मंदिरांत प्रार्थनेच्या वेळीं स्त्रियांना बसण्याकरितां पडद्याची वेगळीच जागा केलेली असे. परंतु तरुण हौशी मंडळींस हे आवडेना. स्त्रियाच्या समान हक्कास ह्याने बाध येतो, सबब आम्ही आपल्या घरच्या स्त्रियांस पडद्यांतून काढून पुरुषमंडळीतच घेऊन बसणार, असा कित्येकांनीं आग्रह धरला. आणि ब्राह्मसमाजांतील वरिष्ठाच्या मर्जीची परवा न करतां, त्यांनीं आपल्या म्हणण्याप्रमाणे अम्मलबजावणीही केली. तात्पर्य, अबलोन्नतीच्या कामीं केशवचंद्र ह्यांस त्यांचे तरुण अनुयायांच्या चालीने चालतां न आल्यामुळे, पुढारी ह्या नात्याने त्यांच्यासंबंधी आदर कमी होत चालला. स्त्रीशिक्षणाच्या पुरस्कर्त्यांत बोस, दास आणि गांगुली हे पुढारी होते. स्त्रीशिक्षणासंबंधीं केशवचद्रांचे विचार इतर मंडळींहून भिन्न होते. गणित, तत्त्वज्ञान, आधिभौतिक शास्त्रें, इत्यादि उच्च प्रतीचें शिक्षण स्त्रियांना देऊं नये, असे त्यांचें मत

होतें. अबलोन्नति करण्याच्या भरांत अबलांच्या सबल पुरुषी बायका बनवूं नये, असे त्यांचें म्हणणे असे. स्त्री-स्वातंत्र्यासंबंधींही त्यांची कल्पना फार मर्यादित होती. झनानापद्धतींत होणारा स्त्रियांचा कोंडमारा जरी त्यांस नको होता, तरी आर्यस्त्रियांची मर्यादा त्यांस स्पृहणीय वाटे. स्त्रियांनीं अगदींच पुरुषांबरोबर वावरणे त्यांस पसंत नव्हते. त्यास प्रौढविवाह पाहिजे होते. तरी विवाहसंकल्प साखरपुडा करून बालपणींच कायम करावा, असे त्यांचे मत असे. प्रौढ प्रीतिविवाहांतील वल्लभोपासना आणि प्रियाराधना, हे पाश्चात्य समाजांतील प्रकार त्यांस अत्यंत गर्हणीय वाटत. विवाहग्रंथि म्हणजे काही सामाजिक बंधनाचा करार नव्हे. एका हयातींत एकदांच ही ग्रंथी जुळावयाची असते. ह्यास्तव पुरुषानीं किंवा स्त्रियानीं कोणीच पुनर्विवाह करू नये, असे त्याचें स्पष्ट मत होते. तसेच भिन्न जातीतील विवाह ते कधीच स्तुत्य मानीत नसत. ब्राह्मांनीं मुद्दाम वर्णसंकर करावा, अशा मताचे ते नव्हते. उलट होता होईतो, आपआपल्या जातीतच विवाह करावा, असा त्यांचा अभिप्राय होता.

परंतु ह्या गोष्टी कट्टर सुधारकांस व स्त्री-स्वातंत्र्याच्या चाहत्यास मुळींच पटल्या नाहीत. तो सुधारणेचा मनु होता, हें मागे दर्शविलेच आहे ह्यामुळे मतभेद उत्पन्न झाले. फूट सुरू होण्यास आणखी कारणे होतीच. ब्राह्मसमाजांतील केशवचंद्र सेन ह्यांच्या निमित्ताने विभूतिपूजेचे प्रस्थ वाढूं लागलेले कित्येकांस मुळींच पसत नव्हते. तसेच त्या नवीन समाजसंस्थेत संघटनेच्या दृष्टीने कांहींच व्यवस्था नव्हती. ह्या कारणास्तव सन १८७४ सालीं ह्या समाजशाखेतून " समदर्शी-मंडळ " ह्या नांवाची एक उपशाखा निर्माण झाली. त्यांनीं आपले 'समदर्शी' नामक स्वतंत्र वर्तमानपत्र पंडित शिवनाथशास्त्री याच्या संपादकत्वाखाली सुरू केले; आणि त्यांतून केशवचंद्र सेनांच्या कित्येक आवडत्या सिद्धान्तांवर वादविवाद सुरू झाले. केशवचंद्र सेनांनीही आपल्या 'संडे मिरर' पत्रात शेलक्या शब्दानीं त्यांचा समाचार घेण्यास कमी केलें नाहीं.

समाजांतील केशवचद्र सेनांच्या माहात्म्यास अशा रीतीनें विरोध उत्पन्न होऊं लागला, तस केशवचंद्र सेनांनीं आपले वागण्याचे धोरण बदलले. जिकडे तिकडे दणदणाट करून सोडणाऱ्या त्यांच्या सामाजिक चळवळी मंदावल्या. भारताश्रमांतील अब्रुनुकसानीच्या खटल्याने त्यांचे डोळे चांगलेच उघडले. आपले

अनुयायी आचरणांत किती ढिले आहेत, त्यांची मने किती विकारवश आहेत, प्रपंचासक्तीने कसे सर्वांस घेरले आहे, इत्यादि गोष्टींचे कटु अनुभव आल्यामुळे, मनोनिग्रह, वैराग्य व आचारशुद्धि यांचे पुरे महत्त्व त्यांस कळूं लागलें. एखाद्या विरक्ताप्रमाणे ते एकान्तात काळ घालवू लागले. त्यांच्या प्रार्थनांतून वैराग्य व दुःख ह्यांची छाया पसरली. धातूचे पात्रास स्पर्श करावयाचा नाही, हातांत कमंडलु घ्यावयाचा, स्वतांचे अन्न स्वतां शिजवावयाचे, आणि शेवटल्या माळ्यावर एकान्तात एकतारीवर भजन करीत बसावयाचे, असा त्यांचा क्रम सुरू झाला त्याच्या पट्ट-शिष्यानी ह्यांतही त्याचे अनुकरण करण्यास कमी केले नाहीं. तेव्हा ध्यानधारणेसाठी एकान्तवास मिळावा, म्हणून त्यांनीं मोरपुकुर ह्या खेडेगावांतील एक बाग विकत घेतली, आणि त्या बागेस "साधनकानन" असे नांव ठेवून, तेथे ते आपल्या अनुयायांसह ध्यानधारणादि साधनमार्ग आक्रमू लागले. त्या-नतर कलकत्याच्या ब्राह्म-प्रार्थनामंदिरात उपासना करणारे ते ब्राह्म सुधारक, कोणी तीन दगडावर आपला स्वयपाक करीत आहेत, कोणी पाणी काढीत आहेत, कोणी पर्णकुटिका बांधीत आहेत कोणी आपला आश्रम सारवीत आहेत, तर कोणी विशाल वृक्षांखाली व्याघ्रांबरावर बसून ध्यानयोगाचा अभ्यास चालविला आहे, अशा सन्यस्तवृत्तीने साधनकाननात राहूं लागले. केशव-चंद्रांनीं आपल्या अनुयायाचे योगी, भक्त, ज्ञानी व सेवक असे चार वर्ग करून ते त्या त्या वर्गातील शिष्यास तदुचित अभ्यास शिकवू लागले. आणि अशा रीतीने एकेश्वरीपंथाच्या धुतलेल्या सप्रदायपटावर जुन्या हिंदु, मुसलमान, व खिस्तीधर्मातील धर्मवेड म्हणून गणलेल्या कित्येक लौकिक-आचाराची छटा वरचेवर उमटू लागली. त्यानी आपल्या शिष्यांस हिंदु, खिस्ती, महमदी व बौद्ध यांचा अभ्यास करण्यास लावले, आणि धर्ममतप्रवर्तनात आपण येथेच न थांबतां पुढे अघाडी मारणार, अशी निश्चित प्रतिज्ञा केली.

केशवचद्र सेन हे स्वता तत्त्वज्ञानी नव्हते. त्यांनी पाश्चिमात्य अगर पौर्वात्य यांपैकी कोणत्याच तत्त्वज्ञानाचा आस्थापूर्वक अभ्यास केलेला नव्हता. तथापि ते फार बुद्धिमान् व भावनाप्रधान असल्यामुळे, ते दर महिन्याला कांही तरी नवीन टूम काढीत. त्यांच्या वृत्तीतील हा विक्षिप्तपणा आणि त्यांची निरंकुश महत्त्वाकांक्षा यांचा मेळ घालणें कित्येक वेळां कठीण जाई. साधनकाननांत सुरू

केलेले क्षौर-मुंडण, ध्यान, योग, भजन, कीर्तन, इत्यादि-प्रकार वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होऊ लागले. तेव्हां ह्या सर्व गोष्टींचा परिणाम राज्यकर्ते जे साहेब-लोक याच्या मनांवर काय होईल, याची चिंता वाटून केशवचंद्रांस त्याची सफाई करण्याचा पुष्कळच खटाटोप करावा लागला. आमच्या साधनकाननात आम्ही लोकांचे आक्षेपास पात्र होईल, असे कोणतेही जुने विधि करीत नसतो, वगैरे मजकूर प्रसिद्ध करून स्वताच्या आचारांचे धिटाईने समर्थन न करिता, निषेधच करण्याचा कुटिल मार्ग त्यास स्वीकारावा लागला! कारण इकडे साधनकाननांत सन्यस्त वृत्ति धरली असता आलबर्ट हॉल इन्स्टिटयूट बांधण्याची त्याची जबर महत्त्वाकांक्षा कायमच होती. त्यासाठी त्याचे दीर्घोद्योग सुरू होते, आणि त्या कृत्यास सरकारी अमलदार व श्रीमान् याच्या सक्रिय सहानुभूतीची जरूरी असल्यामुळे, त्यानी आपल्याला खुळयात काढूं नये, अशी केशवचंद्रास काळजी वाटत असे. सुदैवाने त्यानी आपल्या दोन्हीही महत्त्वाकांक्षा हळुहळू पुऱ्या केल्या. त्याचा आलबर्ट हॉल लवकरच तयार झाला, आणि योग व भक्ति ह्या दोन खांबावरची त्याच्या धर्माची इमारतही हळुहळू उभारूं लागली. केवळ भक्ति अथवा नुसता योग ह्यानीं मी मार्गच्युत झालो असतो, परंतु उभयताचे संयोगाने ईश्वरीप्रेमाच्या बागास बहार आला आहे, असे ते म्हणतात. प्रार्थना हा त्याचा अत्यंत आवडीचा विषय होय. त्याच्या प्रार्थना त्या काळी आबालवृद्धांत विशेष लोकप्रिय झाल्या होत्या. प्रार्थनेत व संकीर्तनात ते फार रंगून जात. त्याच्या प्रार्थनेचा जाब त्यास ईश्वराकडून हमेश मिळत असे, आणि त्याप्रमाणे ते आपले वर्तन ठेवीत, असे ते म्हणतात. खिस्ताचे खालोखाल श्रीचैतन्य हे त्याचे इष्टदेव होते. ते नाममंत्राचा जप करीत. त्यांनी त्यासाठीं स्वतंत्र नामावळी तयार केल्या होत्या. पूजादि विधि-विधानाची त्यांस हळुहळू गरज भासूं लागली. व ते त्या विधींतही रगू लागले. साधी व वैराग्यशील रहाणी त्यांस आवडे ही गोष्ट अगदीं खरी असली, तरी त्यांचे बाह्य देखाव्यांत दैन्य व दिमाख यांचे विलक्षण मिश्रण असे.

पुढे केशवचंद्रांचें साधनकानन लवकरच सुटले, व त्यांनीं "लिली कॉटेज" नामक एक प्रशस्त इमारत विस्तृत आवारासह विकत घेतली. हें लिली कॉटेज म्हणजे एक गोपीचंदाचा राजवाडाच होता. त्याच्याच शेजारीं

केशवचंद्रांचे उजवे हात प्रतापचंद्र यांनी आपले 'पीस कॉटेज' बांधले, आणि हळुहळू ते सर्व आवार केशवचंद्रांच्या अनुयायांची मंगळवाडी झाली. तात्पर्य, अंगांत कफनी घालून दारोदार भीक मागून आपला स्वयंपाक आपण उकडून खाणारे केशवचंद्र, एका मोठ्या प्रचंड वाड्यात राहूं लागले. आणि त्यांच्या दाराशी घोडागाडी आणि पट्टेवाले खडे झाले. जळके भाडे घासून मशिरलेले हात बडया लाटसाहेबाकडे करण्याचा त्याना वरचेवर प्रसंग असे. आणि अशा कित्येक प्रसंगीं साध्या कफनीचे, साहेबी पोशाखात त्यांस रूपांतर करावें लागे. तेव्हा कालचे फकीर ते हेच काय, ह्याचा लोकांस विस्मय पडे!

ह्या सर्व उद्योगात प्रथम काही वर्षे त्याच्या सहधर्मचारिणीकडे त्याचे असावे तितके लक्ष नव्हते. परतु पुढे ती वृत्ति पालटून त्यानीं आपल्या गृहिणींसही आपली पट्टशिष्यीण केली त्याच्या इतर शिष्यवर्गात प्रायः पचविशीच्या आतीलच उत्साही मंडळी असे. केशवचद्रास लोक काहीं म्हणोत, ते जे जे काही सागतील, व नवीन नवीन विधि अमलात आणतील, त्यास निष्ठापूर्वक अनुसरण्यास ते सदा तत्पर असत. अशा मडळीत विशेषकरून उमानाथ गुप्त, अमृतलाल बोस, विजयकृष्ण गोस्वामी, महेंद्रनाथ बोस, कान्तिचंद्र मित्र, अघोरनाथ गुप्त, त्रैलोक्यनाथ सन्याळ, गिरीशचद्र सेन, गौरगोविंद राय, प्रसन्नकुमार सेन, केदारनाथ डे, दीनानाथ मुजुमदार, प्यारीमोहन चक्रवर्ती, कालीशंकर कविराज, रामचंद्र सिंग, बंगचद्र राय आणि प्रतापचंद्र मुजुमदार, ह्याचा उल्लेख होतो. याच्यासबधी पुढे एका प्रकरणात पुन्हा उल्लेख यावयाचा असल्यामुळे, येथे अधिक विस्तार करीत नाही.

असो. अशा रीतीने ही साधनकाननातील विरक्त मंडळी साधनसंपादन करण्यांत गुंतली असता, व बाहेरची भारतवर्षीय ब्राह्मसमाजातील मंडळी नवीन सघटना करण्याच्या प्रयत्नात असतां, एक विलक्षण प्रकार घडून आला. त्यामुळे त्याच्यामध्ये होऊं घातलेली फूट लवकरच घडून आली. केशवचद्र सेनानीं आपली वडील मुलगी कुचबिहारचे बालमहाराजास दिली. यामुळे सर्व ब्राह्म-समाजांत अतिशय खळबळ उडून गेली. कारण लग्नाच्या वेळीं मुलीचें वय चवदा वर्षांहून कमी असून वराचे वय अवघे पंधरा वर्षांचे होते. अर्थात् ब्राह्मपंथास अत्यत असमत असा तो बालविवाह झाला. शिवाय ब्राह्मसमाजाच्या पुढाऱ्याने—किंबहुना धर्मगुरूने—आपली मुलगी ब्राह्मसांप्रदायाच्या

बाहेरच्या सनातन हिंदुधर्मीयांस देणें, ही गोष्ट ब्राह्मसमाजी मंडळीस लांच्छनास्पद वाटला, आणि त्याहीपेक्षां त्याच्या दृष्टीने अत्यंत आक्षेपार्ह गोष्ट म्हटली म्हणजे, वधूवरांचे लग्न ब्राह्मविधीने न होता हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे झाले. इतकेच नव्हे तर त्या समारंभांत खुद्द मुलीच्या बापास तो धर्मबाह्य असल्यामुळे, बहिष्कृत केले होते व कन्यादान केशवचद्राच्या बधूनी केले ! ह्या गोष्टी केशवचंद्र सेनाच्या संमतीनेच झाल्यामुळे, त्याच्यावर टीकाचा भडिमार झाला. त्याच्या सहकारी मित्रांनीही या वेळी त्यांच्यावर टीकास्त्र उचलण्यास कमी केले नाही. केशवचद्र सेनाकडून हा जो सप्रदायद्रोहाचा अक्षम्य गुन्हा झाला, तो त्यांनी राजघराण्यात आपली मुलगी जाण्याचा योग आला, ह्या मोहास बळी पडून केला, असे जरी कोणी फारसे उघड दूषण दिले नाहीं, तरी केशवचद्र, राजलक्ष्मीच्या मोहाला बळी पडले, असा विचार टीकाकाराच्या डोक्यांत आल्यावाचून राहिला नाही. त्या योगाने केशवचंद्र सेनाचे चारित्र्यास आलेला कमीपणा दूर होणे शक्य नाही, असे म्हणणे भाग पडते. हे लग्न जमल्याची बातमी बाहेर फुटताच ब्राह्मसमाजातील कित्येक पुढाऱ्यानी केशवचद्र सेनांजवळ त्याबद्दल खुलासा विचारला. त्याला त्यानी प्रथम उडवाउडवीचीच उत्तरे दिली. परतु पुढे केशवचंद्राच्या बधूच्या हातून कन्यादान होऊन बहुतेक सर्व विधि (मूर्तिपूजा टाळून) कुचबिहार दरबारने आपल्या उपाध्यायांकडून हिंदु धर्मशास्त्राप्रमाणे व रूढीप्रमाणे घडवून आणला, असे कळले, तेव्हां केशवचंद्र सेनावर ब्राह्मपथी लोकानी मोठाच गिल्ला केला. केशवचद्र सेनाचा खुलासा मुख्यतः इतकाच प्रसिद्ध झाला कीं, हे लग्न जमवून आणण्याचा आपण मुळीच प्रयत्न केला नाही. सरकारकडून सर्व जम जमून आला; तेव्हा तो ईशसंकेत आहे, असे मानून त्यास अनुकूल राहणे. केशवचंद्रांस भाग झाले. तसेच हा विधि साखरपुड्याप्रमाणेच मानण्यांत येईल, असे सरकारकडून अभिवचन मिळाले होते, असेही दर्शविण्यात आले. शिवाय असेही सांगण्यात आले की, लग्नाच्या वेळीं जे विधि पाळावे व जे गाळावे असे ठरले होते, त्याप्रमाणे कुचबिहार दरबारकडून वर्तन घडले नाही, यामुळे फसगत झाली.

ह्या खुलाशाने फारसे कोणाचे समाधान झाले नाही. नवरानवरीच्या बालवयाकडे दुर्लक्ष्य करून इंग्रजी पद्धतीप्रमाणे लग्नापूर्वी त्याच्या अनेकदां भेटी घडविल्या होत्या. व त्यांनीं एकमेकांस पसंतही केलें होते. कुचबिहार-

ची भावी महाराणी म्हणून केशवचंद्रांचे मुलीवर त्यांच्या कलकत्त्याच्या अनेक देशीविदेशी बड्याछोट्या स्नेह्यांनी आशीर्वादांचीं फुलें टाकलीं होतीं. जांवई विलायतेतून जाऊन आल्यावर त्याच्या राज्यांत आपल्या चळवळीस मोठाच पाठिंबा मिळेल, हा मोह कांहीं लहानसहान नव्हता. तेव्हां आतां मागे फिरणें बरें नाहीं, ईश्वर करतो आहे ते सर्व बऱ्यासाठींच करतो आहे, असे मानून केशवचंद्रांनीं आक्षेपकांच्या आक्षेपांकडे पूर्ण दुर्लक्ष्य केलें. त्यांनी जे केले, त्यांत विशेष गैर असे काही नव्हते. पुष्कळ गोष्टींत त्यांचा निरुपायच झाला, आणि शिवाय ईश्वराच्या नियतीनें हा जो योग घडून आला, त्यांत देशाचे अतिशय कल्याण होणार असल्यामुळे, विरोधकांनीं केशवचंद्रांसारख्या पुढाऱ्यांच्या कृत्याकडे वेगळ्या दृष्टीनें पहावयास पाहिजे होते, असे केशवचंद्राच्या पक्षपातियांचे म्हणणें होते. ब्राह्मविधीप्रमाणें लग्न झाले नसले, तरीं ते हिंदु विधीप्रमाणेही आम्हीं होऊं दिले नाही, ह्याचा त्यांस मोठा अभिमान वाटत होता. विवाहहोमाचे वेळीं आम्ही आमच्या मुलीस तेथें बसूंच दिले नाहीं. आणि अशा तऱ्हेनें कुचबिहाबारवाल्यांचा हिंदुपद्धतीनें लग्न पुरें करण्याचा कावा आपण हाणून पाडला, ह्यात प्रतापचंद्रांना मोठा संतोष वाटला. आणि अशा रीतीनें कोणत्याच धर्मविधीप्रमाणें पुरें न झालेलें हें लग्न पुढें अत्यंत सुफलदायी झालें, असें ते म्हणतात. ते कसें ते आम्हांस सांगता येत नाही. केशवचंद्रांच्या मागें त्यांच्या ह्या मुलीनें त्यांच्या अनुयायांत झालेल्या चौफळींत बराच भाग घेतला होता. तिनें बंगाली स्त्रियांना सुशिक्षित करण्याकरितां कलकत्त्यास एक कॉलेज काढलें त्यांचीं एक मुलगी मुंबईच्या एका बड्या अंमलदारास दिली आहे, असें समजते. केशवचंद्रांच्या जांवई महाराजांनी एक "इंडियन क्लब" नामक संस्था काढली. याहून अधिक लिहिण्याइतकी माहिती आम्हास मिळाली नाहीं. तात्पर्य, प्रतापचंद्र म्हणतात त्याप्रमाणें ह्या लग्नानें देशाचें कोणतेही महत्कार्य साधलेलें असो वा नसो; भारतवर्षीय ब्राह्मसमाजांत फूट पाडून अनेकांच्या विश्वासास पात्र झालेल्या केशवचंद्रांस पदच्युत करण्याचें अत्यंत अनिष्ट कार्य त्यानें घडवून आणलें, यांत शंका नाही. केशवचंद्र पुढारीपणास अपात्र आहेत, असें त्यांचे अनुयायी व सहकारी मित्र उघड उघड म्हणूं लागले. विजयकृष्ण गोस्वामी व पंडित शिवनाथशास्त्री अशा केशवचंद्रांच्या पूर्वींच्या चहात्यांनींच

विरोधाचें शिंग प्रथम पुकारलें, व ब्राह्म-समाज-संस्था आपल्या ताब्यांत घेऊन तिची योग्य संघटना करण्याचा केशवचंद्रांच्या विरोधी मंडळींनीं निश्चय केला. पण त्या कामींही योग्य व पद्धतशीर मार्गानें वादग्रस्त प्रश्न निकालांत लावण्याच्या कामी केशवचंद्र सेनाच्या पक्षाने बऱ्याच अडचणी घातल्या. परंतु तेवढ्यानेंच विरोधी-पक्ष दबण्यासारखा नव्हता, आणि ज्या अनियंत्रितपणाच्या कारणास्तव केशवचंद्र आपल्या अनुयायांसह आदि ब्राह्मसमाजांतून बाहेर पडले. त्याच कारणास्तव पंडित शिवनाथशास्त्री-प्रभृति ब्राह्म-मंडळी केशवचंद्रांशीं भांडून दूर होण्याची वेळ आली. त्यांनीं ठिकठिकाणच्या ब्राह्म-समाजांचे अभिप्रायही जमेस घेऊन चालू ब्राह्मसमाजांतील अव्यवस्था व बेजबाबदारी मोडून ब्राह्मसमाजाची संस्था सुव्यवस्थित व संघटित करण्याच्या हेतूने ता. १५ मे सन १८७८ रोजी 'साधारण ब्राह्मसमाज' ह्या नांवाचा नवीन समाज स्थापन केला. ह्या महत्त्वाच्या सभेस आदि-ब्राह्मसमाजाचे अध्यक्ष राजनारायण बोस हे हजर होते. व महर्षींनींही आपला लेखी संदेश पाठविला होता. 'साधारण ब्राह्मां'च्या ह्या शाखेबद्दल पुढे विस्तृत विवेचन यावयाचे असल्यामुळे त्यासबंधाने येथे अधिक लिहीत नाहीं.

---

## प्रकरण तिसरें

# नवविधानाचें स्थूल स्वरूप

" हे परमेश्वरा, तुझ्या उपदेशकाला विशेष मान देणारे असे दहावीस लोकही आतां ह्या देशांत राहिले नाहीत !"

केशवचंद्र सेनांच्या 'संडे मिरर' नामक पत्राच्या सन १८७९ तील डिसेंबराचे एका अंकांत असे दुःखोद्गार प्रसिद्ध झाले ! कुचबिहारविवाहसंबंध एखाद्या ब्रह्मसमंधाप्रमाणे केशवचंद्रसेनांच्या कांही दिवस मानगुटीसच बसला. बाळपणापासून संगोपन केलेल्या कन्येस तारुण्य प्राप्त होण्याच्यापूर्वीच कुचबिहारच्या अधिपतीच्या स्वाधीन करण्यात केशवचंद्र सेनास जर कांही आनंद झाला असेल, तर त्यांनींच वाढवलेली त्यांची दुसरी एक ऐन तारुण्याच्या भरात आलेली (समाजरूपी) कन्या परपुरुषांचा हात धरून जात असलेली पाहून त्यांस फार दुःख झाले, हे सहज आहे. एकीकडे वधूवरांचे मस्तकावर मंगलाक्षता पडत असतां, दुसरीकडे केशवचंद्र सेनांचे डोक्यावर टीकास्त्राचा सारखा भडिमार सुरू होता. लग्नोत्सवाचा आनंद ओसरला. कन्याविरहजन्य औदासीन्याची प्रतिक्रिया सुरू झाली, आणि अशा समयीं त्यांच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या ब्राह्मसमाज-संस्थेत अत्यंत बखेडा माजून राहिला. अखेर विरोधीपक्षाने आपल्या 'साधारण ब्राह्मसमाजा'ची स्वतंत्र स्थापना केली. आणि बहुजन समाजाला आपल्याकडे ओढून घेऊन केशवचंद्रांवर मात केली. हें शल्य केशवचंद्र सेनांसारख्या मानी पुरुषास सहन होण्यासारखे नव्हते. आपली सहकारी मित्रमंडळी आपणास सोडून गेली, ह्याबद्दल बेफिकिरी व तुच्छता दाखविण्याचा त्यांनी आपल्याकडून पुष्कळ आविर्भाव आणला; परंतु वास्तविक तो त्यांस एक हृद्रोगच लागून राहिला. लवकरच ते अत्यवस्थ आजारी पडले, तेव्हां जिवावरच्या दुखण्याच्या बरळण्यांतदेखील त्यांचे अंतरींचे दुःख कळून आलें.

ह्याच सुमारास—इ. सन १८७५ सालीं बंगाल प्रांतांतील एका महापुरुषाचे सत्सगतीचा लाभ केशवचंद्र सेनांस झाला होता. आणि त्याचा परिणामही त्यांच्या मनावर थोडथोडा घडूं लागला होता. हे महापुरुष म्हणजे भगवान् रामकृष्ण परमहस हे होत. ब्राह्म-इतिहासकारांनीं ह्या थोर पुरुषाच्या

अवतारचरित्राला द्यावें तितकें महत्त्व दिलेले दिसत नाहीं. आम्हीही त्यांचीच दृष्टि अंगीकारून ह्या विलक्षण योगायोगाचा नुसता उल्लेख करण्यापलीकडे तूर्त जास्त कांहींच लिहीत नाहीं. इतकें मात्र खरें की, केशवचंद्र सेन दुखण्यांतून बाहेर पडल्यावर त्यांनीं आपल्या समाजपीठावरून जे पहिलेच प्रवचन केले, त्यावरून त्यांनीं आपला दृष्टिकोण बराच बदलल्याचे दिसून आले. मग हा श्रीरामकृष्णांच्या सहवासाचा परिणाम, की आपले वैशिष्ट्य कायम ठेवण्याची केशवचंद्रांची नूतन समाजाशीं चाललेली अहमहमिका हे निश्चित ठरविणे कठीण आहे.

ते बंगाल्यातील दुर्गापूजेच्या महोत्सवाचे दिवस होते, आणि अशाच एका उत्सवाचे दिवशी, खुद्द ब्राह्मसमाजाच्या पीठावरून केशवचंद्र सेनांनीं दिलेले व्याख्यान त्यांच्या संप्रदायाप्रमाणे—मूर्तिपूजेचा—सगुणोपासनेचा—उच्छेद करणारे नसून उलट बरेच सहानुभूतिपूर्ण झाले. मूर्तिपूजेचे रहस्य काय असावे, ह्याचा त्यांनीं आपल्या व्याख्यानांत विचार केला. आणि शेवटीं. भाविक हिंदूंच्या मुखीं बसलेल्या कालीमाता, जगद्धात्री, लक्ष्मी इत्यादि मंगल नामांनीं त्यांनीं भगवंतास मातृभावाने आळविले. विशेषेकरून खिस्ती वाङ्मयाच्या अनुकरणाने जे ईश्वरास पितृभावाने 'हे बापा' असे संबोधीत असत, ते पूर्वाश्रमींचे परम वैष्णव आज आपल्या आवडत्या देवास पुराणोक्त नांवाने संबोधूं लागले.

ह्यानंतरच्या 'सडे मिरर'च्या एका अंकांत केशवचंद्र सेनांनीं 'मूर्तिपूजेचे तत्त्वज्ञान' ह्या मथळयाखालीं एक लेख लिहिला. त्याच्या सारांश असाः—
" हिंदूच्या मूर्तिपूजेचा सर्वस्वीं अव्हेर करतां कामा नये. × × × एकेका दैवी गुणास मूर्त स्वरूप देऊन त्या गुणमयी मूर्तीस भजणे म्हणजेच हिंदूंची मूर्तिपूजा होय. मूर्तीचा बाह्याकार सोडून दिला, तर त्यात ईश्वरी अनुशासनाचे एखादे सुंदर रूपक अगर चित्र काय तें शिल्लक रहाते. × × × आमच्या पुराणांतील कंटाळवाण्या वाटणाऱ्या भागांचे संशोधन करीत असतां, सर्व-संग्राहक विचारपद्धतीनें परमार्थज्ञान कसे साठवलेलें असतें हें आम्हांला फार उत्कृष्ट कळून आलें. ह्याप्रमाणें पौराणिक वाङ्मयाच्या प्रांतांतून जात असतां, जीं जीं विचाररत्नें आढळतील, तीं गोळा करावीं, व तींच सत्य प्रमेयें ब्राह्ममंदिरांतील व्याख्यानद्वारा पुढें मांडावीं, हेंच आम्ही हल्लीं करीत असतो.

ईश्वराचा एकेक गुण ध्यानीं न आणतां, एकच एक व सर्वांगपरिपूर्ण अशा परमात्म्याची भावना करावयाची, म्हणजे ती एक अव्यक्तोपासनाच होईल, आणि तिचे पर्यवसान केवळ बौद्धिक वादांत अगर नास्तिकपणातही होण्याचा संभव आहे. तसेंच ईश्वरास भजणे, तेंही त्याचे एकच एक प्रकारचे स्वरूप ध्यानीं आणून भजणें, निरुत्साहजनक होईल. ह्यासाठीं त्यास भजावयाचें, तर त्याच्या निरनिराळ्या गुणमय अशा व्यक्तस्वरूपांत त्यास भजावें हेंच योग्य होय. त्याच्या एका गुणप्रतीकास आपण सरस्वती म्हणूं, दुसऱ्यास लक्ष्मी, तिसऱ्यास महादेव, तर आणखी एखाद्यास जगद्धात्री, अशा निरनिराळ्या गुणमूर्तींत आम्ही ईश्वरास प्रत्यहीं भजत जाऊं. ह्यानंतर आपल्या ब्राह्मसांप्रदायिकांस बरोबर घेऊन केशवचंद्र सेन एका रात्रीं श्रीरामकृष्ण परमहंसाकडे दक्षिणेश्वरीं गेले होते. तेथून परत येतांना, पूर्णचंद्राच्या रम्य प्रकाशांत त्यांची बोट गंगेच्या प्रवाहांतून चालली असतां, केशवचंद्राची मनोवृत्ति सहजीच उल्हसित झाली. त्यांनीं बोटीवरच त्यांची सांप्रदायिक प्रार्थना केली. नवलाची गोष्ट इतकीच कीं, ती त्याची प्रार्थना निर्गुण निराकार अशा परमात्म्यास उद्देशून नसून, पंडित जगन्नाथरायाचे श्रीगंगामाईस उद्देशून होती. अंकावर खेळणाऱ्या लहान तान्हुल्याशीं न बोलतांच बोलणाऱ्या प्रेममय अम्बेप्रमाणे, हे गंगामाई ! तूं आम्हास साक्षात् आईप्रमाणेंच आहेस. इत्यादि गंगालहरीसदृश विचारलहरी केशवचंद्राचे तोंडून बाहेर पडूं लागल्या. भावनाप्रधान माणसाची हीच मौज आहे !

मातृप्रेमाचें हें नवीन वारें संचारल्यामुळेंच कीं काय, केशवचंद्र सेनांनीं आपल्या शिष्याच्या साधकधर्मांत सेवाधर्माची आणखी जोड करून दिली. ज्ञानी, योगी, भक्त व सेवक असे त्यांच्या शिष्यांचे चार वर्ग पडले. आणि त्यांच्या अभ्यासाकरितां केशवचंद्रांनीं ब्राह्मगीतोपनिषद् नामक एक ग्रंथ प्रसिद्ध केला. अशा रीतीनें शिष्यमंडळींत जम बसविल्यानंतर एकदर बहुजन समाजावर छाप बसविण्याच्या उद्योगास केशवचंद्र सेन लागले. त्यानंतरच्या समाजाच्या वार्षिकोत्सवाच्या वेळीं केशवचंद्र सेनांचें एक महत्त्वाचें व्याख्यान झालें.

"Am I an Inspired Prophet ?" हा व्याख्यानाचा विषय होता. या व्याख्यानांत त्यांनीं असें दर्शविलें कीं, "मी जे जे कांहीं करीत असतों तें ईशप्रेरणेप्रमाणेंच करीत असतों. ह्यास्तव माझ्या वर्तनावर टीका

करणें, म्हणजे ईशानुशासनाचाच उपमर्द करण्यासारखे आहे. माझ्या देशाच्या कल्याणासाठीं माझ्या हातून अत्यंत निंद्य प्रकार घडले असतील, तर त्याबद्दल मला दोष न देतां, मला तशी बुद्धि देणाऱ्या परमेश्वरास त्याचा जाब विचारा. त्याची तशीच आज्ञा होईल, तर यापुढेही मी अशा हजारो गोष्टी करीनच करीन. मग तुम्ही त्या सर्वेश्वराच्या हुकुमास धाब्यावर बसवणार काय?" ह्या उद्गारांचा रोख कुचबिहारप्रकरणाकडे होता, हे सुज्ञ वाचकास सांगावयास नकोच. वरील भाषणातील आत्मविश्वास कित्येकांस अभिनंदनीय वाटला असेल, परंतु ही दर्पोक्ति बहुजनसमाजास त्या वेळीं रुचण्यासारखी नव्हती खचित; तथापि लोकापवादास भीक घालणारे केशवचंद्र सेन नव्हते. वाग्देवता त्यास पूर्ण प्रसन्न होती. त्यांनीं एकामागून एक मोठ्या चित्ताकर्षक व महत्त्वाच्या विषयावर व्याख्यानाची झोड उडवून दिली. आणि आपल्या काबूतील श्रोतृसमाज निर्माण करण्याकरिताच कीं काय 'ब्राह्मविद्यालय' ही सुप्तावस्थेत गेलेली संस्था त्यांनी पुन्हा जागृत केली. त्याचप्रमाणे Indian Reform Association भारत सुधारक-मंडळ ह्या संस्थेचेही पुनरुज्जीवन करण्याचा त्यांनी खटाटोप केला.

वरील संस्थांच्या पुनर्जीवनाचे प्रयत्न म्हणजे समाजाची अडलेली गाडी पुन्हा गतींत आणण्याकरितां दिलेले धक्के होत. गाडीच्या खऱ्या वेगाची कल्पना पुढेच व्हावयाची आहे. कुचविहारप्रकरणीं आपली चूक सरळपणे कबूल न करिता, तसें वागण्यासंबंधीं ईश्वराचा मला आदेश होता, असे आपले म्हणणे केशवचंद्र सेनांनी प्रसिद्ध केले, ते लोकांस ढोंगीपणाचे व असमर्थनीय वाटले. ईश्वराचा आदेश ही एक धार्मिक कल्पना धर्मपुस्तकांतून नुसती वाचावयाची असते. निदान सामान्य माणसांच्या मुलीच्या लग्नासारख्या किरकोळ प्रापंचिक गोष्टीत, ईश्वर कोणास आदेश देण्याचा संभव नाही. अशीच त्या काळच्या सुशिक्षित गणलेल्या समाजाची ठाम समजूत असल्यामुळें, ईश्वरी आदेश म्हणजे केशवचंद्रांनीं भलतेच माजविलेलें एक स्तोम आहे, असें लोक म्हणूं लागले. त्याप्रमाणे लोकांत अनादर व अश्रद्धा उत्पन्न होण्याजोगी अनिष्ट परिस्थिति प्राप्त झाली असतां, ह्या बिकट परिस्थितीचें खडकास आपले पोटांत घेऊन झांकील, अशी एक विचारक्रांतीची प्रचंड लाट उत्पन्न करणे केशवचंद्र सेनांस भाग पडले. विरोधी मतांस वाळवंटावरील रेघोट्यां-

प्रमाणें पुसून टाकणारी एक पुनर्जीवनाची प्रचंड लाट केशवचंद्र सेनांचे डोक्यांत तयार होत होती ती "नवविधान, नवविधान" अशी गंभीर गर्जना करीत लवकरच बाहेर पडली. आणि केशवचंद्र सेनांचे आकांक्षेप्रमाणें तिनें लोकांचे लक्ष आकर्षित केले.

हिंदुस्थानच्या बिकट परिस्थितीत ह्या देशास तारक होईल, अशा एका नवयुगधर्माची प्रेरणा ईश्वरानें आपणांस केली आहे, आणि त्या धर्माची संस्थापना व प्रसार हें आपले एक जीवितकार्य आहे, अशी केशवचंद्रांनीं आपली भावना करून घेतली होती; व त्या भावनेचा पुकारा करण्याची हीच योग्य वेळ आहे, असे समजून त्यांनीं आपला कार्यक्रम आंखला. तो कार्यक्रम सांगण्याच्यापूर्वी ह्या नवयुगधर्माची स्पष्ट कल्पना दिलेली बरी.

भरतभूमि म्हणजे अनेक धर्मांचे धर्मक्षेत्र होय. आणि येथे खुद्द सनातन हिंदुधर्मास अत्यंत अवनत दशा प्राप्त झालेली. अशी स्थिति पाहून धर्मसुधारणा करण्याचे जेव्हां राजा राममोहनांनी मनांत आणले, तेव्हां येथील नानाविध धर्मीयांचा ज्यात समावेश होईल, असा एक सर्वसंग्राहक धर्म प्रचलित करावा, असा विचार त्यांच्या मनांत आला. त्या वेळच्या सर्व मुख्य धर्मांचा त्यांनीं आस्थापूर्वक अभ्यास केला. सर्व धर्मांचा तितका आस्थापूर्वक अभ्यास आजपर्यंत दुसऱ्या एखाद्या ब्राह्माने क्वचितच केला असेल. परंतु एका सार्वत्रिक एकेश्वरी धर्माचे नवीन ध्येय तयार करण्यापलीकडे त्यांना कांहीच करतां आले नाहीं. त्यानंतर देवेंद्रनाथांना सनातन धर्मातील औपनिषदिक ज्ञान इतके उदात्त व पूर्ण आढळले कीं, त्यांस इतर धर्मांतून कांहीं संग्रह करण्याची आवश्यकताच भासली नाही. उलट केशवचंद्र सेनांचे पहावे, तर त्यांच्या सार्वत्रिक धर्माचे स्वरूप बहुतांशीं खिस्ती धर्मानेच व्यापून टाकले. देवेंद्रनाथांचा तात्त्विक धर्म दुर्बोधत्वादि कारणांमुळे राष्ट्रीयधर्म होणार नाहीं, असे त्यांनीं ठरविलें. आणि शिवाय आचार व विचार हीं जीं धर्माची दोन मुख्य अंगें, त्या दोन्ही अंगांनीं धर्म सर्वसंग्राहक व्हावयास पाहिजे. केवळ एका विचाराच्या अंगानेच पूर्ण असलेला धर्म राष्ट्रीयधर्म म्हणून होऊं शकणार नाहीं, हें उघड होतें. म्हणून जो राष्ट्रीयधर्म होईल, जो सर्वसंग्राहक होईल, आणि ज्याची सत्यप्रतीति साक्षात् ईश्वराकडून घेतां येईल, असा हा दिव्य नवविधान धर्म ईश्वर आमच्या करवीं भूतलावर

संस्थापित आहे; असा पुकारा केशवचंद्र सेनांनीं केला. तेव्हां साहजिकच पुष्कळ लोकांचे लक्ष त्यांच्या विचारांकडे व कार्यक्रमाकडे वेधलें.

इ. सन १८८१ सालीं ह्या नवयुगधर्माच्या एका ध्वजारोपण प्रसंगीं केशवचंद्र सेनानीं भाषण केले, त्याचा सारांश असा कीः–“ ही पहा नवविधान-धर्माची ध्वजा फडकत आहे, धर्मासाठीं धर्मवीरांनी सांडलेल्या रक्तानें हें निशाण लालभडक झाले आहे ! इहपरलोकीचे राजाधिराजांची ही ध्वजा आहे. ते पहा, स्वर्गीच्या संतमहात्म्यांचे आत्मे वर एकत्र जमा झाले आहेत. ह्या त्यांच्या पवित्र संघांतच श्रद्धा, आशा आणि आनंद ह्यांचे सम्मीलन झालें आहे. ह्या निशाणाच्या बुडाशी हिंदु, खिस्ती, इस्लामी व बुद्ध धर्मांचे धर्म-ग्रंथ ठेवले आहेत. आणि ह्याच निशाणाखालीं चारी खंडांतील मानवजातीचा आंतरराष्ट्रीय बंधुभाव एकत्रित झाला आहे. अशा ह्या नव-विधानाचा जय-जयकार असो ! ”

नाविन्य हा ह्या धर्मांतील एक विशेष होता. आणि ईश्वरासंबंधीं मातृ-भाव हा त्यांतील दुसरा विशिष्ट गुण होता. नव-विधान धर्मातील कार्यक्रमाचा पहिला महत्त्वाचा भाग म्हणजे संतसमागम ( Pilgrimages to saints ) हा होय. आजपर्यंत जे अनेक धर्म-प्रवर्तक व तत्त्ववेत्ते होऊन गेले, त्यांच्या एकेकाच्या चरित्राचे एकेक दिवस चिंतन करून, त्याशी कांही काळ तादात्म्य पावावे, असे ह्या प्रकारातील रहस्य होते. ह्यांसबंधी केशवचद्रांचे म्हणणे असे होते कीं, नव-विधानधर्म हा स्वत्वप्रधान-धर्म आहे. बाह्य विषयांचे अगर गुणां-चें स्वतःच्या जाणिवेत रूपांतर करण्याकडे त्या धर्माचा विशेष कटाक्ष आहे. ईश्वर ही एक व्यक्ति आहे, या भावनेने त्यास भजणे, हे जरी योग्यच आहे, तरी त्याचे अनंत कल्याणगुण आत्मसात् करणे, हे धर्माचे खरे रहस्य आहे. बाहेरच्या देवास स्वाधिष्ठानभूत करणे, ह्यांत श्रद्धेचा खरा परिपाक आहे. आणि मोक्षाची अखेरची पायरी ती हीच. आणि खऱ्या संतसमागमाची रीत तरी हीच. नाहीतर ते थोर महात्मे कोठे व आपण कोठे. त्यांच्या व आपल्या-मध्यें हा मोठाच दुस्तर भवसमुद्र पसरलेला आहे. अशा ह्या अविद्यमान महात्म्यांचे स्मरण करणे, त्यांचे गाडवे गाणे, किंवा ते आजही तसेच शरीरधारी कोठें तरी अदृश्य सृष्टींत अगर हिमालयाचे पहाडांत अस्तित्वांत आहेत, असें मानणें, अगर सर्व स्थिरचर व्यापून ते राहिले आहेत, अशी श्रद्धा बाळगणें

ह्या केशवचंद्रांच्या म्हणण्याप्रमाणे खरा संतसमागम नव्हे. तर आपण आपल्या मनाने अशा एखाद्या महापुरुषाच्या सन्निध जाऊन उभयतांमधील देशकालादि अंतर नाहींसे करणे, आणि पुढे आपल्या चिंतनाचा विषय झालेल्या त्या दिव्य गुणमूर्तीला भावनादार्ढ्याने अंतरात सांठवून, आपण स्वतांच तद्रूप होणे, हे संतसमागमांतील त्यांचे रहस्य होते. आणि आपल्या कित्येक पट्टशिष्यासह अशा प्रकारच्या सतदर्शनाची त्याची वारी दरसाल निघत असे. ह्याप्रमाणे पहिल्याच वर्षी त्यानी मोझेस, सॉक्रेटीस, शाक्यमुनि, भारतीय ऋषि, ख्राइस्ट, महंमद, चैतन्य आणि शास्त्रज्ञ पुरुष, अशा कित्येकाचा समागम केला. त्यांत महंमद पैगंबराच्या समागमात त्यांच्या अंतरातील विचार विलक्षण रीतीने प्रगट झाले. त्या प्रसंगी केलेल्या प्रार्थनेत केशवचंद्र सेनाचे असे उद्गार निघाले की, "हे माते, तुझा जो सखा आहे, तो तुझ्या दुश्मनांचा शत्रुच असणार. ज्यांनी ह्या नवयुगधर्माचा आश्रय केला आहे, त्यांना तुझ्या शत्रूंची गय करतां येणार नाहीं. 'लाबच लांब प्रार्थना फुकट आहेत, योग आणि भक्ति ही खुळें आहेत, आणि युगधर्मात कांहींच महत्त्व नाहीं', असे जे म्हणतात, ते तुझे शत्रु होत. त्यास आम्ही कधीच क्षमा करणार नाहीं. ह्या मानवदेहधारी असुरांनी धर्माच्या नांवाखाली तरुण स्त्री पुरुषाचीं अंतःकरणे अत्यंत भ्रष्ट आणि नास्तिक करून त्याचा घात चालविला आहे. ह्यास्तव हे प्रिय महमदी माते, तुझ्या ह्या निष्ठावंत पुत्रानें ह्या काफिराची आजपर्यंत कधीच गय केली नाहीं." इ०.

साधारण ब्राह्मसमाजातील विरोधी लोकांसंबंधीं केशवचंद्र सेनाचे असे हे उद्वेगजनक विचार वारवार बाहेर पडत. पुढे पुढे तर ते आपल्या पत्रांत असे लिहू लागले की, "कुचबिहारप्रकरणाने ब्राह्मसमाजाचे अपरिमित हित केले आहे. ब्राह्मसमाजांत सर्व प्रकारचे लोक एकत्र झाले होते. त्यांतून अश्रद्धावान्, विषयी आणि पापी माणसे ह्या निमित्तानें आपोआपच बाहेर निघून गेलीं. कुचबिहारच्या लग्नाचें सूप पाखडले, आणि त्यांनीं ब्राह्मसमाज आयताच चोख पाखडून निघाला." कोणतीही गोष्ट झाली ती बरीच झाली, असे मानण्याची विचारी माणसाची सहजच प्रवृत्ति असते. तथापि वरील उद्गारांतील द्वेष, सूड व अहंकार ह्यांचा दर्प विरोधी पक्षास सहन होण्यासारखा नव्हता, हेही उघड आहे.

नवविधानाच्या ह्या पहिल्याच वर्षाच्या कार्यक्रमांत (1) (Indian Reform Association) भारतीय सुधारणासंघ, (2) (Children's Temperance Association) बालसयम मडळ, (3) (Arya Nari Samaj) आर्य नारीसमाज, (4) (Theological Institute) अध्यात्मपीठ, (5) (The Brahma Tract Society)ब्राह्मधर्म प्रसिद्धिमडळ. (6) (Bhidhan Bharat) विधानभारत, वगैरे कित्येक गोष्टी केशवचद्र सेनानी घडवून आणल्या. शिवाय त्यांची व्याख्यानमाला सुरूच होती. आपल्या सांप्रदायिक मंडळीस स्वतांबरोबर घेऊन धर्मप्रसारार्थ बगालप्रांतीं सचार करण्याचा नवीन प्रघात केशवचंद्र सेनानीं सुरू केला, व कित्येक ठिकाणी त्यांनी आपले ब्राह्मप्रचारक पाठविले. त्या वेळीं ईश्वराचा आदेश मिळणे हाच मुख्य वादाचा मुद्दा असल्यामुळे, केशवचंद्रांच्या भाषणात हिंदूची योगपद्धति हाच विषय वरचेवर येत असे. शिवाय 'सेवकाचे निवेदन' नामक योगपद्धतीवर नवीन कल्पनाप्रचुर असा ग्रंथ त्यांनी त्याच वेळीं लिहून प्रसिद्ध केला व हिंदु योगी व योगिनी यांचे आदेश म्हणून त्यानीं आपल्या बायकोसह विरक्त योग्याच्या वेशांत आपलीं छायाचित्रे काढविलीं. त्याचप्रमाणे 'विधानभारत'नामक नवीन पुराणात अव्यक्त परमात्मा आजपर्यंत जगांत कसकशा रूपाने व्यक्त होत आला, व त्या व्यक्त स्वरूपांची अखेर ह्या नवयुगधर्मांत परिणति कशी झाली, ह्याच मोठ्या गभीर भाषेत त्यानी उद्घाटन केले. ह्याप्रमाणे कुचबिहार प्रकरणामुळे, चोहोंकडे उत्पन्न झालेल्या असतोषाचा परिहार करण्याकरितां त्यानी जोराचा खटाटोप सुरू केला, आणि त्यांतच त्यांनीं एक विलक्षण विधि उरकून घेतला. आपल्या मुलीची वयोमर्यादा लग्नाच्या वेळीं अपुरी होती, ती मर्यादा आतां पूर्ण झाली, असे पाहून पुन्हा आपल्या ब्राह्ममंदिरांत वधूवरांस एकत्र करून त्यांनी सांप्रदायिक प्रार्थना केली व त्या वेळीं वयांत आलेल्या त्या वधूवरांच्या लग्नविधीची पूर्तता करून घेतली.

आपली चळवळ चित्ताकर्षक करण्याची कला केशवचंद्र सेनांस फारच उत्तम साधली होती. नवविधान धर्माच्या दुसऱ्या वार्षिक उत्सवांत एका रविवारी कट्टया मूर्तिपूजकांच्या उत्सवासही मागे सारील, असा थाटाचा समारंभ केशवचंद्रांनी घडवून आणला. सायकाळी सात वाजतां सर्व ब्राह्ममंदिर, प्रेक्षक व सांप्रदायिक ह्यांनीं खचून भरले असतां, आचार्य केशवचंद्र सेन

ह्यांची स्वारी मोठ्या रुबाबानें हातांत एक चांदीचा पत्रा चढवलेली भव्य निशाणकाठी घेऊन पुढे आली. त्यांच्या दोन्ही बाजूंस त्यांची सांप्रदायिक मंडळी हातांत जळत्या मेणबाती घेऊन दुतर्फा रांगेने उभी राहिली. वेदीपुढे जळत असलेल्या दिव्य पचारतीकडे मूर्तिपूजकांच्या त्या ब्राह्मवंशजांचे डोळे लागून राहिले. आणि वेदीसमोर जळत असलेल्या धूपाच्या गधाने त्यांचीं मने गुंग होऊन गेलीं. अशा वेळीं एकदम विदेशी बॅण्ड, बिगुले व ढोलकीं वाजूं लागलीं. त्याबरोबर देशी नगारे, करणे, झांजा, शिंगे व शंख ह्यांच्या ध्वनीनें आकाश दुमदुमून गेले. अशा रीतीने सर्वांच्या चित्तवृत्ति अत्यंत उल्हसित झाल्या असतां, केशवचंद्रप्रभृति सर्व ब्राह्मानीं आरती म्हणण्यास सुरुवात केली. त्या वेळीं बाहेरच्या तिऱ्हाईतास हे ब्राह्ममंदिर आहे, कीं विष्णुमंदिर आहे, ह्याचा उलगडा निदान कांहीं वेळ तरी होण्यासारखा नव्हता. आरती व स्तोत्रपाठ झाल्यानंतर केशवचंद्र सेनांनी आपल्या नवविधानधर्माची ध्वजा खुली केली. आणि नतर आपल्या धर्मप्रचारकास त्यानी उपदेश केला. त्याचा मतलब असाः—" नवविधानधर्माचे प्रचारकांनो, जगाला तारक अशा ह्या सत्यधर्माचा प्रसार करण्यासाठीं स्वर्गाधिपतीने तुमची योजना केली आहे. हा नवविधानधर्माचा ध्वज पहा. ह्याचे छायेखाली सर्व गोष्टीचा समन्वय होत आहे. चारी धर्म आणि चारी दिशा, येथे एकीकरण पावतात. वृद्ध-तरुण, स्त्री आणि पुरुष सर्वांचा समावेश येथें होतो. ज्ञान, भक्तियोग, आणि कर्म ह्या सर्वांचा समुच्चय येथें आहे. ह्यासाठीं, हे नवविधानाचे प्रेषितांनो ! जा, हे निशाण ज्या सार्वत्रिक धर्माचे चिन्ह आहे, त्या धर्माचा चोहोंकडे प्रसार करा. ह्या निशाणाचे तुम्ही एकनिष्ठ सेवक व्हा. आणि तुमच्या एकनिष्ठेचे दर्शक म्हणून ह्या निशाणास प्रत्येकजण प्रणामपूर्वक स्पर्श करा. म्हणजे ईश्वर तुमचा साह्यकारी होईल." अशा अर्थाचे स्फूर्तिदायक भाषण झाल्यानंतर सुमारें पाऊणशे ब्राह्म सैनिकानी निशाणास मुजरा करून आपली धर्मनिष्ठा व्यक्त केली. त्याचप्रमाणे दुसरे दिवशी सोमवारीं ब्राह्म-स्त्रियांचा समारंभ झाला. स्त्रिया अशिक्षितांच्या अगर सुशिक्षिताच्या असोत, निदान भारतीय आर्य स्त्रिया तरी भाविकपणांत पुरुषांच्या वर कडी करतात हा अनुभव सार्वत्रिक आहे. जुन्या पद्धतीप्रमाणें न्हाऊन माखून हातांत पंचारत्या घेऊन ब्राह्मस्त्रिया ब्राह्ममंदिरांत दाखल झाल्या. ब्राह्ममंदिरांतील वेदीसमोर ब्राह्म-स्त्रियांनींच मुद्दाम तयार

केलेली ती रेशमी पताका फडकत होती. त्या सभोवार त्या सुशिक्षितांच्या टापटिपीच्या तरुण ब्राह्म-स्त्रिया पाठीवर दीर्घ केशकलाप मोकळे सोडून व हातांत आरत्या घेऊन, जेव्हां कर्मठ वैष्णव स्त्रियांप्रमाणे, तोंडाने मधुर गीतांचे गोड आलाप काढीत प्रदक्षणा घालूं लागल्या. तेव्हां तो मोहक देखावा पाहून, स्वर्गींच्या निर्गुणोपासक राममोहनांनींही तोंडांत बोटच घातलें असेल! राजा राममोहनांनीं हे दृश्य पाहणे अशक्य वाटल्यावरूनच कीं काय, त्याच उत्सवांत राजा राममोहनांच्या तसबिरीचा अनावरण समारंभ ब्राह्ममंदिरांत मोठ्या थाटाने साजरा करण्यांत आला.

ह्या द्वितीय वार्षिकोत्सवातील कार्यक्रमांत केशवचंद्रांनी आपल्या सांप्रदायिकांसमवेत एक सबंध रात्र मंत्रजागराप्रमाणे ब्राह्म-प्रार्थना-जागर केला. सालाबादप्रमाणे त्याच्या नूतन धर्मस्वरूपाबद्दल एक सुश्राव्य व्याख्यान झालेंच. आपल्या नवीन धर्मातील विशेष सांगतांना ते असे म्हणाले कीः—“जगांतील सर्व घडामोडींत जर कांहीं शास्त्र असते, तर ईश्वराचे अनुशासन हे तरी अशास्त्रीय कसे असेल. निरनिराळ्या धर्मांस सांधणारा दुवा आजपर्यंत सांपडला नव्हता. तो ह्या नवविधानरूपाने आज उपलब्ध होत आहे, ही केवढी धन्यतेची गोष्ट आहे! सर्व धर्मांत अनुस्यूत असलेला असा मणिगुणाप्रमाणे नवविधान धर्म आहे, हा धर्म स्वत्वप्रधान आहे. हा धर्म गुरुशास्त्रादिकांच्या मध्यस्थीवाचून प्रत्यक्ष प्रतीत होणारा आहे. आणि हा धर्म सार्वत्रिक लागू पडणारा आहे. ह्यास्तव सर्व राष्ट्रांनो, ह्या नवविधानाच्या निशाणास वंदन करा. आणि परमात्मा सर्व विश्वाचा पिता आहे, व अखिल मानवसमाज हा एक बंधुवर्ग आहे. ह्या दिव्य संदेशाचा सर्वत्र पुकारा करा. जगांतील सर्व संतांशीं व धर्मप्रवर्तकांशीं आपण एकरूप होऊं या. असे आपण म्हणूं या, की प्रभु येशुख्रिस्त हा आपल्या बुद्धिस्थानीं आहे. साक्रेटीस हा आपल्या मस्तकीं आहे, प्रभु चैतन्य आपल्या हृदयस्थ आहे, हे मंत्रद्रष्टे हिंदु ऋषि केवळ आत्मरूप असून, तो परोपकारी हॉवर्ड आपला उजवा हात आहे. अशा ह्या नवविधानास तुम्ही प्रत्येकजण साक्षी रहा” असे परोपरीने केशवचंद्र सेन आपल्या नवधर्माचे माहात्म्य लोकांस समजावून सांगत असतांना, आपल्या भाषणांत ब्राह्मधर्म हे पूर्वसांप्रदायिक नांवच त्यांनीं टाकून दिलें होतें. पुढें लवकरच नवविधान व ब्राह्मधर्म हे भिन्न

किंबहुना विरोधी धर्म आहेत, असे स्पष्टच लोकांस सांगण्यांत येऊं लागलें. अशा रीतीने ब्राह्मसमाजांतील ह्या दोन शाखांतील मतभेद जरी स्पष्ट होत गेला, तरी त्याबरोबर त्यांचा परस्परांतील विरोध वाढू नये,म्हणून साधारण ब्राह्मसमाजांतील लोकांसाठी ब्राह्ममंदिरांत प्रार्थना करण्याकरितां नवविधानसमाज मुद्दाम एक दिवस पाळीत असे. एकदा तर केशवचंद्राच्या सांप्रदायी मंडळीची मिरवणूक रस्त्यांनी चालली असता साधारण ब्राह्मसमाजाचे मंदिराशीं जेव्हां मिरवणूक आली, तेव्हा आचार्य केशवचंद्र सेनांनी त्या मंदिरासमोर भररस्त्यावर गुडघे टेकून व मस्तक नमवून कांहीं वेळ प्रार्थना केली, व त्यांच्या बरोबरीच्या मंडळींनी त्याचे सभोवार घेर धरून गीतें म्हटलीं. इतकें झाल्यावर केशवचंद्र सेन आपल्या अनुयायासह सथपणे पुढे मार्गस्थ झाले. ह्यानंतर केशवांच्या कांहीं अनुयायांनी तर आपल्या शत्रुसमाजातील गृहस्थाकडे जाऊन त्यास आपली कृतज्ञतादर्शक काही वस्तु नजर करून द्वेषनिर्मूलनाचा प्रयत्न चालविला; तथापि अशा बाह्योपचारांनी अंतःशुद्धि होणे त्या वेळीं दुरापास्तच होते. कारण एकीकडे असे हे देखावे होत असतां, सेनांनी केशवचंद्र हे आपल्या धर्मवीर प्रचारकाचे दरबार भरवून त्यांस असा स्पष्ट इशारा देत होते कीं:—"आपला हा नवा पंथ जुन्या ब्राह्मपंथापासून अगदीं अलग ठेवणे फार जरूर आहे, कारण आपले शत्रु आपला मार्ग रोखीत असून त्यांचे हेतु फार घातक आणि भयंकर आहेत. व्यभिचारासारख्या अनाचारांस त्यांच्यांत सवतासुभाच सापडला आहे! अशा वेळीं पावित्र्याचे संरक्षक म्हणून जर आपण उभे राहिलो नाही, तर सर्व देश अशा प्रकारच्या अनाचारांत बुडून जाईल, असा फार मोठा धोका आहे!"

हे सर्व आरोप वृथा व द्वेषमूलक होते, असे सर्वसाधारण समाजाच्या वतीने म्हणणे होते. शिवाय स्त्रीस्वातंत्र्याच्या अगदीं नव्या व अपूर्व अमदानींत लोकदृष्टीला विपरीतसे वाटणारे प्रकारही थोडेफार घडणे त्या वेळीं अपरिहार्य होते.

नवविधान ह्या नूतन पंथाचा जन्मकर्मविचार स्थूल दृष्टीने येथवर केला आहे. ह्या पंथाचा तत्त्वविचार नीट समजण्यासाठीं कोणत्या परिस्थितींत हा पंथ निर्माण झाला, हे सूक्ष्म दृष्टीने पाहणे जरूर आहे. हा पंथ निर्माण होण्याच्या वेळीं केशवचंद्रांचे मनावर विविध प्रकारचे संस्कार जोरावले असावे, व असे

दिसतें. ब्राह्मसमाजांतील तीव्र विजोड, श्रीरामकृष्ण परमहंसांची नवीन जोड आणि येशूखिस्ताकडे त्यांच्या मनाची प्रचंड ओढ, ह्या त्रिविध कारणांतून नवविधान पंथ निर्माण झाला. ह्या वेळच्या केशवचंद्राच्या उद्गारांत त्यास सोडून गेलेल्या साप्रदायिकांबद्दल संताप व दुःख आणि येशूखिस्ताबद्दल असामान्य प्रीति; हीं कारणे जितकी उघड दिसतात, तितकीं श्रीरामकृष्णाचे अनुकरण करण्याची बुद्धि उघड दिसत नाहीं. तथापि श्रीरामकृष्ण परमहंस व ब्राह्मसमाज याचा परस्पराशी संबंध किती सन्निकट होता, ह्याचा विचार पुढे एका स्वतंत्र प्रकरणातच करण्याचे आम्ही योजले आहे.

जेव्हा एखाद्या प्रासंगिक कारणाने समाजाग्रणीची जनात अत्यंत अपकीर्ति होते, तेव्हा ते कर्तृत्ववान् पुढारी चिकाटीने सत्कार्याचा व्याप इतका वाढवितात कीं, त्याच्या दणदणाटात निंदकाची तोंडे सहजच बंद पडतात; आणि लोकप्रीतीचे डळमळणारे आसन पुन्हा स्थिरावते. केशवचंद्रानी याच युक्तीचा अवलंब केला, आणि नवविधानाच्या जयजयकारात सर्व लोकाचे लक्ष पुन्हा आपल्याकडे वेधून घेतले. केशवचंद्रांच्या दृष्टीपुढे दोन भिन्न समाज होते. हिंदुलोकाचा बहुजनसमाज आणि राजकर्त्याचा अल्पसंख्याक परंतु सुधारलेला व सत्ताधारी समाज. नवीन नवीन विधिविधाने व उत्सव सुरू करून, व भजनी मंडळीचे दौरे काढून भोळ्या हिंदीजनतेचे मन आकर्षित करून, व खिस्त महात्म्याने संपृक्त अशी विद्वत्ताप्रचुर व्याख्याने देऊन, देशी-विदेशी साहेबलोकांचा संतोष राखावा, असा ह्याचा दुहेरी प्रयत्न सुरू होता. व्हाइसरॉयपासून तो अगदीं हलक्या दर्जाच्या खिस्ती इसमापर्यंत सर्वांशी स्नेहसंबंध ठेवण्याचा केशवचंद्राचा सतत प्रयत्न असे.

तात्पर्य, आदि ब्राह्म-समाजात जो हिंदुधर्माचा अभिमान दिसून येतो, तो ब्राह्मसमाजाच्या ह्या शाखेत सुटून, खिस्तासंबंधीं अभिनिवेश विशेष स्पष्ट रीतीने दिसून येतो. 'वसुधैव कुटुंबकम्' ही कल्पना खिस्ताच्या छत्राखालींच शक्य आहे. हिंदुलोकानीं धर्मांतर करून खिश्चन व्हावयास नको, पण खिस्तावांचून त्याची सुटका नाही अशी नवविधानकाराची पुरी समजूत दिसते. ह्याचीं कारणे उघडच आहेत. आपले स्वताचे घर शोधून पाहण्याबद्दल पूर्ण अनास्था, येशूखिस्ताबद्दल प्रथमदर्शनीच प्रीति, चारी खंडांत खिस्तीधर्माचा, खिस्ती लोकांच्या राजसत्तेचा होत असलेला फैलाव, आणि

आधुनिक काळांतील धर्मसंस्थापनेस व त्याच्या प्रसारास उपकारक अशा आधिभौतिक शास्त्रांची खिस्ती लोकांकडून होत असलेली प्रगति. ह्याच व अशाच कारणांमुळे ह्या नवविधान नामक सार्वत्रिक धर्माच्या कल्पनेतील बहुतेक सर्व भाग खिस्तानेच व्यापला असल्यास नवल नाहीं. तथापि नवविधान धर्मास राष्ट्रीय स्वरूप देण्याचाही केशवचंद्रांचा कटाक्ष होता. ह्यास्तव ह्या नवीन धर्माची उभारणी करतांना नवसंहिता, जीवनवेद, ब्राह्मगीतोपनिषद्, योगशास्त्र, विधानभारत वगैरे वाङ्मय त्यांनीं तयार केले. खिस्ती मिशनरी संस्थेस अनुसरून धर्मप्रचारकांचा एक संघ निर्माण केला. हिंदूंच्या तात्त्विक दृष्टीने खिस्तीधर्माचे दर्शन प्रसिद्ध केले. आणि प्रार्थनेअर्ती प्रेरणा, हे एक विशिष्ट मत त्यांनीं प्रस्थापित केलें. केशवचंद्र सेन आपल्या नवसंहितेत असें म्हणतात कीं, "ज्यात प्राचीन ज्ञान व अर्वाचीन शास्त्र यांचा संग्रह केला आहे, अशा सार्वत्रिक धर्मानुशासनावर आमची निष्ठा आहे. हे अनुशासन सारे धर्मात्मे व सत्पुरुष यांत एकोपा मानते, सर्व धर्मशास्त्रांत ऐक्य पहाते, साऱ्या प्रेषितधर्मात संगति लावते; ती अशी कीं, ज्यामुळें भेदाचे निर्मूलन होते, ऐक्य आणि शांति याचे महत्त्व वाढते, आणि त्यायोगान तर्क आणि श्रद्धा, योग आणि भक्ति, विरक्ति आणि उदात्त सामाजिक कर्तव्ये, यांची जोड होऊन, योग्य काल प्राप्त झाला असतां सर्व राष्ट्र आणि पंथ यांचे एक राज्य किंबहुना एक कुटुंब बनते."



## प्रकरण चवथें

# नवविधाननिष्ठा

केशवचंद्राच्या नवीन पंथाचे नामकरण ता.२४ माहे जानेवारी सन १८८१रोजीं उघड समारंभाने जाहीर झाले. परंतु तत्पूर्वी कित्येक दिवस धर्मसंस्थापनेची ऊर्मी त्यांच्या चित्तात वरचेवर येत होती. इ. सन १८७५ च्या जानेवारी महिन्यांत " Behold the light of Heaven in India." ( हिंदुस्थानांत उदित झालेला हा स्वर्गीय प्रकाश पहा ) ह्या विषयावर त्यांचे व्याख्यान झालें. त्याचा सारांश असाः—" हिंदुस्थानास आज अत्यत बिकट काल प्राप्त झाला असतां, ईश्वराची दयार्द्रदृष्टि आमचेकडे वळली आहे, ही मोठीच आनंदाची गोष्ट आहे. ईश्वराचे देशोद्धाराचे मार्ग मानवी प्रयत्नांहून भिन्न असतात. खरी सुधारणा आंतूनच होत असते. ती बाहेरून आणतां येत नाहीं. आज जो ईश्वराचा संदेश आम्हांस मिळाला आहे, तो पूर्वीच्या ईश-प्रेरितधर्माशीं विसगत नसून पूरक आहे. तो सुवर्णवर्खाप्रमाणे विस्तृत नसून रत्नाप्रमाणे चित्घन आहे. आमच्या उद्धाराकरिता पाठविलेला हा दिव्य संदेश म्हणजे ( I am ) 'मी आहे' हे साधे सत्य होय. ह्या एका सत्यांत सर्व तत्त्वज्ञान व सर्व पंथज्ञान आले. ईशप्रणीत म्हणून गणलेलीं शास्त्रें सर्वस्वी ईशप्रणीत नसतात. ईशसंदेश म्हणजे एखादा लेख अगर शास्त्र नव्हे. ईश-प्रेरणा प्रत्यक्ष सांगितली व ऐकली जाते. "मी आहे" ह्या सत्य-सिद्धान्ताला आणखी 'प्रेम' ह्या वृत्तीची जोड दिली, म्हणजे त्यात अखिल मानवधर्म आला. जीवाजीवातील भेदभाव नाहींसा होऊन ज्याने एकात्मकता सिद्ध होते, तेंच प्रेम होय. इच्छेच्या तादात्म्यांत प्रेमाची परीक्षा होते. ईशसंकल्पाहून आपला भिन्न संकल्प न उरणे, हेच खरे ईशप्रेम होय. ह्याच भावनेचा अतिरेक हिंदूंच्या सर्वदेवमयत्ववादांत झाला आहे. ईश्वराशीं ऐक्य पावून आपण भिन्न-पणानें न उरणें ही कल्पना उदात्त खरी; पण त्यांतून सर्व देवत्रयत्वभावा सारखा भयंकर परिणाम झाला. ह्या पंथाचे लोक आपण ईशरूपच आहो—ईश्वरच आहोंत—असली आत्मघातकी भावना धरून चालतात. हा मोठा दोष टाकून

आपण आपल्या अहंकारबुद्धीच्या त्यागाने व प्रेमाच्या अवलंबनानें ईश्वराशीं ऐक्य सपादन केले पाहिजे ह्या रीतीनें एका ईश्वराशी सर्वांचेंच ऐक्य असल्यामुळे, मनुष्यामनुष्यांचे नाते जवळचे होऊन, परस्परांत प्रेम व ऐक्य हे ओघानेच प्राप्त होते. प्रेम आणि औदार्य अशा वृत्ति अखंड यात्रेकरूं-प्रमाणे ज्या एकदां घर सोडून बाहेर पडतात, त्या कधीच परतत नाहींत. दुसऱ्याने आपल्याशीं जसें वागावे असे आपणास वाटते, तसे आपण दुसऱ्याशीं वागावें. ही नीतीची मर्यादा मानतात. पण ती खरी मर्यादा नव्हे. प्रेमवृत्तीस कोणतीच मर्यादा खपत नाही प्रेम करणारा स्वताच भिन्नत्वाने उरत नसल्या-मुळे, त्यास त्याचीच मर्यादा तरी कशी उरेल ? ज्यांत आज हिंदुस्थानाचा खरा बचाव होईल, असा हा ईशसंदेश मी सर्वांस सांगत आहे. आणि तो संदेश सांगोवांगी नसून मला प्रत्यक्ष ईश्वराने जो सांगितला, त्याचाच मी पुकारा करीत आहे."

ईश्वराच्या तोंडचे 'मी आहे' असे शब्द ऐकल्यानंतर ईश्वरासंबंधीं आणखी तो पुरावा काय पाहिजे ? अंतश्चक्षु व अंतःश्रोत्र यांच्याहून दुसरे साक्षीदार ते कोणते ? ईश्वरावरील श्रद्धा ही कांहीं भावना नव्हे, ही प्रत्यक्ष जाणीव आहे. अशा रीतीने ईश्वर हा जाणीवेत आल्यावर प्राचीन काला-पासून आम्ही जे उत्कंठेने वांच्छीत आहोत, ते आम्हास मिळाल्याप्रमाणे आहे. 'मी आहे' ह्या स्वयंप्रभ जाणीवेत ईश्वर पाहिल्यावर मग त्याच्या पाषाणमय मूर्ति कशाला ? आणि मग सर्वदेव हा वाद तरी कशाला ? ह्या साध्या सत्य सिद्धान्तात प्राचीन हिंदुस्थान व अर्वाचीन युरोप यांची एक-वाक्यता आहे. व त्या एक सत्याची जाणीव हिंदुस्थानच काय; पण अखिल मानवजातींचा उद्धार करण्यास समर्थ आहे. श्रद्धावंतास निःशंक करणारा हा साधा संदेश ईश्वर स्वतःच न सांगतां, बुद्धिभ्रंश करणाऱ्या शास्त्र व गुरु यांच्यावर कसा म्हणून विसंबेल !

ह्यानंतरचे केशवचंद्र यांचे महत्त्वाचे व्याख्यान 'आमची निष्ठा व अनुभव' हे आहे. ह्याचा सारांशः—"येशुखिस्त इहलोक सोडून जाऊं लागले, तेव्हां त्यांनीं ( आपल्या धर्मप्रसाराचें काम ) आपले धर्मानुशासन परमात्म्याचे ( Holy spirit) स्वाधीन केले. अशी माझी दृढ श्रद्धा आहे. त्या परमात्म्याचें वर्णन आमच्या प्राचीन ग्रंथांत जसें आहे, तसें इतर

देशांतील शास्त्रांत क्वचितच असेल. सर्वदेवमयत्वभाव, अनेकदेवपूजा, मूर्तिपूजा, व्रतवैकल्ये, अनेक विधिविधाने, अशा अनेक निंद्य प्रकारांनीं आमच्या धर्माची आज अवनति झालेली असो; परंतु वेदकालीन ऋषींनी निराकार ब्रह्माचे सत्यस्वरूप आम्हांस शिकविल्याबद्दल आम्ही जसे त्यांचे आभारी आहोत, त्याचप्रमाणे आमच्या पुराणांनी आमच्या ठिकाणीं ज्या उत्कृष्ट धर्मभावना जागृत केल्या, त्याबद्दलही आपण कृतज्ञ असले पाहिजे. खोट्या देवाचा मीही धिक्कार करीन; पण त्यांच्या उपासनेत ज्या प्रेमादि भावनांचा उत्कृष्ट परिपोष झाला, त्यांचा अव्हेर करणे अशक्य आहे. यास्तव प्राचीन ऋषींची तत्त्वदृष्टि व अर्वाचीनांची कोमल वृत्ति ह्या दोहोंचाही आम्हीं स्वीकार केला आहे. आम्हां आधुनिकांचे अंतःकरणांत ब्रह्म सगुणरूपाने अवतरले आहे. आमच्या पंथाचीं मुख्य मते तीनच आहेत. ईश्वरवाद, अमृतत्ववाद, आधिदैवतवाद (doctrine of conscience). हीं तिन्ही मते एकांत एक गुतलेलीं आहेत. ईश्वरासंबंधी आस्तिक्यबुद्धीतच अमृतत्व सिद्ध होते. ईश्वर आहे, तेथे स्वर्ग आलाच. किंबहुना ईश्वर आणि स्वर्ग हे पर्याय शब्द होत. कारण ईश्वर नित्य व सर्वत्र आहे व तोच स्वर्ग होय. तो मरणोत्तर आहे, तसा पूर्वीही नित्य सिद्ध आहे. ह्यास्तव विभु अशा परमात्म्याची उपासना करा, अमृतत्वावर श्रद्धा असूं द्या, आणि नीतिमर्यादेने वागा. हें आमचे धर्मानुशासन होय.

"परंतु आमचे अनुभव पाहतां आमचा ब्राह्म-समाज हे भरतभूमीचे ध्येय असावें, असे म्हणवत नाही. आमच्या ब्राह्मसमाजास ईश्वराचा पवित्र पंथ म्हणता येत नाहीं. प्रामाणिकपणानेच बोलावयाचे तर ब्राह्म-पथाने आजवर आमच्यांतील मूर्तिपूजादि धर्मवेडे घालवून कितीही चांगली कामगिरी केली असली, व ब्राह्म समाजांचा विस्तार कितीही झाला असला, तरी ज धर्मानुशासन ब्राह्म आपले म्हणवितो, त्यापासून ब्राह्मसमाजी मंडळी अद्याप फार दूर आहेत. त्यांनीं आपल्या निंद्य आचरणाने आपल्या थोर धर्मपंथास कमीपणा आणला आहे. ब्राह्मसमाजाचा गेल्या चाळीस वर्षांचा इतिहास म्हणजे आचार व विचार यांच्या विरोधाची एक उद्वेगजनक व निराशाजनक कथा आहे. ज्यांनीं ईश्वराच्या आज्ञा धाब्यावर बसविल्या आहेत, सदसद्विवेकबुद्धीचा घात केला आहे, आणि आपल्या धर्मपंथाच्या मतांकडे दुर्लक्ष करण्याचा जणुं काय कटच

केला आहे, असा जर एखादा समाज कोणास पहावयाचा असेल, तर ब्राह्म-समाज ह्या बड्या नांवाखाली मोठ्या दिमाखाने मिरवणारा आमचा समाज पहा. आम्ही अत्यंत क्षुद्र बुद्धीचे पंथाभिमानी, तुसडे असे आहोत. थोडक्यात म्हणावयाचे तर जो धर्म आम्ही मिरवतो, त्यास आम्ही सर्वथैव अपात्र आहोत. निराश झालेली भरतभूमि शतकानुशतके अशा दांभिकपंथाच्या अनुभवाने वैतागून जाऊन आम्हां क्षुद्र ब्राह्माचा धिक्कार करीत नसेल काय?

"ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत सर्व ब्राह्मसमाजात एकाही व्यक्तीचा आजपर्यंत उद्धार झाला नसेल! बरे, धर्मप्रसाराचाच विचार करावा, तर हिंदुस्थानचा बहुजनसमाज आमच्या चळवळीपासून अद्याप दूरच आहे. तथापि समाधानाची इतकीच गोष्ट आहे की, आमच्या पथाने आमच्या स्त्री वर्गावर बराच परिणाम केला आहे. त्याचप्रमाणे आमच्या सुशिक्षित वर्गापैकी ख्रिस्ती झालेले अथवा नास्तिक असलेले असे वगळले, तर बाकीचे सर्व उघड रीतीने आपणांस ब्राह्म म्हणवीत नसले, तरी ते आमच्या पंथाचेच अनुसारी आहेत. आतां चाळीस वर्षांच्या अनुभवाने आमच्या धर्ममतास निश्चित व अबाधित असे स्वरूप आले आहे काय, असे कोणी विचारल्यास त्यास 'नाही' असेच उत्तर द्यावे लागेल.पण धर्ममताच्या अभेद्य तटांत कोंडून राहणे, म्हणजे कांहीं स्वर्ग नव्हे. आम्हांस सत्य सापडले नाही असे नाही. परंतु आम्हास ते आणखी कळावयास पाहिजे आहे. स्वर्गीय आनंदाचे व शांतीचे दंवबिंदु आम्ही चाखले आहेत, परंतु ब्रह्मानंदाचा अगाध सागर आमच्यापुढे अज्ञात असाच पसरलेला आहे. आमचे धर्मशास्त्र संपूर्ण झालेले नाही. प्रतिवर्षी त्यात नवीन नवीन सर्ग सामील व्हावयाचे आहेत. आमचा धर्म जर मनुष्यकृत असेल, तर त्याचा नाश झाल्यावांचून राहणार नाही. आणि तो ईश्वप्रेरित असेल, तर आमचा कोणीं कितीही विरोध केला, तरी तो अभंगच राहील."

केशवचंद्राच्या विशिष्ट मताचे ज्यांत थोडेफार दिग्दर्शन झाले आहे, अशा कांहीं व्याख्यानांचा सारांश आम्हीं आतापर्यंत ठिकठिकाणी दिला आहे. त्यांच्या प्रत्येक व्याख्यानांत कांही तरी नवीन विचारसरणी आढळते. परंतु सर्वच व्याख्यानांचा सारांश येथे देणें अशक्य आहे. तथापि ह्या प्रकरणांत आणखी कांहीं व्याख्यानांचा सारांश देऊन हे प्रकरण पुरे करूं. हीं व्याख्याने इ. सन १८७८ सालची फूट पडल्यानंतरचीं आहेत. ह्या व्याख्यानांत जीझस ख्राइस्ट

ही व्यक्ति अगर कल्पना केशवचंद्रांचे विचारांत कशी केंद्रीभूत झाली होती, हें दिसून येईल. इ. सन १८७९ चे ईस्टरच्या सणांत केशवचंद्रानीं दिलेल्या व्याख्यानांत ख्राइस्ट हा कोण ? असा भरतभूमीकडून सवाल उपस्थित करून त्यास जबाब दिला आहे, त्याचा सारांश असाः—

"ज्याने भरतभूच्या हृदयाचाच ठाव घेतला आहे, आणि ज्याच्या सत्तेने देशांत विलक्षण क्रान्तीच्या लाटा उसळल्या असून, हिंदुस्थानच्या चारी कोपऱ्यांपर्यंत ज्याच्या नांवावर नवीन नवीन आचार व सुधारणा पसरत चालल्या आहेत, तो ख्राइस्टच आज हिंदुस्थानचे राज्ययंत्र चालवीत आहे. येथे ब्रिटिश सरकारची राजकीय सत्ता ती काय! इंग्लंडच्या खिस्तरूप प्रचंड नैतिक सत्तेनेच ह्या विस्तृत देशावरील साम्राज्य जिंकले आहे. भारतवर्षाचा हा दिव्य कोहिनूर धारण करण्याची योग्यता येशू खिस्तावाचून दुसऱ्या कोणास नाहीं हें त्रिवार सत्य आहे. आणि हे सुवर्णभूमीचं अमोलिक रत्न त्याच्या हस्तगत होईलच होईल हेही खरे आहे. हिंदुस्थान देश जिंकल्याचा मान ब्रिटीश सोजिरांस देतां येत नाहीं. तर तो मान स्वार्थत्यागी व परोपकारी अशा खिस्ती. मिशनऱ्यास कृतज्ञबुद्धीने दिला पाहिजे. आपण हिंदु असलो तरी खिस्ताने येथे आणलेल्या अत्यंत श्रेष्ठ व उदात्त नीतितत्त्वांबद्दल त्याचीच व त्याच्या प्रचारकांची स्तुति करणे आपणास भाग आहे. ज्याच्या पायाशीं प्राचीन तत्त्वज्ञान नम्र झाले, त्या जीझसची महती तुम्हास नाकबूल करतां येणार नाही.

"खिस्त हा केवळ नीतीचाच आदर्श आहे असे नव्हे, तर तो लोकोत्तर दैवी शक्तीचाही पुतळा आहे. मी आणि माझा पिता एकरूप आहोत (I and my Father are one) ह्या एका वाक्यात मनुष्यातील दैवी संपत्तीची किल्ली त्यांनीं खुली केली. याच एका वाक्यात निरहंकाराचे दुसरें एक मोठे तत्त्व सांठविले आहे. जी अहंबुद्धि आपणास मोहात आणि दुःखात पाडूं शकते, ती बुद्धि खिस्ताचे ठिकाणीं नव्हती. वास्तविक खिस्त ही एक दिव्य कल्पना, खिस्तजन्माच्या पूर्वीही परमात्मस्वरूपात अव्यक्तरूपाने होतीच. त्या अव्यक्त कल्पनेंत एक खिस्तच काय, पण त्याचा सर्व शिष्यसंभार व त्याच्या सर्व लीला रेखाटलेल्या होत्याच. त्या शबल ब्रह्माने त्या अव्यक्त कल्पनेस आपला पुत्र म्हणून हाडामांसाचा बनविला. अशा रीतीने परमात्म्याची दिव्य शक्ति व प्रेरणा घेऊन तो देवपुत्र जगतीतलावर अवतीर्ण झाला.

ईशावताराचे हेंच खरें तत्त्व आहे. अशा ह्या अवतारी पुरुषावर जे शिष्य-भावाने एकनिष्ठा ठेवितात, ते तद्रूप होतात. अध्यात्म दृष्टीने जीव आणि ईश्वर हे एक कसे, ते येशु-ख्रिस्ताने अनेक रीतीने सांगितलें आहे. आपल्या पूर्वजांनीं जे एकच एक तत्त्व अव्वलपासून अखेरपर्यंत प्रस्थापित केलें, तें ईश्वरमयत्व वाद (Pantheism) हें होय. तें तत्त्व अगदींच टाकाऊ व चुकीचे आहे. त्यांत अनेक मूर्खपणाच्या व घातुक कल्पना समाविष्ट झाल्या आहेत. परंतु सत्य, प्रेम आणि आनंद यांत जीवेश्वराचे बुद्धिपुरःसर होणारे ऐक्य हे येशु ख्रिस्ताचे तत्त्व आपल्या धर्मापेक्षां फारच उदात्त व पूर्ण आहे! हिंदूंच्या ऋषींचे ध्येय, समाधियोगाने जीवभाव ब्राह्मस्वरूपांत लीन करणे हें आहे. परंतु हे साधीत असतां, ते आपली जाणीवही ठेवीत नाहींत. सारें अजाणतपणेंच घडवून आणतात! आणि शिवाय ब्रह्माशीं तादात्म्य पावण्या-पूर्वीं जीवाने आपले दोष व वैगुण्ये उराशीं तशीच बाळगलेलीं त्यांस चालतात. ईशसंकल्पाशीं आत्मसंकल्प बुद्धिपुरःसर एकरूप करण्याची आमच्या धर्माची कल्पना नाहीं. ती येशु ख्रिस्ताची कल्पना आहे. ख्रिस्त-प्रणीत योग सक्रिय आणि पवित्र स्वरूपाचा आहे त्यांत भक्ति व पावित्र्य याचा सुंदर मिलाफ आहे. कोठे ख्रिस्ताची नम्र शरणागति, आणि कोठे "अहंब्रह्मास्मि" ही हिंदु तत्त्वज्ञान्यांची भलतीच बढाई.×× हे ख्रिस्त भक्तांनो, तुम्ही जर्मनींत जर्मन ख्रिस्ताचे व अमेरिकेत अमेरिकन ख्रिस्ताचे गोडवे खुशाल गा. परंतु हिंदूंपुढे ख्राइस्ट आणाल, तर तो युरोपांतला सुधारलेला एक साहेब नसून आशियांतील एक विरागी साधु असा आणा. हिंदूंच्या वैराग्याला भलतीच आत्मघातकीपणाची दिशा लागली आहे. वैराग्याचे खरे खरें कल्याणप्रद स्वरूप ख्रिस्तानें दिग्दर्शित केले आहे. असा तो माझा ख्राइस्ट, माझा गोड येशू, माझ्या अंतरींचा तो दिव्य हिरा, माझ्या गळ्यांतील तो कंठमणि, आज वीस वर्षें मी ह्या दीन हृदयाशीं जोपाळला आहे. सख्यांनो! तो नवरदेव आपल्या दाराशीं आला आहे. मूर्ख कुमारिकांप्रमाणें ह्या वेळीं झोपीं जाऊ नका; तर उठा, आपल्या दिव्यांच्या वाती सरसावा, आपल्या आंगावर उत्तम शृंगार चढवा, आणि उत्सवप्रिय पौर्वात्यांस शोभेल, अशा रीतीने ह्या नवरदेवांचें स्वागत करण्यास उत्साहपूर्वक सामोऱ्या व्हा."

ह्याप्रमाणें एका व्याख्यानांत ख्रिस्ताचा महिमा सांगितल्यानंतर त्रिमूर्ति-

कत्व आणि त्यांतील खिस्ताचे व्यक्तित्व यांवर त्यांचे दुसरे व्याख्यान झाले. या व्याख्यानाचा सारांश सांगण्यापूर्वी वाचकांस हे सांगितले पाहिजे की, ह्या देवत्रयीवरच राजा राममोहन व ट्रिनीटेरिअन मिशनरी ह्याचा वाद होऊन देवत्रयीकत्वाचा राममोहन ह्यानीं निषेध केला होता त्याच त्रयीचा केशवचंद्रांनी फारच मोठ्या उत्साहाने पुरस्कार केला आहे. केशवचंद्र म्हणतातः "हा देवत्रयीवाद म्हणजे अखिल विश्वाच्या पवित्र शास्त्राचा निधि आहे. हे तत्त्वज्ञान पूर्वी पूर्वेकडून पश्चिमेकडे गेले, तेच आज अधिक उज्ज्वल स्वरूपांत पश्चिमेकडून पूर्वेस परत उदय पावत आहे. पृथ्वीच्या सूर्याभोवतीं होणाऱ्या परिभ्रमणात तिने कधी सूर्याच्या अधिक जवळ जावे, ह्याचे ज्योतिर्विदांस नवल वाटत नाही. तसेच आध्यात्मिक तेजाचा प्रकाश ह्या भरतभूमीतच अधिक पडावा, ह्याचेही कोणास आश्चर्य वाटावयास नको. बा युरपा! आशियातील मी एक नम्र मनुष्य देवत्रयीकत्व वादाचे रहस्य सांगतो आहे, ते जरा स्वस्थपणे ऐक. फार प्राचीन काळच्या ऋषींनीं त्या अज्ञात परब्रह्म वस्तूचे (नासदीय सूक्तांत?) जसे स्फुरले तसे वर्णन केले. आणि खरोखर त्याहून अधिक तरी कोण काय सांगू शकेल? असे ते अनिर्वचनीय ब्रह्म अंधकारमय सुप्तावस्थेत असतां एकाएकी शब्द उत्पन्न झाला. प्रकाश होवो, असे म्हणताच प्रकाश झाला, व पुढे अनुक्रमाने सर्व सृष्टि निर्माण झाली. हिंदूंच्या अवतारकथांतही हीच उत्क्रान्तीची कल्पना आहे ही उत्क्रान्ति होता होता, ईशपुत्र खिस्त निर्माण होण्यांत एका अर्थी उत्क्रान्तीची सीमा झाली. ब्रह्माचे अखेरचे व्यक्त स्वरुप म्हणजे देवमनुष्य होय. परंतु एक येशुखिस्त निर्माण होऊन तेथेच जर जगाची उत्क्रान्ति थांबली असती, तर सृष्टीचे हे कोडे उलगडणे, अशक्य झाले असते. व ईशपुत्राचा जन्मही निष्फळ ठरला असता. अखिल मानवजातीस पावन करून सर्वांसही ईशपुत्रत्व देणे, ही उत्क्रान्तीची पुढील पायरी आहे. ह्या उत्क्रान्तीच्या लाटेचा जो प्रेरक त्यासच पवित्र आत्मा (Holy Ghost) असें म्हणतात. ह्याप्रमाणे पिता, पुत्र व पवित्र आत्मा ही तीन सत्यें सिद्ध झाली. ह्या त्रिकोणाचा शिरकोण तोच जिवोहा; तेच ब्रह्म; ते ब्रह्म मानवकोटींत व्यक्त होणे; तोच ईशपुत्र ख्राइस्ट; आणि त्या दैवीसत्तेने पुन्हा सर्व मानवाचे स्वर्गारोहण करणें, तोच पवित्र आत्मा. जनक, अनुशास्ता व उद्धारक; स्थिर ब्रह्म,

चलित ब्रह्म व निवृत्त ब्रह्म (Still God, the journeying God, the returning God); शक्ति अथवा स्फूर्ति (Force), शहाणपण, आणि पावित्र्य; सत्य, शोभन आणि सौंदर्य; किंवा सत्, चित् आणि आनंद; अशी ही देवत्रयी आहे. योगभूमिकेवरून ह्या त्रयीचें ध्यान करावयाचें तर (पिता) वर, (पुत्र) खालीं व (पवित्र आत्मा) आंत असाच मी अगुलिनिर्देश करीन.

"ह्या त्रयीवादांत पिता व पवित्र आत्मा हे एकच आहेत, ही गोष्ट निर्विवाद आहे. ईशपुत्र हाच काय तो वादाचा विषय आहे. ह्या वादांत देवमाणूस व मानवदेव ह्या दोन कल्पनांतील भिन्नभाव स्पष्ट लक्षांत घेतला पाहिजे. पहिली कल्पना सत्य असून दुसरी भ्रामक आहे. देवमाणूस म्हणजे एक मानवच· पण त्यांत देवत्व आविर्भूत झालेले असते. पण मनुष्य तो मनुष्यच. तो कधी देव होऊ शकणार नाहीं. खाइस्ट हा मनुष्यच होता. व तो अद्यापिही त्याच रूपांत कायम आहे. ब्रह्मीभूत झाला नाहीं. ईशपुत्र कितीही पूर्ण असला तरी तो ईश होणार नाहीं. आपली खाइस्टची भक्ति म्हणजे बंधुप्रेम होय, पितृभक्ति नव्हे. खाइस्ट हा पितृत्वाचा अवतार नसून बंधुत्वाचा अवतार आहे. तो आपला बांधव आहे. त्याच्या ठिकाणी पित्याचा जसा अंश आहे, त्याचप्रमाणे जगजननी मेरी हिचाही अंश आहे. अर्थात् बांधव या शब्दांत भगिनींचाही अंतर्भाव होतो. पित्याच्या पौरुषाप्रमाणे मातेचे प्रेम, क्षमा, दया इत्यादि कोमल भावही खिस्ताचे ठिकाणीं दिसून येतात. सर्व गुणांचा परिपाक अखेर प्रेमांतच होत असल्यामुळे, स्त्री हे पुरुषाचें उत्क्रान्त स्वरूप आहे असें मी म्हणतो. स्त्रियांच्या अंतःकरणांतील प्रेमाची जोड पुरुषाच्या कोणत्याही मोठ्या सद्गुणाने होणार नाही.

"एवंगुणविशिष्ट ज्या खाइस्टचें मी वर्णन करतो, तो खिस्ती पुराणांतील सामान्य देहधारी खाइस्ट नव्हे. माझा खाइस्ट हा अधिक श्रेष्ठ, पूर्ण, सनातन व विभु आहे. आणि तो तुम्हांला श्रद्धेच्या दृष्टीने आजही सर्वत्र दिसेल. त्याला चित् म्हणा, शुद्धबुद्धि म्हणा, अथवा मूळारंभींचा शब्द (Logos) म्हणा. हा खाइस्ट प्रत्येक खऱ्या ब्राह्मणाच्या अथवा वैदिकाच्या अंतःकरणांत आहे. तो गंगेच्या पवित्र तीरावर आहे. तो प्रत्येकाच्या अंतःकरणात आहे. हिंदु जर खिस्ताचा विरोध करीत असेल, तर तो फक्त खिस्त या नांवापुरताच विरोधक

आहे. वेळ येईल त्या वेळीं हिंदूंस हा ख्रिस्त प्रत्यक्ष होईल, अथवा ख्रिस्तच भरतभूमींत आविर्भूत होईल.

"काशीक्षेत्रीं मिळणाऱ्या लांकडी डब्याच्या संच्याप्रमाणे हें आपलें शरीर आहे. त्याच्या पशुवृत्तीच्या बाहेरचे झांकण काढा, म्हणजे आंत खऱ्या माणुसकीचा डबा निघेल. तोही उघडाल तर त्यांत तुम्हांला ख्राइस्टरूप डबा दिसेल, तोही उघडून पहाल, तर पवित्र आत्म्याचे सपुट तुम्ही पहाल, आणि त्याच्याही आंत निराकार ब्रह्मतत्त्वाचा वास आहे, असे तुम्हास आढळून येईल. ह्या दृष्टान्तावरून एक गोष्ट उघड होते, ती ही की, आपण पामर जीव व ते परब्रह्म, यांस जोडणारा ख्रिस्त मध्यतरींचा दुवा आहे. पामर जीवाच्या डब्यांतील ख्राइस्टची संदुक उघडून पाहिल्यावाचून परमपुरुषाचा लाभ होणे शक्य नाहीं. हे जरी खरें आहे, तरी ख्रिस्त हा काहीं देव नव्हे. अर्थात् मूर्तिपूजेस विटलेल्या या भरतभूमीत आणखी ख्रिस्त मूर्तीचे देव्हारे कोणी माजवील, तर त्याचा मी योद्धयाप्रमाणे कसून विरोध करीन. ख्रिस्त हा केवळ साधनाचा दर्शक आहे. खरा प्रेरक पवित्र आत्माच आहे. येशु ख्रिस्ताचे जन्म पतितास पावन करीत नाही. तो उद्धारक एक पवित्र आत्माच आहे. परंतु मौज अशी कीं, ब्रह्म अथवा 'जीहोवा' ह्याचे माहात्म्य जुना करार सांगून गेला. ईशपुत्राच्या लीला नव्या कराराने वर्णिल्या, परंतु खरा पतितपावन असा जो पवित्र आत्मा (Holy Ghost) त्याचे माहात्म्य आजपर्यंत अवर्णितच राहिले. ते लोकांस शिकविण्याकरिता नवविधानाचा (Third Dispensation) हा तृतीय अवतार आहे. ह्या तिन्ही कराराचा समन्वय करा, म्हणजे तोच अखिल जगाचा देवत्रय पंथ सिद्ध होईल. सच्चिदानंद हेच त्याचे रूप. ह्याप्रमाणें जुन्या मतांचा नाश न करितां मागे मागे जाणाऱ्या जगास पुढे घेऊन त्यास जगदुद्धाराचा खरा मार्ग नवविधान दाखवीत आहे."

एकोणिसाव्या शतकातील 'ईश्वरी साक्षात्कार' ह्या केशवचंद्राच्या दुसऱ्या एका प्रसिद्ध व्याख्यानाचा सारांश, 'आम्ही काय कुणाचे खातो रे, तो राम आम्हाला देतो रे' ह्या सुप्रसिद्ध पद्यांत आला आहे, असे म्हटले तरी चालेल. ह्या व्याख्यानात आधिभौतिकशास्त्रेही अध्यात्मविचारांस पोषक व साहाय्यक आहेत, असे त्यांनीं शिवाय प्रतिपादले आहे. जीव आणि ईश्वर यांच्या दरम्यान असलेल्या सोपानाच्या अनेक पायऱ्या आधिभौतिकशास्त्रानें

कमी करून, जीवास अधिक ईशसन्निध केलें आहे, असे त्यांचें म्हणणे आहे. केशवचंद्रांचे ईशदर्शनांत देवाचे उजवे बाजूस येशु खिस्त तर डावे बाजूस चैतन्य; पुढे मोझेस तर बाजूला शाक्यमुनि अशी प्रभावळ आहे. केशवचंद्राचे म्हणणे असे कीं, वरील सत्पुरुषास जसा ईश्वर प्रत्यक्ष झाला, तसा जरी आपल्याला न झाला, तरी वरील पद्यांतील विचारसरणीनें पाहतां ईश्वर आपणां सर्वांस कळूं लागेल. त्याचे भान आपल्याला हरघडी होईल.

देव आणि भक्त हे दोन्ही शब्द सापेक्ष आहेत. देवाचे येथवर वर्णन झाल्यानंतर भक्ताच्या संबधीही केशवचंद्रांचे विचार समजावून घेतल्यावाचून हा विषय पुरा होणार नाही. 'आम्ही नवविधानाचे ईशप्रेषित' ह्या विषयावर केशवचंद्र यानी एक व्याख्यान दिले. त्याच्या आरंभीच ते आपल्या नवविधानास उद्देशून म्हणतात कीः—" पूर्वेकडील सूर्य पुन्हा एकदा उदयास येऊन त्याने निद्रावश झालेल्या जगास आनंदित केले आहे, आणि अज्ञानांधकारांत आजवर जग गुरफटले होते, त्या घनघोर अंधकाराचा त्याने नाश केला आहे." इतक्या थाटांनीं व्याख्यानाचा उपक्रम केल्यानंतर त्यानी आपल्या सहकारी धर्मप्रेषितांच्या दैन्य व स्वार्थत्यागादि गुणांचे रसभरित वर्णन करून 'आपण आपल्याला हिंदूचा येशुखिस्त म्हणवू पाहतो' ह्या टीककाराच्या आक्षेपाचा त्यानीं निषेध केला आहे. पुढे केशवचंद्र म्हणतातः—" येशु खिस्त व असेच दुसरे महात्मे यांचा मी एक सेवक होण्याची मात्र इच्छा करतो, मला माझ्यासंबंधी व्यर्थ दंभ माजविण्यात मुळीच आनंद वाटत नाही, याबद्दल सर्वांनीं खात्री असू द्यावी. माझे भाषण अलंकारिक व थोडे जास्त लाक्षणिकही असू शकेल. कवि-कल्पनाचा अथवा धार्मिक अर्थवादाचा अधिक आश्रय केल्याबद्दल कोणी मला दोष देवोत. तो आशियांतील लोकाचा स्वाभाविकच दोष आहे. पूर्व ही काव्यभूमि आहे, आणि आपले वाङ्मय हे सर्व कल्पनात्मक, व भाषा रूपकात्मक आहे. येशु खिस्तानेंही अशाच भाषेचा उपयोग केला आहे त्याप्रमाणे मीं लाक्षणिक भाषा वापरली असतां कोणी त्याचा शब्दशः अर्थ घेतां कामा नये. मी ज्या हेतूने शब्द वापरतो त्याच अर्थाने ते घेतले पाहिजेत; परंतु वस्तुस्थिति मात्र अशी नाहीं. जेव्हां मीं देव पाहिला अथवा 'आजि म्यां ब्रह्म पाहिले' असे म्हणतो, तेव्हां माझे श्रोते लगेच असें अनुमान काढतात कीं, मला ह्या चर्मचक्षूंनीं

अंतरिक्षांत कांहीं तरी दिव्य प्रकाश दिसला. आणि म्हणून माझा ईश्वरी साक्षात्कार केवळ कल्पनामात्र आहे, असे मानतात. तसेच जेव्हां मी म्हणतो कीं, येशु व मोझेस याच्याजवळ मी होतो, तेव्हां ऐकणाराच्या कल्पनेची धाव येथपर्यंत जाते कीं, मी कोणी दोन मानवदेहधारी व्यक्ति अगर त्यांचीं भूते पाहिली असतील. माझ्या साध्या काव्यमय वाक्याचा लोक शब्दशः अर्थ करतात, आणि मग तशी गोष्ट कशी घडावी, म्हणून त्याचा उलट उपहास करतात! पौर्वात्यांच्या लाक्षणिक बोलण्याच्या आवडीमुळे सारा गैरसमजुतीचा घोटाळा माजला आहे. यास्तव भावनाशून्य टीकाकारांनो, माझ्या भाषणाचा अक्षरशः अर्थ न करितां तो केवळ लक्षणेने ध्यानीं घेत चला.‡ तात्पर्य, मी कोणी चमत्कार दाखविणारा अतिमानुष शक्तीचा पुरुष आहे, असे माझे म्हणणे नाहीं, आणि तसे कोणी समजू नये. आमच्या नवविधान पंथांत जरी मी केंद्रीभूत दिसलो; तरी वस्तुतः मी माझे असे कांहीच सांगत नसून, मी व माझे सहकारी ह्यांचे सर्वांचे नवविधानात सम्मिलन झाले आहे. आमचे विचार हे नवविधानाचे विचार आहेत, कोणाही व्यक्तीचे नाहींत. शिवाय मध्यस्थावाचून प्रत्यक्ष देवभेट होते, हा तर नवविधानाचा मुख्य सिद्धान्त आहे.

"समन्वय हे नवविधानाचे दुसरे ब्रीद आहे. आमच्या अंगात आमच्या पूर्वज आर्यांची धर्मश्रद्धा खेळत आहे, हे जर खरे आहे, तर आमच्यावर खिस्ताचे संस्कारही दृढतर झाले आहेत हेही खरे आहे. ईश्वर ही जशी एक व्यक्ति आहे, तसेच तो एक सद्गुणाचे अधिष्ठानही आहे. आम्ही त्या परमपुरुषाच्या व्यक्तीची पूजा करतो, व त्याचे सद्गुणलक्षण आत्मसात् करतो. अविद्यमान सत्पुरुषाच्या संगतीचा लाभ अशा रीतीने घेता येतो. चित्ताने चैत्यास (चिंतनाचे विषयास) आत्मसात् करणे ह्या प्रक्रियेप्रमाणेच सहानुभूति देखील एक क्रिया आहे. आपण आपल्या आत्म्यास तात्पुरते आपणांतून काढून दुःखिताच्या अंतःकरणात घालणे व त्यांचे दुःख अनुभविणे, व त्यांच्या दुःखनिवारणार्थ त्याची सेवा करणे, अशी ती क्रिया आहे. अशी

---

‡ वरील उतारा विस्तृत देण्याचें कारण त्याने केशवचंद्रांच्या कित्येक आश्चर्यजनक व गूढ वाटणाऱ्या उक्तींवर निराळाच प्रकाश पडेल.

ही एकजीव होण्याची कल्पना केवळ खिस्तीच आहे. आपल्यामधील योग-विद्या म्हणजेही तसलाच एक प्रकार आहे. ह्याच पद्धतीनें आजकाल युरोपनें हिंदुस्थान आत्मसात् करणे, व हिंदुस्थानाने युरोपशीं एकजीव होणें जरूर आहे. आम्हीं खिस्ताला मान दिलाच पाहिजे. इतकेच काय, पण आम्ही स्वतांच तादात्म्य भावनेने खिस्त झाले पाहिजे. पण लौकिकी धर्माप्रमाणें खिस्ती होतां कामा नये. कारण खिस्त आणि खिस्तीधर्म ह्यांत महदंतर आहे.''

———

## प्रकरण पांचवें

# प्रार्थना व प्रेरणा

प्रार्थना व प्रेरणा ही मनुष्याच्या अध्यात्मजीवनचक्राच्या आंसाचीं दोन टोकें आहेत. किंबहुना एकाच अनुभवाच्या त्या दोन बाजवा आहेत असे केशवचंद्र म्हणतात. प्रार्थना व प्रेरणा ह्या दोन शब्दांत केशवचंद्राच्या आयुष्याचे सारे रहस्य येते; परंतु ह्या दोन शब्दाचा किती सूक्ष्म अर्थ घ्यावयाचा हे ठरविणे फार कठीण आहे. कीर्तनापासून आत्मनिवेदनापर्यंत सारेच भक्तीचे प्रकार जीवाच्या शरणागतीचे अतएव प्रार्थनेचेच आहेत; तसेच साध्या विषयानुवर्ति इंद्रियप्रेरणेपासून थेट अपरोक्षानुभूतीपर्यंत सारेच चढते चढते प्रेरणेचे अनुभव आहेत, असेही कोणी म्हणेल. विशेषेकरून ब्राह्म-वाङ्मयांत ह्या शब्दाचा उपयोग अनुभवाच्या विशेष सूक्ष्मदृष्टीने केलेला नसावा, असे दिसते. त्यामुळे नवनिधानपथाची प्रार्थना व प्रेरणा ही दोन टोके आहेत, असे जेव्हां सांगण्यांत येते, तेव्हां प्रेरणा ह्या शब्दातील केशवचंद्रांचा लक्ष्यार्थ कोणता, ह्याचा खुलासा पुढे सविस्तर केला आहे.

पहिली ईश्वरनिष्ठा व दुसरी प्रार्थना अशा ह्या मुमुक्षुमार्गाच्या पहिल्याच दोन पायऱ्या आहेत असें केशवचंद्र म्हणतात. इंद्रियनिग्रहादि साधनांनीं चित्तशुद्ध करावे, व मग त्या शुद्ध चित्ताने भगवंताची प्रार्थना करावी, हा त्यांच्या धर्मशास्त्राचा पहिलाच धडा आहे. प्रार्थना हे उपासनेतील एक महत्त्वाचें अंग आहे. ब्राह्मोपासनेत प्रथम भगवंताच्या षड्गुणैश्वर्यांची स्तुति, नंतर त्याच्या दयालुत्वाबद्दल कृतज्ञबुद्धीने आभारप्रदर्शन, आणि नंतर प्रार्थना, असा अनुक्रम असतो. यांपैकीं स्तवन आणि कृतज्ञता हीं जशी देवासंबंधीं आपलीं कर्तव्यें आहेत; त्याप्रमाणे प्रार्थना हे एक अपरिहार्य साधन आहे. षड्रिपूंपासून आपले रक्षण करण्यास जीव सर्वथा असमर्थ आहे. ईश्वरीकृपेवांचून मानवी प्रयत्न व्यर्थ होत, असा जीवांचा आजपर्यंतचा अनुभव असल्यामुळें त्या कृपेसाठीं देवाची करुणा भाकल्यावांचून गत्यंतर नाहीं. नैराश्याच्या घनघोर रात्रीं जीव बावरला असतां, त्यास आशेचा दिव्य

किरण दाखविणारी एक प्रार्थनाच होय, असा केशवचंद्रांनीं आपला अनुभव सांगितला आहे. ईश्वराची अखंड प्रार्थना करा. (Pray without ceasing) हेंच त्यांचे ब्रीदवाक्य आहे. प्रार्थना करावयाची म्हणजे एखादे विशिष्ट आसन घालून बसावयाचे, अथवा अमुक ठरीव शब्द उच्चारावयाचे असे नव्हे. प्रार्थनेचे महत्त्व आसनांवर अथवा शब्दांवर नाही. प्रार्थना निःशब्दही होऊ शकेल. तसेच ती एकान्ताप्रमाणे लोकांतही होऊं शकेल. अनन्यगतिक झालेल्या मनाची तीव्र उत्कंठा हेच खऱ्या प्रार्थनेचे रूप होय. "तस्मात् कारुण्यभावेन रक्ष रक्ष परमेश्वर," अशासारखा ठराविक पाठ म्हणणे ही खरी प्रार्थना नव्हे. आपल्या प्रार्थनेत आपल्याला खरोखर काय पाहिजे आहे, या गोष्टीची जाणीव व तत्संबधीं आर्तता असली पाहिजे. ठरीव प्रार्थनाचे केवळ शब्दोच्चारण व्यर्थ होय. असे स्तोत्रपाठ तासन् तास करूनही, त्याची फलश्रुति काहीं न मिळाल्यामुळे, साधकाचे मन रूक्ष व निराश होते यासाठी जुन्या ठरीव प्रार्थनांचा उपयोग न करितां, आपण आपले मनोगत रोज सुचेल, ह्या शब्दात व्यक्त करावे. असे आहे, तरी कोणास काहीं मार्गदर्शक असावे असे वाटत असेल तर त्यानीं 'Theist's, Prayer book' हे पुस्तक पहावे," असे केशवचंद्रानी सांगितले आहे. वरील विषयावर केशवचंद्र याचे व्याख्यान, इ. सन १८६८ सालीं मुंबईच्या प्रार्थनासमाजांत झाले. त्या वेळी त्यांनी अखेर असे निक्षून सांगितले की, विद्वत्ता, लोकसंग्राहक बुद्धि, अथवा सामाजिक सुधारणा, इत्यादि कोणत्याही साधनांनी स्वदेशाचा उद्धार होणार नसून, ईशप्रार्थना हे एकच काय ते त्यास खरं साधन आहे. ह्यासाठीं विलंब न करता, प्रत्येकानें त्याच साधनाचा अवलंब करावा.

येथपर्यंत ह्या साधनाचे पूर्वाङ्ग सांगितले. ह्याचे उत्तराङ्गातच ह्याची फलश्रुति आहे. ज्या प्रार्थनेचा जाब ईश्वराकडून मिळाला नाही, ती खरी व पुरी प्रार्थनाच नव्हे. केशवचंद्र सेन आपल्या एका प्रार्थनेत म्हणतातः—
"देवा, ह्या जगातील अश्रद्धेय लोकांच्या प्रार्थनेचे ढोंगधत्तुरे मला आतां पाहावत नाहींत. प्रार्थनेची कोण ही थट्टा! सर्व धर्मांचे लोक आपआपल्या प्रार्थनामंदिरात रोज जातात, आणि ते तुझ्याजवळ अनेक मागण्या करितात. परंतु तूं काय म्हणतोस, ते ऐकण्यासही ते भले गृहस्थ थांबत नाहीत! आपल्या रोजच्या संसारकार्यासाठीं तांतडीनें निघून जातात. त्यांच्या ठिकाणीं धीर

नाहीं, खरी आतुरता नाहीं, कळकळ नाहीं, किंवा नम्रभाव नाहीं. त्यांच्या प्रार्थनेस जाब देण्यास तूं येतो आहेस, तो सारे लोक गेलेसुद्धां! तुझी आशीर्वाद देण्याची वेळ येते, तो सारे मंदिर रिकामे! काय हे ढोंग! कसली ही थट्टा! ह्या अधीऱ्या अहंमन्य लोकांस, देवा हे कळू दे, कीं त्यांचा उद्धार त्यांच्या प्रार्थनेतील वक्तृत्व अथवा प्रश्नरचना यांवर अवलंबून नाहीं; ते काय म्हणतात, त्यावर अवलंबून नाहीं; त्यावर तूं काय आशीर्वचन देतोस, ते ऐकून घेण्यात सारी फलश्रुति आहे. ईशप्रसाद घेतला नाहीं, मग प्रार्थना ती काय?

वरील विवेचनांत ईशप्रेरणेचा जो अनुभव अभिप्रेत आहे, तो प्रत्यहीं ज्याच्या वाट्यास येत असेल, असे भाग्यवान् फारच थोडे, असे आम्हांस तरी वाटते. परंतु केशवचंद्र ह्यास तो अनुभव इतका दुर्घट वाटत नाहीं. ते म्हणतात कीं, ईश्वरी आदेश प्रत्यक्ष मिळवणे, हे जर आज कोणास कठीण वाटत असेल, तर तो ह्या आधुनिक काळातील जडवादी सुधारणेचा परिणाम आहे. आज ईश्वरी आदेश म्हणजे फक्त पुस्तकविक्याचे दुकानीं मिळणारी एक चीज आहे, असे लोकांना वाटते. हा आमचा अधःपात आहे. वास्तविक आमचे सारे जीवनच जर ईशतत्त्वात आहे, तर त्याचा संदेश आम्हांला वेळोवेळीं समजणे, ह्याहून स्वाभाविक दुसरे ते काय? प्रार्थना आणि प्रेरणा हे दोन प्रकार इतके सन्निकट आहेत की, ते वास्तविक एकाच गोष्टीच्या दोन बाजूंप्रमाणे आहेत. जीवात्म्याने गुडघे टेकून ईश्वराशीं सन्मुख व्हावे, व श्रद्धेच्या व निष्ठेच्या दृष्टीने वर त्याचेकडे पहावे, हेच प्रार्थनेचे रूप. मग सूर्या-सन्मुख होऊन पाहिले असतां, सूर्याचा दिव्य गोल दिसावा, हे जसे स्वभाव-सिद्ध किंबहुना अपरिहार्य आहे; त्याचप्रमाणे आतुरतेने देवाकडे दृष्टि लागली असता, त्याचा दिव्य प्रकाश अंतःकरणात प्रविष्ट होणे, हे सहजप्राप्तच आहे. आपण अनन्यगतिक होऊन शरण जाणे, एवढेच आपले काम आहे. मग ईशप्रेरणेचे अचूक फळ मिळाल्यावांचून राहणारच नाहीं.

कोणी म्हणतील कीं, ईश्वर जर सर्वज्ञ आहे, तर त्याची आम्ही प्रार्थना करण्याची काय गरज आहे. तसेच अबाधित अशा सृष्टिनियमाने जर सारे जगिक व्यवहार बांधलेले आहेत, तर एखाद्या व्यक्तीच्या प्रार्थनेमुळें त्यात फेरफार होणें, असंभवनीय आहे. ह्या आक्षेपास केशवचंद्र असे उत्तर

देतात कीं, ह्या शंकेत मागा म्हणजे मिळेल, ह्या ईश्वराच्या कायद्याचें अज्ञान दिसून येते. देव कोणाकरिता कधींही आपले कायदे मोडीत नाहीं. आतां कोणी असे म्हणतील कीं, आम्ही आजवर प्रार्थना करीतच आलों, पण आम्हांस कधी ईशप्रेरणेचा अनुभव घडला नाहीं, तर हे त्यांच्या प्रार्थनेचे वैगुण्य होय, असे केशवचंद्र त्यास उत्तर देतात. जीवकला व ईशकला ह्यांच्या तारांची टोके एकत्र होतांच तेथे प्रकाशाची ठिणगी पडलीच पाहिजे. किंबहुना असेच म्हटले पाहिजे कीं, ह्या चित्कलेचा प्रकाश म्हणजे विद्युत्प्रकाशा-प्रमाणे प्रासंगिक कारणाने मधून मधून चमकणारा प्रकाश नव्हे. देववाणी कधींकाळीं कोणास ऐकूं येत असली, तरी तिचा घोष संतत व अव्याहत सुरूच आहे. सूर्य आपले ठायीं नित्य तळपतच असतो, जो आपले घर उघडील त्यास प्रकाशाचा लाभ सहज प्राप्त होईल त्याचप्रमाणे ईशप्रेरणा कधी कोठे नाहीं, असे नाहीं. घेणारा मात्र आर्त पाहिजे. ईशप्रेरणेची दुसरी अशी मौज सांगतात कीं, त्या प्रेरणेबरोबर ज्ञान व निष्ठा हीं दोन्ही एकदमच प्राप्त होतात. ही प्रेरणा ईश्वराची आहे, केवळ आपलाच मनोविकार नाही, याबद्दल शंकाच रहात नाही. त्या प्रेरणेवर देवाचा शिक्का स्पष्ट असतो. शिवाय ईशप्रेरणेचा असा एक विलक्षण परिणाम अनुभवास येतो की, तेणेकरून जीवाचा अहंकार गलित होऊन, त्याच्या ठायी दैवी शक्तीचा संचार होतो. पशुवृत्तीचा नाश होऊन आध्यात्मिक तेज चमकूं लागते. तो एक देवमाणूस होतो. ईशाचे भाव धारण करण्याचे त्यास सामर्थ्य येते. त्याचा अर्थ 'अहंब्रह्म' असा जीवास अद्वैत प्रत्यय येतो, असे मात्र नव्हे. 'अहं ब्रह्मास्मि' हा सिद्धान्त तर्काचा अतिरेक दर्शवितो. तो सिद्धान्त अत्यंत अनीतिमय व घातुक आहे. ह्या सिद्धान्ताचे व सर्वदेवमयत्वभावाचे आपल्यांतून जितके लवकर निर्मूलन होईल तितके बरे. जीवशिवभेद हा नित्य आहे. सर्वदेवमयत्वभावांत पापी जीव हाही शिवरूप मानतात. हे जीवशिवाचे ऐक्य अत्यंत अनर्थावह आहे. ईशप्रेरणेने जो देवभाव अंगीं येतो, तो प्रकार अगदीं भिन्न आहे. प्रथम पापाचें निर्मूलन करून मनोविकारांवर ताबा मिळविला पाहिजे, नंतर सच्छील संपादन केले पाहिजे. आणि इतकेही करून स्वेच्छेनें संपादिलेल्या त्या सच्छीलांतच रंगून न जातां, अखेर ईश्वराच्या समोर निरहंकारवृत्ति व पूर्ण-शरणागति प्राप्त झाली, म्हणजे मग जीवाची स्वतंत्र अशी वासनाच उरत

नाहीं. देवा, आतां "मना येई तैसे करी" असा भाव उपजतो. अहंकाराचा नाश होतो आणि जीवाच्या सर्व शारीरिक व मानसिक क्रियांस साक्षात् ईश्वराकडूनच प्रेरणा होते! येशूख्रिस्ताचे चरित्र हे वरील अनुभवाचे आदर्शभूत आहे. असे जे ईशप्रेषित महापुरुष असतात, त्यांचे सभोवार प्राणवायूप्रमाणे सारे धर्माचेच वातावरण पसरलेले असते. त्याना धर्मतत्त्वे गूढ अथवा दुर्ज्ञेय वाटत नाहींत. ईश्वरीप्रेरणेतच ते वावरत असतात. ईशकृपेच्या ह्या मेघवृष्टीचा अनुभव घरीदारीं, बाजारात व देवळात कोठेही त्यांस येतच असतो. त्यासाठीं कर्मत्याग करून एकांतवास करावयास नको. त्यास एकच साधन आहे. ते साधन म्हणजे निष्ठावत प्रार्थना हे होय. देवभावात जीवभाव हारपणे, ही त्याची फलश्रुति आहे. सापळ्यांत शिरलेला उंदीर जसा परत येऊं शकत नाहीं, तसा देवाच्या पायाशी चिकटलेला जीव पुन्हा पशुवृत्तीत येत नाहीं. ईशकृपेचे खाजे खाऊन पुष्ट झालेल्या जीवाची ही गोष्ट होय. क्षुद्र जीव सांपळ्यातूनही निसटून पळतात. खुद्द केशवचंद्र स्वताबद्दल म्हणतात की, माझ्यामधील देवभाव केवळ प्रार्थनेपुरताच टिकतो. जेथे मुख्य आचार्य ह्यांचा हा अनुभव, तेथे इतरांची कथा काय?

केशवचंद्रांच्या अनेक प्रार्थना आत्म-निरीक्षणपर आहेत. त्यात त्यानीं आपल्या स्वतांचे व आपल्या समाजबंधूचे जे दोषाविष्करण केले आहे, तसे ब्राह्मसमाजाच्या शत्रूंनीही क्वचितच केले असेल. आम्ही ढोंगी आहोत, स्वार्थी आहोत, अपवित्र आहोत, आमचे मनोविकार अद्याप प्रबळ आहेत, आम्ही मनाने मूर्तिपूजकच आहोत, आम्ही जे लोकांस उपदेश करतो, त्याप्रमाणे आमचेच वर्तन नसते, इत्यादि अनेक दोष त्यानी आपल्या पदरी घेतले आहेत. नवविधानाचे ब्राह्मप्रचारकांबद्दल केशवचंद्र पुढे एक दिवस तारीख २ सप्टेंबर इ. सन १८८३ रोजी, ईश्वराजवळ अशी प्रार्थना करतात कीं, "हे सर्वज्ञ परमेश्वरा, धर्मोपदेशकाच्या अडचणी काय असतात, व त्यांची सत्त्वपरीक्षा किती बिकट असते, हे तू जाणतच आहेस. त्यानी मोठमोठाले सत्यसिद्धांत उपदेशिलेच पाहिजेत. तसे करणे त्यांस भागच असते. ते जरी खिन्न व निराश झालेले असले, तरी त्यांनीं श्रद्धेचे महत्त्व सांगून आशावाद गायला पाहिजेत. ते स्वता आचरणाने अपवित्र असले, तरी त्यांनीं दुसऱ्यापुढे पावित्र्याचा महिमा वर्णिला पाहिजे. त्यांचे आपसांत

किती मत्सर व बखेडे असले, तरी दुसऱ्यांपुढे त्यांनीं प्रेमाचे व बंधुभावाचे गोडवे गायले पाहिजेत. ह्याप्रमाणे हे प्रभो, ते वाणीनें खोटे व मनाने ढोंगी होतात. आणि अशा रीतीने चंचल वृत्तीच्या दुर्वर्तनी स्त्रियांप्रमाणे, ते धार्मिक, अधार्मिक व धर्मविरोधी अशा सर्वांस सारखेच खूष करण्यासाठीं झटतात. तरी हे सर्व शक्तिमान् परमेश्वरा, हा मोह, ही भूल, नाहींशी कर आणि तुझ्या सेवकांतील ह्या नीच वेश्यावृत्तीचे निर्मूलन कर."

आत्मपरीक्षणाकडे कित्येक ब्राह्मांचा विशेष कटाक्ष दिसतो. महाराष्ट्रीय ब्राह्मांपैकीं डॉ० भांडारकर यांची दृष्टिही अशीच होती. प्राचीन संतांचीही अशीच कांहींशी पद्धति दिसते. पण श्रीसमर्थ रामदासाचीं करुणाष्टकें, व श्रीतुकोबांचे कित्येक अभंग यातून त्यानी आपल्या पदरीं जे दोष बांधले आहेत, त्यांचा त्या महापुरुषांच्या ठिकाणीं संभवही वाटत नाहीं. सामान्य प्रापंचिकाची भूमिका घेऊन संतानीं ते कवित्व केले, असे मानण्याचा शिष्ट-संप्रदाय आहे. तीच दृष्टि जरी केशवचंद्राच्या वरीलप्रमाणे प्रार्थना वाचतांना आपल्याला ठेवतां न आली, तरी बऱ्याच सहानुभूतीच्या दृष्टीनेच आपण त्यांच्या दोषाविष्करणकाडे पाहिले पाहिजे, हे उघड आहे. असो.

प्रार्थनेचे प्रेरणेत रूपांतर होऊन त्या योगे देवकळा प्राप्त होणे, ही गोष्ट सहज सिद्ध आहे, असे म्हणणे जरी सयुक्तिक दिसले, तरी अनुभवाने ती गोष्ट किती दुष्कर आहे, हे ब्राह्माच्या मुखानेच आपल्याला कळून देते. मूळ प्रार्थनेचे प्रेरणेशी तोंड लागायलाच असामान्य निष्ठा पाहिजे. ती निष्ठा कांही प्रसंगाने क्वचित् प्राप्त होते. अथवा ते ईश्वरी कृपेचेच फळ आहे, असे म्हटल्यास चालेल. त्रिविधतापाने पोळलेले अंतःकरणच परमार्थास अधिकारी होते. केशवचंद्राच्या चरित्रांतही ही गोष्ट प्रत्ययास येते. त्यांच्या ज्या प्रार्थना परिणाम-कारक झाल्या, तो त्यांच्या आयुष्यातील काळ अत्यंत उद्विग्नतेचा होता. केशवचंद्र प्रथम तारुण्याचे उंबरठ्यावरच उभे असतां, त्यास प्रभु रामचंद्राप्रमाणें तीव्र औदासीन्याने गांठलें. परीक्षेच्या मंडपांतून पूर्वी लिहिल्याप्रमाणे त्यांचा झालेला बहिष्कार हा त्यांस निमित्तकारण झाला. त्यांना सर्व जग अंधकारमय झाले. कोठेही आनंदाचा किरण दिसेना. अशा वेळीं, देवद्वारावरील, 'प्रार्थना' हा दिव्य संदेश, त्यांना प्रतीत झाला. त्यांनीं त्या साधनाचा एकनिष्ठेनें अवलंब केला, व ते शांत झाले. त्यानंतर केशवचंद्र म्हणतात कीं, मी जर

सुखी झालों असेन, तर तें एका प्रार्थनेचें फळ होय. ह्या उद्गारांतील "सुखी झालों असेन, "हे शब्द महत्वाचे आहेत. कारण केशवचंद्रांचे पुढील आयुष्य-क्रमांतही त्यांस उद्विग्नतेने कायमचे सोडलें नाहीं. कुचबिहारलग्नानंतर जी समाजांत फूट झाली, त्यानंतरच्या त्यांच्या प्रार्थनांत अत्यंत दुःख, उद्वेग व संताप हे मनोविकार दिसून येतात. त्याचप्रमाणे त्यांच्या आयुष्याच्या अखेरीस त्यांच्या अनुयायांतील बखेडे पाहून ते फार निराश व दुःखी झाले होते. "आनंदरस हा प्याला, भवताप शांतचि झाला!" अशा प्रकारच्या धन्योद्गारापेक्षां त्यांच्या प्रार्थनांतून दैन्य, पश्चात्ताप, निराशा व दुःख अशा वृत्तींचीच छाया अधिक दिसते.

तारीख १९ जुलै १८८३ रोजींच्या प्रार्थनेत ते असे म्हणतात कीः— "हे परमेश्वरा, माझे जीवन व जीवनकार्य हीं व्यर्थ गेलीं असेच मी समजा-वयाचे काय? बखेडे मिटावे आणि वातावरण शांत व्हावे, म्हणून तूं मला दिलेल्या बुद्धीची व शक्तीची मीं शिकस्त केली; पण व्यर्थ! माझ्या अंतरांतील तीव्र वेदना मीं तुझ्यापासून छपविल्या नाहींत. माझ्या सभोंवार माजलेल्या यादवीने माझे अंतःकरण शतशः विदीर्ण झाले आहे, आणि मी रोज मज-समोर पहात असलेल्या सूडाच्या वृत्तीने माझ्या शरीरास असह्य वेदना होत आहेत. मी तुझ्याजवळ रात्रंदिवस करुणा भाकीत आहे. पण माझ्या जीवाला विश्रांति नाहीं!" दुसऱ्या एका प्रसंगीं तर, "ही उदास किंबहुना दुःखित अंतःकरणाची थोरवीच मी तुझ्याजवळ मागत आहे," अशी त्यांनीं प्रार्थना केली आहे.

अर्थात् हे त्यांचे क्लेश त्यांच्या लोकसंग्राहक बुद्धीस धरून होते. व्यक्तिशः त्यांस इतके दुःखी होण्याचे कारण नव्हते. हे क्लेश दूर व्हावे, म्हणून त्यांच्या अहर्निश प्रार्थना सुरू होत्या. त्या फलदायी झाल्या नाहींत, म्हणून त्याच्या प्रार्थनांचें महत्त्व कमी होत नाहीं. अखिल विश्वाचे कल्याण व्हावे, अशी श्रीज्ञानदेवांची प्रार्थना सुप्रसिद्धच आहे. तथापि ती आज कित्येक शतके पुरी झाली नाहीं; व ती केव्हां तरी पुरी होईल अशीही फारशी आशा नाहीं. ह्यासंबंधीं केशवचंद्रांचें म्हणणें इतकेंच आहे कीं, ईश्वरास अंतःकरणपूर्वक हांक मारली, तर त्याचा आदेश हटकून मिळतोच मिळतो; पण तो आपल्याला अनुकूलच असतो असें मात्र नाहीं.

येथपर्यंतच्या विवेचनावरून प्रार्थना व प्रेरणा ह्यांसंबंधीं केशवचंद्रांचे विचार व अनुभव ह्यांची बरीचशी कल्पना वाचकांना होईलच. तथापि त्याची अधिक स्पष्ट कल्पना येण्यासाठीं केशवचंद्र सेन ह्यांच्या कांहीं निवडक प्रार्थना व त्यांस देवानें दिलेले जबाब, हे त्याच्याच प्रार्थनांवरून "देव-भक्त संवाद" ह्या सदराखालीं पुढील प्रकरणांत देत आहोत. त्यावरून केशवचंद्र यांच्या प्रार्थना व त्यांस देवाकडून मिळणाऱ्या प्रेरणा, यांची वाचकांस स्पष्ट कल्पना आल्यास पहावें.

---

## प्रकरण सहावें

# देव-भक्त-संवाद

तारीख २२ जुलै सन १८८३ रोजीं केशवचंद्र अशी प्रार्थना करतातः— " माझ्या मनाची अशी भावना आहे की, तुझा चेहरा ( Thy face ) जर मला नित्य दिसला नाही, आणि तुझे शब्द जर मला सदोदित ऐकू आले नाहींत, तर मग तूं ईश्वर कसचा! आम्ही ज्याप्रमाणे एकमेकांना पाहतो, त्याप्रमाणे तूं आम्हांला दिसणार नाहींस काय? आम्ही ज्याप्रमाणे एक-मेकांचे बोलणे ऐकतो, त्याप्रमाणे घडोघडी मिळणारे तुझे संदेश, आणि आमच्या रोजच्या प्रार्थनांस तुजकडून मिळणारे जाब, आम्हास ऐकू येणार नाहीत काय? हे शक्य नसेल, तर तूंच नाहीस, निदान आम्हाला तरी तूं शून्यवत् आहेस."

वरील अवतरणाचा वाच्यार्थ घेतला, तर अशा अनुभवाचे भाग्यवंत लाखांतही फार थोडे सांपडतील असे वाटते. भावनाप्रधान बंगाली लेखकांच्या लेखात अर्थवाद व अतिशयोक्ति ह्याचा भास ठिकठिकाणी होतो. त्यामुळे वाचकांस सत्यनिश्चय करण्यास बरेच अवघड जाते. माझ्या बोलण्याचा श्रोत्यानीं लक्ष्यार्थ घ्यावा, वाच्यार्थ घेऊं नये, असे खुद्द केशवचंद्र ह्यांनीही आपल्या एका व्याख्यानांत स्पष्टच सांगितले आहे. परंतु ही लक्षणा त्यांच्या सर्वच उद्गारांस लावावयाची की काय, त्यांचें सारेच गद्य काव्यमय आहे, असे मानावयाचे कीं काय, हा प्रश्न उरतोच. केशवचंद्र एका प्रार्थनेत म्हणतात की, "देवा, चिकित्सक बुद्धीचे टीकाकार माझे सभोवार असतां, मी जेव्हां तुझेजवळ तत्त्ववेत्ता म्हणून बोलत असेन, तेव्हा मीं बालवृत्तीने बोलावे, व निवडक मित्रांत एकटाच बोलत असतां, मीं उत्साहभराने बोलावे, असे कर." प्रार्थना व प्रेरणा ह्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नांवर अधिक प्रकाश पाडणारे जे उतारे आम्ही पुढे देत आहोत, ते केशवचंद्र ह्यांचा सार्वजनिक प्रार्थनां-पैकीं आहेत. त्यांचा अर्थ वरील उद्गारांच्या दृष्टीने कसा लावावा, ते आम्ही

वाचकांवरच सोंपवितों. आपल्या एका प्रार्थनेंत केशवचंद्र देवाजवळ बोलत आहेत, आणि देवाकडून—त्यांच्याच मुखाने त्यांस प्रत्युत्तर मिळत आहे, असे हे प्रश्नोत्तररूप प्रार्थनेचे प्रकार आहेत. केशवचंद्र सेन देवाजवळ प्रार्थना करितातः—

[ १ ]

" हे प्रभो, तूं आमच्याशीं बोलतोस काय ? मानवांच्या कानीं तुझे शब्द पडणे शक्य आहे काय ? शंकडो लोक ही गोष्ट अशक्य आहे, असें म्हणतात. तर दयाळा, माझे मन यासंबंधी निःशंक कर."

" अरे अश्रद्धावान् गृहस्था, मी पूर्वीं हिब्रू व हिंदु संतांजवळ वारंवार बोलल्याचे तुला माहीत नाहीं काय ? आणि मी जर पूर्वीं बोलत होतों, तर आताही मला बोलतां येणार नाहीं काय ? का माझी वाचाशक्ति गेली ? किंवा ह्या पिढीचे लोकांचा मीं निर्दयपणे अव्हेर केला, असे तर नव्हे ?"

"हे परमात्मन्, तूं निराकार, तुला तर जीभही नाहीं, मग तू बोलणार कसा ?"

" माणसाप्रमाणे मी बोलत नसतो."

" मग तूं आमच्याशीं कसा बोलतोस ?"

" अचुक शहाणपण सुचणें, कोठून तरी उत्तेजन मिळणे, कशाची तरी उत्कट स्फूर्ति होणे, मार्गदर्शक धडा घ्यावा, अशी अनेक गोष्टींची विलक्षण जुळवाजुळव घडून येणे, एकाएकीं कर्तव्यबुद्धि खडबडून जागृत होणे, सृष्टि-क्रमांतील सूचक अर्थ कळूं लागणे, ही माझी निवेदनपद्धति होय."

" तुझी इच्छा तूं कोणत्या भाषेंत आम्हांस कळवितोस ?"

" माझी भाषा म्हणजे हिब्रू अथवा संस्कृत, इंग्रजी अथवा ग्रीक अशी नाहीं. माझी भाषा ही अंतःकरणाची स्वभाषा होय. निःशब्द उत्कंठा व मूक प्रश्न याच्या द्वारे जीव माझ्याशीं बोलतात, आणि त्यांच्या अंतःकरणांतील श्रद्धा व स्फूर्ति यांच्या द्वारे मी आपले सत्य त्यांस कथन करतो."

" पण देवा, तूं जें सुचवितोस, ते माणसांस नेहमींच समजते काय ?"

" होय, निरपवाद समजतेच. देववाणी सुबोध असते. बालक ती जाणण्यास उत्सुक असतो, त्यास ती समजते. तत्त्ववेत्ता ती समजून घेण्याची काळजी घेत नाहीं, तो गोते खातो."

" तर मग तूं जो बोलतोस तो कांहीं शेलक्या मंडळींशीं कीं सर्वांशीं ? जुन्या मताचे माझे कांहीं शेजारी म्हणतात, कीं तुझा आदेश कांहीं वाटेवर पडला नाहीं, तो मिळण्याचे भाग्य लाखांत एखाद्यालाच. कित्येक तर असे म्हणतात कीं, आजच्या भरतभूमींतील साऱ्या आस्तिक व भक्तमंडळींत तुझा दिव्य संदेश घेण्यास तूं फक्त एकच पुरुष पसंत केला आहेस ! माझ्या देवा, हें खरेंच काय ? "

" मुळींच नाही. कांहीं शेलक्या मंडळीस मात्र देव वश होतो, असा भलताच आरोप मजवर कधींही कोणी करू नये. माझ्या येथें ही प्रतारणा बिलकूल नाहीं. बाल-वृद्ध, शहाणे खुळे, पापी व पुण्यवान्, हिंदु व खिस्ती, अशा सर्वांसच माझें म्हणणे समजून घेण्याचे सामर्थ्य मी दिलें आहे."

" मग देवा ! ही सारी मंडळी तें नाकबूल करून उलट माझाच उप-हास करतात हे कसे ? मी माझ्या इंग्रजी व हिंदी बहुतेक स्नेह्यास विचारलें, ते सर्व एकमताने माझा इन्कार करतात."

" ते जर माझें म्हणणे ऐकत नसतील, तर तो माझा दोष नव्हे. माझें अस्तित्व हें जसें सत्य आहे, तसेंच मी बोलतो हेंही खरें आहे."

" मग हे दीनवत्सला, तूं बोलत असूनही तुझ्या अत्यंत दीन बालकांना तें ऐकूं येत नाही हे कसें ? तें कृपा करून सांग."

" बाबारे, क्वचित् त्यांचींच पापें त्यांच्या आड येतात,कोठें त्यांची अश्रद्धा त्यांस कांहीं समजूं देत नाहीं. आणि कित्येक तर माझी प्रेरणा घेऊनही गर्वानें किंवा अज्ञानाने सर्व श्रेय आपल्याच अकलेस देत असतात."

" देवराया, तूं माझ्याजवळ कधी बोलला आहेस काय ? "

" लाखो वेळां."

" केव्हां बरें देवा ? आणि कोठें ? "

" सांजसकाळ, रात्रंदिवस, व वर्षानुवर्षे तुझ्या आत्म्याच्या ठिकाणीं मी स्फुरद्रूप झालों आहें."

" तो कसा ? "

" वत्सा, माझ्याजवळ ये. ह्याचा अधिक खुलासा करण्यापूर्वी तुझ्या मस्तका-वर वरदहस्त ठेवून तुला आशीर्वाद देऊं दे."

" हा मी एक गरीब पामर जीव तुझ्या पायांशीं नम्र झालों आहें."

“ आतां तुझ्या अंतरात्म्याच्या ठिकाणीं विलक्षण आनंदाचें भरतें आल्या-सारखे तुला वाटतें काय ?”

“ होय, देवा.”

“ तर मग मी आतां काय म्हणतो, ते नीट ऐक; व त्याचा जबाब दे. रोज तुला भूक लागते व तू जेवतोस. लोक असेच म्हणत नाहीत का कीं, आम्हांला भूक लागते, तेव्हा आम्हास खावेसे वाटते म्हणून आम्ही जेवतो. पण तू काय म्हणतोस बरे? अगदीं सत्याला स्मरून सद्भावनेने बोल पाहूं ”

“ बाळा जेव. असे तूं म्हणतोस म्हणून मी जेवतो; आणि मी दुखणाईत असतां तूच मला आतां जेवूं नको, असे सांगतोस.”

“ अशा वेळी मी तुझ्याजवळ कसा बोलतो ? ”

“ क्षुधा आणि ज्वर ह्यांच्याच द्वारें.”

“ आणि माझें बोलणें तुला नीट आणि स्पष्ट समजतें ना ? तसेंच तूं भलतीच चूक करीत असलास तर तुझें अंतःकरण तुला खात नाही काय ? मग ती सूचना तुला कोणाकडून मिळते बरें ?”

“ निःसंशय तुझ्याचकडून. आमची विवेकवाणी ही खरोखर देववाणीच आहे.”

“ आणि ह्याचप्रमाणें तुझ्या आयुष्यातील उत्कर्ष-अपकर्षाचे विशेष प्रसंग हे तरी माझेच आदेश नाहीत का ?”

“ खरेंच, ते तसेच आहेत. ते आम्हास पुष्कळ गोष्टी शिकवितात.”

“ तसेंच हा सुंदर गुलाब पहा. तो तुला कांहीं सांगतो आहे काय ?”

“ होय, होय. देवराया! त्या फुललेल्या फुलाच्या रूपानें तुझ्या हंसतमुखांतून मी असें ऐकतो आहे कीं, ‘बाळ, माझें तुजवर प्रेम आहे आणि म्हणूनच ही प्रेमाची खूण मी तुला देत आहे’.”

“ माझें बोलणें तुला ऐकूं येतें तर ?”

“ येते खचित. हे परमपुरुषा, तुझे धन्यवाद असोत. तुझा जयजयकार असो.”

[ २ ]

“ हे प्रभु ! तुझे शब्द ऐकणें, तुझा आदेश मिळणें, हा एक अलौकिक चमत्कार नाहीं का ?”

" अलौकिक, ही तुमची भावना असेल, देव सृष्टिनियमास सोडून अलौकिक असें कांहींच करीत नाहीं."

" पण जगाच्या इतिहासांत तर देशोदेशीं असे अलौकिक ऋषि व भविष्यवादी पुरुष होऊन गेले, असे मानतात: आणि अशा महात्म्या पुरुषांच्या पायाशी बसूनच ईशप्रणीत म्हणून गणलेली धर्मशास्त्रे सर्व राष्ट्रे शिकत आलीं आहेत. असेही ऐकतो कीं, अशा असामान्य पुरुषाची समाधी लागत असे, त्यास दिव्य दर्शने होत असत, त्याना दिव्यज्योति दिसे आणि तुझे दूत त्यांस भेटून तुझा संदेश त्यास पोचवीत. हे परमात्मन् , ईशप्रेरणेचीं हीं गूढ रहस्ये मला समजावून सांग आणि माझे दुश्चित्त शांत व सुप्रकाशित कर."

" बाबारे, जुन्या पुराणांतील अवशिष्ट राहिलेली ही सारी खुळें आहेत ! वास्तविक गूढ चमत्कार आणि दिव्यदर्शने ह्याचा मला अत्यन्त तिट्कारा आहे. जे कोणी अशा प्रकारचे अलौकिक सामर्थ्य मिरवीत असतील, त्या ढोंगी लोकांनीं श्रद्धाळू व साध्याभोळ्या लोकांचें आजवर पुष्कळ नुकसान केले आहे. अशावर इतःपर भरंवसा ठेवू नकोस. ईशप्रेरणा ही सूर्यप्रकाशाप्रमाणे उघड आहे, आणि साध्या श्वसनक्रियेइतकी ती सुलभ आहे. त्यासाठीं पहाड चढावयास नकोत व गिरिगव्हरीं समाधीचा अभ्यास नको. रोजचीं प्रापंचिक कर्मे करीत असतांही ईशप्रेरणा समजते."

" म्हणजे मी खातपीत असता अथवा हिंडतफिरत असताना, किंवा धंदारोजगारात गढलो असताना, तूं माझ्याशी बोलशील काय ?"

" होय."

" तर मग तुझ्या म्हणण्याप्रमाणे प्राणायाम, ध्यानधारणा, समाधि इत्यादि कशांचीच अवश्यकता नाही ?"

" नाही. कशाचीच गरज नाहीं. एक विवेकनिष्ठा ( Faith in conscience ) असली म्हणजे पुरे."

[ ३ ]

" ईशप्रेरणेशी आधिभौतिक शास्त्रे विरोधी नाहींत काय ? जर तुझ्याच प्रेरणेने चालावयाचे तर ती शास्त्रे केवळ उपेक्षणीय ठरतात नव्हे ?"

" असे नव्हे. आधिभौतिक शास्त्राचा असा मुळींच विरोध नाही. त्यांची

उपेक्षा न करतां त्यांस विसाव्या शतकांतील बायबलाप्रमाणें मानून तीं आदरानें वाचावीं. जे जें म्हणून सत्य आहे, तें माझेंच आहे व तें पवित्र आहे."

" परंतु उत्क्रान्तिवादासारखीं जीं धर्मविरोधी शास्त्रें आहेत, त्यांचें काय करावें ? "

" जी जी शास्त्रसिद्ध म्हणून गोष्ट दिसेल, तिचा धीरानें स्वीकार करावा. आधिभौतिक शास्त्रमंदिरांतही तुला अखेर माझीच प्रेरणा ऐकूं येईल. हक्सले आणि डार्विन हे न कळत माझेच कार्य करीत आहेत. त्यांचे नास्तिकपणाचे तर्क असतील, ते तू सोडून दे. परंतु त्यांच्या ज्या शास्त्रसिद्ध गोष्टी दिसतील, त्यांस माझ्या शब्दाप्रमाणे मान दे. सर्व शास्त्राच्या प्रक्रियेत 'मी आहे' आणि 'मी अखिल चराचराचे धारणपोषण करीत आहे'. अशा अनेक गभीर आणि सत्यसिद्धान्तांची मीच सर्वत्र प्रेरणा करीत आहें, असेंच तुझ्या प्रत्ययास येईल."

[ ४ ]

" बरें. देवा, मी वैराग्यशील असावे, असेंच तुला वाटतें काय? माझे लग्न झाले असून मला मुलेबाळे आहेत, तर उद्याचा विचार न करून माझे कसे चालेल ? यास्तव माझे मित्र मला म्हणतात की, धर्मातील हे वैराग्याचे खूळ तूं सोडून टाक. तर मी काय करावे बरे ?"

" माझी तुला अशी आज्ञा आहे की, तू वैराग्यशीलच असले पाहिजे. प्रापंचिक वृत्तीचा मला तिट्कारा आहे."

" पण आपले व आपल्या आश्रिताचे सगोपन करावे, असे तूच आम्हांस सांगितलेस नाहीं काय ?"

" होय, पण ते अशा पाखड पद्धतीने नव्हे. देवाचा लाभ जोडणे, हे तुझें पहिले कर्तव्य आहे. अन्नाच्छादनासाठीं धडपडणे हे नव्हे. त्याची काळजी मी घेईन. वैराग्य म्हणजे आलस्य नव्हे. श्रद्धायुक्त मनानें अहंकार सोडणे, व निःशंक मनाने देवावर भार टाकणे याचेच नांव वैराग्य. ह्या अखिल विश्वाची मीं अशी रचना केली आहे कीं, ज्यांचा माझ्यावर निर्धार आहे, त्यांच्या हिताची गोष्ट त्यांस सहज प्राप्त व्हावी."

"परंतु हे महाराजा, आम्ही गरीब माणसे ! तुझी ओळख करून देण्यास आम्हांला मध्यस्थ कोणी नाहीं !"

"तेंच उत्तम आहे. बाळांनो, मुलांनीं बापाकडे धाव घेण्यास मध्यस्थ कशाला?"

"पण आम्ही जरी तुझ्याजवळ असलो, तरी तूं आम्हांला स्पष्ट दिसत नाहींस!"

"होय. तसें प्रारंभीं होणारच. परंतु ह्यापुढे मध्यस्थावर अवलंबून न राहतां, तुम्ही स्वतःच प्रयत्न कराल, तर माझे दर्शन तुमच्या डोळ्यांस सहज घडेल. तुम्हांला मार्गदर्शक म्हणून तुम्ही खोट्या देवाच्या फंदी पडूं नका. मध्यस्थ गुरूंच्या नादीं लागूं नका किंवा व्यर्थ जुन्या पोथ्याचे भारेही धुडाळूं नका. तुम्हाला कोणी कांही सांगो, तुमच्या हृदयीं वास करणारा जो मी, त्या माझ्या संमतीवांचून कोणतीच गोष्ट मानू नका. तुम्ही माझी रोज उपासना करीत जा. आणि अशी तुमची पूजा सुरू असली, म्हणजे मी निराकार आहे हे ठाऊक असूनही, तुम्ही माझे मुखमंडळ पहाल, माझे हितगुज ऐकाल, आणि माझ्या पायांना स्पर्शही कराल. जसजसे तुम्ही वरचेवर मजकडे याल, व उत्कंठेनें माझ्याकडे दृष्टि लावाल ( Ply your optic nerve ), तसतसा माझा चेहरा तुम्हांला स्पष्ट दिसेल."*

केशवचंद्रानी आपल्या प्रार्थनांतून वरीलप्रमाणे संवादपद्धतीचा अवलंब बऱ्याच वेळां केला आहे, आणि आपल्या व्याख्यानांतील कित्येक वादग्रस्त मुद्दे त्यांनीं अशा प्रार्थनाप्रसंगीं देवमुखाने पुन्हा वदविले आहेत. तसेच आपल्या प्रतिस्पर्ध्यांची कानउघाडणीही अधिक स्पष्ट शब्दात केली आहे. उदाहरणार्थः–देवमुखाने केशवचंद्र म्हणतात कीं, "सुधारक व देशसेवक वर्गांतील सार्वजनिक पुढाऱ्यांप्रमाणे अहर्निश धडपड करणे, व्याख्याने देणे, अथवा मोठी विद्वत्ता संपादन करणे, हीं ब्राह्मांचीं खरी कर्तव्ये नव्हत. तसेच शाळा काढणे, स्थानिक-स्वराज्यांत सुधारणा घडविणे, शेतकऱ्यांस ऋणमुक्त करणे, अबलोन्नति करणे, अथवा राज्ययंत्र सुयंत्रित करविणे, इत्यादि सर्व सार्वजनिक हिताची व परोपकाराची कृत्ये करणे, हेही ब्राह्मांचें केवळ दुय्यम प्रतीचे कर्तव्य होईल. हे सर्व करून जर तुम्ही माझी उपासना करणार नाहीं,

* देववाणीबद्दल अनुभव केशवचंद्र एके ठिकाणीं असा सांगतात कीं, मेघगर्जनेप्रमाणें आकाशवाणी झाली, आणि ती शिष्य मंडळींनीं (disciples) आनंदमग्न ( **with rapt attention** ) होऊन ऐकिली.

तर तुमची किंमत पांखडलेल्या तुसाप्रमाणें कवडीमोल होईल. ब्राह्मपंथांत राहण्यास तुम्ही अपात्र व्हाल. ब्राह्मसमाज हा भरतभूमीच्या उद्धाराकरितां मीं स्थापिलेला एक पथ आहे. त्यांतून असा कोंडा आणि तूस बाहेर फेकला जाईल. हे पहा, हजारो चोर आणि दरोडेखोर माझ्या ह्या पवित्र पंथांत घुसले आहेत. पण मी त्यांस तेथे टिकूं देणार नाही. मला माझा हा पथ शुद्ध व पवित्र राखावयाचा आहे. आज तुम्हां ब्राह्मांमध्ये कित्येक उपदेशक, प्रचारक, साधु आणि उपाध्ये आहेत; ते प्रार्थनेच्या वेळी माझ्या ब्राह्म-भक्ताप्रमाणे डोळे मात्र मिटतात, पण त्यांना माझे दर्शन झालेले नसतें. त्यांची मजवर निष्ठा नसते; उलट ते खऱ्या साक्षात्कारी भक्तांचा मना पासून उपहास करतात. अवघ्या दहा-पंधरा मिनिटांची रोजची उपासना, पण ती कशीबशी उरकून एकदां केव्हां जाऊं, असे त्यांस झालेलें असते. प्रार्थनेला मात्र मंदिरांत येतात. पण ती पुरी होतांच दारूचे गुत्ते, नाहींतर कुंटणखाने, ह्यात झक मारण्यास निघून जातात! * तुमच्यापैकीं ज्याची पशुवृत्ति इतक्या परमावधीच्या थरास गेली नाहीं, तेसुद्धां स्त्रियांनीं पुरुषसमाजात वागावे असे प्रयत्न करतात. तेव्हां स्त्रियांसंबंधीं त्यांचे मन पापी व विषयासक्त असते. ह्याशिवाय असत्य, सोदेगिरी, हांवरटपणा, द्वेष, कपट, चुगलखोरपणा असे कितीतरी दोष त्यांच्या निढावलेल्या अंतःकरणांत कायमचे बिऱ्हाड करून बसलेले असतात!" असो. अशा रीतीनें ब्राह्मांचें दोषाविष्करण केल्यानतर, आचार्य केशवचंद्र यांचा व इतर ब्राह्मांचा संबंध काय, त्यांच्यांत मतभेद झाल्यास आचार्यांच्या शब्दासच त्यांनी कसे महत्त्व दिल पाहिजे, आचार्य व पारमार्थिक गुरु यांत भेद कोणता, वगैरे मुद्दे सांगून ब्राह्ममंदिर हे जगज्जननीचे मंदिर होय, व येथे मातृभावानेच माझी उपासना घडवून आणण्याचा आपला संकल्प आहे, वगैरे गोष्टींचा देववाणींत उल्लेख आहे. विस्तारभयास्तव हे उतारे येथें अधिक देतां येत नाहींत.

वरील प्रश्नोत्तररूप प्रार्थना केशवचंद्र कशा करीत असत, व त्यांचा श्रोत्यावर काय परिणाम होत असे, ह्याची नक्की अटकळ आज करतां येणार नाहीं. ह्या प्रार्थना त्यांच्या वर्तमानपत्रांत वेळोवेळीं प्रसिद्ध होत असत.

---

*" Ye are in the temple for prayer, and prayer over, Ye are in the brothel and the beer shop for debauchery."

शिवाजीमहाराजांच्या अंगांत देवीचा संचार होऊन, ती आपला आदेश त्यांच्या मुखानें वदवी, असें इतिहासकार सांगतात, तशांतला वरील प्रकार नव्हे. तसेच मृतात्म्यांशीं संवाद करणारे, मध्यस्थाचे मुखाने कांहीं वदवितात, तसलाही नमुना हा खास नव्हे. आपल्याकडील महीपति आदिकरून कित्येक कवींनीं नामदेवादि संतांचा व पंढरीच्या विठोबाच्या मूर्तीचा संवाद वर्णिला आहे; तसलाच हा एक अनुभव आहे, असेही म्हणणे कठीण वाटते. तात्पर्य, देवभक्तांच्या दोन्ही भूमिका एकाच वक्त्याने घेतल्यावर भक्तवाणीपेक्षा देववाणींत विश्वसनीयता अधिक कां ? हा एक प्रश्नच उरतो.

अभिषेकपात्रांतून गळणारे साधे पाणी क्षणमात्राने गोमुखांतून तीर्थ म्हणून वाहूं लागतें. कारण दरम्यान त्यास ईशप्रतीकरूप महत्पदाचा सरकार घडला, असे मानण्यांत येते. त्याप्रमाणे ह्या प्रश्नोत्तररूप प्रवाहांत उत्तरवाणीला पावन करणारें मध्यस्थ काय असते, हा एक चिंतनीय प्रश्न आहे. तसेच केशवचंद्रांच्या निरनिराळ्या शब्दप्रयोगांवरून त्याचे इष्टदैवत निर्गुण निराकार ब्रह्म नव्हे, तशी सगुणसाकार मूर्तिही नव्हे, हे उघड होते. आतां त्याची भाषा सगुणसाकार अशा स्वरूपासच जास्त साजेशी दिसते हे खरें, तथापि संतांच्या मुखाने म्हणावयाचे तर "समचरण विटेवरि उभे राहिले" ते ब्रह्म कसें होतें, हे 'जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे' असेच म्हटले पाहिजे. केवळ अनुभवाच्या गोष्टीबद्दल अननुभवी माणसांनी साशंक होणे योग्य नव्हे. संत म्हणतातः–'कसे बोटाने दाखवूं तुला। पहा अननुभव गुरुच्या मुला ॥' तेच खरें, पण, "गुरुच्या मुला" हे शब्द ब्राह्मांस रुचणार नाहींत.

आतां 'प्राचीन ऋषींचे व संतांचे ब्रह्मानुभव व हे आधुनिक ब्राह्मानुभव-सारखेच काय', असा कोणी प्रश्न विचारल्यास, 'होय, सारखेच', असे ब्राह्म तरी खास उत्तर देतील. आम्हीं अशा प्रकारचा प्रश्न विचारला असता केशवचंद्र सेनच काय; पण त्यांच्या अनुयायांत आजही ब्रह्मसाक्षात्कारी असे पुरुष आहेतच आहेत; अशा अर्थाचीं उत्तरे एकदोघां प्रमुख ब्राह्मांकडून आम्हांस मिळालीं आहेत. ह्या बाबतीत थोडा अधिक विचार होण्यासाठीं आधुनिक काळांतील साक्षात्कारी म्हणून मानलेले सुप्रसिद्ध संत श्रीरामकृष्ण देव, ह्यांच्याशीं केशवचंद्र सेन यांचा व त्याच्या अनुयायांचा संबंध कोणत्या प्रकारचा होता, ह्याचा थोड्या बारकाईने तुलनात्मक दृष्टीने विचार होणे जरूर आहे, तरी ती गोष्ट पुढील प्रकरणावरच टाकलेली बरी.

---

## प्रकरण सातवें

# श्रीरामकृष्णपरमहंस

राजा राममोहन ह्यांचें अवतारकार्य ज्या सालीं संपले, त्याच सालीं बंगाल प्रांतीं श्रीरामकृष्ण ह्या अलौकिक पुरुषाचा जन्म झाला. दोघांचा जीवनहेतु बहुतांशीं एकच असावा असे दिसते. श्रीरामकृष्ण हे सनातनधर्माचे कट्टे अभिमानी होते, तरी पण त्यानी ख्रिस्ती आणि इस्लामी धर्मांचाही अभ्यास केला होता. मात्र त्यांचा अभ्यास राजा राममोहनांप्रमाणे वाङ्मयात्मक नसून साधनात्मक होता. एकाने धर्माचे बहिरंग पाहिले, तर दुसऱ्याने अतरंगासत्व ज्ञात घातला. यामुळे एक पंडित व दुसरे सिद्ध होते. राजा राममोहन ह्यांस जगांतील प्रमुख सतरा भाषा उत्तम अवगत होत्या, तर रामकृष्णांस आपल्या जन्मभाषेतही लिहिण्यावाचण्याची पंचाईत होती. त्या काळचें सुधारलेले जग राजा राममोहन यांचा रुबाब, त्यांची विशाल-बुद्धि व व्यापकदृष्टि ह्यांकडे कौतुकाने व आदराने पहात होतें, आणि रामकृष्णासारख्या कालीदेवीच्या एका यःकश्चित् वेड्यापिशा पुजाऱ्या-कडे जग प्रथम ढुंकूनही पाहण्यास तयार नव्हते. अशा ह्या दोघां विलक्षण व्यक्तींनीं एकोणिसावे शतकांत बंगालच्याच काय पण साऱ्या हिंदुस्थानच्या धर्मविचारांस जोराची चालना दिली. आज राजा राममोहन ह्यांचा ब्राह्म-समाज व रामकृष्णांचे मिशन, हे दोन्ही संप्रदाय जरी परस्पर भिन्न आहेत, इतकेच काय पण एकमेकांसंबंधी अगदीं उदासीन आहेत, तरी श्रीरामकृष्णांच्या वेळीं तशी स्थिति नव्हती. श्रीरामकृष्णांच्या चारित्र्याचा ब्राह्म-समाजाशीं अत्यंत निकट संबंध आहे. केवळ केशवचंद्र सेनच काय; पण नवविधान व साधारण ब्राह्म समाज ह्या ब्राह्म-समाजाच्या पुढारलेल्या संस्थांच्या चालकांवर श्रीरामकृष्णांच्या संगतीचा विशेष परिणाम झाला होता. असें श्रीरामकृष्णांचे चरित्रकार म्हणतात. व त्यांस प्रतापचंद्रांसारखे कट्टे ब्राह्म व फर्कुहारसारखे कट्टे ख्रिस्ती लेखक दुजोरा देतात.



श्रीरामकृष्ण आणि केशवचंद्र सेन.



तपोवनांतील केशवचंद्र व त्यांचे सांप्रदाय बंधु.

श्रीरामकृष्णांचे कल्याण, श्रीमत् स्वामी विवेकानंद, तसेंच श्रीरामकृष्णांचा दासबोध (Gospel of Ram-krishna) लिहिणारे दुसरे प्रतिकल्याण "एम्" म्हणजे बाबू महेंद्रनाथ गुप्त, असे श्रीरामकृष्णांचे कित्येक प्रमुख अनुयायी पूर्वींचे ब्राह्म पंथी होते. तसेच वाग्विहारी केशवचंद्र सेन, लेखणी-बहाद्दर प्रतापचंद्र मुझुमदार, भक्तश्रेष्ठ विजयकृष्ण गोस्वामी आणि शीघ्रकवि त्रैलोक्यनाथ संन्याळ, असली ब्राह्मसंप्रदायाची प्रमुख मंडळी श्रीरामकृष्णांच्या पायांशीं बसून त्यांच्या बोधामृताचे वरचेवर सेवन करीत असत. तात्पर्य, गंगातटाकीं दक्षिणेश्वरच्या एका ओऱ्यांत बसलेल्या ह्या अप्रसिद्ध पुजाऱ्याच्या हातीं सुधारलेल्या जगाची नाडी लागण्यास ब्राह्मसप्रदायच साधनीभूत झाला, आणि मूळच्या ब्राह्मसंप्रदायाचे नवविधानांत होत चाललेल्या रूपांतरास श्री-रामकृष्णांचा सहवास कारणीभूत झाला, अशी वस्तुस्थिति दिसते. परंतु ह्या गोष्टीस ब्राह्मइतिहासकारानीं द्यावे, तितके महत्त्व दिलेले दिसत नाहीं. इतकेच नव्हे, तर विजयकृष्ण गोस्वामी ह्यांच्यासारखे ब्राह्मसंप्रदायाचे मुख्य आधारस्तंभ, श्रीरामकृष्णाच्या आकर्षणाने ब्राह्मसंप्रदाय अज्ञीच सोडून जेव्हां बाहेर झुकले, तेव्हां अशा रीतीने ब्राह्मसंप्रदायच नामशेष होतो कीं काय, अशी दहशत वाटून ब्राह्मइतिहासकार पंडित शिवनाथशास्त्री ह्यांच्यासारख्या विवेकशील पुढाऱ्याने, आपल्या साधारण ब्राह्मसमाजाचा असल्या अनर्थावह (!) सहवासापासून मोठ्या दक्षतेने बचाव केला ! त्यामुळे ह्या आधुनिक पंडिताचे साधारण ब्राह्मसंप्रदायी व त्या सिद्धपुरुषाचे अनुयायी हे पुढे परस्परांपासून अगदीं अलग व सुरक्षित असे राहूं लागले. ही गोष्ट चांगली झाली कीं वाईट झाली, ह्याबद्दल सर्वांचेंच एकमत होईल असें नाहीं; तथापि त्या-संबंधीं वाचकांस अधिक विचार करतां यावा, म्हणून श्रीरामकृष्ण व त्यांच्याशीं सन्निकट असलेला नवविधानपंथ, ह्यांच्या परस्परसंबंधाचा थोडा बारकाईनें विचार करूं.

श्रीरामकृष्ण परमहंस हे एक लोकोत्तर कोटीचे पुरुष होऊन गेले, ही गोष्ट आज सर्वमान्य झाली आहे. एकोणिसावे शतकांतील देशकाल मानाने त्यांचें जन्म-कथन अत्यंत विस्मयकारक वाटते. एकदां स्वर्गाच्याही पलीकडे दिव्य लोकांत एक महान् ऋषि निजानंदांत मग्न असतां एक दिव्य बालक त्यांच्याजवळ गेले, व लडिवाळपणानें त्यांच्या खांद्यावर हात टाकून त्यानें

त्या महर्षींचे समाधींतून उत्थान केलें, व म्हटले कीं, "मी भूतलावर अवतीर्ण झालो आहे, आतां तुम्हीही तिकडेच अवतार घ्यावा." हे खुणेचे शब्द ऐकून त्या महापुरुषाने किंचित् स्मित करून आपली संमति दर्शविली, व श्रीमत् विवेकानंद या रूपाने ते पुढे अवतीर्ण झाले. अशी आख्यायिका खुद्द रामकृष्णच सांगत असत. अर्थात् वरील आख्यायिकेतील ते दिव्य बालक हें खुद्द त्यांचेच रूप होय, हे सांगावयास नकोच.

श्रीरामकृष्णांचे वडील खुदीराम हे परमभक्त होते. ते यात्रेच्या निमित्ताने एकदां गयेस गेले असतां, त्यांस विलक्षण दृष्टान्त झाला. पितृलोकीच्या एका सभेत मुख्यस्थानावर महाविष्णु–श्रीगदाधर अधिष्ठित झालेले त्यांनी पाहिले. आपले सारे दिवगत झालेले पूर्वज सिंहासनाधिष्ठित श्रीगदाधरास साष्टांग प्रणिपात करीत आहेत, असे पाहून खुदीरामाचे अंतःकरण भक्तीभावाने अत्यंत विनम्र झाले. तेव्हा श्रीगदाधरानी त्यास जवळ बोलाविले. खुदीरामानं पुढे होऊन भगवंतास वंदन केले, व सद्गदित अंतःकरणाने त्याचे स्तवन केले. तेव्हां श्रीगदाधर विष्णु प्रसन्न झाले व म्हणाले की, "धर्मसंस्थापनेकरितां पुनःपुन्हा अवतार घेण्याचे माझे ब्रीद आहे, त्याप्रमाणे ह्या वेळीं मी तुझा पुत्र म्हणून अवतार घेईन." ह्याच सुमारास रामकृष्णाची माता सती चंद्रामणि हिलाही दिव्य स्वप्ने पडत होती. एकदां तर भर दिवसा ती शेजारच्या शिवमंदिरासमोर उभी असता, शिवलिंगातून एकाएकीं दिव्य तेज बाहेर पडले, व ते तिच्या शरीरांत अंतर्धान पावले !

याप्रमाणे श्रीरामकृष्णास शिवरूप म्हणावे कीं विष्णूचा अवतार समजावें, अथवा सबल ब्रह्मच मूर्तरूपाने अवतरले, असे म्हणावे हे ठरविणे भाविकांस कठीणच पडेल. पुढे रामकृष्ण अवतीर्ण झाल्यानंतरही, ते त्यांचे एक परमभक्त मथुरबाबू ह्यांस शिवरूपाने दिसले, अघोरमणिदेवी नामक एक भाविक बाई त्यांचे रूपांतर श्यामसुंदर गोपालकृष्णरूपांत झालेले पाही, श्रीमत् विवेकानंदांस तर त्यानीं एकदा राधिकेच्या रूपांतही दर्शन दिले. राम आणि कृष्ण म्हणतात तो मीच असे निश्चित आश्वासन खुद्द रामकृष्णानींच आपल्या अंतसमयी विवेकानंदांना दिले, व त्यांचे किंचित् साशंक झालेले मन निश्चित केलें, हें प्रसिद्धच आहे. माझे गुरु श्रीराम व श्रीकृष्ण यांच्याहूनही थोर होते, त्यांचा वास्तविक अधिकार किती होता, हे सांगणें मलाही शक्य नाहीं, असेंही

स्वामी म्हणत. लौकिक दृष्टीने श्रीरामकृष्णांनी देह ठेवल्यानंतरही ते त्यांच्या भक्तमंडळीस प्रत्यक्ष होत असत. त्यांचा केवळ बहिश्चर प्राण असे स्वामी विवेकानंद अमेरिकेंत असतां रोज रात्रीं त्यांच्याशी संवाद करून आपली दुसऱ्या दिवशीच्या व्याख्यानाची रूपरेषा आखीत असत. स्वामीजींसारख्या श्रेष्ठ कोटींतील अनुयायाची गोष्ट असो; पण एकदा एका अगदी सामान्य दर्जाच्या भाविकानें, पेटलेल्या घरांतून एक लहान मूल बाहेर काढण्याकरितां श्रीरामकृष्णाचें नांव घेऊन आगीच्या डोंबात उडी घातली, तेव्हां श्रीरामकृष्णाच्या मूर्तीनें त्यास झेलून धरून मुलासकट सुरक्षितपणें बाहेर आणून ठेवलें, असा त्या भाविकास अलीकडे एकदा प्रत्यय आल्याचेंही प्रसिद्ध झालें आहे. ह्या ठळक गोष्टींवरून श्रीरामकृष्ण ह्या महनीय विभूतीबद्दल वाचकास कांहींशी कल्पना होईल असें वाटतें.

श्रीरामकृष्णाचें विभूतिमत्व जसें आश्चर्यजनक आहे, तसेंच त्यांचें चरित्रही विस्मयकारक आहे. ते द्वैत्यांत द्वैती, अद्वैत्यांत अद्वैती आणि विशिष्टाद्वैत्यांतही तसेच साजणारे होते. रामोपासनेचें खरें हृद्गत कळावें म्हणून त्यांनीं कित्येक दिवस झाडावर राहून हनुमंताशीं आपलें शक्य तों सर्व तऱ्हेनें तादात्म्य करून घेतलें होतें. कालीदेवीचा उपासक त्यांच्यासारखा दुसरा क्वचित्‌च झाला असेल. कृष्णभक्तींत ते दुसरे गौरंगच होत. अथवा राधेची उपमाही त्यास दिली असता शोभेल. समाधियोग त्यास सहजप्राप्त होता. एखादें सुंदर दृश्य अथवा गोड गीत त्यांना भावसमाधि लावण्यास पुरेसें होई. भैरवी ब्राह्मणीच्या सहवासांत तंत्रविद्येंतील जी घोर साधनें त्यांनीं केलीं, तीं ऐकलीं कीं मन थरारून जातें! कालीदेवीच्या दर्शनासाठीं त्यांनीं जो अट्टहासपूर्वक धावा केला तो ऐकून पाषाणहृदयी मूर्तीच्या अंतःकरणासही द्रव आला, ह्यांत कांहींच नवल नाहीं. कामिनी आणि कांचन ह्यांसंबंधींचा मोह समूळ नष्ट करण्याकरितां त्यांनीं असिधारेप्रमाणें तीव्र व अग्नीप्रमाणें जाज्वल्य साधनें केलीं, तीं पाहून आपली बुद्धि गांगरून जाते. स्त्रीविषयक भिन्नभाव अजीच नाहींसा व्हावा, म्हणून ते स्त्रीवेषानें स्त्रियांच्या समाजांतच कित्येक दिवस राहिले, इतकेंच काय, पण विवस्त्र झालेल्या तरुण स्त्रिया–नव्हे तरुण व सुंदर दंपत्यांची साक्षात् रतिक्रीडा–पाहूनही आपली ब्रह्मभावना यत्किंचितही चलित होत नाहीं! उलट सौंदर्य व आनंद ह्यांच्या

दर्शनांत समाधीच लागते, अशी त्यांनीं आपली सत्त्वपरीक्षा पाहिली! कांचनासंबंधीं तुच्छबुद्धि त्यांच्याठायीं इतकी बाणली होती कीं, कांचनाच्या नुसत्या सान्निध्याने त्यांच्या अंगास आंकड्या येऊ लागत! श्रीरामकृष्णांसारख्या स्वयसिद्ध अवतारी पुरुषांस इतक्या खडतर साधनांचा अवलंब कां करावा लागला; तसेच इतक्या साधनांनंतर ब्रह्मानुभवानें ज्यांची पूर्णपणें निःसदेहवृत्ति बनली, जे स्थितप्रज्ञ झाले, त्यांनीं पुन्हा खिस्ती व इस्लामी धर्मातील अतरंगसाधनांचा अभ्यास करून, तोच अनुभव घेण्यास त्यांस अज्ञानावच्छिन्न बुद्धि कोठची उरली? वगैरे प्रश्न सहज उत्पन्न होतात.

पूर्णज्ञानसंपन्न पुरुषांस पुन्हा योगाभ्यास चालू ठेवण्याची आवश्यकता काय? असा प्रश्न श्रीरामकृष्णांनीं त्यांचे गुरु श्रीतोतापुरी यांस केला होता. तेव्हां आपल्या पितळी कमंडलूचा दृष्टान्त देऊन त्यांनीं उत्तर केले कीं, हा कमंडलु एकदा घांसून आरशासारखा स्वच्छ केला, तरी तो पुन्हा रोज घांसून ठेवण्याची आवश्यकता नसते काय? त्यावर रामकृष्णांनीं मोठे मार्मिक प्रत्युत्तर केले कीं, कमडलु सुवर्णाचाच असला, मग हा खटाटोप कोठे रहातो? साधने करून सिद्ध झालेले पुरुष व स्वयंसिद्ध अवतारी पुरुष यांच्या अधिकारांतील फरक वरील प्रत्युत्तरांत दर्शित झाला आहे असे वाटतें. तथापि अशा स्वयंसिद्धांनींही सामान्य साधकांप्रमाणे साधने करीत बसावें हे कसे? हा प्रश्न रहातोच. हाच प्रश्न श्रीरामकृष्णांचे अनुयायी बाबू गिरीशचंद्र ह्यांनीं त्यांस विचारला असतां श्रीरामकृष्ण म्हणाले कीं, "बाबारे, हर आणि गौरी ह्यांचा त्रिकालीं कधींही वियोग नसतां, मला शिव पति मिळावा म्हणून पार्वती जी तपश्चर्या करीत असते, ती कां बरे? मलाही इतकीं खडतर साधनें करावीं लागतात, हे पाहून तरी लोकांनीं ह्याचा सोळावा हिस्सा तरी साधनें करावीं, हाच ह्यांतील हेतु आहे."

श्रीरामकृष्णांचा लोकसंग्रह वरवर पाहणाराच्या लक्षांत येण्यासारखा नाहीं. कारण लोकसंग्रहाच्या अलीकडील लौकिकसाधनांचा त्यांच्या ठिकाणीं पूर्ण अभाव होता. धर्मप्रचारार्थ त्यांनीं कोठे व्याख्यानांचा दौरा काढला नाहीं; श्रीदयानंदांसारख्या शास्त्रार्थाच्या सभा भरविल्या नाहींत. किंवा धर्मविषयक एखादा प्रबंधही लिहिला नाहीं. पण आधुनिक विकारांच्या खवळलेल्या दर्यांत संचार करणारे कित्येक देवमासे आपल्या वाग्जालांत कसे गुंतवावे,

ह्याबद्दल मात्र श्रीरामकृष्ण अत्यंत दक्ष होते असें दिसते. ही त्यांच्या वाग्जालाची फेक ब्राह्मसमाजी मंडळीवरच वारंवार झालेली आहे. Gospel of Shri Ramkrishna ह्या ग्रंथाचे दोन्ही भाग वाचून पाहतां असे दिसतें की, श्रीरामकृष्णांचे निदान त्या ग्रंथांतील महत्त्वाचे बहुतेक सर्व संवाद ब्राह्मसमाजी मंडळींशींच झालेले आहेत. ही इंग्रजी वळणाची ब्राह्मसमाजाची मंडळी आपण होऊन ह्या अप्रसिद्ध दरिद्री पुजाऱ्याकडे जाणे शक्यच नव्हते; परंतु उलट श्रीरामकृष्ण मात्र त्याच्या भेटीसाठीं उत्सुक झालेले होते. ह्या विषयासक्त जगात सद्गुरु आणि सच्छिष्य ह्या दोघांचीही सारखीच अपूर्वाई आहे. ह्यामुळे सच्छिष्य सद्गुरूंच्या शोधात नसतां, उलट सद्गुरूच सच्छिष्याच्या शोधात आहेत, असे कधीं कधी आढळून येते. निदान एकोणिसाव्या शतकांतील धर्मग्लानीच्या काळांत असाच उलट प्रकार आढळून येणे स्वाभाविक होते. ब्राह्मसमाजापैकींच नरेंद्रनाथ दत्त (स्वामी विवेकानंद), देवेंद्रनाथ ठाकूर, ईश्वरचंद्र विद्यासागर, बाबू केशवचंद्र सेन, इत्यादि अधिकारी साधकाचा शोध घेत श्रीरामकृष्णच फिरत होते. ही सारी मंडळी आपल्याच विद्वत्तेच्या आढ्यतेत असल्यामुळे श्रीरामकृष्णांची योग्यता कळण्यास त्यास बराच अवधि लागला व कित्येकास ती कधींच कळलीही नाहीं असे वाटते. साधारण ब्राह्मसमाजाचे संस्थापक पंडित शिवनाथशास्त्री याच्याबद्दल उल्लेख वर आलाच आहे. आदि-ब्राह्मसमाजाचे प्रधान आचार्य देवेंद्रनाथ ह्याचाही जवळ जवळ तसाच प्रकार झाला. श्रीरामकृष्ण देवेंद्रनाथांच्या भेटीस देवेंद्रनाथांचे सहाध्यायी मथुरबाबू* ह्यांच्याबरोबर आपण होऊनच एकदा गेले होते. तेव्हां देवेंद्रनाथानीं त्यांस ब्राह्मसमाजाचे वार्षिक उत्सवास येण्याविषयी बोलावणे केले. परंतु अशा मोठ्या समारंभास यावयाचे ते बगाली बाबूप्रमाणे पायघोळ धोतर नेसून व चादर घेऊन आले पाहिजे, अशी त्यांची अट होती. पुढे ती अट श्रीरामकृष्ण पाळतीलच असा भरंवसा न वाटल्यामुळे हा पटकूर नेसलेला

* ज्या दक्षिणेश्वर मंदिरांत श्रीरामकृष्ण रहात असत, त्या मंदिराची मालकीण राणी रासमणीचे मथुरबाबू हे जांवई होत. ते मंदिराचे व्यवस्थापक असून श्रीरामकृष्णांचे परमभक्त होते.

धर्मवेडा, सुशिक्षित सभ्यांच्या समाजांत न आलेला बरा, असे वाटून त्यांनीं आपलें दिलेले आमंत्रण रहित केले !

ह्याप्रमाणे आदि-ब्राह्मसमाज व साधारण ब्राह्मसमाज ह्या ब्राह्मसमाजाच्या दोन प्रमुख आग्रत शाखा आपल्याच संकोचाने श्रीरामकृष्णापासून जरी दूर राहिल्या, तरी नवविधानपंथाचा प्रकार मात्र तसा झाला नाहीं. वैष्णव भिकाऱ्याच्या मेळयांत रंगून जाणाऱ्या केशवचंद्रांस ह्या अर्धनग्न साधूशीं सहवास करणे इतराप्रमाणे असभ्यपणाचे किंवा धोक्याचे वाटले नाहीं. यामुळे त्याची चित्तवृत्ति श्रीरामकृष्णांच्या ठायीं जी एकदां जडली, ती अखेरपर्यंत कायमच राहिली. बंगाली तरुणांत श्रीरामकृष्णाची प्रसिद्धी करण्यास केशवचंद्र सेन हेच कारण झाले. श्रीरामकृष्णाचे स्वामी विवेकानंदादि पट्टशिष्य त्याच्याकडे येण्यापूर्वीच केशवचंद्र सेन याच्यावर श्रीरामकृष्णांची छाप बसली होती. केशवचंद्र सेन हे त्या वेळीं तरुणबंगालचे जीव की प्राण असल्यामुळे, स्वामी विवेकानंदाची जागा वास्तविक त्यांनीच पटकावयाची, पण तसे घडले नाहीं. ह्याचे कारण केशवचंद्राची असामान्य ख्रिस्तनिष्ठा, किंवा त्यांची स्वतःबद्दलचीच अहमन्यता, किंवा त्याची प्रपंचरति अथवा तो केवळ एक योगायोगच, हे पुढील विवेचनावरून काहींस जाणतां येईल.

स्वामी विवेकानंदाप्रमाणेच केशवचंद्रासंबधीं श्रीरामकृष्ण याच्या मनाचा विशेष ओढा होता. आदिब्राह्मसमाजाच्या मंदिरात ते तरुणपणीं एकदा ध्यानस्थ बसले असता, श्रीरामकृष्णानी त्यांस दुरून पाहिले होते. त्याच वेळीं तेथील सर्व ब्राह्मतरुणात केशवचंद्रांचीच धारणा सिद्ध होण्याजोगी आहे, असे त्यांनीं जाणलें होते. रामकृष्ण समाधीत असता, एकदा एक सुंदर मोर आपला शोभिवत पिसारा पसरून डौलाने नाचत असलेला त्यांनी पाहिला. हा मोर म्हणजेच केशवचंद्र व त्याचा पिसारा तोच केशवचंद्राचे अनुयायांचा विस्तार होय, असे हे रूपक होते. केशवचंद्र हे एक साधुपुरुष आहेत, असे ते म्हणत. केशवचंद्रांचे नवविधानांत कांहीतरी तथ्य असले पाहिजे, एरव्ही इतके लोक पंडित शिवनाथशास्त्री यांच्या नादी न लागतां केशवचंद्रांच्या भजनीं लागतेना, असे ते नेहमीं सांगत. ह्यांत थोडा गौरवाचा भाग असला तरी ह्यावरून केशवचंद्रांबद्दल श्रीरामकृष्णांना किती प्रेम वाटत होतें, तें लक्षांत येईल. ते केशवचंद्रांच्या भेटीस प्रथम गेले, तेव्हां ते त्यांस असेंच

म्हणाले कीं, "तुम्हाला ईश्वरी साक्षात्कार होतो असें ऐकतो, तरी तो साक्षात्कार कसा असतो, हे समजून घेण्याकरितां मी आलो आहे." देवेंद्र-नाथांच्या प्रथम भेटीच्या वेळीही त्यांनी त्यास असेंच विचारले होते. देवेंद्र-नाथ ज्ञानी झाले, तरी ते एक बडे प्रापंचिकच, आणि शिवनाथशास्त्री पंडित असले; तरी ते एक वावदूकच असा श्रीरामकृष्णाचा त्यांच्यासंबंधी ग्रह दिसतो. उलटपक्षी देवेंद्रनाथ हे रामकृष्णांस असभ्यात काढीत होते तर शिवनाथ-शास्त्री त्यांस विकृत मेंदू झालेले एक वेडेपीर समजत असत! त्यांची दिगंबर स्थिति एकास असभ्य वाटे आणि त्यांची भावसमाधि दुसऱ्यास फेपऱ्या-प्रमाणे दिसे! एकास त्यांचा गैदीपणा तिरस्करणीय वाटे, तर दुसऱ्यास त्यांचे होत असलेले देव्हारे, व गिरीशबाबूसारख्या नाटक्यानीं संपादित झालेली त्यांची प्रभावळ ही पहावत नसत! परंतु केशवचंद्र, प्रतापचंद्र व चिरंजीव शर्मा-त्रैलोक्यनाथ संन्याळ इत्यादि नवविधानपंथीय पुढाऱ्यास श्रीरामकृष्णाबद्दल फार आदर वाटे. प्रतापचंद्र मुजुमदार ह्यांनी तर श्रीरामकृष्णाचें जे शब्द-चित्र एके ठिकाणीं रेखाटलें आहे, ते इतके मार्मिक व मनोहर आहे की, त्याहून आपल्याला अधिक कांहींच लिहितां येणार नाहीं, असें खुद्द त्यांच्याच अनुयायांना वाटून, श्रीविवेकानंदांच्या नवीन विस्तृत चरित्रात संपादकानीं ते जसेंच्या तसेंच उद्धृत केलें आहे. प्रतापचंद्र म्हणतातः—"श्रीरामकृष्णाच्या सहवासाचा लाभ जोवर ईश्वर आम्हांस देईल तोवर आम्ही मोठ्या आनंदानें त्यांच्या पायाशी बसून त्यांच्यापासून पावित्र्य, वैराग्य, अध्यात्म आणि प्रेमोत्कर्ष याचे धडे घेऊं. श्रीरामकृष्णांनी आपल्या बालभावानें ईश्वराविषयीं मातृभाव आमच्या ठिकाणी फार विलक्षण रीतीनें उत्पन्न केला. त्यांच्या साहचर्यानें हिंदूंच्या पुराणांतील तेहतीस कोटि देवतांच्या रूपानी त्या परम-पुरुषाचे अनंत कल्याणगुण कसे प्रकट होतात, ते आम्हांस समजून आले."

केशवचंद्रांच्या मनावरही श्रीरामकृष्णाच्या सहवासाचा व त्यांच्या अर्थपूर्ण सहजोक्तींचा जादूप्रमाणे परिणाम झाला. आणि हिंदूंची मूर्तिपूजा हे त्यांच्या अधःपाताचे मुख्य कारण होय, असे मानून त्यासाठी अंतःकरणापासून तडफड-णारे केशवचंद्र सेन व त्यांचे अनुयायी ह्यांचा असा ग्रह होऊं लागला की, ईश्वराला साकार मानण्यांत जितकी चूक आहे, तितकीच त्यास केवळ निराकारच समजण्यांतही होत आहे. ह्या मतपरिवर्तनानंतर केशवचंद्रांस जे

आध्यात्मिक प्रत्यय येत गेले, व जे दिव्य दृष्टान्त होऊं लागले, त्यांवरून ईश्वराच्या सगुणसाकारतेवरील त्यांची श्रद्धा हळुहळू बळावूं लागली. खुद्द रामकृष्णांचेही विलक्षण साक्षात्कार त्यास वरचेवर होऊं लागले. ह्यामुळे श्रीरामकृष्णांबद्दल त्यांचा पूज्यभाव सहजच वाढत गेला. श्रीरामकृष्णांस पाहतांच मूर्तरूपास आलेले हे नवविधानच काय असे वाटून, नवविधानाचा जयजयकार असो! असे म्हणून ते त्यांस वंदन करीत! आणि एखाद्या लेकराप्रमाणे त्यांच्या पायाशीं बसून, त्याच्या तोंडून स्रवणाऱ्या बोधामृताचें बालवृत्तीने प्राशन करीत. केशवचंद्राच्या वक्तृत्वाबद्दल श्रीरामकृष्ण गौरव करू लागले की, "तुमच्याच तोंडून ऐकलेले शब्द मी लोकांस सांगतो, आणि म्हणून ते त्यास पटतात," असे नम्रभावाने केशवचंद्रांनीं म्हणावे. ब्राह्ममंदिराच्या वेदीवर केशवचद्र सेन कधी वक्तृत्वाच्या भरांत असता, श्रीरामकृष्ण तेथ अकस्मात् आल्यास उपासना बंद करून केशवचंद्र लगेच वेदीवरून खालीं उतरत, आणि त्या संतसंगतीच्या आनंदांत रंगून जात. एकदां तर श्रीरामकृष्णास त्यानीं आपल्या घरीं नेऊन आपले बसणे, उठणे, निजणे, भोजन करण इत्यादि नित्यव्यवसायाच्या जागा त्यास दाखविल्या व श्रीरामकृष्णांनीं आपल्या दृष्टिक्षेपानीं त्या पावन कराव्या, असे त्यांस आर्जविले. केशवचंद्राचे सहकारीमित्र खुद्द विजयकृष्ण गोस्वामी तर असे सागतात की, त्या वेळीं केशवचंद्रानी श्रीरामकृष्णास आपल्या उपासनेचे खोलींत नेऊन तेथे त्यांच्या पायांवर पुष्पांजलि वाहून त्यांची पूजाही केली! आमच्या भाविक वाचकास ह्यात कांहीच विलक्षण वाटणार नाहीं. परंतु साकार देव आणि गुरु ह्यांचा अत्यंत कडक शब्दांनीं निषेध करणाऱ्या ब्राह्मांच्या आचार्यांचे हें वर्तन त्यास फार चिंतनीय आहे, यांत शंका नाहीं.

केशवचंद्रांचा नवविधान पथ हा प्रामुख्याने खिस्तानुयायी असतांही त्या धर्मास विसंगत अशी मातृभावाने ब्रह्माची उपासना, त्याचप्रमाणे अग्नि, उदक, ध्वज इत्यादींची होणारी आराधना, संन्यस्तवृत्तीचा व वेशाचा अंगीकार वगैरे प्रकार नवविधान पंथांत जे रूढ होऊं लागले, ते या मत-परिवर्तनाचाच अप्रत्यक्ष परिणाम होय यात शंका नाहीं. आतां केशवचंद्र सेन व श्रीरामकृष्ण ह्यांच्या सहवासाचा काल पुढें कित्येक वर्षें टिकता, तर हें मतपरिवर्तन पुरें होऊन नवविधानाचें वैशिष्ट्य कदाचित् कांहींच राहिलें

असतें. परंतु तसें न होतां ते वैशिष्ट्य कायम टिकले, ह्यास कारण पंडित शिवनाथशास्त्र्यांप्रमाणें केशवचंद्रांचाही आपले वैशिष्ट्य कायम टिकविण्या-बद्दल अट्टाहास हेच होय असे आम्हांस तरी वाटते.

हे मतभेदाचे मुद्दे थोडक्यांत म्हणावयाचे तर दोनचारच होते. (१) देव, भक्त व गुरु हे एकरूप आहेत हे न पटणे, (२) ज्याचा धर्म त्यास पुरेसा आहे व सत्यस्वरूप आहे, असे न मानतां, सर्व धर्म अंशतः खरे मानून साऱ्या धर्मांची नवीन खिचडी तयार करणे, (३) " सगुण (साकार) निर्गुण एक गोविंदु रे " हे पुरें न पटणे, (४) परमार्थाच्या बरोबरीने प्रपंचाचा बडेजाव करून प्रपंचपरमार्थांचा समुच्चय मानणे, परंपरागत चालत आलेल्या रूढींचे व शास्त्रमर्यादांचे महत्त्व न जाणणे, असे ते मतभेदाचे मुद्दे होते. परंतु सूक्ष्म रीतीने विचार करतां केशवचंद्रांनी पडद्याआड केलेली श्रीरामकृष्णांची पूजा, व उघड ब्राह्ममंदिरांत केलेली येशू ख्रिस्त, मोझेस, महमद, चैतन्य इत्यादींची मानसपूजा, तसेच सर्व धर्मांत सत्य आढळतें, इतकेच नव्हे तर जगातील सर्व प्रचलित धर्म हे खरे आहेत, याप्रमाणे झालेले त्याचे मतांतर; त्याच-प्रमाणे होम, शांतिजल, इत्यादिरूपाने साकारोपासनेस येत चाललेले महत्त्व, व प्रपंच सोडून संन्यस्तवृत्तीचा होत असलेला अंगीकार, आणि नवसंहितेत शास्त्र व रूढी यांस देऊं केलेले महत्व, वगैरे केशवचंद्राचे प्रकार पाहिले म्हणजे एका अहंकाराशिवाय त्यांच्या मतभेदास फारसा आधार राहिला नव्हता, असे उघड दिसतें. ह्या अहंकाराच्या प्रत्ययासाठीं केशवचंद्रांच्या अंतःकरणाच्या कप्प्यांतील एक दोन कल्पना सांगितल्या असतां पुरें होईल. केशवचंद्र ह्यांचा पूर्वीचा जिवलग मित्र विजयकृष्ण ह्याला ते म्हणत की, " मी चैतन्य व ख्रिस्त ह्यांचा अंशावतार आहे, तर तूंही चैतन्याचा अनुयायी अद्वैत असल्याबद्दल पुकारा कर." इतकेच काय पण ते आपल्या प्रभावळीत असतां, खुद्द श्रीरामकृष्णांसही आपल्या नवविधान पंथांचे एक अनुयायी असे म्हणण्यापर्यंत त्यांच्या विचारांची मजल गेली होती ! मग धर्मवेडाच्या अज्ञातपंकांतून श्री-रामकृष्णांस केशवचंद्रांनीं वर काढले असे त्यांचे अनुयायी म्हणतात त्यांत नवल काय ! असो. केशवचंद्र वारले तेव्हां श्रीरामकृष्ण एखाद्या मुलाप्रमाणें रडले ! तीन दिवस त्यांनीं आपलें अंथरूण सोडले नाहीं. " केशवाचे निधनानें माझ्या एका अंगास पक्षघात झाला," असे ते म्हणत. हें ज्यांचे केशवचंद्रांवर

अलौकिक प्रेम, त्या श्रीरामकृष्णांबद्दल केशवचंद्रांच्या सुप्रसिद्ध सार्वजनिक व्याख्यानांत अगर लेखांत कृतज्ञबुद्धीने अथवा प्रेमादराने चुकून एकदांही उल्लेख आढळूं नये हे आश्चर्य होय.* ब्राह्मसमाजाचा 'सुलभसमाचार' व 'संडे मिरर' यांमध्ये मधून मधून श्रीरामकृष्णांसंबंधीं उल्लेख येत असे, असे श्रीरामकृष्ण परमहंसांच्या इंग्रजी चरित्रावरून दिसतें. परंतु ते उल्लेख कदाचित् अधिक मोकळ्या मनाचे प्रतापचद्र मुजुमदार यांचेही असतील, काय सांगावे. प्रतापचंद्र मुझुमदार ह्यांनीं आपल्या केशवचंद्रांच्या चरित्रांत श्रीरामकृष्णांच्या सत्संगतीचा व विचारांचा केशवचंद्रांचे 'नवविधाना'वर बराच परिणाम झाला, असे स्पष्ट म्हटले आहे. हाच उल्लेख जाहीर रीतीने केशवचंद्रांच्या तोंडीं अधिक शोभला असता. परतु केशवचंद्रांची महत्त्वाकांक्षा त्यांच्या कर्तृत्वापेक्षांही अधिक बलवत्तर होती. आणि माझा नवविधानपंथ मी कोणाचे ऐकून अगर पाहून बनविला नसून, तो साक्षात् ईशप्रणीत आहे, असे ते ठासून सांगत असल्यामुळे श्रीरामकृष्णाबद्दल कृतज्ञबुद्धीने त्यांच्या तोंडून उल्लेख–निदान त्यांच्या प्रसिद्ध इंग्रजी भाषणांत निघाला नाहीं, अशी आमची समजूत झाली आहे.

केशवचंद्र सेन आपल्या 'जीवनवेद'नामक आत्मचरित्रांत असे लिहितात कीं:—" मी माझा हा माल बाजारात शक्य तितका सुंदर मांडीन, पण मी कोणाचे उसने घेणार नाहीं. मी सारी रात्र प्रार्थनेत घालविली आणि दुसऱ्या दिवशीं सकाळीं मला हे भाडवल मिळाले. माझा प्रथमपासूनच असा निर्धार होता कीं, साक्षात् ज्ञानस्वरूप अशा परमात्म्याकडूनच ज्ञान संपादन करावे, आणि जे संपादन केले तेच लोकांस द्यावे. वैराग्य आणि ईश्वराशीं ऐक्य हेही मी दुसऱ्या लोकांच्या सांगण्यावरून पत्करणार नाहीं." जेथे खुद्द केशवचद्रांचे हे उद्गार तेथे त्यांच्या अनुयायांच्या अहंकाराचा चटका, सूर्यकिरणांपेक्षां वाळूने अधिक भाजावे, त्याप्रमाणे जाणवल्यास नवल नाहीं. केशवचंद्रांच्या स्वावलंबी व स्वतंत्र माहात्म्याचे वर्णन करतांना ते श्रीरामकृष्णांस तर मोजीत नाहींतच, पण 'महात्मा राममोहन' आणि 'महर्षि देवेंद्रनाथ, यांच्याकडूनही केशवचद्रांनीं काहीच घेतले नाहीं, असे ते अभिमानपुरःसर लिहून सांगतात. परंतु

* केशवचद्रांचीं इंग्रजी व्याख्याने व त्यांचे स्फुट इंग्रजी लेखसंग्रह हीं पुस्तके पाहून आम्ही वरील विधान करीत आहोंत.

ब्राह्मेतर तिऱ्हाईत लेखकांची समजूत अशी नाहीं. आम्हांस तर असेच वाटतें कीं, नवविधानतत्त्वविचारांतील बराचसा उत्तमांश श्रीरामकृष्णवचनामृतातूनच घेतला आहे. मग गोरसांत केशवचंद्रांनीं विलायती सोडावॉटर घालून गोरसाचे रूप व चव पालटली ही गोष्ट वेगळी.

श्रीरामकृष्णांच्या उपदेशाने अखंड सच्चिदानंदाचे वास्तविक स्वरूप केशवचंद्रांचे ध्यानी आलें, सगुणोपासनेसबंधीं त्यांची दृष्टि निवळली, परमात्मशक्तीस मातृभावाने ते पाहू लागले, आणि कोणताच धर्म पूर्णत्वाने सत्यस्वरूप नसून प्रत्येक धर्मात सत्य अंशतः मात्र असूं शकते, ही जी ब्राह्माची सर्वसाधारण समजूत त्यात पालट पडून जगांत प्रस्थापित असलेले सर्व धर्म सत्य आहेत, असे ते म्हणूं लागले. तथापि येशू खिस्तावर त्यांची निष्ठा होती, ती प्रचलित खिस्तीधर्मावर नव्हती. श्रीचैतन्यांसबंधी त्याना आदर होता, तो अलीकडील वैष्णवधर्माबद्दल नव्हता. पूर्वीच्या धर्मसंस्थापकांप्रमाणेच आपण एक आहोत असा त्याना जबर आत्मविश्वास होता. प्रचलित असलेले सर्व धर्म अवनतदशेस प्राप्त झाल्यामुळे, विशेष आदरणीय नाहींत, असा त्यांच्या मनाचा खरा ग्रह झालेला असावा असें वाटते. हिंदूंच्या आचारधर्माची त्यांनी अनेक वेळा अत्यत निर्भर्त्सना केलेली आढळते. त्याचप्रमाणे खिस्तीधर्म व यहुदीधर्म ह्यांबद्दल त्यानी अनादरच व्यक्त केला आहे. तथापि येशू खिस्ताबद्दल केशवचंद्र याची दृढतर भक्ति असल्यामुळे, त्यांचीं सर्व व्याख्याने येशू खिस्ताचे माहात्म्याने संपृक्त आहेत. यावरून त्याचा खिस्तीधर्माकडेही तितकाच ओढा होता, असा कोणाचाही ग्रह होणे स्वाभाविक आहे. ह्यासबधी फर्कुहार ह्याच्या ग्रंथांतील एक उल्लेख मोठा मननीय आहे. त्याच्या एका खिस्ती धर्मोपदेशक मित्रास बाबू प्रतापचंद्रांनी असे खात्रीपूर्वक सांगितले की, त्याची व केशवचद्राची धर्मभावना अगदीं खिस्तीच आहे; परतु ही गोष्ट ते उभयतां सार्वजनिक रीतीने अद्याप बोलून दाखवीत नाहीत; कारण त्यांस असे वाटते कीं, त्यांनी आपली खरीं मते आताच एकदम सांगून टाकण्यापेक्षां ती हळुहळू उघड करण्यानेच ते आपल्या देशबांधवांच्या ठिकाणी खिस्तनिष्ठा पूर्णपणे उत्पन्न करूं शकतील. पुढे अनुभवाअंतीं खिस्तनिष्ठा आणि कृष्णनिष्ठा ह्या दोहोंसही ते व त्याचे अनुयायी अंतरले असे दिसतें. फर्कुहारसाहेब म्हणतात कीं, खिस्ताला सर्वांत

श्रेष्ठ मानावयाचे, आणि सारे धर्मही खरे मानावयाचे, ह्या विसंगतीचा परिहार केशवचंद्रांकडून केव्हांही झाला नाहीं. असो.

तात्पर्य, श्रीरामकृष्णांनीं ख्रिस्तीधर्मांतील अंतरंगसाधनांचा अभ्यास करून जे कांही जाणावयाचे ते जाणले, आणि अखेर ते कट्टे सनातन हिंदुधर्मीच राहिले. आणि त्यांच्या विवेकानंदादि अनुयायानीही स्वधर्माचाच अभिमान धरला. परंतु केशवचंद्र जे एकदा जॉन बुलच्या कच्छपी लागले, तो त्यांचा पूर्वग्रह गोधागुली न्यायाने न सुटून, 'शिव शिव न हिंदुर्नयवनः' अशी नवविधान पंथाची तऱ्हा झाली !

---

## प्रकरण आठवें

# नवविधानाचे कांहीं विधि

आतांपर्यंत झालेल्या वर्णनावरून केशवचंद्रांच्या मनांत उठलेले विचारांचें वादळ कोणत्या स्वरूपाचे होतें, ह्याची कल्पना वाचकांस येईल. आपला नवविधान पंथ जगांत रूढ कसा करावा, हा विचार मुख्यत्वेकरून त्यांच्या-पुढें होता. त्यांच्या मनाची भूमिका जरी खिस्ती होती, तरी वैष्णवकुलाचे संस्कार, श्रीरामकृष्णांचा सहवास आणि महंतीची आवड अथवा लोकेषणेची तीव्र जाचणी, यामुळे त्यांना हिंदूचे खिस्ती होणें अशक्य होऊन खिस्तीधर्मास उलट हिंदुत्वाचा बाप्तिस्मा देणें भाग पडलें. तसेंच साधारण-ब्राह्मांच्या नुसत्या बुद्धिवादापेक्षा आपल्या पंथांत कांहीं विशेष आहे, हें जगास दाखविणें जसें त्यांस जरूर होतें, त्याचप्रमाणें नुसत्या शाब्दिक धर्मविचारांचे धर्मशील बनवून त्यास परंपरेची शाश्वती आणण्यासाठीं, त्यास कांहीं उपसंस्था, धार्मिक शिस्त, उत्सव व विधिविधानें यांचीही आवश्यकता वाटली. तसेंच खऱ्या महंतीस मूळ कारण वैराग्य आहे, हेंही त्यांच्या लक्षांत येऊन चुकलें होतें. या कारणास्तव त्यांनी आपल्या समाजांत जे नवीन निरनिराळे उत्सव व विधि सुरू केले. त्यांपैकीं कांहीं नमुने पुढें देत आहोंत.

**१ फकिरी दीक्षाः**— एका चैत्र शुद्ध ३ ला प्रसिद्ध सत्पुरुष श्रीचैतन्य ह्यांची जन्मतिथि होती. त्या दिवशीं केशवचंद्रांच्या ब्राह्ममंदिरांत फकिरीची दीक्षा घेण्याचा विधि करण्यांत आला. आदले दिवशीं आचार्य केशवचंद्र ह्यांनीं आपल्या मस्तकाचें मुंडन केलें होतें. उत्सवाचे दिवशीं सकाळीं भाई कांतिचंद्र ह्यांनीं ब्राह्मप्रचारकाचे पाय धुतले, भाई गौर गोविंद यांनी ते पुसले. नंतर सर्व प्रचारक, केशवचंद्र सेनांच्या पुष्पहारांनीं सुशोभित केलेल्या गृहमंदिरांत जाऊन आपआपल्या जागेवर बसले. भाई प्रतापचंद्र मुजुमदार ह्यांनीं खिस्तीधर्मपुस्तकांतून येशू खिस्तानें आपल्या अनुयायास केलेला उपदेश वाचून दाखविला. नंतर आचार्य केशवचंद्र ह्यांनीं अंगांत कफनी घालून वेदीवरून नित्याप्रमाणें ईश्वराची करुणा भाकली. प्रार्थना सुरू असतांच

केशवचंद्र सेनांनी आपल्या अंगावरील वस्त्र फाडून त्याची कौपीन करून ती परिधान केली; व खाकेत झोळी व हातांत दंड घेऊन ते उभे राहिले ! त्यानंतर भाई कांतिचंद्र ह्यांनीं त्यांचे झोळींत मूठभर भिक्षा घातली, आणि गौर गोविंद उपाध्याय ह्यांनीं केशवचंद्रांचे गळ्यांत नवयुगधर्माचा शिक्का असलेले पदक बांधले. नंतर आणखी कांही प्रचारकांचे गळ्यांत तसलीच पदकें बांधलीं व बाकीच्यांचे मस्तकावर केशवचंद्रांनी आपला वरदहस्त ठेवला. पुढे केशवचंद्रांनीं आपल्या घराचे आवारांतील कमळसरोवरावर, मिळालेल्या भिक्षान्नाचा स्वतां स्वयंपाक करून भोजन केले. आपल्या घराचा कारभार आपला वडील मुलगा करुणाकुमार ह्याचे स्वाधीन केला; व त्यांनीं स्वतां भिक्षान्नावर राहण्याची शपथ घेतली. त्याच दिवशीं संध्याकाळीं पल्लवांनीं सुशोभित केलेल्या ब्राह्ममंदिरांतील वेदीसमोर सहा मुख्य प्रचारक स्थानापन्न झाले. आणि त्यांनीं सत्य, ज्ञान, अनंत, इत्यादि ईश्वराच्या षड्गुणाचें, प्रत्येकाने एकेक गुणाचे याप्रमाणे, विवेचन केले; लगेच त्या दिवशी ते धर्मप्रचारक धर्मप्रसारार्थ चोहोंकडे निघून गेले, आणि त्याच दिवशीं नवविधान, ( New Dispensation ) हें साप्ताहिक त्यांनी सुरू केले.

२ **पवित्र भोजनः**—दुसऱ्या एका रविवारी प्रभु येशू ख्रिस्ताच्या पवित्र भोजनाचे अनुकरण करण्यांत आले ब्राह्ममंदिरांत धर्मप्रचारकाची नित्योपासना झाल्यावर सर्व मंडळी भोजनाकरितां नुसत्या जमिनीवर बसली. मधोमध शुद्धोदकाने भरलेली रुप्याचीं भांडीं पत्रपुष्पांनी सुशोभित करून ठेवलीं होतीं. नंतर केशवचंद्रांनीं ख्रिस्ती धर्मपुस्तकांतून प्रसंगोचित असा भाग वाचून दाखविला. नंतर ते अन्नोदक पवित्र व ओजस्वी व्हावे म्हणून ईश्वराची प्रार्थना करण्यात आल्यानंतर तेथे जमलेल्या सर्व स्त्री पुरुषांना व आबालवृद्धांना ते अन्नोदक प्रसाद म्हणून भक्तिपुरःसर थोडथोडे वांटण्यांत आले. त्या पवित्र अन्नोदकांस प्रभूचे मांस व प्रभूचे रक्त अशा संज्ञा देण्यांत आल्या. त्याचे रहस्य असें सांगण्यात आलें कीं, " हे पवित्र अन्नोदक पोटात गेल्यावर ते पचनीं पडताच प्रभु येशू ख्रिस्ताचे रक्त आपल्या अंगांत खेळूं लागेल. ईश्वराशीं तादात्म्य पावण्याची ही एक उच्चतर भावना आहे." केशवचंद्र सेनांचा कल ख्रिस्ती आचारांकडे विशेष असल्यामुळे " उदरभरण

नोहे जाणिजे यज्ञकर्म " ही हिंदुधर्माची भावना ह्यांचे लक्षांत आली नाहीं असे दिसते.

३ **विरागी गृहस्थः**—केशवचंद्रांची ह्यापुढील कल्पना म्हणजे " विरागी गृहस्थ " ही होय. त्यांनी ह्या नवीन वृत्तीची कित्येकांना दीक्षा दिली. अशा गृहस्थानीं इतरांप्रमाणेच सर्व व्यवहार व धंदारोजगार करावयाचा, परंतु धंदारोजगार अगर काबाडकष्ट करून त्यांनी जो पैसा मिळवावयाचा तो त्यांनीं ईश्वरार्पणबुद्धीनें ब्राह्ममंदिराचे (Bidhan Deposit Bank) विधान अमानत पेढीवर आणून भरावयाचा. ह्याप्रमाणे तो पैसा एकदां ईश्वराचा होऊन तो निष्पाप झाला, म्हणजे त्यांतून केवळ चरितार्थास जरूर तितकाच पैसा उचलावयाचा, जास्त खर्च करावयाचा नाहीं, असा ह्या विरागी गृहस्थांचा धर्म असे.

४ **भगिनीसमाजः**—विरागी गृहस्थांची अशी शिस्त लागल्यानंतर 'भगिनी-समाज' म्हणून एक नवीन संस्था त्यांनी सुरू केली. स्त्रियांच्या निरनिराळ्या दर्जाप्रमाणे त्यांस निरनिराळ्या प्रतीच्या दीक्षा देण्यांत येत. त्यांचे शपथ विधीत सामान्यंकरून चिंतन, अल्पाहार, स्वभावनिरीक्षण, परोपकार, जीव-दया, शिशुसंगोपन, स्वच्छता व आरोग्यविज्ञान असे विषय असत पाहिल्या प्रतीचे शपथविधीत खालील कर्तव्यांचा समावेश होत असे. देवाची एकशे-आठ नांवे घेणे आणि संतांस व महात्म्यांस शरण जाणे, प्रातःकाळी ऋग्वेदाचा पाठ वाचणे, दुपारी ख्रिस्ती धर्मग्रंथ (बायबल) वाचणे, साधकांस व भक्तांस साखरपाणी देणे, स्वताचा स्वयपाक स्वता करणे. मंदिरांत असतांना मस्तक कपड्यांनीं आच्छादित ठेवणे, एकांतिक चिंतन व एकतारी-वर भजन करणे, मुलासह आरत्या व स्तोत्रे म्हणणे, आणि श्रीचैतन्यांचे चरित्र श्रवण करणे. ह्याचप्रमाणे लहान अविवाहित मुलींस निरनिराळी अनुशासनपद्धति असे.

५ **विद्यार्थिवर्गः**—स्त्री-पुरुषांची अशी संगति लागल्यानंतर विद्याव्यासंगी अशा मुलांकरितांही एक शासनपद्धति सुरू करण्यांत आली. त्याचा क्रम असाः—प्रातःकाळी प्रातःस्मरण व धर्मशास्त्रावलोकनानंतर सकाळची उपासना व अष्टोत्तरनाममाला-स्तोत्रपाठ, रोजचा अभ्यास व काम, गवतापासून नम्रता व फुलांपासून कोमलता ह्या मनोवृत्तींचा अभ्यास करणे, नक्षत्रमंडलाचा अभ्यास

आणि अनंतस्वरूपाचे चिंतन, एकेश्वरीधर्मानुसार अभ्यास आणि झोंपीं जाण्यापूर्वी, हातून घडलेल्या पातकांचा उच्चार करून प्रार्थना. ह्याप्रमाणें दिनक्रम ठेवण्याविषयीं कित्येक विद्यार्थ्यांस दीक्षा देण्यांत आली.

६ **अग्न्युपासनाः**— कर्मठाचे धार्मिक विधि म्हणजे कांहीं धर्म नव्हे. खऱ्या शाश्वतधर्माचें स्वरूप याहून अत्यंत भिन्न व परम उदात्त आहे, असें मानून हिंदूंचे कर्मकांडाबद्दल तुच्छतापूर्वक औदासीन्य धरणें, किंबहुना त्याचा धिक्कार करणे, हेंच ज्यांचें वास्तविक शील, अशा ब्राह्मांच्या ब्रह्ममंदिराच्या कार्यक्रमांत सन १८८१ चे जून महिन्यात हा एक नवीन विधि सुरू झाला. त्या दिवशीं मंदिरांतील सांप्रदायिकासही आज कोणता समारंभ होणार ह्याची कल्पना नव्हती. मंदिरांतील वेदीपुढे एक विस्तीर्ण लोहकुंड ठेविले होते. त्याच्या जवळच एका बाजूस इंधनें व समिधांचा भारा असून दुसऱ्या बाजूस तुपानें भरलेला एका मातीचा घडा होता. होमद्रव्याचे सभोंवार सुंदर व सुवासिक पुष्पांच्या रंगवल्लिका शोभत होत्या. वैदिकधर्मास पारखे झालेल्या त्या सांप्रदायिक धर्मसुधारकांस, आपल्या ब्राह्ममंदिरात होमहवनाची तयारी पाहून, साहजिकच आश्चर्य वाटलें ! सर्व मंडळी जमा झाल्यानंतर आचार्य ब्रह्मानंद केशवचंद्र सेन ह्यांनी प्रथम ईशप्रार्थनारूप मंगल केलें. अंगीकृत कर्म निर्विघ्न व यथासांग पार पडावें म्हणून ईश्वराचे आशीर्वाद मागितले. आणि नंतर होमकुंड प्रज्ज्वलित करून त्यांनी अग्नीची स्तुति करण्यास सुरुवात केली. ते म्हणालेः—" हे प्रज्ज्वलित अग्ने, तू फार थोर आहेस. ह्या विश्वात तुझी शक्ति फार मोठी आहे. तुझा भव्यपणा आणि तुझी महती यांबद्दल आम्ही तुझा गौरव करतो. तू कांहीं ईश्वर नव्हेस आणि आम्ही तुला भजतो असेंही नव्हे, तर अग्नीचाही जो अग्नि असा जो विश्वप्रकाशक अविनाशी ज्योति तो तुझ्या रूपांत प्रकाशित झाला आहे. हे दिव्य अग्ने, तुझ्या ह्या स्वरूपांतच तो प्रकाशक परमात्मा आम्हांस दृग्गोचर होत आहे. त्यानेंच आपल्या हातांत तुझ्या ह्या पवित्र ज्वाला धरल्या आहेत. त्याच्यावाचून तुला अस्तित्वच नाहीं. अशा त्या तुझ्या व आमच्या ईश्वराला आपण भजूं या." अशा प्रकारें त्या लोकोपकारक अग्नीची त्यांनी पुष्कळ स्तुति केली. आणि त्यांनी हवनाचा समारोप खालील शब्दांत केला. ते म्हणालेः—" हे दिव्य अग्निनारायणा, तुझ्याच आज्ञेने मी आज तुझा अग्निहोत्री होऊन आमच्या व्यवायधर्माचे हवन करण्याकरितां ह्या खऱ्या

होमाचा प्रसार सुरू करीत आहें, तर तूं आम्हांस साह्यकारी हो. आणि आमचीं सर्व पापे व विषयवासना ह्याचा तुझ्या दिव्यतेजात नाश करून टाक, सैतानाचा नाश कर आणि मृत्यूसही जाळून टाक. ह्या सहा समिधा मी तुला शेवटी अर्पण करतो, त्या जाळून तूं भस्म करशील, त्याचप्रमाणे माझे षड्‌विकारही भस्मसात् करून टाक." असे म्हणून आधुनिक अग्निहोत्री केशवचंद्र सेन ह्यांनी अग्निनारायणास सहा समिधाची शेवटली आहुति दिली, आणि सर्व मंडळीसह अग्निदेवाचा मोठ्याने जयजयकार केला.

७ **पावनविधि**:—वेदांतील कर्मकांड हे ब्राह्मणानी स्वतार्ची वृत्ति अबाधित चालण्याकरिता व्यर्थ माजवलेले एक खूळ आहे, असे म्हणणारा एक बुद्धिवानाचा वर्ग प्राचीन कालापासून येथे आहेच. दुसऱ्या एका मध्यस्थ वर्गाचे म्हणणे असे आहे कीं, वेदोक्तविधीत काही रहस्य असले, तरी वेदोक्त मंत्रांत तसे काहींच रहस्य नाही. यास्तव उपासना करावयाचीच तर ती संस्कृतासारख्या अपरिचित मृत भाषेतील अर्थहीन मंत्राने न करता स्वयप्रेरित भावनेने प्राकृत भाषेतच करावी. अशाच्या संतोषाकरिता ह्या नवविधान धर्मातील कित्येक विधि थोड्या विस्ताराने सागणे जरूर झाले आहे. खिस्ती वाङ्मय व खिस्ती मिशनरी ह्याच्याशीं विशेष परिचय झाल्यामुळे म्हणा, अगर अखिल मानवजातीकरिता ह्या सार्वत्रिक नवविधानधर्माचा अवतार होता, म्हणून म्हणा, त्यातील आचारविचारात पौर्वात्य व पाश्चिमात्य सस्कृतीचे विलक्षण मिश्रण झालेले दिसते. वरील होमसंस्कारानतर लवकरच बाप्तिस्म्याचा एक नवीन संस्कार ब्राह्मविधींचे प्रणालिकेत रूढ झाला. ज्या आत्मशुद्धीस अग्नीनें आरंभ केला, तिची पूर्तता उदकाने केली. जुन्या विषयी जीवाचा अग्नीने नाश केला, व लगेच पवित्रोदकांत नवजीवनाचे जातकर्म झाले. एका रविवारी आचार्य केशवचंद्र ह्यांनीं पीठावर बसून प्रथम थोडी प्रार्थना केली. ते म्हणाले:—"हे शाश्वत परमात्मन्, ज्या ठिकाणीं तुझा पुत्र जीजस ह्यास अठरा शतकांपूर्वी पावन करून घेतलें (बाप्तिस्मा दिला), त्या पवित्र क्षेत्राच्या ठिकाणीं, जॉर्डन तीर्थावर जाण्याकरिता आम्ही यात्रेकरू तुझे सेवक निघालों आहोत, तर तूं आम्हास मार्गदर्शक होऊन जेणेकरून आमचा हा प्रवास सुखावह होईल असे कर." अशी प्रस्तावना झाल्यानंतर सर्व सांप्रदायिकाची मिरवणूक वाजत गाजत त्याचे लिलीकॉटेज नामक वाड्या-

मागील कमलसरोवरावर गेली. तेथे घाटावर नवविधानधर्माचे निशाण फडकत होतें. व त्याच्या खालीं एका प्रशस्त लाकडी वेदीवर व्याघ्रांबर पसरले होतें. तो माध्यान्ह कालचा वेळ होता. अशा वेळीं सूर्याचे तापापासून पीठाधिष्ठित आचार्यांचे रक्षण करण्याकरिता कमलसरोवराच्या कांठच्या वृक्षवेलींनी आपल्या पुष्पपल्लवांच्या माळाचा मंडपच उभारला होता. अशा थाटात आचार्यांची स्वारी स्थानापन्न झाल्यावर त्यानीं आपल्या उपदेशास सुरुवात केली ती अशीः—

"प्रिय बंधुहो, आज आपण ज्यू लोकाचे धर्मक्षेत्रात जॉर्डन नदीचे कांठी बसलो आहोत. ज्यास डोळे असतील, त्यानीं पहावे. मी तुम्हास खचित सांगतो, अठरा शतकापूर्वी प्रभु येशूस येथेच बाप्तिस्मा देण्यांत आला. हे पवित्र तीर्थाचे उदक पहा. येथेच ईशपुत्राने बुडी मारली. येथेच तो भाग्यवान् जीझस जॉन दि बॅप्टिस्ट याचे हातून पावन झाला. आणि त्याचप्रमाणे वरील आकाशांत पवित्र आत्म्याचा आवेशही येथेच झाला. ह्याप्रमाणे पिता, पुत्र व पवित्र आत्मा ह्या त्रयीचा संगम येथेच झाला आहे, तो अवलोकन करा." असा उपदेश केल्यानंतर केशवचंद्र सेनानी अग्निदेवाप्रमाणे वरुणदेवतेची यथेच्छ स्तुति केली. नंतर ज्या तीर्थांतून बुडी मारून निघाल्याबरोबर येशू ख्रिस्त पावन झाला, त्या पवित्रोदकात आपणही बुडी मारून पावन व्हावे, अशा भावनेने केशवचंद्र सेनांनीं आपल्या अंगास सुगंधी तेलें व अत्तरें लावून ते कमळसरोवरात उतरले आणि ख्रिस्ती त्रयीचा उच्चार करून त्यांनीं भाविक कर्मठाप्रमाणे तीन वेळा बुडी मारली; आणि अखेर जय सच्चिदानंद असे म्हणून शेवट त्या त्रयीचा समन्वय केला. नंतर डोळे कान, हात, पाय हे पाण्याने धुऊन, ते प्रार्थनेचा समारोप करीत असतां, एका गायक प्रेषिताने त्याच्या मस्तकावर जलधारा धरली. नंतर ते शांतिजल आपआपल्या कलशात भरून घेण्याची एकच गर्दी झाली. आचार्य आपला कमंडलु भरून घेऊन बाहेर आले. त्यानी सर्व भक्तमंडळीवर आपल्या कमंडलूतील पवित्र उदकाचे सिंचन केले. तेव्हा सर्वांनीं शांतिः शांतिः शांतिः, असे त्रिवार म्हणून ह्या तीर्थपावनविधीचा समारोप केला. नंतर आचार्यांचे स्पर्शाने पवित्र झालेल्या तीर्थात सर्व स्त्री-पुरुषांनी स्नानें केलीं, व सर्वजण तें शांतिजल घेऊन आपआपल्या घरीं गेले.

एकीकडे ब्राह्ममंदिरात असे नानाविध चित्ताकर्षक समारंभ घडत असतां

दुसरीकडे केशवचंद्रांच्या घरीं लग्नादि मंगलकार्यांचीही गर्दी उडाली होती. त्यांनीं आपली दुसरी मुलगीही कुचबिहारचे राजघराण्यातच दिली. केशवचंद्रांच्या घरीं त्यांच्या शेवटच्या मुलाचे नामकरणापासून, तो वडील मुलाच्या लग्नापर्यंत कोणतेही लहानमोठें कृत्य असो, त्यास असे स्वरूप दिले जात असे की, त्यामुळें सर्वांचे लक्ष सहजच तिकडे वेधले जाई. प्रतिकूल झालेल्या लोकमतावर अशी ही मोहनी सुरू असतां, केशवचद्राची व्याख्यानमाला अखंडित सुरूच होती. ते आपला व्याख्यानाचा विषयही तसाच चित्ताकर्षक योजीत.

"ईश्वर आणि ईशपुत्र एकच काय ?" हा त्याच्या व्याख्यानाचा एकदा विषय होता. त्याच्या भाषणातील सारांश असा होता कीं, "पवित्र आत्मा आणि परमात्मा यातील अभेद कोणी नाकबूल करणार नाहीं. परंतु ईश्वर आणि ईशपुत्र यांतील भेद कायम आहे. ईशपुत्र हा एक दैवी पुरुष होता. दैवी पुरुष आणि पुरुषाकार देव, ह्या दोन कल्पनात महदंतर आहे. दैवी पुरुषात पुरुषाचे मानवी स्वरूप कायम असून त्यात दैवी अंशाचा आविर्भाव झाला असल्यामुळेंच, तो पुरुष आपणास वंदनीय होतो. परंतु पुरुषाकार देव ही कल्पना अगदीच खोटी व असंबद्ध आहे. जीझस ख्राइस्ट दैवी पुरुष होता; म्हणजे तो देव होता असे नव्हे. आणि आजही तो आपला मानवीपणा सोडून ईशतत्त्वात एकरूप झाला आहे, असे नाहीं. मोक्ष म्हणजे बौद्धाचे निर्वाणाप्रमाणे किंवा हिंदूच्या ब्रह्माप्रमाणे जीवात्म्याचे परमात्म्यांत समरस होणे ( विलीन होणे ) असे नव्हे. तर जीझस ख्राइस्ट हा एक नमुनेदार पुरुष ईश्वराने निर्माण केला. तो आज स्वर्गात जेथे असेल, तेथे मानवरूपातच असेल. त्याचे मानवरूप तिन्ही काली अबाधितच आहे."

असो. ह्याप्रमाणे विचारवंताकरिता व्याख्याने, स्त्रियाकरितां देशी स्त्रियासंघासारख्या संस्था (नेटिव्ह लेडीज् इन्स्टिटयूशन) व त्या संस्थातही उत्साह व चळवळ कायम ठेवणाऱ्या निरनिराळ्या विषयातील स्त्रियांच्या परीक्षा आणि सार्वत्रिक आबालवृद्धाकरिता नवविधानदर्शक नववृंदावनासारखे मित्रमंडळीसह केलेले नाटकाचे खेळ, ह्याप्रमाणे हरप्रयत्नांनी सर्वांचे चित्त ओढून घ्यावे, व त्यास आपले धर्मतत्त्व शिकवावे, म्हणून केशवचद्राचा खटाटोप एकसारखा सुरू होता. ह्याच सुमारास त्यांनी स्वानुभवासंबंधीं एक व्याख्यान माला दिली, व तीच पुढे "जीवनवेद" ह्या

नांवानें प्रसिद्ध झाली. त्यासंबंधीं विवेचन पुढें येईल. धर्मप्रसारासंबंधीं केशवचंद्रांचा उत्साह विलक्षण होता. त्या उत्साहाचे भरांत ऑक्सफर्ड मिशन, मुक्तिफौज, अशा विदेशी संस्थाचाही त्यांनीं मोठ्या जोरानें पुरस्कार करण्यास कमी केले नाहीं.

ह्याप्रमाणे केशवचंद्र सेनाच्या धर्मोद्धारासंबंधीं कल्पनांच्या भराऱ्या सुरू असता, त्यांची धर्मपत्नीही त्यांच्या भावनावेशांत मागें राहिली नाहीं. ती त्यांची खरीच सहधर्मचारिणी ठरली. सन १८८२ च्या सप्टेंबर महिन्याच्या दुसऱ्या तारखेस केशवचंद्र सेनांनीं आपल्या दहाव्या सुव्रत नामक मुलाचा नामकरण-समारंभ साजरा केल्यावर अवघ्या दोन महिन्यांच्या आंतच ता. २८ आक्टोबर रोजी ( Vow of conjugal asceticsm ) वैवाहिक संन्यास नामक त्यांनीं एक शपथविधि केला. एका रविवारी केशवचंद्रांच्या धर्मपत्नीने आपले संपूर्ण वेणीदान करून आपल्या पतीसमवेत योगधर्माची दीक्षा घेतली. तेव्हांपासून त्यांनी असिधाराव्रताप्रमाणे ब्रह्मचर्याची शपथ घेतली. त्यानंतर केशवचंद्रांच्या धर्मपत्नीचा दिनक्रम सामान्यत्वे असा असे:—अथरुणातून सकाळी उठतांच सच्चिदानंद परमात्मा, नंतर साध्वी सती, आणि नंतर नवविधान ह्यांस वंदन करावे स्नान करतांना "जलात हरि आहे" असे तीन वेळा म्हणावे. तसेच भोजन करतांना "अन्नांतही हरि आहे" असे तीन वेळां म्हणावे आणि आपल्या पर्णकुटीत पतीसमवेत योगाभ्यास करावा. ह्याप्रमाणे सामान्य दिनक्रम असून वारपरत्वें निरनिराळा दिनक्रम असे तो असा:—

| वार | श्रवण | सेवा | दान |
|---|---|---|---|
| सोमवार | जीजस ख्राइस्टचे चरित्र | पतिसेवा | सुवर्णदान |
| मंगळवार | बुद्धचरित्र | मातृपितृसेवा | रौप्यदान |
| बुधवार | " | अपत्यसेवा | ताम्रदान |
| गुरुवार | महंमद पैगंबरचरित्र | बंधुभगिनीसेवा | वस्त्रदान |
| शुक्रवार | नानकचरित्र | सेवकसेवा | तंदुलदान |
| शनिवार | शिवदुर्गाचरित्र | अनाथसेवा | औषधिदान |
| रविवार | याज्ञवल्क्यमैत्रेयीचरित्र | प्रचारक व उपदेशकसेवा | विद्यादान; |

कित्येकांस हे सारे स्तोम वाटण्याचा संभव आहे. तथापि ह्यांतील योजकाची कल्पकता कित्येकांस सूचक होईल, असे वाटतें.

'मनःपूतं समाचरेत्' हेंच केशवचंद्रांचे ब्रीदवाक्य असावें असे वाटते· इतकेंच नव्हे, तर त्यांच्या मनानें पुनीत ठरल्याप्रमाणें इतरांनींही वागावे, असा त्यांचा आग्रह दिसतो. ह्या त्यांच्या आग्रहाची सीमा चारी खंडांच्या चतुःसीमेला जाऊन भिडली होती. सन १८८३चे सुरवातीसच त्यांनीं आपल्या 'न्यू डिस्पेन्सशन' पत्रांत जगांतील सर्व राष्ट्रांस व सर्व धर्मांच्या लोकांस उद्देशून एक जाहीरनामा आपल्या नांवाने प्रसिद्ध केला. त्यातील आशय असा की, "नानाधर्म आणि नानामते यांच्या गलबल्यांतील विरोध नाहींसा करून, सर्वत्र एकसूत्रीपणा, सलोखा, प्रेम, आणि शांति प्रस्थापित करण्याकरितां, नवविधानरूपाने एक दिव्य संदेश ईश्वराने पाठविला आहे. त्याचा सर्वांनीं स्वीकार करावा, आणि आपसांतील भेदभाव विसरून चारी खंडातील लोकानी ईश्वराचे जनकत्व आणि अखिल मानवजातींचे बंधुत्व ह्याचा जयजयकार करावा" मोठ्या गंभीर व डौलदार भाषेत हा जाहीरनामा प्रसिद्ध झाला खरा! पण अशा सार्वत्रिक धर्माच्या एकछत्राखाली नांदण्यास जग अद्याप तयार नव्हते. अथवा सर्वांस मानवेल व सर्वांचा संग्रह करील, असा व्यापक व तेजस्वी धर्म संस्थापित करण्याचा ईश्वरतुल्य अधिकार केशवचंद्र सेनाच्या ठायी असणे शक्य नव्हते. ह्यामुळे ह्या जाहीरनाम्याचा आत्मविश्वासाच्या प्रदर्शनापलीकडे काहीच उपयोग झाला नाही. उलट आपल्या नवविधानास सार्वत्रिक स्वरूप आणण्यासाठीं केशवचंद्राची जी उपाययोजना सुरू होती, ती कित्येकांस विसंगत वाटण्यासारखी होती. उदाहरणार्थ, सन १८८३च्या पहिल्या जानेवारीरूच कित्येक जुने विद्वान पंडित व महामहोपाध्याय ह्याच्या सहकारितेने "वेदिक स्कूल" ह्या नांवाची सस्था वेदविद्येचे अभ्यासाकरितां त्यांनीं स्थापन केली. आणि त्याच महिन्याच्या विसावे तारखेस "आशिया खंडाचा युरोप खंडास संदेश" ह्या मथळ्याखालीं कलकत्त्याच्या नगरभुवनांत व्याख्यान दिले, त्यांत खालीलप्रमाणें विचार होते:—"नवविधान ही संस्था खिस्तीधर्माची विरोधी नाहीं, इतकेच नव्हे तर एशिआटिक व युरोपिअन धर्मांचें व चारित्र्याचे एकीकरण करण्याच्या कामी नवविधान ही संस्थाही येशू खिस्ताचे पावलांत पाऊल टाकून चालणार आहे. जो खिस्ती नाहीं असा एखादाही चांगला अगर दैवी प्रकार जगांत असेल काय? जगांत सत्य, युक्त व निष्ठावंत असे

जें कांहीं असेल ते एक खिस्ताचें आहे. जगांत एकच सत्य, एकच प्रेम, आणि एकच पावित्र्य असूं शकेल, आणि ते ईश्वराचें, अर्थात् खिस्ताचे होय. नवविधानाच्या केंद्रस्थानीं जीझस खाइस्ट आहे. आणि सर्व जगाने त्यापुढे नमावे, असाच त्या ईशपुत्राचा अधिकार आहे.'' असो. असा परोपरीने खिस्ती धर्माचा गौरव करूनच ते थांबले नाहींत, तर त्यापुढे ते आपल्याला 'येशुदास' असे अभिमानपुरःसर म्हणवूं लागले.

केशवचंद्रांच्या धर्ममतात नाविन्यादि गुण अथवा सकरादि दोष असोत वा नसोत; लोकसंग्रहासाठीं त्यांची साऱ्या आयुष्यभर एकसारखी अविश्रांत खटपट सुरू होती, ही गोष्ट कोणीही कबूल करील. अखेर अखेर लोकमताच्या प्रतिकूल वाऱ्याबरोबर झुजताना त्यांच्या मनावर व शरीरावर बराच ताण पडला व त्यांची प्रकृति वारवार बिघडूं लागली. शरीरस्वास्थ्याची परवा न करतां त्यांनीं आपले उद्योग अव्याहत सुरूच ठेविले होते. त्यांच्या आवडत्या संस्थेचे वार्षिकोत्सव व त्यांतील विविध कार्यक्रम, ह्यांतील उत्साह त्यांनीं अखेरपर्यंत ढळूं दिला नाही. उलटपक्षीं दरखेपेस ते पूर्वींचे कार्यक्रमांत कांहीं तरी नवीन गोष्टींची भरच घालीत असत. आपल्या संप्रदायाचें तेज चढण्याकरितां वैराग्य, बंधुभाव, परोपकार व पावित्र्य अशा अनेक सुव्रतांच्या शपथा ते आपल्या सहकारी मित्रांस घेण्यास लावीत. त्यांनीं आपल्या नवविधानातील सदाचाराचे एक धर्मशास्त्र नवसंहिता नामक तयार केले. त्यांत त्यानी प्रत्येक गृहस्थाचे गृह कसें असावें; घरांत स्वच्छता व व्यवस्था कशी ठेवावी, उठल्यापासून प्रत्येक गृहस्थानें आपलें गृहकृत्य कसे टापटिपेने व काय भावनेनें करावें· हे सांगितले असून, स्नान-भोजनादि नित्य साध्या कर्मांतही वर लिहिल्याप्रमाणे शुचिभावना ठेवावी; ईश्वराची प्रार्थना रोज तीच तीच न करितां नवीन शब्दांत करावी; व आपल्या प्रार्थनेस ईश्वराकडून उलट जाब मिळेपर्यंत थांबावें; नुसती प्रार्थना करून उठूं नये; जातकर्म, नामकरण, दीक्षा, विवाह, अंत्येष्टी व श्राद्ध, हे संस्कार कसे करावे; तसेच आत्मसंयमन, ब्रह्मचर्य, वैधव्यपरिपालन, प्रचारकधर्म, भक्ति, विरक्ति इत्यादि व्रतांच्या शपथा कशा घ्याव्या; वगैरे अनेक नीतिपर व धर्मपर असे नियम त्यांत सांगितले आहेत. विस्तारभयास्तव ते येथे देतां येत नाहींत. सामान्यतः ते बहुतेकांस ठाऊक असतील असेच असल्यामुळें, सुज्ञ वाचकांस त्यासंबधीं

विशेष सांगावयास नको. तथापि त्यांपैकीं कांहींचे वर्णन पुढे एका स्वतंत्र प्रकरणांत केलें आहे.

ह्याशिवाय त्यांनीं योगावर एक लहानसा ग्रंथ लिहिला. त्यातील विचाराची मांडणी कांहींशी नवीन दिसते. ती अशीः—" ईशचिंतन म्हणजे योग अशी त्यांची व्याख्या आहे. जन्मास आलेला जीवात्मा पापात्मक स्थितीत परमात्म्यापासून दूर राहतो. त्याची भेट होणे किंबहुना त्याचे ऐक्य घडवून आणणे व ते अनुभवणे ह्यातच हिंदूंच्या योगाचे रहस्य आहे. योग हे एक आध्यात्मिक ऐक्य आहे. योग म्हणजे एकत्वात द्वैताची जाणीव होय. वैदिककाळचे साधक हा योग बाह्य दृश्याशीं करीत असत. नानाविध सृष्ट चमत्काराचे व सौंदर्याचे मागे ईशतत्त्व आहे. किंबहुना सृष्टीतील विविधशक्तिच ईश्वररूप आहेत, अशी त्यांच्या मनाची धारणा असे. पुढे वेदान्ताचे युगात जीवात्म्यातच ईशस्वरूपाचे चिंतन करणे, असा योगाचा प्रकार बदलून गेला. आणि त्यानंतरच्या पौराणिक काळात जगाच्या इतिहासाचे संक्रमणांत अथवा व्यवस्थितींत ईशस्वरूपाचे अथवा ईशशक्तीचें चिंतन करण्याचा प्रघात सुरु झाला. ह्यासच भक्तियोग म्हणतात. तात्पर्य, वेदांतील ईशचिंतन काव्यमय आहे, वेदान्तातील स्वत्वप्रधान आहे, आणि पुराणांतील प्रेममय आहे. अशा रीतीने आपल्याच ठिकाणीं निरनिराळ्या भावनेने ईशाची जी द्वैतात्मक प्रचीति त्यासच केशवचंद्र सेन योग असे म्हणतात. आणि त्यांची स्वतःची प्रवृत्ति जीवात्म्यांतच परमात्मा पाहणे, ह्या योगपद्धतीकडेच जास्त दिसून येते.

नवसंहिता व योगपद्धति हे केशवचंद्र सेनांच्या हातचे शेवटचेच महत्त्वाचे लेख होत. आपल्या संप्रदायात शिस्त व एकसूत्रीपणा राहण्यासाठीं त्यांनी नवसंहिता लिहिली. तथापि आपल्या अनुयायांत भेद माजविण्यास तीच कारण होईल, याचीही जाणीव त्यांस होती. यास्तव आपली नवसंहिता जरी ईशप्रेरणेप्रमाणेच लिहिली आहे, तरी त्यांतील वाच्यार्थाने बाधले न जातां, लक्ष्यार्थ मात्र संमतिदर्शक पहावा, अशी सूचना त्यांनीं आपल्या सांप्रदायिकांस दिली होती.

असो. अशा रीतीने आपले जीवितकार्य संपवून शेवटीं झाल्या गोष्टींचा आढावा काढण्याकरितां ब्राह्मसमाजांतील आपल्या कारकीर्दीचा अहवाल त्यांनीं आपला भाऊ जयकृष्ण सेन ह्यास लिहिण्यास सांगितला. त्या वेळी

केशवचंद्र सेन अत्यवस्थ स्थितींत होते, बोलण्याचेही त्यांस सामर्थ्य नव्हतें. तरीही त्या अहवालांत आपले 'दोष व आपले अपयश' ह्यासाठीं एक स्वतंत्र प्रकरण त्यांनीं लिहिण्यास सांगून तत्संबंधीं मुद्दे त्यानीं स्वहस्तानें टिपून दिले.

दिवसां घडलेल्या चुकांबद्दल पश्चात्तापपूर्वक प्रार्थना करणे हा ज्यांचा रोज निजतांचा दिनक्रम असे, त्यानी आपल्या महानिद्रेचे समयी साऱ्या आयुष्यांतील चुकांची हजेरी घेतली असावी, हे उघड आहे. मरणापूर्वी थोडे दिवस अगोदर त्यांनी मंदिरांत केलेल्या प्रार्थनेत औदासीन्याची छटा बरीच दिसून येते. त्यानीं असे उद्गार काढले की, "हे नाथ! ह्या लोकीं क्षमा, शांति व प्रेम ह्यांचे सर्वत्र साम्राज्य नांदावे, म्हणून तुझ्या ह्या सेवकाने आपल्या आयुष्यभर निरनिराळ्या रीतीनें अविश्रांत परिश्रम केले; पण अखेर माझें जीवित व जीवितकार्य हीं अपयशीच ठरलीं काय? हे जगन्नाथा, यापुढे तरी माझ्या हातून कांहीं होण्याची आशा आहे काय? असल्यास अजूनही सांग, आणि तुझ्या आशीर्वचनाने मला सुखी कर."

प्रतिस्पर्धी समाज हे केशवचंद्राच्या मनात एक कायमचेच शल्य रुतलेले होते. त्यातही त्यांच्या स्वताच्या समाजस्थितीचे सूक्ष्म निरीक्षण करीत असतांही असमाधानकारकच परिस्थिति त्यास आढळून आली. त्यांनी आपल्या अनुयायांस अंतःशुद्धीचे व शिस्तीचे धडे एकावर एक देण्यांत इतकी घाई केली की, ते पचनीं पाडण्यास कोणासच पुरेसा अवसर मिळाला नाहीं. केशवचंद्राच्या वैराग्याच्या दीक्षेने त्यांच्या पट्टशिष्य मंडळीच्या आचरणांत यक्षिणीच्या कांडीप्रमाणे स्थित्यंतर घडवून आणले. परंतु त्यांच्या मनावरील षड्विकारांची भीड त्यामुळे मुळीच कमी झाली नाहीं. मिटलेल्या डोळ्यांनी-ही मोह सोडला नाहीं, निर्विकार परमात्म्याचे चिंतन करणारे मन क्षुद्र वासनांनीं लडबडलेलेच होते, वैराग्याच्या राखेखालीं सांप्रदायिक मत्सराचे निखारे धुमसतच होते. रणवाद्यांनी जागृत केलेली वीरवृत्ति एरव्हीं हांकेस जाब देईना. कृत्रिम उत्साहभरांत उद्दीपित झालेल्या ज्या भावना क्वचित् साक्षात् ईश्वराशीं बातचिजा करूं शकत त्या, उत्साहाचे भूत गाडले जातांच, अगदीं निश्चेष्ट झाल्या. आचार्यांच्या शब्दाचा आधार मिळतांच शिष्यांचे अनन्यगति-कत्व गेले. मग अशुद्ध चित्ताने केलेल्या प्रार्थनांस ईश्वराकडून जाब येणें अशक्यच झाले. आपण लावलेली जोमदार रोप्यांची बाग शेवटीं खुरटलेली व

किडलेली पाहून बागवानाचा जसा विरस व्हावा, तशी केशवचंद्रांच्या मनाची स्थिति झाली. जीवनाच्या अभावाप्रमाणें खतांचा वरचेवर चेप केल्यानेंही, बागेचा नाश होतो, हा कटु अनुभव त्यांस येऊन चुकला तसेंच चारी खंडांतील लोकांस आपल्या निशाणाखालीं आणण्याची ज्या पुरुषानें महत्त्वाकांक्षा धरली, त्यास अखेर आपल्या समाजाचेही सीमोल्लंघन करून शेजारच्या साधारण-ब्राह्मांच्या शीवेत आपले प्रेमाचें निशाण नेतां आले नाही. ही गोष्ट त्यांच्या मनास जाचूं लागली. आणि ह्यामुळेच, इतकेंही करून मी शेवटीं अपयशीच ठरलों काय, हे उद्वेगजनक उद्गार त्यांच्या तोंडून निघाले.

असो. ह्याप्रमाणे निराशेने त्यांच्या मनाच्या नाड्या आंखडल्या असतांही पुढील वार्षिक उत्सवांत 'आनंद बाजारा'ची ( Fancy Bazar ) आपण नवीन टूम काढूं, अशी त्यांच्या मनाची धाव सुरूच होती. शरीराच्या नाड्या आंखडत चालल्या, तरी माझें नव-देवालय तावडतोब उभारून त्याचा अनावरणसभारंभ माझ्या हातून होऊं द्या, असा त्यांचा अट्टाहास सुरूच होता. विझणारा दिवा विझतां विझतां एकदां मोठा व्हावा, असाच हा प्रकार होता !

मोठ्या धामधुमीनें केशवचंद्रांच्या नव्या देवालयाचे काम त्यांच्या अनुयायांनी हातीं घेतले. नवंबर महिन्यांत सर्व अनुयायांनी आपल्या हातांनी पाया घालण्याचा मुहूर्त केला. केशवचंद्र तशा आसन्नमरण स्थितींत असतांही खिडकीशीं आपला बिछाना नेऊन तेथून नजरेनें देखरेख ठेवीतच होते. आतां त्यांच्यांत कांहींच त्राण राहिलें नव्हतें. अशा स्थितींत त्याची अखेरची भेट घेण्याकरितां भगवान् रामकृष्ण परमहंस एक दिवस त्यांच्या घरीं आले. ती हकीगत पुढील-प्रकरणीं सांगूं.

---

## प्रकरण नववें

# श्रीरामकृष्णांची शेवटची भेट व अखेर

केशवचंद्र सेन याच्या अतकाळीं त्यांस अनेक मंडळी भेटावयास आली; परंतु त्यांत प्रमुखत्वाने तीन व्यक्तींचा विशेष उल्लेख आढळतो. त्या तीन व्यक्ती म्हणजे कलकत्त्याचे लॉर्ड बिशप, महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर आणि श्रीरामकृष्ण देव ह्या होत. ह्या तिन्ही व्यक्तींचा व केशवचंद्र यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध होता. केशवचद्र सेन आपल्याला स्वयंसिद्ध मानोत, परंतु ज्यांस धर्म कशाशी खातात, ह्याचा पूर्वी गंध नव्हता, त्याच्या ठिकाणी धर्मविचार जागृत होऊन त्यांस निरनिराळे वळण लागण्यास प्रथम खिस्ती मिशनरी, नंतर ब्राह्मपुढारी, व अखेर श्रीरामकृष्ण देव हे विशेष कारण झाले ह्यांत शंका नाही. केशव-चंद्रांस देवेंद्रनाथ वडिलांच्या ठिकाणी, खिस्ती मिशनरी पंतोजींच्या ठिकाणी आणि श्रीरामकृष्ण सद्गुरूच्या ठिकाणी होते, असे म्हणणे गैरवाजवी होणार नाही. देवेंद्रनाथांस ते 'फादर' (बाबा) ह्या शब्दांनींच संबोधीत असत. परंतु त्यापूर्वीच क्लेअर आणि चामर ह्यांच्या उपदेशांनी आणि रे० बर्न्स, रे०लॉग आणि रे०डॉल ह्या प्रसिद्ध खिस्ती मिशनऱ्यांच्या दृढ संगतीने त्यांच्या मनावर संस्कार केले होते. उपनयनांतील आद्यगुरूंच्या पूर्वींच शाळापतोजी-कडे गुरुत्व जावे तसे हे झाले. त्यामुळें प्रथम सस्कारांनी त्यांच्या गाडीची चकार जी एकदां खिस्ती मार्गावर पडली, ती मागूनच्या ब्राह्मसंस्कारांत देवेंद्रनाथांसही मोडतां आली नाहीं. श्रीरामकृष्णाच्या सहवासाने ती केशवचंद्र ह्या व्यक्तीपुरती बरीच बुजली गेली खरी, परंतु ह्या एंजिनाच्या मागे असलेले नवविधानाचे सर्व डब्बे पूर्वींच्या रुळांवर जे एकदां चढले, ते त्याच मार्गाने एंजिनाच्या मागे धावत येऊन प्रसंगीं एंजिनासही त्याच मार्गाने जाण्यास धक्का देत होते. अशा स्थितींत केशवचंद्रांचा नवविधानसमाज म्हणजे केशवचंद्र नव्हे, आणि केशवचंद्रांचे बाह्य स्वरूप तेच त्यांचें अंतरंग नव्हे, असा वास्तविक प्रकार झाला होता. एकांतांत अथवा श्रीरामकृष्णांजवळ आले असतांना, अफूची चटक लागलेल्या मोराप्रमाणे नमलेली केशवचंद्रांची मनोवृत्ति, ते



८५ श्रीरामकृष्ण परमहंस

आपल्या प्रभावळींत असतांना त्यांची निरंकुश मतंगजाप्रमाणे उद्दाम दिसणारी महत्त्वाकांक्षा आणि मोठ्या आर्यांग्लसमुदायापुढे जाहीर व्याख्याने देत असतां भर उत्साहाच्या गजरांत त्यांच्या कल्पनावारूची सर्कशीच्या घोड्या-प्रमाणे होत असलेली दौड, ह्या भिन्न असत. ह्यामुळे ते मनानें श्रीराम-कृष्णांचे जवळजवळ चेले बनले असले, तरी ब्राह्मपंथाकरितां नवसंहिता लिहीत असतां, त्यांना ब्राह्मपंथाची विशिष्ट मतें सोडता अगर बदलतां आली नाहीत. तथापि व्यक्तिशः श्रीरामकृष्ण त्याच्या मनावर एकसारखे काय बिंब-वीत होते ह्याची वाचकास कल्पना येण्याकरिता त्याच्या अखेरच्या भेटीचा प्रसंग पुढे थोडा सविस्तर वर्णिला आहे.

भगवान् रामकृष्ण केशवचंद्र सेनांच्या शेवटल्या भेटीस गेले, तेव्हा केशव-चंद्र प्रथम आंत असल्यामुळे त्यांची भेट होण्यास थोडा उशीर झाला. राम-कृष्ण भेटीसाठीं अत्यंत उत्सुक झाले. त्याच स्थितीत त्यांची भावसमाधि लागली, आणि तशाच स्थितीत त्याच्या तोंडून एकामागून एक उद्गार निघाले. त्याचा सारांश असाः—

"ह्या कोच आणि खुर्च्यांचा पूर्वी उपयोग होता पण आता त्यांचा काय उपयोग?"

"आई, तूं येथे आलीस होय. अरे वा, किती सुंदर हा तुझा पोषाख! आई, बैस. तूं कशाला त्रास घेतेस?"

"देह आणि आत्मा. देहास जन्म आहे म्हणून शेवटही आहे. परंतु आत्मा अमर आहे. देह आणि आत्मा भिन्न आहेत. परंतु ज्यांस देव दिसला नाहीं त्यास देह व आत्मा एकच वाटणार. पोफळ कच्चे आहे, तों सुपारी सालाला डकलेली असते. ते एकदा पक्क झाले की सुपारी सुटली."

"जोपर्यंत मला माझ्या खऱ्या स्वरूपाचे ज्ञान झाले नाहीं, तोपर्यंत सत्ता-स्वरूपही, केशव, अमृता, प्रसन्न, अशा व्यक्तीचे व वस्तूंचे उपाधीमागे लपले जाते. वस्तुतः सर्व दृश्याचे मागे एकच परमात्मा आहे. तोच नानाविध-रूपाने नटला आहे. परमात्म्याची शक्ति निरनिराळया व्यक्तींत कमजास्त प्रमाणाने व्यक्त झाली आहे. विद्यासागर मला एकदां म्हणाले, 'ईश्वराने जी आपणांस शक्ति दिली आहे, ती कांहीस कमी व कांहीस जास्त दिली आहे काय? असा ईश्वर पक्षपाती आहे?' मीं उत्तर केले 'तसे नसतें तर

एक इसम दहांस नव्हे पन्नासांस भारी कसा निघता ? तसें जर नसतें तर आम्ही सर्वजण दक्षिणेश्वराहून इतके लांब तुमचे भेटीस कां येतो ? ईश्वराचे सृष्टींत वैषम्य आहेच. आणि त्यांत कांहीं खोल हेतु आहे. त्यावरून ईश्वर पक्षपाती आहे असे ठरत नाहीं. ईश्वराचा दैवी अंश ज्यांत अवतरतो, त्यांच्या ठायीं इतरांपेक्षां पुष्कळच जास्त शक्ति असते. एखाद्या श्रीमंताची राहाण्याची अनेक घरें असलीं, तरी त्याचा भेट घेण्याचा असा एखादा आवडता दिवाण-खाना असतोच. ज्या जीवात्म्याचे परमात्म्यावर उत्कट प्रेम असते, तेच त्याचे निवासस्थान होय. अशा जीवात्म्यास परमात्म्याकडून विशेष प्रकारच्या शक्ति मिळतात'."

"ब्रह्म आणि ब्रह्माची आद्यशक्ति हीं एकच. तीं उभयतां सापेक्ष आहेत. हिऱ्याची चमक हिऱ्यावांचून लक्षांत येत नाहीं. तसेंच उलटपक्षीं हिरा आपली चमक सोडून दिसणार नाहीं."

"साक्षात्कारानंतर ईशप्रेम जितकें दृढ होत जाईल, तितकें सर्व वस्तुजातात ईशदर्शन होणे सुलभ होत जाईल. नदीला पूर येऊन सर्व जलमय झाले नाही, तोपर्यंतच नदीच्या वांकड्यातिकड्या प्रवाहांतून जाणे भाग आहे. एकदां सर्वच जलमय झालें, मग काय, वाटेल तिकडून थेट सरळ समुद्राकडे जावे. एकदां पीक कापले म्हणजे मग वांकड्यातिकड्या पायवाटेने जावयास नको. मोकळ्या शेतांतून वाटेल तसे सरळ जावे. एकदां आत्मसाक्षात्कार झाला, म्हणजे मग ईश्वराचे रूप कोठेही व्यक्त होते. विशेषेकरून ज्यांनी कामिनी- कांचनाचा त्याग केला आहे. व जगांतील क्षुद्र वस्तूंवरून ज्यांचे लक्ष उडून परमेश्वराकडे लागले आहे, अशा शुचि जीवात्म्यांच्या ठिकाणीं त्यांस ईशदर्शन होते."

"परब्रह्म आणि माया हीं एकच. ब्रह्म निष्क्रिय, अव्यक्त असले म्हणजे त्यास पुरुष म्हणतात. तेच व्यक्त व सक्रिय झालें की त्यास प्रकृति म्हणतात. बापाने सर्व प्रपचकार्य आईकडे सोपवावे तसेंच हें आहे. आईची सत्ता तिला बापाकडूनच मिळालेली असते. आई आणि बाप हीं सापेक्ष आहेत. बाप म्हटला कीं तेथे आईची कल्पना आलीच. प्रकाश-अंधकार, सुख आणि दुःख, अशींच हीं द्वंद्वे आहेत- हें तुला कळले काय ?"

केशवचंद्रः—( हंसत ) होय महाराज.

श्रीरामकृष्णः—मी आई म्हणतो तीच जगद्धात्री. ती आपल्या लेकरांचें

पालनपोषण करते. जगांत कसे रहावे आणि सत्यज्ञान संपादन करून मुक्त कसे व्हावें, हे तीच शिकविते. मूल आपल्या आईपासून दूर कसे राहूं शकेल? त्याला कांहींच कळत नाही, पण त्याच्या आईला सर्व कळत असतें. आई भरवील ते खावे व खुशाल खेळावें इतकेंच त्याला माहीत. त्याची सर्व काळजी त्यानें आईवर टाकलेली असते.

केशवचंद्रः—हे अगदीं खरे आहे, महाराज.

भगवान् रामकृष्ण ह्या वेळीं समाधींतून उत्थान पावले होते. परंतु केशवचंद्रांस 'तुमचे कसे काय आहे' वगैरे व्यावहारिक कुशल प्रश्न न विचारता त्यांनी आपला अध्यात्मविषयच पुढे चालविला. ते म्हणाले:—"तुमची ब्राह्मसमाजी मंडळी परमेश्वरानें निर्माण केलेल्या सृष्ट पदार्थांचेच एवढे वर्णन करीत काय बसतात?" "हे प्रभु, तूं हा सविता निर्माण केलास तसेच चंद्र आणि हे तारेही तूंच निर्माण केलेस." अशा ह्या सृष्टपदार्थांचेच तुम्ही एवढे स्तोम काय माजविता? बागेतील सुंदर फुलांचे गुच्छ व त्यांचा सुटलेला मधुर सुगंध इत्यादि बागेच्या भपक्यांतच गुंग होणारे पुष्कळ. पण ह्या बागेचा धनी कोण, त्याची भेट घेण्याचें क्वचितच कोणी मनांत आणतो? त्या दोहोंत मोठे कोण, बाग कीं बागेचा धनी? जोपर्यंत मृत्यूने आपणास सोडलें नाही. तोपर्यंत ही सारी बाग खरोखर विनाशीच आहे. बागेचा स्वामीच काय तो सद्रूप आहे.

एकदां गुत्त्यांत जाऊन दारूचे दोनचार पेले झोकून दिले, म्हणजे मग तेथे पिंपांत विक्रीकरितां दारू किती टन शिल्लक आहे, ह्याची उठाठेव करण्याची कोणास जरूर? एकस्त्या जीवाने एक बाटली ठोकली की बस्स!

मी नरेंद्राला पाहिलें की, आनंदानें मला भरतें येतें. "मग तुझा बाप कोण? तुझी घरें किती!" हीं मीं कधींच विचारपूस केली नाहीं.

मनुष्याला आपली चीजवस्त, पैसा-अडका, घरदार ह्यांची किंमत असते, म्हणून त्याला वाटते की, ईश्वरालाही त्याने निर्माण केलेल्या सूर्य-चंद्रादि सृष्ट पदार्थांबद्दल तसेंच वाटत असेल. तेव्हां आपण ईश्वरानें केलेल्या पदार्थांची स्तुति केली, तर ईश्वर त्याने खूष होईल.

शंभू मलीक मला एकदां म्हणाला, "महाराज, माझी सर्व संपत्ति मी मरतांना कालीमातेच्या चरणांवर अर्पण करीन असा मला आशीर्वाद द्या."

मीं उत्तर केले. "तूं म्हणतोस तरी काय? अरे, तुला ही सारी संपत्ति! जगदंबेला त्याची किंमत तुझ्या पायाखालच्या धुळीहून कांही अधिक नाही!"

एकदा एका विष्णुमंदिरांतील देवाच्या अंगावरील दागिने चोरीस गेले. तेव्हा मथुर म्हणाला, "देवा, तुझ्यांत कांहीच अर्थ नाही. तुझ्या अंगावरचे जवाहीर चोरून नेले, तरी तुला काहीच करतां आले नाही?" ते ऐकून मीच रागाने म्हणालो," अरे, तू काय हे मूर्खासारखे बोलत आहेस ह्या मूर्तीत तूं ज्या भगवताची पूजा करतोस, त्या जगन्नाथाला तुझे ते जवाहीर आणि मातीचे ढेकूळ सारखेच! बाबारे, लक्षांत ठेव की, साक्षात् लक्ष्मीचे सारे ऐश्वर्य त्याचेकडूनच तिला मिळाले आहे." त्यास संपत्तीची काय किंमत आहे? त्यास कांही किंमत असेल तर ती प्रेम, विवेक आणि वैराग्य ह्यांचीच. प्रत्येकाच्या प्रकृत्यनुसार त्याची ईश्वरासंबंधी कल्पना असते. एखादा तमोगुणी मासाहारी मनुष्य देवासाठी पशुयज्ञ करतो, दुसरा एखादा रजोगुणी त्याच्या आवडीचे अनेक पदार्थ ईश्वरास अर्पण करतो, तर तिसऱ्या एखाद्या सत्त्वगुणी पुरुषास आपल्या पूजेचे स्तोम जगास दाखवावे असे वाटत नाही, तो शुद्ध गंगाजळ व बिल्व-पत्राने देवाची पूजा करतो. साधा दूधभात आणि साखर ह्यांचाच नैवेद्य दाखवितो. ह्याशिवाय आणखीही एक गुणातीत भक्ताचा वर्ग आहे. ते बालकाप्रमाणे असतात. त्रिगुणात्मक काया आणि मन ह्यात त्यांचा आत्मा गुंतलेला नसतो. भक्तिभावाने देवाचे नाव घेणे हीच त्यांची पूजा, होय. नांवाशिवाय दुसरे तिसरे ते कांही जाणत नाहीत. पुढे भगवान् केशवचंद्रास उद्देशून हसत म्हणतात:—

"तुम्ही आजारी पडला आहाना. ह्यांत फार खोल अर्थ आहे. तुमच्या देहांत ईशप्राप्तीसंबंधी उत्कट भक्तिभावाच्या कित्येक ऊर्मी आजवर येऊन गेल्या असतील. तुमचें हे दुखणें त्यांचीच साक्ष देत आहे. अशा उत्कट भावनांनीं शरीर-प्रकृतीचा कसा चुरा होतो, याची त्या वेळीं कल्पना नसते. परंतु वास्तविक त्यांनीच उडविलेल्या खळबळीने तुमची तनु जर्जर करून टाकली आहे. एखाद्या झोपड्यांत शिरलेला मस्त हत्ती ज्याप्रमाणे ते झोपडे हादरून मोडून टाकतो, तसा भक्तांच्या अंतःकरणांत ईश्वरासंबंधीं उत्कट भाव एकदां जागृत झाला, की तो हे मर्त्य शरीर जीर्ण करून टाकतो....आग लागली म्हणजे प्रथम घरांतील कांही वस्तु पेट घेतात व अखेर साऱ्या घराची

राखरांगोळी होते. त्याचप्रमाणें त्या परमपुरुषाच्या प्रेमज्योतीचा एकदां चटका लागला, की प्रथम कामक्रोधादि षड्विकार नंतर ( पाठीच्या कण्याप्रमाणें ) खडा अहंकार आणि अखेर सारे जड शरीर नाश पावते.......देवाच्या रुग्णालयांत तुम्ही आपले नांव दाखल करून चुकलां आहांत. आतां तुम्हांला पुरे बरे केल्यावांचून त्यांची सोडचिठी मिळणार नाही.

मागे तुम्ही आजारी पडलां होता, तेव्हां मी मोठ्या पहांटे उठून जगदंबेची प्रार्थना करीत असे की. "आई गे, ह्या केशवाचे जर कमजास्त झाले तर कलकत्त्यास आल्यावर मी तुझ्याविषयी कोणाजवळ बोलत बसू ? त्या वेळी तुम्हांस बरे वाटावे म्हणून मी आईला नारळसाखर देईन, असा नवस केला होता."

"सर्व कांही आईच करीत असते. परंतु आज आहे आणि उद्या नाही असा हा मर्त्य जीव फुकाचा कर्तृत्वाचा अभिमान बाळगीत असतो." भगवान् रामकृष्णांचे तोंडून असे गंभीर व उद्‌बोधक विचार बाहेर पडत असता, केशवचंद्रांच्या आईने त्यांस नमस्कार केला, व केशवचंद्रास आरोग्य प्राप्त व्हावे, म्हणून आशीर्वाद मागण्याकरितां त्यांची प्रार्थना केली. तेव्हां रामकृष्ण म्हणाले:—"आईजवळ ती विद्या मी शिकलो नाही. मी आईजवळ एक भक्ति काय ती मागितली. दुसरे कांही नाही. तुम्ही त्या जगदंबेचीच प्रार्थना करा." असे सांगून व केशवचंद्रांचा फार गौरव करून भगवान् रामकृष्ण निघून गेले. शेवटी खोलीत मुलामाणसांच्या घोळक्यांत पडून राहू नकोस. त्याने ईश्वराचे विस्मरण होऊन अविद्यासागरांत बुडून जाशील. ह्यापेक्षा मित्रमंडळींत देवाच्या गोष्टी ऐकत पडून रहा, असे ते जातांना त्यांस बजावून गेले.

ह्यानंतर एक दिवस महर्षि देवेंद्रनाथ त्यांच्या परमप्रिय अशा ब्रह्मानंदांच्या भेटीस गेले. देवेंद्रनाथ भेटीस येतांच केशवचंद्रांनी त्यांच्या पायावर डोई ठेवली. व त्यांचा हात आशीर्वादासाठीं बळेच आपल्या मस्तकावर ठेवला. देवेंद्रनाथांस त्यांची ती अत्यवस्थ स्थिति पाहून अत्यंत गहींवर आला. त्यांनी त्यांस प्रेमाने मिठी मारली व सद्गदित कंठाने ते म्हणाले, "ईश्वराची काय विचित्र लीला आहे ती पहा, मी अद्याप धट्टाकट्टा असतां तुमची मात्र ही दशा व्हावी !"

असो. अशा रीतीने आप्तइष्ट व सुहृद् यांच्या अखेरच्या भेटी होत असतां, तिकडे आनंदबाजाराची व नवदेवालयाची तयारी झपाट्याने सुरूच होती.

असें होतां होतां सन १८८४ चे नवीन वर्ष उगवलें. शेवटीं त्या खिस्ती पाडव्याचे दिवशीं नवदेवालय उघडण्याचा त्यांनीं आपला हट्ट पुरा केला. मंडळींनीं त्यास खुर्चीत घालून ती खुर्ची नवदेवालयांतील संगमरवरी पीठावर नेऊन ठेवली. अत्यवस्थ स्थितींत त्यांस तेथें आणलेलें पाहून समारंभास आलेल्या सर्व मंडळीस मोठें आश्चर्य वाटलें. केशवचंद्र सेनांनीं स्थानापन्न झाल्यावर, सच्चिदानंद हरे नमः, असें मंगल करून हात जोडून आपल्या शेवटच्या प्रार्थनेस अत्यंत खोल गेलेल्या आवाजांत सुरुवात केली. सर्व श्रोते त्यांचा प्रत्येक शब्द मोठ्या उत्कंठेने ऐकत होते. ते म्हणालेः—

" आई, तुझ्या ह्या देवालयांत आज मी आलो आहे. ही मंडळी मला येथे येऊं देईनात, पण मी कसेंही करून शेवटी आलोच. माते, तुझें येथेंच वास्तव्य आहे........ माझे वृंदावन आणि काशी हीच. माझी मक्काही हीच. आणि माझें जेरूसलेम पण हेंच......माझी आई हेंच माझें आरोग्य, आणि माझें ऐश्वर्यही तेंच. माझी शांति आणि शोभा, माझें जीवन आणि अमृतत्व सर्व कांहीं आईच! रोगानें अत्यंत जर्जर झालेला असा मी माझ्या आईच्या सान्निध्यांत आज सुखी झालो आहे! माझे प्रिय बंधु हो, तुम्हीही ह्या माझ्या आईची सेवा करून सुखी होणार नाहीं काय ?"

केशवचंद्रांची आपल्या नवदेवालयांतील हीच पहिली व शेवटची प्रार्थना होय. श्रोत्यांच्या मनांस अखेरचा चटका लावणाऱ्या प्रार्थनेनें केशवचंद्रांच्या रोगजर्जर झालेल्या कुडीस जबर धक्का दिला. दुखण्याने अखेरचें रूप घेतलें. सर्वांचे तोंडचे पाणी पळालें. स्त्रियांच्या कोमल चित्ताची दुःखानें कालवाकालव केली. त्या प्रेमानें वेड्या होऊन त्यांस वरचेवर विचारपूस करूं लागल्या. "मी आतां तुम्हांला जास्त काय सांगूं ? बोलावेंच तर त्या वैकुंठावांचून मला कांहींच सुचत नाहीं. आणि ते बोलूं लागलो तर तुम्हीं मोहानें अधिकच आक्रोश कराल!" असें त्यांनीं म्हणावें. तुमच्या मंडळीची तुम्हांस कांहीं व्यवस्था करावयाची आहे काय ? असें कोणीं विचारल्यास, "तीं ज्याच्या घरचीं माणसे आहेत, तो विश्वंभर त्यांची व्यवस्था लावील." असे त्यांनीं म्हणावें. मूत्रकृच्छ्राच्या वेदनांनीं मात्र त्यांस अत्यंत व्याकुल करून सोडलें. "बाबा" आणि "मा" अशा शब्दांनीं जगाचा जो आईबाप त्यास ते एकसारखे आळवूं लागले! आपल्या वृद्ध मातेच्या अंगावर अंग टाकून त्यांनीं

म्हणावे, "आई, माझ्या ह्या असह्य वेदना कशानेच बऱ्या होणार नाहीत का?" त्यावर त्या अभागी आईने आपल्या दिव्य मुलास पोटाशीं घेऊन हुंदके देत म्हणावे की, "बाळा, तुझ्यासारख्या पुण्यवंताला जे हे दुःख भोगावे लागतें, तें आमचे पाप आहे!" त्यावर केशवचंद्रानी दुःखी होऊन म्हणावे, "माझे लाडके आई, तूं असे म्हणूं नकोस ग! तूं असे कसे म्हणतेस! तुझ्यासारखी आई दुसरी कोठे दिसेल काय? मजमध्ये जे गुण असतील ते तुझेच नाहींत का? मला वाटते माझ्या कल्याणाकरिताच आई जगदंबा मला हे काय-क्लेश देत आहे." असो, असे हृदयद्रावक अनेक तुटक संवाद होत होते. एकीकडे बाबू त्रैलोक्यनाथ बायबलातील प्रसंगोचित गीत गात होते. दुसरे अनुयायी अष्टोत्तर नाममंत्राचा पाठ करीत होते. अशा समयीं तारीख ८ जानेवारी १८८४ रोजी तो अत्यंत प्रभावशाली धर्म-संस्थापक अखेरची वेळ आली, तेव्हां इहलोक सोडून चालता झाला! त्या-वेळच्या, त्याची बायको व आई यांच्या विलापाने सर्वांची अंतःकरणे विदारून गेलीं! "माझ्या ह्या दिव्य पतीची खरी ओळख ते असताना ह्या अभागिणीला पटली नाही. आतां मी काय करूं?" असे म्हणून त्याची पत्नी देवी जगत्मोहिनी त्यांच्या शवास बिलगून रडूं लागली. "बाळा, तूं सामान्य मनुष्य नसून साक्षात् महादेव मला दिसतो आहेस" असा त्यांची वृद्ध व परमवंद्यमाता देवी शारदासुंदरी शोक करूं लागली! ह्या त्यांच्या दुखोद्गारांत दुसऱ्या हजारो लोकांच्या दुःखाचे दिग्दर्शन होत होते! असे म्हणणे गैर होणार नाहीं.

---

## प्रकरण दहावें

# जीवन-रहस्य

केशवचंद्र सेनाच्या चरित्रातील रहस्य त्यांनी आपल्या जीवनवेद नामक आत्मचरित्रपर लेखांत लिहून ठेविले आहे. आपल्या एका प्रार्थनेत केशवचंद्र म्हणतात की, माझे जीवन हे एक सुंदर व सचित्र बायबलच आहे. जों जों मी त्याचें अवलोकन करतों, तों तों मला समाधान वाटतें. या माझ्या बहुमोल जीवनग्रंथाबद्दल ईश्वरा, मी तुझा फार आभारी आहे. मोठमोठ्या धर्मात्म्यांच्या चारित्र्याचा आरंभ वैराग्यातच झालेला आढळतो. धर्मबीज रुजण्यापूर्वी मनोभूमिका अगोदर भाजून निघावी लागते. केशवचंद्राचे तसेंच झालें. ज्या भूमिकेवर पुढे विश्वकर्म्यानें त्यांचे चित्र घवघवीत रंगांत रंगविलें, ती भूमिका मळकटच होती. स्मशानभूमीत उगवलेल्या वेलीप्रमाणे त्यांची अंतःकरणवृत्ति तरुणपणापासूनच करपून गेलेली होती सर्व जगच त्यांना अरण्याप्रमाणे भयाण दिसूं लागल्यामुळे, त्यांना वेगळा वनवास पत्करावा लागला नाहीं. त्यांच्या खुद्द घरचीच मंडळी त्यास वन्य श्वापदांप्रमाणे क्रूर व घातक दिसूं लागली, मन उदास किंबहुना भीतिग्रस्त झालें. आणि जीवास सुख व शांतीच्या लाभाकरिता तळमळ लागून राहिली. अशा स्थितीत मन साहजिकच ईश्वराशी सन्मुख झाले, आणि आपल्या तरणोपायासाठीं ईश्वराची प्रार्थना करावी, पापक्षालनासाठीं ईश्वराची करुणा भाकावी, अशी त्यास आंतून स्फूर्ति झाली. मनाच्या असहाय स्थितींत "जीवा, शरणागत होऊन प्रार्थना करणें हाच तुझा धर्म आहे" अशी ईश्वरानेच त्यास स्फूर्ति दिली. वैराग्याच्या तापाने करपलेली त्यांची मनोवृत्ति ह्या स्फूर्तिजीवनानें पल्लवित झाली. आणि पुढे त्यांतूनच त्यांचा धर्मवृक्ष निर्माण झाला. वैराग्य आणि प्रार्थना हेंच त्यांच्या धर्माचें द्विदल बीज होय. त्यांनीं आपल्या अनुयायांस कडक वैराग्याची दीक्षा दिली, व त्यांच्या अंतःकरणावर प्रार्थनेचें महत्त्व ठसविलें. केवळ विधि म्हणूनच प्रार्थना करणें व्यर्थ आहे. प्रार्थनेस योग्य अशी अंतःकरणाची कोमल वृत्ति असली पाहिजे. तरच ईश्वराकडून

प्रार्थनेचें प्रत्युत्तर मिळतें. आणि असा जबाब मिळेल तरच ती प्रार्थना असें त्यांचे म्हणणे असे. आणि खरेंच आहे की, सवालास जबाब मिळेल. तरच ते तारायंत्र. बाकी कोणाचा कांही अनुभव असो. केशवचंद्र सेनांच्या व्यष्टि मनास ईश्वराच्या समष्टि मनाकडून प्रार्थनेस प्रत्युत्तरादाखल हटकून आदेश मिळत असत असे ते म्हणतात. आणि त्यांचा खाजगी व सार्वजनिक प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही ईशप्रेरणेनुसारच चालत असत. ही ईशप्रेरणा त्यांस कधी बाहेरून तर कधीं आतूनच स्फुरत असे. ज्ञानस्वरूप व्यापक परमात्म्याच्या ज्ञानवीचि चोहोंकडे निरंतर पसरलेल्याच आहेत. जीवानें आपलें अंतःकरण तितकें कोमल व सन्मुख केलें, तर त्याच्या प्रार्थनेस जाब मिळाल्यावाचून रहात नाहीं, असें त्याचें सांगणें असे

ह्या बाह्य प्रेरणेप्रमाणें अंतःप्रेरणेसंबंधीं त्याचें म्हणणें असें असे कीः-आंत एक जीवात्मा व त्यास प्रेरणा देणारा परमात्मा, अशा दोन पृथक् संवेदना ( संवित ) असतात. ह्यातील जीवात्म्याची कोणती व परमात्म्याची कोणती ? हे जाणून त्यातील ईश-प्रेरणेप्रमाणें वागणें, हे प्रत्येकाचें कर्तव्य आहे. सहज-स्फूर्ति आणि ईश्वराचा आदेश, हीं केशवचंद्रांच्या धर्मातील दोन मुख्य रहस्यें आहेत. हा ईश्वराचा आदेश, म्हणजे काही कर्णपिशाच नव्हे. ईश्वराचा आदेश म्हणजे मानवी भाषेत झालेली आकाशवाणी नव्हे. ईश्वराच्या आदेशास कोणतीही भाषा लागत नाही. आपला हेतु कळविण्यास त्यास कांही खाणाखुणाही कराव्या लागत नाहीत. निरनिराळी परिस्थिति उत्पन्न करून त्या योगें कर्तव्यजागृति करणें, किंवा प्रतिकूल परिस्थितींतही सूक्ष्म अंतःस्फूर्तीनें जीवास हितबुद्धि सुचविणें, असे ईश-प्रेरणेचे अनेक प्रकार असतात. किंबहुना ईशप्रेरणेची ज्ञानगंगा सदोदित अखंड वाहतच आहे. ज्यास आपले हित जाणून घ्यावयाचें असेल, त्या समित्पाणि जिज्ञासूनें आपले हात पुढे करून व जरा मान वांकवून आपली तहान भागवून घ्यावी. असें केशवचंद्रांच्या सांगण्यातील तात्पर्य दिसतें.

ह्याप्रमाणें आपल्या अंतरात असलेला शिवात्म्याचा अंश हाच आपला गुरु व आपली सदसद्विवेकबुद्धि हेंच आपलें शास्त्र असा त्याचा सिद्धान्त असल्यामुळे ते बाह्यशास्त्राची व गुरूची मर्यादा जुमानीत नसत. कोणाही पुरुषापुढें मी आपली मान वांकवणार नाही, कोणाही जीवास अगर शास्त्रास

मी आदर्शभूत मानणार नाहीं. असा केशवचंद्र सेनांचा बाणा होता. गुरु व शास्त्र यांच्या गुलामगिरीचा त्यांस अत्यंत तिरस्कार वाटे. प्रभु ख्राइस्ट व श्रीचैतन्य अशा धर्मात्म्यांबद्दल त्यास अत्यंत आदर वाटे. परंतु त्यांसही पूर्ण व अस्खलनशील अशा ईश्वराप्रमाणे अथवा सद्गुरूप्रमाणे कोणी मानूं नये, असा त्यांचा आग्रह असे. किंबहुना सद्गुरु हा शब्दच त्यांच्या धर्मकोशांत नव्हता त्यांचा नवविधान, हा वस्तुतः ईशप्रणीतच आहे, असा त्याचा जरी आत्मविश्वास होता. तरी वेद अगर दुसरे कोणतेही धर्मग्रंथ ईश्वरप्रणीत आणि अमोघ आहेत, असे मानण्यास ते तयार नव्हते. त्यांच्या मतस्वातंत्र्याची पहिली बंडखोरी ती हीच. केशवचंद्र व्यवहारात अत्यंत भेकड पण परमार्थात अत्यंत निर्भय व शूर होते.

आपल्या परंपरागत कुलगुरूंचा अवमान करणारे व आपल्या प्रेमादरास पात्र झालेले, येशूख्रिस्त व श्रीचैतन्य ह्यासही सद्गुरु म्हणून न लेखणारे केशवचंद्र, रस्त्यातील एखाद्या भणग भिकाऱ्यापासूनही एखादी गोष्ट शिकण्यास तयार होते. इतकेच काय पण स्थावर-जंगमात्मक ही अखिल सृष्टि हाच माझा धर्मशास्त्र-ग्रंथ आणि त्यातील एखादी गवताची काडी ही माझी शिक्षक, अशी त्यांची भावना असे. परंतु एखाद्या ऋषीने असे सांगितले किंवा शास्त्रांत तसे लिहिले, म्हणून ते मानण्यास ते मुळीच तयार नव्हते. कोणी कांहीं म्हणो, व कोठे कांहीं लिहिलेले असो, मला माझी सदसद्विवेक बुद्धि जे सांगेल तेच खरे, असा त्यांचा आग्रह असे व शिष्यांचे मनावरही ते हेच तत्त्व बिंबवीत. मी तुमचा गुरु नव्हे, मी तुमचा एक सेवक आहे. किंबहुना कोणीच कोणाचा गुरु होऊं शकणार नाहीं. ह्या अपरंपार विश्वाच्या ग्रंथाढ्य शाळेत कोणीही अध्यापनाचे स्तोम न माजवितां यावज्जन्म अध्ययनशील रहावे, हेच जीवाचे कर्तव्य आहे. आणि असे अध्ययन सुरू असतां गतानुगतिक न होतां स्वतांचे विवेकबुद्धीप्रमाणेच वर्तत जावे, असा त्यांचा उपदेश असे.

" मनःपूतं समाचरेत् " हा दंडक सर्वांच्या पचनीं पडण्यासारखा नसला, तरी माझी त्याने कधींच फसगत झाली नाहीं, असे केशवचंद्रांचे म्हणणें असे. सदसद्विवेक बुद्धीच्या तीक्ष्ण खड्गानें ते आपला मार्ग कापीत चालले होते. परंतु पुढें लवकरच ह्या धर्मवीरांच्या वीरवृत्तीस भक्तीच्या प्रेमकटाक्षानें मोहवश

केलें. अर्जुनाच्या त्रिदंडी संन्यासाप्रमाणें वैराग्याचा रूक्ष व कठोर आवेश बाजूला सारून केशवचंद्रांची मूर्ति भक्तीच्या प्रेमरसांत दंग झाली. ईश्वराशीं पितृभावाने जे पूर्वी दूर मर्यादशीलपणे वागत होते, ते ह्या स्थित्यंतरानंतर परमेश्वराशीं मातृभाव ठेवून बालवृत्तीने मांडीवर निःशंकपणे खेळूं लागले. पृथ्वीवरील मर्त्यजीव, व "आकाशांतील बाप," ह्या उभयतांतील महदंतर त्यांनीं ह्या मातृभावाने नाहींसे केले. वैराग्यानें त्यांनीं कांचनाचा मोह तोडला, तसा मातृभावानें त्यांनीं कामिनीच्या मोहास उपकारक असे वळण लावलें.

केशवचंद्रांच्या साधनसोपानावरील ह्या पुढील पायरी म्हटली, तर तीं योग ही होय. भक्ति व योग हीं बहीणभावंडे दोन बाजूंनीं त्यांच्याजवळ आलीं. भक्तीने प्रेमाची आरती त्यांच्यापुढें केली, व योगाने त्यांस साक्षात्काराचा प्रसाद दिला. द्वैतांत अद्वैत न पाहतां ईश्वराच्या प्रत्येक व्यक्त गुणाकडे निराळेपणाने पाहण्याकडेच प्रथम त्यांची प्रवृत्ति असे. यामुळे त्यांची वृत्ति कधीं विरागी तर कधीं प्रेमी, कधीं आनंदी तर कधीं उदासीन, अशी असे. ते ख्रिस्ताची उपासना करूं लागले, म्हणजे चैतन्य त्यांच्या नजरेपुढे येत नसत. व प्रभु चैतन्याचे चिंतन करीत असतां, इतर महात्मे त्यांच्या मनास पारखे होत. पुढे पुढे ही व्यतिरेक-पद्धति सोडून अन्वयपद्धतीने ईश्वरस्वरूपाचा विचार करणे, हे नवविधानाचे ध्येय म्हणून मानण्यांत येत असे. तरी योगानुभवाच्या अखेरच्या अद्वैतांत देवभक्तांचे द्वैत कायम राखण्याकडे त्यांचा विशेष कटाक्ष होता. "तूं देव मी भक्त ऐसें करी" हीच त्यांची अध्यात्मांतील अंतिम सीमा होती.

केशवचंद्रांची ईश्वरावर जबरदस्त निष्ठा होती. ईशकृपेवांचून कांहीच होणें शक्य नाही; व ईशकृपा झाली असतां कांहींच होणे अशक्य नाहीं; असे ते मानीत. एक ईशकृपेबद्दल बळकट विश्वास असल्यामुळे त्यांनीं 'जर' आणि 'तर'ची अनुमानपद्धति झुगारून दिली होती. "कसे होईल ?" आणि "काय होईल ?" ह्या शंकितवृत्तीचा त्यांच्या मनास कधीच विटाळ झाला नाहीं. त्यांचे गणित सारेच उरफाटे होते. "आधिं कळस मग पाया रे!" अशा मनोरथाच्या उतरंडी ते बिनदिक्कत रचीत असत. त्यागांतच समृद्धीचें बीज आहे. सर्वांत मोठी बेरीज वजाबाकीनेच होते, असे त्याचे शास्त्र असे. निष्ठेच्या या निस्सीमपणामुळें त्यांच्या मनांत एखादा संकल्प येण्याची खोटी

त्याची दुसऱ्यास वार्ताही लागण्याच्या अगोदर तो संकल्प प्रत्यक्ष कार्यरूपानेंच अवतरत असे. ह्या त्यांच्या कामाच्या धडाडीने ते बाहेरच्याच काय पण निकटच्या अनुयायांसही नेहमीं चकित करून सोडीत.

केशवचंद्र सेनांच्या मनाच्या उत्क्रांतीचा इतिहास मोठा चिंतनीय आहे. त्यांची प्रारंभींची पापभीरुता, असंतोष व औदासीन्य आणि त्यांची अखेरची त्यानीं मानलेली बालोन्मत्तवृत्ति ह्या दोन टोकांत त्यांची सर्व साधकावस्था येते. केशवचंद्रांच्या वृत्तीत वरचेवर पालट दिसत असत. कधीं एखाद्या बड्या साहेबाच्या अध्यक्षतेखाली एखाद्या सामाजिक सुधारणेच्या विषयावर केशवाचा सिंहनाद दणदणत आहे, तर लगेच पुन्हा एखाद्या झोपड्यांत एकतारीवर तेच केशवचंद्र सद्गदित अंतःकरणाने ईश्वराची करुणा भाकीत आहेत. कधीं डोकीचा ऐटबाज संजाब विचरून " अप टु डेट " साहेबी पोषाखांत स्वारी कोणा बड्या लाटसाहेबांचे स्वागत करीत आहे, तर त्यावर लवकरच सर्व मुंडन करून बौद्धभिक्षूंच्या भिकार वेषात केशव भीक मागत आहेत ! कधीं आचार्यपदावरून गंभीर उपदेश करीत आहेत, तर कधीं तळ्याचे कांठीं तीन दगड मांडून त्यावर भिक्षान्न शिजवीत आहेत ! कधीं मूर्तिपूजेवर झोड उठविली आहे, तर कधीं पत्रपुष्प, धूपदीप इत्यादि पूजाद्रव्यांनी आपले ब्राह्मविधि साजरे करीत आहेत ! अशा तऱ्हा वारंवार दिसून येत. राहण्यास राजवाड्यासारखा प्रासाद, राजे-महाराजांसारखे घरीं पाहुणे, सार्वभौमाची महत्त्वाकांक्षा, सततीची पूर्ण समृद्धि एवंगुणाविशिष्ट असे हे केशव जोगी होते.

श्रेय व प्रेय याचा दाता भगवान् आहे भक्तांचे योगक्षेम तोच चालवितो. ह्यासाठीं त्याची नम्र भावानें नेहमीं प्रार्थना करावी, आणि प्रपंचासंबंधीं व समाजासंबधी हरएक गोष्ट ईश्वर आपल्या प्रार्थनानुरूप जो 'आदेश' देईल, त्याप्रमाणे करीत जावी, अशी त्यांची निष्ठा होती. निव्वळ एकेश्वरी विचाराने त्यांचे समाधान होत नसे. विचाराप्रमाणे धर्मप्रसारास तदनुरूप आचारांचीही त्यांस जरूरी वाटे. ह्यासाठी वैराग्यादि साधने व पूजादि उपचार ह्यांचे रहस्य ते आपल्या अनुयायांच्या मनावर बिंबवीत असत. त्यांनी विरागी असावें, आणि त्यांनीं उत्तम गृहस्थाश्रमही चालवावा; त्यांनीं समाजसुधारणा घडवून आणावी व त्या भरांत धर्मजागृति व आत्मोन्नति ह्यांस विसरू नये; अशी त्यांची शासनपद्धति होती.

त्यांच्या मनोबोधाची तऱ्हाही विलक्षण असे. मनाच्या विकारवशतेस ते पाप समजत. मनाचे व शरीराचे दौर्बल्य हेही पाप असे त्यांस वाटे. किंबहुना पाप म्हणजे काय, हे ठरविण्याच्या अगोदरच त्यांचे पाप, त्यांच्या मनास खात असे. पापाबद्दल त्यांची दृष्टि फारच सूक्ष्म असे. जाळ्यांत एखादी माशी सांपडताच ती पकडण्याकरिता जसा कोळी अगदी टपून बसलेला असतो, तसे कायावाचामनाने यत्किंचितही पाप होतांच त्यांच्या विवेकबुद्धीस त्याची तत्क्षणीं जाणीव होत असे. "अशी असंख्य पापे माझ्या हातून झालीं असतील, आणि ती झाली तेही बरेच झाले; कारण त्या योगाने माझ्या जीवाची तळमळ होऊन मीं ईश्वराची करुणा भाकली. आता ईशकृपेने पापाचा डोंगर नाहीसा होऊन त्या ठिकाणीं शांतीचा समुद्र अथांग भरून राहिला आहे;" असें त्यास वाटे. भक्ताची बालोन्मत्त पिशाचवृत्ति त्यांस मोठी स्पृहणीय वाटे. प्रत्येक भक्तांत ह्या तिन्ही वृत्ति असतात असे ते आपल्या अनुभवाने सांगत. त्यासंबंधी ते जीवन-वेदांत लिहितात, त्याचे तात्पर्य असेः—"जीवाच्या अनंत कालाच्या उत्क्रांतिमार्गांत मानवी जीवित अत्यल्प आहे. यामुळे अनुभवाच्या दृष्टीने मी बालकच आहे. प्रौढ व वृद्ध माणसांपेक्षां माझे चित्त मुलांतच जास्त रमते. तसेच जगांतील सुखदुःखाची मापे मी फेकून दिलीं आहेत. 'गरिबी खुदाकी प्यारी है'. असे मी मानले आहे. जगात गरिबी व श्रीमंती ह्या दोनच जाति आहेत. त्यापैकी माझी जात गरीब आहे. ह्याचा मला अभिमान वाटत असतो. लोकापवादाची मी पर्वा केली नाही. भजनात एकतारी घेऊन निर्लज्जपणाने मी नाचलो. असा धर्मवेडेपणा मीं आनंदाने अंगीकारला. आणि शेवटी एखाद्या अट्टल दारूबाजाप्रमाणे अधिकाधिक मादक अशा प्रेमवारुणीचे वाढत्या प्रमाणात सेवन करून प्रेमोन्मादाचाही अनुभव घेतला."

त्यांनी तसे स्पष्ट शब्दांतच न म्हटले तरी भगवान् रामकृष्ण परमहंस हाच भक्ताचा उत्कृष्ट नमुना त्यांस अखेर आदर्शभूत झाला असावा. आणि त्या भक्तोत्तमांत ज्या निरनिराळ्या मनोवृत्तींचा त्यांस मिलाफ दिसला, तसा मिलाफ आपल्यामध्येही आहे असा त्यांस आत्मविश्वास वाटला असावा, असे वाटते. कारण अजाण दुनियेस सुजाण करणारा मी ईशप्रेषित नवविधानधर्माचा संस्थापक आहे, इतकेच काय, मी ह्या कालाचा प्रभु येशुख्रिस्त व चैतन्यच आहे. हा त्यांचा बलवत्तर अहंकार बालवृत्तीची साक्ष देत नव्हता.

तसेंच कुचबिहारच्या लग्नानंतर झालेल्या लोकनिंदेनें त्यांना जो त्वेष चढला त्यानें त्यांच्या लोकेषणेचें उग्र स्वरूप उघड केलें. आणि त्यांचे डोळ्यांदेखतच त्याच्या अनुयायांत माजलेली दुही पाहून त्यांच्या प्रेम व शांति यांच्या समुद्रास बराच जोराचा ओहोट लागला. हे त्यांच्या अंतरांतील असंतोष व दुःखाचे खडक अखेर उघडे पडले, त्यावरून दिसून आले. ते कांहीं असो. इतकी गोष्ट खरी कीं, केशवचंद्र सेन आणखी कांहीं वर्षे जगते, तर त्यांनी आपल्या ठिकाणीं सर्व इष्ट सुधारणा घडवून आणल्या असत्या आणि मग ते व त्यांचा समाज आज आहे त्यापेक्षां आपणांस जास्त आदर्शभूत झाला असता. परंतु मनुष्यानें पूर्ण होऊंच नये, ही असूया जेथे परमेश्वरासही सुटली नाही, तेथे आपला थोडा विवेक सुटून त्या परमेश्वराबद्दल आपल्यालाही राग आला तर त्यांत नवल काय ?

केशवचंद्र सेन ब्राह्मसमाजांत दाखल झाले,तेव्हां त्यांच्यांत पूर्वी न आढळणारे असे दोन गुण त्यांनीं संपादन केले. ते दोन गुण म्हणजे प्रेमलक्षणाभक्ति व जीवशिवाचा ऐक्यभाव हे होत. हे दोन्ही गुण त्यांस एकमेकांस पूरक असेच वाटले. शिवाय प्रेमातून धर्मखूळ आणि ऐक्यभावात सर्वदेवमयत्वभाव अशीं विघ्ने उत्पन्न व्हावयाचीं; परंतु केशवचंद्र म्हणतात, कीं माझी प्रेमाची फुलबाग ऐक्याच्या अभेद्य खडकावर फुलल्यामुळे तसे कांही झाले नाही. प्रेमाने अंतःकरण भरून आले असतां परमात्म्याचे एकरूप डोळे भरून पहावे, असा त्यांचा अनुभव होता. एकात्मभाव दृढ होण्यासाठीं डोळे मिटून ध्यानस्थ बसण्याचा त्यांनी फारसा खटाटोप केला नाहीं. डोळे उघडे ठेवूनच त्यांनीं साऱ्या जगाकडे पाहिले. तेव्हां त्यांस सर्वत्र सचरलेले ईशस्वरूप दिसले, व ते त्यांनी ओळखले.

केशवचंद्र म्हणतात कीं, माझा सारा व्यवहार रोखठोक होता. उधारी व्यवहारच नाहीं. भविष्यकाळच्या अनिश्चित लाभासाठीं मला कधीं तप करीत बसावे लागले नाहीं. रात्र प्रार्थनेत घालविली कीं, दुसऱ्या दिवशी कशास वाण नाहीं. मलाच काय पण माझ्या देशाला, सर्व मानवकोटीला, नव्हे साऱ्या जगाला पुरून उरेल इतकें ईश्वराने मला दिले. पांच पैशांच्या भांडवलावर लाखो मिळविले. पांचशें वर्षांची प्रगति पंचवीस वर्षांत घडवून आणली. पूर्वी ब्राह्मपंथी मंडळी किती व्यसनी, दुबळी व प्रेमशून्य होती, त्यांना उत्साह कसा तो ठाऊकच नव्हता. पण अवघ्या दहा वर्षांच्या

परिश्रमानें केवढा फरक पडला! आज बडे सुशिक्षित लोक भररस्त्यांतून नगर-संकीर्तन करीत लोकलाज सोडून हिंडत आहेत. आज कालीचे उपासक आणि कृष्णाचे उपासक गुण्यागोविंदाने नांदत आहेत. शक्ति आणि प्रेम ह्यांच्या भक्तांत सलोखा आहे. ह्या अपूर्व यशामुळे माझ्या उतारवयांतही मला तरुणपणाचा उत्साह वाटत आहे. हजारों तरुण माझ्या अंगांत शिरले आहेत, असें मला वाटतें. मी देवाचा सेवक आहे. जे माझ्या स्वामीचे आहे, ते सर्व माझेंच आहे! वाहवा केवढा हा आनंद की, आज आमच्या यशाचा भरत-भूमीवर नुसता वर्षाव होत आहे, व आमच्या यशाच्या पताका हवेत सारख्या फडकत आहेत. आमच्या गरीब बिचाऱ्या मायभूला केवढे हे निधान सांपडले! आतां आम्ही कधींही अपयश न घेतां लोकांत नवविधानाचा प्रसार करणार. हे दयाळू आई, तुझ्या ह्या लेकराना तुझा आशीर्वाद असू दे."

केशवचंद्रांच्या जीवनवेदावरूनच त्यांचे जीवनरहस्य आतापर्यंत सारांश-रूपानें लिहिले. राजा राममोहन ह्यांचे आत्मचरित्र एका लहानशा पत्रांतच संपुष्टांत आले, देवेंद्रनाथांचें आत्मचरित्र मध्यावसानीच थांबले; पण केशव-चंद्रांचे आत्मचरित्र रहस्याच्या दृष्टीने पूर्ण असून फार उद्बोधक आहे, यांत शंका नाहीं. केशवचंद्रांच्या चरित्रांत त्याच्यासंबंधी अनादर व गैरसमज होण्या-सारखे प्रसंग अनेक येऊन गेले. परीक्षेच्या मंडपातून त्यांस काढून लावले, त्यामुळें त्यांची सहजच अपकीर्ति झाली. पुढे ब्रह्मानंद-पदवीदानसमारंभा-च्या वेळीं, कुलाचार मोडून आप्तांचा अवमान करून, त्यांनी आपल्या नूतन भार्येसह प्रयाण केले; तेही कित्येकांस गोड वाटले नसेल. त्या पुढील मोंगीर येथील भक्तीच्या पुरांत वाहवलेल्या मंडळींनीं केशवांच्या पायांवर लोळण घेऊन विभूतिपूजेचा अतिरेक केला, तो इतर ब्राह्मबंधूस खपला नाहीं, आणि त्यानंतर कुचबिहारच्या सोयरिकीने तर त्यांची फारच अपकीर्ति झाली. ज्यांची केशवचंद्रांबद्दलची सहानुभूति ह्या विवाहाने कमी झाली नाहीं असेही केशवचंद्रांचे कित्येक लहानमोठे चहाते होते, ही गोष्ट खरी. केशवभक्त गौरी-प्रसाद मुझूमदार ह्यांनीं तर केशवांची तरफदारी करण्यासाठीं चारपांचशें पानांचा ग्रंथ खर्ची घातला आहे. तथापि कुचबिहारची सोयरीक अखिल भरतखंडास कल्याणप्रद होईल ही जी त्यांच्या सन्मित्रांची दुराशा ती अगदींच फोल ठरली आणि ब्राह्मांच्या अत्यंत उज्ज्वल अशा आत्मिक विवाहाच्या

पुरस्कर्त्यांच्या नांवास कुचबिद्दुव्वी जोड त्यावेळीं व त्यानंतर अपयशासच कारणीभूत झाली आहे, असें मोठ्या दुःखानें म्हणावें लागते !

ह्या सर्व दिव्यांतून केशवचंद्र सुरक्षितपणें बाहेर पडले हे खरें; परंतु त्यांच्या आयुष्याच्या अखेरीस आशेपेक्षां निराशा व उत्साहापेक्षां निरुत्साह ह्यांचीच छाया त्यांच्या मनावर अधिक पसरली होती. एरव्हीं त्यांची महत्त्वाकांक्षा दांडगी व उत्साह प्रचंड होता. एमर्सनच्या उक्तीप्रमाणे युगधारी विभूतींतील अपूर्वता व नाविन्य त्यांच्या ठिकाणीं चमकत होते. राजा राममोहनप्रमाणेच पूर्व-पश्चिमेचे समेलन हे त्यांच्या आयुष्याचे ध्येय होते. त्यांची प्रवचनें व व्याख्याने अनेक विषयांवर असंख्य झालीं असतील; पण त्यांचे पहिलेच जाहीर व्याख्यान येशु ख्रिस्त, युरोप आणि आशिआ या विषयावर झाले, आणि आशिआचा युरोपखडास संदेश हेच त्यांचें शेवटचे व्याख्यान होय. ह्या व्याख्यानाच्या उत्साहभरांत जो आशावाद त्यांनीं प्रगट केला आहे, तो त्यांस शेवटपर्यंत खरोखरच पटून राहिला होता कीं काय, याबद्दल शंका वाटते.

केशवचंद्र सेन हे कोणी जाडे पंडित नव्हते. ते कर्मठ तर नव्हतेच व मोठे योगीही नव्हते. पण ते उच्च कोटींतील एक भक्त होते, हें खास. त्यांच्या निस्सीम भक्तीस ईश्वर वश होता. प्रार्थना आणि श्रद्धा ह्या त्यांच्या ऋद्धि-सिद्धि होत्या, ते त्यांशिवाय कशासच जाणत नव्हते. त्यांतही त्यांच्या आयुष्याच्या अखेरीस त्यांस श्रीरामकृष्णांसारख्या थोर महात्म्याची सत्संगति घडली. पितृभावापेक्षा मातृभावाने त्यांची दृष्टि ईश्वराकडे वळली आणि त्यांच्या भक्तीस शुद्ध व अत्यंत उत्कट असे स्वरूप प्राप्त झाले, यामुळे त्यांचें व त्यांच्या कित्येक सहृदय अनुयायाचे परम कल्याण झाले असेल, यांत शंका नाहीं.

---



भाई प्रतापचंद्र मुजुमदार.

जन्म–इ. सन १८४०　　　　　　　　　　मृत्यु इ. सन १९०५

## प्रकरण अकरावें

# प्रतापचंद्र मुजुमदार

केशवचंद्रांचे नवविधान म्हणजे हिंदु व खिस्तीधर्मांची एक खिचडी आहे. किंवा पाहिजे तर असे म्हणा कीं, उभय धर्मांतील तत्त्वांचे ते एक रसायन आहे. केशवचंद्रांच्या दृष्टीने साऱ्या जगाचा प्रकाशक एक येशू खिस्तच आहे. आणि हें मत त्यांच्या संप्रदायांत अद्यापिही अनुसरलेले दिसते. ह्या प्रकाशकाच्या प्रकाशाने केशवचंद्र व प्रतापचंद्र हे दोन चंद्र भरतभूमीवर कोणता प्रकाश पाडीत परिभ्रमण करीत होते, हे मागील विवेचनावरून लक्षांत आलेच असेल, नसल्यास केशवचंद्रांचे खिस्तमय विचार आम्ही पुढील प्रकरणांत सविस्तर देतच आहों; त्यावरून अधिक कल्पना येईल.

श्रीरामपुरचे खिस्ती मिशन व कलकत्त्याचा ब्राह्मसमाज यांचा ऋणानुबंध मोठा विलक्षण दिसतो. ते एकमेकांस कधीं उपकारक तर कधीं अपकारक असे वाटतात. बापाच्या दृष्टीने सख्खे व आईच्या दृष्टीने सावत्र असे त्यांचे संबंध दिसतात. आकाशांतील बापावर दोघांचे प्रेम सारखेच पण दोघांची मायभूमि वेगळी. यामुळे कधी प्रेम तर कधीं वाद असे प्रकार आढळतात. त्यांतही ब्राह्मांचे खिस्त व खिस्तीधर्म यांवर निर्व्याज प्रेम दिसते. पण कॅरे, डफ, तिनलिग अथवा हॉवेल इत्यादि खिस्ती पाद्र्यांचे ब्राह्मांवर जे प्रेम दिसते त्यांत दोन प्रकार आहेत. कित्येकांस ब्राह्मसमाज म्हणजे हिंदुस्थानच्या खिस्तीकरणाची किल्ली असे वाटतें. म्हणून ते त्यांस आपल्याकडे ओढतात. आणि दुसऱ्या कित्येकांस आर्यधर्माचे रहस्य ब्राह्मांच्या मध्यस्थीने आपल्याला कळल्यामुळें ते ब्राह्म-पुढाऱ्यांबद्दल फार आदर दर्शवितात.

राजा राममोहन व केशवचंद्र सेन ह्यांनीं खिस्ती धर्मांतील कित्येक संस्कार जसे उचलले, त्याप्रमाणे त्यांनीं आपल्या स्वतंत्र विचारांनीं खिस्ती धर्मविचारांसही अगदींच नवीन वळण लावलें. ही गोष्ट कित्येक खिस्ती लेखक आतां प्रांजलपणे कबूल करतात. श्रीरामपुरच्या कॉलेजचे प्रिन्सिपाल मि०हॉवेल हे अलीकडे दिलेल्या एका व्याख्यानांत असें म्हणतात कीं, खिस्त-

चरित्रांतील पौर्वात्य वळण आम्हांस केशवचंद्रांनीं पटविलें. त्याचप्रमाणें जीझस ख्राइस्टमधील मानवी भाव, त्रयीवादाचें व्यवहार्यस्वरूप, अंतर्यामीचें ख्रिस्ती धर्मांतील रहस्य, आणि परधर्मांतील सत्य सिद्धान्तांबद्दल खरा खरा आदर, ह्या गोष्टी केशवचंद्रांपासून आम्ही शिकलो. आणि येथील ख्रिस्ती धर्मसंस्थांस भारतीय स्वरूप कसे द्यावे, हाही विचार त्यांनींच आम्हांस सूचित केला. केशवचंद्रांचा मित्र प्रतापचंद्र यांच्याबद्दलही अमेरिकन ख्रिस्ती विद्वानांचे असेच अभिप्राय आहेत. या सर्वांस खरें कारण केशवचंद्र व प्रतापचंद्र यांचें ख्रिस्ती धर्माबद्दल प्रेम हेच होय. ख्रिस्ती धर्मासंबंधीं व संस्कृतीसबंधी प्रतापचंद्र मुझूमदार यांच्या मनांत वागत असलेला आदर त्यांच्या मुंबईस झालेल्या व्याख्यानांतूनही उघड दिसून येतो. आणि आजही नवविधानसंप्रदायांत हिंदूंच्या रामकृष्णादि देवांच्या जन्मतिथि अथवा पूर्वाचार्यांच्या व प्राचीन संताच्या पुण्यतिथि जरी पाळीत नसले, तरी गुड-फ्रायडेसारखे ख्रिस्ती सणांचे दिवस मोठ्या समारंभाने अद्यापिही पाळले जातात. आणि ख्रिस्ताचे माहात्म्य त्यांच्या मिशनऱ्यांपेक्षांही अधिक आदराने गाइले जाते. आपण ख्राइस्ट व गौरंग यांचे उभयतां अंशावतार आहोत, अशी कल्पना केशवचंद्रांस होऊन, विजयकृष्ण गोस्वामी ह्यांनीं आपण अद्वैत ( चैतन्याचा अनुयायी ) असल्याचा पुकारा करावा, असे त्याचे म्हणणे होते. तसेच श्रीरामकृष्णांस आपल्या नवविधानाचे अनुयायी मानण्यापर्यंत त्यांच्या बुद्धीची मजल गेली होती ! वगैरे हकीगत मागे आलीच आहे. अवतार ही कल्पना त्यांनीं पूर्वींच अमान्य केली असल्यामुळे त्यांस गैरसोयीची झाली, आणि अखेर गरीब दुबळ्या वैष्णवांपेक्षां त्रिखंडी गाजत असलेल्या विजयशाली येशू ख्रिस्ताचाच दास म्हणवून घेणें त्यांस अधिक भूषणावह वाटले. ह्या सर्व महत्त्वाकांक्षी पुरुषांच्या लीला आहेत. त्यांत दुःखाची गोष्ट इतकीच की, केशवचंद्रांसारख्या परम बुद्धिवान् पुरुषाच्या ठिकाणीं अप्रयोजकपणाही इतका प्रमाणाबाहेर जावा !

वैष्णव भक्तींत विजयकृष्ण गोस्वामी हे केशवचंद्रांचे जसे जोडीदार होते. त्याचप्रमाणे ख्रिस्तभक्तीत केशवचंद्रांस प्रतापचंद्राची उत्तम साथ होती. कुचबिहारप्रकरणानंतर विजयकृष्ण हे अखेर केशवचंद्रांस सोडून गेले. त्याच वेळीं प्रतापचंद्रही सोडून जाण्याच्या बेतांत होते; परंतु अखेर मित्र-

प्रेमानें तत्त्वप्रेमावर सरशी केली, आणि प्रतापचंद्र अखेरपर्यंत केशवचंद्रांस चिकटून राहिले. नवविधान जगजाहीर करण्याच्या कामी प्रतापचंद्रांची कामगिरी केशवचंद्रांपेक्षांही अधिक झाली आहे. नवविधानपंथांत प्रतापचंद्रांचें इतके महत्त्व असल्यामुळे, त्यांच्यासंबंधी कांहीं माहिती आम्ही सारांशरूपानें पुढे देत आहोतः—

प्रतापचंद्रांचा जन्म हुगळीजवळ बांसबेरीया येथें इ. सन १८४० त झाला. त्यांचे वडील लहानपणीच वारल्यामुळे त्यांना शिक्षणाचा लाभ मिळाला नाही. त्यांचे खरेखुरे सज्ञानपण ते ब्राह्मसमाजांत दाखल झाले (१८५९) तेव्हांपासूनच सुरू झाले. पुढे त्यांच्या ठिकाणीं जे आध्यात्मिक संस्कार जागृत झाले, त्यास कारण प्रथम देवेंद्रनाथ व केशवचंद्र यांची संगति व अखेर श्रीरामकृष्णांची कृपा हेच होय. प्रथम त्यांनीं केशवचंद्रांप्रमाणे बंगालच्या बँकेत नोकरी धरली होती. पण पुढे केशवचंद्रांनी ती नोकरी सोडली, तेव्हां यांनीही नोकरी सोडली. ते घरचे खाऊनपिऊन सुखी होते. यामुळे त्यास आपले सारे आयुष्य समाजकार्यास लावतां आले. इ. सन १८७० सालीं ते 'इंडियन मिरर'चे संपादक झाले. त्यापूर्वी व त्यानंतरही वर्तमानपत्रांत लेख लिहिणे, हा त्यांचा नेहमीचाच व्यवसाय असे. त्याच्या लेखनापेक्षांही त्यांच्या वक्तृत्वाने ते अधिक प्रसिद्धीस आले. तथापि त्याच्या व्याख्यानांतील बुद्धिवैभवापेक्षां त्यांच्या मनाची श्रीमंती व त्याच्या लेखातील पांडित्यापेक्षा त्यांची निष्कपट प्रीति, हीच आम्हास अधिक चित्ताकर्षक वाटतात; म्हणून त्यांचेच दिग्दर्शन या प्रकरणांत केले आहे.

प्रतापचंद्र मुजुमदार म्हणजे केशवचद्रांचा उजवा हात होत. केशवचंद्रांचे बालमित्र, नातेवाईक, शेजारी, अत्यत चहाते अनुयायी, सहकारी आणि अखेर केशवचंद्रांचे चरित्रकार, या अनेकविध नात्यांनीं प्रतापचंद्रांस केशवचंद्रांच्या अनुयायांत अग्रेसरत्वाचा मान मिळतो. शिवाय लेखनकौशल्य, चित्तशुद्धि सरळ निष्कपटभाव, अकृत्रिम प्रेम, निरंहकारबुद्धि आणि ख्रिस्तभक्ति इत्यादि गुणांत प्रतापचंद्र केशवचद्रांपेक्षां कांकणभर सरसच ठरतील असे वाटते. किंबहुना वरील गुणांपैकीं कित्येक गुण केशवचंद्रांमध्ये नसलेले प्रतापचद्रांमध्यें भरपूर होते, असे आढळते. दुसऱ्याबद्दल प्रेम आणि आदर व्यक्त करण्यांत प्रतापचंद्रांच्या मनाचा सरळपणा, मोकळेपणा व उदारपणा दिसतो, त्याचा

केशवचंद्रांच्या ठिकाणीं जवळ जवळ अभावच होता, असें म्हटल्यास गैर होणार नाहीं.

प्रतापचंद्र अवघे नऊ वर्षांचे झाले, तोच त्यांचे वडील त्यांस पोरकेपणा देऊन परलोकवासी झाले. ते एक सामान्य प्रतीचेच गृहस्थ होते. तथापि प्रतापचंद्रांनी आपल्या आठवणीत त्यांच्यासंबंधीं जे उद्गार काढले आहेत, ते कोणाहीं सत्पुत्रास शोभण्यासारखे आहेत.

प्रतापचंद्र म्हणतातः—"पितृपदाचा लाभ मला झाला नसल्यामुळें पुत्रासंबंधी बापाची अपेक्षा स्वाभाविक काय असते, ह्याचा मला अनुभव नाहीं, तथापि माझ्या बाळपणच्या अंधुक स्मृतींवरून मला असें आठवतें कीं, मी माझ्या वडिलांचा पहिलाच मुलगा, कांहींतरी नांव काढीन, असें त्यांस वाटत असावे. माझ्या बाळपणींच मला सोडून गेलेले, प्रियबाबा! माझ्या या पोरक्या खडतर आयुष्यांत ती आपली त्या वेळची भावी काळची अटकळ कांहीं खरी ठरली काय? तुम्ही स्वर्गांत मजसंबंधीं ज्या काही आशा करीत असाल, त्यांस तुमचा हा मुलगा खरोखर पात्र आहे काय? माझ्या स्वर्गींच्या पालका, ह्या तुमच्या श्रवणेच्छु मुलाजवळ दोन शब्द बोला, आणि माझ्या अंतःकरणांत नवीन ध्येये व कर्तव्यनिश्चय जागृत करा."

वडिलांस नांगऱ्ये अथवा अडाणी समजून तुच्छ लेखणारे विद्वान् या युगांत अनेक आढळतील. अशा काळीं नवशिक्षितांनीं प्रतापचंद्रांचे आपल्या वडिलांच्याबद्दल प्रेम, आदर व त्यांच्या संतोषाबद्दलची त्यांची आस्था, हीं ध्यानीं धरणे खचितच कल्याणप्रद होईल. प्रतापचंद्रांची आई वडिलांच्या मागून दहा वर्षांनीं वारली. वडील वारले त्या वेळीं ती अवघी पंचवीस वर्षांची होती. त्या काळच्या इतर स्त्रियांप्रमाणे ती निरक्षर होती. परंतु ती मोठी रुबाबदार, बुद्धिमान्, थोर मनाची, अत्यंत सदाचारी, शीलसंपन्न व कष्टाळू अशी बाई होती. वैधव्यदशेत अत्यंत तामसी वृत्तीने राहावे व संसारांतील कष्ट जीवापाड सहन करावे, असें तिचे जिणे फार कष्टप्रद होते. ती वैधव्य-स्थितींत मृत्यूचीच उत्सुकतेने वाट पहात आहे असें दिसे. आणि अखेर तो मृत्यु तिच्या एका उपोषणाचें हरिदिनीं तिला प्राप्त झाला! शेवटल्या दुखण्यांत तिच्या औषधोपचारांकडे घरांतील वडील मंडळींनी कोणींच लक्ष दिले नाहीं. तेव्हां आपण त्या भयाण मध्यरात्रीं "कोणी माझ्या लाडक्या आईला

बांचवील काय" अशी जीवदानाची भीक मागत घरें धुंडीत वेड्यापिशा-सारखे सैरावैरा कसें धावत होतो, याचे मोठे हृदयद्रावक चित्र प्रतापचंद्रांनीं रेखाटले आहे. आणि त्यानंतर आपल्या परलोकवासी आईला उद्देशून प्रताप-चंद्र म्हणतातः—"अत्यंत जिवलग माणसेही दीर्घकालाने एकमेकांस विसरतात; आणि दुःखाच्या असाध्य जखमाही कालेकरून बुजून जातात. त्यांतूनही मला मनाजोगती पतिनिष्ठ अशी चांगली बायको मिळाली असल्या-मुळे देवाच्या दयेने मी सुखी आहे; परंतु या खडतर संसारांत जेव्हां एखादे वेळीं जीवाची अगदी गळचेपी होते, आणि जीव थकून जातो, त्या वेळीं 'आई! तू मला लहानपणीं आजारी असतां जशी घेत असस त्याप्रमाणे तुझे उरावर मस्तक ठेवून स्वस्थ पडावे, असे फार वाटते. हे माझे पुण्यशाली देवते! माझ्या आत्म्याला स्पर्श करणे जर तुला शक्य असेल, तर मजपाशीं ये आणि अगदीं माझ्याजवळ येऊन ईश्वराच्या घरची शांति मला दे'."

प्रतापचंद्र पुढे असे म्हणतात कीं, "विधवांचे पुनर्विवाह होवोत अगर न होवोत ह्याबद्दल माझे म्हणणे नाहीं, परतु त्यांच्या अनाथ स्थितींत त्यांच्या आप्तेष्टांनीं त्यांची योग्य ती काळजी घेऊन त्यांस ममतेनें वागविणे फार जरूर आहे. आतां आपल्याकडे विधवांचा नेहमीच छळ होतो असे कोणी म्हणेल तर ते मात्र खरे नाहीं, असे निदान बंगालपुरते तरी मी खात्रीनें म्हणू शकेन." वरील विचारांतील प्रतापचंद्रांचे मातृप्रेम व त्यांची समतोल बुद्धि हीं दोन्ही स्तुत्य आहेत.

प्रतापचंद्रांचे लग्न एका अकरा वर्षांच्या अशिक्षित कुमारिकेशीं झाले. त्या लग्नाच्या गांठीबद्दल प्रतापचंद्र म्हणतात "विवाहग्रंथी हे एक परम गूढ आहे. ती एक ईश्वराच्याच घरची ठरलेली योजना आहे. सौदामिनी, माझी भावी बायको दहाअकरा वर्षांची असेल नसेल. मी तिला क्वचित् एक दोन वेळां चुटपुटती पाहिली असेल, परतु लग्नविधीने ती माझी बायको होतांच माझे तिच्यावर अपरंपार व अनुपमेय प्रेम जडले. कामदेव अगोदरच आंधळा मग बालविवाहांत त्याची दृष्टि कोठून उघडणार? पण माझी अशी खात्री आहे कीं, माझा जो अनुभव तोच दुसऱ्या हजारो नवरदेवांचा अनुभव आहे. हें प्रेम कसे उत्पन्न होते? पोरवयांतील उत्कंठित मनाने ते अगोदरच भावित केले असतें काय? अथवा रूढीच्या बलाने अशी ही लग्नग्रंथी

अपरिहार्य मानून मन प्रेम करूं लागते ? किंवा प्रेम हें त्या वेळचें एक कुतूहल मात्र आहे ? अथवा ती एक बाळपणाची नुसती गंमत आहे. नाहीं. असे नाहीं. खरी वस्तुस्थिति याहून अत्यंत भिन्न असते. ज्या रात्रीं माझें लग्न झालें, त्यास आज तीस वर्षे होऊन गेलीं, आणि माझी प्रियपत्नी म्हणजे जणुं काय अलम दुनियेतील सर्व स्त्रियांतून माझ्याजोगी अशी एक सर्वोत्कृष्ट स्त्री मीं निवडूनच घेतली आहे, असे मला वाटतें. आणि माझें तिच्यावरील प्रेम कितीही शुद्ध असलें, तरी तिने ज्या प्रेमानें माझी आजपर्यंत सेवा करून मला धन्य केलें आहे, त्या तिच्या उज्ज्वल प्रेमापुढें माझें प्रेम केव्हांही फिकेंच पडेल. जन्ममृत्यू-प्रमाणे लग्न हाही एक ईशतंत्र योगच आहे. मी आणि माझी अल्पवयी गरीब बायको, यांच्याप्रमाणें जी कोणी ह्या ईश्वरी नेमानेमाला नम्रभावानें मान वांकवून पोरवयांतील निष्कपट आनंदानें ईश्वरावर भरंवसा ठेवून लग्नास तयार होतील, त्यांना ईश्वर धैर्य देऊन त्याचा भावि संसार तो सुखाचा करील यांत शंका नाहीं. मी बालविवाहाची तरफदारी करतों असें नव्हे. त्याचप्रमाणे प्रीतिविवाहापूर्वीच्या प्रेमसंपादणीवरही माझा मुळींच भरंवसा नाहीं. लग्नाचा जो गंभीर धर्मविधि आहे तो जर निष्ठापूर्वक पुरा केला, तर त्याच्याच योगाने स्त्री-पुरुषांच्या अंतःकरणांत अत्यंत खोल, शुद्ध व कोमल अशा भावना उत्पन्न होतात. त्या विवाहग्रंथींतच लग्नाच्या पूर्वोत्तर जरूर असणाऱ्या सर्व गोष्टींची जोपासना व सिद्धता आपोआप होत असते. प्रतिकूलवृत्तीचीं नवरानवरीही लग्नाच्या धार्मिक विधीवरील निस्सीम निष्ठेमुळे परस्परानुकूल होतात. यास्तव विवाहेच्छु माणसाने सर्वांत शहाणपणाची गोष्ट हीच लक्षांत ठेवावयाची कीं, मनुष्यमात्र हा अपूर्ण व सदोषच असावयाचा. यास्तव सुखदुःखाचे वांटेकरी अशा ज्या माणसाची आपल्याला जोड मिळणार आहे, तें माणूस वरील सामान्य मर्यादेच्या बाहेरचें असावें, अशी आपण कधींही अपेक्षा ठेवू नये. बालविवाहांत मुला-मुलींचे संमतीशिवाय आपल्या-इकडे वडील माणसें लग्न घडवून आणतात. परंतु ज्या देशांत तरुण युव-युवतींचे स्वेच्छेने प्रतिविवाह होतात, त्या प्रांतांतील दंपतीप्रमाणेच आमच्या वरील पद्धतीनें लग्न झालेलीं हिंदूंचीं दंपत्येंही आपलें आयुष्य सुखानेच घालवितात.

ह्या वरील सर्व उद्गारांत प्रतापचंद्रांचा प्रेमळ स्वभाव, मोकळें मन व

निराग्रहवृत्ति, हीं चांगलीं दिसून येतात. ह्याचेंच दुसरे प्रत्यंतर पहावयाचें असल्यास श्रीरामकृष्ण परमहंसाबद्दल प्रतापचंद्रांनीं केशवचंद्रांच्या चरित्रांत व अन्यत्र जे उद्गार काढले आहेत, ते पहावे.

प्रतापचंद्र आपल्या वयाच्या एकोणिसाव्या वर्षी ब्राह्मसमाजांत दाखल झाले. ब्राह्मपंथाच्या प्रतिज्ञालेखावर प्रथम सही करतांना त्यांचे सर्व अंग थरारले, व हात कापूं लागला. परतु देवेंद्रनाथ हे त्यांचे पारमार्थिक गुरु, आणि केशवचंद्र सेन, हे पार्थसख्या कृष्णाप्रमाणे, त्याचे तत्त्ववेत्ते जिवलग स्नेही, असे ते मानीत असत. पूर्ण मनुष्याच्या एक पुरी झालेली व एक पुरी होत घातलेली, अशा त्या दोन प्रतिमा आहेत असे त्यांस वाटे. त्या उभयतांवर प्रतापचद्र याची पूर्ण निष्ठा होती. केशवचंद्रांच्या पावलांत पाऊल टाकून चालावयाचे, इतकेंच ते जाणत होते. केशवचंद्रांस आचार्यपद मिळाले, तेव्हां त्या समारंभास त्यांच्याबरोबर प्रतापचंद्रही आपल्या अल्पवयी पत्नीस घेऊन देवेंद्रनाथाच्या घरीं गेले होते. पुढे परत येते वेळीं घरच्या मंडळींनीं त्यांस मनाई केली, पण प्रतापचद्र त्या मनाईस न जुमानतां तसेच घरांत घुसले.

ज्या वेळी ब्राह्मसमाजांत ते दाखल झाले, त्या वेळची त्यांच्या समवयस्क बंगाली तरुणाची स्थिति अत्यंत अनीतिमय व शोचनीय असावी असे दिसते. प्रतापचद्र आपल्या स्वतांबद्दल असे लिहितात कीं, मी त्या वेळी (१८५९) मोटा बुद्धिमान्, भावनाप्रधान व बहुभाष, असा एक उमदा तरुण होतो. परंतु माझ्या वर्तनांत करारीपणा नव्हता. आणि तत्त्वनिष्ठा कशी तीहि मी जाणत नव्हतो. मी व माझे त्या वेळचे स्नेही ह्यांची धार्मिक वृत्ति अत्यंत भावनात्मक असे. आम्हीं आमची मने आमच्या धार्मिक भावनानीं इतकी हळवी करून घेतलीं होतीं कीं, प्रार्थना व उद्बोधन यांचे वेळी आम्हीं बेसुमार रडरड रडावें ! डोळ्यांतून एकसारख्या अश्रुधारा वाहात राहणे, ह्यातच भक्तीचा परिपाक आहे, असे त्यावेळी आम्ही समजत होतों. लहानपणीं देव आपल्याला कसा समजेल, असे मला वाटे. आमच्या देव्हाऱ्यांतील ठाकुरजीबद्दल घरची मडळी फार आदराने व भक्तीने बोलताना मी बाळपणी ऐकत असे; तेव्हां मलाही त्यांच्याबद्दल मोठा आदर व वचक वाटे. बाळपणीं कित्येक वेळां मला आनंददायक असा दिव्य प्रकाशही दिसे. परतु त्या वेळीं त्या प्रकाशाचा खरा प्रकाश माझे चित्तांत पडला नाहीं; परंतु

जीवाची जीवनकला हेंच परमेश्वराचें रूप असे मीं जेव्हां नंतर जाणले, तेव्हां पूर्वी अज्ञात असलेले परमपुरुषाचे स्वरूप नंतर मला कळून आले. त्यास मीं जाणले व त्याची मी पूजा करूं लागलो." प्रतापचद्र आणखी असें म्हणतात कीं, " माझे सर्व शिक्षण, माझे वक्तृत्व, किंबहुना माझ्या सर्व बौद्धिक व नैतिक क्रिया यांचा पाया माझ्या एका धार्मिक वृत्तीत आहे. आणि एका निस्सीम धर्मभावनेने अशीं अनेक माणसें तयार होऊ शकतील याबद्दल मला मुळींच शंका नाही."

प्रतापचंद्र यांच्या शिक्षणाची काळजी घेणारे त्याच्या लहानपणीं कोणीच नव्हते. ह्या पोरक्या मुलाला घरींदारी ममतेचा व सहानुभूतीचा नुसता शब्दही ऐकावयास मिळत नसे. अशा स्थितींत एका भोळ्या धर्मभावनेच्या जोरावर ते पुष्कळच नावलौकिकास चढले. नवविधानाच्या धर्मकार्यासाठीं ते इंग्लंडास चार वेळा व अमेरिकेत तीन वेळां जाऊन आले. ते जपानातही गेले होते. शिकागो येथील सुप्रसिद्ध धर्मपरिषदेत प्रतापचंद्र याची अनेक लोकप्रिय अशीं व्याख्याने झाली. त्याच्या ह्या सफरींत त्यांनी मॅक्स मुल्लर, मार्टिनो असे अनेक प्रसिद्ध तत्त्ववेत्ते, व अनेक बडे अधिकारी व राजकारणी पुरुष ह्यांचा स्नेह सपादन केला. त्याचे परदेशस्थ स्नेही येथील स्नेह्यांपेक्षा संख्येने कदाचित् अधिकच भरतील. त्याचे अमोघ वक्तृत्व व उदात्त विचार ह्यानीं अमेरिका व युरोप येथील जाडे विद्वान् लोकही अत्यंत संतुष्ट झाले. त्यांच्यापैकीं कोणास प्रतापचंद्रांच्या ठिकाणीं गूढ आध्यात्मिकता आणि कुशाग्र व ठाम अशी बुद्धिमत्ता याचा फारच सुंदर मिलाफ दिसे. आणि म्हणून त्यानी त्यांच्या देशांत केलेल्या लोकसेवेबद्दल ते फार कृतज्ञता दाखवीत. अखिल मानवसमष्टीचे दिव्यदृश्य त्यांनी पाश्चात्यांच्या दृष्टीपुढे उभे केले. आणि मग त्या उचंबळलेल्या व्यापक दृष्टीच्या ओघांत पूर्वपश्चिमेतील सीमा नाहीशा केल्या असे ते म्हणतात. हे पाश्चात्याच्या तोंडचे गोडवे ऐकण्याला मोठे मोहक व गोड वाटतात. गर्भश्रीमान् अशा पाश्चात्यांच्या ठिकाणीं 'वचने किम् दरिद्रता !' असो. इतके खरे कीं, केशवचंद्रांच्या अनुयायांत प्रतापचंद्र हे अत्यत उदारमतवादी म्हणून गणले जात असत. प्रथम कांहीं काळ केशवचंद्राच्या विचारांहून भिन्न असे प्रतापचंद्रांचे कांहींच विचार नसत. परंतु पुढेंपुढें त्यांचीं स्वतंत्र व्याख्यानें व लेख प्रसिद्ध होऊ लागले, तेव्हां 'व्यक्ति तितक्या प्रकृति' ह्या न्यायानें त्यांच्या

विचाराची मांडणी भिन्न दिसूं लागली. प्रतापचंद्र इंग्रजी कादंबऱ्या वाचण्याचे मोठे शौकी होते. तसा त्यांना तत्त्वज्ञानाचा नाद होता की नाहीं, हें सांगवत नाहीं, तथापि त्यास तत्त्वज्ञानी म्हणतां येईल असे मात्र वाटत नाहीं. ते जाडे लेखक होते. त्याचे पहिले पुस्तक ब्राह्म-समाजाचा धर्म व त्याची वाढ ह्या नांवाचे प्रसिद्ध झाले. मनुष्यमात्राचे ठिकाणी उपजतच असणाऱ्या धर्मभावनांत खरे धर्मबीज असते, असें त्या पुस्तकांत त्यांचे म्हणणे आहे. विवेचक बुद्धीपेक्षां श्रद्धेवरच त्यांची जास्त भिस्त दिसते. धर्माची वाढ, बाहेरच्या बुद्धिवानांचे वादविवाद व पांडित्य यांवर अवलंबून नसून, ती जीवाच्या अंतर्गत होत असते, असे त्यांचे म्हणणें आहे. त्याप्रमाणे धर्माचे ज्ञान व त्याचा परिपाक ही गोष्ट ज्याच्या त्याच्या स्वाधीनची व अंतरंगांतील असली तरी साधकास बाहेरचे मार्गदर्शक दृश्य असे काहींतरी लागतेच. असे मार्गदर्शक ईशप्रेषित जगात अवतीर्ण होत असतात. मात्र त्यांत खरे कोण व भोंदू कोण यांची निवड करणे कठीण असते. तरी नवविधानाचे ईशप्रेषित हे श्रद्धेय आहेत असा त्यांच्या म्हणण्यांतील मथितार्थ दिसतो.

'ओरिएन्टलख्राइस्ट' आणि 'धी स्पिरीट ऑफ गॉड' हीं येशु ख्रिस्ताबद्दलची त्यांचीं दोन महत्त्वाचीं पुस्तके आहेत. त्यांत केशवचंद्राच्या त्रयीवादाचा त्यांनीं अनुवाद केलेला नाही. तसेच आजपर्यंत अवतीर्ण झालेल्या अनेक धर्मो-पदेशकांपैकी तो एक आहे असेही केशवचंद्राप्रमाणे म्हणणे त्यांस कबूल नाही. प्रतापचंद्रांचे म्हणणे येशु ख्रिस्त हा मानवकोटीचा एकच एक सर्वोत्कृष्ट नमुना आहे. ज्याच्या ठिकाणी मानवाचे चांगुलपणाची परमावधि झाली, असा येशु ख्रिस्त हा एकच मनुष्य कोटीतील देवपुत्र आजपर्यंत निर्माण झाला. यास्तव अखिल मानव जगांतील सर्व धर्मांचे एकीकरण ह्या मानवकोटीच्या केंद्रीभूत असलेल्या पुरुषोत्तमाचे ठिकाणीच झालेले आपल्याला पाहाण्यास सांपडेल! ह्याप्रमाणे प्रतापचंद्रांची ख्रिस्तनिष्ठा केशवचंद्राहूनही वरचढ होती असे दिसतें.

आपल्या अध्यात्मशास्त्राचीही त्यांस गोडी होती, नाही असे नाहीं. तथापि वेदान्तांतील अद्वैतवाद त्यांस मुळींच ग्राह्य नव्हता. आपल्या शास्त्रांतील सत्, चित्, आणि आनंद ह्या त्रिगुणांचीं द्योतक अशी ब्रह्मन, परमात्मन् व भगवान् अशीं देवाचीं त्रिविध कार्यात्मक तीन नांवे त्यांनीं

ठरविलीं होतीं. आणि कोणत्याही धर्मातील ईश्वराची कल्पना ह्या त्रिविध प्रकारांच्या बाहेर जाऊं शकत नाहीं, असें ते म्हणत. वरील त्रिप्रकारांपैकीं सत् ह्या तत्त्वाचे वर्णन हिंदूंचे वेद व खिस्तांचा जुना करार यांत आहे. चित् ह्या तत्त्वाचे वर्णन उपनिषदें व सेटपालचीं पत्रे यांत आढळते, आणि आनंद ह्या तत्त्वाचीं वर्णनें हिंदूंचीं पुराणे व खिस्तांची गॉस्पेल्स ह्यांत आहेत, अशी त्यांनीं जुळवाजुळव केली आहे. आत्म्याच्या अमृतत्वावर त्यांची श्रद्धा होती. आणि ईश्वराच्या दयालुत्वांतच मानवी प्रेमाचा उदय होतो, ह्यामुळे मानवी प्रेम हेही ईशप्रेमाप्रमाणे अमर्याद होऊं शकते. कुटुंबसेवा, समाजसेवा, देश-सेवा ह्यांचे रहस्य यांत आहे असे ते म्हणत. प्रेम हें अमर आहे, आणि इहलोकींच्या प्रेमी माणसांच्या भेटी मरणोत्तर परलोकीं होतात, अशी त्यांची निष्ठा होती.

प्रतापचंद्रांचें व्याख्यान किंवा उपासना म्हणजे श्रोत्यांना एक सर्वोत्कृष्ट मेजवानीच असे. वक्तृत्वाप्रमाणे लेखनकलेतही ते परमनिष्णात होते. वरील ग्रंथांशिवाय त्यांचें केशवचंद्राचे इंग्रजी चरित्र, हार्टसबीट्स् इत्यादि ग्रंथ प्रसिद्ध आहेत. "आशी" ह्या नांवाचे त्यांचे शेवटले बंगाली लेखही फार उत्कृष्ट वठले आहेत, असे म्हणतात. तरुणास उच्च प्रतीचे शिक्षण देण्याची व्यवस्था रहावी म्हणून त्यांनी आपल्या आयुष्याच्या अखेरीस फार खटपट केली. कलकत्याचे युनिव्हर्सिटी इन्स्टिटयूट हें त्याच खटपटीचें दृश्य फळ आहे. मुंबईच्या ब्राह्म कुटुंबांत केशवचंद्रांपेक्षांही प्रतापचंद्र हे अधिक परिचित असतील. कारण मुंबईच आपले घर समजून मुंबईत ते बरेच दिवस येऊन राहिल होते. आणि मुंबईच्या प्रार्थनासमाजाचा तो आरंभकालच असल्या-मुळे त्याच्या येथे राहण्याचा प्रार्थनासमाजास बराच उपयोग झाला असावा, असे उघड दिसतें. भाई गौरगोविंद व अमृतलाल ह्या ब्राह्मप्रेषितांच्या सहकारितेने मंगळूर व मद्रास येथील समाजांतही त्यांनीं बरेच नवजीवन उत्पन्न केले.

केशवचंद्र सेन वारले, तेव्हा प्रतापचंद्र विलायतेस होते, ते तेथून परत आल्यावर पाहतात तो भारतवर्षीय ब्राह्मसमाजांत अनेक बखेडे माजून राहिले होते. केशवचंद्रांच्या आचार्यपदाचा मान प्रतापचंद्रांस मिळावा, असें म्हणणारीं एक पक्ष होता, तर दुसरा पक्ष ज्याची योग्यता त्यासच, असें

म्हणून आचार्यपदाची गादी तशीच रिकामी ठेवावी, असे म्हणणारा होता. ह्याशिवायही आणखी दोन स्वतंत्र पंथ होतेच. ह्या सर्वांचा मेळ घालण्याचा प्रतापचंद्रांनीं प्रयत्न केला, पण तो फुकट गेला. त्याचप्रमाणे साधारण ब्राह्म-समाजाचे अध्यक्ष आनदमोहन बोस व आदि-ब्राह्मसमाजाचे मुख्य देवेंद्रनाथ व द्विजेंद्रनाथ ठाकूर याचा व प्रतापचंद्र याचा उत्कृष्ट स्नेह असल्यामुळे ब्राह्मसमाजाच्या सर्व शाखा एकत्र करण्याचाही त्यांनीं प्रयत्न केला; परंतु दोन तीन जोड-उत्सव करण्यापलीकडे त्यांतही त्यांस यश आले नाही.

प्रतापचंद्रांच्या संप्रदायबंधूंनी त्यांस योग्य रीतीने वागविले नाहीं. तथापि नवविधान ही धर्मसंस्था म्हणजे आपल्या एका बालमित्राचे महत्कार्य आहे, ते खालीं पडूं द्यावयाचे नाही, असा त्यांच्या मनाचा उत्साह होता. प्रतापचंद्र हे श्रीरामकृष्ण परमहंस यांचेकडे वरचेवर जात असत. केशवचंद्र वारल्यावर एक दिवस ते रामकृष्णाचे दर्शनास गेले असता, ते त्यास म्हणाले, " ह्या जगाचा तुम्ही आजवर पुरेसा अनुभव घेतला. आता ह्या संस्था, आणि समाज, व्याख्याने आणि वादविवाद पुरे झाले नाहीत काय ? तुमच्या जीवाला ह्याचा कंटाळा आला असेल. आता तरी एका ईश्वरावर निष्ठा ठेवण्याची वेळ झाली नाहीं काय ? तुम्हीं आता ईशप्रेमाच्या अविनाशी समुद्रांत खोल खोल बुडी मारून राहावे, हेच योग्य दिसते." ह्यावर प्रताप-चंद्र म्हणाले, " होय, होय. आपण म्हणतां तीच गोष्ट जरूर केली पाहिजे, ह्यांत शका नाही. परंतु केशवाचे कार्य मागे पडूं नये, इतकेच मला राहून राहून वाटते." त्यावर श्रीरामकृष्ण म्हणाले, " केशवाची संस्था सुरू ठेवावी असे तुम्हाला वाटते काय ? ठीक आहे. आणखी थोडे दिवस थांबा म्हणजे हेच तुमचे विचार पालटतील, नंतर त्यांनीं एक गोष्ट सांगितली. एक मनुष्य एका खडकावर मोठ्या कष्टाने झोपडे बांधून सुखाने राहिला होता. लवकरच एक दिवस वादळ सुरू होऊन ते झोपडे डोलूं लागले. तेव्हा, हे मरुता, माझे झोपडे पाडूं नकोस, अशी त्याने वायुदेवतेची प्रार्थना केली. परतु वाऱ्याचा सोसाटा कमी होईना व झोपडे तर कोसळण्याच्या बेतात आले. तेव्हां त्या युक्तिवानानें अशी प्रार्थना केली कीं, " हे बाप्पा, हे घर तुझा पुत्र हनुमान ह्याचे आहे, तें पाडूं नकोस." परंतु वादळ कमी होईना. "अहो, हें मारुतीचें घर आहे." असा त्यानीं पुष्कळ आक्रोश केला पण व्यर्थ. मग त्यानें

" हें घर लक्ष्मणाचें आहे." असा बहाणा केला. त्याचाही जेव्हां उपयोग होईना तेव्हा शेवटीं " अहो, हे घर प्रत्यक्ष प्रभु रामचंद्रांचे आहे. हे वायु-देवा! ह्यास धक्का लावूं नकोस." असेंही तो म्हणाला, परंतु सारें व्यर्थ. घर अगदीं कडाडण्याच्या बेतांत आले. आपल्या विनवण्यांचा कांहींच उपयोग न होतां घर पडूं लागले असे पाहतांच तो मनुष्य चटकन् घराबाहेर पडला, आणि चरफडत म्हणाला, " हे खास सैतानाचेच घर आहे." ही उद्बोधक गोष्ट सांगितल्यावर श्रीरामकृष्ण प्रतापचंद्रांस म्हणाले की, " केशवाचे नांव राखण्याची तुम्हाला उत्कंठा असेल; परंतु असा विचार मनाशीं करा कीं, केशवाची संस्था जी अस्तित्वांत आली ती ईशाचेच संकल्पाने, आणि त्यासंस्थेचे दिवस भरले असतील, तर तीही त्याचीच इच्छा. ह्यासाठी तुम्ही आपले ह्या अमृतत्वाचे समुद्रांत बुडी मारून सुखी व्हा, हेच योग्य." ह्या संवादानंतर पुढे प्रतापचंद्र बरींच वर्षें हयात होते. व त्या मुदतीत त्यांच्या कार्याचा व्यापही लहानसहान नव्हता. तथापि प्रतापचंद्रांच्या आयुष्याचे अखेरचे दिवस त्यांनीं आपल्या शैलाश्रमीं एकान्तवासातच काढले. त्यावरून व त्यांच्या आशी नामक लेखावरून असे दिसते कीं, ते अखेर कर्मनिवृत्त होऊन गतकालचा आढावा व मरणोत्तर-कालचा विचार यातच मग्न झाले असावे. पुढे तारीख २७ मे सन १९०५ रोजीं ते परलोकवासी झाले. त्यांच्या स्मशानयात्रेला ब्राह्मसमाजाच्या उभय शाखांचे पुढारी व इतर बडे गृहस्थ हजर होते. त्याची अखेरची मिरवणूक साधारण-ब्राह्मसमाज मंदिराशीं आली, तेव्हां साधारण-ब्राह्मांच्या स्त्रिया बाहेर येऊन त्यांनीं त्या ब्राह्मपुढाऱ्याचे शवास योग्य तो मान दिला. अशा रीतीने नवविधानाचा एक उपचंद्र कांही काल लोकांचे चित्त आकर्षित करून दिवंगत झाला!

---



**ब्रह्मानंद केशवचंद्रांच्या नवविधानाचे धर्मप्रेषित.**

गौरगोविंद, केदारनाथ, वंगचंद्र, प्यारीमोहन, प्रतापचंद्र, अघोरनाथ, गिरीशचंद्र, महेंद्रनाथ, केशवचंद्र, रामचंद्र, कांतिचंद्र (उभे), अमृतलाल, प्रसन्नकुमार, दिनानाथ, त्रैलोक्यनाथ, उमानाथ.

## प्रकरण बारावें

# केशवचंद्रांचे मुख्य अनुयायी

केशवचंद्रांची तरुण बंगालवर उत्तम छाप बसली होती. आणि त्यांतूनच निवडक मंडळी आपल्याकडे ओढून घेण्याची कला त्याना फारच चांगली साधली होती. अशा मंडळीचीच इ. सन १८६० सालीं संगतसभा स्थापन झाली. त्यांतून १८६७ सालीं ब्राह्मिशनरी अथवा प्रचारकसंघ निर्माण झाला. १८७१ सालीं भारत-आश्रम त्यांनीच काढला. आणि पुढे १८७७ सालीं नवविधानाच्या प्रेषितसंघांतही यांपैकीच कित्येक कट्टे अनुयायी दाखल झाले. पुढे केशवचंद्रांच्या लिली कॉटेजच्या शेजारीच त्याची वसाहत होऊन ती मंगळवाडी ह्या नांवाने प्रसिद्ध झाली.

केशवचंद्रांचे प्रथमपासूनचे सर्वच अनुयायी त्यास अखेरपर्यंत टिकून राहिले असे नाहीं. कुचबिहारच्या लग्नाच्या निमित्ताने ज्या वेळीं फूट पडली. त्या वेळीं त्यांचे कित्येक अनुयायी व सहकारी त्यांस सोडून गेले. तथापि त्याही प्रसंगानंतर त्यांस पुढारी म्हणून अनुसरणारे कित्येक अनुयायी होतेच. त्यांची केशवचंद्रांवर निस्सीम भक्ति होती, व केशवचंद्रांसही त्याच्यावांचून चैन पडत नसे. ही सर्व मंडळी घरची गरीब असून त्यांचे शिक्षणही अगदीं बेताचेच होतें. तथापि पुढें केशवचंद्रांच्या नानाविध चळवळीचे नेतृत्व जसजसे त्यांच्याकडे येत गेले, तसतसे त्यांतून कित्येक प्रचारक, कित्येक उपदेशक, कोणी लेखक तर कोणी कवि, कोणी भक्त म्हणून प्रसिद्धीस आले.

अशा रीतीने त्या प्रत्येकाने जरी आपली खरी योग्यता जगाच्या निदर्शनास आणली, तरी त्यांच्या व त्यांचे पुढारी केशवचंद्र सेन यांच्या बुद्धिवैभवांत बरेंच अंतर असल्यामुळें, हरघडी केशवचंद्रांच्या सल्ल्याशिवाय त्यांचें पाऊल पडत नसे. अशा रीतीनें एका व्यक्तीच्या पूर्ण हुकमतींत हा अनुयायी संघ बरींच वर्षें वागत आल्यामुळें ब्राह्मांनीं निंद्य म्हणून मानलेला गुरुसंप्रदाय केशवचंद्रांनीं सुरू केला, असा त्यांच्यावर बाहेरच्या ब्राह्म-मंडळींचा नेहमीं आक्षेप असे. उलटपक्षीं वरील मंडळींपैकीं प्रत्येकानें आपआपल्या स्वतंत्र बुद्धीच

प्रमाणें वागावें त्यांत आपण ढवळाढवळ करूं नये, असा केशवचंद्रांचा विशेष कटाक्ष होता. यामुळे एकाची स्वतंत्र प्रेरणा दुसऱ्याच्या प्रेरणेशी क्वचितच जमल्यामुळे ह्या मतस्वातंत्र्याच्या संप्रदायांत हमेश चुरस, द्वेष व बखेडे माजत; आणि केशवचंद्रांस आपल्या सर्व अनुयायांस एकमताने वागण्यास लावतां येत नाहीं, असाही त्याच्यावर आक्षेप येत असे. हा मतभेदाचा लढा केशवचंद्रांस अखेरीस अत्यंत दुःखप्रद झाला, व त्यांच्या पश्चात् तो भारतवर्षीय समाजाच्या अपकीर्तीस कारण झाला. असे होण्यास व्यक्तीव्यक्तींतील कोणते दोष कारण झाले, त्याची विशेष चिकित्सा करण्याचे येथें कारण नाही. तथापि स्थूलमानाने पाहतां नवविधानाचे खरें रहस्य आपल्याला समजले तसेंच ते आहे; केशवचंद्रांचे ईप्सित आपणच काय ते खरें जाणतो; इत्यादि प्रकारच्या मताचा अभिनिवेश व महत्त्वाकांक्षा हीच या बखेड्याचीं मुख्य कारणें होत. जगांत असा एकही धर्मपंथ अगर संप्रदाय दाखवितां येणार नाही, की ज्याच्या अनुयायात वरील दोष नाहींत. कोणताही धर्मपंथ अगर संप्रदाय ह्याच्या पायाच्या दगडाबरोबरच त्याच्या नाशाचीं बीजे नकळत पुरली जात असतात, अशी ही ईश्वराची नियति आहे. यास्तव वरील दोषाचे अधिक उद्घाटन येथें न करिता ह्या कर्तृत्ववान् धर्मप्रेषितांचा वाचकांशी अल्प परिचय करून देण्याचा आम्ही प्रयत्न करतो. नवविधान पंथातील ह्या प्रेषिताची सर्वांचींच सविस्तर चरित्रे येथें देतां येणे शक्य नाहीं. तथापि त्यापैकीं कित्येकाची त्रोटक माहिती खाली देत आहोत.

एखाद्यास उजवे हात दोन आहेत, असें म्हणता येत असेल तर प्रतापचंद्रांप्रमाणे अघोरनाथ गुप्त ( इ. सन १८४१-८१ ) हेही केशवचंद्राचे उजवे हात होत, असें म्हणतां येईल. भक्त विजयकृष्ण गोस्वामी ह्यांनी जे कित्येक तरुण ब्राह्मसमाजांत ओढून घेतले, त्यांपैकींच अघोरनाथ हे एक होते. ते कॉलेजमध्ये असताच–त्याच्या वयाच्या बाविसाव्या वर्षीं त्यानीं ब्राह्मधर्माची दीक्षा घेतली. आणि त्यांनीं आपले सर्व आयुष्य धर्मकार्यासाठींच खर्च केलें. त्याची कामाची धडाडी फारच मोठी होती. अध्यात्मशास्त्रांतील गूढरहस्यें ते सांगू लागले, कीं श्रोत्यांची मने आपल्याकडे फार जोराने ओढून घेत. नवविधानाच्या सर्व साधकांचे ते अग्रणी होते. केशवचंद्रांनीं केलेल्या साधकांच्या चतुर्विध प्रकारांत त्यांस योगाची दीक्षा दिली होती. तथापि

योग, भक्ति, कर्म आणि ज्ञान या सर्वांचा समुच्चय त्यांच्यापुढें ध्येयरूपानें होता; यामुळे त्यांच्या उपासनेत अद्भुत जादू भरली आहे असे वाटे. नवविधानाचे निशाण हातीं घेऊन धर्मप्रसारार्थ उत्तर हिंदुस्थानात ते दूरवर हिंडले. सिंधांतील वाळवंट व पंजाबांतील पहाडी मुलख ओलांडून ते पलीकडे गेले. ते जेथे जेथे जात तेथे तेथे हजारो माणसे त्यांच्या भोवती गोळा होत. निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास करण्यास केशवचंद्रानी आपल्या अनुयायांस सांगितले, त्यात अघोरनाथानी बौद्ध धर्माचा अभ्यास केला व शाक्यमुनीचें चारित्र प्रसिद्ध केले. धर्मसुधारणेप्रमाणे समाजसुधारणेतही ते बरेच पुढे गेले होते. त्यानी एका विधवेशी विवाह केला होता. व ती विधवाही भिन्न जातीतील पसंत केली होती. तथापि साधु अघोरनाथ ही असामान्य पदवी जी त्यांनीं संपादन केली, त्याचे कारण आध्यात्मिक दृष्टीने त्याची योग्यता श्रेष्ठ दर्जाची होती असे म्हणतात.

अमृतलाल बोस (इ. सन १८३९–१९१३)—हे नवविधानाचे तिसरे एक आधारस्तंभ होत. त्यांच्या प्रचंड उत्साहाने समाजांत चांगली जागृति राहिली. भारतवर्षीय ब्राह्ममंदिर हे त्यांच्या अविश्रांत श्रमाचेच एक स्मारक आहे. केशवचंद्रांचे ते एक कट्टे अनुयायी होते. त्याच्या वाणीत तेज होते, आणि अंतःकरणात भक्तीचा ओलावा असे. यामुळे त्यांच्या कीर्तनात स्पष्टोक्ति, कळकळ व प्रेम यांचा चांगला मिलाफ असे. श्रीरामकृष्ण परमहंसाकडे हमेश जाणाऱ्या ब्राह्मभक्तांत हे एक असावेत असे वाटते.

महेंद्रनाथ बोस (इ. सन १८३८–१९१५)—हे खिस्ती होण्याचे मार्गास लागलेले एक गृहस्थ केशवचंद्र यांच्या जाळ्यात सांपडले. आणि पुढे ते नवविधानाचे एक प्रेषित होऊन त्याचे एकनिष्ठ सेवक बनले. त्यांच्याकडे वर्तमानपत्राच्या संपादकाचे काम असे. बायबल हा त्यांच्या अभ्यासाचा आवडता विषय होता. शिवाय त्यांनी बंगालीत नानकाचेही चरित्र लिहिले; व शीख धर्माचाही त्यांनीं अभ्यास केला.

उमानाथ गुप्त (इ. सन १८३९–१९१८)—हे एक केशवचंद्रांचे निस्सीम भक्त होते. केशवचंद्रांचा प्रत्येक शब्द त्यांस वेदतुल्य होता. केशवचंद्रांचे प्रत्येक कृत्य त्यांस मार्गदर्शक वाटे. इतकेच काय; पण केशवांच्या पदधूलीने पुनीत झालेली जागा त्यांना पुण्यक्षेत्राप्रमाणें

पवित्र वाटे, केशवांच्या चतुर्विध साधकांत उमानाथ हे सेवक ह्या कोटींतील होते. उमानाथ आपल्या भोळ्या भावाच्या आनंदांत सदा बेडावलेले असत. वादविवाद त्यांस फोल वाटत. सुलभसमाचार, धर्मतत्त्व, बालकबंधु इत्यादींचें संपादकत्व कांहीं काल त्यांच्याकडे होतें. तथापि गुरुजींची सेवा करावी व बालवृत्तीच्या आनंदांत रमावें, हे त्यांच्या चरित्रांतील खरें रहस्य होय.

उपाध्याय गौरगोविंद—हे एक पोलीस अंमलदार होते. कर्मधर्मसंयोगाने त्यांच्या ठिकाणी सन्यस्त वृत्ति जागृत होऊन ते नवविधानाचे अत्यंत नम्र असे एक भक्त झाले. त्यांचा विद्याव्यासंग फार दांडगा असे. केशवचंद्रांनीं त्यांस हिंदुधर्माचा अभ्यास करण्यास सांगितले होते. आणि त्यांनींही सर्व आयुष्य ह्याच कामांत खर्ची घातले. वेद, उपनिषदें व पुराणे यांतील निवडक माहिती केशवचंद्रांस देण्याचे काम ह्यांचेकडे असे. चतुर्विध साधकांत हे ज्ञानी साधक म्हणविले जात. श्रीकृष्णाचे चरित्र, गीतासमन्वयभाष्य, वेदान्तसमवाय, श्रीमद्गीताप्रपूर्ति इत्यादि त्याचे ग्रंथ प्रसिद्ध असून त्यांनीं लिहिलेले केशवचंद्रांचे बंगाली चरित्र सर्वोत्कृष्ट झाले आहे असे म्हणतात.

कांतिचंद्र मित्र (इ सन १८३८–१९१७)—ह्यांस दुर्दैवाने स्वतांचे नातेवाईक असे एकही मनुष्य न राहिल्यामुळें ईश्वराने केशवचंद्र याची सर्व कुटुंबव्यवस्था त्यांचेकडे सोपविली. ते लवकरच केशवचंद्रांच्या मुलांबाळांचे "काका" झाले. इतकेच नव्हे, तर नवविधानाच्या सर्व धर्मप्रचारकांचे ते "काकाबाबू" होऊन, सर्वांच्या घरची व्यवस्था पहावी व त्यांचेकडे सोपविलेले काम करण्यास त्यांस पूर्ण निर्वेधपणा द्यावा, हेच ह्या "काकाबाबूंचे" एक व्रत असे. सर्वांच्या गरजा भागवाव्या, सर्वांच्या सुखसोयीकडे पाहावे, सर्व संस्थेचा पत्रव्यवहार चालवावा, हिशेब लिहावे, या सर्व कामांत त्यांस रात्रीच्या रात्री जागून काढाव्या लागत, अतिशय कष्ट सोसावे लागत; परंतु घरचें मनुष्य ज्या आस्थेनें ह्या गोष्टी करील त्याहीपेक्षां कान्तिचंद्र मित्र याची आस्था अलौकिक असे. कान्तिचंद्र ह्यांनीं पीठावर बसून चार उपदेशाच्या गोष्टी सांगण्याची कधींच महत्त्वाकांक्षा धरली नाहीं. "सेवा" ह्या एका शब्दांत धर्माचें सर्व रहस्य आलें असे त्यांस वाटे. नवविधानपंथांतील ह्या जनमित्राच्या प्रेमवृत्तीचे एकच लक्षण सांगितले असतां पुरे. त्यांस कोणीही मनुष्य भेटावयास आलें तर नवीन पद्धतीचें हस्तांदोलन अथवा जुन्या पद्धती–

च्या नमस्कार ते कधीच करीत नसत; तर प्रेमाने त्यांचे दोन्ही बाहू पुढें होत, आणि भेटीस येणाऱ्या मनुष्यास आलिंगन देऊन ते कडकडून भेटत, तेव्हां त्याचे समाधान होई.

त्रैलोक्यनाथ सन्याळ (इ. सन १८४०-१९१६)— ही भारतवर्षीय ब्राह्मसमाजांतील एक आनंदमूर्ति होत. ईश्वराने केशवचंद्रांच्या मनांत एकीकडे प्रेरणा करावी, व लगेच त्याचा सुंदर प्रतिध्वनि त्रैलोक्यनाथांचे कंठांतून काव्यरूपाने बाहेर पडावा, अशी ही अपूर्व जोड नवविधानपंथास लाभली होती. त्रैलोक्यनाथ हे जसे शीघ्र कवि तसे उत्तम गवईही होते. त्यांची ती उंच व भव्य मूर्ति खड्या सुरांत भजन सांगत पुढे चालली आहे, अशा नगर-संकीर्तनाच्या अत्यंत चित्ताकर्षक मिरवणुकी सतत चाळीस-पन्नास वर्षे कलकत्ते-करांनी पाहिल्या आहेत. ते श्रीरामकृष्ण परमहंसाकडे हमेश जात असत. ते गाऊं लागले, की परमहंसांची हटकून समाधि लागे. केशवचंद्र आपल्या अखेरच्या दुखण्यांत अगदीं अखेरीस त्रैलोक्यनाथाच्या गळ्याला मिठी मारून म्हणाले, "त्रैलोक्यनाथ, तुझीं ही मधुर गीतें मला पुढे कोठे ऐकायला मिळतील?" त्यांच्या ह्या अलौकिक गुणांमुळे त्रैलोक्यनाथ ह्या मूळच्या एका सामान्य नाटक्यास पुढे चिरंजीव ही अन्वर्थक पदवी मिळाली.

प्रसन्नकुमार सेन (इ. सन १८३८-१९१५)—हे केशवचंद्र सेन ह्यांचे एक खास मदतनीस होते. ते त्यांच्या तैनातीस सदा तत्पर असत. केशव-चंद्र यांच्या बरोबर ते इंग्लंडासही गेले होते. केशवचंद्रांच्या हरएक चळ-वळींत आणि त्यांच्या पश्चातही केशव ॲकेडमी, केशवाश्रम, इत्यादि संस्था काढण्यांत त्यांनी अतोनात खटपट केली आहे. त्यांच्या अंगीकृत कार्यांतील उल्हास पाहून त्यांस केशवचंद्र "कार्योद्धार" असें म्हणत असत.

गिरीशचंद्र सेन (इ. सन १८३५-१९१०)— हे नवविधान पंथाचे एक बडे मौलवी होते. हिंदी, खिस्ती, बौद्ध आणि इस्लामी अशा चार धर्मांचा खोल अभ्यास करून त्या प्रमुख अशा चारी धर्मांचा ज्यांत समन्वय होईल, असा सार्वत्रिक नवविधान पंथ काढण्याचे जेव्हा केशवचंद्रांनी मनांत आणलें, तेव्हां त्यांनीं निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास करण्यास निरनिराळ्या अनुयायांस सांगितले. त्यांत गौरगोविंद यांनी हिंदु धर्माचा, प्रतापचंद्र यांनीं खिस्ती धर्माचा, अघोरनाथ ह्यांनीं बौद्ध धर्माचा अभ्यास केला; त्याचप्रमाणे

गिरीशचंद्र ह्यांनीं आपली चाळिशी उलटल्यावर मुद्दाम लखनौ येथे जाऊन पर्शियन व आरेबिक या दोन भाषांचा अभ्यास केला. आणि त्यांनीं कुराणादि लहानमोठ्या तीस इस्लामी ग्रंथांचीं बंगालीत भाषांतरें प्रसिद्ध केलीं. त्यासाठीं त्यास अहोरात्र मेहनत घ्यावी लागली! इतक्या परिश्रमानें तयार केलेल्या ग्रंथांवर आपले नांव प्रसिद्ध करण्याचीही त्यास महत्त्वाकांक्षा नव्हती. धर्मप्रचारक म्हणून त्यानीं साऱ्या हिंदुस्थानात व ब्रह्मदेशातही संचार केला. याशिवाय महिला ह्या नावाचें एक स्त्रियाचें मासिकही ते चालवीत असत. तथापि नवविधानाचे मौलवी हे त्याच्या चरित्राचें सार आहे. कुराणादि ग्रंथाच्या दृढाभ्यासानें महमद पैगंबराबद्दल त्यांची भक्तिही इतकी दृढावली की, त्यांच्या आत्मजीवन नामक आत्मचरित्रात ती उत्कृष्ट प्रतिबिंबित होऊन ते केवळ भाषाज्ञानानेच नव्हे, तर अंतरीच्या भक्तीनेही खरेखुरे मौलवीच बनले.

भारतवर्षीय ब्राह्ममंदिराच्या खालोखाल नवविधान पथांत मोंगीर येथील ब्राह्ममंदिराचे महत्त्व आहे. कारण एका काळीं तेथें जी भक्तीची भरती उसळली होती, ती केवळ अपूर्व होती. तेथील ब्राह्ममंदिर ज्याच्या खटपटीनें बांधलें गेलें, ते दीनानाथ मुजूमदार ( इ. सन १८३९–१९१७ ) होत. ह्यांनीं मोंगीर, वायव्येकडील प्रांत, बहार वगैरे ठिकाणीं धर्मप्रचारकाचें काम फार उत्कृष्ट रीतीनें केलें. नुसतीं व्याख्यानें न देतां प्रत्येक घरोघर हिंडून घरांत रोजची उपासना व अनुष्ठानपद्धति याची शिस्त घालून देण्यात त्यानी पराकाष्ठेची काळजी घेतली. घरोघरी मुलास नैतिक वळण मिळावें व अज्ञान मुलास धर्मप्रवेश नामक दीक्षा देऊन त्यांसही मार्गारूढ करावें, अशी त्याची शिस्त असे. ह्या जिकिरीच्या कामात त्यांच्या सहधर्मचारिणीची त्यांस उत्तम मदत असे. त्याची मुलें फार मधुर स्वभावाचीं व अत्यंत सच्छील अशी होतीं. गृहस्थाश्रमधर्माचरणानें संसार कसा धन्य करावा, हे स्वतांच्या उदाहरणानें त्यांनीं लोकांस दाखविलें. दुर्दैवानें त्यांचीं प्रौढदशेस आलेलीं सहा मुलें एकामागून एक त्यांच्या देखत मरण पावलीं. तथापि ईश्वराच्या दयालुत्वाबद्दल त्यांची श्रद्धा अढळ राहिली. नवविधानसांप्रदायिकांत दीनानाथ म्हणजे एक सौजन्याची मूर्तिच होती. ह्यांचे आजोबा हे एक जुन्या चालीचे वैराग्यशील सत्पुरुष होते. त्यांच्याच साहचर्यात दीनानाथ यांचे पूर्ववय गेलें असल्यामुळें, त्यांच्या शीलसंवर्धनास तेच संस्कार विशेष उपकारक झाले.

डाक्का हे पूर्वबंगाल्यांतील ब्राह्मपंथाच्या चळवळीचे एक प्रमुखस्थान आहे. कलकत्त्याच्या भारतवर्षीय समाजाचे आचार्य जसे केशवचंद्र सेन, तसे डाक्याचे उपाचार्य बगचंद्र ( इ. सन १८३९-१९२२ ) हे होत. ते परम मातृभक्त होते. त्याच्या मातृभक्तीचा परिपाक ईशशक्तीस मातृभावाने शरण जाण्यांतच झाला. पूर्वबंगालच्या दासमडळीचे ते एक पुढारी होते. आणि कलकत्त्याचा प्रतिध्वनि पूर्वबगाल्यात जशाचा तसा उठविण्याचे काम ते तत्परतेने करीत असत. त्यानी आपल्या दीर्घायुष्याची सतत साठ वर्षे त्याच्या मातृदैवताच्या सेवेत खर्च केली.

केशवचंद्र यांच्या विविध चळवळींपैकी एकेक चळवळ अगर संस्था एकेका अनुयायाच्या परिश्रमाचे स्मारक म्हणून होऊन राहिली आहे. नव-विधानाच्या धर्मप्रचारकाची मंगळवाडी ही रामचंद्र सिह ( इ. सन १८४१—१८९९ ) याच्या दीर्घोद्योगाचे एक मूर्तिमंत स्मारकच आहे. त्याच्या आयुष्यात चागल्या पैदास्तीची नोकरी मिळण्याचा त्यास योग आला असतां तो मोह सोडून त्यानीं आपणांस धर्मकार्यास वाहून घेतले. आणि ब्राह्म-समाजात अनेक बखेडे पडल्यावरही सर्व पक्षाकडून आपणास निर्विकार व निःस्पृह असे म्हणवून घेतले.

वर लिहिल्याप्रमाणे ज्यानी दृश्य असे कोणतेच कार्य केले नाहीं, पण ज्याचा स्वार्थत्याग व ज्याचे ऋषितुल्य वर्तन, यानीच बिनबोभाट फार मोठे कार्य केले, अशा धर्मप्रेषितापैकी ऋषि केदारनाथ ( इ. सन १८३७—१८९१ ) हे प्रसिद्ध आहेत. अगावर कुटुबभरणाची मोठी जबाबदारी असता, वाढती श्रीमती सोडून त्यानी गरिबी पत्करली, आणि सर्व आयुष्य ईशचिंतनांत घालविले. धैर्य व क्षमा ह्या गुणाचे ते आदर्श होते. केशवचद्र हे केदारनाथ ह्यांस शातसाधक असे म्हणत. त्यानी जो धर्मपथ स्वीकारला, त्याची सेवा करण्यांत त्यानी कोणताही स्वार्थत्याग अगर कसलेही कष्ट टाळले नाहींत. ते वादविवादापासून सदा दूर असत आणि अनंताच्या चिंतनांत सदा मग्न असत.

श्रीतुकोबांचे अभग जेव्हांचे तेव्हा जगनाडे यानी लिहून ठेवले नसते, स्वामी विवेकानंद याचीं व्याख्याने मिस्तर गुडविन यांनीं टाचून ठेवलीं नसतीं, तर केवढ्या उत्कृष्ट वाङ्मयाला आज आपण पारखे झालो असतों!

त्याचप्रमाणें केशवचंद्र सेन यांचीं व्याख्यानें, उपदेश आणि प्रार्थना ह्यांचीं वेळोवेळीं टांचणे करून ज्यांनीं केशवचंद्रांची वाङ्मयमूर्ति चिरंजीव केली ते प्यारीमोहन चौधरी हेही नवविधानाच्या प्रेषितांपैकीच एक होते. ह्याशिवाय नवविधानाच्या धर्मप्रचारकांतही साधु हीरानंद, नंदलाल वगैरे कित्येक नावाजण्यासारखे पुरुष होऊन गेले. परंतु विस्तारभयास्तव त्या सर्वांची त्रोटक माहितीही येथे देतां येत नाही.

वरील धर्मप्रेषितांबद्दल हे लक्षांत ठेवण्यासारखें आहे कीं, ते सर्व घरचे गरीब असतां, पैशाचा मोह सोडून त्यांनीं आपले सर्व आयुष्य नवविधानाच्या कार्यीं मनःपूर्वक अर्पण केले. प्रथम नवविधान संस्थेतून त्यांस तनखा असा कांहीच मिळत नसे. " एकादशीचे घरीं शिवरात्र " असाच बहुतेक योग असल्यामुळे क्वचित् माध्यान्हकाळ गुजरण्याकरितां हे नवविधानसेवक केशवचंद्राच्या लिहिण्याच्या पेटीत धुंडाळीत; तेव्हां त्यांच्या हातीं क्वचित् दोन चार पैसे लागत. त्यांत ते दिवसाचा गुजारा करीत असत, तर कधी उपाशीही रहात !

केशवचंद्रावर जशी त्यांची अतुलनिष्ठा होती. तसे केशवचंद्रांचेही त्यांच्यावर प्रेम असे व त्यांच्या सुखसोईकडे केशवचद्रांचे लक्ष असे. केशवचंद्र ह्या धर्मप्रेषितांकडे निरनिराळी कामे वांटून देत असत. कोणी धर्मोपदेशक, कोणी वर्तमानपत्राचे संपादक, कोणी शाळांचे व्यवस्थापक, कोणी इमारती कामाचे अधिकारी, कोणी प्रचारकांचे मार्गदर्शक अशीं निरनिराळीं कामे निरनिराळ्या वृत्तींच्या माणसांकडे सोपविलेली असत, व सर्वांचा मिळून एक धर्मप्रेषितांचा दरबार व त्याचे अध्यक्ष केशवचंद्र सेन अशी व्यवस्था असे. केशवचद्र म्हणतील ती पूर्वदिशा, अशी सर्वांची निष्ठा असे. केशवचंद्रांचे लक्ष खिस्तानें व्यापले आहे, असें दिसले म्हणजे सर्वांचे लक्ष बायबलाकडे लागे. केशवचंद्रांस श्रीचैतन्यांचा ध्यास लागला कीं ही सर्व मंडळी जणुं काय वैष्णवधर्माचाच उद्धार करणार कीं काय, असा त्यांच्यांत भजनानंदाचा रंग चढे. केशवचद्र सेन त्यांस उपदेश करीत त्यांतील सार असे असे कीः—

" उद्यांची काळजी तुम्ही सोडा. अयाचित रीतीनें तुम्हांस ह्या संस्थेतूनच यापुढें काय मिळेल त्यावर संतुष्ट असा. द्रव्यार्जनाची वासना ठेवूं नका. दुसऱ्या कोणी तुम्हांस सांपत्तिक मदत केल्यास त्यास शिवूं नका. तुम्ही आपल्या धर्मपत्नीस गरिबीचें व्रत शिकवा. तुम्ही वैरागी आणि तुमची

पत्नी वैरागिनी असा तुमचा गृहस्थाश्रम नवविधानस्वामींस समर्पण करा. तुम्ही आजपर्यंत एकमेकांवर प्रेम केले. त्याहूनही अधिक प्रेम यापुढे तुम्ही परस्परांवर करा. मद, मत्सर आणि स्वार्थ ह्यांचा त्याग करा हे लक्ष्यांत असूं द्या की, ह्या नवविधानांत पंथभेदास जागा नाहीं. सर्व धर्मांचा मिलाफ ह्यांत झाला आहे. तथापि तुम्ही प्रत्येकाने ह्यापैकीं कोणत्या तरी एका धर्म-पंथाचा अभ्यास करून धर्मप्रसारार्थ निरनिराळे प्रांत वांटून घ्यावे, आणि हा नवविधान म्हणजे सर्व धर्मांची एक प्रातिनिधिक संस्था आहे, अशी जगाची खात्री करून द्यावी. आपले अंतःकरण निर्मळ आहे व बुद्धि शुद्ध आहे. ह्याची नेहमीं काळजी घ्या. भक्ति आणि वैराग्य हीं ध्येये गाठण्याच्या उत्साहांत रोजचीं सामान्य कर्तव्ये विसरूं नका. तसेच योगासारख्या भूमिकेवर चढण्याची अथवा भक्तीचा ठाव घेण्याची महत्त्वाकांक्षा धरीत असतां, नीति, सचोटी, परोपकार, आप्तेष्टांवर प्रीति, इत्यादि कौटुंबिक व सामाजिक गुणधर्मांची उपेक्षा करूं नका."

## प्रकरण तेरावें

# नवसंहिता

जाणाऱ्या दिव्याने विझण्यापूर्वी किंचित् काल जास्त प्रकाश द्यावा, त्याप्रमाणें केशवचंद्र सेनांच्या कारकीर्दीची अखेरची वेळ आली असता, आपली संप्रदायपरंपरा पुढे चालावी म्हणून त्यांनी आपल्या धर्मविचारांस संकलित स्वरूप दिले व ते आपल्या अनुयायांसाठीं प्रसिद्ध केले. त्यासंबंधीं साराशरूपाने ते म्हणतात कीं, सर्वांना सुप्रबुद्ध करणारे ईशानुशासन हा आमचा पंथ, सर्वांचा प्रतिपाल करणारे ईशप्रेम हेच आमचे धर्मशास्त्र, सर्वांना सुलभ अशा ब्राह्मभावांत राहणे हाच आमचा स्वर्ग, आणि जेथे सारे सत्य, सारे प्रेम आणि सारे पावित्र्य एकवटलें आहे, असे परमेशाचे अदृश्य राज्य, हेंच आमचें धर्ममंदिर होय. आमच्या ह्या नवविधानाची नवसंहिता लवकरच तयार होईल आणि त्याची आपल्या लोकांत रीतसर प्रसिद्धि करण्याकरिता एक दिवस नेमणे अवश्य होईल. त्या दिवसानें लोकांतील अंदाधुंदी, अहमन्यता आणि स्वैराचार यांचा काळ संपेल व सदाचार, शिस्त, सुसंगति यांचा काल सुरू होईल. ब्रह्मानंद केशवचंद्र सेन ह्या भविष्यवाद्यांची ही भविष्यवाणी इ. सन १८८३ सालीं प्रगट झाली !

पूर्वीं ब्राह्मांकरिता अनुष्ठानपद्धति ह्या नांवाचे एक पुस्तक देवेंद्रनाथांनीं लिहिलेंच होतें. परंतु त्याहून व्यापक आणि राष्ट्रीय भावना व परंपरा ह्यावर आधारलेलें असून ह्या नवीन पंथाच्या सुधारलेल्या आर्यांच्या राहणीस साजेसें होईल अशा एका धर्मपुस्तकाची उणीव फार भासूं लागली. म्हणून वर दर्शविल्याप्रमाणे केशवचंद्रांनीं आपल्या अवतारकृत्याच्या अखेरीस, सर्व आर्य म्हणविणाऱ्या लोकांनीं आणि विशेषतः ब्राह्मधर्मानुयायी जनांनीं संसारात नेहमीं कसें वागावें आणि आपलीं नित्याचीं व नैमित्तिक कृत्ये कशीं करावी, हें सांगण्याकरितां नवसंहिता हा मूळग्रंथ इंग्रजीत लिहिला. त्याचीं एकंदर एकोणतीस प्रकरणे आहेत. त्यांपैकीं पहिल्या तेरा प्रकरणांत गृहस्थाश्रमाचे सामान्य नियम सांगितले असून, पुढील सात प्रकरणांत संस्कार व अखेरच्या

नऊ प्रकरणांत कांहीं व्रतांचा विचार सांगितला आहे. अशा प्रकारचे ब्राह्म-पंथाचें हें एकच नमुनेदार पुस्तक दिसते. ह्यास्तव त्याची कांहीं कल्पना येण्या-करिता पुढे प्रकरणशः त्रोटक माहिती दिली आहे.*

१ आवाहनः— ह्यांत, "हे सच्चिदानंद हरी, तूं आमचा गुरु हो आणि तुझ्या पवित्र नवविधानाच्या भक्त-वृंदांस आपले नवसंहितारूप नियमशास्त्र कथन कर." वगैरे मंगल आहे.

२ गृहः—घर व घरांतील वस्तु स्वच्छ, नीटनेटक्या व रमणीय असाव्यात. परमेश्वरास गृहदेवता मानून त्यास ते अर्पण करावे. उपासनास्थानाच्या भिंतीवर खालीलप्रमाणे ×बोधप्रद वाक्ये लिहावी. परंतु शोभेकरितां किंवा बोधाकरितां देखील कोणतीही प्रतिमा, मूर्ति, चित्रे‡ किंवा कसलीही तसबीर अथवा मूर्तिपूजेचे चिन्ह ह्या पवित्र ठिकाणीं ठेवूं नये.

३ गृहस्थः—फार लवकर किंवा फार उशिरां उठूं नये. उठल्याबरोबर शुचिर्भूत होऊन प्रातःस्मरण करावे. मग नियमित व्यायाम करावा. तद-नंतर नित्याची वर्तमानपत्रे असल्यास त्यांच अवलोकन करावे. मग सुस्नात व्हावे. स्नान करते वेळीं ऋग्वेदांतील खालील† मंत्रानुरूप प्रार्थना करावी.

४ नित्याची उपासनाः—उपासनागृहांत प्रत्येकाने स्वच्छ वस्त्रे परिधान करून आपआपल्या ठरीव आसनावर बसावे. घरची मंडळी व पाहुणे ह्यां-

---

* सदर माहिती नगरकरकृत मराठी भाषांतरावरून दिली आहे. व ती स्थालीपुलाक न्यायाने अति अल्प असली तरी ग्रंथपरिचयास पुरेशी आहे.

× सहृदयं संमनस्य अविद्वेशं कृणो वः, अन्योन्य अभिहर्यत वत्स जातं इवाघ्न्या। अनुव्रतः पितुः पित्रो मात्रा भवतु सम्मनः जायापत्ये मधुमतिं वाचं वदतु शांतिवान्। माते भ्राताभ्रातर द्विषद् मा स्वसारं उत स्वसा, संम्यंच सव्रतः भूत्वा वाच वदत भद्रया —अथर्ववेद०

ब्रह्मनिष्ठोगृहस्थः स्यात् तत्त्वज्ञानपरायणः। यद्यत्कर्म प्रकुर्वीत तद्ब्रह्मणि समर्पयेत्॥ —ऋग्वेद.

‡ आपो अस्मान् मातरः शुद्धयंतु। विश्वंहि विप्रं प्रवहंति, देविः उदइद आभ्यः शुचिरासः ऐमि। —ऋग्वेद.

† नंबर १४–संस्कार हें सदर पहा.

पैकीं पुरुषानें एके बाजूस व स्त्रियांनीं त्यांच्यासमोर दुसऱ्या बाजूस बसावें. यजमानाने व्यासपीठावर बसावे. प्रथम एक पद्य गावे, नंतर आवाहन करावें, नंतर पुन्हा सर्व स्त्रीपुरुषांनीं गीत गावे, ईशस्तव करावा, नंतर ध्यान करावें. मग सर्वांनी मिळून ठरीव प्रार्थना करावी. मग ईशस्तोत्र म्हणावे. इतकें झाल्यावर यजमानानें धर्मपुस्तकांतून शास्त्रवाचन करावे. ह्यानंतर त्या दिवसाची प्रार्थना करावी. त्यात सर्वांनी आपापल्या अंतस्थ मनोभावना ईश्वरास निवेदन कराव्या. अखेर आशीर्वचन मागितल्यावर सर्वांनी उभे राहून आरती म्हणावी. परमेश्वरास त्रिवार नमस्कार करावा, आणि आनंद-भरित अंतःकरणाने शांतिः शांतिः शांतिः असे त्रिवार म्हणावे.

५ नित्याचे भोजनः—“ अश्नीथ वाथ पिबथ कुरुथ वाथ यत्ततः । यूयं कुरुत तत्सर्वं महिम्ने परमेशितुः ॥ ” आपआपल्या जागीं बसल्यावर सर्वांनीं अन्नदायिनी विश्वजननीस नमस्कार करावा. नंतर यजमानाने प्रार्थना करावी. अन्नामध्ये सद्भक्तांस आपल्या प्रभूची मूर्ति दिसली पाहिजे. अन्न सत्त्वशील असावे. मद्यासारखे काळकूट विष नाही. व्रतस्थांनी मांसाहार करूं नये. जेवताना वृत्ति आनंदित असावी.

६ कामधंदाः—काम नियमित, निरलस व संतोषवृत्तीनें करावे. सर्व भार ईश्वरावर टाकावा. कुटुंबपोषणार्थ करावा लागणारा व्यवसाय कसाही असो, त्यास कंटाळूं नये. विश्वासपूर्वक कष्ट करणे, ही ईश्वराची श्रेष्ठ उपासना होय.

७ करमणूकः—उद्योग ही जशी आदिशक्तीची पूजा, तशीच करमणूक हीही त्या आनंदस्वरूपाची आराधना होय. तथापि व्यभिचार आणि मदिरा-पान ह्यांसारखा पृथ्वीवर दुसरा जीवंत नरक नाहीं. ऐषआरामी, विलासी, व थिल्लर अशा स्त्रियांशीं विशेष संभाषण व सहवास करू नये. नित्य कोणत्या प्रकारची करमणूक करावी, व त्यांत किती काल घालवावा, हें प्रत्यक्ष प्रभूसच विचारावे. संगीत व नाट्यकला ही करमणूक चांगली आहे.

८ अभ्यास आणि वाचनः—शरीरास अन्न, आत्म्यास भक्ति, तसे मनास ज्ञानाचें खाजें लागते. विशेषेंकरून सर्व राष्ट्रांतील धर्मपुस्तकांचा संग्रह करावा. वाचन मित असावें. अतिवाचनाचा दोष सहसा होऊं देऊं नये. कल्पित कादंबऱ्यांस भुलूं नये. नास्तिक ग्रंथांविषयीं सावध रहावे.

९ दानधर्मः—दानधर्मावांचून कोरडा भक्तिभाव शुष्क व शून्य दिसतो.

१० आप्तविषय आणि संबंधीः—संसारी मनुष्याचे संसारसंबंधीं सर्व संबंध परमपवित्र होत.*

११ बंधुभगिनीः—मुलें मोठी होऊन त्याचे विवाह झाल्यावर पाहिजे असल्यास मुलांनीं आपल्या पत्नीसह व मुलीनी पतीसह स्वतंत्र रहावे; परतु परस्परांच्या प्रेमात विपर्यास होऊं नये.

१२ पतिपत्नीः—विवाह हा दैवी संबंध होय. जो विवाहसंबंध प्रत्यक्ष परमेश्वराच्या साक्षीने होत नाहीं तो मुळीं विवाहच नव्हे. अतएव, विवाह-देवतेसमोर मस्तक नम्र करावें, आणि तिचा आशीर्वाद संपादन करावा. स्त्री-पुरुषाची योग्यता व अधिकार सारखे आहेत तथापि पुरुषाने स्त्रीत्व पत्करून घरांतील गृहकृत्य करण्याची इच्छा धरू नये. स्त्रीनेही अंगी पुरुष-पणा आणून पुरुषाचें काम करण्याची हाव धरूं नये. अशा स्त्रीचा सर्वथा नाश होईल. इहलोकीं स्त्री-पुरुषांचा विवाह कधींही पूर्ण होत नाहीं मरणोत्तर पतिपत्नीच्या आत्म्याचे शाश्वत ऐक्य व्हावयाचे असते. विवाह ही ह्या सुखाची प्रथम पायरी होय. जे पातिव्रत्य राखण्यास महत्प्रयास पडतात, निर्धास्त स्थली मात्र जे सुरक्षित रहाते, ते खरे पातिव्रत्य नव्हे.

१३ चाकरनोकरः— ज्या घरांतील माणसे आपल्या चाकरनोकरांना मायेने वागवितात, आणि त्यांस कोणत्याही गोष्टीची वाण पडूं देत नाहीत, ते गृह धन्य होय.

१४ संस्कारः—सद्भक्ताने आपल्या घरांतील सर्व कार्ये अद्वितीय, अविनाशी परमेश्वराचे नामस्मरण करून करावीं. मूर्तिपूजेसंबधी संस्कारांचा लव-लेशही त्यांत नसावा. सर्व संस्कार साधे व हृदयग्राहक असावेत. त्यांचा अर्थ सर्वांस सहज समजेल असा असावा. ज्या कर्मात भक्ति नाहीं. तीं सर्व व्यर्थ होत. सुगंधी धूप, सुवासिक पुष्पे, निर्मल उदक, भव्य निशाण आणि सुंदर चित्रे, हीं सर्व भक्तीचीं उपकरणे होत. ईश्वराच्या घरी सर्व काल शुभ आहेत. व सर्व स्थले पवित्र आहेत. निव्वळ संस्कारांच्या अंगी कोणत्याही प्रकारचा

---

* मातरं पितरं चैव साक्षात् प्रत्यक्षदेवताम् ।
मत्वा गृही निषेवेत सदा सर्व प्रयत्नतः —महानिर्वाण, ८:२४.

पवित्रपणा नाहीं. शुद्ध मनाने ते केले असतां मनावर त्यांचा परिणाम अत्यंत पवित्र होतो. नवविधान धर्माच्या अनुयायांनी प्रत्येक संस्कार एकसारख्या रीतीनें करावा.

१५ जातकर्मः—प्रथम दाईने मूल धुतल्यानंतर आईनें त्याचे मुखकमल अवलोकन करून त्याचे चुंबन करावे, व नेत्र निमीलित करून शांत चित्तानें प्रार्थना करावी. नंतर पित्याने अवलोकन करावे आणि ईश्वराची स्तुति करावी. एक महिना झाल्यावर जातकर्म करावे. त्या वेळी इष्टमित्रांस पाचारण करून नित्योपासनेचा पूर्वभाग सपल्यावर मुलाच्या बापाने त्याच्या रक्षणाबद्दल देवाची प्रार्थना करावी. त्यानतर ब्राह्मोपासकाने आशीर्वचन म्हणावे व सर्व भक्तजनांनी ॥ शांतिः शांतिः शांतिः ॥ असे त्रिवार म्हणून एका पद्याने उत्सवाची परिसमाप्ति करावी.

१६ नामकरणः—मूल सहा महिन्यांचे झाल्यावर त्याचे नाव ठेवावे. ह्या प्रसंगी मुलाला अभ्यगस्नान घालून वस्त्राभरणानी भूषित करावे. आपल्या देशाचारास अनुसरून मुलाच्या कपाळी चंदनतिलक लावावा. उपाध्यायानें प्रथम ईश्वरोपासना करावी. मुलाच्या बापाने त्यास हातांवर घेऊन व्यासपीठासमोर उपासकाच्या सन्मुख उभे राहून प्रार्थना करावी. त्यानंतर उपाध्यायाने मूल आपणाजवळ घेऊन त्याचे नांव ठेवावे व मुलाच्या गळ्यांत पुष्पहार घालावा. नंतर सर्वांनी त्रिवार ॥ शांतिः ॥ असे म्हणावे. मग त्याचें उष्टावण प्रथम आईने व नतर आलेल्या पोक्त स्त्रियांनी करावे. त्या वेळीं मंगलवाद्ये वाजवावी.

१७ दीक्षाः—पुत्राचे धर्मशिक्षण पूर्ण झाल्यावर व त्यास सोळा वर्षे पुरीं झाल्यावर, त्यास ब्राह्मदीक्षा द्यावी. त्यासाठी मुलानें अभ्यगस्नान करावें स्नान सपत आले म्हणजे बापाने नवविधाननिशाणमुद्रित अशा पात्रानें त्याच्या मस्तकावर उदक सिचन करावे. "ह्या शांतिजलाच्या योगे जसा देहाचा सर्व ताप नाहीसा होतो, तद्वत् परमेश्वर आपलें कृपावारी सिचन करून अंत करणास शांति देवो." असे मुलाने त्या वेळीं म्हणावे. नंतर शुभ्र वस्त्र परिधान करून त्यावर भगवे उपवस्त्र घ्यावे. नंतर मुलाच्या बापाने उपाध्यायासन्मुख वेदीसमोर मुलासमवेत उभें राहून दीक्षेबद्दल याचना करावी. त्यानंतर आचार्यांनीं दीक्षार्थी मुलास तत्संबधी कांही सूचक प्रश्न विचारावे. त्या

प्रश्नांस अनुलक्षून मुलांनीं उत्तरें द्यावींत, त्यांत खालीलप्रमाणे वचनें असावींत. " आत्मा अनंत कालपर्यंत उन्नतशील आहे. मनोदेवतेच्या द्वारें परमेश्वर आपली इच्छा मनुष्यास कळवितो व विवेकाच्या द्वारे मनुष्यास सत्यासत्याचे पूर्ण ज्ञान होते. सरळ विचार, अचल विश्वास, शुद्ध भक्ति, खरा योग, सात्त्विक वैराग्य व अखंड कर्तव्यतत्परता, हीं सर्व सत्य धर्माचीं अवश्य अंगें होत. साधु पुरुष कितीही पवित्र असला, तरी तो प्रत्यक्ष ईश्वराचा निष्पाप, निष्कलंक अवतार आहे असे मानावयाचे नाहीं. साधु पुरुषाच्या सोज्ज्वल उक्ती धर्मग्रंथांतून लिहून ठेवल्या आहेत. ज्या ज्या मानाने त्या शुद्ध व अबाधित असतील त्या त्या मानानें त्या ग्रंथाचा आदर योग्य होईल. विवेकपूर्ण वागल्याने सर्वांस प्राप्त होणारा जो मधुमय ईश्वरसहवास तोच स्वर्ग होय." ह्याप्रमाणे दीक्षासंस्कार आटोपल्यावर आचार्यांने ह्या नूतन ब्राह्मास 'नवविधाना'चे निशाण द्यावे आणि समाजाच्या नावाने दोन प्रोक्त सभासदांनी शास्त्रवचने आणि नवसंहिता तसेच नित्योपासनेकरितां एक आसन इतक्या देणग्या द्याव्या. नंतर परमेश्वरास वंदन केल्यावर सर्व समाजाने " ब्रह्मकृपाहि केवलं " हे ठरीव पालुपद म्हणून 'शांतिः'चा त्रिवार उच्चार करावा. विवाहाच्या कामी अविचार आणि उतावळी करून बहुतांनी आपल्या हाताने आपला नाश करून घेतला आहे. यास्तव तरुणांनीं फार सावध रहावे.

१८ विवाहः—स्वेच्छेच्या भरीस पडून फार लवकर अथवा फार उशिरां विवाह करूं नये. देहस्वभावानुरूप शरीर आणि मन परिपक्व दशेस आलें म्हणजे विवाह करण्यास प्रवृत्त व्हावे. विवाह होण्याच्या अगोदर मुले जाणतीं व समजूतदार असल्यास त्यांच्या वारवार भेटी होऊन परस्पर संभाषण व्हावे. असे प्रसंग वडील माणसांच्या समतीने त्यांच्यासमोर व्हावेत. पुरुषास एकच पत्नी आणि स्त्रीस एकच पति असावा. कोणत्याही कारणांवरून काडी मोडून विवाहमुक्त होऊं नये. वधूवरांची कुळें जेवढीं दूर संबंधाचीं असतील तेवढीं चांगलीं. विवाहसंस्कारांत, वाग्निश्चय, विवाहवस्त्र व सुवर्णांगुलीयक देऊन वराचा सत्कार, वधुवरांचीं लग्नास संमति, कन्यादान, विवाहबंधन ( वधुवरांनीं परस्परांचा उजवा हात धरून त्यावर पुष्पमाला बांधणें आणि वधुवरांनीं प्रतिज्ञा करणे ) व प्रार्थना असे भाग असतात. त्यानंतर

उपाध्यायाने वधुवरांस उपदेश* करून आशीर्वाद द्यावयाचा असतो. इतके झाल्यावर धार्मिक विधि पुरा झाला. तरी कायदेशीर हक्कासाठी तो विवाह नोंदून घ्यावा लागतो.

१९ अन्त्येष्टी:—यांत मरणाराने अतसमर्था विश्वजननीस उद्देशून करावयाची प्रार्थना, मरणोत्तर उपाध्यायानी करावयाची प्रार्थना व शेवटीं अग्नि लावणाऱ्या आप्ताची प्रार्थना इत्यादि गोष्टीचा समावेश होतो.

२० श्राद्धसंस्कार:—मृताशौच सात दिवस धरावे. अशौचदर्शक म्हणून आप्तांनीं उजव्या दंडावर अथवा छातीच्या डाव्या बाजूवर वैराग्यसूचक भगव्या वस्त्राचा तुकडा लावावा तसेच मुतकी घर इतरास समजावे म्हणून ओटीवर आढ्यापासून जमिनीपर्यंत एक भगवा कपडा टांगून ठेवावा. आठव्या दिवशीं मृताच्या शरीराची राख एका कुंभात भरून श्राद्धकर्त्याने तो कुंभ घेऊन पुढे चालावे व त्याच्या बरोबर वरील भगव्या फडक्याचे निशाण घेऊन कोणी चालावे. मग नियमित स्थळीं श्राद्धयात्रा आल्यावर सर्वांनी उभे रहावे व उपाध्यायाने प्रार्थना करावी. त्यानतर तो रक्षाकुंभ जमिनीत खोल पुरावा व त्याच्यावर संगमरवरी शिला उभी करून त्यावर मृताचे नांव वगैरे खोदावे. नंतर श्राद्धकर्त्याने व उपाध्यायानी प्रार्थना करावी, व आशीर्वाद मागावा. नंतर "ब्रह्मकृपाहि केवल" आणि त्रिवार "शांतिः" याचा उच्चार करून ह्या विधीची परिसमाप्ति करावी. तसेच शक्त्यनुसार दानधर्म करावा.

२१ व्रतें:—व्रतांच्या योगे पुण्यप्राप्ति होत नाहीं; परंतु तीं धर्माचरणाऱ्या कामीं साधनांदाखल उपयोगी पडतात. पातिव्रत्य, पत्नीव्रत, शिष्यत्व, भूतदया, आत्मपरीक्षण, शांति, आत्मसंयमन, भक्ति, योग, वैराग्य इत्यादि अनेक प्रकारची व्रते आहेत. परमेश्वराची प्रार्थना हे प्रत्येक व्रताचें जीवन होय. नवसंहितेत आठ व्रतेच विवक्षित रीतीने सांगितलीं आहेत.

२२ रिपुसंहार:—म्हणजे षड्रिपूंचे दमन हे व्रत अत्यंत श्रेष्ठ होय. हे व्रत घेण्यापूर्वीं चित्तास घोर अनुताप झालेला पाहिजे. याप्रमाणे तयारी झाल्यावर व्रत घेण्यासाठीं ठरविलेल्या दिवशीं सुस्नात होऊन एकांतस्थळी

---

* ब्रह्मनिष्ठो गृहस्थःस्यात् तत्त्वज्ञानपरायणः ।
यद्यत् कर्म प्रकुर्वीत तत् ब्रह्मणि समर्पयेत् ॥

जावें व तेथें अंतःकरणातील सर्व घोर पातकें ईश्वरास निवेदन करून त्याची करुणा भाकावी. अनुतापानें अंतःकरण दग्ध होऊन नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागाव्या. त्यानंतर पुन्हा स्नान करून प्रातरुपासना करावी व ती संपल्यावर सर्वांच्या समोवतीं अथवा एकांतस्थळीं बसून रिपुसंहारव्रत ग्रहण करावें. त्यांत प्रथम परमेश्वराची प्रार्थना करून त्याचें साहाय्य मागावें आणि नंतर ज्या मनोवृत्तीचा संहार कर्तव्य असेल, तिला शब्दांनीं यथेच्छ ताडन करून तिची पुरी निर्भर्त्सना करावी, आणि नंतर पुन्हा ईशप्रार्थना करावी.

२३ शिशुशिक्षणः - यांत लहान मुलांमुलींस चित्रलेखाच्याद्वारें धर्माचीं व नीतीचीं पुष्कळ तत्त्वें चांगल्या रीतीनें शिकविता येतात. घरांत सारवून तयार केलेल्या जमिनीस साधनस्थान म्हणतात. व्रताच्या प्रथम दिवशीं मुलास स्नान घालून त्याच्या गळ्यांत पुष्पमाला घालाव्या व त्यास उपासना ऐकवून साधनस्थानीं न्यावें. तेथें मुलानें ईश्वराचें मंगल केल्यावर देवाचा आशीर्वाद मागावा. नंतर आईनें साधनपटावर रांगोळीनें १ हा अंक काढावा. मुलानें तो मोठ्यानें वाचून त्यावर फुलें वाहावीत. नंतर आईनें "एक देव, एक भाव, एक कुटुंब, एक शास्त्र आणि एक मुक्ति" असें मुलाकडून म्हणवावें. नंतर एकाच्यापुढें नवविधानाचें निशाण काढावें. त्यावर मुलानें फुलें वाहावीं, आणि आईबरोबर पवित्र नवविधानाचा जयजयकार करावा. तिसऱ्या चित्रांत चारी खंडाचे नकाशे काढून दाखवावे. त्यावर पूर्ववत् मुलानें फुलें वाहावीं आणि म्हणावें "सर्व पृथ्वीवर शांति आणि समाधान वास करो, चारी खंडांतील लोकांत ऐक्य व प्रेम यांचें वर्धन होवो!!" याप्रमाणें आईनें निरनिराळीं चित्रें काढून त्यावर मुलानें फुलें वाहावीं, आणि आईबरोबर ठरींव वाक्य उच्चारावें. उदाहरणार्थः-पैशाच्या पिशवीचें चित्र काढल्यावर त्यास फुलें वाहून "परमेश्वराचें शाश्वत सत्य सर्व ऐहिक संपत्तीहून अत्यंत मोलवान होय" असें म्हणावें. सूर्यचंद्र काढल्यास, "माझी कीर्ति सूर्या-प्रमाणें तेजस्वी व प्रेम चंद्राप्रमाणें आल्हाददायक असो"; नदी काढल्यास, "तिच्या प्रवाहाप्रमाणें माझा जीवनप्रवाह सर्वांस सुखद होवो!" चंदन वृक्ष काढल्यास "माझ्या छलकासही माझेकडून आराम मिळो" असें मुलांकडून म्हणवावें. व्रत घेणारी मुलगी असल्यास तिला अनुरूप चित्रें व वाक्यें योजावीत जसें:-कंकणाचें चित्र काढल्यास "दान हें माझे हातांतील रत्नकंकण

होवो. लुगडे काढल्यास, विनयवस्त्र माझ्या सर्व दोषांवर पांघरूण घालो. इत्यादि प्रकारे शिशु-शिक्षण अथवा चित्रसाधन हे व्रत सात दिवस करावे. शेवटच्या दिवशी मुलाच्या हातून त्याच्या सोबत्यास खाऊ द्यावा. गरीबांस दानधर्म करावा. तसेच गाईगुरांस वैरण व पक्षांस धान्य चारावे.

२४ आत्मिक विवाहव्रतः— आपला विवाहसंबंध विशेष आत्मिक करावा, अशाविषयी कोणा दंपत्यास ईश्वरी स्फूर्ति झाली असतां, त्यांनी मात्र त्या स्फूर्तीनुरूप हे आत्मिक विवाहव्रत करण्यास प्रवृत्त व्हावे, इतरांनीं होऊं नये. ह्या व्रतांत प्रथम तीन दिवस ईश्वरभजनादि धर्मसाधने करून पूर्वतयारी झाल्यावर चवथ्या दिवशीं नवराबायकोंने सुस्नात होऊन भगवीं वस्त्रे परिधान करावी, आणि नित्योपासना झाल्यावर सात दिवस व्रतस्थ राहण्याची प्रतिज्ञा करावी. नतर उभयतांचे सव्यकर सुमनग्रथीने बांधून प्रतिज्ञा करावी. पतीने पत्नीस कषायवस्त्र, आसन, धर्मपुस्तक व नवविधानाचे निशाण द्यावे, व त्याचा तिने स्वीकार करावा. नंतर पतीने ईश्वराची प्रार्थना करावी.

२५ ब्रह्मचर्यः—ह्या व्रताचे वर्णन करायला नकोच.

२६ वैधव्यः—हेही व्रत विधवेने मी पुन्हा विवाह करणार नाहीं व माझे पातिव्रत्य मी अन्य पुरुषास सहसा अर्पण करणार नाहीं, अशा प्रतिज्ञापूर्वक असते.

२७ साधकः—हे व्रत साधकाने आपले सर्व जीवन नवविधानधर्मबंधुगणाच्या सेवेस अर्पण करण्याचे असते.

२८ विरक्त गृहस्थाश्रमः— ह्या व्रतात साधकाची सर्व प्राप्ति पवित्र नवविधानास अर्पण करावयाची असते.

२९ धर्मप्रचारकः— ह्याचीही दीक्षा तदनुरूप असून दीक्षा घेतल्यानंतर नूतन प्रचारकास जुन्या प्रचारकवर्गाने आलिंगन द्यावे आणि एक कमंडलू व वीणा ह्यांची देणगी द्यावी, असा विधि असतो.

ब्राह्मधर्ममते सदर पुस्तकाच्या अखेरीस दिलीं आहेत, तीं अशीः—

१ परमेश्वर एक आहे. तो अनादि, सर्वज्ञ, सर्वशक्ति, निरवयव, ज्ञानस्वरूप, परम पवित्र, कल्याणनिधान, आनंदमय, पतितपावन, असा आहे.

२ मनुष्यास आत्मा आहे. तो अमर, अविनाशी आणि उन्नतस्वरूप आहे. परमेश्वराशीं त्याचा साक्षात् व नित्य संबंध आहे.

३ परमेश्वराच्या ठायी प्रीति, पूज्यत्वबुद्धि आणि अनन्यभाव ठेवून तत्पूर्वक त्याचे मानसिक भजनपूजन करणें हीच त्याची शुद्ध उपासना. हिच्याच योगे इहलोकी व परलोकीं शाश्वत सुखप्राप्ति होते.

४ परमेश्वर सावयवरूपानें पृथ्वीवर अवतार घेत नाहीं. सर्वथा सत्य व सर्वांशीं प्रमाण असें कोणतेंही एक धर्मपुस्तक त्याने दिलेले नाही.

५ मनुष्याच्या अतर्यामी परमेश्वराने आपल्या पवित्र धर्मबीजाची स्थापना करून ठेविली आहे तद्द्वारां मनुष्यमात्रास सत्य-धर्माचे ज्ञान होते. हा धर्मभाव शुद्ध व सात्त्विक पुरुषांच्या ठायी विशेष जागृत असतो.

६ परमेश्वर सकल मनुष्यमात्राची प्रेममयी माता, अतएव प्रत्येक पुरुष आपला बंधु, व प्रत्येक स्त्री आपली भगिनी असा मंगलभाव अंतःकरणांत सदैव जागृत ठेवून प्रत्येकाने वागावे.

७ मनुष्यास आपल्या पापपुण्याचा इहलोकी व परलोकींही हिशेब द्यावा लागतो. पातकांबद्दल परमेश्वर दंड करितो तो मनुष्याच्या हितार्थ करितो. हा दंड अनंत कालचा नसतो.

८ कृत-पातकाबद्दल अनुतप्त अंतःकरणाने परमेश्वरास शरण जाणे, व त्याजवर आपला सर्व भार टाकून पातकांपासून सर्व प्रकारे दूर राहण्याविषयीं निरंतर जागृत राहणे हेंच पापाचे खरे प्रायश्चित्त.

ह्या नवसंहितेत गृहस्थाश्रमाचे जे चित्र रेखाटले आहे, ते अलीकडील साहेबी थाटाच्या हिंदूंप्रमाणेच मिश्र स्वरूपाचे आहे, हे वाचकांस कळून येईलच. आर्यांच्या संस्कारांवरील गीर्वाण भाषेचा पडदा काढून ते त्यांनी उघड केले खरे; पण पुन्हा इंग्रजी पेहराव चढविण्यात कोणती राष्ट्रीय भावना साधली, तें समजणे कठीण आहे. फार वर्षांच्या रूढीमुळे संस्कारांचा अर्थ इतका उघड केलेला कित्येकास पाहवणार नाही. संहितेनें आपले हृदय इतके मोकळे केलेले इंग्रजी पेहरावांतच साजेल, असें वाटूनच कदाचित् त्यानीं या परभाषेचा आश्रय केला असेल. आपला संप्रदाय एकसूत्री व सघटित असावा, म्हणून केशवचंद्रांनीं त्यांस ग्रंथरूपाने ग्रंथी मारली खरी. पण त्याचा परिणाम मात्र अगदी उलट झाला. गीर्वाण भाषेतील अनेकार्थतेचा अनर्थ ह्या इंग्रजी संहितेसही टाळतां आला नाहीं. हिंदुस्थानांतील साऱ्या हिंदु सुधारकांस किंबहुना चारी खंडांतील

लोकांस समजावी, म्हणून ही संहिता इंग्रजींत लिहिली असेल. पण चारी खंडांतील लोक अथवा चारी धामांचे हिंदु राहोत, खुद्द केशवचंद्रांचे बंगाली शिष्यवर्गांतच नवसंहितेच्या रहस्याबद्दल एकवाक्यता राहिली नाही. आणि शेवटीं जे पंथभेद व्हावयाचे ते झालेच. तेव्हा ईश्वरीलीला अचिंत्य, आहे, हेच खरें!

---

प्रकरण चौदावें

# सिंहावलोकन

इ. सन १९२५ च्या वर्षारंभी केशवचंद्राचे चिरजीव एके ठिकाणीं असें म्हणतात कीं, "ह्या भारतवर्षात जर पुढे एखादा सद्धर्म प्रस्थापित व्हावयाचा असेल, तर त्याचा उगम राममोहन व त्याचे सच्छिष्य देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन ह्यांच्या उदार अंतःकरणांतच आपल्याला आढळेल." सेनबाबूंनी केलेल्या ह्या भविष्यात कितपत तथ्य आहे, ते भविष्यकाळ तर ठरवीलच; परंतु ह्यासंबंधी आपल्याला आजही विचार करता यावा, म्हणून येथे थोडे थांबून झालेल्या विषयाचे सिंहावलोकन केलेले बरें कारण ब्राह्मसमाजाच्या इतिहासाचा पूर्वरंग येथेच समाप्त होतो. वरील अवतरणात ज्या तीन प्रमुख व्यक्तींचा उल्लेख झाला आहे, त्यांचे चरित्र व चारित्र्य यांचे येथवर विस्तृत वर्णन केले आहे. ह्या तीन चरित्रात अनुक्रमाने ज्ञान, प्रेम आणि जनसेवा हे तीन गुण प्रगट झाले असून ह्या अनुक्रमांतच ब्राह्मेतिहासाची उत्क्रांति दिसून येते, असे मानतात. प्रकृत विषयासंबंधी महाराष्ट्रीय वाचकास विशेष माहिती असण्याचा संभव नसल्यामुळे सदरहू विषयाची माहिती जास्त तपशीलवार पूर्व ग्रथांत दिली आहे. ब्राह्मसमाज ही संस्था महत्त्वाची असल्यामुळे तीस अधिष्ठानभूत अशा ह्या तीन संस्थापकांच्या चरित्रांचा संक्षेप करून चालले नसते, तसेच त्यांचे सहकारी मित्र व अनुयायी यांच्या संबंधींही त्रोटक माहिती देणे भाग होते. असो. ह्याप्रमाणे आतापर्यंत झालेल्या ग्रंथविस्ताराबद्दल खुलासा करून आपण ह्यापुढे येथपर्यंत वर्णित झालेल्या विषयाचा सारांशरूपाने विचार करूं.

ह्या तिसऱ्या भागांतील केंद्रीभूत व्यक्ति केशवचंद्र सेन, ह्यांच्याबद्दल सर्वांसच कमीअधिक प्रमाणाने आदर वाटत असला, तरी त्यांनी केलेल्या कार्याबद्दल सर्वांचे सारखेच अभिप्राय पडतील असे नाही. निरनिराळ्या तऱ्हेने त्यांच्या कार्याकडे पाहतां येईल. कित्येकांच्या मताने खिस्तीकरणाची लाट थोपवून धरणे एवढेंच जनतेचें कार्य त्यांच्याकडे होतें. व ते त्यांनीं सिद्धीस नेलें. रामकृष्ण-

परमहंस म्हणत की, मी काय एक लांकडाचा ओंडा आहे; पण केशवचंद्र सेन म्हणजे लोकसंग्रहाचें मोठेंच जहाज आहे. मॅक्समुल्लरसाहेब यांस असें वाटलें कीं, एका केशवचंद्रांनीं भारतवर्षास एक शतक पुढें ढकललें. मिस कॉलेट ह्या ब्राह्मइतिहासकार बाईंना केशवचंद्र सेन हे एक अद्वितीय धर्मगाजी होऊन गेले असें वाटलें. अशा त्याच्या ह्या धर्मकार्याचा थोडा तपशीलवार विचार होण्याकरितां एक दोघां सुप्रसिद्ध लेखकांचे विचार आम्ही पुढें सविस्तर देत आहोंत.

एक इंग्रजी विद्वान् लेखक फ्रँक लिलिम्स्टन असें म्हणतात कीः— केशवचंद्रांचा भारतवर्षीय ब्राह्मसमाज स्थापन झाला, त्या वेळीं त्याच्या धार्मिक विचारांतील मुद्दे पुढीलप्रमाणे होतेः—

१. ईश्वर हा सृष्टीचें आदिकारण नाही. त्यानें इच्छामात्रेंकरून सर्व सृष्टि शून्यांतूनच निर्माण केली; व तिचें तो धारण करीत आहे. असें ठरविण्यांत ब्राह्मांनीं पूर्वाचार्यांच्या विचारात पुष्कळच सुधारणा केली. ईश्वराला सृष्टीहून अत्यंत भिन्न व स्वतंत्र मानलें, त्यामुळें धातु, पाषाण अथवा माणसें यांत ईश्वरभाव मानून त्यांची पूजा करणें हें अशक्य झालें. त्याचप्रमाणें सृष्टीला उपादान कारणही ब्रह्म आहे असें त्यांनीं मानलें नाहीं. तसेंच अभावांतून भावरूप कांहींच उत्पन्न होणार नाही, हा सांख्यसिद्धान्तही त्यांनीं मानला नाहीं, यामुळें सर्व देवमयत्वभाव त्याना टाळता आला. आणि सृष्टीला सत्यत्व दिल्यामुळें अद्वैत्यांच्या मायावादाचाही आश्रय त्याना करावा लागला नाही.

२. त्यांचें दुसरें तत्त्व असें कीं, निसर्ग आणि उपजतबुद्धि यांतच सारें धर्मशास्त्र आलें; असें ठरविण्यात त्यांनीं हिंदूंची श्रुतिस्मृतिपुराणें व खिस्त चारित्र्याचें ऐतिहासिक सत्य या सर्वांसच हरताळ लावला. निसर्गाचें पुस्तक व ईश्वराची प्रेरणा ह्याप्रमाणें बाह्य सूचना जरी त्यांनी मानल्या तरी व्यवहारतः ब्राह्मांनीं आपला धर्म मनोमयच मानला. ते म्हणतात आमचें धर्मशास्त्र असें कांहींच नाहीं. कारण प्रत्येक व्यक्तीस होणारी अंतःप्रेरणा हेंच त्यांचें धर्मशास्त्र. तो अंतःप्रेरक साक्षात् ईश्वर आहे. अर्थात् त्या ईश्वराची ओळख करून देण्याचें काम जीझससारख्या मध्यस्थाकडून होत नसून, उलट अशा सत्पुरुषांची ओळख करून देणारा तो आत्मप्रेरक ईश्वरच आहे. असा वास्तविक प्रकार असता परमेश्वरस्वरूपाचें ज्ञान धर्म-

शास्त्रे अगर सत्पुरुष करून देतात, असे मानणे असंबद्ध आहे. प्रतापचंद्र म्हणतात की, ईश्वरवादीधर्म दोन प्रकारचा आहे. एक बाह्यप्रेरित व एक अंतःप्रेरित. सृष्टीतील अनत घडामोडींच्या अवलोकनाचा जो परिणाम मनुष्याच्या मनावर होतो तो बाह्यप्रेरित धर्म होय. तो मनुष्याची ग्राहक शक्ति व बाह्य परिस्थिति ह्यावर अवलबून असल्यामुळें, कांहीसा अनिश्चित स्वरूपाचा असतो; परंतु दुसरा धर्मप्रकार आपल्या ठिकाणी असलेला जो ईश्वरी अश, त्याजकडून प्रेरित झालेला असतो. एकात मनुष्य ईश्वराच्या शोधात असतो, तर दुसऱ्यात ईश्वरच मनुष्याच्या मागे असतो. प्रतापचंद्रांचे आणखी म्हणणे असे की, सर्व धर्मांचाच पाया वरील प्रमाणे असतो. मात्र इतर धर्मांतून ह्या पायावर खिस्त, महमद अथवा कृष्ण अशा अलौकिक व्यक्तींचा डोलारा उभा केलेला असतो, तसा ब्राह्मांनी उभा केलेला नाही. [ह्या वरील विवेचनावरून प्रतापचद्रानी गृहित धरलेल्या ह्या दोन प्रेरणांहून भिन्न अशी सद्गुरूची अमोघ व दिव्य प्रेरणा असते, ही गोष्ट त्यांना पटली नव्हती, असे दिसते.]

३. ईश्वराला व्यक्त होण्याला शरीराची आवश्यकता नाहीं. जो ईश्वराला जाणत नाही, तो ख्राइस्टला काय जाणणार ? अवतार म्हणजे देव मनुष्य होत नाही. तर मनुष्यातील देवाश विशेष व्यक्त होतो व अशा पुरुषास आपण ईश्वरी सदेश सांगणारे धर्मोपदेशक मानतो. ह्याप्रमाणे त्याचे तिसरं तत्त्व होतें.

४. त्याचे चवथं तत्त्व असं होते की, ब्राह्मधर्म हा इतर सर्व धर्मांहून भिन्न असूनही तो सर्व धर्मातील रहस्यरूप आहे. ह्यांत निरनिराळ्या धर्मातील आज्ञांचा अगर सिद्धान्ताचा केवळ सग्रह केलेला नसून त्याची एका सत्य धर्मात एकवाक्यता केलेली आहे. अर्थात तो सनातन हिंदुधर्मांतून अथवा खिस्ती धर्मांतून निघालेला नसून, मानवी अतःकरणातच तो प्रादुर्भूत होतो.

५. त्याचे पाचवे तत्व प्रत्येक जीवाने आपल्या कर्मांचे फळ इहलोकीं किंवा परलोकीं भोगलेंच पाहिजे असे आहे. सदाचार व सत्कर्मे ह्यानी ईश्वरी कृपा होऊन मनुष्याचा उद्धार होतो. पापक्षालन खऱ्या पश्चात्तापाने होतें. जीझस ख्राइस्टासारखा मध्यस्थ सर्व जीवाच्या पापांचे निरसन करतो, ही गोष्ट त्यांस मान्य नाही. ह्यावर खिस्ती आक्षेपक असा प्रश्न विचारतात की,

पश्चात्तापानें आपले पापक्षालन होईल असे मानले, तरी आपल्या पापाचे परिणाम जे इतरांवर घडतात, त्यांचे निरसन आपल्या पश्चात्तापाने कसे होणार ? शिवाय हा पामर जीव इतका विषयाधीन व स्वभावतःच पापी आहे की, त्याचे व दुसऱ्या त्याच्याच सारख्या अनत जीवांचे पाप केवळ ईश्वरी कृपेवांचून—आणि त्यासाठीं जीझसने मध्यस्थी केल्यावांचून—निरसन होणे शक्यच नाहीं.

मनुष्यप्राणी हा भावनाप्रधान आहे. त्याच्या भावनांपुढील पापात्मक आमिष दूर करावयाचे तर त्या भावना तितक्याच उत्कटतेने ईश्वराकडे लावणे जरूर आहे. अशा रीतीने नवविधान धर्मातील भावनाच्या अतिशयाचे ते समर्थन करतात. ते पुढे असेही म्हणतात की, भावनात्मक धर्माला मानवी व्यवहाराचे नीतिधर्मही लागत नाहींत. किंबहुना भावनाप्रधान भक्त अनीतीच्या मार्गाने जाण्याचा सभवच नाहीं.

असो. ह्याप्रमाणे हिंदुधर्मास सोडून ख्रिस्ती धर्माकडे जाऊं पहाणारा हा नवविधानपथ कोणत्याच धर्माशीं साम्यता पावला नाहीं. ख्रिस्ताचे इह-लोकींचे चरित्र सत्य मानले असता ते साधक जीवास उत्कृष्ट मार्गदर्शक होते, व त्याच्या उद्धारक उत्तर-चरित्रावर निष्ठा ठेवल्याने जीवाची पाप-विमोचनाची काळजी दूर होते, असे जे ख्रिस्ती मत, ते नवविधानाने अमान्य केले, आणि हिंदुधर्मशास्त्रातील प्रामाण्यावरही त्यांनी विश्वास ठेवला नाही. अशा रीतीने धर्मशास्त्र व ईश्वराची अथवा सत्पुरुषांची सगुण चरित्रे हीं पूर्वजांच्या अनुभवांनीं सिद्ध झालेलीं प्रमाणे झिडकारून त्यांनी जो भावना-प्रधान असा मनोमय धर्म आरंभिला, तो ख्रिस्ती व हिंदु दोन्ही धर्मातील लोकांस बेजबाबदारपणाचा वाटला, व ह्यांतच त्या पंथाच्या अपयशाची गुरु-किल्ली आहे, असे त्यांचे टीकाकार मानतात.

दुसरे प्रसिद्ध ब्राह्मइतिहासकार पंडित शिवनाथशास्त्री हे केशवचंद्रांच्या गुण-दोषविवेचनाचा असा आढावा काढतात की, केशवचंद्रांच्या विशिष्ट शिकवणीचा पहिला मुद्दा आधिदैवतवाद व त्यांत ईशवाणीचें महत्त्व हा होय. त्यांत धोरण सोडून त्यांनी अतिरेक केला, यामुळे मात्र त्यांस फाजित पावावे लागलें. त्यांच्या उपदेशाचा दुसरा मुद्दा, सामाजिक सुधारणांचा धार्मिक कर्तव्यांतच अंतर्भाव करणे हा होय. अनासक्ति, इंद्रियदमन, ब्रह्मचर्य,

इत्यादि हिंदूंच्या कडक व अव्यवहार्य शिस्तीची कदर कमी करून साध्या नीतिमर्यादेने त्यांनी देवाचे राज्य येथे सुरु केले ! पश्चात्ताप आणि प्रार्थना हें त्यांचे तिसरे रहस्य होय. ह्याची सविस्तर चर्चा पूर्वी झालीच आहे. शरणागति हा चवथा मुद्दा आणि रुक्ष तत्त्वज्ञानाच्या ठिकाणीं भक्तीचा उत्कर्ष करणे, हे त्यांचे पांचवे रहस्य होय. केशवचंद्रांनीं तत्त्वज्ञानावर ग्रंथ लिहिले नसले तरी त्यांचे चरित्र म्हणजे मूर्तिमंत तत्त्वज्ञानच होते. आणि त्यांस भक्तीचा पेहराव असल्यामुळे ते सामान्य जनतेसही लोकप्रिय झाले. त्यांच्या-सारख्या थोर ब्राह्म-पुढाऱ्यांनी हातापायांत घुंगुर बांधून नाचावे ही गोष्ट राजनारायण प्रभृति कित्येक ब्राह्मांस आवडली नाही. पण त्यावर केशवाचे म्हणणे वरती दिलेच आहे कीं, पापात्मक भावनांत मन हे गुंतणारच; मग तिकडून त्यास काढण्यासाठी तितकाच भक्तिप्रेमाचा अतिशय करावयास पाहिजे. धर्मास सार्वजनिक व सर्वसंग्राहक रूप देणे, ही त्यांच्या उद्योगांतील सहावी बाब होती, आणि जनसेवा तीच ईशसेवा ही सातवी गोष्ट झाली. आपला नवविधान धर्म हा ईशप्रणीत असल्याबद्दल निष्ठा हे त्यांचें आठवे तत्त्व असून नववा प्रकार म्हणजे रोजची उपासना होय. असे हे नवगुणात्मक नव-विधानाचे विधायक स्वरूप होते. ह्या विधायक कार्यक्रमाबरोबर विघातक गोष्टीसही त्यांनीच चालन दिले. सर्व धर्म सत्यस्वरूप आहेत, असे मानून त्यांनीं धार्मिक रूढींस व व्रतवैकल्यांसही ईशप्रणीत धर्माइतके महत्त्व दिले. व निरनिराळे विधि सुरू केले. त्या धर्मविधीतही लोकांचा गैरसमज करणारे अर्थवादात्मक स्तुतीचे स्तोम फारच माजले. या स्तुतीबरोबर विरोधकांचा द्वेषही वाढला. वाढत्या स्त्रीस्वातंत्र्यास विनाकारण आळा घातला, आणि आपल्या स्वातंत्र्यास आड येऊं पहाणारे समाजाचे प्रातिनिधिक स्वरूप झुगारून दिलें. आपली महती इतकी वाढविली की, आचार्य म्हणून केशव-चंद्र जे जे सांगतील ते ते सर्वांनी श्रद्धापूर्वक मानलेच पाहिजे, त्यांचा अधिक्षेप करतां कामा नये, असे त्यांनीं ठरविले. त्यांचे म्हणणे असे होते की, धार्मिक संस्था ह्या अवतारी व अधिकारी पुरुषांच्या आज्ञेनेच चालावयाच्या त्यांस प्रातिनिधिक नियंत्रण घालू पाहणें मूर्खपणाचे आहे. तेव्हां धर्मपीठावरून ते जें सांगतील ते प्रमादरहितच असलें पाहिजे, ह्याबद्दल शंका न घेतां ते सश्रद्ध मनानें ऐकावें. कारण आपली श्रद्धा चुकीची असली तरी सर्वज्ञ परमेश्वर-

श्रद्धावानास आपण होऊनच खरें ज्ञान देतो. ह्या त्यांच्या महतीच्या बढाईनें ते आपल्या अनुयायांत जसे आदरणीय वाटले, तसेच बाहेरच्या मंडळींत तिरस्करणीय झाले.

ते कांही असले तरी त्याचा नवविधान पंथ विशेषेकरून पुढील तीन गुणांनी विशेष विधायक व परिणामकारक झाला. सत्पुरुषांबद्दल आदर हा त्यांतील पहिला गुण होय. अहंमन्यतेत केशवचंद्र सेन इतर ब्राह्मपुढाऱ्यापेक्षां यत्किंचित्‌ही कमी नव्हते. पण साधुपुरुषांच्या संगतीबद्दल खरी खरी आस्था त्यांच्या ठिकाणी दिसते, तशी दुसऱ्या कोणत्याही ब्राह्मपुढाऱ्याच्या ठिकाणी दिसत नाहीं. श्रीरामकृष्ण परमहंस व दयानंद यांच्यासारखे संन्यासी, पवहारी बाबा व बाबाजी भगवामदास यांसारखे हिंदु साधु, रे० डॉल व रे० वैकुंठनाथ ह्यांसारखे खिस्ती पाद्री, आणि सय्यद सदरउद्दीन व सीराजुद्दीनसारखे मौलवी, ह्या सर्वांचे केशवचंद्रांवर प्रेम असून केशवचंद्रांचाही त्यांच्याबद्दल आदर असे. दुसरा गुण ईश्वराच्या सान्निध्याबद्दल अखंड भावना हा होय. त्यांच्या पश्चात् त्यांच्या पंथांची मिशन्स आणि मिशनरी होतेच, व्याख्यानमाला आणि थोर पुरुषांच्या स्मरणार्थ वार्षिकोत्सव हेही सुरूच होते. वर्तमानपत्रें व हस्तपत्रकेंही बंद झालीं नव्हतीं. पण प्रगतीच्या नांवाने मात्र पूज्य ! याचे मुख्य कारण ईश्वराच्या सान्निध्याबद्दल त्याच्यांत खरी निष्ठा नाही, असे केशवचंद्रांचेच अनुयायी म्हणतात. जेथे ईश्वराच्या सान्निध्याबद्दल निष्ठा नाही तेथे ईशवाणीचा प्रत्यय आणि त्यास शरणागति कोठून असणार ? तात्पर्य, वडिलांची पुण्याई, पूर्वप्राक्तनयोग, अथवा सत्संगति, इत्यादि कारणांनी केशवचंद्रांस प्राप्त झालेले व्यक्तिमहात्म्य त्याच्या बरोबरच लयास गेले ! आणि 'राजा कालस्य कारणम्' हे कालमहात्म्य मात्र मागे राहिले ! ह्या कालमहात्म्याने पूर्वी खुद्द केशवचंद्रांसही पुरे घेरल्यावांचून सोडलें नाहीं. मग इतरांची कथा काय ?

ज्या काळाचा आपल्याला विचार कर्तव्य आहे त्या काळीं एका बाजूस अज्ञानी लोकांनीं वेड्या वेड्या धर्माचारांचे रान माजविले होतें, तर दुसऱ्या बाजूस सुशिक्षित वर्गानें, धर्मशासनास अगदींच झुगारून देऊन वागण्यांत कांहींच ताळ ठेवला नव्हता. डुकराचे व गाईचे मांस पोटांत कोंबून इस्लामी व हिंदुधर्मांची इज्जत घ्यावी ! आणि बीर-दारूचे पेले झोंकून उदार मतें

बरळत सुटावें ! हें त्या काळच्या डफसाहेबांच्या विद्यार्थ्यांचे व तत्सम स्वैर वृत्तीच्या बंगाली तरुणांचे जीवन होते ! इतकेंच काय पण आपल्या चिरंजीवांनीं मद्याचा अव्हेर करणे, हे वडिलांसही असभ्य व लज्जास्पद वाटत असे ! गोषांतून बाहेर पडलेल्या तरुणीच्या लावण्यविनयावर पापी डोळ्यांची टोळधाड पडली होती ! आणि खिस्ती संस्कारांनीं वैष्णव धर्म व कुलाचाराचा घात केला होता ! केशवचंद्रांच्या समकालीन पिढीपेक्षां त्यांच्यापूर्वीची पिढी शील व पावित्र्य ह्या दृष्टीने पुष्कळच बरी होती, असे केशवचंद्रांनीं व त्यांच्या कांहीं अनुयायांनीं अनेक वेळां उद्गार काढले आहेत. इंग्रजी शिक्षण तरुण पिढीस नीट पचवितां आले नाही. ते त्यांस फारच बाधले होते. पुरुषांप्रमाणेच तरुण स्त्रियांचीही स्थिति शोचनीय झाली होती. सासरीं व माहेरीं कोठेच त्यांचे पटत नसे. आई-बापांना व नवऱ्यांना त्या सारख्याच त्रस्त करून सोडीत असत. आजीबाईंची पोथ्यापुराणावरील निष्ठा तरुण मुलींत राहिली नव्हती. आणि उलट शेक्स्पिअर किंवा मिल्टन ह्यातही त्या रमल्या होत्या असे नव्हतें. प्रपंच कसा करावा, काटकसर कशी राखावी ह्याची काडीची माहिती नसल्यामुळे, त्यांचे जिणे व्यर्थ भारभूत झाले होते. त्या संक्रमणकाली जडवाद नास्तिकवाद व अज्ञेयवाद यांचा सुकाळ झाला होता जुन्या धर्माचारांवर पुरी गदा आली होती. पण नवीन सुधारलेले असेही कोणतेच सदाचार रूढ झाले नव्हते. जुन्यापुराण्या धर्मरूढींची सरसहा तोड करून राजा राममोहन ह्यांनी आपला मार्ग मोकळा केला. देवेंद्रनाथांनी तेथे ब्राह्मधर्म बीजाचे आरोपण केले, आणि केशवचंद्र यांच्या निगेत तो वृक्ष वाढीस लागून चांगलाच मोहोरला. पण फलनिष्पत्तीच्या दृष्टीने पाहतां आज निराशेचीच स्थिति आहे हे ब्राह्मलेखकही नाकबूल करीत नाहींत.

उगम, वाढ आणि फलश्रुति ह्या दृष्टींनीं कोणी खिस्तीधर्माचीच उपमा ब्राह्मधर्मास देतात. जॉन धी बॅप्टीस्टप्रमाणें राममोहन ह्यांनीं भूमिका तयार केली, जीजस खाइस्टप्रमाणे ब्राह्मधर्माचा पुढे जन्म झाला आणि सेन्ट पॉलप्रमाणे केशवचंद्र हे ब्राह्मधर्मासही मागें सारून नवविधान काढते झाले. कोणी नवविधानास इस्लामी धर्माची उपमा देतात. महमद पैगंबराचे व्यक्तिमहात्म्य केशवचंद्रांनीं अंगिकारिले, आणि कुराणावरील निरसीम निष्ठा त्यांच्या नवसंहितेस प्राप्त झाली. अशा रीतीनें इस्लामी धर्मातील गुणांपेक्षां

वैगुण्याचेंच अनुकरण जास्त झाले, अशी कित्येक टीका करतात, तर कोणी हा बौद्धधर्माचा राजा अशोकच असे केशवचंद्राचे वर्णन करितात, आणि कोणी केशवचंद्रांस अद्वैतवादी वेदान्ती समजतात.

पश्चात्ताप व प्रार्थना यात केशवचंद्राच्या धार्मिक जीवनास आरंभ झाला. भक्तिमार्गात मध्यअवसान आले, आणि अखेर योगात त्याच्या जीवनाची समाप्ति झाली. केशवचंद्राच्या पश्चात्तापात पूर्वपापाची कल्पना येत नाही. त्याच्या समजुतीप्रमाणे पूर्वपाप ही कल्पनाच भ्रामक आहे. पूर्वपाप हा पदार्थच वास्तविक खरा नाही. कारण ते म्हणतात की, जे पाप पूर्वी घडून गेले ते आता कोठे आहे? अर्थात् जे पाप कालाबरोबरच नाहीसे झाले, त्याचा आणखी तो नाश काय करावयाचा? पाप हा काही आपला घात करणारा असा एखादा पदार्थ नाही. पापाचे स्वरूप आपल्या आत्मघातकीपणातच आहे. कारण मनुष्याच्या इच्छास्वातंत्र्यातच पापाचा उगम होतो. आपल्या हातून प्रत्यक्ष पाप घडले नाही, म्हणजे आपले कर्तव्य संपत नाही. तर पापात्मक वासनेचा संभवही अंतरात राहता कामा नये, तरच तो मोक्ष होय, असे केशवचंद्र समजतात. तात्पर्य, कर्मविपाक ह्या अत्यंत बिकट प्रश्नाचा त्यांनी खोलवर विचार करण्याचा प्रयत्नही केला नाही असे दिसते.

प्रार्थनेसंबंधी पूर्वी पुष्कळच उहापोह झाला आहे. प्रार्थनेच्या आरंभी ईश्वर आपल्या सन्निध आहे, असे भान झाले पाहिजे, आणि प्रार्थना करीत असता, त्याच्या सहवाससुखाचा अनुपम लाभ होऊन आपली तनु उत्कट भावनेने रोमांचित झाली पाहिजे, असे ते प्रार्थनेचे स्वरूपवर्णन करतात. केशवचंद्राचा भक्तिभाव पुरा डोळस होता. ईश्वराच्या अनेक गुणावरून त्याचे स्वरूप ठरविणे वेगळे व त्याचा प्रत्यक्ष साक्षात्कार होणे वेगळे. अगोदर देवाला डोळे भरून पहावा, आणि मग त्याचे गुणानुवाद गावे अशी त्यांची उपासना अत्यंत उज्ज्वल स्वरूपाची असे, असे म्हणतात. ईश्वरास प्रत्यक्ष पहाणे हा धर्म, व त्याची विवेकवाणी ऐकणे ही नीति, असे ते म्हणत. शास्त्र व गुरु यांच्या मार्फत मिळणारे शिक्षण अप्रत्यक्ष असून खरे शिक्षण ब्रह्मावलोकनांतच मिळते असा ते आपला अनुभव सांगत. कोणत्याही गोष्टीची युक्तता ठरविताना देशकालवर्तमान लक्षांत घेण्याची पद्धत त्यांस मान्य नव्हती. तसेच लोक काय म्हणतात व सांगतात ह्याची

त्यांनीं कधींच परवा केली नाहीं. उलट लोक ज्या गोष्टीस सम्मति दर्शवितात, ते कर्म हटकून धोक्याचे असतें, असें ते मानीत. लोकमताबद्दल ते अत्यंत तुच्छता दर्शवीत. लोकसंग्रहात्मक कर्मयोग हे त्यांचे खरें ध्येय नसून भक्तियोग हेंच त्यांचे वास्तविक ध्येय होय. मात्र त्या भक्तियोगाच्या उत्कर्षात "आत्मवत् सर्व भूतेषु" ही कसोटीही त्यास कमीपणाची वाटे. आपण सर्व केवळ बांधव नसून एकमेकांचे सेवक आहोत, अशी त्यांची शिकवण होती. यामुळें आपल्याप्रमाणेंच दुसऱ्याला लेखावयाचें नसून दुसऱ्यासाठीं आत्मसमर्पण करावयाचें, असें उच्च ध्येय ते लोकापुढे मांडीत असत पण हा केवळ समजुतीचाच घोटाळा आहे असें वाटतें. त्यांच्या भक्तिभावांत मूर्तिपूजेला जरी अवसर नव्हता, तरी अग्नि, जल, निशाणादि चिन्हें इत्यादि प्रतीकांची ते उपासना करीत असत. त्याचे अनुयायीही प्रतिमोपासना व प्रतीकोपासना ह्यांत भेद मानून एकाचा निषेध तर दुसऱ्याचा अंगीकार, असा फरक दाखवितात. बाह्य स्थूल मूर्तीप्रमाणें अंतरांत असलेले अमूर्त असे जे कामक्रोधादि विकार व चतुर्विध ईषणा इत्यादींची जोपासना करणें, ह्यांसही ते मूर्तिपूजा याच सदरात घालून त्याचा निषेध करीत असत. तात्पर्य, अमूर्त मनोविकारांस मूर्तस्वरूप मानणें, आणि अग्नि, जल, दीप, ध्वजा, क्रॉस, इत्यादि साकार जड वस्तूंची पूजा करूनही त्यास मूर्तिपूजा न म्हणणें, हे एकेश्वरीपंथाचे गूढ आहे. एकेश्वऱ्याचे एक विदेशी अग्रणी पूर्ववयांत एका खडकाच्या विवक्षित भागाची मनोभावें पूजा करीत असत, व त्यांत कांहीं अस्वाभाविक अथवा मूर्खपणाचें केलें, असेंही त्यांचे म्हणणे नसे ब्राह्मांतही वेदी, समाधि आणि पुतळे यांचे वैशिष्ट्य मानतातच. तसेंच मनुष्याची पूजाही ब्राह्मसमाजांत केवळ अशक्य आहे असें जरी केशवचंद्रांनीं अनेक वेळां प्रतिपादिले होतें, तरी त्यांनीं आपली स्वताची पूजा करून घेतली. आणि त्यांनीं श्रीरामकृष्णाचीही केली, तसेंच त्यांचेच कट्टे अनुयायी चिरंजीव त्रैलोक्यनाथ यांनीं एका काव्यांत कवीच्या नरहरीरूप भगवतीतनूचें वर्णन केले आहे. आणि "दिव्य प्रकाशांत मीं माझें नरहरीरूप जेव्हां पाहिलें, तेव्हां मीं मोठ्या आदरानें माझ्या पायाची धूळ मस्तकीं धारण केली." असें विलक्षण वर्णन केलें आहे. ह्या गोष्टीच्या समर्थनार्थ केशवांचे अनुयायी असें म्हणतात कीं आम्हीच काय पण कट्टे सुधारक

साधारण ब्राह्म हेही शिवनाथशास्त्र्यांच्या पायां पडत व त्यांच्या गळ्यांत हार घालीत इतकेच नव्हे तर युरोपिअन एकेश्वरी पाहुण्यांची चंदनाच्या गंधापासून यथास्थित पूजा करीत. तात्पर्य, फुले तीं फुलेंच. त्यात सर्वांत अत्तर एकच असले, तरी अत्तर म्हणजे कांहीं तीं फुले नव्हत. फुलांचे महात्म्य व त्यांचा गौरव कांहीं और आहे असेच त्यांचे म्हणणे दिसते.

असो. ह्याचप्रमाणे भगवन्नामाचा जप करणे, तीर्थक्षेत्रीं यात्रा करणे, सत्समागमाचा गौरव करणे, मेळे व नगरसंकीर्तने काढणे, एकतारी व खोळ यांजवर भजन करणे, इत्यादि वैष्णवांचे आचार केशवचंद्राच्या ठिकाणीं दिसत असत. वैष्णवधर्मांतीलच काय, पण साऱ्या प्रचलित धर्मांतील भक्त्युद्रेक त्यांच्या ठायीं एकत्रित झाल्यामुळे, हा ब्राह्मसमाजाचा अधःपात होत आहे, अशीही त्या वेळीं कित्येकांस भीति पडली.

योग हे केशवचंद्रांच्या जीवनाचे अत्यंत परिणत स्वरूप होय. त्याचा योग म्हणजे एकांतांतील समाधि नव्हे. ते योग म्हणजे जीवाची सहज-स्थितिच समजत समन्वय हे त्यांचे ब्रीदवाक्य होय. त्याचा योग अखंड टिकणारा व अनंत उन्नत होणारा असा असे. ते म्हणत की, ज्यास आपण मुक्ति म्हणतो, ती एक परिमित स्थिति आहे; पण योग हा अपरिमित आहे. बुद्धिबळांत फरजी अथवा मात होऊन डाव थांबण्यापेक्षां तो अखंड चालू राहण्यांतच अधिक मौज आहे असे म्हणण्यासारखे हें आहे. बौद्धिकवादा-प्रमाणेच अलौकिक अशा ज्या योगपद्धति त्यांचाही केशवचंद्रास तिरस्कार असे. योगाभ्यासास एकान्तवास उपकारक असला तरी तो ध्येयरूप होऊं नये, असा त्यांच्या सांगण्यांत कटाक्ष दिसतो.

जीवशिवाचा योग अखंड टिकणारा आहे. जीवाचा शिवांत लय होत नाहीं. किंवा जीवाला पुनरावृत्तिही नाहीं असे त्यांचे मत आहे. पूर्वजन्मींचे स्मरण नसतां, त्या जन्मींच्या पातकाचे फळ आपण ह्या जन्मीं भोगतों, असे म्हणणें हे केशवचंद्रांस अत्यंत अयुक्तिक वाटे; तसेच हिंदूंच्या मुक्तीच्या कल्पनेंत आत्मनाश अभिप्रेत असून जीवाने कष्ट सोसून पुण्य संपादन करण्यांत कांहींच हेतु राहात नाहीं असे ते म्हणत. "In Him we live, move, and have our being." हा त्यांच्या तत्त्वज्ञाना-चा पाया होय. आपल्या सर्व कर्मांचे कर्तृत्व जीव आणि शिव ह्या दोहोंकडे

असतें, तरी ईशेच्छा जाणून त्याप्रमाणें वर्तणें यांतच खरी माणुसकी आहे, अशी त्यांची निष्ठा असे.

भवितव्यतेच्या दृष्टीने ते अत्यंत अशावादी होते. जीवाची तशी इच्छा व प्रयत्न असो वा नसो, जीवाची अनंत उन्नतिच होत जाणार, असा त्यांचा सिद्धान्त होता. कर्म, उपासना, ज्ञान व योग ह्या चतुर्विध मार्गांचा इतकेंच काय पण हिंदु, बौद्ध, ख्रिस्ती व मुसलमानी आणि इराणी ह्या सर्व धर्मांचा त्यांनीं प्रथमच आपल्या नवधर्मात समन्वय केला, असे त्यांचे अनुयायी मोठ्या अभिमानाने सांगत असतात. तसेच प्रणव, त्रिशूळ, कमळ, क्रॉस व अर्धचंद्र इत्यादींचे एक संयुक्त चिन्ह प्रथमच त्यांनीं आपल्या नवविधानास योजलें असेही ते म्हणतात.

केशवचंद्रांच्या मुक्तिसिद्धान्ताच्या पायऱ्या नर, नरोत्तम, नरहरि आणि हरि अशा असाव्यात असे दिसते. ते मुक्तावस्थेला सरित्सागरसंगमाचा दृष्टान्त देतात. जीवन्मुक्त्याच्या भगवती तनूला विवर्तविलासाचेच साम्य दाखवितात. पण जीवाचें स्वतंत्र कर्म सुटल्यावर व तो ईश्वराधीन झाल्या-वरही ईश्वराकडून त्याची अनंत उन्नति होत जाते, हा त्यांचा आशावाद उरतोच. तसेच जगांतील सर्व धर्मांचे वैशिष्ट्य कायम राहूनही नवविधानाच्या सूत्रांत मणिगुणाप्रमाणे सर्व धर्मांचा समन्वय होईल, असा त्यांना भरंवसा होता. अशा रीतीने पूर्व-पश्चिमेचा सांधा जोडावा, ही त्यांच्या जीवितांतील फार मोठी महत्त्वाकांक्षा होती. आशियाचा युरोपला संदेश ह्या त्यांच्या शेवटच्या व्याख्यानांत त्यांनीं आशिआ ही धर्मसंस्थापकांची जन्मभूमि तिचा योग्य तो गौरव करून युरोपिअनांच्या अनेक गुणांचे अभिनंदन केले आहे. त्याचबरोबर युरोपिअनांच्या ठिकाणीं एशिआटिकांबद्दल असलेल्या विद्वेषाबद्दल त्यांची स्पष्ट कानउघाडणी करून राष्ट्रांतील निरनिराळे घटक, अथवा कुटुंबांतील वेगळाल्या प्रवृत्तीची माणसें किंवा शरिरांतील भिन्न अवयव तसेच संगीत जलशांतील निरनिराळीं वाद्ये, हीं सर्व आपआपले व्यक्तित्व अणुभरही न घालवितां उत्कृष्ट सलोखा व मिलाफ राखतात त्याप्रमाणे निरनिराळ्या देशींच्या व धर्मांच्या लोकांनीं ईश्वराच्या एकछत्राखालीं एकोप्याने नांदावे, असा त्यांनीं फार कळकळीनें उपदेश केला आहे. आणि ही गोष्ट ख्रिस्ताचे निशाणाखालीं घडून येण्याचा पूर्ण संभव आहे, असेही त्यांत दर्शविले आहे.

तात्पर्य, जीवाचा ब्रह्माशीं जो समन्वय तो योग व जीवाचा जीवाशीं जो सलोखा तीच मानवी संस्था असा communion व community ह्या दोन शब्दांच्या व्याख्या त्यांनीं केल्या आहेत. ह्या मानवी संस्थेची संघटना हें त्यांच्यासमोर ध्येयरूपानें दृश्य होतें. ते जसजसे मोठे होत गेले, तसतसा त्यांच्या अभिमानानें ब्राह्मसमाज व कलकत्ता शहर अथवा हिंदुसमाज व हिंदुस्थान इत्यादि मर्यादा उल्लंघून आशियाची सरहद्द गाठली होती. व्याख्यानाच्या ओघात त्यांनी आपल्याला हिंदु या नावांतच अनेक वेळां गोंवून घेतलें असलें, तरी तसा त्याचा अभिमान होता असें वाटत नाहीं. आम्हीं वेदांस झुगारून दिले असें जेव्हां ते बोलत, तेव्हां त्यांत त्यांच्या मनोधैर्याची प्रशंसाच गर्भित असे. ते आपल्याला निराकार अशा एकेश्वराचेच उपासक म्हणवीत. केशवचंद्र सेन आपल्याला ख्रिस्ताचा अंशावतार समजत असून त्यांच्यापूर्वीं जन्मलेल्या ( राममोहन ह्यास नव्हे ) श्रीरामकृष्णांना ते जॉन धी बॅप्टिस्ट असेंही मानीत ! येशू ख्रिस्त हेच त्याचे सारे जीवन होते. त्यांच्या रहाणींत व येशु ख्रिस्ताच्या रहाणींत फारच साम्य होते, असेंही म्हणतात. मग तो येशु ख्रिस्त ऐतिहासिक नव्हे असेंही ते कसे म्हणतात ते कोडेंच आहे ! त्यांची पुण्यभूमीची व्याख्या हिंदुकुश ओलांडून पॅलेस्तिनपर्यंत गेली होती. ब्राह्म-मॅरेज-ॲक्टाचे वेळीं कायद्याप्रमाणेही त्यानीं आपले मूळचे हिंदुत्व उघड उघड झुगारून दिले होते. अशा अनेक कारणांस्तव केशवचंद्र सेन हे आपल्यापैकीच एक वंदनीय पुढारी असले, तरी त्यांस हिंदु म्हणतां येईल असें वाटत नाहीं. आणि ही हिंदुत्वासंबंधीं बेपर्वाईच त्यांची संस्था आज नामशेष होण्यास कारण झाली, असें म्हटल्यास गैर होणार नाहीं.

ब्राह्मसमाजानें आपणास आपल्या बांधवांपासून स्वयं बहिष्कृत करून घेतलें हे ठीक नाहीं, अशी आतां केशवचंद्रांच्या अनुयायांत क्वचित् कोठें जाणीव उत्पन्न होत आहे. आणि कित्येक हिंदुसमाज आणि ब्राह्मसमाज ह्यांतील पडदा एनकेन प्रकारेण नाहींसा करण्याचें इच्छित आहेत. तथापि सामान्यतः नवविधानाचे विद्वान् पुढारी आपल्या पृथकत्वाला व वैशिष्ट्याला जागण्याविषयीं आपल्या संप्रदायबंधूंस इशारा देतच आहेत. राजा राममोहन ब्राह्म असले तरी हिंदुच होते. देवेंद्रनाथांचा ब्राह्मधर्म म्हणजे हिंदुधर्माची सुधारलेली आवृत्ति होय. पण नवविधान म्हणजे सुधारलेला हिंदुधर्म

नसून पाहिजे तर इतका वाढलेला हिंदुधर्म म्हणा की, त्याच्या अतिव्याप्तींत हिंदुधर्माची मर्यादा मुळींच राहिलेली नाहीं नवविधानपंथी लोक आम्ही कोणत्याच विशिष्टधर्माचे नाहीं, किंवा आम्ही सर्व धर्मांचे आहोत, असेंच आपल्याला म्हणवितात. कल्पनामय सार्वत्रिक धर्म त्यास जसा फोल वाटतो, त्याचप्रमाणे हिंदुधर्माच्या पुनरुज्जीवनांत सामील होणेंही त्यांस अनिष्ट वाटते.

राजा राममोहन ह्यांना ख्रिस्तीधर्माबद्दल जरी प्रेम वाटत होतें, तरी त्यांनीं स्वधर्माचा अभिमान यत्किंचितही सोडला नाहीं. स्वधर्माग्रह राखून एकेश्वरी ऐक्य संपादावे, असा त्यांचा दुहेरी हेतु होता. देवेंद्रनाथास एकेश्वरी ऐक्याबद्दल विशेष आस्था नसून स्वधर्माबद्दल मात्र उज्वल असा अभिमान होता, व ख्रिस्ती धर्माबद्दल प्रेम तर नव्हेच, पण किंचित् तुच्छताबुद्धिच होती. ही स्थिति केशवचंद्रांनीं व त्यांच्या अनुयायांनी अगदीच पालटली आणि देवेंद्राचा हिंदुधर्माग्रह कोठच्या कोठें नापत्ता होऊन एकेश्वरी ऐक्य आणि तेंही येशु-ख्रिस्ताच्या झेंड्याखालीं घडवून आणण्याची त्यानीं महत्त्वाकांक्षा धरली व ती अद्यापिही साफ सुटली असेल असें वाटत नाहीं. नवविधान संप्रदायाचे 'धी वर्ल्ड ऍण्ड धी न्यू डिस्पेन्सेशन' हें वर्तमानपत्र जर चालले तर त्यात गुड-फ्रायडे, ख्रिस्तमस हॉलिडे, मुक्तीफौजेचे जनरल विल्यम बूथ याचा वार्षिकोत्सव इत्यादि उत्सव, भारतवर्षीय ब्राह्ममंदिर असें नाव धारण करणाऱ्या संस्थेत नित्यनेमानें व उत्साहाने पाळतात. परंतु आपल्या प्राचीन शेंकडों आर्यो-त्सवांपैकीं एकही उत्सव पाळीत आहेत, असें दिसत नाही.×ही भारत वर्षीय ब्राह्म मंदिराची विटंबनाच होय, असें म्हणावयास काय हरकत आहे ?

डॉ० बेझंटबाईसारख्या विदेशी स्त्रियाही हिंदु पुराणाचा महिमा मुक्त-कंठानें गातात, व श्रीकृष्णभक्ति मनोभावे करतात, असे प्रकार सभोंवार पाहूनच कीं काय नवविधानांतील कित्येक सांप्रदायी आतां रामायण, भारत, भागवतादि ग्रंथांचा विशेष गौरव करूं लागले आहेत. आमचीं पुराणें म्हणजे सामाजिक व कौटुंबिक नीतीचे ठसे आहेत. राम, लक्ष्मण, सीता, हनुमान, कृष्ण, अर्जुन, भीष्म, सती सावित्री ह्यांचीं चरित्रे ही हिंदूंची खरी

× नाहीं म्हणायला अलीकडे एका मार्च महिन्यांत पवित्र होलीचा उत्सव ब्राह्म-संस्थेनें साजरा केल्याचें दिसून येते.

जिनगी आहे. राजाराणी, नागरिक–योद्धे, स्वामिसेवक, बंधुभगिनी, आईबाप, गुरुशिष्य, बंधु, पुत्र, मित्र हे कसे असावे, ह्यांचे आदर्श पुराणांत सांपडतात. त्याच प्राचीन सदाचारांची पुनरावृत्ति आज करावयाची आहे. यास्तव पुराणें म्हणजे प्राचीन-अर्वाचीन काळास सांधणारे उत्कृष्ट दुवे आहेत असे आतां केशवचंद्रांचे अनुयायी मुक्तकंठाने म्हणत आहेत. भगवद्गीताही त्यांस वंदनीय झाली आहे. श्रीमद्भागवतांतील कृष्णचरित्रास मनसोक्त गालिप्रदान देण्याचे धाडस आतां फारसें कोणी करीत नाहीं. राममोहनांची कृष्णनिंदा तर नाहीच, पण रवींद्रनाथांची रूपकदृष्टिही न अंगिकारितां आतां शारदासुत (केशवाला) येशोदासुताची उपमा देण्यांत गौरव वाटूं लागला आहे. राधाकृष्णचरित्र व सीतारामचरित्र म्हणजे जगाच्या इतिहासांतील अत्यंत दिव्य व ओजस्वी असे कथाभाग असे आतां नवविधानाचे ब्राह्मही लिहूं लागले आहेत. राम आणि कृष्ण; बौद्ध आणि चैतन्य हे सर्वोत्कृष्ट ब्राह्म होत, अशीही भाषा ह्या ब्राह्मलेखकांस गोड वाटूं लागली आहे. असा मनाचा पालट जरी कांहीं नवविधान लेखकांत पडत असला, तरी ज्या समाजांत मोझेस, जीझस आणि जनरल बूथ यांचे वार्षिकोत्सव मोठ्या आस्थेने होतात, त्या नवविधान-समाजांत राम–कृष्ण जयंत्या अथवा व्यास, भीष्म किंवा शंकराचार्य, यांच्या तिथि साजऱ्या कराव्या असे वाटत नाहीं, हे दुर्दैव होय! नाताळ पाळावयाचा मग नवरात्र कां नको! मेरी ही जगज्जननी मग काली आणि जानकी ह्या कोण? केशवचंद्र खिस्तचरित्रास ऐतिहासिकता कितपत देत होते ते एक गूढच आहे. त्यासंबंधी त्यांचे उच्चार, आचार आणि विचार यांत असावा तसा मेळ नाहीं. मॅक्स् मुल्लर यांच्या म्हणण्याप्रमाणे केशवचंद्र जीझस खाइस्ट ह्यास ऐतिहासिक पुरुषच मानीत होते. वास्तविक, खिस्त ह्या केवळ तत्त्वावर केशवचंद्रांसारख्या भाविकाचे समाधान राहणें कठीणच होते.

केशवचंद्र सेन हे विलक्षण भावनाप्रधान होते. त्यांनीं प्रभूचे पवित्र भोजन Lord's supper आणि शांतिजल Baptismal हे खिस्ती आचार सुरू केले, तसे (वैदिक) होमहवन आणि पौराणिक सावित्रीव्रत व कोकिळाव्रत, हीं पण प्रचारांत आणलीं, यामुळे ते म्हटले तर हिंदूंच्या अति जवळ, नाहीतर फारच दूर, अशी त्यांची वृत्ति होती. त्यांच्या अनुयायांतही हे मत-वैचित्र्य इतकें तीव्र नसले तरी अंशतः तरी कायम आहेच. हिंदराष्ट्रीय

ख्रिस्ती चर्च ही एक कल्पना ध्येयरूपाने त्यांच्यापुढें आहे. व ह्या संस्थेत साऱ्या हिंदुस्थानाचा व एकेश्वरी ऐक्य ह्या संस्थात सर्व राष्ट्रांचा, समावेश घडवून आणावा, असेही कित्येक म्हणत आहेत. कालाची गति विचित्र आहे. गौतमबुद्ध हा जसा विष्णूचा अवतार मानला, तसा येशुख्रिस्त हाही त्याचाच अकरावा अवतार झाला, असे सर्व सग्राहक हिंदुधर्म पुढे केव्हांही म्हणणारच नाहीं, असे कोणी सांगावे! तसेच आजच्या ख्रिस्ती जगाची शीलभ्रष्ट स्थिति व दुष्ट मनोवृत्ति ह्यात उद्या पालट पडल्यास त्याच्या अपराधांस्तव त्यांच्या धर्माबद्दल व धर्मसंस्थापकाबद्दल हिंदूच्या मनात उत्पन्न झालेली आढी उद्यां शिथिल होणार नाही, असे तरी कां म्हणावे? परंतु भविष्य-कालच्या गोष्टी भविष्यकाळावर ठेवून इतके आज अभिमानपुरःसर म्हणतां येईल कीं, आर्यभू ही ज्याची जन्मभूमि व पुण्यभूमि आहे, त्यानीं आपला अभ्युदय आर्यधर्माचरणानेच संपादावा, हेच उक्त आहे. आज शीख व जैन ह्यांसही, फार काय बौद्धासही, हिंदु म्हणून समजण्यास देश तयार होत असतां, ब्राह्मांनी निष्कारण अविचारानीं घातलेली ख्रिस्तीधर्माची मिठी सोडून, लवकरच स्वभानावर यावे हेच त्यांस उचित होय.

केशवचंद्रांच्या गेल्या वार्षिकोत्सवाच्या वेळी पंडित सीतानाथ तत्त्वभूषण असे म्हणाले की, केशवचंद्रानी आपल्या धार्मिक जीवनास "अथातो ब्रह्म-जिज्ञासा" ह्यात गर्भित असलेल्या शास्त्रीय प्रक्रियेप्रमाणे स्वधर्मजिज्ञासा पुरी करून नंतर आरंभ केला असता, तर ब्राह्मसमाज आज आहे, ह्या स्वरूपांत दिसला नसता; परंतु केशवचंद्रांनीं सुरुवातीसच ख्रिस्त व ख्रिस्ती जीवन हें आपल्यापुढे आदर्शभूत ठेवल्यामुळे ब्राह्मसमाजसंस्थेस आजचें स्वरूप प्राप्त झाले आहे. ह्या त्यांच्या म्हणण्यांत पुष्कळच तथ्य आहे यांत शंका नाही. केशवचंद्रांनी पूर्वपरंपरेस धरून प्रथम धर्माभ्यास केला असता, तर आज ब्राह्मसमाज हे नांवही, फार तर कलकत्त्याचे बाहेर, कोठेच ऐकूं आले नसते. राजा राममोहन व देवेंद्रनाथ ह्याचा ब्राह्मधर्म हिंदुधर्माच्या व्यापक स्वरूपाचे बाहेर कधींच गेला नाही. परंतु त्यानंतर ख्रिस्त मिशनऱ्यांच्या वळणावर जी ब्राह्मसमाजाची चळवळ जोराने सुरू झाली, तीस बहुतांशीं कारण केशव-चंद्र सेन हेच होत. साधारण-ब्राह्मसमाज व त्याच्या ठिकठिकाणी स्थापन झालेल्या शाखा, तसेच प्रार्थनासमाज व त्यांच्या शाखा ह्या केशवचंद्रांच्या

नवविधान पंथांत आज अंतर्भूत नसल्या तरी त्या सर्व संस्थांचे परंपरेनें मूळ-उत्पादक केशवचंद्र सेन हेच होत, असे म्हणण्यास हरकत नाहीं. हें खिस्ती वळण केशवचंद्रांनीं स्विकारलें नसतें, तर ते आज सर्वांच्या एकमताने ह्या देशातील संतमालिकेत जाऊन बसले असते. आणि मग त्यांनीं व त्यांच्या अनुयायांनी केलेलें धर्मकार्य अधिक उज्ज्वल, लोकप्रिय व फलदायी होऊन तें अधिक चिरस्थायी पण झाले असते. केशवचंद्रांस नवविधान ही एक संकुचित नवीन संस्था निर्माण करावयाची नसून नवविधान ही जगांतील धर्मा-कडे पहावयाची एक नवीन दृष्टि त्यांस रूढ करावयाची होती, असे ते म्हणतात. अशा ह्या शुद्ध दृष्टीस खिस्ती चष्मा घालण्याची त्यास बुद्धि झाली, हे देशा-चे मोठें दुर्दैव होय. ह्या गोष्टीचा प्रत्यय हळुहळू नवविधान पंथांतील लोकांस येऊ लागला आहे. केशवचंद्रांच्या अनुयायांपैकीं कित्येकांनीं आपलीं शास्त्रें व पुराणे यांच्याकडे आस्थापूर्वक पाहण्यास आरंभ केला आहे, आणि त्यांत किती गूढ तत्त्वज्ञान व नीति सांठविली आहे, त्याचा प्रकाश त्यांच्या चित्तात थोडथोडा पडूं लागला आहे, असे त्यांच्यापैकी कित्येकाच्या उद्गारां-वरून दिसून येते. विलायती कपड्यांच्या होळ्या महात्मा गांधीनी सुरू केल्या, त्या प्रसंगास उद्देशून नुकतेच एका बंगाली विदूषीनें असे उद्गार काढलेले नवविधानाचे पत्रांत प्रसिद्ध झाले आहेत कीं, "आपले शरीर आच्छा-दणाऱ्या विदेशी कपड्यांप्रमाणें आपले अंतःकरण व्याप्त करून सोडणारे विदेशी संस्कारही जाळून टाकण्याची आपण विशेष उतावळी करावयास नको काय?" असो.

केशवचंद्रांच्या पश्चात् त्यांच्या समाजाची लवकरच वाताहात झाली. त्यांचे सहकारी बालमित्र प्रतापचंद्र मुजुमदार हे केशवचंद्रांच्या अंतकाली विलायतेस होते ते तेथून परत आल्यावर समाजाचे आचार्यपदाबद्दल बखेडा उत्पन्न झाला. केशवचंद्रांचे शिष्य प्रतापचंद्रांस आचार्यपद देण्यास कबूल होत ना! त्यांनी ते आचार्यपद तसेच रिकामें ठेवण्याचे ठरविलें. त्यावरून अतिशय बखेडे उत्पन्न झाले, आणि लवकरच सर्व जगास एका धर्मछत्रा-खालीं आणूं पाहणाऱ्या ह्या एका नवविधानसमाजाचीं चार छकले झालीं. एक कुचबिहारच्या महाराणीचे आश्रयाखालील "लिलीकॉटेज-संघ"; दुसरा भाई गौर गोविंद यांचा "प्रचारकदरबार-संघ"; तिसरा तरुण ब्राह्मांचा

"प्रार्थना-संघ": आणि चवथा भाई प्रसन्नकुमार ह्यांचा "केशवआश्रम". ह्याप्रमाणें एका भारतवर्षीय ब्राह्मसमाजाचे चार संघ झाले. त्यांच्या एकीकरणाचा प्रयत्न बाबू मोहितचंद्र सेन आणि प्रो० विनयेंद्रनाथ सेन यांनीं इ. सन १९०६ साली करून पाहिला, पण तो निष्फळ झाला. कुचबिहार संघांचे मुखपत्र 'युनिटी आणि मिनिस्टर' हे आहे. दरबारसंघाचें वर्तमानपत्र 'वर्ल्ड ॲण्ड धी न्यू डिस्पेसेशन' या नांवाचे आहे. तिसऱ्या प्रार्थनासंघाचें प्रकृति नामक बंगाली पत्र निघते. आणि चवथ्या प्रेषित दरबारचे प्रसन्न कुमार ह्यानीं 'केशवाश्रम' ह्या नांवाचे विद्यालय सुरू केलें. ह्याप्रमाणे स्वदेशीं नवविधानाची जागृति राखून शिवाय प्रतापचंद्र हे शिकागो येथें तर प्रो० विनयेंद्रनाथ हे जिनेव्हा येथे, तर कोणी बर्लिन येथे भरलेल्या धर्मपरिषदांस हजर राहून त्यांनींही केशवचंद्रांचा विश्वबंधुत्वाचा संदेश साऱ्या जगास सांगितला. नवविधान पंथांतील विद्वानांइतके शब्दसृष्टीवर निरंकुश सत्ता गाजविणारे लेखणीबहादर इतर कोठे क्वचितच सांपडतील. मात्र पुष्कळ वेळां अनभ्यस्तांस, पूर्वीच्या पौराणिक नाटकांतील पल्लवांनी झांकलेल्या विदूषकाच्या चेहऱ्याप्रमाणे ह्या गाढ्या विद्वानांच्या पल्लवग्राही भाषेत विचाराचें तोंडच कोठे उमजत नाहीं. गुंतलेल्या सुताच्या गुंड्याप्रमाणे लांबलांब वाक्यांच्या गुंतागुंतींत विचाराचे अग्र हातीं लागणे पुष्कळ वेळां मुष्किलीचेच होते. ते कांहीं असो. पण त्यांनी निरनिराळी वर्तमानपत्रे व शाळा यांच्याद्वारे लोकशिक्षणाचे जे काम सुरू केलें ते त्यांस भूषणावहच झाले. तथापि सार्वत्रिक धर्म अथवा एक धर्मदृष्टि प्रस्थापित करण्याचे जे महत्कार्य केशवचंद्रांनी हातीं घेतलें होते, ते पुरे करण्याची, इतकेंच काय, पण त्याचा जोराने पुरस्कार करण्याचीही धमक त्यांच्या अनुयायांपैकी कोणांतच पुढे राहिली नसावी असे दिसते. केशवचंद्राच्या सहकारी अनुयायांत जे विशेष नावांजण्यासारखे पुरुष पूर्वीं होऊन गेले, त्यांच्यासंबंधीं त्रोटक माहिती पूर्वी एका प्रकरणांत दिलीच आहे.

नवविधान-पथाचा वार्षिक अहवाल प्रसिद्ध होत नसतो, यामुळे नवविधान-पंथाचा तपशिलवार इतिहास देण्यास सोपसे साधन उपलब्ध नाही. धी वर्ल्ड आणि धी न्यू डिस्पेन्सेशन ह्या नांवाचे त्यांचे एक इंग्रजी साप्ताहि सुरू आहे. त्यावरून ह्या संस्थेच्या कार्यक्रमाबद्दल कांहींशी अटकळ होते. नवविधान-पंथाचे भद्रोत्सव व माघोत्सव हे दोन वार्षिक उत्सव होत असतात. ह्या उत्सवांतून

दिवंगत झालेल्या ब्राह्मपुरुषांचे पुण्यस्मरण, कीर्तन, उपासना, नगरसंकीर्तन, आनंदबाजार, वगैरे कार्यक्रम असून बायबल, भगवद्गीता, वगैरे ग्रंथांधारें अगर स्वतंत्र अशीं व्याख्यानेंही होत असतात. श्रीरामकृष्ण परमहंस यांची पुण्यतिथि बुद्धोत्सव, गौरंगलीला, पवित्र होली, विरोधी लोकांचे हितास्तव प्रार्थना, इत्यादि कार्यक्रमही यांत असतात. ह्या प्रासंगिक सार्वजनिक उत्सवाशिवाय नामकरण, जातकर्म, श्राद्ध, विवाह इत्यादि खासगी संस्कारही ब्राह्ममंदिरात होत असतात; व त्यांची नोंद त्याचप्रमाणे ब्राह्मकुटुंबांतून झालेल्या जन्ममृत्यूची नोंदही त्यांच्या वर्तमानपत्रात असते.

राजकारणाशी राजा राममोहन ह्यांचा जेवढा निकट संबंध होता, तितका देवेंद्रनाथ व केशवचंद्र ह्यांचा मुळीच राहिला नाही केशवचंद्राच्या देशाभिमानापेक्षा त्याची स्वामिभक्तिच अधिक प्रखर होती–असें त्याच्या अनेक उद्गारांवरून दिसून येईल. तथापि ते आपल्या धर्मोपदेशकाच्या उच्च भूमिकेवर असता चक्रवर्ती राजे आणि महाराजे याचे मुगुटही आपल्या निशाणाखाली ओढण्यास कमी करीत नसत. तसेंच आजच्या त्यांच्या अनुयायांस जरी जहाल म्हणता न आले तरी आपल्या भारतवर्षीय ब्राह्ममंदिरात ते प्रसिद्ध असहकारवादी महात्मा गांधी यांचा मोठ्या प्रेमाने सत्कार करतात. आणि ब्राह्मसमाज सोडून गेलेले जहाल पक्षाचे नेते प० देशबंधु दास यांच्या मृत्यूबद्दलही खेदप्रदर्शक ठराव व प्रार्थना करीत असतात. यावरून देशभक्ति हे नवविधान भक्तींतील एक प्रधान अंग आहे, अशी त्यांची आजतरी शिकवण आहे असे दिसते.

हिमालयांत उगम पावलेल्या गंगेचा प्रवाह प्रथम लहान असला, तरी पुढे तो वाटेत आलेले खडक दुभंग करीत फुगत जातो, व शेवटीं समुद्राजवळ अत्यंत विस्तार पावतो. त्याप्रमाणे हिमालय ओलांडणारे राममोहन यांचें एकेश्वरी तत्त्वज्ञान हिमालयाच्या पहाडांत ध्यानमग्न राहणारे देवेंद्रनाथांच्या परमात्मभावांत परिणत झाले, तें पुढे केशवचंद्रांच्या कारकीर्दीत, मोंगीरचे भक्त्युद्रेक, भारताश्रमांतील अत्याचार व कुचबिहारचा लग्नगोंधळ, ह्या खडकांस भेदून पुढें नवविधानाच्या उत्सवमायेच्या सत्तेने नानाविध रूपानें प्रगट झालें. अमोघ अशा मेघवृष्टीनें वनश्रीला जे अभिनव ऐश्वर्य चढतें, तें माळ्यानें झारीनें एकेक झाड शिंपून येणार नाहीं. त्याचप्रमाणे सामुदायिक उपासनांचें

व धर्मोत्सवांचें खरें महत्त्व केशवचंद्रांच्या माघोत्सवांत पूर्णपणें प्रगट होत असे. जलप्रलयांत भूमीचे उंचसखल भाग जसे दिसेनासे होतात, त्याचप्रमाणे अशा महोत्सवाच्या आनंदसागराला भरती येऊन सर्व भेदभाव नाहीसे होत. परंतु अशी ही भरतीची वेळ अगदी मर्यादित असल्यामुळे आणि भरतीसही मर्यादवेलाची मर्यादा उल्लंघून जातां येत नाहीं, यामुळे उत्सवप्रिय लोकांच्या मूळ प्रकृतीचे खडक कांहीं कालाने उघडे पडत, आणि मग समाजनौका त्यांतून कशी हाकारावी ह्याचे कर्णधारांस मोठे कोडे पडे. असो. ते दिवस गेले. आतां आजच्या नवविधानपंथाचे मतवैचित्र्य व व्यक्तिमहात्म्य आणि त्याचप्रमाणे समाजाची संघटना यासंबंधी माहिती मिळविण्याकरितां आम्हीं नवविधानपंथीय अनेक अधिकारापन्न गृहस्थाशीं पत्रव्यवहार केला. परंतु आम्हास फारशी माहिती मिळाली नाही. नवविधान-पंथांतील फक्त एकच विद्वान् सद्गृहस्थानी आम्हांस मेहेरबानीने काही माहिती दिली ती थोडक्यांत प्रश्नोत्तररूपाने खालीं दिली आहे.

प्रश्नः—उपजत बुद्धि किंवा अंतरांतील विवेकवाणी हीच एक ज्ञानाचे साधन असे तुम्ही मानतां काय ?

उत्तरः—नाहीं.

प्रश्नः—सद्गुरूंच्या मदतीची तुम्हांला जरुरी भासत नाही काय ?

उ०ः—होय. आम्हांला भासते. मात्र सद्गुरु एक नसून अनेक आहेत व ते निरनिराळ्या प्रकारचे आहेत. सद्गुरु म्हणजे मध्यस्थ नव्हेत. तसेंच ते प्रमादरहित असतात असेंही नव्हे.

प्रश्नः—आपले मन दुर्बल असेल किंवा बुद्धिभ्रष्ट असेल, तर आपल्याला आंतून मिळणारा मनोदेवतेचा जाब चुकीचा किंवा खोडसाळ मिळून आपण फसूं नये म्हणून तुम्ही काय सावधगिरी घेतां ?

उ०—ज्या विवेकवाणीचा केशवांनीं उल्लेख केला आहे ती वास्तविक देववाणीच ( Voice of God ) असल्यामुळे ती दिव्य व अमोघ अशीच असते. परंतु ती वाणी आपल्या सारख्यांना बुद्धिगम्य होत असतांना ती दुसऱ्या गोष्टींशी संकर पावून दूषित होण्याचा संभव असतो. अशा वेळीं संतांचे अनुभव व शास्त्रप्रचीति यांचा पडताळा पहावा लागतो. क्वचित् योगाभ्यासांतील आपलेच आत्मप्रत्यय आपणांस योग्य इशारा देतात.

प्रश्नः—सविकल्प व निर्विकल्प समाधींचे अनुभव खरे आहेत असें तुम्ही मानतां काय ?

उ०:—आपल्या नित्याचे जाणीवेपलीकडील अनुभवांसंबंधीं आम्ही तर्क करित बसत नाही.

प्रश्नः—तुम्ही अद्वैतवाद, मायावाद, अवतारवाद, पुनर्जन्म, मूर्तिपूजा, विभूतिपूजा, हे कांहींच मानीत नाहींना ?

उ०:—आम्ही केवल अद्वैत मानीत नाही, मायावाद मानण्याची आम्हांला गरज नाहीं, आम्ही ब्रह्माचे अगणित अवतार ईशपुत्र ह्या रूपाने मानतो. पुनर्जन्मवाद, देवमूर्तिपूजावाद ह्यांची आम्हांला गरजच नसते.

प्रश्नः—योगाभ्यासावर तुमची श्रद्धा आहेना ?

उ०:—होय. पण आमचा योग म्हणजे केशवप्राणित सहजयोग होय.

प्रश्नः—एक्या सत्यदेवाचा साक्षात्कार झालेले गृहस्थ तुमच्या समाजांत आहेत काय ?

उ०:—होय. आहेत.

प्रश्नः—वैष्णवधर्माशी इतर ब्राह्मसमाजांपेक्षां तुमचे साधर्म्य अधिक नाहीं काय ?

उ०:—आमचे कोणत्या एका पंथानुभवाशी दुसऱ्यापेक्षां अधिक साधर्म्य आहे असे नाही. हा प्रत्येक व्यक्तीच्या अनुभवाचा व भावनेचा प्रश्न आहे.

प्रश्नः—मूर्तिपूजा, यज्ञोपवीतधारण आणि वर्णाश्रमभेद हीं प्रत्यक्ष पातकें आहेत असे तुम्ही मानतां काय ?

उ०:—ज्यांनी ईश्वराचे रूप व मानवी बंधुत्व जाणले आहे त्यांच्या दृष्टीने पाहिलीं दोन ही पातकेच होत. इतरांच्या दृष्टीने त्यांस आम्ही चुका अथवा धर्मवेड असे समजतो. वर्णाश्रमभेदाचे आजचे स्वरूप पापरूपच आहे.

प्रश्नः—केशवचंद्रांच्या नवसंहितेतील आचार तुम्हीं पाळतां काय ? त्यांत कांहीं महत्त्वाच्या सुधारणा झाल्या आहेत काय ?

उ०:—नवसंहितेतील आज्ञा अक्षरशः पाळावयाच्या नसून त्यांतील रहस्य जाणून त्याप्रमाणें वागावे असेंच त्यांनीं प्रस्तावनेत लिहिलें आहे.

ज्या संस्थेत पूर्ण मतस्वातंत्र्य आहे, अशा आमच्या समाजांत नवसंहितेतील आचार पाळणे अगर न पाळणे हें प्रत्येक व्यक्तीच्या कलावर अवलंबून असतें. नवसंहितेंत फेरफार झाले आहेत, पण ते नमूद करण्याइतके महत्त्वाचे नाहींत.

प्रश्नः—आपल्या समाजात हिंद्वेतरांचा अंतर्भाव होतो काय ?

उ०:—होय, अर्थात्. आमचा समाज सर्वसंग्राहक आहे.

प्रश्नः—तुम्ही आपणां स्वतःला अहिंदु असेच लेखतां काय ?

उ०:—आम्ही आपल्याला एकसमयावच्छेदेकरून हिंदु, मुसलमान, बौद्ध, खिस्ती, ज्यू, पार्शी इ०इ० मानतो. तेव्हां हा प्रश्नच उद्भवत नाहीं.

प्रश्नः—सामाजिक सुधारणा हे तुमच्या समाजाचे एक आवश्यक कर्तव्य आहे काय ?

उ०:—होय. दैवी संदेशाची अनुकूलता व स्फूर्ति मिळत आहे तोपर्यंत. ( Yes, subject to the sanction and suggestion of the Divine spirit ).

वरील प्रश्नांची उत्तरे पाठविणारे विद्वान् मित्र आणखी असेही कळवितात कीं, "केशवचंद्र हे कोणी तत्त्ववेत्ते नसून ते एक भक्त होते. तत्त्वविवेचनापेक्षां प्रत्यक्ष धर्मानुभव घेण्याकडेच आमचा अधिक कटाक्ष आहे. प्राचीनकाळापासून आजपर्यंत चालत आलेले निरनिराळे विचार, संस्कृति व ध्येये ह्या सर्वांचा समन्वय करून त्याची संगति लावणे हे नवविधानाचे उद्दिष्ट आहे. यामुळे नवविधानाचा इतिहास व तत्त्वज्ञान हें आज निश्चित नसून पुढे कालाबरोबर घडत जाणाऱ्या ह्या गोष्टी आहेत. निरनिराळे धर्म, विचार आणि आचार यांची संगति लावण्याकरितां केशव-चंद्रांनीं ज्या ज्या संस्था निर्माण केल्या, त्या सर्वच अल्पायुषी झाल्या! कुचबिहारच्या सोयरिकींतही हे समेलनाचेच रहस्य होते असे मानतात. परप्रातांत सोयरिकी करून, इतकेच काय पण केशवचंद्रांचे मुलगे व नाती यांचीं लग्ने इंग्लंडांत करून कुचबिहारच्या महाराणी माताजींनी केशवचंद्रांचेच व्रत पाळले, म्हणून त्यांचे मोठे गोडवेही गाण्यांत येतात; पण अशा लग्नांनीं देशावरील आपत्तीचे विघ्न टळणे शक्य नाहीं, हें गेल्या खिस्ती महायुद्धांनीं स्पष्ट केलें आहे. तात्पर्य, केशवचंद्रांसारखा अद्वितीय संस्थापक असतांही नवविधान

पंथाचा अथवा भारतवर्षीय ब्राह्म-समाजाचा, आदि-ब्राह्म व साधारण-ब्राह्म यांच्या समजांपेक्षां, अधिक अपकर्ष व्हावा, याचे एक कारण विवेकापेक्षां भावना ही अल्पायु असते; यामुळे साधनकाननांची सुंदर वनराई अशाश्वत ठरून सनदशीर संस्थाचे पक्के चिरेबंदी वाडेच गृहस्थाश्रमी लोकाचा लोक-संग्रह अधिक काल व्यवस्थित करू शकतात असेच अनुभवास आले. एक रवींद्रनाथांचे व्यक्तिगत नवजीवन पाहिजे, नाहीतर निदान साधारण-ब्राह्मांची ठणठणीत संघटना तरी पाहिजे. भारतवर्षीय ब्राह्म-समाजाच्या नवविधान पंथांत दोहोंचा अभाव झाल्यामुळे अपकर्ष झाला असावा असाच निष्कर्ष ठरतो. शिवाय असे की, केशवचंद्र सेन वेदान्त तत्त्वज्ञानास जितके पारखे होते, तितके पुढे त्यांचे अनुयायी पारखे राहिले नाहीत. व उलटपक्षी केशवांची ख्रिस्त धर्म व ख्रिस्ती लोक यांच्यावरील निष्ठा राजकारणातील कटु अनुभवां-मुळे पुढे सहजच मंदावली ! अशा स्थितीत हिंदु धर्मापेक्षां नवविधानात कांही विशेष आहे हे लोकांस पटविणे उत्तरोत्तर अशक्यच होत गेले असावे, असेही उघड दिसते.

---

# तिसऱ्या भागाची कालानुक्रमणिका

१८३८ केशवचंद्र सेन यांचा जन्म.

१८५६ केशवचद्रांचे लग्न.

१८५७ केशवचद्र ब्राह्मसमाजांत दाखल होतात. गुडविलफ्रटरनिटी. केशवचंद्रांचा गृहत्याग.

१८५९ सिलोनची सफर.

१८६० लघुग्रंथमाला. संगतसभास्थापना.

१८६१ ब्राह्मधर्म अनुष्ठान.

१८६२ केशवचद्रांस आचार्यपद व ब्रह्मानंद पदवी मिळते. कलकत्ता कॉलेज-स्थापना.

१८६३ एकेश्वरी मित्रसमाज. उपासनासमाज.

१८६४ मुंबई-मद्रासकडे प्रयाण. मिश्रविवाह. ब्राह्म-प्रतिनिधिसभा.

१८६६ भारतवर्षीय ब्राह्मसमाज-स्थापना. जीझस खाइस्ट. आशिया आणि युरोप व्याख्यान. मिस् मेरी कार्पेंटर यांचे स्वागत आणि संगत.

१८६८ नगरसंकीर्तन. मुंबईस दुसरी भेट. मोंगीरचा महोत्सव.

१८६८ भारतवर्षीय ब्राह्ममंदिराचे अनावरण.

१८७० इग्लंडास प्रयाण. इंडियन रिफॉर्म असोसिएशन.

१८७१ भारताश्रम. ब्राह्मविद्यालयाचा पुनरुद्धार.

१८७२ नेटिव मॅरेज ॲक्ट तिसरा. ब्राह्मप्रचारक समिती.

१८७४ समाजनियंत्रणाची चळवळ.

१८७५ श्रीरामकृष्ण परमहंसाची पहिली भेट.

१८७६ साधनकानन.

१८७८ कुचबिहारलग्नाचें वादळ. ६ मार्च.

,, साधारण-ब्राह्मसमाजाची स्थापना. ता. १५ मे.

१८७९ ब्राह्मगीतोपनिषद्. Am I an inspired Prophet? व्याख्यान. संतसमागम प्रार्थना.

१८८१ नवविधान, आम्हां नवविधानाचे प्रेषित. व्याख्यान. प्रेषितांचा दरबार. निरनिराळे शपथविधि. अग्न्यूपासना. पावनविधि. इत्यादि व्रतें.

१८८२ दंपति-संन्यास आणि दुसरीं व्रते.

१८८३ वेदिक शाळा. नवविधानाचा जाहीरनामा. ' आशिआचा युरोपला संदेश. नवसंहितायोग.

१८८४ देवालयाचे अनावरण. केशवचद्रांचा मृत्यु.

---

# तिसऱ्या भागाच्या आधारग्रंथांची यादी

१ प्रतापचंद्र मुजुमदारः— केशवचंद्रांचें चरित्र, व्याख्याने, इतर लेख.

२ केशवचंद्र सेनः—हिंदुस्थानांतील व्याख्याने, प्रार्थना, लेखसंग्रह, नवसंहिता (मराठी भाषांतर).

३ शिवनाथशास्त्रीः—ब्राह्मसमाजाचा इतिहास.

४ नटेसन्ः—केशवचंद्र, प्रतापचंद्र यांचीं चरित्रे.

५ निरंजननियोगीः—नवविधानाचे प्रेषित व प्रचारक.

६ गौरीप्रसाद मुजुमदारः—केशवचंद्र व त्यांचे विरोधि.

७ एम्ः—श्रीरामकृष्णवाक्सुधा.

८ रामकृष्णमिशनः—श्रीरामकृष्ण परमहंस चरित्र.

९ फर्कुहारः—आधुनिक धार्मिक चळवळी.

१० लिलिंग्स्टनः—ब्राह्मसमाज व आर्यसमाज ह्यांचा ख्रिस्तीधर्माशीं संबंध.

११ लिओनार्डः—ब्राह्मसमाजाचा इतिहास.

१२ धी वर्ल्ड ॲण्ड धी न्यू डिस्पेन्सेशन, इंडियन मेसेंजर यांचे अंक, इत्यादि.

॥ श्री ॥

# नवयुगधर्म

## खंड पहिला—भाग चवथा

---

## साधारण ब्राह्मसमाज

किंवा

## पंडित शिवनाथ व सीतानाथ

---



पंडित शिवनाथशास्त्री, ब्राह्म-इतिहासकार

जन्म—इ. सन १८४७. मृत्यु—इ. सन १९१७.

## प्रकरण पहिलें

# आद्यसंस्थापक

नवविधानसमाज व साधारण-ब्राह्मसमाज अशा भारतीय-ब्राह्मसमाजाच्या दोन शाखा झाल्याचें पूर्वी आलेच आहे. भारतीय-ब्राह्मसमाज ही मूळची संस्था आज लयास गेली असे जरी म्हणतां न आलें, तरी आपल्या देशांतील किंबहुना साऱ्या मानवी जगातील धर्मसुधारक व समाजसुधारक मंडळीचें कर्णधारत्व परमेश्वराने आपल्या हातीं दिले आहे, अशा आत्मविश्वासानें ज्या ब्राह्मसंस्था मागून नांवारूपास आल्या त्या नवविधानसमाज व साधारण-ब्राह्मसमाज ह्याच होत. ह्यांपैकीं नवविधानपंथाने धार्मिकविधि व साधने ह्यांस जास्त महत्त्व दिले, व साधारण-ब्राह्मसमाजाने समाजसुधारणा व समाज-नियंत्रण ह्या मुद्द्यांवर जास्त जोर दिला.

ह्या दोन्हीही संस्थांत पुढारलेल्या व स्वतंत्र बाण्याच्या बगाली तरुणांचाच भरणा होता. दोन्हीही संस्थांनी सामाजिक सुधारणांचे धोरण, ब्राह्मसंस्थेची रचना व नियमबद्धता, तसेंच धर्मप्रसाराची कल्पना, धर्मप्रचारकांच्या संज्ञा, आणि सामाजिक प्रार्थना ह्या सर्व गोष्टी खिस्तीधर्मातून घेतल्या. खिस्त सोडणे आपणांस शक्य आहे काय? व खिस्त आपण जोडावा काय ? हेंच प्रश्न त्या त्या संस्थांच्या शिरोभागी असलेल्या विद्वानांनीं आपल्या समाजबंधूपुढे मांडले; पण त्यांचीं उत्तरे मात्र निरनिराळीं दिलीं गेली. भारतीय आर्यांना खिस्त कधींच सोडतां येणार नाहीं, असे केशवचंद्रांनीं निक्षून सांगितले. व साधारण-ब्राह्माचे पुढारी एस्. के. चतर्जी यांनीं तितकेंच स्पष्ट सांगितले कीं, "भरतभूमीच्या उद्धारासाठीं आपल्याला खिस्ताची जरुरी नाही. हिंदुस्थानांतील ईश्वरवाद बायबलच्या शिकवणीपेक्षां कोणत्याही रीतीने कमी दर्जाचा नाहीं. आमचे वेद आणि उपनिषदे आमच्या उद्धारास पुरेशीं आहेत." साधारण-ब्राह्मांचे दुसरे अग्रणी पंडित शिवनाथशास्त्री हेही एका भाषणांत असे म्हणाले कीं, "खाइस्ट ही व्यक्ति एका काली होऊन गेली असें गृहीत धरले, तरी त्यांच्या अनुयायांतही अनेक बाजूंनीं त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ असे कित्येक पुरुष झालेले आहेत."

साधारण-ब्राह्मसमाजांत जीझस ख्राइस्टाबद्दल अशी ही उदासीन वृत्ति सर्वसाधारणपणें दिसून येते, असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. तथापि आचारविचारांनीं वैष्णवांच्या बरेच जवळ गेलेल्या नवविधानाच्या प्रचारकांनीं नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या सचित्र पुस्तकांत आपणांस अॅपास्टल्स ऑफ् धी न्यू डिस्पेन्सेशन असे म्हणवून घेण्यांत भूषण मानावें, व वैष्णवांशीं क्वचितच पटणाऱ्या साधारण-ब्राह्मांनीं, यंदांच्याच अहवालांत आपलें ध्येय काय, तें श्रीमद्भागवतांतील खालील दोन श्लोकांत* सांगावे, असें वाटावें, ही गोष्ट थोडी नवलाचीच खरी.

एकमेवाद्वितीयम्, सत्यंज्ञानमनंतंब्रह्म, ब्रह्मकृपाहि केवलं, धर्मंचर, धर्मात्परंन्नास्ति, यतोधर्मस्ततो जयः ॥ हीं साधारण ब्राह्मसमाजाचीं ब्रीदवाक्ये आहेत. त्यांचा अर्थ सहज समजण्यासारखाच आहे. ह्या सर्व सिद्धान्तपर वाक्यांचा

---

(१) *तदेव रम्यं रुचिरं नवं नवं
तदेव शश्वन्मनसो महोत्सवम् ।
तदेव शोकार्णव-शोषणं नृणां
यदुत्तमश्लोक-यशोऽनुगीयते ॥

—भागवतम्, १२।१२।४८.

**भावार्थः**—ज्यांत परम पुरुषाचे गुणानुवाद गाइले आहेत, तेंच आनंददायक, नवीन व रुचिर होय. त्यानेंच मनाच्या ठिकाणीं आनंदाचा नित्य महोत्सव होतो, व त्यानेंच मानवांचा शोकसमुद्र कोरडा पडतो.

(२) यस्यास्ति भक्तिर्भगवत्यकिञ्चना
सर्वैर्गुणैस्तत्र समासते सुराः ।
हरावभक्तस्य कुतो महद्गुणा
मनोरथे नासति धाव तो बहिः ॥

—भागवतम्, ५।१८।१२.

**भावार्थः**—ज्याला ईश्वराची निष्कामभक्ति साधली, त्याच्याच ठिकाणीं सर्व गुण व दैवी संपत्ति वास करिते, ज्याचें ईश्वरावर प्रेम नाहीं, व ज्याच्या वासना त्यास मिथ्या विषयांकडे ओढून नेतात, त्याच्या ठिकाणीं श्रेष्ठ प्रकारचे सद्गुण कोठून राहणार !

रोख जितक्या उत्कटतेने धर्मशीलसंवर्धनाकडेच लागतो, तितक्या उत्कटतेनें साधारण-ब्राह्मांकडून धर्मकार्य आजपर्यंत झालेले नाहीं, याबद्दल अलीकडे तरी प्रत्येक सालच्या त्यांच्या अहवालांत खेद प्रदर्शित केलेलाच आढळतो. ब्राह्म-समाजाचे पूर्वींचे संस्थापक राजा राममोहन, देवेंद्रनाथ व केशवचंद्र ह्यांच्या तोडीचे असामान्य कोटींतील पुरुष 'ब्राह्मसमाजात' नांव घेण्यासारखे पुढे कोणी झाले नाहीत. असे आहे तरी साधारण-ब्राह्मसमाजाचे मूळ संस्थापक आनंदमोहन बोस, पंडित शिवनाथशास्त्री, शिवचंद्र देव व उमेशचंद्र दत्त हेही नांवाजण्यासारखे पुरुष होऊन गेले, यांत शंका नाही. विस्तारभयास्तव त्यांचीं साग्रचरित्रे देता येत नाहीत. तथापि त्यांच्या चरित्राचे त्रोटक वर्णन पुढे करीत आहोत; त्यावरून अंशतः बोध होईल.

**आनंदमोहन** यांचा जन्म इ. सन १८४७ साली झाला. बहुतेक सर्व थोर पुरुषांप्रमाणे आनंदमोहन ह्यांच्या शीलसंवर्धनास त्यांच्या आईचे संस्कारच अधिक कारण झाले. त्यांची आई एक जुन्या चालीरीतीची भाविक बाई होती. तिने सर्व तीर्थयात्रा केल्या होत्या. तिच्याइतकी धर्मनिष्ठ व व्रतस्थ अशी स्त्री क्वचितच पाहण्यास मिळेल. शिवाय ती मोठी कर्तृत्ववान् होती. आनंदमोहन ह्यांच्या बाळपणींच त्यांचे वडील वारले. तेव्हा त्यांच्या मोठ्या इस्टेटीची व्यवस्था व मुलांचा विद्याभ्यास तिनेंच चालवून घराण्याची इभ्रतही चांगली राखली. ह्या साध्वी स्त्रीचें पातिव्रत्यही तसेच उज्ज्वल होते. तिच्या-समोर बोलताना तिच्या पतीचें नाव सहज कोणाच्या तोंडून निघताच त्या पुण्यस्मरणाबरोबर नम्र भावाने दोन्ही हात जोडून ती मस्तकी धारण करी, व तोपर्यंत तिच्याशी बोलणारास बचकून थांबावेच लागे! तिचा भाविकपणा इतका होता कीं, ती मेण्यांतून कोठे जात असता, वाटेनें कोठे एखादें पिराचे थडगे दिसले, तर ती तेथे मेण्यांतून खालीं उतरून पायी चालत असे, व त्यास नमस्कार केल्यावांचून पुढे जात नसे. एकदां कांहीं यात्रेकरू जहाजांत बसून जगन्नाथाला जात असतां ते जहाज वादळांत सांपडून बुडाले. त्याच जहाजांतून आनंदमोहनांची आई यात्रेला जावयाची होती; पण कांहीं निमित्तकारण होऊन तिचे जाणे राहिले व जीव बचला; पण याबद्दल तिला आनंद न होतां, "देवांनीं इतक्या यात्रेकरूंस आपल्या पायाशी नेलें, आणि मीच तेवढी त्यास नकोशी कशी झालें?" असें वाटून तिला फार

दुःख झालें ! ह्या भाविक आईचें इतकें बारकाईनें वर्णन देण्याचें कारण इतकेंच कीं, ब्राह्मसमाजाचे पुढारी ज्या स्त्रियांच्या पोटीं जन्मास आले, त्या स्त्रियांचा स्वभाव व शील यांचें शक्य तितके स्पष्ट चित्र वाचकांसमोर असावें.

अशा धर्मभोळ्या आईच्या पोटीं जन्मास आलेले आनंदमोहन हेही सात्त्विक अंतःकरणाचे व धार्मिक प्रवृत्तीचे निघाले यांत नवल नाहीं. खेदाची गोष्ट इतकीच कीं, आनंदमोहन ह्यांच्यावर इंग्रजी विद्येचे जे संस्कार झाले, ते मूळच्या संस्कारांस अनुकूल व पोषक असे नव्हते. ते एक नामांकित बॅरिस्टर होते, ही गोष्ट खरी; तरी पण त्यांचें चित्त त्या धंद्यांत केव्हांही नव्हतें. इतकेंच नव्हे तर हीं कज्जांच्या कागदांचीं भेंडोळीं मला विषारी सर्पाप्रमाणें भयप्रद व तिरस्करणीय वाटतात, असे ते आपल्या प्रियपत्नीजवळ म्हणत. ते प्रेमचंद रायचंद स्कॉलर होते. त्याचप्रमाणें ते पहिले हिंदी रँग्लर होते. तरी त्यांचें लक्ष त्या विद्येतही विशेष गुंतलेले नव्हते. ते अतिशय बुद्धिमान् असल्यामुळे ते स्कॉलर, रँग्लर, व बॅरिस्टर सहज झाले. पण त्यांच्या अंतःकरणाची भूक वेगळीच होती. ते मनाचे अत्यंत प्रेमळ व परम मातृभक्त होते. मोठेपणीं बॅरिस्टर झाल्यावरही कोर्टांतून घरीं आले कीं त्यांनीं तसेंच पोषाख न काढतां आईकडे जावें. ती माउली हातीं माळ घेऊन नेहमींच्या ठिकाणीं नामस्मरण करीत बसली आहे, असे पाहिले, कीं ह्यांनीं आपला आंगरखा तेथेंच टाकून देऊन, त्या परमपूज्य मातेपुढे सपशेल आडवे पडून, तिचे अंकावर डोकें ठेवून निजावें, आणि ती पाठीवरून प्रेमानें हात फिरवून उठवीपर्यंत तसेंच मातृप्रेमानंदांत पडून रहावें ! जन्मदात्या आईप्रमाणें मायभूमीवरील त्यांचें प्रेमही अलोट होते.

ह्याप्रमाणे आनंदमोहन हे स्वभावाने फारच गोड व मोठे परोपकारी होते. गुप्तदान करण्यांत त्यांना आनंद वाटे गरीबांच्या संतोषापुढे व धन्यवादापुढें मोठे प्रचंड सन्मानाचे समारंभही त्यांस तुच्छ वाटत. एकदां रस्त्याने जात असतां भीक मागणाऱ्या एका अनाथ गरीब म्हातारीला त्यांनीं एक रुपया दिला. तो रुपया पाहतांच त्या म्हातारीला अनिवार गहिंवर लोटला. त्या बिचारीला तो आनंद झालेला पाहून आनंदमोहन ह्यांस जें समाधान झाले, तें व्हाईसरॉयांच्या एखाद्या स्तुतिपर गौरवानें झालें नसतें.

आनंदमोहन इंग्लंडांत शिकत असतांना, इंग्लंडचे मुख्य प्रधान होण्याची

ह्यांची लायकी आहे, असें तेथील साहेब लोक म्हणत. दोनशें वर्षांपूर्वी ते जन्मास आले असते, तर ते हिंदुस्थानांतील एक सुप्रसिद्ध साधु म्हणून प्रसिद्ध झाले असते, असें निवेदिताबाई म्हणतात. ते कायदे-पंडितांत उमेशचंद्र बानर्जी ह्यांच्या बरोबरीचे, गणित्यांत पाहिले हिंदी रँग्लर, राजकारणांत सुरेंद्रनाथांहूनही सरस आणि ब्राह्मसमाजांत तर केवळ आदर्श-भूतच होते ! बुद्धिवैभवांत आनंदमोहन हे एक नरपुंगवच खरे; पण त्यांचें अंतःकरण एखाद्या स्त्रीप्रमाणें कोमल होते. ते जरी मोठे नामांकित राष्ट्रीय वक्ते होते, तरी त्यांची देशप्रीति त्यांच्या व्याख्यानांपेक्षां रोजनिशींतूनच अधिक कळून येते. देशकार्य हें एक देवकार्यच आहे, असें ते मानीत असत. मनुष्य-जन्माचा अमोलिक ठेवा ईश्वराने आपणांस दिला आहे, तो देवकार्यीं झिजविण्यासाठीं ते अत्यंत दक्ष असत. एक दिवस वायां फुकट गेला, तर त्याबद्दल त्यांस किती वाईट वाटे, ते त्यांच्या रोजनिशीवरून दिसून येतें. तसेंच त्यांची ईश्वराविषयीं प्रेमळवृत्ति, त्यांच्या समाजपीठावरील प्रवचनां-पेक्षां, त्यांनीं एकांतांत बसून आपल्या प्रियपत्नीस लिहिलेल्या पत्रांत अधिक दिसून येते. तात्पर्य, ते मोठे पंडित होते, मोठे राजकार्यधुरंधर होते, मोठे समाजसुधारक होते, पण याहीपेक्षा त्यांचे खरें वर्णन ते अंतराचे एक तापसी साधु होते; असे त्यांचे निकटवर्ती स्नेही म्हणतात. एकांतांत बसून ईश-चिंतन करण्याचा त्यांस नाद असे. त्यांची ईशनिष्ठा त्यांच्या रोजनिशीच्या प्रत्येक पानांत दिसून येते. प्रार्थनेचें अवडंबर घालण्याचा त्यांना कंटाळा होता. रोजच्या कौटुंबिक प्रार्थनेच्या वेळींही मोठ्यानें प्रार्थना करणें, त्यांस साधत नसे. ते आपल्याला ( Servitus Dei ) देवदास म्हणवून घेण्यांत भूषण मानीत. अशा ह्या आधुनिक काळच्या एका हिंदी ऋषीचे हातांत मात्र ईश्वरानें बायबल दिलें होते ! परंतु त्या वेळच्या देशकालमानाकडे पाहतां त्याबद्दल कोणी वैषम्य मानण्यांत अर्थ नाहीं.

पंडित शिवनाथशास्त्री व आनंदमोहन हे दोघे जिवलग स्नेही होते. दोघांचा जन्म एकाच सालीं झाला. दोघेही केशवचंद्रांच्या भारतवर्षीय ब्राह्म-मंदिराच्या प्रथम अर्पणसमारंभाच्या वेळींच ब्राह्मसमाजांत दाखल झाले. अखेरपर्यंत त्या दोघांनीं सहकारित्वाने ब्राह्मसमाजाकरितां अतिशय परिश्रम केले. भारतवर्षीय समाजांतून साधारण-ब्राह्मसमाज बाहेर पडण्याचे वेळीं आनंद-

मोहन व शिवनाथ बाबू ह्यांनीं रात्रीच्या रात्री विचार करण्यांत घालविल्या. समाजांत फूट पडूं नये म्हणून आनंदमोहन ह्यांनीं शिकस्त केली; पण त्याचा उपयोग झाला नाहीं. शिवनाथ बाबूंप्रमाणेच आनंदमोहन ह्यांचा समाजनियंत्रण व स्त्रीस्वातंत्र ह्या दोन मुद्द्यांवर विशेष भर होता. विलायतेत त्यांनीं कांहीं वर्षें काढलीं असल्यामुळे समाजाची रचना ठरविण्याचे श्रेय बहुतेक त्यांसच घेतां आले. प्रथमपासून त्यांच्या आयुष्याच्या अखेरपर्यंत साधारण-ब्राह्मसमाजाचे तेच अध्यक्ष होते.

ब्राह्मसमाजाच्या बाहेरही त्यांचे कार्यक्षेत्र फार मोठे होते. शिक्षणविषयक, सामाजिक आणि राजकीय चळवळींचेही ते अग्रणी होते. इंडियन असोशिएशन व राष्ट्रीयसभा ह्या संस्थांत व सन १९०७।०८ सालच्या प्रचंड राजकीय चळवळींत सुरेंद्रनाथ बाबूंचे जोडीदार असे तेही एक लोकाग्रणी होते. आनंदमोहन ह्यांस बंगालचे माधवरावजी रानडे असे म्हणतात. त्यांच्या पत्नीने रमाबाईप्रमाणे आपल्या आयुष्यातील आठवणी प्रसिद्ध केल्या असत्या, तर त्या उभयतांच्या कोमल स्वभावाच्या माधुर्यांत अधिक साम्य प्रगट झाले असतें, असे आम्हांस वाटते.

दुसरे पुढारी **पंडित शिवनाथशास्त्री**, हेही एम्. ए. असून साधारण-ब्राह्मसमाजाचे एक प्रमुख पुरस्कर्ते होते. किंबहुना त्यांनीं केलेली वाङ्मयसेवा आणि प्रचारक व उपदेशक म्हणून त्यांनी केलेलें धर्मप्रसाराचे काम, हे लक्षात घेता, ते साधारण-ब्राह्मसमाजाचे मुख्य आधारस्तंभ होते, असेच म्हणावे लागते. ते मूळचे दाक्षिणात्य सामवेदी ब्राह्मण होते. त्यांचे पणजे अत्यंत शुचिवर्तनाचे भाविक धर्मात्मे होते. त्यांच्या चरित्राचा पंडितजींना अत्यंत आदर असे. पंडित शिवनाथ यांचे वडील मोठे संस्कृतज्ञ असल्यामुळे त्यांस विद्यासागर ही पदवी असे; परंतु ते अत्यंत नास्तिक व तामसीपणांत केवळ कर्दनकाळ असत. शिवनाथांची आई व आईची आई ह्या दोन अत्यंत मायाळू व परोपकारी स्त्रिया होत्या. राजा राममोहनांप्रमाणें पंडित शिवनाथ यांस दोन बायका होत्या. त्यांच्या पहिल्या लग्नाचा साखरपुडा झाला, तेव्हां ते दोन वर्षांचे व त्यांची चिमुकली बायको एक महिन्याची होती. पुढें हें लग्न त्यांच्या वयाच्या बारावे वर्षीं झालें. ही बालविवाहित स्त्री पुढें अत्यंत सुशील व परोपकारी निपजली. व तिनें आपल्या आंगच्या उत्कृष्ट शीलानें आपल्या



देवदास आनंदमोहन बोस, अध्यक्ष

जन्म—इ. सन १८४७. मृत्यु—इ. सन १९०६.

पतीची मर्जी तर प्रसन्न केलीच; पण त्यांच्या सर्व समाजाचें लक्ष आकर्षून घेतलें! तथापि दैवदुर्विलास असा कीं, ह्या पहिल्या सूनबाई मामंजींना नापसंत होऊन त्यांनी आपल्या मुलाचे अठरा एकोणिसाव्या वर्षींच दुसरें लग्न केलें. ही गोष्ट अर्थात् शिवनाथ ह्यास मुळीच पसंत नव्हती; परंतु त्यावेळीं बापापुढें ब्र काढण्याचीही त्याची प्राज्ञा नव्हती. त्याच्या वडिलाच्या हातातील प्रत्यक्ष चवदावें रत्न इतकें प्रखर होतें की, त्याच्या तडाख्यातून ते एकदा मरतां मरतां वाचले! त्या प्रसंगीं आपला मुलगा नाहक मार खाऊन ठार मेला, असे समजून त्याची अभागी आई घर सोडून जंगलात रडत बसली होती! मुलगा मेला नसून जिवत आहे, असें कोणीं तिला येऊन सांगितलें; पण तें तिला खरेंच वाटेना! पुढें मोठेपणीही शिवनाथबाबूंचा पावठा ब्राह्ममंदिराकडे वळलेला पाहताच त्या जमदग्निबोवांची पायाची आग मस्तकास गेली. त्या अपराधाबद्दल इतक्या प्रौढ वयातही त्यास उभें फोडून काढण्याची म्हातारे-बुवांनीं तयारी केली. आपल्या बायकोस तर तुझा मुलगा मेला असेंच त्यांनी सांगितलें. घरच्या देवाची पूजा नित्याप्रमाणें ह्यापुढें आपण करणार नाहीं, असें एक दिवस शिवनाथांनी सांगताच, त्यास वठणीवर आणण्याकरितां वडिलांनीं खरोखरच बाबूंचे टिकोरें हातात घेतलें. गरीब बिचाऱ्या आईनें पुष्कळ मध्यस्थी केली, रडून रडून भुई भिजविली पण व्यर्थ! ह्या वेळी पंडित-बोवाही बरेंच निर्ढावले होते. त्यांनी वडिलास शांतपणें पण ठासून इतकेंच सांगितलें की, "बाबा, मला व्यर्थ कशाला मारतां? याउपर आपण मला मारलेंतच तर तें मी सर्व सहन करीन; परंतु तुम्ही मारान माझें हाडनी हाड मोकळें केलेंत तरी मी पुनश्च तुमच्या देवघराचा उंबरठा ओलांडणार नाहीं!" मुलाच्या ह्या धिटाईच्या जबाबानें तो जमदग्निही चपापला आणि त्या दिवशीचा अतिप्रसंग कसाबसा टळला! त्यानंतर मरेपर्यंत पितापुत्रांचें मात्र पुन्हा दर्शन झालें नाहीं! तरी त्यापुढेंही एक दोन वेळा खुद्द आपल्या मुलावर, केवळ त्याच्या धार्मिक स्वैरवृत्तीस्तव, मारेकरी घालण्यासही त्या वृद्ध विद्यासागरांनीं कमी केलें नाहीं.

ह्या घरच्या विद्यासागराप्रमाणें शिवनाथ ह्याचे कॉलेजांत दुसरे एक विद्या-सागर होते; परंतु एक सागर आंगच्या तामस क्षारामुळें झोंबरे व तोंडीं न लागण्याइतके खारट! तर दुसरे सत्त्वगुणामुळें तितकेच शीत व मधुर होते.

ते सुप्रसिद्ध विधवाविवाहप्रवर्तक ईश्वरचंद्र विद्यासागर हे होत. त्यांच्यासंबंधीं उल्लेख मागें द्वितीय खडांत आलाच आहे. त्यांच्या मतांची छाप तरुण शिवनाथांवर इतकी बसली की, त्यांनीं विद्यार्थिपणांतच विधवाविवाहाचा जोरानें पुरस्कार चालविला. शिवनाथबाबूंची घरची अत्यत गरिबी असतांही पुनर्विवाहित नवदंपतींस लोकक्षोभापासून बचावण्याकरितां, ते जोरानें अभ्यास करून स्कॉलरशिपा मिळवीत, व ते पैसे आपल्या बहिणीसमान मानलेल्या पुनर्विवाहित मुलींच्या चोळीबांगडीकरितां देत असत !

सुप्रसिद्ध वैष्णव कुळांतील प्रसिद्ध ब्राह्मधर्मप्रचारक विजयकृष्ण गोस्वामी हे शिवनाथांचे सहाध्यायी होते. त्यांनींच आपल्या ह्या मित्रास आपल्याबरोबर भारतीय-ब्राह्मसमाजांत नेले. तेथे कांहीं काल शिवनाथ हे केशवचंद्रांचे मोठे भक्त व अनुयायी होते; परंतु पुढे कुचबिहारचे लग्नानंतर त्यांच्यापासून फुटून निघण्यांत शिवनाथशास्त्री ह्यांनींच विशेष पुढाकार घेतला. ते मनाचे मोठे निग्रही होते. त्यांनीं पूर्वीं ब्राह्मधर्माची दीक्षा घेऊन यज्ञोपवीताचा त्याग करतांनाही त्यांच्यावर मोठा प्रसगच होता. शिवनाथबाबू आईबापांचे एकुलते एकच चिरंजीव त्यांनीं यज्ञोपवीताचाही धिक्कार केला, हे त्यांच्या आईबापांस समजले, तर तीं वृद्ध मातापितरें, एक दुःखानें तर दुसरें संतापानें, आपला घात करून घेतील, असे त्यास वाटे; परंतु अशा वेळी " बाळा, धीर सोडूं नको, चल, पुढे हो, मला तुझ्या हातून काहीं कार्य घडवून आणावयाचें आहे." असे शब्द कानी पडल्याचा त्यांस वरचेवर भास होई. ब्राह्मधर्मदीक्षेबद्दल ह्यामुळेच त्यांचा चटकन् निर्धार झाला असे म्हणतात पण पुढें नवलाची गोष्ट ही कीं, ह्या ईश्वरी आदेशाच्या मुद्दयावरच केशवचद्रांशीं त्यांचा कायमचा बेबनाव झाला. त्याचप्रमाणे व्यक्तिपूजेच्या बाबतीत केशवचंद्रांच्या टीकाकारांत ते सामील होते; पण पुढे साधारण ब्राह्मसमाजाचे पुढारी या नात्यानें वागत असतां साधारण ब्राह्मांपैकी कित्येक स्त्री पुरुष त्यांस गुरूंप्रमाणे लेखून त्यांच्या पायां पडत व त्यांच्या गळ्यांत हार वगैरे घालून त्यांचा आदरही करीत. षड्विकाराचे होम, पंचदीपाचे प्रतीक, इत्यादि कित्येक विधींत ते केशवचद्रांचे अनुयायी होते, असे दिसते. तथापि त्यांनीं कुचबिहार लग्नासबंधीं जी केशवचंद्रांवर टीका केली ती खोटी, निराधार व द्वेषमूलक होती, असा केशवचंद्रांच्या काहीं कट्टया अनुयायांचा त्यांच्यावर

फार मोठा आक्षेप आहे; परंतु आम्हांस मात्र त्या आक्षेपांत फारसें तथ्य दिसत नाहीं.

साधारण-ब्राह्मसमाज स्थापन केल्यावर त्याच्या धर्मप्रचारकाचे व आचार्य-पदाचें काम शिवनाथशास्त्री यांनीं फार चांगल्या रीतीनें बजावलें. धर्म-प्रचारक ह्या नात्याने त्यांनीं सर्व हिंदुस्थानांत अनेक वेळां संचार केला. त्यांच्या भाषणाची शैली बहुधा अगदीं साधी व घरोब्याची असे. ते नाणावलेले कवि होते. साधारण-ब्राह्मसमाजाच्या प्रत्येक चळवळींत ते प्रमुखपणे भाग घेत असत. ते मनाने भाविक नसावेत. श्रीरामकृष्णांच्या समाधिभावांवर शिवनाथबाबूंची मुळींच श्रद्धा नसे. भावसमाधि ही एक मेंदूची विकृति आहे, असे ते समजत. सिद्धपुरुषांबद्दल त्यांची भावना कांहींशी अश्रद्धेचीच दिसते. तरी पण ब्राह्मसमाजांतील साधनाश्रम ही पोटसंस्था मुख्यत्वेकरून शिवनाथशास्त्री ह्यांनीच अस्तित्वांत आणून ती चालविली. त्याच्या ध्येयाप्रमाणे पुढे धार्मिक उत्साहाचे व शीलाचे साधक त्यांतून निर्माण झाले नसले, तर यास त्यांचा इलाज नव्हता.

योगाभ्यासापेक्षां सुधारलेला गृहस्थाश्रम हेच शिवनाथबाबूंचें खरे ध्येय दिसते. इंग्रजांचा गृहस्थाश्रम व इंग्रजाच्या संस्था यांचे सूक्ष्मावलोकन करण्या-करितां शिवनाथशास्त्री इंग्लंडांत सहा महिने जाऊन राहिले होते. त्यांचे ललितवाङ्मय बंगालींत बरेच प्रसिद्ध आहे. धार्मिक विषयासंबंधी गृहधर्म, धर्मजीवन, हीं दोन बंगाली पुस्तके आणि Mission of the Brahmo-Samaj, Men I have seen, The History of Brahmo-Samaj. हीं त्यांची इंग्रजी पुस्तके फार प्रसिद्ध आहेत. शिवनाथशास्त्री हे केशवचंद्रां-प्रमाणे श्रीरामकृष्णपरमहंस यांच्याकडे मधून मधून जाणारे होते. हे वर आलेच आहे. केशव भक्त व शिवनाथ पंडित, असा तुलनात्मक अभिप्राय श्रीरामकृष्ण बहुधा त्यांच्यासंबंधीं देत असत. शिवनाथ अट्टल ब्राह्म असले तरी शेवटी दोन बायकांचा दादला! ही गोष्ट त्यांच्या टीकाकारास मोठीच सोयीची झाली होती. ते कांहीं असो. शिवनाथांच्या दोन्ही स्त्रिया त्यांस मात्र यत्किंचितही गैरसोईच्या न होतां त्या आपल्या अगच्या शुद्धशीलाने व पावित्र्यानें त्यांस फारच भूषणभूत झाल्या. त्यामुळे त्यांच्या ब्राह्मपुढारी ह्या चारित्र्यास कमीपणा आला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांनीं केलेल्या ब्राह्मसमाजाच्या

अमूल्य सेवेबद्दल त्यांस इ. सन १९१७ साली समाजाकडून मानपत्र देण्यांत आलें. आणि त्याच्या पश्चात् तर साधारण-ब्राह्मसमाजानें त्यांचे व्यवस्थित स्मारक उभारून त्यांचे नांव राजा राममोहन, देवेंद्रनाथ व केशवचंद्र ह्या सुप्रसिद्ध त्रयींपुढे प्रमुखत्वानें जोडून दिले आहे.

शिवनाथ बाबू हे आपले जीवितकार्य संपवून नुकतेच मरण पावले. त्यांनीं आईपासून प्रेम व बापापासून निर्धार किंवा आग्रही स्वभाव हे दोन गुण घेतले. " मातेप्रमाणे ईश्वरावर निर्व्याज व निस्सीम प्रेम करून त्याशी तादात्म्य पावावे." हेच त्यांच्या धर्मोपदेशातील सूत्रवाक्य आहे. ह्याप्रमाणे धर्ममतांत त्यास केशवचंद्राचेच अनुयायी मानले, तरी त्यांची सामाजिक व राजकीय मते केशवचंद्रांहून पुष्कळच जहाल होती यात शंका नाही. त्याच्या सामाजिक मतांचे दिग्दर्शन पूर्वी ठिकठिकाणी आलेच आहे. त्याची राजकीय मते कळण्यास एकच गोष्ट सांगितली म्हणजे पुरे आहे, की बंगालच्या फाळणीच्या वेळच्या प्रचंड चळवळीत एका जहालजहालांच्या सभेस अध्यक्ष होण्यास कोणीच धजेना, त्या वेळी पंडित शिवनाथशास्त्री धिटाईने पुढे झाले, व त्यानीं अध्यक्षस्थान स्वीकारले. इतकेंच नव्हे तर त्यांनी आपल्या ओजस्वी वाणीनें श्रोतृसमाज हलवून सोडला. त्या प्रसंगी त्यांनी जाहीर रीतीने केलेल्या प्रतिज्ञा संस्मरणीय आहेत. शिवनाथबाबूंनी अध्यक्षपदावरून अशा प्रतिज्ञा केल्या की, " स्वायत्त शासन " ही एकच राज्यपद्धति ईश्वरास मंजूर आहे, असें आम्ही समजतो. " आणि उद्या आम्ही भिकेस मिळालो, तरी ह्या सरकारची नोकरी आम्ही कधीच पत्करणार नाही!"

ब्राह्मसमाजाच्या इतिहासात स्वामिभक्तीच्या अतिरेकाची उदाहरणे अनेक सापडतील. पण निधड्या छातीच्या देशभक्तीची उदाहरणे ह्या समाजात दुर्मिळच आहेत. आनंदमोहन व शिवनाथ बाबू हे दोघे सन्मित्र देशसेवेला वाहिलेलेच होते. आनंदमोहन ह्यांनीं तर राजकीय चळवळीतील अतिश्रमानेच मरण ओढवून घेतले. त्यास इतके श्रम करूं नका, असें शिव-नाथ बाबूंनीं म्हटले, तर मोठ्या आवेशाने ते म्हणत की, " शिवनाथबाबू, देवकार्यासाठीच मी माझा देह वाहिला आहे." आणि खरोखरीच ते शेवटल्या दुखण्यात अंथरुणावर खिळलेले असतांनाही त्यानीं डोलींतून जाऊन एका मोठ्या राजकीय सभेचें काम उत्साहानें पार पाडलें. असे धर्मवीर ह्या भूमीस

अनेक लाभले असतांही ह्या देशाची धार्मिक, सामाजिक व राजकीय परिस्थिति अद्यापि लज्जास्पदच रहावी, हे मोठेंच सखेदाश्चर्य होय !

असो. वर निर्दिष्ट केलेल्या साधारण-ब्राह्मसमाजाच्या प्रमुख संस्थापकांपैकीं तिसरे शिवचंद्र देव ह्यांच्यावर प्रसिद्ध प्रोफेसर डेराझिओ ह्याचे शिक्षणसंस्कार बरेच झालेले होते. तरी त्यांचे उदारमतवादित्व, विद्वत्ता, सौजन्य व शिस्त इत्यादि गुणानीं ते साधारण-ब्राह्मसमाजास केवळ आदर्शभूत झाले होते. सुदैवाने ह्या समाजाच्या चिटणीसाचे काम ह्यांनींच आपल्याकडे बरींच वर्षें घेतले होते. चवथे पुढारी उमेशचंद्र हे कलकत्त्याच्या सिटीकॉलेजचे प्रिन्सिपाल होते. ह्या कॉलेजच्या संस्थापनेंत आनदमोहन आणि शिवनाथ बाबू याचे विशेष अंग होते. त्यानीं प्रथम सिटीस्कूल काढले; त्याचे पुढे कॉलेज झाले. ह्या शिक्षणसंस्था काढण्यात त्यांचे दुहेरी हेतु असत. एक, अशा संस्थांतील शिक्षक ब्राह्म-समाजास सहजच उपयोगी पडत, आणि शिवाय अशा शिक्षणसंस्थेत येणाऱ्या विद्यार्थिवर्गावर अप्रत्यक्ष रीतीने ब्राह्मसमाजाचा नैतिक ताबा राहिल्याने ब्राह्मसमाजाच्या अभिवृद्धीस त्या सस्था कारण होत.

प्रिन्सिपाल बाबू उमेशचंद्र हे कट्टे ब्राह्म होते. त्यांनी आपल्या पूर्ववयात धर्मच्छल अतिशय सहन केला होता. ब्राह्मबोधिनी, धर्मसाधन, इत्यादिं नियतकालिकाचे संपादकत्व त्याच्याकडे असे. केशवचंद्राचे तर ते केवळ उजवे हातच होते. साधारण-ब्राह्मसमाज स्थापन करतांना केशवचद्रास सोडावें लागते, हे त्याना मोठेच संकट पडले. असो. साधारण-ब्राह्मापैकी आद्य प्रवर्तकाचा थोडाफार परिचय ह्याप्रमाणे करून दिला आहे. स्थलसंकोचास्तव ह्या चरित्रात्मक भागाचा अधिक विस्तार करता येत नाहीं.

---

## प्रकरण दुसरें

# कार्यविस्तार

वरील पुढाऱ्यांनीं साधारण-ब्राह्मसमाज स्थापन करतांच प्रथम त्याच्या रचनेकडे अगोदर लक्ष दिले. पूर्वीच्या समाजात असावे तसे नियंत्रण नव्हते, यामुळेच पुढे बखेडे उत्पन्न झाले, असे त्यास सहजच दिसून आले. केशवचंद्र असल्या नियंत्रणाखालीं राहण्यास कबूल नसत. ते म्हणत कीं, धर्मसंस्थापकांचा अधिकार फार मोठा आहे. साक्षात् ईश्वरच त्यांच्या मुखाने बोलत असतो. बहुजनसमाजात ईश्वरासबधीं सामान्यतः अज्ञानच असते. अर्थात् अशा लोकोत्तर ईश-प्रेषितावर अजाण लोकाच्या बहुमताचे नियंत्रण घालूं पाहणे हे अत्यंत हास्यास्पद आहे. इतर व्यावहारिक सस्थातील मतस्वातंत्र्याचे तत्त्व धर्मसंस्थास लागू करता येण्यासारखे नाही. त्या सस्था एकतंत्रीच चालल्या पाहिजेत. धर्माच्या बाबतीत महात्म्याची अनियंत्रित सत्ताच सर्वांनीं मानली पाहिजे, हे जगास शिकविण्याकरिताच नवविधानाचा अवतार आहे.

पाश्चात्य सस्कृतींतील मतस्वातत्र्याचे तत्त्व ज्यांस पुरे बाणले आहे, अशा नवीन सुशिक्षित मंडळीस हे विचार पटण्यासारखे नव्हते. कोणाही पुरुषास असा असामान्य अधिकार देण्यास ते तयार नव्हते. आपल्या विवेचकबुद्धीस अशी परस्वाधीन करणे, हे त्यास मनोदौर्बल्य वाटे, आणि विशेषकरून त्याच मतभेदास्तव साधारण ब्राह्म-समाज निराळा निघाला असल्यामुळे समाज-रचना हीच गोष्ट त्यानी प्रथम हाती घेतली. त्यांनी समाजाची नियमावली तयार केली. अध्यक्ष, चिटणीस, दुय्यम चिटणीस खजिनदार व प्रचारक यांच्या रीतसर नेमणुका झाल्या. व साधारण ब्राह्मसमाज संस्थेचे काम जे एकदां पद्धतशीर सुरू झाले, ते आजतागाईत तसेंच सुरू आहे. यात लक्षांत घेण्यासारखी गोष्ट इतकीच कीं, साधारण ब्राह्मसमाजापैकीं विजयकृष्ण गोस्वामी, रामकुमार विद्यारत्न, शिवनारायण अग्निहोत्रि इत्यादि कांही प्रमुख धर्मप्रचारकांची धर्म-जिज्ञासा समाजाच्या बंधनांत फार दिवस राहूं शकली नाही. लवकरच त्यांस साधारण ब्राह्मसमाज सोडून जाणे भाग झाले. अशा रीतीने केशवचंद्रांच्या

म्हणण्याप्रमाणें धर्मवीरांची स्वैरवृत्तीच त्यांनीं आपल्या उदाहरणांनीं कांहींशी सिद्ध केली. एकदां धार्मिक भावनेची प्रचंड लाट अंतरांत उत्पन्न झाली कीं, ती मग कोणत्याच बंधनास मोजीत नाहीं. परंतु बंधाऱ्याच्या रचनेतच सामावणारे जे शांतवृत्तीचे तलाव आहेत, त्यांस रचनाबंधनच शोभादायक व संरक्षक होतें. ते बंधाऱ्याचे आंतच राहून पांथस्थांची तृष्णा शमवितात, व लोकसंग्रहकारी विशालवृक्षास पल्लवित करतात.साधारण-ब्राह्मसमाजात ह्या दुसऱ्या प्रकारच्याच लोकांचा विशेष भरणा असे. त्यांनी जे आपणास समाजरचनेचें बंधन घालून घेतलें, तें अद्याप अबाधित आहे. त्याचे कार्यकारी मंडळाच्या बैठकी व साधारणसभांचीं संमेलनें वेळच्या वेळीं होत असून दरसाल होत असलेल्या कामाचा आढावा वार्षिक अहवालात रीतसर घेण्यात येतो.

साधारणब्राह्मसमाजाचे सभासद होण्यास तीन अटी पाळाव्या लागतात. (१) अठरा वर्षांहून अधिक वयोमान. (२) रोज उपासना करण्याचा नियम, (३) मूर्तिपूजा व जात ह्यांचा त्याग करून वैयक्तिक व सामाजिक सर्व धर्मविधि ब्राह्मधर्माप्रमाणें करणें. ह्या तीन अटी पाळणाऱ्या कोणाही स्त्री-पुरुषास साधारण ब्राह्मसमाजात दाखल होता येतें. इ. सन १९२६च्या अखेरीस साधारण ब्राह्मसमाजाच्या पटावर १३९८ सभासदांचीं नांवें दाखल होतीं. जोडब्राह्मसंस्थांची संख्या ४९ असून पैकीं फक्त १८ समाजाचे प्रतिनिधि सर्वसाधारणसभेस हजर होते.

साधारण ब्राह्माच्या कार्यविस्ताराचे तीन प्रमुख प्रांत आहेत (१) अध्यात्मिक, (२) सामाजिक व (३) शैक्षणिक. ह्यापैकीं अध्यात्म प्रांतातील धर्मप्रचार ही बाब सर्वांत महत्त्वाची आहे. (अ) अधिकृत धर्मप्रचारक, (ब) साधनाश्रमातील साधक, (क) सेवक-मंडळी, (ड) ब्राह्मसमाजाचीं दोन मुखपत्रें, आणि याशिवाय कलकत्ता कांग्रेगेशन, बडानगर कामकरी मिशन, संगतसभा, थिऑलॉजिकल सोसायटी, रोजची उपासना, विद्यार्थ्यांची साप्ताहिक उपासना, धर्मशिक्षालय, संगीत विद्यालय, नैतिक शिक्षणाची रविवारची शाळा, ब्राह्मबंधुसमाज, ब्राह्मतरुणसंघ, आणि भारत-महिला-समिति अशा, अशा कलकत्त्याच्या मुख्य संस्थेच्या उपशाखा हें काम करीत आहेत.

प्रत्येक वर्षाच्या आरंभीं धर्मप्रचारकांकडे त्या सालचें काम वांटून दिलेलें असतें. व सालअखेर त्यांच्या कामाचा आढावा घेण्यांत येतो. त्याचप्रमाणें

साधनाश्रमाच्या कार्यव्यवस्थापकांच्या कामाचाही वार्षिक अहवालांत गोषवारा येतो. देशसेवा, ब्राह्मसमाजसेवा, व ब्रह्मसाधन यांसाठीं आपलें आयुष्य वेंचण्याचें ज्यांनी ठरविले आहे, अशा धर्मबांधवांचा साधनाश्रम बनलेला आहे. ह्या आश्रमाच्या सेवाशाखेत मागसलेल्या जातीत सुधारणा करणारी मंडळी नामक उपसंस्था आहे. ती इ. सन १९०९ साली स्थापन झाली. ह्या सस्थेच्या आज सुमारे चारशे शाळा असून त्यांत बंगाल व आसाम ह्या प्रांतांतील अगदीं मागसलेल्या जातींतील सोळा हजारावर मुलें आज शिकत आहेत. ह्याशिवाय डाक्क्याचा विधवाश्रम आणि केरळचें सेवासदन ह्या दोन उपसंस्था आहेत. तसेच साधनाश्रमाचे राममोहन राय सेमिनरी या नांवाचे बांकीपूर येथे एक हायस्कूल आहे. ह्या ब्राह्मप्रचारक व साधकमंडळींत आपल्या प्रांतातील रा० विठ्ठल रामजी शिंदे, व रा० चिटणीस हे दोघे मुद्दाम विलायतेतून धर्मशिक्षण घेऊन आलेले सद्‌गृहस्थ आहेत. ह्याशिवाय मुंबईच्या प्रार्थना-समाजांतील दुसरे कित्येक सभासद साधारण ब्राह्मसमाजाचे सभासद आहेत.

साधारण ब्राह्मसमाजापुढे जे विस्तृत कार्यक्षेत्र आहे, त्या मानानें अधिकृत धर्मप्रचारक व कार्यवाहकाची सख्या अपुरी पडते असे पाहून धर्मदीक्षा न दिलेल्या अशा सामान्य गृहस्थाची इ. सन १९०३ साली सेवक मंडळी ह्या नांवाची एक संस्था काढली. त्यांत हल्ली सुमारे ५४ सभासद आहेत. ह्याशिवाय साप्ताहिक सामाजिक प्रार्थनेस येणारांचें कलकत्ता कांग्रेगेशन असून त्याचे गेल्या वर्षअखेर २६८ सभासद होते. इ. सन १९०३ सालीच शशीपद बानर्जी ह्यांनी ठेवलेल्या रकमेतून कामकरी वर्गाच्या धार्मिक व नैतिक शिक्षणासाठीं शशीपद इन्स्टिटयूट नामक संस्था निघाली आहे. त्या सस्थेमार्फत प्रार्थना व व्याख्यानें होत असतात बाबू अनाथकृष्ण सील ह्या एका उद्योगी व उत्साही गृहस्थानी मॅजिक लॅटर्नच्या साह्याने ब्राह्म-समाजाची बरीच माहिती कामकऱ्याच्या मुलांस व इतरांसाठीं देण्याची तजवीज केली आहे. ह्या ग्रंथांत दिलेली बरीचशीं चित्रे आम्हांस त्याच्या-कडून मिळालेल्या फोटोवरूनच तयार केलीं आहेत.

थिऑलॉजिकल सोसायटी, संगतसभा, आणि दैनिक प्रार्थनामंडळ, ह्यांची जवळ जवळ एकच संस्था अलीकडे नऊदहा वर्षे झाली आहे. ह्या संस्थेमार्फत रोज सायंकाळीं हिंदी अगर खिस्ती धर्मपुस्तकांतून प्रार्थना होते.

व नंतर प्रश्नोत्तरेंही होतात. दर मंगळवारीं एखाद्या सामाजिक, चरित्रात्मक, किंवा तात्त्विक पण व्यवहारोपयोगी अशा प्रश्नावर वादविवाद होतो. शुक्रवारीं तत्त्वज्ञान किंवा भक्ति ह्या विषयावर प्रवचन व प्रश्नोत्तरे होतात. श्रोतेमंडळी पांचपंचवीस असते. रोजची हजेरी सरासरी आठ-दहावर जात नाहीं. इ. सन १९२६ सालीं ज्या विषयांवर धर्मप्रवचनें झालीं, त्यांत कांहीं खालील विषयावर होतीं:—(१) उपनिषदें व बायबल याची एकवाक्यता, (२) गुरु आणि संगतपरिपाठी, (३) प्रतिमापूजन आणि ध्येयवाद, (४) तुकाराम आणि महाराष्ट्रीय संत, (५) कृष्णकथेची वाढ, (६) ख्रिस्ती कल्पनामयत्ववाद, (७) हिंदु कल्पनामयत्ववाद, (८) वैष्णवधर्म इत्यादि.

विद्यार्थ्यांची सामाजिक उपासना ही संस्था बाबू आनंदमोहन व पंडित शिवनाथशास्त्री यानीं इ. सन १८७९ साली स्थापली. कलकत्त्याच्या तरुण मंडळींत सामाजिक, धार्मिक व नैतिक विचारांचा प्रसार व्हावा, तसेच नेमस्तपणा, आचारशुद्धि, जिज्ञासा, समाजोन्नतीची आस्था, ईश्वरवादाची जीवनध्येयाबद्दल उदारमतें, आणि लोकसेवेकरिता विविध उद्योग, इत्यादि गुणांचा उत्कर्ष त्यांच्या ठिकाणी व्हावा, असा ह्या संस्थेचा हेतु आहे. सर प्रफुल्लचंद्र राय, बाबू हेमचंद्र सरकार, प्रो० रजनीकांत गुह, कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर, अशी बडी विद्वान् मंडळी ह्या संस्थेच्या कार्यक्रमांत भाग घेत असते. ह्याशिवाय केवळ धर्मशिक्षणाकरिता धर्मशिक्षालय ही संस्था नुकतीच निघाली आहे. ब्राह्मसमाज संगीत विद्यालय व संडे मॉरल ट्रेनिंग स्कूल ह्याही नव्याजुन्या संस्था आहेत. पहिल्या संस्थेत विद्यार्थ्यांची संख्या अवघी सात आठ असते, व दुसऱ्या संस्थेतही गेल्या सालीं एकशे तेरा विद्यार्थि होते. नैतिक शिक्षणाचा नमुना म्हणून डॉ० लिव्हिंग्जस्टन याच्या चरित्रांतील कांही भाग मॅजिक लॅन्टर्नच्या साहाय्यानें मुलांस गेल्या साली दाखविण्यांत आले.

साधारण-ब्राह्मसमाजाचे 'इंडियन मेसेंजर' हे एक साप्ताहिक इंग्रजी वर्तमानपत्र व 'तत्त्वकौमुदी' हे बंगाली पाक्षिक आहे. दोघांसही वर्गणीदारांचा फारच तुटवडा आहे. ह्याप्रमाणे साधारण-ब्राह्मसमाजाचे धर्मकार्याचा विस्तार आहे. सामाजिक कामांत, दुष्काळ, जलप्रलय, इत्यादि आपत्तीच्या प्रसंगीं साधारण-ब्राह्मसमाजाची थोडीफार मदत होते. शिक्षणाच्यासंबंधीं

त्यांच्या महत्त्वाच्या संस्था म्हणजे ब्राह्म बालिकाशिक्षालय, कलकत्ता सिटी कॉलेज व सिटी कॉलेजस्कूल, ह्या होत.

साधारण-ब्राह्मसमाजाच्या ठिकठिकाणीं ज्या शाखा किंवा जोडसंस्था आहेत, त्याची माहिती ह्या लहानशा ग्रंथांत देतां येणे शक्य नाहीं. ह्या संस्था साऱ्या हिंदुस्थानांत तुरळक पसरल्या असल्या, तरी त्यांतील बहुतेक पूर्वहिंदुस्थानांतच आहेत. 'शितावरून भाताची परीक्षा' ह्या न्यायाने त्यांची कल्पना ह्या ग्रंथातील वर्णनावरून वाचकास सहज होईल. अशी कल्पना न होण्यासारखी एकच संस्था आहे, ती 'खासी हिल्सामिशन' ही होय. हिंदुस्थानच्या ईशान्येकडील कोपऱ्यातील डोंगराळ मुलखातील अगदी खेडवळ, नव्हे रानटी, लोकांतील ही चळवळ होय. ह्या रानटी लोकातील चालीरीति अगदीच विलक्षण होत्या. तिरदाजी हा त्याचा आवडता व्यासंग होय. ते सर्वभक्षक आहेत. पण दुधाचा मात्र त्यांना अत्यंत वीट आहे. तान्ह्या मुलासही ते दूध देत नाहींत. त्यास केळीं देतात.

अशा ह्या सुधारणेने अस्पृश्य मानलेल्या देवाच्या अडाणी व गरीब लेकराच्या उद्धार करण्याच्या मिषाने खिस्ती मिशनऱ्यांनीं तेथे चंचुप्रवेश केला. त्यास आज जवळ जवळ ऐशीं पंचायशी वर्षे झाली. त्यानी त्याचे पोषाख, चालीरीति, भाषा, शिक्षण वगैरे बाबतीत कांहीं सुधारणाही घडवून आणली असेल. पण त्याबरोबर दारूबाजी, चैनबाजी, दगलबाजी, रंडीबाजी, इत्यादि कित्येक बाजीही ह्या सुधारणांबरोबर आल्या. खिस्ती होण्यासाठीं भलतीच आमिषे त्याच्यापुढे टाकलीं. आपण सारे पापी आहोत, हे खिस्त्यांचें महावाक्यही त्यांच्या मनावर चांगले बिंबवले. आणि अशा रीतीने अखेरच्या दिवशीं तारण होण्याकरिता पाप्यांचा एक मोठाच तांडा तयार केला.

ही शोचनीय स्थिति लक्षांत येऊन बाबू नीलमणि चक्रवर्ती ह्या गृहस्थाने आपले सारें आयुष्य या लोकांच्या सुधारणेसाठीं खर्ची घातले, आणि त्यांच्या पंचवीस वर्षांच्या सतत प्रयत्नाने पन्नास मैलांच्या टापूत त्यानीं चवदा ब्राह्मसमाज, चार शाळा, चार रुग्णालये इत्यादि लोकोपयोगी संस्थांची स्थापना घडवून आणली. खिस्ती धर्माच्या श्रेष्ठत्वाबद्दल त्या लोकांस पूर्वी खिस्ती मिशनऱ्यांपुढें निरुत्तर व्हावें लागे. ती स्थिति आतां राहिली नाहीं. दुर्दैवाची गोष्ट इतकीच कीं, असले हे डोंगरसुधराईचें दुर्घट काम अंगावर घेणारे बाबू

नीलमणि चक्रवर्ती यांच्या अभावीं ते काम आतां दरसाल मागलटीसच पडत चाललें आहे असे दिसते. असो.

ह्याप्रमाणे साधारण-ब्राह्मसमाजाच्या अनेक संस्थानीं आपआपल्यापरी लोकहिताचे कार्य केले आहे. ह्या स्थानिक सस्थांप्रमाणे तत्त्वकौमुदी, धी इंडियन मेसेजर, संजीवनी, वामबोधिनी, मुकुल, मॉडर्न रिव्ह्यू, प्रवासी, सुप्रभात, सेवक, महिला, सोपान इत्यादि कित्येक सुप्रसिद्ध वर्तमानपत्रे व मासिकें ह्यांच्या द्वारें त्यांनीं लोकशिक्षणाचे महत्त्वाचे काम केले आहे. तसेच नियतकालिकांशिवाय बाबू कृष्णकुमार-मित्र, बाबू नगेंद्रनाथ चतर्जी, पंडित शिवनाथशास्त्री, पंडित सीतानाथ तत्त्वभूषण, प्रो० धीरेंद्रनाथ चौधरी, आणि बाबू हेमचंद्र सरकार ह्यांच्यासारख्या विद्वानानीं, चरित्रात्मक, ऐतिहासिक, धर्मपर व तात्त्विक विचारांचे जे वाङ्मय प्रसिद्ध केले आहे, त्याची योग्यताही मोठी आहे. त्यांतही बाबू नगेंद्रनाथ ह्याचे राजा राममोहन ह्याचे चरित्र, पंडित शिवनाथशास्त्री ह्यांचा ब्राह्मसमाजाचा इतिहास आणि पंडित सीतानाथ ह्याचे ब्राह्मधर्मशास्त्र, प्रो० धीरेंद्रनाथ वेदांतवागीश यांचे धर्मतत्व व साधन, हे ग्रंथ ब्राह्मसमाजाच्या दृष्टीने फार महत्त्वाचे झाले आहेत असे मानतात.

पूर्वीच्या समाजांहून साधारण-ब्राह्मसाजाच्या आचारविचारांतील विशेष सांगावयाचा तर दोनचार मुद्दे लक्षांत घेण्यासारखे आहेत. प्रथम सांगावयाचे तर नवविधानधर्मांतील वैराग्य व योगदीक्षेचा त्यांनीं कधीच अंगीकार केलेला दिसत नाहीं. राजा राममोहन अथवा देवेंद्रनाथ ह्यांची साधी उपासनाच त्यांनीं पसंत केली. साधारणब्राह्मांचा भर सामाजिक सुधारणेकडे प्रथमपासून अधिक आहे. त्यांतही अबलोन्नति हा त्यांचा विशेष आवडीचा विषय आहे. देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन ह्यांची वृत्ति केवळ धार्मिकच होती. सामाजिक सुधारणांसंबंधीं साधारणब्राह्मांचीं मते त्यांच्याशी जुळती नव्हतीं. साधारण ब्राह्मांच्या पुढारलेल्या सामाजिक विचारांत स्त्रीस्वातंत्र्य व मिश्रविवाह ह्यांस प्राधान्य द्यावे लागलें, आणि ह्यामुळे त्यांस एकंदर जनतेचा तीव्र विरोध सहन करावा लागला. मद्यपाननिषेध हाही एक उपयुक्त विषय त्यांनीं हातीं घेतला होता. व मद्यपान करणारे इसमास ब्राह्मसमाजाचे सभासद होतां येऊं नये, असा एक निर्बंध घालण्याचेही एक वेळ घाटत होतें. परंतु कायदेशीर बंधनापेक्षां लोकशिक्षणानेंच ही सुधारणा घडवून आणणें योग्य होईल, अशा

समजुतीवर तो प्रश्न तसाच सोडून देणें त्या वेळीं सोईचें वाटलें ! साप्ताहिक व दैनिक सामाजिक उपासना, संगतसभा, व साधनाश्रम इत्यादि संस्थांच्या द्वारे साधारणब्राह्मसमाज केवळ धर्माचें कार्य करीत आहे. तथापि त्यांच्या उद्योगाचे दृश्य फल सामाजिक सुधारणांतच अधिक दिसून येते, ही गोष्ट उघड आहे.

सामाजिक सुधारणांच्या खटपटीस धार्मिक चळवळीचा पेहराव देण्यापलीकडे ब्राह्मसभासद फारसे कांहीं करीत असतील असे दिसत नाही. फार काय, पण धर्मसाधनाच्या आश्रमांतसुद्धां समाजसेवेचे कांही विशिष्ट प्रकार हेच त्यांचे पुढे येतात. अवांतर हेतुस्तव आपण धर्माचा अवलंब केलासा दाखवितो, ही आपली चूक होत आहे, असे आतां त्यांच्यांतील विचारी लोकांस वाटूं लागले आहे. तसेच केवळ नियंत्रणाच्या शिस्तीने काम भागत नाही. अगदी नियमबद्ध झाले, तरी ते एक जड गृह होईल. आत जाग राहून ते उत्तम नांदते व्हायला तितक्याच योग्यतेचे गृहस्थ पाहिजेत. ही पण उणीव त्यांस दिवसेंदिवस जास्त भासूं लागली आहे. तसेच साऱ्या जगाला गवसणी घालण्याचे उदात्त विचार तोंडाने बोलत असतां, त्यांनी शेजाऱ्यांशीही अगदीं फटकून वागण्याचे जे अहंमन्यतेचे धोरण ठेवले आहे, त्यामुळेच हे ब्राह्म सामान्य जनतेपासून दूर राहिले, असेही कोणी बोलूं लागले आहेत. परंतु ती त्यांच्या अंगीं जडलेली ढब सहसा मोडणे कठीणच दिसते ! तसेच खरे वैराग्य व स्वार्थत्याग असल्यावांचून नुसत्या हेगेल नाही तर कॅन्ट यांच्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगून स्वतास कांहीं पटत नाही, व दुसऱ्यास कांहीं पटवितांही येत नाहीं. हाही अनुभव त्यास येऊन चुकला आहे असें दिसते. डोक्यांतील घट्ट मेंदूपेक्षां हृदयांतील वाहते रक्त अधिक संगमशील असते, याबद्दलही त्या बुद्धिवाद्यांची आतां खातरी होऊं लागली आहे.

असो. ह्याप्रमाणे धार्मिक चळवळीचा जोम व ओजस्विता हीं साधारण-ब्राह्मसमाजाच्या कार्यक्रमांत जरी विशेष दिसून आली नाहींत, तरी त्यांचा व्यवस्थितपणा, धिम्मेपणा व त्यांचे वाङ्मय ह्यांनीं बंगाल्यांतील आधुनिक विद्वानांचें लक्ष आपल्याकडे ओढून घेतले आहे. पाश्चात्य संस्कृतीची छाप अद्याप त्यांच्यावर कायमच आहे, तरी त्यांच्यांतील पंडित सीतानाथ तत्त्वभूषण ह्यांच्यासारख्या कांहीं विद्वान् लेखकांनी त्यांची नजर ख्रिस्तीधर्मपुस्तकांतच

खिळून न ठेवतां पाश्चात्य आधुनिक तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथांकडे वळविली आहे, आणि त्याचबरोबर आपल्याकडील वेदान्ताचाही परामर्ष घेऊन विचाराचा समतोलपणा दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

येणेप्रमाणे, साधारणब्राह्मसमाजाचा कार्यविस्तार आणि त्याचे संख्याबल ही जरी आशाजनक नसली, तरी त्यांचा बुद्धिवाद फार जोरकस व चिरस्थायी होणारा आहे, असे ते मानतात. राजा राममोहन, देवेंद्रनाथ, राजनारायण, केशवचंद्र, प्रतापचंद्र, उपाध्याय गुरु गोविंद या ब्राह्म-बंधूचे धार्मिक वाङ्मय जसे महत्त्वाचे आहे, तसेच किंबहुना त्याहूनही अधिक चिरस्थायी स्वरूपाचे व महत्त्वाचे असे वाङ्मय साधारण-ब्राह्मांपैकीं पंडित सितानाथ तत्त्वभूषण, पंडित शिवनाथशास्त्री, बाबू नागेंद्रनाथ चतर्जी, प्रो० धीरेंद्रनाथ चौधरी, वेदांतवागीश बाबू हेमचंद्र सरकार, वगैरे विद्वान् ब्राह्मानीं निर्माण केले आहे असे म्हणतात. तेव्हां साधारण-ब्राह्मसमाजाच्या ह्या संक्षिप्त इतिहासात त्याच्या निरनिराळ्या संस्थांच्या किंवा व्यक्तींच्या कार्यक्रमाचे तपशील देत न बसतां त्यांच्या धार्मिक विचारांची मांडणीच पुढील प्रकरणांतून थोडक्यात देण्याचे आम्हीं योजिले आहे. हे काम फार अवघड व आमच्या अधिकाराच्या बाहेर-चें आहे खरें; तथापि ज्याने लेखणीचा हात धरून आतापर्यंत आमचेकडून लिहविले तो बुद्धीचा प्रेरक हेंही काम शेवटास नेण्यास समर्थच आहे. असो, पुढील विवेचनांत स्थूलमानाने पाहतां, अगोदर ब्राह्म-तत्त्वज्ञान, नंतर ब्राह्मांचा प्रामाण्यवाद, त्यापुढे ब्राह्ममतदर्शन, आणि अखेर ब्राह्मविधि, आचार व साधने, असा विषयांचा अनुक्रम येणार आहे.

---

## प्रकरण तिसरें

# तत्त्वज्ञान

### अद्वैत

पूर्वी संकल्प केल्याप्रमाणें आम्ही ह्या भागांत ह्यापुढे साधारण ब्राह्मांचे विचार निरनिराळ्या प्रकरणांतून निरनिराळ्या रूपानें वाचकांस सादर करणार आहोत. ह्या ऐतिहासिक खंडाच्या अखेरच्या या भागांत होणारा हा विचार-विनिमय वाचकांस कंटाळवाणा न होतां अन्वर्थकच वाटेल, अशी उमेद आहे. यापुढे या भागांत प्रथमपासून अखेरपर्यंत एका संप्रदायशाखेचा ब्राह्म-विचारच यावयाचा असल्यामुळे, त्यात कोठें कोठें पुनरावृत्तीचा दोष येणे कांहींसे अपरिहार्य होईल, हे सुज्ञ वाचकांस सांगावयास नकोच.

बुद्धिवाद किंवा तार्किक विवेचन हा साधारण ब्राह्मांच्या वाङ्मयाचा विशेष आहे. देवेंद्रनाथ व राजनारायण यांनीं जरी ब्राह्मधर्मास व्यवस्थित स्वरूप दिले, तरी त्यांनींही तात्त्विक दृष्टीनें विचार केलेला दिसत नाहीं. आणि आज ब्राह्म समाजांत राजा राममोहन, देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन यांच्या उक्तीस जो मान आहे, तो प्रायः "बाबावाक्य प्रमाणम्" या न्यायानेच आहे. पण साधारण-ब्राह्मसमाजांतील कित्येक विद्वानांनीं ही वृत्ति सोडून ब्राह्मांचें तत्त्वज्ञान युक्तिवादानें सिद्ध करण्याचा प्रयत्न चालविला आहे. ह्या प्रयत्नांत वेदान्त व इतर मुख्य प्रचलित मतांशीं त्यांचा जेथे जेथे विरोध येतो, त्या मुद्द्यांवर तुलनात्मक विवेचन या समग्र ग्रंथाच्या शेवटल्या खंडांत यावयाचें आहे. तो उहापोह आम्ही येथे करीत नाहीं. परंतु अखेरच्या तुलनात्मक खंडांत दुसऱ्या अनेक मतवाद्यांच्या मतांचाही विचार कर्तव्य असल्यामुळे त्या ठिकाणीं ब्राह्मांचे विचार सविस्तर देतां येणार नाहीत. म्हणून साधारण-ब्राह्मांची तात्त्विक विचारसरणी आम्ही ह्या भागांतच यापुढे विस्तारानें देत आहोत.

स्थूल मानाने पाहतां साधारण-ब्राह्म हे कल्पनावादी (Idealist) दिसतात. त्यांच्यांतही मतभेद असतील, पण प्रामुख्यानें ते जर्मन तत्त्ववेत्ता

हेगेल+ ह्याचेच अनुयायी आहेत. आपल्याकडील निंबार्क यांचें मत कांहीं अंशीं साधारण ब्राह्मांच्या मतांशीं जमतें, असें म्हणतात, पण तसें असलें

+हा जर्मन तत्त्ववेत्ता इ. सन १७७० ते १८३१ या काळांत होऊन गेला. याच्या मतास आज खुद्द जर्मनींत मुळींच मान नाहीं. पण इंग्लंडांत आहे. आणि त्याच परंपरेने इकडील इंग्रजी शिकलेले विशेषकरून बंगाली ब्राह्म यांनींही त्याचेच मत मान्य केले आहे असे दिसते. हेगेलचे तत्त्वज्ञान थोडक्यांत सांगतां येण्यासारखें नाहीं, तथापि नमुन्याकरितां त्याचे कांहीं सिद्धांत खालीं देतोः—(१) सत्य हे बुद्धिगम्य असते व बुद्धिगम्य तेच सत्य असते; किंवा "सत् तेच चित् व चित् तेच सत्य होय." (Whatever is real is rational and whatever is rational is real) [विज्ञानं ब्रह्म अशा भासल्याचा हेगेलचा सिद्धांत आहे. गीतारहस्य पा. २२२]. (२) अस्तित्वभाव, तत्त्वदृष्टि व कल्पना, किंवा "वस्तुशास्त्र, तत्त्वशास्त्र व बोधशास्त्र" या ज्ञानाच्या ("न्यायशास्त्राच्या") तीन पायऱ्या आहेत. (३) व्यष्टीचे अस्तित्व हे स्वतंत्र नसून ते अनंताचे किंवा समष्टीचेच अस्तित्व होय. "प्रत्येक व्यक्ति ही समष्टीकडे जाणाऱ्या उत्क्रांतीचा अवयव आहे, असं समजले तर मात्र ती व्यक्ति सत्य व वास्तविक आहे. तिला निराळी काढली व ती स्वतंत्र आहे असे मानले, तर तिचे सत्यत्व व नित्यत्व हीं नष्ट होतात."(The Being of the Finite is not its own Being but is on the the contrary the Being of its Other, namely the Infinite.) ब्रह्माची स्वयंप्रवृत्ति म्हणजे त्याचेच त्याच्याशीं जे निरुपाधिक ऐक्य, त्या प्रकारास किंवा विकारास द्रव्य म्हणतात. (The activity of God himself is simple unity with himself, the form, is matter.) "स्वकामाने स्वकामासाठीं परमात्मा प्रगट झाला, म्हणजे विश्वोपपत्ति होते. आत्मा स्वरूपांत राहून प्रकट होतो, आणि पुनः स्वरूपांत प्रविष्ट होतो. हा उत्क्रांतीचा क्रम आहे. सर्व आत्ममयच आहे. परमात्मा अज्ञेय स्वरूपांत अस्ति इतकाच असतो. पुढे त्याचे सच्चिदानंदात्मकत्व प्रकट होते व पुढे त्याला स्वरूपज्ञान होतें. नंतर स्थूलापासून सूक्ष्मापर्यंतचें अचर व चर विश्व, जीवाची जाणीव, स्वरूपज्ञान, विवेक, सत्त्व, नीति, राजशासन इत्यादि स्वरूपें घेऊन पुढे ललितकला, धर्म व शास्त्रज्ञानासहित

तरी त्यांस निंबार्काचे‡ अनुयायी असे मुळींच म्हणतां येणार नाहीं. प्रायः ब्रह्मज्ञान यांत परिणत होऊनच तो स्वरूपाप्रत परत येतो. स्थूलापासून अत्यंत सूक्ष्मापर्यंत प्रगमन करून पूर्णत्व प्राप्त करून घेणे, ही आत्म्याची उत्क्रान्ति आहे." "ब्रह्मतत्त्वज्ञान तीन भूमिकानी प्राप्त होते (१) प्रत्यगात्मज्ञान ( यातच मानसशास्त्र येतात ); (२) विराटस्वरूपाचे ज्ञान ( यांत सत्त्व, नीतिवृत्ति, राजशासन व इतिहास याचा अंतर्भाव होतो; (३) केवलात्मज्ञान यांत कलादिकात दिसणारी केवलोपलब्धि, धर्म, बोधरूपतत्त्वज्ञानाचा इतिहास याचा समावेश होतो." अवतरणातील मजकूर भानूंच्या गीतेच्या उपसंहारातून घेतला आहे. पान ५३९, ५४० पहा.

‡ निंबार्क हा नीमावतपंथाचा संस्थापक एक दाक्षिणात्य तैलंगी ब्राह्मण अकराव्या बाराव्या शतकात होऊन गेला. तो वृंदावन येथे रहात असे. तो आचार्यांच्या मायावादाचा विरोधि असा एक वैष्णवधर्मप्रसारक होता. राधाकृष्ण व इतर गोपी हीं त्याचे पंथाचीं उपास्ये होत. त्याच्या संप्रदायास संनक संप्रदाय म्हणतात. त्यांचे संन्यासी व गृहस्थाश्रमी असे दोन वर्ग आहेत. निंबार्काचे चरित्र अद्भुत असून त्याला विष्णूच्या सुदर्शनाचा अवतार मानतात. सूर्यास्तानंतर न जेवणारा एक अतिथि एक दिवस सायंकाळीं त्याच्या घरी आला असतां त्याने अतिथीचे जेवण होईपर्यंत सूर्यबिंबास दारच्या निंबाच्या झाडाखालीं जाऊं दिले नाही, म्हणून त्याचे नाव निंबार्क पडले, अशी दंतकथा आहे. हें सारें चरित्रवर्णन साधारण ब्राह्मांस न पटण्यासारखेच असल्यामुळे, ते त्याचे अनुयायी म्हणविण्यास कधींच राजी होणार नाहीत ! तथापि त्याचीं मते त्यांस तितकीं त्याज्य वाटत नाहींत. तीं अशीं:—जड सृष्टि, जीवात्मा व ईश्वर हे एकमेकांपासून भिन्न तसेच एकही आहेत. पहिल्या दोहोंस ईश्वराशिवाय स्वतंत्र अस्तित्व नाहीं, या अर्थानें ते तिघे एक आहेत. ते दोघे ( जीव ईश्वर ) अस्तित्व व क्रिया या बाबतींत ईश्वरावर अवलंबून आहेत. ब्रह्म हे जगताचे उपादान कारण आहे. (१) ( जगत् ) कार्याचे रूप धारण करण्याची शक्ति असणे व (२) ते कार्य करण्यास पात्रता असणे, म्हणजेच उपादान कारण असणे होय. या शक्ति सूक्ष्म स्वरूपांत असणे ही ब्रह्माची सहजावस्था होय. या सूक्ष्म व बीजभूत शक्ति, ब्रह्म कृतींत किंवा व्यवहारांत उतरवितें, तेंच चराचर विश्व होय.

कांहीं उपनिषदांतील निवडक वाक्यांशिवाय आपले हिंदूंचे कोणतेच धार्मिक अगर तात्त्विक ग्रंथ त्यांस मान्य नाहींत. आणि अशा निवडक वेच्यांतील हीं अगदीं निवडक अशीं जी आदर्शवाक्ये ते आपल्या अहवालाच्या मुखपृष्ठावर छापतात, त्यांत एकमेवाद्वितीयम् ( छांदोग्य, ६।२।२ ) आणि सत्य ज्ञानमनंत ब्रह्म ( तैत्तिरीय, २।१ ) हे दोन मोठे तत्त्वसिद्धान्त आहेत. पण ह्याही त्यांच्या ब्रीदवाक्याचा ते जो अर्थ करतात, तो आपल्याकडील वेदान्तमताशी अगदीच विसंगत आहे. त्याचा विरोध जडवादी, विज्ञानवादी, स्वभाववादी इत्यादिकांशीं असला, तरी मायावादी जे वेदान्ती त्याच्याशीं साधारण-ब्राह्मांचा कसून विरोध आहे. यास्तव साधारण-ब्राह्मांच्या मताचा नीट उठाव दिसण्यासाठीं वेदान्तमताची भूमिका आम्ही यापुढे मधून मधून देणार आहोत. विषयविवेचनास आरंभक वाक्ये ह्या दृष्टीने आम्ही वरील दोन सिद्धान्तांचाच उपयोग करणार आहोत. तथापि त्या दोन सिद्धान्तांचे स्पष्टीकरण करावे, एवढाच आमचा हेतु नसून विवेचनास निमित्तमात्र ते आधार घेऊन ब्राह्मांच्या तत्त्वज्ञानाचे स्थूलमानाने दिग्दर्शन करावे, असा आमचा प्रयत्न आहे. ह्या प्रकरणात एकमेवाद्वितीयम् या सिद्धान्तवचनापासूनच आरंभ करूं.

छांदोग्य उपनिषदांतील आरुणि-श्वेतकेतु-संवादात हे वाक्य आले आहे. आरुणि श्वेतकेतूला म्हणतोः—सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं। अर्थः—बाळा, जगाच्या उत्पत्तीच्या पूर्वीं एक, अद्वितीय, असें सत् मात्र होते. वरील वचनात एकं, एव, अद्वितीय अशा तीन शब्दानी स्वगतभेद ( उ० झाडांचीं फुले, पाने, फळे ) सजातीय भेद ( उ० अनेक झाडे ) विजातीय भेद ( उ० झाडे, डोंगर, घरे इ० ) ह्याप्रमाणे शक्य त्या सर्व भेदांचा निरास करून वेदान्ताने एकाचे केवलत्व सिद्ध केले आहे. केवल अस्तिभावांत अंशाअंशी भाव कल्पितां येत नाहींत, त्यामुळे स्वगत भेद अशक्य आहे. एका केवळ अस्तित्वाचें भेददर्शक दुसरें सजातीय कांहीच असूं शकणार नाहीं. तसेच अस्तित्वाचे विरोधि जे नास्तित्व ते विजातीय असले, तरी ते शून्यरूप असल्यामुळे अस्तित्वाचे प्रतियोगी असूच शकत नाहीं. यामुळे सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वीं एक निर्गुण, निरुपाधिक, व केवल असे सत् म्हणजे आहेपण मात्र होते, दुसरे कांहींच नव्हते. असे वेदान्ततात्पर्य आहे. पंचदशीकार श्री विद्यारण्य स्वामी ह्याचाच आणखी असा खुलासा करितात कीः—

एकमेवाद्वितीयम् सन्नामरूपविवर्जितम् ॥
सृष्टेः पुराऽधुनाप्यस्य तादृक्त्वं तदितीर्यते ॥ ५।५

**भावार्थः**—जें सृष्टिव्यक्तीच्या पूर्वी सजातीय व स्वगतभेदशून्य एक व अद्वितीय ब्रह्म होतें, ते आतां ( सृष्टीच्या व्यक्तावस्थेत )ही तसेच आहे. तात्पर्य, एकमेवाद्वितीयं हे ब्रह्मलक्षण सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी, ती विद्यमान असतां, व तिच्या लयानंतर एकच कायम आहे, असा वेदान्ताचा सिद्धांत आहे.

आतां साधारण-ब्राह्म जरी आपणास अद्वैतीच म्हणवितात, तरी त्यांचें ब्रह्म ( Absolute ) वरीलप्रमाणे त्रिविधभेदरहित नसून त्रिविध भेदसहित आहे असेंही कोणी कदाचित् म्हणेल.

" Without the world God is not God" जग नाहीं तर ब्रह्मही ब्रह्म नाहीं.

" To be is to stand in relations " सत्ता म्हणजेच सापेक्षता; किंवा असणें म्हणजेच कोणाचे संबंधी असणे.

A God who is not revealed is no God.

ईश्वर जर व्यक्तच नसेल तर ईश्वर आहे हे तरी कशावरून म्हणावे. अव्यक्त असे ब्रह्म नव्हेच. असे त्याचे सिद्धान्त आहेत. जीव, जग व ब्रह्म अशीं तीन सत्येते मानतात. शिवाय ही सत्ये त्यांच्या म्हणण्याप्रमाणे नित्यही आहेत. मात्र जीव व जग ह्यांस अधिष्ठान एका अखंड ब्राह्माचे आहे. असें त्यांचे म्हणणे असल्यामुळे, आम्ही स्वगतभेद मात्र मानतो असे ते म्हणतात; पण हें सर्वांना पटेलच असे वाटत नाही. कारण नामरूपात्मक जगत् हें अनात्म, म्हणजे आत्मरूपाहून भिन्न, असल्याचे त्यांस कबूलच आहे. तसेंच त्या नामरूपात्मक जगाची सत्ता भ्रामक नसून सत्य व नित्य असल्याचे ते म्हणतात. शिवाय सांख्यांप्रमाणें ते असंख्य जीवात्मे मानतात. आतां हे भेद जर नित्य मानले, तर त्याचे केवल ब्रह्म कोणास जवळजवळ शून्य रूपच वाटल्यास नवल नाहीं. परंतु ते शून्य नसून उलट हे अखिल विश्व म्हणजेच ( Living thought of a living God. ) चैतन्य ब्रह्माचा एक चिद्विलास आहे, किंवा विद्यमान ईश्वराचा तो जागृत विचार आहे, असेच ते ठासून सांगतात. आणि आत्मदृष्टीने किंबहुना ईशदृष्टीनेंसुद्धां ह्या कल्पक—कल्पनेच्या द्वैतांत तरुशाखांप्रमाणें एक स्वगतभेद मात्र आहे असें ते मानतात.

" Living thought of a living God " म्हणजे जागरूक ईश्वराचे जिवंत विचार, हे जग व जगदीश ह्यांचें ब्राह्मानें केलेलें वर्णन यथार्थ असलें, तरी एकमेवाद्वितीयं असे एकच निर्गुण निर्विकल्प व सर्वभेदशून्य असें केवळ ब्रह्म मानल्यावांचून जिज्ञासूची जिज्ञासा थांबत नाहीं. व समाधान वाटत नाहीं. परब्रह्मास व्यक्ति म्हणावे तर तेथे अहं आणि इदं, आत्म आणि अनात्म, व्यक्ति आणि अव्यक्तिक इत्यादि भेद उत्पन्न होतील; पण पूर्णाच्या ठिकाणीं भेदाची कल्पना करणे म्हणजे पूर्णास अपूर्ण मानणे आहे. तसेच व्यक्ति म्हटली कीं त्यास व्यक्तत्वाची मर्यादा आली. जे प्रत्यक्ष मर्यादेत आले ते ध्येयरूप कसे असेल ? अर्थात् परब्रह्म हे ध्येयरूप असून ते पूर्ण व अनंत असल्यामुळे ते व्यक्त न मानतां अव्यक्तिकच मानणे योग्य होईल. केवळ सोपाधिक जीवासच व्यक्ति म्हणतां येईल. निरुपाधिक जे अनंत ब्रह्म त्यास व्यक्ति कसे म्हणावे ? तसेच अहं आणि इदं, ज्ञाता आणि ज्ञेय असा भेदच जेथे नाहीं, त्या अभेदाचे ठिकाणी विचार तरी कसा संभवेल ? आणि ज्याच्या ठिकाणीं अपूर्णता किंवा कर्तव्यशेषच नाहीं, त्याच्या ठिकाणीं कोणती इच्छा आणि वासना असणार ? अशा अर्थाच्या शंका पाश्चात्य पंडितही आतां काढूं लागले आहेत.

अशा शंकांस ब्राह्म असे उत्तर देतात कीं, वरील विचारसरणींत भेद म्हणजे विरोध असे चुकीने मानले आहे. जेथे सर्व भेदांचे ऐक्य आहे, समन्वय आहे, तेथे भेद अनंत मानले, म्हणून अधिष्ठानांत अपूर्णता कशी येईल ? व असमाधानाचे कारण काय ? तसेच आत्म्याचे मर्यादित अपूर्ण-स्वरूप आणि अमर्याद पूर्णस्वरूप ह्या दोन स्वतंत्र वस्तू नसून एकाच आत्म-रूपाकडे भिन्न दृष्टीनें पाहण्याचे हे प्रकार आहेत. आत्मा (व्यक्ति) हा पूर्णच आहे. कारण त्यांत अनंताची अखंडित सत्ता आहे. आणि तो अपूर्णही आहे. कारण त्याची पूर्णत्वाकडे नित्य प्रवृत्ति आहे. तात्पर्य, पृच्छकांचा ध्येयात्मा जीवात्म्याच्या व्यक्तरूपाने कार्यक्षम होऊन परत आपल्या पूर्णत्वाकडे येत असतो. ब्राह्म पुढे म्हणतात की, सोपाधिक जीवांस जर सर्वांगाने सांत मानले, तर ते अनंताहून पृथक् होऊन ते आपल्या भिन्न सत्तेनें अनंतासच मर्यादित करतील. अर्थात् सांत हे अनंताशीं तत्वतः एक-रूपच आहेत. आतां दिक्कालादि परिच्छेद आणि वस्तुपरिच्छेद इत्यादि

सोपाधिक व्यक्तींची लक्षणें पूर्ण परब्रह्माच्या ठिकाणीं नाहींत, म्हणून पूर्ण ब्रह्म हें अव्यक्तिकच असले पाहिजे, असेंही म्हणणे ब्राह्मांस व्यर्थ वाटते. कारण वस्तुतः केवळ परब्रह्म हीच एक सद्व्यक्ति असून, जीवात्म्यांस व्यक्तित्व आले आहे, तें तरी ह्या परब्रह्माच्याच जीवावर होय. असे ब्राह्मांचे व्यक्तिक ब्रह्म आहे.

आतां एकमेवाद्वितीयं अशा परब्रह्माच्या ठिकाणीं विचार व इच्छा संभवत नाहींत. कारण अद्वैताच्या ठिकाणी विचारांचे द्वैत कसे असेल? अशी शंका कोणी काढतात, तीही ब्राह्माच्या मताने अयुक्तिक आहे. कारण सत्यतेला सोडून द्वैत उभारावे, हेच कांही विचाराचे कार्य नसते. उलट विचारास सत्यता यावी, हेच ध्येय आहे. परंतु अशा रीतीने विचारांचे शुद्धीकरण होत होत ब्राह्माचे विचार हें स्वरूप मावळून, केवळ सद्रूप किंवा अनिर्वचनीय रूप राहते असे मात्र ब्राह्मास वाटत नाही. विचार आणि सद्वस्तु यांचे असे एक-रसात्मक ऐक्य होत नसून, त्या ऐक्यांत मूल पदार्थाची विजातीय सत्ता कायमच राहते. कारण ह्या नित्यसिद्ध द्वंद्वापैकीं कोणतेही पद नाहींसे होणें शक्य नाही. सत् आणि चित् किंवा सद्वस्तु आणि विचार, यांपैकीं, अखेरच्या सच्चिताच्या ऐक्यांत, विचार विराम पावतो, असे म्हणावे, तर असा विचारांचा लय विचारावांचून कोण पाहणार? बरें विचार किंवा कल्पना शिल्लक राहून सत्त्वाचा लय होतो, हे खरे म्हणावे. तर सत्यतेचा लय हाच सत्य पदार्थ होऊन राहतो. बरे, सत् आणि चित् या द्वैताचे ऐक्यच होत नाहीं म्हणावे, तर ते स्वतंत्रच पदार्थ मानावे लागतील, पण चित्ने आपण होऊनच सत्यतेस सोडणे, म्हणजे आपणच नाहींसे होणे आहे. आणि उलट सत् चित्ला सोडून स्वतंत्र आहे, ही जाणीव म्हणजेच चित् होय. आतां सत् आणि चित् यांच्या ऐक्यांत ह्या दोन्ही वस्तू लय पावून तिसरेंच कांहीं तरी बनते म्हणावे, तर ते सत् न राहिल्यामुळे शून्यवत् होईल. आणि चित् लय पावल्यावर पुढे काय राहिले ते जाणणेच अशक्य होऊन, शून्यावस्थाच प्राप्त होईल. यास्तव एकच अनुमान शिल्लक राहते ते हे कीं, सत् + चित्= सद्वस्तु आणि विचार, हें विजातीय द्वैत समरस होणे अशक्य असल्यामुळें, तें नित्यद्वैत असूनही, जे त्यांचे ऐक्य, तें परमपुरुषांचे स्वरूप होय. अशा ह्या परमपुरुषास बुद्धि, ज्ञान व विचार, आहेत, त्याचप्रमाणें इच्छाही आहे. ती त्याची इच्छा म्हणजे परिस्थितीशीं विरोध, अथवा अपूर्णतेची जाणीव असें

नव्हे. उलट जीवाची इच्छा व त्या इच्छेची पूर्तता, यांत जीवाच्या अल्प सामर्थ्यामुळे नेहमीं अंतर पडते. परंतु सर्व शक्तिमान् ईश्वराची इच्छा म्हणजेच तिची पूर्तता, संकल्प म्हणजेच सिद्धता, असा मोठा फरक आहे. या सर्व विवेचनावरून ब्राह्म पूर्वपदावर येऊन असे सिद्ध केल्याचे दर्शवितात की, परब्रह्म हें अव्यक्तिक नाहीं. त्यास बुद्धि, ज्ञान, विचार, इच्छा हे सर्व गुण परिपूर्णावस्थेत आहेत. आणि म्हणून ब्रह्मसत्तेस अपौरुष न म्हणतां उलट अतिपौरुष म्हणणेंच बरोबर होईल.

ब्राह्मांची ही विचारसरणी मुद्दाम सविस्तर दिली आहे. ती वेदान्तमताच्या कसोटीनें फोलच आहे. इंद्रियसवदेना हीच काय ती जीवाची ज्ञानसाधनसामुग्री आहे. ईश्वराचें स्वरूप इंद्रियातीत व अचिंत्य आहे. ब्रह्माच्या ठिकाणीं सत्, चित्, आनंद वगैरे गुण आहेत, असें सागतां येणे मनुष्यास अशक्यच आहे. तें ब्रह्म ज्ञानाच्या व विचाराच्या पलीकडे आहे. ते जाणावयाचे नाहीं अज्ञान दूर करून ब्राह्मी स्थिति अनुभवावयाची आहे. ब्रह्माला सत् म्हणूनही त्याचें खरे स्वरूप जाणिवेत येतच नाहीं. यास्तव जाणींवत येणारे जे सत् तेही त्याचें रूप नव्हे, असें वेदान्तमत आहे. असो. आपल्याला येथे वेदान्त मताची विशेष चर्चा करावयाची नसून, ब्राह्माचे " एकमेवाद्वितीय मत " पहावयाचें आहे. यासाठी तेच आणखी काय म्हणतात ते पाहूं. विश्व म्हणजे जागरूक देवाचा जिवंत विचार आहे, असा ब्राह्माचा सिद्धान्त वरती विचाराकरितां घेतला आहे, त्याचा अर्थ ते कसकसा करतात ते यापुढे तपशीलवार पाहूं. आम्ही या ब्राह्मांच्या विचारास इतके महत्त्व देतों ह्याचे कारण, एक तर ते विद्वान् आहेत. त्यांनीं वेदान्तमताचा पूर्ण विचार केला आहे, असे ते म्हणतात. आणि त्यांचा विचारपूर्वक असा ग्रह झाला आहे कीं, वेदान्त्यांचा आत्मसाक्षात्कार, किंवा अद्वैतानुभूति हा एक क्षणिक अनुभव आहे. ते अखेरचें ध्येय नव्हे; उलट खऱ्या धर्मजीवनास त्यानंतर आरंभ होतो, आणि नीति, आत्मौपम्य बुद्धि व लोकसेवा, इत्यादि उदात्त कल्पनांचे खरे रहस्य, जे वेदान्त्यांना मुळीच समजले नाही, ते कळूं लागते. यास्तव त्यांच्या मतांचा विस्तारपूर्वक ऊहापोह होणें जरूर आहे. ब्राह्मांचे तत्त्वज्ञान असे निश्चित कांहींच नाहीं. त्यांच्या वैयक्तिक विचारांवरूनच ही तत्त्वज्ञानाची चिकित्सा आहे. असो.

ब्रह्माचा हा विश्वसंकल्प जरी मनोमय असला, तरी आपल्याला बाह्य जडद्रव्य दिसते ते मिथ्या आहे, म्हणजे त्याचें वास्तविक अस्तित्वच नाहीं असे ते समजत नाहींत. परतु जे जग सामान्य माणसांस असंख्य वस्तूंच्या प्रचंड संग्रहाप्रमाणे दिसते, ते ईशसंकल्पाच्या सूत्रांत मणिगणांप्रमाणे सुसंगत गुंफलेले व गुतलेले आहे, असे त्यांस दिसते. अर्थात् त्यांचे अद्वैत एक संख्यावाचक नसून ऐक्यवाचक किंवा एकीकरणवाचक आहे. हे एकीकरणाचे खरे कार्य व्यष्टिमनच नव्हे, तर वस्तुतः समष्टिमनच करीत असते. त्या मनाच्या ठिकाणीं सृष्टींतील भिन्न बाह्य पदार्थांचेच एकीकरण होते असें नव्हे, तर विषयी आणि विषय, ज्ञाता व ज्ञेय याचाही सापेक्ष सबध त्याच व्यापक मनात जडलेला दिसतो. आपले मन देहेंद्रियांनीं मर्यादित असल्यामुळे सर्व विश्वाचे ज्ञातेपण त्यास आपल्याकडे घेतां येत नाहीं. शिवाय जे विश्व शास्त्रकारास उपलब्ध झाले आहे, तेवढेंच काय ते ब्रह्माचें व्यक्त स्वरूप असेंही मानतां येत नाहीं. शास्त्रज्ञास अज्ञात, व अज्ञेय असेंही अमर्याद ब्रह्माचे स्वरूप असेल. तात्पर्य, ज्ञाताज्ञात अखिल ब्रह्मास जाणील इतके किंचिज्ज्ञ जीवाचें मन समर्थ व व्यापक नसते. परंतु अनंत ब्रह्माच्या मनाची व्याप्तिही अमर्याद असल्यामुळे त्या व्यापक मनाच्या बाहेर कांहींच रहात नाहीं. किंबहुना सारे जीवात्मे किंवा व्यष्टिमने यांचाही संग्रह त्या व्यापक मनांत दृश्यरूपानेंच झालेला असतो. अशा रीतीने जीवाचे व्यष्टिमन किंवा आत्मा हा एक पक्षीं बाह्यपदार्थांचा ज्ञाता व विषयविषयी-भावाचे अधिष्ठान होत असून, दुसरे पक्षीं तो आपल्या किंचित् ज्ञानासहित ह्या थोरल्या व्यापक मनास ज्ञेयरूप होतो.

ह्याप्रमाणे विचार करतां ब्राह्म असे ठरवितात कीं, मनाच्या जाणिवेबाहेर पदार्थांस अस्तित्वच नाहीं. बाह्य पदार्थांनीं जाणिवेत येऊन ज्ञेयरूप व्हावे अगर न व्हावे असा पदार्थांचा कांहीं अनिश्चित धर्म नाहीं. पदार्थ अज्ञात मानल्यास त्यांस ज्ञेय कसे म्हणावे. ते शून्यरूपच होतील. प्रत्येक ज्ञेय पदार्थ जाणिवेचा विषय असलाच पाहिजे मग ती जाणीव व्यष्टीची अगर समष्टीची असो. आतां जीवाच्या जाणिवेस विषय होणारी ज्ञेय वस्तु विषयग्रहणाच्या ज्ञानक्रियेहून किंवा इंद्रियसवेदनक्रियेहून भिन्न व बाह्य भासली तरी जीवाच्या ज्ञानास आधार जो आत्मा व बाह्य विषयभूत दृश्यास आधार जी

ज्ञेय वस्तु, हीं तत्त्वतः एकच असल्यामुळे ह्या वरकांती दिसणाऱ्या द्वैतांत अद्वैतच दिसून येतें. ह्याचा अर्थ असा कीं, विश्वात्मा हा विश्वास जसा आधार तसाच विज्ञानात्मा हा जीवास आधार आहे. परतु विश्वात्मा आणि जीवात्मा हे तत्त्वतः एकरूप असल्यामुळे त्यावर आधारलेली जग व जीव ही जोडी यांचेंही ऐक्य दिसून येते.

वरील विचारसरणींत वेदात्यांच्या दृष्टीने सत्यांश नाहीं असे नाहीं. पण जीव, जग आणि ईश्वर ह्या सत्य अर्थाची जाणीव नित्य जागृत ठेवून एकमेवाद्वितीयम् या सिद्धान्ताचा अनुभव घडणे शक्य आहे काय? असा वेदान्ताचा प्रश्न आहे. एकमेवाद्वितीय हा फक्त कांहीएक मतविश्वास नव्हे. एकमेवाद्वितीयं यापुढेच तत्त्वमसि ह्या महावाक्याचा उपदेश करून ब्रह्मानंदाची अपरोक्षानुभूति घेण्यास श्रुतिमाऊली सांगत आहे. साधारण-ब्राह्मही असेच म्हणतात की, आमचा कल्पनावाद म्हणजे कांहीं भावनेचें अलौकिक चित्रलेखन नव्हे. तात्त्विक कल्पनावाद हा अनुभवाच्या अभग पायावर उभारला आहे. त्याचा अनुभव कांहींच टाकण्यास सांगत नाही. जग–जीव हे भ्रमकार्य आहेत; त्यांस पारमार्थिक सत्यत्व नाही; असाही त्यांचा अनुभव सांगत नाही. मात्र आध्यात्मिक सत्तेपलीकडे पदार्थास अस्तित्वच नसते, असे ते म्हणतात. तसेच ब्रह्मज्ञान व ब्रह्मानुभव ह्यासाठी व्यावहारिक ज्ञान व व्यावहारिक अनुभव यांच्यापलीकडे दिव्यदृष्टि, अंतर्दृष्टि नाहीं तर योगदृष्टि वगैरे पाहिजे, असे म्हणण्यावर त्यांचा फारकरून भरंवसा नसून अतींद्रिय वादाचा ते उपहासच करतात. व ही सर्व धर्मवेडे मोडून टाकलीं पाहिजेत, असेच ते समजतात. ह्या विचारसरणीने साधारण-ब्राह्मांस जो आध्यात्मिक अनुभव घडत असेल, तो एकमेवाद्वितीयं या सिद्धान्ताचा लक्ष्यार्थच असेल काय? त्यांच्या ह्या विचारसरणींत एकमेवाद्वितीयं या अद्वैत तत्त्वाचे परोक्षज्ञान तरी बिनचुक दिसते काय? आम्हांस तर असे वाटते की, ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः हा एकत्वाचा अभिप्राय वरील विचारसरणींत खचित नाहीं. मग एकमेवाद्वितीयं असे ते काय अर्थाने म्हणतात? ह्याची अधिक फोड होण्यासाठीं त्यांचा द्वैताद्वैतविचार पुढील प्रकरणांत पाहूं.

---

# प्रकरण चवथें

## तत्त्वज्ञान ( पुढें चालू )

### द्वैताद्वैत

द्वैतात अद्वैत पाहणे हेच श्रेष्ठ प्रकारचे ज्ञान आहे, असे भगवद्गीता सांगते. ते ज्ञान म्हणजे एकमेवाद्वितीयं हेच होय. त्याचा भावार्थ काय तें खालील‡ गीतावचनावरील श्रीज्ञानदेवांच्या टीकेत स्पष्ट आहे. परंतु साधारण-ब्राह्मांस हा भाव मान्य नाहीं. त्यांचे ज्ञान केवळ राजसी न मानले, तरी खालील व्याख्येप्रमाणे शुद्ध सात्त्विक नाहीं, असे म्हणावे लागते. आवरण-विक्षेपादि दोष दूर करून ज्ञात्याने आपल्या ठिकाणीं निर्गुण ब्रह्माचा किंवा अद्वैताचा अनुभव घ्यावा, व त्या अनुभवांत ज्ञात्याचे ज्ञातेपण आणि विषया-चें ज्ञेयपणही विरून जावें, हे एकमेवाद्वितीयं या सिद्धान्ताचे रहस्य आहे, असे ब्राह्म मानीत नाहींत.

जीव-ब्रह्म, जीव-जग आणि जग-ब्रह्म या द्वैतांचा निरास ब्राह्म मानीत नाहींत. किंबहुना हे द्वैत अपरिहार्य आणि इष्टच आहे, असे ते मानतात. मात्र त्या द्वैतांत नित्य सापेक्ष संबंध आहे, असे सांगून त्यांतील विरोधाचा ते अंशतः परिहार करतात. या विरोधाचा परिहार करण्याकरितां जगाचे स्वतंत्र अस्तित्व नाहींसें करणे त्यांसही भाग पडते. तसेंच जीवब्रह्म ही तत्त्वतः एकच आहेत, असेही मानणे त्यांस प्राप्त होते. परंतु जगाचे स्वतंत्र नसले तरी परतंत्र अस्तित्व ते नित्य मानतात; व जीवब्रह्माचें तादात्म्य न मानतां सदैव द्वैत

‡सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते। अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ १८।२० ॥ श्रीमद्भगवद्गीता. श्रीज्ञानेश्वरी टीकाः—तरी अर्जुना गा तें फुडें। सात्त्विक ज्ञान चोखडें। जयाच्या उदयीं ज्ञेय बुडे। ज्ञातेनिसीं ॥ ५२९ ॥ जैसा सूर्य न देखे आंधारें। सरिता नेणिजती सागरें। कां कवळिलिया न धरे आत्मच्छाया ॥ ५३० ॥×× कां चेतोनि स्वप्ना येतां। जैसें होय ॥ ५३२ तैसें ज्ञानें जेणें। करितां ज्ञातव्यातें पाहाणे। जाणता ना जाणणें। जाणावे उरे ॥ ५३३ ॥



पंडित सीतानाथ तत्त्वभूषण

साधारण-ब्राह्मसमाजाचे अध्यक्ष.

मानतात. त्यामुळें त्यांचा हा तीन दगडांवरील संसार अबाधित चालतो. आणि अनेकांमुळेंच ऐक्यभाव नांदतो असें त्यांस दिसतें. असें त्यांचें हें ऐक्यात्मक द्वैत कसे त्याचा स्पष्ट व सुबोध खुलासा त्यांच्याच दृष्टीने आतां करूं.

ते म्हणतात कीं, मनुष्य सुशिक्षित असो किंवा अशिक्षित असो, 'मी आहें' व 'मी जाणतो' या दोन गोष्टींबद्दल तो स्वभावतःच अगदीं निःसंदेह असतो. परंतु एक गोष्ट त्याच्या सहसा लक्षांत येत नाहीं कीं, तो जाणतो, तेव्हां ज्या पदार्थांचें त्याला ज्ञान होते, त्या पदार्थज्ञानाबरोबर हे मीं जाणले असा 'मी'-चा आत्मप्रत्ययही त्यास येत असतो. पदार्थज्ञानात जर आत्मप्रत्यय नसेल तर तें माझे ज्ञान अशी जाणीवच उत्पन्न होणार नाही. मी+ज्ञान ही दोन्ही पदें आपल्या जाणिवेचे विषय असतात. त्यांतील मीपद गाळले तर त्या ज्ञानाशीं आपला संबंधच राहणार नाहीं. तात्पर्य, जीवाच्या जाणिवेच्या कमजास्त कक्षेत विषय कोणतेही येवोत, वर्तुलाच्या मध्यबिंदूप्रमाणे जीवाचा अहंप्रत्यय हा नित्य निरपवाद असतोच. विषयाशीं आपले मन तादात्म्य पावत असल्या-मुळें, या अहंप्रत्ययाचे भान आपणास नेहमी होत नाही, इतकेच. याप्रमाणें पदार्थज्ञानांतःप्रत्येक वेळीं, अनात्मपदार्थ व आत्मप्रदीप, विषय व विषयी किंवा ज्ञाता व ज्ञेय या द्वैताचे ज्ञान एकाच वेळीं होत असते.

आपलेच आपल्याला भान नसेल तर बाह्यपदार्थांचेही ज्ञान आपल्याला संभवणार नाहीं. ह्याप्रमाणे विषयज्ञानास जशी आत्म्याच्या सामान्य ज्ञानाची आवश्यकता असते, त्याचप्रमाणें आपल्या आत्म्याच्या जाणिवेसही अनात्म विषयाची जोड अखड असते. मग तो पदार्थ इंद्रियांस प्रत्यक्ष असो किंवा मनोवेद्य असो. पण जाणिवेनें कांहीं तरी जाणतच राहिले पाहिजे. त्यावांचून तिचें अस्तित्वच सिद्ध होत नाहीं. रुपयाच्या दोन बाजूप्रमाणे विषयविषयीभाव हे एकमेकांस अखंड चिकटलेलेच आहेत. केवळ आत्म-प्रत्यय हा एकच विषय जाणिवेस असूं शकत नाहीं. कारण आपले आत्मरूपच जाणावयाचें तें कसें ? आत्म्याच्या दर्शनांत त्याचे कोणते गुण जाणावयाचे ? त्यास नित्य, शुद्ध, बुद्ध, निर्गुण, निराकार असें कांहीं जाणलें, तरी त्या जाणिवेत नित्या-बरोबर अनित्याचा निषेध, शुद्धाबरोबर अशुद्ध व विकारी गुणांचा निषेध, निरा-काराबरोबर आकाराचा निषेध, असा हा निषेध नित्य सापेक्ष असतोच. अर्थात्

भावरूपानें असोत अगर निषेधरूपाने असोत आत्मज्ञानास म्हणजे आपल्या जाणिवेस विषयभूत असें कांहीं तरी अनात्म असावेच लागतें. मी मलाच काय तें जाणतो, दुसरें कांहींच जाणत नाहीं, ह्या अनुभविक ज्ञानासही 'दुसरें कांहींच जाणत नाहीं', हा द्वैतकल्पनेचा अभाव विषयभूत होतोच. दुसरेपणाच्या अपेक्षेनेच एकटेपणास एकटेपण येतें. अर्थात् आपण जेव्हां आत्मज्ञानास एकटेंच एकटें असे म्हणतो, तेव्हां आपण आपणांस जाणत असून, दुसरें कांहींच नाहीं, ही कल्पना अगर भावनाही आपल्याच ज्ञानाचा विषय झालेली असते. तात्पर्य, अनात्मविषय निरपेक्ष आत्मज्ञान संभवतच नाही. मग तो विषय प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष, इंद्रियगम्य किंवा मनोवेद्य, भावरूप किंवा अभावरूप, कसाही असो. ब्राह्मांच्या ह्या आत्मानात्मवादात, आत्मानात्म्याचा किंवा सदासताचा सापेक्ष संबंध नित्य आहे, असे ते मानतात. वेदांती जगास असद्रूप म्हणजे शून्याप्रमाणेच लेखतात. पण ब्रह्मभावनेत शून्य हे सताचे प्रतियोगी असे त्यांस मानावे लागत नाही. म्हणजे अनात्मभावावांचून आत्म्याचें अस्तित्व, असतास वगळून केवळ सताची कल्पना किंवा सत्ता संभवतच नाही, असें वेदांती मानीत नाहींत. समाधियोगात कांहीं काळ ध्याता, ध्येय व ध्यान ही त्रिपुटी किंवा केवळ अहंप्रत्यय राहतो. पण पुढे निर्विकल्प समाधीत तोही शेष रहात नाहीं. मग अनात्मविषयाचें चिंतन वेदांतमतांत कोठून असणार ! पण ह्या खोल विचाराची व अनुभवाची आस्था साधारण ब्राह्मांच्या ठिकाणीं दिसत नाहीं. त्यांस गुणातीत वाद व गूढ वाद हीं सारी तुच्छ व तिरस्करणीय खुळेच वाटतात !

ब्राह्म म्हणतात कीं, मन हे कधीं रिकामे रहात नाही. ते अनात्मचिंतनाने सदां व्याप्त आहे. अशा रीतीने सारें विश्वरूप जरी मनांत सामावलें, तरी त्या योगाने मनाचें अद्वैत कांहीं मोडत नाही. तेव्हां ब्राह्मांपुढें विचाराचा मुख्य प्रश्न असा आला कीं, आपल्यापुढे अपरंपार पसरलेल्या ह्या विश्वाची बाह्यसत्ता मुळींच नसून तें सारे मनोमयच आहे कीं काय ? ह्या गोष्टीचा निर्णय लावण्याकरितां प्रथम ते आपल्या व्यष्टि मनाच्या अनुभवापासूनच सुरवात करतात, आणि त्याबरोबर हेंही लक्षांत ठेवण्यास सांगतात की, व्यष्टि व समष्टि मनें ही तत्त्वतः एकच असून समष्टीचेंच व्यष्टींत व्यक्तिभवन झालेलें आहे. अर्थात् व्यष्टि-समष्टीकडे एकच न्याय लागू असल्यामुळें

मनाबाहेर जगास अस्तित्व नाही, हे सिद्ध करीत असतांना आपण आपल्या नजरेपुढे व्यापक असे समष्टि मनही ठेवले पाहिजे. व्यष्टि मनाची व्याप्ति अत्यल्पच असणार. परतु व्यष्टि मनाच्या अनुभवांवरुन समष्टि मनाबद्दल अनुमान करण्यास मुळींच हरकत नाही. आपले व्यष्टिज्ञान समष्टिज्ञानाच्या अपेक्षेने जरी मर्यादित दिसले, तरी तत्वतः ते भिन्न, विभागलेले अथवा मर्यादित नाहीं. तो केवळ ज्ञानाच्या व्यक्तेत फरक दिसतो इतकेच. व्यक्तीचे विस्मरण, निद्रा किंवा अज्ञान अशा प्रतिबंधामुळे कोणतेही पदार्थ त्या व्यक्तीस अज्ञात असले, तरी त्या पदार्थांच्या अस्तित्वाचा सामान्य जाणिवेशी असलेला सापेक्ष संबध नित्य अबाधितच असतो. अशा सामान्य जाणिवेच्या अथवा व्यापक मनाच्या बाहेर सृष्टपदार्थ कधींच असू शकत नाहीत. तसेच ते थोरले मनही निर्विषय असें कधींच असत नाही. कोणी कल्पनावादी असे म्हणतात कीं, आपल्या मनाचे सकल्प आपल्या मनाबाहेर जाऊन जगरूपाने प्रत्यक्ष दिसतात, असे नसून, बाह्य म्हणून दिसणारे जे सारे जग ते आहे तेथेच व तसेच असून, फक्त त्यास व्यापक मनाने आच्छादले किंवा व्यापले आहे. त्या मनाच्या व्याप्तीबाहेर जग नाहीं, इतकेच जाणावें. तात्पर्य, नामरूपात्मक असे असंख्य विविध पदार्थ जे दिसतात, ते सर्व तसेच आहेत, असे मानून त्यावर ब्राह्मांचें इतकेच म्हणणे दिसते कीं, हे सारे विश्वात्म जादुगाराच्या पोतडीत नित्यसिद्धच आहेत. त्यांत भ्रांतिकृत चमत्कार वस्तुतः काहींच नाही. दोरी आणि साप ह्या दोन्ही वस्तु त्याच्याच पोतडींतल्या आहेत व त्या भिन्नच आहेत. ह्यावरून असे सिद्ध होते कीं, (१) प्रत्यगात्मा सर्व जगाचा आधार आहे. (२) प्रत्यगात्मा हा अद्वितीय आहे. (३) त्याचे यथार्थ ज्ञान झाल्याने साऱ्या दृश्य जगाचा निरास होतो. (४) व एकमेवाद्वितीयं असा एक आत्माच राहातो. हे वेदान्ताचे अद्वैत सिद्धान्त साधारणब्राह्मांस खरोखर मान्य नाहींत. असें असतां एकमेवाद्वितीयं हा सिद्धांत आम्ही आदर्शवत् मानतों, असे ते कसें म्हणतात, ते सांगणे कठीणच आहे. विलायतेहून आणलेल्या मडमेस आपली अर्धांगी करून, तिला पुराणोक्त सावित्री असे गोडसे नांव द्यावें, तसलाच हा प्रकार दिसतो. असो.

जगांतील द्वैत ही सारी माया आहे, असे जेव्हां वेदान्ती बोलतात, तेव्हां

ब्राह्मांस त्यांची मोठी चीड येते. आणि मग वड्याचें तेल वांग्यावर या न्यायानें मध्ययुगीन ब्राह्मणवर्गावर निष्कारण यथेच्छ तोंडसुख घेऊन, आणि मायावादाचीं खुळें तशींच गळीं उतरण्याचा काळ आतां राहिला नाहीं, हें बौद्धिक युग आहे, असा पांडित्याचा आविर्भाव आणून, द्वैतांतील अद्वैत सिद्ध करण्याकरितां भौतिक शास्त्राच्या आधारावर ते जे युक्तिवादाचें मोठें अवडंबर घालतात, तेंही मुद्दाम तपशीलवार पहाण्यासारखें आहे.

विवर्तवादाची यक्षिणीची कांडी फिरवून आणि तत्त्वमसीचा छूः मंतर करून जगाचा निरास करणाऱ्या वैदिक महामांत्रिकाचा खेळ न कळल्यामुळे त्याचा उपहास करून युक्तिवादाच्या प्रशस्त मेजावर अनेक तर्कांचीं शास्त्रीय उपकरणीं मांडून द्वैताद्वैताचे अपूर्व प्रयोग दाखविण्याचे जे प्रयत्न आधुनिक पंडित करतात, तेही जिज्ञासूंनी लक्षपूर्वक पहाणे जरूर आहे. जगांतील द्वैत न मोडतां ते अद्वैत कसे सिद्ध करतात तें पहा, व ते डोळस श्रद्धेनें पहा, असें त्यांचे वारंवार सांगणे आहे. प्रथम पदार्थविज्ञानासंबंधींच आपण त्यांचा विचार पाहू. पदार्थाची व्याप्ति ( म्हणजे पदार्थानें अडविलेला आकाशाचा भाग ) हा त्याचा सर्वसाधारण गुण आहे. पदार्थाचे शब्द, स्पर्श, रूपरसगंधादि गुण कसेही असोत, त्या सर्व गुणांस आश्रयभूत असा त्या पदार्थाचा व्याप्ति हा गुण असतो. व्याप्तीस दुसऱ्या कोणत्याही विवक्षित गुणांची आवश्यकता असते असे नाहीं. पण वरील प्रत्येक गुणास व्याप्तीची आवश्यकता आहेच. पदार्थाचे रूपरंगस्पर्शादि गुणांत वाटेल तो बदल अगर त्यांचा नाश आपल्या कल्पनेस संभवेल; पण त्या पदार्थानें व्यापलेला अवकाश नाश पावला, अशी कल्पनाही संभवत नाही. त्याचबरोबर हेंही लक्षांत घेतलें पाहिजे कीं, रंग, रूप, आकारादि कोणत्याही गुणांविरहित अशा व्याप्तीची अगर अवकाशाचीही कल्पना संभवत नाहीं. तात्पर्य, पदार्थाच्या गुणांच्या ज्ञानाशीं त्या पदार्थाच्या व्याप्तीच्या ज्ञानाचा अगदीं निगडित संबंध आहे, इतकेंच नव्हे तर जे पदार्थ आपल्याला पूर्णपणें अज्ञात आहेत, म्हणजे ज्यांचे कोणतेही गुणधर्म आपल्याला ठाऊक नाहींत, त्या अज्ञात पदार्थासही व्याप्ति ही असलीच पाहिजे, असें निश्चित ज्ञान आपल्याला असतें. लांबी, रुंदी आणि जाडी अगर खोली हीं व्याप्तीचीं तीन प्रमाणें आपल्या माहितीच्या बाहेरच्या पदार्थासही लावतां आलींच पाहिजेत, असें आपण जें निश्चित समजतों, त्याचें

कारण व्याप्ति हा जाणिवेंतीलच एक प्रकार आहे, हे उघड आहे. व्याप्तीस ज्ञानाचा एक प्रकार म्हटले, तरी व्याप्ति म्हणजे इतर पदार्थांप्रमाणें एक स्वतंत्र पदार्थ आहे असे नाहीं, तर तो पदार्थविज्ञानाचा म्हणजे विषय-ग्रहणक्रियेचा एक आवश्यक भाग आहे, इतकेंच. एखाद्या चौकटी आंखले-ल्या कागदाप्रमाणे पदार्थाचे असंख्य विभाग कल्पितां येतील, तो प्रत्येक विभाग ज्ञेयरूप म्हणजे आपल्या ज्ञानाचाच विषय होईल. अर्थात् त्या असंख्य विभागांचे एकीकरण त्या ज्ञानानें केले, म्हणूनच त्या सबंध पदार्था-ची एक व्याप्ति किंवा आकृति सिद्ध झाली. पदार्थाचे भिन्न भिन्न व स्वतंत्र तुकडे करतां येतील; पण त्या पदार्थाच्या व्याप्तीचे अथवा त्या मूळच्या पदार्थाने व्यापलेल्या अवकाशाचे वेगवेगळाले अलग तुकडे करतां येणार नाहींत. कारण एकीकरण—असख्य विभागाचे एकीकरण—हेच व्याप्तीचे स्वरूप आहे. ते एकीकरण कालाधीन नाही. म्हणजे व्याप्तीच्या विभागाचे पूर्वी एकीकरण नव्हते, ते केव्हांतरी मागून झाले, असे म्हणतां येत नाहीं. किंबहुना विभागाची कल्पनाच ऐक्य करणाऱ्या व्याप्तीवांचून संभवत नाहीं. अशा रीतीनें सूक्ष्म परिमाणु व स्थूल पदार्थ यांचा सग्रह करणारी व त्यांचे एकीकरण करणारी ही व्याप्ति, अवकाश, अथवा आकाश, अखंड, अनंत, व अनादि आहे. पण ती व्याप्ति अथवा आकाश, हा काही एक स्वतंत्र पदार्थ नसून व्यापक जाणिवेच्या एकीकरणाचाच एक प्रकार आहे. जाणिवेबाहेर व्याप्तीस किंवा आकाशास अस्तित्वच नाही.

आतां पदार्थाचा आकार किंवा त्याची व्याप्ति हा जसा आपल्या जाणिवे-चाच एक प्रकार आहे, त्याचप्रमाणे पदार्थांचे रग, स्पर्श, गंध, इत्यादि जे अधिक स्पष्ट गुण आपल्या अनुभवास येतात, तेही आपल्या जाणिवेवरच अवलंबून आहेत, ते बाह्य विषय नाहींत. जशी दुःख ही एक जीवाची संवेदना आहे, आपल्या जाणिवेला सोडून बाहेर स्वतंत्र असणारा असा तो पदार्थ नाहीं, तसेंच जे आपण पदार्थांचे निरनिराळे गुण म्हणून म्हणतो, ते आपल्याच इंद्रियांच्या संवेदनांचे प्रकार आहेत. उदाहरणार्थ, रंग हा दृष्टीचा विषय आहे. अर्थात् दृष्टिच नसेल किंवा द्रष्टाच नसेल तर रंग हा पदार्थच संभवत नाहीं. आतां रंगासारखा बाह्य पदार्थास व्यापून राहणारा व तसा प्रत्यक्ष बाहेर दिसणारा गुण हा केवळ मनोमय आहे, असे म्हणणे कोणास

चमत्कारिक वाटेल. परंतु ( रंगाची ) व्याप्ति हा एक स्वतंत्र बाह्य पदार्थ नसून तो एक एकीकरण करणाऱ्या जाणिवेचाच प्रकार आहे, असें आपण ठरविलेंच आहे. दुसरी अशी शंका कोणी घेतील कीं, आपल्या वेदना आपल्यालाच होतात, त्या दुसऱ्याला होत नाहींत. म्हणून त्या आपल्या जाणिवेवरच अवलंबून आहेत, असे म्हणतां येईल, पण पदार्थांचें रूप आपल्याप्रमाणे इतरांसही सामान्यतः एकसारखेच प्रतीत होते, त्यास व्यक्तीच्या इंद्रियविज्ञानाचाच एक प्रकार असे कसे म्हणावे ! अशी शंका येईल, परंतु ती व्यर्थ आहे. कारण एकच रूप सर्वांना दिसते, असे जे आपल्याला वाटते, तो भ्रम आहे. सर्वांनाच काय, पण आपल्याच दोन डोळ्यांना पदार्थाचें एकच रूप दिसत नसून दोन रूपे दिसतात. ती सारखींच दिसतात व आपले डोळे एका रेषेत आहेत, यामुळे तीं एकरूप वाटतात. एका डोळ्याने तिरवे पाहिले, किंवा एक डोळा मिटून व दुसऱ्या डोळयाच्याखाली बोट घालून बुबुळ फिरविला, तर एकाचे दोन पदार्थ दिसणे, किंवा पदार्थ फिरतो आहे, असे वाटणे वगैरे प्रकार होतात. काविळीने पदार्थ पिवळा दिसणे, किंवा पित्तविकाराने निरनिराळे आकार भासणे, दोरीवर साप भासणे, अरण्यांत मृगजल दिसणे, ढग धांवतांना चंद्र फिरतोसा वाटणे, उदबत्ती फिरवली तर अग्निवर्तुळ दिसणें, समांतर रस्ता दुरून निमूळता होत गेलेला दिसणे, परातींतील पाण्यांत प्रतिबिंबित चांदण्या खोल अंतरावर आहेतसे दिसणे, कागदावरील चित्रांत जाडी किंवा खोली दिसणें, वगैरे हे सर्व दृष्टिभ्रम आहेत.

पदार्थांचे बाह्यस्वरूप हे जर स्वतंत्र व स्वयंसिद्ध मानले, तर डोळयांत अंगुली घातली असतां एकाचे दोन चंद्र दिसतात, त्या वेळीं त्यांपैकीं खरा कोणता मानावयाचा, हे ठरवितां येत नाहीं. तसेच तीक्ष्ण दृष्टि, मंद दृष्टि, दूरपणा, जवळपणा, मंद प्रकाश, प्रखर प्रकाश, नुसते पहाणे व दुर्बिणीतून किंवा सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पहाणे, इत्यादि पहाण्याच्या परिस्थितींत व उपकरणांत फरक पडेल, त्याप्रमाणे पदार्थाचे आकार व रंग यांत फरक दिसतो. तेव्हां त्यांपैकीं खरें कोणतें व खोटें कोणते ? तसेच रूप रंग खोटे का दिसेनात, पिवळा रंग वस्तुतः नसून जर कावीळ झालेल्या दृष्टीला भासतो, तर पांढरा रंग तरी दिसतो, तो बाहेर नसून ती अंतःसंवेदनाच नाहीं कशावरून ? सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिलेला आकारच जर खरा मानावा, तर नुसत्या डोळ्यानें पाहिले-

ळा आकार कोणाचा ? तो आला कोठून ? तात्पर्य, त्यांपैकीं कोणताही एक जर कोठें बाहेर नसून आंतील इंद्रियसंवेदनेचाच परिणाम असेल, तर दोन्हीही प्रत्यय एकाच जातीचे असल्यामुळे दोन्ही प्रकार केवळ इंद्रियविज्ञानाचेच कां मानूं नयेत ?

चक्षुर्वैसत्यं हा इंद्रियविज्ञानाचा सिद्धान्तनिरपवाद खोटा आहे, हे सुज्ञांस सांगावयास नकोच. परंतु सृष्ट पदार्थांच्या सत्यतेबद्दल ग्वाही देणाऱ्या इंद्रियांत डोळे हेच महत्त्वाचे साक्षीदार आहेत. कारण, आपल्या जगिक ज्ञानापैकीं ९⁄₁₀ ज्ञान आपणांस डोळ्यांकडून मिळते. यास्तव त्यांची साक्ष कशी घादांत खोटी आहे, हे एकदां निश्चित कळले, म्हणजे अनभिज्ञांसही इतर इंद्रियांच्या ज्ञानाबद्दल विशेष विस्तारपूर्वक सांगावयास नको. म्हणून दृष्टिभ्रमाबद्दल थोडासा अधिक विचार करूं.

पदार्थांच्या रूपदर्शनाला सत्यता केवळ नेत्रेंद्रियामुळेच येते. रूपदर्शन खरें कीं खोटें, हे इतर इंद्रियांस ठरविता येत नाहीं. म्हणजे एकाच पदार्थाचे प्रत्येक इंद्रिय आपल्या संवेदनेप्रमाणे अगदीं भिन्न वर्णन देते. त्यास दुसऱ्या इंद्रियाकडून पडताळाही मिळत नाहीं. आतां नेत्रेंद्रिय व स्पर्शेंद्रिय यांचा असा पडताळा आहेसा वाटतो. कां कीं, एका इंद्रियाच्या ज्ञानाने दुसऱ्या इंद्रियाचे ज्ञान आपण अनुमित करतो. आंधळा मनुष्य स्पर्शेंद्रियाने आकाराचा निश्चय करतो, व पदार्थाचा स्पर्श गुळगुळीत किंवा खडबडीत लागेल, किंवा तापून लाल झालेला धातूचा तुकडा हात भाजील. हे अनुमान आपण स्पर्श न करतां नजरेनेच करतो. अशा रीतीने ही दोन्ही इंद्रिये जरी एकमेकांचा पुरावा करीत असलीं, तरी त्या दोघांच्या साक्षी एकाच अनुभवाच्या नसून, एक इंद्रियज्ञान तर दुसरे केवळ अनुमान असा त्यांत फरक आहे.

पदार्थांचे रूप केवळ मनोमय नसून ते मनाच्या बाहेर आहे. अशी जी आपली निश्चित बुद्धि असते, ह्याचे एक बलवत्तर कारण असे आहे की, पदार्थ आपल्या नजरेच्या बाहेर कांहीं अंतरावर आहेत, असे आपण प्रत्यक्ष पहातोसे दिसते, परंतु हाही भ्रमच आहे. वस्तुतः आपणांस जे रूप दिसत असतें, ते आपल्याच डोळ्याच्या बाहुल्यांवरील उमटलेले पदार्थाचे चित्र होय. ज्यांच्या डोळ्यांच्या बाहुल्यांवर हे चित्र उमटत नाहीं, त्यांना पदार्थांचे रूप नसल्याप्रमाणेच आहे. पदार्थ आपणापासून निरनिराळ्या अंतरावर आहेत,

असें जें आपल्याला वाटतें, तें अनुमानानें आपण ठरविलेले अडाखे आहेत. आंधळयास एकाएकीं दृष्टि आली असतां, त्याला सर्व पदार्थ एकाच पातळीत डोळयाला लागून आहेत असे दिसते. अगदीं लहान मूल प्रथमदर्शनी चंद्रादि दूरचे पदार्थ घेण्यास पाहते. याचें कारण ते त्याच्या डोळ्यास लागून आहेत, असे त्यास त्यावेळीं वाटत असते.

वस्तुतः अंतर म्हणजे तरी काय? दृष्टीपासून दृश्य पदार्थापर्यंत गेलेली जी काल्पनिक अगदीं सरळ रेषा तिच्या लांबीसच त्या पदार्थामधील अंतर म्हणतां येईल. परंतु ह्या काल्पनिक रेषेच्या ऐवजी आपण जर एखादी अगदीं सरळ काठी तो पदार्थ व आपले डोळे यांचेमध्ये धरली, तर ती अंतर दाखविणारी मधली काठी कितीही लांब असली, तरी त्या काठीची सर्व लांबी आपल्याला दिसणारच नाही. फक्त डोळयांजवळचें टोक तेवढेच दिसेल. त्याचप्रमाणे पदार्थाचे प्रकाशकिरण अगदी सरळ रेषेने डोळ्यांत येत असतील तर त्या सरळ किरणांच्या रेषेवरून तो पदार्थ अमुक अंतरावर नेत्राबाहेर आहे, असा दृष्टीला अंदाज होणे अशक्य असते. परंतु दृष्टीचा विषय असलेल्या पदार्थाचा स्पर्श होण्यास किती पुढे जावें लागेल, याबद्दल नेहमींच्या अनुभवाने आपणांस अनुमान करता येते. शिवाय सभोंवारच्या पदार्थांचे दिसणारे रंग व आकार यांच्या फरकांवरूनही, आपण त्यांच्यामधील अंतर सापेक्षतेने ठरवूं पाहतो. हा सर्व विश्वगोल ईश्वराने मोहरीच्या आकाराइतका सूक्ष्म केला, तरी आंतील सापेक्षता कायम राहिल्यामुळे जीवास कांहींच फरक झाल्यासारखा वाटणार नाहीं! ह्याप्रमाणे अंतराचे ज्ञान सापेक्ष आहे. तसेंच ते वस्तुतः परोक्ष व अनुमानिक असून दृढाभ्यासाने ते आपणांस प्रत्यक्ष वाटते. तेव्हां जे आपणांस दूर दिसते तें दृष्टीला दूर नसून स्पर्शाला दूर असते. तसेंच डोळ्याच्या बाहुलीवर उमटलेली पदार्थांची प्रतिमाच वास्तविक आपल्याला दिसत असतां, डोंगरासारख्या पदार्थाचे फार मोठे आकार आपण पहातो, असें आपणांस वाटतें, तेही केवळ परंपरेनें व दृढाभ्यासानें अनुमित होत असलेले पदार्थाचें सापेक्ष ज्ञान आहे.

या दृष्टिभ्रमाप्रमाणेच स्पर्शज्ञानाचाही प्रकार आहे. थंड, उष्ण, मऊ, कठीण हे पदार्थांचे भासणारे गुण कोठें बाहेर स्वतंत्र नसून, त्या केवळ भिन्न भिन्न इंद्रियसंवेदना आहेत. म्हणजे ते सारे विषय मनोमयच आहेत. कारण,

थंडपणा, उष्णता, मऊपणा, काठिण्य हे जर स्वतंत्र बाह्य विषय असते, तर ते सदा सर्वांना निश्चयेकरून सारखेच प्रतीत झाले असते; परंतु ते तसे होत नाहींत. तर एकाच पदार्थाबद्दल प्रकृतिभेदानें प्रत्येकाची इंद्रियसवेदना भिन्न होते. श्रीमंत नाजूक मनुष्यास जे कठीण व खरखरीत भासेल, ते गरीब राकट माणसास तसे वाटणार नाही, इतकेंच काय; पण एकाच मनुष्यानें आपले दोन हात कढत व थंड पाण्यांत बुडवून थोड्या वेळानें दोन्ही हात कोमट पाण्यांत घातल्यास तेंच पाणी एका हातास गार तर दुसऱ्या हातास गरम लागेल. यावरून हें उघड होते कीं, थंडपणा, उष्णता, मृदुपणा, काठिण्य हे स्वतंत्र बाह्य विषय नसून, ह्या मनास होणाऱ्या संवेदना आहेत. एखादा बर्फाचा खडा आपण हातांत घेतो, तेव्हां हाताला जड व गार लागतोसा वाटतो; पण तो भ्रम आहे. वास्तविक "गार" ही कल्पना हातांतील नव्हे, ती मनांतील आहे. तसेंच जडत्व वस्तूत नसून ते पृथ्वीच्या आकर्षणामुळें वस्तूंत आहेसें वाटते. ह्या अध्यासाची याहूनहीं विलक्षण उदाहरणे आढळतात. एकाच्या पायास रोग झाला म्हणून गुडघ्यापासून खाली तोडला. शुद्धीवर आल्यावर त्यांस कोठे वेदना होतात, म्हणून विचारतां पायाचे बोटांत होतात असेंच तो म्हणे. दुसऱ्या एकाचें नाक कापलें व त्यावर कपाळाची कातडी काढून लावली. मग नाकास स्पर्श केला, तरी कपाळास केला, असे त्यास वाटे!

याचप्रमाणे घ्राणेंद्रियाचीही गोष्ट आहे. पदार्थाचे सूक्ष्म परिमाणु घ्राणेंद्रियास जाऊन लागतात, तेव्हां इंद्रियसंवेदना होते. अर्थात् ती प्रत्येक व्यक्तीची भिन्न असणार. त्या संवेदनेव्यतिरिक्त घाण अगर वास हा बाह्य पदार्थच संभवत नाहीं. तो केवळ इंद्रियसंवेदनेचा मनावरील परिणाम आहे. एकदां एक कोळीण एका माळणीकडे पाहुणी गेली. तेव्हां तेथील सुवासिक वासानें तिचें डोकें इतकें उठलें कीं, तिला झोप येईना. तेव्हा तिनें आपली मासळीची रिकामी टोपली पाण्यांत भिजवून ओली केली, आणि तो मासळीचा दर्प जेव्हां सुरू झाला, तेव्हा ती सुखानें निजली! जनावराना माणसांचा वास येतो, इतकें त्यांचें घ्राणेंद्रिय तीक्ष्ण असते, परंतु त्यांस नरकाची घाण येत नाही. तेव्हां सुगंध किंवा दुर्गंध हे घ्राणेंद्रियाचे स्वतंत्र बाह्य विषय नसून त्या अंतरांतील अनुकूलप्रतिकूल संवेदना आहेत. रुचि हा

पदार्थही बाहेरचा नसून रसनेंद्रियाचें एक विज्ञान आहे. प्रकृतिभेदानें रुचीं-ची प्रतीति भिन्न येते. सुग्रास अन्नही ज्वरितास कडू लागते. ध्वनि अथवा शब्द हाही स्वतंत्र बाह्य विषय नसून कर्णेंद्रियांवर होणारा तो एक परिणाम आहे. ध्वनीच्या लाटा बाहेर हवेत उत्पन्न होतात, असे शास्त्रज्ञ सिद्ध कर-तात; परंतु त्या लाटा म्हणजे कांही ध्वनि नव्हे. जर कोणी ऐकणाराचनसेल किंवा कोणास कर्णेंद्रियच नसेल, तर ध्वनि ही कल्पनाच संभवणार नाहीं. अर्थात् त्या बाहेरच्या लाटांच्या संवेदना मनाकडे पोचतील, तेव्हांच त्यास ध्वनि असे रूप येतें. तेव्हां हे रूप बाहेरचे नसून आंतलेच आहे, हे उघड आहे. ध्वनि हा स्वतंत्र बाह्य विषय असता व त्याचा इंद्रियांच्या जाणिवेशी कांहींच संबंध नसता, तर तोफेचा आवाज जवळच्यास कठोर व दूरच्यास अस्पष्ट असा कां प्रतीत होता ? त्यांपैकी कोणाचे ज्ञान खरे म्हणावें व दुसऱ्याचे तरी खोटे कसे मानावे ? बरे, ध्वनि हा बाह्य विषय जर स्वतंत्र व एकच आहे, तर अशा भिन्न प्रतीति दोन्ही कशा खऱ्या मानाव्या ? तेव्हां हेच खरे कीं, ध्वनि हा स्वतंत्र असा बाह्य विषयच नाही. याप्रमाणे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे जे पदार्थांचे गुण मानतात, व ज्या गुणसमुदायाच्या अस्तित्वामुळें पदार्थांची बाह्य सत्ता खरी मानली जाते, ते गुण वस्तुतः मनाव्यतिरिक्त बाह्य विषय नसून आपल्या जाणिवेच्या आश्रयाने अतरांत होणाऱ्या संवेदना-च आहेत. अर्थात् अखिल जड सृष्टीचे ज्ञान आपल्याला कोठे मनाबाहेर पैदा होत नसून, सारा अनुभव व प्रतीति अंतरांतच आहे, हे उघड झाले.

विषयग्रहण-क्रियेत ज्या निरनिराळ्या इंद्रियसंवेदना आपल्या मनावर उमटतात, त्या संवेदनासमुच्चयासच आपण पदार्थ समजतों. पण वास्तविक त्या भिन्न संवेदना उत्पन्न करण्यास जी बाह्य वस्तु कारण झाली, ती आपण जाणतच नाहीं. कारण त्या बाह्य अधिष्ठानभूत वस्तूचे ज्ञान केवळ शब्द-स्पर्शादि कांहीं विवक्षित गुणरूपापुरतेंच आपल्याला होणें शक्य आहे. पण आपलीं इंद्रियें अल्पज्ञ व यथार्थ ज्ञानाविषयी असमर्थ असल्यामुळें बाह्य वस्तूचें पूर्ण ज्ञान कधींच होणे शक्य नाहीं. निसर्गवाद्यांच्या म्हणण्याप्रमाणें, प्रत्येक पदार्थास आधारभूत असलेली एक जड व अज्ञेय वस्तु अथवा तत्त्व बाहेर अपरंपार असतांना अद्वैत कसे सिद्ध व्हावें, हा प्रश्न उपस्थित होतो. त्यास ब्राह्म असें उत्तर देतात कीं, (१) अशा सर्वथा अज्ञेय व अनिर्वचनीय

वस्तूचें अस्तित्वच मानतां येत नाहीं. (२) माझी संवेदना म्हणजे मी+संवेदना. ती संवेदना मला आत्म्याला सोडून कशी असणार ? आणि संवेदनेसह आत्म्याचे कारण बाह्य जड तत्त्व कसे असेल ? (३) जे तत्त्व बाह्य अंतरावर आहे ते अंतस्थ मनावर परिणाम कसा करील ? (४) कार्य आणि कारण दोन्ही ज्ञेय असतात, तेव्हांच कार्यकारणभाव सिद्ध होतो. अर्थात् संवेदना-कार्याचे कारण अज्ञेय असणार नाहीं. (६) यास्तव बाह्य पदार्थांचे अधिष्ठान 'जाणीव' किंवा मन अथवा आत्मा हेच असले पाहिजे. तात्पर्य, पदार्थांचा गुणसमुदाय ज्या अधिष्ठानावर असतो, ते अधिष्ठान व आपले मन ( आत्मा ) तत्त्वतः एकरूप असल्यामुळे पदार्थांच्या व्याप्तीने केलेले गुणसमुदाय चे एकीकरण व आपल्या मनाने केलेले तज्जन्य सवेदनांचे एकीकरण यांचा पडताळा जमून जँगिक व्यवहारांत सुसंगतपणा राहतो.

हें शेवटचे तात्पर्य कांहीं अपसिद्धान्त सोडून वेदांत प्रक्रियेशीं बरेच जुळते आहे, यांत शंका नाहीं. आतां अजातवादाप्रमाणे जगत् झालेच नाहीं, असे मानतात. दृष्टि सृष्टिवादाप्रमाणें जगताला आधार व अधिष्ठान आत्माच आहे असे म्हणतात. कोणी असें म्हणतात की, बाह्य विषयज्ञानांत अतःकरण-वृत्ति आभासासह बाह्य विषयापर्यंत जाऊन ती त्यास व्यापते व त्यातील वृत्त्यंश अज्ञानावरण दूर करतो, व आभास बाह्य विषयाचे प्रकाशन करतो. असा वेदान्तमतांत सूक्ष्म भेद असला, तरी स्थूलमानाने पाहतां पदार्थज्ञान म्हणजे वृत्तिज्ञान असेच वेदान्तमत आहे. कित्येक भौतिकशास्त्रज्ञ असे सिद्ध करतात, कीं ज्ञान हे बाह्य पदार्थांवर मुळींच अवलंबून नाहीं. बाह्य पदार्थ कांहींच नसतां नेत्रेंद्रियाच्या व कर्णेंद्रियाच्या ज्ञानतंतूंच्या ठिकाणी कृत्रिम आंदोलने उत्पन्न केलीं, तर प्रकाश व ध्वनि यांचे ज्ञान उत्पन्न होते. तसेच उलट प्रकाश व ध्वनि यांचीं बाह्य आंदोलने प्रमाणाबाहेर जास्त वेगाने झाल्यास त्यांचें ज्ञान होत नाहीं. अशा रीतीने ज्ञानतंतूंच्या विवक्षित आंदोलनांतच सर्व विषयज्ञानाचें वर्गीकरण होते. उदाहरणार्थ, आपले नेत्रतंतु व कर्णतंतु ह्यांनीं आपलीं स्थानें बदललीं, तर बाह्यप्रकाश(ध्वनिरूप) ऐकूं येईल व गाणे(प्रकाशरूप) दिसूं लागेल ! याप्रमाणे सर्व विषयांचा बाजार मनांतच असून इंद्रियांस संवेदना करणारा बाह्य पदार्थ केवळ ईशेच्छा होय, असें कोणी मानतात.

पण द्वैत आणि अद्वैत यांचा मिलाफ करण्याच्या हेतूनें कित्येक ब्राह्म कल्पना-

वादी असा युक्तिवाद करतात कीं, पदार्थ केवळ मनाच्या कल्पनेचेच प्रकार नव्हत. तसेच पदार्थांचे सगुण चित्र मनोमय असून तशा भिन्न संवेदनांना प्रेरक असे प्राथमिक धर्म मात्र बाह्य वस्तूंत आहेत, असेही नव्हे. तर द्वैती म्हणतात त्याप्रमाणे पदार्थांचे शब्दस्पर्शादि दुय्यम गुण व इंद्रियसंवेदनाप्रेरक प्राथमिक गुण, हे दोन्ही बाह्य पदार्थांच्याच ठिकाणीं आहेत. इतकेच नव्हे तर कवि व चित्रकार त्यास प्रतीत होणारें सौंदर्य किंवा मधुरभाव हा एक तिसराही गुण बाह्य पदार्थांच्या ठिकाणीच आहे. अशा रीतीनें गुणवान् पदार्थांचे बाह्य अस्तित्व कबूल करून ते पुढे द्वैत्यांस असे सांगतात की, पदार्थांचे हे गुणालंकार अनुभवणारें मनही आणखी ह्या पदार्थांच्या अंतर्गत माना, अशीं असंख्य ज्ञाताज्ञेयरूप मनें ज्या अधिष्ठानावर व्यक्त होतात, तोच सर्वज्ञ परमात्मा होय. त्याच्या ठिकाणी ह्या सर्व पदार्थांतर्गत मनाचें एकीकरण होतें. तात्पर्य, विश्वात्मा केवळ नामरूपात्मक विश्वरूपांनीं व्यक्त झाला असे नव्हे, तर निरनिराळ्या पदार्थांत असलेले मन अथवा अहंकार हेही त्याचे ठिकाणींच व्यक्त झाले आहेत. व्यक्त असणे हाच परमात्म्याचा स्वभाव आहे. परमात्मा आणि तो अव्यक्त, ही कल्पना असंबद्ध आहे. प्रकाश हाच त्याचा अखंडित धर्म आहे. त्या प्रकाशांत जड सृष्टि व अध्यात्म सृष्टि अशा भेदास जागा नाहीं. जी जड सृष्टि आपण म्हणतो ती मनाच्या दृष्टीनें मनोमयच आहे. तसेच जी सृष्टि आज आपल्याला इंद्रियगोचर किंवा मनोवेद्य आहे, तेवढेच त्या परमात्म्याचे स्वरूप व्यक्त आहे असे मानण्याचेंही कारण नाही. एखाद्या विस्तृत ग्रंथांतील एखादे तुटक अवतरण वाचावें, त्याप्रमाणे दृश्य जग हे परमात्म-ग्रंथांतील एक लहानसें तुटक अवतरण आहे.

तात्पर्य, कल्पनावाद्यांचा सिद्धान्त असा आहे कीं, जे अनुभवास येतात, ते नामरूपात्मक जग व जीव हे सद्रूप आहेत. ते बाह्य दृष्टीनें जसे भेदरूप आहेत. तसे अंतर्दृष्टीनें मनोमय व एकरूप आहेत. जी सृष्टि आपल्याला जड दिसते तीच विचारपूर्वक पाहिल्यास निर्जीव व जड नाही. ती एका चिद्घन परमात्म्याची जागती चित्कला आहे, तो त्याचा चिद्विलास आहे. असें विचाराअंतीं कळून येईल. असा ज्ञानविलास करणारा तो एक परमपुरुष आहे. ती एक अचिंत्य अशी निर्गुण निरुपाधिक अथवा केवळ काल्पनिक सत्ता नाहीं. तर तो एक सगुण परमात्मा आहे, व नामरूपादि भेदांनीं युक्त

असे जीव आणि जग हे त्याचे स्वगत भेद आहेत. भेदांत अभेद, द्वैतांत अद्वैत तें हें असें आहे. ही केवळ कल्पना नव्हे. हें केवळ ज्ञान नव्हे. हा अनुभव आहे. त्या महानुभवासच भूतांतरात्मा किंवा परमपुरुष असे ब्राह्म मानतात.

पदार्थज्ञानाच्या प्रक्रियेचे ब्राह्मपद्धतीन भौतिकशास्त्रांच्या आधारावर आम्हीं जें वर फार सविस्तर विवेचन केले आहे त्यांत आम्हांस हेच दाखवावयाचें आहे कीं, मायावाद्यांचा विवर्तवाद टाळून व योग्यांच्या प्राणायामापासून समाधीपर्यंतचा दिव्य अनुभव व अतींद्रियवाद यांबद्दल ब्राह्मांनीं तुच्छता दर्शविली पण त्यांत त्यांनीं मुद्द्याची अडचण मुळींच टाळली नसून हा प्राणायाम निंदकांचा एक द्राविडी प्राणायामच झाला. कारण ब्राह्मांनीं इतका सर्व काथ्याकूट केला, पण अनंताच्या ठिकाणीं अंतवंत जीव कसा निर्माण झाला, परमात्म्याच्या ज्ञानवृत्तेतून जीवगत अज्ञान कसें उद्भवले; अविकारी सामान्य सत्तेतून विकारी जग कसे संभवले ? हे सर्व गूढ कधींच न उकलणारे आहे असे म्हणून त्यांस स्वस्थच बसावे लागले. तात्पर्य, ‘माया’ या दोन अक्षरांत जो अर्थ आहे तितकाही सर्व अभिप्राय या विस्तृत विवेचनांत नाहीं, हेच आम्हांस स्पष्ट दाखवावयाचे आहे. असो.

ब्राह्मांच्या ह्या विवेचनावरून ते जीव आणि कूटस्थ, ईश्वर आणि ब्रह्म असे चैतन्याचे चार भेद मानीत नाहीत. मनासच ते आत्मा म्हणतात, असे दिसते. उन्मन स्थितीचा अनुभव त्यांस नसावा असे वाटते. त्यांची विचारसरणी नेति, नेति, अशी व्यतिरेक पद्धतीची नसून अन्वयपूर्वक दिसते. पण ते त्यांचे एकीकरण जीव, जग व ब्रह्म ह्या त्रयीच्या पुढे जाऊंच शकत नाहीं. वस्तुतः नामरूपे व त्यांच्या पांघरुणाखाली असलेले नित्यतत्त्व असे जगांतील वस्तूंचे दोनच वर्ग वेदान्ती मानतात. आणि अविभक्तं विभक्तेषु ह्या एकीकरणाच्या प्रक्रियेने अखेर एक सत्तासामान्यत्व मात्र राहतें, असें ते अनुभवितात. हे सत्तासामान्यत्व ब्राह्मांस अमान्य आहे असे नाहीं. पण नामरूपाचे पांघरूण न काढतांच ते त्या ब्रह्मसत्तेचा अनुभव घेऊं पाहतात. इतकेंच नव्हे, तर सत्तासामान्यत्व ही एक केवळ अस्तिवाचक स्थिति नसून तो अनंतकल्याणगुणवान् व क्रियावान् असा परमपुरुष आहे असे ते मानतात. त्यासच उद्देशून सत्यंज्ञानमनंतं हे त्यांचें दुसरें आदर्शवाक्य आहे. त्याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

---

# प्रकरण पांचवें

# तत्त्वज्ञान (पुढें चालू)

## त्रिगुणांचे प्रकार

साधारण-ब्राह्मांचे दुसरें ब्रीदवाक्य 'सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म' असे आहे. हें वाक्य तैत्तिरीयोपनिषदांत दुसऱ्या अध्यायांतील पहिल्याच अनुवाकांत आहे. जवळजवळ त्याच अर्थाचें "सच्चिदानद" हेंही विशेषण ब्रह्माचे स्वरूप-लक्षण मानतात. पण ह्या स्वरूपलक्षणांत सत्य किंवा सत्, ज्ञान किंवा चित् आणि अनत किंवा आनंद हीं जीं निरनिराळीं पदे आहेत, ते वस्तुतः ब्रह्माचे निरनिराळे गुण नसून अब्रह्मापासून ब्रह्माची व्यावृत्ति करविणारीं अशी ही पदे आहेत. तात्पर्य, ब्रह्म हें त्रिविध नसून एकरस आहे व त्यास वरच्यांपैकी कोणतीच विशेषणें लागत नाहीं. कारण ते निर्गुणच आहे, असा वेदान्ताचा आशय आहे.

परंतु साधारण-ब्राह्मांचें ह्या गुणत्रयाचे रहस्य वरील प्रकारचे नाहीं. या पदांची सापेक्षता जरी त्यांस कबूल आहे, तरी असत्, जड व परिच्छिन्न ह्या गुणांचा निरास करण्याकरितां ही उगाच ब्रह्मबोधार्थ गृहित केलेलीं विशेषणे आहेत, कांट्याने कांटा काढून पुढे दोन्हीही काटे टाकावे, त्याप्रमाणे ह्या विशेषणांच्या सापेक्ष जोड्या ब्रह्मबोधांत ग्रहण करावयाच्या नसून अखेर सोडावयाच्या आहेत, असे मानण्यास ब्राह्म तयार नाहींत. पूर्वपक्ष, उत्तरपक्ष आणि दोहोंचा समन्वय; ऐक्य, भेद आणि भेदाभेद; जड, जीव आणि जाणीव; पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा; अशी कल्पनावाद्यांची विचार-सरणी आहे. ह्या विचारसरणींत तिन्ही पदे सत्य मानून समन्वयाचा प्रयत्न केलेला आहे, तो वेदान्तास संमत नाहीं. गेल्या सालच्या (१९२६) तत्त्व-वेत्त्यांच्या सभेच्या अध्यक्षांनीं तर ही ब्राह्मकल्पनावाद्यांची भूमिका मागें एके ठिकाणीं दर्शविल्याप्रमाणें अधिक स्पष्ट केली आहे. त्यांच्या म्हणण्या-प्रमाणें बाह्य पदार्थांचे ठिकाणीं त्यांचें गुणात्मक असणें हा सत् गुण, इंद्रिय-

संवेदनांस प्रेरक होणे हा चित् गुण, आणि चित्रकार व कवि यांस स्पष्ट प्रतीत होणे, हा आनंद गुण. ह्या त्रिगुणांस:आणखी " मनोब्रह्मेतिव्यजानात् " ह्या श्रुतीप्रमाणें मनाची जोड मानली, म्हणजे ज्यांस वेदान्ती अब्रह्म म्हणतात, त्या बाह्यपदार्थांसही सच्चिदानंदब्रह्म असेच म्हणावे लागेल. अर्थात् हा ब्राह्मांच्या दृष्टीनें विचार झाला. वेदान्ती जे विद्यारण्यस्वामी, त्यानी असे म्हटलें आहे कीं:—

सच्चित्सुखात्मकं ब्रह्म नामरूपात्मक जगत्. ॥ —पंचदशी, १३।६२
निस्तत्ये नामरूपे द्वे जन्मनाशयुते च ते ॥ —पचदशी, १३।७९

वेदान्त्याच्या मताने जगाचे नामरूप हे मायेचे गुण आहेत, अर्थात् ते मिथ्या आहेत. तेच द्वैतास कारण आहेत. ह्या गुणद्वयापैकी रूप हा गुण अशाश्वत असल्याबद्दल ब्राह्माची खात्री दिसते. पण नामास मात्र ते सोडीत नाहींत. सवेदना ( perception ) आणि कल्पना ( conception ) किवा संकल्प यांतील भेद वेदान्त्यास कळला नाही, असे त्याचे म्हणणे आहे. ते म्हणतात कीं, इंद्रियविज्ञान हे जसे क्षणभगुर आहे, तसे संकल्प नाहींत. संकल्प हे सत्य व नित्य आहेत. तात्पर्य, ब्रह्माचे सकल्पगर्भित सगुण नाम हे ब्राह्मांस अत्यंत प्रिय आहे. ते गैर आहे असे नाहीं. परतु त्यामुळे त्यांची मति सगुणब्रह्मांतच गुंतून ते द्वैतांत अद्वैत सिद्ध न करितां अद्वैतात द्वैत राखण्याचा मोह मात्र त्यास दुर्निवार झाला आहे, हे त्यांच्या पुढील विचारांवरून दिसून येईल. सत्यज्ञानमनत ब्रह्म किंवा सच्चिदानद ब्रह्म ह्या वाक्यांच्या आधारे साधारण ब्राह्मांपैकीं प्रमुख तत्त्ववेत्त्यांच्या विचाराचे, स्पष्टीकरणार्थ, पुन्हा एकदां समालोचन करूं.

ज्ञाता व ज्ञेय यांचे जे एकीकरण त्याचेच नांव ज्ञान होय. या जोडीपैकी कोणत्याही एकाचे अभावी ज्ञान ही कल्पनाच सभवत नाहीं. मुद्द्याची गोष्ट ही कीं, ब्राह्मांच्या या एकीकरणांत ज्ञाता व ज्ञेय हा भेद कायमच राहतो. ज्ञानवत्ता ही एकाजिनसी एकच खरी; परतु ती निरुपाधिक नाहीं. अनेक विषयांना नित्य प्रकाशणारी अशी ती आहे. नित्य जागरूक अशा परमात्म्याच्या ज्ञानवत्तेत अखिल विषय हे जर नित्य सिद्ध नसते, तर जीवाला पूर्वस्मृति अगर अनुभव हीं दोन्ही अशक्यच झालीं असतीं. पूर्ववयांतील असंख्य गोष्टी विस्मृतींत नाहींशा होणे, हाच ज्याचा स्वभाव, तो किंचितज्ज्ञ जीव निद्रा-

वश होऊन अत्यंत कल्पनाशून्य स्थितींत गेल्यावर सुद्धां, पूर्वी ज्ञात असलेल्या अथवा अनुभविलेल्या गोष्टींचे संस्कार त्याच्या रिकाम्या झालेल्या अहंकारांत असतात, असे म्हणणें परस्परविरोधि होईल. पुन्हा जागृतीवर येणें हेंही ज्याच्या इच्छेच्या आधीन नाहीं, शिवाय जेथें देहबुद्धि व मन या दोघांचा लोप होतो, तेथें झोपेतून उठावें, अशी इच्छाही संभवत नाहीं. तसेंच अमुक अनुभवाची अमुक वेळीं स्मृति होणे, अमुक विचार अमुक वेळी मनांत येणें, यांपैकीं कोणतीच गोष्ट ज्याच्या स्वाधीन नाहीं, अशा सर्वतोपरी असमर्थ जीवास वेळोवेळीं पूर्वस्मृति देऊन व जागृत करून, व्यवहारक्षम करणे हें काम जी सत्ता करते, तीच परमात्म्याची अनाद्यनंत ज्ञानवत्ता होय. तिच्या बाहेर कोणताच विषय–स्थूल पदार्थ अथवा मनोमय कल्पना,–कांहींच असणें शक्य नाही. कारण जाणिवेच्या बाहेर विषयाची सिद्धि करणार कोण? आणि तसेंच उलट विषयावांचून जाणीव, ज्ञेयावांचून ज्ञान हे तरी असणार कसे?

पूर्वी सांगितलेच आहे कीं, प्रत्येक विषयग्रहणाच्या क्रियेत जीवात्मा हा ज्ञाता व ज्ञेयरूप असतो. कारण ज्ञेयरूप विषयांसही अधिष्ठान त्याचेच असतें. अशा ह्या आत्म्याचे स्वरूप तत्त्वतः शाश्वत व विभु असेच आहे. व्यष्टिरूपांत त्याचे जे व्यक्तत्व तेच अशाश्वत व परस्पर भिन्न असे भासतें. आतां जड सृष्टि ही जीवात्म्याहून भिन्न असून तिचा जीवात्म्याशीं जेवढा संबंध येतो, तेवढी ती त्यास ज्ञात होते. आणि तो संबंध सुटला, म्हणजे ती पुन्हा अज्ञात होते, अशी जी लौकिकी समजूत आहे, ती चुकीची आहे. ज्ञाता आणि ज्ञेय हीं एकमेकांपासून अलग असून, कांहीं कालमात्र त्यांचा संबंध होतो, अशी वस्तुस्थिति नाहीं. तर परमात्म्याची जी अखंड ज्ञानवत्ता तीच ज्ञाता-ज्ञेय अशी उभयरूप आहे. तीच जीवात्म्याच्या जीवनांत व्यष्टिरूपांत ज्ञाता-ज्ञेयरूपानें व्यक्त होते. आपण ज्यास आपला आत्मा म्हणतो, त्याचे व्यक्तिगत व सर्वगत अशीं दोन रूपें आहेत. तो विज्ञानात्मा आहे; तसाच तो विश्वात्मा आहे. तो जीवात्मा आहे, तसाच तो सर्व भूतांतरात्मा आहे. तत्त्वतः तो एकच आहे. तेव्हां पदार्थ आपल्या जाणिवेच्या कक्षेंत असोत अगर बाहेर असोत, ते सर्वगत असलेल्या व्यापक जाणिवेच्या सत्तेहून बाहेर असणारच नाहींत. अशी ही जाणीवही तत्त्वतः आपल्या आत्म्याचीच असल्यामुळें प्रत्यक्ष इंद्रिय-संवेदनेंतून दूर राहिलेले विषयही आपणांस मनोवेद्य होतात. कारण ते ज्या

ज्ञानवत्तेच्या आधारावर असतात, ती चित्कला एक व अखंड असून ती आपल्या जाणिवेशीं तत्त्वतः एकरूपच आहे. आपण जेव्हां अनंत विश्वाची कल्पना करतो, तेव्हां त्यास आधारभूत असलेल्या विश्वात्म्याचेंही आपणांस चिंतन होते, कारण विषयभूत पदार्थास व्यापावे, हाच आत्मप्रकाशाचा धर्म आहे. आपल्या व्याप्तीच्या कल्पनेत एकीकरणाची व अनंतत्वाची कल्पना जशी अंतर्भूत होते, त्याचप्रमाणे या एक व अनंत अशा अवकाशाच्या कल्पनेत तत्प्रकाशक आत्म्याचे अनंतत्व व एकत्व याचेंही ज्ञान अध्याहृत होतें.

आतां ही ज्ञानवत्ता अनादि व अनंत आहे असे वरती म्हटले. येथें अनादि व अनंत हे शब्द केवळ गौरवपर अथवा वाद खुटविण्याकरितां उपयोजिले, असे नव्हे. वस्तुस्थिति अशीच आहे कीं, ही ज्ञानवत्ता पूर्वी एका कालीं नव्हती व पुढे एका कालीं अस्तित्वांत आली, अशी कालाची कल्पना संभवत नाहीं. वस्तुतः काल हा जाणिवेहून स्वतंत्र पदार्थच नाहीं. जाणिवेच्या बाहेर कालाची कल्पना आपण कशी करणार ? कारण ज्याची कल्पना करावी तो जाणिवेतच आला असे म्हणावे लागेल.

आपण मागे पाहिलेच कीं, दोन पदार्थांमधील अंतरास आपण अवकाश असे म्हणतो. अवकाश ही कल्पना सापेक्ष आहे. अतिशय अंतरावरील अवकाशाच्या काल्पनिक भागांचे एकीकरण करून अखंड एकरूप असणारी जी व्याप्ति तिची कल्पनाही जाणिवेच्या पोटातच येते. जाणिवेचे पोट इतकें मोठे आहे की, तीस व्याप्ति ही उपाधीच लागत नाहीं. निराकाश व निरवयव असे ते आहे. व्याप्तीच्या कल्पनेप्रमाणे आतां आणि मग, पूर्वी आणि नंतर, अशा सापेक्ष कल्पनांतील जे अंतर त्यासच आपण काल म्हणतो. कालाचें अस्तित्वही सापेक्ष आहे, निरपेक्ष नाहीं. कारण कोणत्या तरी घडलेल्या अगर घडणाऱ्या गोष्टींकडे त्याचा संबंध आहे. ह्या घडणाऱ्या गोष्टी कधीं कधीं सूक्ष्म व केवळ मनोवेद्य असतात, तेव्हां त्यांचे आपणांस नेहमीं भान असतेच असे नाहीं. यामुळे आपण जेव्हां आतां किंवा पूर्वी अथवा मग हे शब्द उच्चारतों, त्या वेळीं कोणत्या तरी गोष्टीशीं या शब्दांचा अवश्य संबंध असतोच हें आपल्या लक्षांत येत नाहीं. वस्तुतः कांहीतरी क्रियेवांचून काल संभवत नाहीं. कारण अनंत क्रियांच्या सांखळीनेच काल मापला जातो. त्याचप्रमाणें कालाबाहेर क्रियाही संभवत नाहीं. तसच कोणतीही क्रिया कालाच्या

अगदीं आरंभीं झाली, अथवा अगदीं शेवटीं होईल, असेंही म्हणतां येत नाही. आरंभीं झालेली पहिलीच गोष्ट कोणती म्हणावी कीं, ज्याच्यापूर्वी कांहींच घडलें नाहीं. कारण " ज्याच्यापूर्वी " असें म्हणतांना, त्या गोष्टीच्या पूर्वी काल होता, असें गृहित धरावेंच लागतें. तसेंच कालाच्या अंताचीही कल्पना संभवत नाहीं. आतां काल हा स्वतंत्र पदार्थ नसला, तरी तो ज्या क्रियांवर अवलंबून आहे, त्या क्रियांचें प्रकाशक ज्ञान आहे. अशा रीतीनें अनंत काल ही कल्पनाही ज्ञानाच्याच पोटांत समावत असल्यामुळें ज्ञान ही वस्तु क्षणिक नसून अनंत आहे व ती अखंड आहे. काल आणि व्याप्ति किंवा आकाश हे पदार्थ अनेक गोष्टींनी खंडित झालेले दिसले, तरी ते वस्तुतः अखंडच आहेत. कारण काल आणि व्याप्ति किंवा आकाश यांच्या कोणत्याही दोन काल्पनिक खंडांच्या दरम्यान अनुक्रमें काल आणि आकाश यांहून दुसरें कांहींच असत नाहीं. ह्याप्रमाणें अखंड आणि अनंत असा काल व व्याप्ति यांचें एकीकरण ज्या जाणिवेंत होतें, तीही तशीच असली पाहिजे, हें उघड झालें. कारण असा कोणताही काळ कल्पितां येत नाहीं कीं, ज्या वेळीं क्रिया संभवणार नाहीं. आणि अशी क्रिया किंवा काळ संभवत नाहीं कीं, जो जाणिवेंत येऊं शकणार नाहीं.

संवेदनेचे दोन प्रकार असतात. निरनिराळ्या घडामोडीच्या निरनिराळ्या संवेदना होतात व सर्व घडामोडींचा एकीकरणानें अर्थ करणारी एक ज्ञान-रूप संवेदना असते. जगांत घडणाऱ्या गोष्टी इतक्या सूक्ष्म व जलद घडत आहेत कीं, त्यांस वेगवान् नदीचीही उपमा शोभणार नाहीं. ह्या क्षणींची क्रिया उत्तरक्षणीं रहात नाहीं. कोणतीही वस्तु केव्हांही आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण जो आहे म्हणून मनांत यावें, तिला आहे म्हणावें तों पूर्वक्षणींच तिचें रूपांतर होऊन ती आहे म्हणणें खोटें पडतें. कारण पूर्वक्षणीं पाहिलेली वस्तु उत्तरक्षणीं रहात नाहीं. तींत पालट पडतो. तीच दिव्याची ज्योत दोनदां बोट भाजूं शकत नाहीं. नदींत एक पाऊल टाकावें तों दुसऱ्याच पावलास नदीचें पाणी बदलतें ! तीन वर्षांच्या अवधींत मनुष्याचें शरीर नखशिखांत नवीन बनतें. पूर्वीचीं धिप्पाड शरीरें आज खुरटलीं. पूर्वीच्या नैमिषारण्य-ब्रह्मारण्याचीं आज उद्यानें झालीं ! मध्ययुगीन भारताच्या राजधान्या जमिनींत गडदल्या व एका खारटणावर मुंबई उभारली ! पूर्वी देश होते तेथें

समुद्र झाले व हिमालयाचे पाय धुणारा उपसागर मागे हटला! अशा रीतीनें क्रियात्मक जग क्षणोक्षणीं पालटत असले, तरी अशा असंख्य क्षणिक गोष्टींची माळ गुफून, तिचा इतिहास बनविणारी जाणीव तुटक नसून ती अखंडच आहे. म्हणूनच आपल्याला पूर्वी व नंतर या दोन कालवाचक शब्दांचा संबंध जोडतां येतो. तिन्ही काल या व्यापक जाणिवेत नित्यसिद्धच आहेत. म्हणूनच अत्यंत प्राचीन शोध व भविष्यवाद हेही संभवतात. व्यक्त आणि अव्यक्त, दृश्य आणि अदृश्य, आपल्याला मनोवेद्य अथवा अचिंत्य, अशा असंख्य गोष्टी व्यापक जाणिवेत नित्य सांठविलेल्या आहेत. जीवाचा जन्म व त्याच्या आयुष्याचा शेवट कल्पितां येतो, आणि त्याबरोबर त्याच्या सोपाधिक जाणिवेचाही आरंभ आणि शेवट झालेला दिसतो. परंतु अनंत आणि सनातन अशा ज्ञानवत्तेचा जीवात्मा म्हणून व्यक्त झालेला जो अल्पांश त्याची ही कथा आहे. अर्थात् तो ज्यांतून व्यक्त होतो व ज्यात शक्य तर लीन झालासा वाटतो, ती परमात्म्याची ज्ञानवत्ता पूर्वी व नंतर तशीच कायम असते. जीवाच्या जन्माबरोबर ज्ञान उत्पन्न होत नाहीं व त्याचा कधीं नाशही होत नाहीं. ज्ञानवत्ता सदैव जागरूक आहे. तिला विस्मृति कधींच ठाऊक नाहीं. तसेच तिला अज्ञात असे त्रिकालांत कांहींच नाही.

तात्पर्य, ही ब्रह्माची ज्ञानवत्ता हीच आपल्या जीवनाचें रहस्य आहे. तीच आपल्या सर्व विज्ञानास आधार आहे, ती अनंत प्रकारच्या संवेदनांचे रूप धारण करून आणि त्यांचे एकीकरण करून ह्या आश्चर्यजनक विश्वरूपानें आपल्याला प्रतीत होते, तीच निद्रा व विस्मृति यात आपली इच्छा नसतांही नाहींशी होते आणि तीच पुन्हा जागृति व स्मृति ह्या रूपाने आपण होऊन प्रगट होऊन जीवाच्या जागृतीतील व्यवहाराचे जाळे गुफते. ती आपल्या ठिकाणीं व्यष्टीचा अभिमान उत्पन्न करते व आपल्या जन्माबरोबरच ती उत्पन्न होऊन जीवाच्या जीवनाधीन झाली, असे ती भासविते. परंतु वास्तविक ती स्वतंत्र आहे, ती कधी उत्पन्न झाली नाहीं व कधींही नाश पावत नाहीं. ज्यास आरंभ व शेवट भासतो, ती देहेंद्रियानीं मर्यादित झालेली तदंशभूत जीवाची जाणीव होय. विश्वात्म्याची ज्ञानवत्ता अमर्याद, अनंत व पूर्ण आहे. तिच्यांत नवीन संवेदना उत्पन्न होत नाहीत व पूर्व संवदेनांचा कधीं लयही होत नाहीं. भूतभविष्यवर्तमान ह्या तिन्ही काळीं घडणाऱ्या गोष्टी व उत्पन्न होणाऱ्या असंख्य

कल्पना या ज्ञानवत्तेंत नित्यसिद्धच आहेत. अशी ती ज्ञानवत्ता आपणांस विषयरूप आहे. तसेंच विषय पालटतात, पण ती साक्षीरूपानेही नित्य कायम आहे. ती अविकारी म्हणजे न बदलणारी असली, तरी जीवात्मे व जग तिच्या आधारावरच व्यक्त होतात. त्यांचे अस्तित्व सापेक्ष आहे पण सत्य आहे. मायावादी म्हणतात, त्याप्रमाणे तो भ्रम नव्हे. ब्राह्माचे म्हणणे असे आहे कीं, भ्रम हा जर खरा आहे, तर ज्याला भ्रम झाला, तो व्यष्टिरूप जीवही खरा असला पाहिजे. तो खरा नसला तर भ्रम तरी कोणाला होणार ! अशा रीतीने दोन्ही खरे मानल्यावर, ईश्वराची आणखी असंबद्ध माया मानण्याचे कारण रहात नाही. तात्पर्य, जीव हा मायाकार्य नाहीं. त्यास केवळ व्यावहारिकच सत्ता आहे असे नाहीं, तर पारमार्थिक सत्ताही त्यास आहे. आणि परब्रह्माचा जीवात्म्याशीं जो संबध आहे, तो केवळ तटस्थ लक्षणात्मक नसून तें परब्रह्माचे स्वरूपलक्षण आहे.

प्रत्येक व्यक्तीचे संवेदनात्मक ज्ञान भिन्न म्हणजे विलग असते. एकाच्या इंद्रियाच्या अथवा मनाच्या क्रिया दुसऱ्याच्या स्वाधीन नसतात. हे जरी खरें आहे, तरी सर्वांच्या सवेदनात्मक ज्ञानांत स्थूलमानानें सारखेपणा असतो. त्याचप्रमाणे एकाचे विचार व भावना त्यास दुसऱ्याला देतां येतात. ह्यावरून सर्वांच्या अस्तित्वाच्या बुडाशीं असलेली जाणीव ही एकच आहे. त्यामुळे प्रत्यक्ष इंद्रियसंवेदनांपुरते जीवाचे ज्ञान जरी फारच मर्यादित असले, तरी फार दूर अंतरावरच्या व प्राचीन काळच्या गोष्टीही त्यास मनोवेधक होतात. यावरून जीवाच्या सत्तेत सातत्त्व आहे, त्याप्रमाणे अनंतत्वही आहे. मी अंतवंत आहे असे जीवाने आपल्याला ओळखण्यात जीव आपल्या कल्पनेने सांतत्वाची मर्यादा ओलाडतो. कारण सांत आणि अनंत ह्या कल्पना परस्पर सापेक्ष आहेत. सांताला सत्यत्व दिल्यावांचून अनंतत्वाला तरी खरेपणा कोठून येणार ? ब्राह्म म्हणतात की, अद्वैती जे मायावादी ह्याचे चुकते ते येथेच. वास्तविक जीव हा किंचिज्ज्ञ आहे, अपूर्ण आहे, अपवित्र आहे, पापी आहे, या निषेधात्मक सर्व गोष्टी खऱ्या आहेत. म्हणूनच परमेश्वरास सापेक्षतेने पूर्ण, पवित्र, पावन व प्रेमी अशीं विधायक विशेषणे आपणांस देतां येतात. जगात प्रेम आणि दया असे हे गुण ज्याअर्थीं खरोखर आहेत, त्याअर्थीं प्रेम आणि दया इत्यादि गुणांनीं जोडले जाणारे जगांतील भेदही

सत्यच असले पाहिजेत. मायलेक, नवराबायको, पूज्यपूजक यांच्यांत दिसून येणारें प्रेम द्वैतांत अद्वैत व भेदांत ऐक्य सिद्ध करते. अध्यात्मांतील अनुभवही हेंच सिद्ध करतो. एकाच ढालीला दोन बाजू असतात. त्याप्रमाणे भेद आणि ऐक्य ह्या एकाच वस्तूच्या दोन बाजू आहेत. नैतिक दृष्टया वरील मांडणी अद्वैती मायावादापेक्षां ब्राह्मांस अधिक सयुक्तिक दिसते. ते म्हणतात की, जीवाचा पुरुषार्थ त्याच्या महत्त्वाकांक्षेत आहे. ती त्याची महत्त्वाकांक्षा अमर्याद वाढणारी असते, यातच अनंताशीं असलेल्या त्याच्या सापेक्ष संबधाची शाश्वती आहे.

आनंद हे जें आणखी एक पद आपण परमेश्वरास लावतो, त्याच्या सत्यतेचा ब्राह्मांच्या दृष्टीनें आतां थोडासा जास्त खुलासा करूं. परमेश्वर हा अनंत म्हणजे पूर्ण असला पाहिजे. तो आनदमय म्हणजे पवित्र, गुणैश्वर्य-संपन्न व सुखरूप असला पाहिजे. ही गोष्ट या गुणांचा अभाव अथवा कमतरता आपल्या ठिकाणी दिसते, त्यावरूनही दिसून येईल. कोणाचीही दुर्गुणांकडे स्वाभाविक प्रवृत्ति नसते. प्रेमादि सद्‌गुण द्वेषादि दुर्गुणांपेक्षा श्रेष्ठ असे कोणीही कबूल करील. जुलूम-जबरदस्ती व पाप न करतां कोणाचे ईप्सित हेतु जर सिद्ध होत असतील, तर कोणाचीही पापाकडे सहसा प्रवृत्ति होणार नाही. अर्थात् या सदसद्विवेकबुद्धीची जाणीव प्रत्येक व्यक्तीच्या ठिकाणीं सारखीच असणार नाहीं. ती ज्या मानाने जास्त असेल, त्या मानानें तो ईश्वरासन्निध गेला असे आपण म्हणूं यावरून हे जे गुण जीवाच्या ठिकाणीं अंशतः व्यक्त होतात, ते पूर्णपणे ब्रह्माधिष्ठानाच्या ठिकाणी असले पाहिजेत, हे उघड झाले.

आतां परमेश्वराच्या ठिकाणचे प्रेम, पावित्र्य, आनंदादि गुण बाह्य जगाकडे पाहून आपल्याला नेहमींच प्रतीत होतील, असे नाही. इतकेच नव्हे तर जलप्रलय, अग्निप्रलय, भूकंप, लढाया, रोग, बलिष्ठांचा जुलूम इत्यादि विघ्नांनीं जगिक व्यवहार इतके खचून गेले आहेत कीं, या सर्व दृश्याचें अधिष्ठान आनंदमय ब्रह्म असावे, ही गोष्ट पटणें दुरापास्तच होते. यामुळें परमेश्वराच्या ठिकाणींच अपूर्णता, असामर्थ्य व दुःख इत्यादि लक्षणें असावींत, असे क्षणभर वाटूं लागते, परतु तें आपलें अज्ञान आहे.

दुसऱ्याच्या हातून घडलेल्या कार्याचें बाह्य स्वरूप आपल्याला दिसते;

पण त्याच्या मागें असलेला हेतु आपल्याला कळत नाहीं. सामान्य माणसांचे हेतु जर आपल्याला जाणतां येत नाहींत, तर त्या सर्वज्ञ परमेश्वराचे हेतु आपणां किंचिज्ज्ञांस कसे समजावेत ? असे आहे तरी आपण व्यवहारांत अल्प-परिचितावरही त्याच्या सद्धेतूबद्दल भरंवसा ठेवून व्यवहार करतो मग बुद्धिवादी व चिकित्सक असे ब्राह्म म्हणतात कीं, तसा निर्धार निःशंकपणे परमेश्वरावर कां न ठेवावा ? वास्तविक ह्यांतच जीवाचे कल्याण आहे कारण आपल्या अज्ञानामुळें आपण त्याचा हेतुविपर्यास करण्याचा पुष्कळ संभव आहे. शिवाय कित्येक शाप आशीर्वादरूप व्हावेत, त्याप्रमाणे कित्येक आपत्ति जगाच्या कल्याणास कारणीभूत होत असतात. वादळें व आगी यांनीं हवा शुद्ध होते. दुष्काळ व सांथी यानीं लोकसंख्येची फाजील वाढ मर्यादित होते व सहानु-भूति आणि परोपकार अशा सद्‌गुणांची वाढ होते. प्रसंगाने मनुष्य शहाणा होतो. संकटांत मनुष्य गर्वगलित होतो. शिवाय ब्राह्म सांगतात कीं, सृष्टि-रचनेचे कार्य अद्याप पुरे झालें नाहीं. ते अव्याहत सुरूच आहे. सृष्टि उत्तरोत्तर सुधारत आहे. पंचमहाभूतांचे क्षोभ उत्तरोत्तर कमी होत आहेत. अपूर्णांतून सृष्टीची गति पूर्णाकडे आहे. आतां ईश्वराने हें जग प्रथमपासूनच पूर्ण का केले नाहीं ? असा प्रश्न रहातो, पण त्याचे पूर्ण उत्तर एक ईश्वरच देऊं जाणे !

तथापि, ब्राह्म आपल्या तर्कानें असें अनुमान सुचवितात कीं, कालांत उत्पन्न झालेला सृष्ट पदार्थ वाढत जाणें व सुधारत जाणे, हा त्याचा स्वभाव-धर्म आहे. या कालाधीन सृष्ट पदार्थांच्या वर्धनक्रियेतच भौतिक शास्त्रांची उत्पत्ति होते. सारे जग एकदमच पूर्णावस्थेत उत्पन्न झाले असते, तर त्याचा स्वभाव आपल्याला मुळींच कळला नसता. आणि मनुष्याच्या ज्ञान-संग्रहांत केवढी तरी उणीव राहिली असती ? शिवाय जगाची अपूर्णांतून पूर्णाकडे गति आहे, यांतच मनुष्यमात्राच्या उद्योगशीलतेचे रहस्य आहे. सृष्टींत ज्या ज्या उणिवा भासतात, त्या पुऱ्या करण्याकरितांच मानवी जगा-ची धडपड आहे. त्यांतच सहानुभूति, सहकारिता आणि चढाओढ इत्यादि गुणांची वाढ होऊन मनुष्याचा पुरुषार्थ सिद्ध होत असतो. आणखी एक असें उघड दिसतें कीं, पूर्ण व अनंत अशी वस्तु एकच असणार. दुसरी वस्तु तशी झाली, तर एका वस्तूची व्याप्ति दुसरीच्या अनंतत्वाला बाध आणील.

तेव्हां जो पदार्थ उत्पन्न होतो, त्याची सतत वाढ होत जाणें, हें जरी सृष्टि-नियमानुसार आहे, तरी तो पूर्ण होणें कधींच शक्य नाहीं. ईश्वराने निर्माण केलेला मनुष्य याप्रमाणे अनंत उन्नतीस पात्र आहे. पण तो ईश्वरतुल्य किंवा पूर्ण होणें कधींच शक्य नाहीं. तात्पर्य, अपूर्ण असणे, हा सृष्टपदार्थांचा स्वभावच आहे, व तो अपरिहार्य आहे. उलट ज्ञान, प्रेम व पावित्र्य, हीं जेथें पूर्णत्वाने आहेत, ते अनंत पूर्णानंदरूप एकच आहे. त्या आनंदाचा किंचित् अनुभव भक्ताला आपल्या उत्कट भावनेत व योग्याला ध्यानधारणेत येत असतो. असो.

ह्याप्रमाणें ध्यानगम्य ज्ञानाची किंवा अनुभवाची जी कल्पना साधारण ब्राह्म देतात ती वेदान्ताच्या दृष्टीने बरीच खालच्या दर्जाची ठरते. उपासकांच्या दृष्टीने ही उपास्याची कल्पना ठीक आहे. पण तत्त्वज्ञांची दृष्टि उपासकांहूनही सूक्ष्म असली पाहिजे. जोवर सर्व उपाधींचा निरास झाला नाहीं, तोवर अनंताचीं कल्पनाच कशी संभवेल ? अहं प्रत्ययासह सर्व दृश्याचा निरास करणे, म्हणजे शून्यावस्था येते, असे ब्राह्म म्हणतात. परंतु (Positive) भावरूपांतून (Negative) अभावरूपांत जात असतांना मध्यंतरीं शून्यावस्था (Zero) लागतेच. परंतु हे शून्य म्हणजे अभाव नव्हे. अभावापेक्षां शून्य मोठें आहे. किंबहुना तेंच अनंत होय. 'तुका म्हणे नभा। असे अणूचाही गाभा' ॥ हीच तुकोबांची अनंताची व्याख्या फार सूक्ष्म आहे. ज्यास परीघ नाहीं, तेच अमर्याद, तेथे अत्यंत सूक्ष्म आणि विराट सारखेच ह्या व्याप्तीच्या सापेक्ष कल्पनाच तेथे संभवत नाहींत. समजा, जगांत एकच रंग आहे, असें मानले, तर सारे दृश्य-जात एक रंगी होऊन कोणताच पदार्थ दिसणार नाहीं. अशा रीतीने सर्व इंद्रियांची वाट लावीत गेल्यास, म्हणजे त्यांस बधिर करीत गेल्यास किंवा आकाशतत्त्वावर आपली बुद्धि आरूढ करून तेथूनच जगाकडे आपण पाहतो अशी कल्पना केल्यास जगाचा काय प्रत्यय येईल ? पण तो शून्यवत् प्रत्यय पाहणारा द्रष्टा राहतोच. त्याचाही अहंप्रत्यय काढून घेतला, तर मग विषयविषयीभाव, ज्ञाताज्ञेयभाव अथवा मन आणि विचार हें द्वैत कोठून राहणार ? बोलून चालून जी कल्पनाच ती परमेश्वराची मानली म्हणून काय झालें ? ती तत्त्वशून्यच आहे, तिची आस्था तत्त्वज्ञांनीं ती काय मानावयाची आहे ? पण त्रिगुणांपलीकडे ब्राह्म जातच नाहींत. मग

तीं तीं त्रिकुटें सत्यं, ज्ञानं, अनंतं; सत्, चित्, आनंद; ऐक्य, भेद, भेदाभेद; सत्त्व, बोध, केवल; द्रव्य, गति, मन किंवा अध्यात्म, आधिभूत, आधिदैवत अशीं कोणतींही माना: कांही मानले तरी सगुण ब्रह्म, ईश्वर, हिरण्यगर्भ, मन, आधिदैवत, किंवा एक जगन्नियता परम पुरुष, येथेच कोठें तरी याचें ध्येय थांबते. फार तर प्रियकराचा लाभ, ईश्वराशीं सलोकता, समीपता हीच त्याची आवड, बद्धाचे मुक्त होणे, सेवकानेच स्वामी होणे, जीवाने शिव होणे ही कैवल्याची कल्पना त्यांस भावत नाहीं. सारांश, जगाचा निरास करून, द्वैतांतून अहंप्रत्ययाचाही लय करून अद्वैत अनुभव किंवा ब्रह्मानुभव घेण्यास ब्राह्म भितात. त्यांना तो आत्मनाश वाटतो, तो इष्ट नाहीं व शक्यही नाहीं असें ते मानतात. इतकेंच नव्हे तर उलट जगिक प्रपंचाच्या पसाऱ्याला मायावादी वेदान्तीच भितात, असा त्यांचा जगद्गुरु शंकराचार्यप्रभृति वेदांत्यांवरच टोमणा आहे! द्वैतात भय आहे की अद्वैतांत आहे, याचा विचार सुज्ञ वाचकांनीच करावा. नामरूपांतूनच अरूपाकडे जावयाचे हे ब्राह्मांचे म्हणणे संप्रदायधर्मापुरतें ठीक आहे, पण तत्त्वतः अरूपाच्या ठिकाणीं नामरूप कसें असणार? सापेक्षवादास तरी निरपेक्षाची सीमा नको काय? प्रकाश व अंधकार ह्या कल्पना सापेक्ष खऱ्या पण स्वयंप्रकाश सूर्याला अंधकाराची कल्पनाही कशी संभवेल? तसेंच एकीकरण क्रियेचीही कोठें तरी समाप्ति पाहिजेचना? आणि साधकाच्या मार्गक्रमणासही केव्हां तरी शेवट नको काय? असो. तूर्त याचा जास्त ऊहापोह येथें करीत नाहीं. येथपर्यंत कांही ब्राह्म पंडितांचे केवळ तात्त्विक विचार सांगितले. त्यांच्या संप्रदायाच्या दृष्टीनें सर्वसामान्य अशा ब्राह्म-मतांचा व तत्पूर्वी त्यांच्या वादाचा विचार पुढील प्रकरणापासून करूं.

---

## प्रकरण सहावें

# प्रामाण्यवाद

### सामान्य विचार

साधारण-ब्राह्मांपैकीं कांहीं विद्वानांच्या दृष्टीनें तत्त्वज्ञानाचा सामान्य विचार मागील प्रकरणांत केला. आतां धर्मासंबंधीं सामान्यत्वे ह्या पंथाचीं विशिष्ट मते काय आहेत, ते यापुढे पहावयाचे आहे. ईश्वरासंबंधी कल्पना हीच साऱ्या धर्मविचारांस केंद्रीभूत असल्यामुळे त्यासंबंधीच अगोदर विचार करणे योग्य होईल. परंतु ईश्वर ज्ञेय आहे कीं अज्ञेय आहे, तो सगुण आहे कीं निर्गुण आहे, तो केवळ तत्त्वरूप आहे किंवा कर्ता-करविता पुरुष आहे, तो सृष्टीहून पर आहे कीं सृष्टीचा अंतर्यामिन् आहे, तो नुसता ज्ञाताच आहे, ज्ञाताज्ञेयरूप आहे किंवा केवळ ज्ञानस्वरूप आहे, इत्यादि अनेक वाद ह्या नवयुगात उपस्थित झालेले असल्यामुळे, ह्या सर्व वादाचा निरास करून साधारण-ब्राह्म जे आपले सांप्रदायिक धर्ममत म्हणून प्रस्थापित करतात, ते कोणत्या प्रमाणाच्या आधारावर; याचा विचार अगोदर झाला पाहिजे. यास्तव एकंदर ब्राह्मसंस्थांच्या प्रामाण्यबुद्धीचा सामान्य विचार ह्या प्रकरणांत करून साधारण-ब्राह्मांसंबंधी विशेष विचार आम्ही पुढील प्रकरणापासून करणार आहोत.

उपनिषदाचे प्रणेते ऋषि, प्रस्थानत्रयीवरील भाष्यकार शंकराचार्य आणि श्रीरामानुज, आदि-ब्राह्म राममोहन, देवद्रनाथ व केशवचंद्र, तसेच पश्चिमेकडील हेगेल, जेम्स मार्टिनो, आणि ग्रीन, अशा अनेक विद्वान् ज्ञात्या पुरुषांबद्दल साधारण-ब्राह्माचा आदर असला, तरी ह्यांपैकीं अमुकच एकास प्रमाण मानावे असा त्यांचा सर्वांचा एकनिश्चय नाहीं. धर्मांचे परस्पर विरोध आहेत. हिंदूंच्या श्रुति भिन्न आहेत, भाष्यकारांचेही एकमत नाहीं आणि राममोहनापासून तो केशवचंद्रांच्या अनुयायांपर्यंत म्हटलें तर सारेच वेदान्ती, नाहीं तर कोणीच नव्हत, असे दिसते. अद्वैतांबद्दल

द्वैत व द्वैतांतून अद्वैत अशी ब्राह्मविचारांस जीं आंदोलनें मिळालीं आहेत, त्यांवरून कोणती गोष्ट सिद्धान्तवत् मानावी, हे ठरविणें त्यांच्या अनुयायांस कठीणच आहे. साधारण-ब्राह्मांपैकी पंडित शिवनाथशास्त्री, बाबू नागेंद्र-नाथ चतर्जी, डॉ० हीरालाल हलधर, पंडित सीतानाथ तत्त्वभूषण किंवा बाबू हेमचद्र सरकार या सर्वांचीही धर्मविचारांत अगदीं एकवाक्यता आहे असेंही वाटत नाहीं. ह्या मतवैचित्र्याच्या प्रकारांत प्रमाणवैचित्र्याचीं कारणें-ही बीजभूत आहेत. कोणी सहजज्ञानास महत्त्व देतात, कोणी आत्मप्रत्ययातून द्वैती भावना सिद्ध करतात, कोणी आत्मप्रत्ययासच ब्रह्मप्रत्यय मानतात, कोणी केशवचंद्रांस ईशप्रेषित व त्यांच्या नवविधानास ईशप्रणीत मानतात, तर कोणी आपल्या विवेचक बुद्धीवांचून कोणासच प्रामाण्य देत नाहींत. दुसरे कोणी बाह्य सृष्टीसच धर्मशास्त्र मानतात, तर कोणी अहंप्रत्यय हीच साऱ्या ज्ञानाची गुरुकिल्ली आहे असे म्हणतात. श्रुतीस जो अनुकूल असेल, तोच तर्क प्रतिष्ठित मानावा, असे आपलें वेदांतशास्त्र सांगते, तर उलट तर्काच्या कसोटीस जे उतरेल, तेवढेच शास्त्रवचन मानावे असे ब्राह्म म्हणतात.

ब्राह्मांच्या प्रामाण्यवादांत असा हा गोंधळ माजण्याचीं मुख्य कारणे दोन दिसतात. खरा ब्रह्मानुभव येण्याच्या पूर्वींच त्याचीं प्रमाणें ठांसून सांगण्यांत ब्राह्मपुढाऱ्यांनीं उतावळी केली आहे आणि शिवाय साऱ्या ब्राह्मपुढाऱ्यांनीं विधर्मी ग्रंथांच्या अध्ययनाने अगोदर आपलीं मते बनवून मग त्या दृष्टीनें अखेर वेदान्ताकडे ओझरते पाहिले आहे. यामुळे वेदान्तपरिभाषेतील कित्येक महत्त्वाचे शब्द जरी त्यांनीं वापरले असले, तरी त्या शब्दांच्या लक्ष्यार्थाबद्दल वेदान्त्यांची व त्यांची दृष्टि किंवा अनुभव हीं एकच आहेत, असे म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, अपरोक्षानुभव हे प्रमाण राजा राममोहन यांनीं मानलें असलें, तरी त्यांत आचार्यांच्या मतास त्यांची बौद्धिक संमति दिसते, इतकेंच त्यावरून म्हणतां येईल. श्रीशंकराचार्यांचे सारे ब्रह्मानुभव राममोहन ह्यांनीं आत्मसात् केले होते, अथवा त्यांची तत्त्वदृष्टि त्यांनीं पुरी पचनीं पाडली होती असें वाटत नाहीं. त्यानंतरचे थोरले ब्राह्म महर्षि देवेंद्रनाथ ह्यांचे "आत्मप्रत्ययाचें" प्रमाण वेदान्त्यांच्या आत्मप्रत्ययाशीं मुळींच जुळतें नसून, एकाचें अद्वैत ज्ञान तर दुसऱ्याचें स्पष्ट द्वैतात्मक ज्ञान, हें अगदींच भिन्न दिसतें. त्यानंतरचे तिसरे प्रतिविधानाथ देव राजनारायण बोस ह्यांनीं

तर ब्रह्मज्ञान म्हणजे एक थोडेंसें श्रेष्ठ प्रकारचें व्यावहारिक ज्ञानच (Common Sense) ठरविलें. ब्रह्मानंद केशवचंद्र थोडे त्यांच्याही पुढे जाऊन म्हणतात कीं, ह्या ईश्वरविषयक ज्ञानास आत्मप्रत्यय आणि व्यावहारिक चातुर्य तरी कां लागावें ? अडाणी आणि अशिक्षित लोक काय ईश्वराचीं मुलें नव्हत, तर त्यांनीं त्यास पारखे असावे. ईश्वरज्ञान म्हणजे पंडितांपासून पामरांपर्यंत आढळणारे ते एक सहजज्ञानच आहे. जीवन्मुक्तांच्या ज्ञानस्थितीसही वेदान्ती सहजज्ञान असेच म्हणतात. दोन्हीही ज्ञाने प्रमाण-निरपेक्ष व निःसदेहच खरीं, पण एक सामान्य तर दुसरे विशेष; एक अव्यक्त तर दुसरें व्यक्त. एक ज्ञानोत्तर तर दुसरे अज्ञानजन्य; एवढा जबरदस्त त्यांत भेद आहे.

कार्याकार्य ठरविणाऱ्या प्रमाणांच्या सुधारलेल्या आवृत्ति केशवचंद्रांनीं अनेक काढल्या. सरळ नाक न धरितां द्राविडी प्राणायाम करावा तशांतलेच तेही प्रकार दिसतात. उदाहरणार्थ, आपली विवेकवाणी सांगेल तें योग्य; जे सर्वमान्य असेल ते रुजू; ज्याबद्दल ईश्वरप्रेरणा करील ते खरे व अखेर ईशप्रेषित केशवचंद्र जे सांगतील तेच सत्य आहे; अशी निःशंक (अंध) श्रद्धा खुशाल ठेवावी; असे त्याच्या सांगण्याचे भिन्न प्रकार दिसतात. तात्पर्य, रूढि व परंपरा ह्यांस अगदीं झुगारून द्यावे, पण परंपरेनेच बनलेल्या व्यक्तीची नामधारी विवेकाची वाणी मात्र मानावी; व्यास, वशिष्ठ व शंकराचार्य ह्या महाजनांस खुशाल मूर्खांत काढून, "महाजन" म्हणजे कलिकालांतील प्रायः अधार्मिक असे सामान्य बहुजन जी मान्य करतील, तीच नीति व तोच धर्म समजावा; ज्यांस ईश्वराचा मागमूसही नाही, त्या सर्वांनीं (मनाच्या विकल्पांसच) ईशप्रेरणा मानून वर्तावे आणि शेवटीं रामकृष्णादि अवतारांचें नांवही न घेतां, येशूदास केशवचंद्रांस अवतारी पुरुष लेखून त्यांच्यावर डोळे मिटून श्रद्धा ठेवावी हा नवविधान पंथांतील प्रामाण्यवादाचा सारांश आहे !

साधारण ब्राह्मसमाज म्हणजे एक प्रकारे केशवाच्या नंतर बौद्धांचाच (बुद्धिवाद्याचा) अवतार होय. सत्यमशास्त्रमनश्वरं हेच त्यांचे प्रमाण. ह्या सत्यज्ञानाचा साक्षी एक ईश्वर आहे, असे ते मानतात. सारे धर्मही असेच मानतात. पण साधारण-ब्राह्मांचा विशेष हा आहे कीं, त्यांचा एक ईश्वर कोणा एका काळीं व विवक्षित स्थळीं, येशुखिस्त, महंमद किंवा वैदिक ऋषि यास सत्यधर्म सांगून गेला, आणि त्यानंतर आतां त्याने मौन धारण केले आहे, असे

-नसून जीवात्मा हेच ईश्वराचे पवित्र मंदिर आहे. शुद्ध अंतःकरणाने आणि कळकळीनें त्याचा शोध घेतल्यास तो जिज्ञासूंजवळ केव्हांही बोलतच असतो, असे ते मानतात. बुद्धि आणि अध्यात्मदृष्टि हेच ईश्वराकडून सत्य ज्ञान मिळण्याचे मार्ग आहेत. जोपर्यंत मनुष्याचे अतःकरणांत ब्रह्मजिज्ञासा शिल्लक आहे, तोपर्यंत हा सत्यधर्मही शाश्वत आहेच. त्यांचे आणखी म्हणणे असें आहे कीं, वेद, बायबल व कुराण हे धर्मग्रंथही ईशप्रेषित नसतीलच असें नाहीं. पण त्यांपैकीं किंवा त्याशिवाय कोणत्याही धर्मग्रथावरून सत्य पारखावयाचें नसून उलट कोणत्या ग्रंथांतील कोणते वचन मानावे हे ठरविण्याची सत्य ही एक स्वतंत्र कसोटी आहे. सर्व धर्मशास्त्रे स्खलनशील आहेत, परस्परविरोधि आहेत व आधिभौतिक शास्त्रीय प्रगतीशीं विसंगत आहेत, यांमुळे तीं त्यांस पूर्णपणे मान्य नाहीत. परा आणि अपरा विद्या असा भेद ते मानीत नाहींत. प्रत्येक लहानमोठ्या शास्त्रीय शोधात आणि व्यवहारचातुर्यात ईश्वराचे स्वरूपच उत्तरोत्तर अधिकाधिक व्यक्त होत आले आहे, असें ते मानतात, तात्पर्य, बुद्धि, विवेकवाणी व अध्यात्मदृष्टि ह्यांना वाट पुसत प्रत्येक व्यक्तीने घडोघडीं केलेले सत्यशोधन हे जसें ब्राह्माचे धर्मशास्त्र आहे, त्याचप्रमाणे सर्व देशातील व अनादि कालांतील अध्यात्मठेवीवर ब्राह्मसमाज आपला वारसा सांगत आहे. त्यांचा देवधर्म आणि ईशप्रेषणा हीं सर्व सार्वत्रिक, प्रागतिक आणि नित्य आहेत. आमच्या पायदळीच्या अणुरेणूपासून तो आकाशस्थ दिव्य तारागणापर्यंत सर्व स्पष्ट पदार्थ आम्हांस सत्यधर्मच शिकवीत आहेत ! अशी त्यांची निष्ठा किंवा निदान भाषा तरी आहे.

वरील विवेचनावरून 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे' हें ब्राह्मांच्या मताने एक धर्मवेड्या लोकाचे खूळ आहे किंवा प्राचीन कालापासून लोकांनीं भीति व अज्ञान यांचेमुळे जीवापासून ईश्वर अतिदूर मानला, त्या लौकिक समजुतीवर पुढे धूर्तांनीं योजलेला हा काल्पनिक तोडगा आहे. पण साधारणब्राह्म म्हणतात कीं, "आम्ही आतां पुरे हुशार झालो आहोत. हा देवऋषींचा गंडा इतःपर आम्हांस घालतां येणें शक्य नाहीं! कारण पौराणिक काळच्या वेडगळ समजुतीप्रमाणें आमचा देव दूर नाहीं. तो नित्य आमच्या सन्निध आहे. तो आमचा अंतर्यामिन्, आम्हांस साक्षात् तारणारा आहे. त्याच्या व

आमच्या दरम्यान कोणा मध्यस्थास उभे राहण्यास जागाच नाहीं. हे मध्यस्थ म्हणजे ईशदर्शनांतील नसते विघ्न आहे. आम्हांस धर्मसुधारक व आधिभौतिक शास्त्रीय संशोधक सारखेच थोर वाटतात. त्या पुरुषांस आम्ही फार तर आमचे वडील बंधु मानूं पण ते जर आमच्यासारखेच (प्रमादशील) असतील तरच. तुम्ही जर त्यांस दिव्य दृष्टि, किंवा अतिमानुष शक्ति मानाल, तर त्या तोतयांकडे आम्ही ढुंकूनही पाहणार नाहीं. कारण, ज्याच्याकरिता इतरांच्या तोंडाकडे पहावयाचे तो परमात्मा सर्वत्र संचरलेलाच आहे. ते आमचें जवळचे इष्ट दैवत सोडून आम्ही काल्पनिक अवतारी देव व मध्यस्थ यांचे मागे कशास लागावे ? जीझस व कृष्ण यांच्यापूर्वी व नंतर जन्मास आलेल्या कोट्यवधि जीवांची सर्वथा उपेक्षा व्हावी अशी ईश्वराची नियति दिक्-कालानीं परिच्छिन्न नाहीं ! ” ही हेमचंद्रादिकांची भाषा हिमचंद्राप्रमाणेच जरी रम्य व शीतल आहे, तशीच ती साधकाची तीव्रता गारठवून त्याच्या धर्मशीलास मोहनिद्रेत झोपविणारी आहे. ती आस्तिकापेक्षां नास्तिक फार सफाईने बोलूं शकेल. ती ऐकून कोणी अनुभवी असे म्हणतील की, पथाभिमानाने बेहोष झालेल्या धर्मवेड्याच्या हातीं खचित काही तरी सत्यांश लाभेल; पण ह्या स्वतंत्र बुद्धीच्या उदारमतवाद्याच्या हातीं खरोखरच काय लागत असेल, ते तेच जाणोत ! असो.

तात्पर्य, बाह्यप्रमाण ह्या दृष्टीने साधारण-ग्राह्य हे वेदशास्त्रांस स्वतंत्र महत्त्व मुळींच देत नाहींत. अवतारी पुरुष व सद्गुरु यांच्या आज्ञा प्रमाण-निरपेक्ष सत्य असतात असे ते मानीत नाहीत. तसेच सिद्धांचे अलौकिक सामर्थ्य, योग्यांची अतींद्रिय दृष्टि, महात्म्याचा गूढ वाद, भक्ताचा उन्मनावस्थेतील अनुभव, भाव आणि श्रद्धा याची तीव्रता व अनन्यत्व ह्या सर्व गोष्टी त्यांच्या दृष्टीने जवळ जवळ उपहासास्पदच आहेत. माणसांच्या विषयग्रहणशक्तींत ते भेद मानीत नाहींत. जी बुद्धि व्यावहारिक सत्तेतील क्षुद्र विषयांस जाणते, तीच बुद्धि पारमार्थिक सत्तेतील ब्राह्मीस्थितिही जाणते, असे ते समजतात. बुद्धि तरी निर्णायक कोणाची ठरवावयाची, कारण एका बुद्धिमानाने ठरविलेले सिद्धान्त त्याच्याहून अधिक बुद्धिमान् मनुष्य खोडून काढील; त्या आक्षेपास ते फारसे महत्त्व देत नाहींत. कारण त्यांचे म्हणणें असें दिसते कीं, तर्कशास्त्राप्रमाणे जो सिद्धान्त निरपवाद ठरतो, म्हणजे ज्या

सिद्धान्ताच्या उलट सिद्धान्त निघणें अशक्यच असतें, त्या सिद्धान्तास केवळ तर्कटी बुद्धीनें कोणास बाध आणतां येणें शक्य नाहीं. यासाठीं तार्किक विचार हे एकच प्रमाण साधारण ग्राह्य मानतात. उदाहरणार्थ, सृष्टिरचनेवरून सृष्टीच्या मागे कोणा सत्ताधारी पुरुषाची कल्पना होते, सृष्टीतील हेतुवादावरून तो सृष्टिकर्ता चतुर व ज्ञानी आहे असें ठरतें आणि पदार्थाच्या सत्स्वरूपमीमासेने भेदांतील अभेद कळून येतो. तसेच नीतिशास्त्राच्या चिंतनाने तो परमपुरुष शुद्ध व पवित्र आणि दयाळू असला पाहिजे असेंही पटते. अशा रीतीने औपनिषदिक ऋषि किंवा वेदान्ताचे आचार्य यांचा ब्रह्मवाद व पाश्चात्यांचा बुद्धिगम्य केवळ कल्पनावाद याच्यांतील साम्य नुसत्या साध्या तार्किक विचारपद्धतीनें कळून येत, असें त्यांचे म्हणणे आहे. अर्थात् ह्या विचारसरणीमुळें ह्या नवीन सुशिक्षितांस कोणत्याही जुन्या परंपरेचे, धार्मिक अगर तात्त्विक वाङ्मयाचे किंवा ब्रह्मविदांच्या गूढ अनुभवाचे कांहींच महत्त्व न राहून तीं केवळ धर्मवेड्या लोकांचीं खुळे आहेत असे वाटूं लागले आहे. त्यामुळे ते वर दर्शविल्याप्रमाणें त्यांच्याकडे तुच्छतापूर्वक दुर्लक्ष करतात. अशा शोचनीय स्थितींत अपरोक्षानुभूतीची चटक तर राहोच, पण परोक्षज्ञानाचीही आस्था असावी, तशी त्यांच्या ठिकाणीं दिसत नाहीं. परंपरेची दोरी तुटलेले हे पतंग, स्वैर कल्पनांच्या तरंगावर झोके खात खात बुद्धिवादाच्या वावटळीत सांपडून अखेर केव्हांच नामशेष होतील याचा नियम नाहीं; ह्यास थोडे अपवाद असतील तर ते या टीकेचेंच समर्थन करतील; असें ह्या भागाच्या शेवटल्या प्रकरणांत येणाऱ्या अवतरणावरून दिसून येईल.

तात्पर्य, ज्याअर्थीं मी आहे, त्याअर्थीं मला उत्पन्न करतें, पालन करतें व मार्गदर्शक असें ब्रह्म आहे, हा देवेंद्रनाथांचा आत्मप्रत्यय होय आणि असें तें ब्रह्म माझें हितचिंतक, स्नेही, आश्रयभूत व स्वामिन् आहे, हेही त्या आत्मप्रत्ययाचेच प्रकार होत. असे हे सत्यज्ञान प्रमाणनिरपेक्ष स्वतःसिद्ध आहे. साध्या व्यावहारिक ज्ञानाप्रमाणे तें सर्वांस सहज आणि प्रत्यक्ष आहे. अतिपरिचयामुळें त्याचे आपल्याला महत्त्व न कळलें, तरी वस्तुतः ह्याच सहजज्ञानाच्या आधारावर निरनिराळे धर्म उभारले जातात असें आदिब्राह्म मानतात. सहजज्ञान, विवेकवाणी, देववाणी, श्रद्धा आणि प्रत्यक्ष दर्शन, हीं फारच थोडया फरकांतील नवविधानपंथाच्या सर्व सांप्रदायिकांस

सहजप्राप्त अशा ब्रह्मानुभवाची श्रेणि आहे. आणि कारणमीमांसा (Causal), हेतुवाद (Teleological), सत्तावाद (Ontological) आणि नीति (Moral) हे ब्रह्म स्वरूपसिद्धीचे साधारण-ब्राह्माचे पुरावे आहेत. ते केवळ बुद्धिगम्य आहेत. त्यांस दिव्यदृष्टीची जरूरी नाही. मात्र बुद्धि चिकित्सक असावयास पाहिजे आणि त्यासाठी हेगेल यांनीं आंखलेल्या स्थूलापासून सूक्ष्मापर्यंतच्या ज्ञानमार्गांतील आधिभौतिक शास्त्रांचे टप्पे घेत गेले पाहिजे. तसेंच धर्मशास्त्रे व महात्मे पुरुष हे प्रमादशील आहेत, ही सावधगिरीची खूणगांठ अंतरांत ठेवून, त्यांच्याही शिकवणीचा चिकित्सक दृष्टीने विचार झाला पाहिजे, असें साधारण-ब्राह्म समाजांतील पोक्त पंडितांचे सांगणें आहे.

वरील प्रामाण्यमीमांसा विशेषेकरून बाबू हेमचंद्र सरकार व पंडित सीतानाथ तत्त्वभूषण ह्या समाजाच्या शिरोभागीं असलेल्या दोघां विद्वानांच्या लेखांच्या आधारें केली आहे. पण आजच्या समाजाच्या बुद्धिस्वातंत्र्याच्या युगांतही राजा राममोहन, देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन यांचे विचार 'बाबावाक्यं प्रमाण' याप्रमाणेच पुष्कळ ब्राह्म मानीत आहेत. यास्तव त्यांचीं हीं प्रमाणे या लेखांत पुन्हा दर्शविली आहेत. मानवी प्राण्याची बुद्धि-रूप धेनु स्वतंत्र मोकाट सोडली, तरी संप्रदायगवाणींतील संतोच्छिष्टाचे अंबोण टाकून, निसर्गाचीं कांटेरी पानें ओरपण्यासत्व ती धावेल, असा नियम नाहीं. कित्येकांस तर्कटी डोंगराच्या कपारीवर उड्या घेण्यापेक्षा अन्नदात्याचे दावे पत्करते! हा स्वभाव आहे, आणि म्हणूनच धर्मसंप्रदाय कांहीं काळ तरी टिकूं शकतात. आत्मनिष्ठ पुरुषाची व्यवसायात्मक बुद्धि पामर जीव अथवा कच्चे साधक यास कशी असणार? तात्पर्य; जन्मोजन्मींचे संस्कार, अन्नदोष, संसर्गदोष, इंद्रियांचे अध्यास, मनाची चटक, निरनिराळ्या इषणा, प्रकृतीचे धर्म, परिस्थिति, षड्रिपूंची चिथावणी, बुद्धिमांद्य आणि अज्ञान इत्यादि निरनिराळ्या रंगाच्या कांचाच्या थरांतून येणारा सामान्यबुद्धि-प्रकाश हाच ब्राह्माचा एक अर्धवट आधिदैवत पक्ष होय. हीच ती ब्राह्मांच्या सत्याची कसोटी. मतलबी आणि मूर्ख मनुष्यांशिवाय सामान्य कोटींतील कोण मनुष्य ह्या आधारावर विसंबेल? आणि शिवाय अचिंत्य अशा ईशस्वरूपाचा निश्चय असल्या भ्रामक प्रकाशांत कोणासही होऊं शकतो हें म्हणणें किती अविचाराचें आहे! सारेच ब्राह्म असे अविचारी असतील ही गोष्ट संभवत नाहीं. संप्रदाय झाला

की त्याला नामरूपाचें कुंपण लागतेंच. ब्राह्मांचें तत्त्वविचार निश्चित नाहींत आणि धर्मशास्त्रही नाहीं. या गोष्टीची उणीव बुद्धिस्वातंत्र्याचा डांगोरा पिटणाऱ्या ब्राह्मांसही आतां वाटूं लागली आहे. आणि म्हणून वेद, शास्त्रें, पुराणें आणि सदाचार ह्या ठरीव प्रमाणांचा साधकबाधक विचार त्यांच्या-पैकीं क्वचित् कोणी आतां करूं लागले आहेत. त्यांतही त्यांस कांहीं विशेष निष्पन्न होत नाहीं, हें पुढील विवेचनावरून दिसून येईल.

---

## प्रकरण सातवें

# प्रामाण्य-विचार

### उपनिषदें

संप्रदाय झाला कीं तेथें अनुशासन आलें व शास्ताही आला. पंथभेदाचा सरसहा निषेध करणाऱ्या लोकांचाही शेवटीं एक पंथच बनतो. मी कांहीं नवीन धर्म सांगत नाहीं, असें श्रीकृष्ण गौतमबुद्धापासून थोर पुरुष सांगतच आले. तरी पण भगवंताचा भागवतधर्म व बुद्धाचा बौद्धधर्म हे आपल्या वैशिष्ट्यानें निराळे पडलेच. त्याचप्रमाणें साधारण-ब्राह्म हे कांहीं नवीन धर्म सांगत नसले, तरी जुन्यांतील विवक्षित आधार घेऊन त्यांनीं आपली संघटना स्वतंत्रच केली आहे. असे स्वतंत्र होतांना त्यांनी जुन्यापैकीं कोणत्या गोष्टी व व्यक्ति प्रमाणभूत मानल्या व कोणत्या टाकल्या यांचा विचार झाल्यावांचून त्यांच्या स्वतंत्र संघटनेतील सार्थकता किंवा व्यर्थता लक्षात येणार नाही व त्यांचें वैशिष्ट्यही समजणार नाही. म्हणून मागें सांगितल्या-प्रमाणें साधारण-ब्राह्मांच्या प्रामाण्यवादाच्याच कांहीं भागाचें आम्ही यापुढें स्पष्टीकरण करणार आहोत.

एक विद्वान् ब्राह्म लेखक म्हणतात, कीं स्वातंत्र्य, सामर्थ्य आणि संग्रह यांची या भूतलावरील दिव्य प्रतीकें म्हणजे पर्वत आणि सागर हे होत. पर्वताचें उदात्त स्वरूप आणि सागराचा विस्तार आणि खोली ही अत्यंत उद्बोधक आहेत. पर्वत हे ध्येयवाद व तत्त्वज्ञान शिकवितात तर समुद्र लोकसंग्रह आणि व्यवहार यांची दीक्षा देतो. ऋषि हे पर्वताप्रमाणें स्थिर व दूरदर्शी असतात आणि संत व संशोधक हे सागराप्रमाणें लोकोपकार करि-तात. अशा थोर पुरुषांमध्येंही परमश्रेष्ठ ( Prince of Prophets ) अशा जीझस ख्राइस्टमध्यें हे दोन्हीही प्रकारचे दिव्य गुण पूर्णपणें वास्तव्य करीत होते. अमेरिका आणि युरोप ह्यांनीं उभय दृष्टि राखून जीझसचें अनुयायित्व उत्कृष्ट राखलें. पण सदरहू लेखक म्हणतात कीं, आमचे भारतवर्ष मात्र

ध्येयवादांतून खालीं व्यवहारांत येत नाहीं. त्यामुळे अपरिमित नुकसान होत आहे. अशा ह्या नवयुगाच्या आरंभींच्या आपत्काली हिंदुस्थानात जे लोकोत्तर धर्मात्मे निर्माण झाले त्यात पहिले नवयुगप्रवर्तक राजर्षि राजा राममोहन, दुसरे आधुनिक संत महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर आणि तिसरे आधुनिक योगी ब्रह्मानंद केशवचंद्र सेन हे होत. ह्याबरोबरच स्वामी दयानंदाचा अर्धवट उल्लेख ब्राह्म करीत असतात, म्हणून आम्ही यांस ब्राह्मांच्या दृष्टीनेच धर्मराज्यातील साडेतीन शहाणे हे एक ऐतिहासिक नाव देतो. अर्थात् हेच साधारण-ब्राह्मा-चेही खरखुरे अनन्यसाधारण असे शास्ते व्हावयाचे, परंतु " नैकोमुनिर्यस्य मतं प्रमाणम् " अशीच त्याची स्थिति झाली. राजा राममोहन यांची प्रस्थानत्रयीवर भिस्त म्हणजे निव्वळ ढोंग असे कोणी ब्राह्म म्हणू लागले. देवेंद्रनाथ व अक्षयकुमार दत्त यांनीं तर वेदप्रामाण्य झुगारून दिले, तेव्हा ब्राह्म-समाजात मतस्वातंत्र्याचा मोठाच जयजयकार झाला ! केशवचंद्र यास वेद कशाशी खातात, हेही माहीत नव्हते ! त्याच्या व्याख्यानात आमचे ऋषि, उपनिषदें, बुद्ध, चैतन्य असे तीन-चार ठरीव शब्द क्वचित् येत. ते केवळ औपचारिकच असल्यामुळे त्यांचें प्रस्थानत्रयीसंबंधी किंबहुना आपल्या साऱ्याच प्राचीन वाङ्मयाबद्दलचे अज्ञान कधीच झांकले गेले नाहीं. त्यांनी सर्व धर्मांतील सुभाषिताचा एक श्लोकसंग्रह म्हणजे सर्व धर्मदर्शन अथवा अठरा धान्य चे एक कडबोळे तयार करविले होते. पण हा अब्राह्मिक वाङ्मयाचा ब्राह्म-धर्मास आधार घेण्याचा त्याचा प्रयत्न हास्यास्पद व निष्फळच ठरला. सामान्यतः साधारण-ब्राह्मसमाजास तर पूर्वपरंपरेची आस्था कांहीचीही राहिली नाही. परंतु साधारण-ब्राह्मापैकीं कांही यास अपवाद निघाले व त्यांतीलच एक तत्त्वज्ञ पुढारी पंडित सीतानाथ हेच आज त्याचे कर्णधार ठरले आहेत. तेव्हा त्याच्याच निरनिराळ्या ग्रंथास वाट पुसत साधारण-ब्राह्माच्या नवपंथाचा मागोसा घेत आम्हांस यापुढे जावयाचें आहे. असो.

ज्या नवयुगास राजा राममोहन यांनी आरंभ केला, त्याचा शतसांवत्सरिक-समारंभ खिस्तविजयांत होण्याचा प्रारंभी संभव वाटत होता. खिस्ती राज-सत्तेने दिलली वचने जर पाळलीं असतीं, व एका खिस्ती साम्राज्यांतील बरोबरीचे घटक अशा उन्नतदशेस जर आम्ही वाढत गेलो असतो, तर आज सुशिक्षित हिंदुस्थान कदाचित् अर्धेअधिकही ब्राह्मांचा मान्यवर

( Prince of prophets ) जो जीझस ख्राइस्ट याचेंच अनुयायी होऊन गेले असते. जो खिस्तीधर्म पूर्वी हिंदी सुशिक्षितांस आदर्शवत् वाटूं लागला होता, तो तसा आता खिस्तप्रेमी ब्राह्मांच्या अनुयायांसही वाटत नाही, याचीं अनेक कारणे सागतां येतील; पण त्यांत खिस्ती लोकांची हिंदुस्थानावर जी चाल झाली ती क्रूस, बाटली, तागडी आणि निशाण अशी गोगलगायीच्या पावलांनी कशी झाली, ती आम्हास पूर्वी खरी कळलीच नाही. पण आतां ते राज्यकर्ते, त्याचे हितसंबंध आम्हांहून अगदीं भिन्न मानीत आहेत, आणि व्यापार व साम्राज्य याबद्दलची आम्हांस वगळून त्याची स्वताची तृष्णा बेसुमार वाढत आहे. असे जेव्हां स्पष्ट दिसून आले त्या वेळी साधारण ब्राह्माचे पुढारीही असतुष्ट होऊन ज्वलज्जहाल बनले आणि खिस्ती लोक व खिस्तीधर्म यांनी मस्तकी धारण केलेले मानवी बधुत्वाचे तत्त्व त्याच्या अंतः-करणापासून बरेच दूर असून, ते त्यांच्या स्वार्थबुद्धीच्या डोक्याच्या ववचींतून खालीं अंतःकरणांत उतरणे अशक्य आहे, असे पाहून स्वकीय होऊ घातलेले परकीय व त्याचा धर्म याबद्दल सुशिक्षिताची आस्था हळु-हळू कमी झाली. पण त्यातही ब्राह्मांच्या ठिकाणीं आणखी एक प्रकार घडून आला; त्यामुळे हिंदुस्थानांतील खिस्तीकरणाची साथ टळली. तो प्रकार म्हणजे त्यांनीं खिस्तीधर्माची विकृति-लस आपल्यास टोचून घेतली, हाच होय. त्यामुळे त्यांच्यापैकीं कित्येक अजूनही जरी खिस्ती पाद्र्यांचे संगतीत राहून त्यांच्या स्तुतिपाठाचे काम करीत आहेत, तरी ते स्वतां खिस्ती होण्याची भीति आतां फारशी राहिली नाहीं.

वरील प्रकारची लस टोचून घेणे, म्हणजे येणाऱ्या आपत्तीशी तडजोड करणेच होय. ह्याप्रमाणे ह्या संस्कारसंकराने ब्राह्म खिस्ती व्हावयाचे टळले खरे; पण दुर्दैवाने ते हिंदुही राहिले नाहीत हा टोचण्यापासून एक वातविकार किंवा वेडच त्यांना जडले म्हणायचे ! आज चांगले पोक्त व सुज्ञ ब्राह्मही असे म्हणतात कीं, ज्याच्या पोटीं आम्ही जन्मास आलो, त्यांस कोणी हिंदु म्हटल्यास आमचा इलाज नाहीं; पण आम्ही मात्र इतःपर हिंदु म्हणवून घेण्यास साफ तयार नाहीं. आम्हांस तुम्ही वर्णसंकर करणारे, स्त्रैण, दुबळे, अभिमानशून्य किंवा पाहिजे तर परतंत्र गुलामदेखील म्हणा, आमचे त्यावर काही म्हणणें नाहीं; पण आम्हांस हिंदु म्हणाल तर तें मात्र आम्हांस खपणार नाहीं !

साधारण-ब्राह्मांच्या गेल्या वार्षिक सभेत झालेल्या भाषणांत खुद्द समाजाच्या अध्यक्षांनीं बोलण्याच्या ओघांत ब्राह्मांस सहज हिंदु म्हटलें. तर त्याबद्दल केवढा बाऊ होऊन त्या वाक्स्खलनाबद्दल अध्यक्षांसही जाब द्यावा लागला. अलीकडेच एकदां त्यांच्या मुखपत्रात ब्राह्मसमाज ही हिंदुधर्माची उत्क्रान्त आवृत्ति आहे, असें संपादकांनीं म्हटलें त्याबरोबर ब्राह्मात इतकी ओरड झाली कीं, आतां हे ब्राह्ममंदिर हादरून कोसळते की काय, असे होऊन संपादकांस पुरी अद्दल घडली! ह्या ब्राह्मांनीं हिंदुत्व सोडण्याचा अविचार कां केला याचे कारण वेगळेच आहे. त्याचे विवेचन पुढे येईल; पण आज हे ब्राह्म असें म्हणतात की, हिंदु अशी संकुचित भावना आम्हास नापसंत आहे. खिस्ती, मुसलमान, पारशी, याच्याशीं सापेक्षतेनें भिन्नता दर्शविणारे हिंदुत्व ह्या सापेक्षवाद्याना पत्करतां येत नाही. म्हणून साऱ्या आकाशास गवसणी घालूं पाहणारे हे कल्पनावादी मूठभर लोक आपणास ब्राह्म म्हणवीत आहेत; पण त्याची एकीकरणाची आकांक्षा येथेच कां थाबते नकळे! आणखी मोठे मन करून ते आपणास नुसते मानव, जीव किंवा सृष्टपदार्थ, असेच कां म्हणवून घेत नाहींत? एका हिंदुत्वाच्या अद्वैतात ब्राह्मपंथाचे नसते द्वैत उत्पन्न करणारे हे विद्वान्, आतां लोकांस द्वैताद्वैत शिकवीत आहेत! असो.

ह्याप्रमाणे जे हिंदुच नव्हत त्यास वेदशास्त्रे व पुराणे काय होत! आणि त्या स्वयमन्य विद्वानास लोकाचाराची तरी काय परवा! पण बापापासून भांडून बाहेर पडलेल्या मुलाला नवीन संसारासाठीं कोठून तरी चार भाडीं-कुंडी हीं गोळा करावी लागतातच. त्याप्रमाणे हिंदुत्वातून फुटून बाहेर पडलेल्या ब्राह्मापैकी साधारण-ब्राह्मांच्या स्वतंत्र बिऱ्हाडांत स्वमतांचा परिपाक करण्यासाठी कोणत्या नांवाची पात्रे गोळा केली आहेत, ती जरा डोकावून पाहू.

कसचे वेद आणि कसचीं धर्मशास्त्रे; त्यांस मागे फेकून देऊन पुढें चला. राजा राममोहन व दयानंद यांनीं केलेला वेदशास्त्राचा पुरस्कार केवळ बतावणीपुरता बाह्यात्कारीच होता. त्यास फसूं नका, असे वरवर पाहणारे (On looker) ब्राह्म हिंदी दूतांकडून (Indian messenger) लोकांस अजूनही इषारा देतच आहेत. तरी पण पोरक्या पोरास मोठे झाल्यावर आई-बापांचे नांव सांगण्याची अडचण जाणवतेच; त्याप्रमाणे साधारण-ब्राह्मांच्या

पंडितांस, आपल्या घरीं वाढलेल्या केवळ-कल्पनावाद ऊर्फ ब्राह्मवाद, याचे वडील, दाईज, गोत्र, शाखा, प्रवर इत्यादि लागेबांधे सांगावे लागतात. आणि म्हणून क्षेत्रोपाध्यायांच्या घरच्या वंशावळीच्या वह्या चाळाव्या त्याप्रमाणें साधारण-ब्राह्माचे अध्यक्ष पं० सीतानाथ तत्त्वभूषण यानीं वैदिक व पौराणिक वाङ्मयाचीं बरीच पानें चाळली आहेत. तसेच त्यांनी भौतिकशास्त्रांचीही बाडें पाहिलीं आहेत. त्यावरून ते जो निष्कर्ष काढतात, तो आम्ही तात्पर्यरूपानें पुढे देत आहोत.

मागे साधारण-ब्राह्माचा कल्पनावाद आम्हीं सविस्तर सांगितलाच आहे. त्याच्या समर्थनार्थ ते खालील सिद्धान्त उपनिषदांतून दाखवितात.

[ १ ]

ज्यांत एकमेवाद्वितीयं व तत्त्वमसि ही सिद्धान्तवचनें आलीं आहेत, त्या छांदोग्योपनिषदांतील अरुणि व त्याचा मुलगा श्वेतकेतु यांच्या संवादांत खालील वचनें आहेतः—

यथा सौम्यैकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातꣳ स्याद्वाचारंभणम्
विकारो नामधेयं मृत्तिकेत्येवसत्यम् ॥ —छांदोग्य, ६।१।४.

**अर्थः**—पिता म्हणाला, बाळा, ज्याप्रमाणें मृत्तिकेच्या एका भांड्यानें इतर सर्व मृत्तिका-विकार जाणतां येतो, कारण विकार हे नुसते वाणीचें अवलंबन, मृत्तिका हेंच केवळ सत्य आहे.

* * *

तꣳहोवाच यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकोऽङ्गारः खद्योतमात्रः परिशिष्टः स्यात्तेन ततोऽपि न बहु दहेदेवꣳ सोम्य ते षोडशानां कलानामेका कलातिशिष्टा स्यात्तयैतर्हि वेदान्नानुभवस्यशानाथ मे विज्ञास्यसीति ॥ ३ ॥ स हाशाथ हैनमुपससाद तꣳह यत्किंच पप्रच्छ सर्वꣳह प्रतिपेदे ॥ ४ ॥ तꣳहोवाच यथा सोम्य ते षोडशानां कलानामेका कलातिशिष्टाभूत्साऽन्नेनोपसमाहिता प्राज्वालीत्तयैतर्हि वेदाननुभवस्यन्नमयꣳहि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥ ६ ॥ —छांदोग्य, ६।७.

**अर्थः**—पिता म्हणाला, बाळा, ज्याप्रमाणे मोठ्या पेटवलेल्या अग्नीपैकीं खद्योताएवढी एक ठिणगी उरली असतां, तिच्यानें तिच्यापेक्षां

लहान वस्तुदेखील दहन होत नाहीं.–अर्थात् मोठी तर नाहींच–त्याप्रमाणें तुझ्या सोळा कलांपैकीं ( तूं पंधरा दिवस अन्न भक्षण केलें नाहींस यामुळे ) एक कला अवशिष्ट राहिली आहे, त्यामुळे तुला वेदांचा अनुभव घेतां येत नाहीं. आतां अन्न भक्षण कर. म्हणजे मी तुला सांगेन व तूं जाणशील. नंतर त्याने भोजन केले व तो पित्याकडे गेला. पित्याने त्याला जे जे (प्रश्न) विचारले. त्या त्या सर्वांचे त्याला ज्ञान झाले. तेव्हां पिता त्याला म्हणाला, बाळा, ज्याप्रमाणे मोठ्या पेटविलेल्या अग्नीपैकी उरलेली खद्योताएवढी ठिणगी सभोवतीं गवत घालून प्रज्वलित केली असता पुष्कळ दहन करू शकते, त्याप्रमाणे तुझ्या सोळा कलांपैकीं एक कला शिल्लक राहिली होती, ती अन्नाचे योगाने वाढवून प्रज्वलित केली, तेव्हां तिच्या योगानें वेदाचें ज्ञान अनुभविण्यास तू समर्थ झालास. म्हणून बाळा, मन अन्नमय आहे, प्राण उदकमय आहे आणि वाणी तेजोमय आहे. याप्रमाणे पित्याने सांगितलेले ज्ञान श्वेतकेतूला समजले.

तत्रैतच्छुंगमुत्पतित ऽ सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥३॥+++ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः+++॥६॥–छांदोग्य, ६।८-३।६.

अर्थः—हे शरीर त्या अन्नापासून अंकुराप्रमाणे उत्पन्न झाले आहे असे जाण.×××बाळा, सत् हेच या सर्व प्रजांचे मूळ आहे, आयतन आहे आणि प्रतिष्ठा आहे.

* * *

सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तद्धैक आहुरसदेवेदमग्र आसीदेकमेवाद्वितीय तस्मादसतः सज्जायत ॥१॥ कुतस्तु खलु सोम्यैव स्यादिति होवाच कथमसतः सज्जा येतेति सत्त्वेन सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥२॥ तदैक्षत बहु स्या प्रजायेयेति तत्तेजोऽसृजत तत्तेज ऐक्षत बहुस्या प्रजायेयेति तदपोऽसृजत॥ —छांदोग्य ६।२।१–३.

अर्थः—बाळा, जगाच्या उत्पत्तीचे पूर्वी एक, अद्वितीय असे सत् मात्र होते. कोणी म्हणतात पूर्वी एक अद्वितीय असे असत् होते. व त्या असतापासून सत् उत्पन्न झाले. पण बाळा, असे असतापासून सत् उत्पन्न होणे कसें शक्य होईल ? म्हणून पूर्वी सत्च–एक अद्वितीय असेच–होते. त्याने पाहिलें

कीं, मीं बहुत व्हावें, आणि मी (अधिक) उत्पन्न व्हावें. त्यानें तेज उत्पन्न केलें. त्या तेजाने पाहिले कीं मीं बहुत व्हावे आणि अधिक उत्पन्न व्हावे.

ह्या उताऱ्यांवरून पंडित असे म्हणतात कीं, अरुणीच्या म्हणण्याप्रमाणे सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम ही एक जाणीवेची क्रिया आहे आणि मूळच्या एकत्वांत जे अनेकत्व उत्पन्न होते, ते तद्भिन्न नसून तत्त्वतः एकरूपच असते. ज्याप्रमाणे असतांतून सत् उत्पन्न होऊं शकले नाहीं. त्याचप्रमाणे 'बहू' ही भेदरहित अभेदांतून उत्पन्न झालेले नाही. 'बहु' होण्याच्या पूर्वीं सत्नी तसा संकल्प केला. अर्थात् बहू होण्यापूर्वीं हे जग संकल्पांत होतेंच. परंतु केवलाच्या दृष्टीने संकल्प करणे व तसे असणे ह्या दोन्ही गोष्टी एकरूप असल्यामुळे, ह्या अरुणीच्या मनात कल्पनावादाची रूपरेषा दिसून येते, असे पंडितजींचे म्हणणें आहे. याबद्दल वेदान्त्याचे मत असे आहे की, अज्ञात रज्जूवर सर्प असावा त्याप्रमाणे बुद्धिपरिकल्पित सत्च्या अवयवापासून हा जगद्विकार-द्वैतप्रपञ्च ब्रह्मविवर्त संभवतो. पण हे जगत् अशी बुद्धि होते, तेव्हांही परमार्थतः सत्तत्व एकच व अद्वितीय असते. [ वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यमेवं सदेव सत्यमिति श्रुतेः ( घटे ). विकार हे केवळ वाचारम्भण आहे. मृत्तिकाच सत्य. त्याप्रमाणे सत्च सत्य आहे.]

[ २ ]

सोऽहं भगवो मन्त्रविदेवास्मि नाऽऽत्मविच्छ्रुत ꣳ ह्येव मे भगवद्दृशेभ्यस्तरति शोकमात्मविदिति सोऽहं भगवः शोचामि त मा भगवाञ्छोकस्य पारं तारयत्विति त ꣳ होवाच यद्वै किंचैतदध्यगीष्ठा नामैवैतत् ॥ ३ ॥ नाम वा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदआथर्वणश्चतुर्थ इतिहास पुराणः पञ्चमो वेदानां वेदः पित्र्यो राशिर्दैवो निधिर्वाकोवाक्यमेकायनं देवविद्या ब्रह्मविद्या भूतविद्या क्षत्रविद्या नक्षत्रविद्या सर्वदेवजनविद्या नामै वैतन्नामोपास्स्वेति ॥ ४ ॥

—छांदोग्य ७।१।३–४.

**अर्थः**—भगवन् ( सनत्कुमार ) तथापि मी केवल शब्दार्थ मात्र जाणणारा आहे; मला ( नारदाला ) आत्मज्ञान झाले नाहीं. आत्मज्ञानी मनस्तापाच्या पलीकडे जातो, असे मीं आपणासारख्या थोर पुरुषांकडून ऐकले आहे. हे भगवन्, पण माझे मन ताप पावत आहे. करितां आपण मला शोकाच्या

पैलतीरीं न्या. सनत्कुमार म्हणाले, तुला जे ज्ञान झाले आहे, ते केवळ नाममात्र आहे. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, चवथा अथर्ववेद, पांचवा इतिहासपुराण, व्याकरण, श्राद्धकल्प, गणित, उत्पातादिज्ञान, विधि, तर्कशास्त्र, नीतिशास्त्र, निरुक्त, वेदविद्या, भूततंत्र, धनुर्वेद, ज्योतिष, सर्पविद्या, ललितविद्या हे सर्व ज्ञान नाममात्र आहे. या सर्व नामांची ब्रह्मबुद्धीने उपासना कर.

याप्रमाणे नामापासून वाणि, मन, संकल्प, चित्त, ध्यान इत्यादि भूमापर्यंत एकवीस प्रकारच्या उपासना सनत्कुमारानी एकापुढे एक नारदास सांगितल्या आहेत. त्यात हेगेलच्या सत्त्वापासून केवलापर्यंतच्या कल्पनाचे स्मरण होते असे पंडित म्हणतात. आता एका कल्पनेतून दुसरी कशी निघाली हे जरी सनत्कुमारानी दाखविले नाहीं, तरी त्यांस अनतत्वाची कल्पना बरोबर आली होती, असे पंडितजी सांगतात. आतां वस्तुतः नामापासून भूमापर्यंतची संगति भाष्यकारानी लावलीच आहे. शिवाय वेदान्तसिद्धान्ताच्या दृष्टीने ती गोष्ट फारशी महत्त्वाची नाहीं. अधिकारभेदाने निरनिराळ्या उपासना उपनिषदात सांगितल्या आहेत खऱ्या, पण त्या गौण म्हणूनच सांगितल्या आहेत. निरनिराळीं शास्त्रे ईश्वराचे सत्य स्वरूपच प्रकट करतात, असा जो ब्राह्माचा सिद्धान्त आहे, त्यासही वरील अवतरण कसे अनुकूल होते ते समजत नाहीं. असो. आतां त्यांचा दुसरा उतारा घेऊं.

[ ३ ]

यत्र नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमाऽथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यद्विजानाति तदल्पं यो वै भूमा तदमृतमथ यदल्पं तन्मर्त्यꣳ स भगवः कस्मिन्प्रतिष्ठित इति स्वे महिम्नि यदि वा न महिम्नीति ॥ १ ॥ गोअश्वमिह महिमेत्याचक्षते हस्तिहिरण्यं दासभार्यं क्षेत्राण्यायतनानीति नाहमेवं ब्रवीमि ब्रवीमीति होवाचान्यो ह्यन्यस्मिन्प्रतिष्ठित इति ॥ २—छांदोग्य, ७।२४।१–२.

स एवाधस्तात्स उपरिष्टात्स पश्चात्स पुरस्तात्स दक्षिणतः स उत्तरतः स एवेदꣳ सर्वमित्यथातोऽहंकारादेश एवाहमेवाधस्तादहमुपरिष्टादहं पश्चादहं पुरस्तादहं दक्षिणतोऽहमुत्तरतोऽहमेवेदꣳ सर्वमिति ॥१॥—छांदोग्य, ७।२५।१.

**अर्थ**:—जेथे दुसरे कांहीं दिसत नाहीं, दुसरें कांहीं ऐकूं येत नाही

दुसरे कांहीं जाणतां येत नाहीं. त्याचें नांव निरतिशयत्व (भूमन्). जेथे दुसरे पाहता येतें, ऐकतां येते, जाणतां येते त्याचें नांव अल्प. जे भूमन् ते मृत्युरहित, जे अल्प अविद्याकाली विद्यमान असणारे ते मर्त्य. नारद म्हणाला, भगवन्! तो भूमन् कशामध्ये स्थित आहे ? तो स्वताच्याच विभूतीमध्ये (महात्म्यामध्ये) स्थित आहे. आणि तो विभूतीमध्ये स्थित नाहींही. गाई, अश्व, हत्ती, सुवर्ण, दास, भार्या, शेतवाडी, घरं इत्यादिकांना महिमा समजतात हा महिमा ज्याच्याजवळ असतो, तो मनुष्य ज्याप्रमाणे (त्या महिम्याहून अन्य असून) अन्याचे ठिकाणी स्थित असतो तसा, हा भूमन् नाहीं, असं मी सांगतो.

तो खालीं आहे, वर आहे, पाठीमागे, पुढे, उजवीकडे, डावीकडे तोच आहे. तोच हे सर्व आहे. (तो भूमन् जीवाहून इतर कोणी नाही, असे दर्शविण्यासाठी) अहंकारादेश सांगतात- मीच खाली आहे, मीच वर आहे. पाठीमागे, पुढे, उजवीकडे, डावीकडे मीच आहे. हे सर्व मीच आहे.

पंडित म्हणतात कीं, ह्यावरून हे उघड होते की, ज्ञाताज्ञात सर्व पदार्थांची बेरीज करून आपणांस अनंत गाठना येणार नाहीं. कोणत्याही पदार्थाच्या ज्ञानात आपण स्वतांला पहात असून त्या अहंप्रत्ययांत त्या पदार्थालाही पाहतो. ज्याअर्थी आपण सर्व पदार्थ पहात असता आपणालाच पाहतों. त्याअर्थी आपण म्हणजे आत्मा खालीं, वर, चोहोंकडे सचरला आहे, असे होते. सर्व कांही तोच आहे किंवा मीच आहे, असे आत्मदृष्टीने सनत्कुमार म्हणतात. म्हणजे आत्मरूपात विश्वरूप आणि विश्वरूपांत असे हे आत्मरूप असे द्वैताद्वैत सिद्ध होते.

आचार्यांचे मत असे नाहीं. ते वरील वचनावरील भाष्यात असे म्हणतात की, "अथान्यदर्शनविशेषप्रतिषेधेनाऽऽत्मानंपश्यतीत्युच्यते तदैकस्मिन्नेव क्रियाकारकफलभेदोऽभ्युपगतो भवेत्॥" अर्थः—बरे, दुसऱ्या दर्शनविशेषाच्या प्रतिषेधाने आपल्या स्वरूपाला पाहतो, असे म्हटले, तर एकामध्येच क्रियाकारक फलभेद मानल्यासारखे होते. "आत्मनो निर्विशेषैकत्वाभ्युवगमे दर्शनादिक्रियाकारक फलभेदाभ्युपगमस्य शब्दमात्रत्वात्॥ अर्थः- आत्म्याचे निर्विशेष एकत्व स्वीकारले असता दर्शनादि क्रियाकारक फलभेद मानणे केवळ शब्दमात्र आहे. "अन्यत् न पश्यति" असे विशेषण असल्या-

मुळें आत्म्याचे स्वदर्शन संभवतें असें म्हणतां येत नाहीं. कारण अदृश्ये-ऽनात्म्ये ( तैत्तिरीय २।७ )=अदृश्य ब्रह्मामध्यें. " न संदृशेतिष्ठति रूपमस्य " ( काठकोपनिषद् २।३।९ )=याचे रूप दर्शनविषयामध्ये रहात नाहीं. " विज्ञातारमरे के न विजानीयात " ( बृहदारण्यक २।४ )=विज्ञात्याला कोणत्या साधनाने जाणावे ? अशा श्रुति आहेत. शिवाय छांदोग्यांतच " एकमेवाद्वितीयं " " तत्त्वमसि " इत्यादि एकत्वसूचक सिद्धान्तवचने अनेक आहेत.

[ ४ ]

स होवाच यदूर्ध्वं गार्गि दिवो यदवाक् पृथिव्या यदन्तरा द्यावापृथिवी इमे यद्भूतं च भवच्च भविष्यच्चे त्याचक्षत आकाश एव तदोतं च प्रोतं चेति कस्मिन्नु खल्वाकाश ओतश्च प्रोतश्चेति ॥ ७ ॥ स होवाचैतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिवदन्ति ॥ — बृहदारण्यक, ३।८।७

अर्थः—जें भूलोकाच्या वर, पृथिवीच्या खालीं आहे, जे या पृथिवीच्या मध्ये आहे, ज्याला भूतवर्तमान व भविष्य म्हणतात, ते आकाशामध्ये ओत व प्रोत आहे. आकाश कशामध्ये ओत व प्रोत आहे ? गार्गि, याचे उत्तर ( आवाच्य आहे पण ) ब्राह्मण सांगतात कीं, ते क्षयरहित ( ब्रह्म ) आहे. ( सर्वविशेषण रहितमित्यर्थः। एकमेवाद्वितीय हि तत्केन कि विशिष्यते ॥ ८ ॥ भाष्यार्थ-अक्षर सर्व विशेषणरहित आहे असा भावार्थ. ते एकच अद्वितीय आहे. तेव्हां कोणते विशेषण कोणाला देणार ? कशाने कोणाला विशेषित करणार ? )

एतस्य वा अक्षरस्य प्रशासने गार्गि सूर्याचंद्रमसौ विधृतौ तिष्ठत...इ०.

—बृहदारण्यक, ३।८।९.

अर्थः—गार्गि, या अक्षर ब्रह्माच्या नियंत्रणाने निर्माण केलेले सूर्य व चद्र ( नियमानुसार ) वागतात.

* * *

तद्वा एतदक्षरं गार्ग्य दृष्टं द्रष्टृश्रुतं ँ श्रोत्रमतं मन्त्र विज्ञातं विज्ञातृ नान्यदतोऽस्ति द्रष्टृ नान्यदतोऽस्ति श्रोतृ नान्यदतोऽस्ति मन्तृ नान्यदतोऽस्ति विज्ञात्रे तस्मिन्नु खल्वक्षरे गार्ग्याकाश ओतश्च प्रोतश्चेति ॥ ११ ॥ — बृहदारण्यक, ३।८।११.

अर्थः—ते हे अ-क्षर अदृष्ट पहाणारे; अश्रुत श्रवण करणारे; अमत

मनन करणारे; अविज्ञात विज्ञातृ; असे आहे. याहून दुसरा कोणी द्रष्टा, श्रोता, मन्ता अथवा विज्ञाता नाहीं. गार्गि, यामध्यें आकाश ओत व प्रोत आहे.

* * *

स होवाच न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवत्यात्मनस्तु कामाय पति, प्रियो भवति। इ०. —बृहदारण्यक, २।४।५.

**अर्थः**— पतीच्या कार्याकरितां (भार्येला) पति प्रिय होत नसतो, आपल्याच कार्याकरितां पति प्रिय होतो. ( पंडितजी आत्मा या पदाचा अर्थ परमात्मा असा करतात.)

* * *

आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेय्यात्मनि खल्वरे दृष्टे श्रुते मते विज्ञात इदꣳ सर्वं विदितम् ॥६॥

—बृहदारण्यक, ४।५।६.

**अर्थः**—हे मैत्रेयि, या स्वतःला अर्थात् आत्म्याला पाहिले पाहिजे, त्याचे श्रवण केले पाहिजे, मनन केले पाहिजे, निदिध्यासन केले पाहिजे. आत्माचे दर्शन, श्रवण, मनन व विज्ञान झाले असतां हे (आत्म्याहून इतर) सर्व विज्ञान होते.

**इदं** ब्रह्म, इदं क्षत्रम्. इमे लोका, इमे देवा, इमे वेदा इमानि भूतानिदꣳ सर्वं यदयमात्मा ॥ ७ ॥ —बृहदारण्यक. ४।५।७.

**अर्थः**—हे ब्राह्मण, हे क्षत्रिय, हे लोक, हे देव, हे वेद, ही भूतें, हे सर्व हा आत्माच होय.

* * *

यत्र हि द्वैतमिव भवति तदितर इतरं पश्यति इ० + + + यत्रत्वस्य सर्वमात्मैवाभूत्तत्केन कं पश्येत्. + + + तत्केन कं विजानीयाद्येनेदꣳ सर्वं विजानाति तं केन विजानीयात्स एषनेति नेत्याम्या + + + विज्ञातारमरे केन विजानीयादित्युक्तानुशासनासि मैत्रेय्ये तावदरे खल्वमृतत्वमितिहोक्त्वा याज्ञवल्क्यो विजहार ॥ —बृहदारण्यक, ४।५।१५.

**अर्थ**—जर द्वैत असेल तर एक दुसऱ्याला पाहील + + + परंतु हें

सर्वच जेथे आत्मा आहे, तेथे काय कशानें पहाणार ? + + + कशानें कोणाला जाणणार ? ज्याचे योगाने हे सर्व जाणता येते, त्याला कशानें जाणावयाचे ? " असा नाहीं तसा नाही " असा वर्णिलेला आत्मा तो हा. सर्वांचा जो ज्ञाता त्याला कशाने जाणावयाचे ? हे मैत्रेयि, याप्रमाणे तुला ज्ञान सांगितले. अमृतत्वस्थिति ती ही. याप्रमाणे ज्ञान सांगितल्यानंतर याज्ञवल्क्याने सन्यास घेतला.

ह्या याज्ञवल्क्यगार्गिसंवादावरून तत्त्वभूषण पंडितांच्या दृष्टीने असे सिद्ध होते कीं, पदार्थ जसे दिसतात तसे नसतात. त्यास जाणणारा जो द्रष्टा त्याच्याशी दृश्याचा सापेक्ष संबंध असणे अगर नसणे, हे अनिश्चित नाही. जाणिवेहून ते दृश्य पदार्थ स्वतंत्र नाहींत. तसेच द्रष्ट्याहून त्यांस पृथक् सत्ता नाहीं. दिक्कालाने परिच्छिन्न असे दृश्य पदार्थ जरी अनेक व परिच्छिन्न असतात, तरी द्रष्ट्याचे ठिकाणीं हे भेद, मर्यादा अगर विकार नाहींत. यावरून सर्व पदार्थ व विचार अगर कल्पना यांच्या बुडाशीं सत्यंज्ञानमनंतं अशी एक अविभक्त व अनंत अशी जाणीव आहे. परंतु पदार्थांचे ऐक्य म्हणजे समरस होणे नव्हे. तांबडे आणि हिरवे ह्या एकाच मनाच्या संवेदना मनोरूपच खऱ्या, परतु त्यामुळे त्या मनाहून स्वतंत्र नसल्या तरी परस्पर भिन्न असतातच. आकाशाचे भेद कल्पिले तरी सबंध आकाशाच्या जाणिवेत त्यांचे ऐक्य होते. त्याचप्रमाणे निरनिराळे अहंकार अगर आत्मे हे ह्याच दृष्टीनें अनंताशीं एकरूप आहेत. निरनिराळ्या आत्म्यांचा समष्टीशी जो संबंध तो भेदांत अभेदरूप आहे. आणि त्यांचा आपसांतील संबंध अभेदांतील भेदाप्रमाणे आहे. याप्रमाणे ऐक्य मोडणारे भेद व ऐक्य जोडणारे भेद यांतील फरक औपनिषदिक ऋषींच्या फार करून लक्षांतच आला नाहीं. दृश्य व द्रष्टा हे स्वतंत्र भिन्न पदार्थ नसले; तरी त्याची सापेक्ष भिन्नताही त्यांच्या लक्षात येत नाहीं. यामुळे द्रष्य व द्रष्टा यांतील भेद ते आभासरूप मानतात. त्याचप्रमाणे जीवात्मा व परमात्मा यांचे तत्त्वतः ऐक्य असलें तरी परस्परांत भेद आहे, हे ते जाणत नाहींत व त्यांस हे भेद देहपातापर्यंत देहाच्या उपाधीमुळे—वास्तविक नसतांना भासतात असे वाटते, पण ही चूक कांही ऋषींच्या लक्षांत आली असे कौषीतकी उपनिषदातील इंद्रप्रतर्दनसंवादावरून पंडितजी दाखवितात.

[ ५ ]

स होवाच प्राणोऽस्मि प्रज्ञात्मा तं मामायुरमृतमित्युपास्व —कौषीतकी, ३।२.

अर्थः—इंद्र म्हणाला, मी प्राण आहे, मी प्रज्ञात्मा आहे. त्या माझी आयुष्य आणि अमृतत्व म्हणून उपासना कर.

ता वा एता दशैव भूतमात्रा अधिप्रज्ञं, दश प्रज्ञामात्रा अधिभूतं, यद्धि भूतमात्रा न स्युर्न प्रज्ञामात्राः स्युर्यद्वा प्रज्ञामात्रा न स्युर्न भूतमात्राः स्युः। न ह्यन्यतरतो रूपं किंचन सिध्येत् ॥

नो एतन्नाना तद्यथा रथस्यारेषु नेमिरर्पितो नाभावरा अर्पिता एवमेवैता भूतमात्राः प्रज्ञामात्रास्वर्पिताः,प्रज्ञामात्राःप्राणेऽर्पिताः।स एष प्राण एव प्रज्ञात्माऽऽनंदोऽजरोऽमृतः। न साधुना कर्मणा भूयान्नो एवा साधुना कनीयान्। एष ह्येवैनं साधु कर्म कारयति तं यमेभ्यो लोकेभ्य उन्निनीषत, एष उ एवैनम साधु कर्म कारयति तं यमेधो निनीषते। एष लोकपालः। एष लोकाधिपतिः। एष सर्वेशः स म आत्मेति विद्यात्सम आत्मेति विद्यात् -कौषीतकी, ३।८.

अर्थः—खरोखर त्या या दहा भूतमात्रा प्रज्ञे( प्रज्ञामात्रा )मध्ये स्थित आहेत, आणि दहा प्रज्ञामात्रा भूतांमध्ये स्थित आहेत. जर भूतमात्रा नसतील तर प्रज्ञामात्रा नसणार आणि जर प्रज्ञामात्रा नसतील, तर भूतमात्रा नसणार कारण दोहोंपैकीं एकापासून कोणतेही रूप सिद्ध होत नाहीं. आणि ( असे असून ) या दोहोंमध्ये भिन्नत्व नाही. ज्याप्रमाणे रथचक्राची नेमि अरांमध्ये स्थित असते, आणि अरा नाभीमध्ये स्थित असतात, त्याचप्रमाणे, या भूतमात्रा प्रज्ञामात्रांमध्ये स्थित आहेत. आणि प्रज्ञामात्रा प्राणामध्ये स्थित आहेत. तो हा प्राणच प्रज्ञात्मा. तो आनंद, अजर व अमर आहे. तो चांगल्या कर्माने वाढत नाहीं, वाईट कर्माने कमी होत नाहीं. ज्याला या लोकांमधून वर नेण्याची त्याची इच्छा होईल, त्याजकडून तोच चांगलीं कर्मे करवितो ! ज्याला खालीं नेण्याची त्याची इच्छा होईल त्याजकडून तोच वाईट कर्में करवितो. तोच लोकांचा पालनकर्ता. तोच लोकांचा स्वामी, तोच सर्वांचा स्वामी, तोच माझा आत्मा असे जाणावे, तोच माझा आत्मा असें जाणावे.

  

पंडित सीतानाथ तत्त्वभूषण म्हणतात कीं, वरील उताऱ्यांवरून असे उघड दिसते की, त्यांत केवळ विषयिविज्ञानवाद किंवा विषयविज्ञानवाद नसून ज्यांत विषयविषयीचे द्वैताद्वैत आहे असा केवळ कल्पनावाद ( Absolute Idealism ) अगदी स्पष्ट आहे. तो प्रच्छन्न बौद्धाच्या ( आद्य-शंकराचार्यांच्या ) अद्वैतमताहून अगदीं भिन्न आहे. या कौषीतकी उपनिषदातील इंद्रप्रतर्दनसंवादावर पंडित सीतानाथ याची विशेष भिस्त आहे. किंबहुना साऱ्या उपनिषदात स्वमतास पुष्टि देणारा असा एवढाच उतारा त्याना मिळाला आहे, असे म्हटल्यास चालेल.

ह्यावर आम्हास तूर्त इतकेच सुचवावयाचे की, इंद्रप्रतर्दनसंवादातील जीवनचक्राचा तुंबा अथवा नाभि म्हणजे प्राण व प्राण म्हणजे प्रज्ञा येथेच तो दृष्टान्त संपतो. प्रज्ञा म्हणजे एकमेवाद्वितीयं ब्रह्म असाच निश्चित अर्थ वरील वचनातून निघत नाहीं. फार तर प्रज्ञा हा शब्द ईश्वरवाचक मानतां येईल. पण तो परब्रह्मवाचक मानण्याचे कारण दिसत नाही. "प्रज्ञानं-ब्रह्म" "विज्ञानं-ब्रह्म" "ही परब्रह्माची स्वरूपे थोडीबहुत तरी नामरूपात्मकच होतात."

शिवाय कौषीतकी हे मुख्य दशोपनिषदापैकीं नसून ब्राह्मणोपनिषद् असल्यामुळे आरण्यकापेक्षा त्यास उत्क्रांतवादी ब्राह्मांनी कमीच लेखले पाहिजे. असो. आता अखेर ब्राह्माच्या ध्येयाबद्दल पंडित काय दाखवितात, व वेदान्त-मताचे ते कसें निराकरण करतात ते पाहूं.

[ ६ ]

यद्वै तन्न पश्यति पश्यन्वै तन्न पश्यति न हि द्रष्टुर्दृष्टेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वात् । न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्यद्विभक्तं यत्पश्येत् ॥२३॥ + + + यद्वै तन्न विजानाति विजानन्वै तन्न विजानाति न हि विज्ञातुर्विज्ञातेर्विपरिलोपो विद्यतेऽविनाशित्वान्न तु तद्द्वितीयमस्ति ततोऽन्य द्विभक्तं यद्विजानीयात ॥ ३० ॥ —बृहदारण्यक, ४।३।२३-२९.

**अर्थ**—( सुषुप्त स्थानामध्यें ) तो जे पहात नाहीं तें ( वास्तविक ) पहात असून पहात नाहीं; कारण द्रष्टयाच्या दृष्टीचा कांहीं लोप झालेला नसतो; त्या दृष्टीचा विनाश झालेला नसतो. त्याला पहातां येईल, असें पण त्याच्या-

हून निराळे असे दुसरे कांहीं नसते. + + + तो जे जाणत नाहीं, ते ( वास्तविक ) जाणीत असून जाणीत नाहीं; कारण त्याच्या विज्ञातृत्वाचा कांहीं लोप झालेला नसतो; विज्ञातृत्वाचा विनाश झालेला नसतो. त्याला जाणतां येईल असे पण त्याच्याहून निराळें असे दुसरे कांहीं नसते.

× × स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति भगवतो वचो वेदयन्ते तमिच्छन्ता ववास्तमिति ॥३॥—छांदोग्य, ८।७।३.

**अर्थः**—जो त्या आत्म्याचा शोध करून त्याला जाणतो, त्याला सर्व लोक प्राप्त होतात, त्याचे सर्व काम पूर्ण होतात, असे आपले वचन आहे, असें ज्ञाते सांगतात. त्या आत्म्याची इच्छा करीत आम्ही ( इंद्रविरोचन ) येथे राहिलो.

* * *

स होवा च नाह खल्वयं भव एवं सम्प्रत्यात्मानं जानात्ययमहमस्मीति नो एवेमानि भूतानि विनाशमेवापीतो भवति नाहमत्र भोग्यं पश्यामीति ॥२॥

—छांदोग्य, ८।११।२.

**अर्थः**—इंद्र म्हणाला, भगवन्, हा आत्मा देखील ( सुप्तावस्थेत ) हा मी आहे आणि ही भूतें आहेत असे जाणीत नाही. म्हणून हादेखील जणुकाय विनाशीच. म्हणून यामध्ये मला कांहीं फल दिसत नाहीं.

तं वा एतं देवा आत्मानमुपासते तस्मात्तेषां सर्वे च लोका आत्ताः सर्वे च कामाः स सर्वांश्च लोकानाप्नोति सर्वांश्च कामान्यस्तमात्मानमनुविद्य विजानातीति ह प्रजापतिरुवा च प्रजापतिरुवाच ॥६॥ —छांदोग्य, ८।१२।६.

अर्थः—अशा या ( इंद्राला प्रजापतीनें सांगितलेल्या ) आत्म्याची देव उपासना करतात. म्हणून त्यांना सर्व लोक व सर्व काम प्राप्त झालेले आहेत. जो या आत्म्याचे पूर्ण ज्ञान करून घेऊन त्याला जाणतो, त्याला सर्व लोक व सर्व काम प्राप्त होतात, असे प्रजापतीचे वचन आहे.

* * *

एवमेवैष संप्रसादोऽस्माच्छरीरात्समुत्थाय परं ज्योतिरूपसंपद्य स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते इ. —छांदोग्य, ८।१२।३.

**अर्थः**—त्याप्रमाणे ह्रादेखील ( आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर )•प्रसन्नचित्त होत्साता ( मरणसमयीं ) या शरीरांतून वर निघून श्रेष्ठ अशा ( ईश्वराच्या ) ज्योतीप्रत प्राप्त होऊन स्वतांच्या रूपाने युक्त होतो.

तद्यथा श्रेष्ठी स्वैर्भुंक्ते यथा वा स्वाः श्रेष्ठिनं भुजन्त्येवमेवैष प्रज्ञात्मैतैरात्मभिर्भुंक्ते एव वै तमात्मानमेत आत्मानोभुजन्ति ॥+++तथो एवैवं विद्वान्सर्वान्पाप्मनोऽपहत्य सर्वेषां भूतानां श्रैष्ठ्यं स्वाराज्यमाधिपत्य पर्येति य एवं वेद य एवं वेद ॥—कौषीतकी, ४।१९. [ इतिऋग्वेदीया कौषीतकि ब्राह्मणोपनिषत्समाप्ता ]

अर्थः—ज्याप्रमाणे धनी आपल्या माणसांसहवर्तमान भोजन करतो आणि ज्याप्रमाणे ती माणसें त्याचेंच अन्न खातात, त्याप्रमाणे हा प्रज्ञात्मा त्या आत्म्यांसह ( म्हणजे इंद्रियांसह ) भोग भोगतो आणि इंद्रिये त्याच्याकरितांच भोग भोगतात.+++ज्याला ( इंद्राप्रमाणे ) हे ज्ञान होते, तो सर्व पापांना मारून सर्व भूतांचे श्रेष्ठत्व, निरंकुश राज्य आणि स्वामित्व पूर्णत्वाने मिळवितो.

* * *

आचार्यकुलाद्वेदमधीत्य यथाविधानं गुरोः कर्मातिशेषेणाभिसमावृत्य कुटुंबे शुचौ देशे स्वाध्यायमधीयानो धार्मिकान्विदधदात्मनि सर्वेंद्रियाणि संप्रतिष्ठाप्याहिंसन्सर्वभूतान्यन्यत्र तीर्थेभ्यः स खल्वेवं वर्तयन्यावदायुषं ब्रह्मलोकमभिसंपद्यते न च पुनरावर्तते न च पुनरावर्तते ॥ इतिसामवेदीया छांदोग्योपनिषत्समाप्ता ८।१५।१.

अर्थः—आचार्यांच्या गृहीं आचार्यांचे काम करून उरलेल्या वेळांत विधिपूर्वक वेदांचे अध्ययन करून गृहस्थाश्रमी होऊन शुद्ध ठिकाणीं स्वाध्यायाचें अध्ययन करणारा व पुत्रशिष्यादिकांना धर्मयुक्त करणारा, सर्व इंद्रिये आत्माच्या ठिकाणी स्थित करून, भूतमात्राला, तीर्थाटनादि शास्त्रोक्त खेरीजकरून, पीडा न देतां, जो याप्रमाणे वर्तन करतो, तो ब्रह्मलोक पावतो. तो पुन्हा परत येत नाहीं.

ह्या उताऱ्यांवरून पंडितजी असें दाखवूं पाहतात कीं, कौषीतकी व छांदोग्य ह्या ऋग्वेदीय व सामवेदीय उपनिषदांच्या शेवटीं जीवात्मा ब्रह्मांत

लीन होतो, असा लयवाद नाहीं. बृहदारण्यकाचा कदाचित् तसा अभिप्राय आहे, असे म्हणतां येईल. याप्रमाणे औपनिषदिक विचारपद्धतींत एकवाक्यता नाहीं. अद्वैत वेदान्तांतील लयवाद, संन्यासवाद आणि खऱ्या उपासनेचा निषेध हीं असंबद्ध व घातक तत्त्वे वरील उपनिषदात मान्य केलेलीं नाहींत, ही गोष्ट फार महत्त्वाची आहे, असे पंडितजी म्हणतात. ते आणखी असे म्हणतात कीं, लयवादाची कल्पना सुप्तावस्थेच्या अनुभवावरून घेतली आहे; पण ती उघड उघड चूक आहे. कारण जागृतीतील बाह्य पदार्थांची सुसंगति द्रष्ट्याच्या निरपेक्ष असते. अर्थात् स्वप्नसृष्टीची उपमा जागृतावस्थेतील सृष्टीस लावतां येणार नाही. कौषीतकी व छांदोग्य अशा उपनिषदात आत्म्याचा ब्रह्मात लय वर्णिला नसून ब्रह्मलोकप्राप्ति सांगितली आहे व त्या ठिकाणीं देवही आत्म्याची सेवा करतात, वगैरे वर्णनावरून तेथे अद्वैतवाद्यांचे एकरस ब्रह्म नसून भेदसहित सामाजिक जीवन आहे. यावर आम्ही वेदान्तमतदर्शक गीतारहस्यातील खालील उतारा वाचकांस सादर करतो.

"उपासनेसाठीं घेतलेल्या सूर्यादि प्रतीकाच्या म्हणजे सगुणब्रह्माच्या उपासनेने जे ब्रह्मज्ञान होते, ते प्रथम थोडे अपुरे असते. कारण, त्यामुळे सूर्यलोक किंवा ब्रह्मलोक इत्यादिकांच्या कल्पना मनांत उद्भवून त्या मरणसमयींही कमीजास्त मानाने कायम असण्याचा संभव असतो. म्हणून ही कसर काढून टाकून मोक्ष मिळण्यास अशा लोकांनी देवयानमार्गानेच गेले पाहिजे, हे म्हणणे सयुक्तिक आहे. (वे. सू.४।३।१५) +++ पण ब्रह्म व स्वतःचा आत्मा याच्या दरम्यान अशा तऱ्हेचा कोणताही द्वैती आडपडदा (तैत्ति० २।७) ज्याच्या मनांत यत्किंचित् शिल्लक राहिला नाहीं, तो नेहमीच ब्रह्मरूप होत असल्यामुळे, अशा पुरुषास ब्रह्मप्राप्तीस्तव दुसऱ्या कोठेच जावयाचे काही कारण रहात नाहीं, हे उघड आहे. यासाठी शुद्ध ब्रह्मज्ञानाने जो पुरुष पूर्ण निष्काम झाला. "न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति"—त्याचे प्राण दुसऱ्या कोठेही जात नाहीत, तो नित्य ब्रह्मभूत असून ब्रह्मांतच लय पावतो. (बृह० ४।४।६) अशा प्रकारचा पुरुष "अत्र ब्रह्म समश्नुते" (कठ ६।१४) येथल्या येथेच ब्रह्म अनुभवितो, असे बृहदारण्यक व कठ या दोन्ही उपनिषदांत वर्णन आहे." इ० [गीतारहस्य—पृष्ठ २९५।२९६].

बृहदारण्यकांतील अवतरणांत तर याज्ञवल्क्यांनीं संन्यास घेतल्याचें स्पष्ट म्हटलेंच आहे. एकंदरींत ह्या आरण्यकातले उतारे पंडितजींच्या मतास अगदींच विरुद्ध आहेत. मग केवळ ब्रह्मवादिनी स्त्रियांच्या गौरवास्तवच पंडितजींनीं त्याचा उल्लेख केला असल्यास न कळे!

पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यानी लिहिलेल्या 'उपनिषदाचा ईश्वरवाद' या नावाच्या पुस्तकांत वरील प्रकारचे विचार आहेत. उपनिषदात ईश्वर-वाद आहे, तसा ब्रह्मवादही आहे. त्यात जशी सगुणोपासना आहे तशी सगुण-निर्गुण व केवळ निर्गुण अशीही उपासना सांगितली आहे. शांडिल्यविद्या (छां० ३।१४), पुरुषविद्या (छा० ३-१६, १७) पर्यंकविद्या (कौषी० १।१), प्राणोपासना (कौषी० २), इत्यादि अनेक प्रकारच्या विद्या म्हणजे उपासना उपनिषदात वर्णिल्या आहेत. त्यात अन्न, प्राण, मन, विज्ञान इत्यादि अनेक ब्रह्मप्रतीके आहेत. पण सर्व उपनिषदाचा असा सिद्धान्त आहे की, वास्तविक ब्रह्मस्वरूप याहून भिन्न आहे. (केन १।२–८). वरील प्रकारच्या निरनिराळ्या उपासनाच्या वर्णनात कोठे द्वैती भाषा आली आहे, कोठे अगदी गौण अशा ब्रह्मप्रतीकांची महती वर्णली आहे, कोठे सगुणनिर्गुण अशी दोन्ही विशेषणे लाविली आहेत. आणि कोठे विरुद्धार्थी विशेषणाच्या जोड्याही उपयोजिल्या आहेत, तरी अधिकारभेद व रुचिभेद हे लक्षात घेऊन सांगितलेल्या ह्या सर्व गौण उपासना अखेरच्या अद्वैत सिद्धान्तास बाध आणतात असे म्हणतां येणार नाही. असो.

तथापि उपनिषदांतून ब्राह्मांचा अखंड द्वैताद्वैत सिद्धात सिद्ध करता येतो, असे दाखविण्याचा पंडित सीतानाथ याचा प्रयत्न आहे. बृहदारण्यकातील ब्रह्मवादिनी स्त्रियाच्या सभाधीटपणावरून बरेच शिकण्यासारखे आहे असें पंडिताचे म्हणणे आहे. तरी त्यावरून आज स्त्रीस्वातंत्र्य व स्त्रीशिक्षण या-संबंधी होणारा अविवेक समर्थनीय कसा ठरतो हे समजणे कठीण आहे. तसेच त्याच संवादाच्या अखेर याज्ञवल्क्यांनीं आपल्या पत्नीस सोडून संन्यास घेतला, हेंही त्यांच्या विचारसरणीस विरुद्धच आहे. त्याचप्रमाणे कौषितकी उपनिषदांतील इंद्रप्रतर्दनसंवाद जरी त्यांस फार आवडला असला, तरी त्या उपनिषदांतून ज्ञानसंस्कार जीवाच्या प्राणांत किंवा त्याच्या हितानाडींत सूक्ष्मरूपानें राहतात, हें तत्त्व त्यांच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या मुद्द्यांस जुळते

नाहीं. त्यामुळें सर्व प्रकारच्या कल्पना, विचार, किंवा ज्ञानसंस्कार परमात्म्याच्या ठिकाणीं तिन्ही काळीं सिद्ध असतात व तेथूनचे ते जीवास वेळोवेळीं मिळून त्याचें अज्ञान व सुषुप्तीतील विस्मृति दूर करतात. हा जो त्यांचा मुख्य सिद्धांत त्यास दुजोरा मिळत नाहीं. उलट पाण्यानें भरलेली घागर दोर लावून विहिरींत सोडावी व पुन्हा लागेल तेव्हा ती जशीच्या तशी दोरानें विहिरींतील पाण्याच्यावर ओढून घ्यावी अशाच प्रकारें जीवाचे ज्ञानसंस्कार सूक्ष्म शरीरात राहून ते कर्मसंधान वेळेवर बाहेर आणले जातात, हीच कल्पना श्रुतिसंमत व सयुक्तिक दिसते. म्हणजे कल्पनांचा अथांग भरलेला बाजार ही मोठ्या भाजी मार्केटाची उपमा एकमेवाद्वितीयं अशा ब्रह्माशी मुळीच जुळत नाहीं !

ते कांहीं असो पण बहुतेक साधारण-ब्राह्मांचें स्पष्ट द्वैतमत पंडित सीतानाथ यांस पटलें नाहीं, म्हणून त्यांनी वेदांतमतास अधिक जवळ असा आपला नवीन द्वैताद्वैत सिद्धांत काढला आहे. साधारण-ब्राह्मांनीं आपली हिंदूंची धार्मिक वाङ्मयाची पूर्वपरंपरा साफ तोडलेली पंडितजींस आवडली नाहीं, म्हणून त्यांनी मोठ्या आस्थेनें आपली विचारपरंपरा उपनिषदांशीं जोडण्याचा आस्थापूर्वक प्रयत्न चालविला आहे; तसेंच केशवचंद्राच्या नवसंहितेप्रमाणें साधारण ब्राह्माच्या अनुष्ठानपद्धतीचें पुस्तक जरी इंग्रजींतच असलें, तरी प्रार्थना व संस्कार यांत संस्कृत वाङ्मयाच्या थोडातरी उपयोग करण्याइतकी आस्था अप्राण साधारणब्राह्मापैकीं कांहींच्या ठिकाणीं दिसत आहे; आणि वेगळ्याच अर्थांनीं कां होईना पण उपनिषदांतील प्रासादिक वचनें त्यांच्या प्रार्थनासंग्रहांत आढळत आहेत; ही समाधानाचीच गोष्ट आहे असो. आतां पंडितजींचा शास्त्रविचार पुढील प्रकरणांत पाहूं.

---

## प्रकरण आठवें

# शास्त्रविचार

हिंदुधर्मांत अनेक पंथभेद असले, तरी प्रामाण्यबुद्धिर्वेदेषु हे लक्षण सर्व पंथांनीं स्वीकारले आहे. राजा राममोहन व देवेंद्रनाथ यांची बुद्धिही बहुतांशीं अशीच होती. स्मृतिग्रंथापैकीं मनुस्मृतीचाही उपयोग देवेंद्रनाथांनीं थोडाफार केलेला आहे. परंतु केशवचंद्रांपासून हे धोरण सुटले ते सुटलेच. केशवचंद्राचे अनुयायी पुन्हा वेदान्ताकडे वळले; आणि साधारण ब्राह्माचे अध्यक्ष पंडित सीतानाथ तत्वभूषण मागिल प्रकरणात लिहिल्याप्रमाणे उपनिषदें चाळूं लागले, तरी तो मागूनचा विचार होय. आरंभापासूनचा त्याचा हा विचार असता, तर हे कलम हिंदुधर्मावर कदाचित् हळुहळू सांधले गेले असते. परंतु ख्रिस्ती धर्म व ख्रिस्ती तत्त्वज्ञान यांचे तयार झालेले कलमच त्यांनीं बंगाली भूमींत रोवले. तेथे त्यास हिंदुस्थानातील पुण्यभूमि व हवापाणी हीं जरी विशेष अनुकूल नसलीं, तरी पाश्चात्य शास्त्राचे खत त्यास चांगलेच मानवेल, आणि ह्या बौद्धिक ईश्वरवादाच्या नवीन रोपड्याचीं मुळे हळुहळू खोल जाऊन त्याचा विस्तार इतका वाढेल कीं, त्याच्या छायेत बाकीची सारीं पंथभेदांचीं झुडपे खुरटून नामशेष होतील, आणि अशा रीतीने ह्या ब्राह्मवृक्षाच्या पारब्यांनी हा पृथ्वीगोल व्याप्त होईल, अशी ब्राह्मास आशा आहे. तेव्हां ब्राह्मांनीं वापरलेलीं पाश्चात्य शास्त्रांचीं असलीं ही जोरकस खते तरी कोणतीं, याचा आतां विचार करूं.

मागे एके ठिकाणीं आम्हीं दर्शविलेच आहे कीं, पाश्चात्य ईश्वरवादाची भिस्त, (१) विश्वरचनाशास्त्र, (२) हेतुशास्त्र, (३) सत्त्व-मीमांसाशास्त्र आणि (४) नीतिशास्त्र यांवर आहे. जड, जीव, मन आणि शील अगर नीति अशा विचाराच्या चार पायऱ्या कल्पून आपला ईश्वरवाद कसा सिद्ध होतो, ते त्यांनी दाखविले आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे ह्या चार पायऱ्या म्हणजे ईश्वरवादाच्या उत्क्रांतीतील निरनिराळे टप्पे किंवा पंथ होत. ते म्हणतात

की, दयानंदाच्या वैदिक एकेश्वरीवादाचा हेतुवादांत अंतर्भाव होतो. आणि स्वामी विवेकानंदांनीं सस्वरूपमीमांसेचा जरी प्रयत्न केला आहे, तरी त्याना त्यांतील सर्व गर्भित गोष्टी समजल्या नाहींत. आणि चवथ्या नैतिकवादाचा तर त्यांनीं मुळींच विचार केला नाही. असो.

आतां आपण प्रथम विश्वरचनाशास्त्रातील जड-वादासंबंधीं आह्मांचा विचार पाहूं. विश्वात काहीच नाश पावत नाही. नाश दिसतो तो नाश नसून रूपांतर आहे अर्थात् पदार्थाचे नाम आणि रूप बदलले, तरी पदार्थाची सत्ता नाहीशी होत नाही. एखाद्या सोन्याच्या दागिन्यावर घण मारला तर तो सोन्याचा दागिना नाहींसा झाल्यासारखा वाटेल, पण सोने कायमच राहील. त्या सोन्यावरही कांहीं रासायनिक क्रिया केल्यास त्याचेही रूप पालटेल. पण ते द्रव्य नष्ट होणार नाही. तात्पर्य, निरनिराळीं रूपांतरे होत असतां तीं ज्यावर होतात, असे ह्या रूपातराच्या बुडाशीं एक तत्त्व कायम असतें, म्हणूनच रूपांतर जाणवते. आतां ह्या रूपांतरात जो कार्यकारणभाव दिसतो, तो इतका निश्चित असतो कीं, अमुक कारणानंतर अमुक कार्य घडलेच पाहिजे, असा निरपवाद सिद्धान्त आढळतो. कार्य-कारणांत आढळणारा हा जो नित्य-संबंध तोच कारणाचें कार्यांत बिनचूक रूपांतर घडवून आणणारा व त्या रूपांतराचा साक्षी असतो. आपण ज्या क्रिया करतो, त्या क्रियांची संगति लावणारे असे आपले एक मन असते; त्याचप्रमाणे सृष्टीच्या रूपांतराच्या व कार्यकारणमीमांसेच्या नियमांची अंमलबजावणी करणारे असे एक सर्वगत मन मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. ते मनच कार्यकारणाचें एकीकरण करते, व त्यांचा संबंध जोडूं शकते. कारण व कार्य ह्यांच्या बुडाशीं एकच तत्त्व असतें, यामुळे कार्यकारणांतील व्यापार व त्याबद्दल निश्चितबुद्धि संभवते. असे जे एक व्यापक तत्त्व त्यासच कल्पनावादी व्यापक मन किंवा आत्मा म्हणतात.

विश्वरचनाशास्त्रातील गति अगर शक्ति या तत्त्वाचा निरनिराळ्या शास्त्रज्ञांनीं निरनिराळा विचार केला आहे. पाश्चात्य जडवाद्यांनीं शक्ति अगर गति यांचे मागे जाणीव किंवा इच्छाशक्ति मानली नाहीं. कारण ती जड-वाद्यांच्या कोष्टकात बसत नाहीं. पंडित म्हणतात कीं, आपल्या प्राचीन ऋषींनीं वेदांत या शक्तीचे वर्गीकरण करून इंद्र, वरुण, वायु, अग्नि अशा निरनिराळ्या देवता कल्पिल्या आहेत, आणि अशा

रीतीने सृष्टींत दिसून येणाऱ्या निरनिराळ्या शक्तींची संगति लावली आहे. परंतु आता जेम्स मार्टिन प्रभृति अलीकडील शास्त्रज्ञांनीं याचा अधिक खोल विचार करून असें ठरविलें आहे की, सृष्टीत निरनिराळ्या दिसणाऱ्या शक्ति या एकच गतिरूप आहेत. इतकेंच नव्हे तर जड द्रव्याचे परिमाणु हेही केवळ त्या गतींचेच केंद्र आहे. अशा ह्या सर्व विश्वाच्या घडामोडीच्या बुडाशीं असलेल्या मूलभूत गतीचे प्रेरक एक स्वतंत्र समष्टि मन मानल्यावाचून निर्वाह लागत नाहीं. कारण गतीच्या मागें कोणाची तरी इच्छा असली पाहिजे. आणि ज्याअर्थीं विश्वरचनाशास्त्रानें विश्वांतील विविधतेचें एकीकरण एका गतींत केलें आहे. त्याअर्थीं त्या गतीचे प्रेरक असें एकच व्यापक व सर्वज्ञ मन आहे, असें सिद्ध होतें.

येथपर्यंत द्रव्य व गति याचा विचार झाला. आता त्याहून थोडा सूक्ष्म विचार जीवनशास्त्रांत आपल्याला करावा लागतो. कारण द्रव्य आणि गति यांतील संबंध व नियम जीवनशास्त्राच्या विचारास पुरे पडत नाहींत. उदाहरणार्थ–(१) द्रव्याची वाढ बाहेरून होत जाते, परंतु जीवनाची वाढ आंतून होत असते. द्रव्याची वाढ म्हणजे केवल बेरीज होय. पण जीवनाच्या वाढींत जीवनास योग्य पदार्थांची निवड व त्या पदार्थांचें पचन ह्या दोन क्रिया फार महत्त्वाच्या असतात; (२)तसेंच मूळच्या एकरूपांतून विविधरूपांत व्यक्त होत जाणें, हा जीवनशास्त्रांतील विशेष आहे. (३) संबंध शरीर व त्याचे अवयव यातील व्यापार परस्परानुकूल असतात,ही अनुकूलताही जीवनशास्त्राचा विशेष आहे. व (४) पुनरुत्पादन हाही त्याच शास्त्राचा विषय आहे. ह्या चार विशेष प्रकारांची संगति गतिशास्त्र किंवा रसायनशास्त्र अथवा पदार्थविज्ञानशास्त्र, यांनीं लाणू शकत नाहीं. इतकेंच नव्हे तर तर गतिशास्त्र व रसायनशास्त्र यांत कारणांवरून कार्याचा निश्चय होतो. पण जीवनशास्त्रांत अंतिम कार्य हेंच कारणास हेतुभूत होतें. बीजाची पदार्थविज्ञानशास्त्रांनीं किंवा रसायनशास्त्रांनीं कितीही चिकित्सा केली, तरी त्यांतून वृक्ष निर्माण झालाच पाहिजे, असा कार्यकारणभाव त्यांस दाखवितां येणार नाही. अर्थात् पुनरुत्पत्ति हें अंतिम ध्येय साधण्यासाठीं जरूर ते सर्व रूपांतर व विकार घडवून आणण्याचा हेतु त्या बीजाच्या ठिकाणीं पूर्वींच अव्यक्त असतो. असे हेतु केवळ जीवनसृष्टींत अथवा

सेंद्रियपदार्थांतच आढळतात असे नव्हे; तर हवा, पाणी, उजेड, अन्न, अशा जड द्रव्याचा जीवाच्या जीवनाशीं पोष्य-पोषक असा जो संबंध असतो, तोही एक हेतुवादाचाच प्रकार होय. याशिवाय त्याचा खुलासा इतर भौतिकशास्त्रे करूं शकत नाहींत. ह्यावरून त्या अखिल चराचर सृष्टीच्या रचनेच्या बुडाशीं फार गुंतागुंतीची प्रचंड योजना आहे, असे उघड होते. योजना दिसली कीं, तेथे योजकाचे अनुमान करणे भागच पडते. आणि मग ओघानेच असे दिसून येते कीं, हे सर्व जग उत्पन्न होण्यापूर्वी योजकाच्या योजनेत पूर्वीच संकल्प रूपांत अव्यक्त असले पाहिजे. त्याचे हे योजनाकार्य अनादि व अनंतच मानणे भाग आहे. ह्यावरून असे सुसंगत संकल्प धारण करणारे एक व्यापक मन आहे, व त्याच्या ठिकाणीं बाह्य सृष्टीचे संकल्प नित्यसिद्धच आहेत असे उघड होते.

ह्याप्रमाणे जगत्कार्यावरून कारणरूप परमात्म्याचे अनुमान ब्राह्म करीत असतात. परंतु वेदांतमतास ही विचारपद्धति मान्य नाहीं. सृष्टीचे नियम या दृष्टीने कार्यकारणमीमांसा व हेतुवाद यांस कितीही महत्त्व असले, तरी त्यावरून सृष्टीहून पर अशा ब्रह्मस्वरूपाचा निश्चय करणे चुकीचे होईल. कारण वरील विचारपद्धतीत वर्तमानकालावरून भविष्यकाल व भविष्यकालानें वर्तमानकाल निर्णित होतो. हे जरी खरे आहे, तरी अशा प्रकारच्या नियमांवरून, या नियमांनी बांधलेला असाच नियामक असला पाहिजे, असे अनुमान काढणे व्यर्थ आहे. सर्वशक्तिमान् परमेश्वरास कार्यकारणवाद व हेतुवाद इत्यादि बंधनें कशी असणार? गंगेवर बांधलेल्या पुलात योजकाचे योजनाचातुर्य विलक्षण दिसले, तरी पुलावाचून गंगापार होता येत नाही, ही त्याची स्वाभाविक असमर्थताच अगोदर कबूल करणे भाग आहे. तात्पर्य, त्या सर्व योजनांच्या मर्यादा अमर्यादास लागत नाहींत. कार्यावरून कर्त्याची कल्पना कदाचित् होईल. पण अकर्त्याची कशी होईल? वेदान्तमताप्रमाणे परमपुरुषाकडे जगाचे कर्तृत्वच नाही. किंबहुना जगाचे अस्तित्वच खरे नाही. ते केवळ मायेचे भ्रमरूप कार्य आहे. तेथे वरील युक्तिवादास जागाच रहात नाहीं. असो, तूर्त ब्राह्म दृष्टीपुरताच विचार केला, तर त्यांनीं निदान जडवाद्यांची कारण-मीमांसा व हेतुवाद्यांची योजना, ह्यांवरून अखिल विश्वरचनेच्या बुडाशीं द्रव्य व मन ह्या दोन वस्तु असल्याचे सिद्ध केले. आतां ह्या पुढील एकीकरणाचें

काम सत्स्वरूप ममिांसेचे असून त्या सत्ता शास्त्राच्या आधाराने पंडित तत्त्वभूषण असे सिद्ध करतात की, द्रव्य व मन ह्या मूलभूत दिसणाऱ्या वस्तूंसही स्वतंत्र भिन्न अस्तित्व नसून त्याचा संबंध त्या एका परमपुरुषाशीं आहे.

आता द्रव्य हे सत्तावाचक आहे, आणि मन संकल्परूप आहे. परंतु संकल्प आणि सत्ता यात जमीन-अस्मानाचे अंतर आहे. आपल्या खिशात चार पैसे आहेत, अशी केवळ कल्पना करणं व खिशात प्रत्यक्ष पैसे असणं, ह्या गोष्टी अत्यंत भिन्न आहेत. तेव्हा कल्पना आणि सत्ता या दोन पदार्थास जोडणारी वस्तु म्हणजे ज्ञान होय. आपण एखादा पदार्थ पहातो म्हणजे त्याच्या अस्तित्वाचे आपल्याला ज्ञान होते. त्या ज्ञानक्रियेत पदार्थाच्या गुणसमुदायरूपाच्या खालील जे वस्तूचे ज्ञेय स्वरूप ते जीवाच्या गुणसंवेदनांच्या बुडाशीं असलेल्या आत्मरूपाशीं तत्त्वतः एकरूपच असते. म्हणजे द्रष्टयाचे आत्मरूप व दृश्याचे आत्मरूप ही तत्त्वतः एकच असतात, व पदार्थज्ञानांत (द्रष्टयाचा) आत्मा (दृश्याचे) आत्म्यासच विषय करून पहात असतो. अशा रीतीने आत्म्याचे ठिकाणीं विषयविषयीभाव राहणें, याचेच नांव पदार्थाचे अस्तित्व होय. कारण बाह्य म्हणून वाटणाऱ्या पदार्थाच्या सूक्ष्म भागाचे व गुणसमुदायाचे एकीकरण करणारे मन त्या पदार्थाच्या बुडाशीं असते, म्हणून त्या पदार्थाची एकरूपाने व्याप्ति अगर आकार सिद्ध होतो. म्हणजे ते मन व त्या मनासच विषयभूत झालेला एकीकरणात्मक संकल्प मिळून विषयविषयीरूप तो पदार्थ होतो. याप्रमाणे अखिल बाह्यसृष्टीस आपल्या पोटांत सामावणारे आकाश व काल, म्हणजे त्यांच्या समसत्तेच्या व्यापक मनाने केलेला बाह्य पदार्थाचा प्रचंड एकीकरणात्मक संकल्प होय. अर्थात् अखिल विश्व हे त्या व्यापक मनांत संकल्परूपच सिद्ध झाले. ते जे बाह्य वाटते ते जीवाच्या मर्यादित मनाच्या दृष्टीने होय. विस्मृति, निद्रा व अज्ञान हे व्यष्टिमनाच्या ज्ञानास प्रतिबंध आहेत. ते व्यापक मनास नाहीत. अर्थात् व्यापक मनात सर्व विश्व संकल्परूपाने नित्यसिद्ध असून त्याच्याबाहेर कांहींच नाहीं. संकल्परूप बाह्य पदार्थ परस्परभिन्न आहेत. पण त्यांचे संकल्प करणाऱ्या व्यापक मनाच्या ठिकाणीं ऐक्य आहे. याप्रमाणे ज्ञेयरूपांत भिन्न व ज्ञातेपणांत एक असे द्वैताद्वैत आहे. म्हणजे सर्व मने ज्ञेयरूपांनीं भिन्न व ज्ञातेपणाने तत्त्वतः एकरूपच आहेत. यावरून परब्रह्म हे केवळ अद्वैत

नसून, विज्ञानात्मे, आणि विज्ञानात्मक विविधरूप जग ह्या परब्रह्मांतीलच अवस्था आहेत स्वामी विवेकानंद-पंथाने जो केवळ अद्वैतमताचा पुरस्कार चालविला आहे, ती त्याची चूक आहे असे पंडित सीतानाथ याचे म्हणणे आहे.

हा ब्राह्माचा कल्पनावाद तर वेदान्तास मान्य नाहीच पण त्या कल्पनावादांतर्गत असलेला जो सत्तावाद, तोही वेदान्तास धरून नाही. कारण एक सत्ता मानली की, त्याचेबरोबर त्रिपुटी किंवा ब्राह्माच्या मताने ज्ञाताज्ञेय भाव हा आलाच. अर्थात् सच्चिदानंद ब्रह्म अथवा सत्यज्ञानमनंतमब्रह्म असे जरी वेदान्ती म्हणतात तरी त्यातील सत् हे पदही परब्रह्मास असत्चे व्यावर्तक म्हणून लावलेले असते. वस्तुतः तेही पद परब्रह्माच्या केवळ निर्गुण स्थितीस लागू पडत नाहीं. आणि ज्ञाता तेच ज्ञेय किंवा कर्ताच कर्म मानणे हा तर वेदान्तमताने दोष मानला आहे.

आता चवथ्या नीतिवादाने पंडितजी असे सिद्ध करतात कीं, प्रत्येक जीवाला आत्मप्रीति आणि शुभेच्छा ही असतेच. शुभ काय, अशुभ काय म्हणजे चांगले काय व वाईट काय, याबद्दल त्याची कल्पना बरोबर असो वा नसो, पण तो आपल्या बुद्धीने चांगले तेच करीत असतो, किंवा इच्छीत असतो. मनुष्याचा जसजसा आत्मविकास होत जातो, त्याप्रमाणे त्याच्या शुभकल्पनेचा दर्जा व व्याप्ति हीं वाढत जातात. व्यक्ति कुटुंबाचे शुभ चिंतीत असते. कुटुंबापुढे जातीचे बरे काय, हा प्रश्न असतो, अशा रीतीने मानवी हितापर्यंत शुभेच्छेची व्याप्ति वाढते, व प्रेमाचाही पसारा वाढतो. त्याचप्रमाणे आत्मविकासाबरोबर, इंद्रियजन्यसुखापुढे भावनात्मक, त्यापुढे बौद्धिक आणि त्याही पुढे आध्यात्मिक सुख असा सुखेच्छेचा दर्जाही वाढत जातो याप्रमाणे सुख, आनंद, प्रेम, चांगुलपणा, यांचा दर्जा व व्याप्ति पूर्णत्वापर्यंत वाढत जाईल. परंतु हे पूर्णत्व जरी एक ध्येयरूप कार्य मानले तरी, त्यास नैतिक दृष्ट्या पूर्ण असा पुरुष कारणरूपाने असलाच पाहिजे. कारण जो ही पूर्णत्वाची भावना मानवी अंतःकरणात उत्पन्न करतो, तो स्वतः अपूर्ण कसा असेल ? ही केवळ अनुमानाचीच गोष्ट नव्हे. तर ईशचिंतनाच्या परमोत्कर्षात हे ध्येयरूप पूर्णत्व परमपुरुषरूपानेही उपासकास प्रतीत होते. आतां जगांत आपल्याला जे दुःख अथवा पाप आढळते, त्याने या पूर्णत्वास मुळींच बाध येत नाहीं. जगाची अनंत उन्नति होत असल्यामुळे, आणि अपूर्णातून

पूर्णत्वाकडेच प्रगति आहे. ह्यामुळें अपूर्ण हें पूर्णत्वाचे पूरकच आहे, विरोधक नाहीं. शिवाय मनुष्याचे शील व सामर्थ्य वाढण्यास जगांत दुःख व पाप यांची जरूरीच आहे. तसेंच जीवाचे इहलोकींचे आयुष्य हें नदीवरील पुलांतील कमानीच्या गोलार्धाप्रमाणे जीवास एक गूढ वाटते. पाण्याच्या वरील कमानीत वर्तुलाचे एक अपूर्ण शकल तेवढे दिसते. तेंच पाण्यात ( प्रतिबिंबासह ) पाहिले, म्हणजे कमानीचे वर्तुळ पूर्ण होते. त्याचप्रमाणे मृत्यूच्या पलीकडील जीवाचे अमरत्व लक्षांत घेतले, म्हणजे त्याच्या जीवनाचे पूर्णत्वही लक्षांत येते.

आतां आत्म्याला पूर्ण आणि अपूर्ण दोन्ही कसे म्हणावयाचे ? तसेंच पूर्ण ब्रह्माच्या ठिकाणी जीवात्म्यांचा असंख्य असा संघ मानून आणखी ईश्वर म्हणून वेगळे काय मानावयाचे ? त्याचप्रमाणे अनेक जीवांच्या अनेक व्यक्ति मानल्या, तरी अशा असंख्य व्यक्तींचा संघ एक परमपुरुषवाचक व्यक्तिरूप कसा असेल ? कारण व्यक्ति ही व्यावर्तक असते. अशा प्रश्नांस पंडितजी असें उत्तर देतात कीं, प्रत्येक जीवाला स्वगत अनुभवाशिवाय अज्ञात अशा अमर्याद जगाचीही जाणीव असते. आत्म्याची जी व्यक्तिगत व समर्याद अशी अवस्था त्यास आपण मनुष्य म्हणतो. आणि त्याची जी अमर्याद व व्यापक स्थिति त्यास आपण ईश्वर म्हणतो. भेदशून्य असेंच केवळ ब्रह्म मानल्यास त्याच्या ठिकाणी भेद कधीच प्रतीत होणार नाहीत. परंतु भेद ज्याअर्थी प्रतीत होतात, त्याअर्थी ते केवळ अद्वैत नाही तर द्वैताद्वैत आहे. आतां परमात्म्याच्या ठिकाणी जीवात्म्याच्या असंख्य व्यक्ति असल्या तरी त्यामुळे परमात्मा अव्यक्तिक ठरत नाही. तसें म्हणणे म्हणजे परमात्म्याचे अस्तित्वच नाकबूल करण्यासारखे आहे. कारण असंख्य आत्म्यांच्या बुडाशीं एक परमात्मसत्तेचे सामान्यत्व न मानल्यास दोन आत्म्याच्या दरम्यान कोणताच व्यवहार होणे अशक्य होईल. तसेंच आत्मा हा तत्त्वतः अनंत आहे, म्हणून जीवास अनंतत्व ही कल्पना निदान मनोवेद्य आहे. जीव ज्या वेळीं आपण अल्पज्ञ आहो असें जाणतो, त्या वेळीच तो सर्वज्ञत्वाचीही कल्पना करून चुकतो. कारण तीच कल्पना सापेक्षतेमुळे त्याचे अल्पज्ञत्व सिद्ध करते. अर्थात् आत्मा हा तत्त्वतः सर्वज्ञ असल्यावांचून त्याच्या ठिकाणीं ती कल्पनाच उदित होणार नाहीं. ह्या रीतीने जीवात्मा व परमात्मा हे एकरूप

होतात. आत्म्याची जाणीव व परमार्थसत्ता यांची समसत्ता आहे आणि त्यावरून परमार्थसत्ताही जाणीवरूप ठरते. परब्रह्माच्या ठिकाणीं जीवांचा व्यक्तिभेद झाल्याने एक व्यक्ति दुसरीपासून जरी विवर्जित होत असली, तरी ती एक व्यक्ति ब्रह्मरूपाने सर्वसमावेशक असते. तसेच परब्रह्माचे व्यक्तिकत्व जीव ह्या ठिकाणीं अंशाच्या जर स्पष्ट अनुभवसिद्ध आहे, तर परब्रह्मास अपौरुष किंवा अव्यक्तिक कसें म्हणतां येईल !

तेव्हां तात्त्विक दृष्टीने, शास्त्रीय दृष्टीने, व नैतिक दृष्टीने, सर्वखल्विदंब्रह्म म्हणजेच सर्वभूतान्तरात्मा होय. त्याच्या ठिकाणीं अनेकत्व असून तो एकच आहे. आणि तो एक अव्यक्तिक तत्त्व नसून अनंतकल्याणगुण-समन्वित असा परमपुरुष आहे असे पंडितजींचे प्रतिपादन आहे.

आतां वेदान्तमताप्रमाणे कार्यकारणवाद, हेतुवाद, इतकेंच काय पण सत्ता-वादही निर्गुण, निष्क्रिय, व निर्विकार अशा परब्रह्मस्वरूपास जर स्पर्शही करूं शकत नाहीत, तर नीतिवादाची गोष्टच नको. नीतिवादातील प्रेम व सुख यांची कल्पना वाढवितां वाढवितां सालोक्य अथवा सामीप्य मुक्तीइतकी शुद्ध व श्रेष्ठ केली, तरी त्या स्थितींतही जीवाचे समाधान निरतर राहणे शक्य नाहीं. त्याच्या उपास्याचे दुजेपण त्यास अखेर दुःसहच होईल. त्या द्वैताचा त्यास कंटाळा येईल. परोपरीच्या विषयसुखाची पूर्ण अनुकूलता असतांना विलासी पुरुष अखेर त्यावर लाथ मारून सुषुप्तीची इच्छा करतो त्याप्रमाणे ती प्रेमसुखाची द्वैतात्मक जाणीव नको आणि ते द्वैत नको, असेंच अखेर जीवाला वाटणे अपरिहार्य आहे. आतां वास्तविक पाहिले, तर आपण द्वैतांत बसून देहबुद्धीनेच हे सारे विचार करीत असतो. या आपल्या विचारसरणीस असलेली द्वैताची मर्यादा उल्लघणे अशक्य आहे. कारण, त्या पलीकडे शब्दासही रीघ नाहीं. मन-वाणीसही वाव नाहीं. मग युक्तिवाद कसचा ? ती निर्विकल्प ब्राह्मी स्थिति केवळ अनुभवगम्य आहे. तो अनुभव हेंच ब्राह्मांच्या द्वैताद्वैतवादास समर्पक उत्तर होय ! दुसरा इलाज नाहीं.

आपल्या येथे धर्मजिज्ञासा व ब्रह्मजिज्ञासा, पराविद्या व अपराविद्या ही अगदीं स्वतंत्र खातीं असल्यामुळे, तत्त्वनिश्चयासाठी हिंदूंच्या इतर शास्त्रांचा विचार करणे पंडित सीतानाथ यांस जरूर वाटले नसावे. परतु पुराणे मात्र त्यांस तशीं वगळतां आलीं नाहींत. कारण मायावाद म्हणजे प्रच्छन्न बौद्धमत

असें कोणी म्हणतात, त्याचप्रमाणें भागवतधर्म म्हणजे प्रच्छन्न मायावादच आहे, असें जरी ब्राह्म मानतात, तरी भागवतधर्म ही अद्वैत वेदान्ताची सुधारून वाढवलेली व अधिक व्यवहार्य व सुलभ केलेली अशी आवृत्ति असल्याची ख्याति असल्यामुळे वैष्णव ऊर्फ भागवतधर्माचा पंडितजीस कसून विचार करावा लागला. शिवाय ब्राह्मसमाज हा मुख्यत्वेकरून एक भक्तिपंथच असल्यामुळे वैदिक ऋषींपेक्षा वैष्णवांपाशीं त्याचे, निदान बंगाली पंडितजींचें तरी जवळचे नातें असावें. यासाठीं पुराणें व पुराणोक्तधर्म यासंबंधी ब्राह्मांचे विचार काय आहेत, ते पुढील प्रकरणात पाहूं.

---

# प्रकरण नववें

# वैष्णवधर्म

बंगालच्या धार्मिक जीवनावर वैष्णवधर्माची बरीच छाप आहे. पण ह्या छापेतून साधारण-ब्राह्म अगदी अलग आहेत. नवविधान-पथाचे कित्येक विद्वान् लेखक आणि आदिब्राह्माचे प्रमुख रवींद्रनाथ यांचा भारत, भागवत, रामायण या पुराणांतील व्यक्तींबद्दल कांहीतरी आदर आहे; पण साधारण-ब्राह्मसमाजाचे अध्यक्ष व मोठे नाणावलेले तत्त्वज्ञ पं० सीतानाथ तत्त्वभूषण हे आपल्या पुराणांस सरसहा दूषणच देत आहेत. त्यासंबंधीं त्यांच्या एका नवीन पुस्तकांतील सारांश मोठ्या कष्टानें आम्ही खालीं देत आहोत. ते म्हणतातः—

भागवतधर्म हा एकेश्वरी पथास औपनिषदिक धर्मापेक्षा अधिक जवळचा आहे, असे कोणी मानतात, ते खरे नाहीं. उपनिषदांतील ब्रह्मवादात अद्वैत आणि विशिष्टाद्वैत असे दोन प्रकार आहेत. त्यांतूनच शांकर व रामानुज-मतांचा उगम झाला. देवकीचा पुत्र वासुदेव--कृष्ण याच्यापासून भागवत-धर्मास मूर्त स्वरूप आले, असे कोणी मानतात, तेही चूक आहे. वास्तविक वासुदेव हा केवळ एक काल्पनिक वैदिक देव असून कृष्ण यासही ऐतिहासिक सत्यता मुळींच नाहीं. छांदोग्यात ज्या देवकीपुत्राचा उल्लेख आहे, तो वसु-देवाचा पुत्र कृष्ण नव्हे. कृष्णाची ऐतिहासिकता सिद्ध करण्याकरता यादवां-ची जी वंशावळ पुराणकार दाखवितात, ती पोरकट आहे. वेदान्तसूत्रे व पाणिनीचीं सूत्रे यांत वासुदेव व अर्जुन यांचा उल्लेख आढळतो. तो वासुदेव म्हणजे कृष्ण नसून विष्णु व इंद्र या वैदिक देवांचाच तो उल्लेख आहे.

भागवताच्या दशम स्कंधांत असे लिहिले आहे की, कोणी एक पौंड्र राजा आपण वासुदेवाचा अवतार आहों असे सांगत असे, व त्याप्रमाणे त्याने कृष्णाकडे निरोपही पाठविला होता. त्यावरून वासुदेव हा एक प्राचीन वैदिक देव म्हणून त्यापूर्वीच मानला जात असे, असे उघड दिसते. शिवाय विष्णुपुराणांत त्याचे वर्णन ब्रह्मपर आहे. म्हणजे जो सर्व पदार्थांत आहे व

त्याच्यामध्यें सर्व पदार्थ आहेत म्हणून त्यास वासुदेव म्हणतात असे म्हटले आहे. अर्थात् वसुदेवाचा मुलगा तो वासुदेव असे नव्हे. बौद्ध धर्मात बुद्धाच्या जातककथा रचल्या गेल्या व त्या धर्मात बुद्धास विशेष व्यक्तिमाहात्म्य प्राप्त झाले. ते पाहून ब्राह्मणधर्मास अशा एखाद्या केंद्रीभूत दिव्य व्यक्तीची आवश्यकता वाटूं लागली. यामुळे गौतमाप्रमाणे क्षत्रियकुलोत्पन्न आणि धर्मोपदेशक अशा जोड कल्पनेची कृष्णाची कथा रचण्यात आली. अलिकडील उदार मताचे संशोधकसुद्धा या गौप्यगोपनाचा स्फोट करण्यास कचरतात. त्यांच्या कोमल अंतःकरणास हे कार्य मूर्तिभंजकांच्या विध्वंसनासारखे विनाशक स्वरूपाचे वाटते ! परंतु ज्या मूलभूत कृष्णावतारकल्पनेवर इतके असत्य व अनीतिमय धार्मिक वाङ्मय उभारले गेले, ती मूळव्यक्तिच खोटी आहे, हे सिद्ध करण्यांत खरोखर देशाचे महत्कार्य केल्यासारखेच होणार आहे, हे ते जाणत नाहीत. असे पंडित म्हणतात.

वैष्णवधर्माचा मूळ इष्ट देव जो विष्णु त्यास वैदिक वाङ्मयांत विशेष महत्त्व नाहीं. "तद्विष्णोः परमं पदं" याचा वास्तविक अर्थ ( विष्णुरूप वामनाच्या त्रिपदकथेवरून ) माध्यान्ह कालचा सूर्य इतकाच आहे. विष्णुस परमेश्वर मानूं लागले ते पुढे कृष्णावताराच्या कल्पनेनंतर कृष्ण हा विष्णूचा अवतार या रूपाने होय. आता कृष्णाची कल्पनाही ऋग्वेदांतूनच घेतली असावी असे दिसते. ऋग्वेदात [ मं ८ सू. ९६।१३–१५ ] कृष्णनामक एका अनार्य योद्ध्याशीं इंद्राचे युद्ध होऊन त्याने बृहस्पतीच्या साह्याने त्याचा नाश करून मानवी हित साधले असे आहे. ह्याच बीजभूत कथेवरून, बौद्धकालानंतर पूर्वीच्या वैदिकधर्मातील कांहीं आचार नापसत असलेल्या आर्य लोकांनीं, गोवर्धनाचे कथेत या इंद्रकृष्णयुद्धाचे उट्टे काढून, इंद्राची फजिती झाली, असे दाखविले आहे. यादव हे मूळचे दास किंवा अनार्यच होत. कौरव-पांडवांची कथा तर धादात खोटी दिसते. अशा असंबद्ध कथा ज्यात मनसोक्त वर्णिल्या आहेत, त्या महाभारतास आपण अवघ्या दोन पिढ्यांच्या पूर्वीपर्यंत इतिहास म्हणत आलो, हे आपल्या पूर्वजांचें केवढें अज्ञान होय ! खरोखर ज्यांस नीतिशास्त्र व पदार्थविज्ञान यांचे यत्किंचित् ज्ञान आहे, त्यांस या ग्रंथांत खुळचट व अडाणी लोकांच्या मनरंजनाकरितां दुष्परिणामकारक अशा रचलेल्या आचरट भाकड कथाच

आढळतील. आणि ही गोष्ट नवयुगधारी राजा राममोहनराय यांनी व्यासाच्या मुखानेच सिद्ध केली आहे. ते व्यासच या कथा मनःकल्पित आहेत, अशी [ मयै व प्रोच्यमानस्य मनसा काल्पितस्य च ] प्रारंभी प्रस्तावना करतात, हें त्यानीच प्रथम उघड केले.

याप्रमाणे पुराणांतील कथा असबद्ध व आचरट असल्या, तरी पंडित म्हणतात की, त्यातील काहीं विधानें सत्य मानली असतां, परंतु त्यास इतर देशाच्या समकालीन इतिहासाचा दुजोरा मिळत नाहीं. हिंदुस्थानच्या संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासाचे पहिले पाच विभाग पाहिले तर (१) इ. सनापूर्वी २००० ते १००० हा मंत्रसंहिता, शतपथब्राह्मण आणि बृहदारण्यक यांचा काल; (२) इ. सनापूर्वी १००० ते ५०० इतर ब्राह्मण व उपनिषदे; (३) इ. सनापूर्वी ५०० ते २०० सूत्रकाल; (४) इ. सनापूर्वी २०० ते इ. स. ५०० धर्मशास्त्र व पंथविशिष्ट उपनिषदें; (५) इ. स. ५०० ते १००० पौराणिक काल: असे कालविभाग पडतात. या कालातील वाङ्मयात काही उपनिषदांनी सूर्य, कोणी वायु, कोणी रुद्र अशा नावांनी परमेश्वराची उपासना सांगितली आहे. परंतु ते वैदिक देव ऐतिहासिक पुरुष नव्हतेच. पुढील ब्राह्मण, उपनिषदे यांत कुरु, पांचाल, धृतराष्ट्र, विचित्रवीर्य, परिक्षितीचा पुत्र जन्मेजय, देवकीसुत इत्यादि नांवे आढळतात. पण त्यात भारती युद्धाचे नावही नाहीं. पाणिनीच्या सूत्रांतही या महायुद्धाचा नुसता उल्लेखही नाहीं. बौद्धिक सुत्तांत कृष्ण हा एक सामान्य असुर होता, असा तुच्छतेनेच उल्लेख आहे. त्यातही भारतीय युद्ध अनुल्लिखितच राहिले. त्यानंतरच्या धर्मशास्त्राच्या विभागात पातंजलीने प्रथम कृष्ण-पांडवकथेचा उल्लेख केला आहे.

ह्यावरून आणि भारतकथेतील साम्राज्याच्या वर्णनावरून ती कल्पना लेखकानी, ग्रीकाची हिंदुस्थानावर स्वारी झाली, त्यानतर अशोकाच्या साम्राज्यावरून घेतली असली पाहिजे. तत्पूर्वी मनूसही साम्राज्याची किंवा भारतीय युद्धाची कल्पना नव्हती. आतां अशा या मूलभारतातही कृष्णाचा संबंध फारच थोडा होता. तोही एक मुत्सद्दी इतकाच होता. अवतारी पुरुष म्हणून नव्हता. अर्थात् भगवद्गीता आणि दुसऱ्या गीता या महाभारतात बऱ्याच मागून घुसडलेल्या आहेत. त्यांत ज्या संस्कृतीचे वर्णन आले आहे, ते फार पुढील काल दर्शवितें. इ०सनापूर्वी ३०० वर्षांवर मेगॅस्थानीस हा

ग्रीक वकील चंद्रगुप्ताच्या दरबारीं होता. त्यानें हिराक्यूलीस याची भक्ति मथुरा ( Methora ) व कृष्णपूर ( Kleisobora ) येथील लोक करीत असत, असें म्हटले आहे. यावरून कृष्ण हा ग्रीकांचा हिराक्यूलसच असावा, कारण अशा परराष्ट्रांतून देवाच्या कल्पना घेण्याची पूर्वापार चाल आहे. किंवा ऋग्वेदांत एक अनार्य कृष्णयोद्धा व एक कृष्णसूक्तकार ऋषि असल्याचा उल्लेख आहे, त्या दोन्ही कल्पना एकत्र करून बौद्धकालानंतर कोणी तरी ही कृष्णकथा रचली आहे; व ती रचण्याची स्फूर्ति किंवा आवश्यकता बौद्धधर्मातील केंद्रीभूत अशा गौतमबुद्ध या ऐतिहासिक महान् व्यक्तीवरून सुचली आहे. याप्रमाणे भागवतधर्मातील कित्येक उत्कृष्ट उपदेश व त्या पंथाच्या अग्रभागीं असलेली कृष्ण ही व्यक्ति, असें सारेच बौद्धधर्मातून चोरून घेतलेले आहे. म्हणजे वासुदेव कृष्णाने भागवतधर्म उपदेशिला असें झाले नसून, भागवतधर्मानेच उलट हा एक तोतया कृष्ण बनविला आहे. कारण पूर्वींचा याज्ञिकाचा वैदिकधर्म नाहीसा झाला, व औपनिषदिक ब्रह्मवादही सामान्य लोकास निरुपयोगी ठरला, तेव्हा शून्यवादापर्यंत मजल गेली; असे पाहून विस्कळित झालेल्या ब्राह्मणधर्माच्या पुरस्कर्त्यांनी वैदिक ईश्वरवादाची पुन्हा जुळवाजुळव करण्यासाठीं वासुदेव-कृष्ण ही एक कल्पित व्यक्ति उभी करून त्याच्या ठिकाणीं सर्व कल्याणगुण मानले असे दिसते.

ह्याप्रमाणे कृष्ण काय किंवा विष्णु काय ह्या खऱ्या ऐतिहासिक व्यक्ति नव्हत; त्याचे वर्णन कल्पनामय आहे, हे अजाण व अविचारी लोकांच्या लक्षात येत नाहीं. एखाद्या तत्त्वाच्या ठिकाणी पुरुषकल्पना करून त्याचे वर्णन करण्याची पद्धत उपनिषदे व पुराणे यात ठिकठिकाणी आढळते. मंडुक उपनिषद्, गीता, भागवत, (१२।११।१–२०) विष्णुपुराण (२२।१) यांत परमेश्वराच्या विराट किंवा चतुर्भुज अशा स्वरूपाचीं वर्णनें लाक्षणिक व रूपकात्मक आढळतात, यावरून विष्णु, कृष्ण इत्यादि पौराणिक व वैदिक देव ह्या अमूर्त कल्पना होत, असे स्पष्ट दिसते. त्रिमूर्तीची कल्पनाही छांदोग्यांतील तेज, आप आणि अन्न ह्या त्रिगुणात्मक कल्पनेवर बसविलेली, आहे. पुराणांतील वर्णनें अशीं काव्यमय आहेत. त्या काळी भौतिकशास्त्रे नव्हती. आणि जें कांही तत्त्वज्ञान होते त्यांतही तर्कपद्धति व विचाराची बारकाई नव्हती.

भक्तिशास्त्र हे वेदान्तापेक्षां अधिक सुधारलेले व व्यवहार्य आहे, असें कोणी

मानतात; पण तें खरें नाहीं. भक्तिशास्त्रांतील ईश्वरी अवताराची कल्पना वेदान्तांतील जीवेश्वराचे ऐक्य या वेडगळ कल्पनेवरच रचलेली आहे. वस्तुतः भक्ति व उपासना द्वैतावांचून संभवतच नाहीं. परंतु वैष्णवधर्माच्या मुख्य पुराणांतून अद्वैतवादालाच मिठी मारली आहे. अनंत अशा परमात्म्याशीं अमर अशा जीवात्म्याचे सप्रचीत असे जे द्वैतात्मक ऐक्य खिस्ती धर्मांत वर्णिले आहे, ती खऱ्या भक्तीची कल्पना मूळ वैष्णवधर्मांत मुळींच नाहीं. वैष्णवधर्माची भक्तीची कल्पना विष्णु व भागवत पुराणांतील कित्येक स्तुतिपर स्तोत्रांत आहे. वस्तुतः तीं प्रार्थनास्तोत्रेंही पद्धतशीर नाहींत. त्यांत कांहीं तरी अव्यवस्थित विचार व कल्पना आहेत. तत्त्वविवेकाचे तर नांवही नाहीं ! कित्येकांत तर परमतखंडनाचा मोहही अनावर झाला आहे. त्यावरून ह्या स्तोत्रकारांच्या ठिकाणीं शुद्ध आत्मप्रचीतीचा वानवाच दिसतो. त्यांनीं स्तोत्रांतील अद्वैत कल्पना उपनिषदांतून नुसती उतरून घेतली आहे झाले. ह्यांत स्वतांचा आत्मभाव दिसत नसून अत्यत अनर्थावह असा सर्वदेवमयत्वभाव मात्र दिसतो. ईश्वराचा अनुभव घडल्यावांचून भक्तीची पूर्तता होत नाहीं. यासाठी सर्वांभूतीं भगवद्भावावर त्यांनीं जास्त जोर दिला आहे. परंतु जीवेश्वराचा संबंध दाखविण्यास ज्यांस देहधारी विशिष्ट अवताराची कल्पना काढावी लागली, त्यास परमेश्वर विशेषेकरून जीवाच्या ठिकाणीं नित्य संचरलेला आहे, याची नीटशी कल्पनाच नव्हती, हे उघड होतें.

ह्या भक्तिसूक्तात दोन प्रकार आहेत. एक ऐश्वर्य भक्ति व एक मधुर भक्ति. देवाचे ऐश्वर्य वर्णन करावे व त्याच्या सेवेचे दान मागावे, असा प्रार्थनेचा प्रकार खरा; परंतु पूर्ण परब्रह्मास काय कमी आहे, तर त्याची सेवा शक्य होईल ? अर्थात् देवाने निमाण केलेल्या जीवांचीच सेवा ओघास आली. परंतु या मायावाद्यांच्या मताने सर्व सृष्टीच मिथ्या असल्यामुळे लोकसेवा ही कल्पनाच अशक्य होते. मग एक सारूप्य मुक्ति मानावी किंवा ईश्वरास मनुष्याप्रमाणेच देहधारी मानून शारीरिक सेवेस त्यास पात्र करावे, हे दोन ध्येयमार्ग राहिले. त्यांपैकीं दुसऱ्या मार्गाचा वैष्णवांनीं अंगिकार केला.

आतां अवतारांची कल्पना सांख्य व वेदान्त यांवरून काढली असल्यामुळें अवतार म्हणजे पूर्ण परब्रह्म नव्हे, तर त्याचा अंश होय, हेंही मान्य करणें भाग पडलें. भागवतांतील एका श्लोकांत 'कृष्णस्तु भगवान् स्वयम्' असे;

शब्द आहेत खरे; पण ते अगदीं तुटक आणि मागून घातल्यासारखे उघड दिसतात.कारण आपल्या उपास्यास परब्रह्माचा अंश मानण्यांत वैष्णवांस कमीपणा वाटूं लागला असावा. पुढे ब्रह्मवैवर्त पुराणाने ही अडचण अगदीं दूर केली. आणि कृष्ण हे पूर्ण परब्रह्मच बनले. अशा रीतीने कृष्णाचे ऐश्वर्य अमर्याद वाढवूनच ते पुराण थांबले नाहीं, त्यांनीं माधुर्यभक्तीच्या कल्पनेतही अत्यंत अचरटपणा केला आणि जारिणीच्या प्रेमात माधुर्य प्रेमाची परिणति दिसते, असें दाखवून त्या कालच्या देशाच्या नैतिक अधःपाताची सीमा दाखविली ! तेथपासून कृष्णाच्या रासलीला हे एक भक्तिशास्त्रांतील नवीन वाङ्मय बनले. कृष्णाचे हे उघड जारकर्म महाभारतकालीं कवीच्या कल्पनेत नव्हते. कारण, तसे असते तर शिशुपालाने कृष्णाची निर्भर्त्सना केली, तेव्हां त्या गोष्टीचा उल्लेख वरचेवर केला असता. राधाकृष्णाचे रास महाभारतांत नाहीत, इतकेच नव्हे तर तेराव्या शतकानतर केव्हा तरी रचलेल्या भागवतांतही राधेचे नांव नाहीं. एकंदरींत अगदीं अलीकडील ब्रह्मवैवर्त पुराणांत रासलीला जितक्या मोकळेपणाने वर्णिल्या आहेत, तशा त्या पूर्वीच्या कोणत्याही पुराणांत नाहींत. व राधचे तर नांवही नाही; आणि ब्रह्मवैवर्ताने तिसरें एक असे काम केले कीं परस्त्रियांशी केलेला रास कोणाला अनीतिमय वाटूं नये म्हणून गोलोकांत कृष्णाचा त्या स्त्रियाशी नित्य संबंध होता, असे सांगून, अनीतीचे एक दिव्य शास्त्र बनविले. आणि ह्या अनीतिमय कथांवर अध्यात्मशास्त्रातील कित्येक कूटेही बसविली. एक ब्राह्म कृष्णचरित्र सूर्यमालेवर रचले म्हणतात.

असलें हे ब्रह्मवैवर्तपुराण अठरा प्रमुख पुराणांतील एक असून नवीन वैष्णव पंथाचेच काय, पण अर्वाचीन हिंदुधर्माचे निदर्शक असे हे पुराण आहे. आतां ह्या पुराणातील निरनिराळ्या विलासांच्या व वैभवाच्या वर्णनावरून कर्वाने मुसलमानी अमदानीचा थाट पाहिला होता, असे उघड दिसतें. तेव्हां ते पधराव्या शतकाच्या पूर्वीचे असणे शक्य नाही. वैष्णवधर्माच्या या विकृत होत चाललेल्या स्वरूपाचा परिणाम उच्च प्रकारच्या मानसिक उपासनेच्या ठिकाणीं मूर्तिपूजा रूढ होण्यांत झाला. ही मूर्तिपूजाही अलीकडीलच आहे. फार काय पण मूर्तिपूजेचे सार्वत्रिक व सर्वमान्य स्वरूप भागवताचे वेळींही नव्हते. कपिल-देवहुती सवादांत मूर्तिपूजेचा गौणत्वाने उल्लेख केला आहे. पुढे कृष्णउद्धव-संवादात मूर्तिपूजेस जो मान्यतेचा शिक्का मिळाला आहे, तो

[ स्नानालङ्करणंप्रेष्ठमर्चायामेवतुद्धव—भा. ११।२७।१६] भागवतांत कोणी तरी माणून घातला आहे कारण भागवतकार जर एकच कवि असता तर तो देवहुतीस एक व उद्धवास त्याच्या अगदीं विरुद्ध असे कसे सांगता ? तात्पर्य, ब्रह्मवैवर्त पुराणानें देव व देवी या दंपतीची पूजाअर्चा देहेंद्रिय-धारी विषयी जनाप्रमाणेंच रूढ केली. भागवतातही जे भक्तिप्रकार सांगितले आहेत, ते गीतेतील प्रकारांपेक्षांही निद्य आहेत. कारण गीतेत कृष्णाला नुसते विभूतिमत्त्वच दिले. पण भागवताने तर त्यावर ताण करून विष्णुकृष्ण याच्या काल्पनिक आकृतीचे ध्यान करण्यास सांगितले. आणि अशा रीतीनें मूर्तिपूजा आवश्यकच केली. आता भागवतातील काही उपदेशांत (भा. ११।१४) आकारापासून निराकारापर्यंत अशी कल्पनेची सूक्ष्मता आहे; पण त्या निराकाराच्या कल्पनेत अखेर जर उपास्य-उपासकाचें द्वैत रहात नसेल, तर त्या भक्तींत प्रेमादर तो कसा राहणार ! तात्पर्य, भक्तीचा परिपोष व्हावा, म्हणून पुराणकारांनीं कितीही काल्पनिक कथा रचल्या, तरी परिणामी ते वेदांती मायावाद्यांपुढे एक तसूभरही गेले नाहीत, हे उघड आहे. दुर्दैवाची गोष्ट आहे कीं, बंगाली लोकांचीं भाविक आणि स्त्रैण मनें जितकीं ह्या वैष्णवधर्मानें भारलेलीं आहेत, तितकीं दुसरीं कोणाचीही या मधुरभावांत गुंतलीं नसतील. रामानुज, माध्व इत्यादि वैष्णव आचार्यांसही खरी तत्त्वदृष्टि दिसत नाहीं आणि चैतन्यास तर काय म्हणावें, तेंच कळत नाही !

शेवटीं ह्या वैष्णवधर्माच्या समालोचनातून पंडितजी तात्पर्य इतकेंच काढतात की, (१) काव्यानें सत्यधर्माची पूर्तता होत नाही. (२) अतिशय थोर व दिव्य दृष्टीचे गौतमबुद्ध यास प्रतियोगी म्हणून वैष्णवानें काल्पनिक कृष्णदेव उभा केला. (३) ते कल्पनाचित्रही ठीक असतें तर त्यांनीं [ जीझसप्रमणे ] काहीं हित साधलें असतें. परंतु हे चित्र ज्यांनीं काढलें ते खरे पुण्यात्मे नसून नुसतेच कवि होते. त्यांच्या नीतीच्या कल्पना चुकीच्या होत्या. (४) काव्य था होईना पण त्यास सत्याचा आधार, आत्मप्रतीतीची जोड व तत्त्वज्ञानाचा दुजोरा असला पाहिजे. (५) भक्ति अद्वैत वेदान्तावर उभारणे केव्हाही अशक्य आहे. (६) आजचा वैष्णवधर्म तर केवळ द्वैतीच आहे. (७) सौंदर्य व मधुरभाव यावर चित्तैकाग्र्य करणे म्हणजे रूपाची उपासना व विषयकामनेची उत्कंठा होय. (८) धर्मसाधनाच्या प्रारंभीं

किंवा अखेरीस केव्हांही नीति सोडतांच येत नाहीं. धर्मानें नीति सोडली तर तो धर्मच नव्हे. यासाठीं व्यक्ति, कुटुंब, समाज, धर्म आणि राजकारण ह्या सर्व बाबतींत एकंदर जीवनाचा नैतिक हेतु व पूर्ण सदाचाराकडे आणि सर्वांगानी पूर्णत्वप्राप्तीकडे प्रवृत्ति, अशीच खऱ्या भक्ताची अढळ दृष्टि पाहिजे.

दह्यादुधाची चोरी करणाऱ्या कृष्णाला माझ्या घरच्या चपराशाचीही योग्यता नव्हती ! असे राजा राममोहन हे एका पाद्र्याजवळ बोलले होते. त्या प्रभूच्या अमंगल गीताची समस्या आजच्या साधारण-ब्राह्मांच्या अध्यक्षानीं वरीलप्रमाणे केली आहे. भावनाप्रधान बंगाली लोकाचा अतिरेक हा स्वभावच आहे. तो स्वभाव श्रीकृष्णनिंदेत दिसून आल्यास नवल नाही ! प्रत्यक्ष श्री-कृष्णावताराच्या वेळी जर शिशुपाल होते, तर आजच्या कलिकालात त्याची वाण काय ? शिशुपालासारख्या श्रीकृष्णाच्या कट्टया द्वेष्ट्यानेही त्याच्या बालपणच्या जारकर्माचा (?) उल्लेख केला नाही. यावरून असे उघड होते की, ते जारकर्म मानण्याइतका शिशुपाल अप्रबुद्ध नव्हता. उलट कृष्णाच्या बालक्रीडाचा उल्लेख दरबारी भाषणात शिशुपालासारख्या मानी राजानें करणे मूर्ख व पोरकटपणाचे दिसतें, असेंच त्याने मानले असले पाहिजे. पण इतकाही विवेक श्रीकृष्णाशीं निष्कारण वैर करणाऱ्या आजकालच्या पंडितब्रुवात नाहीं ही अत्यंत उद्वेगजनक स्थिति आहे ! श्रीकृष्णचरित्र-वर्णनात कवीनीं कोठें कोठें अतिशयोक्ति व कोठें रूपकात्मक वर्णन केलें आहे हे उघड आहे; परंतु ती अतिशयोक्ति, अभाविक व अहंमन्य अशा बुद्धिवानाशिवाय दुसऱ्या कोणाच्याही परमार्थास बाधक होणारी नाहीं, इंग्रजांच्या संसर्गानें ज कित्येक घाणेरडे व अनीतिजन्य रोग इकडे आले आहेत. त्याचप्रमाणे संशोधन आणि चिकित्सा हे पडुरोगासारखे दोन रोगच आमच्या सुशिक्षितांच्या मागे लागले आहेत, असे जे जुने लोक म्हणतात, त्यात काहीं सत्यांश आहे, यात शंका नाही संशोधनाची भूक शमत नाहीं आणि फाजील चिकित्सेमुळें काहींच पचत नाही, असे कित्येक आधुनिक विद्वानांचें झाले आहे !

अशा ह्या पाखंडी मतांतरांना ईश्वर करील, तर आम्हास सविस्तर व मुद्देसूद उत्तरे द्यावयाचीं आहेत; पण त्यास येथें स्थलावकाश नाहीं. त्या-साठीं शेवटला तुलनात्मक खंड स्वतंत्रच लिहावयाचा आहे. ईश्वरानें तो पुरा करून घ्यावा; तरच आरंभलेल्या ग्रंथाची सार्थकता आहे. असो.

आमच्या वाचकांपैकीं जे वरील विचारांनीं संशयग्रस्त होतील, त्यांस तूर्त आमची इतकीच विनंति आहे कीं, वरील लेखांनीं कोणींही आपला बुद्धिभेद करून घेऊं नये. बुद्धि डोळस ठेवावी हे खरें; पण जेथील दुधावर आम्ही वाढलो ते पवित्र स्थळ पाहण्यासाठीं आईच्या अंगावरचा पदर दूर करावयाचा नाहीं. बालभाव असेल तोपर्यंतच ते दिसेल. ह्या अलमदुनियेच्या बकाल बाजारात देवास परोक्षताच प्रिय आहे. यामुळेच ब्राह्मांच्या शंभर वर्षांच्या उपासनांनंतरही अपरोक्षानुभूति अद्याप दूर आहे. हरीच्या सगुण चरित्रांनीं सज्जनवृंद आजपर्यंत डोलतच आलेले आहेत. भागवतामृतही कोणास कडू लागत असेल, त्यास आंग्लविद्येचा ज्वर आला आहे, असे खुशाल समजावे. जी कृष्णकथा गाऊन श्रीमद्व्यास पावन झाले, जी श्रीशुकाचार्यांच्या तोंडून निघाली, तत्त्वविवेकांत ब्राह्मपंडितांचीही ही रग जिरविणारे मधुसूदन-सरस्वति ह्याना जिची चटक लागली, ब्राह्मांच्या विश्वासांतले धर्मसुधारक कबीर यानीं " एक एक गोपीके प्रेममें हो गये कोटि कबीर ! " असे ज्या शुद्ध प्रेमाचे महात्म्य वर्णन केले, मतसाम्यांत ब्राह्मांच्या अगदींच जवळचे निंबार्क ह्यांनीं ज्या राधाकृष्णभक्तीची ध्वजा अकराव्या बाराव्या शतकांत पुन्हा कायम केली, ब्रह्मानंद केशवचंद्रांचे दुसरे जीशस श्रीचैतन्य प्रभु हे ज्यांत रंगून गेले, महाराष्ट्रीय ब्राह्मांचे आवडते श्रीनिवृत्ति, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम हे जगद्वंद्य संत ज्या कृष्णलीला गाण्यास कधींच कंटाळले नाहींत, त्या श्रीकृष्णचरित्राची सूर्यप्रकाशाप्रमाणे दिव्य प्रभा जर कोणास दिसत नसेल, तर त्यांना कांहीं दृष्टीचा विकार आहे, असेंच समजलेले बरे ! कां अलीकडे दोन पिढ्यांत आम्हांला एकाएकीं जास्त कळूं लागलें असें म्हणायचें ? परतु असा हा आंग्लाईचा कालमहिमा म्हणावा, तर श्रीरामकृष्ण परमहंस आणि श्रीमत् स्वामी विवेकानंद, श्रीरामकृष्णानंद, श्रीरामतीर्थ, श्रीगुलाबराव व श्रीबाबा-भारती, अशा कित्येक आधुनिक संतपुरुषांनी श्रीकृष्णभक्तीचा साक्षात् अनुभव मागच्याच पिढीत घेतला नाहीं काय ? ईश्वराने राधाकृष्णरूपानें ज्यांस साक्षात् दर्शन दिलें, असे भाग्यवंत या नवयुगांतही कित्येक आढळतात. मग त्यांच्या दिव्य अनुभवापुढें ह्या ब्राह्ममताची मातब्बरी ती काय ! थिऑसफिस्टांनीं आम्हांस श्रीकृष्णचरित्ररहस्य सांगावें व हिंदु आईबापांच्या पोटीं येऊन

आम्हीं श्रीकृष्णनिंदा करावी, हा दैवदुर्विलास नाहीं काय ? ज्यांची संघटना व निष्ठा पाहून न्यायमूर्ति रानड्यांचा ब्राह्मसांप्रदायाचा अभिमान गलित झाला त्या, प्रेमाने गोपीगीतें व खेळीया गात नेमाने पंढरीस जाणाऱ्या, वारकऱ्यांची नीतिमत्ता व ईशप्रेम याचा कितवा अंश, "सारीं इंद्रियें मोकळीं टाकून विषय भोगा" म्हणून सांगणाऱ्या ब्राह्मांत सांपडेल, याची त्यांनीं बारकाईने तुलना केली आहे काय ? कोण ब्राह्मांच्या नीतीची ही अपूर्वाई! कोण चिकित्सक बुद्धीचा दुरभिमान ! आणि कोण ही विलक्षण तर्कपद्धति! थोरांबद्दल अधिक काय लिहावे, पण पंडित सीतानाथ तत्त्वभूषणासारख्या पुरुषाने इतके बेजबाबदारपणे कांहींतरी लिहावे, याचे आम्हास फारच आश्चर्य वाटते ! वरील लेखांत त्यांनीं कालगणना, धर्मरहस्य व भक्तानुभव यांबद्दल आपले इतके अज्ञान प्रगट केले आहे कीं, त्यांतील फोलपणा थोडा विचार केला असतां कोणासही सहज कळून येईल.

कालनिर्णयाच्या दृष्टीने श्रीकृष्णाचा काल इ. सनापूर्वीं १४०० वर्षे हा आतां अनेक प्रमाणांनी निश्चित झाला आहे. भागवत पुराणही पंडितजी म्हणतात तितके अर्वाचीन नाहीं. याबद्दलही विकृत बुद्धीच्या पाश्चात्य संशोधकांशिवाय व त्यांचे अंधानुकरण करणाऱ्या देशी पंडिताशिवाय आतां कोणास शंका राहिली नाहीं. ब्रह्मपुराणांत व विष्णुपुराणांत रासक्रीडावर्णन आहे. श्रीकृष्ण-चरित्रांचे रहस्य भगवतांच्या उक्तीवरुन लक्षात घ्यावे ते बरे.‡ त्यागानेच अमृतत्वाची प्राप्ती होते, असा उपनिषदांचा अखेरचा सिद्धान्त आहे. कुलवधू स्त्रियांस, गुणांत विनय आणि लज्जा व माणसांत पति ह्या प्राणापेक्षांही प्रिय-वस्तु असतात. त्यांचाही त्याग करण्यास श्रीकृष्णाने सांगितले, व गोपींनी तें

---

‡ ( १ ) ये यथा मां प्रपद्यन्तेतांस्तथैव भजाम्यहम् ॥
अर्थः—जे मला ज्या प्रकारे भजतात, त्यांना मी त्याप्रमाणेच फल देतों.
( २ ) सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अर्थः—सर्व धर्म सोडून तूं मला एकट्यालाच शरण ये.
( ३ ) अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् साधुरेव स मंतव्यः ।
अर्थः—मोठा दुराचारी कां असेना; मला जर तो अनन्यभावानें भजत आहे, तर तो साधुच समजला पाहिजे.

मानलें, त्या वेळचें तें गोपींचें आत्यंतिक प्रेम पाहून मोठ्या मोठ्या तपोधन ऋषींनीं व कबीरासारख्या अर्वाचीन संतांनीं लज्जेनें माना खालीं घातल्या. अशा त्या दिव्य लोकोत्तर प्रेमाची कल्पना, पाश्चात्य युवयुवतींचे नाचरंग व वशीकरणपद्धति यांसाठीं हपापलेल्या अभागी आधुनिक सुधारकांस कोठून येईल!

अकराव्या शतकांतील निंबार्क यांची इष्टदेवता राधा होती, श्रीशुकाचार्य यांचीही इष्टदेवता राधाच होती, म्हणून भागवतांत तिचे नांव त्यांनीं उघड केलें नाहीं, अशी वैष्णव संप्रदायांत समजूत आहे. त्यांत बरेच तथ्य दिसतें. श्रीरामकृष्ण परमहंसांनीं एकदां अत्यंत प्रसन्न असतांना श्रीस्वामी विवेकानंद यांस श्रीराधेचें प्रत्यक्ष दर्शन (आपल्याच शरीराचे दिव्य रूपांतर करून) दिल्याचे त्यांच्या चरित्रांत प्रसिद्ध आहे. तसेंच वृंदावन क्षेत्रांतील एका माकडाने स्वामी एकदां यमुनेवर स्नान करीत असतां त्यांची छाटी पळविली, तेव्हां ते तेथील क्षेत्रदेवता जी राधा तिच्यावर रुष्ट झाले, असे पाहून त्या माकडानें ती मुकाट्याने परत आणून दिली. अशी एक विलक्षण कथा, भोळ्याभाबड्या लोकांनीं नव्हे- तर चिकित्सक लेखकांनीं प्रसिद्ध केली आहे. तात्पर्य, श्रीराधादेवी ही भक्तीची परमसीमा होय. ती परपुरुषाशीं (मौंजीबंधनही न झालेल्या बाळकृष्णाशीं) रत झाली, याचा कोणी कांहीं अर्थ करोत; परंतु ज्यांचा देहभाव समूळ नष्ट झाला होता, अशांच्या कथा, विषयव्यवहारांत वागणाऱ्या आपल्या विकारी मनांस श्रद्धेवांचून पटणे फार कठीण आहे. याची पूर्ण जाणीव ठेवून, अशा कथांस खोट्या अगर निंद्य ठरविण्याचें धाडस शहाण्यांनीं तरी करूं नये, हेच योग्य होय.

असो. श्रीकृष्णचरित्राबद्दल ज्यांचे असे हे विचार ते रावण-कुंभकर्ण व नल-नील-जांबुवंतांच्या कथा ज्यांत आहेत त्या रामायणास इसाबनीतीइतकेही महत्त्व देत नसतील, हे उघड आहे. शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें पुराणांसंबंधीं साधारणब्राह्मांची प्रामाण्यबुद्धि कशी नष्ट झाली आहे, हें वरील विवेचनावरून कळून येईल.

आतां सदाचार हें एकच प्रामाण्य उरले. सदाचार म्हणजे प्राचीन कालापासून चालत आलेला देशरिवाज इतकाच अर्थ घेतला, तर तो सदाचार न पाळण्यांतच ब्राह्मांनीं आजपर्यंत भूषण मानलें आहे. परतु ही आपली मोठीच घोडचूक झाली असें, पाश्चात्यांनीं कान टोंचल्यामुळें, आतां त्यांना

हळुहळू कळून येत आहे. आणि आम्हीं पूर्वपरंपरेचा आजपर्यंत धिक्कार केला, यांतच आमचें अपयशाचें बीज आहे, असें ब्राह्मांस आतां कोठें वाटूं लागलें आहे.

असे आहे तरी सदाचार याचा अर्थ असा संकुचित करण्यास ब्राह्म अजूनही तयार असतील असें नाहीं. सदाचार म्हणजे शहाण्या लोकांचा—अर्थात् साहेब लोकांचा—आचार असाच अर्थ आजपर्यंत त्यांनीं केलेला दिसतो. त्यांचे महाजन म्हणजे साहेब. आणि विलायत हाच त्यांचा पंथ. ह्या साहेब लोकांच्या आचारांचे शुद्धस्वरूप पाहण्याकरितां राजा राममोहन, केशवचंद्र, शिवनाथशास्त्री असे बहुतेक सर्व ब्राह्म पुढारी विलायतची यात्रा करून आले. कित्येकांनीं आपलीं मुले शिक्षणाच्या निमित्ताने विलायतेसच वाढविलीं. व कित्येकांनी त्यांचीं लग्नेही तेथेच केली. साहेबांचे रिवाज समजावे व लाजाळूपणा मोडावा, म्हणून कित्येकांनीं आपल्या पडद्यांतल्या बायका बाहेर काढून साहेबांच्या घरीं हिंडवल्या. ह्याप्रकारे त्यांच्या दृष्टीने त्यांनीं ज्या सदाचारांचे अनुकरण केले त्याचे विस्तृत वर्णन 'सामाजिक सुधारणा' या सदराखालीं पुढील प्रकरणांतून आम्ही देणार आहोत. म्हणून हा साधारण-ब्राह्मांचा प्रामाण्यवाद येथेच खुंटवूं.

---



साधारण-ब्राह्मसमाज मंदिर-कलकत्ता.

## प्रकरण दहावें

# ब्राह्मतदर्शन

एकमेवाद्वितीयं व सत्यंज्ञानमनंतं ब्रह्म, या साधारण-ब्राह्मांच्या दोन आदर्श-वाक्यांचा विचार पूर्वीं झाला. आतां त्यांच्या राहिलेल्या दुसऱ्या चार आदर्श-वाक्यावरून असें दिसते कीं, (ब्रह्मकृपा हि केवलं) ब्रह्मकृपा हेंच त्यांचें साधन आहे. (सत्यमेव जयते) सत्य हें त्यांचें ब्रीद आहे; (धर्मं चर, धर्मात्परं नास्ति) धर्माचरण हेंच त्यांचें अनुशासन आहे, आणि (यतो धर्म-स्ततो जयः) जेथें धर्म तेथें जय अशी त्यांची फलश्रुति आहे.

एकमेवाद्वितीयं या वचनाप्रमाणें 'ब्रह्मकृपा हि केवलं' यांतही सांगणारांनीं जें अनन्यत्व निक्षून सांगितलें आहे, तें जबरदस्त पुरुषार्थवादी अशा ब्राह्मांच्या ठिकाणीं अन्वर्थक आहे, असें वाटत नाहीं. केशवचंद्रांस कदाचित् कांहीं अंशीं दैववादी म्हणतां येईल पण तितपतही दैववादी साधारण-ब्राह्मांस म्हणतां येणार नाही. माझे हातून पातक घडलें तरी त्याचाही जाब तुम्ही ईश्वरासच विचारा, अशी केशवचंद्रांची निष्ठा असल्याचें ते बोलून दाखवीत. उलट पक्षीं साधारण-ब्राह्म हे आपल्या कर्माचें कर्तृत्व ईश्वराकडे न देतां कर्माचा अधिकार व जबाबदारी आपली आहे असें स्पष्ट मानतात. दुसरें वाक्य 'सत्यमेव जयते' या वचनांतील सत्य या पदाचा अर्थ, उच्चार, विचार, आचार आणि अनुभव यात मेळ इतका तरी मानला-च पाहिजे. परंतु हा मेळ इतर ब्राह्मांच्या ठिकाणीं राहो, पण अनुष्ठानिक जे ब्राह्म उपदेशक यांच्या ठिकाणींही असावा तसा नसतो, ही गोष्ट त्यांसही नाकबूल नाहीं. तिसरें वचन 'धर्मं चर, धर्मात्परं नास्ति' यांतही जी धर्मा-चरणाच्या श्रेष्ठतेची सापेक्षता दर्शविली आहे, ती प्रपंचपरमार्थ एकरूप मानणाऱ्या साधारण-ब्राह्मांच्या ठिकाणीं कांहीं अंशीं निरर्थकच ठरते. इतकें सांगितल्यावर 'यतो धर्मस्ततो जयः' या फलश्रुतीचा अनुभव साधारण-ब्राह्मां-च्या या अयशस्वी संस्थेस अद्याप तरी आला नाहीं, हे सांगावयास नकोच. शिवाय मरणोत्तर स्थितीबद्दल ज्यांची कोणतीच निश्चित भावना नाहीं, त्यांचा

ही फलश्रुति म्हणजे सिद्ध ताइताप्रमाणे एक शब्दालंकारच होय. कारण 'तुरत-दान-महापुण्य' अशी तात्कालिक फलश्रुतीची धर्मवेडी समजूत साधारण-ब्राह्मांचे ठिकाणीं असेल, असे वाटत नाहीं. या आमच्या त्रोटक टीकेस दुसरी बाजू असणे शक्य आहे. आणि त्याचेंच सविस्तर वर्णन आम्ही ब्राह्मलेखकांच्या आधारे यापुढे करणार आहोत. ते वाचल्यावर आमच्या टीका कितपत समर्पक आहेत, याचा विचार वाचकांनींच करावा. ब्राह्मांचीं हीं आदर्शवाक्ये साऱ्या जगास आदर्शवत् आहेत यांत शंका नाहीं. तसेच तीं आत्मसात् करून स्वानुभवाच्या पायरीवर नेणे, ही गोष्ट कोणासही अत्यंत दुरापास्तच आहे अर्थात् ब्राह्मांची सर्वसाधारण उन्नति अद्याप त्या आदर्शापर्यंत गेली नसली तरी तेवढ्याने ते निंद्य ठरतात, असा आमच्या लिहिण्यांतला भावार्थ नाहीं. वेदान्तशास्त्रांतील चार महावाक्ये ज्यांनीं आपल्या अनुभवांत उतरविलीं आहेत असे कोट्यवधि वेदान्तानुयायी लोकांत किती थोडे सांपडतील, ह्याची आम्हांस जाणीव आहे. परंतु मतामतांच्या गलबल्यांत हिंदूंना कोपरखळ्या मारून जे प्रमुख विद्वान् लोक स्वजनसंमर्दांतून बाहेर आले, त्यांची खरी ओळख करून देणे जरूरच आहे. नांवावरून लक्षण कळतेंच असें नाहीं. जाहिरातीवरून औषधींचे गुण ठरत नाहीत. त्याचप्रमाणे आदर्शवाक्ये सर्वोत्कृष्ट असलीं, तरी संस्था आदर्शवत् झाली आहे काय, हा चिकित्सेचा प्रश्न शिल्लक राहतो. व त्याचाच आम्हांस विचार कर्तव्य आहे.

वरील आदर्शवाक्यांचा साधारण-ब्राह्म जो अर्थ करतात, त्यास अनुसरूनच त्यांनीं आपली सांप्रदायिक मतपत्रिका बनविली आहे, ती अशीः—

१ जगाचा कर्ता, भर्ता आणि उद्धरता असा एकच देव आहे. तो अंतर्यामिन् आहे, तो सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, अत्यंत प्रेमळ, न्यायी व पवित्र आहे. तो विभु, शाश्वत आणि आनंदमय आहे.

२ जीवात्मा अमर व अनंत उन्नत होणारा आहे. तो ईश्वरास आपल्या कर्माबद्दल जबाबदार आहे.

३ ईश्वराची सत्य रूपाने मानसिक उपासना करावी. खरें सौख्य व तारण यांच्या प्राप्तीसाठीं ईश्वरोपासना करणें जरूर आहे.

४ ईश्वरावर प्रेम करणें व आयुष्यांतील सर्व व्यवहारांत त्याच्या इच्छेनुरूप वागणें, हीच खरी उपासना होय.

५ प्रार्थनापूर्वक ईश्वरावर भार टाकणें आणि त्याच्या सान्निध्याची सतत जाणीव बाळगणे, हींच अध्यात्मप्रगतीचीं साधनें आहेत.

६ कोणत्याही कृत्रिम पदार्थाची ईश्वर म्हणून उपासना करूं नये. त्याचप्रमाणें कोणतीही व्यक्ति किंवा ग्रंथ प्रमादरहित व तारणाचे अनन्य साधन मानूं नये. परंतु पंथभेद किंवा देशभेद न मानतां सर्व धर्मशास्त्रांच्या व लोकांच्या शिकवणींतील सत्याचा आदरपूर्वक स्वीकार करावा.

७ ईश्वराचे पितृत्व, मानवाचे बंधुत्व आणि प्राणिमात्रांवर दया, हेच सत्यधर्माचे रहस्य आहे.

८ ईश्वर पुण्याचे बक्षीस देतो व पापाबद्दल शासन करतो. ते शासन उपायरूप असून कायमचे नसते.

९ पापापासून खऱ्या पश्चात्तापपूर्वक निवृत्ति हे एकच पापाचे प्रायश्चित्त आहे. ज्ञान, सत्त्व आणि पावित्र्य या गुणात ईश्वराशी ऐक्य पावणे हेच खरें तारण होय.

वास्तविक मतस्वातंत्र्य हाच साधारण-ब्राह्मसंस्थेचा विशेष आहे. परंतु धर्मसंप्रदाय म्हटला म्हणजे या स्वातंत्र्यास कांही तरी मर्यादा असावीच लागते. म्हणून साधारण-ब्राह्मसमाजांत दाखल होतांना नवीन सांप्रदायिकांस जे लिहून द्यावे लागते ते असें:—

ईश्वराचे अस्तित्व, मानवी जीवात्म्याची अनत उन्नति व अमरत्व आणि उपासनेची आवश्यकता या गोष्टींवर माझा भरंवसा आहे, आणि उलट पक्षीं कोणत्याही सृष्ट वस्तूस अगर व्यक्तीस मी ईश्वर मानीत नाही, किंवा मानवांच्या तारणार्थ जीवेश्वरांमधील मध्यस्थ असा कोणी असूं शकेल, असा माझा विश्वास नाहीं.

एका सत्यदेवाची, प्रेम आणि सेवा यांचे द्वारे, उपासना करणे, ब्राह्म-धर्मतत्त्वांचा प्रसार करणे, श्रेय आणि प्रेय संपादण्यांत ब्राह्मबंधूंस व इतरांस मदत करणे आणि ब्राह्म संस्थेची व्यवस्था सनदशीर पद्धतीने चालविणे, हा जो साधारण-ब्राह्मसमाजाचा उद्देश; त्याच्याशीं माझी सहानुभूति आहे; व त्या उद्देशाच्या सिद्धयर्थ माझ्याच्याने होईल ती मदत करण्यास मी तयार आहें.

माझी वर्तणूक सुधारावी व मीं नेमाने ईश्वरोपासना करावी असा मी मनःपूर्वक प्रयत्न करीत आहें.

माझे कौटुंबिक व इतर सर्व धार्मिक विधि, मूर्तिपूजा व जातिभेद न करतां, मी ब्राह्म-तत्त्वाप्रमाणे करण्यास तयार आहे.

माझें अठरावे वर्ष पुरे होऊन गेलें आहे.

साधारण-ब्राह्मसमाजाच्या उद्दिष्टांच्या पूर्ततेसाठीं मी खालीलप्रमाणें मासिक अगर वार्षिक वर्गणी देतो.

वरील मजकुराच्या अर्जाच्या खालीं सांप्रदायिकांपैकी सूचक व अनुमोदकांच्या सह्या असतात. आणि नंतर त्या अर्जाचा संस्थेकडून रीतसर विचार होतो.

येथपर्यंतच्या मजकुरावरून साधारण-ब्राह्मांच्या मतांची कल्पना स्थूलमानाने वाचकांस आलीच असेल. तरी हा ग्रंथ सांप्रदायिक नसून विवेचक पद्धतीनें लिहिण्यास घेतला असल्यामुळे ह्या ब्राह्म-मतांचा विस्तारपूर्वक विचार करणें जरूर आहे. ह्या प्रकरणात आम्ही ब्रह्म व जीव यासंबंधीच ब्राह्मांचा सांप्रदायिक विचार सांगणार आहोत. बाकीच्या मतांचा विचार पुढें क्रमशः येईल.

ब्राह्मांपैकीं कांहीं पंडिताच्या तात्त्विक विचारसरणीचा स्थूलमानाने पूर्वी विचार झाला आहे. आतां धर्माच्या मूलभूत सिद्धान्ताबद्दल त्यांचे सामाजिक म्हणणें काय आहे, त्याचा विचार विशेषेकरून हेमचंद्र सरकार यांच्या पुस्तकांवरून पाहू. प्रथम ईश्वराचे स्वरूपलक्षण ठरवितांना तो ज्ञेय आहे की अज्ञेय आहे, तो सगुण आहे कीं निर्गुण आहे, तसेच तो सृष्टीच्या पर आहे की सृष्टींत ओतप्रोत भरलेला आहे, असे तीन प्रश्न त्यांच्यापुढे आले. पहिल्या प्रश्नाचें उत्तर त्यांनीं असे ठरविले कीं, ज्याप्रमाणे आकाशाची अंतिम सीमा

---

* नाहं मन्ये सुवेदेति नो न वेदेति वेद च,
योनस्तद्वेव तद्वेद नो न वेदेति वेद च ।

**भावार्थ**:—मला ते ( ब्रह्म ) नीट समजलें आहे असें नाहीं. मला तें समजलें नाहीं असेंही नाहीं. मला ते समजलें असूनही समजले नाहीं, या सिद्धान्तवत् वाक्याचा अर्थ ज्याला समजला, त्यालाच ते समजलें. हेमचंद्र सरकार यांस हे पटले असले, तरी पंडित सीतानाथ यांचा तत्त्वविचार याहून भिन्न आहे, हें सुज्ञ वाचकास सांगावयास नकोच.

आपल्याला न कळली तरी आपल्याला आकाश म्हणजे काय तें कळतें, त्याचप्रमाणे ब्रह्मस्वरूपाचे पूर्णपणे आकलन होणे मानवी बुद्धीस अशक्य असले, तरी ते शून्यवत् वाटत नाहीं. अर्थात् ते अज्ञेय नाही. तसें ते पूर्णपणे ज्ञेयही नाही.

ब्रह्म सगुण आहे कीं निर्गुण आहे, ह्याचाही विचार ब्राह्म वरीलप्रमाणें सापेक्षतेनेंच करतात. ते म्हणतात कीं, प्रेम, क्षमा, दया इत्यादि कल्याणगुण आपणांस श्रेष्ठ वाटतात, त्यावरूनच ते गुण दैवि आहेत. ईश्वराचे पूर्ण स्वरूप जरी आपल्याला न कळले, तरी जे गुण मनुष्यात आपल्याला स्पृहणीय वाटतात ते प्रेम, क्षमा, दया इत्यादि गुण ईश्वराच्या ठिकाणीं असलेच पाहिजेत, अशी आपली खातरी होते. अशा रीतीने ईश्वर हा सगुण ठरतो; परंतु तो अशा रीतीने सकलकल्याणगुणसमन्वित असला तरी तो त्या गुणांनी मर्यादित झालेला नाहीं. तो गुणातीत आहे. म्हणून ह्याअर्थी त्यास निर्गुणही म्हणता येईल. सत्, चित्, आनन्द हे त्याचे तीन गुण ठळक, सार्थ व खरे आहेत. त्या केवळ कल्पना नव्हत. तसेच दुसऱ्या अर्थी त्या गुणांची व्याप्ति किंबहुना त्या गुणाचे पूर्ण स्वरूप कल्पनातीत आहे. ( ब्रह्म निर्गुण आणि ईश्वर सगुण असा भेद ब्राह्म मानीत नाहीत यामुळे त्याच्या दृष्टीने केवळ,ब्रह्म, ईश्वर, परमपुरुष देव,परमात्मा हे शब्द सन्मानार्थीच आहेत.)

ईश्वर सृष्टीत सर्वत्र अनुस्यूत आहे कीं सृष्टीच्या पर आहे. याचाही निर्णय त्यांनीं वरील धोरणाने केला आहे. सृष्टीच्या पलीकडे राहून सृष्टि निर्माण करणारा, असे ईश्वराचे स्वरूप त्यास मान्य नाही. ईश्वर सृष्टीत ओतप्रोत भरलेलाच आहे. परतु तो सृष्टीने मर्यादित झालेला नाही, त्याअर्थी तो सृष्टीच्या पलीकडेही आहेच. अशा रीतीने जो अज्ञेय असून ज्ञेय आहे, गुणातीत असून सगुण आहे, आणि सृष्टीच्या पर असून सृष्टींतही आहे, अशा त्या परमात्म्याची व्याख्या करतां येणे शक्य नाही. त्याचे स्वरूप केवळ कार्यानुमेय आहे. त्याची व्याख्याच करावयाची तर फार तर इतकेच म्हणता येईल कीः—

यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति
यत् प्रयन्त्यभिसविशन्ति तद्विजिज्ञासस्व तत् ब्रह्म ।

**भावार्थः**— ज्याच्यांतून ह्या वस्तु निर्माण होतात, ज्याच्यात त्या राहतात, आणि येथून गेल्यावर ज्याच्यांत त्या विराम पावतात, तोच ईश्वर होय. अशा

त्या विश्वाला अधिष्ठानरूप असलेल्या ब्रह्माचें साकल्यानें आपल्याला ज्ञान होणें अशक्य आहे. तरी मानवी आकांक्षा तृप्त होण्यापुरतें आपल्याला त्याचें स्वरूप कळते. जसें ब्रह्माचे सद्रूप तसेंच त्याचे चिद्रूपही कळतें. हे ब्रह्माधिष्ठान जड नाहीं. कारण तृणांकुरापासून तो खगोलापर्यंत आणि क्षणभंगुर कीटकापासून मानवी इतिहासाच्या दीर्घ नाटकापर्यंत सर्व दृश्य, चैतन्यानें भरलें आहे. तसेंच सत्य, न्याय, पावित्र्य इत्यादि कल्याण-गुणांचें संवर्धन व्हावें, अशी ज्याअर्थी सृष्टिकर्त्याची योजना दिसते, त्याअर्थी ईश्वराचा प्रेम किंवा आनंद हा तिसरा गुणही अनुभवास येतो.* ह्याप्रमाणे ईश्वरासंबंधीं जीवाचे बौद्धिक, भावनात्मक, आणि नैतिक अनुभव आहेत. विश्वात्मा, जीवात्मा, व मानवी जगाचा कर्ताकरविता तोच आहे.‡ (१) तो एक सद्रूप आहे. विश्व हे छायारूप आहे, तो निर्विकार आहे, बाकीचें सर्व क्षणभुंगर आहे. (२) तो ज्ञाननिधि आहे. त्याचेंच ज्ञान सर्वत्र व्यक्त झालें आहे. (३) तो एकच अनंत आहे. बाकी सर्व सांत आहे. (४) तो आनंद-रूप आहे. त्याच्या आराधनेनें दिव्य आनंद प्राप्त होतो. (५) तो क्षमाशील आहे. त्याच्या क्षमेचाच आपल्या पापी जीवनास आधार आहे. (६) तो एकच आहे. सर्व पदार्थ त्याचें एकत्वच दर्शवितात. (७) तो पवित्र आहे. जो सद्भावनेनें त्याच्या पवित्र नामाचें स्मरण करतो, तो पवित्र होतो. असा हा सप्तगुणात्मक ईश्वर म्हणजे ब्राह्मपंथानें आपला म्हणून मानलेला एक ईश्वर असें नव्हे, हे ईश्वराचें स्वरूपलक्षण×अपूर्ण आहे खरें; पण तें तसें असणें हें अपरि-हार्य आहे. ह्या लक्षणातील अनंतत्व आणि अद्वितीयत्वही सहजसिद्ध आहे.

* आनंदाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ।

‡ नित्योनित्यानाम् चेतनश्चेतनानामेको बहूनाम योनिदधाति कामान् तमात्मस्थं,

× सत्यं ज्ञानमनन्तम् ब्रह्म आनंदरूपममृतं यद्विभाति शान्तं शिवमद्वैतम् शुद्धम् अपापविद्धम् ।

Brahmoism, Philosophy of Brahmoism, The Fundamental Principle of Brahmoism, The Religion of the Brahma Samaj, अशा ब्राह्माच्या अनेक पुस्तकातील वर्णनांत सूक्ष्मविरोध आहे. तो आम्हांसही टाळणें शक्य नाहीं.

आत्मस्फूर्ति ही सर्व ज्ञानाच्या मूलभूत आहे, ती व्यापक आहे. अखिल पदार्थ दृश्य म्हणूनच जाणले जातात. दृश्य आणि द्रष्टा हे सापेक्ष आहेत. अर्थात् दृश्यदर्शनात दृश्याबरोबर द्रष्टा हा आपणांसही पाहत असतो. सर्व दृश्य अथवा ज्ञेय पदार्थ दिक्कालाधीन म्हणजे त्यांच्या पोटांतच आहेत. आणि अशा दिक्कालासही दृश्यरूपाने आपणासहित पाहणारा तो एकच ज्ञाता असल्यामुळे तो परमपुरुष दिक्कालातीत म्हणजे अनंत, सर्वज्ञ व अद्वितीय आहे. हे ब्रह्मस्वरूपासबंधीं तात्त्विक विवेचन पूर्वी आलेच आहे. अर्थात् त्यावरून ब्राह्मास ईश्वराचे अवतार व मूर्ति अमान्य आहेत, हे वेगळें सांगावयास नको.

ह्याप्रमाणे ईश्वराचा विचार झाल्यावर आतां जीवासंबंधीं ब्राह्माचा विचार पाहूं.* हा विचार करीत असतांही त्यास दक्षिणोत्तर ध्रुवांप्रमाणे दोन बाजूंस दोन विरोधी मते आढळली. पाश्चिमात्य जडवाद्यांनी जीवचैतन्यास जणुं यंत्रांतील गतीप्रमाणे जडोद्भव मानले. आणि वेदान्त्यांनीं तर जीवास केवळ भ्रमरूप मानले. परंतु ब्राह्मानी ही दोन्ही टोकें सोडून अहंप्रत्ययवान् जीवास सत्य मानले. तसेच जीवास जन्म म्हणजे आरंभ असूनही त्यास अंत नाहीं, असे जीवाचे अमृतत्व त्यांनी मानले आहे. मृत्यु हा शरीरास आहे. पण त्यानंतरही आपण कोठें तरी असूच अशी सार्वत्रिक दृढ श्रद्धा असतेच. ज्यास आरंभ झाला, त्याचा अंत होतो, असा जड सृष्टीचा वास्तविक नियम नाही. नियम उलट आहे. एकदा उत्पन्न झालेली गति प्रतिबंध नसल्यास अनंत काल तशीच रहावी, हाच निसर्गाचा नियम आहे. जड पदार्थाच्या ठिकाणी गुरुत्वाकर्षणाचा धर्म कधी तरी उत्पन्न झाला असेल, परंतु त्यामुळे त्या धर्माचा शेवटही होईल, ही कल्पना मात्र संभवत नाहीं. जड सृष्टीचाही अत्यंत विनाश संभवत नाहीं. मग अध्यात्मसृष्टीचा कसा संभवेल? जडसृष्टीतील क्षय पावणारी परिमाण-मर्यादा अध्यात्मसृष्टीत नाही. तसेच वापरामुळे झीज हा जडसृष्टीचा नियम अध्यात्मसृष्टीस लागू नसून, त्यांगांत वाढ किंवा समृद्धि, असा उलट नियम आहे. तसेच मानवी बुद्धीची पोहोच, त्याच्या अंतःकरणाची खोली आणि त्याच्या इच्छाशक्तीचे ऐश्वर्य, हे सारे उदात्त गुणधर्म मनुष्याच्या इहलोकीच्या

* यांतही मधून मधून थोडा विरोधाभास आहे.

आयुष्याच्या लघुतेशीं अत्यंत विसंगत दिसतात. जगांत उघड उघड घडणाऱ्या पापाची व अन्यायाची निष्कृति आपणांस ज्याअर्थी येथेच पाहण्यास मिळत नाहीं, त्याअर्थीं, ती पुढे केव्हां तरी झाली पाहिजे. अखेर सत्यास जय व असत्यास पारिपत्य हा येथे मृत्युलोकीं कधी कधीं अनुभवास न येणारा सिद्धान्त निरपवाद आहे, असें अज्ञात भविष्य काळाकडे दृष्टि ठेवून आपण निश्चयाने सांगू शकतो. पुण्यात्मे व पापात्मे ह्यांस मृत्यु ही एकच अखेरची गति असेल, तर सदसद्विवेकबुद्धि हे एक थोतांडच ठरेल. तात्पर्य आपल्या ह्या जन्मीच्या बौद्धिक, नैतिक व आध्यात्मिक जीवनाची सार्थकता व फलश्रुति जेथ होईल, असे कोणत्या तरी अज्ञातस्वरूपात आपले जीवन मृत्यूनंतरही असलेच पाहिजे. शाश्वत आणि अनत असा जो परमात्मा तोच तत्त्वतः एकरूप अशा जीवात्म्याच्या अमृतत्वाचा सर्वात सबळ पुरावा होय. जीवात्मा मूळच्या अपूर्ण स्थितीतून ब्रह्माच्या पूर्णस्थितीकडे स तत उन्नत होत जात असतो, असे ब्राह्माचे मत आहे. अर्थात् तसे होण्यास तो अमरच मानला पाहिजे. असा उन्नत होणारा जीव, अखेर आपणांस जन्म देणाऱ्या परमदयाळु जगत्पित्याच्या अगदीं सन्निध गेला असतां, त्या साधक जीवाच्या अहंप्रत्ययाचे नरडे दाबून त्या परमेश्वराने त्या जीवाचा घात करणे, म्हणजे त्यास पार नाहींसा करणे, (ब्रह्मांत जीवात्मा लीन होणे) ही गोष्ट कल्पनेस असबद्ध व असत्य वाटते. अपूर्णातून पूर्णदशेकडे जीवाने अनंतकाल जात रहावे. परंतु त्यानें पूर्ण कधींच होऊं नये, (कारण पूर्ण वस्तु एकच असणार ) हेंच जीवाचें अमृतत्व आहे जीव जर ब्रह्मात लीन म्हणजे समरस होत असेल, तर ते अमृतत्व जीवाचे कसचे ! ते ब्रह्माचेच अमृतत्व होईल. त्याबद्दल कोणासच शंका नसून ते सिद्ध करीत बसण्याचे प्रयोजनही नाही, असे ब्राह्माचें मत आहे.

ह्याप्रमाणे जीवाचे अमृतत्त्व ठरले, तरी मृत्यूनंतर जीव कोठे, कोणत्या स्थितींत रहातो ह्याबद्दल ब्राह्मांची कांहीच निश्चित भावना नाहीं देवेंद्रनाथ प्रभृति कित्येक ब्राह्म, जीवात्मा मृत्यूनंतर अशरीर स्थितीत अनंत उन्नतदशेस जात असतो, असे म्हणतात; व आजही बहुतेक ब्राह्म तसेच मानतात. पंडित सितानाथ प्रभृति कांहीं थोडे ब्राह्म जीवास मरणोत्तर सूक्ष्म शरीर असणे शक्य आहे, असें मानतात, व बाबू प्रतापचंद्रादि फारच थोड्या

ब्राह्मांचा कल जीवास ह्या मृत्युलोकीं पूर्वजन्म व पुनर्जन्म मानण्याकडे दिसतो. आत्म्याची नैतिक उन्नति आणि नैतिक उन्नतीसाठीं सामाजिक जीवनाची आवश्यकता, ह्या दोन मुद्द्यावर साधारण-ब्राह्मांचा इतका जोर आहे कीं, त्या मुद्द्यांचे पूर्ततेसाठीं जीवास मरणोत्तर हल्लींसारखे स्थूल शरीर प्राप्त न झालें, तरी जीव हा मरणोत्तरहीं एक सामाजिक घटक या रूपातच असला पाहिजे, आणि त्यासाठीं त्यास असाच एखादा स्थूल देह नसला, तरी अशाच साधनांचा सूक्ष्म देह तरी असलाच पाहिजे, असे कित्येक मानतात. निदान मनुष्याला मरणोत्तर मनुष्याहून हीन कोटींतील जन्म येणे हे त्याच्या अनंत उन्नतीच्या दृष्टीने अशक्य आहे, असा त्यांचा दृढ विश्वास आहे.

अशा रीतीने जीवात्म्याचे आयुष्य अनंत मानण्यास जे तयार आहेत, तेच ते आयुष्य अनादि म्हणण्यास मात्र तयार नाहींत. इतकेंच काय पण ह्या जन्माच्या अगोदरच्या जन्माबद्दलही साधारण-ब्राह्माची वृत्ति फारच साशंक आहे. पूर्वजन्म न मानल्यास काहीं जीव जन्मतःच सदृढ, सतेज व सुंदर असावेत, व कांहीं पंगु, पतित व पोरके व्हावेत, यात ईश्वराकडे वैषम्य व नैर्घृण्य हे दोष येतात, ह्या मुद्द्यास ते असे उत्तर देतात की, हे वैषम्य एक पूर्वजन्म मानल्यानेच दूर होत नाहीं. कारण पूर्वजन्मातील वैषम्याचा खुलासा लावण्याकरिता त्याच्या पूर्वी जन्म मानावा लागेल आणि असे करतां करतां मूळ वैषम्य कसे व केव्हां उत्पन्न झाले, हा प्रश्न तसाच शिल्लक राहील. शिवाय ईश्वराच्या न्यायीपणास्तव पूर्वजन्म मानून इहजन्मींच्या वैषम्याचा परिहार करावा, तर पूर्वजन्मींच्या अपराधांची जीवास आठवणही न देतां त्याबद्दल त्यास शिक्षा देणाऱ्या देवाच्या पदरी अन्याय व अप्रयोजकपणा इत्यादि अनेक दोष येतील. यासाठीं पूर्वजन्माबद्दल नसत्या कल्पना करीत न बसता या जन्मीं आरंभ झालेल्या जीवनाचा पुढील काय तो विचार पहावा, असेच सामान्यतः त्यांचे धोरण दिसते. तथापि पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यांच्या मनाचा कल पूर्वजन्म मानण्याकडेच आहे. त्यांचे म्हणणे असे आहे कीं, पूर्व पापांचें स्मरण व्यष्टिमनास नसलें तरी ते समष्टिमनास असते व तीं दोन्हीं मनें तत्त्वतः एकच असल्यामुळे वरील दोष रहात नाहीं. तात्पर्य, जीवात्म्याची सतत उन्नतिच होत जाणार ह्या एका सिद्धान्ताबद्दल मात्र सर्वसाधारण-ब्राह्मांची एकवाक्यता आहे. बाकी मुद्द्यांसंबंधीं वाटेल त्याने पटेल तें मानावें, अशीच

त्यांच्या विचारांची अनिश्चित स्थिति आहे. त्यांचे विश्वासांतले पाश्चात्य भौतिक शास्त्रज्ञ अलीकडे परलोकविद्येबद्दल शास्त्रीय संशोधन करू लागले आहेत. त्यांच्या प्रकाशाने ह्या जन्मपरंपरेच्या वादावर काय प्रकाश पडतो, इकडे कित्येक ब्राह्माचे लक्ष लागले आहे. तथापि तो परलोकवाद त्यांस पटणे तूर्त तरी दुरापास्तच आहे. परलोकविद्येसारख्या कांहीशा अतींद्रिय व अद्भुत वादावर (पाहिजे तर भूतवादावर म्हणा) साधारण-ब्राह्मासारख्या बौद्धिक व व्यावहारिक दृष्टीच्या समाजाची निष्ठा बसणे कठीण आहे. ते मुख्यतः ह्या जन्मापुरताच विचार करतात आणि असे निश्चित ठरवितात की,(१) जीवात्मा व परमात्मा तत्त्वतःएक असले तरी स्वरूपतः भिन्न आहेत; (२) तसेच जीवात्म्याचे जीवन परमात्म्याचे कृपेवर अवलंबून असले तरी कार्याकार्य ठरविणे व करणे याबाबद त्यास स्वातंत्र्य आहे; (३) जीवात्मा काही करो त्याची सतत उन्नतिच होत जाणार हा सिद्धान्त निरपवाद आहे. पण जीवात्म्याची उन्नति कितीही झाली तरी तो परमात्मरूप होणे मात्र कधीच शक्य नाहीं. असे म्हणणे विरोधपूर्ण आहे खरे, पण असा हा विरोध हेच ब्राह्ममताचे वैशिष्ट्य आहे. तो विरोध त्यांना विचारात किंवा व्यवहारात कोठेच जाणवत नाही. प्रपंच-परमार्थांतील विरोधाचा समन्वय ते प्रपंचात राहून कसा करतात ह्याचे विवेचन पुढील प्रकरणांत करण्याचा प्रयत्न केला आहे.



## प्रकरण अकरावें

# ब्राह्ममतदर्शन

### जगीक-प्रपंच-कैवल्य

जीव आणि ईश्वर याचा विचार वरीलप्रमाणे झाल्यावर ब्राह्माचा जगासबधीं विचार पहावयाचा राहिला. ब्राह्मांचे ब्रह्म जगाहून वेगळे राहून जग निर्माण करते असे नाही. त्याचे ब्रह्म पूर्ण आणि अनत आहे. ते सर्वत्र ओतप्रोत भरले आहे. पण जग आणि जगदीश्वर ही मात्र एक नव्हत. अर्थात् केवळ ब्रह्माधिष्ठानास सोडून, जे नामरूपात्मक अब्रह्म असे जग राहिलेसे भासते—कारण पूर्ण ब्राह्मात दुसरे कांहीं राहील तर ते ब्रह्म त्या मानाने अपूर्ण होईल—ते तत्त्वशून्यच ठरते. परंतु हे त्यांस कबूल नाही. तात्पर्य, ( Deism ) केवलेश्वरवाद, ( Pantheism ) सर्वदेवमयत्ववाद आणि ( Subjective Idealism ) विषयि-विज्ञानवाद, त्याचप्रमाणे क्षणिक विज्ञानवाद व जडाद्वैत हे सर्व वाद नाकबूल करून, ( Neo Hegelian Meliorism ) केवळ कल्पनावाद्याचा गोडसा क्रमोत्कर्षवाद स्वीकारून त्यांनीं आपल्या इष्ट देवाकरिता किंबहुना आत्मदेवाकरितांच जे प्रपच-मंदिर उभारले आहे, ते फारच मोहक व मनोहर आहे, यांत शका नाही. परतु वैराग्याची ठिणगी पडली नाही, तोवरच ह्या लाक्षागृहाची शोभा आहे, आणि त्यात पंचप्राणांची निशा आहे; तथापि हे कळण्यास स्थितप्रज्ञ विदूर जवळ केले पाहिजेत. मग ज्यांस पुरा विवेक नाहीं, वैराग्य नाहीं, शमादि संपत्ति नाही, मुमुक्षा नाहीं, सद्गुरूची परवा नाहीं, त्या शब्दपंडितांनीं ह्या प्रपंचाचे केलेले वर्णन कसे असेल, हे काय सांगावयास पाहिजे ! एका त्यागानेच मात्र अमृतत्वाची प्राप्ति होते, असे जाणणाऱ्या वैदिकधर्मी नैराश्यवाद्यांस मात्र ते रुचणार नाही. असो.

सृष्ट्युत्पत्तिकथनाबद्दल औपनिषदिक ऋषि व साधारण-ब्राह्म हे दोघेही सारखेच उदासीन दिसतात. ह्या शंकामय मायाकार्याची संगति लावीत बसणे, म्हणजे रज्जूसर्पावरील लहरी मोजून त्याच्या विषाचे अनुमान करण्यासारखेच

ऋषींस व्यर्थ वाटले. आणि आंग्लविद्याविशारदांच्या आवडीच्या बायबलांतील सृष्टयुत्पत्तिकथा उत्क्रान्तिवादानें दुर्ज्ञेय केल्यामुळे तेही त्या भानगडींत पडले नाहींत. शिवाय ज्यांस पूर्वजन्माबद्दलही आस्था नाहीं, ते संसारी पंडित सृष्टीच्या जन्मकथनाच्या उठाठेवींत कां पडतील ! त्यांना जी सृष्टि दिसली त्यांतील योजना व उत्क्रान्ति पाहून त्यांनीं सृष्टिकर्त्या ईश्वराचे विकास, अस्तित्व व गुण अनुमित केले. आणि त्या निराकार जगदीश्वराची विश्वमंदिरांत प्रतिष्ठा केली. इतकी तयारी झाल्यावर त्यांना तीर्थक्षेत्र आणि पर्वण्या यांचे स्थानमाहात्म्य व कालमाहात्म्य कांहींच वाटेनासे झाले. आरामखुर्चीवर बसलेल्या ब्राह्माच्या हृदयस्थ जर सदोदित हरि असेल, तर त्याने आराम सोडून कष्ट कां सोसावे ? आणि शिवाय आपल्या अज्ञानाबद्दल हंसे तरी कां करून घ्यावे ? त्यांच्या अमर्याद ब्रह्मगोलाचा केंद्र ते जेथे बसतील तेथेच जर आहे, तर ह्या क्षुद्र पामर जीवाला आणखी ते काय पाहिजे ? अशा ह्या स्वयंमन्य केंद्रांतून ते प्रपचाचे जे वर्णन करतात, त्याचे दोन नमुने खालीं दिले आहेत.

" आतां आमच्या आध्यात्मिक व प्रापंचिक जीवनांतील भेद नाहींसा झाला. बोट करावे तिकडे केवळ ब्रह्म संचरल्यामुळे आतां निराशेला जागाच राहिली नाहीं. मानवी जीवन व संस्था यांस आतां मोठे गभीर पावित्र्य प्राप्त झालें आहे. जग ही कांहीं माया नव्हे आणि जीव हे कांही आभास नव्हत. मानवी जन्म ही कांही आपत्ति नव्हे; कुटुंब, समाज आणि त्यांतील प्रेमाची व कर्तव्याचीं प्रिय बंधने ही तोडून मोकळे होणे, हे जीवास मुळींच श्रेयस्कर नाहीं. आपण अशा कांहीं जाळ्यांत अडकलेलो नाहीं, कीं त्यांतून सुटणे यांतच आपला उद्धार असावा. तसे असेल तर ज्याने आपल्याला या जाळ्यांत टाकले, तो एक सैतानच असला पाहिजे. पण पूर्ण परब्रह्माच्या सत्तेत अशा सैतानाला वावच नाहीं ! आणि तो दयाळु परमेश्वर आपल्याला कधींच गोत्यांत टाकणार नाहीं. यासाठीं यापुढें दुःखवादाला कायमची तिलांजलि दिली पाहिजे. आपल्या पायाखालची भूमि पवित्र आहे. शुद्ध आत्मा हाच ईश्वराचा स्वर्ग आहे. आणि मानवी गृहस्थाश्रम हीच अत्यंत पवित्र पुण्यभूमि आहे. आपल्या पावित्र्याची व प्रेमाची वाढ व्हावी, म्हणून पवित्र व प्रेमी ईश्वराने आपणांस येथे धाडलेंआहे. ब्रह्मसाधन करणारानें असे हें जग व समाज सोडून पळून जाण्याचें मुळींच कारण नाहीं. जेथें जीवाचे आटोकाट प्रयत्न सुरू असून त्याची पारख होत आहे,

जेथें प्रापंचिक संकटें व बंधने आहेत, आणि सामाजिक कर्तव्ये आणि अडचणी येत आहेत, तें स्थळ म्हणजे या जीवाचे अत्यंत पवित्र असे ब्रह्ममंदिर होय. जेथे आईबाप आणि मुले, पति आणि पत्नी, स्नेही आणि सोबती यांच्या प्रेमाचा अत्यंत सुवासिक धूप रात्रंदिवस जळत आहे, जेथे दुसऱ्याचे दुःख व क्लेश पाहून दया-औदार्यादि उदात्त धर्म जागृत होत आहेत, जेथे सत्-संगतीमुळे पवित्राचरणास मदत होत आहे, त्या गृहस्थाश्रमीच्या कर्तव्यवेदी-पेक्षां कोणती पर्वतावरील गुहा ईश्वराचा साक्षात्कार अधिक स्पष्ट करून देणार आहे ? ”

दुसरे एक विद्वान् ब्राह्म प्रपंचाबद्दल असे म्हणतात की, “ संसारी जीव आणि साधु हे दोन वर्ग पूर्वीपासून पृथक् मानण्यांत मोठीच चूक झाली आहे. ह्या साधुवर्गात कित्येक विषयाच्या अतिसेवनाने विटलेले, कित्येक विषयाच्या उत्कट कामनेचा भंग झाल्यामुळे वैतागलेले व कित्येक वेदान्ताच्या माया-वादाला बळी पडून उदासीन झालेले, असे असतात. प्रपंचाच्या क्षेत्रांतून धर्म-क्षेत्रांत जाण्याचे असे हे मार्ग असल्यामुळे, बहुतेक सर्व धर्मसंस्थापकाच्या ह्या विरक्तीचे संस्कार त्यांच्या अनुयायांत पसरून विरागी, सन्यासी, ब्रह्मचारी, पुरोहित आणि धर्मगुरु, ह्यांचा, अडाणी जगाने सन्माननीय म्हणून मानलेला एक मोठा वर्ग निर्माण झालेला आहे. आम्ही म्हणतो की, हे लोक बाह्यतः संसारसुखासंबंधीं उदासीन दिसतात खरे; पण काहीं तुरळक अपवाद सोडून दिल्यास ते प्रपंचासक्त लोकांपेक्षांही अधिक भाडखोर, लोभी, दुष्ट, मूर्ख, व्यसनी आणि विलासी असतात. सांप्रदायिक गुरु, पुरोहित, महंत आणि पंड्ये हीं अशाच लोकांचीं उदाहरणे होत. हिंदुस्थानांत देवळे व मठ याचा सुकाळ झाला आहे; तसेच येथे धर्मगुरु, साधु आणि संन्यासी हेही असंख्य झाले आहेत, ही गोष्ट आपल्या देशाला भूषणावह नसून, ही भिकेची लक्षणे, अधर्माचीं चिन्हे व दुराचाराचीं पेवे आहेत, यास्तव ह्यांचा जितका लवकर नायनाट होईल तितका ब्राह्मांस इष्ट आहे.”

“ एके बाजूस हे संन्याशाचे संसार आणि दुसऱ्या बाजूस धर्मभोळ्या गृहस्थांकडून भयनिवृत्ति व सुखप्राप्तीकरितां देवास दिले जाणारे बळी व निरनिराळे भोग, हे पाहिले म्हणजे धर्म व प्रपंच ह्यांची लोकांनीं केलेली फारकत देवास रुजू नाही, संसारी जीवास धर्माकडे व धर्मक्षेत्रांतील लोकांस

संसाराकडे जाण्यास तोच भाग पाडीत असतो असे सिद्ध होते. आणि खरोखर सर्व उत्तम धर्मांचे हेच रहस्य आहे. प्रपंच सोडून परमार्थामागे लागण्याची प्रवृत्ति सत्यधर्मास अत्यंत विरोधीच आहे. आम्हांस मोठी आनंदाची गोष्ट वाटते कीं, आधुनिक काळांत धार्मिक कर्तव्य व अध्यात्मसंस्कृति यांसंबंधीं सुशिक्षित समाजाचा दृष्टिकोन बदलत आहे. धर्म व नीति हीं वास्तविक परस्पर भिन्न नव्हत. तसेच व्यवहार हीच उपासना हा आधुनिक काळचा महामंत्र आहे. आपली प्राचीन परंपराही प्रापंचिक कर्तव्यास धरूनच आहे. प्रत्येक मानवी प्राण्याला तीन ऋणे मानली आहेत.. पाहिले पितृऋण; हे कुटुंबाची सेवा व सुधारणा करण्याने फिटते. ऋषींचे ऋण हे अध्ययन, अध्यापन व सामाजिक सुधारणा यांनी फिटते. आणि तिसरे देवऋण हे आरोग्यसंरक्षक नियमाच्या पालनाने व इंद्रियांचा निग्रह न करता सर्व सृष्ट पदार्थांच्या व विषयांच्या विवेकपूर्वक भोगाने फिटले जाते. कारण एक कवि म्हणतो कीं, God is paid when man receives, to enjoy is to obey. मनुष्याने घेणे म्हणजेच ईश्वरास दिल्याप्रमाणे आहे. कारण भोग भोगणे यांतच त्याचे आज्ञापालन आहे. सर्व चराचर जग ईश्वराने व्याप्त करावे, आणि दुसऱ्याच्या जिनगीचा लोभ न धरतां ईश्वराने दिलेले आयुष्य ह्या दृष्टीने सृष्टिसुखात खुशाल भोगावे. असेच ईशोपनिषद् सांगते."

हे ब्रह्मलेखक पुढे असे वर्णन करतात कीः—"आपल्या अंतःकरणांत धार्मिक आणि स्वाभाविक असे दोन भेद वाटतात. आपण कसे आहो व कसे असावयास पाहिजे. ह्या दोन भिन्न भावना आपल्या ठिकाणीं दिसतात. आपले व्यक्तिगत जीवन व सामाजिक जीवन यांत वेगळेपणा वाटतो. निसर्गाचा आपल्याशीं सापत्नभाव जाणवतो; परतु अध्यात्मदृष्टीने हे सर्व भेद मावळतात. व सर्व सुसंगत असून सारे आपल्या कल्याणाकरतांच आहे, हे कळून येते. सर्व सृष्टीची धडपड जीवोत्पत्तीकरितांच आहे. निसर्गाशीं झगडून जीवांकुर ईश्वरी इच्छेने वर येतच आहे. ईश्वराचे अध्यात्म तेज मानवी इच्छेत व उत्साहांत प्रगट होत आहे. मनुष्य हा शक्तीचा पुतळा, उत्साहाची मूर्ति, कर्तृत्वाचा आगर व इच्छाशक्तीचा सांठा आहे. अर्थात् आळस, निरुत्साह, जुन्या चालीरीतीची आवड, शास्त्र व सवयी यांची गुलामगिरी, आचार, प्रचार व लोकमत यांचे बंधन, चिंता, भय,

निराशा व दुःख, हीं सारी अध्यात्मजीवनास कुपथ्ये आहेत. शक्ति, आनंद आणि प्रकाश (पांडित्य) हींच अध्यात्मजीवनाचीं लक्षणे होत. अशा प्रकारच्या ऐहिक जीवनांत प्रिय पत्नी व मित्र यांच्या आलिंगनांत आणि लाडक्या बालकांच्या चुंबनांत, ईशप्रेमाची साक्ष पटते. सर्व संसारनाटक अमोघ अशा ईश्वरी कृपेने संपृक्त होते. मग जीव हा आभास नव्हे व जीवन हे स्वप्न नव्हे, असे पटते; सामाजिक रचनेची व नियमांची शोभा वाटते. आणि जगाच्या जाणिवेशीं स्वतांच्या जाणिवेचा मेळ पटतो. भौतिक-शास्त्रेही ईशप्रणित आहेत असे कळते. कला म्हणजे सातांत अनंताची उतरलेली छबी दिसते, आणि नीति म्हणजे सक्रिय ब्रह्माचा साक्षात्कार वाटतो. धार्मिक होणे म्हणजे ईश्वराप्रमाणेच पूर्ण होणे होय. ईश्वराचे जगात प्रत्ययास येणारे सौंदर्य आणि प्रेम स्वर्गीय सुखाचा आनंद देते. मग साधक जीव आपल्या प्रियकर आत्मदेवास म्हणतो कीः—हे प्रियकरा, मी जर तुजवर योग्य प्रेम केले तर मला दुःखी होण्याचे कारण काय ? तुझा वियोग मला कां वाटावा ? माझ्या सर्व कामनांचा विषय असा तू नेहमीं माझ्या जवळच नाहींस काय ? इंद्रियसेवनात मला तुझाच अनुभव येत नाही काय ? मधुर पदार्थाच्या सेवनांत तुझ्याच चुंबनाचा लाभ नाही काय ? हे माझ्या प्रियतमा, तुझे हे अदृश्य रूप किती मनोहर आहे ? तुझे स्पर्शहीन आलिंगन किती गोड आहे ? तुझे अश्रवणीय आणि अश्रुतगीत किती मधुर आहे ! तू किती सुदर आहेस! तुझे घर किती सुबक आहे. तुझे हे जग किती मनोवेधक आहे ! आणि मला त्वा दिलेले जीवन किती मनोरम आहे ! तुझे स्मित मधुर आहे, तुझे आलिंगन मधुर आहे, तुझे चंद्रसूर्यतारे मधुर ( sweet ) आहेत ! तुझे प्रेम मधुर आहे. खाली आणि वर सर्व कांहीं मधुर आहे. तू माधुर्याचा अनत व अमर्याद सागर आहेस ! ”

हे प्रकरण येथेच तोडून विराम करावा, किंवा हे अवतरण असेच आणखीही लांबवावे, असा कोणास मोह झाल्यास नवल नाहीं. परंतु अति गोडाचाही वीट येतो आणि गोड झाले तरी त्यांत असत्याची माशी खपत नाहीं. त्याप्रमाणे मूळ लेखकाच्या मधुर भावाचा आम्हांस वीट आला. ज्या ग्रंथांतून वरील विचार घेतले आहेत, त्या ग्रंथांत प्रोफेसरसाहेबांनी भाषेचा नुसता पाऊस पाडला आहे. आमच्या उत्कंठित लेखणीच्या चोचीत त्यांपैकीं जे

चार थेंब आले, ते आम्हीं वर दिले आहेत. सदर लेखांत वर्णन केलेल्या प्रेमानंदाचा एकशतांशही अनुभव ज्यांस खरोखर प्रपंचांत येत असेल, ते त्रिवार धन्य होत ! ज्या संसारास यादवांच्या रामराज्यांत श्रीज्ञानेश्वरांनीं इंगळाची शेज म्हटलें, तीच या इंग्रजांच्या विसाव्या शतकांत पुष्पशय्या झाली काय ? 'ह्या संसारासारिखे दुःख आणीक नाहीं' असे म्हणणाऱ्या शिवछत्रपतींच्या राजगुरु समर्थांपेक्षांही आम्ही अधिक समर्थ झालो नव्हे ? आसन्नमरणस्थितींत आलेल्या या मायभूमीच्या पुत्रात वरील वर्णनांत आपले आत्मचरित्र पहाणारे असे हरीचे लाल किती सापडतील ? दुःख, दारिद्र्य, दावे,दैन्य आणि दास्य यांनीं 'निरयगति बरी' असे म्हणावयास लावले असतां, प्रपंचकैवल्याचे गीत गाणाऱ्याची ही धुद तरी कोणती ? ह्या ब्राह्मांच्या गोड देवाने बहुत दिले; पण त्यात हे एक टीचभर पोट दिले नसते तर बरें होतं! असें प्रायः घरोघर म्हणण्याची वेळ आली असतां, ह्या विद्याविनोदाचे आज प्रयोजन काय ? प्रोफेसरसाहेबांचे जर हे खरोखरच आत्मप्रतीतीचे बोल असतील, तर त्याच्या या असामान्य कोटींतील अनुभवाचा इतरेजनास कांहींच आधार मिळणार नाहीं, हे तरी त्यांनी समजावयास पाहिजे होते.

'अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदे भरीन तिन्ही लोक ।' अथवा 'प्रपंच साधुनि परमार्थाचा, जेणे लाहो केला । तो नर भला भला ॥' अशा उक्तींतील संतांचा खरा आशय तेच जाणोत. पण ह्याच संतांनी स्वतः संसाराची आस्था काडीचीही दाखविली नाहीं, इतकेच नव्हे तर संसारांत सुख मानणाऱ्यास मूर्खातला शिरोमणि म्हणण्यासही कमी केले नाहीं. ही गोष्ट विसरता येत नाहीं ! ईशसृष्टि हे एक मोठे जगन्नाटक सुरूच आहे. पण त्या नाटकांतही असे हे भाट आणि कवि जे संसाराचे एक उपनाटक रंगवितात त्यांनीं जागृतीच्याऐवजीं गाफीलपणा येण्याचा मात्र फार संभव आहे ! असा जगांत एकही धर्म नाहीं, कीं ज्याने विषयसुखाचा त्याग सांगितला नाहीं. संसार सुखमय नाहीं. सुख वाटत असेल तर तो सुखाचा भास आहे. हा अनुभव कांहीं आजच्या हिंदुस्थानचा नव्हे. तो सिद्धान्त दिक्कालातीत आहे. आणि त्यांतही हिंदुस्थानच्या आजच्या स्थितींत, अशा गोडीगुलाबीच्या मोहक थापा मारून अननुभवी तरुणांस संसारांत ओढण्याऐवजीं शक्य तर ते संसारांत न पडतील असाच जबाबदार

लेखकांनीं उपदेश केला पाहिजे. काल्पनिक प्रेमाच्या आणि सौंदर्याच्या गोष्टी सांगून तरुणांचीं अंतःकरणे अफूबाजाप्रमाणें भ्रांत आणि दुबळीं न करता तीं विरक्त आणि निस्पृह केलीं पाहिजेत. हळुवार मनाचीं व आलिंगन-सुखास लाचावलेलीं अशीं कादंबरींतील पात्रे आतां नको आहेत. मनाचीं कठोर व वज्रप्राय अशी माणसें पाहिजे आहेत. प्रवृत्तीच्या भाषेत बोलावयाचें तर असंतोषांत उत्कर्षाचें बीज आहे. मग तो उत्कर्ष ऐहिक असो अगर पारमार्थिक असो. निवृत्तीचे रहस्य पहावयाचे तर 'नैराश्यं परमसुखं' हेच खरे आहे. विषयानंदास ब्रह्मानंद लेखणे म्हणजे सुषुप्तीस जीवन्मुक्ति म्हणण्याप्रमाणेच वेडेपणाचे आहे. प्रत्येक वाक्यागणिक अध्यात्मदृष्टि, अध्यात्मदृष्टि ( spiritual ) असे म्हटल्याने ती दृष्टि येत नाहीं. वैराग्याच्या दिव्यांतून गेल्यावाचून ती दिव्य दृष्टि कोणासच प्राप्त झालेली नाहीं. आमचे हे ब्राह्मलेखक शब्दसंपत्तीचे कुबेर आहेत. परंतु सरकारी शिक्याचीच नोट बॅंकेत पटते. त्याची नक्कल सोनेरी छापली तरी अजाण मुलाशिवाय तिला कोणी विचारणार नाही, हें त्यांनी लक्षात ठेवावें. खऱ्या चित्रकाराचें कौशल्य भडक रंगात नाहीं, किंवा अलंकाराच्या अतिशयांत नाहीं, तर यथातथ्य दर्शनात आहे. संसारचित्राचें मर्म निराशा व दुःख ह्यांतच आहे. आणि ह्याचाच उठाव देशोदेशीच्या अनुभवी व निस्पृह अशा साधुसंतांनी आपल्या ग्रंथातून केलेला आहे. पण असाधारण साधुसंताचें महत्त्व साधारण-ब्राह्मास काय होय! साधुसंत, धर्मगुरु, पुरोहित आणि विरागी सन्यासी यांची सरसहा निंदा करण्याचें बाळकडूच कित्येक आधुनिक सुशिक्षितास आग्लाईने दिलेले असते. अशी बेजबाबदार-पणाची निंदा ऐकून "××× तू तो राम सुमर जग लढवा दे" असे म्हणून बेदरकार राहण्याइतकी त्यांची सत्त्वसंपत्ति थोर असते, हें अशा लेखकास कळत नाही; हा केवळ विद्येचा मद होय. असो. ही बरीच वाढलेली टीका तूर्त पुरे.

ह्याप्रमाणे संसार म्हणजे पापाची खाण नसून ती फार मोठी पुण्यभूमि आहे, आणि तीर्थक्षेत्रे आणि साधुसंत याचा सहवास पुण्यप्रद होण्याऐवजीं अनर्थावह होण्याचा बराच संभव आहे, या ब्राह्मांच्या मतांचे आपण निरीक्षण केले. आतां सामान्यत्वे पाप आणि पुण्य यांबद्दल ब्राह्मांचे विचार काय आहेत, तें थोडक्यांत पाहूं. ईश्वरी नियमाचे जाणून बुजून उल्लंघन ह्यास ते

पाप समजतात. ईश्वराने दयाळुत्वाने जीवाला कांहीं मर्यादेपर्यंत कार्याकार्य निवडण्याची बुद्धि दिली आहे. जसे तांबड कोणते व काळे कोणते हा फरक जीवास कळतो, त्याचप्रमाणे बरेवाईट, बरोबर आणि चुकीचे, शुभ आणि अशुभ कर्म कोणते, याची निवड करण्याचे सामर्थ्यही जीवास दिलेले आहे. त्या सामर्थ्याबरोबर त्याचेवर योग्य वर्तनाची जबाबदारीही येते. त्यांत तो चुकल्यास त्याची अध्यात्मदृष्टि मंदावते आणि ईश्वर त्यास दूरावतो. पापाचे फल दुःख हे तर आहेच; पण त्याहीपेक्षां पापी मनुष्याचें मनच त्यास खातें; आणि ईश्वरी कृपेस आपण दुरावलो, यामुळे त्याच्या मनास जे क्लेश होतात, तेच पापाचे खरे फल होय. ईश्वरावीण आपण पोरके व एकाकी राहण्यापेक्षां मरण बरें असे पाप्यांस वाटू लागते. (?) ही पापाची उद्-बोधक कल्पना पूर्वी आपल्या येथे प्रचलित नव्हती, ती ख्रिस्तीधर्मशास्त्रांतून ब्राह्मांनीं घेऊन तिचा साऱ्या देशभर फैलाव केला, हे ब्राह्मसमाजाने फारच मोठे देशकार्य केले, असे त्यांस वाटते. पण याचबरोबर त्यांनीं ख्रिस्ती-धर्मांतील अक्षय्य नरकाची कल्पना मात्र घेतली नाहीं. ब्राह्मांचे म्हणणे असे आहे कीं, ईश्वराच्या अमर्याद प्रेमापुढे जीवाचे पाप ते कितीसे टिकणार ! एकाही जीवाचा उद्धार केल्यावांचून ठेवावयाचा नाही, असे ईश्वराचे ब्रीद आहे. पापी पुरुष ईश्वराकडे न वळला तर ईश्वर त्याचे मागे जाऊन त्यास पापापासून मागे ओढील. कारण पापी लोकांबद्दल ईश्वराला राग येत नसून कींव येते. परतु तसे असले तरी जीवास कर्मांची फळे भोगल्यावांचून गत्यंतरच नाही. अपराधाबद्दल क्षमा करून पाप्यांस तसेच सोडून देणे हे ईश्वराच्याही हातीं नाहीं. पापाबद्दल जीवास खरा पश्चात्ताप न झाला, तर कोणत्याही तीर्थाने, नवससायासाने अगर तोडग्याने ते पाप दूर होणार नाहीं. आणि त्यास खरा पश्चात्ताप होतांच ईश्वराच्या अमोघ कृपेस आडवे येण्याचे कोणांतच सामर्थ्य नाही. मृत्युलोकींचा जन्म ही एक ईश्वराची देणगी आहे, असे ब्राह्म मानीत असल्यामुळे, या जन्म-मरणपरंपरेतून सुटणे ही त्यांची उद्धाराची कल्पना नाहीं. शिवाय जन्ममरण परंपरा ते मानीतही नाहींत. सतत अभ्यासाने ईश्वराच्या इच्छेशीं आपली इच्छा मिळती घेणे हेच आध्यात्मिक जीवनाचे अखेरचे ध्येय आहे. जीवाचे तारण तें हेच. आपल्या आवडी-नावडी ईशेच्छेशीं मिळत्या येऊं लागल्या

कीं आपोआपच आपल्या मनांत पापवासना उद्भवणेच बंद होते. कार्याकार्यांतील झगडा बंद पडतो, मनाचे कल कर्तव्यास धरूनच होतात व श्रेय आणि प्रेय एकरूप होते. अनन्यगतिकत्वाचा आनंद जीव भोगूं लागतो आणि याच प्रपंचकैवल्यास अनुलक्षून मी आणि माझा पिता एकरूप आहोत, असे जीझस म्हणाला, आणि वेदान्ताने तत्त्वमसि असे म्हटले.

ह्याप्रमाणे तत्त्वमसि या महावाक्यावर, Thy will be done, "तुझी इच्छा प्रमाण" अशा अर्थाची कारिका ब्राह्मांनीं रचली. आतां त्यावरील भाष्य पहावयाचें तर सामाजिक सुधारणांवरील ब्राह्म पंडितांचे लाघवी विवेचन हेच काय तें मुख्य भाष्य होय. त्याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

---

## प्रकरण बारावें

# नवयुग आणि धर्म

एखाद्या आंब्याच्या झाडाच्या पोकळीत दूरच्या वडाच्या झाडावरून आलेल्या कावळ्यांनीं प्रसाद करावा, आणि त्या बीजारोपणांतून झालेल्या वटवृक्षाने थोड्याच दिवसांत आपलेच प्रस्थ माजवून मूळच्या झाडास गुरफटून व खुरटून टाकावे, तशीच ह्या ब्राह्म-समाजाची कांहींशी गोष्ट आहे. राजा राममोहन ह्यानीं ब्राह्मधर्माचे कलम लावले खरे; पण लवकरच त्यावर डफ, डेराझिओ, डेव्हिड ह्या एकाक्ष (एकदेशी) डकारांनीं जो कृपाप्रसाद केला, त्यांतून निर्माण झालेला सामाजिक सुधारणेचा वृक्ष लवकरच इतका माजला कीं, त्याचा भार संभाळणे व जांच सोसणे मूळच्या कलमास उत्तरोत्तर कठीणच होत गेले. आणि आज त्या कलमाची एखाददुसरी खुरटलेली खांदी कोठे जीव धरून आहे इतकेच. म्हणूनच "द्वा सुपर्णा" पैकीं शिवरूप जातीच्या पक्ष्यांची तर त्यावर वानवाच दिसत आहे. पण दुसऱ्या जातीच्या पक्ष्यांपैकीं ध्यान करणारे बगळे, नेकटायवाले बोलके पोपट, चिकित्सक बुद्धीचे डोळस पिसारे मिरविणारे मोर, मधुर वाणीचे कोकिळ, कधीं वियुक्त नसणारे चक्रवाक्, वर्णसंकर करणाऱ्या मंजुळवाणीच्या साळुंका, शिकारी साहेबांच्या अचूक भक्षस्थानीं पडणारे पारवे, त्याचप्रमाणे आपल्याच आरवण्याने उजाडलें ह्या तोऱ्यांत उकिरडा उकरणारे कुक्कुट, 'मनस्येकं वचस्येकं' असले आधलेमधलेच वाघूळ, मेलेल्याचीं आंतडीं काढणारे गृध्र आणि ब्राह्मण्याच्या काकबलीवरच आजपर्यंत जिवंत राहून व्यर्थ कोलाहल करणारे दुसरे कित्येक पक्षी, ह्यांनींच हा वटवृक्ष भारभूत झाला आहे!

उपरिनिर्दिष्ट डफ, डेराझिओ आणि डेव्हिड ह्यांनीं आणि ह्यांच्या जातभाईनीं बंगाल्यांत बुद्धिवादाचा व बुद्धिभेदाचा जो उपव्याप केला व ज्यामुळें सुशिक्षितांची बुद्धि भ्रष्ट होऊन अनाचार व अविचार यांचा जो कळस झाला, त्याची ज्यांस पुरी माहिती आहे, त्यांस वरील रूपक अन्वर्थकच वाटेल. वरील गृहस्थ बुद्धिमान्, उद्योगी, आणि प्रामाणिकही असतील. हिंदी लोकांच्याबद्दल त्यांच्या ठिकाणीं हितबुद्धीही असेल, परंतु त्यांच्या पुष्पित वाग्वल्लीनें धर्मवृक्षास



पुढें बसलेलेः—वरदप्रसन्न राय, गुरुदास चक्रवर्ती, पं. शिवनाथशास्त्री, काशीचंद्र घोसाळ, गोविंदचंद्र दत्त.
मधली रांगः—कालीनारायण राय, कृष्णकुमार मित्र, प्राणकृष्ण आचार्य, श्रीशचंद्र राय, मधुसूदन सेन, ललितमोहन दास.
मागें उभेः—सुब्बा कृष्णय्या, सुरेंद्र शशीगुप्त.

किती व कसें भासलें व नाडलें, इतकेंच आम्हांस ह्या ठिकाणीं पहावयाचें आहे. तसेंच आमच्या बुद्धिवादी सुधारक बंधूंस आम्हांस असें सुचवावयाचें आहे कीं, सुधारणारूप स्वतंत्र वटवृक्षाच्या गुणावगुणाबद्दल आम्हांस येथे विशेष ऊहापोह कर्तव्य नसून ह्या सुधारणांनीं धर्मावर जी कुरघुडी केली आहे, तितक्याचपुरता आम्हांस विचार करणें आहे. वस्तुतः ब्राह्म-मतांचे खंडन-मंडन अखेरच्या खंडांतच इतर मतांबरोबर व्हावयाचे आहे; परंतु त्यास किती कालावधि लागेल, किंबहुना ते काम आमच्या हातूनच होईल कीं नाहीं, हें आज सांगतां येत नाहीं. यामुळे यापुढे सुधारणांसंबधी जे ब्राह्मांचे विचार आम्हांस सांगावयाचे आहेत, त्यासंबंधी आमची नापसंती दर्शविणें जरूरच आहे. सामाजिक सुधारणा ह्या व्यापक प्रश्नांत कांहीं सत्यांश आहे, हें कोणीही कबूल करील. किंबहुना एखादे थोतांड अगर पाखंडही त्यांत कांहीं सत्यांश असल्यावांचून नादूंच शकत नाही. पण आमचे म्हणणे इतकेच कीं, परप्रत्ययनेय बुद्धि, स्वाभिमानशून्यता, आध्यात्मिक अनुभवाबद्दल अज्ञान, उतावळी, अतिरेक, अविवेक, विषयलालसा, इत्यादि दोषांनी कित्येक सुधारकांचे प्रयत्न दूषित असल्यामुळे, धर्माचे पवित्रक्षेत्र त्यांच्या दुष्ट संस्कारांपासून सुरक्षित राहील, अशी आस्था प्रत्येक धार्मिकानें बाळगली पाहिजे.

आजचे नवयुग प्रागतिक विचारांनीं इतके भारले आहे कीं, पूर्ण व सिद्धान्तवत् गोष्टींसही प्रगति असली पाहिजे, अशी विद्वानांसही भ्रांति झाली आहे. शिवाय सर्व सुधारणांची गुरुकिल्ली स्वातंत्र्यांत आहे, अशी दृढ भावना झाल्यामुळे व्यक्तीच्या व देशाच्या स्वातंत्र्याच्या आड जी जी गोष्ट येते, असें आपल्या स्वतांच्या अगर दुसऱ्याच्या बुद्धीने वाटते, त्या गोष्टीचा धिक्कार करण्याची फारच उतावळी होत आहे. संक्रांतीचे वाहन व दृष्टि यांप्रमाणें आजच्या अवदशेचे वाहन राजकारण आहे आणि दृष्टि पश्चिमेकडे आहे. अर्थात् त्या धोरणानेंच जे बोलतात व लिहितात त्यांचे ते करणे लोकांस सहज रुचतें. आजच्या प्रागतिक वातावरणांतील विचारांच्या प्रवाहाविरुद्ध ब्र काढणें म्हणजे स्वतांचे तोंडावर शिंतोडे उडवून घेण्याप्रमाणें हास्यास्पद झालें आहे. ही सर्व जाणीव लक्षांत ठेवून, सुधारणांसंबंधीं बुद्धिवादी साधारण-ब्राह्मांचे कोणते असाधारण विचार आहेत, ते आम्ही वाचकांस सादर करीत आहोंत. त्यांचा वाचकांनीं गंभीरपणें विचार करावा.

साधारण-ब्राह्मांस जर कोणती गोष्ट विशेष जिव्हाळ्याची वाटत असेल, तर ती गोष्ट म्हणजे सामाजिक सुधारणा ही होय. ह्या सुधारणांपुढे त्यांस केवळ धर्माची आस्था फारशी राहिलीच नाही असे म्हटले तरी चालेल. एखाद्या माशुकाच्या मागे लागलेला तरुण ज्याप्रमाणे आतेष्टांसही सोडून जातो, त्याप्रमाणे आदिब्राह्मसमाज, व भारतीय ब्राह्मसमाज ह्या आप्त-संस्थांस सोडून साधारण-ब्राह्म जे बाहेर पडले, ते बहुतांशीं ह्या सुधारणा-बाईच्याच पायी ! ते सारे इंग्रजी शिकलेले पदवीधर तरुण, त्यांनी भौतिक शास्त्रांच्या चष्म्यांतून जेव्हां धर्माकडे पाहिले, तेव्हां त्यांस असे आढळले की, (१) धर्मशास्त्रांतील उपपत्ति, व देवतांच्या कथा ही सारी खुळें आहेत. (२) पुरोहितवर्गाचा नैतिक अधःपात झाला असून त्यानीं स्वतांची तुंबडी भरून आपली गादी कायमची राहण्याकरितां चोहोकडे वैषम्य आणि जाति-भेद ह्यांची तत्त्वे दृढमूल केली आहेत. (३) निरनिराळ्या धर्मपंथांत संकुचित-पणा व द्वेष माजला आहे. (४) एकाच सांच्यांतील अनुष्ठानें व धर्मविधि पाळले जात आहेत. (५) अनुष्ठानांच्या बाह्य प्रक्रिया बेसुमार लांबवून धार्मिक जीवनांत अंतरंग साधनास अवसरच ठेवलेला नाहीं. (६) धर्मवीरांचा छळ व जाळपोळ ( The impious persecution and burning of martyrs ) सुरू आहे. (७) ललितकला व जीवाची साधी चैन यांसही सोडचिठी ( Puritan divorce ) दिली आहे, (८) समाजहितविरोधी निवृत्तीच्या भावना वाढून त्यांनीं मनुष्यप्रपंच व जग यांस विन्मुख झाला आहे, किंवा स्वर्गीय सुखाच्या अथवा व्यक्तिगत स्वार्थाच्या मोहास बळी पडला आहे. (९) ब्रह्मचर्य आणि महंती यांच्या साहचर्यात बहुधा आढळणाऱ्या पापी व बदमाष आयुष्यांचे दुष्परिणाम दिसत आहेत. (१०) दैववादास मिळालेल्या प्राधान्यामुळे आणि निवृत्तिवाद्यांच्या निष्क्रियतेमुळे सामाजिक प्रगति खुंटली आहे. असा हा धर्माचा ऱ्हास झाल्यामुळे सुशिक्षित जगास धर्माचा वीट आला. व आतां आम्हांस धर्म नको, नीति पाहिजे अशी चोहोंकडे हकाटी झाली."*

---

* ब्राह्मलेखकाचा हा उतारा कोणत्या तरी पाश्चात्यलेखकाच्या आधारें मूळ लिहिला असावा हें उघड दिसतें. वाचकांनीं सूक्ष्मावलोकन ठेवल्यास त्यांची अशी ही परप्रत्ययनेय बुद्धि पदोपदीं दिसून येईल.

वरील ब्राह्मलेखक पुढे असा सिद्धान्त सांगतात की, ज्या वस्तूच्या दुरुपयोगानें अत्यंत हानि होते, ती वस्तु फारच मोलाची असते. ह्याप्रमाणे वरील दुष्परिणामांचे मापानें धर्माचे महत्त्व सिद्ध होऊन तो इतक्या वाईट स्थितींतही जिवंत राहूं शकला. धर्मजीवनाची अशी मीमांसा केल्यानंतर जीवनधर्माचा ते असा खुलासा करितात की, जीवाची धर्मप्रवृत्ति ही द्वैतात्मक आहे. आणि अज्ञान, क्लेश, ममत्व, माया, जडशरीर आणि ही सृष्टि यांच्या बंधांतून जीवास मुक्त करणारा धर्म असला तरी समाज हेच त्याचे साधन आहे. मानवकोटींतील जीवाच्या सक्रिय सहानुभूतीवांचून माणसांस जसे अन्नवस्त्र मिळणे अशक्य आहे. त्याचप्रमाणे त्यास व्यक्तिशः मुक्ति मिळणेंही अशक्य आहे. समाज आणि व्यक्ति यांचे हित धर्मानें एकरूप केले आहे. भौतिकशास्त्रज्ञास धर्मिष्ठाची एकाग्रता लागते, तसेंच समाजसुधारकाची लोकसंग्राहक बुद्धि, नीतिपालन, शास्त्ररूढि व परंपरा यासंबंधी बेपर्वाई, स्वार्थत्याग इत्यादींस धर्मनिष्ठेची मदत होते. आता या नवयुगात धर्माने आपले महत्त्व राखावयाचे तर त्यानी देवळांतून आणि मठातून बाहेर पडले पाहिजे, आणि संसारी जीवांच्या रोजच्या व्यवहाराशी एकरूप झाले पाहिजे.* आयुष्याची ज्योत आत्मविवेकरूप शुद्ध प्राणवायूंत (oxygen) लवकर जळून खाक होईल, यासाठीं समाजरूप नत्रवायु त्यांत पुष्कळच मिळविला पाहिजे. आपली आत्मीय भावना वाढवीत वाढवीत ती समाज व राष्ट्र ह्या ध्येयांतून अखिल मानवकोटीशीं एकरूप करणे, हेच जीवाचे ध्येय आहे. स्वाध्याय आणि उपासना ह्याप्रमाणेच दूरदूरच्या समाजांचे हितसंबंध एकत्र गुंफणारीं वर्तमानपत्रे रोज वाचणें हे एक रोजचे पवित्र कर्तव्यच आहे. ह्या प्रकारे सुधारकांचे संघ, संशोधकांच्या प्रयोगशाळा, मजुरांचे कारखाने, राजकीयसभा ही सर्व धर्माचींच क्षेत्रे आहेत, ह्या एकाच भावनेने प्रत्येक मनुष्यास सद्धर्माचा खरा प्रत्यय येईल. आणि अखेर सर्व राष्ट्रांचा एक संघ होऊन ईश्वराच्या नियतीची पूर्तता होईल."

---

* अशी एक गोष्ट सांगतात कीं, एका तरुणाने मातृदेवोभव असे कोठे ऐकले. लगेच त्यांनीं घरीं येतांच आईस ताकीद दिली कीं "उद्यापासून मी निजून उठण्याच्या अगोदर तूं अंथरुणाशीं उभे असले पाहिजे. तरच मी तुला नमस्कार करीन !" ह्या सत्पुत्राच्या तंबीप्रमाणेच ही भाषा दिसते.

सुशिक्षितांनीं तिरस्कृत केलेल्या धर्माचें कार्यक्षेत्र वास्तविक किती मोठें आहे, याबद्दल ब्राह्म विद्वानांची कल्पना स्थूलमानानें वरीलप्रमाणें दिल्यावर आधुनिक सुधारणा, शास्त्रीय संशोधन, आणि स्वदेशाभिमान, ह्या त्रिवेणीचा संगम धर्मक्षेत्रांत कसा होऊं शकेल, याबद्दल त्यांच्या विचारांचें थोडें अधिक दिग्‌दर्शन केलेलें बरें.

" हल्लीच्या सुधारणा युगास कालियुग मानून ह्या काळांतील जडवाद, नास्तिकवाद, कर्मभ्रष्टता, जीवनार्थ कलह, गुलामगिरी, आसुरी संपत्ति, साम्राज्यासाठीं भयंकर लढे, प्लेग, दुष्काळ व दारिद्र्य इत्यादि सर्व आपत्ति ह्या सुधारणेपायीं भोगाव्या लागत आहेत, असे कट्टे धर्माभिमानी मानतात, आणि धर्माच्याच पोटीं जन्मास आलेल्या या सुधारणेने धर्माचा घात केला, असें पाहून ह्या पितृघ्न सुधारणेचा मनापासून द्वेष करतात. जुने ते सारेच चांगलें, अशी त्यांची ठाम समजूत असते. त्याच्या उलट सुधारणावादी लोकांनीं शास्त्रीय शोधांच्या जोरावर निसर्गावर जय मिळवला आहे. अग्निरथ आणि विमाने, बिनतारी संदेश आणि बोलकीं यंत्रे, इत्यादि अनेक अद्भुत चमत्कार दाखवून, ते आपल्या बुद्धिवैभवाने येथील भूदेवच बनले आहेत. त्यानीं देव आणि देवता यांस कधीच हद्दपार केले आहे. आणि मनुष्याची धार्मिक भावना हा एक ज्ञानतंतूंचा विकार आहे, असें ठरवून तो अजिबात नाहींसा कसा करावा, याचे संशोधन त्यांनीं चालविले आहे. त्यांचे म्हणणे असें आहे कीं, राष्ट्रीय संघटनेकरितां एखादा खोटानाटा देव वाटल्यास मानावा, पण वास्तविक नीतिशास्त्रापुढे धर्माची काडीचीही किंमत नाही."

" ह्याप्रमाणें धर्म आणि व्यवहार, द्रव्य आणि देव, भौतिक शास्त्र आणि श्रद्धा, बुद्धि आणि आदेश यांमधील लढ्यांत कोणाला मानावे, हे ठरविणें मनुष्यास फार कठीण झाले आहे. हे द्वैत मोडणे अशक्यच आहे अशी सामान्य माणसांची समजूत असल्यामुळे गंगेत गेले गंगादास, मथुरेत गेले मथुरादास, असेंच दुटप्पी वर्तन चोहोकडे आढळतें. देवळांत गेल्यावर डोळे मिटावे व बाहेर आल्यावर सौंदर्य लुटावें, भौतिकशास्त्राच्या प्रत्यक्ष ज्ञानावर वाढती निष्ठा ठेवावी व अप्रत्यक्ष देवास भिऊन वागावे, असा हा खेळखंडोबा कित्येक मध्यवर्ती अनिश्चित बुद्धीच्या लोकांनीं चालविला आहे."

" धर्माभिमानी आणि सुधारणावादी एकमेकांचे दोष दाखवितात व त्यांत

सत्यांश असतो, यांत शंका नाहीं. पण त्याबरोबरच ते एकमेकांचे गुण जाणत नाहींत, हाच मोठा दोष आहे. सुधारणा म्हटली म्हणजे ती नुसती भौतिक कशी होईल ? सुधारणा या शब्दांतच मानवी उत्कर्षाचा बीजभूत असलेला आत्मप्रकाश हा आलाच. उलट निरालंब स्थितींत आत्मविकास तरी काय होणार ? जगिक व्यवहार सोडले तर आत्मविकास ही केवळ कल्पना मात्र राहते. तात्पर्य, धर्माने यापुढे जागिक व्यवहाराशीं फारकत करून जिवंत राहणें शक्य नाहीं. धर्मातील जुनीं मंत्रतंत्रे आणि विधिविधाने यांच्या मृत-प्राय अवशेषाना सशोधकाच्या सग्रहालयाशिवाय दुसरे कोठेच महत्त्व राहिलें नाहीं. (१) मानवी प्रगतीबरोबर धर्मही प्रागतिक झाला नाहीं; (२) धर्माने धर्मगुरूंचा एक पेशावर्ग तयार केला. त्यांनीं शास्त्रावलोकन व आचारशुद्धी-कडे मुळींच लक्ष न देतां स्वताच्या हिताकरितां भोळ्या लोकांत जातिभेद वाढवून जातिपरत्वे निरनिराळी व्रतवैकल्ये सांगून सामाजिक जीवनाचा घात केला; (३) निरनिराळे पंथभेद व जातिद्वेष निर्माण केले; (४) सामाजिक व कौटुंबिक सुखात माती कालवून भ्रष्टता व अनाचार वाढविला आणि (५) व्यक्तीच्या मुक्तीचे थोतांड माजवून व्यक्तिक स्वार्थबुद्धि वाढविली व दैव-वादाने लोकांस आळशी केले. या अनेक कारणांमुळेच अलीकडे जडवाद, अज्ञेयवाद आणि नास्तिकवाद हे उत्पन्न झाले आहेत."

"कोणास विलक्षण वाटेल, पण ब्राह्म म्हणतात, वस्तुस्थिति अशी आहे कीं, आजकालचे कट्टे नास्तिकशास्त्रज्ञ, कलाभिज्ञ किंवा राजकारणी पुरुष यांच्या ठिकाणीं जे खरें धर्मशील दिसते, तें खास धर्मप्रचारक, धर्मोपदेशक, आणि आचार्य यांच्या ठिकाणींही दिसत नाहीं. भौतिकशास्त्रज्ञास, चित्तैकाग्र्य, धारणा, सूक्ष्म बुद्धि, तीक्ष्ण जिज्ञासा व तीव्र उत्कंठा, आजन्म विषयसुखनिरपेक्ष शास्त्रीय व्यवसाय, शुद्ध व पवित्र बुद्धि आणि समष्टीशी तादात्म्य इतके गुण जर अवश्य लागतातच तर मग धर्मशील ते याहून कोणते ? तात्पर्य, आजचा आधुनिक सुधारणेचा, शास्त्रकलांच्या प्रगतीचा व सुराज्याचा हा काळ हाच खऱ्या धर्मविकासास योग्य आहे."

"ह्या सुधारणायुगानेच (१) आपल्याला धर्मातील शाश्वत व मुख्य भाग कोणता व गौण भाग कोणता ते शिकवले. पंथविशिष्ट कर्मे, सांप्रदायिक विधि, यज्ञयाग, होमहवने, स्वर्गपाताळ, देवदेवता, जपजाप्य, महालय आणि

ब्राह्मण-भोजनें, दानधर्म आणि देवदर्शनें, इत्यादि ही खऱ्या धर्मशास्त्राचीं अंगें नव्हत हेंही आपल्याला ह्या नवयुगानेंच शिकविलें. (२) तसेंच धर्मशीलाचें महत्त्व जीवास पशुवृत्तींतून पूर्णत्वाकडे नेण्याचें कसें आहे, तें आधुनिक जीवनशास्त्र आणि विकासवाद ह्यानींच दाखविलें; आणि धर्मास भौतिकशास्त्रांकडून भय नाहीं हेंही त्यांनींच सिद्ध केलें. (३) बौद्धधर्मी, बुद्धिवादी व कल्पनावादी लोकास, ईश्वराचें अस्तित्व न मानतांही सामाजिक बंधनें उत्कृष्ट पाळतां येतात यावरून नीतिशास्त्र हें ईश्वरवादापेक्षा श्रेष्ठ व स्वयंपूर्ण आहे, ही समजूतही ह्या नवयुगधारी ( ब्राह्म ) पंडितानींच दूर करून ईश्वरबुद्धीवांचून आपला तरणोपाय नाहीं, हें सिद्ध केलें, व अशा रीतीनें धर्माचें स्वरूप उज्ज्वल केलें. (४) त्याचप्रमाणें शास्त्रीय प्रगतीनें अबाधित राहणारीं अशीं धर्मश्रद्धेचीं अढळ तत्त्वें कोणतीं, हेंही नवयुगानेंच आपल्याला शिकविलें. ह्या नवयुगानें आणखी हेंही दाखविलें कीं, (१) ह्या विश्व-दर्शनामागें एक सर्वज्ञ, नैतिक, न्यायी, पवित्र व प्रेमी अशा परमपुरुषाची सत्ता आहे. (२) ह्या सृष्टीच्याबाहेर एक स्वर्गीयसृष्टि आहे आणि तेथूनच महात्म्यांना सत्य, सौंदर्य आणि मांगल्य यांच्या स्फूर्ति मिळतात. (३) प्रार्थना आणि धारणा यांच्या योगानें जीवास आत्म्याच्या द्वारें परमात्म्याशीं एकरूप होतां येतें. ह्या एकरूपतेच्या मानानें जीवास स्वर्गीय कल्पना व स्वर्गीय शक्ति यांचा लाभ करून घेतां येतो आणि मनुष्याचें शरीर हा जसा एक अंतर्यामीचा अवतार, तसाच परमात्म्याशीं एकरूप झालेला जीवात्माही कांहीं अवतारच मानावा. अशा रीतीनें ईश्वरी आदेश, अवतार, प्रेरणा, चमत्कार आणि अमृतत्त्व, इत्यादि गोष्टींवर भौतिकशास्त्रांनीं नवीनच प्रकाश पाडला आहे. आणि तरीही हे नवयुगधर्मप्रवर्तक पंडित आपले सिद्धांत अखेरचे व शाश्वत असे न मानतां, ते प्रगमनशील आहेत असेंच मानतात (५) शेवटीं नवयुगानें हेंही सिद्ध केलें कीं, नीति, कला, शास्त्र, तत्त्वज्ञान, यांच्या प्रगतीची साथ ज्यास ठेवतां येईल तोच धर्म शाश्वत होईल. धर्म साधा, सार्वत्रिक, सार्वजनिक आणि आध्यात्मिक असाच असेल तो टिकेल. बाहाई व ब्राह्म यांचीच धार्मिक चळवळ भविष्यकालीं टिकणारी आहे. कारण त्यांत सर्व धर्मांचीं उच्च तत्त्वें समाविष्ट झालेलीं आहेत."

"शेती आणि संपत्ति, उद्योग आणि व्यापार, सैन्य आणि आरमार, शिक्षण

आणि संशोधन हींच राष्ट्रीय उन्नतीचीं आजकालचीं लक्षणे असल्यामुळें धर्मास राष्ट्रीय जीवनांत कोठेंच जागा नाहीं असे प्रथमदर्शनीं वाटेल; परंतु मनुष्याप्रमाणे राष्ट्रासही आत्मा असतो. एखाद्या जोडे विकणाऱ्यास पृथ्वीचे अर्धे राज्य दिले, तरी राहिलेल्या अर्ध्या राज्याचाही तो अभिलाष करीतच असतो. जीवाचा खरा संतोष बाह्य अभिवृद्धीवर अवलंबून नसून तो जसा आत्मप्रसादावर अवलंबून आहे; त्याचप्रमाणे राष्ट्राचा आत्मा जो धर्म तेच राष्ट्राचे अखेरचे सत्यस्वरूप आहे. हिंदुस्थानांतील पूर्वींच्या सर्व घडामोडींचा केंद्र धर्मच होता. हिंदूंच्या सर्व उदात्त गुणाच्या बुडाशीं त्याचे धर्मशीलच आहे. हिंदुधर्मातील कर्मविपाकशास्त्रानेच नीतिशास्त्रास बळकट केले आहे. हिंदूंचे दशावतारच काय, पण सर्व महान् भक्त व साधु यास ईश्वरी अवतार मानल्यामुळे हिंदी राष्ट्रापुढे समान ध्येये राहून राष्ट्र व राष्ट्रीय संस्था यांचें संजीवन झाले आहे. यज्ञयाग, देवळे व देवतार्चने इत्यादि धार्मिक महोत्सवांमुळें ललितकलांस उत्तेजन मिळाले आहे. अलेक्झांडर, नेपोलिअन, नेल्सन, वेलिंग्टन, यांप्रमाणे हिंदूंचे वीरपुरुष केवळ परदेशाचे अपहार करणारे नसून जनक, रामचंद्र, हरिश्चंद्र, कर्ण, युधिष्ठिर आणि कृष्ण हे महान् धर्मवीर म्हणून प्रसिद्ध आहेत. महाभारत आणि रामायण हीं महाकाव्ये नीति आणि धर्मतत्त्वे यांच्या उपदेशांनी भरलेलीं आहेत. त्याचप्रमाणे बौद्ध व ख्रिस्ती राष्ट्रांच्या इतिहासावर त्या त्या धर्मांचा विशेष परिणाम झालेला आहे."

" जीझसला न मानल्यामुळें ज्यू लोकांचा अधःपात झाला. त्याचप्रमाणें हिंदूंच्या अधःपाताचे कारणही त्यानीं राजा राममोहन, महर्षि देवेंद्रनाथ, व ब्रह्मानंद केशवचंद्र अशा धर्मात्म्यांस अद्याप आपले धार्मिक पुढारी असे एकमताने मानले नाही हेच होय. राष्ट्रीय प्रगतीचा धार्मिक जीवनाशीं निकट संबंध आहे. राष्ट्रीय गुणाच्या संवर्धनास धर्मशील हे अत्यंत उपकारक आहे. अशा रीतीने भौतिक शास्त्राची प्रगति, आधिभौतिक सुधारणा आणि राष्ट्रीय भावना, त्या सर्वांचे प्रवाह धर्मसिंधूस उपकारक असून धर्मसिंधूतील सूक्ष्मसंस्काराचे मेघच स्वर्गातून वर्षाव करून वरील प्रवाहांस गति देतात, असा त्यांचा अन्योन्यसंबंध आहे."

वरील आशयाचे कित्येक ब्राह्मांचे विचार दिसतात. ते मोठे गोड व गोल आहेत. तसेच ते फोलही आहेत असें सूक्ष्म तात्त्विक दृष्टीने पाहतां दिसून येईल.

तत्त्वज्ञ ब्राह्म असो किंवा वेदान्ती असो त्याची दृष्टि वेगळीच असते. आणि त्याची भाषाही अशी लाघवी व औपचारिक नसून सडेतोड असते. हें पुढील प्रकरणांतील पंडित सीतानाथ यांच्या स्पष्टोक्तीवरून दिसून येईल. ब्राह्मांची सर्वांचा समन्वय करण्याची बुद्धि चांगली खरी परंतु सर्व वस्तु जशाच्या तशाच एकत्र करू पाहणे व्यर्थ आहे. तेथे वेदांत्याची भागत्याग-लक्षणाच उपयोगी पडते. खडे, पाकड आणि चहाड मुगांत घातले, तर मूग खाणाऱ्या मनुष्याचे दातच पडतील. बहिर्मुख इंद्रियांचे विषय अंतर्मुख झालेल्या मनाच्या ध्येयाशी एकरूप कसे होतील ? एकमेकांशी तोंडे फिरलेल्या परा आणि अपरा विद्या यांचे निधान एक कसे असेल ! श्रेय आणि प्रेय ही एकरूप होतात, ही एक रोचक भाषापद्धति आहे इतकेच. एकंदरींत हा आधुनिकाचा धर्म-शास्त्र-वाद मोठा व्यवहारोपयोगी वाटतो खरा; पण तो परमार्थदृष्टीने भ्रामक आहे. कवींचीं सुभाषितें ऐकायला विलासी राजा भोजच तयार होईल. पण ज्याला तीव्र ब्रह्मजिज्ञासा उत्पन्न झालेली आहे त्या मुमुक्षुला ते काव्यालंकार काय कामाचे ! भौतिकशास्त्रज्ञांची एकाकारवृत्ति म्हणजेच धर्म असे म्हणणे म्हणजे जारिणीलाच पतिव्रता म्हणण्यासारखें आहे. नुसती उपमा असेल तर ठीक आहे. पण दोन्ही वृत्ति एकरूप म्हणणे गैर दिसते. शास्त्रज्ञांस ईश्वर हा नित्य अज्ञेयच राहणार, धार्मिकास तो ज्ञेय होतो. असो. हे अखेरच्या तुलनात्मक खंडांतील विवेचन आम्ही आतांच वाढवीत नाही. आता ब्राह्मांस अत्यंत प्रिय अशा ज्या सुधारणा, त्यांच्या तपशिलाचा विचार पुढील प्रकरणांत पाहूं.

---

## प्रकरण तेरावें

# धर्म आणि सुधारणा

हिंदुधर्म आणि ब्राह्मधर्म यांची वजाबाकी केल्यास स्थूलमानाने बाकी ब्राह्म-सुधारणा राहते असे पंडित सीतानाथ यांचे म्हणणे दिसते. बाकीचे ब्राह्म कबूल न करोत पण ब्राह्मधर्म म्हणजे हिंदुधर्माची सुधारलेली आवृत्ति असेच पंडित सीतानाथ समजतात. हिंदूंचा ईश्वरवाद त्यास कबूल आहे. इतकेंच काय, पण परमेश्वर एकच आहे इतके हिंदूंनी मानल्यावर हिंदूंच्या इंद्रवरुणादि स्वर्गीय देवता मानण्यासही पंडितांची हरकत नाही. याप्रमाणें तत्त्वतः हिंदूंच्या ईश्वरवादाशी मिळते घ्यायला जरी ते तयार आहेत, तरी हिंदूंच्या आजच्या आचारधर्माशीं मात्र त्यांचा कसून विरोध आहे. तेथें त्यांची भाषा तडजोडीची नसून स्पष्ट व सडेतोड आहे.

हिंदूंच्या स्वर्गीय देवता ब्राह्मांस कबूल आहेत; पण त्या देवतांची पूजाअर्चा व त्यांस होणारे बलिदान व नैवेद्यसमर्पण हे प्रकार मात्र ब्राह्मांस अगदीच अमान्य व तिरस्करणीय वाटतात. ब्राह्मांचा आचारधर्म हा सर्वस्वी ख्रिस्ती व इस्लामी वळणावर आहे हे त्यांस नाकबूल नाहीं. हिंदूंच्या विधायक ईश्वरवादाला ब्राह्मांनीं अनेक निषेधांची ही अपूर्व जोड दिली ही त्यास मोठी अभिमानास्पद गोष्ट वाटते. ह्या निषेधास मूर्तिपूजेपासून सुरुवात झाली. द्वारकानाथ ठाकूर यांच्याकडे दुर्गापूजेच्या महोत्सवाला बोलावण्याकरितां देवेंद्रनाथ राजा राममोहनांकडे गेले असतां, " मला, आणि दुर्गापूजेला बोलावतोस !!! " हे राममोहनांचे अत्यंत तुच्छतेचे उद्गार म्हणजे अरुणीने श्वेतकेतूला सांगितलेल्या महावाक्याप्रमाणेंच ब्राह्मांच्या अंतःकरणांवर—इतकेंच काय पण ब्राह्ममंदिराच्या स्थिरचर काष्ठपाषाणांवर कायमचे, उमटून राहिले आहेत ! त्यांच्या आणि वैष्णवांच्या तप्तमुद्रांप्रमाणे तेच ब्राह्मांचें मुख्य लक्षण आहे. पण ह्या मूर्तिभंजकांचा शिक्का मारून घेण्यास हिंदुस्थानांतील सुशिक्षित समाजही अद्याप तयार नाहीं, हेच ब्राह्मांच्या अपयशाचे एक द्योतक आहे.

पंडितजी म्हणतात, काय करावें, हिंदुलोकांत व्यक्तिस्वातंत्र्यच नाहीं.

हिंदु आपल्या आईबापांसच भितात असे नव्हे; तर सारे आप्तइष्ट, सोयरे-धायरे, शेजारीपाजारी, आपल्याला काय म्हणतील या चिंतेंतच ते बेजार असतात. 'यद्यपिशुद्धं लोकविरुद्धं' हा त्यांस मोठा धाक! 'शास्त्रात् रूढिर्बलीयसी' हे त्यांचे विचारस्वातंत्र्य! पंडितजींचे एक वृद्ध धर्मपरायण चुलते त्यांस नेहमीं म्हणत कीं, बाबारे,

'यदि योगि त्रिकालज्ञः समुद्रलंघनक्षमः ।
तथापि लौकिकाचारम् मनसापि न लंघयेत् ॥'

पंडितजी खेदाने म्हणतात कीं, "अशी ही आमची लहानपणापासूनची दुबळी शिकवण! सर्व रूढींची प्रेरणा जेथून होते, व जे सर्व लौकिकाचाराच्या अतीत आहे, अशा आत्मतत्त्वाची ओळख हिंदुमुलांस कधींच कोणी करून देत नाहीं. ख्रिस्ती समाजांत आणि ख्रिस्ती वाङ्मयात जो आधिदैवतवाद पदोपदी आढळतो, त्याचा गंधही आम्हांस नसतो. आतां इंग्रजी शिक्षणाने मतस्वातंत्र्याची किंमत अलीकडील विद्यार्थ्यांस चांगलीच कळूं लागली आहे ही गोष्ट वेगळी, परतु आताही लहानास आणि थोरास मतस्वातंत्र्याची महती जरी कळत असली, तरी ती निबंधलेखनापुरतीच किंवा एखाद्या व्याख्यानापुरतीच. त्यानीं व्याख्यानात मतस्वातंत्र्याच्या ख्रिस्ती संस्थांचे कितीही गोडवे गाइले, तरी ते घरच्या वातावरणात गेले, की तेथे म्हाताऱ्या आत्याबाईचे नाहीतर बुढ्ढ्या उपाध्यायाचे जसे बंदे गुलाम होतात! हिंदूंची कुटुंबसंस्थाच अशी जाचक व घातक आहे कीं त्यात धर्माच्या बाबतीतच काय, पण इतर व्यवहारातही व्यक्तिस्वातंत्र्य बुद्धिपुरःसर समूळ नष्टच केलेले असते. युनिव्हर्सिटीच्या एखाद्या पदवीधरासही विचारले की, कॉलेज सुटल्यावर पुढे तुम्ही काय करणार? तर "वडील सांगतील ते करू" असे हे त्यांचे बावळटपणाचे उत्तर ठरलेलेच असते! तात्पर्य, हृदयस्थ परमेश्वरास न विचारतां, लोक काय बोलतात, तेच हिंदु ऐकत असतात. मूर्ति, रूढि, आणि जनापवाद याचे हे देव्हारे ब्राह्मधर्मास साफ मोडावयाचे आहेत. पंडित म्हणतात कीं, आमच्या अनुष्ठानिक ब्राह्मांनी हा विजय बहुतेक मिळविलाच आहे आणि आमच्या समाजसुधारकांनीं आपल्या जीवनांत देवाचें राज्य प्रस्थापित केले आहे. उलटपक्षीं जे आपल्या मनोदौर्बल्यामुळे जुन्यासच चिकटून राहिले, त्यांची मनाची बोचणीच हळुहळू कमी होऊन,

त्यांस वाईट तेच दृढाभ्यासानें चांगलें वाटूं लागलें व मग ते आपल्याच मताचें कसें तरी समर्थन करूं लागले. पण यांत त्यांचें मनोदौर्बल्यच उघड झालें आहे."

"अशा अर्धवट लोकांपैकींच कित्येकांचा हा ठराविक मुद्दा असतो कीं, सामाजिक सुधारणा समाजांत राहूनच घडवून आणल्या पाहिजेत. आणि जोपर्यंत समाजांत रहावयाचें तोपर्यंत समाजाच्या समजुतीकरितां मूर्तिपूजादि आचारही पाळले पाहिजेत. परंतु हें त्यांस कळत नाही, कीं मूर्तिपूजेवर ज्यांची प्रामाणिक निष्ठा आहे, त्यांस मूर्तिपूजा जरी क्षम्य असली, तरी ज्या एकेश्वरवाद्याची तशी निष्ठा नाही, त्यांनीं जनरीतीस्तव मूर्तिपूजा करणें हें निद्य पाप आहे. त्यांनी हें मूर्तिपूजेचें ढोंग काहीं काळ करणें जर क्षम्य असेल तर त्यानीं तें निरंतर करण्यांत तरी हानि कोणती? वास्तविक अशा अप्रामाणिक गृहस्थाचें वजन मूर्तिपूजकांवर मुळींच पडणार नाहीं. सामाजिक सुधारणाचें यश अशा दुटप्पी वर्तनाच्या पुढाऱ्यावर अवलंबून नसतें. जे निधड्या छातीचे सुधारक वीर, विरोध आणि छळ सहन करून दुसऱ्याचा स्वमताग्रह आणि असहिष्णुता, यांची हड्डी नरम करतात, आणि आपल्या उदाहरणानीं कच्च्या दिलाच्या आपल्या सुधारकबंधूंस मार्ग मोकळा करतात, तेच यशाचे खरे धनी होत."

"जर एखाद्या समाजाचीं मूलग्राही तत्त्वें बरोबर असून, त्यांत मतस्वातंत्र्यास व प्रगतीस पूर्ण अवसर असेल, तर दुसऱ्या गौण मतभेदांस्तव तो समाज न सोडता, त्या समाजातच राहून सुधारणा घडवून आणणें हेंच शहाणपणाचें होईल. पण हिंदुसमाजांतील मूर्तिपूजा व जातिबंधन यांतून व्यक्तीला स्वातंत्र्यच नाहीं. सर्व संस्काराच्या वेळीं त्यास ती बंधनें पाळणें भागच असतें. यास्तव जे भ्याड किंवा ढोंगी असतील त्याशिवाय इतर कोणासही हिंदुसमाजांत राहता येणें शक्य नाहीं. अशा समाजस्थितींत वरवर सुधारणा करून भागत नाहीं. तर आमूलाग्र क्रांतीच घडवून आणणें भाग पडतें. तात्पर्य, मूर्तिपूजा, बलिदान आणि चातुर्वर्ण्य हाच ज्या हिंदुसमाजाचा पाया आहे, तो पाया एक उखडून तरी काढला पाहिजे, किंवा त्या समाजांतून आपण तरी बाहेर पडलें पाहिजे, यावांचून तिसरा मार्ग ब्राह्मांस राहिला नाहीं. म्हणून ब्राह्म हिंदूंच्या गोटांतून बाहेर पडले."

पंडित पुढे म्हणतात कीं, " मूर्तिपूजेच्या तर्फेनें कच्च्या दिलाच्या ईश्वरवाद्यां-कडून असे सांगण्यांत येते कीं, मूर्तिपूजा ही एक प्रतीकोपासना आहे, यासाठीं तिचा उच्छेद न करतां, शक्य तितका उपयोग करून घ्यावा. परंतु वास्तविक हिंदूंच्या देवांच्या सर्व मूर्ति कांहीं ईश्वराचीं गुणप्रतीके नाहीत. रामकृष्ण, सीता, सावित्री, अशा कित्येक तर पुराणांतील काल्पनिक मूर्तिच आहेत. परमेश्वराच्या सर्वशक्तिमत्त्वाबद्दल खातरी पटल्यावर, गदाधराची मूर्ति आणखी काय करणार ? विद्येची प्रत्यक्ष किंमत कळल्यावर सरस्वतीचें प्रतिमापूजन व्यर्थच नाहीं काय ? इतक्याही उप्पर अशा प्रतिमांचा कांहीं उपयोग होतो असे मानलेच तर त्यांचा जास्तींत जास्ती उपयोग दिवाणखान्यातील सरंजाम किंवा उपकरण ( Furniture ) याप्रमाणे वाटल्यास करावा. प्रतिमांचीं देवळे करून पूजाअर्चा कशाला ?" प्रतीकोपासना आणि प्रतिमोपासना ह्या अगदी भिन्न मानून प्रतीकोपासनाचें महत्त्व पंडितजी मान्य करतात. पण ते म्हणतात की, " हिंदूंचीं प्रतीके प्राचीन काळच्या रानटी लोकांस योग्य असली तरी तीं नवयुगातील सुशिक्षित ब्राह्मास अगदीच अयोग्य आहेत, आपल्या अशिक्षित व रानटी कुंभार व रंगारी मूर्तिकारापेक्षा आधुनिक ख्रिस्ती कलाभिज्ञांचीं प्रतीके सुशिक्षितांस शतपटीने अधिक योग्य आहेत. काली, हनुमान आणि गणपति अशा विचित्र मूर्तींची उपासना करण्यांत कोणा ईश्वरवाद्याला आपले हित होईल असे वाटत असेल तर त्यांनीं ती करावी; पण उपाध्यायाच्या लुच्चेगिरीस व अतिलोभास बळी पडलेल्या अडाणी व अविचारी लोकांबरोबर प्रतिमोपासनेत सामील होणे, म्हणजे शतमूर्खपणा किंवा अत्यंत निंद्य व गर्ह्य असे ढोंग आहे." असे त्यांचे स्पष्ट मत आहे. ख्रिस्ती व इस्लामी लोकांस प्रतिमेवांचून उपासना करता येते, इतकेच काय; पण पंडित म्हणतात कीं, " ब्राह्मांचीं अगदीं लहान मुलेही निराकार परमेश्वराची मानसिक उपासना करूं शकतात. तेव्हां मूर्तिपूजा ही मानसिक उपासनेची एक पायरी आहे, असे जे म्हणतात, त्यांतही कांहीच अर्थ नाहीं. यास्तव लहान मुलांपासून सर्वांस प्रतिमा फोडून परमेश्वराची सत्यरूपानें मानसिक उपासना करण्यासच शिकविले पाहिजे. हिंदूंच्या हल्लीच्या मूर्तिपूजेत गौणि उपासनेतून श्रेष्ठ उपासनेत प्रगति व्हावी, अशी मुळींच योजना नाहीं. यावरून मूर्तिपूजा ही मंद अधिकाऱ्याकरितां योजलेली उपासनेची एक मधली पायरी नसून, आपल्या स्वार्थाकरितां सर्व लोकांस अज्ञानांत ठेवून आपला

फायदा करून घेण्यासाठीं ही लबाड धर्माचार्यांनीं केलेली ठकबाजी होय! यास्तव आपल्या राष्ट्राची खरी धर्मोन्नति व्हावयास पाहिजे असेल, तर पंडित म्हणतात की, साऱ्या देवळांतून प्रतिमोपासनेचा नायनाट केला पाहिजे. आणि हिंदूंच्या धर्माचार्यांचे मतलबी व जुलमी वर्चस्व कायमचें झुगारून दिलें पाहिजे."

"आता कित्येक असे प्रतिपादन करतात कीं, हिंदुसमाज अलीकडे पूर्वी इतका सुधारणाविरोधि राहिला नाहीं. सुधारकाचा पूर्वीसारखा आतां कोणी छळ करीत नाहींत. यासाठीं ब्राह्मांनीं समाजास चिकटून राहूनच योग्य कालाची वाट पहावी; म्हणजे त्यास असे आढळून येईल कीं, ज्या सुधारणा त्यांस घडवून आणावयाच्या आहेत, त्या लोक आपण होऊनच स्वीकारतील व मग ब्राह्मसमाजासारख्या संस्थेची गरजच राहणार नाही." ह्या प्रतिपादनास पंडित असे उत्तर देतात कीं, "एकतर ही हिंदुसमाजाची सुधारणांसंबंधी कांहीशी सहिष्णुता फक्त शहरांतून दिसते, इतर ठिकाणी दिसत नाही. दुसरे असें कीं, ही सहिष्णुता कोणाही नीतिमान् आणि धार्मिक मनुष्यास आनंददायक वाटणार नाहीं कारण, ज्या चालीरीति धर्मबाह्य म्हणून हिंदुसमाज स्वीकारण्यास तयार नाही, त्याच्याबद्दलही त्या समाजाने सहिष्णुता दाखविणे म्हणजे त्या समाजाचा हा नैतिक अधःपात व दौर्बल्यच होय! ज्यास सत्याची किंचित् चाड आहे, असा कोणीही मनुष्य ही हिंदूंची दुबळी सहिष्णुता पाहून त्यांचा धिक्कार आणि तिरस्कारच करील! तिसरें असें की, हिंदुसमाजाने आम्ही आपण होऊनच हळुहळू सुधारत चाललो आहो, आम्हांस ब्राह्म सुधारकांची गरज काय, असे म्हणणे व ब्राह्माच्या क्रांतिकारक चळवळीस त्यांनीं खरें महत्त्व न देणे म्हणजे, सूर्य प्रकाशतो तेव्हा मुळीं दिवसच असतो, आणि चंद्र मात्र रात्रीं प्रकाश देतो, म्हणून सूर्यास चंद्राइतकेंही महत्त्व न देण्याप्रमाणे मूर्खपणाचे आहे. तसेच समाजांत राहून समाजसुधारणा करूं पाहणे, म्हणजे निखार पाण्यांत बाहेर पाग लावून होडी ओढावयाची असतां, होडींत बसूनच पाग ओढण्यासारखे निष्फळ आहे."

पंडित सीतानाथ मतस्वातंत्र्याचे फार मोठे चहाते दिसतात. ज्यांचें आपण अवश्य ऐकावें असे कोणी तरी आपल्याहून ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध असावेत आणि त्यांचे आपण जरूर ऐकावें, ही परिस्थिति इष्ट कीं अनिष्ट

असा यांत प्रश्न उत्पन्न झाला असतां ही गोष्ट सर्वथैव अनिष्ट असेंच त्याचें उत्तर पंडितजी देतील.

मूर्तिपूजेसंबंधींही ते हिंदूंची मुळींच गय करण्यास तयार नाहींत. ब्राह्मांच्या इंडियन मेसेंजरमध्ये मूर्तिपूजेवर एक बाहेरचा लेख विचारणीय म्हणून छापला होता. त्यांत त्या लेखकाचा मुद्दा असा होता कीं, मूर्तिपूजेत उपासनेला मूर्ति घेण्यांत वस्तुतः दोष नसून त्या मूर्तीच्या ठिकाणीं उपास्याबद्दल मर्यादित भावना ठेवण्यांत दोष आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे पूर्ण व अनंत अशा परमेश्वराची भावना जर स्पष्ट आहे, तर उपासनेसाठीं चतुर्भुजधारी गदाधर घेतला काय किंवा शाळिग्राम घेतला काय त्यांत विशेष आक्षेप घेण्यासारखे कांहीं नाहीं. परमात्मा म्हणून विष्णूची पूजा करावी, पण धन देणारी या संकुचित भावनेने लक्ष्मीची पूजा करणे गैर आहे. श्रीराम हेच कोणास परब्रह्मरूप आवडेल, तर ठीक आहे; पण बलवर्धन करणारा म्हणून मारुतीची पूजा करणें बरें नाहीं. तात्पर्य, उपास्याबद्दलची भावना व्यापक आहे की संकुचित आहे, सामान्य आहे कीं विशेष आहे, यावरच मूर्तिपूजेचा गुणदोष ठरवावा असें त्यांचे मत दिसते. पण ही तडजोडीची भाषा पंडित सीतानाथ यांस मान्य होण्यासारखी नाही सर्व चराचर जर परमात्म्यानेच सचरले आहे तर प्रतिमा मात्र देव कसा नाही ? असा तुकोबादि संतांचा सवाल आहे. त्यास पंडित असे उत्तर देतात कीं, ईश्वर साऱ्या सृष्टीत सचरला असला, तरी तो साऱ्या पदार्थांत सारखाच व्यक्त झालेला नाही. पाषाण ही खनिज कोटि सर्वांत कनिष्ठ आहे. त्यापेक्षा कृमिकीटकाची योग्यताही अधिक आहे. आणि जिवाच्या आत्म्याची योग्यता तर सर्वांत अधिक आहे. यास्तव ज्यांत ईश्वराचें स्वरूप बहुतांशीं अव्यक्तच आहे अशा पाषाणाची देव म्हणून पूजा करणे, हे अत्यंत अवनतीचे व अज्ञानाचे द्योतक आहे."

ब्राह्मांनी अंगिकारलेल्या अभाविकांच्या ह्या मुद्द्यास अनुलक्षून तुकोबा म्हणतात—पाषाणच देव पाषाण पायरी । पूजा एकावरी पाय ठेवी ॥ १ ॥ × × × तुका म्हणे हे भाविकांचे वर्म । येथें धर्माधर्म विचारावे ॥ २ ॥ श्रीरामकृष्ण परमहंस असेंच म्हणतात कीं, 'यजमानाची सत्ता साऱ्या घरांत सारखीच असते पण त्याच्या भेटीचे ठिकाण दिवाणखाना' हें ठरलेले असतें. त्याचप्रमाणें देवभेटीच्या योगाचें स्थान म्हणजे श्रीविठ्ठलाचे पाय

आहेत, हे अनुभवी भाविकांनींच जाणावे. लोहचुंबकाच्या जड खनिज तुकड्यांत जे आकर्षण असते, ते जिवंत माणसांतही नसते. तेव्हां कोट्यवधि लोकांच्या सद्भावनेने अथवा ईश्वराच्या अचिंत्य नियतीने, पंढरीचा विठोबा, काशीचा विश्वेश्वर, गयेचे विष्णुपद किंवा यमुनेच्या डोहावरील वाळू यांत काय जादू आहे हे सद्भावपूर्वक अनुभव घेतल्यावांचून केवळ बुद्धिवाद्यांस कसे कळेल!

ब्राह्माची एकदां ईश्वरोपासना सुरू झाली कीं त्याच्या वर्णनांत अनाम देवास नाम प्राप्त होते, अरूपाचे रूप सुंदर दिसू लागते, निराकारास चेहेरा, डोळे, हात, पाय इत्यादि सर्व प्रत्यक्ष कार्यक्षम इंद्रियें प्राप्त होतात; इच्छा, बुद्धि, इत्यादि वृत्ति असणारे मनही त्यास असते. ब्राह्माचा देव बोलतो, हातानीं स्पर्श करतो, आपल्या पायीं घरीं चालत येतो, हे सर्व त्यांस पटते. ब्राह्माच्या घराच्या अनावरणमहोत्सवांत राममोहन, देवेंद्र, केशवचंद्र यांच्या तसबिरा अवश्य लावाव्या असे पंडित आपल्या ब्राह्मविधानांत फर्मावितात. मृताच्या राखेवर स्मारकें होऊन ती ब्राह्मास दर्शनीय ठरतात. देवेंद्रनाथाचा सप्तपर्णी वृक्ष यात्रेचे ठिकाण होते. ब्राह्ममताप्रमाणे हीं सारी देशाच्या अभ्युदयाचीच साधनें आहेत, समाजमंदिरात (किंवा पुण्याच्या हरिमंदिरांत) रोज नेमाने जाणे हे ब्राह्म आपले पवित्र कर्तव्य समजतात पण देवळांत देवदर्शनास जाणे यात मात्र ब्राह्ममताप्रमाणे देशाचा अधःपात होतो! असो. तूर्त इतकेंच पुरे.

मूर्तिपूजेचा याप्रमाणे विचार झाल्यानतर पंडितजी हिंदूंच्या चातुर्वर्ण्याकडे वळून म्हणतात कीं, "ब्राह्मांनीं ह्यावरही विजय मिळविला आहे. ब्राह्मसमाजांत अद्याप सोयरिकीच्या बाबतीत जातिनिर्बंध कोणी कोणी उघड न बोलतां चोरून पाळीत असले, तरी तेवढ्यावरून ब्राह्मसमाज चातुर्वर्ण्यावर उभारला आहे, असे कोणीही म्हणणार नाही. त्याचप्रमाणे समाजाच्या धर्मोपदेशक वर्गांत ब्राह्मणेतरांचे प्रमाण अजून कमी असले तरी त्याचे कारण जातिभेद नसून ब्राह्मणेतरांची अद्याप व्हावी तशी प्रगति झाली नाही हेच होय."

पंडित म्हणतात कीं, "जातिभेद हा वैदिक व पौराणिक काळींही नव्हता. बेटीव्यवहार आणि रोटीव्यवहारास जातींचा प्रतिबंध पूर्वीं नसे. या बाबतींत ख्रिस्ती व ब्राह्म उपदेशकांच्या मानवी बंधुभावाचा उपदेश हिंदूंवर फारसा

परिणामकारक झाला नसला तरी, इंग्रजसरकारच्या प्रतिगामी राज्यपद्धतीमुळें राष्ट्रीयभावना जागृत होऊन जातिभेदाची तीव्रता उत्तरोत्तर कमी होत चालली आहे. पण अशाही रीतीने जातिभेद मोडत असले तरी मूळच्या चातुर्वर्ण्यसंस्थेची तरफदारी करणारे जे कित्येक आहेत, त्यास पंडितजीचे म्हणणे असें आहे कीं, चातुर्वर्ण्याची मूळची योजना कशीही असो, पण ह्या चातुर्वर्ण्याचे व्यावर्तक असे दुर्भेद्य सांचे कां असावेत ? ह्या भिन्न वर्णांत रोटीबेटीव्यवहार होण्यास, तसेंच त्यांनीं आपल्या जन्मसिद्ध पेशाची अदलाबदल करण्यास काय म्हणून हरकत असावी ? आनुवंशिक सस्कारांमुळे वर्ण हे जन्मावरच ठरविणे भाग आहे, ह्या जातिवंतांच्या मुद्द्यास पंडित मुळींच महत्त्व देत नाहीत. ते म्हणतात. वैष्णव-धर्मातील कित्येक धर्मोपदेशक जातीने वैद्य व कायस्थही होते. केशवचंद्र जातीनें वैद्य तर विवेकानद कायस्थ होते. आणि खिस्ती धर्माचा थोर संस्थापक जीझस हा तर सुतार होता. युरोप व अमेरिका खंडांत अगदीं खालच्या वर्गातून मोठमोठाले धर्मोपदेशक, तत्त्वज्ञानी, मुत्सद्दी व व्यापारी निर्माण होत आहेत. आतां तिकडे जाति नसल्या तरी भिन्न वर्ग आहेत खरे, पण ते असले तरी असे व्यावर्तक नाहींत, लवचिक आहेत."

तात्पर्य, जन्मावरून अगर गुणकर्मावरून कशानेही वर्णव्यवस्थेचे समर्थन होऊ शकत नाहीं. कारण गुणकर्मावरून तरी माणसांची निरनिराळ्या वर्णात विभागणी केव्हां आणि कोणीं करावयाची ? तेव्हां ते अशक्यच आहे; पण सुदैवाची गोष्ट आहे कीं, आपले सरकार जरी काळागोरा हा वर्णभेद मानीत असले, तरी रयतेला सर्वांना सारख्या निःपक्षपातबुद्धीने वागवितें, यामुळे जातिमाहात्म्य आतां मोडत चालले आहे. तसेच ह्या पोटजाति मोडून सर्व हिंदुसमाज चार मुख्य वर्णांत विभागून देण्याची सत्ता कोणांतच राहिली नाहीं व त्यास सरकारचाही पाठिंबा मिळणार नाहीं. आतां जातिबहिष्कृत मनुष्यासही सरकारांत बढती मिळण्यास मुळींच अडचण राहिली नाहीं. मग ह्या जातिनिषेधास विचारतो कोण ! कित्येकांचें असे म्हणणें आहे कीं, कसेंही असो; हा वर्णभेद फार वर्षांचा असल्यामुळे विशेषकरून ब्राह्मणवर्णातील लोकांची बुद्धिमत्तादि गुण जसे श्रेष्ठ प्रकारचे आढळतात तसे इतर वर्णांत आढळत नाहींत. यासाठीं वर्णशुद्धि राहावी म्हणून त्यांचा भिन्नवर्णांत बेटीव्यवहार न होणें बरें. ह्या आक्षेपास पंडित मुळींच महत्त्व

देत नाहींत. ते म्हणतात कीं, एका वर्णात काय, पण एका कुटुंबांतही भिन्न योग्यतेचीं माणसें आढळतात. शिवाय ब्राह्मण-वर्णात कांहीं श्रेष्ठ गुण आहेत, असे मानले तरी तितकेच जबरदस्त दोष ब्राह्मणांत आहेत ते इतर वर्णात नाहींत. उदाहरणार्थ, अहंमन्यता, गर्विष्ठपणा, भिक्षावृत्ति, निरभिमानता असे हे दुर्गुण ब्राह्मणजातीत भरपूर असतात. आणि उलटपक्षीं खालच्या म्हणून गणलेल्या वर्गात नम्रपणा, ईश्वरपरायणता, परोपकार इत्यादि जे श्रेष्ठ प्रकारचे गुण असतात, ते श्रेष्ठ जन्माचा तोरा मिरवणाऱ्या ब्राह्मण-जातींतही नसतात. तात्पर्य, अनुवंशिक संस्कार ह्या खुळात कांहींच अर्थ नसून प्रत्येक जीव हा ईश्वराचा स्वतंत्र अवतार आहे. जाति-जातींत श्रेष्ठकनिष्ठभाव जन्मसिद्धच मानले तर हे भेद कधींच दूर होणार नाहीत, आणि मग भिन्न जातींत बेटीव्यवहार होणे पुढे केव्हाही अशक्य होईल. परंतु हे खरे आहे कीं, हा श्रेष्ठकनिष्ठभाव वास्तविक मुळांतच नाही. इतक्याउप्पर उगाच श्रेष्ठ म्हणविणाऱ्या जातींना खालच्या म्हणून गणलेल्या जातीशीं बेटीव्यवहार करण्यात जरी कांहीं तोटा वाटत असला तरी तसें करण्यांत फायदाही अमर्याद आहे. तेव्हां पंडित म्हणतात हे लक्षांत ठेवावे कीं, हिंदूंच्या सर्व सामाजिक दुःखाचें मूळ अशी जी जातिसंस्था तिचें पूर्णपणें निर्मूलन झाल्याशिवाय देशाचा उद्धार होणे शक्यच नाहीं.”

---

# प्रकरण चौदावें

# सुधारणा

## अबलोन्नति

ब्राह्म म्हणतात कीं, आमची चळवळ विघातक आणि विधायक अशा दोन्ही स्वरूपाची आहे. विधायक असे ब्राह्मांना अजून फारसे करतां आले नाहीं. पण नगररचनेपूर्वी माजलेल्या रानाची तोड हे काम काहीं कमी महत्त्वाचे नाहीं. ते काम आपण बरेच केले याबद्दल ब्राह्माना फार अभिमान वाटतो. नवीन वसाहतीपूर्वी रेड इंडियन्सचा निःपात करणाऱ्या पाश्चात्याच्या शिष्यवरांनाच ही विचारसरणी शोभते. आता ब्राह्मधर्माची अमेरिका कधी वसते तेच पहाणे आहे. ब्राह्म कांहीं समजोत; पण त्याच्या विघातक कामगिरीचे कोणी फारसे कौतुक करतील असे वाटत नाहीं. चौसोपी वाडा पेटवून देण्याचे काम एखादे टार्गे पोरही करील; पण तो पुन्हा बांधण्यास लक्षाधीशाचे भाडवल एंजिनीअराची अक्कल व कारागिरांचे कौशल्य इतकी जुळवाजुळव लागते. पूर्वी वसईप्रातांत पोर्चुगीजानी विहिरीतून निषिद्ध पदार्थ टाकून गांवचे गाव बाटवले, त्याप्रमाणेच भोळया लोकांचा व अर्धवट शिकलेल्याच्या बुद्धिकूपात कुतर्क टाकून साराच ब्रह्मघोटाळा करण्याचे काम सोपे व तितकेच भूषणावह आहे! ब्राह्मणधर्माच्या अजिक्य किल्ल्यावर पाद्र्यानीं तोफा डागल्या असता,* त्यांच्यामागे उभे राहून त्यास रंजुका आणि दारूगोळा पुरवणाऱ्या ह्या ब्राह्म

* "When the walls of the mighty fortress of Brahmanism are encircled, undermined and finally stormed by the soldiers of the cross, the victory of Christianity must be signal and complete."

—*Sir A. Lyall quoted by Lellingston at pp. 118-119.*

**भावार्थः**—" एकदां ब्राह्मणधर्माच्या तटांना वेढा देऊन ते उडवले आणि त्यांवर खिस्ती धर्मवीरांनीं हल्ला चढविला, म्हणजे खिस्तीधर्माचा विजय पुरा व कायमचा होईल."

बारगिरांची मर्दुमकी पाहिली, म्हणजे इंग्रज सेनानीच्या हुकूमाप्रमाणें आपल्याच देशबंधूंवर संगिनी रोखणाऱ्या दुर्दैवी काळ्या पलटणी डोळ्यांसमोर येतात! त्यांनीं स्वराज्य घालविलें, ह्यांनीं स्वधर्मास मूठमाती देण्याकरितां कंबर कसली आहे. आतां ह्यांनीं खणलेल्या खाड्यांत कोणाची समाधि होते, तें भविष्यकालच पाहील! असो.

ब्राह्मांच्या ह्या विघातक कामगिरीसच विधायक म्हणावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, त्यांनी बूट स्टॉकिंग्ज व चष्मे, तसेंच स्वातंत्र्य आणि शिक्षण इत्यादि उपकरणांनीं बायकांचे पुरुष केले. आणि डोक्याचें शिरस्त्राण टाकून, चेहऱ्याचें रूप बदलून, मी पापी, मी पापी, म्हणून धाय मोकलून रडणाऱ्या, आणि खेडवळ स्त्रियाप्रमाणें शेजाऱ्याशीं क्षुल्लक गोष्टींवरून कचाकच भांडणाऱ्या व बोटें मोडणाऱ्या पुरुषास बायका बनवलें! सिंहासनावरील देवांच्या मूर्तीस खालीं ओढून त्या ठिकाणीं बायकांस बसवून त्यांचे भलतेच देव्हारे माजविले! मूर्तीस जे खातां येणार नाहीं असे नैवेद्य दाखविणाऱ्या मूर्तिपूजकाप्रमाणें, नारीपूजकांनी आपल्या देवतांस पचणार नाहीं, असें स्वातंत्र्यशिक्षणाचें ताट त्यांच्यापुढें ठेवलें, आणि " देवतांनो, हा तुमचा नैवेद्य दाखविण्यास–नव्हे तुम्हास जुलमानें खाऊ घालण्यास–आम्हीं उशीर केला " म्हणून गहिंवरून ह्या उपासकांनीं लज्जेनें माना खालीं घातल्या!

Down with the Brahmins, ह्या ब्राह्मणांना खालीं ओढा! त्यांना नामशेष करा! असें हें लढाईचें शिंग फुंकूनच ब्राह्म थांबले नाहींत, तर कडव्या लढवय्यांचें पुरें अनुकरण करून त्यांनीं हिंदूंच्या मूर्तीही खालीं ओढल्या, आणि पुढें हिंदूंच्या जनानखान्यावर चाल करून विनय, शील, मर्यादा, पावित्र्य, निरहंकार, स्वार्थत्याग, तितिक्षा, निष्ठा, भाव, संतोष, इत्यादि त्याच्या पूर्वपरंपरेतील बहुमोलाच्या दागिन्याची लुटालूट व जाळपोळ केली!

भोळ्या भाविकांचा 'भाव तसा देव' असतो पण ह्या सुजाणांच्या देवता तशा नाहींत. देवाला भक्ताचें बंधन आहे पण ह्या देवता स्वतंत्र आहेत. मंदिरातील प्रतिमा स्थिर असतात, पण ह्या गृहलक्ष्मी चर आहेत. न जाणों ह्यापुढें ह्यांचे हे बायले उपासक ध्यानमग्न असतां ह्या देवतांचें स्वातंत्र्य त्यांस संचारार्थ केव्हां बाहेर नेईल! व ह्या सुखलोलुप व भ्रांत प्रापंचिकांचीं घरें केव्हां स्मशानवत् भयाण होतील, याचा कांहींच नियम नाहीं. ईश्वर करो आणि

असे प्रसंग कधीं न येवोत. ह्या आमच्या टीकेवरून आम्ही ब्राह्मस्त्रियांचा उपमर्द करीत आहोंत असा कोणींही आपला गैरसमज करून घेऊं नये. आमच्या मायबहिणींप्रमाणेच बंगालच्या स्त्रियांबद्दल आम्हांस पूर्ण आदर आहे. जें आम्हांस अनिष्ट वाटत आहे, त्याची जबाबदारी स्त्रीवर्गावर नसून, परप्रत्ययनेयबुद्धीच्या गैरधोरणी पुरुषांवरच आहे, असे आमचें स्पष्ट मत आहे.

स्त्रीस्वातंत्र्य, स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, आणि विधवाविवाह इत्यादि अबलोन्नतीच्या प्रकारांबद्दल आज सर्व सुशिक्षितांचे प्रायः एकमतच असेल. आणि ह्या सुधारणाविरुद्ध बोलूं पाहणे म्हणजे शंभर वर्षे मागे जाण्याप्रमाणेच उपहासास्पद होईल हे आम्ही जाणतो. प्रागतिक विचारांचा जोराचा प्रवाह असा वहात असतां त्याच्या उलट पोहून जाण्याकरितां दोन हात टाकणें म्हणजे लोकापवादाच्या भोवऱ्यांत ग्रथकाराचे मरणच आहे; परंतु बुडतां बुडतांही आसनाचे ठाण मांडणाऱ्या श्रीस्वामी रामतीर्थांचे धैर्य डोळ्यापुढें ठेवून टीकेच्या पाणलोटाची परवा न ठेवतां आम्ही आमच्या वाडवडिलांच्या विचाराची बैठक अढळ ठेवण्याचा प्रयत्न करणार आहोत. कितपत साधेल तें खरें.

ब्राह्मसमाजांतील अबलोन्नतीचा आरंभ स्त्रियांचा पडदा दूर करण्यापासून झाला. ब्राह्म तरुणांच्या स्त्रिया प्रथम ब्राह्म-मंदिरांतून वेगळ्या जागेत बसूं लागल्या, नंतर त्यांची प्रगति पुरुषांजवळ बसण्यापर्यंत झाली. पुढे त्यांचा देशी-विदेशी स्नेहीसोबती यांच्या घरी संचार सुरू झाला. असे हे स्त्रीस्वातंत्र्याचे कुतूहल फार काळ निरुपद्रवी राहूं शकले नाहीं. अनंगमहाराजास हें स्वातंत्र्य खपले नाहीं. ह्या स्वैराचारी प्रणयी जनांस चतुर्भुज करण्याचे त्यांचे एकदम हुकूम सुटले. प्रेम अगोदरच अंध आणि त्यांत ते स्वतंत्र झालेले, मग खाड्यांत पडण्यास काय उशीर! प्रेमावेशांत जातीचा निर्बंध राहिला नाहीं. आपलेच दांत आणि आपलेच ओठ! स्त्रीस्वातंत्र्याच्या पुढारलेल्या निशाणास मागें खेचणें, म्हणजे नामुष्कीच. तेव्हां पडलो तरी तोड वरतीच असे अपयशाचें रूप पालटले! आणि वर्णसंकर हेच मुळीं आमचे ध्येय आहे, असे ब्राह्म म्हणूं लागले. मग मिश्रविवाहाचे प्रायश्चित्तादाखल देखावे झाले. त्या वर्णसंकराची प्रजाही निर्माण झाली. पण ती गैरकायदेशीर व बेवारशी असें जेव्हां समजले, तेव्हां विषयलोलुप ब्राह्मांचे डोळे उघडले! मग सरकारी अम्मलदारांजवळ असलेलें

आपलें सर्व वजन खर्च करून केशवचंद्रांनीं ह्या गैरकायदा वर्तनाची निष्कृति नवीन धर्मविरोधी कायद्याने करून घेतली; पण त्यांस हिंदुसमाजानें विरोध केला. तेव्हां आतां शेंडी तुटो नाहींतर पारंबी तुटो, असा ब्राह्मांनीं निर्धार करून आपली हिंदुत्वाची शेंडी छाटून टाकली आणि आपण ब्राह्म झाले! म्हणजे कोणत्याही जातिधर्माच्या कुमारिकेकडे अथवा विधवेकडे अगोदर कामुक दृष्टीने पाहण्यास आणि मग जरूर तर तिच्याशीं लग्न करण्यास त्यांनीं कुलपरवाना मिळविला!

प्रौढविवाह म्हटला म्हणजे तो कुमारिकेशीं असो अथवा विधवेशी असो, विवाहापूर्वी प्रियाराधन, वल्लभोपासना अथवा वशीकरण इत्यादि विदेशी शिष्टाचार हळुहळू आलेच. बॅरिस्टर मुकर्जी नामक एका विद्वानाने ( Decline and fall of the Hindus ) हिन्दु जनाचा ऱ्हास आणि अधःपात या नांवाचे एक पुस्तक अलीकडे लिहिले आहे. ते बंगाल्यांत लोकप्रिय झाले असून त्यास जोडलेल्या डॉ० सर पी. सी. रॉय याच्या प्रस्तावनेत 'भरतखंडाच्या पुनरुज्जीवनाचा खास संदेश' अशी सदर निबंधाची सूत्रबद्ध स्तुति केली आहे. या पुस्तकाचे विषय म्हणजे हिंदुसंस्कृतीचा भयंकर विपर्यास, वेद, पुराणे आणि ब्राह्मण यांची परमावधीची टवाळी आणि सुधारणेचा विलक्षण हव्यास हेच होत. प्रकृत विषयाला लागू असे त्या निबंधांतील कांहीं उतारे श्री० ठाकरे यांच्या भाषांतरावरून आम्ही खालीं देतोः—

"तुमच्या समाजांतील तरुण व तरुणी कधींच एकत्र येत नाहींत. विचार व विकारविनिमयासाठीं एकत्र मिसळण्याची त्यांना कधी संधीच मिळत नाहीं. यच्चयावत वस्तुमात्राला स्पर्शमात्रानेंच रोमांचित करणाऱ्या ईश्वरदत्त प्रेमाच्या जादूची भावना त्यांच्या हृदयांत कधींच स्फुरण पावत नाहीं."

"बोलूनचालून जातीचा तो पुरुष, शिकारी वृत्तीचा. आयुष्यांत थोडा वेळ तरी त्याला शिकार करण्याची मोकळीक द्याल कीं नाहीं? एकोणीस वीस वर्षांच्या आंत त्याचे आईबाप त्याचे लग्न करोत वा न करोत, तरुण स्त्रीची प्रेमयाचना करण्याची त्याची निसर्गजात भावना चुरडली जाणें शक्य नाहीं. तरुण कुमारीच्या प्रेमयाचनेंत काय लज्जत असते, याचा एकदां तरी अनुभव घेतल्याशिवाय त्याची लालसा तृप्त व्हावयाची नाहीं. जशा लहानपणीं गोंवर कांजण्या एकदां येऊन जायच्याच, त्यांतलाच हा निसर्ग-

जात प्रकार आहे. योग्य दर्जाच्या कुमारिकांशीं बोलण्याचालण्याची त्याला मोकळीक द्या; आणि एकदां तरी १७ ते २१ वर्षांच्या वयाच्या दरम्यान त्याला निष्पापपणे जबरदस्त अशा प्रेमपाशात खुशाल सांपडूं द्या. झाले तर यांत अंतीं त्याचे हितच होईल."

"प्रेमयाचनेच्या सगळ्या धडपडी यशस्वी होतांक्षणीच तारुण्याने मुसमुसणाऱ्या त्या तरुणाला भावी जीवनग्रथीचा इषारा म्हणून मिळणारे प्रेमाचे बक्षिस—त्या निष्पाप कुमारिकेचे खास पहिले गोडसे चुंबन! बस्स्, त्यापुढे कोणत्या मोलवान् बक्षिसाची आठवण त्याला सर्व आयुष्यभर विशेष सुखदायक होईल? या बक्षिसाची किमत कोण करणार? आणि याची आठवण कशाने बुजणार? माझी खात्री आहे की, तुमच्या त्या प्रेमचद रायचंद स्कॉलरशिप किंवा ती टागोर-लॉ मेडले, यांपेक्षां त्याला त्या प्रथम चुंबनाची किमत खात्रीने जास्त वाटेल. XXX त्याची गोड आठवण, त्या प्रसगाचा विचार, पुढील आयुष्यांत कर्तव्याचे निरनिराळे झगडे लढतांना त्याला स्फुरण देतील."

"हल्ली त्याच्या ( हिदु तरुणाच्या ) मनांत एका बाजला अभिजात शुद्ध निसर्गबुद्धि आणि दुसऱ्या बाजला त्याच्या डोक्यांत लौकिकी कल्पनांनीं 'मज्जाव' 'मज्जाव' म्हणून उत्पन्न केलेली तिरस्कारबुद्धि याचा सारखा झगडा चाललेला असतो. पण किती झाले तरी तो स्त्रीच्याच उदरातून जन्माला आलेला! कितीही शिकवण दिली तरी त्याची स्त्रीविषयक निसर्गबुद्धि वर उसळी मारल्याशिवाय कशी राहणार?"

"स्त्री व पुरुष दोघांनाही हिदुस्थानात तारुण्याचा उमलता बहार काय असतो याची जाणीवच कधीं अनुभवण्यास मिळत नाही"

' एवढ्या मोठ्या अफाट हिदुस्थानांत तरुण स्त्री-पुरुष कधीच एकमेकांच्या प्रेमपाशांत सापडत नाहीत; आणि जर यदाकदाचित् प्रेमभावना उदित झालीच तर तिचे पर्यवसान अकालीं अनिष्ट पितृपद किंवा मातृपद यांतच व्हायचे! या विस्तीर्ण देशांत तरुण पुरुषाला आपल्या आयुष्यांत पहिल्या कुमारीचुंबनाची गोडी अनुभविण्याची कधींच संधि मिळत नाहीं. त्यामुळें नसानसांतून ज्याची स्मृति सळसळत जाईल आणि जो त्याला उमदा माणूस बनवील, अशा त्या अनुपम अनुभवाला तो कायमचा मुकतो. ही गोष्ट अत्यंत अप्रयोजक आणि निसर्गाविरुद्ध आहे."

बॅरिस्टर मुकर्जीसारख्या जाड्या बुद्धिवाद्यांनीं हिंदूंचा अधःपात ह्यासारख्या अत्यंत गंभीर विषयाचे विवेचन करतांना वरील विचार व्यक्त केले आहेत आणि हे पुस्तक भारतीय बौद्धिक मंडळानें प्रसिद्ध केले आहे. शिवाय "माझ्या सर्व देशबांधवानीं प्रस्तुत प्रबंध अवश्य विचारांत घ्यावा" अशी "भारत महर्षि" डॉ० सर पी. सी. रॉय ह्यांची या निबंधास जोराची शिफारस आहे. शुकाचार्यांनी रासलीलांचे वर्णन करावे त्याप्रमाणे हे एक गूढच आहे. तरुणतरुणीच्या चुंबनापर्यंत गेलेल्या उत्कट प्रेमास निष्पाप हे विशेषण लावल्याने, विवाहापूर्वीचा हा सर्व आचार जर पवित्र व शिष्टसंमतच होत असेल, आणि चातुर्वर्ण्याचा निःपात व स्त्रियांचा स्वैराचार ह्यावरच जर हिंदूंचा उत्कर्ष खोळंबून असेल, तर हिंदूनी आपल्या वृद्ध मातृतुल्य संस्कृतीस लवकरच डोळे मिटावयास सांगावे हे बरे !

प्रौढविवाहात आम्हास जो अनिष्ट प्रकार वाटतो तो हाच. ह्या वशीकरणप्रयत्नाची कायदेशीर लग्नात पूर्तता होईपर्यंत उभयतांचीं मने अगदीं शुद्ध व निष्पाप राहतात असे मानणे म्हणजे डोळ्यावर बळेच कातडे ओढण्याप्रमाणेच आहे. शक्य काय आणि अशक्य काय हे येथे पहावयाचे नसून तरुणपणच्या साहजिक मनुष्यस्वभावाप्रमाणे मन व शरीर भ्रष्ट होण्याचा संभव ह्या पद्धतीत कितीतरी जास्त आहे, इतकेच आम्हांस म्हणावयाचे आहे. आणि ब्राह्मदृष्टीने नीतिशास्त्रात गैरवाकब असलेल्या हिंदुसमाजास नीतिशास्त्राचे धडे शिकविणाऱ्या ब्राह्मानीं या पद्धतीचा इतका जोरानें पुरस्कार करावा, हे मोठेच आश्चर्य होय. तसेच मिश्रविवाहपद्धतींत ह्या वशीकरणरूप खेळखंडोब्याचे क्षेत्र अमर्याद वाढवून ब्राह्मानीं स्त्रियांचें ( रुचिवैचित्र्य हेच विषयलोलुप जीवाचे हित नसेल तर ) कोणतें हित साधले तें कळणे कठीणच आहे. आम्हाला आवडेल त्या परजातींतील व धर्मांतील पुरुषाशीं आम्ही विवाह करणार, अशी ब्राह्म स्त्रियांनीं कधी मागणी केल्याचे आमच्या ऐकिवांत नाहीं. हिंदुस्थानातील कुलस्त्रिया आज कोणच्याही पंथांत असोत, त्यांचा मूळचा ( ब्राह्मनिंदित ) स्त्रीधर्म अजिबात जाण्यास अद्याप कित्येक पिढ्या जाव्या लागतील यांत शंका नाहीं. तूर्त स्त्रियांना स्वातंत्र्य देण्याच्या मिषानें ब्राह्मांनीं आपल्या विषयवासना मोकाट सोडल्या आहेत, इतकेंच खरें. यामुळेच सुधारणा हा शब्द कितीही गोड असला तरी तो पापमूलक

आहे असें कित्येक वेळां आढळून येतें. अगोदर पाप घडावें आणि मग त्यावर अंतरपाट टाकून शुभमंगल म्हणावें. चोरी होऊन गेल्यावर सावधान म्हणावे, अशाच बहुतेक सुधारणांचा जन्म असतो. हे बारकाईने पाहिल्यास दिसून येईल. सुधारणांत जो इष्ट भाग असतो तो औपचारिक राहतो. अनिष्ट भाग मात्र बेसुमार बळावतो. देशकालमानाने प्रौढविवाह हा आपद्धर्म म्हणून कां होईना आज क्रमप्राप्तच झाला आहे. अर्थात् लग्नाच्या वयाची मर्यादा थोडी वाढविणे यांत कांहीं गैर नाहीं. परंतु ठाकूर आणि सेन या ब्राह्म पुढाऱ्यांच्या घराण्यांतही बालविवाह जर अपरिहार्य होतात, तर मग प्रौढविवाहाची ही रिकामी इंग्रजी कायद्याची सक्ति कशाला! आणि सक्तिचीच जरूर असेल तर मग बालविवाहाला साखरपुडा म्हणून पळवाट काढण्यांत तरी मुद्दाम कायदा घडविणाऱ्या केशवचंद्र ह्या पुढाऱ्याची काय निष्ठा राहिली? तसेच जर बालविवाहनिषेधक सक्तीचा कायदाच पाहिजे, तर मद्यपाननिषेधक कायदा मागण्याची सूचना ब्राह्मसमाजांत पुढे आली तेव्हां ब्राह्मानी कां माघार घेतली? काय बालविवाहापेक्षा दारुडे होणे, कमी निंद्य आहे काय? तात्पर्य, ब्राह्माच्या ह्या सुधारणेच्या अट्टाहासांत निष्कारण परंपराद्वेष, ब्रह्मद्वेष, शास्त्रीयकर्मद्वेष व सुखलालसेची लाचारी याहून अधिक तथ्य कांहीच दिसत नाही.

ब्राह्मसाधनाचा विचार करतांना पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यांनीं 'स्त्रियाशीं संबंध' या विषयावरही आपले विचार प्रदर्शित केले आहेत. ते त्या ठिकाणीं जरी अप्रस्तुत नसले तरी त्यांचा समावेश आम्ही याच प्रकरणांत करीत आहोत. पंडित सीतानाथ यांच्या म्हणण्यांतील भावार्थ असाः—

कित्येक सुप्रसिद्ध धर्मपंथाच्या अपयशाचे बीज, त्यानीं स्त्रियांसंबंधीं प्रश्न योग्य रीतीने सोडविले नाहीत, यांतच आहे. स्त्रियांसंबधीं भिन्न विचार करणाऱ्या पुरुषांचे दोन वर्ग दिसतात. एक,

स्त्रियांचा तो संग नको नारायणा। काष्ठ या पाषाणा मृत्तिकेच्या ॥१॥
नाठवे हा देव न घडे भजन! लांचावले मन आवरेना ॥२॥
दृष्टिमुखें मरण इंद्रियांच्या द्वारें। लावण्य ते खरें दुःखमूळ ॥३॥
तुका म्हणे जरी अग्नि झाला साधु। परी पावे बाधु संघट्टणें ॥४॥

असें म्हणणारे विरक्त गृहस्थ, ब्रह्मचारी किंवा संन्याशी यांचा वर्ग, आणि

दुसरा स्त्रियांस केवळ उपभोग्य वस्तु किंवा प्रापंचिक स्वास्थ्याचें एक साधन असें मानणारा, असे दोन वर्ग आहेत पण ह्या दोन्हीही दृष्टि चुकीच्या असून, सत्य ह्या दोन टोकांमध्ये आहे.

पंडित म्हणतात कीं, " स्त्रियांसबंधी अशुद्ध चित्त व विकारी नजर हें पाप मनुष्यास अत्यंत दुस्तर आहे. ईश्वरचिंतनानें अंतःकरण सदा व्याप्त असल्या-शिवाय या पापापासून सुटका नाही. इतकेंच नव्हे तर " नरनारी साधारण समान अधिकार " हे तत्त्व आपल्या मनात पूर्णपणे बिंबल्यावाचून अंतःशुद्धीचा प्रयत्न म्हणजे नुसता द्राविडी प्राणायाम आहे. आपली समाजरचना या बाबतीत अत्यंत सदोष आहे. त्यांत आपण क्रांति घडवून आणली पाहिजे. पुरुष हा स्वामी असून स्त्रियांनीं त्याच्या आधीन राहिले पाहिजे, ही भावना नष्ट झाली पाहिजे. स्त्रियास आपले सहभागीदार व सहकारी आपण मानले पाहिजे. त्यांस आपण आपल्या मायबहिणीप्रमाणे लेखले पाहिजे. वडील माणसानी आपल्या घरच्या मुलांमुलीस सारखेच वागविले पाहिजे. स्त्रियाचा उपयोग त्यानी घरात काबाडकष्ट करावे व पुरुषांच्या विषयकामना पुरवाव्या इतकाच जुने लोक करीत आले. आणि आता नवीन प्रतिष्ठित सुधारकाच्या कुटुंबातील स्त्रियांसही चांगल्या नटवून थटवून खाणे, गाणेंबजावणे, खेळ, नाच याच्या मजलसीत मनोहर बाहुल्या म्हणून मिरवण्यात येतात. पुरुषाच्या वाङ्मयात्मक किंवा लोकोपकारी कोणत्याही व्यवसायात त्याचें अंग नसतेंच. त्याच्यापुढे बौद्धिक अगर आध्यात्मिक संस्कृतीचे ध्येयच नसते. मुलीच्या लग्नात जे नायकिणींचे नाचरंग व दुसरे सोहाळे होतात, त्यांवरून त्याचा जन्म केवळ कामपूर्ती-करतांच आहे असे त्यांस प्रथमपासूनच शिक्षण दिले जाते ! अशा परिस्थितींत स्त्री पाहतांच पुरुषाची नजर कामुक व्हावी यात काहीच नवल नाही." येथ-पर्यंत पंडित सीतानाथ यांच्या विचारांत पुष्कळ घेण्यासारखे आहे, यांत शंका नाही. परंतु हा उपदेश त्यांनी त्यांच्या ब्राह्मबधूंसच करावयास पाहिजे. हिंदुसमाजाची स्त्रीविषयक कल्पना ते म्हणतात तशी निंद्य नसून ब्राह्मां-पेक्षांही अनंतपटींनीं श्रेष्ठ आहे. 'पराविया नारी रखुमाईसमान । हे गेले नेमून ठायींचेचि' ॥ हे शृंगारलेल्या कुलवधूसच उद्देशून नव्हे तर एका पण्यांगनेस उद्देशून तुकोबांनीं म्हटलें आहे. श्रीरामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद यांचीही सक्रिय शिकवण अशीच आहे. तात्पर्य, स्त्रियांचे महत्त्व स्वतंत्रच

आहे, त्यांचें महत्त्व वाढविण्यासाठीं पुरुषांचें बायकांशीं साम्य जोडण्याचें कारण नाहीं. शूद्रांचे शूद्रत्व घालविण्याकरितां ब्राह्मणांनीं त्यांच्याशीं रोटी-बेटीव्यवहार करावा, असें सांगण्याप्रमाणेच हा उलटा विचार आहे.

असो. आतां हा नरनारींतील वैषम्यभाव घालविण्याकरितां पंडित जे इलाज सुचवितात, तेही जुन्या शिस्तीच्या वाचकास कांहीसे विलक्षण वाटतील. पंडित म्हणतात की, " अविवाहित तरुणाचे पहिले कर्तव्य हे आहे कीं, ह्या वैषम्यभावास मदत होईल असे त्यांनीं कांहींच करता कामा नये. त्यांनी आपल्या लग्नाचे बाबतीत स्वयंनिर्णयाचे तत्त्व पूर्णपणें अमलांत आणावे. वडीलधारी माणसे कितीही योग्यतेचीं व मायाळू असली तरी त्यांच्या मार्फतीने वधूची निवड करूंच नये. आणि वधूही त्याप्रमाणेच वर पसंत करताना स्वताच्या स्वतंत्र विचाराने वागत आहे असे पहावे. वडील माणसानीं वयात न आलेल्या वधूवरांची जमविलेली लग्ने पुढे क्वचित् कोठे सुखावह होत असल्यास तो अपवाद किंवा काकतालीय न्यायच मानावा. परंतु काही झाले तरी वधूवरांच्या स्वतःच्या पसतीने जमलेल्या लग्नांत जो स्नेहभाव वाढतो, तो अशा दुसऱ्यांनी जोडलेल्या जोडण्यात दिसून येणे शक्यच नाहीं. शिवाय तरुण वधूवरांनीं हे लक्षात ठेवावे कीं, लग्न हे कांही केवळ गृहस्थाश्रमींच्या प्रपंचकार्याकरितां नाही, तर ज्ञानार्जन, शीलसंवर्धन, ईश्वरप्रणिधानाचा आनंदभोग आणि लोकसेवा यात सहकारिकत्व असावे, हा लग्नांतील हेतु आहे. याहून कमी भावना ठेवून जे लग्न करतात, ते जुन्या चालीचे अगर नव्या चालीचे असोत; ते आपल्या बायकांना एक भारवाही प्राणी किंवा इंद्रियाचे खाद्य असेच मानूं लागतात व त्यामुळे इतर स्त्रियाबद्दलही त्यांची तीच भावना होते; यापेक्षा आपणास व्यवहारी व शहाण्या म्हणविणाऱ्या शिष्ट लोकाचे न ऐकतां तरुणांनीं अविवाहित राहिलेले बरे." स्त्री-पुरुषांनीं अविवाहित राहण्यासंबंधीं पडित सीतानाथ यांचे विचार जसे स्पष्ट आहेत, त्याप्रमाणे जरूर तर स्त्री-पुरुषानीं घटस्फोट करावे, पुनर्विवाह करावे, असें प्रतिपादन त्यांच्या लेखांत आम्हांस कोठें आढळले नाहीं, ही गोष्ट नमूद करण्यासारखी वाटते.

आतां जे विवाहित झालेलेच आहेत त्यांना पंडित असे बजावितात कीं, " त्यांनीं आपल्या स्त्रीला आपणापेक्षां कमी कधींही मानूं नये. तर तिला आपले

एक स्नेही असे मानावें. सुशिक्षित समाजांतील स्त्रिया अडाणी, हेकट किंवा अगदींच माणसांतून उठल्यासारख्या अशा कधीं नसतात. यामुळें शेजार-संबंध, मुलांचें शिक्षण आणि बौद्धिक व आध्यात्मिक व्यवसाय यांत त्यांची उत्कृष्ट जोड मिळते. अशी जोड ज्या स्त्रीची पुरुषास मिळत नसेल, त्या स्त्रीशीं पुरुषानें शारीरिक संबंध ठेवणे हा एक गुन्हाच होय. मानवी व्यक्तीचा केवळ उपभोग्य विषय म्हणून उपयोग करणे हे पाप आहे. वस्तुतः प्रत्येक मनुष्यानें आपल्या आत्मशुद्धीकरितां हा बहुमोल नियम लक्षांत ठेवावा कीं, अगदींच जरूर किंवा अपरिहार्य नसेल तर स्वस्त्रीबद्दलही पुरुषानें विषयवासना सामान्यत्वें ठेवूंच नये. डॉ० जेम्स असे म्हणतात कीं, प्राथमिक देहधर्मांचे चोचले पुरविण्याचे बेतबात व योजना यांत गर्क होण्याचें मनुष्य सोडून देईल तर त्या देहधर्मांस अनीतिमय मनोविकाराचें स्वरूप येणार नाहीं. तहान आणि भूक भागविणें यांत निंद्य कांहींच नाहीं, परंतु परोपरीचीं खाद्यपेयें सेवन करणारा व त्यांचें सदा चिंतन करीत बसणारा खादाड व दारुडा हे मात्र तिरस्करणीय होतात. वेळीं अवेळीं विषयकामनेचें चिंतन न करतां तिच्याकडे शक्य तो दुर्लक्ष्य करणें हेंच चित्तशुद्धीचें साधन आहे."

ह्याप्रमाणें स्वस्त्रीसंबंधीं विचार सांगितल्यावर मुलांमुलींच्या संगोपना-बद्दल पंडित सांगतात कीं, "मुलीस मुलाप्रमाणेंच वागवावें. जें शिक्षण मुलास तेंच सर्व मुलीस द्यावें. मुलगा काय व मुलगी काय दोन्हीही माणसेंच. यासाठीं मुलांचें मन सुसंस्कृत होण्यासाठीं शास्त्र आणि तत्त्वज्ञान, काव्य आणि कला, इतिहास आणि राजकारण, हे जसे विषय आपण मुलांस शिकवतों, तसेच ते मुलींसही शिकविलेच पाहिजेत. मुलांस ज्याप्रमाणें धंदे-रोजगाराचें शिक्षण द्यावयाचें त्याचप्रमाणें मुलींसही दिलें पाहिजे. तिचा नवरा तिचें पोट भरील किंवा तिच्या सासरच्या दुसऱ्या माणसावर अवलंबून राहिल्यास तीही तिला पोसतील हे विचार मूर्खपणाचे व तिटकारा आणणारे आहेत. स्त्रियांना गृहव्यवस्था व बालसंगोपन हेंही काळजीपूर्वक शिकवावें, पण हेंच त्यांचें काम असें मात्र समजू नये. उलट पुरुषाचेंही हें काम आहे हें लक्षांत ठेवावें."

"आईबापांनीं आपल्या मुलांस दूर करूं नये. त्यांच्याशीं निकटसंबंध ठेवावा. कुलाचें शील व चालरीत मुलें पाळतील अशी काळजी घ्यावी. आपल्या स्वभावा-

शीं न जमणाऱ्या कुटुंबाशीं आपल्या मुलांचा संबंध येऊं देऊं नये. तरुणपणच्या देहधर्मांची त्यांस कल्पनाही न शिवेल अशी काळजी घ्यावी. मुलींच्या लग्नाची फाजील काळजी वाहूं नये. पुरुषाशीं संबधित असल्यावांचून मुलीचे अविवाहित जीवित व्यर्थ होय, अशा घातक कल्पनेस आपण अवसर देऊं नये. आपणांस अनुरूप अशा कुळांशीं सोयरीक जोडावी. सोयरेसंबंध जोडताना आपली साधी राहणी, शुचिर्भूतपणा, धर्मपरायणता इत्यादींचे रक्षण, जातिनिष्ठ हिंदूच्या इतकेच डोळ्यांत तेल घालून करावे. उदाहरणार्थ, ज्या घराण्यांत चाली-रीतीचा डौल, भपका, चैनबाजी, ग्राम्य विषयाची चर्चा, धर्मासंबधी औदा-सीन्य असे प्रकार आढळतील, ते नातेवाईक असले तरी त्यांच्याशी कसलाच संबंध ठेवूं नये. खोट्या उदार सुधारणामताच्या नादीं लागून, असल्या कुटुंबांचा व लोकांचा आपल्या मुलामुलींना यत्किंचितही संपर्क होऊं देऊं नये. पण वधूवरांची निवड करण्यांत मुलांमुलीस पूर्ण स्वातंत्र्य द्यावे. असे करण्यांत त्यांचे नुकसान झाले तरी ते नुकसान त्यांनी आपल्या अलौकिक आणि उदात्त विचारानीं भरून काढावे. विवाहेच्छूंनी असा स्वार्थत्याग सोसल्यावाचून कोणतीही धार्मिक अगर सामाजिक सुधारणा चिरस्थायी होणार नाही."

ब्राह्मपंडिताचे हे विचार आम्हास विसंगत वाटतात. कारण असे पहा की, गुणकर्मस्वभाव याची विभागणी ज्यांत सहजसिद्ध होते ती वर्णव्यवस्था मोडा आणि विवाह करतांना पुन्हा गुणकर्मस्वभावाचे साम्य डोळ्यात तेल घालून पारखून घ्या, हा द्राविडी प्राणायामच नव्हे काय? शिवाय, हाडारक्तात अदृश्य असणारे पिढीजात जन्मसिद्ध संस्कार डोळ्यांत तेल घालून दिसतील काय? आणि तेही डोळे कोणाचे तर वांकड्या नजरेने पहाणाऱ्या देहधर्मवश व कामांध तरुणतरुणींचे. हे आम्हास सारे विपरीतच दिसते. वराने आपली वधू पसंत करणे हा आतां शिष्टाचारच झाला आहे. पण वरही पसंत करण्याची जबाब-दारी वधूवरच टाकण्याची पद्धत अद्याप तितकी रूढ झाली नाहीं. स्त्रियांचें स्वातंत्र्यशिक्षण व त्यांची वरपरीक्षा किंवा वल्लभोपासना यासंबंधीं ब्राह्मांचे विचार बरेच वादग्रस्त होण्यासारखे आहेत. तूर्त आम्ही त्यासंबंधीं कांहींच जास्त लिहीत नाहीं. पण आम्हांस असा भरंवसा आहे कीं, हे विचार त्यांस लवकरच बदलावे लागतील.

---

## प्रकरण पंधरावें

# सदाचार

### सामान्यविचार

सद्विचार आणि सदाचार असे जर धर्माचे दोन भाग केले, तर साधारण ब्राह्मांच्या सद्विचारांबद्दल ऊहापोह पूर्वी झाला आहे, व पुढेही होईल. ह्या-पुढील प्रकरणात त्यांच्या सदाचारांबद्दल विचार करावयाचा आहे. सकाळीं उठल्यापासून निजेपर्यंत किंबहुना जन्मल्यापासून मरेपर्यंत माणसांनी आपली आचारशुद्धि कशी राखावी, याबद्दल ब्राह्मांची मांडणी काय आहे ते पहावयाचे आहे. ब्राह्मांचा धर्म बाह्यप्रमाणनिरपेक्ष असल्यामुळे स्मृत्यादि शास्त्रांचा विचार करावयासच नको. आतां त्यांचा युक्तिवाद आणि उपयुक्तता-वाद पाहिला तरी त्याचीही मांडणी पूर्वपरंपरेस धरून केलेली दिसत नाहीं. सदाचारांत, माणसाचे देवासंबंधीं व्यवहार (पराविद्या) किंवा माणसांचे माणसांसंबंधीं व्यवहार (अपराविद्या) असे त्यांचे भिन्न वर्गीकरण नाहीं. व्यक्तींचे व कर्मांचे सत्त्व, रज, तम अशा त्रिगुणाच्या निरनिराळ्या मिश्रणा-वर भेद कल्पून त्यावर त्यांची सदाचाराची मांड नाही. संचित, प्रारब्ध, क्रियमाण इत्यादि कर्मविपाकशास्त्राची उपपत्तिही त्यानी सदाचार ठरवितांना पाहिली नाही. वासनाक्षयाने जन्ममरणपरंपरेतून सुटावे असेही त्याच्या सदाचाराचे धोरण नाहीं. निष्काम कर्मयोग हाही त्यांच्या सदाचाराचा स्पष्ट दंडक नाहीं. सदाचाराचे वर्गीकरण करणारे चार वर्ण त्यांस मान्य नाहीत, चार आश्रमही कबूल नाहीत. स्त्री-पुरुष, बालवृद्ध अशाही स्वतंत्र भेदपरत्वें आचारांचे वर्गीकरण त्यांनी केले नाही. आर्यांचा इतिहास, त्यांचे महोत्सव पर्वण्या, देशाचार, कुलाचार यांचा त्यांच्या सदाचाराला अगदीं विटाळ नाहीं, असे म्हटले तरी चालेल तेव्हा ब्राह्मांच्या सदाचारासंबंधी विचार करतां नीति, कांहीं अनुष्ठाने, सुधारणा आणि प्रार्थना ह्या विषयांचा विशेषेकरून विदेशी ग्रंथांच्या आधारे त्यांनीं बराच विचार केला आहे असे जे ते म्हणतात. त्यासच आम्ही त्यांचें सदाचार शास्त्र म्हणतों.

नीति आणि धर्म हे भिन्न आहेत, असें कित्येकजण मानतात आणि नीति

म्हणजेच सदाचार असें मानून त्याव्यतिरिक्त जो धार्मिक आचार त्यास तें थोतांड समजतात. कोणी धर्मासच सर्वस्व मानून नीतीस स्वतंत्र महत्त्व देत नाहींत. धर्मापलीकडे नीति म्हणून कांहीं एक वेगळें शास्त्र आहे असे ते मानीतच नाहीत. ब्राह्म नीति व धर्म ह्या दोहोंसही मानतात; पण व्यवहारतः धार्मिक आचार किंवा शास्त्रीय कर्में यांवर त्याचा विशेष भर नसून नैतिक आचरणासच ते प्रायः धर्म समजतात. खिस्ती लेखकांनीं नीतीस जे महत्त्व दिले आहे ते हिंदु वेदान्त्यांना कळलेच नाहीं, असा ब्राह्म विद्वानांचा सामान्यतः समज आहे. यासंबधीं पंडित सीतानाथांची कल्पना अशी आहे कीं, उपनिषदांतून नीतिनियमांचा विस्तार नाही, याचं कारण वेदान्ताने लौकिकव्यवहार तुच्छ मानले आहेत, हे एक आणि शिवाय वेदान्तशास्त्राचा अधिकारी साधनचतुष्टयसंपन्न असला पाहिजे, असा निर्बंध असल्यामुळें साधकाने नीतिमान् कसे व्हावे ते सांगण्याचे उपनिषदांस कारणच पडले नसावे असे ब्राह्म पंडितांचे मत आहे. तरी पण विशेषेंकरून श्वेताश्वतरासारख्या उपनिषदातून जे परमेश्वराचे वर्णन आले आहे त्यावरून प्रमुख नीतिनियमाचा उपनिषदांतही अप्रत्यक्ष उल्लेख असल्याचे दिसून येते. असे ते म्हणतात,

एको देवः सर्व भूतेषु गूढः सर्वव्यापी सर्व भूतान्तरात्मा ।
कर्माध्यक्षः सर्व भूताधिवासः साक्षी चेतो केवलो निर्गुणश्च ॥

**अर्थः**—एक देव सर्व भूतांमध्ये गूढरूपाने सर्व व्यापणारा, सर्व भूताचा अंतरात्मा, कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूताचे ठिकाणीं अधिष्ठान असलेला साक्षी, ज्ञाता, केवल आणि गुणरहित आहे.

या ते रुद्र शिवा तनूरघोरा पापकाशिनी ।
तया नस्तनुवा शंतमया गिरिशन्ताभिचाकशीहि ॥

**अर्थः**—हे रुद्रा, तुझी जी तनु कल्याणकारक, भयंकर नसलेली आणि पापाचा नाश करणारी आहे, त्या शांत तनूने, हे गिरिनिवासा, आम्हांला दर्शन दे.

त्वं स्त्री त्वं पुमानसि त्वं कुमार उत वा कुमारी ।
त्वं जीर्णो दंडेन वंचसि त्वं जातो भवसि विश्वतोमुखः ॥
नीलः पतंगो हरितो लोहिताक्षस्तडिद्गर्भ ऋतवः समुद्राः ।
अनादिमत्वं विभुत्वेन वर्तसे यतोजातानि भुवनानि विश्वा ॥ श्वे. ६।३-४

अर्थः—तूंच स्त्री, तूंच पुरुष, तूंच कुमार, तूंच कुमारी, तूं म्हातारा काठीनें चालतोस तूं जन्मल्याबरोबर विश्वतोमुख होतोस. निळ्या, हिरव्या, तांबड्या डोळ्यांचा पक्षी तूं आहेस. मेघ तूं, ऋतु तूं, समुद्र तू, आदिरहित व ज्याच्या पासून सर्व भुवनें निर्माण झाली असा तू सर्व व्यापून रहातोस.

अशा ठिकठिकाणच्या वर्णनांवरून ब्राह्म म्हणतात, परमेश्वराचें वर्णन तात्त्विक व नैतिक दोन्ही दृष्टींनी पूर्वीच्या ऋषींनी केलें आहे. पण उत्तर वेदान्तात त्याचा तात्त्विक स्वरूपावर जास्त भर आहे. आणि ब्राह्मांस ईश्वराचें नैतिक स्वरूपच जास्त चिंतनीय वाटतें, असा फरक आहे.

ब्राह्मपंडित म्हणतात कीं, "भेदांत अभेद पहाणे हेच नैतिक जीवनाचें बीज आहे. आत्मप्रतीतींत जो जीवशिवभाव व्यक्त होतो तेच नीतीचें स्वरुप होय. ज्यात खरी आत्मौपम्यबुद्धि आहे तीच नीति होय. ज्यांत आत्मरूपाबद्दल जीव भ्रांत दिसतो तीच अनीति. परमेश्वराची जी अंतःकरणात स्फूर्ति होते, ज्यांस ब्राह्मविवेकवाणी म्हणतात तीच नीति. स्थूलमानानें पाहता नीति किंवा सदाचार म्हणजे ज्ञानार्जनाच्या हव्यासानें बुद्धि प्रगल्भ करावी, लोकसेवेचा व्याप वाढवून मानवीबंधुत्वाची भावना जागृत करावी आणि जीव व सृष्टि याच्या रचनेंत व्यक्त होणारें परमात्म्याचें अलौकिक सौंदर्य, प्रेम आणि चातुर्य पाहून नम्र आणि आनंदित व्हावें हेच होय. किंवा असेही म्हणता येईल की, नैतिक जीवनाचा विकास दोन तऱ्हेनें होतो. एक जीवाचें स्वार्थाचें वर्तुळ वाढत वाढत कुटुंब, जात, देश व अखेर अखिल भूगोल यास व्यापून मानवबंधुत्वात पूर्ण विकास पावतें. त्याचप्रमाणें इंद्रियधर्म, बुद्धि, भावना, आणि आध्यात्मिक अनुभव याप्रमाणें अपूर्णातून पूर्णाकडे जीवात्म्याची अनंत उन्नति होत जाते. जीवशिवाची सापेक्षता हाच नैतिक जीवनातील हेतु आहे. नीतीची परिणति अध्यात्मात होते. ब्राह्मीं स्थिति हाच नीतीचा शेवट होय.

पुण्याचें फल आत्मप्रसाद व पापाचें फल पश्चात्ताप असें कित्येक ब्राह्म मानीत आले; पण पंडित सीतानाथ म्हणतात की, "जीवाच्या व्यवहारावरून देवाचा व्यवहार अनुमित करणारांची ही भूल आहे. ते म्हणतात कीं, पुण्य-कर्माहून थोर असें हेतुभूत फल तें कोणतें, आणि पापाहून भयंकर असें वेगळें फल तें काय असणार ? तात्पर्य, आत्मप्रसाद हा फलरूप नसून पुण्यकर्माचेंच तें एक अंग आहे. तसेंच पश्चात्ताप हा पापाच्याच अंगभूत आहे. पश्चात्तापास

कार तर उपाय म्हणतां येईल. तो फलरूप नाहींच. यास्तव पुण्यफलाचा लोभ आणि पापाच्या परिणामाची भीति हे सदाचाराचे शुद्ध हेतु नसून आत्म्याकरितांच आत्मप्रेम असा निर्हेतुक भाव पाहिजे. पंडितजीचे जरी असे हे स्फुट विचार असले तरी सामान्यत्वे पाहता ब्राह्मांची सदाचाराची कल्पना शुद्ध सात्त्विक नसून सत्त्वराजसिक आहे. त्याचप्रमाणे श्रेय आणि प्रेय ही उपनिषदांतील परिभाषा जरी ते वापरतात, तरी श्रेय हे केवळ आत्मगत किंवा कर्तृवाच्य आहे, बाह्यार्थवाच्य नाही असे ते मानीत नाहीत. म्हणजे मनुष्यानें मनुष्याशीं वागण्याच्या पद्धतीचाही ते श्रेयातच समावेश करतात. वस्तुतः वेदान्तमताप्रमाणे श्रेय हे केवळ सात्त्विक आणि प्रेय हे राजसिक व तामसिक असेच मानले पाहिजे. किंबहुना निस्त्रैगुण्य हेच श्रेय असावे. पण ब्राह्माची व्यावहारिक दृष्टि सत्त्वरजापलीकडे प्रायः जातच नाही.

ह्या श्रेयप्रेयवादाचा समन्वय करण्याच्या मोहात आधुनिक विद्वानांनीं जो गोंधळ केला आहे, त्यासंबंधी एका विद्वान् ब्राह्म-लेखकाचेच विचार आम्ही खाली देत आहोत.

"आपल्या आयुष्यात असा एक काळ येतो कीं, त्या वेळीं श्रेय काय व प्रेय काय यातील भेद आपल्याला स्पष्ट कळत नाही. एक मार्ग आत्मसंयमनाचा आहे तर दुसरा स्वार्थपरायणतेचा आहे. साधकाने प्रथमच आपण कोणत्या मार्गाने जाणार, मृत्युपथास लागणार, कीं अमृतत्व प्राप्त करून घेणार हे नक्की ठरविले पाहिजे. ब्राह्मसमाजाने आपले एक नवीन ध्येय निर्माण करून हा प्रश्न अधिकच गुतागुतीचा केला आहे. प्राचीन आचार्य असे सागत आले की, ज्यास ईश्वर पाहिजे असेल त्याने जगाचा मोह सोडला पाहिजे. परतु ब्राह्मधर्माची शिकवण अशी नाही. ब्राह्मधर्माची शिकवण अशी आहे कीं, ब्राह्माने संसाराचा त्याग करता कामा नये. त्याने प्रापंचिकाची व नागरिकाचीं सर्व कर्तव्ये केलीं पाहिजेत. मुलेबाळे व बायको याच्या प्रेमात त्यांनीं ईश्वराचा साक्षात्कार पहावा, आणि प्रवाहप्रतित प्रपचातील रोजचीं सर्व कामे करण्यातच ईश्वराची सेवा व उपासना मानावी. साधकाच्या वासना आणि भावना ह्या ईश्वराच्याच देणग्या आहेत, त्याअर्थीं त्यास साधकाच्या मार्गातील प्रतिबंध असें मानतां येत नाहीं. निरनिराळ्या प्रकारचे भोग आणि करमणुकी ह्या पापमूलक किंवा मनास भ्रष्ट करणाऱ्या आहेत असें मानूं नये. आपल्या गरजा

उत्तरोत्तर वाढत आहेत आणि आपल्या वाढत्या संस्कृतीच्या विकासासाठीं त्यांची फार जरूरी आहे."

"ह्याप्रमाणे ज्या निरनिराळ्या प्रकारच्या सुखोपभोगांचा पूर्वी साधकाला त्याग सांगितला होता, तेच भोग आतां निराळ्या दृष्टीने ग्राह्य ठरले आहेत. त्यांतही अलीकडील शास्त्रीय दृष्टीने पाप आणि गुन्हेगारी यासंबंधी भावना अगदीच बदलून, रोगी मनुष्याप्रमाणे पापी व गुन्हेगार मनुष्याबद्दल कीव करावी, द्वेष करूं नये असे जे नवीन मत बनत आहे, तेही फार धोक्याचें झाले आहे. पूर्वीचे धर्मिष्ठ लोक आत्मनिग्रह आणि प्रेम इत्यादि गुणांनीं आपला प्रपंच पावन करीत असत; परंतु आतां पाप आणि नरक इत्यादि कल्पना इष्ट आहेत असेच मानण्याकडे प्रवृत्ति होत आहे. मनुष्यांतील पशु-वृत्तीचा निग्रह करण्याचे ऐवजीं, तिला पूर्णपणे स्वैर सोडावे आणि मनुष्यांतील अत्यंत घातुक भावना आणि विकार यांचे कोडकौतुक करून त्यांस उत्तेजन मिळावे असे वाङ्मय हल्लीं प्रसिद्ध होत आहे. आधुनिक शिक्षण आणि सुधारणा यांचा हा भयंकर परिणाम आहे. जे पूर्वी द्वेष्य किंवा त्याज्य म्हणून गणले गेले होते, ते मोहवश जीवास प्रिय असल्यामुळे ते श्रेय असे मानून लोक त्याच्यामागे लागले आहेत."

"ब्राह्मापुढे हा अत्यंत कठिण प्रश्न येऊन पडला आहे. त्यानी जे धर्माचे नवीन ध्येय बनविले आहे ते प्रपंचांत राहूनच साधावे असे त्यांचे म्हणणें आहे. परंतु आधुनिक संस्कृति आणि शास्त्रीय संशोधन ह्या बड्या नांवां-खाली होणाऱ्या क्रान्तीने ब्राह्मांच्या अत्युच्च ध्येयाचा आज व्यवहारतः अधः-पात होत आहे. आजकालचे नामधारी धर्मात्मे भलभलत्या मतांचा व विचारांचा फैलाव करीत आहेत. यासाठीं प्रत्येक ब्राह्माने हे अवश्य लक्षांत ठेवावे की; सत्य आणि असत्य, श्रेय आणि प्रेय यात कोणतीही तडजोड आणि समन्वय होणे शक्य नाहीं. यास्तव त्यांनीं वाटेल तो स्वार्थत्याग करून प्रेयाचा मोह निःशेष सोडावा आणि श्रेयसंपादनार्थच झटावें. ही निवड साधकाने प्रारभींच करावी; आणि अशा रीतीने ज्या साधकाचे प्रारंभीचे प्रयत्न श्रेयरूप ईश्वराची प्राप्ति व्हावी असेच असतात, त्यास अखेर असा अनुभव येतो कीं, ईश्वराची प्राप्ति करून घेण्याच्या एकनिष्ठ प्रयत्नांचें पर्यवसान ईश्वरानेंच उलट आपली प्राप्ति करून घेतली; आपणच ईश्वराच्या सर्वस्वीं आधीन झालों

ह्या कैवल्यांत होतें. आणि मग वेदान्त्यांचा अद्वैतवाद आणि अवतारवाद यांतील रहस्य पुरे पटतें." संप्रदायाचा अभिमान सोडून ब्राह्मलेखक लिहूं लागले म्हणजे वेदान्ताचीच भाषा कशी बोलतात, याचा हा उत्कृष्ट नमुना म्हणून वाचकांस थोड्या विस्तारानें सादर केला आहे. मात्र त्यावरून सर्व साधारण-ब्राह्मांचे असेच विचार आहेत, असे मात्र कोणी समजूं नये. पिंडांतला इंद्रियगण व ब्रह्मांडांतील मानवगण या दोघांचा संतोष हेच ब्राह्माचे सर्वसाधारण ध्येय, हाच त्यांचा सदाचार आणि हेच त्याच्या ईश्वरोपासनेचे व्यावहारिक रूप आहे.

ब्राह्मांचा स्थितप्रज्ञच काय पण सर्वभूतांतरात्मा परमेश्वरही 'सर्वभूतहिते रतः' ह्या विशिष्ट लक्षणाने नित्य युक्त आहे. अर्थात् त्याच्या सदाचाराचे शाब्दिक ध्येय साम्यबुद्धीपेक्षां सर्वभूतहित हेच जास्त दिसते. आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक या तीन पथांपैकीं ब्राह्मातून काही जरी आध्यात्मिक पंथाकडे थोडे झुकले असले, तरी सामान्यत्वे त्याचा कल आधिदैवतपक्षाकडेच दिसतो. स्थितप्रज्ञ हे विधिनिषेधातीत असतात आणि त्याच्या वर्तनाने सिद्ध होणारे नीतीचे नियम हेच मनुष्यास कित्त्याप्रमाणे प्रमाण होतात, हे सिद्धान्त ब्राह्मांस मान्य नाहींत. त्यांचे विधिनिषेध कधींच सरत नाहींत आणि त्यांचा आधिदैवतपक्षच लंगडा असल्यामुळे त्यास प्रमादरहित असे कोणीच दिसत नाहीं. तात्पर्य, 'मनःपूतं समाचरेत्' हे त्यांचे सदाचाराचे पृथक्करण आणि स्वतंत्र शास्त्र आहे. कार्याकार्य ठरविण्यास कोणतेही शास्त्र ते मानीतच नाहींत. असे आहे तरी संप्रदायाच्या दृष्टीने लौकिक व्यवहार व धार्मिक आचार असे सदाचाराचे भेद त्यांना करणे भागच पडले. शाश्वत धर्म म्हणून कांहीं सार्वत्रिक तत्त्वे जरी त्यांस मान्य असलीं, तरी त्यानीं आपल्या सांप्रदायिक धर्माचे सतत वैशिष्ट्य राखण्याचा आस्थापूर्वक प्रयत्न केला आहे. धार्मिक आचार व संस्कार हेच धर्माचे मुख्य अंग आहे. त्याचप्रमाणे साधारण-ब्राह्मांनीं आपल्या धार्मिक आचारांस व्यवस्थित रूप देण्याचा अलीकडे विशेष प्रयत्न केला आहे. आणि 'ब्राह्मांचीं अनुष्ठाने व प्रार्थना' या नांवाचे एक लहानसें पुस्तक त्यांचे अध्यक्ष पं० सीतानाथ तत्त्वभूषण यानीं लिहिले आहे. त्याची थोडक्यांत रूपरेषा आम्ही यापुढे देत आहोत.

---

## प्रकरण सोळावें

# सदाचार ( पुढें चालू )

### नित्यकर्म किंवा प्रार्थना

**१ प्रातःस्मरण**—ह्यांत आत्म्याचाही जो आत्मा त्याचे मातृपितृभावानें स्मरण करून त्याने आपले निद्रेत रक्षण केले, जागृत करून पूर्वस्मृति दिली, पदोपदी पुढील मार्ग दाखविला, याबद्दल आभार मानतात. व पुढे "माझ्या हातात हात घालून तू माझा नित्य सांगाती हो. तुझी पवित्र दृष्टि माझ्या कायिक, वाचिक, मानसिक अपराधांकडे असूं दे. मजकडून चूक होईल त्या वेळीं सावध कर व औदासीन्य येईल त्या वेळी उत्तेजन दे. आजच्या सुखदुःखांच्या अनुभवाने तूं मला पूर्वीपेक्षा अधिक जवळ कर, आणि तुझ्या व माझ्या ऐक्याचा सोन्याचा दिवस लवकर येऊ दे" अशा अर्थाची प्रार्थना असते.

**२ पूर्णांग उपासना (सार्वजनिक)**—ह्या उपासनेच्या आरंभी एक पद्य म्हणतात. नतर आचार्याकडून उद्बोधन होते. त्यात प्रार्थनेचे पूर्वी मन ईश्वराभिमुख असावे, मनांत उत्कटता असावी, म्हणजे ईश्वरही आपल्या भावाचा भुकेला आहे, असे आढळेल. ती प्रार्थनेची घडी त्यानेच जमवून आणली अशी भावना ठेवावी, आणि त्यानेच उत्पन्न केलेल्या सद्भावनेने उपासकाचीं अंतःकरणे उल्हसित, उदात्त आणि पवित्र होवोत, अशी आस्था बाळगावी, वगैरे गोष्टी सांगण्यांत येतात. नंतर पुन्हा एक पद्य होऊन, आचार्य व सर्व उपासक मोठ्याने खड्या व स्पष्ट स्वरांत—

> सत्यंज्ञानमनन्तं ब्रह्म। आनन्दरूपममृतं यद्विभाति !
> शान्तं शिवमद्वैतम्। शुद्धमपापविद्धम्।

हा मंत्र म्हणतात. आणि मागून आचार्यांची आराधना सुरू होते. आराधनेत वरील मंत्रांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ विस्तारपूर्वक करण्यांत येतो. उदाहरणार्थः—"तूं आत्म्याचा आत्मा, जीवाचे जीवन, विचारशक्तीचा उगम, असा अंतर्यामिन् आहेस. तुझ्या सत्तेतच आम्ही जगतों व वागतों, सर्वत्र

तुझीच सत्ता संचरली आहे. तुला सोडून आम्ही कोठें जाणार ? तुझी सर्वज्ञ दृष्टि आम्हांवर आहे. आमचा स्वभाव तुझ्यापासून छपवितां येत नाहीं. तुझ्या-इतका जवळचा मार्गदर्शक इहलोकीं दुसरा कोण असणार ? तूंच सर्व जगाचा नियंता आहेस. आमच्या उत्तरोत्तर विकास पावणाऱ्या मनास तुझें उदयोन्मुख तूं पटवीत असतोस. तूं अणूंत जसा पूर्ण आहेस, तसाच विश्वांतही पूर्ण आहेस. तूं दिक्कालानवच्छिन्न आहेस. आम्ही अत्यंत क्षुद्र जीवही तुझ्याच अमर्याद शक्तीच्या आधारावर आहोत. याप्रमाणे चोहोंकडून तूच आम्हांस व्यापलें आहेस, असे पाहून आम्ही निश्चित व शांत होतो. तुझ्या आनंदरूपाने सर्व विश्व व्याप्त आहे. पण ज्यांस तुझे सप्रचित ऐक्य घडते त्यांस अद्वितीय अशा परमानंदाचा लाभ घडतो. आम्ही अगदीं क्षुद्र व्यवसायांत असतांही आमचे जीवन तुझ्याच-साठीं आहे, असे आम्हांस वाटते. तुझ्या ज्ञानानें आमचीं मने संतुष्ट होतात, तुझ्या प्रेमाने चित्त समाधान पावते, तुझ्या सेवेने इच्छापूर्ति होते, आणि तुझ्याशीं पूर्ण ऐक्य झाल्याने पूर्णानंदाची प्राप्ति होते. अशा अभेदानंदांत असतांना तुझ्या अमर्याद प्रेमाचा आम्हांला अनुभव घडतो. तसे प्रेम दुसऱ्या कोणाचे असणार ? ह्या अखिल विश्वातील नानाविध रूपांत आणि योजनेत आमच्यावरील तुझे प्रेम व्यक्त होत आहे. आणि अशा रीतीने दिवसानुदिवस तुझें आणि आमचे ऐक्य दृढतर व शाश्वत होत आहे. तूं एक आणि अद्वितीय आहेस. निरनिराळ्या व्यवसायव्यापृत्वांत आणि व्यवधानांत एक ध्येयरूप असा तूंच आमचा स्वामी आहेस. सर्व विश्वाचा केंद्र तूं आहेस. आणि आम्हांस कळो वा न कळो तूं आम्हांस आपल्याशींच नेत आहेस. त्याच-प्रमाणें तूं पवित्र आहेस. आमचे हातून पाप घडलें तरी तूं आम्हांस टाकून न देतां अनुतापजलाने आम्हांस शुद्ध करतोस. ज्या दिवशीं आमच्या इच्छा तुझ्याशीं एकरूप होतील, आमची ही वणवण थांबेल आणि आम्ही सर्वस्वीं तुझे होऊं, तो दिवस धन्य होय. आमच्या आत्माचा तुझ्याशीं ज्या क्षणीं समागम होतो, त्या वेळीं त्या सोन्याच्या दिवसाची अंधुक कल्पना येते ! तुला आम्ही आमचे आत्मार्पण करतों व पुनःपुन्हा प्रणाम करतों.''

ह्यानंतर कांहीं क्षण शांत चित्तानें सर्वजण ईश्वराचे ध्यान करतात. नंतर आचार्य व उपासक मिळून खालील महानिर्वाणतंत्रांतील थोडा फेरफार केलेले श्लोक म्हणतातः

ॐ नमस्ते सते ते जगत्कारणाय। नमस्ते चिते सर्वलोकाश्रयाय।
नमोऽद्वैततत्त्वाय मुक्तिप्रदाय। नमो ब्रह्मणे व्यापिने शाश्वताय।
त्वमेकं शरण्यं त्वमेकं वरेण्यं। त्वमेकं जगत्पालकं स्वप्रकाशम्॥
त्वमेकं जगत्कर्तृ पातृप्रहर्तृ। त्वमेकं परं निश्चलं निर्विकल्पम्॥
भयानां भयं भीषणं भीषणानां। गति प्राणिनां पावनं पावनानाम्॥
महोच्चैःपदानां नियन्तृ त्वमेकं। परेषां परं रक्षणं रक्षणानाम्॥
वयन्त्वां स्मरामो वयन्त्वां भजामो। वयन्त्वां जगत्साक्षिरूपं नमामः॥
सदेकंनिधानं निरालंबमीशं। भवांभोधिपोतं शरण्य व्रजामः॥

त्यानंतर पुन्हा सर्वजण उपनिषदांतील व ऋग्वेदांतील खालील प्रार्थना किंवा त्याचा गद्यार्थ म्हणतात.

"असतोमा सद्गमय, तमसोमा ज्योतिर्गमय, मृत्योर्माऽमृतं गमय, आविरावीर्मएधि. रुद्र यत्ते दक्षिणं मुख तेन मा पाहि नित्यम्. [अर्थः— असतापासून सताकडे ने, अंधकारातून प्रकाशाकडे ने, हे स्वयंप्रकाश, आम्हांला दर्शन दे, हे रुद्र, आपल्या दक्षिणमुखाने तूं आमचे नित्य रक्षण कर.]

त्यानंतर पुन्हा एक पद्य गातात. नंतर आचार्य जगत्कल्याणासाठी प्रार्थना करतात. आणि मग एखाद्या शास्त्रवचनावर आचार्यांचे प्रवचन होते. प्रवचनाचे अखेर त्यात वर्णिलेल्या गुणाचा विकास व्हावा, म्हणून देवाजवळ आचार्य करुणा भाकतात आणि नतर सर्वजण खालील मंत्र म्हणतात. "ॐ एकमेवाद्वितीयम्, सत्यमेवजयते, ब्रह्मकृपाहिकेवलम् शांतिः शांतिः शांतिः." अखेर पंडित शिवनाथशास्त्र्यांचे खालील श्लोक किंवा दुसरे एखादे पद्य म्हणून उपासना संपते.

नमो नमस्ते भगवन् दीनानां शरण प्रभो। नमस्ते करुणासिन्धो नमस्ते मोक्षदायक। पितामातापरित्राता त्वमेकं शरणं सुहृत्। गतिर्मुक्तिः परा सम्पत् त्वमेव जगतां पतिः। पापग्राह समाकीर्णे मोहनीहार सवृते। भवाब्धौ दुस्तरे नाथ नौरेका भवतः कृपा। त्वत्कृपातरणिं देहि देहि नाथ वराभयं। मृत्युमायामये घोरे संसारे देहि मेऽमृतम्। क्षिप्रं भवतु शान्तात्मा भक्तस्ते भक्तवत्सल। निर्वाणं यातु पापाग्निस्त्वत् प्रसादात् परमेश्वर। [स्तोत्र सुबोध आहे. विस्तारभयास्तव अर्थ दिला नाहीं.]

**(३) कौटुंबिक प्रार्थना:**—रोज अगर साप्ताहिक कौटुंबिक प्रार्थनाही वरीलप्रमाणेच करितात. किंवा त्यांत बराच संक्षेपही करतात. आदिअंतीं पद्य, प्रथम कौटुंबिक स्थितीस अनुलक्षून आराधना, नंतर कांहीं क्षण ध्यान करतात. अखेर " कौटुंबिक सुस्थिति असावी, सर्वांनी एकमेकांशी व्यवस्थित वागावे, कोणी कर्तव्यास चुकूं नये, कामक्रोधादि मनोविकारांपासून रक्षण व्हावे, एकमेकाचे दोष एकमेकांनी सभाळून घ्यावे आणि एकंदरीत प्रपच-कैवल्याचा लाभ घडावा ", अशी प्रार्थना असते.

**(४) स्नानकालीं प्रार्थना:**—" हे शुद्ध करणारे उदक तुझ्या प्रेमाचे विशेष व्यक्तरूप आहे. या उदकाने माझे शरीर जसे रोज शुद्ध होते त्याच प्रमाणें तुझ्या समागमाने माझी आत्मशुद्धि होत जावो."

**(५) भोजनकालचा अनुग्रह** (Grace) " मला अन्न देऊन माझे शरीर रक्षण करणाऱ्या हे प्रिय माते, मला आरोग्य व बल देण्यासाठी, तू आपल्या हातांत अन्नोदक घेऊन येथे हजर आहेस. तुझ्या कृपेने हे सारे संप्राप्त झाले आहे. ह्या अन्नाने जसे माझे प्राणधारण होते त्याप्रमाणे तुझ्या अनुग्रहाने माझ्या आत्म्यास आरोग्य व बळ ह्यांचा लाभ घडो."

**(६) रोजच्या उद्योगाचे आरंभीं प्रार्थना:**—" हे स्वामिन ! तू सबाह्या-तर व्याप्त आहेस. येथिल माझ्या धन्याचे रूपात तूच मजकडून सेवा मागत आहेस, ती निर्लोभ व निरालस वृत्तीने मजकडून करून घे. माझे हे उद्योग तुझ्या व माझ्यामध्ये अंतरायभूत होऊ देऊं नकोस. उलट ह्या उद्योगाचे द्वारेच तूं मला जवळ कर."

**(७) सायंप्रार्थना:**—" हे माझ्या सहचारी मित्रा ! तूच या दिवसाचा शेवट आणून जिकडे तिकडे शांतता केली आहेस. सारा दिवस तुझेच काम करीत असतां मी किती वेळां तरी तुला विसरलो. एखाद्या अजाण अर्भकास त्याच्या मातेने सारा दिवस अंगावर वागवावे, त्याप्रमाणे मला न कळताही तूं मला सारा दिवस संभाळून मार्गास लावलेस; माझेकडून किती तरी वेळा कायिक-वाचिक-मानसिक दोष घडले असतील, यामुळे मी खिन्न होऊन तुझ्या समागमास अंतरलो आहे. तरी हे परमेश्वरा, तुझे स्वरूप अधिक स्पष्ट कळू दे आणि तुझे पवित्र सत्त्व माझ्या अंतरांत उतरूं दे."

**(८) झोपीं जाण्यापूर्वी प्रार्थना:**—" हे माझ्या प्रेमळ माते, सर्व्या

दिवसाचे कष्ट झाल्यावर तूं आपल्याजवळ निजण्यासाठी मला बोलावीत आहेस. मी केवळ तुझ्या प्रेमाधीन आहे असे वाटते. सर्व अवस्थेत तुझी पवित्र इच्छाच प्रेरक असून मला माझ्या ध्येयाकडे नेत आहे. आता ही सुखाची झोप घेतल्यानंतर जेव्हा मी जागा होईन, तेव्हा अंतर्बाह्य तुझ्या सान्निध्याचे भान मला राहील, अशी कृपा असू दे."

पूर्वीचे नित्यकर्म बदलून ब्राह्मांनी यांत काय सुधारणा केली ते समजणे कठीणच आहे. ब्राह्माच्या प्रातःस्मरणापेक्षा पूर्वीच्या नैष्ठिकी घराण्यातून स्त्री-पुरुषाच्या तोंडून जे प्रातःस्मरणाचे श्लोक, भूपाळ्या, पदे, स्तोत्रे ऐकू येतात, ती किती तरी प्रासादिक व अर्थगंभीर असतात. पण सारेच बदलण्याच्या अट्टहासात ब्राह्मानी आपले नित्यकर्म अगदीच रूक्ष व कृत्रिम करून ठेविले आहे. संध्योपासनेच्या ऐवजी त्याची पूर्णांग उपासना हे एक भलतेच अवडंबर झाले आहे. पांच सात मिनिटे संध्येला फुरसूद नाही व आस्था नाही अशा काळात ही कौटुंबिक उपासना किती ब्राह्म करीत असतील याची वानवाच आहे! यापेक्षा राजा राममोहन व देवेंद्रनाथ ह्या ब्राह्मगुरूंनी स्वानुभवानें वाखाणलेली निदान गायत्रीची उपासना ब्राह्मांनी कां सोडली ते कळत नाही. गायत्री मंत्राच्या उच्चारांत काय अजब जादू आहे, ह्याचा अनुभव केवळ हिंदूंनीच नव्हे तर ब्राह्मानीही घेतला आहे. आणि थिऑसफिस्टानी तर आता त्या मंत्राचें माहात्म्य सप्रयोग सिद्ध केले आहे. बाकीच्या मूर्ति राहोत; पण सूर्य आणि अग्नि ही तेजे प्रत्यक्ष असताना व त्याच्या उपासना ब्राह्मांच्या पूर्वाचार्यांनीच रूढ केल्या असता, त्याही ह्या रूक्ष बुद्धिवाद्यास पटल्या नाहीत असे दिसते. पंडित शिवनाथशास्त्री हे कांही होम करीत असत. कोणी ब्राह्म पंचदीपांचे प्रतीक वापरीत असत, असेही समजते. परंतु सामान्यतः ब्राह्मांनी जानव्याबरोबर संध्योपासनाही सोडली, अग्नीची उपासना सोडली, ब्रह्मयज्ञादि यज्ञही सोडले आणि ख्रिस्ती कवींची (Hymns) प्रार्थनास्तोत्रे तेवढीं नवीन जोडली.

---

## प्रकरण सतरावें

# सदाचार ( पुढें चालू )

### संस्कार

(९) **जातकर्मः**—मुलाच्या जन्मानंतर एक महिन्याच्या आंत जातकर्मविधि करतात. ठरलेल्या वेळीं सर्व आमंत्रित मंडळी घरीं एकत्र झाल्यावर मुलाची आई नाहीं तर बाप त्याला घेऊन तेथें येतात, व आपल्या संप्रदायात ईश्वराने पाठविलेल्या त्या नवीन जीवास सर्वांनीं आशीर्वाद द्यावेत व त्याच्या कल्याणाकरितां ईश्वराची प्रार्थना करावी असे प्रास्ताविक भाषण होते. नंतर एक पद्य झाल्यानंतर आचार्य उदबोधन आणि आराधना करतात. मग नेहमींची ( असतो मा सद्गमय ) प्रार्थना झाल्यावर मुलाची आई किंवा बाप नवसंहितेंतील प्रार्थना करतात. त्यांत मुलाचे गर्भाशयात रक्षण करून त्यास जन्म दिल्याबद्दल देवाचे आभार मानून देवानेच त्याचा संभाळ करावा व त्याचा संभाळ करण्यास शक्ति द्यावी. तो बालक कुटुंबास शुभदायक होईल असे करावे, अशाबद्दल प्रार्थना असते. नंतर आचार्य आशीर्वाद देतात. नंतर एकमेवाद्वितीय वगैरे मंत्र म्हणून विधि पुरा होतो. लगेच मुलाची जन्म-पत्रिका छापील फार्मावर लिहिण्यांत येते. त्यात वरती 'ब्रह्मकृपाहिकेवलं, एकमेवाद्वितीयं, सत्यमेवजयते', ह्या तीन वाक्यांचे मंगल असते. खालीं मुलाचे नांव ( हे मागून लिहितात ) जन्मवेळ व स्थळ दिलेलीं असून बाप, आजा, आजी, पणजा, पणजी व त्याचप्रमाणे आईकडीलही वंशावळ लिहिलेली असते. त्याखालीं साक्षीदारांच्या सह्या व पत्ते असतात. पत्रिका केल्याची तारीख असते. आपल्या पत्रिकेप्रमाणें पंचांगांतील कोणत्याही वस्तुस्थितीचें टांचण नसते. ह्या जातकर्माच्या विधीनंतर सागतेबद्दल समाजास कांही देणगी द्यावी लागते.

(१०) **नामकरण आणि अन्नप्राशनः**—हा विधि मूल एक वर्षाचे झाले म्हणजे करतात. सर्व पाहुणेमंडळी जमल्यावर त्या मुलाचे आईबाप त्यास

घेऊन येतात व प्रास्तविक भाषण करतात. पुढें एक पद्य झाल्यावर आचार्यांचें उद्‌बोधन होते व मुलास उद्देशून आराधना होते. नंतर नेहमींची प्रार्थना व पद्य म्हणून झाल्यावर मुलाची आई किंवा बाप प्रार्थना करितात. त्यांत देवाचे आभार मानून पुढे प्रार्थनेत, त्या नूतन मुलाचे संगोपन ही ईश्वराचीच सेवा होय, आणि त्या सेवेने आईबापांचा उद्धार होईल, व देवाशीं ऐक्य जोडेल, अशा भावनेची याचना असते. नंतर आचार्य त्या नवबालकास आपल्याजवळ घेऊन " मी ईश्वरसाक्ष श्रीयुत XX व श्रीमती XX ह्याच्या या मुलास श्रीमत् X X असे नांव ठेवतो " असे म्हणतात. आणि त्यास आशीर्वाद देऊन ईश्वराजवळ त्याचे अभिष्ट चिंतितात. नंतर प्रसंगोचित एक पद्य म्हणण्यात येते. शेवटीं त्यास माजघरांत नेऊन आचार्य किंवा एखादा जवळचा नातेवाईक त्या मुलाच्या तोंडात अन्न घालतो आणि ते अन्न ईश्वराने आपल्या आशीर्वादाने पावन करून त्याच्या शरीराच्या व आत्म्याच्या वाढीस ते उपकारक करावे, अशी ईश्वराची प्रार्थना करतात. त्यानंतर तेथे जमलेले दुसरेही नातेवाईक त्यास अन्नप्राशन करवितात. शेवटीं समाजास देणगी देऊन समारंभ पुरा होतो.

(११) **विद्यारंभः**—हा समारंभ पाचव्या वर्षी होतो. वरीलप्रमाणे सर्व मंडळी जमल्यावर मुलाला ( अगर मुलीला ) चांगले कपडे घालून तेथे आणतात. मुलाने आचार्यास व इतर सर्व मंडळीस नमस्कार केल्यावर आई किंवा बाप याचे प्रास्ताविक भाषण होऊन मुलास देण्याकरितां पाटी, पेन्सिल व पहिले पुस्तक असे आचार्याजवळ देतात. नंतर पद्य, उद्‌बोधन, आराधना, सामान्य प्रार्थना वगैरे झाल्यावर आचार्य मुलास उद्देशून भाषण करतात; त्याचा भावार्थ असाः-" बाळा, आजपर्यंत तुला तोंडीच शिकविले. आता आजपासून तुला लिहिण्यावाचण्यास शिकवावयाचे आहे. तुला वाचतां येऊं लागले, म्हणजे पुष्कळ मौजेच्या व उपयुक्त गोष्टी तुला समजतील. आणि तुला लिहिता येऊं लागले म्हणजे तुला आनंद वाटून पुष्कळ लोकांचे भले करतां येईल. तूं जर हुशारीने अभ्यास केलास, तर ईश्वर आणि येथील आप्त-इष्ट संतुष्ट होतील. मोठेपणी तूं एक विद्वान् व सन्माननीय पुरुष (किंवा स्त्री) होशील. यासाठीं शिक्षकास वडिलांप्रमाणे व सोबत्यास बंधू ( भगिनी ) प्रमाणे मानून अभ्यास करीत जा. अभ्यासास बसण्याच्या पूर्वी व नंतर

देवास वंदन करीत जा " नंतर आचार्य त्या मुलाला पाटी, पेन्सिल व पहिलें पुस्तक देतात आणि अक्षरओळख करून देण्याचा संस्कार होतो. नंतर पाटीवर मुलगा अक्षर गिरवतो व मग सर्वांस नमस्कार करतो. आईबापांची प्रार्थना होते. आचार्यांचे आशीर्वाद मिळतात. अखेर मुलाने पुन्हा वंदन केल्यावर समाजास देणगी देऊन सांगता झाल्यावर विधि पुरा होतो.

(१२) **दीक्षाविधि**:—सतरावे वर्षी कोणा तज्ज्ञांकडून प्राथमिक धार्मिक शिक्षण झाल्यावर अठरावे वर्षी तो प्राथमिक शिक्षक आपल्या शिष्यास दीक्षा देण्यासाठी आचार्यांजवळ आणतो. शिफारसीवजा त्यांचे प्रास्ताविक भाषण झाल्यावर ब्राह्मनिष्ठेबद्दल आचार्य उमेदवारास ठराविक प्रश्न विचारतात व त्यांस ठराविक उत्तरें मिळतात. त्याचे तात्पर्य असेः—

**आचार्य**:—ईश्वरसाक्ष दीक्षा घेण्याचा तुमचा निश्चय आहे काय ?

**उमेदवार**:—होय.

**आचार्य**:—तुम्हांस ब्राह्मधर्माची तत्त्वे ठाऊक असून त्यावर विश्वास आहे काय ?

**उमेदवार**:—होय.

**आचार्य**:—तुमचें उपास्य काय ?

**उमेदवार**:—सत्य, शुभ आणि सुंदर अशा एकेश्वराचा मी उपासक आहे. तो आत्मा आहे. त्याची शक्ति, ज्ञान, प्रेम, न्यायीपणा आणि पावित्र्य हीं अमर्याद आहेत. तो विभु, शाश्वत आणि आनंदरूप आहे. कोणत्याही प्रतिमेची किंवा सृष्ट पदार्थाची अथवा प्राण्याची, परमेश्वर, परमेश्वराचा अवतार किंवा मध्यस्थ म्हणून उपासना करावयाची नाहीं.

**आचार्य**:—तुम्ही त्याची उपासना कशी करणार ?

**उमेदवार**:—त्याची सत्य व आत्मरूपाने उपासना करावयाची. त्याची उपासना अपरोक्ष व मानसिक होते. सर्वभावेंकरून ईश्वरावर प्रेम करणे आणि ईशप्रेमाने त्याच्या इच्छेची स्फूर्ति मिळेल त्याप्रमाणे वागणे हीच खरी उपासना होय. परमेश्वराच्या उपासनेला पूजाद्रव्यें किंवा बली द्यावे लागत नाहीत.

**आचार्य**:—जीवात्म्याबद्दल तुमची कल्पना काय आहे ?

**उमेदवार**:—जीवात्मा अमर व अनंत उन्नतशील असून तो आपल्या कर्माबद्दल ईश्वरास जबाबदार आहे.

**आचार्य**:—शास्त्र आणि ईशप्रणीतधर्म याबद्दल तुम्हांस काय वाटते?

**उमेदवार**:—मनुष्याच्या अंतःकरणांतील ईश्वराचा शब्द ( Voice of God ) हेच खरे धर्मशास्त्र होय. कोणतेही पुस्तक किंवा कोणाचीही शिकवण प्रमादरहित किंवा तारणाचे अनन्यसाधारण असे साधन मानावयाचे नाही; तर सर्व धर्मशास्त्रांतून सत्याचा आदरपूर्वक स्वीकार करावयाचा आहे. शिवाय ह्या सृष्टीच्या विशाल ग्रंथाचा व त्याचप्रमाणे इतर शास्त्रीय, तात्त्विक वाङ्मयात्मक व ऐतिहासिक ग्रंथाचा आदरपूर्वक अभ्यास करून आपल्या पारमार्थिक कल्याणाकरितां त्या सर्वांपासून ज्ञान संपादन करावयाचे आहे.

**आचार्य**:—तुम्ही आपला पारमार्थिक गुरु कोणास मानता?

**उमेदवार**:—अंतःकरणात बोलणारा ( speak ) ईश्वर हाच माझा गुरु व अचुक मार्गदर्शक होय. मानवी प्रगतीसाठी ज्यानी कोणतेही रीतीने प्रयत्न केले आहेत, असे सर्व कालातील व सर्वदेशातील साधु व ऋषि हे माझे शिक्षक आहेत; परंतु अचुक मार्गदर्शक असे कोणासही मानावयाचे नाही.

**आचार्य**:—इतर मानवप्राण्याशी तुमचे काय नाते लागते?

**उमेदवार**:—ईश्वर हा पिता असून सर्व नरनारी बंधु-भगिनी आहेत.

**आचार्य**:—स्वर्ग आणि नरक याबद्दल तुमची काय कल्पना आहे?

**उमेदवार**:—स्वर्ग व नरक हे स्वतंत्र प्रांत असल्याचे मला कबूल नाही. स्वर्ग व नरक ह्या शब्दानी जीवात्म्याचा आध्यात्मिक दर्जा दर्शविला जातो. जेव्हां अंतर्यामाचे ठिकाणीं परमेश्वर व्यक्त होतो आणि दैवी आनंदाचा जीवाला प्रत्यय येतो, त्यालाच मी स्वर्ग म्हणतो. जेव्हा अंतःकरण दुष्ट वासनांनीं दूषित झालेल असते तेव्हा त्यासच मी नरक म्हणतो. ईश्वर सद्गुणांस बक्षीस देतो, आणि पापाबद्दल शासन करतो; परंतु त्याचे शासन उपायादाखल असते, कायमचे नसते. ( या बाबतीत समाजाचे एकमत दिसत नाही.)

**आचार्य**:—पापमोचनाबद्दल ( Atonement ) तुमची काय कल्पना आहे?

**उमेदवार**:—पश्चात्तापपूर्वक पापापासून परावृत्ति म्हणजे पापनिष्कृति होय. प्रायश्चित्त म्हणजे कांहीं बाह्यविधि नसून अंतःकरणवृत्तीचा पालट होय.

**आचार्यः**—तारण ( Salvation ) म्हणजे काय ?

**उमेदवारः**—कायिक, वाचिक व मानसिक पापापासून सुटका, व ज्ञान प्रेम आणि पावित्र्य या गुणांत ईश्वराशीं ऐक्य याचें नांव तारण. ज्ञान, प्रेम व पावित्र्य हे ईश्वरी गुण मनुष्य एकसारखे संपादित राहील, परंतु त्याचा आत्मा परमात्म्यांत कधींही लीन होणार नाही.

**आचार्यः**—ब्राह्मधर्माची दीक्षा घेण्याबद्दल ईश्वराचा आदेश तुला झाला आहे काय ?

**उमेदवारः**—होय. ब्राह्मदीक्षा घेण्याबद्दल माझ्या अंतराच्या अगदी आंत खोल ( inmost recesses of my heart ) देववाणी झालेली मी ऐकली आहे.

**आचार्यः**—तर मग ब्राह्मधर्माच्या तत्त्वावर श्रद्धा असल्याबद्दल प्रतिज्ञा कर.

**उमेदवारः**—माझा असा विश्वास आहे की, ईश्वर हा एकच सृष्टीचा कर्ता व भर्ता आहे. त्याचें सामर्थ्य, शहाणपणा, प्रेम आणि पावित्र्य ही अमर्याद आहेत. (२) जीवात्मा अमर व अनंत उन्नतशील आहे. (३) ईश्वर जीवास प्रत्यक्ष होतो. त्याचेमध्यें शास्त्रगुरु हे मध्यस्थ नाहीत. (४) ह्याप्रमाणे परमात्म्याच्या साक्षात् प्रचितीशी शास्त्रगुरु सुसंगत असतील तितकेच ते माननीय आहेत. (५) रोज ईश्वरोपासना करून पवित्राचरण ठेवण्याचा मी निश्चय करतो. (६) जात आणि मूर्तिपूजा याचा मी धिक्कार करतो, व कौटुंबिक सर्व विधि ब्राह्मसमाजधर्माप्रमाणे करण्याचा मी निश्चय करतो. ह्या शपथेप्रमाणे वागण्यास ईश्वराने मला साहाय्य करावें.

ही शपथ झाल्यावर उमेदवाराची लहानशी प्रार्थना होते. नंतर आचार्यांचा दीक्षेबद्दल उपदेश होतो. त्यात ब्राह्मधर्माचा थोडक्यात इतिहास असून ब्राह्मसमाजाकरितां कायावाचामनाने झटण्याबद्दल आज्ञा असते. सदर ठराविक भाषणांत खालील उद्गारही आढळतात.

" ईश्वरवाद हे भारतवर्षांत एक नवीन मत निघालेले नाहीं. प्राचीन आणि मध्ययुगीन भारतातील ऋषि व साधु या एकेश्वरी तत्त्वाचें परम उदात्त स्वरूप जाणत होते. परंतु देशांतील लौकिक विधिविधाने व प्रतिमापूजा यांपासून त्यांना ते तत्त्व अलिप्त ठेवतां आले नाहीं."

" वर्णव्यवस्था आणि प्रतिमापूजा या बाबतींत यत्किंचितही जुळते घेण्याचा

मोह तुम्हांला कधींही होऊं देऊं नका. त्यायोगाने धर्ममांद्य, इतकेंच काय पण व्यवहारतः आपल्या धर्माचा नाश केल्यासारखे होईल. त्याचप्रमाणें सामाजिक सुधारणा ह्या ब्राह्मसमाजाच्या कार्यक्रमातीलच एक भाग असला तरी सामाजिक सुधारणाबद्दल स्तुत्य अशा उत्साहभरात हें विसरूं नका की, सुधारणा हें ब्राह्मधर्माचे केवळ बाह्यांग आहे. परमात्म्याशीं सप्रचीत समागम हेंच ब्राह्मधर्माचे रहस्य आणि जीवन आहे."

"तुमच्या आयुष्यातील हरएक बाबीत तुम्ही ईश्वराचा सल्ला घेत जा."

(१३) **विवाह**:— इ. सन १८७२च्या ३ ऱ्या अॅक्टाप्रमाणे लग्नाच्या दिवसापूर्वी १४ दिवस अगोदर वधूवरापैकी एकाने आपल्या सहीनें जाहीर खबर द्यावी लागते. याप्रमाणे नोटीस करण्याच्या आदल्या दिवशी वाग्दानाचा विधि होतो. त्यात आदिअंती एक स्तोत्र म्हणावयाचे असून मध्यतरी लहानशी प्रार्थना करावयाची असते. लग्नदिवशी सकाळी वधूवराचे घरीं त्यांची मनें लग्नविधीसाठी तयार व्हावीं म्हणून कौटुंबिक उपासना होतात. त्या वेळी पूर्वजांचे स्मरण करून त्याचे आशीर्वाद मागण्यात येतात. लग्नविधीच्या पूर्वी सरकारी रजिस्ट्रार, तीन साक्षीदार, वधूवराचे (वयात आलेले नसल्यास) पालक, आणि वधूवर याचे समक्ष कायद्याप्रमाणे लग्नाची नोद केली जाते; नतर आचार्याच्या वेदीसमोर वधूवरें एकमेकासन्मुख बसतात. जवळच रजिस्ट्रार व साक्षीदार असतात. प्राथमिक स्तोत्र म्हणून झाल्यानंतर मुलीचा पालक उभा राहून जमलेल्या मंडळीस सागतो कीं, श्रीमन् × × × ह्यानी माझी कन्या श्रीमती × × × याच्याशी लग्न करण्याची इच्छा दर्शविली, त्यास मुलीची समति आहे, असे जाणून मी तिला आपल्यापुढे आणली आहे. आपण लग्नविधीस मदत करून 'स्वस्ति' असे म्हणावे हीच सविनय प्रार्थना आहे. त्यावर सर्व मडळी "स्वस्ति" असे म्हणतात. याचप्रमाणे वराचा बाप अगर पालक उभा राहून त्याचेही भाषण होते. नंतर आचार्य वरास विचारतात की, वधूस कायदेशीर बायको करून एकनिष्ठ पतीच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये पत्करण्याचा तुम्हीं निश्चय केला आहे काय? वधूसही याप्रमाणेच विचारतात. दोघांनीही होय म्हटल्याबर पुन्हा दुसरे स्तोत्र म्हणून उद्बोधन व प्रसंगोचित आराधना होते. नंतर आचार्य वधूवरांचे सव्य कर एकत्र करून त्यावर फुलाची माळ गुंडाळतात.

मग तशाच स्थितीत तिथिवाराचा प्रथम उल्लेख करून, वधूस उद्देशून वर प्रतिज्ञा करतो कीं, " ईश्वर व सांप्रदायिक बंधु यांच्यासमक्ष मी आपखुषीनें व निःशंक मनानें, तुझी लग्नास संमति आहे असें जाणून तुला कायदेशीर पत्नी करून घेत आहे. मी जीवमान आहे तोपर्यंत कोणत्याही स्थितीत तुझ्या कल्याणाची चिंता वाहीन. गुण, संपत्ति आणि सुख यांत तुला वांटेकरी करण्याचा प्रयत्न करीन. माझें मन तुझें स्वाधीन व तुझें माझें स्वाधीन होवो ! आणि आपलीं उभयतांचीं संयुक्त अंतःकरणें ईश्वराशीं ऐक्य पावोत ! तूं माझी सखी व्हावेस व मी तुझा सखा ( Friend ) असावें आणि आपलें हें सख्य नित्य अभंग रहावें."

याचप्रमाणें वधूही म्हणते. नंतर उभयतां, " हे प्रभो, हा लग्नकरार राखण्यास आम्हांस मदत कर " अशी प्रार्थना करतात व एकमेकांचे हार व आंगठ्या यांची अदलाबदल करतात. मग आचार्यांचा धर्मोपदेश होतो त्यांत खालील उद्गार आढळतातः—

" लग्न ही एका दिवशीं एका तासांत घडलेली गोष्ट नव्हे. आजन्म प्रयत्नानें गांठण्याचें तें एक परमसख्यात्मक ध्येय आहे. वैवाहिक जीवनांत त्याचा प्रत्यय प्रथम पुरेसा येत नाहीं. इतकेंच काय, पण त्या ध्येयाचा पूर्ण प्रत्यय येण्यास सारी हयातही पुरत नाहीं. अर्थात् तें ध्येय मरणोत्तर साधतें. असें असलें तरी या आयुष्यांतील सख्याचा प्रत्यय अगदींच ध्येयरूप नसतो असें नव्हे. हें ध्येय ब्राह्मांस उत्तरोत्तर अधिक जवळ येत चाललें आहे. ही गोष्ट पूर्वपद्धतीच्या लग्नांशीं ब्राह्म-लग्नांची तुलना केल्यास दिसून येईल. इतकेंच काय, पण पन्नास वर्षांपूर्वी ब्राह्म दंपतींस जें ध्येय दूर होतें, तें आतां तितकें राहिलें नाहीं. हें ध्येय साध्य होण्यास अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे पतिपत्नींचा परस्परांसंबंधीं सारखाच आदर हें होय. कोणत्याही गुणांत उभयतांत कमजास्तपणा असला, तरी तो साफ विसरून उभयतांचे गुण समाईकच आहेत, असें मानून आपसांत पूर्ण साम्यभाव ठेवणें, हेंच लग्नाचें अत्युच्च ध्येय गांठण्याचें खरें साधन आहे. श्रेष्ठ-कनिष्ठ स्वामि-सेवक असा कोणत्याही प्रकारचा वैषम्यभाव राहतां कामा नये. सुख-दुःख भोगणें हीच वैवाहिकांची इतिकर्तव्यता नसून, पूर्ण आत्मोन्नति करणें हाच विवाहहेतु आहे. यासाठीं कुटुंबावर कोणतीही आपत्ति आली तरी

विवाहाचा हेतु निष्फळ झाला, असे मानण्याचे कारण नाहीं. ब्राह्म-वैवाहिकांचे घर म्हणजे ईश्वराचे एक पीठ (Altar) आणि ब्राह्मसमाजाची एक संस्था होय. यापुढे तुम्ही स्नेही आणि पाहुणे यांचे आदराने आतिथ्य करणे, दीन दुबळ्यांस मदत करणे, ब्राह्मसमाजाची, देशाची आणि प्रत्येक चांगल्या कार्याची एकमताने आणि एकहाताने सेवा करणे, इत्यादि गोष्टी करण्यास आनंदाने सदा तत्पर असले पाहिजे."

अशा रीतीने उपदेश झाल्यावर आचार्य ईश्वराची प्रार्थना करतात की, " ह्या वधूवर मुलास विवाहाने अंतिम ध्येय ईश्वरच प्रगट करो, हा विवाह वधूवरांस, ब्राह्मसमाजास, देशास इतकेच काय पण साऱ्या जगास कल्याणप्रद होवो, आणि ईश्वराने बांधलेले हे नवीन घर एक ईश्वराचे पीठ आणि सर्व सत्कार्यांस आसरा असे नांदो." अखेर स्तोत्रपाठ होतो, वधूवरे सर्व मंडळीस नमस्कार करून त्यांचे आशीर्वाद घेतात, मग कायदेशीर रजिस्ट्रेशनचा उत्तरभाग पुरा होऊन समाजास देणगी देऊन विवाहविधि पुरा होतो.

(१४) **वधूवरणः**—वधू ज्या दिवशी प्रथम सासरीं येते, त्या दिवशी लतापुष्पांनी ते घर शृंगारतात. तिचा गृहप्रवेश होतांच घरांतल्या सर्व माणसांची व तिची ओळख करविण्यांत येते. वडील माणसांस ती नमस्कार करून आशीर्वाद घेते. लहान मुले तिला नमस्कार करून तिचा आशीर्वाद घेतात किंवा विदेशी पद्धतीचे हस्तांदोलनादि सत्कारविधि होतात. नंतर नेहमींप्रमाणे थोडक्यात उपासना होऊन आचार्यांचा ठरीव धर्मोपदेश होतो. त्यांतील भावार्थाची वाचकांस कल्पना होईलच. विशेष नमूद करण्यासारखा एकच मुद्दा त्यात असतो. आचार्य म्हणतातः—" ह्या देशात एकत्र कुटुंबाच्या पद्धतीमुळे घरधनिणीचे काम इतर देशांपेक्षां फार जिकिरीचे व त्रासाचे असते. या पद्धतींत जसे फायदे आहेत तसे दोषही आहेत. परंतु हल्लींच्या कालमानास ही पद्धत जुळती नसल्यामुळे ती हळुहळू नाहीशी होत आहे; तथापि ती पद्धत आहे तोंपावेतो नवविवाहित मुलीस कुटुंबात वडील माणसे असल्यापासून पुष्कळ उपयोग होतो, आणि प्रौढ गृहचारिणीसही दहा माणसांचे कुटुंब प्रेमाने व आनंदाने चालवावयाचे हे एक भूषणच असते. ह्या वधूप्रवेशाचे वेळींही समाजास दक्षणा द्यावी लागतेच.

(१५) **अंत्येष्टिः**—प्रेतावर स्वच्छ वस्त्र, फुले, गुलाबपाणी वगैरे घालून तयारी

झाल्यावर आचार्य किंवा एकादा नातेवाईक लहानशी प्रार्थना करतो. त्यांत पुढील उद्गार असतातः—“ हे अमर आत्मनिवासा, तुझ्या अतर्क्य योजनेने तूं आमच्या प्रिय माणसास नेलेंस, त्याचे जड शरीर थंड पार्थिवरूप होऊन येथे राहिलें, परंतु त्याचा अमर आत्मा नेहमीप्रमाणेंच आतां तुजमध्यें आहे. ह्या लोकीं असतांना जसा तो जीव तुझ्या प्रेमबाहूंनीं बद्ध होता, तसाच तो आता परलोकींही आहे. वरच्या वरच्या लोकांत तूं त्याला ने. तुझा समागम उत्तरोत्तर दृढतर होऊं दे. तसेंच दुःखाकुल झालेल्या मंडळीस तुझा प्रेमळ चेहरा दिसूं दे, तुझ्या प्रेमळ करांचा त्यांना स्पर्श होऊं दे, आणि तुजमध्येंच त्यांस शांति व समाधान यांचा लाभ मिळूं दे, इ०.” नंतर ते मृत शरीर दहन करण्याकरितां किंवा पुरण्याकरिता नेतात. जातांना “ ब्रह्मकृपाहि केवल, जय जय सच्चिदानंद हरि ” असा घोष करीत आणि शक्य तर वाद्यांच्या साथींत भजन करीत जातात. मृत शरीर पुरल्यावर किंवा जाळल्यावर गेलेल्या आत्म्याचा स्वर्गाकडील प्रवास सुखावह होवो आणि त्याची पुण्यस्मृति येथे आमच्यांत राहून आमच्याबरोबर ती परलोकीं येवो, अशी प्रार्थना करतात. मृत शरीर जाळले, तरी त्याची रक्षा एकाद्या पात्रांत घालून ती योग्य ठिकाणीं पुरतात आणि त्यावर एकादें स्मारक उभारतात. मृताशौच दुःखा-वेगाप्रमाणे किंवा कुलरीतीप्रमाणे एक आठवड्यापासून महिन्यापर्यंत पाळ-तात व श्राद्ध होईपर्यंत मृतास उद्देशून रोज सकाळीं कौटुंबिक प्रार्थना होते.

(१६) **श्राद्धः**—श्राद्धास आरंभ सुप्रभात संकीर्तनापासून होतो. नंतर आचार्यांची रीतसर उपासना होते. नंतर धर्मशास्त्रातील एकाद्या भागावर आचार्यांचें किंवा दुसऱ्या एकाद्या विद्वानाचे प्रवचन होते. कठोपनिषद्, भगवद्गीता, महाभारतांतील शांतिपर्व यातील एकादा भाग बहुधा घेतात, किंवा महर्षि देवेंद्रनाथ यांच्या अनुष्ठानपद्धतींतील खालील वचनें घेतात.

मातरं पितरञ्चैव साक्षात् प्रत्यक्षदेवताम् ।
मत्वा गृही निषेवेत सदा सर्वप्रयत्नतः ॥

**भावार्थः**—आईबापांस प्रत्यक्ष देवता मानून त्यांची आस्थापूर्वक सेवा करावी.

श्रावयेन्मृदुलां वाणीं सर्वदा प्रियमाचरेत् ।
पित्रोराज्ञानुसारी स्यात् सत्पुत्रः कुलपावनः ॥

**भावार्थ**:—कुलपावन अशा सत्पुत्राने आईबापांशीं गोड बोलावें, त्यांची आज्ञा पाळावी व त्यांचे प्रिय करावें.

गुरूणाञ्चैव सर्वेषां माता परमको गुरुः ।
माता गुरुतरा भूमेः खात् पितोच्चतरस्तथा ॥

**भावार्थ**:—सर्व गुरुजनांत माता परम श्रेष्ठ आहे. पृथ्वीपेक्षा तिचे महत्त्व अधिक आहे आणि पित्याची योग्यता आकाशाहूनही मोठी आहे.

धर्मं शनैसंचिनुयात् वल्मीकमिव पुत्तिकाः ।
परलोकसहायार्थं सर्वभूतान्यपीडयन् ॥

**भावार्थ**:—मुंग्या ज्याप्रमाणे वारूळ रचतात त्याप्रमाणे दुसऱ्यास पीडा न देतां परलोकीं सहाय मिळावें म्हणून प्राण्याने पुण्यसंचय करावा.

एकः प्रजायते जन्तुरेकएकप्रलीयते ॥
एकोऽनुभुंक्ते सुकृतमेकएव तु दुष्कृतम् ॥

**भावार्थ**:—जीव एकटाच जन्मास येतो व एकटाच जातो. तसेच तो पापपुण्याचे फलही एकटाच भोगतो.

ह्याप्रमाणे धर्मप्रवचन झाल्यावर मृताचा कोणी सगासोबती त्याचे चरित्र सांगतो व प्रार्थना करतो. त्यानतर आचार्य नवसंहितेतील प्रार्थना करतात. त्यांत शेवटीं असे मागतात की, "तुझ्या अमर्याद कृपेने ह्या भूलोकीचाच स्वर्ग होवो; आणि तुझ्या सत व चिरजीव यांच्या परिवारात अमर लोकात तुजमध्ये राहण्याची रुचि आम्हांला येथेच प्राप्त होवो."

अखेर श्राद्धानिमित्त दाने व देणग्या कोणाला दिल्या, ते आचार्य सांगतात आणि स्तोत्रपाठ व संकीर्तन होऊन समाजास देणगी देऊन श्राद्ध-विधि पुरा होतो.

# प्रकरण अठरावें

# सदाचार ( पुढें चालू )

## ब्राह्मांचे कांहीं महत्त्वाचे विधि

(१७) **धर्मप्रचारकाची दीक्षाः**—धर्मप्रचारक उमेदवाराचे शिक्षण पुरे झाल्यावर समाजाचे चिटणीस त्यास समाजात आणून प्राथमिक स्तोत्र वगैरे झाल्यावर त्याची ओळख होण्याकरिता प्रास्ताविक भाषण करतात. नतर खालील ठरीव संवाद होतो.

**आचार्यः**—सन्माननीय बंधू. धर्मप्रचारकाचे जीवन पसत करण्यास तुम्हास कोणीं प्रेरणा केली ?

**उमेदवारः**—अतर्यामिन् जो परमात्मा त्यानेच मला तशी प्रेरणा केली. अशाच रीतीनें मी त्याची सेवा करावी अशी ईश्वराची इच्छा दिसते.

**आचार्यः**—तर मग परमेश्वरानेच तुम्हास अधिकृत केले आहे. मी उगाच निमित्तमात्र आहे. ह्या गभीर विधीस त्याच्या कृपेचें बल असावें म्हणून हे बंधुभगिनींनो, आपण सर्व मिळून प्रभूच्या पायाशी जाऊं या. (Let as all approach the Lord's feet) नतर स्तोत्रपाठ, उपासना, पुन्हा तिसरे स्तोत्र होऊन खालील ठरीव प्रश्नोत्तरे होतात.

**आचार्यः**—सन्मान्यबंधु, धर्मप्रचारक होऊन आपण लोकास काय शिकवणार तें सांगा बरे.

**उमेदवारः**—मी हे शिकवीन कीः—(१) ध्यान, आराधना व प्रार्थना अशी अनंताची मानसपूजा करावी. (२) मनुष्यांच्या शारीरिक, बौद्धिक, नैतिक, आणि आध्यात्मिक कल्याणासाठी झटून तद्द्वारा ईश्वराची सेवा करावी. (३) सर्व कुटुंबांतून व समाजांतून ईश्वराची मानसिक पूजा करावी आणि प्रेम शांति आणि पावित्र्य यांचे साम्राज्य भोगावे. (४) सर्व धर्मोपदेशकांबद्दल व शास्त्रांबद्दल योग्य तो मान द्यावा आणि भिन्न धर्मानुयायी लोकांच्या दरम्यान आदर राखावा. (५) खरी ईश्वरपरायणता म्हणजे मनुष्याचे शरीर, मन, अंतःकरण आणि आत्मा यांच्या ईश्वरदत्त शक्तीची सुसंगत वाढ होय.

**आचार्यः**—सामाजिक आणि आध्यात्मिक अशा कोणत्या चुका व दोष नाहीसे करण्याकरिता तुम्ही विशेष झगडणार आहांत ?

**उमेदवारः**—(१) प्रतिमापूजा, (२) अवतारवाद, (३) सर्वदेवमयत्व-भाव, म्हणजे सृष्टिकर्ता व सृष्टि, अनंत व सांत हे अभिन्न मानणे, (४) मध्यस्थ-गिरी म्हणजे जीवात्म्यास परमात्मा स्वतःच (साहाय्यनिरपेक्ष) अपरोक्ष होतो असे न मानता, विवक्षित व्यक्ति अगर धर्मशास्त्र हे तरणोपाय आहेत, असे मानणे, (५) जाति किंवा वर्णभेद, (६) उपाध्येगिरी—म्हणजे अधिकृत पुरोहिताकडून होणाऱ्या शास्त्रीय कर्मास (गुणनिरपेक्ष) महत्त्व व पावित्र्य मानणे, (७) स्त्रीपराधीनता, म्हणजे ईश्वरदत्त शक्तीची वाढ करून स्त्रीजातीची सेवा करण्याच्या स्त्रियाच्या हक्कास यत्किंचितही प्रत्यवाय आला असतां ह्या गोष्टीचा प्रतिकार करण्याकरिता शिकस्त प्रयत्न करणे.

**आचार्यः**—बरं. तुमच्या स्वीकृत धर्मपंथाबद्दल तुमचे विचार काय आहेत?

**उमेदवारः**—माझा असा विश्वास आहे की, ब्राह्मसमाज—आणि त्यात-ही ज्या समाजाचा मी अनुयायी आहे, तो समाज—ही एक दैवी संस्था आहे. धर्मामधील परम सत्यधर्माचा व तारणाच्या सर्वोत्कृष्ट मार्गाचा, आचार व प्रचार व्हावा यासाठी ईश्वरानेच हा पंथ नेमला आहे, इ०.

ह्यानंतर आचार्यांचा धर्मोपदेशकास उपदेश होतो. त्यात खालील विचार असतातः—

"तुम्हांला हे माहीत असूं द्या की, ब्राह्मसमाजाचे कार्य विधायक आणि विघातक अशा दोन्ही स्वरूपाचे आहे. तुम्ही कितीही थोडे विधायक काम केलेत तरी तुमचे श्रम फुकट गेले असे होणार नाही. परंतु उत्साही तरुण सुधारकास विघातक कार्यात बहुधा मोठा आनंद वाटतो, तरी केवळ विध्वंसन हे धर्मप्रचारकाचे काम नव्हे तथापि नवे रचताना वर्षानुवर्षे लोकांच्या प्रेमादरास पात्र झालेल्या जुन्या गोष्टी मोडणेही भाग पडते. ह्या-योगाने पुष्कळ छळ व अपकीर्ति सोसावी लागते. परंतु सत्यप्रतिष्ठेकरितां हा सर्व स्वार्थत्याग जरूरच असतो. ह्या देशांतील धर्मांच्या इतिहासाकडे पाहिले की, असे दिसतें की, स्वार्थमूलक धार्मिक आचार व सामाजिक रीति यातील दोषांची भलतीच गय केल्यामुळे सत्यधर्मास फार धोका आला आहे."

" एकेश्वरी धर्म हा ह्या मानवी जगांतील प्रथमोपासकाइतका प्राचीन आहे व तो आपल्या आजच्या विचारांइतका नवीन आहे, तो प्रागतिक आहे, हें विसरतां कामा नये. तुम्हांस अत्यंत आदरणीय पुरुषांचीं ब्राह्ममतें म्हणजे कांहीं ब्राह्मधर्माचें अखेरचें सत्य स्वरूप नव्हे. धर्माचें जें स्वरूप आज उपलब्ध आहे, तेंच ध्येयरूप मानून ईश्वराच्या यापुढें होणाऱ्या प्रेरणांकडे डोळेझांक करणें आणि समाजांत आणि देशांत यापुढेंही जरूर असलेल्या सुधारणाबद्दल आळसानें उदासीन राहणें हें ब्राह्मप्रचारकास लज्जास्पद आहे !"

" तसेंच तुम्हीं हें लक्षांत ठेवावें कीं, ब्रह्म आणि माया असा एक निराधार भेद मानून जो निवृत्तिवाद वेदान्तानें रूढ केला, त्यास आपण तोंड दिलें पाहिजे. आत्मा आणि शरीर हीं दोन्ही देवानेंच दिलेलीं आहेत. यासाठीं देह आणि आत्मा दोघांच्याही गरजा आपण पुरविल्याच पाहिजेत. आतां ही गोष्ट पण आपण विसरता कामा नये कीं, शारीरिक, बौद्धिक, नैतिक आणि आध्यात्मिक अशा हिताहिताच्या पायऱ्या आहेत आणि वरच्या पायरीच्या हिताकरितां खालच्या पायरीचें हित सोडण्यास तयार असलें पाहिजे. धर्माकरितां जो त्याग होईल त्या त्यागाच्या प्रमाणांतच धर्माचें महत्त्व वाढेल. यासाठीं धर्मप्रचारकांनीं लोकेषणा, वित्तेषणा, ह्या सोडल्या पाहिजेत व गरिबीच पत्करली पाहिजे.

अशा रीतीनें उपदेश झाल्यानतर आचार्यास आणि दुसऱ्या वयोवृद्धास प्रचारकांनीं वंदन केल्यावर दीक्षाविधि पुरा होतो.

ह्याशिवाय (१८) ब्राह्मसमाजाच्या वार्षिक उत्सवाचे वेळीं समाजाच्या उत्कर्षाकरितां कौटुंबिक प्रार्थना, (१९) नवीन ब्राह्ममंदिराचा अनावरण समारंभ, (२०) नूतनगृहप्रवेश आणि (२१) रोगमुक्तीनंतर देवाचे आभारप्रदर्शन, अशीं हीं कांहीं नैमित्तिक अनुष्ठानें ब्राह्मांनीं ठरविलीं आहेत. त्यांची माहिती विस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं.

ह्या अनुष्ठानपद्धतींत हिंदूंचे सारे सण महोत्सव, पुण्यतिथ्या, जयंत्या, पर्वण्या, ह्या सर्व गोष्टी ब्राह्मांनीं बुद्धिपुरःसर गाळल्या आहेत. तथापि नाताळ, गुड फ्रायडे, मुक्तिफौजेचे जनरल बूथ यांचा स्मृतिदिन, तसेंच ब्राह्मांपैकीं थोरांपासून सानांपर्यंत कित्येकांचे स्मृतिदिन पाळण्यांत येतात. त्याचप्रमाणें माघोत्सवासारखे कांहीं सामाजिक समारंभही दरसाल

करण्यांत येतात. तसेंच हिंदूंत रूढ असलेल्या प्रमुख संस्कारांपैकीं गर्भाधान हा संस्कारही गाळला आहे. वास्तविक बालपणीं वाग्निश्चय किंवा साखरपुडा करून माणसांची नजर कामुक होण्याच्या पूर्वीच तिला नियंत्रण घालणे, व प्रौढपणीं विवाह आणि गर्भाधान या धार्मिक संस्कारासच संमतिवयाच्या कायद्याप्रमाणें मानणे ह्या लग्नाच्या तडजोडीस ईश्वरचंद्र, केशवचंद्र व प्रतापचंद्र इतकें त्रिविध चंद्रबळ मिळेल असे वाटते. पण साधारण ब्राह्मांस हे पटत नाहीं असे दिसते. गर्भाधान संस्कार हा तर त्यांस असभ्य वाटला असावा हे उघडच दिसते. शिवाय त्याच्या अतिप्रौढविवाहपद्धतीत हा संस्कार अयुक्तिकच ठरण्याचा संभव अधिक. असो. एकंदरींत संस्कारांपेक्षां समारंभ आणि नित्यकर्मांपेक्षा उदार (!) मते यांच्यावरच त्यांची जास्त मदार दिसते.

---

# प्रकरण एकोणिसावें

# सदाचार ( पुढें चालू )

## अनुष्ठानविचार

वास्तविक आचारधर्माचे नीति व संस्कार हे दोन पंख आहेत. ह्या दोन्ही पंखांवांचून आचारधर्माची गति नाहीं. प्रत्येक पंखास आपआपल्यापरी महत्त्व आहे. नीतीवांचून आचारधर्म तो काय ? उलट ज्यास कायदा म्हणतात त्यांत संस्कारधर्मासच सारे महत्त्व असते. कायदा नीतीचा विचार करीत नाहीं. संस्कारहीन अन्न खाल्ल्यास जातीकडून बहिष्कार होतो; पण चोरी केल्यास होत नाही. जरठ-बालाविवाह सप्तपदीने कायदेशीर ठरतो; पण असंस्कृत प्रीतिविवाह स्वेच्छेने एकत्र विलास करूनही कायदेशीर ठरत नाही. या वैषम्यातील रहस्य हेच आहे. त्यासाठीच ब्राह्मानीं आपला लग्नाचा कायदा मुद्दाम करवून घेतला. त्या योगाने भिन्न जातींतील व धर्मांतील विवाह नुसत्या नोंदण्याने कायदेशीर झाले. घटस्फोटाची सवड ब्राह्म दांपत्यास मिळाली. नुसत्या ब्राह्मसमाजी विवाहाने एकत्र कुटुंबातील नवरा विभक्त केला. त्याच्या बापाने दुसरा मुलगा दत्तक घेणे कायदेशीर केले. असे जे फरक केले ते येथे ग्रंथविस्तारास्तव देतां येत नाहींत. शिवाय सदरहु कायदा दुरुस्त करून घेण्याबद्दल साधारण-ब्राह्माचा आटोकाट प्रयत्न हल्ली सुरू आहे. यास्तव अशा अनिश्चित स्थितीत त्याचे आजचे स्वरूप सागणे किंवा त्याजवर टीका करणे व्यर्थ आहे.

साधारण-ब्राह्मसमाजाचे सुप्रसिद्ध विद्वान प्रचारक हेमचंद्र सरकार यांनीं तयार केलेल्या प्रार्थनेच्या पुस्तकांत दिलेल्या प्रार्थना आणि संस्कारविधि यांत थोडाफार फरक आहे. परंतु पंडित सीतानाथ यांचे पुस्तक अलीकडे मुद्दाम सर्व सांप्रदायिकांकरितां केले असल्यामुळे आम्हीं त्याच पुस्तकाचा येथें उपयोग केला आहे. हेमचंद्र सरकार यांच्या प्रार्थनांत काव्य जास्त आहे. त्याचप्रमाणें ख्रिस्ती धर्मपुस्तकांतील व संस्कृत वाङ्मयांतील उतारेही जास्त आहेत. एकंदरींत दोन्ही पुस्तकांचा विचार करतां या प्रार्थनांत बराच

कृत्रिमपणा, अतिशयोक्ति व प्रपंचाचा मोह दिसतो. नवीन जन्मलेल्या मुलास परमेश्वराच्या अतर्क्य महिम्याचे दिव्य पीठ व साधक बापाच्या तारणाचे साधन असे म्हणणे, तरुण युवयुवतींच्या प्रेमैक्यास तीर्थप्रमाणे पावित्र्य देणे, आई-बापांना सोडावे पण बायकोला जोडावे हा स्त्रीदाक्षिण्याचा कळस करणे, घरास स्वर्ग म्हणणे, खाणींत काम करणाऱ्या मजुरास देवदास ठरविणें, प्रपच हीच तपश्चर्या असे सांगणे; तसेच ईश्वर सदा प्रत्यक्ष आहे म्हणणे व पुन्हा अदृश्य आहे म्हणून शोक करणे, प्रत्येक पाऊल त्याच्या सागण्याप्रमाणे पडत आहे असा आत्मानुभव सांगणे व ईश्वराचा आदेश आणि त्याची इच्छा काय आहे ते आम्हांला कळत नाहीं, म्हणून रडणे, हे सारे भ्रांत जीवांचे मोहवश प्रकार, भाविकाचे अनियंत्रित कल्पनातरग किंवा जाणत्या कडून न कळत होत असलेले ढोंग, यापैकी कांहीं तरी किंवा या सर्वांचे मिश्रण असावे, असे वाटते.

वस्तुतः कोणत्याही धर्मातील संस्कार हे मूळ त्या धर्मातील फारच थोड्या महात्म्यानीं अनुभविलेले गूढ रहस्य असते. कित्येकास सस्काराची उपपत्ति सागता येईल, कित्येकास ती सागतां येणार नाही; पण तो विषय सामान्य बुद्धिवादाच्या पलीकडील असतो. जीवाचे पंचकोश व त्याची सूक्ष्म आदोलने आणि बाह्य विश्वप्रकृतीचे निरनिराळे लोक, त्या लोकाच्या द्रव्याची निर-निराळीं आदोलने व त्याचे परस्परावर होणारे अनुकूल प्रतिकूल परिणाम, इत्यादि अत्यंत गहन विचार सस्कार ठरविणारांनीं केलेले असतात. पण हिंदूंचे सस्कार ठरविणारे ऋषि आणि शास्त्री हे लबाड, ढोंगी, आपमतलबी होते; त्यांनीं आपले स्वताचे प्रस्थ माजवून इतरास कायमचे आपल्या कह्यांत ठेवण्याकरितां आणि आपल्या चरितार्थाची सोय लावून घेण्याकरितां सारे यज्ञयाग, अनुष्ठाने, विधिविधाने, व्रतवैकल्ये यांचे पोकळ अवडबर रचलें आहे, अशी ब्राह्मांनी आपली समजूत, खोल विचार व शोध न करताच, करून घेतली आहे; हे पाश्चात्य संशोधकांच्या व येथील थिऑसफिस्टांच्या प्रयोगांवरून त्यांस लवकरच कळून येईल अशी आशा आहे. उदाहरणार्थ, मंत्रोच्चाराचे महत्त्व किती मोठें आहे हें आता विलायती सोनार कान टोच-तील तेव्हांच ब्राह्मांस समजणार व ते आविंधांचे झाले तर हिंदु होणार !

पंडित सीतानाथ म्हणतात कीं, मला जुन्या अनुष्ठानपद्धतीत आजच्या

नवयुगांत साजेसें कांहींच आढळले नाहीं. पांच हजार वर्षांच्या पूर्वींचेंच अन्नपाणी आजही आमचें शरीर धारण करते. मग आमचा आत्मोद्धार करण्यास समर्थ असलेले त्या वेळचे गूढसंस्कार आज निकामी कसे झाले ह्याचा ब्राह्मांनीं काडीचाही विचार केलेला दिसत नाहीं. किंबहुना तो त्यांचा विषयच नव्हे. बुद्धिवादाच्या कूपांतल्या मंडुकांस बाहेर अपरंपार पसरलेल्या अदृश्य सृष्टींतील नियम कसे कळावे ? नारळांतील खोबरे जसे पोपटाच्या चोंचीच्या आटोक्याबाहेरचे असते त्याचप्रमाणे आचारधर्मावर प्रहार करणारे शाब्दपंडित धर्मरहस्य जाणूं शकत नाहीत. बीजाचे रक्षण व्हावे म्हणून ते ईश्वरानें टणक फोलकटात जसे लपविलेलं असते, त्याचप्रमाणे धर्मबीज हे बाह्यतः तुच्छ दिसणाऱ्या आचार, विधी व रूढि यांनी आच्छादिलेले असते. ते केवळ बुद्धीच्या व पांडित्याच्या जोरावर कळत नाहीं. निष्ठापूर्वक आचरणाने त्याचा अनुभवच घेतला पाहिजे.

नामाचा महिमा । तुज न कळे पुरुषोत्तमा ॥

ही साधी पण अर्थगंभीर संतोक्ति अहंमन्य विद्वानांनी अवश्य लक्षांत ठेवावी असे वाटते. असो.

पंडित म्हणतात कीं, माझ्या संस्कारकौस्तुभाचा स्त्री-स्वातत्र्यांचा पैलू चांगलाच दर्शनीय झाला आहे. पण ऋग्वेदातील " गृहान् गच्छगृह पत्नी यथा सो वशिनी त्वं विदथमा वदासित "—ऋग्वेद १०।८५।२६।२७. ( गृहपत्नी म्हणून घरी जा, आणि स्वामिनी म्हणून घरच्या मंडळींशीं बोल ) इत्यादि सूक्ते किंवा ब्राह्मांनींच वेंचलेली वर दिलेलीं आणि इतर अनेक मनुस्मृतींतील रत्नें, स्त्रियांचे महत्त्व काय कमी दर्शवितात ? आईचे महत्त्व हिंदुधर्माने जाणले तसे कोणत्या धर्मानें जाणले आहे ? सामान्य ( Ladies and Gentlemen ) हा लौकिक व्यवहार राहो; पण ईश्वराच्या नामस्मरणांतही देवाच्या अगोदर देवीचे स्मरण, पित्याच्या अगोदर मातेचे स्मरण ही पूर्वापार पद्धति ज्यांच्या हाडींमासीं खिळली आहे, गार्गी वाचक्नवी, सीता, सावित्री, अशा स्त्रीचारित्र्यांच्या दिव्य ध्येयांनीं ज्यांची संस्कृति शुद्ध झाली आहे, त्या हिंदूंस अलीकडील अर्धख्रिस्ती ब्राह्मांनीं " आमचे वैवाहिक संबंध आध्यात्मिक दृष्टीनें हिंदूंच्यापेक्षां किती उदात्त होत चालले आहेत तें पहा " असें सांगणें म्हणजे धारिष्टाची कमालच झाली असें वाटतें.

आणखी एका लहानशा गोष्टीचा उल्लेख करून हें वाढलेले प्रकरण संपवूं. ती गोष्ट अशी कीं, पूर्वीच्या पुरोहितवर्गावर बेजबाबदारपणे तोंडसुख घेणाऱ्या ह्या ब्राह्मांचे कोणतेच विधि जर समाजास दक्षणा दिल्यावांचून पुरे होत नाहींत, किंबहुना या नैमित्तिक देणगीशिवाय नित्याची वर्गणीही जर ह्या धर्मसंस्थेस द्यावी लागतेच, तर मग पूर्वीच्या पुरोहितसंस्थेने असे कोणते पाप केले होते, कीं त्यांनीं दशांतील धर्मसंस्थेचा पत्कर घेऊन चरितार्थाकरितां दुसरा कांही एक व्यवसाय न करतां नुसते हवा खाऊन रहावे ! ब्राह्माच्या ह्या धर्मोपदेशकाच्या धर्मशीलापेक्षां पूर्वीच्या दशग्रथी पुरोहितांचे धर्मशास्त्राध्ययन किंवा धर्मशील निकृष्ट होते, असे आम्हास बिलकुल वाटत नाहीं. उलट ते कितीतरी पटीने उच्च दर्जाचे होते याबद्दल आम्हाला तरी तिलप्राय शंका नाहीं. आणि साधारण-ब्राह्माच्या कलकत्त्याच्या एका मुख्य प्रार्थनामंदिराकरतां एक लायक आचार्य मिळण्याची जेथे वर्षोनवर्ष पचाईत पडते, तेथे ह्या नवशिक्षितांनीं आचारधर्माचे बाबतीत प्राचीन पुरोहितवर्गास तुच्छ लेखून प्रौढी मिरविणे व्यर्थ आहे. दानासंबंधींही आमची अशी समजूत आहे कीं, संस्थांच्या वर्गणीपटावर आंकडे भरण्यापेक्षा प्रत्यक्ष अल्पदानानेही घेणाऱ्याच्या व देणाऱ्याच्या दोघांच्याही मनावर फार अमोलिक संस्कार घडत असतात. साधारण-ब्राह्मांचे पाहिले अध्यक्ष आनंदमोहन यानीं वाटच्या एका भिकारी बाईला एक रुपया दिला. तो पाहतांच तिला जो आनंद झाला, व तिचा तो आनंद पाहून तिच्याहीपेक्षां जास्त जो आनंद आनंदमोहन यांस झाला, तो हजारो रुपयांची ब्राह्म-समाजाला मदत करूनही झाला नसता असे आम्हांस वाटते. तात्पर्य, पूर्वसंस्कार हे हिंदूंच्या आचारधर्मांचे जे अंतरंग तें नीट न पारखतां ब्राह्मांनीं झिटकारण्यांत व नवीन संस्कार रचण्यांत चिंतामणीच्या ऐवजीं ब्राह्मांनीं आपल्या हातीं गाराही घेतल्या असण्याचा संभव दिसत आहे. त्याचे अधिक विवेचन आर्यसमाज व थिऑसफीच्या द्वितीय खंडांत परभारेच येणार आहे, यास्तव येथे जास्त विस्तार नको.

---

## प्रकरण विसावें

# ब्राह्मोपासनांची प्रगति

ब्राह्मांचा ज्ञानयोग म्हणजे द्वैत किंवा द्वैताद्वैत, त्यांचा कर्मयोग म्हणजे सामाजिक सुधारणा, आणि त्यांचा भक्तियोग म्हणजे उपासना होय. त्याच्या सर्व सस्कारांतही उपासना हेंच मुख्यांग आहे. हे अंग आतां मूळच्या स्वरूपांत राहिले नसून उत्तरोत्तर फार शुद्ध होत आले आहे असे म्हणतात. साधारण-ब्राह्मांचे हे उपासनाशास्त्र पाश्चात्याच्या अत्यत खोल (?) अशा तत्त्वज्ञानाशी मिळते आहे; तसेंच त्यांत हिंदूंची अत्यंत श्रेष्ठ साधनांचीच परंपरा जरी ठेवली आहे, तरी त्यांतील दोष काढून टाकून ती आधुनिक कालास व विचारास साजेशी करून घेतली आहे, असे ब्राह्म म्हणतात. तरी उपासना हेंच ब्राह्मधर्माचे मुख्य लक्षण असल्यामुळे त्याचा येथे खुलासेवार विचार करूं.

राजा राममोहन यांच्या उपासनेत, स्तोत्रपाठ (Hymn) असून शिवाय 'ॐ तत्सत्, एकमेवाद्वितीयं ब्रह्म; यतो वा इमानि भूतानि जायन्ते ॥ येन जातानि जीवन्ति ॥ यत्प्रयत्नाभिसंविशन्ति ॥ तद्विजिज्ञासस्व तद्ब्रह्मेति ॥' या मंत्रांचा उच्चार करून त्यांच्या अर्थाचे चिंतन करण्यांत येत असे. त्यानंतर महानिर्वाणतंत्रांतील "ॐ नमस्ते सते ते जगत्कारणाय" इ० हे स्तोत्र म्हणण्यांत येऊं लागले. ब्राह्मसमाजाच्या प्रारंभींच्या उपासनापद्धतीवर शांकर मताची छाप असल्यामुळे त्या उपासनेत प्रेमपावित्र्यादि कोमल वृत्तींस अवकाश नसे. वैष्णवधर्मास राधाकृष्णउपासनेचे जे स्वरूप प्राप्त झाले होते ते ब्राह्मांस मुळींच पसंत नसल्यामुळे वैष्णव-वेदान्ताकडे प्रारंभीं कोणीं ढुंकूनही पाहिले नाहीं. राजा राममोहन यांची वरील वेदान्तवचनांवर जशी निष्ठा होती, त्याचप्रमाणे वॅट्ससाहेब यांचीं स्तोत्रे त्यांस अत्यंत प्रिय झालीं होतीं.

त्यानंतरच्या महर्षि देवेंद्रनाथांच्या काळांत फेनेलो यांच्या प्रार्थना ब्राह्मांना आदर्शभूत झाल्या; परंतु स्वाभिमान अगदींच नाहींसा झाला नव्हता. यामुळे उपासनेची कांही परिभाषा मात्र संस्कृत होती. महर्षींच्या उपासनेचें वर्गीकरण बरेंच लांबलचक होतें तें असें:—

१ अर्चनाः—ॐ पितोनोऽसि इ० —यजुर्वेद.
२ प्रणामः—यो देवो अग्नौ यो अप्सु यो विश्वं भुवनमाविवेश इ० —श्वेताश्वतर, २।१७
३ समाधानः—सत्यंज्ञानमनन्तं ब्रह्म —तैत्तिरीय०
ॐ सपर्यागात् इ०
४ ध्यानः—गायत्रीमंत्र.
५ स्तोत्रः—महानिर्वाणतंत्र ( ॐ नमस्ते सते ते जगत्कारणाय । )

[ ह्या स्तोत्रांतील 'विश्वरूपात्मकाय', 'सर्वरूप' इत्यादि शब्द सर्वदेवमयत्वभाव दर्शवितात म्हणून देवेंद्रनाथ यांनीं ह्या स्तोत्रातील काहीं शब्दप्रयोग बदलले होते. अशा रीतीने परंपरागत चालत आलेले स्तोत्रपाठ बदलणे हे पंडित सीतानाथ यांस अत्यंत गैरशिस्त वाटते. ते म्हणतात कीं, पूर्वजांचे विचार आपल्याहून फार भिन्न होते, यास्तव पूर्वजाच्या शब्दांत आपण प्रार्थना न करणेच चांगले.]

६ प्रार्थनाः—असतो मा सद्गमय, तमसो मा ज्योतिर्गमय, मृत्योर्माऽमृतं गमय, आविरावीर्मएधि, रुद्र यत्ते दक्षिणं मुखं तेन मां पाहि नित्य ॥

७ स्वाध्यायः—उपनिषदाचा पाठ.
८ उपसंहारः—श्वेताश्वतरोपनिषद् प्रार्थना.

ह्या अनुक्रमांतही वैष्णव वाङ्मय व त्याबरोबर प्रेमलक्षणाभक्ति वगळली गेली; परंतु राजा राममोहन व सत्येंद्रनाथ ठाकूर यांच्या प्रासादिक पद्यांनीं व महर्षींच्या ओजस्वी व्याख्यानांनीं उपासनांस बराच रंग आणला. परंतु प्रागतिक ब्राह्मांचे तेवढ्याने समाधान झाले नाहीं. त्यांच्या संगतसभांतून वारंवार चर्चा होऊन उपासनेच्या तपशिलांत केशवचंद्रांनीं मिस् कॉब यांच्या 'धार्मिक कर्तव्य' ह्या पुस्तकाचे आधारे बराच फरक घडवून आणला, आणि उपासनेचा नवीन अनुक्रम १ आराधना, २ कृतज्ञता, ३ ध्यान, ४ अनुताप, ५ प्रार्थना आणि ६ आत्मसमर्पण असा झाला. यांत मिस कॉब यांची 'श्रद्धा' गळली व 'ध्यान' नवीन आले इतकेच. पुढे याही लांबट वर्गीकरणाचा संक्षेप होऊन १ आराधना ( कृतज्ञतेसह ), २ ध्यान आणि ३ प्रार्थना ( अनुताप व आत्मसमर्पण यांसह ) असे तीनच प्रकार उरले. पैकीं

आराधना म्हणजे स्तुति, ध्यान म्हणजे योगांतील धारणा आणि समाधि व प्रार्थना म्हणजे ईश्वर प्रत्यक्ष झाला असतां आर्त उपासकाने उत्कटतेने केलेल्या मागण्या. तात्पर्य, विश्वास, प्रेमैक्य आणि पवित्र वासना असे हें उपासनेचें वर्गीकरण बनले.

परंतु ह्याप्रमाणें होणारी उपासना रोज ठरीव शब्दांत व्हावी किंवा प्रत्येक वेळीं उपासकाने अथवा आचार्याने प्रसंगीं सुचेल त्याप्रमाणे नवीन बोलावे, हा वाद उपस्थित झाला. व त्यांतील दुसराच प्रकार जरी ब्राह्मांस तत्त्वतः श्रेष्ठ वाटला, तरी तो तितकाच व्यवहार्य व परिणामकारक होण्यास उपासकांची योग्यता असामान्यच असावयास पाहिजे, ही अडचण लक्षांत घेऊन प्रागतिक ब्राह्मानीं उद्बोधन (जागृति), आराधना, ध्यान, सामान्य ठरीव प्रार्थना (असतो मासद्गमय),प्रवचन, आणि अखेर प्रवचनात वर्णिलेल्या गुणांचे संवर्धनार्थ विशेष प्रार्थना,असा अनुक्रम ठरविला. सत्यंज्ञानमनतं (तैत्तिरीय०), आनंदरूपं अमृत ( मुंडक ), शातं शिवंमद्वैतम् ( माडुक्य ), शुद्ध अपापविद्धम् ( ईश ), असे आराधनेतील वर्ण्य मंत्र ठरवून टाकले. ह्याचा परिणाम सार्वजनिक व खाजगी उपासनांवर चांगला झाला, असे कोणी म्हणतात. उपासकांनी काय बोलावयाचे त्याचे मुद्दे व अनुक्रम ठरले गेले. याप्रमाणें हीं योजना उपासकांस सोयीची व मार्गदर्शक झाली. यातील प्रार्थना या भागास ब्राह्म विशेष महत्त्व देतात. ज्यास आराधना व ध्यान ही साधून मनाला उत्कटता प्राप्त झाली नाहीं, ते प्रार्थना करण्यास खरे पात्रच नसल्यामुळे त्यांनी आपली वरीलप्रमाणे तयारी होईपर्यंत प्रार्थना करूच नये असे ब्राह्म-पंडितांचे मत आहे.

महर्षींच्या व्याख्यानांस जशी सत्येंद्रनाथाच्या पद्यांची फार महत्त्वाची जोड मिळे, त्याप्रमाणे केशवचंद्र यांच्या प्रार्थनास त्रैलोक्यनाथ सन्याळ ऊर्फ चिरंजीव शर्मा या प्रासादिक शीघ्र कवीच्या पद्यांची अनुपम जोड मिळे. त्यानंतर रवींद्रनाथांची गीते हीं लोकप्रिय झालीं पण त्या गीतात सांप्रदायिक संगति व स्फूर्ति नसल्यामुळे त्यांचा ब्राह्मास म्हणण्यासारखा उपयोग झाला नाहीं ! परंतु पंडित विजयकृष्ण गोस्वामी यांनीं वाद्यांच्या साथींत वैष्णवसंकीर्तनाची जी जोड पुढे करून दिली ती ब्राह्मेतर जनसमुदायास फारच चित्ताकर्षक वाटली. ही संगीताची उणीव साधारण ब्राह्मांस फार जाणवत आहे.

ह्या उपासनांस आत्मचिंता, आत्मपरीक्षा, नामजप, नामसाधन ( नामानें

लक्षित असलेल्या सगुण ईश्वराचें ध्यान), स्वाध्याय अथवा शास्त्रपाठ (कोणत्याही धर्मशास्त्राचे पठण) इत्यादि प्रकार पूर्वीच्या ब्राह्मांच्या साधनांत येत असत. त्यांचें सविस्तर वर्णन ब्राह्मांच्या अनुष्ठानपद्धतीवरील (देवेंद्रनाथ, केशवचंद्र सेन, उमेशचंद्र दत्त, सीतानाथ तत्त्वभूषण, आदित्यकुमार चतर्जी, ललितमोहन दास आणि पंडित शिवनाथशास्त्री) अनेक ग्रंथकारांच्या बंगाली पुस्तकांतून आढळेल.

ह्या उपासनापद्धतीला केशवचंद्रांनीं जे योगाचे परिणत स्वरूप दिले, ते बरेच महत्त्वाचे होते. योगाचे त्यानी तीन भेद केले. १ वैदिकयोग म्हणजे बाह्यार्थ योग, २ वेदांतिक योग म्हणजे आत्मगत योग किंवा नैज योग व ३ पौराणिक किंवा भक्तियोग असे ते होते. वैदिक योगांत सृष्टीच्या मागे असलेल्या शक्तीची उपासना असे. यांत द्वैताद्वैत नसून स्पष्ट द्वैत (Scotch Dualism) असे. अर्थात् हा योग साधारण-ब्राह्मपंडितांपैकीं कित्येकास मान्य नाही. कारण त्याच्या मताने सृष्टिकर्ता सृष्टीच्या मागे भिन्नत्वाने नसून सृष्टि हे त्याचेच व्यक्त स्वरूप आहे. केशवचंद्रांच्या वेदान्ती योगाचीही साधारण-ब्राह्मांनीं ओढाताण चालविली आहे. कारण आत्म्याचे ठिकाणीच परमात्मा पाहण्यात आत्मा आत्मरूपाने रहात नाहीं. तो परमात्मस्वरूपात लीन होतो असे जे केशवचंद्रांचे म्हणणे ते साधारण-ब्राह्मांस मुळींच मान्य नाही. पंडित सीतानाथ असे म्हणतात की, केशवचंद्रांचे योगांतील ब्रह्मात्मैक्य केवळ जाणिवेपुरतेच असेल, आणि त्याचे आत्मानात्मद्वैत, अद्वैत आणि सर्वदेवमयत्व भाव टाळण्यापुरतेच असेल. पण ही शंका बरोबर आहे असे केशवचंद्रांचे सारे अनुयायीही आज म्हणत असतील असे वाटत नाहीं. उलटपक्षीं केशवचंद्राच्या या योगपद्धतीनंतर त्यांच्या अनुयायांनीं लवकरच वेदान्तमताचा स्वीकार केला असे दिसतें.

केशवचंद्रांच्या तिसऱ्या भक्तियोगाचा विचार त्याच्या हयातींत पुरा झाला नाहीं. ह्या पौराणिक योगावर त्यांचे मनांत स्वतंत्र ग्रंथ लिहावयाचा होता. पण ते काम त्यांच्या हातून होण्याच्या अगोदरच त्यांचे देहावसान झाले, हा तिसरा योग वैयक्तिक व सामाजिक स्वरूपाचा असावा असे वाटतें. प्रत्येक जिवाचे आयुष्य हा एक जीवनवेदच आहे. अर्थात् धर्मसंस्थापक व इतर थोर पुरुष यांचें जीवन म्हणजे लोकोद्धारार्थ झालेल्या ईश्वराच्या अत्यंत

महत्त्वाच्या अशा आदेशाचा विशेषयोग होय. यासाठीं अशा चरित्रांचा अत्यंत आस्थापूर्वक अभ्यास करणे म्हणजे साधुसमागम किंवा सत्समागम होय.

या योगाची माहिती देतांना पंडित सीतानाथ असा इषारा देतात कीं, केशवचंद्रांच्या या थोरांच्या समागमांत जीझस आणि मोझेस हे ऐतिहासिक पुरुष येतील; पण पौराणिक अवतार मात्र येणार नाहींत. आम्हीही केशवचंद्र मयत झाले, तेव्हां ते रामभक्त किंवा कृष्णभक्त होते असे म्हणावयास तयार नाहीं; पण केशवचंद्रांच्या विचारांस, श्रीरामकृष्णांनीं म्हणा अथवा त्यांच्या पिढीजात संस्कारांनी म्हणा जो अखेर पालट पाडला होता तो लक्षांत घेतां त्यांनीं पुढे कालीभक्त किंवा कृष्णभक्त होणे, हा केवळ कालावधीचा प्रश्न होता. तत्त्वाचा प्रश्न फारसा राहिला नव्हता, असे आम्हांस तरी खातरीने वाटते.

शेवटीं साधारण-ब्राह्म असे सांगतात, " कीं आम्ही आमच्या सांप्रदायिक वाडवडिलांच्या विचारसंपत्तीवर नुसते ऐदी होऊन बसलो नाहीं. तर आम्हीं केशवचंद्राच्या योगालाही चांगलाच उजळा दिला आहे. केशवचंद्रांच्या वैदिक योगांतील द्वैत आम्ही मानीत नाहीं. त्यांच्या वेदांती योगांतील परमात्म्याशीं ( ज्ञानपक्षीं ) ऐक्य आम्ही केशवचंद्रांपेक्षांही ठासून सांगतो. यामुळें साधारण-ब्राह्मांच्या योगाने प्राचीन अर्वाचीन मतांतील सांधा अधिक जोडला गेला आहे. आम्हांला सर्वदेवमयत्वभावाची केशवचंद्रांप्रमाणे भीति राहिली नाहीं. द्वैताचा अद्वैताशी मेळ कसा घालावयाचा ती गुरुकिल्ली आम्हांला सांपडली आहे. आमचे भक्तीचे अनुभव पूर्वीच्या लोकांपेक्षां फार खोलवर गेले आहेत. त्यांचे दृश्यफल आम्हांला शिरगणतीने जरी दाखवितां न आलें तरी केव्हांही कोठेही काय अशीं अनुभवाचीं थोर माणसे थोडीच असतात. पण यामुळे त्यांच्या अनुभवाची मार्गदर्शक म्हणून योग्यता कमी लेखतां येणार नाही, अशी ब्राह्मांची विचारसरणी आहे. या बाबतींत पंडित सीतानाथ यांनीं नुकतेच असे प्रसिद्ध केले आहे कीं, " आमची आराधना म्हणजे इतःपर केवळ परंपरा किंवा अनुमान या स्वरूपांत राहिली नाहीं. आमच्या आराधनेला समाधीचा—साक्षात् ईशदर्शनाचा—आधार असतो. ××× आमची आराधना म्हणजे एखाद्या अतज्ज्ञाने केलेलें ईश्वराचे शाब्दिक गुणवर्णन नव्हे. तर तो प्रत्यक्ष अनुभव आहे. आमच्या आराधनेचा आरंभ म्हणजेच ध्यानाचा आरंभ आणि आमच्या प्रार्थना म्हणजे कांहीं आत्मगत

भाषणें किंवा आकाशाशीं पोकळ संवाद नव्हे. आमच्या प्रार्थनांची अशी निकृष्ट स्थिति आम्ही कधींच होऊं देत नाहीं. तर आमच्या प्रार्थना ध्यान-योगांत घडलेल्या प्रत्यक्ष ईशसमागमांतीलच असतात. अशी आम्हीं भक्ति मार्गांत अल्पशी भर टाकली आहे. हा अनुभवप्रकाश अथवा मार्ग असा आहे कीं, ज्या योगाने जगांतील सर्व योगीजनांशीं आमचा संबंध जडला आहे. आणि ज्या काळीं शास्त्रीय प्रगतीने विचारास स्वातंत्र्य आले नव्हते आणि श्रद्धा ही परंपरेच्या कचाट्यांतून सुटली नव्हती, अशा प्राचीन कालापासून हजारो वर्षे चालत आलेल्या चुकांतून याच अनुभूतिप्रकाशाने आम्हांस सोडविले आहे.''

पंडित म्हणतात कीं, '''पूर्वींच्या भक्तियोगांतही आम्हीं साधारण-ब्राह्मांनी अल्पशी भर टाकली आहे'. पंडिताचा हा विनय म्हणावा की भ्रम म्हणावा, हे आम्हांस समजत नाहीं. कारण वैदिक उपासनापद्धतीचे भारी जिकीरीचे अवडंबर आमच्या डोळ्यांसमोर येते. आमच्या उपासनेस प्रायः बाण-शाळिग्रामासारखे प्रतिक, श्रीरामकृष्णासारख्या प्रतिमा किंवा वरतीं श्रीसूर्य-नारायण अथवा येथे अग्निनारायण किंवा श्रीसद्गुरु यांसारखी दिव्य ज्योति अगर मूर्ति पुढे लागते. आमची बहिरंगोपासना झाल्यावर अंतरंगो-पासना सुरू होते. आणि तीही प्रायः पूजामयच असते. आमच्या परमार्थाचा आरंभच वैराग्यापासून व त्यागापासून होतो. मग ते साधन तप असो अथवा उपासना असो. पंचोपचारी पूजेतही पंचेंद्रियाचे विषयच देवाला अर्पण करण्याच्या प्रारंभीं अभ्यास असतो. असे जेव्हां आपले सर्वस्व देवाला अर्पण करावें, परंपरापूजित जपजाप्य करावे, तेव्हां प्रथम अन्वयाच्या नव्हे तर व्यति-रेकाच्या मार्गाने ध्यानयोगांत देवाच्या भेटीचा क्वचित् साधकाला योग आला तर महद्भाग्य ! नवविधाभक्तीच्या मार्गानें गेले तरी श्रवणापासून आत्मनिवेदनापर्यंत जातांना नवमास पोटाशी संभाळणाऱ्या आईप्रमाणेच सद्गुरुमाउलीनें साधकास संभाळले तरच योग्यकालीं खरे द्विजत्व लाभतें. पण साधारण-ब्राह्मांचे पहावे तर त्यांस ही यातायात कांहीच नाहीं. जी उपासना भगवंतास अत्यंत क्लेशदायक वाटली. जवळ जवळ त्यासारखीच ( निराकाराची ) उपासना साधारण-ब्राह्मांचीं अगदीं लहान लहान मुलेंही करतात. तसेंच साधारण-ब्राह्मांची प्रार्थना म्हणजे श्रीरामकृष्णपरमहंस किंवा

श्रीतुकोबा ह्यांची पाषाणमूर्तीपुढील दर्शनासाठीं व्यर्थ डोकेफोड नव्हे, तर त्यांच्या उद्‌बोधनाचा दरवाजा उघडतांच लगेच आराधनेतच यजमानांची भेट, ध्यानांत आलिंगन, आणि प्रार्थनेंत सारा कुशलसमाचार होऊन जातो, हें आश्चर्य होय. तथापि दामाजीपंतांच्या पूर्वींच बेदरच्या बादशहाला भेट देणारा देव आम्हां परंपरागत भोळ्या हिंदु भाविकास केव्हां फसवील त्याचा काय नेम सांगावा? पण विठु महार म्हणजे देव नव्हे. तो देवाने एकक्षणिक घेतलेला लीलावेष होय. हे साधारण-ब्राह्मांसारख्या चिकित्सक बुद्धीच्या डोळसांस हिंदु भोळसटांनीं काय सांगावे! त्याचे अनुभव त्यासच ठाऊक.

---

## प्रकरण एकविसावें

# ब्रह्मसाधन

साधारण-ब्राह्मांच्या निरनिराळ्या विचारांचा ज्यांत परिपाक झाला आहे, असे षड्रसान्नाचे ताट आम्हीं वाचकांपुढे ठेविले. आतां त्यावर ब्रह्मसाधनाविषयीं-च्या त्यांच्या मतांची अन्नशुद्धि करून आम्ही आपले वाढण्याचे काम पुरे करणार आहोंत. पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यानीं जे ब्राह्म-वाङ्मय तयार केलें त्यापैकीं हा शेवटला ब्रह्मानुभवाचा गोड घांस आहे.

ब्राह्मांच्या साधन-मंदिराच्या पायास हेगेलच्या कल्पनावादाच्या इंग्रज अनुयायांनीं घडविलेल्या तोंडी उपनिषदांतील द्वैताद्वैतवादाच्या चुन्यांत बस-विल्या आहेत. केशवचंद्रप्रणित प्रेमलक्षणाभक्तीचा वरती इमला आहे, आणि खिस्तप्रणित कर्माच्या महाद्वारास भगवद्गीतानुशासन व पाश्चात्य कल्पना-वाद्यांचा आत्मानुभव ह्या दोन कमानी आहेत. अशा ह्या साधनाश्रमाच्या विस्ताराची कल्पना स्थूलमानाने प्रथम त्याच्याच शब्दात पाहू.

**साधनांचें क्षेत्र:**—“ ईश्वराला जाणणे, त्याच्यावर प्रेम करणे आणि त्याला प्रिय होईल अशी वर्तणूक ठेवणे याचेच नाव देव जोडणे होय. ईश्वरा-ला जाणणे म्हणजे कोणी तरी एक सृष्टिकर्ता असला पाहिजे, अशी अस्पष्ट भावना असून भागत नाहीं; तर परमात्म्यांतच आपला प्रत्यक्ष वास आहे ही जाणीव अखंड जागृत राहून त्या जाणिवेच्या प्रकाशांतच आपली सारी जीवनचर्या चालली पाहिजे. त्याचप्रमाणे नित्यनैमित्तिक पूजाअर्चा व प्रार्थना करून सद्गदित अंतःकरणाने अश्रु ढाळणे यातच ईशप्रेमाची पूर्तता होत नसून आपले सर्व मनोविकार ईशप्रेमाने सदा संपृक्त असले पाहिजेत. तसेच केवळ निरुपद्रवी अशा नीतीच्या वर्तनाने कर्मयोग सपत नसून आपले जीवित दुसऱ्यास स्फूर्तिदायक होऊन आपल्या अंतरांतील ईशपुत्राने मी व माझा पिता एकच आहोंत अशी एकसूत्रीपणाची सदैव ग्वाही दिली पाहिजे.”

“ अशा उच्च प्रतीच्या आध्यात्मिक जीवनाचा पंथ कोणता, त्याच्या पायऱ्या कोणत्या, त्यांत प्रतिबंध कोणते व ते निवारण्यास उपाय कोणते हे

सर्व साधनशास्त्राचे विषय होत; परंतु त्याचे आस्थापूर्वक अध्ययन कोणीच करीत नाहींत. लोकांची अशी समजूत दिसते कीं, धार्मिक जीवनास धर्मशास्त्रावर विश्वास असला म्हणजे पुरे. ज्यांचा तसा विश्वास बसत नाहीं, त्यांसही ईश्वरासंबंधी मनुष्याच्या मनांत असलेला स्वाभाविक भाव व्यावहारिक धर्मास पुरेसा वाटतो. धार्मिक तत्त्वज्ञानाच्या उठाठेवीची त्यास गरज वाटत नाहीं. कित्येक तर ईश्वराचे स्वरूप अचिंत्य आहे असा पोक्त विचार करून त्या नादीच लागत नाहीत, आणि दुसऱ्या कोणा तार्किकाचा असा ग्रह झालेला असतो की, प्रेम ही एक स्वाभाविक वृत्ति आहे, ती शिक्षणाने किंवा प्रयत्नाने उत्पन्न होणारी नसल्यामुळे, तीसंबंधी विचार करण्याचे कारण नाही. त्याचप्रमाणे पावित्र्य ही एकदम साध्य होणारी एकादी गोष्ट नसून हळुहळू पूर्णत्वास पोचविणारी अनत उन्नतीची ती एक चढती अवस्था आहे. त्यासाठीं प्रयत्न तो काय करायचा ! अशा विचारसरणीमुळे अध्यात्मशास्त्रासंबंधीं चोहोकडे अनास्था व औदासीन्य दिसत आहे. परंतु ब्राह्म म्हणतात की, ही सारी भूल आहे. प्रेम ही स्वाभाविक वृत्ति असली तरी त्वा प्रेम केले पाहिजे ( Thou Shalt love ) ही धर्माज्ञा कांही निरर्थक नव्हे. प्रेम आणि पावित्र्य ह्यांची वाढ आपल्या हाती आहे. आपल्या अंतःकरणाचे आणि वासनेचे ईश्वराशीं पूर्ण तादात्म्य होणे हेच बुद्धोपदिष्ट निर्वाण, जीझसचे पूर्णत्व व गीतेने गायलेली ब्राह्मी स्थिति होय. तात्पर्य, स्वर्गीय पित्याप्रमाणे पूर्ण होणे किंवा याच जन्मीं जीवन्मुक्तीचा सोहळा भोगणे हे जर शक्य आहे तर त्याचे साधनाचे शास्त्रही असले पाहिजे व ते अभ्यासिले पाहिजे, हं उघड आहे. त्यास विवेचक बुद्धीचीच आवश्यकता आहे. धर्मशास्त्रास ईशप्रणीत मानून त्यावर अधश्रद्धा ठेवणे ही धर्मजीवनाची बाल्यावस्था होय. ज्यास सर्वज्ञ ईश्वराची ओळख नाहीं, त्याने धर्मशास्त्रास ईशप्रणीत मानण्यात काहींच अर्थ नाही. आणि ईश्वराची अगोदरच पूर्ण कल्पना आल्यावर शास्त्रास ईशप्रणीत कल्पून अधिक काहींच मिळवावयाचें रहात नाहीं. यासाठीं बाह्यप्रमाणांचा उपयोग तात्पुरता मार्गदर्शक म्हणून करावा. शास्त्रावर विश्वास ठेवून एखाद्या साधनाचाही अभ्यास करावा; परंतु धर्मश्रद्धा ही वास्तविक बाह्यप्रमाणावलंबी अशा विश्वासाची गोष्ट नसून ती दृढ आत्मप्रचीतीच्या ज्ञानानेंच उत्पन्न होत असते. अशा प्रकारच्या ज्ञानास तात्त्विक विचारांची जरूरी आहे.

म्हणून केवळ आप्तवाक्यादि बाह्यप्रमाणांवर न विसंबतां केवळ बुद्धिवादावर झालेले धार्मिक तत्त्वज्ञान आज ब्राह्मांनीं तयार करून जगापुढे मांडलेले आहे."

"हे धार्मिक तत्त्वज्ञान म्हणजे सोपानपरंपरेची पहिलीच पायरी होय. त्यापुढे ध्यानधारणा व समाधि ही सर्व साधनपरपरा आहे. ह्या साधनानी ईश्वराचे ज्ञान प्राप्त झाल्यावर त्यापुढे कर्ममार्ग आणि भक्तीच्या वाटा लागतात. अगोदर ज्ञान, नंतर भावना आणि शेवटीं इच्छा असा हा क्रम आहे. प्रेमास्पद अशा ईश्वराचे ज्ञान, नंतर त्याजविषयी भक्ति आणि त्यापुढे ईश्वरप्राप्तीचे प्रयत्न किंवा दुसऱ्या शब्दात सागावयाचे तर ब्रह्मप्रतीतीतून ब्रह्मप्रीति, ब्रह्मप्रीतीस्तव ब्रह्मभक्ति, ब्रह्मभक्तीमुळे ब्रह्मरति, ब्रह्मरतीची ब्रह्मक्रीडा आणि शेवटी ब्रह्मक्रीडेची परिणति म्हणजे ब्रह्मक्रिया अशी ब्राह्माची प्रणालिका आहे. सर्वांच्या अगोदर ज्ञान पाहिजे. ज्ञानावाचून भक्ति, (श्रवणापासून समाधीपर्यंत ज्ञानानुष्ठान सपादिल्यावाचून केलेली भक्ति,) म्हणजे पोकळ भावनोद्रेक होय, किंवा त्याहूनही दुष्ट अशी मूर्तिपूजा होय. तसेच ज्ञान व भक्ति यावाचून केलेले कर्म म्हणजे व्यर्थ शीण आहे. त्याचप्रमाण ज्ञानभक्तीही कर्मावाचून अशक्य आहे. अशी ही प्रथम कल्पिलेल्या साधनाश्रमाची मर्यादा आहे."

**उपासनांचें स्थूल स्वरूपः—** "ऐहिक सुखसाधनाकरिता ईश्वराची प्रार्थना करावी ही उपासनेची पहिली पायरी होय. ह्या पायरीवर साधक असताना अन्नाच्छादनादि सुखसोयीच्या गोष्टींचे त्यास महत्त्व वाटते व ईश्वरासही तशा गोष्टींचे महत्त्व वाटत असावे अशा बुद्धीने तो देवासही अन्नवस्त्रादि पदार्थ अर्पण करून त्यास सतुष्ट करूं पहातो ह्यानतरची पायरी म्हणजे श्रद्धा, प्रेम, नम्रता, पावित्र्य, नैतिक धैर्य इत्यादि गुणाची याचना करणे किंवा ते दिल्याबद्दल आभार मानणे ही होय. यज्ञयाग, बलिदान व मूर्तिपूजा याचा अव्हेर करून ब्राह्मांनी पहिली पायरी सुरुवातीसच सोडली व ते दुसऱ्या पायरीवर आले. ह्या पायरीवरील खिस्ती उपासनापद्धति त्याना सर्वोत्कृष्ट वाटली म्हणून त्यांनीं देवेंद्रनाथांपासून त्याच पद्धतीचे अनुकरण केले; पण खिस्ती लोकांनीं आपल्या उपासनेची प्रगति यापुढे न केल्यामुळे ती वाढत्या मानवबुद्धीस अपुरी पडून निरुपयोगी ठरली. कारण उपास्याच्या आणि उपासकाच्या मनावर प्रार्थनेचा कांहीं तरी कार्यक्षम परिणाम होईल तरच तिची सार्थकता. परतु निसर्गाचे अनुल्लंघनीय नियम व कायदे जसजसे लोकांस

कळूं लागले त्याप्रमाणे त्यांस हे कळून चुकलें कीं, ईश्वराजवळ ऐहिक वस्तूंची याचना करणे व्यर्थ आहे. तसेच दुसऱ्या पायरीवरील साधक जी सत्त्वसपत्ति मागणार तीही मिळणे न मिळणे हे अध्यात्मशास्त्राच्या नियमांवर निरपवाद अवलबून आहे असे जेव्हा समजते, तेव्हां त्याही देणग्या मागितल्या म्हणजे मिळतीलच ही समजूत दूर होते. व त्या दृष्टीने मात्र प्रार्थनेचे महत्त्व रहात नाहीं. परंतु प्रार्थनेचा उपासकाच्या मनावर जो परिणाम होतो त्या दृष्टीने मात्र प्रार्थनेचे महत्त्व फार आहे. साधकाने मनोभावेकरून सद्गुणसमृद्धिच मागावी–श्रेयच मागावे. प्रेय मागू नये–अशीच ईश्वराची इच्छा असणार. अर्थात् साधक जेव्हा अनन्यगतिक होऊन तेच मागूं लागतो, तेव्हा ईश्वराच्या आड येणारी विषयवासना दूर होऊन तो ईशेच्छेशीच एकरूप होतो. असे होत असता त्याच्या ठिकाणीं ईश्वराविषयीं सद्भावना आणि प्रेम उत्पन्न होते. मग ह्या वृत्तीत उपासक तिसऱ्या पायरीवर जातो. व तो ईश्वराचे स्तवन करूं लागतो. त्या स्तवनाचे भरात तो आपणांस विसरतो अर्थात् तो देवाजवळ आपल्यासाठीं कांहींच मागत नाहीं. त्याच्या उपासनेतील स्वार्थबुद्धि सुटते व त्याचे भजन निष्काम होते. असा हा भजनाचा स्तोत्रसंग्रह विष्णु, भागवत, व मार्कंडेय या पुराणातून आहे. परंतु अर्वाचीन स्तोत्रांतून अवतारांचेच महात्म्य गाइलेले असल्यामुळे आजच्या सुसस्कृत साधकास तीं अगदीच निरुपयोगी होतात. असो. ह्या आराधना नामक तिसऱ्या पायरीवर उपासकाचा स्वार्थ नाहींसा होऊन उपास्याचे ऐश्वर्यवर्णनांत उपासकाचा परमार्थ साधत असतो. आता उपासक हे जे ईश्वराच्या ऐश्वर्याचे वर्णन करतो ते त्याने स्वतः पाहिलेले असते असे नाहीं, तर परंपरेने चालत आलेल्या पद्धतविरून आनुमानिकही असतें; परंतु अशा परंपरागत ज्ञानावर अवलंबून उपासक जेव्हां ईश्वराच्या अनंत कल्याणगुणांचे ध्यान करूं लागतो, तेव्हां तो ध्यान किंवा योग ह्या उपासनेच्या चवथ्या पायरीवर जातो. ह्या पायरीवर हिंदु पुराणकार क्वचितच गेलेले दिसतात. अवतारमाहात्म्यांचा प्रतिबंध यांस आडवा येतो. असें ब्राह्म समजतात. परंतु उपनिषदे, भगवद्गीता आणि शंकराचार्यांचीं कांहीं स्तोत्रे यांत मात्र शुद्ध ध्यानयोग दिसून येतो. प्रश्नोपनिषदांतील प्राणस्तोत्र, श्वेताश्वतरांतील पहिल्याच चार श्रुति, छांदोग्याचे सातव्या प्रपाठकांतील पंचविसावा खंड त्याचप्रमाणें गीतेंतील अकराव्या अध्यायांतील

अर्जुनाची प्रार्थना हीं अशीं उदाहरणें आहेत. परंतु पुढें उत्तरवेदान्तांत अद्वैतावर फाजील जोर दिल्यामुळें व वैष्णवधर्मानें अवतार-कथांचे व पूजा-विधानांचें बंड वाढवून अद्वैत सर्वस्वींच सोडल्यामुळे उपासकाचीही चवथी भूमिका सुटली; परंतु भक्ति आणि योग ह्यांचा सुंदर मिलाफ करण्याचें श्रेय केशवचंद्रांनीं घेतलें व तेच आज साधारण-ब्राह्मांचे विशिष्ट ध्येय आहे. केवळ आराधनेतही त्यास खरे समाधान प्राप्त होत नाहीं. म्हणून ध्यानयोगांत खोल शिरण्याचा त्यांचा प्रयत्न आहे."

"ह्याप्रमाणे ज्ञान, भक्ति, आणि कर्म ह्या ज्या साधकाच्या मानसोन्नतीच्या वास्तविक पायऱ्या त्याच ध्यान, आराधना आणि प्रार्थना या रूपांत ब्राह्म उपासकांच्या आचरणांत आढळून आल्या पाहिजेत असे ब्राह्म म्हणतात खरे; पण खुद्द ब्राह्मांचा अनुभव मात्र याच्या अगदी उलट असून त्या अनुभवा-प्रमाणेच पाहतां प्रार्थना, आराधना आणि ध्यान, म्हणजे कर्म, भक्ति आणि ज्ञान असाच अनुक्रम लागतो. ह्यांपैकीं कर्म आणि प्रार्थना ह्या साधनापूर्वी ज्ञान असतें, असा जगाचा अनुभव नाहीं. ज्ञान असते असेच म्हणावयाचें तर ते परोक्ष व अनुमानिक असते, प्रत्यक्ष नसतें. पुढे पंडित सीतानाथ म्हणतात कीं, "आम्हां ब्राह्मांवर प्रथम संस्कार खिस्ती धर्माचे झाले हे आमचें मोठेंच भाग्य होय, कारण कीं, त्यामुळें प्रार्थना व सामाजिक सुधारणा यांचे खरे महत्त्व आमच्या लक्षांत आले. नंतर वैष्णवधर्माच्या सस्कारांनीं आमच्यांत भक्तीची स्फूर्ति उत्पन्न केली आणि नंतर औपनिषदिक ज्ञान व पाश्चात्यांचें तत्त्वशास्त्र यांनीं आमची विचाराची दिशा वाढून आम्ही ध्यानयोगाच्या मार्गास लागलो." ब्राह्म म्हणतात कीं, "आमच्या या अनुभवाचा फायदा घेऊन साधकानीं आपला क्रम आंखावा. तो असा कीं, प्रथम मनःपूर्वक प्रार्थना आणि दृढ कर्तव्यनिष्ठा नंतर उत्कट आराधना आणि सौंदर्य-आनंदा-दि गुणांची प्रीति आणि अखेर साक्षात् ईशदर्शन व पुढे अशा ब्राह्मी स्थितींतील उच्च प्रकारचे जीवन. हाच तो साधकाचा ध्येयमार्ग होय."

पंडित सीतानाथ ह्यांच्या वरील विचारसरणीचा पूर्ण ऊहापोह करण्याचे हें स्थल नव्हे, तथापि एकदोन गोष्टींचा खुलासा जातां जातां केलेला बरा. मुंडकोपनिषदांतील 'आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेषब्रह्मविदां वरिष्ठः ।' ३।१।४, यांतील क्रियावान् या शब्दाचा अर्थ समाजसुधारक असा करण्याचा

ब्राह्मांचा अभिप्राय दिसतो; परंतु मागच्या संदर्भावरून ब्रह्मविद् म्हणजे ब्राह्म-सुधारक असा अर्थ निघणे कठीण दिसते. तसेच हिंदूंच्या पूजनविधानाचे जें रहस्य पंडितांनीं दिले आहे तेंही चुकीचे आहे. ईश्वराला उपचार हवे असतात म्हणजे त्यास भूक लागते, तहान लागते, हे त्यांतील रहस्य नसून जीवांनीं आपल्या इंद्रियांचे विषय देवास अर्पण करावे किंवा आपल्या सर्व इंद्रियांचा विषय देव हाच करावा, किंवा आपल्या घरच्या सर्व सुखसाधनांचा तोच धनी आहे अशी भावना व्हावी, असा त्यातील बोध आहे. तो सगुण-साकार उपासनेत साधणे तारतम्याने सोपे होते. ध्यानसिद्धि अगोदर कीं प्रार्थना अगोदर ? यासंबधींही साधारण-ब्राह्माचे विचार विसंगत व निराधार दिसतात. तरी आराधनेपासून त्यांच्या उपासनापद्धतीचा तपशीलवार विचार पुन्हा त्यांच्याच शब्दांनीं पाहूं.

**आराधनाः**—आराधनेत गंभीर व निर्दोष विचार, उत्कृष्ट भाषणशैली, व उत्कट भाव असे हे गुण साधणे म्हणजे ईश्वरी प्रसादच होय. ब्राह्मांचे उपदेशक शनिवारी रात्री कोणती तरी इंग्रजी प्रार्थनापुस्तकें धुंडाळून रविवार-च्या प्रार्थनेचे मसुदे तयार करण्यात आपलें बुद्धिसर्वस्व खर्च करितात, पण त्याच्या प्रार्थना परिणामकारक होत नाहीत. यासाठीं त्यांनीं ह्या अशा खटपटींत वेळ न घालविता आपले आचार व मन ह्याच्या शुद्धीकडेच जास्त लक्ष दिले पाहिजे असे आता ब्राह्म म्हणूं लागले आहेत. तथापि उपासनेच्या अभ्यासाची एक दिशा ह्या दृष्टीने त्यानी आराधनेत ऐश्वर्यमूल भक्ति व माधुर्यमूल भक्ति असे दोन भाग पाडले आहेत. सत्यं, ज्ञानं, अनंतं, शांतं आणि अद्वैतं अशा स्वरूपलक्षणानीं ईश्वराची आराधना ऐश्वर्यमूलक असून, आनंदरूप, अमृतं, शिवं, शुद्ध आणि अपापविद्धं ह्या तटस्थ लक्षणांनी केलेली स्तुति ही माधुर्यमूल आहे. ही दोन्ही अंगे आराधनेत अवश्य पाहिजेत. वरील लक्षणे उपनिषदांतून मथन करून त्यानी शोधून काढली. परंतु नव-युगधर्मातील लोकसंग्रह हे जे मुख्यांग तद्दर्शक वरील लक्षणात विशेषण नाही. यास्तव निरालसम्, सक्रियं किंवा धर्मावह, पापनुदं, भगेशं, अशीं विशेषणे आराधनेत घालण्याबद्दल साधारण-ब्राह्माच्या सभेत दोनदां वाटाघाट झाली. पण शेवटीं शिवं, शुद्ध, अपापविद्धं ह्या ब्राह्मपरंपरापुनीत शब्दांवर भागवावें असेच बहुमत ठरलें.

आराधनेच्या ह्या बाह्यांगाप्रमाणें, परोक्ष आणि प्रत्यक्ष असे दोन अंतरंग-भेद कोणी ब्राह्म मानतात. पंडित म्हणतात कीं, "त्यापैकीं पहिली गौण असून दुसरीच इष्ट आहे आराधनेतील प्रत्यक्षतेसंबंधीं, ईश्वराविषयीं तृतीय पुरुषाऐवजीं द्वितीय पुरुषीं प्रयोग व बुद्धिवादापेक्षा भावनेवर अधिक जोर, अशीं बाह्य लक्षणे जरी अनेक सांगतां आलीं, तरी तिचे मुख्य लक्षण म्हणजे उपासकाची निःसदेह वृत्ति हेच होय. परंपरागत चालत आलेल्या श्रद्धेने केलेली आराधना वक्त्याच्या कौशल्याने क्वचित् परिणामकारक झाली, तरी ह्या नवयुगातील आध्यात्मिक जीवनास ती पुरेशी होत नाहीं. यास्तव तात्त्विक व शास्त्रीय विचारानीं ईश्वरासंबधीं आपली भावना तीव्र व निःशंक केली पाहिजे ईश्वराचे सृष्टींतील रचनाचातुर्य; चराचर सृष्टीच्या सर्व अंतर्बाह्य व्यवहारात ईश्वराचे प्रेरकत्व; जीव, जग, जगदीश यांचे तात्त्विक-ऐक्य इत्यादि गोष्टींबद्दल उपासकाची वृत्ति पूर्णपणे निःसंदेह झालेली असली, म्हणजे आराधनेच्या वेळी त्याची भावना अप्रयत्नाने सिद्ध होते. मात्र अशा ह्या भावनेच्या उत्कटतेत अद्वैत्याचा अभेदभाव उत्पन्न होऊन आराधनाच बंद पडण्याचा संभव असतो. यासाठीं ह्या मधल्या अभेदवृत्तीच्या टप्प्यास जपावे. फार वेळ काळोखात राहून मग एकदम उजेडात आले असतां प्रथमदर्शनीं नुसताच स्वच्छ प्रकाश दिसतो. पण पुढे थोड्या सवयीने त्या प्रकाशातील निरनिराळे रग व छाया कळूं लागतात, त्याप्रमाणे प्राथमिक अभेदवृत्तीच्या नंतर सतताभ्यासाने अभेदातील भेद प्रतीत होतात आणि आराधनेतील पुढील दिव्य अनुभव शक्य होतात. उपासक अज्ञानदशेतून ज्ञानदशेत जातो, हाच भेदाचा सबळ पुरावा आहे. अशा आराधनेत ईश्वराचे सुंदर सगुणरूप अंतर्बाह्य सचरलेले उपासकाच्या प्रत्ययास येते आणि स्वर्गीय आनदाची लज्जत कळूं लागते. अशी ही प्रत्यक्ष आराधना म्हणजे ध्यानच होय. तथापि त्यात सूक्ष्म भेद आहे. आराधनेत विचाराचे पृथक्करण होते. ध्यानात एकी-करण होते. आराधना हा भ्रमराचा गुंजारव आहे आणि ध्यान ही त्याच्या मधुपानातील तंद्री आहे. आराधनेत ईश्वराच्या एका लक्षणावरून दुसऱ्या लक्षणा-वर मनाचा सचार होतो, तो ध्यानात थाबून उपासकाचे चित्तैकाग्र्य होते."

ब्राह्मांच्या या विवेचनात एक मुद्दा फार महत्त्वाचा आहे; तो असा की, अद्वैती वेदान्त्याचा अनुभूतप्रकाश हे एक भ्रांतीचे स्थान आहे असे स रे

ब्राह्म निश्चयेंकरून सांगतात. तो दिव्य निर्विकल्प अनुभव म्हणजे ब्रह्मानुभव खास नव्हे असे त्यांचे निक्षून सांगणे आहे. त्या आत्मप्रकाशांत भासून दिसून येणारे जे नानात्व तें सोडावयाचें नसून तें सारे ब्रह्मस्वरूपच आहे असे ते मानतात. त्याची ब्राह्मीस्थिति लोकसंग्रहात्मक आहे. सिद्धाच्या सहजावस्थेतील व्यवहार ज्या उदासीन वृत्तीने होत असतील ती उदासीन वृत्तिही ब्राह्मांस प्रिय नाहीं. त्याच्या क्रियावान् ब्रह्मनिष्ठाची जात अगदींच वेगळी दिसते. 'आत्मरतिः क्रियावान्' आत्मरति हीच ज्याची क्रिया, अथवा ज्ञान, ध्यान, धारणा, हीच ज्याची क्रिया, हा अर्थ ब्राह्मास फार संकुचित व अनुदात्त वाटतो. असो.

आतां त्याच्या ध्यानाचा साविस्तर विचार करूं. ध्यान ह्या शब्दाचा उपयोग ब्राह्मवाङ्मयात किंबहुना आधुनिक वाङ्मयात बराच सढळपणाने केला जातो. गीतेतील ध्यान या शब्दाचा अर्थ ईश्वराच्या ठिकाणीं चित्तैकाग्रय असा आहे. आणि ह्याच अर्थाने महर्षि देवेंद्रनाथ आदिकरून ब्राह्मश्रेष्ठानीं त्याचा उपयोग केला आहे. बृहदारण्यकात ईश्वरी साक्षात्काराचा साधनमार्ग जो सांगितला आहे तो असाः

आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यो मैत्रेयात्मनो
वा अरे दर्शनेन श्रवणेन मत्या विज्ञानेन ऽ सर्वं निदितम् ॥ २।४।५

अर्थः — आपण म्हणजे जो आत्मा तो पाहिला पाहिजे, त्याचे श्रवण केले पाहिजे, त्याचं मनन व विदिध्यासन केले पाहिजे. हे मैत्रेयि, आत्म्याचे दर्शन, श्रवण, मनन आणि ज्ञान हीं झालीं असता या सर्वांचे ज्ञान होते. ह्यावर शंकराचार्य असे भाष्य करतात कीं, 'ह्या चार पदांतील पहिले दर्शन हें साधन नसून साध्य आहे. श्रवणाने प्रमाणांचा विचार व मनन निदिध्यासनाने श्रवणांत येणाऱ्या प्रतिबंधाचा परिहार, याप्रमाणे हीं तिन्ही साधनें अनुष्ठिलीं पाहिजेत. त्यास षड्संपत्तीची पूर्व तयारी पाहिजे. हे साधनानुष्ठान ज्याचे पुरे झाले तो पापकर्मापासून अलिप्त असतो. तो शान्त, दान्त, उपरत, तितिक्षु, समाधानयुक्त होत्साता आपल्यामध्येंच आत्म्याचे स्वरूप पहातो. सर्व आत्मा आहे असे पहातो. याला कोणतेही पाप ताप देत नाहीं. पापरहित इच्छारहित व संशयरहित असा हा ब्रह्मज्ञ होतो. ब्रह्मलोक तो हाच'. असे बृहदारण्यकांत वर्णन आहे, त्याचा पंडित सीतानाथ अनुवाद करतात.

" १ यम (अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह ); २ नियम ( शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान ); ३ आसन ( स्थिर सुखासन ); ४ प्राणायाम ( श्वासप्रश्वासयोर्गतिविच्छेद ) व ५ प्रत्याहार ( विषयांच्या असंसर्गानें आत्माभिमुख झालेल्या चित्ताप्रमाणे इंद्रिये होणे ), ह्याप्रमाणे पातंजलयोगांत बहिरंग साधने सांगितलीं आहेत."

" १ धारणा ( चित्ताचें एके ठिकाणीं स्थैर्य ); २ ध्यान ( वृत्तींचीं एकतानता ) व ३ समाधि ( ध्येयाकार वृत्तिप्रवाहरूप ध्यान ). ह्याप्रमाणे अंतरंग साधने सांगितली आहेत. हीं साधने सामान्यत्वे चित्तैकाग्र्यासाठीं सांगितलीं आहेत. वस्तुतः ती ब्रह्मसाधने नव्हत. तथापि आचार्यांनीं अपरोक्षानुभूतींत त्याच साधनांचा स्वीकार करून त्याचा अर्थ मात्र वेगळा दिला आहे. त्यांची धारणा म्हणजे—

यत्र यत्र मनो याति ब्रह्मणस्तत्र दर्शनात् ।
मनसो धारणं चैव धारणा सा परामता

जेथे जेथे मन जाईल त्या प्रत्येक वस्तूच्या ठिकाणी ईशत्व पाहून तत्स्वरूपी चित्तैकाग्र्य करणे यास ते धारणा म्हणतात. यात दोन गोष्टी मुद्दयाच्या आहेत, (१) सद्वस्तूबद्दल निःसंदेहवृत्ति व (२) प्रतिबंधास न जुमानतां त्या ठिकाणीं चित्तदार्ढ्य. ह्या मुद्दयाच्या गोष्टी साधल्या म्हणजे मनाची चचलवृत्ति स्थिर होऊन नामरूपात्मक पदार्थांत अनुस्यूत असलेल्या सद्वस्तूवर मन जडेल. ती सद्वस्तु आत्मरूप असल्यामुळे, 'सर्व खल्विद ब्रह्म' या धारणेच्या पायरीवरून "अहं ब्रह्मास्मि' या ध्यानाच्या पायरीवर जातां येते. आचार्य म्हणतातः—

ब्रह्मैवास्मीति सद्वृत्त्या निरालंबतया स्थितिः ।
ध्यानशब्देन विख्याता परमानन्ददायिनी ॥

म्हणजे मी ब्रह्म आहे या भावनेत सद्वृत्तिपूर्वक निरालंब स्थितींत राहणें याचे नांव ध्यान. त्याने परमानंदाची प्राप्ति होते. या आचार्यांच्या व्याख्येत निरालंब म्हणजे विषयविचाररहित अथवा निर्विषय असा भावार्थ आहे. परंतु तो पंडितजींस मान्य नाहीं. त्यांचे म्हणणे असे आहे कीं, अहं 'ब्रह्मास्मि' ह्या वृत्तींतही उपास्य-उपासकांमधील भेदाचा पूर्ण निरास होणें अशक्य आहे. ऐक्यभावावर विशेष लक्ष ठेवावें इतकेंच पंडितजींच्या मताने म्हणतां येईल.

यामुळें समाधीची व्याख्या आचार्यांनीं केली आहे तीही त्यांस मान्य नाहीं. आचार्य म्हणतातः—

निर्विकारतया वृत्त्या ब्रह्माकारतया पुनः ।
वृत्तिविस्मरणं सम्यक् समाधिर्ज्ञानसंज्ञकः ॥

म्हणजे वृत्तीस निर्विकार व पुन्हा ब्रह्माकार करून मनोवृत्तीचे पूर्ण विस्मरण होणे, हीच ज्ञानसंज्ञक समाधि होय. ही व्याख्या ब्राह्मांस संमत नाहीं. " ब्राह्मांचें म्हणणे असे कीं, विस्मरण हें समाधीचे मुख्य अंग नव्हे आचार्यांची 'नेति नेति' ही व्यतिरेकी प्रणालि गीतेच्या सहाव्या अध्यायांतील आहे; परंतु त्याहून ब्राह्माची पद्धत जास्त श्रेष्ठ आहे. ती गीतेतील १० व ११ अध्यायांतील अन्वयप्रणाली होय. ती आचार्यपंथी वेदान्त्यांस माहीत नाहीं असे नाहीं; पण त्या पद्धतीस ते थोडे कचरतात! ऐक्याचा दृढबोध होण्यासाठीं प्रथम व्यतिरेकपद्धतीचा अवलंब करावा आणि मग ज्यांचा व्यतिरेक केला त्या सर्व पदार्थांचा ऐक्यांत समन्वय करावा, म्हणजे दिक्कालांनीं व्याप्त असे हे सर्व ईश्वराचे विश्वरूप आहे असे पाहावे. हीच ब्रह्मभावना वाढीस लागेल तरच धर्माला व्यावहारिक महत्त्व येईल. कौटुंबिकमंडळ, रस्त्यातील दाट रहदारी, बाजारचा गोगाट, शाळा व कचेऱ्यातील उद्योग, इतकेच काय पण अपरिहार्य असेल तेव्हां रणांगणावरील रक्तपात, ह्याप्रमाणे संसारांतील सर्व लहानमोठे प्रकार हे ब्रह्माचेच व्यक्त स्वरूप आहे असे दिसूं लागेल. ह्या अन्वयसमाधीने आपल्याला आपल्या जीवनाच्या ध्येयाची कल्पना येते. रोज ह्या समाधीचा अभ्यास करीत गेलें, म्हणजे समाधिभावांत असतां आनंद-पावित्र्यादि जे दिव्य अनुभव येतात, ते एरवीं प्रपंचांत येत नाहींत, यामुळें जें असमाधान वाटते त्याची कल्पना सामान्य प्रापंचिकांस अथवा धार्मिक वृत्तीच्या माणसांस येणे शक्य नाहीं. हें असमाधानच साधकास सहज योगाकडे प्रवृत्त करते आणि अखेर त्यास सिद्धावस्था प्राप्त होते."

पंडित सीतानाथ म्हणतात कीं, " आचार्यपंथी अद्वैतवाद्यांवरील सांख्य द्वैताचा संस्कार गेला नाहीं. दिक्कालांनीं परिच्छिन्न असे पदार्थरूप जे (व्यापक) मनाचे मनोविकार ते त्यांस अनात्म व मायाकार्य वाटतात, ब्रह्मरूप वाटत नाहींत. यामुळें त्यांस शून्यरूप मानून त्यांचा विसर पाडण्याचा ते प्रयत्न

करितात. परंतु समाधिविवर्जित कालांत सृष्टीची प्रतीति सर्वांस सारखीच असते. म्हणून प्रपंचाचा बळेच त्याग करून कैवल्याचा अनुभव घेण्यासाठीं ते एकांताचें सेवन करतात. स्थूलसूक्ष्म सर्व भेदांचा निरास करणें त्यांस जरूर वाटते. सविकल्प आणि निर्विकल्प असे ते समाधीचे दोन प्रकार मानतात. सविकल्पांत ज्ञाता व ज्ञान एवढाच भेद राहतो, तोही निर्विकल्प समाधींत रहात नाहीं म्हणजे निर्विकल्प समाधींत ज्ञाताज्ञेय एकरूप होतात." परतु, पंडित म्हणतात कीं, " ही भूल आहे. सुषुप्तीहून निर्विकल्प समाधीची भिन्नता दर्शविणारी वृत्ति निर्विकल्प समाधींतही असते, हे सदानंदयोगी कबूल करितात. परंतु ती वृत्ति जाणवत नाहीं असे ते जें म्हणतात ते बरोबर नाहीं. कारण वृत्ति आणि ती जाणवत नाहीं हे म्हणणे परस्परविरुद्ध आहे. त्या वृत्तीकडे लक्ष दिल्यास ब्रह्मैक्यबोधाचा भंग होतो असे जे वेदान्त्यांस वाटते, ते त्यांचे केवळ अज्ञान आहे. ही भेदक वृत्ति उपेक्षणीय नसून उलट तीच उपासनेचा व त्यानंतरच्या दिव्य अनुभवांचा आधार आहे. तात्पर्य, भेदाचा निरास करण्याचा निष्फळ प्रयत्न करून मायावादी ब्रह्मानंदाच्या तीरापर्यंत फार तर जातात; पण त्यापुढील प्रेमानंदाच्या अनुभवास ते सर्वस्वीं मुकतात ! उलटपक्षीं ब्राह्मसाधकांस असा अनुभव येतो कीं, जो भेद मायावाद्यांस मान्य नाहीं, तो भेद तत्त्वतः मुळांतच आहे, इतकेच नव्हे तर जीवेश्वर ह्या दोन व्यक्तींतील नैतिक व भावनात्मक संबंध त्या भेदावरच अवलंबून आहे. हा भेदसंबंध अनिर्वचनीय आहे. वात्सल्यप्रेमाहून तो जवळचा आहे व पतिपत्नीप्रेमाहून तो मधुर आहे. तो केवळ अनुभवगम्यच आहे. ह्या अनुभवानंतर उपासकाची सद्रूपाची आराधना शिव आणि सुंदर रूपांत परिणत होते."

" ईश्वराचे (Good) शिवरूप जाणावयाचे, म्हणजे जीव-ईश्वरभेदाचें तात्त्विक स्वरूप लक्षांत घेतले पाहिजे.

" नानवाप्तम् अवाप्तव्य वर्त एवच कर्मणि "

याप्रमाणें ईश्वराच्या निरालस व अखंड सक्रियतेंत त्याच्या ठिकाणीं व्यक्ताव्यक्त असलेले जे जीव त्यांचे भलें व्हावे, हीच परमेश्वराची एक इच्छा असते, ही भावनाही जागृत पाहिजे. मनुष्य बरेंवाईट कांहींही करीत असो, ते तो बऱ्या-करितांच करीत असतो. बरें काय याबद्दलची पामर व सिद्ध यांची कल्पना

अत्यंत भिन्न असली, तरी दोघांची वृत्ति तत्त्वतः सुखाभिमुखच असते. ही वृत्ति हें ज्याअर्थी व्यापक मनाचे व्यक्तस्वरूप आहे त्याअर्थी त्या समष्टि मनाची ही अशीच प्रवृत्ति असली पाहिजे हे उघड झाले. फरक इतकाच कीं, ईश्वराची शुभेच्छा जीवाप्रमाणे प्रमादशील व संकुचित नसून ती बिनचूक व परम उदात्त असते. तसेच त्या परम समर्थाची इच्छा व इच्छेची पूर्तता ह्या एकरूप असतात. ह्या दोन टोकांच्या दरम्यान जीवाने आपले शिवरूप ध्येय अधिकाधिक उदात्त व व्यापक करावयाचे आहे. असे होता होतां आपल्या ध्येयाची विश्वप्रपंचाशी समव्याप्ति होते. आपले सर्व व्यवहार ईश्वराच्या इच्छेनुरूप होत आहेत, अशी दृढभावना उत्पन्न होते आणि एका व्यक्तीच्या सुखापासून सर्व भूतमात्राच्या सुखापर्यंत मजल जाऊन अखेर परमेश्वराची प्रसन्नता हा एकच हेतु लहानमोठ्या सर्व क्रियेत दिसू लागतो."

" हे परमेश्वराचें प्रेम केवळ कार्यानुमेय नसून प्रत्यक्ष आहे, ही भावना मग जागृत होते. आत्मप्रीति हे त्याच्याच प्रीतीचे व्यक्त स्वरूप आहे, कौटुंबिकाचे प्रेम हेही भगवताच्याच प्रेमाचे दृश्य आहे. इतकेच नव्हे, तर अत्यंत प्रेमळ आई मुलाला क्षणभर विसरेल, पतीची सेवा करणारी स्त्री झोपी जाईल; पण परमेश्वराच्या प्रेमास खंड नाहीं, प्रत्यवाय नाही व त्याच्या प्रेमास कसल्या मोबदल्याची अपेक्षाही नाही. जीवेश्वराच्या प्रेमाचा व्यापार प्रत्यक्ष आहे. ईश्वर हृदयस्थ असून स्मृति आणि ज्ञान यांचा प्रेरक आहे. प्रत्येक क्रिया तोच करीत आहे. पाण्याचा घोट आणि अन्नाचा घांस तोच आपल्या हातानीं जीवाच्या तोडांत घालीत आहे. अन्नाचे पचनही तोच करीत आहे. आपल्या प्रिय माणसातील मधुर शब्द, गीत, स्मित, इत्यादि मौजा ह्या सर्व ईश्वराच्या प्रेमसागरावरील लहरी आहेत. अशी ही शुभभावना वाढवीत वाढवीत, दुःख, जरा, रोग, मृत्यु इत्यादि भयकर आपत्कालीही ईश्वराचा अभय कर आपल्यावर आहे. म्हणूनच त्यांतूनही तरणोपाय आहे, अशीही निष्ठा वाढवावी. अशी वृत्ति झाली कीं जगिक व्यवहाराच्या कल्होळातही अतरातील विवेकवाणीचा शब्द स्पष्ट कळूं लागतो. मग कर्तव्य तीच इच्छा व श्रेय तेच प्रेय असे होते. यासाठीं आत्मा आणि परमात्मा, मन आणि सृष्टि हीं तत्त्वतः एक आहेत, ही भावना मानसिक विचारांत अथवा बाह्य सृष्टीच्या अवलोकनांत नित्य जागृत ठेवावी. प्रतिक्षणीं ईश्वराच्या सान्निध्याची साक्ष असूं

द्यावी. ईश्वर सृष्टीमागे दडला नसून उलट तो विश्वरूपाने व्यक्त झाला आहे. ईश्वराचें विश्वप्रेम ही अत्यंत अद्भुत कादंबरीपेक्षांही दिव्य व अद्भुत कादंबरी आहे, आणि ईश्वराचे सौंदर्य अल्पांशानेही प्रतिबिंबित करणारें महाकाव्य अद्याप निर्माण व्हावयाचें आहे."

शिवरूप विश्वरूपांत कसे पहावें ह्याबद्दल पंडितजींचे विचार वरील प्रकारचे आहेत. आतां प्रत्यक्ष व्यवहारांत आपण आपले कल्याण साधण्यासाठीं ते प्रार्थना हे साधन सांगतात. ते आणखी असे सांगतात की, "आपल्या खऱ्या कल्याणाची आपली समजूत इतकी कोती असते कीं, त्यासाठीं ईश्वराची प्रार्थना करण्याची आपल्याला आवश्यकताच वाटत नाही; पण पश्चात्ताप आणि प्रार्थना ह्यांतच ब्राह्मधर्माचा आरंभ आहे. केशवचंद्रांच्या अव्वल कारकिर्दींतच पश्चात्तापाच्या दुःखाने एकसारखे रडत बसणे व मोठमोठ्यांनीं हुंदके देत देवाची करुणा भाकणे असे प्रकार ब्राह्मांच्या सामाजिक प्रार्थनेत वरचेवर होत असत. कांही खिस्ती व वैष्णवपंथाचेही प्रारंभीचे अनुभव असेच सांपडतात. वरील पथांच्या आद्य संस्थापकाची ही जी विशेष कळकळ्याची वृत्ति दिसते, ती त्याच्या स्वतांच्या कल्याणासाठी नसून इतर लोकांची पापप्रवृत्ति पाहूनच त्यांच्या अंतःकरणाची कालवाकालव होत असावी हे उघड आहे. ते सर्वांच्या कल्याणाकरिता वरीलप्रमाणे सद्गदित अंतःकरणानें ईश्वराची वरचेवर करुणा भाकीत. अशा रीतीने खिस्त-चैतन्यासारख्या शुद्धात्म्यास अपरपार दुःख होई खरें; पण त्या योगाने ईश्वरास लवकर करुणा येऊन जगातील पापाचे परिणाम कांही कमी होत असत, अशी समजूत आहे. ह्याप्रमाणे पाप्यांकरितां मध्यस्थी ही गोष्ट जरी सर्व ब्राह्मांस मान्य नसली, तरी त्यावरून प्रकृत विषयापुरता एक मुद्दा विशेष लक्षात घेण्यासारखा आहे, तो हा कीं, जीझस खाइस्ट किंवा चैतन्य यासारख्या साधुपुरुषास माणसांतील वैगुण्य व दोष अधिक स्पष्ट जाणवल्यामुळे त्याच्या प्रार्थनेस तितकी तीव्रता आली. यास्तव आपल्या ठिकाणीं किती गोष्टींची कमतरता आहे याचे नेहमीं आत्मनिरीक्षण करून आपली मनोभूमिका प्रार्थनेस योग्य केली पाहिजे. ईश्वराच्या घरचे कायदे अनुल्लंघनीय असले तरी प्रार्थना हा त्यापैकींच एक कायदा आहे. कांहीं फले प्रार्थनेनेच मिळतात. हा एक कायदा पाळल्यानें दुसऱ्या कायद्यांचे बंधही दूर होतात. आपल्या अपूर्णतेची तळमळ व त्या-

साठीं ईश्वराच्या पायाशीं शरणागति अशी मनोवृत्ति प्रार्थनेच्या वेळीं पाहिजे. आराधना आणि ध्यान यांनीं उपासकाचे मन कितीही सुसंस्कृत झाले, तरी वरील प्रकारच्या खऱ्या प्रार्थनेशिवाय अहंकाराची ग्रंथि सुटणे अशक्य आहे. आणि एकदां ही अहंकाराची गांठ सुटली, म्हणजे प्रार्थनेतील उत्सुकता व त्यास लगेच ईश्वराकडून मिळणारी उलट स्फूर्ति किंवा प्रेरणा अशी श्वासोच्छ्वासा-प्रमाणे ( Aspiration and inspiration ) क्रिया व प्रतिक्रिया यांची संतत धारा सुरू होते. ह्या बाबतींत पंडितजी आणखी असे म्हणतात कीं, " ब्राह्मांचा ईश्वरवाद ज्यांस समजला त्यांस ईशप्रेरणेच्या अनुभवाबद्दल शंका येणे अशक्यच आहे. अशा प्रकारच्या ईशप्रेरणेची जी दुर्मिळता वाटते याचे कारण खऱ्या प्रार्थनेचा अभाव हेच होय. यास्तव खिस्ती धर्मशास्त्र सांगते त्याप्रमाणे अखंड प्रार्थना हेच जीवाच्या तारणाचे साधन, किंबहुना हेच जीवाचें तारण होय, असे निश्चयेकरून समजावे."

---

## प्रकरण एकविसावें

# ईश्वरपरायणता

ब्राह्मसाधनांपैकीं उपासना हा एक अभ्यास आहे. उपासनेने अदृष्ट तयार होते, अशी ब्राह्मांची भावना नाहीं. त्यांचे म्हणणे असे आहे कीं, उपासनेच्या अभ्यासाचे प्रत्यंतर लौकिक आचारांतही दिसून आले पाहिजे. लौकिक कर्मा-शिवाय वेगळे असे शास्त्रीय कर्म ते फारसे मानीतच नाहींत. व्यवहार हीच त्यांची धार्मिक वृत्ति, लोकसेवा हीच त्यांची ईश्वरपरायणता होय. यासंबंधीं पंडित सीतानाथ तत्त्वभूषण यांचे विचार आम्ही पुढे देत आहोंत.

" मानवी विचाराची प्रगति पूर्वपक्ष, उत्तरपक्ष आणि समन्वय; विषय, विषयि आणि केवळ; अभेद, भेद आणि भेदाभेद अशा तीन टप्प्यांनीं होत असते. प्रथम एकच पदार्थ पहावा, पुढे दुसरा पहातांच त्यांत भेद मानावा; आणि नतर विचारांतीं दोन्ही तत्त्वतः एकरूप मानावे, असे करतां करतां सर्वांचा अखेर केवलात समन्वय करावा, अशी ही विचाराची गति आहे. मागिल प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे प्रार्थना हा कोणत्याही धर्माचा आरंभच असणार. जीवाच्या प्राथमिक अवस्थेत त्याच्या प्रार्थना ऋग्वेदांतील प्रार्थनां-प्रमाणे शारीरिक सुखसोयींसाठीच असणार हे सहज आहे."

रूपं देहि जयं देहि यशो देहि द्विषो जहि ।
विदेहि द्विषतां नाशं विदेहि बलमुच्चकैः ॥
भार्यां मनोरमां देहि मनोवृत्त्यानुसारिणीम् ।
विद्यावन्तं यशस्वन्तं लक्ष्मीवन्तञ्च मां कुरु ॥

" ही मार्कंडेय पुराणांतील देवीची प्रार्थना ह्याच नमुन्याची आहे. तात्पर्य, ऋग्वेदकाल जाऊन जरी पुष्कळ वर्षे लोटलीं, व आजचा काल सुधारणेचा म्हणून लोक प्रौढी मिरवूं लागले, तरी ह्याही कालांत वरील प्रकारच्या प्रार्थना करण्याची प्रवृत्ति गेली आहे असे नाहीं. परंतु इंद्रियसुखांबद्दल लालसा ही जरी कालांतराने पूर्ण नष्ट न झाली तरी विचाराच्या प्रगतीबरोबर इंद्रियसौख्यापेक्षां अधिक योग्यतेचे विषय मनुष्यास दिसूं लागतात. आणि

मग ऐहिक आणि पारलौकिक, जडात्मक आणि आध्यात्मिक, प्रापंचिक आणि धार्मिक असे विषयांचे भेद पडून त्या विषयांच्या साधकांचे देव आणि असुर असे दोन विरोधि वर्ग बनतात. आणि जे ईश्वराच्या शोधास लागले त्या साधकांस, साऱ्या ऐहिक गोष्टी, इंद्रिये व विषय, घरदार, बायकामुले, सगेसोयरे, हे सारे पदार्थ परमार्थप्राप्तीस प्रतिबंधक असे वाटतात. पूर्वी जे ऐहिक विषयवैचित्र्यांत वासनेचे तारतम्य असे, ते आतां ऐहिक आणि पारमार्थिक या दोन विषयांत सुरू होते. इंद्रियसौख्यापेक्षां आत्मप्रसादाची गोडी वाढते. प्रेय आणि सौंदर्य यांची आवड निरपेक्ष होते. श्रेय आणि प्रेय यांचा झगडा सुरू होतो. प्रेय नकोसे वाटते आणि मनुष्याच्या गौण इंद्रियवृत्ति पशुतुल्य वाटून त्या जगातून नाहीशा करण्याकरितां मनुष्य झटूं लागतो. असे हे द्वैत मनुष्याच्या जीवनक्रमांत अपरिहार्य आहे आणि इष्टही आहे. पण या द्वैताचा नाश म्हणजे प्रकृतीचा लय, जडाचे मिथ्यात्व मानून, इंद्रियांचे दमन, साधून, साधनविषयांचा त्याग करून,- सारांश,—मानवी जीवितांतील पशुवृत्तींच्या बळी घेऊन, करावयाचा नाही. कारण ह्या द्वैताला आधार एकाच परमात्म्याचा आहे. दोहोंचे कारण तोच आहे. आणि त्या द्वैतांतच त्याची पूर्णता आहे."

"आपल्या इंद्रियांच्या स्वाभाविक प्रवृत्तीस पशुवृत्ति म्हणून मारण्याचे कारण नाही. मनोविकार कांही कोणाचे शत्रु नव्हत. इतकेच नव्हे तर योग्य व्यापक दृष्टीने पहाता असे दिसते की, पारमार्थिक जीवनांतीलही ते अवश्य भाग आहेत. जर इंद्रियवासना नसतील तर यमनियमाचे महत्त्व काय? नीतिमर्यादा कशाला? आणि सामाजिक बंधनाचीही थोरवी कोणती? खरोखर साधुसंतांच्या उद्गारांत वासनांवर जे कोरडे ओढलेले आढळतात ते अगदींच निरर्थक आहेत. वासनावर विवेकाचे नियमन असावे इतकाच त्याचा अर्थ घेतां येईल. विषयासक्ति आणि विषयविरक्ति हीं दोन विरुद्ध टोके आहेत. त्यांचा अन्वय भक्तीत होतो. विरक्तीने शुद्ध केलेली जी आसक्ति तीच भक्ति होय. भक्ति म्हणजे प्रसंगोपात्त ईश्वरासंबंधीं प्रेमाचा पान्हा फुटणें असेच केवळ नव्हे, तर सर्व विषयजात, सारे पदार्थ, हे ईशतत्त्वांतील असून ते त्याचेच आहेत. खाणेपिणे, घरदार, बायकापोरे, गांव आणि देश इत्यादींवरील आपलें प्रेम म्हणजे ईश्वराच्याच व्यक्त रूपांवरील प्रेम होय.

अशा रीतीनें मनुष्याच्या साऱ्या ऐहिक जीवनास प्रकाशित करून तजेला आणणारी तीच खरी भक्ति होय. तीच साध्य करण्याकरितां साधकाची जन्मभर धडपड असावी. या आयुष्यांत आपली एखाद्या विषयावर ही व्यापक दृष्टि सुटून संकुचित दृष्टीने आसक्ति बसेल. मग आपण त्या विषयाच्या पाशांत अडकलो असे आढळून येताच आपण त्या विषयबंधाचा द्वेष करूं लागूं, पण पुढे विचाराअंतीं त्या प्रथम प्रिय व नंतर द्वेष्य झालेल्या पदार्थांत जेव्हां आत्मरूप आपण पाहूं, तेव्हा आपल्याला कळून येईल कीं, पहिली आसक्ति अनाठायी नव्हती. पण ती अंध व झुकलेली होती इतकेच. अर्थात् मागून जेव्हां त्याच विषयावर आपण प्रेम करूं, तेव्हां तो देवाचा विषय म्हणूनच प्रेम करूं. अशा ह्या अभ्यासात आपल्याला मिळणारे यश सापेक्षच असणार. पूर्ण हे जर आपले ध्येय आहे; तर आपले यश पूर्ण कसे असेल? पण आपले यश सापेक्ष असले, तरी आपणाला जो लाभ होतो, तो पूर्णाचाच आहे, तो सापेक्ष नाही."

"ईश्वराशीं ऐक्य जोडावे यातच खरे आत्मकल्याण आहे. आणि मनुष्याच्या आयुष्यातील निरनिराळीं कर्तव्यें आणि व्याप ही सर्व ते ध्येय गाठण्याचीच तयारी आहे. बरे आणि वाईट, पाप आणि पुण्य हा भेद ओळखून चागल्याचा पुरस्कार करावा हे नीतिमत्तेचे काम आहे. परतु ईश्वरासंबधीं प्रेमात सर्व चागल्या गोष्टींचा समावेश होतो, असे मानुन त्याच ध्येयाकडे सदैव प्रवृत्ति असणे हीच व्यवहारातील खरी धर्मपरायणता होय. वर दिलेल्या मानवी विचारप्रगतीच्या पहिल्या किंवा दुसऱ्या टप्प्यावर जे आहेत, त्यांस दुसऱ्या अनेक कर्तव्यापैकीं ईश्वरभक्ति हे एक कर्तव्य वाटते. ईश्वरी स्फूर्तीपेक्षा पुरस्कारावर त्याची जास्त भिस्त असते. परतु जो अन्वयबुद्धीने मानवी जीवनाचा विचार करतो, त्यास सर्व पापाचे व दुःखाचे मूळ ईशसानिध्याची विस्मृति हे एकच आहे, असे वाटते. ज्याच्याकडे देवाने पाठ केली त्याच्या पाठीशी सर्व संकटे व आपत्ति असतात, असे तो मानतो. आपला नेहमीचा सागाती जो ईश्वर त्याजकडे नुसते पाहताक्षणीच संकटास तोड देण्याच्या अगोदर संकटच आपले तोड काळे करते, असा त्याचा अनुभव असतो. ईश्वरपरायणता हे त्याचे रोजचे केवळ विवक्षित वेळांचे आन्हिक नसते; तर अखंड ईश्वरपरायण वृत्तीने त्याची सारी दिनचर्या पावन झालेली असते.

रोजचा अगदीं क्षुल्लक व्यवहार पाहिला तरी ती त्याची उपासनाच असते. तथापि त्यांतही ईश्वरपरायण पुरुषाची दिनचर्या स्थूल मानाने पहावयाची, तर तो प्रातःकाळीं ब्राह्म मुहूर्तावर उठतो. पुढील दिवसभर करावयाच्या कामाचा कितीही बोजा त्याच्या मनावर असला तरी कुचराई व दिरंगाई न करतां तो ईश्वराचें प्रातःस्मरण करतो. ज्या दिवसाच्या आरंभींची अमृत वेळ अशी साधली त्याच्या त्या दिवसाप्रमाणें आयुष्यही सत्कार्यांत व्यतीत होते. केवळ उपासनेच्या आनंदात दंग होऊन तो आपल्या व्यवहारास चुकत नाहीं. व्यवहारांत ज्यांच्याशीं त्याचा संबंध येतो, ती सर्व ईश्वराच्या घरचीं माणसें आहेत, असेंच तो समजतो. तो कोणाचेंही मन दुखवीत नाहीं. कसलेंही पाप करीत नाहीं. त्याच्या हातून काहीं अपराध अगर चूक झाली तर त्यानंतर शक्य तितके लवकर निदान रात्रीं निजतांना तो पश्चात्तापपूर्वक देवाची क्षमा मागतो. व दिवसात काया-वाचा-मनाने जे दोष घडले असतील त्या सर्व दोषांची ईश्वरापुढील पश्चात्तापाच्या कुंडात तो रोज आहुति देतो. ज्याचा अपराध झाला असेल त्याचीही क्षमा मागण्यास त्याला कमीपणा वाटत नाही."

"ज्यांच्या हातून मोठे अपराध होण्यासारखे नसतात त्यांच्याकडूनही स्त्रियांच्यासंबंधी पापवासना आणि दुसऱ्याची अनादरपूर्वक निंदा किंवा टीका असे अपराध होण्याचा संभव असतो. परंतु यासाठी सायंकाळचीं तरुण व हौशी स्त्री-पुरुषांचीं संमेलनें व वादविवादविषयक सभा, सुंदर व सुशोभित असे स्त्रियांचे समाज, असे व्यवहारात येणारे कसोटीचे प्रसंग साधकाने टाळूं नयेत; उलट मुद्दाम जोडावे. आणि त्यातून निर्विकार मनानें पार पडण्याचा प्रयत्न करावा. सुंदर स्त्रियांच्या संगतीत राहून ज्याच्या नजरेस किंवा मनास पाप शिवत नाही, तीच माणसं कसोटीस उतरल्यामुळे, असे प्रसंग टाळणाऱ्या लोकांपेक्षा अधिक श्रेष्ठ ठरतात. त्यासाठी ईश्वरपरायणतेचा दृढाभ्यास पाहिजे, त्यावाचून परस्त्रियांबद्दल मायबहिणीची बुद्धि उत्पन्न होणार नाहीं. उत्तरोत्तर काल असा येत आहे कीं, दिनचर्येंतील स्वास्थ्य कमी होऊन चरितार्थाकरिता कष्टच फार करावे लागतात; परंतु त्यातही सकाळीं, संध्याकाळीं, भोजनाचे वेळीं व कार्यारंभीं ईश्वराचें मनःपूर्वक चिंतन करण्यास कसा तरी वेळ काढावाच. ज्यास इतकाही वेळ मिळत नाही असें वाटेल,

तो अभागी होय. अशा ईश्वरपरायणतेत सर्व दिवस गेल्यावर आळस, थकवा, औदासीन्य अशा वृत्तीत झोपीं न जातां, त्या शाश्वत सुखकंदाच्या आलिंगनांत झोपीं जावें."

वरील विवेचनावरून हे दिसून येतें कीं, ब्राह्माच्या ब्राह्मी स्थितीची कसोटी निजबोधांत नसून बाह्य वृत्तीत आहे. ते असे म्हणतात कीं, " ईशप्रेमाचे रूपांतर जर मानवी प्रेमांत होणार नाहीं, तर ते खरें ईशप्रेमच नव्हे. जो आपल्या प्रत्यक्ष बंधूवर प्रेम करीत नाहीं, तो परोक्ष ईश्वरावर कसे प्रेम करील ? ज्यास मनुष्यांत बंधुत्व दिसत नाहीं, त्याचा देव–केवळ काल्पनिक होय. तो सर्वभूतांतरात्मा नव्हे.

यस्तु सर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्यति ।
सर्व भूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ॥ —ईश, ६.

**अर्थ**:—जो आत्मरूपांत सर्व वस्तु पहातो आणि सर्व वस्तूंत आत्मरूप पहातो, तो कोणाचाही द्वेष करीत नाही.

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥

—गीता, ६।३२.

**अर्थ**:—दुसऱ्याचें जें सुखदुःख तें ज्यास आपलेंच वाटतें तोच परम योगी होय.

आत्मवत् सर्वभूतेषु हेंच खऱ्या माणुसकीचें ध्येय आहे. ज्याचे आप्तइष्ट, सुहृद, सोबती, देशबंधु यांच्यावर प्रेम नाहीं तो भ्रांतचित्तच जाणावा. मानवी प्रेमाची वाढ ध्यानधारणा आणि व्यवहार ह्या दोन्ही तऱ्हेनें झाली पाहिजे. परहितदक्षतेला आरंभ घरींच होतो, हें खरें; पण त्याची व्याप्ति घरातच संपतां कामा नये. ज्यास परहिताकडे लक्ष देण्यास सवड होत नाहीं, तो लहरी प्राणि स्वताच्या कुटुंबाकडेही दुर्लक्षच करणार ! याप्रमाणे कुटुंब, समाज, देश व मानवकोटि ह्यांचे सापेक्ष संबंध आहेत. या संबंधाकडे लक्ष न देता जो स्वार्थांतच गर्क राहतो, तो नास्तिकच होय.

आता कोणी म्हणतील कीं, मनुष्याचें ज्या मानानें सामर्थ्य असेल त्या मानानेंच त्याचें प्रेमाचें क्षेत्र कमीअधिक असणार. तर हें म्हणणें बरोबर नाहीं. आपल्या मनाचा मोठेपणा आपल्या सामर्थ्याच्या संकोचानें संकुचित

होण्याचें कारण नाहीं. शेजारधर्म, अतीत-अभ्यागत, पाहुणचार, दीन-दुबळ्यांचा समाचार, निरनिराळ्या स्थानिक संस्थांचीं कामें, हीं कर्तव्यें सर्वांच्या आटोक्यांतीलच असतात. याप्रमाणें सामाजिक कर्तव्ये बजावीत असतां आपल्या आयुष्यांतील विशेष कार्य कोणते ह्याचा प्रत्येकानें शक्य तितका लवकर निश्चय करावा. जो कोणी ईषणा सोडून स्वच्छेनें ईश्वराची प्रार्थना करून सत्कार्यास तयार होतो, त्यास त्याच्या आयुष्यांतील मुख्य कार्य कोणते ते ईश्वराकडून हटकून समजते. तो त्याच्या आयुष्यास खरें वळण लागण्याचा समय असतो. एकदां ते ध्येय समजले, म्हणजे त्यासाठीं वाटेल त्या हाल-अपेष्टा व लोकापवाद सोसण्यास मनुष्यानें तयार असले पाहिजे, योगक्षेमाची चिंता सोडली पाहिजे. कारण जो प्रपंचाची व सत्कार्याची अशा दोन्ही चिंता वाहतो, त्याच्या हातून कांहींच होत नाहीं. पुष्कळ वेळा आपल्या ध्येयाच्या साधनांतच ईश्वर आपल्या चरितार्थाचीही सोय लावतो. आणि केव्हां केव्हां ती स्वतंत्रही पहावी लागते. केवळ चरितार्थाकरिता वाटेल तो हलका व्यवसायही करावा पण आपल्या आयुष्याचें ध्येय साधण्यातच आपण आपली पराकाष्ठा करावी. चरितार्थसाधनाकडे जास्त लक्ष ठेवूं नये आणि अशा रीतीनें आपला इष्ट व्यवसाय व चरितार्थसाधन हीं जरी भिन्न असलीं, तरी दोहों मिळून ईश्वरसेवा हे आपले एकच ध्येय होतें अशी निष्ठा बाळगावी."

" **संतसमागमः**—स्वतंत्र धर्मविचारांत फायद्याप्रमाणे तोटेही असतात. जुन्या धर्मनिष्ठाची उत्कटता आणि धर्माची अंतर्दृष्टि धर्मसुधारक ल्यूथर व दुसरे एकेश्वरीपंथी यांच्यात राहिली नाहीं. त्याचप्रमाणे ब्राह्मसमाजाच्या पहिल्या अमदानींत जो उत्साह आणि भक्तीचा पूर लोटला होता तो दिवसानुदिवस कमी होत जाऊन पुढे पुढे ब्राह्माचे जीवन अगदींच शुष्क व फोल दिसूं लागले. स्वतंत्र विचाराच्या माणसाने योग्य खबरदारी न ठेवल्यास त्याची अंतर्भावना नष्ट होऊन सामान्य नीति आणि व्यवहार यांपलीकडे त्याचा धर्मभाव रहाणार नाहीं. गुरु-शास्त्रांवरील प्रामाण्यबुद्धि नाकबूल करून आत्मप्रतीति हीच ज्ञानाची गुरुकिल्ली ठरवली, दैवी अवतार खोटे मानून प्रत्येक जीवाने साक्षात् ईश्वराशीं संबंध ठेवावा, असे एकदां मत झाले, म्हणजे सत्संगति व ग्रंथावलोकन याची मुळीच आवश्यकता नाहीं असें वाटूं लागतें. सर्वच शास्त्रें आणि धर्मात्मे प्रमादशील ठरले, त्यांच्या सर्वांच्याच

शिकवणींत सत्यासत्याची भेसळ आहे असें एकदां मानले, म्हणजे सामान्यत्वें सर्वच धर्म आपले व विशेषेकरून कोणताच धर्म आपला नाहीं, असे होऊन सर्व धर्मांचा अभ्यास होणे तर दूरच राहते; पण कोणत्याही विशिष्ट धर्माचा अगर पंथाचा अभिमान सोडल्यामुळे शेवटी कोणत्याच धर्माचा अगर पंथाचा अभ्यास होत नाहीं. सर्व धर्मांचा अभ्यास करणारे राममोहन क्वचितच निर्माण होतात. इतकी बुद्धिमत्ता सामान्य जनांस नसतेच. सामान्य लोक व्यक्तिमाहात्म्यामुळे किंवा संप्रदायनिष्ठेमुळेच एकत्र होतात; पण अशा संप्रदायाच्या आजच्या उदारमतवादी पुढाऱ्याची कोणत्याच प्रकारच्या धर्ममतांवर विशेष प्रकारची निष्ठा नसल्यामुळे ते जो सार्वत्रिक धर्म आणि बुद्धिवाद सांगतात, तो केवळ कल्पनामय व रूक्ष असून त्यात काहीच रंग येत नाहीं आणि मग ज्यास काहीच करावयास नको त्या आळशी आणि उथळ मनाच्या लोकांस ही चांगलीच सबब मिळते."

" बाह्यप्रामाण्यापेक्षा अंतःप्रामाण्य श्रेष्ठ खरें; पण असें नुसतें तोंडाने वरवर म्हणणाऱ्या भ्रांतास हे कळत नाहीं, कीं आपल्या आराधना, प्रार्थना आणि योग त्याचप्रमाणे देवधर्मासंबंधी आपले विचार यात स्वतंत्र स्फूर्ति आणि अपरोक्षता असावी तशी क्वचितच असते. बाह्यप्रामाण्याची व बहिरंगसाधनाची जोड घेतल्यावाचून उपासकास स्वतंत्र रीतीने अंतरंगसाधनाची दृढता संपादितां येत नाहीं हे ह्या चुकलेल्या साधकास कळत नाही. आपले आजचे जे विचार आहेत, ते आपले जन्मसंस्कार व शिक्षण याचे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष परिणाम आहेत. अर्थात् त्याच विचाराची क्रान्ति अगर विकास व्हावयाचा ताही जुन्यानव्या विचाराच्या संसर्गानेच होणार. उपासना हे जरी आध्यात्मिक उन्नतीचे साधन असले, तरी ते एकच साधन ईश्वराने नेमिले आहे, असें नाही. सच्छास्त्र आणि सत्पुरुष यांचा समागम हेही एक महत्त्वाचें साधन आहे. मात्र जो जो कोणी साधु भेटेल अथवा जीं जीं पुस्तकें हातीं लागतील त्यांचा समागम करणें योग्य नाहीं. प्रत्येक जीवासाठीं—त्याला कळो अगर न कळो, पण धार्मिक शास्त्रांची एक पूर्वपरंपरा ठरलेलीच असते. आपल्या राज्यकर्त्यांनीं ह्या देशांत जो नवीन सुशिक्षितांचा वर्ग निर्माण केला आहे त्या वर्गात ह्या परंपरेसंबंधीं आज मोठीच क्रान्ति झाली आहे. आतां जुनी परंपरा सुटून नवीन निर्माण झाली आहे. जुन्या वाङ्मयांतील शाश्वत व

उपयुक्त तत्त्वांचा संग्रह करणाऱ्या आणि नवीन शास्त्रीय संशोधन, तात्त्विक उपपत्ति आणि लोकोपकारी उद्योग ह्यांतील सारसंपत्तीचा उपयोग करणाऱ्या अशा उत्साही विद्वद्वर्गाची नवीन मालिका आपल्याला लाधली आहे. ह्यासाठीं ज्यांस डोळे आहेत त्यांनीं पहावें आणि आत्मकल्याण साधावें. धर्म म्हणजे एकट्या जीवाचा एक्या परमेश्वराशीं योग हे खरे; पण ह्या योगाचें एक सामाजिकही अंग आहे. ईश्वर हा एक कुटुंबाचा कर्ता किंवा अध्यात्म-मंडळाचा केंद्र आहे, यास्तव एकत्र आणि सामुदायिक उपासनेनेच त्याचा लाभ होणे शक्य आहे. सामुदायिक उपासनांच्या वरचेवर होणाऱ्या संस्कारांची गोळाबेरीज फार परिणामकारी होते. त्या अनंत व पूर्ण अशा परब्रह्माचे सारे स्वरूप एकट्या जीवाला कसे आकलन होणार? यासाठीं अनेक उपासकाचा मेळा पाहिजे, म्हणजे विचारविनिमय होतो. कित्येक गंभीर, कित्येक प्रेमळ अशा उपासकांच्या चेहऱ्यांवरून दिसून येणाऱ्या वृत्ति इतरांचे उद्बोधन करतात, यामुळे एकांतिक उपासनेप्रमाणे सामाजिक उपासनेचे महत्त्वही फार आहे."

या बाबतींत सर्वच ब्राह्मांचे एकमत आहे असे निदान त्यांच्या आचरणावरून दिसत नाही. उपनिषत्सागरांतील यदृच्छेने जी हाती लागलीं ती ईश्वराचीं लक्षणे गोळा करून त्यांच्यावर आराधनेत कल्पनांचे मनसोक्त मनोरे रचावयाचे ही एक कल्पनावाद्यांची मूर्तिपूजाच होय असें ते मानतात! आणि ध्यान ही क्रिया तर सामाजिक उपासनेत त्यांस अत्यंत अप्रयोजक वाटते! ब्राह्माच्या उपासनेत ब्राह्मेतर राहोत; पण त्यांचे सांप्रदायिक स्त्री-पुरुषही उत्तरोत्तर इतके थोडे हजर राहूं लागले आहेत कीं, कोठे तरी चुकत आहे, आपल्यामध्ये बरीचशी कमतरता आहे, असे प्रांजल बुद्धीच्या ब्राह्मांस आतां वाटूं लागले आहे. असो.

" ब्राह्मांच्या ह्या तोंडच्या उपदेशाप्रमाणे त्यांच्या सांप्रदायिक वाङ्मयाचे महत्त्वही त्यास फार आहे. ज्यांना दूरवर पहाण्याची सवय लागलेली असते, त्यांच्याकडून आपल्याच धर्मग्रंथाची 'अतिपरिचयादवज्ञा' ह्या न्यायाने अत्यंत उपेक्षा होते. स्वतांच्या सप्रदायाचेच ग्रंथ व सांप्रदायिक पुरुष यांबद्दल त्यांचे अज्ञान कधीं कधीं लज्जास्पद असते. वस्तुतः आपल्या आकांक्षा,

गरजा, संवयी व लायकी यांबद्दल स्वकीय ग्रंथकारांस जी माहिती असते, ती परकीय ग्रंथकारांस असणे अशक्य असतें. यामुळे आपलेच सांप्रदायिक ग्रंथ आपणांस उपकारक होतात तसे इतरांचे होणार नाहींत. यास्तव त्याचा-च अगोदर पूर्ण अभ्यास करावा व ते पुरे पचनीं पडल्यावर जरूर तर दुसरे धर्मग्रंथ पहावे " असें आतां ब्राह्मपंडितच म्हणूं लागले आहेत हाही एक कालमहिमाच होय !

ह्याप्रमाणे ब्राह्मसमाजाचे सांप्रदायिक मार्गदर्शक म्हणून राजा राममोहन, देवेंद्रनाथ व केशवचंद्र यांचा प्रमुखत्वाने उल्लेख होऊन त्यांच्या अनुषंगाने प्रतापचंद्र, अघोरनाथ गुप्त, गिरीशचंद्र सेन आणि गौरगोविंदराय यांचा अनुक्रमे खिस्ती, बौद्ध, इस्लामी व हिंदुधर्मावरील व्यासंगाबद्दल उल्लेख ब्राह्मांकडून वरचेवर करण्यांत येतो. तसेच रवींद्रनाथ व त्रैलोक्यनाथ यानी चैतन्यांचे वैष्णवधर्मांतून घेतलेले संस्कार आणि साधारण-ब्राह्मांनी औपनिष-दिक ऋषि व इंग्रज आणि जर्मन कल्पनावादी आणि थिओडर पार्करसारखे एकेश्वरी याचेकडून उचललेलें तत्वज्ञान याचाही ब्राह्ममार्गदर्शक म्हणून गौरव करण्यांत येतो.

पंडित सीतानाथ म्हणतात की, " वरील वाङ्मयाचा अभ्यास करताना (Christ, atonement, Regeneration, Crucifixion and resurrection) या परिभाषेचा खरा गूढार्थ आपण लक्षांत घेतला पाहिजे. त्याच-प्रमाणें 'अयमात्मा ब्रह्म, ( म्हणजे अद्वैत नव्हे ) सर्वं खल्विदं ब्रह्म' ( म्हणजे सर्वदेवमयत्वभाव नव्हे ) या ऋषीच्या वचनांची ( द्वैताद्वैतात्मक ) प्रतीति आपल्या रोजच्या विचारांत व अनुभवांत आपण घेतली पाहिजेत. त्याचप्रमाणें पाश्चात्य कल्पनावादाबद्दल आपली वृत्ति व अनुभव निःसंदेह पाहिजेत. आणि मूळच्या अभेदापासून भेदद्वारा ऐक्यापर्यंत जाणारी विरोधपरिहाराची आपली वृत्ति म्हणजे केवळ एक काल्पनिक उपपत्ति आहे असे न मानतां आपल्या आयुष्यांतील भाविक, नैतिक आणि सामाजिक आचारपद्धतिच तद्रूप झाली पाहिजे."

पंडित म्हणतात कीं, " ह्याचेच नांव सत्समागम. ह्यानेच शुष्क बुद्धिवादाचे दुष्परिणाम दूर होऊन सर्व देशांतील व काळांतील विचारी सज्जनांशी कायमचें

तादात्म्य लाभेल. अशा रीतीने अखिल जगांतील सर्व साधुसंतांचा एक अमर्याद असा संघ जरी आपल्यापुढें आला, आणि आपल्या दृष्टीनें निरनिराळ्या धर्मांतील व पंथांतील द्वेष आणि विरोधाचे तट जरी नामशेष झाले तरी त्यांत सांप्रदायिक उपसंघांस पुरेसा वाव असतो, आणि तो ठेवावा लागतो हे लक्षांत ठेवावे. एका वाड्यांत ज्याप्रमाणे अनेक दालने असतात, प्रवासी मडळींत ज्याप्रमाणे निरनिराळे मेळे होतात, त्याप्रमाणें सार्वत्रिक धर्मांत निरनिराळे संप्रदाय अविरोधाने नांदू शकतात. आणि ज्यांनीं त्यांनीं आप-आपल्या सप्रदायांतील मार्गदर्शक महात्म्यांच्या तंत्राने राहणे हे सोयीचे व श्रेयस्कर असते. यांत कोणत्याही रीतीनें संकुचितपणा आहे, असे मानण्याचें कारण नाही. उलटपक्षीं अध्यात्मक्षेत्रांत स्वेच्छेने आणि स्वातंत्र्याने भटकणाऱ्या साधकास सप्रदाय हा एक निवाऱ्याचा व सुखाचा आसरा मिळतो. आणि तेथे साधकाच्या उन्नतीची विशेष काळजी घेतली जाते. पांथस्थ साधक मार्गारूढ असताना त्यास भेटणारे हे सांप्रदायिक वाटाडे अखेर चार दिवसाचेच सोबती ठरले, तरी त्यांच्यापासून काहींच हानि होत नाहीं. उलट स्वर्गद्वारापर्यंत सांगातीच येणारे ते पुढारी ठरले तर मात्र त्यांस मध्येच सोडण्यांत त्यांच्याशीं आपण अप्रामाणिक होऊन आपण आपलाच घात करून घेतल्यासारखे होण्याचा संभव असतो. तात्पर्य, संतसमागम, सांप्रदायिक वडील बंधूंबद्दल आदर, बरोबरीच्यांशीं सोबती, आणि आपल्यावर अवलंबून राहणारासंबधीं आस्थापूर्वक काळजी, हींच सांप्रदायिकाच्या आध्यात्मिक उन्नतीचीं अभिन्न रूपे आहेत. परमेश्वर एकाकी नाहीं. तो देवतांनीं परिवेष्टित आहे. ह्यास्तव आपले धर्मासंबंधीं अत्युच्च ध्येयही एकातिक नसून कौटुंबिक व सामाजिक ह्याच स्वरूपाचे असावे. आणि आपल्या ठिकाणच्या ईशप्रेमाच्या अखड ज्योतीचा बाह्य विस्तार असंख्य व्यक्तिप्रेमांत व्हावा, हेंच ब्राह्म-साधनांचे अखेरचें साध्य आहे."

ह्या देशांतील आधुनिक विद्वानांपैकीं इतर बुद्धिवादी व ब्राह्म यांच्या विचारांपेक्षां पंडित सीतानाथ यांचे वरील विचार पुष्कळ गंभीर व चिंतनीय आहेत यांत शंका नाहीं. ते प्रबळ आशावादी आहेत, क्रमोत्कर्षवादी आहेत, प्रवृत्तीचे भोक्ते आहेत, कट्टे सुधारक आहेत आणि अंशतः द्वैतीच आहेत, यामुळें त्यांचा दृष्टिकोन वेदांत्यांहून आज बराच भिन्न दिसतो खरा; पण कांहीं

विघातक सुधारणांचा तीव्र मोह त्यांनीं सोडून दिला तर ते हिंदूंशीं समरस होण्यास फारसे कठीण पडणार नाहीं असे आम्हांस वाटते. मनुष्य एकदां संप्रदायांत पडला म्हणजे अनियंत्रित उदार मतांचा मोह त्यांस कसा आवरावा लागतो, हे ह्या प्रखर बुद्धिवाद्यांच्याच लेखांतून आज वाचावयास मिळत आहे, ही गोष्ट फार चिंतनीय आहे.

संप्रदायाचा योग्य तो अभिमान अवश्य असावा. पण डॉ०बेझंटबाई व मि० नरीमन हे हिंदुमहासभेचे सभासद असल्याबद्दल कौतुक करणाऱ्या ब्राह्मांनीं आपले सांप्रदायिक वैशिष्ट्य कायम राखण्याकरितां हिदुसमाजांतून स्वयंबहिष्कृत राहणे हे आम्हांस फारच उद्वेगजनक वाटते. ब्राह्माच्या दृष्टीने हिदूंची मूर्तिपूजा आणि चातुर्वर्ण्य हेच काय ते त्यांचे मोठे अपराध. परतु या दोन्ही विषयांतील खरे रहस्य ब्राह्मांस समजू नये इतके ते खचितच गूढ नाहीं. मग सांप्रदायिक अभिमानास ते बळी पडत असतील तर ते देशाचे दुर्दैव होय. त्यांच्या ब्राह्मोपासनेस ब्राह्मेतर काय, पण आस्थेवाईक ब्राह्मही येत नाहीसे झाले. त्यांच्या उपासनेंतील तेज वाढले नसून कमी झाले, याचे कारण त्यानीं शोधले पाहिजे. राजा राममोहन आणि देवेंद्रनाथ यांनीं प्रणव आणि गायत्री यांच्या जपाची पुरश्चरणे केलीं. केशवचंद्रानीं नामाचा जप चालविला, यामुळे त्यांच्या उपासनेस तेज चढले. आज साधारण-ब्राह्मच असे म्हणतांना आढळतात की, हल्लीची उपासनेची ही औपचारिक पद्धत व्यवहारतः फुकट आहे. 'बोधयंतः परस्परं' इत्यादि गीतावचनांनीं हल्लीच्या उपासनापद्धतीचे समर्थन होत नाही. कारण तसा एकांतिक विचारविनिमयाचा व्यवहार सामाजिक उपासनेत घडत नाही. शिवाय हरिकीर्तन, पुराण, यज्ञयाग, अनुष्ठाने, देवतार्चने, भजने इत्यादि हिंदूंच्या पूर्वपरंपरेतील सार्वजनिक उपासनांत वैचित्र्य व कर्माचे तेज जे प्रत्ययास येते ते या ठरीव व कृत्रिम उपासनेत आढळत नाहीं. नुसता शब्दपाल्हाळ होतो, असे आतां ब्राह्मांसही वाटूं लागले आहे. तात्पर्य, खिस्ती वळणावरचे आपले पाऊल घसरलें असाच पदोपदीं अनुताप करण्याची वेळ त्यांना येत आहे.

राजा राममोहन, देवेंद्रनाथ, केशवचंद्र, प्रतापचंद्र, विजयकृष्ण, शिवनाथशास्त्री आणि आजचे साधारण-ब्राह्मांचे अध्यक्ष पंडित सीतानाथ, ह्या व

अशा विचारी ब्राह्मांच्या चरित्रांचें बारकाईनें अवलोकन केल्यास असें स्पष्ट दिसून येतें कीं, ब्राह्म म्हणून आरंभिलेल्या यांच्या चरित्राचा आरंभ आणि अखेर हीं होकायंत्रातील दक्षिणोत्तर दाखविणाऱ्या टोंकांप्रमाणे पूर्वपश्चिम दाखविणारीं टोकें आहेत. आरंभाची दिशा पश्चिम असून अखेरीचा रोख प्राच्य वेदान्ताकडेच स्पष्ट आहे. ब्राह्मनौका यापुढें चालविणाऱ्या कर्ण-धारांचें लक्ष या ऐतिहासिक होकायंत्राकडे राहील तर अधिक मोजा आणि गमती न खातां ते आपलें इष्ट निधान लवकर गांठतील.

———



ॐ महामाननीय पूजनीय श्रीदेवगुरु भगवान्
पंडित शिवनारायण अग्निहोत्री
जन्म--इ. सन १८५०.

## प्रकरण बाविसावें

# देवसमाज

ब्राह्मसमाज व ब्राह्मसमाजाच्या विचारांची रूपरेषा ह्यांची कल्पना येथपर्यंत वाचकांस दिली. तेव्हां हा खंड वस्तुतः येथेच समाप्त व्हावयाचा; परंतु याच खंडांत आणखी देवसमाजाची माहिती देण्याचें योजिले आहे. पृथक्करणाच्या दृष्टीनें देवसमाज आणि साधारण-ब्राह्मसमाज बहुतेक एकच आहेत. दोघांचीं कारणें एकच, हेतु एकच, कर्ताही एकच; पण कार्य मात्र काहींसें भिन्न आहे. त्रिगुणांचा तोच मसाला; पण वेगळ्या प्रमाणांत पडल्यामुळें कार्यांत केवढा फरक होतो! शरीररचना मनुष्याचीच; पण सिद्दी आणि सिधी यांत केवढा फरक! बौद्ध, खिस्ती, शीख, इस्लामी व हिंदु या धर्मांचे संस्कार घेऊन ब्राह्मधर्म झाला आणि त्याच संस्कारांतून देवसमाजाचा देवधर्म निघाला. एकानें धर्माला ब्राह्म म्हटले, दुसऱ्याने देव म्हटले. दोन्हीही विशेषणें विशेष्यापेक्षांही दांडगीं. दोन्हीही अखिल मानवजातीच्या कल्याणासाठीं नेमलेलेच विहित धर्म, सामाजिक सुधारणा हेच दोन्ही सस्थांचे मुख्य ध्येय आणि सामाजिक सुधारणांच्या बाबी आणि कल्पनाही दोघांच्या सारख्याच. आणि यात कांहीं नवलही नाहीं. कारण साधारण-ब्राह्मसमाजाच्या पहिल्या चार धर्मप्रचारकापैकीं एक प्रमुख धर्मप्रचारक व लाहोर-ब्राह्मसमाजाचे आचार्य शिवनारायण अग्निहोत्री हेच ह्या देवसमाजाचे संस्थापक होत.

अगोदर अनुभव आणि मग उपपत्ति असाच सर्व शास्त्रांचा व्युत्क्रम आहे. अगोदर किमया आणि मग रसायनशास्त्र, अगोदर फलज्योतिष आणि मग ज्योतिःशास्त्र, अगोदर वनस्पतींचा अनुभव मग वैद्यशास्त्र, अगोदर तत्त्वज्ञान मग मानसशास्त्र, त्याचप्रमाणें अगोदर काल्पनिक धर्म आणि मग विज्ञानमूलक धर्म, असा हा दीर्घ कालाचा उत्क्रान्तीचा मार्ग असल्यामुळें आजपर्यंत देशोदेशीं अनेक काल्पनिक धर्म निर्माण झाले, त्यांचें व भौतिक शास्त्रांचें मंथन करून जो अत्यंत उत्क्रांत धर्म ठरला तोच हा शास्त्रशुद्ध विज्ञानमूलक देवधर्म होय, असें त्या धर्माच्या संस्थापकांचें म्हणणें आहे.

आतां इतरांस काल्पनिक म्हणून याच धर्मास विज्ञानमूलक म्हटलें, याचें कारण, दोन्ही प्रकारच्या धर्मांत तसेच ठळक भेद आहेत. निसर्गाचे सूक्ष्म अवलोकन करून भौतिकशास्त्राचे साक्षात् अनुभवजन्य सिद्धान्त कायम झाले नव्हते, तोपर्यंत मनुष्याचा तर्क हाच धर्मप्रवर्तक होता. परंतु पुढें भौतिकशास्त्रांचा प्रत्यक्ष पुरावा जसजसा पुढे येऊं लागला, तसतसा आस्तिकांचा ईश्वरवाद डळमळूं लागला.

निसर्गाचे जे प्रत्यक्ष स्वरूप तेंच सत्य असे भौतिकशास्त्र सागतें, आणि धर्मग्रंथांत असेल ते प्रत्यक्षाशी असंबद्ध असले तरी ते खरे असे अज्ञानमूलक धर्मशास्त्र सांगते. सृष्टीतील प्रत्येक गोष्ट निसर्गाच्या निरपवाद नियमाप्रमाणेंच होते, असे भौतिकशास्त्र सांगते. ते आणि इतर अज्ञानमूलक धर्मशास्त्र ईशपुत्र, योगी, सिद्ध, भक्त यांचे अद्भुत चमत्कार खरे मानते. सृष्टि ही एक आणि अखंड आहे, आणि सर्व चराचरांवर त्या एका अखड सृष्टीच्या नियमाचेंच नियंत्रण आहे असे भौतिकशास्त्र सांगते, पण अज्ञानमूलक धर्मशास्त्र ह्या सृष्टीच्या पलीकडे सृष्टिनियमांना अतीत असा एक काल्पनिक ईश्वर मानते. तसेच जे सृष्टपदार्थ प्रत्यक्ष गोचर होतील तेंच भौतिकशास्त्र मानते, पण अज्ञानमूलक धर्मशास्त्र ज्याचे अस्तित्वाचा कांहींच प्रत्यक्ष पुरावा नाही असे अनेक अदृश्य देव व देवता मानते. ह्याप्रमाणे भौतिकशास्त्रविरोधि जीं धर्मशास्त्रे तीं भ्रामक व काल्पनिक होत. त्यांचा प्रत्यक्ष पुरावा कांहींच मिळत नाहीं. परंतु विज्ञानमूलक धर्म हा तसा नाही. तो शास्त्रीय प्रयोगाप्रमाणें प्रत्ययास येणारा व म्हणून असंदिग्ध व विश्वसनीय आहे.

अशा ह्या अपूर्व धर्माचे संस्थापक श्रीपंडित शिवनारायण ऊर्फ सत्यानंद अग्निहोत्री ऊर्फ श्रीदेव गुरुभगवान् हे कान्यकुब्ज ब्राह्मण होत. यांचे पणजे श्रीपंडित गंगाप्रसाद अग्निहोत्री हे एका संस्थानचे दिवाण होते. त्यांस पंचवीस गांवांची जहागिरी होती. त्यांचे चिरंजीव म्हणजे गुरुभगवानांचे आजे हे लक्ष्मीपुत्र असूनही परमवैराग्यशील होते. त्यांनीं आपले सर्व आयुष्य धार्मिक अनुष्ठानांत व तीर्थयात्रा यांतच घालविले. त्यांस पुजारीबाबा असे म्हणत. गुरुभगवान् यांचे वडील हेही मोठे कर्तृत्वशील, कडक शाकाहारी, मोठे उद्योगी, श्रीमान् व रुबाबदार गृहस्थ होते. भगवानांची मातोश्री ही ब्रिटिश रिसाल्यांतील एका सुभेदार मेजरची पुतणी होय. ती बाई अत्यंत

धार्मिष्ठ व करारी होती. तिची तितिक्षा फारच जबर असे. भगवानांच्या आई-बापांनीं पुत्रप्राप्तीकरितां पुष्कळ नवससायास व दानधर्म केले होते. तेव्हां तारीख २० डिसेंबर १८५० रोजीं सुप्रभातीं अकबरपूर येथे गुरुभगवान् यांचा जन्म झाला.

गुरुभगवान् हे मोठे कुशाग्र बुद्धीचे होते. प्रौढपणीं त्याचा शिक्षणक्रम सिव्हिल एंजिनीअरिंग कॉलेजांत पुरा झाल्यावर ते सन १८६८ साली सरकारी नोकरींत शिरले. कॉलेजांत असतांना शंकराचार्यांच्या वेदातमताची त्यांच्या मनावर चागलीच छाप बसली होती. सन १८७१सालीं त्यांनीं त्या कॉलेजचे कोणी धार्मिक वृत्तीचे क्यूरेटर होते, त्याच्याजवळ सहकुटुंब गुरुदीक्षा घेतली. तेव्हापासून त्याच्या मनात धर्मसुधारणा व सामाजिक सुधारणाचे विचार वरचेवर येऊं लागले. तेव्हा त्यानी निरनिराळ्या शास्त्राचा व धर्मांचा अभ्यासही चालविला. सन १८७३ साली ते लाहोर येथे सरकारी शाळेत ड्रॉइंगमास्तर झाले. आणि तेथेच त्यांचे पुढील सर्व आयुष्य गेले. पुढे त्याचा संबंध लाहोरच्या ब्राह्म-समाजाशीं आला, तेव्हा ते आपल्या कर्तबगार पत्नी-सह ब्राह्मसमाजांत दाखल झाले. ते इ. सन १८७५ सालीं लाहोरच्या समाजाचे सन्माननीय आचार्य होते. त्यांच्या सद्वर्तनाने व वक्तृत्वाने त्याची लवकरच चोहोंकडे कीर्ति झाली. त्यावेळी सन १८७७ सालीं आर्य-समाजाची एक शाखा लाहोर येथे स्थापन झाली होती; आर्य समाजाचेही वजन तेथे पडूं लागले होते. तेव्हां आर्यानी वाढवलेल्या वेद-माहात्म्यावर अग्निहोत्र्यांनीं खूब झोड उठवली. पुढे ते साधारण ब्राह्मसमाजाचे पहिलेच प्रचारक झाले. त्यांनी लवकरच सरकारी नोकरी सोडली. आणि सन १८८२ पर्यंत ब्राह्मसमाजाचे काम फार मेहनत घेऊन केले. मुक्तिफौजेच्या वळणावर त्यांनीं एक ब्राह्मसेनाही उभारली होती. एकंदर लाहोरच्या सर्व समाजावर त्यांचे चागलेच वजन बसले होते.

लहानपणापासूनच त्यांची जिज्ञासा फार तीव्र असे. त्यांनीं शास्त्रावलोकना-बरोबर निरनिराळीं साधनेंही करून पाहिलीं. परोपकाराचीं अनेक कृत्ये केलीं व सर्व प्रकारे स्वार्थत्यागही सोसला. असे होतां होतां त्यांच्या ठिकाणीं देव-शक्ति हळुहळू विकास पावल्या, सद्गुणांच्या सर्व प्रकारांबद्दल प्रबल प्रेम, दुर्गुणांच्या सर्व तऱ्हांबद्दल प्रखर द्वेष, सत्याच्या सर्व बाजूंबद्दल निरतिशय

प्रेम, असत्याच्या सर्व प्रकारांबद्दल जाज्वल्य द्वेष. या मनोवृत्तींचा त्यांच्या ठिकाणीं पूर्ण विकास होऊन ते "देव-आत्मा" झाले. त्यांच्या ठिकाणीं अद्वितीय मानसिक प्रकाशाची "देवज्योति" प्रगट झाली आणि दुसऱ्याचे अंतःकरण हलवून सोडणारे "देवतेज" ही उत्पन्न झालें.

ह्याप्रमाणे त्यांच्या ठिकाणीं देवशक्ति प्रादुर्भूत झाल्यावर त्यांना मनास पटे ते ते निर्भिडपणे बोलून दाखवीत व त्याचप्रमाणे त्यांची कृतिही असे. असा विकास होतां होतां तारीख २० डिसेंबर १८८२ रोजीं त्यांच्या जन्मदिवशीं त्यांनीं लाहोरास एक मोठी सभा भरवून, खालील दिव्य प्रतिज्ञा केली.

सत्य शिव सुन्दर हि मेरा परम लक्ष होवे
जग के उपकार हि मे जीवन यह जावे ।

याप्रमाणे लोकांच्या अंतःकरणांत आपल्या देवशक्तीने शक्य ती श्रेष्ठता आणून व त्या योगानें मानवी व्यवहारांतील असत्य व दोष काढून टाकून पृथ्वीवर देवराज्य स्थापन करण्याचा त्यानीं श्रेष्ठ संकल्प केला. त्यांचा आत्म-विश्वास दांडगा होता. आपले आयुष्यांतील कार्य अद्वितीय आहे. आपण पापापासून मुक्त आहो, भवसागरातून लोकांस तरून नेणारे आपण एक जहाज आहो, राष्ट्रोद्धार करण्याचे सामर्थ्य आपणांमध्ये आहे, असा त्यांस भरंवसा होता. मी लोकांवर हुकमत चालविण्यासाठींच जन्मास आलो आहे. दुसऱ्यांच्या आज्ञा पाळण्यासाठी जन्मलो नाहीं, असे ते म्हणतात. त्यांच्या ठिकाणचा हा महतीचा दर्प ब्राह्मसमाजांत खपण्यासारखा नव्हता. यामुळे लवकरच त्यांना ब्राह्मसमाज सोडावा लागला. नंतर व्हिक्टोरिआ राणीचे जुबिलीच्या दिवशीं ( ता. १६ फेब्रुवारी सन १८८७ ) त्यांनीं देवसमाज नामक एक स्वतंत्र संस्था काढली. प्रथम ब्राह्मांच्याच मतांचा त्यांनीं प्रसार चालविला. पण पुढे सन १८९३ सालीं या संस्थेवर एक मोठे गंडांतरच आलें. गुरुभगवान् याच्यावर एका बेअब्रूच्या खटल्याचे कड्याळ आले. तो खटला पांच वर्षें सुरू होता. या मुदतींत गुरुभगवनांच्या मनांत व विचारांत बराच पालट झाला. आणि पुढें सन १८९८ सालापासून देवसमाज ह्या संस्थेस एक नास्तिकाची संस्था असें स्वरूप प्राप्त झालें.

ह्या संस्थेने समाजाच्या शिक्षण आणि नीतीच्या उन्नतीकरितां बरेच प्रयत्न चालविले. या नास्तिक सस्थेचे गुरुभगवान् हेच प्रतिईश्वर बनले.

त्यांस त्यांचे सांप्रदायिक सत्यदेव असेंच म्हणूं लागले. मग संस्थेचा सन १८९८ पूर्वींचा सर्व वाङ्मयाचा प्रसार करण्याचें श्री गुरुभगवान् यांनीं एकदम बंद केले. एक नवीनच पंथमत त्यांनीं बनविलें. त्याला देवधर्म असें म्हणतात. व त्या धर्माच्या मुख्य ग्रंथास देवशास्त्र असे म्हणतात. ह्या सर्व सामासिक शब्दांत देव ह्या पदाचा अर्थ अलौकिक इतकाच असावा असे दिसते. देवभगवान् यांनीं प्रथम जेव्हां लोकसेवेची प्रतिज्ञा केली त्या वेळीं व त्यानंतर बारा वर्षे त्यांचा ईश्वराबद्दल पूर्ण आस्तिक्यभाव होता. परंतु त्याच्या अंतःकरणांत ज्ञानाचा प्रकाश जसजसा वाढत चालला तसतसा तो भाव नाहींसा होऊन सन १८९४ सालीं ईश्वराबद्दल आपला आस्तिक्यभाव अगदींच निराधार आहे अशी त्यांची खात्री झाली. मग लोकक्षोभाची परवा न करितां त्यांनीं आपले नास्तिक मत प्रगट केलें.

त्यानंतर त्यांचा अतिशय छळ झाला. त्यांना लोकांनीं बहिष्कार घातला. व्याख्यानाचे वेळीं धोंडे वगैरे फेकून त्यांना दुखापत करण्याचा लोकांनीं उपद्याप केला. त्यांच्यावर पिस्तुलाच्या गोळ्याही झाडल्या. अशा रीतीनें त्यांचा फार छळ होत असतां, त्याच्या कोमल अंतःकरणास लोकांच्या दुर्वर्तनाकडे पाहून अत्यंत क्लेश होत, ते वेगळेच. अशा रीतीने शारीरिक आणि मानसिक पीडेची परमावधि होऊन अनेक वेळां मृत्यूच्या द्वारीं जाण्याची त्यांस पाळी आली. परंतु त्यांतून ते बचले. त्यांनीं सारा छळ धैर्यानें सहन केला. आरंभी कोणाचे साहाय्य नसतां एकट्यानें सर्व विरोधांस तोंड देऊन अखेर त्यांनीं विजय संपादन केला. अनेक एकनिष्ठ अनुयायी मिळविले व लोकोपयोगी संस्थाही कित्येक काढल्या. त्यांची त्रोटक माहिती पुढील प्रकरणांत देऊं.

---

# प्रकरण तेविसावें

# विज्ञानमूलक धर्म

ब्राह्मसमाजाचा जो केवळ परमात्मा तोच जवळ जवळ देवसमाजाचा निसर्ग (Nature) होय. निसर्ग हाच देवधर्माचा पाया आहे. (१) निसर्ग किंवा विश्व म्हणजे सर्व चराचर वस्तूंचा व जीवित आणि अजीवित गतींचा व शक्तींचा समुदाय होय. द्रव्य आणि गति हीं एकंदरींत नित्य, अविनाशी आणि अविभक्त आहेत. त्यांस कोणीं निर्माण केले नाही. तीं कोणत्या तरी रूपांत नेहमीं एकत्र असतात. ह्याप्रमाणे सृष्टि ही सनातन, स्वयंभू आणि एकच सद्वस्तु आहे. प्रत्येक सद्व्यक्ति निसर्गाचा भाग आहे. निसर्गाचे बाहेर कांही नाही. (२)निसर्गाच्या शक्तीनें सर्व पदार्थांत बदल होत आहे व त्याच शक्तीने निरनिराळे सृष्ट पदार्थ निर्माण होतात व नाश पावतात. निसर्गाचे नियम ठरीव व अनुल्लंघनीय आहेत. निरींद्रिय वनस्पति, प्राणि आणि मनुष्य अशा विश्वाच्या चार कोटि आहेत आणि मूळ निरीद्रिय कोटींतून बाकीच्या जीवित सेंद्रिय कोटीचा विकास झाला आहे. जीवात्मा हाही एक सेंद्रिय सृष्टीचाच भाग असल्यामुळे तोही त्याच नियमांनीं बांधला आहे. यामुळे सत्यधर्माला सृष्टिनियम सांगणाऱ्या भौतिकशास्त्रांचा आधार आहे. तो आधार ज्यांस नाहीं. अशा इतर सर्व धर्मनिष्ठा नकली व खोट्या आहेत, असे देवसमाजाचे मत आहे.

ह्या देवधर्मांत जीवात्म्याच्या शक्ति, त्याची वाढ आणि नाश हें शास्त्र सांगितले आहे.

(१) मनुष्याच्या जीवितशरीराची रचना, चलनवलन, पोषण आणि विकसन करणारी जी 'जीवनी शक्ति' त्यालाच आत्मा म्हणतात. त्यास बुद्धि, वासना, मनोविकार, भावना इत्यादि शक्ति असल्यामुळे त्यास सेंद्रिय मानतात. मनुष्याचा आत्मा उत्क्रांत झालेला असतो. यामुळे त्यास बुद्धि व भावना ह्या शक्ति असून तत्संबंधीं इंद्रिये असतात.

(२) हा आत्मा निसर्गाच्या नियमांच्या आधीन असतो.

(३) आत्मा व शरीर ह्यांचा नित्य अन्योन्यसंबंध आहे. आत्म्यास व्यक्ति-

गत असलेल्या विचार, भावना आणि जाणीव ह्या शक्ति त्यास एखादें शरीर व विकास पावलेला मेदु असल्यावांचून असणें शक्य नाहींत.

(४) ज्याप्रमाणें आत्म्याची 'जीवनी शक्ति' मातेच्या रक्तपेशीतून जीवित शरीराची रचना करते, त्याचप्रमाणे ती शक्ति शरीरपातानंतर अनुकूल परिस्थिति मिळाल्यास मृत शरीरांतून बाहेर पडणाऱ्या सूक्ष्म जीवनपेशी एकत्र करून त्यांचे सूक्ष्म मानवी शरीर तयार करते.

(५) जीवात्म्याची ही शरीररचनाशक्ति फार महत्त्वाची आहे. ती शक्ति पुरेशी नसेल तर त्यास शरीर बनवितां येणार नाहीं. आणि शरिराच्या अभावीं आत्म्याचे आत्मरूपाने अस्तित्व अशक्य असल्यामुळे आत्मनाशच होईल.

(६) गतीने वस्तूंत बदल करावा असा निसर्गाचा नियम असल्यामुळें वासना, विचार, भाषण, लेखन इत्यादि क्रियांनीं आत्म्याच्या स्वरूपांत व त्याच्या रचनासामर्थ्यांत बरावाईट बदल होतो. अर्थात् आत्मा अचल किंवा निर्लेप नाहीं.

(७) शरीराचे अवयव एकमेकांस केवळ निरुपद्रवी राहून भागत नाहीं. तर ते एकमेकांस उपकारक असावे लागतात. त्याचप्रमाणे मनुष्य हा विश्वाचा एक अंश असून त्यानें एकंदर विश्वाच्या उत्क्रान्तीस साहाय्यभूत होणें भाग असतें. यामुळे जगाच्या उत्क्रान्तीस उपकारक असा जो मनुष्याच्या ज्ञानांत व भावनात बदल होत जाणें ती त्याची प्रगति व याच्या उलट होईल तर तीच त्याची अधोगति होय.

(८) अशा श्रेष्ठ भावना निर्माण होऊन आत्म्याच्या ठिकाणी सत्यप्रकाशाबद्दल किंवा कोणत्याही चांगल्या गोष्टीबद्दल उच्च दर्जाची प्रीति ( अनुरागशक्ति ) उत्पन्न झाली आणि असत्याबद्दल त्याचप्रमाणे सात्त्विक द्वेष ( विरागशक्ति ) उत्पन्न झाली म्हणजेच त्यास धार्मिक जीवन म्हणतात.

(९) परंतु ही प्रीति श्रेयाकरितां नसून प्रेयाकरितां असेल किंवा हा द्वेष असत्यामुळें नसून अभिमान किंवा मत्सर यांनीं प्रेरित असेल तर त्यायोगे आत्म्याचें अधःपतन होईल.

(१०) ह्या अधःपतनाचा परिणाम; (अ) अंतःकरणशून्यता व भ्रष्टबुद्धि; (ब) हृद्रोग, आपत्ति, पापे, गुन्हे, स्वातंत्र्यनाश, धननाश आणि अकालीं देहनाश; (क) बद्धता, हीन स्थितींतून वर येण्याची असमर्थता; (ड) शरीर-

रचनासामर्थ्याचा नाश म्हणजेच परंपरेने आत्मनाश. हे जे अधर्माचे दुष्परिणाम सांगितले, ते ईश्वरावर विश्वास ठेवून किंवा इतर धर्मांचे पालन करून दूर होणार नाहींत.

(११) उलटपक्षीं ज्या मानाने मनुष्य तामसी प्रेम, तामसी द्वेष यांपासून व तज्जन्य तामसी विचार व क्रिया यांपासून मुक्त होईल आणि श्रेष्ठ प्रकारच्या विधायक भावनांची तो जोड करून घेऊन त्या मानानें तो आपल्या आत्म्यासंबंधीं सुप्रबुद्ध, श्रेष्ठ जीवनशक्तियुक्त, सन्मार्गी, परोपकारी, सात्त्विक आनंद उत्पन्न करणारा आणि आपले इतरांशी येणारे सबंध व्यवस्थित जोडणारा असा होईल; त्याचप्रमाणे त्याची शरीररचनाशक्ति वाढून तो मरणोत्तर आपली मानसोन्नति करून दिव्य लोकांत दीर्घकाल जीवमान राहील. विश्वाच्या उत्क्रान्तगतीशीं एकत्व पावून पूर्ण होणें हे जीवाचे परम ध्येय होय.

(१२) मनुष्याचा अधःपात न व्हावा आणि सात्त्विक विरागशक्ति व अनुरागशक्ति यांचा त्याच्या ठिकाणी परिपोष व्हावा, म्हणून त्यांनीं वरील गुणदोष समजून घेण्यासाठी देवज्योति प्राप्त करून घ्यावी व देवतेजही प्राप्त करून घ्यावें. अर्थात् असे देवतेज व देवज्योति दुसऱ्यास प्राप्त करून देण्याचे ज्या अद्वितीय व लोकोत्तर पुरुषाचे सामर्थ्य आहे, तोच खरा पूजनीय महापुरुष होय. अर्थात् तोच देवगुरु भगवान् जाणावा. आत्म्याचे अत्यंत परिणतरूप त्याचे ठायीं असते. निरींद्रिय सृष्ट पदार्थांत ज्याप्रमाणे उत्क्रान्ति होते त्याप्रमाणे सेंद्रिय व्यक्तींतही उत्क्रान्ति होत असते. ह्याप्रमाणे मनुष्यप्राणी हा इतर प्राण्यांपेक्षां जास्त उत्क्रान्त आहे. परंतु सामान्य माणसांतही देवज्योति व देवतेज हे श्रेष्ठ गुण नसतात. ते भगवान् गुरुदेवांनीं प्राप्त करून घेतल्यामुळे त्यांस देवात्मा किंवा सत्यदेव म्हणतात. तेच जगांतील पाहिले सत्यद्रष्टे व सत्यगुरु होत. तेच योग्य अधिकारी जीवांचा उद्धार करणारे होत. बाकीचे अल्ला, ईश्वर, ब्राह्म, बुद्ध हीं सारीं थोताडें होत.

देवसमाजाचा हेतु पृथ्वीवर देवराज्य निर्माण करावे हा असल्यामुळें त्या समाजाचे अनुयायी होणारांस कडक शिस्ती पाळाव्या लागतात त्या अशा:—(१) विज्ञानमूलक धर्मतत्त्वांवर विश्वास, (२) सभासदत्वाची ठरीव वर्गणी देणे, (३) संस्थापकाच्या जन्मोत्सवाच्या समारंभास हजर राहण्याचे वचन,

(४) दहा पापांपासून निवृत्ति. ही शेवटली शिस्त दुसऱ्या कोणत्याही धर्मपंथांत नसते. हा ह्या पंथाचा विशेष आहे. श्रेष्ठ अधिकाऱ्यांस ब्रह्मचर्यादि शिस्तीचीं बंधनें याहूनही अधिक असतात.

प्रत्येक सभासदाला सभासद होण्यापूर्वी

"देवात्मा हि उपासनीयः स सत्यदेवः, सद्धर्मशिक्षकः स एव एकः, परमोक्षदाता, सकलोच्चभावस्य विकासकर्ता।" ह्या मतावर आपला विश्वास आहे अशी प्रतिज्ञा करावी लागते.

देवसमाजाच्या दहा प्रतिज्ञाः—

(१) लांच घेणे, खोटें माप देणें, ठकबाजी करणे, मजुरी किंवा किंमत ठरावाबाहेर घेणें हीं चार पापें मी करणार नाही.

(२) चोरी करणार नाहीं.

(३) उसनवार घेतलेले पैसे अगर वस्तु मी ठेवणार नाही.

(४) दुसऱ्याच्या स्थावरजंगम मिळकतीचा अपहार करणार नाही.

(५) जुगार खेळणार नाहीं.

(६) बेकार रहाणार नाहीं.

(७) व्यभिचार, अनेकपत्नीकत्व किंवा सृष्टिनियमांविरुद्ध गुन्हा करणार नाहीं.

(८) मादक पदार्थ केवळ औषधाशिवाय विकणार नाहीं किंवा सदर मादक पदार्थांच्यासंबंधीं कोणत्याच व्यवहारास मदत करणार नाही.

(९) मांस व अंडीं भक्षण करणार नाहीं व दुसऱ्यास खाण्यास सांगणार नाहीं.

(१०) योग्य प्रसंगाशिवाय मी जीवहत्या करणार नाही.

याप्रमाणे नवीन होणाऱ्या सांप्रदायिकास प्रतिज्ञा कराव्या लागतात.

नवीन सभासदास ह्या समाजाचे सभासद होण्यासाठीं भगवान् गुरूंस एक पत्र पाठवून त्यांत आपण केलेल्या सर्व पापांचा उल्लेख करावा लागतो. व त्यानंतर पुढेही अशींच पत्रे गुरुजींस धाडावी लागतात. ती पत्रे गुरुजी आपल्याजवळ जपून ठेवतात.

समाजाच्या प्रार्थनांचे वेळी भगवान् गुरु क्वचितच हजर असतात. ते हजर नसतील तर त्यांची तसबीर ठेवून त्यांस फुलांचे हार वगैरे घालतात व त्यांच्या

पुढेंच प्रार्थना, स्तोत्रपाठ व गुरूंच्या महिम्याचें वर्णन व उपदेश असे निरनिराळे कार्यक्रम असतात.

गुरु भगवान् यांच्या सामर्थ्याने अनेक भ्रष्ट लोकांच्या चित्ताची शुद्धि झाली आहे. त्याचप्रमाणे त्यांनी आंखून दिलेल्या अभ्यासक्रमाने सांप्रदायिकांच्या ठिकाणीं निरनिराळ्या सद्गुणांचा विकास झाला आहे असे म्हणतात. देवसमाजी पुरुषार्थवादी आहेत.

ह्या पंथाचा साधनविधि विलक्षण आहे. साधकाचे परिस्थितींत सामान्यतः जितके संबंध येतात त्या सर्वांची शुद्धि होण्याकरितां वर्षाचे सोळा विभाग करून प्रत्येक विभागात संबंधीवर्गापैकीं एकेक वर्गाशीं साधकाचा संबंध कसा आहे याचे परीक्षण करून त्यांत दुरुस्ती व सुधारणा करण्यांत येते. त्यांस सोळा यज्ञ म्हणतात. त्यांचीं नावें:—(१) मातापिता संतानयज्ञ, (२) भाईभगिनीयज्ञ, (३) पतिपत्नीयज्ञ, (४) भृत्यस्वामीयज्ञ, (५) देवसमाजयज्ञ, (६) सेवकयज्ञ, (७) स्वजातियज्ञ, (८) स्वदेशयज्ञ, (९) मनुष्यमात्रयज्ञ, (१०) स्वास्तित्वयज्ञ, (११) परलोकयज्ञ, (१२) पशुयज्ञ, (१३) उद्भिज्जयज्ञ, (१४) भौतिकयज्ञ, (१५) देवशास्त्रयज्ञ. (१६) देवगुरुयज्ञ. या प्रत्येक यज्ञाच्या शेवटल्या दिवसाला व्रत म्हणतात. ह्या दिवशीं पुऱ्या झालेल्या यज्ञसाधनाचा काय परिणाम झाला त्याचे सूक्ष्म समालोचन करण्यांत येते, आणि त्यासंबंधी अवनतीचे घोर परिणाम व उन्नतीचे सुपरिणाम यांचे चित्र फार ठळक रीतीने साधकापुढे मांडण्यांत येऊन त्यास सुधारण्याचा प्रयत्न करण्यांत येतो.

देवसमाजाच्या कार्यकारी मंडळाचे आठ सभासद असतात. त्यांशिवाय एक ३२ सभासदांची प्रतिनिधि-सभा असते. समाजाच्या कार्याचीं चार खातीं आहेत. (१) हृदयभेदी (Heart changing) खातें, (२) देवधर्म ज्ञानप्रसारखाते, (३) सामान्यसेवाखाते, (४) जमाखर्चीखाते.

पंजाब, वायव्यसरहद्द, दिल्ली, सिंध, बलुचिस्तान हीं समाजाचीं मुख्य कार्यक्षेत्रें आहेत. या प्रत्येक ठिकाणीं समाजाचीं साधनमंदिरें आहेत.

(१) पहिल्या (Heart changing) हृदयभेदी किंवा मनोविकासी समाजाची मुख्य संस्था म्हणजे देवसमाज-धर्मविकासालय ही होय. त्या खात्यांत काम करणाऱ्या सांप्रदायिकांचे विकासार्थी, सत्संगी, सेवक आणि

श्रद्धाळू असे स्थूलमानानें चार वर्ग असून त्यांचे चळवळीचे मार्गः— (१) स्थानिक प्रार्थनासभा, (२) धर्मोपदेशक मंडळाचे गांवोगांव संचार, (३) समक्ष भेटी व कामावर समक्ष देखरेख, (४) सामाजिक वाङ्मयप्रसार व योग्य माणसांशीं पत्रव्यवहार असे आहेत. ह्या खात्यांची कामगिरी चांगली चालली आहे, असे समाजाचे म्हणणे आहे.

(२) **देवधर्मज्ञानप्रचार साधनें**:—

(अ) रोजचे शिक्षणवर्ग.

(ब) मुख्य ठिकाणीं साप्ताहिक व इतर सभा.

(क) जाहीर व्याख्यानें आणि सवाद.

(ड) नियतकालिके व हस्तपत्रके (उदा०–सेवक, जीवनत्व, Science grounded religion हिंदी व इंग्लिश).

(३) **सामान्य सेवा**—याच्या कांहीं बाबी अशाः—

(१) स्त्रीसभासदांस शिक्षण.

(२) प्रौढ पुरुषवर्गास साक्षर करणें.

(३) हिंदी भाषेचा प्रसार.

(४) मुलांमुलींकरितां प्राथमिक शाळा.

ह्याशिवाय समाजाचीं मोगा आणि लाहोर येथे दोन हायस्कुलें आहेत व फेरोजपूर येथे एक मुलींची नमुनेदार शाळा आहे. या सर्व शाळांतून नैतिक शिक्षणाकडे विशेष लक्ष दिले जाते. याशिवाय बहिष्कृत वर्गांकरितां समाजानें तीन शाळा चालविल्या आहेत.

(४) **सामाजिक सेवेचे प्रकार**—समाजाचे सभासद व विद्यार्थी यांचे– असे आहेतः–

(१) रोग्यांस फुकट औषधे वाटणे.

(२) रोग्यांस इस्पितळांत उपचारांकरितां नेणे.

(३) घरोघर रोग्यांची शुश्रूषा करणे.

(४) अस्पृश्यांची सेवा करणे.

(५) आंधळ्या व अडलेल्या लोकांस मदत करणें, त्यांना मार्ग दाखविणे.

(६) रस्त्यावर पडलेल्या कांचा, कांटे, केळीं, आंबे यांच्या साली वगैरे उचलून टाकणे.
(७) बिनवारशी सांपडलेल्या वस्तु तपास करून मालकांकडे किंवा समाजाच्या वसतिगृहाच्या मुख्य अधिकाऱ्यांकडे पोचविणे.
(८) आग लागलेली विझविणे.
(९) चुकलेल्या मुलांस मालकाकडे पोचविणें.
(१०) अपघातापासून लोकाचा बचाव करणे.
(११) बरोबरीच्या विद्यार्थ्यास मदत करणे व त्यांस वाईट संगती व संवयी यापासून सोडविणे.
(१२) गरीब-विद्यार्थि-सहाय्यक-निधि गोळा करणे.
(१३) जीव आणि वनस्पति यांची सेवा करणे.

समाजाचे हे सारे प्रयत्न प्रशंसनीय आहेत. त्याचप्रमाणे त्यांच्या मादक निवारणी सभा व मांस निवारणी सभा याचेही काम ठीक चालले आहे असें म्हणतात.

याशिवाय दुर्वर्तनी, व्यसनी किंवा निरुपयोगी माणसे सुधारून त्यांस उपयोगांत आणणे, स्वदेशीस उत्तेजन देणे, सभासदाची सांपत्तिक स्थिति सुधारणे, भांडणे मिटवून सार्वत्रिक शांतता राखणे, सार्वजनिक आरोग्य राखणें वगैरे कामेही समाज करतो. तसेच स्त्री-शिक्षण, बालविवाहनिषेध, विधवासाहाय्य, विधवाविवाह, मिश्रविवाह, अस्पृश्यतानिवारण व दुसऱ्या अनेक वाईट चालींचा बीमोड वगैरे सामाजिक सुधारणांकडे समाजाचे लक्ष आहे. त्याचप्रमाणे देशांतील सुराज्यास मदत करावी, हेंही त्याचे विशेष धोरण आहे. त्यांना हल्लींच्या सुराज्याचें महत्त्व फार वाटते; आणि म्हणून ते राजकर्त्यांबद्दल अत्यंत कृतज्ञ व राजनिष्ठ आहेत. त्यांच्या समाजांत गुन्हेगार कोणी नाहींत. त्यांत विशेषेकरून इंग्रजांचा ज्यांनीं अपराध केला, असा तर एकही इसम सांपडणार नाही, असा त्यांस अभिमान आहे. इतकेंच नव्हे तर त्यांनीं उत्तरेकडील कांहीं गुन्हेगार जाती सुधारण्याकरितां सरकारकडून आपल्या ताब्यांत घेऊन त्यांच्यांतही बरीच सुधारणा घडवून आणली आहे असें म्हणतात.

अशा नैतिक शिक्षण, सामाजिक सुधारणा आणि सामाजिक सेवा,

इत्यादि लोकहिताच्या कार्यांमुळें सरकारी अंमलदार व देशांतील कित्येक पुढारी यांच्याकडून देवसमाजानें आजपर्यंत अनेक वेळां धन्यवाद मिळविले आहेत.

भगवान् देवगुरु यांचे बऱ्याच वर्षांचे सांप्रदायिक सहकारी देवरतन या नांवाचे एक लायक गृहस्थ असतां, सदर गुरुदेवांनीं आपल्या मागे आपल्या गादीचे मालक आपले द्वितीय चिरंजीव देवानद यास केल्यामुळें समाजांत फूट पडून देवरतन ह्यानी स्वतंत्र समाज काढला. तेव्हां देवरतन ह्यांची नालायकी दाखविण्याकरितां आपल्या हातून घडलेल्या दोषांचे कबूल जबाब जे देवरतन ह्यांनीं गुरुभगवान् यांचेजवळ साप्रदायिक पद्धतीप्रमाणें दिले होते, ते गुरुभगवान् ह्यांनीं प्रसिद्ध केले, असे म्हणतात. भगवान् गुरुदेवांसारखा पुरुष पूर्वी कधीं झाला नाही व पुढेही कधीं होणार नाहीं, असा त्यांच्या विज्ञानमूलक तत्त्वशिक्षा या ग्रंथात ठाम सिद्धान्त आहे.

ह्याप्रमाणे देवसमाज व त्याचा विज्ञानमूलक धर्म यांची थोडक्यांत रूपरेषा आहे. वस्तुतः धर्म ह्या शब्दात माणसांचा माणसांशीं संबंध यापेक्षां माणसांचा देवाशीं संबंध याचाच प्रमुखत्वाने अंतर्भाव होतो. आणि अशा दृष्टीनें विचार करतां या देवसमाजाच्या देवशास्त्रास धर्म म्हणणेही कठीण आहे. आणि म्हणूनच आम्ही या पंथाची अधिक माहिती ह्या ग्रथांत दिली नाही.

वरील शिवनारायण अग्निहोत्रि यांच्याप्रमाणे, पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर, विजयकृष्ण गोस्वामी, शशिपद बानर्जी त्या ब्राह्मानींही आपआपल्या वेगळ्या धर्म संस्था काढल्या. आणि याच महत्त्वाकाक्षी मडळींच्या वर्गांत प्रतापचंद्र मुझुमदार, रवींद्रनाथ ठाकूर, पडित शिवनाथशास्त्री इत्यादि दुसऱ्याही कित्येक ब्राह्मांचा समावेश करितां येईल. ह्याप्रमाणे हिंदूंचें देवत्रय अगर देवत्रयच कशाला तेहतीस कोटि देव, ईश्वराचे अनेक अवतार, पारमार्थिक सद्गुरु, कर्मठ शास्त्री आणि पुरोहित या सर्वांचे व्यक्तिमहात्म्य हिरावून घेऊन आणि प्राचीन परंपरेत मिळालेल्या श्रेष्ठ स्थानावरून त्यांना पदच्युत करून ब्राह्मांनीं व्यक्तिशः पुन्हा त्याच श्रेष्ठपदाची महत्त्वाकांक्षा धरली, आणि केशवचंद्र सेनच काय पण त्यांच्याविरुद्ध बंड पुकारणाऱ्या साधारण-ब्राह्मांतही शिवनारायण आणि शिवनाथशास्त्री यांच्यासारखे कित्येक स्वतांचे देव्हारे होऊं देणारे थोर पुरुषही निर्माण झाले! याप्रमाणें धर्मवृक्षा-

वरील दैवी अवताराचा शेंडा तोडला खरा; पण त्याचा परिणाम दुसरे अनेक किरकोळ शेंडे उत्पन्न होण्यांतच झाला. ह्याप्रमाणे साऱ्या आचारधर्माचे ध्येयरूप दूषित झाले. हीच गोष्ट धार्मिक अनास्थेस कारण झाली. निरनिराळ्या अधिकारांपरत्वें निरनिराळीं श्रेष्ठ कनिष्ठ ध्येये समाजास लागत असतात. जे झालेचि नाहीं। त्याची वार्ता पुसशी काई ॥ असा जगाचा त्रिकालीं निरास पहाणारे श्रीसमर्थ, अथवा, परी शंकरा शेवटी कोण जाळी ॥ येथपर्यंत अद्वैत तत्त्वविचाराची उघड भाषा बोलणारे तेच समर्थ श्रीरामभक्तीची परंपरा रहावी म्हणून आपल्या निर्याणापूर्वी रामपंचायतनाची स्थापना करतात, अनेक चुन्यामातीचे मारुति स्थापतात आणि जाखाई जोखाईसुद्धां सर्व दैवतें राखावीं असे बजावून सांगतात, यातील रहस्य हेच आहे. वैष्णव संप्रदायांत कितीही योग्यतेचे व महत्त्वाकांक्षी पुरुष झाले तरी त्यांचे श्रेष्ठ उपास्य मानवी जीवाच्या स्पर्धेच्या फारच पलीकडे राहिले. त्यामुळे वैष्णवपंथाचा पसारा समुद्राप्रमाणे वाढला. त्याचप्रमाणे शैव किंवा शाक्त पंथांचीही गोष्ट आहे.

केला मातीचा पशुपति । परी मातीसी काय म्हणती ॥
शिवपूजा शिवास पावे । माती मातीमाजी सामावे ॥

हें बहुतेक सर्व मूर्तिपूजक हिंदूंना ठाऊक असते. भजणारा परमेश्वरालाच भजत असतो. परंतु परंपरेने बांधलेली सामान्य जनतेची ही देवपूजा मोडून हे देवभंजक जेव्हा आपलेच व्यक्तिमहात्म्य वाढवूं पहातात, तेव्हां त्यांच्या हातून कोणत्याच तत्त्वनिष्ठेचा परिपोष न होतां समाजांत ईर्षा, बेदिली व नास्तिकपणा मात्र जास्त फैलावतो.

ब्राह्मांचा अनंत उन्नतिवाद शिवनारायण ह्यांनीं आपल्याच व्यक्तिकत्वांत खुटवला. तो कांहीं लोकांस पटला. कारण, ब्राह्मांच्या अनिश्चित ध्येयवादापेक्षां त्यांत त्यांस प्रत्यक्षता दिसूं लागली. जीव आणि सृष्टि हीं सत्य मानल्यावर ब्राह्मांचा केवल परमात्मा हा कित्येकांस केवळ कल्पनामय वाटून देवसमाजांनी तो सोडून दिला, व ब्राह्मांची समाजनीति तेवढी त्यांनीं घेतली. किंबहुना ब्राह्मसमाजावर थोडीशी सरशी करण्याच्या अहमहमिकेने मद्यमांस निषेधासारख्या आणखीही कांहीं सामाजिक सुधारणा त्यांनीं हातीं घेतल्या. तसेच एकदम नास्तिक मताचा फैलाव करतांना लोकक्षोभ होणार हे जाणून त्यांनीं सरकारची मर्जी संपादून त्यांचें

पाठबळ मिळविण्यांत ब्राह्म सुधारकांपेक्षांही अधिक दक्षता दाखविली. ह्याच धोरणाने विचार करितां या व्यावहारिक पंथाची पुढली पायरी म्हणजे देव-गुरुभगवान् हेंही अलौकिक ध्येय किंवा उपास्य नाकबूल करून शेंड्यावांचून नुसताच सामाजिक संघाचा बुडखा राखणे हीच होय. आणि वरील देव-समाजी देवरतन ह्यानीं तसाच उपक्रम करून शीलसंवर्धक समाज ह्या अर्थाच्या नांवाचा एक नवीन संघ काढला आहे. या संघास देव मान्य नाहीं, त्याचप्रमाणे येथील कोणी देवगुरुही मान्य नाहीत. तात्पर्य, भौत्तिक आणि अध्यात्म यांच्या समन्वयाच्या प्रयत्नात अखेर भौतिक हेच धर्माचे अधिष्ठान बनलें. तेव्हां सहजच वर्णाश्रमधर्माची व्यवस्थिति आणि धर्मसाधनाची परंपरा अजिबात सुटून धर्माचे अवतरण केवळ उपयुक्ततेत आणि त्यापुढे अनास्थेत व पुढे अधोगतींत असा हा आधुनिक विचारक्रातीचा क्रम दिसतो.*

---

* The fancied harmony in the system between the Absolute on the one hand and science and evolution on the other, commended this (Hegelianism) system to many, and the westernised Hindus are still chewing the cud of Hegelian philosophy. A very poor absolute indeed. I can very well understand why the pragmatists of to-day laugh at Hegel's absolute and calls it a zero. The abolition of such an absolute does not make the least difference in our life For the true Absolute we must come to the Vedant philosophy of Hindustan.

*—Pessimism and Life's ideal p. 12.*

## प्रकरण पंचविसावें

# समन्वय

गेल्या शतकांत हिंदुस्थानांत झालेल्या धार्मिक चळवळीपैकीं ब्राह्मसमाज व देवसमाज ह्या दोन संस्थांच्या इतिहासाचे संक्षिप्त विवेचन आतांपर्यंत केले.

विषयमहात्म्य

आज हिंदुस्थान देश जसा परतंत्र आहे, तसाच तो ह्या चळवळीच्या प्रारंभीही होता. आजच्या सामाजिक व औद्योगिक चळवळींचें महत्त्व आपणांस वाटत आहे, त्यांचें महत्त्व त्या वेळीही होते. असे असल्यामुळे त्या काळीं धार्मिक चळवळीस सुशिक्षित लोकांकडून जें प्राधान्य देण्यांत आले, ते वास्तविक आजही द्यावयास पाहिजे आहे. कारण धर्माचरणानें आपलें कोणते कल्याण होणार आहे, हे आजच्या तार्किक युगांत पटणें जरी कठीण असलें, तरी आज आपल्या देशांत व देशाच्या बाहेर पसरलेल्या दुहीस आणि अशांतीस कारण कांहीं अंशीं धर्मभेद आहे, हे पटणे कांहीं कठीण नाहीं. हिंदुस्थानदेश परतंत्र म्हणतात; पण देश परतंत्र कसचा आणि गरीब तरी कसचा, उद्यां येथें जर जिकडे तिकडे इंग्रजानीं वसाहत केली, तर याच देशाची अमेरिका होण्यास पांचपंचवीस वर्षेंही लागणार नाहींत. इंग्रजांचे पिढीजात शत्रु जे जर्मन व रशियन लोक त्यांच्याइतकाही मान व प्रेम इंग्रज आमच्यासंबंधीं दाखवीत नाहींत, याचे कारण आमचा धर्मभेद हेंच होय. तसेच आज कित्येक पिढ्या एकाच अन्नोदकाचे ऋणानुबंधी किंबहुना थोड्याच पिढ्यांपूर्वीं एकाच रक्ताचे असलेले आमचे मुसलमान देशबंधु जे आम्हांस इंग्रजांपेक्षांही परके आणि पारखे होत चालले आहेत, त्याचें कारणही धर्मभेदच होय. अशा स्थितींत आपल्या धर्माची इतर धर्मांवर छाप बसेल अशा प्रकारे त्याचे पुनरुज्जीवन तरी केलें पाहिजे, किंवा आपल्या धर्मानें आज विद्यमान असलेल्या परधर्मांत अगर पुढें होऊं घातलेल्या सार्वत्रिक धर्मांत समरस तरी झालें पाहिजे.* त्यावांचून हा धर्मभेदाचा जाच कमी होण्यास निदान आजच्या परतंत्रतेंत तरी दुसरें साधन दिसत नाहीं.

---

* Whatever changes may take place in the religion and social

हा धर्मभेदच राजा राममोहन यांस अत्यंत अनिष्ट वाटूं लागला. जगाचें धारण करणें हें जें धर्माचें वास्तविक लक्षण तें त्यास कोणत्या उपायानें प्राप्त होईल, हा फार व्यापक प्रश्न राजा राममोहन यांनीं प्रथमच उपस्थित केला, आणि तो प्रश्न सोडविण्यास आरंभ म्हणून सार्वत्रिक धर्माची बीजभूत कल्पनाही त्यांनीं आपल्या मनाशीं तयार केली. ब्राह्मसमाज काय आणि देव-समाज काय, दोघांचे ध्येय साऱ्या जगास व्यापण्याचे आहे.† पुढेमागे साऱ्या मानवकोटीचा कोणता तरी एकच धर्म व्हावयाचा असेल तर तो आमचाच धर्म, असे उभय सांप्रदायी म्हणत आले आहेत; आणि तो त्यांचा विश्वास अद्यापिही कायम आहे. हिंदुस्थानांत व हिंदुस्थानच्या बाहेर धर्ममतांत अलीकडे ज्या उदार सुधारणा घडत आहेत, त्यांस प्रेरणा आमच्या समाजाकडून घडली आहे असे ब्राह्म मानीत असतात. देशांतील सामाजिक सुधारणा, शुद्धिसंघटन, अस्पृश्यता-निवारण इत्यादि चळवळींचे श्रेय ब्राह्मसमाजाकडे आहे असे सांगण्यात येतें. किंबहुना ब्राह्म असेच म्हणतात कीं, आजचे हिंदुस्थानांतील वातावरण ज्या उदार मताने भारलेले आहे, तीं उदार मते ब्राह्मांनींच प्रसृत केलेलीं आहेत.§

सार्वत्रिक ध्येय

---

mechanism of Hindu society it is certain that Hindus will not adapt wholesale the religion and the manners and Customs of Europe, but will carve out a civilization of their own, and cling to the primitive religion of their country with modifications and improvements made by themselves. And while India advances in the path of true religion will not other nations advance also? They are also expected to apply reason to their respective faiths, and evolve theism from the same. Thus realising the hope of the illustrious Ram-mohan Ray—that all nations would worship together the common father of mankind in spirit and in truth."  —*Leonard pp. 178–179.*

† The mission of the Brahmo Samaj is to lift the burden of despondency weighing on the bosom of humanity.

—*Herambachandra Maitra, I. M 26-6-27.*

§ (*a*) They betray their own obscurantism who talk lightly of the movement, which is carrying on an all round propaganda influencing and liberalising, at the same time, Christianity, Islam and Hinduism.

—*Indian Messenger, dated 16-1-1927.*

(*b*) It was Brahmoism alone that could claim to be a universal religion.  —*Rajanikant Guha, I. M. 8-2-25.*

एखाद्या खोलींत एका कोपऱ्यांत एक म्हैसुरी उदबत्ती पेटती असावी आणि तिच्या वासानें सर्व खोली भरून जावी; त्याप्रमाणें ब्राह्म-समाज ही संस्था लहान असली तरी तिने केलेले कार्य फार व्यापक स्वरूपाचे आहे असे ब्राह्म म्हणतात. हे त्यांचे म्हणणे एका अर्थी खरे आहे असे म्हणता येईल. चांगल्या गोष्टी-पेक्षां वाईट गोष्टीचा प्रसार फार लवकर होतो. औषधीं-पेक्षां विषाचा संचार फार जलद होतो. हंडाभर दुधात साखरेचा खडा टाकला तरी त्याची माधुरी दुधांत जाणवणारही नाहीं, पण तोच खडा मिठाचा असला तर साऱ्या दुधाचे रूपांतर करील. प्लेगदूषित उंदरावरील पिसवा त्या काय पण त्यांनीं टोचलेले विष मनुष्याचे सारे शरीर व्यापते. मनुष्याची बुद्धि सुसंस्कृत होण्यास हाडाचीं काडे करावीं लागतात; पण बुद्धि भ्रष्ट करण्यास वेळ लागत नाहीं. तात्पर्य ब्राह्मांच्या विचाराची छाया ही परप्रकाशित चंद्राची चंद्रिका असो किंवा ज्ञानसूर्याचे ग्रहण असो, उदबत्तीचा धूर असो किंवा गंधकाची धुरी असो, पण जपाकुसुमांप्रमाणे आरक्त असणाऱ्या वैदिकधर्मनिष्ठेच्या सूर्योपासक सुमनां-नींही आपला रंग पालटला आहे, ही गोष्ट खरी. उदाहरणार्थः—(१) बंगालच्या मुखोपाध्यायांच्या श्रेष्ठ ब्राह्मण कुळांतील बॅरिस्टर मुकर्जी ह्यांचा 'हिंदूंचा ऱ्हास';*

प्रागतिक विचारसंचार

---

(c) In the birth of the future Church of India and the whole world, the Brahma Samaj has made and is making a contribution which is clear to all who have eyes to see. —*Pt. Sita Nath, I. M. 28-1-27.*

* "तुमची ती काशी आणि इतर यात्रा करण्याची क्षेत्रे नीट पहा. अनन्वित पापाचरणाचीं घाणेरडीं गटारे, मोऱ्या, नरककुंडे होऊन बसलीं आहेत! असल्या या भिकार स्थलाच्या महात्म्याची कुंटणगिरी करणे, हेच का तुम्हां हिंदुजनांचे आजचें ध्येय?"

"काली देवीने लाथाडून लोळविलेला तो भिक्षुक-शाहीचा दांभिक व लुच्चा भट आहे. ×× काली देवीला या भटाला चिरडून जमीनदोस्त करणेंच प्राप्त आहे. ×× लबाड भिक्षुकशाहीच्या घाणेरड्या भिकार शिकवणीच्या पचनीं पडल्यामुळें, तुमचा एकजात स्त्रीवर्ग भटाभिक्षुकांचा गुलाम बनला. त्यामुळेंच तुम्हां हिंदुजनांचा सत्यानाश झाला. ×× विवाहविधीच्या गोडस

बॅरिस्टर मुकर्जी व सर डॉ० पी. सी. राय

(२) ब्राह्मणशाहींतील महाराष्ट्रीय काशीच्या दिवेकरशास्त्र्यांचा " हिंदुधर्म समर्थ कशाने होईल ? "* आणि (३) श्रीरामाच्या पंचवटींतील धर्मविद्यालयाचे मुख्य

---

नांवाखालीं माणुसकीला लाज आणणारे असले अत्याचार करण्यापेक्षां, तुम्ही विवाहाचा पोकळ प्रतिष्ठितपणा कायमचा बंद पाडाल तर फार बरे होईल ! या तुमच्या भ्रष्ट विवाह पद्धतीने, अध्यकिच्च्या कमकुवत पोराबाळांची पैदास करून, तुम्ही आपल्या हिंदु जातीची आत्महत्या मात्र करीत आहात."

" सारांश, भिक्षुकशाही म्हणजे आमच्या वर्तमान दुर्दैवी अधःपाताची खाणच म्हटली पाहिजे." —सर डॉ० पी. सी. रॉय.

बॅरिस्टर मुकर्जी याच्या ( The Decline and Fall of the Hindus) या पुस्तकाचा ठाकरेकृत अनुवाद, पान १६९ ते १७४.

* "(१) पूर्वपरंपरा व सद्यःस्थिति यांचा समन्वय करण्याची योजना केली पाहिजे. (२) कर्मठ भटांची भिक्षुकी संतांनीं घालविली असेल पण संतांच्या मध्यस्थीचें बंड तेव्हांपासून बोकाळलें. (३) जिज्ञासा-मारक वेदान्ताला नमस्कार करून हिमालयात पाठविलें पाहिजे. (४) हिंदुस्थानांत एक लक्ष निरुद्योगी साधू आहेत म्हणे !! हे लक्ष साधू पोसणे म्हणजे हिंदुसमाजाने लवकर मरण्याच्या मार्गाला लागणें आहे. (५) या साधूंचा धर्म बुडला या म्हणण्याचा अर्थ इतकाच कीं, पूर्वीसारखी यांना हल्लीं चंदी मिळत नाहीं. (६) ह्या साधूंचा सैन्यांत भरती करावी. (७) दुबळ्या वेदान्त्यांना मारण्याचा किंवा मरण्याचा वेदान्त शिकवावा. (८) हिंदुस्थानचा नागरिक, हिंदुसमाजाचा अभिमानी, गृहस्थाश्रमी आणि भौतिकशास्त्रांतील एक दोन शाखांत तज्ज्ञ असा साठ वर्षांवरचा मनुष्य हिंदुसमाजाने यापुढे वेदान्ताचा अधिकारी समजला पाहिजे. (९) जगन्मिथ्यात्वाचा वेदान्त आतां हिंदुस्थानांत पुरे झाला. (१०) " सर्वं जगदिदं ब्रह्म " हे तत्त्व शिकविले पाहिजे. (११) मनुष्याला अवतार मानणे हें गुलामगिरीचे द्योतक आहे. (१२) जयंत्या आणि अवतार यांचे बंड कमी केले पाहिजे. (१३) शेवटचा अवतार श्री शिवाजीमहाराज असे समजावे. आणि आतां यापुढें अवतार संपले. अशा समजुतीने लोकांनीं आपआपल्या उद्योगाला

वे. शा. सं. महादेव शास्त्री दिवेकर

अध्यापकांचा "धर्मरहस्य"* हे व असे ग्रंथ वाचले; तसेंच धर्मांतरानें शुद्धि,

---

लागावें. (१४) यत्नदेवाची उपासना यापुढे हिंदुसमाजाने केली पाहिजे. (१५) समष्टिधर्माचें यथायोग्य अनुष्ठान होण्याकरितां अस्पृश्यतानिवारण, चढाईचें शुद्धिकार्य, ब्राह्मण-ब्राह्मणेतर-वादाचें निर्मूलन, वैवाहिक सुधारणा, आणि स्त्रियांची उन्नति हीं झालीं पाहिजेत. (१६) जन्मतः कोणतीही व्यक्ति अगर जाति उच्च नाहीं आणि नीच नाहीं. (१७) आतां देवळें बांधणें हें पापकर्म आहे. (१८) पापपुण्याच्या कल्पना बदलल्या पाहिजेत. (१९) तत्त्वज्ञान चढाईचे आणि आक्रमशील असे पाहिजे इत्यादि.

*" जुन्या मतांप्रमाणे 'वेदांत कोणासच फरक करतां येत नाहीं' हें खरें नाही आणि नवीन मताप्रमाणे कोणासही बदल करतां येईल हेही खरे नाहीं. फक्त ह्या काळच्या सर्व लोकांस मान्य असलेल्या पुरुषश्रेष्ठांच्या परिषदेसच असे करतां येईल. जुन्या मताप्रमाणें सांप्रतचाच आचार अनंत काळपर्यंत चालू रहावा हें सत्य नाहीं. तसेच प्रत्येकाने मनःपूत आचरण करावे हेही सत्य नाहीं. तर सांप्रतच्या सर्वश्रेष्ठ पुरुषांच्या परिषदेच्या मताप्रमाणे सर्वांनी चालावे हेच खरे आहे. केवळ निवृत्ति किंवा प्रवृत्ति धर्म नसून, प्रवृत्तिनिवृत्ति संयोग हाच धर्म होय. वर्ण हे केवळ जन्मसिद्ध किंवा केवळ गुणकर्मसिद्ध नसून अंशतः जन्मसिद्ध व अंशतः गुणकर्मसिद्ध आहेत. सारांश, सत्याची रेषा याचप्रमाणे जुन्या नव्या मतांच्या मधून गेलेली आहे.–एकंदरींत अतिशय उच्चतर सुख म्हणजे निःश्रेयस प्राप्त करून देणारे कर्म किंवा अकर्म, धर्म होय.–आत्मसुख ज्ञानकर्मसंयोगानेच प्राप्त होतें.—(१) ब्राह्मण-वैश्यांनीं प्रसंगी हातीं शस्त्र धरणे सोडलें. (२) ब्राह्मणांसच धर्म बरोबर न समजल्यामुळे सर्वांचीच दिशाभूल झाली. (४) आरंभीं जे सर्व वर्णांमध्यें अन्नव्यवहार आणि विवाह होत असत, ते बंद करण्यांत आले. (५) वर्णांतराची व्यवस्था नाहींशी झाली. इत्यादि वर्णव्यवस्थापालनांत आजपर्यंत चुका झाल्या."—पृष्ठे७।८९।२५६।२५७।२७८.

नाशिकच्या धर्म-महाविद्यालयाचे मुख्याध्यापक श्री० दप्तरी

[ ह्या ग्रंथकाराच्या विचारांचे खंडण धर्मोज्जीवनी सभेने प्रसिद्ध केलेल्या ग्रंथांत पहाण्यास मिळेल.]

भेदनिषेधांनीं संघटन आणि मांसाशनानें सामर्थ्य, संपादावें, असें हिंदूसभेच्या पुढाऱ्यांचें अलीकडील धोरण पाहिलें म्हणजे आपल्या देशांत धार्मिक विचारांचा वारा कसा फिरत चालला आहे, हें दिसून येतें.§ जिकडे तिकडे शिष्ट लोकांत समन्वय अथवा सुवर्णमध्याची भाषा सुरू आहे. तत्त्वज्ञान आणि धर्मसिद्धान्त यांत अशी तडजोडीची भाषा बोलण्यास अवसर आहे, असें मानले, तरी हा सुवर्णमध्य* एका हिंदुधर्मापुरता पाहणे निदान ब्राह्मां-च्या दृष्टीने व्यर्थ आहे. तो धर्मोज्जीवनी सभेत जसा ब्राह्मांस दिसणार नाहीं, तसाच तो ब्राह्मसमाजांतही इतरांस आढळणार नाहीं. त्यासाठीं प्रथम साऱ्या हिंदुस्थानांत जन्मलेल्या निरनिराळ्या पंथांच्या व संप्रदायांच्या धर्मविचारांची तुलना करून त्यांत कांहीं मेळा घालतां आल्यास पाहिला पाहिजे. आणि तसा कांहीं मेळ पडल्यास नतर हिंदुधर्म आणि इतर धर्म यांचा तुलनात्मक विचार झाला पाहिजे. ह्या सर्व कालावधीच्याच गोष्टी आहेत. पण त्या सर्व घडून येईपर्यंत सार्वत्रिक धर्म ह्या सामासिक शब्दाला कोणताही सामाजिक अर्थ प्राप्त होणार नाहीं.

ह्याप्रमाणे सार्वत्रिकधर्माची संघटना व त्या योगाने जगास प्राप्त होणारी शांति ह्या गोष्टी जरी आकाशींच्या चंद्रम्याप्रमाणें फार दूरच्या असल्या तरी, धर्मसंस्थेचे महत्त्व दुसऱ्या एका दृष्टीने अधिक जवळचे व निकडीचे आहे असें आम्हांस वाटतें. आजकालच्या साऱ्या जागिक व्यवहाराची उलाढाल राजकारण ह्या चलनी नाण्यावर होऊं लागली आहे.† ह्या नाण्यांत जर धर्माची किंमत होईल तरच त्याचा खप आहे. नाहींतर त्यास कोणीच पुसेनासें झाले आहे. धर्म ही एक किमया आहे, ही गोष्ट लोक विसरले आहेत.‡ आज

§ That we have sunk so law in the scale of nations appears now to most of us to be due to our philosophy and religion. —*Pessimism p. 1.*

* मागे पान १८८-३४४ पहा.

† To be sincere, the Modern man's religion is patriotism and love of humanity, especially in a dependant and oppressed country like ours the religion of the majority of the educated people is struggle for ridding us from the yoke of the foreigner.

—*Braja Sundar Ray, I M. 3-7-27.*

‡ पण प्राचीन भारतवर्षानें या स्वातंत्र्याचीही उपेक्षा करून असा सवाल

जें राजकारणास महत्त्व प्राप्त झालें आहे, तें योग्यच आहे असे जरी मानलें, स्वराज्य प्राप्ति आणि स्वातंत्र्य हीं कशाने मिळतील ते बोला हा सर्वांपुढे एकच प्रश्न आहे असे गृहित धरले, आतां हिंदूंनी यापुढे जगणे अगर नामशेष होणे, हें एका स्वातंत्र्यप्राप्तीवर अवलंबून आहे, हे जरी खरें असले, तरी आज शेंदीडशे वर्षांचा जडलेला हा पारतंत्र्याचा राजयक्ष्मा दूर होण्यास सद्धर्मानुष्ठान ह्यावांचून दुसरा इलाज नाहीं, उपासनेच्या बळावांचून दुसरें बळ नाहीं, ईश्वरी कृपा संपादन करण्यापलीकडे दुसरा तरणोपाय नाहीं. असे आम्हाला तरी स्पष्ट वाटत आहे.

धर्मानुष्ठान

आंग्लविद्याव्याघ्रीचे दूध प्यालेल्या कित्येक प्रागतिक चळवळ्या वाघांनी बारा हात उडी मारण्याच्या अवसानानें आपल्या आंगचे शैथिल्य मोडून शेपटया झाडाव्या; परंतु पुढें चारी बाजूंनीं मारलेले पारतंत्र्याचे उंच उंच पोलादी गज पाहून त्यावर गुरगुरत आपली नाके घासून उडीची रग तशीच जिरवावी, अशा प्रकारच्याच आजच्या साऱ्या राजकीय चळवळी परिणामीं दिसत आहेत ! जीव स्वस्थ बसूं देत नाहीं, उघडया डोळ्यांनीं प्राण जात नाही, म्हणून कांहींतरी धडपड करावयाची आहे इतकंच ! असले हे निराशेचे उद्गार सांगण्यास एवढी ही ग्रंथप्रवृत्ति नको होती, असे कोणी म्हणतील, त्यास आम्हांस एवढेंच सांगावयाचे आहे कीं, आम्ही निराशावादी नाहीं; प्रबल आशावादीच आहोत. पण ईश्वर करील तें खरें, अशी ही आमची बळकट आशा आहे. त्या ईश्वरीकृपेस पात्र होण्यासाठींच धर्मानुष्ठानाची आम्हांस जरूर वाटत आहे.*

प्रागतिकांचे प्रयत्न आणि ईशकृपा

---

पुढे टाकला आहे कीं, " ततः किम् " पुढे काय ? इच्छेवर प्रभुत्व मिळणें ह्या स्वातंत्र्याचीच भारत वर्षाने अपेक्षा केली आहे.

—रवींद्रनाथ–शान्तिनिकेतनमाला–मराठी भाग पांचवा, पान १४८.

* The attempts of the modern man who has forgotten to cultivate and attain internal and external restraints are less fruitful than they would have been had he cared to attain the spiritual treasures, (षद् सम्पत्ति) had placed himself in close communion with the saints and prophets of old as well as those who are alive, and also had studied the spiritual literature that is best heritage left to him.

—*Pro. Braja Sunder Ray, M. A. B. L., I. M. 3-7-1927.*

आणि त्यासाठींच आजकालच्या आपल्या देशांतील सर्व धार्मिक चळवळींचा तुलनात्मक विचार करण्याचें आम्हीं योजलें आहे.

हा तुलनात्मक विचार शेवटल्या खंडांत होईल. तथापि ह्या तुलनेच्या दृष्टीने नसलें तरी समारोपाच्या दृष्टीने ब्राह्मविचाराची चिकित्सा आम्ही येथे करणार आहोत. आणि ती करीत असतां पूर्वीची पद्धत बदलून ब्राह्मांच्याच लेखातून भरपूर टीपाही देणार आहोत. त्या अशासाठी की, थोरामोठ्यांच्या कृतीवर आणि विचारांवर आम्ही जी आतापर्यंत टीका केली ती निराधार नाही, याबद्दल शंकित वाचकांची ह्या एका प्रकरणावरून तरी खातरी व्हावी.

**प्रांतविशिष्ट अभिमान**

दुसऱ्या एका शंकेचे येथे निराकरण केलेले बरें. लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी यांच्या चहात्या मंडळीत प्रांतभेदाचा विकल्प उत्पन्न झाल्याचे आरोप क्वचित् ऐकण्यांत येतात, त्याप्रमाणे ज्या थोर पुरुषांच्या आचारविचारावर आम्हीं टीका केली आहे, ते महाराष्ट्रीय नसून बंगाली आहेत, या द्वैतभावाने ती मुळींच केलेली नाही. बंगाली लोकांपेक्षां महाराष्ट्रीयाबद्दल अभिमान आम्हांला खातरीनेच अधिक आहे, ही गोष्ट आम्ही मुळींच लपवूं इच्छित नाहीं. खुद्द बंगाली लोकच जे आपले वर्णन करीत असतात ते† सामान्यतः

---

† (a) The emotional and imaginative Bengali is less creed and cult bound than his neighbour in other provinces He is never afraid of innovation and change, when the imported Hinduism of the Sen Rajas became oppressive and unprogressive, the Buddhist Bengali brought in the Pathans to effect a revolution with characteristic results in the life and thought of Bengal .. ..Independant Pathan Kings sought domestic alliances with powerful Brahmin Barons such as Ektaki Bhaduris When Bengal life showed signs of exhaustion and decay under the latter day of Monghul viceroys, the Bengali, mostly the Hindu Bengali, again called in the virile race of British traders to help in the internal revolution of the province. He did not intrigue with the Hindu Mahrathas who were knocking at his door. And he was not mistaken in his choice . The Bengali became the instrument of opening the flood gates of a civilization, quite new and unlike. The Bengali called in the Britisher, helped him to rule and administer province as it came under the British flag. The Bengali took to English education and western culture with an enthusiasm hardly to be seen in

कोणाही महाराष्ट्रीयास भूषणावह वाटणार नाहीं. ब्राह्मसमाजाचे मुखपत्र 'इंडियन मेसेजर' यांतील अग्र व स्फुट लेखांत धर्मभेदातील वैषम्य घालविण्यासाठीं जे मिश्र विवाहाचे ऐन अकबरी इलाज सुचविले आहेत† ते पटण्यासारखे अभिमानशून्य मानसिंग महाराष्ट्रांत आजतरी क्वचितच सांपडतील असे वाटतें.* बंगाल आणि महाराष्ट्र यांच्या वृत्तीमध्ये जरी असा फरक असला तरी ह्या कारणास्तव साऱ्याच बंगाली पुढाऱ्यांबद्दल अनादर दाखवणे, हे योग्य होणार नाहीं.

उलटपक्षीं आमचे तर असे म्हणणे आहे कीं, मुत्सद्दीपणात महाराष्ट्रीय ब्राह्मपुढारी न्या० रानडे आणि राजा राममोहन ह्यांत श्रेष्ठ कोणास म्हणावे हे जरी सांगणे कठीण असले, तरी धार्मिक वाङ्मयाच्या अभ्यासाच्या दृष्टीने राजा राममोहन हेच श्रेष्ठ होते, हे कबूल करणे भाग आहे. ठाकूर आणि भांडारकर हीं घराणीं संतति, संपत्ति व सरस्वति यांची माहेरघरेच खरी, संस्कृत विद्येत डॉ० भांडारकरांची योग्यता म० देवेंद्रनाथांपेक्षां किती तरी जास्त, हेही खरे, पण औदार्याची कृति आणि योगाचा अभ्यास अशा काही असामान्य गुणांनी महर्षींनीं आपली योग्यता फारच वाढविली होती, हे डॉक्टरसाहेबांनींही कबूल केले असते. मुंबईचे भिकोबा चव्हाण हे एक अविद्वान् गृहस्थ जातीने शूद्र असून

ब्राह्मांची तुलना

---

other races. . Bengali ' know thyself and the high destiny that beacons thee, stand manfully against all outside pressure Unto thee is given to lead and not to be led by those who have not yet risen to the height of the vision. —*Leader of In M. 9-5-26.*

(*b*) In fact the position occupied by Brahmo-Samaj affords the only possible solution of the Hindu—Moslem problem. (Spiritual wants.)

† We congratulate the non-Brahmin leader on his bold advocacy of Akabars cure( inter-marriage ) for communal strife.

—*Indian Messenger 25 4-1926.*

* हें लिहून झाल्यावर सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय ब्राह्म डॉ० भांडारकर यांच्या एका पदवीधर नातीने दुसऱ्या एका पदवीधर मुसलमानाशी प्रीतिविवाह केला. त्या निमित्तानें जे लोकमत प्रगट झाले त्यावरून महाराष्ट्रीय सुधारकवर्ग वरील लिहिण्यास अपवादभूत होईल असे दुर्दैवानें म्हणावें लागत आहे !

प्रार्थनासमाजाची आद्यआचार्य ही पदवी पावले. तशीच त्यांची योग्यता असेल. पण राजनारायण बोस यांना शूद्र म्हणण्यास ब्राह्मेतर ब्राह्मणांसही लाज वाटूं लागली. पंडे लोकानीं तर त्यांस विद्यापति (देवमूर्ति) म्हटले.तेव्हां त्यांची विद्वत्ता आणि योग्यता अधिक कशी न म्हणावी ? न्या० चदावरकर यांचे वक्तृत्व, ख्रिस्तीवाङ्मयप्रीति, सुधारणाची आवड आणि भावनाप्रधान स्वभाव अशा सर्व सादृश्याच्या गोष्टी एकत्र केल्या तरी त्यांस केशवचंद्राचें महत्त्व कोणीही देणार नाही. चिकागोच्या धर्मपरिषदेला बाबू प्रतापचंद्र गेले, तसे प्रार्थना-समाजाचे नगरकरही गेले होते; पण एकाची योग्यता दुसऱ्याला मानतां येणार नाहीं. डॉ० आत्मारामदादा प्रार्थनासमाजाचे कायमचे लोकप्रिय अध्यक्ष खरे; पण साधारण-ब्राह्माचे अध्यक्ष आनंदमोहन यांच्या योग्यतेला ते कसे चढतील ? नेटिव ओपीनिअन व सुबोधपत्रिका याचे सपादक मामा परमानद सन्माननीय असतील; पण तत्त्वबोधिनी पत्रिकेचे संपादकमंडळ म्हणजे फारच जड पारडे होते. महाराष्ट्रीय ब्राह्म माडगावकर हे कवि खरे; पण सत्येंद्रनाथ आणि त्रैलोक्यनाथ असल्या प्रासादिक कवींच्या तोडीस ते कसे बसतील ? अडली वेळ भागवून नेणारे सदाशिवराव केळकर आणि विजयकृष्ण गोस्वामी, साधु अघोरनाथ, पडित शिवनाथशास्त्री या धर्मप्रचार-कांची तुलना कशी करता येईल ? प्रार्थनासमाजाचे पंडित पंडित खरे; पण डॉ० राजेंद्रलाल ही असामी भारीच नाही काय ? लालशंकर उमियाशंकर हे थोरच होते, पण शशिपाद बानर्जी याची सेवा आणि छळ हीं दोन्हीही अधिकच झालीं यात शंका नाही. वासुदेवराव नवरगे यानीं मुबई प्रातात पुनर्विवाहांत आघाडी मारली असली, तरी ईश्वरचंद्र विद्यासागरासारखा पुनर्विवाहाचा पुरस्कर्ता दुसरा क्वचितच सापडेल. दामोदरशेटजीचे औदार्य राजा द्वारकानाथ याच्यापुढे किती ? रामचंद्र विद्यावागीश याची समाज-सेवा वामनराव मोडकापेक्षां अधिक कसोटीस उतरली असे माहितगारांस म्हणावेच लागेल. ह्या परलोकवासी झालेल्याचीं नांवे सोडून दिलीं तर आज-चे पं० सीतानाथ तत्त्वभूषण, बाबु नागेद्रनाथ चतर्जी, डॉ० हिरालाल हलधर, प्रो० धीरद्रनाथ वेदांतवागीश, सर डॉ० जे. सी. बोस, सर डॉ० पी. सी. रॉय, डॉ० पी. के. रॉय, लॉर्ड सिंह, बाबू हेमचंद्र सरकार इत्यादि बंगाल-च्या ब्राह्मांच्या तोडीस महाराष्ट्रांत कोण आहेत ? आज प्रार्थनासमाजांत

कोणीच लायक, विद्वान् व उद्योगी पुरुष नाहींत असे आमचें म्हणणें नाहीं; पण वर दिलेल्या माणसाच्या योग्यतेचे पाहू गेल्यास क्वचितच कोणी सांपडतील; व त्यांतल्यात्यांत जे असतील ते ब्राह्मसमाजाचेच अनुयायी* असतील अशी आमची समजूत आहे.

बंगालच्या ब्राह्मापैकीं आम्हीं वरती फारच थोडया गृहस्थांचा नामनिर्देश केला आहे. वास्तविक प्रकार असा दिसतो कीं, गेल्या शंभर वर्षांतील बंगालच्या श्रेष्ठ पुढाऱ्यापैकीं निम्मेहून अधिक ब्राह्मसमाजीच असावेत. अशा बडया पुढारी मंडळींनी ही संस्था चालवून हिंदुस्थानचे कोणते कल्याण केले व कोणतें अकल्याण केले, याचा जर बारकाईने विचार केला तर ह्या सर्वांची दिशाभूल होऊन यानी आपले आयुष्य अंशतः फुकटच घालविले, आणि हिंदु लोकांचे धार्मिकदृष्टया हित करण्याच्या ऐवजीं त्याच्यांत पंथभेद वाढवूनी व त्यांचा बुद्धिभेद करून अपरिमित नुकसानच केले. निदान योग्य मार्गारूढ ते राहिले असते तर जे देशाचे कल्याण ते सहज करूं शकते, ते त्यांनीं केले नाहीं, असे म्हणणे भाग पडते व त्यांचेचबद्दल राहून राहून फार सखेदाश्चर्य वाटते.

काय केले ?

* "You (members of the Prarthana Samaj) have naturally followed the paths opened by your own modern prophets, Ram Mohan Ray, Devendra Nath Tagore, Keshub Chandra Sen, and their successors." —*Freedom, Religion and Reality*, p 3.

¶ या भिन्न भिन्न संप्रदायांच्या व मतवाद्यांच्या आघाताने जगांत द्वेष, कलह व अशांति याचे जे अनर्थ घडत आहेत ते अमर्याद आहेत. असे कां व्हावे ? याचे एकच एक कारण आहे व ते हे कीं, आम्हीं धर्मानुगत न होतां प्रत्येकाने आपआपल्या अभिरुचीप्रमाणे धर्माला स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. धर्माची आम्हाला अत्यंत आवश्यकता आहे यांत संशय नाहीं. पण त्याला स्वतःला अनुरूप बनविण्याचा प्रयत्न केल्यामुळेच त्याच्या आवश्यकतेलाही विलक्षण कमीपणा आला आहे. धर्म हा देशकालातीत, भेदशून्य, विकारविहीन व निरंजन असल्यामुळेंच आम्हांला सर्वकालीं त्याची गरज अपरिहार्य आहे व तो अतित आहे, म्हणूनच, ध्रुवासारखा निश्चल आहे.

—रवींद्रनाथ, शांतिनिकेतनमाला, भाग ५ वा, पृष्ठ ३५.

कोट्यवधि हिंदुलोकांपैकीं सरासरी शेकडा पांच लोक राजकीय, सामाजिक वगैरे चळवळींत असतात. आणि याच शेकडा पांचांपैकीं कांहीं गृहस्थांनीं ही धार्मिक चळवळ हातीं घेतली.† सर्व धर्मांत श्रेष्ठ आणि सर्व धर्मांत जुना अशा हिंदुधर्माच्या परंपरेत देशकालमानानें कांहीं फरक घडवून आणणें कधींकधीं जरूर होईल हे खरें; पण धर्माच्या बाबतींत घडून येणाऱ्या स्थित्यंतराचें प्रमाण फारच सूक्ष्म व तें घडवून आणणाऱ्यांची योग्यता व अधिकार फारच मोठा असला पाहिजे, हें कोणीही कबूल करील. धार्मिक सत्यें प्रायः त्रिकालाबाधितच असतात.* देशकालमानानें व्हावयाचा फरक बहुधा परंपराच हळुहळू घडवून आणीत असते. असें असल्यामुळें धर्मांत बळेंच क्रांति घडवून आणणाऱ्या पुरुषाचें धर्मविषयक ज्ञान फारच सूक्ष्म व व्यापक स्वरूपाचें, तसेंच तें अनुभवसिद्ध व निःसंदेह प्रकारचेंच असलें पाहिजे, हें उघड आहे. परंतु ब्राह्माचा प्रकार अगदींच विपरीत दिसतो.

क्रांतिकारक ब्राह्माचा अधिकार

राजा राममोहन यांनीं आपला पहिला धार्मिक निबंध ( तहफतुल मुवाहिद्दीन ); प्रसिद्ध केला त्या वेळीं ते चवदापंधरा वर्षांचे असतील. त्या वेळीं त्याना संस्कृताचा गंधही नव्हता. त्यानीं प्रथम इस्लामी व नंतर बौद्ध धर्माचा अभ्यास केला. तसेंच अरिस्टॉटल, युक्लिड अशा पाश्चात्याचेंही ग्रंथ त्यानीं पाहिले. आणि त्यांचे पूर्वग्रह बनत चालल्यावर त्यानीं संस्कृत विद्येचा अभ्यास केला.§ महर्षि देवेंद्रनाथ याची स्थिति याहूनही थोडी चमत्कारिक

† The intellectual and therefore the political lead was yet confined to, and monopolised by the remaining 5 p. c. of Indians. Brahmo Samaj was a talk of these 5 p. c.—a talk between themselves and to themselves. As such it is an academic and aristocratic movement of the intellect in the main and therefore no wonder that it has not yet reached the masses. No religion has ever yet been a mere class movement, such as this.

Brahmoism which is rightly claimed to be universal message, yet remained for all practical purposes a Bengali movement.

—*V. R. Shinde, I. M. 2,3-24.*

* मागें पान १९२।१९३ पहा.

§(*a*) It points conclusively to the fact that Rammohan's awakened

होती*.ते ब्राह्मसमाजाचे कर्णधार झाले तेव्हां वैदिक वाङ्मयाचा अभ्यास त्यांनीं

life was one of continuous transition. From the time when he left his father s house in revolt against conventional Hinduism to the last days in Stafleton Grove, his mind was moving on . The youthful reformer was for showing up the mistakes of all the religions . . The primal religious impulse of Rammohan s nature was at last disentangling itself from the intellectualism under which it had long been working, at first joyously, but latterly with painful sense of oppression. ... . The theological transition which lasted all his life, was at his death left incomplete. We may not guess at its completion.

*--Life of Rammohan by H. C. Sarkar, pp. 235-238.*

(b) They have studied the Raga in vain who think that he either believed on the veda or the Koran or the Bible --*Leader I. M 16-5-26.*

(c) On questions of religious faith Rammohan Ray was in general too pliant A lady once observed to me that she was rejoiced to find that he was a sincere Trinitarian, and that he had merely gone to unitarian places of worship from curiosity, as he had attended quakers meetings, the Jewish Synagog &c

*--Mr James Sutherland who was warmly attached to the Raja.*

(d) Raja Rammohan never truly understood Adwaitavada nor could he enter into the spirit of the other schools of Hinduism, through the want of vairagya in his life The Raja passed through the phase of French Illumination and Deism and at last accepted Unitarianism as final The mono. theism of Islam also appealed to him.

*--Kamakhya Nath Mitra, M. A Principal, Rajendra College.*

(e) मागें पृष्ठ ३३–१२९ पहा.

* " .. as to the Maharshi we know the time when he had no aquaintance with these (Hindu) scriptures, the time when he had studied them only superficially and was carried away by what seemed to him their excellences The Samaj itself changed with his personal changes . It is evident from the Maharshi's autobiography that his belief in theism preceded his study of the Hindu scriptures, and his acquaintance with the Raja's works . ..The English education that he had received must have had its due influence .. . For any regular system of spiritual culture, however, we seek in vain in Maharshi's writing and discourses . .. Thus theMaharshi gives the term *atmapratyaya* a meaning entirely his own and deprives it of the significance it possesses in the Upanishads and in the vedantic literature.

*--Philosophy of Brahmoism by Pt. Sita Nath Tatvabhusan Lecture I & III.*

मुळींच केलेला नव्हता.$ ईशावास्य उपनिषदाच्या पहिल्या मंत्राचा भावार्थ समजण्याइतकेही त्यांस संस्कृत येत नव्हते. 'संन्याशाच्या लग्नास शेंडीपासून तयारी', याप्रमाणे वेदाचा अभ्यास करण्यास चार विद्यार्थी त्यांनीं काशीस पाठविले होते. ते वेदविद्यापारंगत होऊन आल्यावर त्यास वैदिक धर्माचें रहस्य सांगणार होते. पण दुर्दैवाने पैशाच्या अभावीं त्यांस लवकरच परत बोलवावे लागले. अर्थात् वेदाभ्यासाचा ग्रंथ तेथेच आटोपला! तिसरे, केशवचंद्र सेन याना धर्म आणि तत्त्वज्ञान म्हणजे काय याची कल्पना बरेच दिवस नव्हती. पुढे ते आचार्य ब्रह्मानंद म्हणून मिरवूं लागले तेव्हा ते कदाचित् ख्रिस्तीधर्मपारंगत असले तरी त्यास स्वधर्माच्या वाङ्मयाचा गंधही नव्हता.† मूर्तिपूजा टाकून केशवचंद्र ब्राह्मसमाजात जाऊं लागले तेव्हा ते १७।१८ वर्षांचे असतील. बाविसावे वर्षी त्यानी उघड रीतीने जानवे तोडून ब्राह्मदीक्षा घेतली. त्याच्या व्यवसायव्यापृत्वामुळे वेदाभ्यासाचे काम त्यानीं उपाध्यायद्वाराच उरकून घेतले. चवथे, शिवनाथबाबू याच्या सामाजिक चारित्र्याला आरंभ कॉलेजातच झाला. आणि तो आरंभ म्हणजे ईश्वरचंद्राच्या संगतीने विधवाविवाहाच्या चळवळीपासूनच होय.§ ईश्वरचंद्र हे पंडित असले तरी ते जवळजवळ नास्तिक होते, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. शिवनाथबाबूंचे पूर्ववय सारे बंडखोरीतच गेले, हे त्याच्या चरित्रा-

---

$ He began to study Sanskrit This was in 1838

—*S. N. Shastri's History of Br. Samaj p. 85.*

† The philosophy taught in these writings (Theological and Ethical essays) of Keshav is not of a profound nature. They show some acquaintance with the current philosophy of Great Britain and France in those days, specially that of the intuitional school, but nothing like a clear grasp of the general trend of either eastern or western thought on the metaphisical subjects... Of Hindu philosophy Keshav knew nothing in those days. At any rate we find him silent about it in his writings and addresses till the very last days of his life. —*Keshub's life by Natesan, pp. 11 & 12, see pp. 201, 517 Supra.*

§ Sastri was, even from his young days a great admirer of Pandit Isvarchandra Vidyasagar and an advocate of his widow remarriage propaganda......When he seems to have just matriculated he actively promoted two widow remarriages.

—*Life of Siva Nath by Tattvabhushan p. 12.*

वरूनच दिसून येतें. आनंदमोहन यांचा आवडता ग्रंथ म्हणजे बायबल होय. रवींद्रनाथ हे हिंदुधर्मज्ञ नव्हत, ब्राह्मतत्त्वज्ञ नव्हत, तर केवळ भावनाप्रधान बंगाली कवि होत.‡ आतां अगदी निवडक मंडळीपैकीं राहतां राहिले पंडित सीतानाथ तत्त्वभूषण. त्यानीं आपली मतें चवदाव्या वर्षापासूनच ठाम करण्यास सुरुवात केली. त्यांच्या आयुष्याचा निदान पूर्वार्ध तरी खिस्तीधर्मशास्त्र व खिस्ती तत्त्वज्ञान याच्याच अभ्यासात गेला.

खिस्तीधर्मप्रेम

त्यानीं स्वधर्माच्या वाङ्मयाकडे प्रथम ढुंकूनही पाहिलें नाहीं.* केशवचंद्र सेन व त्याचे निकटचे अनुयायी यांची सर्व भिस्त खिस्ती धर्मशास्त्रावरच होती. केशवचंद्र व त्यांचे काहीं अनुयायी यास श्रीरामकृष्णाच्या संगतीनें वेदान्ताची गोडी अगदी अखेरीस उत्पन्न झाली, आणि म्हणून बहुतांशानें खिस्तजमा झालेल्या प्रतापचंद्रास केशवचंद्रांच्या अनुयायानीं आपला पुढारी मानण्याचें नाकारलें. हे खिस्तीधर्माचें माहात्म्य ब्राह्मसमाजातून अद्यापिही अगदीच कमी झालेलें नाहीं.§ अद्यापिही खिस्त्याचे सण पाळणें व बायबलचे वर्ग समाजात शिकवणें वगैरे प्रकार सुरूच आहे. खिस्तधर्मासंबंधी तुमची बुद्धि अनुदारपणाची आहे असें जर कोणी बोलले तर ते ब्राह्मपुढाऱ्यास खपत नाहीं. ब्राह्माचें मुखपत्र (Indian Messenger) काळजीपूर्वक पाहणाऱ्यास असें दिसून येईल कीं, आज ब्राह्ममतात परिवर्तन घडवून आणण्याचें कोणास सामर्थ्य असेल तर ते

‡ Rabindra Naths voice is not the voice of India and he is not at all our respresentive poet. The man who will interpret India must enter into the spirit of her cultural continuity and cutural history from vedic times to the present age—the age of Ramkrishna

—*Kamalkhya Nath Mitra, M. A. Pessimism 45.*

*(a) "I took a firm stand against caste and idolatry when I was only fourteen." -- *Sita Nath, I. M. 24-2-24.*

(b) "The Vedant philosophy did not much attract me. The Brahmo leaders had cried it down and I was repelled by it. I made as deep study of the European philosophy and Natural theology as I could and formed my own opinion of the foundation of Brahmoism" —*Ibid*

§ We yield to none in our admiration of the Christian service to India. —*I. M. 8-1925 see also I. M. 1-5-27.*

खिस्ती लेखकांसच आहे. तिकडील लोकांचे नवीन अनुभव व नवीन विचार त्यांच्या नियतकालिकातून किंवा ग्रंथांतून प्रसिद्ध झाले, म्हणजे त्या ओघाप्रमाणें ब्राह्म-नावेच्या शिडास थोडीतरी माचण घ्यावी लागतेच असे वरचेवर दिसून येतें. तात्पर्य, हिंदूंचीं वेदवेदांगे, स्मृतिं आणि पुराणे, टीका व भाष्यग्रंथ, योगादिशास्त्रे आणि तांत्रिक आणि मांत्रिक अनुष्ठानिक ग्रंथ इत्यादींचा सांगोपांग अभ्यास तर राहोच, पण नुसत्या प्रस्थानत्रयीचा ज्यानी आस्थापूर्वक अभ्यास केला आहे असे साऱ्या ब्राह्मात बोटानी मोजण्याइतकेही सांपडणार नाहींत!‡

ब्राह्म-पुढाऱ्यांची अशी ही अर्धवट स्थिति असता त्यांची ज्यांच्याशी गांठ पडली ते खिस्ती धर्मप्रचारक, प्राच्यविद्यासंशोधक आणि खिस्ती राज्यकर्ते हे आपल्या स्वार्थाला पुरे जागे* असून खिस्ती धर्म, संस्कृति व सत्ता यांचें वर्चस्व स्थापित करण्याकरिता डोळ्यात तेल घालून झटत होत. हिंदुस्थानांतील वर्णाश्रमाचे तट त्यांस फोडावयाचे होते. बुद्धिभेद हे एकच त्यांना साधन होते. ब्राह्मणेतरांस ब्राह्मणांविरुद्ध उठवणे ही योजना त्यांचीच दिसते. ब्राह्मण्याचा किल्ला अभेद्य आहे.† हिंदु समाजावर त्याची विलक्षण छाप आहे, हें त्यांस कळून चुकले होते. यास्तव हिंदुस्थानांतील सर्व खऱ्या व काल्पनिक

खिस्ती जागृति

‡ The neglect of these scriptures (प्रस्थानत्रय) seems to be the chief cause of the spiritual nomadism. We see around us, a nomadism which ...does not appreciate the blessings of a fixed home and mother country rich with the treasured spiritual experience of innumerable saints and sages who have communed with God and laboured for their people for thousands of years... Hindu theism is the oldest. Theism in the world, *and its depth is so great that in a century of Brahma devotional and practical endeavour we are yet far from learning all the lessons it has to teach us*

*--Pandit Sita Nath Tatvabhusan's Presidential address in the S. B. Samaj at the end of 1926.*

* "The rise of this new sect (Brahma Samaj), the zeal and subtelity displayed by its founder, with its obvious tendency to undermine the fabric of Hindu superstition are objects of serious attention to the christian mind"

*—Church of England Missionery Register, 1816.*

†......and when the walls of the mighty fortress of

दोषांचें व आपत्तींचें पाप ब्राह्मणांच्या माथीं आहे असा एक खोडसाळ वाद त्यांनी उपस्थित केला* व आमच्याकडल्या शहाण्यानीं व विद्वानांनीं मागचा

---

Brahmanism are encircled, undermined and finally stormed by the soldiers of the cross the victory of Christianity must be signal and complete.

—*Sir A. Lyall quoted by Lellingston on Br Samaj and Arya Samaj pp 118-119.*

* " Brahmanism with its rigid caste system in the social fabric has been the curse of India. More than anything else it has stood in the path of our progress, retarded the growth of nationality, and has been, in a word, the prolific parent of our present day misfortune."

—***Sir P. C. Ray, D. Sc. foreword to the Decline and fall of the Hindoos.***

ह्या ग्रंथाच्या आरंभी ब्राह्मभारताचार्य सर पी. सी. राय, अशी शिफारस करतात कीं, लेखक बॅरिस्टर मुकर्जी हे श्रेष्ठ ब्राह्मणब्रुव आहेत. त्यांनी देशाभिमानाने प्रेरित होऊन जो हा प्रबंध मोठ्या कळकळीने लिहिला आहे, त्याचा देशबांधवांनी खोल विचार करावा.

" To the priestly Brahmans must be ascribed the downfall and decay of the Hindus as a Nation " (p.26) the Hindu world, depleted as it is, must for the sake of its own future life dethrone the Brahmin priest from the Guruship of the Race and break down the rigid walls of the caste system and reframe its marriage code and code social in the light of the civilisation of the day." —***Ibid p. 30.***

" For their ( Brahmins ) own aggrandisement, they exploited the ignorant masses who were left a pray to their villainy. It became quite the recognised custom, that after attaining puberty a bride's first night should be devoted to the Brahmin priest. He thus became the licensed lecher of society which at last revolted, resulting in the birth and rise of Buddism in India " —***Decline and fall of Hindus of p. 51.***

पुढच्या कांहींएक विचार न करतां ब्राह्मणांना शिव्या देण्यांत व वर्णाश्रमधर्मावर मनसोक्त कोरडे ओढण्यात आपल्या पाश्चात्य गुरूंवरही ताण केली.‡ ह्या आधुनिक पुढाऱ्यांचे पाश्चात्य गुरु फार धूर्त व हुशार होते.* भौतिक शास्त्रांत ते निष्णात होते व ते सत्ताधीश असून ऐश्वर्यवान् होते. यामुळें आधुनिकांस ते स्वर्गीय देवदूतांप्रमाणे मार्गदर्शक वाटले.

वस्तुतः वरील गुणांत ते मार्गदर्शक व्हावे हे स्वाभाविकच होतें. परंतु ज्या धर्माच्या भांडवलाचे पश्चिमखंडांत दिवाळें वाजले होते,† त्या बाबतींतही

---

‡(a) " It is the Brahmanic system that betrayed the Hindus, and if that system were analysed it cannot but be evident that it will ever continue to do so "

— *Decline and fall of Hindus*, p. 54.

(b) " The Brahmin, through his Varnashrama Dharma, forged fetters for the great bulk of the Indian people and reduced them to the status of the Shudra." —*I. M. 7-3-27.*

* " The effect of this (English) education is prodigious. No Hindu who has received an English education ever remains sincerely attached to his religion. Some continue to profess it as a matter of Policy. But many profess themselves pure Deist and some embrace christianity. It is my firm belief that if our plans of education are followed up, there will not be a single idolator among the respectable classes of Bengal thirty years hence. And this will be effected without any effort to proselytise; without the smallest interference with religious liberty; merely by the natural operation of knowledge and reflection. I heartily rejoice in the prospect." — *Macaulay's letter dated 12th October 1836.*

†(a) " Unless every word and every syllable from Genesis to revelation, is true, we have no Bible and we may as well gather together what we have been calling our Bibles and make a bonfire of them, and build a monument heaven-high to Voltaire and Pain." —*Moody.*

(b) I call Christianity the one great curse, the one enormous and innermost perversion, the one great instinct of revenge, for which no means are too venomous, too under hand too under ground, and too petty—I call it the one immortal blemish of mankind. —*Neitzsche.*

आमच्या विद्वान् धर्मसुधारकांनीं त्यांच्याच तोंडाकडे पहावें हे मात्र आमचें दुर्दैव होय. भौतिकशास्त्रीय सिद्धांतांनीं ख्रिस्तीधर्माला जो धक्का दिला होता, तो त्याला फारच मर्मी लागला होता.* परंतु ख्रिस्ती राष्ट्र त्या वेळीं विजयशाली असल्यामुळे धर्माची पुन्हा मांडणी करण्याची वल्गति काढून त्यानी कशीबशी सावरासावर केली होती. याच धर्मक्रांतीच्या वेळी पाश्चात्य देशांत धर्म-सुधारकांची जी घोषणा सुरू झाली त्याचा प्रतिध्वनि हुगळीच्या तटाकी कल-कत्त्यास उत्पन्न झाला, आणि बंगालच्या ह्या धार्मिक पुढाऱ्यांनी स्वधर्माबद्दल कांहीं एक अभ्यास न करता ख्रिस्तीलोकाचे सारे विचार जसेच्या तसे डोळे मिटून अंगिकारले. त्यास ज्या जुन्या लोकांनी विरोध केला त्यांस खुशाल अंधश्रद्ध ठरवून ह्यांनी आपल्या ख्रिस्ती उपनेत्राचे मात्र हसे करून घेतले.†

अंधानुकरण

---

* A questionaire on the position of christianity now among the enlightened readers in America shows —

52 p. c. do not believe in immortality.
60 p. c. do not believe in a personal God.
70 p. c. deny divinity of Christ.
71 p. c. deny to the Bible any special inspiration.
48 p c do not believe in christianity in any form.

There are 20,000 Budhists in Paris alone.

quoted in—*I. M. 12-12-26.*

† Another miserable fallacy remains There are three classes of people whose opinions are quoted by missioneries in evidence of the sins and weaknesses of Hinduism. They are (1) Native reformers, (2) christian converts and (3) any exuberant fool who has been discovered. We all know how much the first kind of evidence is worth ..... It is evident that the anxious reformer uses language amongst its equals that he would be very sorry to hear taken *an pied de la lettre* by the would be interpreters of his country's customs ..... Much more is this true of the utterances of the reformer who has lived for years behind by the ink of his own gall. We know how in such cases there can be a growth of bitterness and perversity. Which isolates the thinker and makes his conclusion on social problems absolutely wortnless

—*Sister Nivedita. On Missioneries in India.*

ह्या नवयुगाच्या आरंभकाळीं हिंदुधर्माचा अधःपात झाला होता, धर्माची सत्ता नामशेष होऊन कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं अशी धर्मसंबंधी सारी बेबंदशाही व विस्कळित परिस्थिति झाली होती वगैरे जीं वर्णनें कित्येक खिस्ती लेखक करतात त्यांत मिथ्यारोप व अतिशयोक्ति फार असते हे न जाणता ब्राह्म लेखकानी खिस्ती लेखकांवरही ताण केली आहे !‡ व असेच त्यांचे सारे अंधानुकरण झाले आहे.§

---

ह्याच लेखात भगिनी निवेदिताबाई हिदु स्त्रियाच्याबद्दल एका व्याख्यात्याने निरनिराळे तेरा आरोप कसे खोडसाळपणे केले त्याचे वर्णन करतात तें विस्तारभयास्तव येथे देता येत नाहीं.

‡ (*a*) Every competent observer was deeply impressed with the extra-ordinary hold Hinduism had upon the people. Every element of life was controlled by it —*Dubois.*

(*b*) An in these directions the bustee-population of an Indian City is so far ahead of the slum-population of London, Paris, or New York that an importial critic could not fail to assign the order of age of their social systems correctly without a prior information. —*Sister Nevedita.*

(*c*) The east bowed low before the blast
In patient deep disdain;
She let the legion thunder past.
Then plunged in thought again.

(*d*) As yet there is no sign that the British are accomplishing more than the Romans accomplished in Britain, that they will spread any permanently successful ideas, or that they will found anything whatever. It is still true, that if they departed or were driven out they would leave behind them, as the Romans did in Britain, splendid roads, many useless buildings, an increased weakness in the subject people, and a memory which in a century of new events would be extinct, —*Meredith Townshend qouted in Farquhar p. 13.*

§ One of the saddest results that has followed in the wake of modern Indian education is to find that the out

ख्रिस्तीधर्म प्रमादशील आहे असें म्हणणें ख्रिस्ती लोकांस भाग झालें होतें; पण त्याचे पाहून वैदिकधर्मही प्रमादशील आहे असे म्हणण्याचा कोणताच प्रसंग हिंदूंवर नव्हता, पण ख्रिस्त्यांचे पाहून यांनीं वेदान्तशास्त्रही मोठ्या झोकांत प्रमादशीलच ठरविले. त्यांनीं स्वधर्मातील दोष झाकण्याकरिता धर्माला प्रागतिक ठरविले. ह्यांनींही आपले हिंदी तत्त्वज्ञानास कांहीं विचार न करतां तोच नियम लावला. भौतिक संशोधनाबरोबर ईश्वरविषयक ज्ञान वाढीस लागणार अशी त्यांनी धर्मावर हल्ला चढविणाऱ्या भौतिक शास्त्राशी तड-जोड केली, ह्यांनीही त्याचीच री ओढली. जीवाची अनंत उन्नति त्यांनीं मानली, ह्यांनींही माना डोलवल्या. तिकडील धर्मसुधारकानी जोझस ख्राइस्ट यांस मध्यस्थपदावरून काढले, इकडे अखिल हिंदुलोकांचे तारण करणारा ईशपुत्र हिंदुधर्मात वस्तुतः कोणीच मानलेला नसताना, हे ब्राह्म केवळ सदर भरण्याकरितां ब्राह्मण पुरोहिताच्या बोकाडीस बसले आणि गुरुवाद आम्हास मान्य नाहीं, असे अर्थहीन कांहींतरी बरळू लागले. तसेच ख्रिस्ती देववादाचा (Deism) वारा लागून सर्वदेवमयत्वभावावर म्हणजे ब्रह्म हेच जगाचे उपादान कारण आहे असे म्हणणारांवर ब्राह्म तुटून पडले. त्याच्यात पूर्वजन्म व पुनर्जन्म मानीत नव्हते, तेव्हा यांनींही कर्मविपाकशास्त्र लाथाडले. ते पुरे द्वैती, मग यानीही अद्वैत मत हे भ्याडाचे म्हणून झिडकारले ! त्यांच्यांत जन्म-सिद्ध जाति नाहीत त्याबरोबर इकडे एकंकार पुकारला. तिकडे आश्रमधर्म नाहीत त्याबरोबर इकडे बंगाली विद्यार्थ्यांनींसुद्धा वागण्याचा ताळ सोडला, आणि प्रौढ विद्वानांनीं, वानप्रस्थ व संन्याशी यांस देशबुडवे म्हणून यथा-स्थित गालिप्रदान चालविले.‡ तिकडे देवळांतून मूर्ति नाहीत. मग यांनीही

---

worn Shibboleths of the West are most readily and quietly absorbed, while its deeper and more spiritual ideals remain almost unnoticed. —*C. F. Andrews Young India 1924 p. 322.*

‡ Numerous proofs can be adduced that its (European Education) first introduction greatly tended to create among members of the intelligent and educated classes of the people a lamentable atheism and indifference to religion in general. This was the natural result to be expected from the English education afforded in Government Schools, which whilst

मूर्ति फोडा असा अत्याचार पुकारला. त्यांच्या देवळांसारखीं इकडे प्रार्थनामंदिरें बांधलीं. त्यांच्याच प्रार्थनेच्या दिवशीं हुबेहूब त्यांच्याचसारख्या प्रार्थना सुरू केल्या. नामधारी मिशनरीही त्यार झाले. त्यांचे आचार, विचार आणि पोषाख यांसच सामाजिक सुधारणा समजून त्यांचे अगदीं जसेचे तसे अनुकरण केले.§ तिकडे थोरामोठयांच्या मुलीही परपुरुषांच्या हातांत हात

sapping the foundation of the Hindu religion substituted nothing in its place —*Leonard's History of Brahma Samaj*, *p. 3.*

§ (*a*) I venture to predict that it ( the British Government ) will attempt in vain to effect any very considerable changes in the social condition of the people of India, whose character, principles, customs and irradicable conservatism will always present insurmountable obstacles.

—*Dubois quoted by Farquhar at p. 13.*

ह्याप्रमाणें एका विद्वान् व अनुभवी फ्रेंच प्रवाशाचें भाकित खोटें पाडण्याचें श्रेय इंग्रजांस द्यावयाचें कीं ते सारें आतिथ्यशील ब्राह्मास द्यावयाचें हा एक प्रश्नच आहे. फर्कुहारसाहेब म्हणतात कीं:—

(*b*) The most characteristic and vital of all Hindu doctrines is transmigration and Karma. So powerful and pervasive is the doctrine that there is scarcely a part of the religion that has not been modified by it. How potent then has christianity been in controlling the religious thought of the past century. The doctrine has been expelled completely from the teachings of the Brahma and Prarthana Samajas. Every aspect of the social reform movement is a direct attack upon it. ...A peculiarly arresting proof that christianity has ruled the whcle religious development of the last century, is to be found in the social reform movement. From beginning to end the ideas that have led to reform have been purely christian... The dominance of christianity in the religious developement of the last hundred years may be clearly seen in this that almost without exception the methods of work in use in the movements have been borrowed from missions. *This is the more noticeable since India,*

घालून नाचतात, तशाच इकडे थोर घराण्यांतील ब्राह्मांच्या मुली साहेबांच्या गळां पडून बिनदिक्कत नाचूं लागल्या ! त्यांच्या मडमांप्रमाणे यांच्या स्त्रिया इंग्रजी बोलूं लागल्या. चाहेल त्या समाजांत आपला नवरा शोधू लागल्या आणि न पटल्यास घटस्फोटही करूं लागल्या.† थंड प्रदेशातील प्लॅटिनचा, फ्रॉक, पॅन्ट, खमिस, जॅकिट, कोट आणि त्यावरील चोगा हे सारे पोशाख उष्ण प्रदेशांतही चढाओढीने वापरूं लागले. त्यांची थंड प्रदेशांतील पेये इकडे आणली. खास युरोपची दारू सुशिक्षित बंगाली आपल्या पोराबाळांना घेऊन पिऊं लागले. मुलाने दारू न पिणे हे बापास लांच्छनास्पद वाटूं लागले. साहेब गोमांसाचे शोकी, मग बंगाल्यांनी आपल्या गोमातेच्या नरड्यास हात घालण्यास मागे पाहिले नाही. गोमांस आणि डुकराचे मांस खात आणि तुडवीत, बीर दारूचे प्याले झोकीत बंगाली तरुणाची धर्म-प्रगतीवर भाषणे सुरू झाली.§ इंग्रजीशिवाय बात नाही. इंग्रजीशिवाय विचार

---

*in the past had the genious to produce a series of methods of religious propaganda unmatched in the history of the world* In all the movements we trace a strong desire that their leaders should be like missioneries....The great majority of sadhus, priests, and gurus are recognized as being worse than useless.

—*Furquhar p. 441.*

† Shall we not remember that there is a lot of foreign clothing by which we have drapped our inner selves that is to undergo burning—that is to be distroyed; and that we must lead a campagin for the destruction of such, and let our hearts be clothed in nothing but the gifts of our Divine mother? Life is short and the programme has to be quick.

—*Miss Sunity Gosh, W. N. D. 15-2-23.*

§ (*a*) Unfortunately the fruit of the tree of knowledge brought death into Bengal. Have not our best and most promising men died of drunkenness? Are not many of our educated men who boast of their knowledge shabby drunkards. —***P. C. Muzoomdar, Lectures in Bombay.***

(*b*) One of news papers of the time characterised

नाहीं. अंतर्बाह्य सारे काळे इंग्रज झाले. बायबल हेंच बऱ्याच सुशिक्षितांचें धर्मपुस्तक झाले. आणि पॉल आणि हाफीज हेच स्मृतिकार वाटूं लागले. "बस्स, जानवी तोडा, जात मोडा, पडदा फाडा, ब्राह्मण ओढा, आणि झोडा" हा एकच गिल्ला सुरू झाला! बंगाली तरुण हातात गाईचीं हाडे व गोमांस घेऊन भररस्त्याने मिरवूं लागले! आणि सच्छील ब्राह्मणाच्या घरांत तीं फेकून सुधारणेचा जयजयकार करूं लागले!

नुकतेच दिवंगत झालेले ब्राह्मांचे एक आवडते पुढारी बाबू भुवनमोहन ह्यांनीं हिंदु तरुणाने आपल्या खास लग्नाच्या दिवशीं मुसलमानाला पंक्तीस घेऊन जेवलेच पाहिजे असा एक नवीन दंडक सुरू केला. व आज तर विधर्मीयाच्या घरी हिंदूंनीं आपल्या मुली द्याव्या असा उघड उघड विचार सुरू आहे. नव्हे, आचारासही सुरुवात झाली आहे! हिंदुत्वाचाही अभिमान सुटला आहे, नव्हे तिट्कारा उत्पन्न झाला आहे. आणि ब्राह्म ही एक नवीन जात पैदा झाली आहे.$

विस्तारभयास्तव आम्हास जास्त अवतरणे येथे घेतां येत नाहीत. शिवाय कोळसा उगाळावा तितका काळाच. तथापि वाचकानीं हे अवश्य लक्षांत ठेवावे की, या प्रकरणात आम्हीं दिलेलीं सर्व अवतरणे ब्राह्मलेखक किंवा तत्पक्षीय ख्रिस्ती व इतर उदारमतवादी लेखकाचीच आहेत यामुळे त्यांत

---

Dr. Duff's pupils, as well as other free and easy young men of the time as cutting their way through ham and beef, and wading their way to liberalism through tumblers of beer.

— *Jesudasunudas, W. N. D. 27-12-23.*

$ (*a*) That the caste system is an anachronism in the modern society is evidenced from the fact that marriages not only between one caste and another but also between members of different communities are taking place.

(*b*) But one thing is certain, that unless inter-caste and inter-communal marriages became more general in our midst than they are, we shall cease to exist as a community. We are the heralds of a new religion and therefore of a new civilisation and culture broad based upon a universal brotherhood and therefore it is incumbent upon us to form a community in which these will be concretely realised.

—*Dr. G. Y. Chitnis S. P. 9-6-27*

अतिशयोक्ति, मिथ्या प्रवाद, किंवा दुसरा खोडसाळपणा असण्याची वाचकांस शंकाच नको. असें असल्यामुळे आम्ही विचारतो की, वर ज्या परिस्थितीचें वर्णन आहे तोच ब्राह्माच्या सार्वत्रिक धर्माचा अरुणोदय काय ?† आणि विधर्मीयाशी हिंदी सुशिक्षिताचा समन्वय म्हणतात तो हाच काय ?§

---

† Are ye Brahmos ? yes, ye profess to be my people. Ye have put on the mask of theists and assumed the attitude of devotees. Ye have among your body priests, missioneries, sanits, preachers. Ye close your eyes in prayer as my true worshippers do, and like them ye sing my glory and praise. But ye believe not in me. Ye have not seen me, and ye ridicule those who have. When I stand before you, during your prayers, ye say unto me indignantly—we know thee not, your words like husk and chaff are scattered by the winds, and never reach me. Your formal daily prayers, which hardly exceed ten or fifteen minutes, are disgusting, for they clearly show how impatient you feel in my company and how ardently you wish to get away from my presence every day. ..... Ye hypocrites, your character is as questionable as your faith. Ye drink privately and indulge in bestial revelry. Ye are sold to wine and women. Ye are in my temple for prayer, and prayer over, ye are in the brothel and the beer shop for debauchery.... some of you, who have not yet gone to the extreme of bestiality, are beginning to be sensual and voluptuous and seeking woman's company with lustful hearts. Ye are spoilt, and ye are secretly spoiling many in my church.... There are other immoralities also among you, lying, dishonesty, lovelessness, vengeance, malice, backbiting and other things, for which there is no compunction in your hardened hearts. [God as Judge. Prayer of Keshav Chandra Sen. 21 September 1879.]

(b) We need him (Keshab) to again raise his powerful voice against all the impurities, secret and open, which have been eating into the vitals of our community life.

—*Beni Madhav Das, W. N. D. 28-12-5-25.*

§(a) I found that the teachings of early Brahmo leaders

आतां आपण याच्याहून थोडे खोलांत जाऊन या समन्वयाच्या मुद्द्याचा विचार करूं या. अखिल विश्वात जे जे भेद दिसतील त्यांचा समन्वय

---

had made a revival of philosophical and even of general religious studies well nigh impossible. It had been taught, at any rate people had so understood their teachings—that the close study of any particular scripture was not necessary and that even any general deep study was not necessary for the purpose of religion, there being a short and easy road to it namely commonsense....In the generations that followed both this respect (for the ethnic scripture) and studiousness became very rare and in the third generation it practically disappeared. This is one of the main causes of the in difference and spiritual death which we see around us.

(*b*) I have tapped many an old Brahmo not to speak of the young, in whom there has been nothing like a thorough reconstruction of faith in the light of reason. A more or less blind, though unconscious, reliance on the Brahmo leaders lies at the basis of their faith.

(*c*) The unity of, aims, ideals, and methods which characterised the old leaders and made them respected by their brethren is gone. The present leaders have little reverence for the teachers of either the remote or the near past, and they themselves attract little reverence. They are not members of a living spiritual brotherhood. Hence their teachings fall mostly on careless and unwilling ears and often prove fruitless.

(*d*) The fact is that reverence for religious teachers and their utterances and intellegent reliance on them are essential factors of the religious life. —*Sitanath, I.M. 24-2-24.*

करण्याची ब्राह्मांची महत्त्वाकांक्षा आहे. अखिल सृष्टींतील जी मानवकोटि त्यात ब्राह्मधर्म हा सार्वत्रिक होईल अशी ब्राह्मांस खातरी वाटत आहे.§ पण सर्व लोकांस मान्य होणारा असा तो ब्राह्मधर्म कोणता म्हणून विचारल्यास त्याचें उत्तर मात्र ब्राह्मांस निश्चित असे काहींच देता येत नाही.† कारण आदि-ब्राह्म एक सागणार, नवविधान दुसरेंच सांगणार आणि साधारण ब्राह्म तिसरेंच ठरविणार. एवढ्यानेंच ब्राह्माचा आपसातील भेद संपतो असें नाहीं. आदि-ब्राह्मांपैकीं रवींद्रनाथ सागतील ते इतरास मान्य होईलच असें नाहीं. नवविधानातही चार पथ. त्यात पुन्हा सेन आणि वेणीमाधव, प्रमथलाल, आणि वस्वानी, यामिनीकात आणि तालुकदार हे सारे एकाच मेळाचे आहेत असेंही नाहीं. साधारणब्राह्म पाहिले तरी हेमचद्र आणि हलधर, सीतानाथ आणि ललितमोहन, धीरेंद्रनाथ आणि बिपिनचद्र यांचीं मतें एक आहेत असें मुळींच नाहीं.¶ तेव्हा हाताच्या बोटानी मोजण्याइतक्या ब्राह्म-

समन्वय

§ ......and thus alone can be fulfilled the high destiny assigned by God to the Brahmo Samaj as the future Church of India and of the whole world.

—*Pt. Sita Nath's Presidential address December 1926.*

† I went through the whole range of Brahmo literature then existing but it gave me no satisfaction I heard much from the Samaj pulpit of the nearness and active love of God, of such high ideals of spiritual life, as Yoga, Bhakti, Seva and Vairagya but the whole of this impossible structure seemed to me as built upon a sandy ground work.

¶ I found the leaders of the S. B. Samaj as dogmatic as those of the Brahma Samaj of India in spite of their democratic views as regards the constitution of the Samaj.

I found that my reconstructed philosophical Brahmaism differs a good deal from the common sense Brahmaism in the midst of which I had lived for years While the latter separated matter from mind and the finite from the infinite my revised Brahmaism was founded on unity in difference.

—*Pt. Sita Nath's Presidential address 1926.*

पुढाऱ्यांत जर अद्याप एक विचार नाहीं§ तर त्यांनीं साऱ्या हिंदुस्थानास नव्हे साऱ्या जगास सार्वत्रिक धर्म सांगूं पहाणे‡ म्हणजे थोट्या माणसानें आकाशाला गवसणी घालूं पाहण्यासारखे हास्यास्पदच नाहीं काय ?*

आतां ह्या ब्राह्मांच्या भिन्न पंथांच्या मूलभूत तत्त्वातच कसा भेद आहे तो पाहूं.

---

§ (1) No coherence among workers.

(2) Ministers' Meeting had to be discontinued for want of good attendance.

(3) The conversation in the present monthly meetings scarcely rises above the common place and the superficial.

(4) Want of mutual love and confidence.

(5) We have little to say to one another about the inner-life.

(6) General spiritual apathy, want of attendance and co hesion.

—*Summary of Pt. Sita Nath Spiritual Wants pp 8-9.*

‡धर्माचे पूर्णपणें ज्ञान करून न घेता जे त्याच्या प्रचाराचा व्यर्थ खटाटोप करितात ते ओघानेंच धर्मजीवनापासून च्युत होतात. धर्माला संकुचितता व दिक्काल-मर्यादितता ही याच्याच गडबड्या व उथळ स्वभावामुळें येतात.

—रवींद्रनाथ, शान्ति. भाग ५, पान ७१.

* We feel strengthened by the conviction that the faith of the Brahmo Samaj, though now held by a small band of worshippers not exceeding seven or eight thousands in India will one day be the faith of the whole humanity. But when we recollect the mighty little that we have been able to achieve – – our hearts sink with dispair-*I.M. 21-1-25.*

## प्रकरण सव्विसावें

# ब्राह्ममतसमीक्षा

| आदिब्राह्मांचीं-तत्त्वें | साधारण-ब्राह्मांचीं तत्त्वें | नवविधान-ब्राह्मांचीं तत्त्वें |
|---|---|---|
| १ ईश्वर हा एक पुरुष आहे. आणि त्याचे उदात्त आणि नैतिक गुणधर्म आहेत. | १ जगाचा कर्ता, भर्ता आणि उद्धर्ता असा एकच देव आहे. तो अंतर्यामिन् आहे. तो सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, अत्यंत प्रेमळ, न्यायी, व पवित्र आहे. तो विभु, शाश्वत आणि आनंदमय आहे. | १ ईश्वर—माझा विश्वास आहे कीं, ईश्वर हा एक आहे. तो अनंत, पूर्ण, सर्वशक्तिमान्, सर्वज्ञ, सर्वांवर दया करणारा, सर्वपवित्र, सर्वांगानें शुभ, शाश्वत, विभु, आपला कर्ता, पिता, माता, सखा, मार्गदर्शक, न्याय-दाता आणि तारण-कर्ता आहे. |
| २ ईश्वरानें कधींही अवतार घेतला नाहीं. | २ जीवात्मा अमर व अनंत उन्नत होणारा आहे. तो ईश्वरास आपल्या कर्माबद्दल जबाबदार आहे. | २ आत्मा—माझा विश्वास आहे कीं, आत्मा हा अमर आणि अनंत उन्नतशील आहे. |
| ३ ईश्वर प्रार्थना ऐकतो आणि तिचें उत्तर देतो. | ३ ईश्वराची सत्य रूपानें मानसिक उपासना करावी. खरें सौख्य व तारण यांच्या प्राप्तीसाठीं ईश्वरोपासना करणें जरूर आहे. | ३ अध्यात्मशास्त्र—सामान्य आणि विशेष रीतीनें होणाऱ्या सहजस्फूर्तींवर माझा विश्वास आहे. सामान्य आणि विशेष ईशनियतीवर माझा विश्वास आहे. |

| | | |
|---|---|---|
| ४ ईश्वराची फक्त मानसिक पद्धतीनेच उपासना करावी. हिंदूंचे तप, देवळे आणि ठरीव पूजाविधानें हीं अनवश्यक आहेत. सर्व जाती आणि वंशांच्या माणसांनीं ईश्वराची आवडेल तशी उपासना करावी. | ४ ईश्वरावर प्रेम करणें व आयुष्यांतील सर्व व्यवहारांत त्याच्या इच्छेनुरूप वागणे, हीच खरी उपासना होय. | ४ नैतिकशास्त्र—सर्व गोष्टींत पूर्ण सदाचारास प्रवृत्त करणाऱ्या सदसद्विवेकबुद्धीच्या आज्ञांचेद्वारें प्रगट होणारे ईश्वराचे नीतिनियम मी मानतों. माझा असा विश्वास आहे कीं, मी माझीं विविध कर्तव्यें बजावण्यासंबंधीं ईश्वरास जबाबदार आहे. आणि माझ्या गुणदोषांप्रमाणे माझा न्याय होऊन इहपरलोकीं मला त्याचे फल अगर शासन मिळेल. |
| ५ पश्चात्ताप आणि पापनिवृत्ति हा तारणाचा व अपराधक्षमापनाचा एकच मार्ग आहे. | ५ प्रार्थनापूर्वक ईश्वरावर भार टाकणें आणि त्याच्या सान्निध्याची सतत जाणीव बाळगणे, हींच अध्यात्मप्रगतीचीं साधनें आहेत. | ५ धर्मशास्त्र—ज्यांत राष्ट्रोद्धाराच्या विशिष्ट ईशानियतीचें वृत्तांत आहेत आणि ज्यांत ईशप्रेषित विभूतींची धर्मपरायणता, भक्ति आणि ज्ञान यांचे वर्णन आहे ते धर्मशास्त्राचे भाग मी आदरणीय मानतों. मात्र त्यांतील फक्त तत्त्व ईश्वरप्रणीत असून त्यांतील भाषा मनुष्याचीच असते असे मी मानतों. |
| ६ सृष्टि आणि स्फूर्ति हे ईश्वरीज्ञानाचे मार्ग आहेत. कोणताही ग्रंथ प्रमाण नाहीं. | ६ कोणत्याही कृत्रिम पदार्थाची ईश्वर म्हणून उपासना करू नये. त्याचप्रमाणे कोणतीही व्यक्ति किंवा ग्रंथ प्रमादरहित व तारणाचें अनन्य | ६ धर्मात्मे—( Prophets ) जगातील संत व धर्मात्मे याच्या ठिकाणी जोवर दैवी चारित्र्याचीं निरनिराळीं तत्त्वें प्रतिबिंबित होत आहेत, आणि जोपर्यंत ते लोकशिक्षण व लोकशुद्धि यांस आदर्शभूत होत आहेत, तोपर्यंत ते आम्हांस |

| आदि-ब्राह्मांचीं तत्त्वें | साधारण-ब्राह्मांचीं तत्त्वें | नवविधान-ब्राह्मांचीं तत्त्वें |
|---|---|---|
| | साधन मानूं नये. परंतु पंथभेद किंवा देशभेद न मानतां सर्व धर्मशास्त्रांच्या व लोकांच्या शिकवणींतील सत्याचा आदरपूर्वक स्वीकार करावा. | आदरणीय व मान्य आहेत. त्यांचे ठिकाणीं जो दैवी अंश असेल त्यावर मी आदरपूर्वक प्रेम करून त्यांचे अनुकरण केलेच पाहिजे. याप्रमाणे त्यांचे व ईश्वराचे गुण मीं आत्मसात् केले पाहिजेत. |
| | ७ ईश्वराचे पितृत्व, मानवांचे बंधुत्व, आणि प्राणिमात्रावर दया, हेच सत्यधर्माचे रहस्य आहे. | ७ पंथ—( Church ) सार्वत्रिक पथावर माझा विश्वास आहे. त्या पंथांत प्राचीन शहाणपण आणि अर्वाचीनशास्त्र यांचा संग्रह आहे. तो पंथ सर्व सतमाहात्म्यांत सलोखा मानतो. सार्‍या धर्मशास्त्रांत ऐक्य जाणतो. सर्व ईशप्रेषितविहित धर्मांत अनुक्रम लावतो; भिन्नभाव आणि भेद यांचा तो धिक्कार करतो. ऐक्य आणि शांति यांचे माहात्म्य वाढवितो. बुद्धि आणि श्रद्धा, योग आणि भक्ति, तप आणि सामाजिक कर्तव्य ह्यांच्या श्रेष्ठ स्वरूपांत तो समन्वय पहातो. आणि योग्य कालाचा परिपाक झाला असतां तो पंथ सर्व राष्ट्र आणि संप्रदाय यांचे एक राज्य–एक कुटुंब—बनवितो. |
| | | सारांश, सर्वांस सुबुद्ध करणारे ईशानुशासन हेंच माझें धर्ममत. सर्वांचे रक्षण करणारे ईशप्रेम हेच माझे धर्मशास्त्र. सर्वांस साध्य अशा ब्रह्मभावांत रहाणे हाच माझा |

स्वर्ग. ज्यांत सर्व सत्य, सर्वप्रेम आणि सर्व पावित्र्य आहे अशी जी अदृश्य ईशसत्ता तेंच माझें धर्ममंदिर होय.

८ ईश्वर पुण्याचें बक्षिस देतो व पापाबद्दल शासन करतो. तें शासन उपायरूप असून कायमचें नसतें.

९ पापापासून खऱ्या पश्चात्ताप-पूर्वक निवृत्ति हें एकच पापाचें प्रायश्चित्त आहे. ज्ञान, सत्त्व आणि पावित्र्य या गुणांत ईश्वराशीं ऐक्य पावणें हेंच खरें तारण होय.

ब्राह्मांच्या मुख्य तीन शाखांत मूलतत्त्वासंबंधींही कसा भेद आहे हें वरील पत्रकावरून दिसून येईल. आदि-ब्राह्मांच्या तत्त्वांत जो ख्रिस्तीधर्माचा अंश आहे त्यापेक्षां साधारण-ब्राह्माच्या तत्त्वांत तो अधिक आहे आणि नव-विधानांत तर तो सर्वांहून अधिक आहे.

ब्राह्मांचा जो धर्म तो ब्राह्मधर्म, अशी जरी एक सामान्य व्याख्या केली तरी धर्मासंबंधीं ब्राह्म पुढाऱ्यांच्या कल्पना अगदीं भिन्न आहेत. कोणी तत्त्वज्ञान किंवा मतविश्वास ह्यापलीकडे व्यवहारतः धर्माचें रूप जाणत नाहींत. ह्या उलट कोणाचे सामाजिक सुधारणांपलीकडे धर्मक्षेत्रच रहात नाहीं. कोणाचा धर्म साप्ताहिक सार्वजनिक उपासनेतच संपुष्टांत येतो, क्वचित् कोणी एकांतिक ध्यानधारणेत धर्मानुभव पाहतात. कोणाला धर्म हा स्थिर, शांत व शाश्वत वाटतो. कोणास तो चढाईचा व आक्रमशील असावा असा वाटतो. कोणी धर्मास त्रिकालाबाधित मानतात, तर कोणी असे म्हणतात कीं, आमच्या प्रपंचाच्या स्थित्यंतराप्रमाणे धर्मानें आपले रंग पालटत गेले पाहिजे. दुसरे कोणी म्हणतात कीं, धर्मानें जिवंत रहावयाचे असेल तर आधिभौतिक शास्त्रज्ञांच्या सल्ल्याप्रमाणे आपली प्रकृति ठेवून तनदुरुस्तीबद्दल त्यांचा वेळोवेळीं दाखला मिळविला पाहिजे. शेवटीं रवींद्रनाथ असे म्हणतात कीं,

धर्मकल्पना

" पण दुर्दैवाची गोष्ट आहे कीं, आम्हीं धर्माला निष्कारण अत्यंत कठिण व अवजड बनविले आहे. अपुऱ्या मंत्रतंत्रांनीं, कृत्रिम विधिकर्मांनीं, गहन मतवादांनीं व विचित्र कल्पनांनीं धर्माचे स्वरूप इतके भयंकर करून टाकले आहे कीं, आपणच निर्माण केलेल्या या गहन व गूढ अंधारांत एकेक अध्यवसायी एकेक नवीन पंथ काढून नव्या संप्रदायाची प्राणप्रतिष्ठा करीत आहे. या भिन्न भिन्न सप्रदायांच्या व मतवाद्यांच्या आघातानें जगांत द्वेष, कलह व अशांति याचे जे अनर्थ घडत आहेत ते अमर्याद आहेत."

" असे कां व्हावे ? याचे एकच एक कारण आहे व ते हे कीं, आम्हीं धर्मानुगत न होतां प्रत्येकानें आपआपल्या अभिरुचीप्रमाणे धर्माला स्वरूप देण्याचा प्रयत्न केला आहे. धर्माची आम्हाला अत्यंत आवश्यकता आहे यांत संशय नाहीं; पण त्याला स्वतःला अनुरूप बनविण्याचा प्रयत्न केल्यामुळेंच त्याच्या आवश्यकतेलाही विलक्षण कमीपणा आला आहे. धर्म हा देशकालातीत, भेदशून्य, विकारविहीन व निरंजन असल्यामुळेंच आम्हांला सर्वकालीं त्याची गरज अपरिहार्य आहे व तो अतीत आहे म्हणूनच ध्रुवासारखा निश्चल आहे."†

---

†शांतिनिकेतनमाला, भाग पांचवा (मराठी), पान ३५.

रवींद्रनाथांचे हे विचार इतर ब्राह्मांस मान्य असणें संभवनीय नाहीं. किंबहुना रवींद्रनाथांनींही हे विचार उपनिषदांचे अर्थ लावतांना मानलेले नाहींत. सर्व ऐतिहासिक धर्मांचा समन्वय होईल, असा देशकालानुसार धर्मशास्त्राचा अर्थ लावावा असे ब्राह्मांचे साधारण धोरण दिसते.§ परंतु हें धोरण रवींद्रनाथांच्या वरील विचारसरणीस मुळींच जुळणारे नाही असे वाटते. एकंदरींत हिंदूंच्या ( किंवा दुसऱ्या कोणत्याही एका धर्माच्या ) धार्मिक वाङ्मयाची संगति लावण्याची ब्राह्मांनीं काडीची आस्था दाखविली नाहीं. आपल्या स्वैर वृत्तीस अनुकूल वाटेल तेव्हां श्रुति, स्मृति, पुराणे, तंत्रे यातील कोणत्याही वचनाचा आधार घ्यावा.¶ आणि त्याच ग्रथातील बाकीच्या विरोधी भागाचा विचार न करतांच अव्हेर करावा. अशा ह्या आरामखुर्चीवाल्याच्या धर्मकल्पना आहेत. समन्वय शब्द घडोघडी उच्चारणें सोपे आहे; परंतु धर्मग्रंथांची संगति लावणे हे काम एक श्रीशंकराचार्यांनींच केले.

ब्राह्मांचे तत्वज्ञान प्रेम आणि सेवा ह्या दोन स्वाभाविक मनोवृत्तींवर आधारलेले आहे. सर्व विश्वघटना, व्यवहार आणि धर्म यांच्या बुडाशीं ह्याच दोन शाश्वतवृत्ति आहेत असे त्यास वाटते. आणि त्यामुळें त्या वृत्तीनें जोडलेले द्वैतही त्यास सत्य, नित्य व स्तुत्य दिसते. प्रेम आणि सेवा यांचा आरभ जरी द्वैतांत असला तरी त्याची अखेर ज्या आत्मसमर्पणपूर्वक अद्वैतांत होते ते अद्वैतमात्र ब्राह्मांस मान्य नाहीं. बरे, व्यवहारतः विचार केला तरी " प्रेम आणि सेवा " हा ब्राह्मांचा केवळ वाग्विलासमात्र आहे.* हें

पण धर्माला धारणा करता येणार नाही. धर्मराज ईश्वर हा धारणातीत आहे. जो धारण करतो तो धर्म नसून संसार आहे. —शान्ति, भाग ५, पान ३६.

§ What is needed is fulfilment and progressive evolution of historical religions into a stage where they may be all one though variously called and severally known of men.

—*I. M. 9-1-27.*

¶ As for the theology of the Brahmo Samaj, every body knows that it is optimistic mono-theism with the Unitarian, the protestant and the eclectic elements in it propped up by convenient texts from the Upanishads. —*Pessimism p. 43.*

* Raja Ram Mohan never truely understood Advaita vada nor

"विश्वचि माझें घर" किंवा "उरलो उपकारापुरता" ह्या संतांच्या वृत्तींत जी निरहंकारता व स्वार्थनिरपेक्षता दिसते त्यांचा ब्राह्मांच्या ठिकाणी सामान्यतः दुष्काळच आहे. ही आम्ही ब्राह्मांची निंदा करीत नसून त्यांनीं अवमानिलेल्या वैराग्याची महतीच दाखवीत आहोत. तथापि ब्राह्मांच्या आचाराचा हा प्रश्न तसाच सोडून त्यांच्या तत्त्वज्ञानापुरताच विचार केला तर असे दिसते कीं, ब्राह्माचे तत्त्वज्ञान प्रागतिक असल्यामुळे त्यास त्रिकालाबाधित सत्यत्व कधींच यावयाचे नाहीं. यामुळे ते कित्येकास तुच्छ वाटेल. कितीही योग्यतेच्या कोणत्याही पुरुषाचे कोणतेही मत म्हणजे अखरचें सत्य असे मानता येत नाही, असा ब्राह्मांचा अढळ सिद्धांत आहे. भौतिक शास्त्राच्या प्रत्येक नवीन शोधाने ईश्वराचें स्वरूप त्यांस अधिकाधिक उपलब्ध झाल्यासारखे वाटते.* आणि बहिर्दृष्टीचे हे शास्त्रीय शोध कधींच सपणारे नसल्यामुळे ईश्वराचे पुरें ज्ञान जीवास कधींच होणार नाहीं, असा ब्राह्मांचा समज आहे. म्हणजे 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायाने आत्मज्ञानाने सर्व जाणल्याप्रमाणें होते, या वेदांताच्या सिद्धांताशीं ब्राह्ममत विसंगत दिसते. अगोदर हत्तीचे शेपूट पाहिले, मग कोणी पाय पाहिला, मग कोणाला सोंड दिसली, ह्याप्रमाणे त्यांस ईश्वराचे ज्ञान हळुहळू व्यक्त होत जाणार आहे; अर्थात् हत्ती पाहिला असा पूर्ण अनुभव ह्या डोळस ब्राह्मांस कधींच यावयाचा नाहीं असे दिसते. ब्राह्म ईश्वर आणि ब्रह्म यांतील भेद मानीत नाहींत, त्यामुळेच त्याचे विचार वेदान्तदृष्टीने कोते दिसतात. तसेच ते विसंगतही दिसतात.§

तत्त्वज्ञान

---

could he enter into the spirit of the other Schools of Hinduism through the want of Vairagya in his life. --*Pessi 36*.

* Brahmoism is not static in as much as the conception of Brahmoism that Maharshi had will not satisfy men coming two or three generations after him. Brahmoism is a living religion based upon the living personal experience of every individual, and as such it can no more be finally and absolutely defined by Maharshi than by the sages and seers of the Upanishads. —*Dr. G. S. Chitnis, S. P. 26-6-27*.

मागे पान ४०२।४१४।४१६.

§ (a) The merging of different personalities in an engulfing

पूर्वींच्या चार अंधांच्या गोष्टीप्रमाणें प्रत्येक ब्राह्म जें ब्रह्माचें वर्णन सांगतो, त्यांत हत्तीची सोंड आणि शेपूट याहून अधिक साम्य दिसत नाहीं.

ईश्वराचे रूप

राजा राममोहन यांचे ब्रह्म निर्गुण निराकार व खरोखरीचें अद्वितीय आहे. त्रयीवादाचा त्यांनीं पूर्ण उपहास केला आहे. उत्तर ब्राह्म मतांत जीव, ईश्वर, जगत् किंवा पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा असा कोठे त्रिविध व जीव आणि ईश्वर असा द्विविध भेद मानला आहे. कोणीं ब्रह्मास अनेक व्यक्ति आपल्या पोटांत सामावणारा असा विराट् पुरुष मानून त्यांसच एकमेवाद्वितीयम् असें म्हटले आहे. त्यांचे मते ब्रह्म ही एक सगुण व्यक्ति आहे. तसेंच कोणीं ईश्वराचे शुभ कल्याणगुणच मानले तर रवींद्रांनी ईश्वराच्या तमोगुणाचेही

---

impersonal substance the pantheist idea is an abstract conception which explains nothing. The return of the contents of our consciousness exactly as they were before sleep, with their limits and distinctions unimpaired, proves, their retention in tact in the divine consciousness, a consciousness which as it contains persons must itself be personal, though infintely larger than ours

—*The Romance of daily life by Pt. Sita Nath, I. M. 26-12 26.*

(*b*) The following expressions of the Brahmas show tendency towards advaita —

(1) We are one with God.

(2) A complete effacenent of self-the abandonment of the individual will is the precondition of this union.

(3) 'I' dies unto him to gain its full stature.

(4) The objective becomes subjective.

(5) As god consciousness is self consciousness consciousness of self in its highest form, it is too direct and immediate. This is final and ultimate and explains itself. This is mysticism.

(*c*) आतां रवींद्रनाथ मुद्दाम लक्षात ठेवण्यास सांगतात कीं:—" पूर्णतेच्या विपरीत ती शून्यता होय. पण अपूर्णता ही मात्र पूर्णतेच्या विरुद्ध नव्हे; ती पूर्णतेचाच परम विकास होय." —शान्ति०, भा. ५, धर्म, पा. १११

माहात्म्य वर्णन केले आहे. केशवचंद्रांनीं अशा ईश्वराची अष्टोत्तरशत नामावळी तयार केली आणि साऱ्या ब्राह्मांनी परोपरीने ईश्वराच्या रूपाचे-ही वर्णन केले. रवींद्रनाथांस तर त्याची चाहूल रोज ऐकू आली. हातांत राखडी ( रक्षाबंधन ) बांधण्याकरितां ईश्वराने त्यांच्यापुढे आपला हात केला. केशवचंद्रांजवळ ईश्वराने बोलणे चालणे वगैरे सर्व व्यवहार माणसाप्रमाणें केले. कोणी ब्राह्म ईश्वराच्या मांडीवर निजले, कोणी ईश्वराच्या कडेवर बालभावाने बसले, कोणी त्याच्या पाया पडले, कोणी चालतांना त्याचा हात धरला, कोणी त्याच्या चेहऱ्याकडे पाहून आनंदित झाले, तर कोणास त्याचा चेहरा दिसला नाही म्हणून व्याकुळता आली! अशा रीतीने नामरूपा-शिवाय ईश्वराचे चिंतन व निजध्यास ब्राह्मासही शक्य झाला नाही. मग ईश्वराच्या साकार मूर्तीची उपासना करणारे हिंदु हे ब्राह्मास सात जन्माच्या वैऱ्यांप्रमाणे द्वेष्य का वाटले ते नकळे! थिओडर पार्कर याची पार्थिव

प्रतिमोपासना

पूजा† सुप्रसिद्ध इमरसनसाहेब व एकेश्वरी चॅनिंग साहेब याचे पुतळे,‡ राममोहनांना मंच, त्यांचीच समाधि, देवेंद्रनाथाचा सप्तपर्ण वृक्ष आणि वेदी, केशव-चंद्रांची समाधि, नवविधानाचे निशाण, केशवचंद्र§ आणि शिवनाथबाबू*

† I gathered some wild geramums and blue eyed grass—then my favorite flowers and ever since invested with a strange sense of religious Romance–and with solemn prayers laid them before the Lord, on a great rock sheltered by a tree, as a sign of my devotion and gratitude and self consecration.

*–Revealing letter from Theoder Parker published in I M. 18-5-1924.*

‡ I know of a learned professor of that section ( S. B. Samaj ) bending his head before the statue of Emerson in England and touching the feet too. *–Gouri Prasal Moozumdar.*

§ K.C. Sen in his great antidrink movement typified the burning of the demon of wine by burning the effigy of drink. In the annivasary days of the Brahmo Samaj, the burning of five lights typifing five distinct focuses of spiritual vision, love, faith, purity, asceticism and conscience, was so typical of the Arti of the olden aryan Rishis. *—Ibid p. 219.*

*...The anti-symbolic party (S. B. Samaj) with all hu-

यांची अग्नीची उपासना, शिखांचा ग्रंथसाहेब आणि गुरुगौरव इत्यादि अनंत प्रकार एकेश्वऱ्यांसही साकाराची उपासना अपरिहार्य होते असेंच सिद्ध करीत आहेत.§

आता मायावादाचा विचार पाहूं. राममोहन हे मायावादी होते हें स्पष्टच आहे. केशवचंद्राच्या योगांत जग मिथ्याभूतच ठरते. साधारण-ब्राह्मही इंद्रियविज्ञानास भ्रामकच म्हणतात. " अघटितघटना पटीयसी " अशी ईश्वराची शक्ति त्यांस मान्य आहे. त्याचप्रमाणे जीवाचें अज्ञान हेही त्यांस अनुभवसिद्धच आहे. पण हे अज्ञान आले कोठून हे त्यांस सांगतां येत नाहीं. विश्व हे ईश्वराचें एक लीलाकैवल्य आहे असे म्हणणे त्यांस मूर्खपणाचे वाटते. पण अपूर्णातून

मायावाद

mours of performing a symbolic ceremony in their quarters in the form of an oblation, made up a large pile of fire blazed with burning incense in the name of a regular यज्ञ under the leadings and the guidance of Pandit Shivnath Shastri ...... what so doubly enhanced the beauty of the thing, that the organisers came to join in a body and went on circling the fire with all traditions of reverence to a god or diety.

—*Gouri Prasad Muzoomdar's K. C Sen. p. 226.*

§ From forms to spirit is the message of the New Dispensation ......A stone can be transformed into a book of surmons if taken in a proper spirit. Is not the word God a translation of the thing which once meant " An Idol ". Are not the names as Durga, Siva, Jagannath, Bishvanath and the like replete with the spirits higher and deeper. They are all significant of things spiritual which one in the depth of devotion, can conceive of... Keshub saw thirtythree crores in One and One in thirty three crores.........Flowers are flowers but the essence thereof is no flower at all. That Royal road to spirits—the wonderful translation of forms into spirits, Keshub Chandra Sen saw in the New Dispensation of God.

—*Gouri Prasad Muzoomdar. W. N. D 14-5-25.*

ह्या कट्टया ब्राह्म लेखकाहून मूर्तिपूजक तरी वेगळे काय म्हणतात?

मागें पान १९२।३८७।३८८।३९४।५७५।५७६ पहा.

पूर्णाकडे, हा तरी त्यांचा सिद्धान्त काय? अपूर्ण आले कोठून आणि मूळचेंच जर पूर्ण नसेल तर नवीन पूर्ण तरी येणार कुठून ? रवींद्रनाथ तर म्हणतात कीं, अपूर्ण हा पूर्णाचा परमाविकास होय. ह्या कवींच्या काव्याचा अन्वयार्थ लावणे म्हणजे मायाच कबूल करणे आहे. दुसरे काय ? प्रागतिक ब्राह्म एक निर्गुण निर्विकार असे पूर्णब्रह्म ईश्वराहून भिन्न न मानतां गाणे आणि गाणारा; कल्पना आणि कल्पक इतपतच जगाचें व ब्रह्माचे अस्तित्व मानतात. गाण्यामुळेच गाणारा म्हटला जातो हे जरी खरे आहे, तरी नित्य गात असणे अशीच काहीं गाणाराची व्याख्या करावयास नको. गाणे किंवा कल्पना ह्यांचे अधिष्ठान ह्या दोन्ही क्रियाहून अतीत असेही तत्त्व असू शकेल, हे ब्राह्मांस पटत नाहीं. त्याच्यावरील मायेचा मोह अनावर आहे. गाण्याचा आनंद आणि कल्पनेचे सौंदर्य ते किती ? पण देवळाच्या कळसाकडे पाहूनच ते थांबतात. कारण " बडवे मज मारिती " अशा प्रकारची तितिक्षा धारण करणे, त्यांस नकोसे वाटते. ब्राह्ममताप्रमाणे विज्ञानाचे सारे गाठोडे परमात्म्याच्या स्वाधीन करून सुषुप्तींत प्राज्ञ जो आनंद भोगतो त्यास त्यावेळीं एका अज्ञानाशिवाय कोणती उपाधि असते ? प्रेम आणि सेवा ह्या ब्राह्मांच्या दोन दिव्य तत्त्वास तरी तेथे वाव असतो काय ? तात्पर्य, प्रापंचिकास ह्या काल्पनिक जगाचे कितीही महत्त्व असले तरी ह्या साऱ्या मायेच्या बाजारांतीलच वस्तु आहेत ही गोष्ट खऱ्या विवेकवैराग्यावांचून कळणें कठिण. बुद्धिवादाच्या चौकटींत भडक रंगांत रंगविलेला 'जगदिदं ब्रह्म' हा आधुनिक विद्वानांचा आदर्श, विषयासक्तीच्या खिडकीच्या चौकटींतून दिसणाऱ्या पण्यांगनेच्या मुखमंडनाप्रमाणे पाथस्थास व्यामोह उत्पन्न करील यांत शंका नाहीं. मायेची संभावना विरक्त सत्पुरुषांनीं अशा कठोर शब्दांनींच केली आहे. दारेषणा काय व लोकेषणा काय, दोन्हीही मुमुक्षूस बाधकच आहेत. जगावरील प्रीति सुटेल तेव्हाच ती ईश्वरावर जडेल. देशोद्धाराचा व लोकसेवेचा अभिनिवेश हा ईशप्रेमावांचून स्वतंत्र दृष्टीनें बाधकच आहे. ईश्वर जोडल्यावर मग जग जोडल्यास घोर नाहीं; पण तत्पूर्वी जग हा एक प्रतिबंध आहे. ही विचारसरणी ब्राह्मास बिलकुल मान्य नाहीं. त्यांचा सहजयोग म्हणजे एक परोक्षवाद आहे. त्यांत नामरूपादि उपाधींच्या व विषयविषयी भावाचा बाध होत नाहीं.

जीवात्म्याबद्दल राममोहन यांची कल्पना शंकरमतानुयायीच होती. देवेंद्रनाथ पूर्ण द्वैती होते. केशवचंद्र, रवींद्रनाथ हेही जीव-ब्रह्मैक्यास सरित्सागराची जी उपमा देतात ती अद्वैतपरच मानणे सयुक्तिक दिसतें. इतरही काहीं ब्राह्मांचे अद्वैतपर उद्गार ठिकठिकाणीं आढळतात. ज्यांत

जीवात्मा

द्वैत शेष राहात नाही अशी निर्विकल्पस्थिति साधारण-ब्राह्मास सर्वांसच नाकबूल आहे असे नाहीं. पण अशा अनुभवानंतरची ज्ञानोत्तर जी द्वैतांत अद्वैत पाहण्याची स्थिति तिचे ते विशेष माहात्म्य वर्णन करतात. आम्हास मात्र हे त्यांचे केवळ शब्द-पांडित्यच दिसते. अद्वैत अनुभवणे, पाहणे आणि अद्वैत मानणे यांत महदंतर आहे. अर्जुनाला भगवतांनीं दर्शन दिल्यानंतरचे-बुद्धियोग दिल्यानंतरचे-युद्ध वेगळे व तत्पूर्वीचे दृष्टिभेदामुळे वेगळे. एकमेवाद्वितीयम् असे ब्रह्म जाणलें नाहीं, नव्हे अनुभवले नाहीं; तोपर्यंत हे द्वैतांत अद्वैत काय पाहणार? ज्यांचे तत्त्व-ज्ञान प्रागतिक आहे त्यांची ब्रह्मनिष्ठा काय दर्जाची असणार? शिवाय योग-वासिष्ठांतील चुडालाख्यानांत, दत्तभार्गवसंवादांत, अष्टावक्रगीतेत अथवा भगवद्गीततही जीवन्मुक्तांच्या सहजावस्थेचे जे वर्णन आहे, त्यापुढे ब्राह्मांचा प्रपंचपरमार्थ ह्या द्वैताच्या समन्वयाचा खेळ म्हणजे बाहुलाबाहुलींच्या लग्ना-प्रमाणे फोलच वाटतो. एक सहजयोग अपरोक्षानुभूतीनंतरचा आहे व दुसरा परोक्ष ज्ञानाने मानलेला आहे. जीवात्म्याच्या जन्मपरंपरेबद्दल तर ब्राह्ममतांत साराच अनिश्चित प्रकार आहे.†

आता गुरुवादाबद्दल थोडा विचार करूं वास्तविक विचार करतां आधुनिक ख्रिस्ती जगातील जीजस ख्राइस्टची पदच्युति हीच ब्राह्मदृष्टीनें

गुरुवाद

हिंदुधर्मांतील सद्गुरूंच्या बडतर्फीला कारण झाली असे दिसते. ख्रिस्ती लोकांची मध्यस्थाची कल्पना आणि हिंदूंचा गुरुवाद यात महदंतर आहे. मोक्ष हा ज्ञानानेच होतो, असा वेदांतसिद्धान्त आहे; परंतु ते ज्ञान ब्राह्म समजतात त्याप्रमाणे सर्वांस सहजसाध्य असे सामान्य व्यावहारिक ज्ञान नव्हे. ते ज्ञान अत्यंत कष्टसाध्य आहे. किंबहुना सद्गुरूवांचून तें बहुतेक असाध्यच आहे, असा हिंदु साधकांचा अनुभव असून शास्त्र-

† मागे पान ५१२।६४०।६४१ पहा.

विचारही तसाच आहे. सद्गुरु हे देहधारी दिसले तरी त्यांचें स्तवन 'द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादि लक्ष्यं। एकं नित्यं विमलमचलं सर्वधी साक्षिभूतम्। भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि।' याप्रमाणें त्यांच्या देहास अनुलक्षून कधींच नसते. त्यांच्या मुखानें ईश्वरच ज्ञानदाता होतो. ही ज्ञानदानाची अद्वितीय शक्ति श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ गुरूंच्या ठिकाणीं असूं शकते, हें ब्राह्मांसही नाकबूल करतां येण्यासारखे नाहीं.‡ तसेच विभूति-

‡(a) We do not believe in the mediatorship of the Guru but we do believe that if a man be truly inspired with love for us and for our welfare he cannot fail to help us spiritually. It is only by identifying our own faith with the larger life that we obtain any real power over others. There are people who habitually shape the opinions and inspire the conduct of their associates It is because they incarnate the general consciousness of the company to which they belong.

—*Braja Sundar Ray, I. M. 31-10-1926.*

(b) We often hear men praise somebody whom they love as if he were a god. There is something in this godlike person which fully conquers the mind of his admirer. This kind of faith in man is ridiculed by some people who ridicule it as a mere " sentiment ," but it has more meaning and importance than this ridicule implies.

If we cannot realise God as a formless all pervading Divine spirit, we can at least see Him manifested in the noble hearts and deeds of men. We say that God resides in the heart of man, but how many have realised Him in their own hearts or in those whom they love and admire? If it is true that God loves the noble-hearted, we must love what God loves. It is the only way of loving and realising God.

When there is liking for something or somebody, admiration gradually takes its place. Out of admiration grows love and out of love self-sacrifice, which is the noblest and the best virtue man ever possesses. With it man rises highest in the spiritual atmosphere of eternal bliss and quite forgets

पूजा ( Hero worship ) ब्राह्म तोंडानें मानीत नसले, तरी त्यांच्या आचरणांत ती पदोपदीं दिसून येते. आदि-ब्राह्मांचे रवींद्रनाथ हे तर शांतिनिकेतन आश्रमीचे प्रसिद्ध गुरुदेव आहेत. सर्व आश्रमवासी लोक गुरुप्रमाणें त्यांच्या पायांवर डोकें ठेवून त्यांस वंदन करतात. त्यांस गुरुदेवच म्हणतात. केशवचंद्रांचे अनुयायांनीं त्यांचे पाय धुणें व बायकोच्या केशांनीं ते पुसणें येथपर्यंत त्यांची " गुरुपूजा " नेली होती. सर्व ब्राह्मसाधक त्यांस जीझसप्रमाणें मध्यस्थही मानीत. केशवचंद्रांनी स्वताची पूजा करून घेतली. त्याप्रमाणें त्यांनी श्रीरामकृष्ण परमहंसांचीही सत्पुरुष म्हणून आपण स्वहस्तें पूजा केली. केशवचंद्राच्या मुली व नातींनी नवविधानातर्फे महात्मा गांधींची गंधपुष्पानीं जाहीर पूजा नुकतीच केल्याचे त्यांच्याच वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाले आहे. साधारण ब्राह्म शिवनाथ बाबू यांच्याही त्यांचे सांप्रदायिक बंधु पायां पडत. इतकेंच नव्हे तर पाश्चात्य एकेश्वरी पाहुण्यांची साधारण-ब्राह्म गंधपुष्पानीं पूजाही करीत ! असें ब्राह्मग्रथांतूनच लिहिलें आहे. तेव्हा मूर्तिपूजा आणि गुरुपूजा याबद्दल ब्राह्मांचे आकांडतांडव व्यर्थ आहे असें म्हणणें भाग पडते.*

---

his lower self. This condition of the mind is the proper ground to sow the seeds of the spirit in, where the lower thoughts are sublimated and higher ones realised. It is thus and thus alone that God reveals His sublime and loving self to us.

* (*a*) One man went so far ...... as to wash the feet of Mr. Sen with his own hands and to wipe them with the long hairs of his wife. —*History of the Br. Samaj* p. 230.

(*b*) It is said on the authority of Vijaya Krishna that Keshav took the Master ( Shri Ramkrishna ) to his meditation room and there worshipped his feet with flowers.

—*Life of Shri Ramkrishna* p. 364.

(*c*) I have seen antisymbolists......wear Gairic .....and place vaseful of flowers in their place of worship.

(*d*) I know of Pandit Shiv Nath Shastri also who while

उपासना

आतां ब्राह्मांच्या उपासनेबद्दल थोडा खुलासा करूं. ब्राह्मांची हल्लींची उपासनापद्धति सर्व ब्राह्मांस मान्य नाहीं ! आमचीं लहान मुले निराकाराची उपासना सहज करतात असे पंडित सीतानाथ म्हणोत; पण इतर ब्राह्मांचा अनुभव तसा नाहीं.* इतकेंच काय, पण पंडितांच्या म्हणण्यातही मेळ नाहीं.† ब्राह्मांची आराधना योग्य रीतीने करण्यास लायक असे एकटे दुकटे आचार्यही

---

visiting the homes of the Brahmo families, the Brahmo ladies and gentlemen many times came to fall at his feet and give him every respect he deserved.

(*e*) Rev. Flecher William of the Unitarian association, London ( was garlanded at Bankipur, Brahma Samaj ) and when receiving on his forehead the customary sandlewood paste (from a Brahmica girl) the venerable father bent his head and honoured that synallagmatic reception of......the entire sisterly gathering. —*Gouriprasad Mozumdar.*

(*f*) Ah ! to that party ( Kurta-Bhaja meaning hero worship ) men like Pandit Shivnath Shastri, Mr Umesh Chandra Dutta, Mr. Kali Nath Dutta came to join under the leadership of the late Nabin Chandra Munshi. -*Ibid 178-179.*

(*g*) They (the followers) professed uncommon reverence for him (Sen). They prostrated and abased themselves before him most utterly, they began to talk of him in extravagant phraseology such as lord, master and saviour.

—*P. C. Muzoomdar.*

* What I mean to point out is that services in our Mandirs, as conducted at present, are useless, if not injurious, to those who have not had a preliminary spiritual training ...They (the boys and girls ) get used to words and phrases without realising the things signified by them and they come to regard them afterwards as of no significance at all. They thus became indifferent and apathetic and avoid places of worship (At Dacca) There was a general consesus of opinion that our present services were not suitable for the general public, and they should be adapted to the age, experience and culture of the audience. —*Dr. P. K. Ray, Spiritual Education p. 10.*

† In many cases the current Brahma form of worship as it finds expression in our congregational and other more

त्यांना मिळत नाहींत.* आणि इतक्या तात्त्विक उपासनेत रंगण्यासारखे श्रोतेही त्यांच्या उपासनेस येत नाहींत. यामुळे ब्राह्मांच्या जाड्या तात्त्विक शब्दांचा श्रोत्यावक्त्यांकडून केवळ दुरुपयोग व अवज्ञा मात्र होते, असा ब्राह्मांचाच अनुभव आहे. सामाजिक उपासनानाट्यांतील ध्यानाचा प्रवेश तर कित्येक ब्राह्मांस अत्यंत अप्रयोजकच वाटतो. तसाच काहींसा प्रकार त्यांच्या आराधनेचा असतो.§ पंडित सीतानाथ म्हणतात कीं, 'आमची आराधना-म्हणजे केवळ परंपरा नव्हे, तो साक्षात् समाधीचा अनुभव आहे'.$ पंडितजींचा अनुभव म्हणजे काय ते तेच जाणोत. पण सामुदायिक आराधना म्हणजे समाधि हा आम्हांस मिथ्यार्थवादच वाटतो. ब्राह्मांच्या उपासनेस त्यांचे सांप्रदायी फारसे कोणी हजरही रहात नाहींत, हे पूर्वीं सांगितलेच आहे.

---

मागे पान २३३, ३८७, ३८८, ६२२, ६२३, ६२४ पहा.

or less public services is a series of thoughts and expressions of thoughts characterised by no effort to directly realise the object of worship and often without any emotional fervour. Even the thought the notion of God and his relation to us and the world which runs through these exercises is often found to be most shallow and defective, showing no great intellectual activity in the worshipper. Such worship cannot be called Yoga. —*Pt. Sita Nath I. M. 7-3-26.*

* The Calcutta congregation has ceased to be an example to other congregations in the metropolis and elsewhere. . It is simply because we cannot get a suitable person to hold this most important office (minister) that we have had practically to abolish it, and get back to the old deplorable state of things. .. I have visited many Brahma Samajas in the mofusil. The state of things in them is worse. —*Dr. P. K Ray, President Brahma Samaj Spiritual Education p. 6*

§ There is an idea prevailing among some people who come to join our conrgegational worship that the aradhana portion of the service is unsuitable to the promiscuous audience and therefore it should be very short if it cannot be altogether dispensed with. —*I. M.*

$ Our *aradhana* is no more *parampara* inferential but based on *samadhi* the vision of God. —*Pt. Sita Nath I. N. 15-5-27.*

ब्राह्म हे प्रपंचाचेच उपासक खरे. त्यांचा देवधर्म त्यांच्या प्रापंचिक सोयीप्रमाणें ठरावयाचा असतो. त्यांच्या प्रापंचिक विलासांतील देवधर्म हा फार तर एक अलंकार आहे. ती एक विलायती धर्तीची शिष्टाचार पद्धत आहे. सुख आणि तेंही प्रापंचिक सुख हाच त्यांचा देव, आणि सौंदर्य हीच त्यांची देवता, आणि ह्या दोन्ही देवताची आराधना हेच त्यांचे निःश्रेयस होय.*

अवतारवाद

अवतारवादाबद्दलही ब्राह्माचे निश्चित असे कांहींच एकमत नाही. नवविधान पंथ तर अवतारवाद कबूलच करतो. केशवचंद्र हेच त्यांचे अवतारी पुरुष होत§ आणि साधारण-ब्राह्मांचेही या बाबतीत असावे तसे स्पष्ट एकमत नाहीं. त्याचप्रमाणे श्रीरामकृष्णादि अवतारी पुरुषांच्या पुराणोक्त चरित्रांबद्दल नवविधान,

---

* We have been often asked what is the nature of the Deity that we worship and for some reason or other we have not been able to give a satisfactory answer.

The charge of worldlines is brought against the Prarthana and Brahma Samajes and we cannot say that it is wholly unjust......Now we are simply hiding our own worldliness under the cloak of a positive view of life. It means that we are making our religion conform to our standard of what our life is, instead of what it should be, and are no better than idol worshippers That is why we find it so extraordinarily difficult to answer the question what we worship. —*Dr. G. Y. Chitnis, S. P. 27-2-1927.*

मागें पान ४१५।४१५ पाहा.

§ (*a*) Keshav once told him ( Bijay Krishna ) that he was himself a partial incarnation of Christ and Gouranga and advised Bijay Krishna to declare himself as Advaita

—*Gospel of Ramkrishna Vol. II p 244.*

(*b*) They call the anniversary of his death (Keshub's) the day of the "Master's Ascension." Arecent book calls him "God man Keshub" and "Lord " and "Master." And the room in which he died, is kept precisely as it was then, is entered reverentially, as if it were a shrine.

—*Farquhar, p. 69.*

आदि-ब्राह्म आणि साधारण-ब्राह्म यांचे म्हणणे भिन्न असून त्यात कांहीं कट्टे स्तावक, कांहीं कट्टे निंदक तर कांहीं उदासीन दिसतात.*

---

(c) *Keshub's Greatmens' Theory* :—God of love takes possession of the immaculate spirits in different ages and societies to make some aspect or other, of his complex personality manifest in human character with all its creative energy to lift up humanity and to create a higher order of things.

—*I. M. 3-1-26.*

*(a) Practical solutions of life problems have been offered in the pages of these voluminous records. No scriptures, no message or messenger can hope to make an enduring impression on the life of a people till these have woven themselves into the consciousness of the masses and the women-folk into the very matrix of our domestic and social life. And that is what the Ramayan and the Mahabharat have done in Hindusthan. Rama, Sita, Lakshman, Hanuman, Krishna, Arjun, Bhishma, Sati Savitri and other characters have become the property of the people. They have become the bones and flesh as it were of all India, so that even upto the present time the festivals of Hinduism and all the round of rituals from birth to death commemorate the spirits of these heroes of Hindusthan Figures of ideal kings, queens, citizens, warriors, masters, fathers, mothers, sons, brothers, sisters, friends, followers, servants all live and relive in our modern world through the grace of these masterpieces–these epics of ancient India. They form the nexus of relationship linking up the past with the present."

—*W. N. D. 12-2-25.*

*(b)* The incarnation of the spirit is therefore the very first truth of all practical religions. —*W. N. D.*

(c) To me the story of Shri Ram is one of the most thrilling documents in human history. —*T. L. Waswani W. N. D. 16-4-25.*

*(d)* It (Mahabharat) is full of astounding things told about nature

प्रवृत्ति आणि निवृत्ति यांवर बोलतांना आजचे ब्राह्म प्रवृत्तिपरच अघळपघळ बोलतात. ते एकांतवासाचे विरोधी आहेत. त्यांतही ते साधकांची व्यर्थ दिशाभूल करीत आहेत.‡ राजा राममोहन हे एकांतवासाचे फार भोक्ते होते. देवेंद्रनाथ आणि रवींद्रनाथ✝ हे तर एकांतप्रियच पुरुष होत. केशवचंद्रांचे साधनकानन एकांतवासाचेंच महत्त्व दाखवितें.§ ब्राह्मांचे पाश्चात्य गुरु थिओडर पार्कर हेही एकांताचे महत्त्व फार आहे हे कबूल करतात.† तात्पर्य, साधकाच्या प्राथमिक स्थितींत त्याला एकांताचे महत्त्व फार असते ही गोष्ट स्वानुभवानें सिद्ध असतां कित्येक ब्राह्मलेखक भाजीमार्केटांत आणि कचेरींत, गल्लोगल्लीं आणि घरोघरीं ईश्वराचे सान्निध्य

प्रवृत्ति आणि निवृत्ति

---

and man, that those whom even a modicum of liberal education has given an idea of the reign of law in the physical and moral world and of the nature of real history, can at once see that it is little better than a book of fables intended for the entertainment and instructions (not always of a healthy nature) of the ignorant masses.

—*Pt Sitanath's Krishna and Puranas p. 19,*

(e) Does it not strike you with reference to those Pujas of Durga, that the whole of the Ramayan had been edited by a Shakta worshipper to advertise, for the sake of his own propagandist work, his particular form of worship ? —*The decline and fall of the Hindus p. 24.*

‡ The men of the present age are burying themselves in this busy world with the cry of work is worship, little knowing what silence meant for the soul. —*I. M. 2-3-27.*

✝(a) मागे पान ३०४ पहा.

(b) प्रवृत्तीचें फाजील स्तोम माजवून प्रवृत्ति हीच जीवनाची इतिकर्तव्यता असें मानावयास भारत तयार नाहीं. —रवींद्रनाथ.

§ मागें पान ३८० पहा.

† I had always my favorite places for prayer where alone I might commune with my own heart and be still...... when I went to a new place I stole aside from the rest to find an unseen place wherein to orient myself before my God. —*Letter of Theodore Parker, I. M. 25-5-24.*

प्रत्ययाला येतें असे पाल्हाळिक वर्णन करतात‡ ते अत्यंत दिशाभूल करणारें असते असें आम्हांस वाटते.§ बायकोच्या आलिंगनांत व मुलाच्या चुंबनांत ईश्वर भेटतो म्हणणे म्हणजे सामान्य बुद्धीचाही उपमर्द करण्यासारखे आहे.* ब्राह्मांच्या लेखांत असे अर्थवाद आणि अर्थशून्य पाल्हाळ, अतिशयोक्ति आणि

---

‡ Viewed rightly not only the joyous festivals of human society, but all things in the world and all experiences of life are co-operating in making men religious. Nature is waiting at the door like a fair maiden to tempt man into the temple of the Beautiful......For one who realises the meaning of life and the vision of the Supreme, the act of seeing, hearing, tasting, and touching physical objects in our daily life are not mere sensations but spiritual experiences—so that for him living coincides with worshipping, enjoyment is identical with prayer, and the whole life is permeated by Divine Grace. —*Religion and Modern India.pp. 227, 229,*

§ (*a*) आम्हीं विशेषस्थानी विशिष्ट भाषाविन्यासाने ज्या मादक भावावेगाचा अनुभव घेतो तेंच अध्यात्मिक साफल्य असे चुकीनें समजतो पण ते एक प्रकारें संमोहन आहे असें समजावें. —रवींद्रनाथ, शान्ति०, भाग ५, धर्म.

(*b*) We have our missions and our missioneries, we arrange public lectures, we celebrate anniversaries of our great men, we have our periodicals and pamphlets, yet after all we seem to be where we are, progress is hardly visible. The one thing needful has been neglect. ed, the practice of the presence of God.

—*W. N. D 14-10-23 See also W. N. D 28-5-27.*

" He experiences the loving touch of the Divine Spirit in the tender and affectionate embrace of his dear wife and friends, and in the sweet kisses of his beloved children.

—*Religion and Modern India p 163*

क्लिष्टता, विसंगति$ ढोंग आणि धदेवाईकपणा§ यांचे मासले ठिकठिकाणीं पहा-

$ (a)"अशा प्रकारें संसार, संसारसौख्य, कर्म व जीवन ह्यांना ब्रह्मप्राप्तीशीं संलग्न करणे हेच समाजरचनेचे व जीवननिर्वाहाचे आद्य रहस्य आहे. भारतवर्षानें समाजाला अशाप्रकारे बद्ध करूनच मानवी आत्म्याच्या मुक्ततेचा प्रयत्न केला आहे. त्याने शरीराला अपवित्र समजून त्याचे कधींही खंडन केले नाहीं, समाजाला निंद्य समजून त्याने त्याचा कधीं उपमर्द केला नाहीं, जीवन हे अनित्य समजून त्याने त्याची कधी अवज्ञा केली नाहीं, तर सर्वांलाच त्याने ब्रह्ममय लेखले आहे."

(b)" विषयात निमग्न राहूनही ज्ञानद्वारा ज्याप्रमाणे संयमन करतां येते, तसे विषयसेवनाचे अभावीं होणार नाही. विषयनियुक्त असल्यावांचून ज्ञानालाही पूर्णता नाहीं; आणि ज्ञानाने जो संयम होत नाहीं, तो पूर्ण संयमही पण नव्हे. ते निव्वळ ढोंग व पोकळ अभ्यास आहे."

(c)शंकर ही त्यागाची व अन्नपूर्णा ही भोगाची मूर्ति आहे. उभयताची एकतानता होईल तेव्हांच संपूर्णतेचा आनंद प्रगट होईल.

(d)" जे केवळ ब्रह्मविद्येतच गढून गेले आहेत, ते त्या अविद्येच्या (अंधतमा)पेक्षाही मोठया अंधकारांत प्रवेश करतात."

हेच रवींद्रनाथ पुन्हा असेही म्हणतातः—

(e)"यासाठीच त्याग, दान, तपस्या आणि दुःख या साधनानींच आम्ही गंभीरपणे आत्मलाभ करू शकतो. सुख, आराम आणि विलास याचा त्यासंबंधी काहीं उपयोग होत नाहीं. दुःखाशिवाय दुसऱ्या कोणत्याही उपायाने आत्मशक्तीचा आपल्यास परिचय होऊ शकत नाही."

(f)" सारांश, मातृस्नेहाचे मूल्य दुःखांत, पातिव्रत्याचे मूल्य दुःखांत, वीर्याचें मूल्य दुःखांत, इतकेच नव्हे तर पुण्याचे मूल्यही दुःखांतच आहे."

(g)" दुःख, विपत्ति, मृत्यु आणि भीति हीं तुझ्यापासून दूर ठेवून तुला जाणतां येईल काय ? नाहीं ! तसे घडणे शक्य नाहीं. +++तुझा मार्ग हा निःसंशय आरामाचा नसून दुःखाचा आहे."

§ Omniscient God, known to Thee are the peculiar disadvantages and trials to which preachers are subject. They must always preach high truths, they are bound to do so. Even if they feel not what they

वयास मिळतात. रवींद्रनाथ बोलूनचालून कविच,* केशवचंद्रांसही रूपक, अतिशयोक्ति इत्यादि अलंकारांची भारी हौस असल्याचें तेच कबूल करतात.‡ धर्मासारख्या गंभीर विषयावर लिहितांना ब्राह्म पुढाऱ्यांनीं शब्दांचा उपयोग याहून अधिक कसोशीनेंच व विचारपूर्वक केलेला बरा, असे आम्हांस तरी वाटतें. कारण यांचे उद्गार हेच पुढे त्यांच्या अनुयायाचें धर्मशास्त्र बनते.

असो. ह्याप्रमाणे धर्मासंबंधी विचार झाला. आतां सामाजिक सुधारणांसंबंधी ब्राह्मांची कितपत एकवाक्यता आहे ते पाहूं.† वर्णाश्रमधर्मासंबंधीं

---

say, they must still go about preaching. In whatever mood of mind they may be, whether favourable or unfavourable, they must fulfil their profession. If they are dejected and dispirited they must talk of faith and hope. If they have become impure, they must preach unto others purity, if there is disunion among themselves they must advise others to cultivate love and fellowship. Thus O Lord, their lips may become false and their hearts hypocritical.

—*Prayer of Keshav Chandra Sen. 15 December, 1878.*

* (*a*) "आमच्या दुःख-जीवनात तूं आपल्या ग्रहसूर्यनक्षत्रखचित महासिंहासनापासून आपली लीला पूर्ण करीत आहेस ! हे राजा, तूं आमच्या दुःखाचा राजा आहेस."

(*b*) "अपूर्णतेचा गौरव म्हणजेच दुःख, हीच अपूर्णतेची संपद व दुःख हेंच त्याचे भांडार होय. ++ ह्या दुःखाच्या ऐश्वर्यात अपूर्ण जीव पूर्ण स्वरूपाशीं आपल्या अहंकाराचा संबंध स्थापन करतो व त्याबद्दल त्याला काहींही वाटत नाही."

(*c*) "या कृत्रिम व कोलाहलमय अवडंबरातून तूं आम्हाला त्या पवित्र दृश्याकडे घेऊन जा बरे ! कोठे तर ज्या धूलिशय्येत नग्न देहाने तुझे साधक बसले आहेत, जेथे तुझे सर्वत्यागी सेवक निष्ठुर कर्तव्याच्या खडतर मार्गाकडे धांवत सुटले आहेत व ज्या ठिकाणीं तुझे वर-पुत्र-गण दारिद्र्यानें निष्पिष्ट व विषयाकडून परित्यक्त झाले आहेत. हाय, हाय ! देवा ! त्या ठिकाणीं कोठली दीपच्छटा... व कोठले मणिमाल्य; पण त्या ठिकाणींच तेज व त्याच ठिकाणीं तूं आहेस." —रवींद्रनाथ, शान्तिनिकेतनमाला, मराठी भाग ५.

‡ मागे पान ४०८ पहा.

† मागे पान २७७।२८०।२८१।३७९।४२६।४७६ पहा.

विचार करतां राजा राममोहन यांनीं आपली ब्राह्मण जात संभाळण्याकरितां शेवटपर्यंत काळजी घेतली. त्याच्या राजवटींत ब्राह्मसमाजांत वेदाध्ययनाचा व आचार्यपदाचा अधिकार फक्त ब्राह्मणांसच असे. ते विलायतेस गेले तेव्हा त्यांच्याबरोबर ब्राह्मण स्वयपाकी वगैरे होते. जातिदर्शक यज्ञोपवीत त्याच्या गळ्यांत अखेरपर्यंत होतेच. आणि त्यांचे और्ध्वदेहिकही परदेशीं शक्य तितके शास्त्रोक्तच झाले. देवेंद्रनाथ * व केशवचंद्र हे दोघेही जातीने कुलीन ब्राह्मणांपैकी नव्हते. तरी चातुर्वर्ण्य मोडावे, असे दोघांचेही मत नव्हते. रवींद्रनाथांसही वर्णाश्रमधर्माचे ‡ महत्त्व मान्य आहे.

सामाजिक सुधारणा

आजच्या अनंत पोट जाति ह्या दशोन्नतीस विघातक आहेत इतकेच त्यांचे म्हणणे आहे. साधारण-ब्राह्म मात्र वर्णाश्रमधर्माचे पूर्ण विरोधि आहेत. पण त्यांचे आचरण त्यांच्या विचारांशीं बरेच विसंगत दिसते. केशवचंद्रांनी अब्राह्माशीं सोयरीक जोडली याबद्दल साधारण-ब्राह्मांनीं त्यांच्याविरुद्ध मोठाच गिल्ला केला. साधारण ब्राह्माच्या अनुष्ठानपद्धतींत "आमची मंडळी" (Community) "आमची मंडळी" असा पदोपदीं ब्राह्मजातीचा अभिमानपुरःसर उल्लेख आढळतो. सोयरेसंबंध व घरोबा जोडताना कुलशीलाची जी चिकित्सा करण्याबद्दल पंडितांनी सांगितले आहे त्यातही हीच भेद-बुद्धि दिसून येते. इतकेच काय, पण त्यांच्यात स्वतांच्या अभिमानाबरोबर इतराबद्दल द्वेष आणि तुच्छताही दिसते. तात्पर्य, समान-

* Debendra Nath believed that however evil caste might be, members of the Samaj ought not to be compelled in the circumstances of these days, to give it up. He was opposed to marriages between people of different castes; and he could not endure the thought of widow re-marriage.

‡ दिवसाची ज्याप्रमाणे पूर्वाण्ह, मध्यान्ह, अपराण्ह व सायान्ह अशी चार प्रकारे स्वाभाविक वांटणी झाली आहे, त्याचप्रमाणे भारतवर्षाने मानवी जीवनाची चार आश्रमांत विभागणी केली आहे. ती स्वभावानुसारच केली आहे.++प्रथम शिक्षण, नतर संसार, पुढे संसारमुक्ततेची साधना व अखेर मुक्ति. —शान्तिनिकेतनमाला, भाग ५, पृष्ठ १५६.

धर्मी माणसांनींच परस्परांशीं रोटीबेटीव्यवहार ठेवावा हे तत्त्व साधारण-ब्राह्मांसही जर मान्य आहे, नव्हे आवश्यक वाटते, तर हे समान धर्म जन्मस्थ जातीवरूनच ठरविणे सोयीचे व सुरक्षित आहे, हे आम्हास तरी अगदीं उघड दिसते.

जाति गुणकर्मावर ठरवाव्या असे कित्येक म्हणतात. रवींद्रनाथांसही जातिबंधन लवचिक असावे असे वाटते. वर्णांतराची व्यवस्था पूर्वीच्या स्मृतिकारानींही लाविली असेल. पण आजच्या स्थितीत ती गोष्ट अशक्यप्रायच आहे. विश्वामित्राचे उदाहरण वर्णांतराचा पुरस्कार करणारे नसून विरोधीच आहे. वर्णांतरप्राप्तीसाठीं त्यास केवढे दिव्य तप करावें लागले व त्यासाठी समाजांत केवढी अशांति उत्पन्न झाली, हे लक्षात घेतले म्हणजे गुणकर्मावरून जाति ठरविणें नुसते कठीणच नव्हे, तर अत्यंत बखेडे व भांडणे माजविणारे होईल व त्यामुळे समाजाचे स्थैर्य बिघडून कायद्याचे व व्यवहाराचे निरनिराळे असख्य गुंतागुंतीचे प्रश्न उत्पन्न होतील हे उघड दिसत.साधारण-ब्राह्मासही गुणकर्मावरून जाति ठरविणे शक्य वाटत नाही; तरी ब्राह्म व अब्राह्म अशा दोन तरी जाति ठेवाव्या असा त्यांचा विचार दिसतो. आम्ही प्रारभी महाराष्ट्र ब्राह्म व बगाली ब्राह्म यांची जी तुलना केली आहे, ती महाराष्ट्र ब्राह्मास कदाचित् रुचणार नाहीं, असे आम्हांस त्या वेळीच वाटले. ते म्हणतील कीं, देवेंद्रनाथ कितीही थोर असोत, पण डॉ० भांडारकर हे आम्हांस त्याच्याहूनही थोर आहेत. आम्हांस हे महाराष्ट्रीयांचे म्हणणे एका दृष्टीने कबूल आहे. ती दृष्टि म्हणजे हीच कीं, महाराष्ट्रीय ब्राह्म व बंगाली ब्राह्म यांचे स्वभाव आणि मनोरचना इतकी भिन्न आहे कीं, त्यांच्यांत तुलना करणेच कदाचित् चुकीचे ठरेल. हीच गोष्ट दुसऱ्या शब्दांनी सांगावयाची तर बंगाली ब्राह्म व महाराष्ट्रीय ब्राह्म यांची परस्पर जातच वेगळी असेच म्हणणे ओघास येते. तात्पर्य, ब्राह्मही जर समानधर्मी असू शकत नाहींत, तर साऱ्या हिंदुस्थानांत बळेच एकंकार करून अखिल हिंदुसमाजाची एक जात करू पहाणे हे व्यर्थ आहे. हिंदुसमाजच काय पण अखिल मानवकोटीचीही एक जात झालेली पाहण्याचा दिवस पुढे कधींच उगवणार नाही असे कोणीं सांगावे. पण तसे कधीं व्हावयाचेच असेल तर त्यास अतिदीर्घ काल लागेल व त्यासाठीं आरंभ पोटजातींच्या एकीकरणापासूनच

जातिभेद

झाला पाहिजे. तसे न करतां चारी वर्ण आणि सारे धर्म यांचा एकंकार करण्याच्या घिसाडघाईत भेद कमी न होतां ते वाढून सर्वत्र अनास्था व बजबजपुरी माजेल यांत बिलकूल शंका नाहीं.

जातीजातींतील भेद मोडण्याप्रमाणे स्त्री-पुरुष यांतील भेद शक्य तितका कमी करावा असा ब्राह्मांचा प्रयत्न आहे.* स्त्रियांना सर्व प्रकारे पुरुषांप्रमाणेच शिक्षण देऊन व स्वातंत्र्य देऊन पुरुषांच्या पारतंत्र्यांतून त्या मोकळ्या कराव्या, याचेच नांव अबलोन्नति असे ब्राह्म समजतात. प्रौढाचे प्रीतिविवाह, मिश्रविवाह, विधवाविवाह, घटस्फोट किंवा अविवाहित जीवन हे सारे स्त्री-स्वातंत्र्याचे प्रकार होत साधारण-ब्राह्मांचा हा फारच आवडता विषय खरा; पण या बाबतींतही ब्राह्म पुढाऱ्यांचे एकमत नाहीं.

अबलोन्नति

राजा राममोहन यांनीं सतीची चाल बंद करावी व स्त्रियाचे वारशाचे हक्क वाढवावे एवढीच अबलोन्नतीसाठीं चळवळ केली. देवेंद्रनाथ यांचे मत मिश्र-विवाह व पुनर्विवाह यांस बिलकूल अनुकूल नव्हते.† व केशवचंद्राचेंही मत या सुधारणांस अनुकूल होते असे नाहीं;‡ उलट पुरुषानींही पुनर्विवाह करूं नये ह्या विचाराचे ते होते. साधारण ब्राह्मांचे आजचे अध्यक्ष पंडित सीतानाथ यांचे-ही मत असेच असावे असे वाटते. पुनर्विवाहास अनुकूल असे त्यांचे विचार निदान आमच्या वाचनात नाहींत. स्त्री-शिक्षणाने पुरुषी बायका निर्माण केल्या व त्यांचा कुटुंबास व जनतेस काहीच उपयोग नाहीसा झाला. मातृपद त्यांना नकोसे झाले. बालशुश्रूषा वगैरे स्त्रीधर्मास त्या पारख्या झाल्या. अशी रवींद्रनाथांचीही तक्रार आहे. नटूनथटून सायंकाळच्या मजलसी, मेजवान्या, नाच, सभा यांत मिरवावे व लोकांचे लक्ष आपल्याकडे ओढून घ्यावे अशा

---

* If such (inter) marriages took place oftener the two fighting Communities ( Hindu-Muslim ) would be knit together in loving relationship in no time In fact, for the fusion of innumerable communities, and castes in India this is the only sure way, and India can become a nation in the true sense of the term through such fusion.
—*I. M.* 26-6-27.

† मागें पृष्ठ २२७।२४४ पहा.

‡ मागें पृष्ठ ३७९ पहा.

भलत्याच महत्त्वाकांक्षा स्त्रियांत उत्पन्न झाल्या.¶ स्त्री-धर्माचा विनय, मर्यादा व धर्मशील हीं सुटलीं. हिंदी बाटलेल्या बाया किंवा इंग्रजी नित्य कुमारिका यांच्या हॉस्टेलांतून इंग्रजी पद्धतीने त्या राहूं लागल्या व शिकूं लागल्या.§ प्रीतिविवाहासाठीं वशीकरणाचे धडे त्यांस शिकावे लागले. अशा रीतीने ब्राह्मांनीं आपले स्त्री-स्वातंत्र्याच्या युगास प्रारंभ करून आज तीन पिढ्या झाल्या. आतां पदवीधर ब्राह्म-स्त्रियांची ब्राह्म-समाजास स्वतंत्र जोड मिळाली आहे.

हे सर्व ठीक झाले. यास वाईट म्हणण्याची सुशिक्षित समाजांत आज सोयच नाहीं. पण तूर्त ब्राह्मांपुरताच विचार करतां आमचा ब्राह्मांस असा सवाल आहे कीं, स्त्रियांस स्वातंत्र्य व शिक्षण दिल्यावांचून देशोद्धार होणे केवळ अशक्य आहे, पुढील पिढीच्या ज्या माता होणार त्यांस इतिहास, भूगोल, गणित वगैरे विषयाचे शिक्षण दिले तरच त्या सुप्रसू होतील, नाहीपेक्षां पडद्यांत डांबलेल्या व गुलामाप्रमाणे घरांत राबणाऱ्या स्त्रियांच्या पोटी सुप्रजा निर्माण होणें अशक्य होऊन आमच्या ह्या देशाचा घोर अधःपात होईल, अशा फार गंभीर धोरणाने ब्राह्मांनी स्त्रियांची झपाट्याने उन्नति केली, तर आतां गेल्या शंभर वर्षांत ब्राह्म पुढाऱ्याच्या तोडीचे सुपुत्र, पदवीधर स्त्रियाच्या घरोघर किती किती निर्माण झाले, ह्याची माहिती त्यांनी येत्या शतसांवत्सरिक उत्सवांत व पुढे वेळोवेळी अवश्य प्रसिद्ध करावी. मात्र ती गेल्या जर्मन युद्धांतील बातम्याप्रमाणे शिष्टाचाराने मंजूर केलेल्या असत्यांनीं भरलेली नसावी !

फलनिष्पत्ति

तसेच राजा राममोहन ह्यांची आई, देवेंद्रनाथांची आजी, केशवचंद्रांची आई, आनंदमोहन यांची आई इत्यादि अनेक अशिक्षित ब्राह्ममाताचे धर्मशील ह्या पदवीधर बायांपैकीं किती बायांत उतरले ? तसेच या बालविवाहित ब्राह्ममातांस दीर्घायु व सुप्रजा याचा जो लाभ झाला तो अतिप्रौढ वयात

¶ "The wives in the family are, as in refined families, attractive figures to be presented in social parties and entertainments of men by music, playing and dancing" —*Brahma Sadhan p. 27.*

§ Banga Mahila Vidyalaya—With its scheme for the high education of grown up women and its boarding arrangements conceived according to reformed tastes, without any recognition of caste rules and necessarily some what anglicised in form. —*Philosophy of Brahmoism.*

प्रीतिविवाह केलेल्या किती पदवीधर स्त्रियांस मिळाला ?* केशवचंद्र, प्रताप-चंद्र, शिवनाथशास्त्री, शशिपाद बानर्जी इत्यादि कट्टर

नव्या-जुन्या स्त्रिया

ब्राह्म-पुढाऱ्यांच्या बालविवाहित व जुन्या चालीच्या, अशिक्षित स्त्रियांनीं केवळ पतिव्रताधर्मास जागून पतींचें सहकार्य ( त्याच्या पूर्वसंस्काराविरुद्ध व सभोवारच्या परिस्थितीविरुद्ध ) ज्या निष्ठेने व निरहंकार बुद्धीनें केले त्या मानानें प्रौढविवाहित पदवीधर स्त्रियांचे वरील प्रकारच्या एकनिष्ठ सहकारितेचे प्रमाण किती वाढले आहे ? विदेशी ग्रंथांच्या आधारे अमृतत्वावर पचवीस रकाने लेख लिहून आपल्या परप्रत्ययनेयबुद्धीचे प्रदर्शन करणाऱ्या ब्राह्मविदूषींची संख्या वाढली असेल, पण "माझी थोरली सवत पतिसन्निध गेली, मलाही त्याचेजवळ गेलेंच पाहिजे, हा आमचा पतिव्रतांचा धर्म आहे यांत तुम्ही ढवळाढवळ करूं नये !" असे राममोहन यांस निक्षून सांगून भडकलेल्या चितेंत जळणाऱ्या दोन प्रेतांवर जाऊन शांतपणानें निजणाऱ्या त्या तरुण स्त्रीची अमृतत्वावरील निष्ठा किती पदवीधर स्त्रियांत आहे ?

पंडित सीतानाथ तत्त्वभूषण म्हणतात कीं, प्रौढपणीं प्रीतिविवाह झालेल्या सुशिक्षित दंपत्यात जो उत्कृष्ट सलोखा रहातो, तसा बालपणीं लग्न झालेल्या जोडप्यांत रहाणे अशक्य आहे. बालविवाहित जोडपे कोठें

यशस्वी विवाह

सुखानें नांदत असेल तर तो अपवाद होय. पंडितजी कोठून परमुलुखांतून हिंदुस्थानांत नवीनच आले असते, तर हें म्हणणे कदाचित् त्यांस शोभते ! कारण त्यांस गुरु शोभणारे बाबू प्रतापचंद्र मुजुमदार यांचे विचार याच्या अगदीं उलट आहेत.‡ आणि जगाचा अनुभवही तसाच आहे. पण हे जाणूनच कीं काय, आतां कोणी ब्राह्म असेही प्रतिपादन करूं लागले आहेत कीं, पतीपत्नींत सलोखा राहणे यांतच कांहीं लग्नाचे खरें यश नाहीं. पूर्वीच्या पद्धतीच्या दंपतींत सलोखा राहात असला तरी तो बायकांच्या भेकड अडाणीपणामुळे असेल. आणि नवीन शिकलेल्या जोडप्यांत मतभेदाचा विजोड रोज होत राहिला तरी तो वैयक्तिक अभिमानामुळे असेल. त्यामुळे पहिले लग्न सुखाचे व दुसरे अयशस्वी असें म्हणण्याचें

---

*मागे पान २२२ पहा.

‡ मागें पृष्ठ ४७६ पहा.

मुळींच कारण नाहीं.* तात्पर्य, आमच्या स्त्रिया आमच्याशीं सलोख्यानें न राहिल्या म्हणून काय झालें ? त्या भाविक नसल्या म्हणून काय बिघडलें ? त्या पुरुषी बनल्या म्हणून त्यांत गैर काय आहे ? त्यांच्या ठिकाणीं तेजस्वी पुरुषांस जन्म देण्याचें सामर्थ्य नसलें म्हणून काय अडलें ?–ते कांहीं असले तरी आम्ही आमच्या स्त्रियांस पुरुषांप्रमाणे पंडिता आणि वारा खाल्लेल्या पाडसांप्रमाणे स्वतंत्र करणारच करणार असे म्हणणे हा दुराग्रह आहे. ही आत्मवंचना आहे.

स्त्री-शिक्षण

स्त्री-शिक्षणासबंधींही केशवचंद्रसेन, रवींद्रनाथ व पंडित सीतानाथ यांचे विचार अगदीं भिन्न दिसतात. मुलाप्रमाणेच सर्व प्रकारचें शिक्षण मुलीस द्यावें हे साधारण-ब्राह्माचें मत मूळ ब्राह्म-संस्थापकाच्या विचारें फारच चमत्कारिक दिसतें. व त्याचे दुष्परिणाम आजही दिसत आहेत. पुरुषाप्रमाणे विद्याव्यासंग आणि स्वातंत्र्य याची एकदां कुमारिकांस संवय लागली म्हणजे विवाह व मातृपद हीं बंधनें त्यांस अनिष्ट वाटून हिंदुपद्धतीप्रमाणे गृहिणीच्या कामास त्या कुमारिका बहुधा नालायकच ठरतात.† असा ब्राह्मांचाही अनुभव आहे. संसारांतील टापटीप, काटकसर, पाकसिद्धि, शुश्रूषा, बालसंगोपन, काटकपणा, स्वार्थत्याग, निरपेक्ष प्रेम, गृहकृत्यासंबंधीं कर्तव्यबुद्धि, मर्यादा, आत्मसंयमन, संतोष, आज्ञाधारकपणा, परोपकारबुद्धि, निष्पाप मन, निष्ठा व धर्मशील इत्यादि स्त्रियांच्या ठिकाणी जरूर असणारे सारे गुण पदवीधर स्त्रियापेक्षां इतर स्त्रियांत कमी प्रमाणांत आढळतील असे आम्हास तरी वाटत नाही.$

* On the other hand those (husband and wife) who fight and quarrel may do it from a more highly developed sense of their personalities and so far as the one has not sacrificed his or her personality to the selfishness of the other, that marriage is a success whatever neighbours may say about disturbing nightly scences. This we have to bear in mind when we compare the old marriages with the new ones.

—*Dr. G. Y. Chitnis S. P. 19-6-27.*

† मागें पृष्ठ ५०९ पहा.

$ **It is not true that women are deliberately kept (illiterate in India); but if they were, is their knowledge of house-keeping and cooking of no value ? Is their trained common sence worthless? Can a woman even be called illite-**

इतकेंच नव्हे, तर अशिक्षित स्त्रिया वरील गुणांत कदाचित् सरशीच करतील असा संभव दिसतो त्याचप्रमाणें प्रसंग पडल्यास सामान्य प्रापंचिक कर्तव्यांपेक्षां फार व्यापक व कर्तबगारीची कार्ये आधुनिकांनीं अशिक्षित गणलेल्या जुन्या चालीच्या स्त्रीवर्गापैकीं पतिसहचारिणी स्त्रियांनींच काय, पण हिंदु विधवा स्त्रियांनीही बिनबोभाट चालविल्याचीं उदाहरणे प्रांतोप्रांतीं गेल्या शतकातही अनेक आढळतील.† इतकेंच काय, पण गेल्या शतकातील खास ब्राह्मांच्याच घराण्यांतील विशेष कर्तबगार स्त्रियाची टीप घेतली, तर त्यात शाळा कॉलेजांतून इंग्रजी परीक्षा पास न झालेल्या स्त्रियाचे प्रमाण कमी पडेल असे आम्हास वाटत नाहीं. यामुळे ब्राह्मांच्या पुरुषी स्त्री-शिक्षण व स्त्री-स्वातंत्र्य याच्यात कांही गुणलेश असला, तरी त्या मानाने आवश्यकता नाहीं, उलट धोका मात्र जास्त आहे. म्हणून स्त्रियाना पुरुषाप्रमाणेच लेखणे हा ब्राह्माचा समदर्शीपणाचा अतिरेकच आहे असेंच आम्हास वाटते.

हे तारतम्य अधिक चांगले लक्षांत येण्यासाठीं मराठी वाचकांच्या दृढपरिचित अशा दोन ब्राह्मस्त्रियाचें उदाहरण आम्ही घेतो. दोघीही दाक्षिणात्य

**दोन रमाबाई**

जुन्या चालीच्या ब्रह्मकुलोत्पन्न असून दोघीही नव्या चालीच्या कायदेपंडित ब्राह्मांच्या स्त्रिया झाल्या. दोघींनीही स्त्रीसेवा हेच मोठे कार्य हातीं घेतलें. व त्यात पतिपश्चातही एकप्रकारे लौकिक संपादन केला. दोघीही नांवाने रमाबाईच खऱ्या, पण श्रीमती रमाबाई रानडे वेगळ्या आणि पंडिता रमाबाई ह्या अगदींच वेगळ्या. ह्या दोन रमाबाईच्या धर्मशीलात तारतम्याने असे अंतर पडण्याची दुसरींही कारणे असतील; पण आम्हांस ह्या भेदाचे कारण पुरुषी पांडित्य व स्वातंत्र्य यांची अमर्याद चटक हेच होय, असे वाटते. पुरुषांची सारी व्यावहारिक साधनरूप गौण ध्येये स्त्रियांनीं अंगिकारणे हा निसर्गद्रोह आहे. तो भोवल्यावाचून कधींच रहाणार नाही.

---

rate when it is merely true that she cannot read and write. though at the same time she is saturated with the literary culture of the great epics and puranas? —*Sister Nivedita*

† It is interesting to note that the best managed estates in Bengal are in the hands of widows. Lawyers invariably respect their opinions. —*Sister Nivedita.*

ह्या अविवेकी ब्राह्मांनीं स्त्रियांच्या उत्कृष्ट गुणांची माती केली असें आम्ही म्हणतों ते याचमुळें. जी वस्तु मूळची उत्कृष्ट असते ती दुरुपयोगानें अत्यंत घातक होते, असें समजावें. मर्यादशीलपणा हाच ज्यांचा स्वभाव, परपुरुषांच्या दृष्टीसही न पडणें हेंच ज्यांचें व्रत, त्याच स्वभावतः पुण्यशील स्त्रीजातींत स्वैरवृत्ति व साहस यांचा अतिरेक झाला असतां, कित्येक स्त्रिया अनाचारांत पुरुषांसही लाजवितात. हें स्त्री-चारित्र्याचें दुसरें टोक स्त्री-स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्यांनीं पक्कें लक्षांत ठेवावें.

स्त्रियांस योग्य तें शिक्षण द्यावें, त्यांस उपभोग्य वस्तु किंवा काबाडकष्ट करणारे प्राणी असें लेखूं नये, त्यांस बरोबरीच्या नात्यानें व प्रेमानें वागवावें, या सर्व गोष्टी कोणासही नाकबूल नाहीत. आपली बायको घरातील निरनिराळीं कामें करीत असताना तिला निरनिराळ्या नात्यानें वागवावें अशीच हिंदूंची शिकवण आहे. ती जेवण करून वाढीत असता तिला अन्नदात्या आईप्रमाणें मानावें. प्रापंचिक व्यवहारात बरोबरीच्या मित्राप्रमाणें तिचा सल्ला घेत असावें. त्रिविध पुरुषार्थांत तिला बरोबरीची भागीदार मानावें. तिला वस्त्राभरणानें सतुष्ट ठेवावें, ह्या सर्व रीतीच्या गोष्टी आहेत. परंतु पाश्चात्यांचें केवळ अंधानुकरण करून त्यांच्याकडे होत असलेल्या अनर्थांनीं जागें न होतां, ब्राह्मांकडून अबलोन्नतीचे जे प्रयत्न होत आहेत, ते अगदींच अविचाराचे व आत्मघातकी आहेत असें आमचें स्पष्ट मत आहे.§ याचा जास्त ऊहापोह अखेरच्या तुलनात्मक खंडात होईलच.

---

§ To justify our conduct, we are setting up exaggerated claims on behalf of the individual will and are strongly protesting against discipline. We are confusing self-expression and self-developement with a life of instincts and passions.-We tend to look upon ourselves as healthy animals and not spiritual beings. We have had sin with us from the beginning of our history, but we have recently begun to worship it. Disguised feeling is masquerading as advanced thought. The woman who gives up her husband for another is idealised as a heroine, who has had the courage to give up the hypocritical moral codes and false sentiments, while she who clings to her husband through good report and bad is a cowardly victim of conventions. Sex irregularities are becoming less shocking and more popular.

—*Hindu view of life by Pro. Radha Krishnan.*

हिंदुस्थान आसन्नमरण आहे असें पाहून ब्राह्म वैद्यांनीं धर्मभेद, जाति-भेद आणि स्त्री-पुरुष भेद या त्रिदोषांची चिकित्सा करून त्यांवर योजना गोऱ्या डॉक्टरांच्या सल्ल्यानें ठरवून घेतली. त्यांत रोचक व निस्तत्त्व ब्राह्मधर्माचे "टेस्टलेस क्विनाईन," क्षणैक प्रेमोद्रेकानंतर निःसत्त्व रहाणारे मिश्रविवाहाचें 'पिक मी अप', 'स्वैराचार उन्मादाची 'ब्रँडी', मोह पाडणाऱ्या सुधारणांचा 'क्लोरोफार्म' आणि शेवटीं नास्तिकवादाचा दर्प असलेल्या शिक्षणाचे "ॲक्वा-कॅम्फर" असे ते काहीं तरी मिश्रण होते. व त्यास थेट विलायती रहाणीचें कडक पथ्य संभाळण्यास सांगितले होते ‡ ब्राह्मांची महत्त्वाकांक्षा अशी होती कीं, ब्राह्मपथारूढ तृषार्त जिज्ञासूंसाठीं धर्मजीवनाच्या पाणपोया म्हणजे त्यांची प्रार्थना-मंदिरें व शिक्षणसंस्था होत. ब्रह्मद्वेषांत प्रतिविश्वामित्र अशाच्या पाण-पोयांवर आपली तृषा न भागविणारे रोहिदास अद्याप हिंदुस्थानांत बहुत आहेत हे देशाचे भाग्य होय! पूर्वींचे विद्यागुरु जे ब्राह्मण ते महा लबाड! त्यांनीं सद्धर्माचे उदात्त शिक्षण 'इतरे जनां'पासून चोरून ठेवले. ही त्यांची ठकबाजी धूर्त ब्राह्म विद्वानाच्या लक्षांत येऊन आज उणेपुरे एक शतक लोटले. तेव्हां गेल्या तीन पिढ्यात धर्मशिक्षणाची चोहोंकडे मेघवृष्टि होऊन ही पृथ्वी—निदान हा भारतवर्ष तरी—दिव्य फलभारानीं ओथबलेल्या धर्मवृक्षाच्या पारंब्यांनीं व्याप्त व्हावयास पाहिजे होता. परंतु त्याच्यावर अजून धार्मिक-भावांचा हिरवाळही कोठें अंकुरित झालेली दिसत नाहीं.* तेव्हा आता युरोप

धर्मशिक्षण

‡ "The consequences of my long and uninterrupted researches in religious truth has been that I have found the doctrines of Christ more conductive to moral principles, and better adapted for the use of the rational, than any others which have come to my knowledge; and have also found Hindoos in general more superstitious and miserable both in the performance of their religious rites, and in their domestic concerns, than the rest of the known nations on the Earth." —*Raja's letter to Digby.*

*For a long time, indeed, have we neglected the most serious duty of studying the moral and religious education

व अमेरिकाखंडासारख्या दूरदूरच्या देशांतून 'उदार विचारां'ची नवीन नवीन खते मागवून भरतभूमि चांगलीच खतावण्याचा ब्राह्मांचा विचार सुरू आहे.‡ उत्तम पिकाचें बियाणें कोळशाच्या खाणींच्या मुलखावांचून ब्राह्मांस दुसरें कोठें मिळणार ? साऱ्या भूगोलाचा अभ्यास करून विद्वानांनी जी विद्वत्ता संपादन केली त्यांचें एरव्ही ते चीज काय ? सुंठ-बिब्यापासून तो हेमगर्भापर्यंत घरचीच औषधें उपयोगांत आणली, मग तो डॉक्टर तो कसचा ! श्रीशंकराचार्य आणि श्रीरामानुजाचार्य यांच्याही तत्त्वज्ञानाला आधार ख्रिस्ती-धर्म, वैष्णवांच्या भागवतधर्माला आधार ख्रिस्तीधर्म व इस्लामी धर्म, असे ज्यांनी अपूर्व शोध लावले* त्यांच्या दूरदृष्टीला पायाखालचें कोठून दिसेल ? दुसरें असें की, अमेरिका व युरोप ह्या वरपक्षाशीं सोयरिक जोडून खाद्याला खांदे न भिडवले तर मग समन्वयाच्या शुभलग्नाचा सोहळा तो काय?$

---

of our people, and Providence has most justly punished us by arresting our spiritual growth as well as by producing a diversity of opinion and causing divisions and sub-divisions among us. —*Dr. P K Ray, Spiritual education p 26.*

(b) The Brahma Samaj has not yet made any organised attempt to impart systematic religious education to boys and girls and the result is the present deplorable state.
—*Dr. P. K. Ray, Spiritual education preface.*

‡ The Teachers of the Brahmo Samaj should co operate with the teachers of the Free Christianity and liberal religion in the West in order to unfold the secrets of man's spiritual nature, to discover the laws of the spiritual world, and to found upon them a sound system of spiritual education, which will in my opinion be the basis of the future.
—*Dr. P. K. Ray, Spiritual education preface.*

* Shankar and Ramanuja were influenced by Christian element which was powerful in southern India. Chaitanya was influenced by Mahomedan Religion. *Laxmi* and *papa purusha* of Vaishnavas are Christian ideals. —*I. M. 8-1-27.*

$ But having come long after them (Hegel, Ramanuja and others) and being abreast of the most recent advances in metaphysical speculation, they (modern reformers) have perhaps succeeded in

विलायती झाडांपुढें देशांतील कल्पवृक्षही तुच्छ होय? याचें कारण एकच आहे ते हें कीं, एक सुलभ असून दुसरें कष्टसाध्य आहे. हा विलायती झाडांचा बगीचा केवळ कातडीच्याच दोषांमुळे सबाह्यांतर साहेब न झालेल्या कित्येक ब्राह्मांच्या भावनांस कांहीं काळ रिझवील; पण त्यांत फलनिष्पत्ति काहींच होणे शक्य नाहीं; निदान संभव कमी आहे. हे अजून तरी ब्राह्मांनी उमगावे आणि त्या विदेशी आणि विधर्मी संस्कृतीवरील मोह सोडावा.*

हिंदूचे वेद, शास्त्रे, पुराणे आणि रूढि या सर्वांचा धिक्कार करून किंबहुना हिंदुधर्म आणि समाज यांस लाथाडून ब्राह्म जे अलग पडले व ज्यांचा आता शतसांवत्सरिक समारंभ लवकरच मोठया थाटाने व्हावयाचा आहे, त्यांनी गेल्या शतकात आपल्या समाजाची व देशाची कितपत प्रगति केली, याचा आढावा काढल्यास तो अत्यंत निराशाजनकच दिसेल.* जुन्या चालीच्या बाल-विवाहित दंपत्यांनी ज्या ब्राह्मपुढाऱ्यास जन्म दिला, त्याच्या तोडीचे, निदान त्यांस अनुयायी शोभतील असेही पुरुष मिश्रविवाह, प्रौढविवाह, प्रीति-विवाह, विधवाविवाह, पदवीधर वधूवराचा विवाह इत्यादि सर्व प्रयोग करून-ही कोणी निर्माण केले नाहीत. मग सुप्रजा निर्माण करणे हा मुळी विवाहा-चा हेतुच नसेल तर गोष्ट वेगळी. पण तसे असले तरी हिंदूचा निर्वंश व्हावा असे ज्याअर्थी कोणीच इच्छिणार नाहीं, त्याअर्थी सुप्रजा निर्माण होणे हे स्त्री-शिक्षण व स्त्री-स्वातंत्र्य यांहूनही अधिक महत्त्वाचे आहे हें उघड आहे. आणि त्या बाबतींत आणि धर्मनिष्ठेच्या बाबतींतही ब्राह्म स्त्री-पुरुषांनी

giving deeper theory of spiritual culture than those philosophies and in helping to bring about a *fusion* of all that is most valuable in Vedantism.

—*Pt. Sita Nath I. M. 23-1-27.*

* The Brahma samaj established by keshub which declared the whole world to be its field, is thus conducted without any plan or chart. The condition of the S. B. Samaj is not any better. The places where Brahma Samaj exercised great influence in social welfare work are now almost deserted. The big congregation of Calcutta is without a shepherd. It mainly depends upon the uncertain factor of lay service. The ministers are hardly in touch with the congregation and they are vested with no real responsibility .. ..This being the state of affairs, to say that we have an organisation is to beg a big question.

—*I. M. 6-9-25.*

आपली गैरलायकी सिद्ध केली असल्यामुळे ब्राह्मांच्या चालीरीतीस " फॅशनेबल " हे जरी मोहक नाव शोभलें, तरी " जे सारे दिसते चकाकित असे तें सर्व सोने नसे ! " हे आंग्लविद्याविशारदांना आम्ही सांगावे असे नाहीं.

समन्वयाचे प्रणेते जे ब्राह्म त्यांच्यांत यत्किंचितही एकोपा नाहीं, मूर्तिपूजकांस जे ढोंगी, अडाणी व पापी मानतात, त्या ब्राह्मांच्या ठिकाणीं काडीचीही ब्रह्मनिष्ठा नाही.† " आम्ही हिंदु नाही, तर आम्ही ख्रिस्ती, इस्लामी, यहुदी, पार्शी, बौद्ध, जैन, चिनी, सर्व धर्मांचेच आहोत " असे म्हणणाऱ्या ब्राह्मांस एकाही धर्माचे पुरे ज्ञान नाहीं, सार्वत्रिक धर्मनिष्ठा राहो, पण केवळ ब्राह्म-समाज-निष्ठाही पण त्याच्या ठिकाणी नाही.§ Spiritual या शब्दाशिवाय अवडाही न मिळणाऱ्या ब्राह्मांस प्रपचलालसेशिवाय प्रायः काहीच दिसत नाहीं. सर्व जाति मोडून एकंकार करू पाहणाऱ्या ब्राह्मात आपसात अनेक पंथ, द्वेष व भांडणे याचा बुजबुजाट आहे. आम्हा हिंदूंत व्यक्तित्व नाही, म्हणून व्यक्तिस्वातंत्र्यासाठी टाहो फोडणाऱ्या ह्या सुशिक्षितात व्यक्तिस्वातंत्र्य आतां इतके विकोपास जात चालले आहे कीं, बुद्धिवानांच्या डोक्यांतले हे व्यक्तिकत्व त्यांच्या हातापायांत उतरून, उजवे व डावे हातपाय ह्यांच्यातही व्यक्तिस्वातंत्र्यामुळे आतां बखेडे माजण्याचे तेवढे राहिले आहेत ! तात्पर्य, गुण, संख्या व कार्यनिष्पत्ति ह्या कोणत्याही दृष्टीने ब्राह्मसमाजाने प्रगति केली नसून त्याची अधोगतिच होत आहे.‡

---

† (a) The devotional interest is waning is partly due to the want of able teachers. —*I M. 18 1-27.*

*(b)* The starvation is due to want of spiritual ferment than lack of organisation.

*(c)* Shiv Nath used to say "we Bengali are shallow and effervescent. *I. M. 15-3-25.*

§ Is it not a fact that the majority of us do not really feel for our Church ? Why is there such a dearth of workers, missioneries, lay ministers, helpers choral singers, secretaries office bearers and other workers in the Brahma Samaj ? It is really due to the fact that we do not love Brahma Samaj with that warmth and sincerity which will make us feel for it. *I. M 14-2-26.*

‡ Since nearly half a century the Brahma Samaj is continually languishing and the sectarian and denomina-

ह्यावर ब्राह्मांचें असें म्हणणे आहे कीं, केव्हांही शहाणीं माणसे हीं जगांत थोडींच असतात. यास्तव शिरगणतीवर ब्राह्मसमाजाची प्रगति कोणीं मानूं नये. तर हिंदूंच्या समष्टि मनावर ब्राह्मांनीं जी उदार मतांची छाप टाकली आहे, त्याचे महत्त्व लक्षांत घ्यावे.* आम्हींही ही गोष्ट मान्य केली असती; पण ज्यांस नवयुगांतील ऋषि असे ब्राह्म मानतात, त्या राजा राममोहन, देवेंद्रनाथ व केशवचंद्र सेन यांच्या तोडीच्या व्यक्ति तरी आज ब्राह्मसमाजांत कोठें आहेत ? तात्पर्य, व्यक्तिमाहात्म्य नाही व संख्याबलही नाहीं, यामुळे समव्यसनी अगर व्यासंगी मंडळीचे "क्लब" असावेत याहून ब्राह्मसमाजाचे महत्त्व फारसे जास्त नाहीं. लॉर्ड सिंह हे एक बडे ब्राह्म असें म्हणतात की, शॅफ्टसबरीसाहेबाचे "प्रेम आणि सेवा" हे व्रत आम्हीं पसत केले आहे. चागल्या गोष्टी सर्वांनाच पसंत असतात. त्यास शॅफ्टसबरीसाहेबाचा वशिला नको. पण पसंत असणे आणि आचरणांत आणणे यांत महदंतर आहे. ज्या ग्वास ब्राह्मसमाजात दोन भय्ये आणि तीन चुली असला प्रकार आहे.† त्यानी दुसऱ्यास प्रेमाचे धडे शिकवून काय कामाचे ? तसेच मानवबंधुभाव आणि लोकसेवा तीच ईश्वरी सेवा, ह्या गोष्टी अघळपघळ बोलण्यातही काय राम आहे ? राष्ट्राकरिता किती ब्राह्म आजपर्यंत तुरुंगात गेले असतील ? किती ब्राह्मानी देशाकरिता फकिरी पत्करली ? रामकृष्णमिशन, देवसमाज, आर्यसमाज यांच्याइतके तरी ह्या सर्वांत जुन्या संस्थेनें जनसेवेचे काम केले आहे काय ?$ आतां राहतां राहिली ह्याची उदार मते.

---

tional religions in India are making headways in rapid strides.

The Brahmo Samaj after the ascension of Keshub has been guilty of culpable neglect of duty and has spent much of its energies, power and time in internal quarrels and useless wranglings, and the result has been that it is now a disunited body. —*Taluquadar in Nava Vidhan I. M.* 29-5-27.

* मागे पान ३९६, ४२६ पहा.

† मागे पान ४०१, ४०२ पहा.

**$ As organisation Brahma Samaj is a poor affair.**

उदार म्हणजे सुफलदायी असाच अर्थ करावयाचा असेल, तर ब्राह्मांचीं उदार मते आम्हांस अगदींच अनुदार वाटतात. नवयुगधारी विद्वान् जवळचे व लांबचें पहाण्याचे दोन चष्मे वापरीत असतात. प्राचीन ऋषींच्या एका अंतर्दृष्टीच्या चष्म्याने त्यांस जवळचे व दूरचे दोन्हीही दिसत असे; पण ब्राह्मांचे वरील दोन्ही चष्मे चुकलेले दिसतात. त्यांस पायाखालचेही दिसत नाही व दूरचेही समजत नाही असे म्हणावे लागते. त्यांस जवळचे दिसत असते तर अल्पसंख्याक ब्राह्मांचा समाज तरी नमुनेदार व सुसंघटित असा त्यानी केला असता. त्याना पुढले दिसत असते तर त्यांनीं हिंदूची पूर्वपरंपरा तोडून पाश्चात्यांच्या सुधारणांच्या खाईत अविवेकांनीं उडी घेतली नसती ! तात्पर्य, मोक्ष हे वैय्यक्तिक ध्येय किंवा लोकसग्रह हे सामाजिक ध्येय यांपैकीं कोणतेच ध्येय ब्राह्मानीं साध्य करून घेतले नाहीं. बालोन्मत्त पिशाचवत् वृत्तीच्या सिद्ध पुरुषांपेक्षां प्रेम आणि सेवा ह्या वृत्तीचे सत्पुरुष धन्य होत असे कोणासही वाटेल. पण ह्या वृत्ति ज्यांच्या कृतींत उतरत नाहींत अशांच्या शाब्दिक सहानुभूतीपेक्षा इच्छामात्रेकरून कल्याण करण्याचे ज्यांचे सामर्थ्य आहे त्या तपोनिष्ठांच्या तोंडच्या शिव्या किंवा हातचा मारही परवडला असेही अनेक म्हणतील. सुखवस्तु ब्राह्मानीं दरिद्र्यांस नारायण म्हणावे, मागसलेल्यांच्या वतीने ब्राह्मणवर्गावर ताशेरा झाडावा, आपद्ग्रस्त लोकांस म्हणावे की, "तुम्ही कष्ट भोगता व आम्ही सुखांत आहो खरे; पण ईश्वर आम्हांस तुमच्याच मागे उभा दिसत आहे तो आमच्या हवेल्यांत नाहीं किंवा देवळांतही नाहीं." हा सारा मानभावीपणा आहे. हा लोकसंग्रह नव्हे. 'आमच्याकडे सारे यादव असले तरी भगवान् तुमच्याकडे आहे'

---

The rancour has not yet died out. There is no harm in confessing our failure...... The Brahma Samaj professes the most enlightened religion and its social ideals are considered to be very noble and high. But in social service it cannot approach the R. K. Mission or the Salvation army. In spiritual culture it has lost the depth of the Maharshi or the Brahmanda...... The desideratum to-day is spirit of sacrifice which urges all the members to bring their best to the service of the Samaj. —*Pro. U. N. Ball, I. M. 26-7-25.*

याप्रमाणे पांडवांसंबंधीं धृतराष्ट्राच्या धन्योद्गारांची किंमत ती काय ? तसेच वैराग्याच्या निखाऱ्यांवरून साधनांचें दिव्य करतां येत नाहीं म्हणून आंबराई-च्या शीतल छायेंत बसून हाच तो ब्रह्मलोक मानणें हे अज्ञान आहे. हा सहज-योग नव्हे. द्राक्षें आंबट म्हणून परतलेल्या कोल्ह्याला द्राक्षांची ती चव काय ? व त्याचा प्रामाणिकपणा तो किती ? ब्राह्म पुढाऱ्यांची बुद्धि वरील उदाहरणांप्रमाणे जरी बुद्धिपुरःसर अप्रामाणिक नसली तरी परिणामीं सर्वत्र बुद्धि-भेद, अनास्था व एकंकार असा ब्रह्मघोटाळा मात्र ह्या ब्राह्मांनीं उत्पन्न केला आहे, आणि हाच त्यांचा समदर्शनाचा प्रयत्न होय !

आतां पुढल्याच वर्षीं ब्राह्मांचा शतसांवत्सरिक समारंभ आहे, त्यासाठीं युरोप व अमेरिकाखडांतून बडे धर्मज्ञ व तत्त्वज्ञ यावयाचे आहेत, असा पुकारा झाला आहे. ब्राह्मांची ही उत्सवमाया उत्साह, प्रेम, सहानुभूति, आनंद यांचा नुसता पाऊस पाडून कांहीं काल जबरदस्त आशावाद कदाचित् उत्पन्न करील. कोलंबसास अमेरिका हेच हिंदुस्थान वाटलें त्याप्रमाणे ड्रमंड-साहेबांस§ कांहीं काल हिंदुस्थानच अमेरिकेप्रमाणे आपले असे वाटेल. पूर्व-पश्चिमेचा सांधा कायम जडला असा किप्लिंग यांस प्रेतेटवर शक्यतर संदेश पाठवावा लागेल ! फार काय, पृथ्वीवर स्वर्ग आला असाही ब्राह्मास भास होईल, पण उत्सवाचा उत्साह ओसरल्यावर यांपैकीं कोणते अनुभव शिल्लक राहतील तेच पाहणें महत्त्वाचें आहे.

भूतकालाकडे नजर देऊन आत्मनिरीक्षण व भविष्यकालची दृष्टि ठेवून सुधारणांच्या योजना व सूचना यांसंबधी ब्राह्म पुढाऱ्यांचे विचार थोडेफार सुरूच आहेत. कोणी काही कोणी कांहीं आपआपल्यापरी उपाय सुचवीत आहेत. त्यांच्यांतील दोषांची त्यांस जाणीव आहे, हे त्यांच्याच उद्गारांवरून उघड दिसत आहे. आणि त्यामुळेच त्यांच्या आचारविचारांत पुढेमागे इष्ट

---

§ Dr. Drumond said:—

But above all Indians, Englishmen and Americans all must feel that they all belonged to one family of man tied to·gether by the great bond of love. With this belief in their hearts they must set their feet to the music of divine love and march to the goal." वचनेकिमद्रिद्रता !

—*I. M. 17-2-1924.*

पालट पडेल अशीही आशा करण्यास जागा आहे. यास्तव आमचा हा विवेचक ग्रंथ भाषाभेदाचा विंध्याद्रि उलटून ब्राह्मांच्या हातीं जाईल अगर न जाईल व क्वचित् गेल्यास ते त्यास कितपत महत्त्व देतील याबद्दल अनुमानें आणि कल्पना करीत न बसतां पुढील प्रकरणात स्थूलमानाच्या कांहीं सूचना करून आम्ही हा प्रथम खंड समाप्त करणार आहोत. वाचकांनीं हें लक्षांत ठेवावे कीं, आम्ही येथे तुलनात्मक विचार करीत नसून प्रायः त्यांच्याच उद्गारांच्या आधारावर आम्ही त्यांस कांहीं सूचना करीत आहोत.

---

# प्रकरण सत्ताविसावें

# सूचना

ब्राह्मांचा द्वैतात्मक ब्रह्मानुभव व मानवबंधुभाव, देवसमाजाचा देवात्मा व गुरूपास्ति, आर्यांचा वेदार्थयत्न व शुद्धीकरण, थिऑसफिस्टाचा महात्मा-समागम व जगद्गुरूंचे पाईकत्व, रामकृष्णसघाची सेवारूप शिवपूजा व संन्यास, इत्यादि ध्येयें ही सारीं स्तुत्यच आहेत. सुख, ऐश्वर्य, स्वातंत्र्य, लोकसग्रह, स्वर्ग, निर्वाण, मोक्ष, हीं सारीच ध्येये मोठीं आहेत. मग तीं कोणास साध्य वाटोत अगर कोणाचीं ध्येये याहूनही भिन्न असोत. ह्या ध्येयवादांत तूर्त आम्ही पडत नाहीं. परंतु त्या ध्येयाकरिता मानलेलीं जीं साधनरूप गौणध्येये ती जर निर्दोष नसतील, चुकीचीं असतील, तर त्या योगानेच अतिशय बखेडा माजून अनास्था होण्याचा प्रसंग असतो. चिलीमबाज, स्वयंपाकी, एखादा शीतग्रस्त व याज्ञिक हे जे अग्नि सिद्ध करतात, त्यात त्यांची ध्येये अगदी भिन्न असतात. पण त्यामुळे कोणाचीच हानि नसते, पण चिलीमबाज जर चिलमीसाठीं पडवीचे काथ्याचे बंद तोडूं लागला, स्वयपाक्याने चहासाठी जर पुस्तके चुलींत घातलीं, थंडीने काकडला म्हणून जर कोणीं गवताची गजी पेटविली, आणि हवनांचे अजीर्ण झालेल्या अग्नीस प्रज्वलित करण्यासाठीं कोणीं तुपाऐवजीं पेट्रोलची धार धरली तर त्यांत घात आणि बखेडा ठेवलेलाच असणार हे उघड आहे. ब्राह्मांची उपाययोजना ही अशीच सदोष आहे हे विचारांतीं, नाहीं तर अखेर अनुभवांतीं तरी आढळून येईल, असे आम्हांस वाटते, म्हणून त्यांस आम्ही पुढील सूचना करीत आहोत.

**हिंदुधर्म—**

पहिली गोष्ट हिंदूतून फुटून वेगळे राहण्याची जी दुर्बुद्धि ब्राह्मांस* सुचली आहे§ ती त्यानीं लवकरच सोडावी. ज्यांना हिंदुधर्मांत समन्वय वाटत नाहीं, त्यांस तो दुसरा कोठे दिसेल ?

---

* मागे पान २४१, २४२ आणि २५१ पहा.

§ We do not share the view that the Brahma Samaj is a

**परंपरा—**

दुसरी गोष्ट हिंदु समाजाच्या मागे असलेला संस्कृतीचा अत्यंत उज्ज्वल इतिहास विसरू नये.‡ ही मुरलेली सस्कृति विसरून जे कॅन्ट आणि हेगेल अशाच्या आधारावर उपदेश करूं पाहतात ते फजित पावतात. यास्तव त्यांनीं आपली हिंदूंची परंपरा तोडू नये. परपरेत " महाजनांचे " अनेक वर्षांचे अनुभव बीजरूपाने असतात. यास्तव त्यांचा पूर्ण विचार करून, दुसऱ्यांच्या केवळ अनुकरणाने नव्हे, तर स्वधर्म व स्वकीय सस्कृति यांचा ज्यांनी पूर्ण अभ्यास केला आहे असे निस्पृह तपोधन जे असतील त्याच्या वर्तमानकालच्या अनुभवाने, जे बदल करणे अपरिहार्य ठरेल तेवढेच बदल परंपरेत करावे. जास्त ढवळाढवळ करूं नये. परपरेतच समाजाचे स्थैर्य आहे व त्यांत साठवलेले ज्ञान केवळ पुस्तकी ज्ञानाशी किंवा परकीयांच्या अनुभवांशी जुळते नसले, तरी ते स्वकीयांच्या फारा वर्षांच्या अनुभवांनीं बनलेले असते. यासाठीं दुसऱ्याची आई व आपली आई यांत जो फरक तो फरक त्यांत मानावा. परपरा म्हणजेच तार्किक बुद्धि आणि अनुभव याचा खरा समन्वय होय. परंतु ही गोष्ट इतर ब्राह्मास अद्याप पटत नाहीं.§ त्यांनीं नवीन

---

Hindu Expansion movement, and that we stand for the whole Hindu people. &c. The present form of S. B. Samaj, we emphatically maintain is not fulfilling the law and the prophets in Hinduism.

—*Shashi Bhushan Dutta, Krishna Kumar Mitra, Herambchandra Maitra, Prankrishna Acharya.*

‡ Experience, however shows that in spite of its excellence our message is not proving as effective as it ought to be we have approached the individuals as purely individuals not as members of a society responsible for the continuance of the social order based on liberal principles .. ... the hold that patriotism and love and reverence for the past of the country has on them is not sufficiently clear to us We often preach abstract principles and discant on vague generalities.

—*I. M.*

§ Even Brahmas do not always see aright the lessons

ओतलेल्या पंचरसी ब्राह्मधर्ममूर्तींचा त्यांना इतका कडवा अभिमान आहे, कीं त्यापुढें त्यांना पूर्वपरंपरेचें किंवा दुसऱ्या कोणत्याही गोष्टीचे महत्त्व सहन होत नाहीं.§ सुशिक्षितांचें हे धर्मवेड अजाणांच्या धर्मवेडापेक्षां अधिक लज्जास्पद व घातक आहे असें आम्हांस वाटतें.

**मूर्तिपूजा—**

हिंदुधर्मानें मूर्तिपूजा साधकास आवश्यक मानलेली नाहीं. तथापि आचार-धर्म आणि व्यवहार हा सुसंगत असावा व आपल्याहून कमी अधिकाराच्या माणसांपुढे साधनश्रेणि रहावी म्हणून कुलाचाराप्रमाणे तांदुळाच्या पुंजीवरील सुपारीचीही प्रणवरूप गणपति, विघ्नहर्ता परमेश किंवा सर्वाधिष्ठान ब्रह्म म्हणून पूजा करण्यास जाड्या ब्राह्मपाडितांस लज्जा वाटण्याचे कारण नाही. 'भाव तसा देव भाव तसा देव। ये अर्थीं संदेह धरू नका।' असें तुकोबा सांगतात. सुपारीच्या गणपतीला भूक लागते म्हणून त्याला कोणीच नैवेद्य दाखवीत नाहीत. आपल्या इंद्रियांचे भोग्य विषय देवास अर्पण करण्याची ती एक निवृत्तिपर प्रक्रिया आहे केशवचंद्रांच्या विधान बॅकेत सर्व ब्राह्मानीं आपला पैसा जमा करावयाचा आणि मग तोच पैसा देवाचा म्हणून पुन्हा चरितार्थां-करितां घ्यावयाचा ही पण कल्पना देवपूजेत आहे. ह्या बाबतींत अजाण व

---

it teaches and some times look back with a half longing eye on forms which have been weighed in the balance and found wanting. Have not the Vedic and Puranic Gods betrayed the nation at every step? Why then revive their names and associations under the guise of spiritual interpretations and lay a trap for the simple and unwary? Have we not lost some of our best men as the result of such attempt.

§ Why extol practical work and social reform at the expense of deep contemplation and fervent devotion? why extol mayavadi Vedantism......Is it not finally proved that it leads to atheism? Why go so much after Chaitanya and his followers? Can an unethical sensuous God save any man or society? Our reconstructed bhakti—reconstructed by the study of our national history and by the influenee of Islam and Christianity on us &c. —*Sita Nath, I.M. 6-9-25.*

स्वभावानें दुष्ट अशा परधर्मीयाच्या कोलाहलांत ब्राह्मांनीही व्यर्थ सामील होऊं नये. मूर्तिपूजेंतील रहस्य अजाणही जाणतात. तितकेंही ब्राह्मांस समजूं नये हें आश्चर्य होय ! समन्वयाच्या भोक्त्या ब्राह्मांनीं इतकेंच जाणावें कीं, 'अजि म्यां ब्रह्म पाहिलें। समचरण विटेवरि ऊभे राहिले'।! किंवा 'सगुण निर्गुण एक गोविंदु रे', हाच खरा समन्वय होय.*

आमची मुलेंही निराकाराची मानसोपासना करतात हें ब्राह्मांचें म्हणणें व्यर्थ आहे. जेथें थोर धर्मोपदेशकांना ईश्वराचा पत्ता नाहीं, तेथें भलतेंच सांगण्यांत अर्थ काय ? उलटपक्षीं ब्राह्मांनीं आपल्या स्त्रियांपुढील व मुलांपुढील श्रीराम, व श्रीकृष्ण अशीं उपास्यें हिरावून घेऊन त्यांचें अपरमित नुकसान केलें आहे ! श्रीचैतन्य व महाराष्ट्रीय संत हे ब्राह्मांस मान्य आहेत. त्या संतांनीं आमरणांत मूर्तिपूजा सोडली नाहीं व ती त्यांच्या दिव्य अमृतानुभवास नडलीही नाहीं. ह्या गोष्टीचा ब्राह्मांनीं अवश्य विचार करावा. निदानपक्षीं ब्राह्म पूर्वाचार्यांनीं आरंभिलेली सूर्योपासना व अग्नीची उपासना ही तरी ब्राह्मानीं निष्ठेनें चालवावी.

**अवतारचरित्रें—**

ईश्वराच्या ठिकाणीं व्यक्तिकत्व व नीतिमयता मानणें हाच जर ब्राह्मधर्माचा विशेष असेल, तर ऐतिहासिक अवतारी पुरुषांच्या चारित्र्याचें श्रवण आणि चिंतन हीं धर्मनीतिसंवर्धनास अत्यंत आवश्यक आहेत, हेंही ब्राह्मांस पटलें पाहिजे. पंडित सीतानाथ कांहीं म्हणाले,आणि ब्राह्माचें ब्रह्म व्यक्तिक असलें तरी त्याचें आकलन होणें विद्वानासही फार दुष्कर आहे. मग सामान्य मंदाधिकाऱ्यांची गोष्ट कशाला ? यास्तव अशा त्या निराकर ब्रह्मावर प्रेम बसण्यापूर्वीं किंवा पापी मनास त्याचा धाक वाटूं लागण्यापूर्वीं, श्रीरामकृष्णादि ईशावतार त्यांच्यापुढें इष्टदेव म्हणून उभे करणें हेंच योग्य आहे. ब्राह्मांची श्रीरामावर भक्ति नसून राममोहनवर असेल, श्रीकृष्णावर प्रेम नसून केशवावर असेल, तर निदान ब्राह्म मंदाधिकाऱ्यांनीं अशी ईश्वराची प्रार्थना

---

*अवघें ब्रह्मरूप रिता नाहीं ठाव। प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥१॥
नाहीं भाव तया सांगावें तें किती ! ॥ आपुलाल्या मति पाखांडिया ॥२॥
जया भावें संत बोलिले वचन ॥ नाहीं अनुमोदन शाब्दिकासी ॥३॥
तुका म्हणे संतीं भाव केला बळी ॥ न कळतां खळीं दूषिला देव ॥४॥

करण्यास काय हरकत आहे कीं, हे देवा, राममोहन आणि केशव, तुझेच अंश होते, तुझ्या निराकार स्वरूपाचे आम्हां अज्ञ जीवांस दर्शन होणें दुर्घट आहे. यासाठीं तुझ्या ह्या अज्ञान लेकरांच्या संतोषासाठीं व कल्याणासाठीं सृष्टींतील नानात्वानें नटलेला जो सर्वसमर्थ तूं त्या त्वां आम्हां दीनांस श्रीचैतन्य, राममोहन, केशव, देवेंद्र अशा मानवी रूपांनीं येऊन दर्शन द्यावें व आम्हांस कृतार्थ करावें. ब्राह्मांच्या उत्सवांत ब्रिटिशांच्या साम्राज्यसत्तेचे प्रतिनिधि अथवा अमेरिकेचे एकेश्वरी समाजाचे प्रतिनिधि येऊन जर त्या त्या सत्ताच मूर्तिमंत आल्याचें श्रेय ब्राह्मांस मिळूं शकतें, तर त्या परकीय सत्तांहून अधिक जवळची, अधिक हितचिंतक, अधिक समर्थ अशी जी ईशसत्ता ती आपला प्रतिनिधि भाविक भक्ताच्या भावानुकूल पाठविण्यास असमर्थ आहे काय ? हिंदू भक्तांस देव आकार घेऊन भेटतो, थिऑसाफिस्टांस मैत्रेयादि महात्मे भेटतात, मग ब्राह्मांनी आपला दुराग्रह सोडून ईश्वराची प्रार्थना केल्यास त्यांसही मार्गदर्शक दिसेल. यास्तव भूत अगर वर्तमानकालच्या महात्म्यांस ईश्वराचे प्रतिनिधि मानून शरण जावें. व त्यांच्या चरित्राचें श्रवण, कीर्तन व मनन करावें यांतच निदान मंदाधिकाऱ्यांचे धर्मशील व नीति यांचें संवर्धन होऊन त्यांस तरणोपाय आहे.

**सण व उत्सव—**

ब्राह्मांची व वेदान्त्यांची अवतारवादाची कल्पना* यांत पूर्णावतार व अंशावतार, मानवी देव व दैवी मनुष्य, अप्रमादशील व प्रमादशील, असे कांहीं भेद असले, तरी बरेच ब्राह्म श्रीराम-कृष्णादि विभूतीस ऐतिहासिक थोर पुरुष इतके तरी मानण्यास तयार होतील असें वाटतें. तेव्हां देवाचे अवतार म्हणून नसले तरी थोर पुरुष म्हणून त्यांच्या जयंतीचे उत्सव ब्राह्मांनीं ब्राह्म समाजांत सुरू करावे व जेथें मुक्तिफौजेच्या जनरल बूथचा स्मृतिदिन पाळतात तेथें व्यासपौर्णिमा, भीष्माष्टमी, शंकराचार्यजयंती, रामानुजजयंती, श्रीचैतन्यजयंती असेही दिवस पाळण्यास हरकत कोणती ? तसेच ध्वजारोपण, वटपौर्णिमा (सौभाग्यचिंतन), रक्षाबंधन, अनंतपूजा, पितृपक्ष, विजयादशमी, भाऊबीज, गीताजयंती, मकरसंक्रमण, असे अनेक आर्योत्सवही पाळावे. कांहीं

* मागें पान ४०४ पहा.

विद्वान् ब्राह्मांस ह्या उत्सवांचें महत्त्व वाटत नसलें तरी ब्राह्म-ब्राह्मेतरांचे संमेलन होण्यास व एकमेकाबद्दल सहानुभूति वाढविण्यास ते कारण होतील. तसेच गौरीची पूजा करणे त्यांस पसंत नसले तरी वसतोत्सव या नांवाने स्त्रियांचे महाराष्ट्रांतील इळदकुंकवासारखे समारंभ त्यानी अवश्य करावेत. तात्पर्य, बॉल, डान्स, गार्डनपार्टीज्, खिस्टमस-डेज् इत्यादि विदेशी आचार बंद करून स्त्रियांचे व पुरुषांचे संमेलनाचे देशी आचार व उत्सव सुरू करावे.

**व्रत-कैवल्यें—**

उपासनासमाजाचे यज्ञ व केशवचंद्राचीं नाना विधाने आणि व्रतवैकल्ये पूर्वपरपरेस धरूनही करता येतील. तसेच करणे श्रेयस्कर आहे. त्यासच हिंदु-समाजाची सहानुभूति मिळेल. केवळ तत्त्वज्ञ किंवा शाब्दिक पंडित थोडे असतात. सामान्य जनास व्रतवैकल्ये, विधिविधाने, याच्या द्वारेच तत्त्वज्ञान शिकवणे शक्य असते. परंतु ज्यास आपल्या वेदशास्त्रे—पुराणे—देशाचार—कुलाचार इत्यादींचा अभिमान नाही त्यानी मायभूमीकरिता धाय मोकलून रडणे, किंवा “ वंदे मातरम् ” अशी गर्जना करणे, हे आईचा प्राण घेऊन मग तिच्या शवाला बिलगण्यासारखे ढोंग आणि मूर्खपणाचे आहे, असे आम्हांस वाटते.

**स्वाध्याय—**

‘स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः’ या भगवदुक्तीचा ब्राह्मानी खोलवर विचार करावा. सारेच रग एकत्र करण्यात कोणत्याच रंगाची शोभा न राहतां ज्याप्रमाणे एक शेणखळा तयार होतो, त्याचप्रमाणे ब्राह्माची सर्व धर्मांच्या समन्वयाची सारसग्राहक कल्पना अगदीच टाकाऊ आहे. यासाठी हिंदुस्थानांत जन्मास आलेल्या ब्राह्मांनीं तरी असा नियम करावा की, हिंदुधर्माची प्रस्थानत्रयी व भारत, रामायण आणि भागवत, ही पुराणत्रयी, त्याचप्रमाणे मनु, पाराशर व वशिष्ठ ही स्मृतित्रयी याचा व धर्मशास्त्राचा अभ्यास झाल्यावांचून परधर्मीय ग्रंथ वाचावयाचाच नाहीं. वरील ग्रंथांच्या निवडींत वाटल्यास बदल करावा पण हिंदुधर्माचा आस्थापूर्वक अभ्यास केल्यावांचून परधर्मीय पुस्तक वाचूं नये, इतकेच आमचे म्हणणे आहे. धर्मशिक्षणाच्या अभ्यासास स्वाध्यायापासूनच आरंभ करावा तें बरें. आणि हे न केल्या-मुळेंच ब्राह्मसमाजास आज हें विपरीत स्वरूप प्राप्त झालें आहे. केशवचंद्रां-

संबंधीं बोलतांना पंडित सीतानाथच एके ठिकाणीं असे म्हणतात कीं, 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' यातील पहिल्या पदांत अध्याहृत असलेल्या धर्म-जिज्ञासेचा केशवचंद्रांनी अगोदर विचार केला असता, तर ब्राह्मसमाजास आज जे रूप प्राप्त झाले आहे ते झाले नसतें, हें अगदीं खरे आहे.

**अभ्यास—**

ब्राह्म-समाजांत उपसंस्था भाराभर आहेत. त्यातील काहीं निरर्थक व निरुपयोगीही आहेत. पण त्याच्यात संशोधनाची अशी एकही संस्था नाहीं. आर्यांनीं वेदार्थयत्न चालविला, थिऑसफिस्टांनीं पूर्वींच्या महात्म्याचे, गूढ विद्येचे व हल्ली शास्त्रीय कर्मांचे व सस्कारांचे संशोधन चालविले, जस्टिस वुड्रॉफसारख्या विधर्मीयांनीं तांत्रिक विद्येचे महत्त्व प्रगट केले; पण ब्राह्मांनीं हेगेल आणि कॅन्ट, जेम्स आणि मार्टिनो अशा कोणाची तरी री ओढण्या-पलीकडे धर्माचे बाबतीत खरोखर काहीच केले नाही. हे त्याच्या जाड्या विद्वत्तेस व बुद्धिवादासही न शोभणारेच आहे. वास्तव मीमासकाची व तांत्रिकांचीं शास्त्रीय कर्मे, हटयोग, राजयोग, भक्तियोग, जपतपादि अनुष्ठानें आणि व्रते याचा दृढाभ्यास करून अनुभव घेण्याकरिता साधनाश्रमात नैष्ठिकी ब्रह्मचाऱ्याचे सघ तयार झाले पाहिजेत. असे निष्ठावंत तरुण ब्रह्मचारी जेव्हां कडक वैराग्यवृत्तीने सशोधन व साधनानुष्ठान करतील, तेव्हां ब्राह्मसमाजाचे तेज कोणत्याही कृत्रिम अवडंबरावांचूनच वाढूं लागेल. तोपर्यंत नवयुगांत झाले तरी नुसत्या शब्दपंडितास फारसा कोणी मान देईल असे वाटत नाहीं. उज्ज्वल निष्ठेवाचून धर्मसंप्रदाय म्हणजे तुकोबांच्या उक्तीप्रमाणे "राडवेने जेवी शृंगारु केला" त्यापैकींच मोहक प्रकार होय! प्रीतिविवाह, आलिंगने आणि चुंबने ह्या गोष्टींवर भर नाटक्यांस शोभतो. धर्म-प्रचारकांच्या ठिकाणीं कडकडीत वैराग्य, ब्रह्मचर्य आणि तपःसामर्थ्य पाहिजे. तसेच प्रचारकाच्या धर्मसाधनांच्या चोख अनुभविक ज्ञानास व्यावहारिक ज्ञानाचीही जोड पाहिजे.

**महाजन—**

आजकाल देशांतील पारतंत्र्याच्या दुःखामुळे राजकारणी पुरुषास आपल्या देशांत फार महत्त्व आले आहे. व जवळ जवळ ह्याच कारणास्त व ड्रुमांड आदिकरून पांडित हे स्वतंत्र देशांतील म्हणून त्यांचेही माहात्म्य वाढले आहे. पण

ह्या दोन्ही जातींच्या पुरुषांशीं स्वधर्माचे बाबतींत विचारविनिमय करणे किंवा त्यांच्या ध्येयाशीं आपल्या ध्येयाचा समन्वय करू पहाणे, हे अगदीं चुकीचे आहे. राजकारणी पुरुष आपला देशबांधव असला तरी त्यास धर्मासंबधीं निर्णायक मत देण्याचा अधिकार असतो असे नाही. तसेच परदेशचे पंडित जरी मोठे धर्मात्मे असले तरी ते परकीय असल्यामुळे त्याचीं मते व विचार आपणांस निरुपयोगी आहेत, असेच समजलेले बरे. ब्राह्मांस टोपीवाल्या पाहुण्याचे अगत्य फार. त्यास आपलेकडे हिंदु साधुसंत, संन्यासी, योगी, शंकराचार्य, महामहोपाध्याय कोणी यावेत व त्याच्याशी विचारविनिमय करावा असे वाटत नाही.* ही अत्यंत लाजिरवाणी गोष्ट आहे. 'महाजनो येन गतः स पंथा' असे म्हटले ते महाजन म्हणजे स्वकीय होत. त्याचाच पथ आपल्याला उपलब्ध होईल व उपयोगी पडेल. परकीयाचे पथ आपणास काय कामाचे! यास्तव धर्मोज्जीवनीसभा, हिंदुधर्म महामंडळ इत्यादि संस्थाशी सहकार्य ठेवून उपोद्घातात दर्शविल्याप्रमाणे हिंदुधर्मातीलच अनेक नव्याजुन्या विचारांच्या थोर पुरुषानीं कायदे-कौन्सिलासारखीं सतत संमेलने भरवावी व त्या नवयुगधर्म महामंडळाने स्वधर्माचे संशोधन करून जरूर त्या सुधारणा घडवून आणाव्या हा एकच शिष्टसम्मत मार्ग आहे. समन्वयाचा खरा हितकारी प्रयत्न तो हाच.

**गुरुवाद—**

देवसमाजाचा गुरुवाद आणि ब्राह्मसमाजाचा गुरुविरोध हीं दोन टोके आहेत. वास्तविक गुरुवाद आणि ईश्वरवाद दोन्हीं खरे आहेत. आणि ते मानल्याने ह्या उभय समाजाचे वैशिष्ट्य व दर्जा कमी होण्याचे काहीच कारण नाहीं. सद्गुरूचा आश्रय करणे हा काहीं एक अमुक वेळी व्हावयाचाच असा धर्मसंस्कार नाहीं. शिवाय तो प्रश्न केवळ वैयक्तिक असल्यामुळे समाजानें गुरु मानणे अगर न मानणे असा प्रश्न उत्पन्न होतच नाही. आतां ब्राह्मव्यक्तींनींही मतस्वातंत्र्याची जास्त ऐट न मिरविता शक्य तर श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा सत्पुरुषास शरण जाऊन ते जी शिस्त घालून देतील त्याच शिस्तीने ब्रह्मसाधन करावे हेच योग्य आहे. ही अनुभवाची गोष्ट आहे. ती अनुभव घेऊनच जाणली पाहिजे. उगाच हे "गुरु बहुधा लबाड लोक असतात"

* मागे पान १९३ पहा.

असें बेजबाबदारपणानें कांहीं तरी मत बनवूं नये व बोलूंही नये. साधकानें आपल्या बुद्धीने किंवा विधर्मी चष्म्याने धर्मचिकित्सा करीत बसण्यापेक्षां देवेंद्रनाथ व द्विजेंद्रनाथ अशा अनुभवी ब्राह्मांच्या शिस्तींत साधन केले तर त्या साधकाची प्रगति अधिक होईल हे ब्राह्मही कबूल करतील. उपासनासमाजाचा देवात्मासमागम व केशवचंद्राचा सत्समागम यांवरून गुरु-वादाचेंच समर्थन होते. पण हिंदुस्थानांत आता ज्ञाते व अनुभवी संत कोणीच राहिले नाहीत. काय जे विद्वत्तेचे पेव फुटले आहे ते विलायतेस, अशी ब्राह्म विद्वानांनीं आपली निष्कारण समजूत करून घेतली आहे केशवचंद्रांनीं ज्याप्रमाणे अनेक विद्यमान हिंदी संतांचा समागम केला, तसा यापुढेही ब्राह्मानीं आस्थापूर्वक प्रयत्न केल्यास आजही कोणी "श्रीरामकृष्ण" आणि "पवहारीबाबा" त्यांस भेटतील, आणि त्याच्या कृपेने ब्राह्मसमाजास अधिक तेज चढेल यासाठीं पुढील वेळोवेळीं होणाऱ्या उत्सवात विलायतेतील गोरे टोपीवाले यांस टोपी घालण्याकरिता कोण कोण येतात, इकडे डोळे लावून बसलेल्या ब्राह्मांनीं आपल्याच देशांत ठिकठिकाणी एकांतांत आत्मचिंतन व लोकांचे हितचिंतन करीत बसलेल्या महात्म्यास महत्प्रयासानेही बोलावून आणून त्याच्यात "देवतेज" काय असतें ह्याचा अवश्य अनुभव पहावा. म्हणजे मतस्वातंत्र्याचा त्याचा अहंकार गलित होऊन पुष्कळ गैरसमज दूर होतील.*

**आराधना—**

ब्राह्माच्या आराधनेतील ख्रिस्ती वळण व कृत्रिमपणा त्यानी अवश्य कमी करावा. देवाचीं विशेषणे बहुमतानी ठरविण्याचे प्रकार म्हणजे चार आंधळ्यांनी केलेल्या हत्तीच्या वर्णनाप्रमाणे बहुधा हास्यास्पदच होतात. ब्राह्माच्या सामुदायिक उपासनेतील ध्यान हे तर अगदीच अनाठायीं आहे. ते त्यानीं गाळावे. तसेच प्रार्थनामंदिरात थोर पुरुषाचे पुतळे किंवा तसबिरा न ठेवण्यात आम्हाला कांहींच स्वारस्य दिसत नाहीं. ज्या प्रार्थनामंदिरात परिणामकारी असे धर्मप्रवचन करणारे अधिकारी धर्मोपदेशक मिळत नाहींत, त्या मंदिरात जाणाऱ्या भाविक सांप्रदायिकास थोर पुरुषांच्या चित्राच्या दर्शनाने तरी चित्तास स्फूर्ति व प्रसन्नता वाटून "यांच्या रूपाने ईश्वर आमचा

---

* मागें पान २९४, ३६४, ३६५, ३६६ पहा.

पाठीराखा आहे" असाही धीर कोणी न सांगतां प्राप्त होण्याचा संभव आहे. शिवाय अशा मूर्ति व तसबिरा यांच्या साहचर्यानें प्रार्थनामंदिरास किती तरी अधिक गांभीर्य व पावित्र्य प्राप्त होईल. आपल्या मूर्तिपूजाविरोधास प्राधान्य देण्याच्या हेतूनें राजा राममोहन यांनीं आपल्या ट्रस्टडीडमध्यें कांहीं लिहून ठेवलें असलें तरी ते अक्षरशः पाळण्याचा आग्रह न धरितां त्यांतील रहस्य लक्षांत ठेवावे व लोकांस शिकवावें म्हणजे झाले. ब्राह्म झाले तरी त्यांस मनुष्यस्वभाव कांहीं सुटला नाहीं. उलट सौंदर्योपासना हे एक ब्राह्मांच्या उपासनेचे महत्त्वाचे नवीन अंग आहे. त्यांतून थोर विद्वानांस जरी या गोष्टीचे महत्त्व न वाटले, तरी मंदाधिकारी अशा मुलांस व स्त्रियांस महात्म्यांचीं उत्कृष्ट दर्शनें, त्याचप्रमाणे ऐतिहासिक प्रसंगांचे व पुण्यक्षेत्रांचे किंवा अद्भुत सृष्टिसौंदर्याचे चित्ररूपाने देखावे, हे उद्बोधक होतील यांत शंका नाहीं. तात्पर्य, त्यक्तालंकार वैधव्याप्रमाणे दिसणारे प्रार्थनामंदिर ब्राह्माच्या प्रापंचिक शीलास व सौंदर्यप्रीतीस साजेसे नाहीं, तें त्यांनीं अवश्य सुधारावे.

**एकंकार—**

सर्व माणसें देवाचीं लेकरें आहेत हे सांगण्यास ब्राह्मच काय पण जीझस खाइस्टही नको. हिंदुस्थानांत असा एकही मनुष्य नसेल, कीं ज्यास ही साधी गोष्ट कळत नाहीं. उलटपक्षीं, थोडा अतिशयोक्तीचा संभव पत्करून, आम्ही असें म्हणतो कीं, खिस्ती जगांत असा एकही मनुष्य नाहीं कीं, ज्याने हें तत्त्व पुरे आचरणांत आणले आहे. तात्पर्य, मानवी बंधुत्व हे तत्त्वतः जितकें खरें आहे, तितकेच ते व्यवहारतः दूर आहे. ते जवळ आणावयाचे असल्यास काश्मीरच्या मुली अबिसिनिआंत, म्हैसूरच्या मुली सैबीरिआंत, चिनी मुली चिकागोत किंवा बंगालच्या मुली इस्तंबुलांत देऊन मानवी बंधुत्व साधावयाचे नाहीं. हे युरोपच्या गेल्या महायुद्धाने सिद्ध केले आहे. तसेंच बंगाली ब्राह्मण आज पाण्यांतली भाजी खातात, ती उद्यां चतुष्पादांची करून मुसलमानाच्या थाळ्यांत जेवल्यानेंही ते साधावयाचे नाहीं. हे पण मांसाहारी जगाच्या अनुभवावरून जाणावें. एकंकार करूनही ज्यांना आपल्या स्वताच्या बारिकशा संप्रदायांत सलोखा जोडतां येत नाहीं, त्यांनीं हा वर्णसंकर आणि वंशसंकर करण्याचा अव्यापारेषु व्यापार न करणेच बरें.§

§ How inconsistent we are ! How our action contradicts

**जातिभेद—**

भेद हे कधींच नडत नाहींत. भेदांत अभेद पहाणें हीच ज्यांची समन्वयाची दृष्टि त्यांना हे जातिभेद आणि धर्मभेद कां नडतात तें समजत नाहीं. भेद नडत नाहींत, द्वेष नडतो. आणि तो द्वेष ब्राह्मांनाही सुटला नाहीं. थोडासा व्यवहार्य व उपकारकच वाटतो आहे. तेव्हां त्यांनीं चातुर्वर्ण्यावर तोंड सोडून बखेडा घालण्याचे बंद करावे. ऐक्य जोडावयाचें ते खालपासून वर जोडीत गेलें तरच ते बिनबोभाट व सुकर होते. मनुष्यजातीचे अत्यंत लहान लहान घटक म्हणजे कुटुंबे, पोटजाति, जाति, वर्ण, वंश आणि कोटि, हे खालपासून संघटित करीत जाणे हाच सुधारणेचा योग्य उपाय आहे. अविचाराने वरपासून संकर करून बेदिली व गोंधळ माजवणे ही समाजरचना नव्हे, हे राक्षसी किंवा पिशाचवृत्तीचें विध्वंसन कार्य आहे. यासंबंधीं तूर्त आम्ही जास्त कांहींच लिहीत नाहीं. पण इतकेंच स्पष्ट सांगतो कीं, हिंदूंचीं एकत्र कुटुंबें व त्यांचे वर्णाश्रम म्हणजे समाजांतील निरनिराळी कर्तव्ये अधिकारभेद व श्रमविभाग यांची अत्युत्कृष्ट व्यवस्थिति होय. ब्राह्मास एकत्र कुटुंबे नको आहेत पण मानवबंधुभाव पाहिजे! संत सांगतात कीं, भेद हा देवच करून बसला आहे, तो कोणाच्या बापाच्यानेंही दूर होणार नाहीं. यास्तव एकंकार हा समन्वय नव्हे, किंवा समदर्शनही नव्हे. समदर्शनाला सहभोजने किंवा वर्णसंकर यांची आवश्यकता नाहीं आणि उपयुक्तताही नाहीं. रचनावादी ब्राह्मांनीं वर्णाश्रमधर्माची रचना मोडूं नये उलट निर्दोष आणि मजबूत करावी, हेंच त्यांच्या विद्वत्तेस व सौजन्यास योग्य होईल. त्याचप्रमाणे हिंदूंचीं आदर्शभूत अशीं गांवोगांवचीं मोठमोठीं अविभक्त घराणीं आज चरितार्थासाठी देशोधडीस लागत आहेत त्यास आळा पडेल असा त्यांनीं दीर्घोद्योग करावा. यांत हिंदूसमाजाचे व हिंदूंच्या धर्माचें खरे रक्षण आहे. पण ह्या खऱ्या जिव्हाळ्याच्या व मूलग्राही गोष्टी सोडून ब्राह्मांचें लक्ष भलतीचकडे वेधले आहे.

---

our open professions and intentions! Does not the omniscient and absolutely just God see all this? Does not the decline of the Brahmo Samaj show that it is suffering from internal disorder and disease, and that it is being justly punished for its manifest inconsistencies.

—*Dr. P. K. Ray, Spiritual Education p. 17.*

**स्त्री-स्वातंत्र्य—**

स्त्री-स्वातंत्र्य म्हणजे भस्मासुराचा वरच होय. आणि आजचें स्त्री-शिक्षण म्हणजे सुप्रजा, प्रपंच आणि धर्मशील यांची हानि होय. यासाठीं स्वातंत्र्य आणि शिक्षण ह्या दोन्ही गोष्टी चांगल्या असल्या तरी त्यांचे उपयोगांत तारतम्य राखावे. गाईचे अंबोण बाईट म्हणून घोड्याचा तोबरा गाईला देणे आणि गोठ्यांत डांबलेली गाय सोडून तिला टांग्याला जुंपणे हे समदर्शन नव्हे, हा अप्रयोजकपणा आहे. मातृदेवो भव, पितृदेवो भव हे स्त्री-पुरुषांतील समदर्शन होय.

**प्रपंच—परमार्थ—**

भोग आणि त्याग, प्रपंच आणि परमार्थ, प्रवृत्ति आणि निवृत्ति, ह्या द्वंद्वांचा समन्वय करूं पाहणे व्यर्थ आहे. जीवास भोग, प्रपंच किंवा प्रवृत्ति हीं सामान्यतः अपरिहार्य आहेत, ही गोष्ट खरी. तथापि त्यांची प्राप्ति झाली असतांही नजर त्याग, निवृत्ति किंवा परमार्थ इकडेच असावयास पाहिजे. हेही उघड आहे. ईश्वराने इंद्रियें व त्यांचे विषय दिले आहेत ते भोगासाठींच दिले आहेत, हा युक्तिवाद खोडसाळ आहे. विरागशक्ति व अनुरागशक्ति यांसंबंधीं देवसमाजांतील प्रक्रिया चिंतनीय आहे. स्त्रियांच्या आलिंगनांत किंवा बालकाचे मुके घेण्यांत ईश्वरी साक्षात्कार आहे ही भाषा ब्राह्मांनीं धार्मिक विचारांत वापरूं नये हे बरे. विषयानंदांत चित्तवृत्ति शांत झाली असता क्षणैक जी आनंदाची उपलब्धि होते, तो ब्रह्मानंदाचा अत्यल्प अंश होय, असे असल्यामुळे इतक्या अत्यल्पांशाकरितां जीवाने आयुष्य खर्च न करतां पूर्ण ब्रह्मानंदाकरितां झटावे, असा सांगण्यांतील हेतु असतो. तरुणांस लग्न करून गृहस्थ हो म्हणून सांगणे म्हणजे खुशाल विषयोपभोग घे असे सांगावयाचे नसून, आतां इतर स्त्रिया रुखमाईसमान मान, हाच शास्त्राचा हेतु असतो. प्रपंचाची सरसहा निंदा करणे ब्राह्मांस पसंत नसेल तर ते ठीक आहे. पण त्यांनीं प्रपंचाचा फाजील गौरव करणेंही साधकास घातक आहे, हें लक्षांत ठेवावें. खरे महत्त्व त्यागांत आहे, भोगांत नाहीं. दाई मुलाला संभाळते त्या कर्तव्यबुद्धीने व अनासक्तीनें प्रपंच करावा असें शास्त्र-रहस्य दिसतें. त्यांत बालसंगोपन हे एक सामान्य प्रवाहपतित अपरिहार्य कर्म असून

अनासक्ति ह्यांतच सर्व प्राधान्य आहे. दोन्ही गोष्टी सारख्या दर्जाच्या अमर धर्माच्या नाहींत. यासाठीं येथें ब्राह्मांनीं आपला समन्वयाचा हव्यास सोडावा.

**धर्म-निष्ठा—**

वर सांगितल्याप्रमाणेच राजकारण, समाजकारण आणि धर्मकारण हीं एकमेकांस पूरक व उपकारक असलीं तरी ह्यांच्याही समन्वयाचा आग्रह ब्राह्मांनीं सोडावा. राजकारणांत असत्याचा आश्रय करावा लागेल, धर्मांत तो चालणार नाहीं. धर्मांत वाचिक आणि मानसिक हिंसाही बाधक आहे. राजकारणांत ती अपरिहार्य आहे, राजकारणांत स्पृश्यास्पृश्य दोष, नित्य-नैमित्तिक कर्मलोप, अभक्षभक्षण, अपेय पान इत्यादि कित्येक गोष्टी क्षम्य किंबहुना अपरिहार्यही होतील; पण धर्मांत त्या चालणारच नाहींत. यास्तव राजकारण आणि समाजकारण यांतील उदार मते धर्मातही आणणे हे धर्माचे अतिक्रमण आहे.* धर्माचे ध्येय व त्याची साधने याची शुद्धि अत्यंत कडक रीतीने पाळली पाहिजे. 'ज्याने विठ्ठल मात्रा घ्यावी ।। त्याने पथ्ये सभाळावीं' ।। धर्मांत राजकारण आणणे हे वाईटच आहे; पण राजकारणाकरितां गौणत्वानें धर्मभावनांचा उपयोग करणे हे तर त्याहून निंद्य आहे. धर्माकरितांच धर्म असावा हेंच उत्तम.

**अधिकारवाद—**

शेवटीं ब्राह्मांना एवढीच विनंती करावयाची कीं, सर्व धर्मांत ऐक्य करणे

* (a) We admit no division into sacred and profane among life's activities. Viewed in this light social reform, social service, political agitation, all come under religion and are religious activities. While freely acknowledging it, we cannot shut our eyes to the fact that religion is in danger of being exploited in the interest of social reform, communal solidarity and national effeciency. Religion like honesty degenerates the moment it is practiced as the best policy. Religion demands our allegience for its own sake.

—*I. M. leader 2-3-24.*

(b) **Hinduism and Islam will gain immeasurably in strength and purity if they are not mixed up with secular politics.** —*Congress President quoted with approval I. M. 9-1-27.*

किंवा सर्व जगाचा एक सार्वत्रिक धर्म करणें, ह्या गोष्टी जरी अशक्यप्राय असल्या, तरी सर्व धर्मांत आणि पंथांत सलोखा नांदावा म्हणून साऱ्या धर्मांची मुलें एकत्र करून प्रार्थना करण्याचा उपलक्षणात्मक विधायक उपक्रम राजा राममोहन ह्यांनीं सुरू केला, तो ब्राह्मांनीं यापुढेंही वाटल्यास अवश्य चालवावा. मात्र शंभर वर्षांच्या दीर्घ कालांत ब्राह्मपंथाचे सांप्रदायी हिंदूंशिवाय इतर बोटांवर मोजण्याइतकेही झाले नाहींत, यावरून त्यांनीं जो बोध घ्यावयाचा तो आतां तरी घ्यावा. तसेंच ब्राह्ममंदिरांत येणाऱ्या निरनिराळ्या वृत्तींच्या व अधिकारांच्या माणसांपुढे होणारी उपासना अशी क्लिष्ट, रूक्ष व कृत्रिम न करितां ती आजचा व्यवहार व पूर्वीचा इतिहास यांस धरून असावी व ती खऱ्या आत्मौपम्य बुद्धीचा व भक्तीचा परिपोष होईल अशी करावी. कविकल्पना आणि शब्दलाघव यांनीं क्षणमात्र लोकांस चकित केले, तसेंच ‘एकमेवाद्वितीयं’ अथवा ‘शिवं शांतं अद्वैतं’ अशा सूत्रावर उलट्यासुलट्या तार्किक उड्या मारून उपासकांच्या दृष्टीला थोडा ताण दिला, तरी त्यांचे नीतिव्यवहार आणि धार्मिक आचार यांवर त्याचा कांहींच परिणाम होत नाहीं. “अधिकार तैसा करूं उपदेश” हा तुकोबांचा दंडक ह्या पुस्तकीविद्येच्या काळांत पाळला न गेल्यामुळेच वेदान्तशास्त्र आज बेजबाबदार टीकाकारांच्या उपहासास पात्र झाले आहे. चिकित्सक उपदेष्ट्यांचा दृष्टिदोष व श्रोत्याची अनधिकार बधिरता यांमुळे साराच सावळागोंधळ झाला आहे. दुसरा गोंधळ वेद, पुराणें व संतांचे ग्रंथ ह्यांच्या दुरुपयोगाने झाला आहे. त्यांच्या ठिकाणीं ब्राह्मांची खरी प्रामाण्यबुद्धि असेल तर ठीकच आहे. पण जे सरसहा त्यांचा उपहासच करतात, त्यांनीं आपल्या मनसोक्त आचारविचारास त्यांतील संदर्भरहित तुटक वचनांचा आधार दाखविणें ह्यांत ग्रंथद्रोह व ठकबाजी हे दोन गुन्हे होतात.

**प्रामाण्यविचार—**

ब्राह्म म्हणतात, आम्हीं वेदविद्येचा उद्धार केला. आणि याला अगदीं अलीकडील ठळक आधार म्हणून गेल्या वेदसंमेलनांतील एका फारच जाड्या विद्वान् अध्यक्षाच्या भाषणाचा आधार देतात. मशारनिल्हे पंडितांनीं आपल्या भाषणांत वेदांचे अत्यंत महत्त्वाचे असे सात संदेश सांगितलेः (१) आर्यसंस्कृति स्थानिक आहे; (२) वेदकाळीं जातिभेद नव्हता; (३) वेद-

काळीं स्त्रियांना बरोबरीच्या नात्यानें वागवीत होते; (४) वेदकाळीं लोकशाही होती; (५) आपल्याला हिंदी साम्राज्याचा विस्तार करितां येणें शक्य आहे; (६) आपण निर्धारानें शेती करायला लागलें पाहिजे आणि (७) आपण आपल्याला जाणलें पाहिजे. धर्मवेड सोडले पाहिजे. तसेंच जाति, वंश, वर्ण आणि पंथ यांचा भेद यांचेही बंधन तोडले पाहिजे. आतां ह्यापैकीं पहिल्या सहा गोष्टी देशकालास धरून असल्यामुळें वेद प्रामाण्य म्हणून त्यांचे आज कांहींच विशेष महत्त्व राहिलें नाहीं, आणि सातवें काढलेलें रहस्यही वादग्रस्त आणि अत्यंत भ्रामक आहे. तेव्हां साऱ्या वेदांचे आलोडन करून आपल्या पांडित्याचे व्यर्थ प्रदर्शन करणाऱ्या ह्या आधुनिक चिकित्सक डॉक्टरांपेक्षां—

वेद अनंत बोलिला । अर्थ इतुकाचि साधला ॥
विठोबासी शरण जावे । निजनिष्ठे नाम गावे ॥

हा तुकोबांनीं आम्हांस सांगितलेला वेदपुरुषाचा निरोप अधिक चोख, स्पष्ट आणि व्यवहार्य आहे असें आम्हांस वाटते. अंतरीं धर्माचा जिव्हाळा नसल्यामुळें बहुतेक आधुनिक पंडितांची दृष्टि धर्मग्रंथांचा कालानुक्रम आणि प्रक्षिप्ताप्रक्षिप्त भाग ठरविण्यांतच गोंधळली आहे. श्रीरामकृष्ण परमहंस म्हणतात कीं, आंबराईत जाऊन कोणी आंबराईच्या धन्याची भेट घेण्याची आस्था ठेवीत नाहींत किंवा चार इरसाल आंबे खाऊन कृतार्थही होत नाहींत. तर आंब्याच्या जाति आणि पानांची संख्या मोजण्यातच हे पारखी दंग झाले आहेत. दृष्टिदोषाचा पहिला गोंधळ हा असा आहे. आणि दुसऱ्या गोंधळाचीं गीतें थोडक्यांत उदाहरणार्थ सांगावयाचीं तर—

अन्धं तमः प्रविशन्ति ये संभूतिमुपासते ।
ततो भूय इव ते तमो य उ संभूत्यां रताः ॥

इत्यादि श्रुति—

अहमुच्चावचैर्द्रव्यैः क्रिययोत्पन्नया न घे ।
नैव तुष्येऽर्चितोऽर्चायां भूतग्रामाव मानिनः ॥

अशा पुराणोक्ति किंवा—

निर्जिवा दगडाची काय करिसी सेवा ।
तो तुज निर्देवा देईल काय ! ॥

इत्यादि संतोक्ति होत. ब्राह्मांनीं ह्यांचा स्वमतास आधार घेण्याचा व्यर्थ प्रयत्न केलेला दाखवितां येईल. तात्पर्य, सारसंग्रह या मोठ्या नांवाखालीं ब्राह्म उपदेशक व लेखक जो मिथ्याचार करतात तो त्यांनीं बंद करावा.¶ ह्या-प्रमाणे ब्राह्मांच्या विधायक कार्यक्रमाचा विचार झाला. आतां अखेर ब्राह्मां-च्या विघातक कामगिरीबद्दल पुन्हां त्यांस स्पष्ट इशारा देऊन हें लांबलेलें प्रकरण पुरें करूं.

**धर्मांचे अवशेष—**

हिंदुधर्म आज कितीही अवनत दशेला पोंचलेला असो. जो धर्मभाव आज अस्तित्वांत आहे, तो तारतम्य बुद्धीने पाहतां (अ) देवळें, (ब) सांप्रदायिक आश्रम किंवा मठ, (क) ब्राह्मणवर्ग व (ड) स्त्रिया यांच्या जवळच विशेषेकरून आहे असे म्हणतां येईल. गांवोगांव देवळे आहेत म्हणूनच समाजांत धर्माची जागृति आहे. सुशिक्षित म्हणविणारे लोक देवदर्शनास रोज जात नसले तरी बहुजनसमाजाचा भाव त्या ठिकाणीं असतो. आणि कथापुराणे व उत्सव या निमित्तानें सुशिक्षित लोकही तेथे धर्मभावनेने कधींकधीं एकत्र होत असतात.§ तसेच गुरुसंप्रदायाची कोणीं कितीही टवाळी केली तरी ती बेजबाबदारपणाचीच असते. ज्यांना सत्समागम घडला आहे, तेच संतकृपेचे महत्त्व जाणतील. आम्ही तिसऱ्या खंडांत ह्या शतकातील संतांची माहिती देणार आहोत, त्या वेळीं याचा विशेष खुलासा होईल. गुरु चित्तापहारक असोत अगर निंदकाचे दृष्टीने वित्तापहारक असोत, ते अगदीं पामर जीवानाही ईश्वरपरायण करतात ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे.† धर्माने देवळांतून आणि मठातून आतां बाहेर पडलें पाहिजे, असे जेव्हां ब्राह्मपंडित ठांसून सांगतात, तेव्हां जीर्ण झालेला कां होईना पण आज धर्म कोठे आहे याचा निर्देश तेच करीत

¶ But the vaunted mono-theism with its colossal pretensions to superiority has no such merits to speak of......Eclectecism is contemptible syncretism is colourless. That is why the Brahmo Samaj to-day is a moribund institution —*Pessi. p. 38.*

§ But the value of an Image worshipping, temple building faith, in a land where the cause of religion is one with that of refinements, must be incalculable.

† I would choose not no God no Pope, but Pope—yes even Pope —and God. (Dr. Martineau quoted I. M. 27-2-27.)

असतात. तीच गोष्ट ब्राह्मणांची मनसोक्त निंदा करण्यांत ते सिद्ध करीत असतात. आज हिंदूंचें धार्मिक वाङ्मय कोणाच्या मुखोद्गत असेल तर ते ब्राह्मणांच्याच आहे. त्रैवर्णिकापैकीं क्षत्रिय व वैश्य हे वर्ग संस्कारशुद्ध क्वचित् कोठे असतील. धर्माचरणांतील कर्मठपणा व शुचिर्भूतपणा आज आधिक्यानें कोठे असेल तर तो ब्राह्मणांतच आहे, हे ब्राह्मणांचे शत्रूही कबूल करतील. स्त्रियांचे धर्मवेड तर प्रसिद्धच आहे. नव्या मताच्या काय पण जुन्या मताच्या हिंदूंच्या घराण्यांतूनही पावित्र्य व धर्मशील यांचें रक्षण स्त्रियांनींच केले आहे.

**ब्राह्मांचें विध्वंसक ध्येय—**

पृथ्वी वाटोळी आहे कीं चौकोनी आहे, हें सतांना कदाचित् सांगतां येणार नाहीं, याज्ञिकीच्या संकल्पातील जंबुद्वीपाचा नकाशा ब्राह्मणांना काढून दाखवितां येणार नाहीं, सती सावित्रीची कथा सूत्रपूर्वकालची कीं त्यानंतरची हें स्त्रियांस कळणार नाहीं. पाऊस कसा पडतो, विजा कां चमकतात, ग्रहण कसे लागतें, हेंही त्यांस ठाऊक नसेल; पण अशा साऱ्या भौतिक शास्त्रांच्या अज्ञानामुळें त्यांच्या धर्मपरायणतेत यत्किंचितही कमीपणा येणार नाहीं.§ आपत्कालाच्या ओघाबरोबर वरील धर्मस्थाने आज निस्तेज व सदोषही झालीं असतील, पण धर्माची ठिणगी का होईना आज तेथें आहे, आणि अनुकूलता मिळाल्यास धर्मतेज आपल्या पूर्ण ऐश्वर्यानें तेथें प्रगट होण्याचा अजूनही संभव आहे. ही गोष्ट नाकबूल करण्यांत अर्थ नाही. परतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, नेमकीं हींच धर्मस्थाने भ्रष्ट करणे, निस्तेज करणे किंवा धर्मदृष्टीनें नामशेष करणें हें ब्राह्मांचे अनन्यसाधारण ध्येय आहे ! आंग्लाईरूप इंद्रसत्तेला जो आम्हीं आरंभीं उद्वेगानेच नमस्कार केला तो याचमुळें. तपोधन ब्राह्मणांचा द्वेष कोणीं केला, सती अहल्येचा बुद्धिभेद कोणीं केला ? प्रल्हादाचे धर्मशील

---

§ The influence of the woman, too, on civilisation, is probably vastly greater in India than in the West. And this because the one woman to whose guidance a man is more or less willing to resign himself is also she whose impress is most indelible,—his mother...... ......A man may be a constant visitor in a Hindu house without even knowing where the rooms in which the ladies live. Strength, it has been said, lies in the reserve, and those who are here so strictly concealed are perhaps all the more potent for that ! (Sister Nivedita.)

कोणीं हरण केले ? आणि गोपालकृष्णाच्या सगुणभक्तीचा विरोध तरी कोणीं केला ? ही जी पूर्वीची इंद्रसत्ता तिचेच इंग्रजी संस्कृति हे एक तऱ्हेनें आधुनिक अवतरण होय !

**स्त्रियांचा अधःपात—**

वाघोणीचीं नखें आंतडीं बाहेर काढतात व अस्वलीचीं नखे गुदगुल्या करून प्राण घेतात,असे ऐकतो. त्याचप्रमाणे चेंगिझखानाच्या किंवा तैमूरलंगाच्या लुटीपेक्षांही भयंकर असे भिक्षुकीच्या परिग्रहाचे वर्णन करून ब्राह्मणांच्या वृत्तीचीं आंतडी बाहेर काढणारे आधुनिक संस्कृतीचे रक्ताने माखलेले हात, तीं हिंदु स्त्रियांच्या अंगावरून गोंजारून फिरवीत आहे. पण त्यांतही त्या स्त्रियांचे मरण आहे हे निश्चित आहे. पूतनामावशीचे स्तनही विषारी होते, हें त्या भोळ्या गोपींस कळले नाहीं. बुद्धिपुरःसर नसला तरी परिणामीं तोच प्रकार आज आहे. भिन्न संस्कृतीचे आज पुढे झालेले हात म्हणजे एका काळी हिंदूंच्या राजश्रीपुढे सरसावलेले अफझुलखानाचे हात होत ! ही सुधारणा नव्हे, हा अनर्थ आहे. हे यश नव्हे हे मालिन्य आहे. हे हिंदुस्त्रियाचे मरण आहे. त्या मेलेल्या स्त्रियांच्या राखेतून स्मशानवेलीप्रमाणे नवीन मडमा कदाचित् निर्माण होतील. पण हिंदु स्त्री मेली असेच ब्राह्मांनीं समजले पाहिजे. ज्यांची घरची पूर्वपरंपरा पार सुटली, शाळेत धर्म व गृहकृत्ये यांच्या शिक्षणाचा अभाव, हॉस्टेलांत इंग्रजी पद्धतीचे राहणे, खिस्ती झालेली एखादी चंद्रमुखी कुमारिका अथवा पंडिता विधवा, किंवा एखाद्या खानाच्या अगर दुसऱ्या विधर्मीयाच्या नांवाने कुंकू लावणारी अगर पुसणारी (?) सधवा, ह्याच ज्यांच्या स्त्री-शिक्षणाच्या आदर्शभूत अध्यापिका, आणि त्यागात्मक नसून भोगात्मक ज्यांचे विवाहाचे रहस्य त्यांच्या ठिकाणीं हिंदुत्वाचे शील टिकणें कठीणच आहे ! ! ब्राह्मांस ही गोष्ट इष्टच असेल; पण त्याबद्दल त्यांच्या स्वर्गवासी पूर्वज स्त्रिया त्यांचा त्रिवार धिक्कार करीत असतील हेंही ईश्वरचंद्र आणि केशवचंद्र, प्रतापचंद्र आणि आनंदमोहन अशा मातृभक्त ब्राह्मांच्या अनुयायांनीं जाणलें पाहिजे.

**स्त्रियांचें धर्मशील—**

धर्मपीठावरील देव-गुरूंच्या मूर्ति काढून तेथे बसलेल्या अर्धवट शब्द-पंडितांच्या तोंडाकडे शून्य दृष्टीनें पाहणाऱ्या ब्राह्म-स्त्रियांनीं, तुलसीवृंदावनाशीं

निष्ठेनें बसून वेणाबाईनीं समर्थपद जोडलें, श्रीविठ्ठलमूर्तीच्या पायीं डोई ठेवून सखूबाईंना संतपद लाभले, कृष्णसंगानें 'तुम भये सरोवर, मै तेरी मछिया' असा अनुभव मीराबाईने घेतला, या सुप्रसिद्ध ऐतिहासिक गोष्टींचें चिंतन करावे. म्हणजे मिस् बानी चतर्जी आणि त्यांच्या ब्राह्मिका भगिनी यांस कळून येईल कीं, धर्मशिक्षण शाळेंत, कॉलेजांत, बंगमहिलाश्रमांत किंवा ब्राह्ममंदिरांतही मिळत नाहीं, ते घरींच मिळूं शकते व ते घरींच मिळवावें. ठायींच बैसोनी करा एकचित्त। आवडी अनंत आठवावा ॥ अमृतत्वाचे घडे शिकविण्यास कॅन्ट नको. शिवाय 'शिवम्, शान्तम्, अद्वैतम्' हे समजून घेण्याचा अधिकार फार पुढचा आहे, आणि ते स्वानुभवाच्या तेजाने पटविणारे धर्माधिकारी ब्राह्ममंदिरांतही नाहींत. ते बाहेर आहेत. योग्य अधिकार प्राप्त होतांच साधक असेल तेथे येऊन ते त्यास कृतार्थ करतात. तो अधिकार प्राप्त होण्यासाठीं यशोदेला विश्वदर्शन देणाऱ्या गोपालकृष्णांची व शबरीला कृतार्थ करणाऱ्या प्रभु रामचंद्रांची किंवा सीमंतिनीचे सौभाग्यवर्धन करणाऱ्या उमा-महेश्वरांची अगोदर अनन्यभावाने भक्ति करावी लागते. तीच स्त्रियांच्या स्वाभाविक धर्मभावनेस योग्य आहे.

ब्राह्मणद्वेष—

साधारण-ब्राह्मसमाजाचे अध्यक्ष पंडित सीतानाथ (दत्त) तत्त्वभूषण व तत्सम वृत्तीचे इतर विद्वान् पुढारी म्हणतात कीं, " ब्राह्मणवर्गास श्रेष्ठत्व देण्यास आज जग तयार नाहीं. कारण एकतर तसे श्रेष्ठ ब्राह्मण आज राहिलेच नाहींत. 'पेशा आचाऱ्याचा व मिजास आचार्यांची' ती कोण चालू देणार ?† देशांतील विद्वान् पुढाऱ्यांची नांवनिशी घ्यावी तर जो पहावा तो ब्राह्मणेतर असेच आज आढळेल ! शिवाय हल्लीचे न्यायी सरकार सर्वांना सारखेच वागवीत असल्यामुळे ब्राह्मणाची प्रतिष्ठा इतःपर कांहींच राहिली नाहीं. त्यातून ब्राह्मणांत कांहीं श्रेष्ठ गुण आहेत असे मानलें तरी त्याबरोबर अहंपणा, उद्धटपणा, भिक्षुकवृत्ति आणि अभिमानशून्यता हे दोष त्यांच्या

---

† A Brahmin's speciality consisted in the persuit of knowledge spiritual which gave him understanding and wisdom of the highest order for the good of all. He has given up his spiritual quest but sticks most tenaciously to his prestige even when cooking and serving food. —*I. M. 3-7-27.*

ठिकाणीं फारच जास्त प्रमाणांत आढळतात.§ तसेंच मूर्तिपूजेसारख्या अनिष्ट परंपरा अद्यापिही हिंदुसमाजांत रूढ आहेत. त्याचें कारणही ह्या मतलबी ब्राह्मणांना आपली छाप हिंदुसमाजावर ठेवावयाची आहे हेच होय. यासाठीं ही ब्राह्मणांची प्रतिष्ठा झुगारून द्या, म्हणजे मूर्तिपूजेसारखीं खुळें आपोआप नाहींशीं होतील."‡

**जातीचें गुणकर्म कीं गुणकर्मांची जात—**

ब्राह्मणेतरांपैकीं वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध अशा पुढाऱ्यांनींही असे बेजबाबदारपणाचे उद्गार काढावे ही खेदाची गोष्ट आहे! ब्राह्मण आणि त्याची विद्या यांचा जो कोणी पुरस्कार करतो तो चातुर्वर्ण्याच्या ध्येयबुद्धीनेच करीत असतो. प्रत्येक ब्राह्मणाच्या ठिकाणीं ब्राह्मणाचीं सर्व श्रेष्ठ लक्षणें आढळतील असें कधीं कोणीं म्हटलें नाहीं. आजच काय पण अरुणि श्वेतकेतूच्या वेळेपासून ब्रह्मबंधु हे आहेतच.* आतां "ब्रह्म जानाति ब्राह्मणः" इत्यादि सर्व शास्त्रीय लक्षणांच्या अभावीं जर जातिब्राह्मण ब्राह्मण ठरत नसले तर त्या लक्षणांनीं युक्त असे दुसरे तरी कोण आहेत? आणि कोणीच नसतील तर धर्मानें ब्राह्मणांकरितां म्हणून सांगितलेले अधिकार व कर्में यांची वाट काय? शिवाय असे कीं, जे अनुष्ठानिक नाहींत तेसुद्धां जर ब्राह्म म्हणवितात तर जे श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ नाहींत त्या जातिब्राह्मणांना ब्राह्मण कां मानूं नये? एरव्हीं श्रेष्ठ आणि कनिष्ठ हीं विशेषणें ब्राह्मणास लागणारच नाहींत. जे जातिब्राह्मण असेल त्यांनीं ब्राह्मण्याचीं अमुक लक्षणें संपादावीं हे म्हणणें बरोबर आहे, पण अमुक लक्षणें असतील तरच त्यास ब्राह्मण म्हणावें हे

§ If the Brahmins have shown certain exceptional virtues, are not certain, vices on the other hand such as egotism, arrogance, mendicancy and want of self-respect found among them in a superabundant degree? —*Pt Sita Nath, Brahmaism p. 324.*

‡ The main factor in the perpetuation of image worship will be found in the persistent efforts on the part of the priestly classes, to keep their hold on and suppremacy over the other classes. Over throw this suppremacy, and image worship will die of sheer inanition

--*Pt. Sita Nath I. M. 3-1-26.*

* श्वेतकेतो वस ब्रह्मचर्यं, न वै सोम्यास्मत् कुलीनोऽननूच्यब्रह्मबन्धुरिव भवति. — छांदोग्य, ६।१।१

अव्यवहार्य आहे. जो राजा आहे त्याच्या ठिकाणीं शौर्य व सामर्थ्य असावें हें म्हणणे बरोबर आहे. पण ज्याच्या ठिकाणीं शौर्य व सामर्थ्य आहे तो राजा असें म्हटल्यास सारे खलाशी आणि सोल्जर्स राजे होऊन जॉर्ज बादशहांना पदच्युत व्हावें लागेल. साऱ्याच गाई गरीब नसतात. आणि सरकशींतला वाघही गाईसारखा गरीब असतो. तथापि गाय ती गाय व वाघ तो वाघ त्यांचे लग्न जमणार नाहीं. दुर्वासांच्या तामसी वृत्तीवरून ते शूद्र ठरले नाहींत, व विदुर अत्यंत सात्त्विक म्हणून त्यांस ब्राह्मण मानलें नाहीं. गुणकर्मांनींच जर ब्राह्मण ठरत असता तर ब्राह्मणांनीं अमुक कर्मे करावीं. ( उदा०—ब्राह्मणाचे उपनयन करावे.) व अमुक करू नये इत्यादि साधनांचे विधिनिषेधच शास्त्रांत नसते. कोणी म्हणतात, वेदांत मुळीं चातुर्वर्ण्यच नाहीं. पण उपलब्ध वेदांत विद्वानांना प्रक्षिप्त भाग आढळतो त्यापेक्षां परकीय सत्तेत लुप्त झालेला भाग पुष्कळच असण्याचा संभव आहे. मग स्मृतींत असलेले चातुर्वर्ण्य त्या लुप्तवेदांतील नाहीं कशावरून ? दुसरें असें कीं, ब्राह्मणजातीत होणारा जन्म नेहमीं विशिष्ट कर्माकरितांच असतो असेंही म्हणवत नाहीं. नाहीं तर ब्राह्मणांचीं मुलें ब्रह्मकर्म न करतां उपनयनापूर्वी मरतीच ना ? त्यांनीं जन्मास येऊन कोणतें कर्म केले म्हणावे ? पूर्वकर्मानुरूप त्यांचा ब्राह्मणकुलांत जन्म झाला इतकेंच. याप्रमाणे ब्राह्मणकुलांत जन्म हे पूर्वकर्माचे एक बक्षीस आहे. बक्षीस हे नेहमीं पूर्वकर्माबद्दलच असतें. ह्या बक्षिसाचा एखाद्याने योग्य उपयोग केला नाहीं तरी त्यांस पूर्वपुण्याईने बक्षीस मिळालें ही गोष्ट खोटी ठरत नाहीं. अनिष्ट संस्कारांमुळें व दीर्घकालच्या प्रतिकूल परिस्थितीमुळें आजचे जातिब्राह्मण पतित झाले असतील; तथापि त्यांचे जन्मस्थ संस्कार आजही झांकत नाहींत. क्षत्रियवर्ग प्रायः नामशेषच झाला आहे. पण ब्राह्मण आणि वैश्य यांचे स्वभावधर्म अद्यापिही जातिनिष्ठच दिसतात. आणि त्यांतही संस्कारशुद्धि ब्राह्मणांनींच अधिक राखली आहे. मांजर कितीही माणसाळलें तरी वन्य पशूंचे संस्कार अजूनही त्याचे ठिकाणीं दिसतातच.

घरांत अनेक कामांचे अनेक भाग असतात. ते नादुरुस्त झाल्यास दुरुस्त करावे लागतात. पण स्वयंपाकगृहाचें शय्यागृह किंवा कोठीचा दिवाणखाना असा उपयोग होत नाहीं. त्याचप्रमाणें समाजरचनेंत जे अधिकार-

भेद व व्यवसायभेद पूर्वपरंपरेनें पाडले आहेत ते सुधारावेत पण मोडूं नये. हजारों वर्षे डोक्याचा हा वरचढपणा काय ? म्हणून शरीराचे अवयवांनीं नकार करण्यांत काय हंशील ! एखादा कसरत्या बळेंच खालीं डोके वर पाय करून चालून दाखवील; पण तें क्षणिक आणि अस्वाभाविक आहे. आजच्या आपत्कालीं डोक्यांत पूर्वीची तरतरी राहिली नसेल, ते अधोमुख झालें असेल; तर सर्व अवयवांनीं मेहनत घेऊन सामर्थ्य वाढविल्याने त्यास सहज तरतरी येईल.‡ त्यांतच समाजाचे आरोग्य आणि ऐश्वर्य आहे. ब्रह्मद्वेष हा अज्ञानमूलक व आत्मघातकी आहे.

**श्रेष्ठकनिष्ठभाव—**

आतां अब्राह्मणांच्या श्रेष्ठतेबद्दल साक्षीपुरावा देण्याचा जो खटाटोप पंडितजी-सारखे ब्राह्म करतात तो अगदींच निष्कारण आहे. चातुर्वर्ण्य म्हणजे श्रेष्ठकनिष्ठ भावाचे कायमचे ठसे असे कधींच कोणीं मानले नाहीं. दृढाभ्यासाने हातही डोक्याचें काम करतात. शिवाय मस्तक ज्ञानयोगी असले तर हातपायही कर्मयोगी आहेत, आणि भक्तियोगानें तर अंतःकरण सर्वांत श्रेष्ठ असे मर्मस्थान झाले आहे. तथापि ऊर्ध्वमूल शरीरांतील डोक्याच्या वरचढ स्थानाचा हेवा करून शरीराचा शिरच्छेद करूं पाहणे वेडेपणाचे आहे. त्यांत शरीरसमाजाचा नाश आहे. यांत श्रेष्ठकनिष्ठभाव न मानतां प्रत्येकाचे महत्त्व स्वतंत्र मानतां येईल. तीर्थयात्रेत कष्ट घेणारे पाय बथ्थड डोक्यासही वंदनीय होतील. तात्पर्य, श्रेष्ठपणाचा मक्ता आपल्याकडे आहे असा ब्राह्मणांचा दुराग्रह नसावा आणि तसा तो नाहींही तसे असतें तर ब्राह्मण पुराणकारानीं श्रीराम व कृष्ण ह्या अब्राह्मण दैवतांचा गौरव केला नसता. रामगीता, कृष्णगीता, इतकेंच काय पण व्याधगीता ह्या मानल्या नसत्या. मनूच्या आज्ञा पाळल्या नसत्या. अगदी अर्वाचीन काळ घेतला तरी ऐन ब्राह्मणशाहींतील मोरोपंत, महिपतीबोवा यांनीं सतमालिकेत ब्राह्मणेतर संतांचीं अभेदभावानें व मुक्तकंठाने स्तुति केली आहे तशी केली नसती. तुकोबांच्या अनुयायांचे अग्रणी ब्राह्मण नसतेच. ब्राह्मण हरिदासांचीं कीर्तनें

‡ Along side the movement for the uplift of the untouchables there should to the movement for the uplift of the Touch-me-nots. In the fallen Hindu social structure it is not only the legs that have to be raised, but the lower apex too, has to be set up virtically once more. *—Sarala Debi, I. M. 3-7-27.*

आदिअंतीं तुकोबांच्या अभंगवाणीनें अलंकृत झालीं नसतीं. श्रीसिद्धारूढ आणि श्रीसांईबाबा, श्रीगुलाबराव आणि श्रीविवेकानंद, महात्मा गांधी आणि डॉ० बेझंट यांचे कट्टे अनुयायी ब्राह्मण आहेत, ते नसते. तात्पर्य, विचारी ब्राह्मणांनीं आपलें समदर्शित्व कधींही सोडलेलें नाहीं.

**ब्राह्मणांचा जुलूम—**

आतां मूर्तिपूजा व व्रतवैकल्ये यांसंबंधीं ब्राह्मणांचा जुलूम हा एकच मुद्दा राहिला. निर्धन ब्राह्मण देवळें कोठून बांधणार ? देवळें बांधणारे राजे-रजवाडे व शेट सावकार हेच होत. दक्षिणेश्वराचे देऊळ राणी रासमणी ह्या एका शूद्रजातीच्या बाईने बांधले; ब्राह्मणाने बांधलें नाहीं. पण त्याचे माहात्म्य मात्र एका कंगाल ब्राह्मण पुजाऱ्याने (श्रीरामकृष्ण) त्रिखंडीं प्रस्थापित केलें. यांत त्या ब्राह्मणाने काय मिळविले व जगानें काय मिळविले याचा हिशेब जमेल काय ? रामदासांनीं ठिकठिकाणीं मारुती स्थापन केले त्यांत ब्राह्मणांनीं काम मिळविले ? तात्पर्य, मूर्तिपूजेचा लाभ साऱ्याच मूर्तिपूजकांना मिळेल. त्या मानाने पुजारी ब्राह्मण असला तरी त्याचा लाभ तो किती ! आतां व्रतकैवल्ये राहिलीं. त्यासंबंधीं आम्ही ब्राह्मांस असे आव्हान करतो कीं, अशिक्षित समाज राहो; पण तुमचा सुशिक्षित ब्राह्मसमाज " शिवं शान्तं अद्वैतम् " यावरील मल्लीनाथी ऐकायला आठवड्यांतून एक दिवस तरी मंदिरांत जमतो काय ? शंभर वर्षांच्या अनुभवानेही त्यांस हा मनुष्यस्वभाव कळला नसला तर त्यांचे व देशाचें दुर्दैव होय ! केवळ रूक्ष तत्त्वज्ञान हें अरोचक व अव्यवहारिक आहे. तसेच " मी पापी " " मी पापी " हीच रोजची प्रार्थनेची रड चित्ताकर्षक नाहीं. त्याचप्रमाणे रस्त्यांतून मोटारी, ट्रम्बे, खटारे यांचा कल्होळ सुरू असतां रस्त्यावरील प्रार्थनामंदिरांतील सार्वजनिक ध्यान म्हणजे व्यर्थ ढोंग होय ! रुचिवैचित्र्य व अधिकारभेद तसेच उपास्यभेद व साधनभेद हेच हिंदुधर्माचे वैशिष्ट्य आहे. अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझे त्यास तेंचि द्यावें ॥ हाच हिंदु धर्माचा दंडक आहे. आज समाजांत जो धर्म नादत आहे त्याचें कारण आचार्यांचें शारीरभाष्य नव्हे. व्रत-वैकल्यानेंच धर्म जिवंत ठेवला आहे. तत्त्वज्ञानाच्या पिष्टपेषणांत कालांतरानें चिकित्सकांच्या आळ्या पडतात. पण तुसाचे कवचांत असलेला तांदुळाचा दाणा शेकडों वर्षें टिकतो. व्रतांची अशीच योग्यता आहे. त्यांतील रहस्याचा

दाणा भुकेल्या जिज्ञासूला केव्हांही मिळतो. दैव करील तर या टीकाकारांच्या ह्यातींतच ह्यांना तत्त्वज्ञानाचें अजीर्ण होऊन व्रतवैकल्यें आणि शास्त्रीय कर्मेंच करीत बसण्याची वेळ येईल. सर्व व्रतांच्या बुडाशीं त्याग आहे. या त्यागानें भिक्षुकांपेक्षां दात्यांचीच समृद्धि अधिक होते. हे बेजबाबदार शब्दपंडितांनीं अनुभवानें जाणावें. हिंदुधर्म निवृत्तिप्रधान आहे. हिंदुधर्मांतील भोगांतही त्यागाचें रहस्य आहे. फार काय पण विवाहांतही एकीचे पाणिग्रहणांत दुसऱ्या सर्व स्त्रिया कामुक दृष्टीला परित्यक्त व्हाव्या हेंच तत्त्व सांगितलें आहे. स्त्रीसंभोगासही कालाचें नियमन करण्यांत आत्मसंयमच साधला आहे. हीं धर्मवेडे व अज्ञान्यांचीं खुळें नव्हत. तात्पर्य, आत्मसंयमन, विषयवैतृष्ण्य, तितिक्षा, त्याग, संतोष आणि ईश्वरपरायणता इत्यादि अनेक अमूल्य रहस्यें व्रतवैकल्यांत असतात. त्याची किंमत साधारण ब्राह्मांस नाहीं. भिक्षुकाने मिळविलेला शिधा, केळीं व सुपाऱ्या म्हणजे नादीरशहांनीं केलेली लूट असे त्यांस वाटतें. अगदीं हलक्या धंद्यांत जी प्राप्ति आहे ती आज पुरोहितांस नाहीं. एखाद्या मोटार ड्रायव्हरचाही पगार पंतोजीस नाहीं. ही आजचीच स्थिति कशाला, प्राचीन कालींही अपरिग्रह हें ज्यांचे व्रत, त्या ब्राह्मणांनीं श्रीमंतींत सर्वांवर चढाई केली असा हिंदुस्थानच्या इतिहासांत एक तरी काल दाखवितां येईल काय? ब्राह्मणांच्या पायांशीं सम्राटांचे मुगुट नमत होते, पण त्यांनीं आपल्या आर्थिक अभ्युदयाची कधींच इच्छा केली नाहीं. पेशवाईच्या औट घटकेच्या राज्यांतही शिंदे-होळकरादि ब्राह्मणेतर सरदार ब्राह्मणांपेक्षांही प्रबल होते. तात्पर्य, तरवारीचे सामर्थ्य आणि पैशाचें बळ हीं ज्यांच्यापाशीं आहेत, असे क्षत्रिय आणि वैश्य हे वर्ग त्रैवर्णिकांत समर्थ असतांना ब्राह्मणवर्ग जुलूम तरी कोणावर व कसा करणार ते कळत नाहीं. स्पर्शास्पर्शनियंत्रणामुळे शूद्रांच्याही सेवेचा लाभ इतरांप्रमाणे ब्राह्मणास घेतां येणे शक्य नव्हते. आतां शिक्षणाची बाब पाहिली तर वेदविद्येशिवाय सर्व विद्या व कला सर्वांना मोकळ्याच होत्या. आणि हे वेदविद्येचे खातेंही केवळ ब्राह्मणांचेंच नव्हते ते त्रैवर्णिकांचें होते. शिवाय हे खाते राखीव केल्यामुळें विदुरापासून श्रीगुलाबरावांपर्यंत, किंवा व्याधापासून चोख्यापर्यंत कोणाचीच जिज्ञासा तृप्त होण्याची राहिली नाहीं. वेद न वाचतांच तुकोबानें वेदांचे रहस्य जाणलें. तात्पर्य, ब्राह्मणांनीं लोकांना

अज्ञानांत डांबले असें अजूनही म्हणणाऱ्या ब्राह्म उदारमतवाद्यांनीं वेदविद्या उघड करून शंभर वर्षांच्या दीर्घ प्रयत्नांनीं काय जगदुद्धार केला तो तरी दाखवावा.

असो. हा इतका विस्तार करण्याचें कारण चातुर्वर्ण्य आणि त्यांतही ब्राह्मण आणि त्यांची विद्या यांचा द्वेष हे एक ब्राह्मांचें मुख्य विघातक लक्षण आहे. आणि त्यासाठीं एक विद्वान् ब्राह्म आज असे म्हणतात कीं, या तडजोडीच्या गोड गप्पा मारणाऱ्या ब्राह्मण-शिष्टांना सोडून आपण ह्यापुढे सत्यशोधकांशींच सहकार्य केले पाहिजे.‡ तेव्हा विधर्मी सरकार आणि बहुसंख्याक ब्राह्मणेतर ( अर्थात् जे अविचारी असतील तेच ) यांच्याकडून ब्राह्मणांचा उत्तरोत्तर अधिकाधिक जाच होत जाणार असे दिसते.* खऱ्या ब्राह्मणविद्येवर आपत्कालामुळे चढलेला गंज झडावा अशीच यात ईश्वराची योजना दिसते. ती जाणून ब्राह्मणांनीं आपला तोल संभाळला पाहिजे. ब्राह्मणाचे ब्राह्मण्य जर अग्निप्रमाणे झगझगीत असेल तर त्यांच्या वाटेस कोणीच जाणार नाहीं. उलट हिंदूंच्या वर्णाश्रमधर्माचे रक्षण करण्यास ते समर्थ होतील. परंतु जोवर सर्व पावन करणाऱ्या पावकाप्रमाणे असे ब्राह्मण्याचे तेज प्रकट झाले नाही, तोंपर्यंत हिंदुधर्मात एकंकार, पतितपरावर्तन व शुद्धि हे प्रकार विघातकच आहेत, असे आम्हांस वाटते. समर्थांनीं एका अंत्यजाकडून दिग्विजयी सदाशिवशास्त्र्यांचा गर्वपरिहार केला; पण त्यापूर्वी त्या अंत्यजावर त्यांनीं जे दिव्य संस्कार केले, ते समर्थांचे सामर्थ्य अंगीं आल्यावांचून शुद्धिही अशुद्धिच

‡ We have yet a duty to perform to help the *Satyashodhakas* in Deccan in their efforts to release themselves from the priestly domination Their principles of one God and no intervener between God and man are our principles . ...Let us now leave our Brahmin leaning and care more for the simple minded lower classes our future work must mostly lie in this direction. --*G. B. Trivedi, I. M 19-6-27.*

*" Down with the Brahmin ", is the cry raised and that cry will reverberate through out the length and breadth of the country. Before the masses are awakened to be impregnated with the non-Brahmin cry, the Brahmin should mend his ways and make his peace, or the wind he has sown will make him reap the whirl wind."

—*Indian Messenger 31-5-25.*

होय. आजच्या सामाजिक व राजकीय परिस्थितीमुळेंच चालू शुद्धिकरणाची आवश्यकता वाटत असेल; पण पतितांचा व मागसलेल्यांचा उद्धार करीत असतां ह्या वर्णाश्रमधर्माची घडी पुन्हा नीट बसविण्यासाठीं अगोदर पांढरपेशा जातींचें आणि विशेषेंकरून ब्राह्मणाचे संघटन आणि वेदविद्येचे पुनरुज्जीवन करणे यांची आवश्यकता धर्मदृष्टीनें सर्वांत अधिक आहे. निदान विधर्मी विरोधकांबरोबर आणखी कोणी गोऱ्हेशास्त्री आणि कोणी पंडिता रमाबाई असे उघड कुऱ्हाडीचे दांडे किंवा हिंदुधर्मीयांतच हिंदुधर्माचे प्रच्छन्नवैरी उत्पन्न न होतील, अशी काळजी घेतली पाहिजे.

**सनातनी हिंदूंचीं दोन पापें—**

एक देव, एक धर्म व एक वर्ण हें प्रागतिकांच्या ध्येयवादाचे महावाक्य आहे. जातिधर्म भेद आणि स्त्री-पुरुष भेद हीं सनातनी हिंदूंचीं दोन पापें त्यांस दुःसह झालीं आहेत. त्याबद्दल थोडा अधिक विचार करूं. हिंदुधर्मानें सर्वसमावेशक व्हावे नाहींतर नामशेष व्हावे, असे प्रागतिकांचे अध्वर्यु आज आव्हान करीत आहेत. उलटपक्षीं हिंदुधर्म नामशेष होणे अशक्य आहे; इतक्या उप्पर ईश्वराची नियतीच तशी असेल तर तेही होवो! पण हिंदुधर्मानें आपले पावित्र्य आणि वर्णव्यवस्थेचें वैशिष्ट्य गमावूं नये, असे कट्टे सनातनी निक्षून सांगत आहेत. सनातनीयांची दृष्टि केवळ धार्मिक आहे आणि प्रागतिकांची दृष्टि केवळ राजकीय व सामाजिक आहे.

**उकरून काढलेलें भांडण—**

मानवकोटी एकच आहे हें जसे खरे, तसेच व्यक्ति तितक्या प्रकृति हेंही खोटें नाहीं. या दोन टोकाच्या दरम्यान असलेल्या मानवी समाजात व्यवहाराच्या सोयीकरितां कोणत्या तरी तत्त्वावर परस्पर व्यावर्तक असे सामाजिक घटक पडणे अपरिहार्यच असते. मग ते यदृच्छेने किंवा स्वार्थबुद्धीनें, अथवा द्वेषप्रेरणेने कसे तरी बनणें व त्यांचे स्वरूप अनिश्चित, अशाश्वत व परस्परविरोधि असे रहाणे, यापेक्षां हिंदूंच्या चातुर्वर्ण्य-पद्धतीने ते जन्मतःच सहज विभागले जाणे हें समाजाच्या स्वास्थ्यास व उत्कर्षास अधिक सोयीचें होईल, हें विचाराअंतीं कळून येईल. पण हा कांहीं एक विचार न करितां जेथें मुळात द्वेष नव्हता तेथे द्वेष व जेथें समान हक्कांची कल्पनाही नव्हती तेथें ते खूळ उपस्थित करून हे ब्राह्मपुढारी चातुर्वर्ण्याविरुद्ध लढाई पुकारून

समाजांत केवढी बेदिली व बखेडा उत्पन्न करीत आहेत, त्याची त्यांसही पुरी कल्पना नसेल.

**सर्वसमावेश आणि समता—**

एकंदर मानवी बंधुभाव व अपवादभूत थोर व्यक्तींतील साधर्म्य या दोन कल्पनास धरून कल्पिलेल्या समन्वयाच्या रेषेत सर्व हिंदी समाजास गोवूं पहाणें हे अगदींच अव्यवहार्य आहे, याची ब्राह्मास मुळीच जाणीव नसावी याचें सखेदाश्चर्य वाटते. या इंग्रजी राज्यात पुढारीपण इंग्रजी शिकलेल्यांकडे स्वाभाविकच गेले आहे. अशा ह्या अल्पसंख्याक इंग्रजी शिकलेल्यांत कांहीं बाबतींत जे साधर्म्य आढळतें, ते ते सरसहा सर्व समाजास बळेच लावूं पाहतात, हा न्याय नसून अन्याय आहे. आगगाडींतील प्रवासबंधु सुशिक्षितांतील वर्गबंधु, दुसरे कित्येक व्यवसायबधु अथवा ब्राह्मांतील समाजबंधु यांच्या ठिकाणीं दिसणारें साधर्म्य कृत्रिम, मर्यादित आणि तात्पुरतेंच असते. तें सर्व समाजाच्या सर्वतोपरी समान हक्काचे गमक होऊं शकणार नाहीं. आगगाडीच्या डब्यांत एखादा भंगी आणि अग्निहोत्रि, कसाई आणि गवळी, कोळी आणि माळी अथवा एखादा सुन्नी आणि संन्यासी अगदीं मांडीला मांडी भिडवून पुष्कळ वेळ समतेच्या आणि सलोख्याच्या गोष्टी बोलत बसले, तरी तेवढ्या अनुभवावर त्यानीं गांवोगांव जाऊन जातिभेद आणि धर्मभेद हा "अन्याय, अन्याय!" म्हणून ओरड करून एकंकार पुकारणे मूर्खपणाचें होईल. देशातील मूठभर सुशिक्षितांचा असाच हा अविचार होत आहे. ज्ञानदेव आणि नामदेव, तुका आणि चोखा, पंडित आणि पंत, कबीर आणि तुलसीदास, रेव्हरंड टिळक व शास्त्री चिपळुणकर, गोविंदाग्रज आणि केशवसुत, मायकेल दत्त आणि गट्टुलाल, मुक्ताबाई आणि मिराबाई, सरोजिनीबाई आणि तोरुबाई, ह्या साऱ्या कवि आणि कवयित्रींच्या काव्यपंक्ति जरी सारख्याच दर्जाच्या असल्या तरी त्यांच्या भोजनपंक्तिही एकच असल्या पाहिजेत व त्यांनीं व त्यांच्या आधारावर त्यांच्या सर्व जातभाईनीं आपसांत सोयरिकही जोडली पाहिजे, असा आग्रह धरणें हा न्याय कोठला? आणि याचे महत्त्व ते काय? कित्येक विद्वान् असें विचारतात कीं, ब्राह्मणानीं जर आपलें ब्रह्मकर्म व वेदविद्या टाकून वाटतील ते ब्राह्मणेतरांचे धंदे पत्करले, तर त्यांच्या समव्यवसायी ब्राह्मणेतरांनीं उलट ब्राह्मणांचे हक्क कां

वजावूं नये! अधिक स्पष्ट लिहावयाचें म्हणजे कोणी ब्राह्मण जर जोडे विकूं लागले तर उलट चांभारांनीं ज्योतिर्लिंगावर अभिषेक करण्यास कां जाऊं नये? कांहीं ब्राह्मण गाई विकून कसाई बनले तर कसायांनीं ब्राह्मणाची मुलगी कां मागूं नये? हे तर्कशास्त्र आम्हास फारच विपरीत दिसते. ब्राह्मणांनी हलके धंदे करणे हे गैरच आहे; पण ते जे आज इतर धंद करताना दिसतात, ते वर्णांतराच्या हेतूनीं किंवा त्यांची धनतृष्णा अनावर झाली आहे म्हणून नव्हे. तर केवळ पोटापुरतेही मिळण्यास जरूर तो राजाश्रय व लोकाश्रय त्यांस राहिला नाही, इतकेंच नव्हे, तर द्वेष मात्र बेसुमार वाढत आहे, यामुळेच होय. तेव्हां अल्पसंख्याक जे ब्राह्मण व त्यांची विद्या याचे रक्षण करण्याची बहुसंख्याक ब्राह्मणेतरानी मुळीच आस्था न दाखविता, उलट स्वताच्या अविचाराने किंवा इतर मतलबी लोकाच्या प्रेरणेने त्यांचे पाय ओढून त्याच्या विद्येची बलात्काराने पायमल्ली करणे ही आग्लाईतील एक बेछूट मोगलाई आहे; दुसरे काय! अशा वेळीं आपले सत्त्व न गमावणे हेच सर्व ब्राह्मणाचे आज आद्य कर्तव्य आहे.

**ब्राह्मणांचा धर्म—**

कित्येक ब्रह्मद्वेष्टया ब्राह्मांचा असा मानभावीपणा असतो कीं, "आम्ही ब्राह्मण्याचे द्वेष्टे नाहीं, पण आजच्या जातिब्राह्मणानीं अध्ययन, अध्यापन आणि वैदिक कर्मानुष्ठान हा आपला स्वधर्म सोडूनही ते आपले वर्चस्व मिरवूं पहातात, ते आम्हीं काय म्हणून चालू द्यावे?" पण या त्याच्या म्हणण्यात वस्तुतः फारसा अर्थ नसतो. कारण अध्यापक म्हणजे शाळामास्तरे, पुरोहित म्हणजे लबाड भटे, पारमार्थिक गुरु म्हणजे वित्तापहारक ठक आणि संन्यासी म्हणजे आळशी देशबुडवे, अशी त्याची संभावना आधुनिकांकडून प्रत्यहीं होतच आहे.* लोक कळसाच्या दगडास वंदन करतात म्हणून जोत्याच्या

*.... their notorious associations and loose morals Their luxury and pomp and secret enjoyment of forbidden pleasures of beauty and a thousand other vices and follies,—and one will understand why sadhus and sanyasis, monks and priests (especially when they are celibates) in the temples and monasteries are often despised as a class.....This hereditory order of preceptors and priesthood (Gurus and Purohits) are not less self-seeking and bent on self aggrandisement &c. —*Religion and Modern India p. 81-82.*

दगडानें झुरावें, आयतें खातें म्हणून पोटाची उपासमार करून त्यास बोटांनीं चिमटे घ्यावे, त्याचप्रमाणे अत्यंजांस देवळाच्या गाभाऱ्यांत घेत नाहींत म्हणून मूर्तिभंजक ब्राह्मांस कळकळा यावा, निराशेचे गांवाशिवाय सर्व गांव इतरांस बहाल केले तरी तुम्ही सोवळेओवळे आणि विटाळ अशी प्रतारणा आमच्याशीं कां करतां ? तुमच्या मुली आम्हास का देत नाहीं, तुम्ही आमच्या पंक्तीस कां जेवीत नाहीं, आमच्या घरचे कां खात नाही, तुम्ही मागसलेल्यांस अरेतुरे कां करतां, अहो जाहो असे का म्हणत नाहीं ? इत्यादि कुरापती काढून कोणी कोणीं ब्राह्मणांस वेचून शिव्या द्याव्या, हा सुशिक्षितांचा बुद्धिवाद नव्हे, हा नवयुगाचा कालमहिमा आहे. ह्या कालगतीचे चक्र फिरून उद्यां कदाचित् अशीही वेळ येईल की, महार तेच महर्षि व सोवळे ब्राह्मण तेच अस्पृश्य असे जग मानूं लागेल ! याप्रमाणे अब्राह्मण जगाने ब्राह्मणांवर बहिष्कार पुकारला तर एक इष्टापत्तीच होईल. कारण तो बहिष्कारच ब्राह्मणांचे पावित्र्य निर्वेध राखील. तो द्वेषाग्निच मलीन झालेल्या ब्राह्मण्यास उजळा देईल. ब्राह्मणानी हे अवश्य लक्षांत ठेवावे कीं, "ब्राह्मणो मम दैवतम्" असे एका काळीं साक्षात् भगवान् म्हणाले असले, किंवा "जरी ब्राह्मण झाला भ्रष्ट। तरी तिन्ही लोकीं श्रेष्ठ।" असे पूर्वी श्रीतुकोबा म्हणाले असले, तरी तो काळ गेला, तो आज राहिला नाहीं; व ते विप्रश्रेष्ठही आज फारसे राहिले नाहींत. यास्तव ब्राह्मणानीं आपल्या श्रेष्ठतेची जाणीव स्वधर्मरक्षणापुरती आपल्याशीच ठेवून त्याचा दर्प अथवा उपसर्ग इतरास जाणवणारही नाहीं अशी सावधगिरी अवश्य ठेवावी, यांतच त्याचे शहाणपण आहे. इतक्याउप्पर चातुर्वर्ण्य-प्रपंचात घरीं राहून गृहप्रपच व शेतवाडी राखणाऱ्या व देवदेवतार्चन करणाऱ्या वडील बंधूंवर त्यांचे धाकटे अंमलदार बंधु जर आपली अंमलदारी गाजवूं लागले, तर त्यानीं तिजोरीच्या किल्ल्या त्याचे अंगावर टाकून दर्भाच्या पवित्रकानिशीं बाहेर पडावे व आपल्या कनिष्ठ बंधूचेच काय, पण विश्वकुटुंबाचे कल्याण चिंतीत व त्यासाठी ईश्वराची करुणा भाकीत आयुष्य वेचावे हेच त्यास योग्य होय. आपले धाकटे बंधु जे ब्राह्मणेतर त्यांच्याशीं उलट चुरस, ही ब्राह्मणांस कधींच शोभणार नाहीं व सुखदायीही होणार नाहीं. ब्रह्मद्वेष्ट्या ब्राह्मांची ही विध्वंसनाची आणि स्वैराचाराची हौस आणखी किती दिवस चालणार ! ब्राह्म-समाज दीर्घायु झाल्यास लवकरच असें आढळून येईल कीं, खास त्या समाजांतच आचार्य नांवाचे

ब्राह्मण, खजिनदार व संगोपक नांवाचे वैश्य, आक्रमशील वृत्तीचे वीर आणि कार्यवाहक किंवा सेवक नांवाचे शूद्र किंवा दास असे भेद आपोआपच उत्पन्न होतील. आणि मग चातुर्वर्ण्याची हजारो वर्षांची उत्कृष्ट परंपरा आपण व्यर्थ मोडीत होतों, याबद्दल त्याचा त्यांसच खेद वाटेल.

**स्त्रियांची प्रतारणा—**

जातिभेदाच्या अन्यायाप्रमाणे स्त्रीवर्गावर केलेल्या घोर अन्यायाची जी दुसरी मोठी तोहमत ब्राह्मानीं सनातनीयावर आणली आहे, त्याचाही येथे थोडा अधिक विचार झालेला बरा. ज्या जातीत गार्गि-वाचक्नवि किंवा सरोजिनी बेझंटबाई यांच्यासारख्या विदुषी निर्माण झाल्या त्या स्त्रीजातीतील इतर व्यक्तिही तशाच किंवा त्याहूनही श्रेष्ठ निर्माण झाल्या असत्या, पण पुरुषवर्गानें स्त्रीवर्गाचा आजवर कोंडमारा करून भयंकर घात केला; आणि स्वातंत्र्य आणि विद्या ह्या दुनियेतील अमूल्य वस्तू त्यांस पारख्या केल्या. याहून अधिक घोर पाप ते कोणते! अशी ब्राह्मांची फारच जोराची तक्रार आहे. तसेंच बालविवाहाचा जुलूम व विधवांची करुण स्थिति यांचेही खापर ते जुन्या परंपरेस चिकटून राहणाऱ्या समाजावरच फोडीत असतात. साऱ्या सुधारणाचे मंथन करून अबलोन्नति हे सार त्यांनीं काढले आहे. "घी देखले पण बडगा देखला नाहीं," अशी त्यांची अर्धवट विचारसरणी दिसते. हिंदुस्थानातच काय, पण कोणत्याही देशांत स्त्रीवर्गास आपले परावलंबित्व अजूनही कायमचे झुगारून देतां आले नाहीं. आतां हिंदुस्थानचे परतंत्र गुलाम स्त्रियांना स्वतंत्र करूं पाहत आहेत. देशोदेशीं वारशाच्या हक्काने स्त्रियांचीं राज्येही पूर्वी होऊन गेलीं; पण परतंत्र स्त्रीवर्ग चोहोकडे अद्याप तसाच आहे, तो आतां कोण ब्राह्मांच्या पराक्रमानें यापुढे स्वतंत्र होणार आहे! वस्तुतः स्त्री पुरुषांच्या जोडींत पुरुषाचें श्रेष्ठत्व स्वभावसिद्ध असल्यामुळे, ह्या परतंत्र हिंदुस्थानांतील विद्वान् व स्वतंत्र होऊं पाहणाऱ्या प्रौढ तरुणींनीं ज्यांचें शारीरिक व बौद्धिक श्रेष्ठत्व मनःपूर्वक मानावे, असे नरपुंगव शोधण्यासाठीं स्वतंत्र राष्ट्रांतील पुरुषांच्या तोंडाकडे पाहण्याची वेळ लवकरच त्यांस आल्यावांचून राहणार नाहीं! अशीं चिन्हें आजच दिसत आहेत. विद्येचा मद मोठा कठीण आहे. महत्त्वाकांक्षा ही विद्येची पाठराखणीच आहे, तेव्हां योग्य वर न मिळून किंवा सतीधर्माची ताबेदारी न आवडून गरीब पदवीधर स्त्रियांच्या

अविवाहित नर्सेस आणि स्कूलमिस्ट्रेसेस आणि संपन्न विद्वान् स्त्रियांच्या ही इलिझाबेथ राण्या बनतील हेही क्रमप्राप्तच दिसत आहे.

## शिक्षणाची शेवाळ—

विद्येचा मद आणि आचारविचारांचे स्वातंत्र्य यापुढें हिंदु स्त्रियांचें शुद्ध धर्मशील, विनय आणि नीतिमर्यादा टिकणे कठीणच आहे. वरील अपतितेप्रमाणें शिक्षणाच्या शेवाळेवरील ही अपतिताही राखणे दुष्कर आहे ! स्वतंत्र राष्ट्रांत यांचे दुष्परिणाम जाणवत नसतील असे नाहीं. पण परतंत्र हिंदुस्थानांतील कुटिल राजनीतीनें ब्राह्मणेतर ज्याप्रमाणे चढून गेले आहेत, तीच गत त्याच कारणांस्तव हिंदी स्त्रियाची होईलच होईल हे उघड दिसते. आज हिंदुस्थानांत साक्षर पुरुषांचेच प्रमाण अल्प आहे. तेव्हां सुशिक्षित आणि स्वतंत्र स्त्रियाची संख्या अत्यल्प असणार हे उघड आहे. यामुळे त्यांच्या स्वातंत्र्याचे अनेक दुष्परिणाम लोकांचे नजरेस अजून येत नाहींत. शिवाय शिवाजीबाजींच्या रखेल्या व नानांचा कटिशूळ इकडे दुर्लक्ष करणे ही ज्याप्रमाणे इतिहासकारात सदभिरुचि समजली जाते, त्याप्रमाणे कित्येक स्वैरवृत्तीच्या शिकलेल्या स्त्रियाच्या अनाचाराबद्दल कोणीं शंका काढलीच तर ती खोटीच असली पाहिजे असे गृहीत धरून त्याबद्दल वाच्यता न करणे हाच शिष्टाचार मानला जात असल्यामुळे 'अंदरकी बात राम जाने' असाच कित्येक फॅशनेबल सभ्याचा आचार दिखाऊ असतो. अशा स्थितींत ज्या कोणी आधुनिक स्त्रिया शाळा, हॉस्टेलें, कॉलेजे, वशीकरणाचे प्रयोग, स्वयंवरसंशोधन, वल्लभोपासना, मिश्रविवाह, बॉल, नाच, गार्डनपार्टीज् इत्यादि आधुनिक दिव्यातून गेल्या असतील व ज्याना नव्याबरोबर जुन्या चालींच्या कुलवधूंचीही बारकाईने खरी माहिती असेल, त्यांनीं भावी पिढींतील आपल्या कनिष्ठ देशभगिनींना मार्गदर्शक म्हणून—लाडया कोल्ह्याची नीति सोडून—आपल्या चारित्र्यांतील कायिक-वाचिक-मानसिक पापपुण्याच्या आठवणी (वाटल्यास निनावी) साररूपाने अवश्य प्रसिद्ध कराव्यात. म्हणजे प्रकृत विषयावर बराच प्रकाश पडेल. केशवचंद्र सेन आपल्या प्रार्थनेत जे ब्राह्मचारित्र्याचे वर्णन करतात, त्यांत जरी कांहीं काव्य किंवा थोडी अतिशयोक्ति असली, तरी उलटपक्षीं साधारण-ब्राह्मांनीं आपल्या तीक्ष्ण आत्मनिरीक्षणांत स्त्रीचारित्र्यावर अगदींच पडदा टाकला आहे हेही उघड दिसत आहे.

**स्त्रियांचें स्वावलंबन—**

मुलींना प्रथमपासूनच मुलांप्रमाणेंच धंदेशिक्षणासुद्धां सर्व प्रकारचें शिक्षण द्यावें, व त्यांस पुरुषांच्या पारतंत्र्यांतून कायमचे मोकळे करावे, असा साधारण ब्राह्म पंडिताचा अत्याग्रह दिसतो § यांत कांहीं सोय होत असली, तरी हा अत्यंत रूक्ष असा उपयुक्ततावाद वाटतो. कोळी आणि माळी यांच्या स्त्रियांप्रमाणे पांढरपेशांच्या स्त्रियांनीं उद्योगधंदे करून पोट भरावे यात स्त्रीदाक्षिण्य तें काय ? प्रारब्धवादावर, आप्तेष्टांच्या माणुसकीवर आणि विश्वंभराच्या सदयतेवर मनुष्याचा भरंवसा नसेल तर हा पामर जीव भविष्यकाळच्या आपत्तीची कितीशी तजवीज करू शकणार आहे ! स्त्रियास वैधव्य येण्याचा जितका संभव आहे तितकाच वृद्धापकाळीं मनुष्याची दृष्टि अधू होणार हाही संभव आहे. मग म्हातारपणीं मनुष्याची दृष्टि गेली तर मुलाचे परावलंबित्व नको म्हणून प्रत्येकानें लहानपणींच आंधळ्यांच्या शाळेत जाऊन अंधाचा व्यवहार शिकावयाचा कीं काय ? ही गोष्ट खरी कीं उत्तरोत्तर एकत्र-कुटुंबपद्धति मोडत आहे आणि खेड्यांतील वस्ती शहरांत जाऊन दारिद्र्याच्या वाढीबरोबर महागाईचीही वाढ होत आहे. अशा स्थितींत घरांतील एकाकी बायकोस दुर्दैवाने वैधव्य प्राप्त झाल्यास तिची स्थिति अत्यंत बिकट होईल. पण यास धंदेशिक्षण या इलाजापेक्षा एकत्र-कुटुंबपद्धति, पुनर्ग्रामरचना, घरगुती उद्योग, प्रांतांतील अनाज गैरवाजवी प्रमाणांत बाहेर न जाऊं देणे, साधी रहाणी, इत्यादि अनेक इलाज सुचवितां येतील. परंतु प्रस्तुत तो आमचा विषय नाहीं. आमचें म्हणणें इतकेंच कीं, स्त्रियांस जरूर ते (स्त्रीधर्म) शिक्षण असावे व त्यांस कांहीं मर्यादेपर्यंत

§ So far as they are minds and souls having a common humanity, boys and girls require the same education, and if a boy requires instruction in science and philosophy, in poetry and art, in history and politics, for the proper moulding of his mind and heart, a girl equally requires, the very same things for the very same purposes If a boy needs to be trained up for a profession, learned or industrial, so that he may be enabled thereby to maintain himself and his family when he would have one, a girl needs the same training unless you foolishly hope that her husband, if she should have one, will always be able to feed her, or unless you anticipate without horror her everlasting dependence upon and subjection to her other male relatives or her male friends. —*Brahma sadhan P. 180.*

स्वतंत्रताही असावी. पण जेणेकरून त्यांच्या स्वाभाविक धर्मशीलास धक्का पोंचेल असे स्त्रियांचे रूक्ष बुद्धिवादी अथवा स्वैराचारी पुरुष बनवूं नये. इंग्रजी शिक्षणाने हिंदु तरुणांस अधार्मिक केले हे जर अनुभवसिद्ध आहे तर तशाच प्रकारच्या शिक्षणाचा हिंदु स्त्रियांच्या भावनाप्रधान मनावर भलताच परिणाम होईल हें काय सांगावयास पाहिजे! पण स्त्रीशिक्षणाबद्दल ब्राह्मांचा केवढा हा अट्टाहास!* स्त्रियांस पुरुषी शिक्षण दिल्यास त्यांच्यात अनेक निवेदिता किंवा बेझंटबाई निर्माण होतील ही दुराशाच आहे. ख्रिस्ती जगातील सिस्टर निवेदिता आणि बेझंटबाई आपणांस दिसतात; पण परदेशातील स्त्री-स्वातंत्र्याच्या मूर्ति अशा कित्येक सामाजिक स्त्रियांचीं जी अमंगल चित्रे विदेशी ग्रंथकारच रेखाटतात व तिकडे गेलेले आपले कित्येक स्पष्टवक्ते देशबांधवही सांगतात, त्यावरून तिकडील संस्कृतींतील धोक्याची दिशाही आपण जाणली पाहिजे!

**स्त्रियांचा विवेक—**

"न स्त्री स्वातंत्र्यमर्हति" या धर्मानुशासनांत फार अर्थ आहे. जातिवंत कोळसेविक्या आपले कपडे खराब न करतांही धंदा करूं शकेल. पण इतर कोणी कोळशाच्या दुकानी बसल्यास त्यास ते अवधान राहणार नाहीं. मांसाहारी मराठा मांसाहारांतही जे विधिनिषेध येथे पाळतो ते त्यास विलायतेस गेल्यावरही पाळणे कठीण जात नाहीं. पण विलायतेत गेलेल्या ब्राह्मणाने एकदा शाकाहाराची मर्यादा ओलांडली म्हणजे मांसाहारातील

* (अ) . . . I would sow the seed of education right and left and expand our educational energy to the utmost limit in the midst of our female population, without raising the subtle problems of efficiency and without brooking the suspicion of finding a joyless, peaceless home with an affectionless mother and with a wife whose heart has been hardened by an excessive growth of intellect . . Truely speaking, the need of educating girls and women is more vital and more pressing than that of boys and men. —*Religion and Modern India p. 360-61.*

(ब) As regards systematic moral instructions I can only refer to the beautiful books written by Mr. F. J. Gould and other members of the Moral Education League. [ Ibid ] धन्य ते हिंदुपुत्र आणि धन्य त्यांची विद्वत्ता, कीं ज्यांस धर्म आणि नीतिशिक्षणाचे प्रणेते पॉल आणि गोल्ड असेच दिसतात आणि स्त्री-शिक्षणाचा शुद्ध झरा अहिंदु बेथ्यून-संस्थेंतच आढळतो! यांच्या स्वाभिमानाची तारीफ करावी कीं यांच्या गाढ्या विद्वत्तेस हात जोडावे तें कळत नाहीं!

विधिनिषेध पाळण्याची त्यास मुळींच आस्था रहात नाहीं असें अनुभवी सांगतात. त्याचप्रमाणे जगाच्या विषयाटवींत क्वचित् धर्मच्युत होणारा पुरुषही अगदींच मर्यादातिक्रम होऊं नये म्हणून जो तोल संभाळील तें अवधान व ती आस्था विनय आणि मर्यादा सोडलेल्या स्वैराचारी स्त्रियांत रहाणार नाहीं. स्त्रियांचे साहस पुरुषांस वीट आणण्याइतके भयंकर असते. स्वैराचाराच्या दुष्परिणामांचीं ही आत्यंतिक चित्रे स्त्रीस्वातंत्र्याचे महत्त्व कमी करणार नाहींत असे जे म्हणतील त्यांनीं स्त्रीस्वातंत्र्याच्या सुपरिणामाचींही आत्यंतिक उदाहरणे मिरवूं नयेत. इतकेच काय, पण ज्याचे पूर्वपरंपरेचे संस्कार अद्याप गेले नाहींत आणि नवीन शिक्षण व स्वातंत्र्य यांचाही पुरा अंमल ज्यांच्यावर बसला नाहीं अशाही एका अर्थी अपवादभूतच होणाऱ्या सभ्य व मर्यादशील अशा सुशिक्षित स्त्रियाकडे त्यांनीं बोट दाखवूं नये.

**सतीधर्म—**

अपवादभूत स्त्रियाना स्वातंत्र्य कशाला ? त्यांना परिस्थितीचा प्रतिबंधही रोखूं शकत नाहीं. कोंडून ठेवलेली एका याज्ञिकाची बायको श्रीकृष्ण-चिंतनाने ठायींच सायुज्य मुक्ति पावली ! अपवादभूत उदाहरणें कोणत्याच पक्षाचे समर्थन करीत नाहींत. स्त्रीजातींत झाशीची लक्ष्मीबाई किंवा पॅरिसची जोन ऑफ आर्क असल्या स्त्रिया निपजल्या म्हणून स्त्रियांस लष्करी शिक्षण देऊन सरहद्दीवरील पठाणास तोंड देण्याकरितां तर पाठवा-वयाचे नाहीं ना ? पुरुषाचे धर्मही कित्येक स्त्रिया आचरून दाखवितील, नाहीं असे नाहीं; पण त्यापेक्षां त्यानीं स्त्रीधर्मानेच रहावे हे अधिक स्वाभाविक आणि योग्य नाहीं काय ? ज्या विद्या, कला आणि शास्त्रे पुरुषांस उपयुक्त वाटतात त्याचा लाभ स्त्रियांसही कां देऊं नये असे म्हणणारे स्त्रियां-चे व पुरुषांचे जीवनकार्य आणि त्यांची मनोरचना एकसारखीच आहे असें उगाच गृहीत धरीत असतात. त्यांचा जीवनकार्यभेद तर विधीनेंच उघड केलेला आहे. त्याचप्रमाणे त्याच्या मनोरचनेतही भेद आहे. ह्याच आधुनिकांची स्त्रैणस्फूर्ति जेव्हां कविता प्रसवूं लागते, तेव्हां तरुणीच्या सुमनांचे वर्णन करतांना जाई, जुई, मधुमालती किंवा चंपककलिका यांच्या पलीकडे ती जात नाहीं; उमदा गुलछबू किंवा भरगच्च झेंडू अथवा प्रशस्त धत्तुरा किंवा दाठर कचोरा ह्या फुलांच्या उपमा ती त्यांस लावीत नाहीं. अशा अनेक

रीतीनें ते स्त्रियांबद्दल आपली भिन्न भावना व्यक्त करीत असतात. मग शिक्षण आणि स्वातंत्र्य यांचे बाबतींत स्त्री-पुरुषांतील समतेबद्दल त्यांचा दुराग्रहच नव्हे काय ?* पुरुषी शिक्षण आणि स्वातंत्र्य या बहुमोल वस्तु स्त्रियांस न देणे हा मोठाच अन्याय असे त्यांस वाटते. पण साऱ्या बहुमोल वस्तु सर्वांसच शोभतात आणि पचतात असे थोडेच आहे. नवयुगांतील कित्येक सुशिक्षित तरुणांचे चेहरे डोकींचे केशकलाप व मिशांचे क्षौर यांमुळें स्त्रियांच्या चेहऱ्याशीं बरेच साधर्म्य पावतात, म्हणून त्यांनीं स्त्रियांच्या बुगड्या आणि नथ ह्या बहुमोल दागिन्यांचा हेवा करणे ही कल्पनाही जर हास्यास्पद–नव्हे–असह्य आहे, तर ह्या कल्पनेतील पुरुषी चेहऱ्यांशीं स्त्री-भूषणांनीं होणाऱ्या बहिरंगाच्या विजोडाप्रमाणे पुरुषी स्वातंत्र्य व शिक्षण हीं अमूर्त नरभूषणे स्त्रियांच्या अंतरंगावर चढविणे हे केवळ हास्यास्पदच काय पण अतिशय घातक होईल हे सुज्ञांसही कळूं नये काय ? बहिरंगापेक्षा अंतरंगांतील विसंगतीबद्दल अधिकच काळजी घेतली पाहिजे हे उघड आहे.§

**भिन्न संस्कृतीची मोहनी—**

ब्राह्मतविश्वासांत स्त्री शिक्षण व स्त्री-स्वातंत्र्य यांसंबंधी ब्राह्मांचें आपसांत एकमेकांशीं इतकेच काय पण ब्राह्मेतर सुधारकाशीही जितके एकमत आहे, तितकें दुसऱ्या कोणत्याही मुद्द्यावर नाही. असे असल्यामुळे ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध अशा ह्या पुढाऱ्याचे स्त्री–धर्मासंबंधीं अत्यंत निश्चित अशा स्वरूपाचे विचार अमान्य करताना बराच विचार पडतो, हे खरे. पण विचाराअंती आमची अशी खातरी झाली आहे कीं, सर्वांत जुन्यापुराण्या अशा हिंदूंना परचक्रांच्या हजारों वर्षांच्या काळांत संघटित ठेवणारी जी हिंदूंची अभेद्य संस्कृति त्या संस्कृतीचे वर्णाश्रमधर्मबंधन आणि स्त्री–पुरुषसंबंध हे विशिष्ट प्रकारचे मजबूत दुवे आहेत. हे तोडण्यातच हिंदुधर्मास विस्खलित करून परकीय संस्कृतीला वर्चस्व मिळणार आहे ! परकीय संस्कृतीचे पुरस्कर्ते खेळत असलेले आर्थिक व राजकीय डाव जसे आम्हांस बराच काळ कळतही नाहीत, तसे हेही त्याचे डाव आमच्या

---

* To earnest, unbiassed people, it must be evident that women, equally with men, have the right of free, that is liberal, all round education, free movement, and free livelihood. —*Brahmaism p 371.*

§ We can not, again, too strongly deprecate the mentality that decries Sati Dharma in order to have it replaced by a debasing and debilitating frivolous life. —*P. B., September 1927.*

भोळसट विद्वानांस कळतच नाहींत, असें म्हणावें लागतें.‡ हिंदु-स्त्रियांचा सतीधर्म विदेशी स्त्रियांच्या स्त्रीधर्मापेक्षां - निदान धार्मिक दृष्टीनें—कितीतरी पटीनें श्रेष्ठ आहे, याबद्दल आम्हांस तिळप्राय शंका नाहीं. सामान्यत्वें हिंदु स्त्रीचें मुलांवरील असीम प्रेम, पतीवरील निष्ठा, श्वशुराबद्दल आदर, भावासंबंधीं कळकळ, आप्तेष्टांबद्दल कर्तव्यबुद्धि, धर्माबद्दल आस्था, ईश्वरावरील भक्ति, संतोष, तितिक्षा इत्यादि गुणालंकृत धर्मशीलाची बरोबरी सामान्यत्वे कोणत्याही देशाच्या स्त्रिया करूं शकणार नाहींत. असे असतां आमच्या स्त्रिया मूर्ख आणि सर्वस्वीं परतत्र अशी आपली व्यर्थ समजूत करून घेऊन, आंग्लाईनें व्यामोहित केलेले आमचेच विद्वान् पुढारी, स्त्रीशिक्षण व स्त्री-स्वातंत्र्य यांचे आदर्श म्हणून विदेशी मडमा त्यांच्यापुढे उभ्या करीत आहेत ही आमच्या मायभूमीची व तिच्या मुलींची धादान्त विटंबना होय ! हे पौराणिक धर्मांतून वैदिकधर्माकडे जाणे नव्हे.§ विदेशी बायांचे स्त्रियास निरुपयोगी पुस्तकी ज्ञान, घटस्फोटाचा हक्क राखून पतिनिष्ठा, जुजबी अपत्यप्रेम, तुटक वृत्ति, पुरुषी आचार, मतदानहक्कासाठीं मारामाऱ्या, व्यक्तिस्वातंत्र्य, नसते उपद्व्याप, लोकेषणा, वशीकरणपद्धति, परपुरुषांशी नाच वगैरे लगट, अर्धवट पोशाख अशा ह्या अनेक विजातीय गोष्टीपैकीं कोणत्या गोष्टी हिंदुस्त्रियांस विशेष स्पृहणीय आहेत ? त्यांच्यांत कांही स्पृहणीय गुणधर्मही असतील. ते त्यांचे त्यास लखलाभ होवोत. त्याची नालस्ती करण्याचा आमचा हेतु नाहीं.

‡ How can such missionery literature fail to produce ill feeling? It has been one of the potent causes of the "modest" assumption of the superiority of the West, especially as the unspeakable immorality of western night life, the appalling social irregularities and miseries and filth of western slums, have not yet been sufficiently exposed in the orient. If one can see to what an alarming extent the missionery literature is responsible for the deplorable one-sided information—and that the worse side—which the West possesses and to what an extent this literature is responsible for its superiority complex, in that alone one would find enough justification for the revolt of the East against the whole missionery enterprise!

—*John Jesudasan Cornelius P. B September 1927.*

§ We hold that the present women movements are only a return from the Pauranika ideals of life to the Vedic ideals.

—*P. B. September 1927.*

विलायतेंतील अबलोन्नतीच्या चळवळीचें स्वरूप उत्तरोत्तर अधिक शुद्ध व व्यवहारोपयोगी होत चाललें आहे असे म्हणतात तेही खरें असेल. पण आजकालच्या क्रांतिकारक सुधारकांनीं स्वकीय संस्कृतीच्या गुणांप्रमाणें परकीय संस्कृतीचे दोषही आपल्या नजरेआड करतां कामा नये. आणि याच दृष्टीनें आम्ही हें गुणदोषविवेचन करीत आहोत. हिंदू स्त्रिया सर्वतोपरी निर्दोष व परकी स्त्रिया तेवढ्या निंद्य असा आमचा भाव नाहीं. इतकेंच नव्हे तर व्यवहार-चातुर्यादि अनेक गुण परकी स्त्रियाकडून घेण्यासारखेही आहेत. पण आमचें म्हणणे इतकेंच कीं, नवीन शिक्षणाच्या उपयुक्ततेचा विचार करतांना हिंदु स्त्रियांच्या धर्मभावनेस व मर्यादशीलतेस ते कितपत सुसंगत व उपकारक होईल याचा अधिक विचार अवश्य व्हावयास पाहिजे.§

## हिंदूंची निष्ठा—

तात्पर्य, ब्राह्मांनीं भलत्याच क्रांतिकारक सुधारणांचा मोह आणि स्वमताचा दुराग्रह सोडून द्यावा आणि यापुढे केवळ हिंदूधर्माचीच आस्था बाळगावी, म्हणजे त्यांतच त्यांस सद्बुद्धि सुचेल रिकाम्या ब्राह्ममंदिरांतील उपासकांनीं देवळांतून किंवा वारकऱ्याच्या फडांतून भाविकांची गर्दी कां होते याचे कारण शोधावे म्हणजे मनुष्यस्वभावाचे मर्म त्यांस कळेल. ब्राह्म सिद्धान्तांचे शाब्दिक ज्ञानही ज्यांस धड झालेले नाही अशा ब्राह्मपीठावरील धर्मोपदेशकानी आपल्या पुण्यभूमीतील श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ अशा सत्पुरुषांचा एकनिष्ठेने आश्रय करून पहावा, म्हणजे त्यांच्या मनाची अढळ बैठक, "हे विश्वचि माझे घर" अशी त्यांची व्यापक बुद्धि, आणि त्याचे "सहज बोलणे हाचि उपदेश" ह्यांतील जादू–म्हणजेच त्यांची चित्तापहारक शक्ति, कशी असते ते ब्राह्मांस कळून येईल. ज्यांना रविवारच्या उपासनेचीं टांचणे काढण्याकरितां शनिवारीं

§ And the crucial question has been asked. "Has woman profited by what equality she has achieved? Is she happier than before?" An Italian lady writing in current History (New York) says "Yes, woman has to-day the vote, glory, power, independence, often has wealth, freedom to do what she pleases, but she does not have love and affection, none to think of her and of whom she can think, she is alone, alone and desolate ..." The writer's opinion is certainly worthy of respect, because she holds an honourable position as an author. —*P. B. September 1927.*

रात्रीं जागावे लागते, त्या ब्राह्मप्रचारकांनीं वेदविद्या मुखोद्गत कशी असते हें नैष्ठिकी ब्राह्मणांच्या घराण्यांतून अजूनही पहावें. तसेच साधारण ब्राह्मांचे परात्परगुरु ब्रह्मानंद केशवचंद्र सेन हे अंतकाळीं "मजमध्ये कांहीं गुणलेश असला तर तो तुझेपासूनच मीं घेतलेला नाही काय?" असें ज्या आपल्या वृद्ध मातेस म्हणाले, तिचे धर्मशील कोणत्या प्रकारच्या शिक्षणाने व स्वातंत्र्याने बनलें होते याचा विचार ब्राह्मांनीं पुनःपुन्हा करावा म्हणजे हिंदुविधवा हे हिंदुधर्माचें एक भूषण होय असे महात्मा गांधी काय अर्थानें म्हणतात त्याचे रहस्य त्यांस कळेल.

**समारोप—**

देवांचीं मंदिरे, तपोनिधींचे मठ, नैष्ठिकी ब्राह्मणांचे चतुर्विध आश्रम आणि स्त्रियांचे शील हे जे धर्माचे केंद्र सांगितले, ते आज सर्वतोपरी निर्दुष्ट नसतील. अनाचार, आळस आणि अज्ञान असे दोषही त्या ठिकाणीं कोठे कोठे आढळतील. ते सुधारण्यासाठीं ब्राह्मपुढाऱ्यांनीं अवश्य प्रयत्न करावा. अनेक वर्षांच्या पारतंत्र्याच्या आपत्कालामुळे हे संशोधनाचे व पुनरुज्जीवनाचे काम वरचेवर करावे लागेल हे खरे. प्लेगची सांथ जर सोडीत नाहीं, तर घरें स्वच्छ करावीं; पण तीं जाळून जमिनदोस्त करूं नयेत. निदान ही जुनीं घरे आतां सुधारणे अशक्यच आहे, आणि त्याहून अधिक योग्यतेची नवीन घरें तयार आहेत, अशी जाणत्याची पुरी खात्री होईपर्यंत तरी सबूर करावी.

**दुसरी बाजू—**

ब्राह्मसमाजाची जी उज्ज्वल बाजू आहे त्याचे वर्णन ब्राह्मांच्या ग्रंथांवरून या पुस्तकाच्या चार भागात (१) ब्राह्मांचे नवयुगधारी, (२) नवयुगवर्णन, (३) नवविधान आणि (४) नवयुगधर्म, ह्याप्रमाणे सविस्तर केले परंतु अशा रीतीने एक बाजू वाचकापुढे इतक्या विस्ताराने मांडल्यावर जुन्या मतवाद्यांच्या दृष्टीने त्याची दुसरी बाजूही स्पष्टपणे दाखविणे आमचे कर्तव्य आहे. शिवाय ब्राह्मपुढाऱ्यांची असामान्य विद्वत्ता व त्यांच्या प्रयत्नांचा शंभर वर्षांचा दीर्घ व शांततेचा काल हे लक्षांत घेता लक्षांत घेण्यासारखी फलनिष्पत्ति कांहींच झाली नाहीं असेच म्हणावे लागते.* तेव्हां हा दोष

* "...The present condition of the congregation was not encouraging. Attendance at the Sunday services was not

कोणाचा याचा कसून विचार होणें अगत्याचें आहे. तो विचार ब्राह्म विद्वान् पूर्वीपासून करीतच आहेत. व येत्या शतसांवत्सरिक उत्सवाच्या निमित्ताने पुढेही करतीलच. पण नाटकाच्या उपांत्य अंकाच्या शेवटीं नाटकमंडळीच्या सूत्रधाराप्रमाणे प्रेक्षकांपैकीही एखाद्याने काहीं परीक्षणात्मक व सूचक बोलावें त्याप्रमाणें ब्राह्मसमाजाच्या शतसांवत्सरिक समारंभास अवघे एक वर्ष राहिले असतां आम्ही हा ग्रंथ प्रसिद्ध करीत आहोत. तेव्हां त्यांत गर्भित असलेल्या आमच्या नम्र सूचना सूत्ररूपाने पुढें देऊन आम्ही हा खंड समाप्त करतो.

**काहीं सूचना—**

१. जगाचा सार्वत्रिक धर्म हे कदाचित् कधींच न साधणारे ध्येय आहे, त्यास जग अजून तयार नाही. आणि परतंत्र हिंदुस्थानाने ते जगास शिकवू पहाणे व्यर्थ आहे. यास्तव ब्राह्मानीं शभर वर्षांच्या अनुभवानंतर आतां यापुढे तरी त्या नादीं विशेष लागूं नये.‡

२. ते ध्येय साध्य आहे असे मानले तरी परतंत्र हिंदुस्थानाने अगोदर कट्टे (म्हणजे कडवे नव्हे) हिंदु व्हावयास पाहिजे. पण ब्राह्मांची दृष्टि उलट आहे.*

---

satisfactory. The institutions for the moral and religious training of children were in a moribund condition. The organisation of the youngmen and women were any thing but satisfactory. The Brahma Samaj laid too much emphasis upon constitutions and rules, but forgot that without leadership no institution could thrive. The machinery of the Brahma Samaj appeared as if it lacked proper organisation, it lacked brain as well as heart. Many Brahmas did not pay any attention to the fundamental principles of the Samaj and hardly read the scriptures systematically.

—*I. M. 9-8-1925.*

‡ A universal form or worship is, no doubt, a more mouthful phrase and a more delightful vision. But it is against the overwhelming evidence of experience and the unalterable laws of human mind; and as such, it will ever remain an idle dream —*Pro. Dhirendra Mohan Dutta,*

* If the Brahmo Samaj is the national religion of India, it is so because it is the universal religion of future humanity.

—*Hemchandra Sarkar. I. M. 4-9-27.*

३. हिंदूंतून फुटून बाहेर पडण्याची दुर्बुद्धि ब्राह्मांनीं अवश्य सोडली पाहिजे सार्वात्रिक धर्मात ब्राह्मसंप्रदाय जर अविरोधाने राहूं शकेल तर त्यास हिंदुधर्मातही तसें राहतां येईल.

४. सर्व धर्मांच्या, वर्णांच्या व पंथांच्या लोकांचे साप्ताहिक समेलन आणि सार्वत्रिक अभ्युदयार्थ प्रार्थना असें ब्राह्मसमाजाचे सामाजिक स्वरूप पुढेही ठेवावे. पण धर्म मात्र ज्याचा त्याने निष्ठापूर्वक पाळावा.

५. अनाचार, असंमत आचार किंवा भिन्नाचार यामुळे पोटजाति पडत असाव्यात. यासाठी आचारशुद्धि व आचारसादृश्य याकरिता अगोदर प्रयत्न करून नंतर एकीकरणाच्या नादीं लागावे.

६. चार वर्ण आणि चार आश्रम यांचे अवश्य संगोपन करावे. वर्णाश्रमधर्म ही उपहास करण्यासारखी बाब नाहीं. ती सामाजिक अभ्युदयास अपकारक नसून उपकारक आहे. प्रेम आणि सेवा या वृत्तीस त्यांत पूर्ण वाव आहे. वर्णाश्रमरचना ही धर्मरहस्याची कुडी आहे. धार्मिक, राजकीय व सामाजिक सर्व अडचणीस उपाय व सर्व प्रश्नास बिनतोड उत्तर वर्णाश्रमधर्म हेच एक आहे. वर्णाश्रमधर्मपालनाची आज जीं कोठे उत्कृष्ट उदाहरणे असतील, त्याचे आस्थापूर्वक दीर्घकाल निरीक्षण करून ह्या संस्थांतील रहस्य जाणावे. संकरावाचून आजच नडलेले नाहीं. संकराची तामसी हौस दाबावी. धर्मरक्षणार्थ चातुर्वर्ण्याची जर एका काळी आवश्यकता होती, असे कित्येक ब्राह्म व ब्राह्मणेतर पुढारी कबूल करतात, तर ती आजही आहे. पालटणारे (elastic) चातुर्वर्ण्य ह्या शब्दात काहींच अर्थ नाहीं. गुणकर्माप्रमाणें वर्णांतर करणे निदान सद्यःस्थितींत तरी अव्यवहार्य आहे.

७. भेदात ऐक्य पाहणाऱ्या ब्राह्म तत्त्वज्ञाना वर्णभेद हे नडूं नयेत. भेद अपरिहार्य आहे. द्वेषाचा परिहार अवश्य करावा. पण भेद नको म्हणणारांतच पुष्कळ वेळां द्वेष तीव्रतर आढळतो! ख्रिस्ती आणि इस्लामी धर्मांतही असंख्य पोटभेद आहेत हें ब्राह्मानीं लक्षांत घ्यावे.

८. व्यक्ति, संप्रदाय, देश यांच्या व्यक्तिकत्वाचा पूर्ण अभिमान बाळगणाऱ्या ब्राह्मांना ब्राह्मण, वैश्य, सुतार, लोहार, चांभार अशा जातींचे व्यक्तीकत्व निंद्य वाटू नये, ते सोयीचेच वाटावे.

९. कर्मविपाकशास्त्र, पंचकोशविवरण, चतुर्दशलोकविवरण इत्यादि गूढ

शास्त्रांचें हद्दत पुरें समजून घेतल्यावांचून तरी भिन्न धर्मांत व जातींत बेटीव्यवहार आणि रोटीव्यवहार यांचा एकंकार करण्याची घाई करूं नये.

१०. रोटी-बेटीव्यवहार ह्याच जर प्रेमाच्या जामिनक्या असत्या, तर पौराणिक शंतनूच्या व ऐतिहासिक व्हिक्टोरिआ राणीच्या नातवंडांत घोर रणसंग्राम माजले नसते. अकबरानंतर औरंगजेबाची कारकीर्द गाजली नसती.

११. पूर्वपरंपरेत थोराची चिकित्सक बुद्धि व महाजनांचा अनुभव यांचा समन्वय झालेला असतो. धर्मवृक्षावरील हा परंपरेचा वेल जरूरीप्रमाणे व सोयीसोयीने आपल्या वाढीचा रोख व गति राखीत असतो. त्यास धक्का लावून तो मोडणे हा उच्छृंखल बुद्धीचा पोरखेळ आहे !$

१२. श्रोत्रीय आणि ब्रह्मनिष्ठावाचून आचार्यपदाचा अधिकार कोणासही नसावा.

१३. निदान प्रस्थानत्रयीचा अभ्यास केल्यावांचून परधर्मांचा अभ्यास करूं नये असा ब्राह्माचा ( निदान ब्राह्म-प्रचारकावर ) निर्बंध असावा. निरनिराळ्या धर्मांतील तुटक सुभाषितसंग्रह म्हणजे कांहीं धर्मशास्त्र नव्हे. त्यावरून केलेला उपदेश धर्मनिष्ठेस पोषक होत नाहीं.*

१४. ब्राह्माच्या साधनाश्रमात विशेषेकरून ब्राह्मण जातीच्या ब्राह्मांनीं ब्रह्मचर्यादि व्रताचे कडक पालन करून हिंदूच्या मंत्रतंत्र, जपतप, यज्ञयाग इत्यादि कर्मांचा व साधनाचा शास्त्रीय पद्धतीने निष्ठापूर्वक अनुभव घेणारा

$ नववसन्त हा प्रत्येक खेपेस काहीं नवीन नवीन फुले निर्माण करीत नाहीं व तशा प्रकारच्या नाविन्याची आम्हाला गरजही पण नाही वर्षाकाली व वसंतकालीं जुन्या फुलानाच आलेली नवी नवलाई आम्हाला पाहिजे असते जगात जे कांही उत्तमोत्तम व पुरातन आहे ते सरळ असून त्यात कोणत्याही प्रकारचे गौण्य नाही. रवींद्रनाथ.

* None of these compilations ( of Brahmic ideals from Non-Brahmic Shastras ) has ever been very popular in the Samaj They indeed contain valuable texts but being torn off from their context, such extracts lack life and inspiration and cannot take the place of those ethnic scriptures in which truths receive life and form from the personal lives of their teachers and the social history of the people among whom they grew. —*Spiritual wants, p 11.*

साधकवर्ग तयार करावा. निरनिराळ्या धर्मांच्या ब्राह्मांनीं याप्रमाणें आप-आपल्या धर्मानुष्ठानांचे दीर्घ अभ्यासाने व सूक्ष्म दृष्टीने संशोधन करावें.

१५. केवळ मतविश्वासांत धर्मतेज नसून ते निष्ठापूर्वक केलेल्या शास्त्रीय कर्मांत आहे. या गोष्टीचा गंभीर विचारपूर्वक अनुभव घ्यावा.

१६. ब्राह्मांची अनुष्ठानपद्धति व उपासनापद्धति यांत हिंदुधर्मांतील अधिकारवादाकडे पूर्ण दुर्लक्ष केले आहे ते चूक आहे.

१७. सगुण-साकाराची उपासना मुले, स्त्रिया व सामान्य साधक यांस उपकारक व आवश्यक आहे. किंबहुना कोणत्यातरी रूपात ती अपरिहार्यच आहे. ईश्वराच्या अनंत कल्याणगुणांत रूप आणि आकार तेवढेच वर्ज्य कां? यास्तव पूर्वपरंपरा-पुनीत तीर्थक्षेत्रें, पवित्र मंदिरें व प्रतिमा यांचा अव्हेर करूं नये. त्यात अज्ञान आणि अनाचार न राहील अशी दक्षता ठेवावी.

१८. केवळ तात्त्विक उपदेश परिणामकारी होण्यास वक्त्याचे व्यक्तिमाहात्म्य अलौकिक असावे लागते. सामान्य धर्मप्रचारकांनीं पौराणिक व ऐतिहासिक थोर पुरुषांच्या मुखाने व कथाप्रसंगांस धरूनच उपदेश करावा. पौराणिक कथा व संतलीला ब्राह्मांच्या पीठावरून सांगण्यात अग्राह्य कांहींच नाहीं.

१९. कथासंदर्भानें सांगितलेला उपदेश उठावदार व परिणामकारी होतो. अशा वेळीं चिकित्सकाची ऐतिहासिक दृष्टि बुद्धिभेद करून रसहानि करते, हें तार्किक शब्दपंडितानीं विसरूं नये. इसापनीति किंवा पंचतंत्र यांतील गोष्टी ऐकतांना कोल्हा सिंहाजवळ बोलत आहे असेंच चित्र श्रोत्यांपुढे उभे राहण्यांत कांहीं हानि नाहीं, उलट कोल्ह्याला बोलतां येणे अशक्य आहे हा कुतर्क काढणे मूर्खपणाचे आहे.

२०. ब्राह्मानीं पाडवा, वसंतोत्सव ( स्त्रियांचे हळदीकुंकू ), रामनवमी, आचार्यजयंति, शिवजयंति, सावित्रीव्रत, व्यासपूजा, कृष्णजयंति, रक्षाबंधन, पितृपक्ष, अनंतोत्सव, विजयादशमी, लक्ष्मीपूजन, भाऊबीज, कोजागरी, गीता-जयंति, संक्रांत, तुकाराम, रामानुज, चैतन्य, मीराबाई, राममोहन, रामकृष्ण, केशवचंद्र, विवेकानंद, देवेंद्रनाथ अशा थोर हिंदू पुरुषांचे स्मृतिदिन इत्यादि सण अवश्य पाळावे. त्यांच्या समाजमंदिरांत वाटल्यास परधर्मांचे सण पाळावे. पण ब्राह्मांनीं आपआपल्या घरीं फक्त आपल्याच धर्माचे सण पाळावे.

२१. ब्राह्ममंदिरांत उपासनेचे ठिकाणीं अथवा वरतीं गॅलरींत सर्व धर्मां-

-तील थोर महात्म्यांचीं चित्रें व उद्बोधक कथाप्रसंगांच्या तसबिरी, सृष्टिसौंदर्य, गांभीर्य व पुण्यस्मृति यांचे देखावे, हे भरपूर अवश्य ठेवावे. व्यासपीठा-वरील प्रवचन हे एक शब्दचित्रच असते. अशा ठिकाणीं मनाला प्रसन्नता आणणारीं व उत्कृष्ट स्मृति आणि भावना जागृत करणारीं अशी चित्रे प्रार्थना मंदिरांत ठेवण्यास मनाई असणे, हे एक शिकलेल्यांचे खुळें धर्मवेडच आहे.‡

२२. जे तत्त्वज्ञ पंडित आहेत त्याना साधनाची व उपकरणांची गरजच नाहीं. पण सारे जग तसे नाहीं. ते मंदाधिकारीच आहे. यास्तव बायका-मुलांसुद्धां सर्वांना देव निराकार, व्यापक आणि अनंत आहे हे सांगत सुटणे म्हणजे त्यांस नास्तिक व पाखंडीच बनविणे आहे. निराकारावर प्रेम करणे व त्याची दहशत बाळगणे ह्या दोन्ही गोष्टी मंदाधिकाऱ्यांस केवळ अशक्य आहेत. ज्याना स्वतांच्या पांडित्याचे प्रदर्शन करावयाचे नसून परिणामकारक धर्मशिक्षण द्यावयाचे आहे त्यांनीं मनुष्यस्वभाव जसा आहे तसाच धरून त्यास आवडेल व पटेल तेंच सांगत गेले पाहिजे. ह्यासाठीं ब्राह्मांनीं आपल्या बायकामुलांस सर्वकाळ आकाशाकडे पहात "शिवम्, शान्तम्, अद्वैतम्", आणि सृष्टिसौंदर्याकडे बोट करून "सत्यं शिवं सुंदरम्", नाहीं तर मानवी आनंदास अनुलक्षून "रसो वै सः" असे कांहीं तरी सांगत बसून त्या गूढ शब्दांची अवज्ञा करून घेऊ नये.§

२३. ज्या ब्राह्मांना साकाराची उपासना पटत नाहीं व जरूर नाहीं, त्याही ब्राह्मांनीं स्वतांला व आपल्या सभोंवारच्या मंदाधिकाऱ्यास मार्गदर्शक व कल्याणप्रद अशी सूर्य व अग्नि यांची उपासना प्रत्यही करावी.

२४. केवलाची ( Absolute ) उपासना ही वाऱ्याची मोट बांधण्या-प्रमाणें दुर्घट आहे. ज्या ब्राह्मांस ती साधली असे वाटत असेल त्यांचा तो हजार हिश्शांनीं भ्रमच असावा. तो एक दिव्य लोकोत्तर अनुभव आहे. तो

---

‡ No graven image, statue or sculpture, carving, painting, picture portrait or the likeness of anything shall be admitted within the said prayer-hall, or building &c. —*Trust-deed of S. B Samaj.*

§ *Satyam, Sivam, Sundaram, Raso vai sa* are texts that have nothing to do with the world of maya, and even the most innocent joy arising from the contemplation of Nature is not *parmananda*, but *vishayananda.* —*Pessi p. 44.*

ब्रह्मानुभव म्हणजे तत्त्वज्ञान्यांचा शब्दच्छल किंवा कवींची कल्पना नव्हे. त्यासाठीं सगुणापासून निर्गुणापर्यंतची साधनपरंपरा अविच्छिन्न राखली पाहिजे. नाहींतर एकदम सात हजार फुटांवर नेलेल्या विमानांतील अनभ्यस्त प्रवाशांप्रमाणे मंदाधिकाऱ्यांचें त्यांत ( धर्मतः ) मरण आहे.‡

२५. शिक्षण हा ब्राह्मांचा एक उद्योग आहे. पण कोणास काय शिकवावें याचा कांहींच कित्ता त्यानीं अद्याप घालून दिला नाही. बालसंगोपन पुरुषांनीं शिकावे आणि कायदेपंडित स्त्रियांनीं व्हावें. मीमांसा-शास्त्र यवनानें शिकावे आणि ब्राह्मणाच्या मुलीनीं पोल्ट्रीचा घरगुती धंदा शिकावा. अशी ही शिक्षणाची भिशी सुरू आहे. शिकलेल्यांपैकीं शेकडा पाउणशे गोष्टींचा परिणाम परीक्षा पास होणे व मागून विसरून जाणे यांपेक्षां अधिक नसतोच. आणिक एक परिणाम राहिला तो धर्मशील भ्रष्ट करणे हा होय. ब्राह्मांनीं याचा विचार करावा.

२६. धर्मशिक्षणाची खरी जागा आपले किंवा गुरूंचे रहाते घर ही आहे. शाळा, कॉलेजे व ब्राह्ममंदिरे ह्या धर्मशिक्षणाच्या वास्तविक जागा नव्हत.

२७. ब्राह्म-प्रचारकांनीं विचारांच्या बरोबरीने धार्मिक आचारशुद्धीकडे लक्ष द्यावें तितके थोडेच आहे.

२८. भोगप्रधान आणि भावनाप्रधान ब्राह्मानीं साधनचतुष्टयाच्या निरनिराळ्या उपांगाचे महत्त्व मुळींच जाणले नाहीं.

२९. धर्माचे बाबतींत अनियंत्रित मतस्वातंत्र्यापेक्षां शिस्त, परंपरा आणि आप्तवाक्य यांचे पारतंत्र्य अधिक श्रेयस्कर असते. धर्माचें तत्त्व फार गूढ

‡ It was the height of self—deception—*mithyachara* to profess an abstract and monistic form of worship while in reality the mind was not yet developed enough to get beyond concrete and pluralistic ideas. The same was also true of idols as conscious symbols that helped the intellect in the tasks of conceptions and concentration.. .... So Fichte said " every so-called concept of God is necessarily that of an idol. As for the practical worth of idolatry, it will not be altogether unsafe to refer to the testimony of Hindu experience. Throughout the long history of Hinduism we find how worship of idols in the right spirit has produced a considerable number of saints whose spiritual perfection would stand any intrinsic test of any other religion.

—***Prabudha Bharat.***

असतें. त्यावर स्वतंत्र मत देण्याचा अधिकार फारच थोड्यांत असतो. धर्माचे अंतरंगांत बहुमताचाही शिरकाव होणार नाहीं व होऊं नये.§

३०. महंमद, मोझेस आणि हॉवर्ड अशा पुरुषांशीं मानसिक समागमाचा प्रयत्न करण्यापेक्षां विद्यमान संतांशीं प्रत्यक्ष संतसमागम ब्राह्मांनी प्रयत्नेंकरून साधावा म्हणजे गुरुवादाचे रहस्य त्यांस कळूं लागेल.

३१. स्त्रियांच्या राहण्याची व शिक्षणाची खरी जागा सामान्यतः त्यांचें रहातें घर हीच असावी. हल्लींचीं हॉस्टेलें, हायस्कुलें व कॉलेजें‡ ह्या त्यांच्या जागा नव्हत. स्त्रियांचे शिक्षण पुरुषांच्या शिक्षणापेक्षां फारच मर्यादित व केवळ त्यांच्या स्त्री-धर्मास आवश्यक तितकेंच असावें. ईश्वरास आणि सत्पुरुषांस स्त्रिया व मुले फार आवडतात, याचे एक कारण त्यांचे अज्ञान होय. कोऱ्या पाटीवर हितबोधाचा संदेश स्पष्ट लिहितां येतो. तेथे विकल्पाची किचबीड नसते. उत्कृष्ट धर्मशील व पुस्तकी विद्या ही परस्परावलंबी मुळींच नाहींत. हें ब्राह्मांनीं पूर्व पिढींतील स्त्री चरित्रांवरून जाणावें.

३२. प्रपंचांतील टापटीप व काटकसर ज्यांच्या आंगवळणीं पडली नाहीं त्या मुलींनीं बीजगणिताच्या किंवा नफ्यातोट्याच्या उदाहरणांतील कूटें सोडविलीं तर फायदा काय ? ज्यांना घरचे कष्टाचे चार धंदे करण्याची कुवत नाहीं. त्यांचे आरोग्यशास्त्राचे अध्ययन व पुरुषी कवाईत ही कशाला ? पुराणें म्हणजे भाकडकथा, व कुलाचार म्हणजे धर्मवेड अशी ज्याची भावना त्या मुलींनीं इंग्रजांचा इतिहास घोकून उपयोग काय ? भारतभूमीतील तीर्थक्षेत्रांचे माहात्म्य

---

§ The Brahma Samaj had rightly denied the infallibility of Prophets and Scriptures, infallibility to which the older religions appeal. But its appeal to the common belief, if any such thing at all exists, of all mankind, seemed no more reasonable than the old appeal. It seemed rather worse, for while the Prophets and Scriptures indicate some amount of culture, this appeal was made mostly to the belief of the uncultured and thoughtless masses. —*Pt. Sita Nath.*

‡ The Boarding Institution of the ( Betbune ) College which consists chiefly of the advance ( female ) students is heterdox and in that sense unHindu. —*Brahmaism p. 365.*

ज्यास माहीत नाहीं त्यांनीं अमेरिका व आस्ट्रेलिया येथील व्यापारी शहरे पाठ करणे याहून अप्रयोजकपणा तो कोणता ? व्रतवैकल्याने उत्पन्न होणारे अदृष्ट ज्यास कळत नाही त्या बी. एस्सी. झाल्या म्हणून काय करायचे ! ज्यांना सतीधर्म मानवेना त्या तत्वज्ञानाच्या एम्.ए. असल्या तरी काय होय ! ज्यांत शीलसंवर्धन नाहीं आणि स्त्रीव्यवहारोपयोगिताही नाही ते स्त्री शिक्षण कसचे !

३३. स्त्रीधर्मास साजेसा स्त्री-शिक्षणाचा अभ्यासक्रम ठरेपर्यंत तूर्त मुलाप्रमाणे मुली शिकल्या म्हणून काय झाले ? असे म्हणणे म्हणजे परकरांचे व साड्यांचे माग लागून कापड निघेपर्यंत मुलींनीं विजारी घातल्या म्हणून काय झाले ? किंवा सावंतवाडीहून नवीन खेळणी येईपर्यंत चाकू कातऱ्यांशीं मूल खेळले म्हणून काय झाले ? असे म्हणण्यासारखेच वेडगळपणाचे किंबहुना त्याहून अधिक घातक आहे. पुरुषी शिक्षणावाचून स्त्रियाचे आज मुळींच अडलेले नाही. ब्राह्मपुढाऱ्यांच्या कर्तृत्ववान् माता चंद्रमुखींच्या हॉस्टेलात किंवा बेथ्यून विद्यालयात कधीच नव्हत्या. धर्मशील म्हणजे काय ह्याबद्दल अनुभवाच्या चार गोष्टी ब्राह्म-पुढाऱ्यासही सांगतील अशा अशिक्षित गणलेल्या स्त्रिया जुन्या चालीच्या घराण्यातून आजही ठिकठिकाणीं आढळतील.

३४. शेक्स्पीअर आणि कालिदास, बाण आणि बायरन्, स्कॉट् आणि रेनॉल्ड् इत्यादि ग्रंथसागरांत अवगाहन करणाऱ्या आधुनिकांच्या मत्स्यकन्या अखेर सापडल्याच तर नास्तिकवादाचा दुर्गंध येत असणाऱ्या एखाद्या धीवराच्याच जाळ्यांत सांपडणार इकडे धर्मश्रद्धावत ब्राह्मानी लक्ष ठेवावे.

३५. पुरुषानीं काय व स्त्रियानी काय पुनर्विवाह करणे हे काहीं मर्यादेपर्यंत क्षम्य व व्यावहारिक दृष्टीने जरूरही होईल. पण धार्मिक दृष्टीने तो एक आपद्धर्म आहे ही केशवचंद्रांची दृष्टि ब्राह्मांनीं सोडूं नये विधवाविवाह रूढ होण्यासाठीं "माझ्या आप्तेष्टांच्या मुली पुनर्विवाहासाठीं विधवा होवोत," असे मनापासून इच्छिणाऱ्या ईश्वरचंद्रापासून आधुनिक नाट्य-कवि कादंबरीकार अशा कित्येक सरस्वती-चंद्रांपर्यंत तरुण विधवाची भूमिका मनोहर करणारे इतके सारस्वत एकसारखे निर्माण होत आहे कीं, आतां यापुढे एखादा होतकरू रसिक तरुण आपणांस पति मिळावा अशी इच्छा करणाऱ्या कुमारिकेस लग्नापूर्वीच वैधव्याची इच्छा करण्याची अनवस्था प्राप्त होणार आहे ! हिंदु धर्मातील विधिनिषेधांची शास्त्रीय दृष्टि आधुनिकांनीं सोडली, त्याचे हे फल

होय! महात्माजी हिंदु विधवांची विरागवृत्ति स्पृहणीय मानतात, आणि ब्राह्मपुढारी त्यांच्या ठिकाणीं बळेच अनुरागवृत्ति उत्पन्न करतात. केवढा हा फरक ! आम्ही ब्राह्मांस कामुक मानतो ते याचसाठीं !

३६. विधवाविवाहांचा स्तुत्य विधि म्हणून पुरस्कार करण्यापेक्षां, पुनर्विवाह करण्याचे प्रसंग कमी येतील असाच प्रयत्न करणें बरें. प्रौढविवाह करू इच्छिणाऱ्या ब्राह्मांनीं वधूवरांचे देहधर्म जागृत होण्यापूर्वीं वाग्निश्चय करण्याची चाल अवश्य पाडावी. या बाबतींत केशवचंद्र व प्रतापचंद्र यांचे विचार चिंतनीय आहेत. अमेरिकेतील संयुक्त संस्थानात १६ वर्षांच्याखालीं असलेलीं विवाहित माणसे ६६७००० आहेत असे म्हणतात !

३७. प्रीतिविवाह ही भूल आहे.§ यांत पशुवृत्तीचेच प्राबल्य वाढत जाईल. शिवाय अगदीं विद्वान् दंपत्य असलें, तरी स्वमताग्रह, आवडनावड, स्वातंत्र्यप्रीति, मनाची स्वैर मधुपवृत्ति इत्यादि अनेक कारणांमुळे सहेतुक झालेला विवाहाचा सौदा केव्हां बिनसेल त्याचा भरंवसा नसतो. बालविवाहांतील अकृत्रिम, एकनिष्ठ, निर्हेतुक व पवित्र प्रेम अधिक शाश्वतीचे असतें. विलायतेत प्रीतिविवाहाची पुढील आवृत्ति "प्रयोगादाखल जुजबी लग्नें" (small marriages) ही आहे. ब्राह्मांनीं वेळींच सावध व्हावे.

३८. मिश्रविवाह ही विवाहबंधन मुळींच नसावे असे म्हणण्याच्या अलिकडील पायरी आहे. आहार आणि विहार यांत स्वैरवृत्ति† म्हणजे सुधारणा नसून रानटीपणा आहे.‡ ती माणुसकी नसून पशुवृत्ति होय. ह्या विवाहांत स्वयंनिर्णयाचे क्षेत्र वाढविण्यासाठीं भिन्न जातीतील व धर्मातील युवयुवतींचीं संमेलने बुद्ध्या घडवून आणणे* म्हणजे सभ्यांचा अनाचार होय! मानसिक व्यभि-

---

§ What people, however call "love matches" now a days have error for their father and need for their mother!
—*Nictzsche.*

† They (educated young people) put liberty before authority, conscience before tradition, and in marriages love before the barriers of caste and community —*Dr. G. Y. Chitnis.*

‡ Many thinkers are of opinion that re-barbarisation is already there.
—*pessi p. 4.*

* We realise that such intercommunal marriages can-

चार इतकेच काय, पण लग्नापूर्वींच गर्भधारणादि घोर पापें यांत घडण्याचा संभव असतो! हीं लग्ने म्हणजे कधीं कधीं पतितांच्या पावनविधीचा देखावा असतो!

३९. कुलवधूचें वर्णन ब्राह्मधर्मांत जे केले आहे तेवढे तरी ब्राह्म युव-युवतींनीं लक्षांत ठेवावें.* पतिपत्नीनीं आपसांतही मतस्वातंत्र्य व आचार स्वातंत्र्य मिरवूं नये.

४०. ह्या विषम जगांत " समान हक्क " याच्याइतके चुकीचे मत आज दुसरे क्वचितच प्रचलित असेल. प्रत्येकाच्या योग्यतेप्रमाणे त्यास वागविणे हाच समदर्शीपणा होय. मानवी बंधुत्व याचा अर्थ प्रत्येकाने दुसऱ्याशीं माणुसकीनें वागावे इतकाच करणे योग्य आहे. त्याचा अर्थ संकर किंवा एकंकार असा करूं पहाणे हे अव्यवहार्य, अयुक्तिक व अनर्थकारी आहे.

४१. आज आपल्याला सर्वतोपरी प्राप्त झालेल्या दुःस्थितीचीं कारणे दोनच आहेत. तीं दारिद्र्य व पारतंत्र्य हींच होत. ती दूर होण्यास साधनेंही आज आपल्या हातीं दोनच दिसतात. (१) वर्णाश्रमधर्माची शुद्ध-संघटना आणि (२) तद्द्वारा ईश्वरपरायणता

४२. आजचे सारेच जाति-ब्राह्मण ब्राह्मण्याचे खरे आदर्श नसतील; पण खरे ब्राह्मण्य हे धर्मदृष्टीने हिंदुसमाजाचे भूषण आहे; नव्हे हिंदुधर्माचा प्राण आहे, ही गोष्ट खोटी नाहीं. आणि ते ब्राह्मण्य आजच्या अवनत कालांतही

---

not be made to order ; but if we create social conditions in which it would be possible for members of different castes and communities to meet socially there would not be a very great difficulty in the matter.—*Dr. G. Y. Chitnis S. P.19-6-27.*

* प्रजनार्थं महाभागाः पूजार्हा गृहदीप्तयः
स्त्रियः श्रियश्च गेहेषु न विशेषाऽस्ति कश्चन ॥ २ ॥
सा भार्या या पतिप्राणा सा भार्या या प्रजावती ॥
मनोवाक्कर्मभिः शुद्धा पतिदेशानुवर्तिनी ॥ १५ ॥
छायेवानुगता स्वच्छा सखीव हितकर्मसु ।
सदा प्रहृष्टया भाव्यं गृहकार्येषु दक्षया ॥ १५ ॥
अन्योन्यस्या व्यभिचारो भवदेमरणान्तिकः
एषधर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥ १२ ॥

रक्षण करण्यास जाति ब्राह्मणच पूर्वसंस्कारांमुळे इतरांपेक्षां अधिक समर्थ आहेत. त्याअर्थी ब्राह्मणांनीं ब्राह्मण्याचा अभिमान बाळगावा आणि जे जाति-ब्राह्मण खऱ्या ब्राह्मण्याचें संगोपन करतील ते हिंदुसमाजाचेंच एक महत्कार्य करीत आहेत हे जाणून इतरांनीं त्यास साहाय्यभूत व्हावें हेंच योग्य दिसतें.

४३. जुन्या हिंदु समाजांत अस्पृश्यता दोन प्रकारें मानली जाते. जे जास्त शुद्ध ते सोवळे व जे जास्त अशुद्ध ते विटाळलेले. ही अस्पृश्यता हें धर्मवेड नव्हे. हा अस्पृश्यांचा छळ नव्हे, किंवा सोवळ्याचा ढोंगधत्तुरा नव्हे. प्रवास, सभा, समारंभ, कचेरी, बाजार, रस्ता, सार्वजनिक विहिरी, तळीं कांहीं देवळे इत्यादि ठिकाणीं अस्पृश्याचे निर्बंध कमी करावे. पण अन्नग्रहण, खाजगी उपासना, कोणतेही शास्त्रीय संस्कार व अनुष्ठानें, सतत एके ठिकाणीं बसणें किंवा झोपी जाणें अशा विवक्षित प्रसंगीं, तसेंच, वाहते नसलेले जलाशय, देवळाचे गाभारे, उपासनांच्या जागा, स्वयंपाकघरें निजण्याच्या खोल्या, अशा कांहीं विवक्षित स्थळीं, स्पृश्यास्पृश्यतेचे निर्बंध पाळणें हिताचें व अगत्याचेंही आहे. यांत श्रेष्ठकनिष्ठभाव, बाह्य स्वच्छता व अस्वच्छता यांचा किंवा जातिभेदाचाच केवळ संबंध नसून त्याहून सूक्ष्म अशा संस्कारांचा फार महत्त्वाचा संबंध असतो. ह्या गोष्टी अदृश्य सृष्टींतल्या आहेत. येथें सामाजिक सलोख्याचे किंवा मानवी बंधुत्वाचे विचार कामाचे नाहीत. कुटुंबातील माणसांतही निरनिराळ्या कारणासाठीं अस्पृश्यता पाळावी लागते. समाधिभावांतील मनुष्यास अपवित्र माणसाचा नुसता स्पर्शही असह्य होतो. सत्पुरुषांचे आश्रमांतील वातावरण सद्विचारांनीं भारलेलें असतें असा अनुभव येतो. अशा ठिकाणीं पापी विचारांचीं माणसें न गेलेलींच बरीं.

४४. ब्राह्मसमाजातील सुधारकांचे सुधारणांच्या उत्साहभरांत होत असलेले संकर व सहभोजनादि‡ निरर्थक आचरटपणाचे प्रकार धार्मिक दृष्टीनें अनिष्ट आहेत. अस्पृश्य जगांतील शुचिर्भूत माणसांचा अव्हेर करूं नये. दुसऱ्याचें मन दुखावेल अशा प्रसंगविशेषीं अस्पृश्यता जरूर तर तात्पुरती सोडावी. पण आपण आपल्या घरीं आपल्या पावित्र्यासाठीं स्पृश्या-स्पृश्यतेचे निर्बंध

‡ The removal of untouchability if it means interdinning and nothing less, will, though it is only a half measure, go a long way...... if it is practised systematically and not merely by fits and starts.
—*Spiritual wants, p. 6.*

पाळणे अत्यावश्यक आहे. याचा तज्ज्ञांनीं विचार करावा. पंडित सीतानाथ यांनीं कोणत्या का हेतूने असेना, पण एके ठिकाणी याच तत्त्वाचा पुरस्कार केला आहे. तो त्यासच आम्ही सादर करतो.†

४५. पूर्वीच्या परंपरेकडे पाहतां धर्म, अर्थ, काम, हे पुरुषार्थ अनुक्रमे ब्राह्मण, वैश्य आणि क्षत्रिय याचे विशेष आवडीचे असले तरी हिंदुधर्मा-प्रमाणे चारी पुरुषार्थ सर्वांना मोकळेच आहेत. अशा स्थितीत ईश्वराच्या नियतीने आज चतुर्थ वर्णाच्या अभ्युदयाचा काळ आला आहे असे मानलें तरी त्यासंबधींही ब्राह्मणादि इतर त्रैवर्णिकांनी वैषम्य मानण्याचे कारण नाहीं. स्वार्थत्याग हेच द्विजाचे भूषण आहे. पण त्यासाठीं त्यांनी आपली वर्ण-व्यवस्थेतील जागा सोडावयास नको.

४६. हिंदुधर्माचे भवितव्य काय आहे ते एक ईश्वर जाणे! कांही ब्राह्म आज किंचित् मागे वळून धर्मशास्त्र जुने तितके चागले असे म्हणत आहेत, तर बाकीचे मागे पाहू नका तर आधुनिक जगाच्या प्रवाहाबरोबर जलदीने पुढे पाऊल टाका असे सांगत आहेत. ह्या मतभेदाचीं मुख्य कारणे धार्मिक, सामाजिक व राजकीय ध्येयांचा संकर आणि परप्रत्यनेयबुद्धि हींच होत.

४७. अशा स्थितींत स्वधर्माच्या दृष्टीनेच धर्माकडे पाहणाऱ्या संस्थेची आज काल फारच जरुरी आहे. अनेक परचक्रानीं कित्येकदां पालटत आलेल्या हजारो वर्षांच्या काळांत अबाधित टिकलेली आमची एकच वस्तु जी वैदिक धर्मसंस्कृति ती राखण्याचे कार्य ब्राह्माकडून जर एकनिष्ठने होत असेल, तरच एवढ्या बड्या विद्वान् मंडळीच्या ह्या धर्मसंस्थेचे महत्त्व आहे. नाहीपेक्षा ह्या संस्थेने सामाजिक सुधारक मंडळांतच दाखल व्हावे, ते बरे. त्या योगाने ते लोकांची दिशाभूल तरी कमी करतील असे वाटते.

४८. आशावाद हा मोठा सुखाचा आहे आणि ब्राह्म हे परम आशावादी

---

† If the Gospel of hate has to be preached any where it should be preached in this country, where compromise with untruth, injustice tyranny and corruption reigns supreme in every department of life. We want here a religion which hates before one which has learnt to love. An edgeless virtue, one which does not cut what comes into contact with it, is no real virtue. It is a compromise with vice.

—*Sita Nath, 13 july 1924.*

आहेत. पण यांच्या प्रबळ आशावादास समाजास बरोबर नेण्याचें सामर्थ्य नाहीं, आस्था नाहीं आणि धीरही नाहीं. ह्या ब्राह्मांच्या नगर-कीर्तनमेळ्या-पुढे अग्रभागीं भौतिक शास्त्रांच्या सुखवादाच्या लांब लांब तुताऱ्या वाजत आहेत. त्यामागे अत्यंत भिन्न ध्वनींच्या विदेशी बॅंडचा हलकल्लोळ सुरू आहे. त्यामागे स्त्री-स्वातंत्र्याचीं चित्रे ज्वालाग्राही पेट्रोलच्या मोटारींतून बसलीं आहेत. कित्येक अर्धवट तर कित्येक मतलबी साहेब त्यांच्यापुढे नळे चंद्रज्योति लावीत आहेत. आणि मागे बुद्धिवादाच्या उच्छृंखल घोड्यांच्या गाड्यांतून ब्राह्म विद्वान् अधिष्ठित आहेत. पण आपले गरीब बिचारे पदस्थ नागरिक बंधु किती मागे आहेत; इतकेंच काय पण आपल्या निराकार देवाची पालखी ही किती दूर राहिली ह्यांचे त्यास भान नाही कारण पुढल्या तुतारीवाल्याच्या चालीने चालावयाचे एवढेंच ते जाणतात ! ब्राह्मधुरीणांनीं मागचा पुढचा कांहीं विचार पहावा. ज्याचा सोहाळा तो खरा 'साहेब' ( इष्टदेव ) कोठे आहे ? आणि ज्यांच्याकरितां सोहाळा ते नागरिक बंधु कोठे आहेत ? ह्यांची अधिक आस्था बाळगावी.

४९. ऐहिक सुखसाधने ईश्वराजवळ मागणे हे व्यर्थ व अयोग्य आहे असे ज्याअर्थीं ब्राह्ममत आहे त्याअर्थीं पश्चिमेकडील भौतिकशास्त्राच्या विलक्षण प्रगतीने हुरळून जाऊन ऐहिक क्रमोत्कर्षवादाच्या मोहात सापडणे आणि पश्चिम जगाचे मानसिक गुलाम बनणे हे ब्राह्मांस शोभत नाहीं.

५०. स्वदेश हाच देव, स्वतंत्रता हीच देवी, दरिद्री नारायण हेंच अवतार, लोकसेवा हीच पूजा, महत्त्वाकांक्षा हेच उद्बोधन. सुधारणा हीच आराधना, प्रपंचरति हेच ध्यान, क्रमोत्कर्ष सुखवाद हीच प्रार्थना आणि मनोराज्याची आरती असे नवयुगांतील देवधर्माचे ध्येय बनत चालले आहे. त्यास ब्राह्मांनी आळा घालावा. स्वार्थत्याग, स्वभाषा, स्वधर्मानुष्ठान आणि स्वाराज्यसिद्धि हीच धर्मराज्याची चतुःसूत्री होय.

**अखेर—**

ब्राह्मसमाजाच्या विवेचक इतिहासाचा हा प्रथम खंड पुरा करून हाता-वेगळा करतांना कृतकार्याबद्दल समाधान व थोरामोठ्यांवर टीका करावी लागली ह्याबद्दल खेद, अशा विरुद्ध वृत्ति मनांत उद्भवल्यावांचून रहात नाहींत. राममोहन आणि आनंदमोहन, देवेंद्रनाथ आणि शिवनाथ, केशवचंद्र आणि

प्रतापचंद्र आज कोठे आहेत! आणि उद्यां तरी सीतानाथ आणि रवींद्रनाथ यांचे पश्चात् त्यांचें नांव राखतील असे कोण आहेत? हे विचार मनांत आले म्हणजे अंतःकरण भरून येते! ह्या ग्रंथाचा दीर्घ लेखनकाल ज्यांच्या मानसिक साहचर्यांत गेला ते सारे पुरुष असामान्य कोटींतील होऊन गेले, ही गोष्ट आम्हांसही नाकबूल नाहीं. ज्याच्या सत्तेवांचून गवताची काडीही हालत नाहीं, त्या परमेश्वराच्या साम्राज्यसत्तेत ह्या ब्राह्मपुढाऱ्यांकडे कांहींतरी नियतकार्य असलेच पाहिजे हें उघड आहे. ब्राह्मच काय पण गेल्या शतकांत उदयास आलेले निरनिराळे पंथ आणि संप्रदाय हे सर्व ईशनियोजितच आहेत असें म्हणणे भाग आहे. ही ईश्वरी योजना काय असते हे आपणांस लवकर कळत नाहीं. यामुळे मतभेदांस्तव आपण एकमेकांस दोष देत असतो. सर्व संप्रदायांचा साकल्येकरून जेव्हां विचार होईल, तेव्हाच कदाचित् त्यांतील ईश्वरी नियति काय आहे हे जाणण्यास आपण समर्थ होऊं. तो व्यापक दृष्टीचा व निराग्रह वृत्तीचा सारविचार ह्या ग्रंथाच्या शेवटल्या तुलनात्मक खंडांत होईल. तोपर्यंतचे आमचे विवेचन कांही अंशीं एकदेशीय होणे अपरिहार्य आहे. आज प्रचलित असलेल्या सर्व मतभेदांचे रहस्य व भेदनिरसनांचे उपाय शेवटल्या खंडातच आम्ही सुचविणार आहोत. तोपर्यंतचे आमचे दोषाविष्करण सनातनीयांच्या विचारसरणीशीं पडताळून केलेले आहे असे समजावे. तीच जुनी सात्त्विक धार्मिक दृष्टि व नवीन राजसी राजकीय दृष्टि अंगिकारून आम्हांस अखेर इतकेच लिहावेसे वाटते कीं, स्वातंत्र्यातील मतभेद हे सभांतील दिग्विजयाचे किंवा रणांगणावरील विजयश्रीचे उज्ज्वल रूप धारण करतात. पण पारतंत्र्यांतील मतभेद हे मात्र लज्जास्पद व घातक होत. पारतंत्र्यांत मतस्वातंत्र्य ते कसचे! पारतंत्र्यांत स्त्री-स्वातंत्र ते काय! पारतंत्र्यात धर्म-पंथ-स्वातंत्र्य तें कशाला! स्वातंत्र्य हा प्रत्येक व्यक्तीचा जन्मसिद्ध हक्क असला तरी परतंत्र हिंदूंस तो हक्क आज नाहीं. एका मोठ्या स्वातंत्र्यासाठीं लहानसहान सर्व स्वातंत्र्यें सोडलीं पाहिजेत. मोठ्या अर्थासाठीं लहान स्वार्थ बाजूला सारले पाहिजेत. स्वाराज्य अगर स्वराज्यसिद्धीकरितां प्रापंचिक सौख्याचा मोह आवरला पाहिजे. कलहाग्नीने साऱ्या देशाचा वणवा झाला आहे! आणि अशा दुर्धर प्रसंगीं दावणींत बांधलेल्या गुरांपेक्षां आपणांस अधिक स्वतंत्रता नाहीं. परकीयांच्या आसुरी महत्त्वाकांक्षेची धग भारतमंदिराची आहुति घेते कीं काय असा

घाक पडला आहे ! त्या धर्गीत आर्य-संस्कृतीचे कडेवर स्वराज्याचे बालक अडकले आहे. यांपैकीं आतां कोणास अगोदर वांचवावे याबद्दल पुढाऱ्यांचें चित्त बावरले आहे ! दोन्हीही आम्हांस पाहिजे आहेत. यास्तव स्वधर्मनिष्ठेनें अनन्यगतिक होऊन ईश्वराचा धांवा केल्यास त्या दयाघनाच्या कृपादृष्टींतच ह्या दोघांचे रक्षण आहे. आसन्नमरण पुरुषाच्या तडफडणाऱ्या अवयवांप्रमाणें आजची आपसांतील मत-स्वातंत्र्याची धडपड व्यर्थ शक्तिपात करणारी आहे. आतां हे पंथविरोध नकोत. स्वधर्मातच श्रेय आहे आणि प्रेय आहे. यासाठीं आपले पूर्वज " महाजन " ज्या मार्गाने गेले त्या एका सनातन वैदिक धर्मनिष्ठेने चालून ईश्वरास वश करू या. वैयक्तिक मुक्ति आणि राष्ट्रीय अभ्युदय हीं दोन्ही त्याच्याच आधीन आहेत. ईश्वर करील तेच खरे !

## प्रथम खंड समाप्त

# भरतवाक्य

आतां विश्वात्मकें देवें । येणें वाग्यज्ञें तोषावें ।
तोषोनि मज द्यावें । पसायदान हें ॥१॥

जे खळाची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचें ॥२॥

दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥३॥

वर्षत सकळ मंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी ।
अनवरत भूतळीं । भेटो तयां भूतां ॥४॥

चलां कल्पतरूंचे अरव । चेतना चिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव । पीयूषाचे ॥५॥

चंद्रमे जे अलांछन । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥६॥

किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होवोनि तिहीं लोकीं ।
भजि जो आदिपुरुषीं । अखंडित ॥७॥

—श्रीज्ञानेश्वर.

# ब्राह्मगीतें

**अनन्त हयेछ भालइ करेछ थाक चिरदिन अनन्त अपार**
**धरा यदि दिते फुराइया येते; तोमारे धरिते के चाहित आर**
**भुलायेछ यारे तव प्रलोभने से कि क्षान्त हबे तव अन्वेषणे**
**ना पाये ना पाबे याय प्राण यावे कभु कि फुरावे अन्वेषण तार?**
**यत पाछे पाछे छुढे याब आमि तत आरो आरो दूरे हबे तुमि**
**यतइना पाब तत पेते चाब ततइ बाढिबे पिपासा आमार**
**आदर्श तोमारे देखिब हे यत तोमार स्वभाव पेये हब तोमार मत**
**फुरावे ना तुमि फुरावना आमि तोमाते आमाते हब एकाकार**

—कालीनाथ घोष.

**भावार्थः**—तूं जो असीम आहेस. तेंच ठीक आहे अनंत आणि अगाध असाच तूं नेहमीं ऐस. तुझा जर कधीं कोणाला ठाव लागता तर तोच तुझा शेवट. मग तुझ्यामागे कोणीही लागते ना. तुजबद्दल ज्याच्या अंतःकरणात तूंच तळमळ उत्पन्न केली आहेस, तो तुझ्या शोधांत कधीतरी थांबेल काय? मग तूं त्याला न सापडलास म्हणून काय झाले? त्या प्रयत्नांत तो आपले प्राणही खर्च करील. पण तुझ्या शोधासाठीं त्याचे सुरू झालेले प्रयत्न कधींही थांबतील काय? जसजसा मी तुझ्यामागें लागतों तसतसा तूं अधिकच दूर पळून जातोस. आणि जसजसे माझे यत्न निष्फळ होत जातात तसतशी तुझ्या दर्शनाची माझी उत्कंठा वाढत जाते. मी तुला नेहमी माझा आदर्श असेच मानीन आणि तुझे रूप आत्मसात् करून अधिकाधिक तुझ्याप्रमाणे होईन. जसा तुझा अंत नाहीं त्याचप्रमाणे माझाही शेवट नाहीं. पण तूं आणि मी एकच होऊं.

**सीमार माझे असीम तुमि बाजाओ आपन सूर;**
**आमार मध्ये तोमार प्रकाश ताइ एत मधुर!**
**कत वर्णे कत गन्धे कत गाने कत छन्दे,**
**अरूप तोमार रूपेर लीलाय जागे हृदयपुर!**
**आमार मध्ये तोमार शोभा एमन सुमधुर!**
**तोमाय आमाय मिलन हले सकलि याय खुले**
**विश्व सागर ढेउ खेलाये ओठे तखन दुले** —रवींद्रनाथ.

**भावार्थः**—हे अनंता! तूं या अमर्याद विश्वांत या वेळीं आपली लीला

चालविली आहेस. म्हणूनच माझ्या अंतरांत तूं पाडलेला प्रकाश इतका सुंदर आहे. निरनिराळे रंग, गंध आणि गीत हे तुझ्या रूपोत्सवाने जागृत झालेले माझे मनोराज्य होय. हे निराकारा, म्हणूनच माझ्या अंतरांतील तुझें ऐश्वर्य इतके मोहक आहे. तुझा आणि माझा समागम होतांच सर्वत्र स्वातंत्र्यच होईल. मग ह्या भवसागराच्या लाटा उसळूं लागतील.

अविश्रान्त डाक तारे सतत व्याकुल अन्तरे
हृदयेर धन सेइ प्रियतम प्राणेश्वरे
एइ ये संसार-धाम नहे निरापद स्थान
यतने सञ्चित पुराय निमेषे हरण करे
मुक्ति पथे निरन्तर हओ सबे अग्रसर
सम्मुखेत स्वर्गराज्य पश्चाते चेओना फिरे—त्रैलोक्यनाथ संन्याल.

भावार्थः—उत्कंठित मनाने त्याचा अखंड धावा करा. तो आपल्या अंतराचे निधान आहे, तो आपल्या आत्म्याचा जिवलग स्वामी आहे. हे जग हे निर्भय स्थळ नव्हे. आपण आस्थेने कमाविलेला सद्गुणाचा ठेवा तें एका क्षणांत हिरावून घेते. यासाठीं न थांबता मुक्तिपंथाचा मार्ग सुधारा. स्वर्गाचे राज्य तुमच्यापुढे आहे. मागे पाहू नका.

एसेछे ब्रह्मनामेर तरणी के चाबिरे तोहा आयहे आय
जीवन आंधारे दांडाये केनरे वृथा काने अइ वेला ये थाय
भुवन भरिल मधुर खे, आनन्द लहरी छुटे छे भबे
ब्रह्म कृपा आजि डाकिछे सबे पापी तापी तोरा आयरे आय
धनी कि निर्धन ज्ञानी कि अज्ञान नाहि देखे कारो—मनोरंजन गुह.

भावार्थः—ब्रह्म नावाची नाव आली आहे. ज्यांना जावयाचें असेल त्यांनीं चलावे. जीवनाच्या अंधारांत का दडून राहता? कालाचा व्यर्थ अपव्यय होत आहे. भुवन मधुरगानानें निनादित झाले आहे. आणि आनंदलहरी उचंबळत आहेत. ब्रह्मकृपाच सर्वांस साद घालीत आहे. यास्तव पापी आणि दुःखी, श्रीमंत आणि गरीब, सुजाण आणि अजाण सर्वांनींच चलावें. येथे जातिकुलाचा भेद नाहीं. ज्यास तीव्र उत्कंठा लागली आहे तोच हा भवसागर तरून जाईल.

# चवथ्या भागाच्या आधारग्रंथांची यादी

१ पं० शिवनाथशास्त्रीः—ब्राह्मसमाजाचा इतिहास. मेन आय हॅव सीन०

२ पं० सीतानाथ तत्त्वभूषणः—शिवनाथशास्त्री यांचे चरित्र. फिलॉसफी ऑफ ब्रह्मोइझम्, ब्रह्मजिज्ञासा, ब्रह्मसाधन, कृष्ण आणि पुराणें, स्पिरीचुअल वॉन्टस्, ब्राह्मरिचुअल्स, फंडामेंटल्स् ऑफ ब्राह्मोइझम्, थिईझम ऑफ धी उपनिषत्स, वर्तमानपत्रांतील लेख व पत्रे.

३ बाबू हेमचंद्र सरकारः—आनंदमोहन व राममोहन यांचीं चरित्रे. ब्राह्मप्रार्थना. ब्राह्मधर्म.

४ प्रो० सतीशचंद्र रायः—रिलीजन अॅण्ड मॉडर्न इंडिया.

५ डॉ० जी. वाय्. चिटणीसः—सुबोधपत्रिकेतील इंग्रजी लेख.

६ श्री० द्वा. गो. वैद्यः—प्रार्थनासमाजाचा इतिहास.

७ बाबू गौरीप्रसाद मुजुमदारः—केशवचंद्र सेन.

८ डॉ० पी. के. रायः—स्पिरिचुअल एज्युकेशन.

९ बॅरिस्टर मुकर्जी आणि श्री०ठाकरेः—हिंदूंचा ऱ्हास. इंग्रजी व मराठी.

१० श्री० महादेवशास्त्री दिवेकरः—हिंदुसमाज समर्थ कसा होईल ?

११ श्री० दप्तरीः—धर्मरहस्य.

१२ ऑल अबाउट दि देवसमाज.

१३ बाबू गुरुमुखसिंगः—देवसमाजावर व्याख्यान.

१४ सिस्टर निवेदिताबाईः—व्याख्याने.

१५ अॅस्पेक्टस ऑफ धी वेदांत.

१६ प्रो० कामाख्यनाथ मित्र—पेसीमिझम्.

१७ साधारण ब्राह्मसमाजाचे अहवाल. पहिल्या तीन भागांचे आधारग्रंथ. भागवताच्या भाषांतराचा उपसंहार, ज्ञानकोश, गीतारहस्य, श्री० भागवतांचा उपनिषत्संग्रह, वे० शा० सं० बापटशास्त्री यांचा सार्थ उपनिषद्भाष्यार्थ, इंडियन मेसेजर, धर्म, मॉडर्न रिलिजस् मुव्हमेंट, धी वर्ल्ड आणि धी न्यू डिस्पेंसेशन, प्रबुद्धभारत इ०.

॥ श्रीसमर्थ ॥

# आशीर्वचनें व अभिप्राय

मुलीनें सासरीं जातांना वडील माणसांस नमस्कार करून व आशीर्वाद घेऊन निघावें ह्या जुन्या चालीप्रमाणें ही माझी अल्पकृति रसिक वाचकांच्या हाती देतांना जो तिनें थोरांचा निरोप मिळविला, तो पाठराखणीदाखल यासमवेत जोडीत आहें.

सर्वांचा नम्र

**सदाशिव कृष्ण फडके**

— १ —

**श्रीसच्चिदानंद योगिराज उपासनीबाबामहाराज**

"बरें आहे. चांगलें आहे."

* * *

— २ —

**श्रीसमर्थ नारायणमहाराज**

"श्रीसद्गुरूंचा आशीर्वाद आहे."

* * *

— ३ —

प्रो० **श्रीधरशास्त्री पाठक,**

संस्कृत अध्यापक, एलिफन्स्टन् कॉलेज, मुंबई

आपण दिलेले 'नवयुगधर्म प्रथम-खंड' हें पुस्तक वाचून पाहिले. ब्राह्म-समाज व देवसमाज या दोन समाजांची माहिती सविस्तर देऊन आपण त्या समाजाविषयीं अनभिज्ञ अशा मराठी वाचकांची फार सोय केली आहे. ब्राह्मसमाजाचे मताचा विषयवारीने शेवटचे प्रकरणांत आपण जो विमर्श केला तो फारच मार्मिक आहे. या प्रकरणांतील आपले सर्व विषयांशीं मला सहमत व्हावेसें वाटते व प्राचीन तऱ्हेने प्रस्थानत्रयाचे अध्ययन केलेला विद्वान् आपले सर्व विचार अवश्य मान्य करील अशी माझी खात्री आहे. पुढील दोन खंड आपले हस्ते लवकर पूर्ण होवोत अशी आद्य श्रीमच्छंकरा-चार्यांचे चरणीं प्रार्थना आहे.

* * *

— ४ —

वे० शा० सं० **विष्णुशास्त्री बापट,**

'पंचदशी-भाष्य', 'प्रस्थानत्रयि-भाष्य' इत्यादीं-

चे संपादक 'आचार्यकुल' संस्थेचे संस्थापक.

सुमारे वीस दिवसांपूर्वीं आपण मला आपला "नवयुगधर्म किंवा हिं. आ. धा. च. इतिहास"—प्रथमखंड (ब्राह्मसमाज व देवसमाज) हा ग्रंथ अभिप्रायार्थ

दिला व त्याच्या आरंभीं असलेली 'परीक्षकांस अगत्याची विनंति' दाखवून त्यांत सुचविलेलीं प्रकरणे वाचून शक्य तितक्या लवकर अभिप्राय देण्याविषयीं सांगितलें. त्याप्रमाणें मीं वेळांत वेळ काढून तीं महत्त्वाचीं प्रकरणें सुमारें पंधरा दिवसांत वाचलीं. त्यावरून आपल्या ग्रंथासंबंधीं माझे प्रामाणिक मत काय झाले तें कळवीत आहे.

आपण हा इतिहास मोठ्या कळकळीनें व अतिशय शोधक बुद्धीने लिहिला आहे, ही गोष्ट माझ्याप्रमाणेच कोणीही प्रांजलपणें कबूल करील. इतकेंच नव्हे, तर आपण या ग्रंथाची पूर्वतयारी कित्येक वर्षांच्या अभ्यासाने केली आहे, असेंही दिसून येते. वस्तुतः आपल्या महाराष्ट्राशीं प्रत्यक्ष ज्याचा फारसा संबंध नाहीं व सामान्य लोकांना ज्याची फारशी माहितीही नाहीं, अशा ब्राह्म-समाजाबद्दल इतक्या सूक्ष्म दृष्टीने विचार करण्याचें आपल्या मनांत कसें आले याचे आश्चर्य वाटते. राजा राममोहन, देवेंद्र इत्यादि अलौकिक व्यक्ती-विषयीं आदर असणें निराळे व पश्चिम समुद्राच्या तीरावर राहणाऱ्या आपणास पूर्व समुद्राच्या तीरावर प्रस्थापित होऊन निरनिराळ्या अवस्थांचे आक्रमण करीत असणाऱ्या ब्राह्मसमाजाची खडान् खडा माहिती मिळवून त्याचा विवे-चक इतिहास, इतके परिश्रम व एवढा खर्च करून प्रसिद्ध करण्याची बुद्धि होणे निराळे. पण काही विलक्षण योगायोगामुळेच आपल्या हातून हे कार्य पार पडत आहे, असें म्हटले पाहिजे. आपला या पुढील खंड अजून प्रसिद्ध व्हावयाचा आहे, तो पाहिल्यावांचून त्याविषयीं आज काहीं निश्चयाने जरी बोलता न आले, तरी, या खंडात आपण गेल्या एक शतकाचा जो इतिहास दिला आहे, त्यावरून आपला ग्रंथ मोठा उद्‌बोधक आहे, अस म्हटल्यावाचून राहवत नाहीं. नवीन धर्मपंथ निर्माण करणारे व प्राचीन धर्माचा अभिमान बाळगून त्याच्या अस्तित्वाची आस्था बाळगणारे, अशा दोघानाही हा ग्रंथ मार्गदर्शक होईल, यांत संशय नाहीं. एवढा मोठा ग्रंथ लिहीत असतांना आपण त्यांत कोणतेही विधान प्रमाणावाचून केलेलें नाहीं व कोठेही स्वाभिमान जागृत होऊं दिला नाहीं, हें खरोखर कौतुकास्पद आहे. त्याचप्रमाणें प्रसंगीं आपण निर्भीडपणाही व्यक्त केला आहे. हा जरी इतिहास आहे, तरी त्यांतील कोणतेही प्रकरण वाचतांना कंटाळा येत नाहीं, उलट उत्तरोत्तर जिज्ञासा वाढत जाते, हें या ग्रंथाचें

वैशिष्ट्य आहे. या ग्रंथावरून आपण सनातन वैदिक धर्माचे कट्टे अभिमानी आहां, हे कोणाच्याही लक्षांत येईल. पण त्या अभिमानाला बळी पडून आपण कोणावरही अवास्तव टीका केलेली कोठेही आढळत नाहीं. मनाचा इतका समतोलपणा ठेवणे कोणाही इतिहासकाराला जरी आवश्यक असले तरी सर्वच इतिहासकारांना तितके भान रहात नाहीं, असा पुष्कळ वेळा अनुभव येतो. या दृष्टीने पाहिल्यास आपण प्रस्तुत ग्रंथ लिहून महाराष्ट्र-वाङ्मयाची अपूर्व सेवा केली आहे, असे म्हटल्यावांचून राहवत नाहीं. म्हणूनच या पुढील खडही लवकर प्रसिद्ध होऊन तो महाराष्ट्रवाचकांच्या हातीं पडावा अशी परमेश्वराची मी सद्भावाने प्रार्थना करितो.

आपण आरंभींच शंभर वर्षापूर्वीचे बंगालच्या समाजस्थितीचे जे वर्णन केलें आहे, ते वाचले म्हणजे आपला महाराष्ट्र कंगाल खरा; परंतु त्याने अशी दुर्दशा अजूनपर्यंत तरी अनुभविली नाहीं, याचे साभिमान कौतुक वाटते

राजा राममोहन याचे चरित्र व त्यांची धर्मसुधारणेची इच्छा यांकडे दृष्टि दिली असतां त्यांच्याविषयीं वाचकाच्या मनांत आदर उत्पन्न होतो. पण मनांतून खिस्ताच्या नीतीचे चहाते आणि आनुवंशिक संस्कारांनीं वैदिक असलेल्या राममोहनानीं स्वधर्माचरणपूर्वक स्वतत्त्वज्ञानाचा संप्रदायशुद्ध अभ्यास करून उद्दिष्ट कार्याला आरंभ केलेला नसल्यामुळे त्यांची दिशाभूल झाली; तथापि त्यांचे व्यक्तिशः माहात्म्य केव्हांही प्रशसनीयच ठरेल. त्यांनीं पाद्र्यांबरोबर केलेला धर्मसंवाद त्यांची बुद्धिमत्ता, विद्वत्ता व स्वाभिमान यांची उत्तम साक्ष पटवितो. पण मूर्तिपूजेच्या व ब्र्याच पुरोहितांच्या बाह्य व स्थूल दोषांकडेच त्यांचें लक्ष्य प्रथम वेधले व त्यामुळें अर्थातच त्यांचे एकदां कलुषित झालेलें मन मूर्तिपूजेच्या तात्त्विक उपयोगाचा विचार करण्या-साठी असमर्थ झाले, ही गोष्ट त्यांच्या मद्रासीशास्त्र्याशीं झालेल्या वादावरून चांगली लक्षांत येते.

देवेंद्रांचे बालपण त्यांच्या आजीच्या सहवासांत इतके चांगल्या प्रकारे गेलेलें असूनही स्वधर्माभ्यासाच्या अभावीं त्यांचीही दिशाभूलच झाली. त्यांच्या दुर्मनस्कावस्थेंत त्यांना काकतालीय न्यायाने जे कांहीं प्राप्त झाले तो ईशावास्याचा पहिला मंत्र होय! त्यावर त्यांनीं आपल्या धर्मकल्पनांची इमारत रचिली. हाच जर त्यांनीं प्रस्थानत्रयीचा अभ्यास केला असता तर

त्यांचें ऐश्वर्य व त्यांची बुद्धि यांचा केवढा तरी सदुपयोग झाला असता ! पण भवितव्यतेपुढे इलाज नाहीं !

रवींद्रनाथांसारख्या कविसम्राट् म्हणून गाजत असलेल्या विद्वानानें सामान्य जनतेचा बुद्धिभेद करण्यासारखीं जीं विधानें केलीं आहेत, तीं पाहिलीं म्हणजे स्वधर्मज्ञानाचा गंधही नसतांना सात समुद्रांपलीकडील राजकर्त्यांच्या विधर्मी शिक्षणाने हिंदुस्थानांतील चांगल्या बुद्धिमानांचाही कसा बुद्धिभ्रंश होतो, हें चांगलेच लक्षांत येते.

ब्राह्मांच्या विरुद्ध ब्राह्मणांचा प्रयत्न व विशेषतः रामकृष्ण परमहंस आणि त्यांचे प्रथम ब्राह्म असलेले व पुढें परमहंसांचे शिष्य झालेले स्वामी विवेकानंदादि महात्मे यांचा ब्राह्मसमाजाला प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष प्रतिबंधच झाला व त्यामुळे ब्राह्मधर्म सगळ्या जगाचा धर्म करण्याची केशवचंद्रांची महत्त्वाकांक्षा सफल झाली नाहीं, हें आपला ग्रंथ स्पष्ट दाखवीत आहे. बाकी राजा राममोहन रायादि त्रयी व इतर कांहीं प्रमुख ब्राह्म हे थोर पुरुष तर खरेच ! त्यांची ब्राह्मपंथ व ईश्वर यांवरील निष्ठा मोठी विलक्षण होती !

आपल्या ग्रंथांतील सर्वच प्रकरणे वाचनीय व मननीय असून अपूर्व माहितीने भरलेलीं आहेत. आपण चौथ्या भागाच्या शेवटीं ब्राह्मांना ज्या सूचना केल्या आहेत, त्या निदान सनातन वैदिकधर्माभिमानी लोकांना पटण्यासारख्या आहेत.

बंगाल्यांतील स्त्री-शिक्षणाचा दुष्परिणाम दाखवून आपण तत्संबंधी ज्या सूचना केल्या आहेत, त्या हल्लींच्या प्रागतिक महाराष्ट्राला महत्त्वाचा इशाराच देत आहेत.

एकंदरींत आपण हातीं घेतलेलें हें नवयुवधर्म-इतिहासाचें कार्य अनेक दृष्टींनीं उपयुक्त असून, त्यापासून महाराष्ट्रानें, मनांत आणल्यास, त्याला पुष्कळच बोध घेण्यासारखा आहे. परंतु महाराष्ट्राचा गेल्या पंचवीस वर्षांपासून जो धर्मदृष्ट्या अधःपात होत आहे, त्याकडे लक्ष दिल्यास मलाही आपल्याप्रमाणेंच शेवटीं 'ईश्वर काय करील ते खरे !' असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

शुष्क राजकारणांत निमग्न झालेला महाराष्ट्र आपल्या या प्रयत्नाचा कितपत

गौरव करील हा जरी प्रश्नच असला, तरी आपण आपलें प्राप्तकालकर्तव्य योग्य प्रकारें केले आहे, याबद्दल मी आपलें मनःपूर्वक अभिनंदन करितो.

  

— ५ —

श्रीमंत **बाळासाहेब पंतप्रतिनिधि,** बी. ए.
औंध संस्थानाधिपति

मुंबईचे प्रसिद्ध चित्रकार ( मूर्तिकार ) रघुनाथ कृष्ण फडके यांचे बंधु रा० सदाशिव कृष्ण फडके, वकील यांनीं अभिप्रायार्थ आमच्याकडे पाठविलेला " नवयुगधर्म " प्रथम खंड आम्हीं वाचून पाहिला.

आपल्याकडे राजकीय घडामोडींच्या इतिहासाचीं कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं असलीं तरी त्यांत किती अपुरेपणा आहे हें सर्वश्रुतच आहे. तथापि तो अपुरेपणा घालवून साधार साग्र हकीकतीची ग्रंथनिष्पत्ति करण्याकडे इतिहाससंशोधकांचे सर्व लक्ष लागलें असून त्या दृष्टीने व दिशेने त्यांचे प्रयत्न सतत सुरू आहेत. राजकीय उलाढालीइतक्याच किंबहुना त्याहून अधिक महत्त्वाच्या आधुनिक किंवा प्राचीन, सामाजिक किंवा धार्मिक चळवळींचा इतिहास लिहिण्याकडे कोणाचेही लक्ष निदान महाराष्ट्रांत तरी यापूर्वी गेलेले नाहीं आणि ज्याअर्थीं धर्म आणि राजकारण हीं एकमेकांपासून भिन्न करतां येणार नाहींत, त्याअर्थीं राजकीय चळवळीचाही इतिहास अत्यवश्यक आहे व त्याचाही कसून अभ्यास होणें आज तरी अत्यंत जरूर आहे. त्या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथकाराने हिंदुस्थानासारख्या अफाट देशांतील भिन्न प्रान्तीय विविध धार्मिक चळवळींची माहिती अशी एकत्रित करून ती पुस्तकरूपानें महाराष्ट्रीयांस देण्याचा प्रथम खंडद्वारे केलेला उपक्रम ही या 'नवयुगधर्मा'ची अपूर्वता अपूर्व आहे यांत शंका नाहीं. त्यांच्या अभिनव उपक्रमाबद्दल ते महाराष्ट्रीयांच्या अभिनंदनास पात्र असून धार्मिक चळवळींचा इतिहास मराठींत लिहिण्याचा पहिला मान त्यांसच द्यावा लागेल.

प्रथम खंडांत बंगाल्यांतील ब्राह्मसमाज व देवसमाज या दोनच समाजांचा इतिहास आला असून बाकीच्या अनेक समाजांचा व पंथांचा परामर्ष यथा-

क्षम घेण्याचा लेखकांचा हेतु आहे. पैकीं ब्राह्मसमाजाच्या इतिहासास सदर ग्रंथाचीं बरींच पृष्ठें दिलीं असून देवसमाजाचा इतिहास बाकीच्या पृष्ठांत संपविला आहे. या दोन्ही पंथांचा इतिहास बव्हंशीं चरित्रात्मकच आहे. तरी पण निरनिराळ्या धर्मप्रवर्तकांचीं चरित्रे जितकी साधार तितकीच स्वतंत्रपणे लिहिल्यासारखी आहेत व त्या त्या चरित्रापासून काढलेले निष्कर्ष ग्रंथकर्त्याच्या सूक्ष्म महाराष्ट्रीय चिकित्सक बुद्धीचे द्योतक असून निर्भिडपणाचे व विचारणीय आहेत. त्याचप्रमाणे सदर समाजांची ग्रंथकर्त्यानें केलेली चिकित्सा काळजीपूर्वक पाहिल्यास हिंदुसमाजास ख्रिस्ती, मुसलमानी वगैरे परधर्मीय रोग जडण्यास समाजाची कोणती विशिष्ट परिस्थिति कारणीभूत झाली व त्या त्या काळच्या अद्वितीय पुढाऱ्यांनीं हिंदुधर्माचें अध्ययन करण्यापूर्वीच परधर्माचे अध्ययन केल्याने परधर्माची छाप त्यांच्यावर चट्कन् कशी बसली व त्यानीं परधर्माच्या पायावर उभारलेल्या समाजमंदिरांची वाढ आज शंभर वर्षाच्या दीर्घावधींत इतकी संकुचित कां झाली व त्यांच्या बुद्धिमत्तेचा, द्रव्याचा, परिश्रमाचा, वेळेचा व चळवळींचा उपयोग धर्मैक्यास, विश्वबंधुत्वास, धर्मोन्नतीस किंवा राष्ट्रोन्नतीस काडीमात्र न होतां त्या सर्व गोष्टी उलट राष्ट्रावनतीस कारणीभूत का झाल्या, वगैरे गोष्टी निदान समजून घेतल्यास शेवटल्या प्रकरणांत उभय समाजीयास सांगितलेले सूचनारूपी अनुपान व पथ्य किती यथार्थ आणि कल्याणप्रद आहे याची सहज कल्पना येते.

उभय समाजांचा इतिहास लिहीत असताना ग्रंथकर्त्यानें रेखाटलेली नवयुगारंभींचीं व हल्लींचीं धर्मावनतींचीं व इतर समाजचित्रें एखाद्या कुशल चिताऱ्याप्रमाणे फारच बहारीचीं आहेत. एकंदर ग्रन्थाची भाषा सुबोध व सुसंस्कृत असून ती धार्मिक विषयावर लिहिणाऱ्या खंद्या लेखकास साजेशी आहे.

तसेंच श्रुति, स्मृति व शास्त्रीय तर्क या सर्वांचा अवलंब करून प्रचलित कालचे धर्मप्रवर्तक किंवा धर्मसुधारक गुहेप्रमाणे खोल अशा त्यांच्या आत्मौपम्य बुद्धींत प्रतीत होणारा जो मार्ग दाखवितील तो "युगधर्म" ही ग्रंथकर्त्यांने केलेली युगधर्माची व्याख्या चिंतनीय आहे. त्याचप्रमाणें सध्यांच्या धार्मिक अधःपाताच्या परिस्थितींत अडल्याच्या नात्याने कोणी न मानलें तरी ज्ञान-

शारीच्या नात्यानें मार्गदर्शक म्हणून आजच्या जातिब्राह्मणांचे स्वार्थनिरपेक्ष कर्तव्य कोणते—अर्थात् नवयुगधर्मप्रवर्तनाचे—हे दाखविणारी सद्हेतुमूलक सूचना मननीय नाहीं असे कोण म्हणेल ?

तद्वतच समग्र खंडाची माडणी कालानुक्रमाने केलेली आहे ती ठीकच आहे.

पुस्तकाची बांधणी मजबूत व मोहक असून बहिरंगाप्रमाणेच अंतरंग सुबक छपाईमुळे व विविध छायाचित्रांमुळे मनोरम व चित्ताकर्षक झाले आहे.

प्रस्तुत ग्रंथ अद्वैत वेदान्तशास्त्राचे ( सनातन हिंदुधर्माचे ) मंडन व अन्य धर्मांचे खंडन या दृष्टीने लिहिला असल्याने प्रथमारंभी श्रीमत् जगद्गुरु आद्य शंकराचार्यांचे छायाचित्र देऊन तो श्रीमत् जगद्गुरु आद्य शंकराचार्य यांच्या पुण्यस्मरणार्थ जनीजनार्दन सेवेस नम्रपणे सादर करण्यात ग्रंथकर्त्यांचे औचित्य व दूरदर्शित्व दिसून येते.

एकंदरींत पुस्तक वाचनीय व संग्राह्य झाले असून आजच्या मतामताच्या गलबल्याच्या काळात त्याच्या वाचनाने व मननाने धर्मजिज्ञासु त्याचप्रमाणे साधारण वाचक यांच्या अंगीं बहुश्रुतपणा, परमतसहिष्णुता, हिंदुधर्मविशालता आणि सर्वसंग्राहकता अंगीं बाणून त्याची हिंदुधर्मनिष्ठा वाढून त्यास धर्माचे सत्य स्वरूप कळण्यास फार मदत होईल असा आम्हांस पूर्ण भरंवसा आहे.

जगदंबेच्या कृपेने प्रस्तुत ग्रंथकर्त्यांच्या हातून असेच धार्मिक, उज्ज्वल व उद्बोधक वाङ्मय निर्माण होवो एवढीच आमची इच्छा आहे.

  

— ६ —

**श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर,** बी. ए., एल्‌एल्. बी.,
संपादक 'केसरी', पुणें.

आपला नवीन ग्रंथ 'नवयुगधर्म' नुकताच हातीं आला तेव्हांपासून तो मधून मधून वाचीत आहे. पण असे वाचून समाधान होण्यासारखा तो नाहीं. ग्रंथ खूप मोठा असला तरी तो साद्यंत वाचण्याची मला उत्कंठा लागली आहे. कारण ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, देवसमाज इत्यादिकांची जी माहिती आपण परिश्रमपूर्वक एकत्र करून दिली ती मला तरी पुष्कळच नवी आहे. गेल्या शंभरसवाशें वर्षांच्या नव्या युगांत आपल्या समाजांत धार्मिक व सामाजिक

स्थित्यंतरें किती झालीं व नव्या कल्पना कोणत्या आल्या यांचें समालोचन किती रम्य होईल म्हणून सांगूं ? पैकीं धर्मापुरता विषय आपण हातीं घेतला असून आपल्या संकल्पाप्रमाणे सर्व विषय पुरा झाला म्हणजे तो एक प्रचंडच ग्रंथ होईल. आपण चरित्रपर दिलेली माहिती जितकी मनोरंजक आहे तितकीच आपली चर्चा व टीका बोधप्रद आहे. रवींद्रनाथ टागोर व केशवचंद्र सेन यांच्यावरची आपली टीका मला यथार्थ वाटली. चौथ्या भागांतील २७ व्या प्रकरणांतील सूचना किंवा टीकेचीं टिपणे सूक्ष्म विवेचक असून त्यांत पुष्कळसें स्वारस्य आहे असो ग्रंथ हातीं पडतांच तो उत्सुकतेने मधून मधून चाळून वाटले ते लिहिले आहे. सर्व ग्रंथ वाचून झाल्यावर सविस्तर अभिप्राय व सुचल्यास सूचनाही कळवीन. तूर्त हे प्रास्ताविक अभिनंदन समजावे.

  

— ७ —

श्री० **चिंतामण विनायक वैद्य,** एम्. ए., एल्‌एल्. बी.
'महाभारताचा उपसंहार', 'मध्ययुगीन भारत', 'अबलोन्नति-माला' इत्यादि ग्रंथांचे कर्ते

श्रीयुत सदाशिव कृष्ण फडके यांनीं लिहिलेले 'नवयुगधर्म अथवा आधुनिक धार्मिक चळवळींचा इतिहास', खंड पहिला हे पुस्तक मी वाचलें. इतके चौकसबुद्धीने साधार माहिती मिळवून आणि विवेचक दृष्टीने त्या माहितीस परीक्षणरूपी जोड देऊन एका नवीन महत्त्वाच्या विषयावर लिहिलेले पुस्तक मराठींत अद्यापपर्यंत झालेले नाहीं असे म्हटले असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. रा० फडके हे अद्वैत वेदान्ताचे चांगले माहितगार असून त्यांचीं धर्मविषयक मतें दृढ व विवेचकबुद्धि सूक्ष्म असल्याने त्यांचा हा ग्रंथ मननीय व मनोवेधक झाला आहे. त्यांची भाषाशैली, सरळ, सुबोध व अलंकारयुक्त असल्याने अंशतः अधिक मनोवेधकत्व आलें आहे. धर्मविषयाच्या चर्चेंत व इतिहासांत रूपक अलंकार किंचित् कमी झाला असता तर बरे झालें असते असे मला वाटते. या सूचनेचा विचार रा० फडके यांनीं योग्य वाटल्यास पुढील खंड लिहितांना करावा.

हिंदुस्थानांत सन १८०० चे सुमारास इंग्रजी राज्य होऊन इंग्रजी विद्या व पाश्चात्य विचार बंगाल्यांत प्रथम फैलावूं लागले; तेव्हां साहजिकच नव्या धर्मकल्पनांचा पगडा तेथें बसून जुनें कांही तरी चुकते आहे असे कित्येक बुद्धिवान् लोकांस वाटूं लागलें व त्याचे पर्यवसान नवीन धर्मपंथ हिंदुस्थानच्या पूर्वेतिहासाप्रमाणे स्थापण्याकडे झाले. राजा राममोहन राय, देवेंद्रनाथ टागोर व केशवचंद्र सेन हे तीन धर्मप्रचारक उत्पन्न होऊन त्यांना अनुयायीही मिळाले. हिंदुधर्मीयांच्या धर्मभावनांचा कल मध्य सोडून बाहेर धांवण्याकडे असतो; तथापि हा (Centrifugal) जोर मध्यबिंदूला सोडीत नाहीं ही अभिमानाची गोष्ट आहे. ह्यामुळे ह्या धर्मपंथांत औपनिषदिक विचार सुटले नाहींत; पण नवीन ऋषि, नवीन धर्मग्रंथ, नवीन धार्मिक संस्कार व उत्सव ह्यांचा उद्भव झाला. आणि नेहमीप्रमाणे त्यांस अनुयायी मिळाले. हिंदुस्थानांतील शेकडो धर्मपंथांत त्यांची भर पडली. नवीन धर्म प्रतिपादणारे स्वतःच देव बनले व त्यांची इच्छा नसता किंवा असता हिंदुस्थानच्या प्राचीन परंपरेप्रमाणे त्यांची देववत् पूजा होऊ लागली. तथापि कांहीं तरी शुद्ध कल्पना व शुद्ध आचार जागृत झाले हे कबूल करावे लागते. या सर्व गोष्टींचे मोहक, विस्तृत, इतिहासाला धरून चित्र रंगवून टीकेसहित त्याचा परामर्ष या पुस्तकांत ग्रंथकर्त्यानें घेतला आहे. अर्थात् याचीं ९०० पाने झालीं, तरी हा ग्रंथ मार्मिक व मनोरंजक असून त्याने मराठी वाङ्मयांत फार महत्त्वाची भर पडली आहे.

  



— ८ —

## प्रो० शिवराम महादेव परांजपे

श्रीयुत सदाशिव कृष्ण फडके, वकील, पनवेल, हे 'नवयुगधर्म' या नांवाचें जें एक पुस्तक हल्ली प्रसिद्ध करीत आहेत, ते मराठी वाचकांना अनेक दृष्टींनीं उपयुक्त होण्यासारखें आहे. 'नवयुगधर्म' हे जे नांव या पुस्तकाला देण्यांत आलेलें आहे, त्यावरून या पुस्तकांतील विषयाचा जरी सकृद्दर्शनीं चांगलासा बोध होण्यासारखा नाहीं, तरी श्री० फडके यांनीं याच आपल्या पुस्तकाला 'हिंदुस्तानांतील आधुनिक धार्मिक चळवळींचा विवेचक इतिहास'

असे जे दुसरें एक पर्यायवाचक नांव दिलेलें आहे, तें पुष्कळच अर्थबोधक आहे. व त्यावरून या ग्रंथांत काय विषय येणार आणि त्यांचे विवेचन कोणत्या दृष्टीनें होणार, याबद्दलची बरीच स्पष्ट कल्पना वाचकांना आगाऊ मिळण्यासारखी आहे. या दुसऱ्या विस्तृत नांवाने ज्या कल्पनेचे दिग्दर्शन करण्यांत आलेले आहे, त्याच कल्पनेचे जास्त स्पष्टीकरण श्री० फडके यांनीं आपल्या प्रस्तावनेमध्ये आणि उपोद्घातामध्ये केलेले आहे. त्यावरून हें लक्षांत येण्यासारखे आहे कीं, ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, आर्यसमाज, थिऑसफी, सनातन वैदिक धर्म, त्या धर्मांत झालेले साधुसंत आणि त्यांनीं लिहिलेले धर्मप्रतिपादक ग्रंथ, इत्यादि अनेक संस्थांचा व पंथांचा धार्मिक इतिहास विवेचक दृष्टीने आणि तुलनात्मक पद्धतीने महाराष्ट्र वाचकाच्यापुढे सादर करण्याचा त्यांचा विचार आहे. यावरून त्यांनी नियोजित केलेल्या विषयाचे क्षेत्र किती विस्तीर्ण आणि व्यापक आहे, याची कोणालाही कल्पना येण्यासारखी आहे. इतका मोठा विषय एखाद्या लहानशा पुस्तकामध्ये समाविष्ट करणे अशक्यच आहे; आणि म्हणून श्री० फडके यांनीं आपल्या या धार्मिक इतिहासाच्या निरूपणासाठीं प्रस्तुतच्या पुस्तकाएवढालीं मोठीं अशीं एकंदर चार पुस्तके ( Volumes ) प्रसिद्ध करण्याची योजना निश्चित केली आहे. व त्यांपैकीं प्रस्तुत पुस्तक हा पहिला खंड आहे. या पहिल्या खंडाची पृष्ठसंख्या जवळ जवळ ९०० च्या वर गेलेली आहे. व असे एकंदर चार खंड तयार व्हावयाचे आहेत. त्यावरून श्री० फडके यांनीं किती मोठा दीर्घोद्योग अंगीकृत केला आहे आणि त्याच्या परिपूर्ततेपासून धार्मिक इतिहासाच्या बाबतींत महाराष्ट्रवाचकांच्या ज्ञानामध्ये किती मौल्यवान् भर पडण्यासारखी आहे, हे सहज लक्षांत येईल.

परंतु जरी हा ग्रंथविस्तार येथे वर्णन केल्याप्रमाणे इतका मोठा होणार आहे, तरी या ग्रंथांतील धार्मिक इतिहासाने व्यापिल्या जाणाऱ्या काळाच्या दृष्टीनें पाहिले, तर तो काळ फारसा मोठा आहे, असे नाहीं. त्याची व्याप्ति फक्त गेल्या सुमारें शंभर सव्वाशें वर्षांची आहे. कारण, फक्त गेल्या शतकाच्या सुरवातीच्या सुमाराला उदयाला आलेले बंगाल्यांतील धर्मसुधारक, राजा राममोहन राय यांच्यापासून या धार्मिक इतिहासाला सुरवात करण्यांत आली असून तो इतिहास प्रचलित काळापर्यंत आणून सोडलेला

आहे. पण ही उपरिनिर्दिष्ट कालमर्यादा काळाच्या अफाट समुद्रामध्यें तुलनात्मक दृष्टीने दिसावयाला जरी लहानशी असली, तरी तेवढ्याही अवधीमध्यें आपल्या देशांत धर्मविचारांचे प्रवर्तक आणि प्रतिपादक असे थोर पुरुष थोडेथोडके झालेले आहेत, असे मात्र नाहीं. राजा राममोहन राय, महर्षि देवेन्द्रनाथ, केशवचंद्र सेन, पंडित शिवनाथशास्त्री, रवीन्द्रनाथ टागोर, डॉ० भांडारकर, महादेव गोविंद रानडे, नारायणराव चंदावरकर, गोपाळराव देशमुख, भोलानाथ साराभाई, सर व्यंकटरत्न, स्वामी दयानंद, मिसेस ॲनिबेझंट, बिशप लेडबिटर, भावी जगद्गुरु श्रीकृष्णमूर्ति, श्रीरामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, वासुदेवानंद सरस्वती, श्रीसिद्धारूढ स्वामी, श्रीमौनीबुवा, श्रीसाईबाबा, श्रीउपासनीमहाराज, श्रीनारायणमहाराज, लो० टिळक, म० गांधी, इत्यादि अनेक इहलोकवासी व परलोकवासी विभूतींनीं आपल्या आर्यधर्माचा दीप प्रज्वलित करून लोकामध्ये ज्ञानाचा प्रकाश पसरविण्याचे उज्ज्वल कार्य करण्याचा आपआपल्या परीने या अल्पावधींतही पुष्कळ प्रयत्न केलेला आहे व यांच्यासारख्या सर्व सत्पुरुषांच्या धार्मिक प्रवचनांचा परामर्ष आपल्या या पुस्तकांमध्यें यथासांग घेण्याचा श्री० फडके यांचा विचार आहे. या पवित्र आणि उद्बोधक कार्यासाठीं श्री० फडके यानीं आपल्या ग्रंथाच्या रंगभूमीवर जे या सत्पुरुषाचे संमेलन भरविण्याचे योजिले आहे, त्यांत त्यानीं संकुचित दृष्टीचा प्रांताभिनिवेश न ठेवितां सर्व ठिकाणच्या धर्ममतप्रतिपादकाना पाचारण केलेले आहे. ग्रंथकार हे स्वतः महाराष्ट्रांतील असल्यामुळे महाराष्ट्रातील धर्मविवेचक साधुसंत आणि तत्त्ववेत्ते तर त्यामध्यें यावयाचेच आहेत परंतु पंजाबातील आर्यसमाजी आणि बंगाल्यांतील ब्राह्मसमाज आणि देवसमाज यातील अग्रगण्य प्रचारक यांनाही येथें आपले मत मांडण्यासाठीं बोलावण्यात आलेलें आहे इतकेंच नव्हे, तर जगाच्या सर्व उत्कृष्ट धर्मांतून उच्च उच्च तत्त्वें निवडून त्या सगळ्यांचा आपल्यामध्ये समावेश करणारा जो थिऑसफीचा पंथ त्यांतील मतांचेही या धर्ममहामंडलांत परीक्षण करण्यांत यावयाचे आहे. सारांश, अनुकूलत्वाने किंवा विरोधित्वाने ज्यांचा ज्यांचा म्हणून आपल्या देशांतील पुरातन ऋषिप्रणित सनातन धर्माशीं संबंध आलेला आहे, त्यांचे त्यांचें हंसक्षीरन्यायानें विवेचन करून त्यापैकीं प्रत्येकांतील पाण्याचा भाग-

चटपणा आणि दुधाचें आत्मबलसंवर्धक माधुर्य विशद करून दाखविण्याचा ग्रंथकारांचा मनोदय आहे.

अशा प्रकारचा अभियुक्त आणि उपयुक्त प्रयत्न मराठी भाषेमध्ये यापूर्वी झालेला नाही. History of Philosophy, History of religion, History of Morals अशा सारख्या विषयांवर पाश्चात्य भाषांतून पुष्कळ वाङ्मय निर्माण झालेले आहे. परंतु मराठी भाषेला अद्यापि असल्या प्रगल्भ विषयांचा फारसा परिचय झालेला नाहीं. परंतु एखादा उद्यमशील राजा ज्याप्रमाणे नेहमीं एका पाठीमागून एक नवीन कांहीतरी प्रांत जिंकून आपल्या राज्याला जोडीत असतो, त्याप्रमाणे आपली प्रगमनशील मराठी भाषा हल्लीं आपल्या भावी साम्राज्याचे क्षेत्र नवीन नवीन हस्तगत केलेल्या विषयानी मोठ्या झपाट्याने वाढवीत चाललेली आहे. अशा वेळीं त्या मराठीच्या वाङ्मय-विस्ताराच्या नकाशामध्ये हा धार्मिक इतिहासाचा एक नवीन प्रात दाखल केला जावा, हे प्रसंगप्राप्तच आहे. महाराष्ट्र-वाचकाची ज्ञानाची क्षुधा जशी जशी हल्लीं वाढत जात आहे, त्या त्या मानाने त्यांच्यापुढे नवीन नवीन प्रकारचीं खाद्ये आणि पेये ठेवण्यात येत आहेत, हे अगदीं स्वाभाविकच आहे व तदनुसार हल्लींचा हा जो 'आधुनिक धार्मिक चळवळींचा इतिहास' प्रसिद्ध करण्यात येत आहे, त्या कार्याला श्रीयुत सदाशिव कृष्ण ऊर्फ बाबा-साहेब फडके, हे योग्य आणि अधिकारयुक्त लेखक मिळाले आहेत, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे. श्री० बाबासाहेब फडके यांचा विद्याव्यासंग किती मोठा आहे, व त्यांचे भाषाकौशल्य किती विषयानुरूप आहे, हें प्रस्तुत पुस्तका-वरून तेव्हाच दिसून येण्यासारखे आहे पण धर्मविषयक इतिहास लिहिण्याला नुसती विद्वत्ता आणि भाषेची प्रभुता असली म्हणजेच पुरेसे होते, असे नाहीं. तर धर्म, तत्त्वज्ञान, नीतिमत्ता, वगैरे विषयांतील शाश्वत सिद्धान्त कोणते आणि समुद्राच्या लाटांप्रमाणें वाऱ्याच्या लहरीबरोबर इकडून तिकडे हेलकावे खाणारे सामान्य लोकांचे चंचल विचारतरंग कोणते, यांच्यामधील सारासार निश्चित करण्याचें निर्णायक बुद्धिसामर्थ्यही असल्या ग्रंथांच्या लेखकांमध्ये असावें लागते. आणि तें श्री० बाबासाहेब फडके याच्या ठिकाणीं पूर्णपणें वसत आहे. त्यांचा धार्मिक विषयांचा व्यासंग, त्यांची शांत आणि सात्त्विक चित्तवृत्ति आणि त्यांची सरळ व स्वभावानुरोधी विचारशक्ति, या त्यांच्या

अंगच्या गुणांनीं त्यांची हे पुस्तक लिहिण्याविषयींची योग्यता असंदिग्ध रीतीनें प्रस्थापित केली आहे. अशा सुप्रबुद्ध लेखकाकडून लिहिला गेलेला आपल्या अर्वाचीन धार्मिक चळवळींचा इतिहास सर्व सुप्रबुद्ध लोकांच्या आदराला पात्र झाल्यावांचून केव्हांही रहाणार नाहीं.

प्रस्तुतच्या पहिल्या खंडामध्यें जो ब्राह्मसमाज कालानुक्रमानें पहिल्याने उत्पन्न झाला, त्याचे विवेचन करण्याचे काम श्री० बाबासाहेब फडके यांनी स्वाभाविकपणेच पहिल्याने हातीं घेतले आहे. व त्यामुळे या समाजाचे प्रवर्तक आणि प्रचारक असे बंगालमधील राजा राममोहन राय, श्री० देवेन्द्रनाथ, केशवचंद्र सेन, ईश्वरचंद्र विद्यासागर, रवीन्द्रनाथ टागोर, वगैरे थोर पुरुषांच्या बद्दलची विस्तृत माहिती या खंडांत देण्यांत आलेली आहे. या लोकांची नांवे महाराष्ट्रांतील वाचकाना पूर्वीपासून माहीत आहेत. पण एकेश्वरी-पंथ, ब्राह्मसमाज, देवसमाज, वगैरेसारख्या धार्मिक चळवळी उत्पन्न करण्याची अवश्यकता या लोकांना कां भासूं लागली, या विषयावर प्रकाश पाडणारीं या बंगाली पुढाऱ्यांचीं चरित्रे आपल्या इकडील फारच थोड्या लोकाना पूर्वपरिचित असतील. आणि या दृष्टीने पहाता या पहिल्या खंडांत दिलेली माहिती पुष्कळच मनोरजक व बोधप्रद आहे. मुसलमानी धर्मग्रंथांचे परिशीलन, ख्रिस्ती मिशनऱ्याचा कावेबाजपणा, हिंदुधर्माच्या आद्यतत्त्वांवर अज्ञानामुळे बसलेलीं धर्मभोळेपणाचीं पुटे, इत्यादि स्वरूपाच्या विषम परिस्थितीमध्ये जन्म पावलेले राममोहन, देवेन्द्र किंवा केशवचन्द्र, यांना एकेश्वरी पंथ कां ग्राह्य वाटूं लागला, याची उपपत्ति या ग्रंथाच्या वाचनापासून समजूं लागते. राममोहन वगैरे त्या वेळच्या या व्यक्ति 'एकेश्वरी' (Unitarian) धर्माच्या नांवाखालीं जरी अगदी ख्रिस्तीधर्माच्या किनाऱ्यापर्यंत जाऊन पोचल्यासारख्या बाह्यतः दिसत होत्या, तरी अंतर्यामीं त्यांचीं आर्य संस्कृतीचीं तत्त्वे जागृत असल्यामुळे ख्रिस्ती धर्माच्या समुद्रामध्ये उडी न घेतां आपल्याच धर्मग्रंथांच्या समुद्राचे आलोडन करून त्यांतील उपनिषदे, स्मृति, सूत्रे, भाष्ये, वगैरे ग्रंथांतून एकेश्वरी पंथाला जुळतील अशीं तत्त्वें निवडून काढून त्यांनीं आपला नवीन पंथ स्थापन केला, हा आपल्या आचार्य-प्रणित वेदान्ततत्त्वाचा अखेरीस विजय झालेला पाहून कोणालाही आनंद झाल्यावांचून रहाणार नाहीं. राजा राममोहन राय हे ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या

जाळ्यांत चोहोकडून गुरफटलेले असतांही त्यांची स्वधर्मभक्ति जशी या गोष्टीने दिसून येते, त्याचप्रमाणे त्याचा देश इंग्रजी पारतंत्र्याच्या बंधनांनीं जखडून गेलेला असतांनाही त्याच्या मनामध्ये स्वातंत्र्यप्रीतीची ज्योत किती उज्ज्वल रीतीने जळत होती, हेही त्याच्या चरित्रातील दुसऱ्या एका गोष्टीवरून दिसून येण्यासारखे आहे. ते ज्या वेळेला बंगालमध्ये धर्मक्रान्ति करण्याच्या कामात गुंतले होते, त्याच वेळीं तिकडे फ्रान्समध्ये प्रचंड राज्यक्रांतीची चळवळ चाललेली होती; व त्याबद्दलच्या हकीकती ऐकून त्यांना अतिशय आनंद होत असे. आणि एकदां इ. सन १८३१ साली विलायतची सफर करीत असतांना केप ऑफ गुड होप येथे एका फ्रेंच जहाजावर स्वातंत्र्याचे निशाण फडकत असलेले पाहून त्यांना इतका आनंद झाला की, ते आपल्या गलबतावरून त्या फ्रेंच बोटीवर जाऊन तेथील त्या स्वातंत्र्याच्या निशाणाखालीं स्वातंत्र्याचा जयजयकार करून मोठ्याने नाचूं लागले ! अशा प्रकारची उज्ज्वल स्वदेशभक्ति आणि स्वधर्मप्रीति राजा राममोहन राय यांच्या ठिकाणीं जरी नादत होती, तरी परिस्थितीमुळे त्यांचा कल एकेश्वरी पंथाच्या संस्थापनेकडे वळला. व तो पंथ त्यांनी बंगाल्यामध्ये प्रचलित केला. त्या पंथातील तत्त्वे जरी चांगली होतीं, तरी ती आपल्या वेदान्ताच्या मताहून फारशीं भिन्न नसल्यामुळे यथावकाशाने तो पंथही हळुहळू बंगालमध्ये लवकरच संध्याकाळच्या संकोचावस्थेला साहजिकपणेच जाऊन पोहोचला. या पहिल्या खंडामध्ये ब्राह्मसमाज व देवसमाज यांचे जरी बरेच विस्तृत वर्णन आलेले आहे, तरी ते केवळ पूर्वपक्षाचे पूर्ण प्रतिपादन करण्याच्या दृष्टीनेच आलेले आहे, व त्याच्या उलट मतांचे प्रतिपादन अनेक ग्रंथाच्या आधाराने श्री० फडके यांनीं या खंडाच्या शेवटच्या 'सूचना' या नावाच्या प्रकरणामध्ये थोडक्यात पण मुद्देसूद रीतीनें केले आहे. ह्यावरून ग्रंथातील अखेरच्या सिद्धान्ताचा कल कोणत्या बाजूकडे आहे, याबद्दल गैरसमज होण्याचे कारण उरत नाहीं. त्याचप्रमाणे या खंडाच्या आरंभीं श्री जगद्गुरु आद्य शंकराचार्य याचे चित्र दिले असून त्यांच्याच चरणीं हे पुस्तक सादर केले आहे, यावरूनही वेदान्ताचे अन्तिम प्राधान्य प्रकट होण्यासारखे आहे.

या पुस्तकाची पृष्ठसंख्या ९०० शेंच्या वर आहे, हें पूर्वी सांगितलेंच

आहे. त्याशिवाय या पुस्तकांतील कथानकामध्यें येणारीं निरनिराळीं माणसें आणि निरनिराळीं स्थळें यांचीं मिळून एकंदर चोवीस छायाचित्रे दिलेलीं आहेत; व या ग्रंथाला आधारभूत अशा पुस्तकांची विस्तृत यादीही देण्यांत आलेली आहे. अशा सर्व बाजूनीं हें पुस्तक विश्वसनीय, चित्ताकर्षक आणि बोधप्रद करण्याबद्दल फार काळजी घेण्यात आली आहे. 'विजय' प्रेसनें एवढ्या मोठ्या पुस्तकाचे केलेले छपाईचे कामही निर्दोष आणि सौंदर्ययुक्त आहे. आणि इतके सगळे असूनही या पुस्तकाची किंमत फक्त काय ती चारच रुपये आहे. म्हणून अशा प्रकारचे हे अर्वाचीन धार्मिक चळवळीच्या इतिहासाचे पुस्तक सर्व धर्माभिमानी लोकांनीं संग्रहीं ठेवण्याला योग्य आहे, हे याहून निराळे सांगितले पाहिजे, असे नाहीं.

  

— ९ —

## श्री० पांडुरंग वामन काणे, एम्. ए., एल्एल्. एम्.,

### हायकोर्ट वकील व सुप्रसिद्ध ग्रंथकार

आपल्या प्रचंड ग्रथाचे नुसतें वाचन करण्यालाच कित्येक दिवस लागतील व तो वाचून मग सोपपत्तिक अभिप्राय देण्याला आणखी वेळ लागेल. अशा प्रकारें वेळ खर्च करण्याला मला सामर्थ्य नाहीं, याबद्दल क्षमा करावी. आपला प्रयत्न फार मोठा आहे. मराठी भाषेत अशा प्रकारचा ग्रंथ होणें म्हणजे एक अपूर्वाईची गोष्ट आहे; इतके म्हणून ठेवण्यास मात्र हरकत नाहीं. मधून मधून आपले जे विचार दृष्टोत्पत्तीस आले त्यावरून आपण सनातनधर्माभिमानी असून प्रचलित कांहीं आचारांत फरक करावा; परंतु वर्णव्यवस्था, मूर्तिपूजा, संस्कार, वगैरे पूर्वापार चालत आलेल्या बहुतेक बाबी कायम ठेवाव्या अशा मताचे आपण दिसतां. परंतु आपला सर्व खंडात्मक ग्रंथ प्रसिद्ध होईपर्यंत आपलीं निश्चित मते कळणार नाहींत व भविष्यकाळीं सनातनधर्माची प्रतिष्ठापना कोणच्या तत्त्वाला धरून व्हावी, सामाजिक चालीरीतींत व भावनांत तात्काळ कोणते फरक व्हावे वगैरे बाबतींतील आपल्या मतांचा विचार करतां येणार नाहीं.

  

— १० —

## श्री० श्रीपाद दामोदर सातवळेकर,

'पुरुषार्था'चे आणि वैदिक वाङ्मयाचे संपादक

आपण पाठविलेले आपले पुस्तक "नवयुगधर्म" हे पोचले. ते मीं वाचून पाहिले. या पुस्तकाने मराठी वाङ्मयांत एका अमोलिक ग्रंथाची भर पडली आहे, यांत शंका नाहीं. ब्राह्मसमाज, देवसमाज आदि आधुनिक पंथांच्या स्थापनेचा व त्यातील तत्त्वाचा सांगोपांग इतिहास यांत दिला आहे व या समाजाशीं प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष संबंधांत आलेल्या थोर व्यक्ति श्री० राममोहन राय, महर्षि देवेंद्रनाथ टागोर, केशवचंद्र सेन, प्रतापचंद्र मुझुमदार, ईश्वरचंद्र विद्यासागर, श्रीरामकृष्ण परमहंस, स्वामी विवेकानंद, रवींद्रनाथ टागोर, रानडे, भांडारकर इत्यादि थोर पुरुषांच्या धार्मिक व सामाजिक मताचे व त्या अनुरोधाने त्यांच्या चरित्रातील गुणदोषांचे मार्मिक विवेचन आपण केले आहे. ह्या थोर पुरुषासंबंधाने व त्यांच्या कार्यासंबंधाने विवेचन करतांना स्वतंत्र व चिकित्सक बुद्धीचा कोणत्याही प्रकारे पूर्वग्रहदूषित मन न ठेवतां, सर्वांच्या मतांचा उदारबुद्धीने आपण विचार केला आहे, हा आपल्या ग्रंथांतील विशेष आहे असे मला वाटते. तसेंच येथे ब्रिटिश अंमल सुरू होताच बंगालमध्ये असलेल्या अनेक सामाजिक व धार्मिक चळवळींच्या लाटा व त्यांची एकमेकाशीं झालेली टक्कर व त्यांत पुढाकार घेऊन चळवळ करणाऱ्या लोकाची स्वसमाजाच्या उन्नतीसंबंधाने होणारी तळमळ, त्याचा दीर्घोद्योग, त्याचप्रमाणे लवकर उन्नति करण्यामध्ये होणारा त्याचा उतावीळपणा व त्यामुळें त्यांच्याकडून घडणाऱ्या त्यांच्या चुका या सर्व गोष्टींचे यात इतके बोधप्रद व त्याचबरोबर इतके मनोरंजक वर्णन आपण दिले आहे कीं, ते वाचकाच्या मनांवर परिणामकारक झाल्याशिवाय राहणार नाहीं. अशा रीतीने पुस्तक लिहिण्याचा प्रयत्न मराठीमध्ये तरी कोणीं केलेला पाहण्यांत नाहीं. आपण हा प्रयत्न केला व तो यशस्वी रीतीने तडीस नेला हे पाहून मला फार आनंद होत आहे. आपण पुढील खंड प्रकाशित करून या पुस्तकाने वाचकांची वाढणारी जिज्ञासा तृप्त कराल अशी मला आशा आहे.

— ११ —

## आर्यसमाजी पंडित **नरदेवशास्त्री वेदतीर्थ,**

महाविद्यालय ज्वालापुर (हरद्वार) याचे मुख्याध्यापक (हिंदी) आर्यसमाजाच्या इतिहासाचे कर्ते व 'भारतोदय' आणि 'शंकर' इत्यादींचे संपादक

आपण कृपापूर्वक पाठविलेले 'नवयुगधर्म' नावाचे मोठें पुस्तक पोहोचलें. हे पुस्तक सचित्र असूनही विचित्र आहे. आपला हा ह्या दिशेने प्रयत्न फार स्तुत्य आहे. हा ग्रंथ तुलनात्मक पद्धतिरूपाने लिहिला गेल्यामुळे त्याचे महत्त्व फार वाढले आहे. म्हणूनच हा ग्रथ संग्राह्य झाला आहे. भापा गोड, विषयाची मांडणी सुरेख, ऊहापोह पद्धति शास्त्रीय एव अनुकरणीय आहे. एकंदरींत हा नवयुगाचा धार्मिक इतिहासच झाला आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. ब्राह्मसमाजाची हिन्दुसमाजाशीं तुलना करून आपण ज्या सूचना केल्या आहेत त्या तर प्रतिपक्षास अगदीं निरुत्तर करून सोडणाऱ्या आहेत. आपण देवसमाजाला नसते महत्त्व दिले आहे. ह्या समाजाचा पंजाबांतच थोडा प्रचार आहे. पण त्याची प्रगति खुंटली आहे हिंदुसमाजाशीं फटकून राहिल्या व वागल्यामुळे ब्राह्मसमाज अथवा प्रार्थनासमाजाची संख्या बोटावर मोजण्याइतकीच काय ती राहिली आहे. ऐशी वर्षांपासून ब्राह्मसमाज हिंदुसमाजास म्हणत आहे कीं, "मी येऊ का, मी येऊं का। तुम्हां संगि मी बसूं का ॥" हिंदुसमाजाचे एकच उत्तर आहे आणि ते हे कीं, "नको गड्या तूं दूर रहा। तुझी निराळी दिसे तऱ्हा॥" हिन्दु अथवा आर्य जातीचा वैदिक धर्म इतका स्वाभाविक, तत्वज्ञान इतके श्रेष्ठ, सभ्यता इतकी उत्तम, वर्णाश्रमधर्माची कल्पना इतकी सुंदर कीं, पुढेमागे संसार त्याच मार्गावर येईल यांत तिळमात्र संशय नाहीं. स्वधर्मपोषक व स्वधर्मरक्षक आर्यसाम्राज्य नष्ट झाल्यामुळे आर्यधर्माची अवहेलना झाली आहे. विदेशी, विधर्मी अतएव स्वधर्मावरोधक अस्वाभाविक राज्यपद्धतीच्या दडपणाखालीं जी अनास्था चालली आहे त्या अनास्थेंतून आर्यजातीचा उद्धार होईलच होईल.

" यदा यदाहि धर्मस्य " ह्या भगवंताच्या वचनावर आस्था किंवा निष्ठा ठेवून धर्माचरण करीत असावे. ब्राह्मसमाजाचा व ह्याच्या पोटशाखेचा हा इतिहास वाचनीय, मननीय एवं संग्रह करण्यासारखा झाला आहे. ह्याच्या मननाने प्राच्य व प्रतीच्य धर्माभिमान्यांना आत्मपरीक्षणाचा आयताच सुयोग लाभला आहे. आपण असा सुंदर ग्रंथ निर्माण केला ह्या स्तुत्य, अनुकरणीय अथवा सर्वतोभावेन प्रशंसनीय प्रयत्नाबद्दल मी आपले अभिनंदन करतों.

  

— १२ —

ह० भ० प० **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर,** बी. ए., 'मुमुक्षु'कर्ते

माझा नवा ग्रंथ 'ज्ञानेश्वराची प्रभावळ' याची प्रस्तावना लिहीत असतां आपल्या नवयुगधर्माचे आगमन झाले. त्याचा स्वीकार केला व सहज पुस्तक चाळूं लागलों. ग्रंथाचे नाव व अनुक्रमणिका पाहून कांहीं बोध होईना. ब्राह्म-समाजावर ग्रथ लिहिण्याच्या भानगडींत आपण कां पडलां असें वाटले. मग प्रस्तावना वाचली. हेतु उमगत चालला. प्रकरणामागे प्रकरण वाचीत चाललो. मन रमत चालले. दुपारीं दोन वाजतां नवयुगधर्मांत प्रवेश केला, तों सायंकाळचे दोन तास सोडून रात्रीचे दोन वाजेपर्यंत सतत दहा तास ग्रंथाचे संगतींत गेले ! कोल्हटकरांचा 'भागवताचा उपसंहार' मला जसा अत्यंत आवडला तसा आपलाही ग्रंथ आवडला. त्यानंतर त्याच ग्रथाने मला सतत दहा तास आपल्यापाशीं डांबून ठेविले. बहुतेक ग्रंथ चाळला, बरींच प्रकरणे वाचलीं व माझेच विचार ग्रंथांत सर्वत्र प्रगट झालेले पाहून अतिशय समाधान झालें. ब्राह्मपंथाचे वाङ्मय मीं पाहिले नसल्यामुळे मला नवीन माहिती सुसंगतवार मिळाली. 'महाजन म्हणजे थोर विचारी पुरुष अथवा शिष्ट', 'युगधर्मसंस्थापक अवतारी पुरुषच असावयास पाहिजे', 'त्याग ही सनातनीयांची गुरुकिल्ली आहे', हीं उपोद्घातांतील सिद्धान्तवचनें यथार्थ वाटून चित्त ग्रंथात रमूं लागलें. पुढें शंभर वर्षांमागील बंगालची परिस्थिति ध्यानांत आली व राजा राममोहन राय, ( विशेषतः निष्कर्ष—प्रकरण तेरावें), महर्षि देवेंद्रनाथ, रवींद्रनाथ ( त्यांची गीतांजलि व शांतिनिकेतन ), केशव-

चंद्र सेन ( त्यांचें नवविधान व नवसंहिता ), प्रतापचंद्र मुजुमदार इत्यादि भव्य व उत्तुंग गिरिशिखरांवरून आपण वाचकांस लीलेने सनातनधर्माच्या पठारावर घेऊन चालला आहांत असे, तीन भाग वाचतां वाचतां व विशेषत: पृष्ठ ११८–१३४, पृष्ठ २६८–९, पृष्ठ ३३३–४९, पृष्ठ ४७६, पृष्ठ ५०३ ते ५२१ हीं पृष्ठें व श्रीरामकृष्ण परमहंसांचे मधुर जीवन-चरित्र पाहतां पाहतां वाचून फार समाधान झालें. राममोहन राय, देवेंद्रनाथ, केशवचंद्र सेन, रवींद्रनाथ, प्रतापचंद्र हीं खरोखरच मोठीं माणसे व त्याचे जीवन-चरित्र, त्यांचे गुणदोष, त्यांची कामगिरी यांबद्दलचे आपले विवेचन निःपक्ष-पातार्चे व डोळसपणाचे आहे. आंग्लाईच्या प्राबल्यामुळे आमच्यांतील थोर पुरुषांना सनातनधर्माची ओळख कशी राहिली नाहीं, हे त्याच्या कर्तब-गारीवरील व गुणांवरील आदर कायम ठेवून आपण उत्कृष्ट रीतीने दाखवून दिलें आहे. पंडितजींच्या कृष्णकथेवरील आक्षेपांचे आपले खंडण ( पृष्ठ ६२७–६३२), फार बहारीचे आहे. सुधारणानीं धर्मावर कुरघुडी कशी केली याचे विवरण सुंदर आहे. 'संक्रान्तीचे वाहन व दृष्टि–आजच्या अवदशेचे वाहन राजकारण आहे व दृष्टि पश्चिमेकडे आहे' (पृष्ठ ६५३), हें सत्य आहे. स्त्री-स्वातंत्र्य, स्त्री-शिक्षण, प्रौढविवाह, विधवाविवाह, जातिभेद, वर्णाश्रमधर्म, सगुणोपासना, मूर्तिपूजा, व्रतवैकल्ये इत्यादि विषयांवरील आपले प्रौढ व निर्दुष्ट विवेचन सुधारकांना आज न रुचले तरी डोळसांच्या डोळ्यात ते अंजन घालण्यासारखे निर्मळ आहे. 'लोकापवादाच्या भोवऱ्यांत ग्रंथकाराचे मरण आहे' हें खरें असलें तरी वाडवडिलाच्या विचाराची बैठक अढळ ठेवण्याचा प्रयत्न करणे ( पृष्ठ ६७२ ) प्रत्येक सनातनधर्मीयाचे श्रेष्ठ कर्तव्य आहे व तें आपण उत्कृष्ट बजावलें आहे असे या पहिल्या खंडांतील विवेचना-वरून स्पष्ट म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. चौथ्या भागांतील १४ वे व २४ ते २७ हीं चार प्रकरणें अतिशय बहारीची आहेत. बंगालच्या ब्राह्मांची ( आणि महाराष्ट्रीय सुधारकांचीही ) दिशाभूल होऊन त्यांनीं धार्मिकदृष्ट्या हिंदु लोकांचें हित करण्याऐवजीं त्यांच्यांत पंथभेद वाढवून व त्यांचा बुद्धि-भेद करून अपरिमित नुकसान केलें ( पृष्ठ ७६८ ), हें आपण मुद्देसूद रीतीनें दाखवून दिलें. ब्राह्म अग्रणींच्या अंगचे कित्येक गुण अव्वल दर्जाचे असूनही खिस्ती धर्मानुकरणाच्या इच्छेनें स्वकीय धर्मग्रंथांच्या अनवलोकनानें व परंपरा-

शून्यतेनें त्यांची दिशाभूल कशी झाली व सामाजिक सुधारणेच्या मिषानें त्यांची समाजविघटना कशी केली व त्यामुळें धर्म व समाज यांच्या संघटनेचें कार्य कसे बिकट होऊन बसलें आहे, हें आपण ब्राह्मांच्याच ग्रंथांतील वेंचक अवतरणे घेऊन सिद्ध केलें आहे. आपल्या ग्रंथाची भाषाही सर्वत्र सहज-मनोहर आहे. जसा विचारांत संदिग्धपणा नाहीं तसा भाषेंत कृत्रिमपणा नाहीं. हा ग्रंथ ऐतिहासिक तत्त्वविवेचनाचा असूनही ग्रंथाची एकंदर मांड, सप्रमाण पण सभ्य व प्रौढ भाषेने केलेलें परमतखंडण, तर्कशुद्धपद्धतीने व निर्भयपणें आपलीं मते स्पष्ट सांगण्याचे धोरण ह्या सर्वांस मनोहर भाषेची जोड मिळाल्यामुळे ग्रथ खरोखरच अतीव रम्य झाला आहे. ह्या ग्रंथाच्या द्वारे आपण सनातनधर्माची व हिंदुसमाजाची मोठी कामगिरी केली आहे. पुढील दोन खंड लवकर हातीं पडावेत अशी प्रबळ उत्कंठा वाढली आहे. कळावे.

  

— १३ —

प्रो० **वामन मल्हार जोशी**, एम्. ए.,
'नीतिशास्त्रविचार', 'साक्रेटिसाचे संवाद',
'रागिणी' इत्यादि ग्रंथांचे कर्ते

"नवयुगधर्म"—प्रथम खंड—या पुस्तकाचीं कांहीं प्रकरणे मीं वाचून पाहिलीं. आनंद झाला. या पुस्तकांत बंगालमधील ब्राह्म-धर्म-संस्थापक राजा राममोहन राय व त्यांच्या परंपरेतील देवेंद्रनाथ टागोर इत्यादिकांचीं साधार, सविस्तर व सुसंगत चरित्रें दिलेलीं आहेत, आणि त्यांच्यांत कोठें कोठें मतैक्य आहे व कोठे कोठें मतभेद आहेत हेंही सांगितलें आहे. चरित्रें देतांना विशिष्ट मतमतांतरें कां उत्पन्न झालीं याबद्दल विशिष्ट स्वभाव, शिक्षण व परिस्थिति यांच्या आधारे मीमांसा केली आहे. ब्राह्मसमाजानें जें कार्य केलें आहे तें प्रांजलपणें मान्य करून त्याची चूक कोठे आहे हे सौम्य व सभ्य पण निर्भीड शब्दांनीं सांगितलें आहे. ग्रंथकार रा० सदाशिव कृष्ण फडके सनातनधर्माचे व शांकर-वेदान्ताचे अभिमानी

दिसतात. राजा राममोहन राय हे कितीही विद्वान् व बुद्धिमान् असले तरी स्थितप्रज्ञत्व त्यांमध्यें नव्हतें, त्यांना ब्रह्मज्ञानाचा अनुभव नव्हता, या दृष्टीनें धर्मसंस्थापना करण्याचा त्यांचा अधिकार मर्यादित स्वरूपाचाच होता व राममोहनरायांची जी गोष्ट तीच देवेन्द्रादि इतरांचीही गोष्ट. वेदान्ताचें शाब्दिक ज्ञान या मंडळीचे सामान्य जनाहून कितीही असले तरी ते धर्म-संस्थापनेच्या मानाने बेताचेच होते; धर्माला तर्काप्रमाणें भावनेकडे व परंपरेकडे पहावे लागतें,—इत्यादि दिशांनीं ग्रंथकारांनीं ब्राह्मधर्माचें जें परीक्षण केले आहे ते मननीय आहे. माझ्या स्वतःच्या दृष्टीनें राममोहन राय यांनीं नवीन धर्म स्थापिला ही चूक केली, कारण त्यांना जी जी सुधारणा पाहिजे होती ती ती सनातनधर्माच्या कक्षेत राहूनही साधतां आली असती हे एक, व दुसरे असे कीं, एकदां आपण धर्माची सुधारणा करण्याचें मनांत आणलें व अनेक देवांची हकालपट्टी करून त्याच्या मूर्तींची थट्टा करूं लागलो म्हणजे जो एक देव आपण शिल्लक ठेवूं पाहतो त्याचीही त्याच तर्कपद्धतीच्या असिधारेने कत्तल करण्यास आपल्यातील कांहीं लोक धजावतील व त्यांचा हात धरणे केवळ तार्किक 'न्याय' व विचारशुद्धि यांच्या दृष्टीनें अशक्य होईल. ग्रंथकार रा० फडक्यांची भूमिका व माझी भूमिका अर्थात् भिन्न आहेत व त्यांची विचारपद्धति कांही ठिकाणीं मला अमान्य आहे. पण मला केव्हांही हे कबूल केले पाहिजे कीं, या पुस्तकांतील माहिती उपयुक्त आहे व विवेचन उद्बोधक आहे. ज्याला धर्मासंबधीं विचार करण्याची आवड आहे त्याने हे पुस्तक अवश्य वाचावें.

❀ ❀ ❀

— १४ —

## प्रो० वैजनाथ काशीनाथ राजवाडे, एम्. ए.

'नवयुगधर्म'—ह्या पुस्तकाचीं ८७६ पाने असल्यामुळें मला तें सर्व वाचतां आले नाहीं. तथापि ग्रंथकर्त्यानें सुचविलेले भाग वाचले. इतकीं पुस्तके वाचून (रा० रा० फडके ह्यांनीं शेकडों पुस्तके वाचलीं आहेत व त्यांचीं टिपणेंही त्यांनीं केलीं असावीत) शेवटीं ग्रंथकर्ते जुन्याला चिकटून राहिले ते राहिलेच. स्वतंत्र विचाराचा आव करूनही त्यांना स्वतंत्र विचार करतां आला नाहीं.

ह्याचे कारण अंधश्रद्धा. वेद अनादि, पुराणे नीतीने भरलेलीं, ज्ञान सगळे हिंदुस्थानांत आहे, पाश्चात्य ज्ञान केवळ भौतिक व आध्यात्मदृष्टीने निरुपयोगी अशी ग्रंथकर्त्यांची दृढ समजूत असल्यामुळे नवीन त्याना कसे रुचणार ? महाराष्ट्रांतल्या जुन्या चालीरीति त्यांच्या हाडीमांसीं इतक्या खिळल्या आहेत कीं, त्यांत फरक झालेला पाहून त्यांचा तिळपापड होतो. त्यांनीं दूरवर दृष्टि फेंकल्यास हिंदुस्थानांतल्या हिंदुस्थानांत कितीतरी भिन्न रीतिरिवाज दिसतील. हे रीतिरिवाज आजकालचे नसून फार जुने आहेत. प्रांतागणिक जशा भाषा निराळ्या, तसे आचारविचार निराळे अमके चांगले व अमकें वाईट हे कसे ठरवावयाचे ? कोकणस्थांनीं कोकणस्थांचे आचारविचार पाळावेत, देशस्थानीं देशस्थाचे, असा निर्णय रा० फडके देतील काय ? ह्या भिन्न चालीरीति धर्मपुस्तकांत आहेत काय ?

हिंदु वेदांना मानतात तर खिस्ती बायबलला मानतात. चातुर्वर्ण्य पाळले पाहिजे असे वेद म्हणतात. बायबल म्हणते सर्वांना खिस्तीधर्मांत ओढा. कुराण म्हणते सर्वांना मुसलमान करा. सर्व देवाज्ञा ! तर मग काय, सर्व आज्ञा पाळावयाच्या ? आणि त्या कशा ? धर्म हे एक गौडबंगाल आहे ! विचारवंताला सर्व धर्म मनुष्यप्रणित असे वाटणारच. माझी निदान अशीच समजूत आहे. वेद समजत नाहीं म्हणून वेदाविषयीं इतक्या गप्पा. मी ऋग्वेदाचा अभ्यास करीत आहे, तो पुष्कळ ठिकाणीं दुर्बोध आहे. ह्याचे कारण त्यांतील जुनी भाषा. त्यातील पुष्कळसे शब्द पाणिनीय काळीं व त्याच्या आधींही प्रचारातून गेले होते. यास्क, सायण, खुद्द ऐतरेयादि ब्राह्मणें वेदाचा हवा तो अर्थ करतात. वेदाचा अर्थच जर कळत नाही तर त्यात सर्व कांहीं आहे असे कसे म्हणतां येईल ? तथापि वेदकाळीं समाजस्थिति काय होती ह्याचे थोडेसे आकलन करतां येते. वेदातील देव, चालीरीति सर्व काहीं निराळें होते. आतां त्यांतले कांहींही उरले नाहीं. ऋग्वेदांतला मुख्य देव इन्द्र व त्यानंतर अग्नि. ब्राह्मणकाळीं अग्नीला शेवटलें स्थान दिले आहे व विष्णूला सर्वांच्या शिरोभागीं ठेविलें आहे. शंकराचें कोठे नांवही नाहीं. 'शिश्नदेव' ह्या विशेषणाने लिंगपूजा करणारांची निर्भर्त्सना केली आहे. पण हल्लीं तीच लिंगपूजा जारीनें प्रचारांत आहे. हल्लीं इंद्राला कोणी विचारीत नाहीं. सूर्यवंश व चंद्रवंश अस्तित्वांत आले. वास्तविक इंद्रवंश व अग्निवंश

अस्तित्वांत आले पाहिजे होते. खरा सोम नाहींसा हेऊन खोटा दूर्वादि सोम प्रचारांत आला. ऋग्वेदकाळीं आर्य व अनार्य एवढे दोनच वर्ग अस्तित्वांत होते. त्या कालाच्या शेवटीं चार वर्णांचा उल्लेख आहे. मी एक ह्यासंबंधीं निबध लिहिला आहे, तो भारत इतिहास-संशोधक मंडळाने सप्तम समेलनाच्या अहवालांत प्रसिद्ध केला आहे. त्यांत जातीजातींतले वैमनस्य, व वरिष्ठ जातींनी खालील जातींची केलेली पायमल्ली पुरावा देऊन सिद्ध केली आहे. आज त्या चार वर्णांच्या चार हजार जाति बनल्या आहेत. चार हजार वर्षांपूर्वींचे हिंदुस्थान आज नाही. शेकडो स्थित्यंतरें होत गेलीं आहेत. तथापि जुने ते टिकाऊ व चांगलें असे फडक्यानीं म्हणावे हे नवल! हिंदुस्थान किती जरी पुराणप्रिय असला तरी स्थित्यंतरे झालीं नाहीत असे कोणालाही म्हणतां येणार नाहीं. कोणचीही गोष्ट ठाम नाहीं—हाच सिद्धान्त खरा आहे. तेव्हां विचारवताने स्थित्यंतराच्या आड येऊ नये. स्थित्यंतर म्हणजे सजीवपणा.

जुन्याचा संस्कार कायम ठेवावयाचा व नव्याचा संस्कार होऊ द्यावयाचा नाहीं हा कोठील न्याय? तुम्हाला जे जुने वाटते ते एकेकाळीं नवीन होते. शंकराचार्यांना दैत्य म्हणत होते हे तुम्ही विसरतां. अद्वैत खरें व द्वैत खोटें हें म्हणण्याला काय आधार? उगाच अभिमान कशाला? द्वैत-अद्वैत हे नुसते शब्द आहेत. त्यांचा खरा अर्थ माझ्या मनात उतरत नाहीं. धर्म, तत्त्वज्ञान, सगुण, निर्गुण, हे वादग्रस्त प्रश्न आहेत. ते आजवर कोणीही सोडविले नाहींत व ते पुढेही सुटले जाणार नहींत उगाच तिरीमिरीवर कां यावे? धर्माला बाजूला ठेवावे हाच शहाणपणा.

फडक्यांचे पुस्तक पुष्कळाना आवडेल ह्यात संशय नाही. जुने, अर्धवट जुने असे आपल्या समाजात लक्षावधि—किंबहुना कोट्यवधि लोक आहेत. ते त्यांची पाठ थोपटतील. खासगी भाषणांत ते यांच्यासारखीच भाषा वापरतात. त्यांचे धाडस पाहून अशा लोकांना आनंद होईल; पण फडक्यांची विचारसरणी मला मान्य नाहीं हे स्पष्टपणे मी पुन्हा म्हणतों.

नवीन युगांत सर्वच चांगले आहे असे मी कधींही म्हणणार नाहीं. मला त्यांत पुष्कळ दोष दिसताहेत; पण त्यामुळे जुने चांगलें असेंही मी कधीं म्हणणार नाहीं. जुन्याचे दिवस संपले.

  

— १८ —

## ह० भ० प० **विनायकबोवा साखरे,**

'विचारसागररहस्य', सार्थ 'ज्ञानेश्वरी'. सार्थ 'अमृतानुभव', 'गाथापंचक' इ० ग्रंथांचे संपादक व वारकरी संप्रदायाभिमानी

आपलें 'नवयुगधर्म' या ग्रंथाचे प्रथम खंड ८।१० दिवसांपूर्वी पोचले. त्यांत परीक्षकास केलेल्या सूचनाही पाहिल्या. अभिप्राय इतक्या लवकर द्यावा लागेल असे वाटले नाहीं. शिवाय आमच्या अभिप्रायाची किंमत ती काय ? असे मनांत येऊन स्वस्थतेने ग्रथवाचनास आरंभ केला होता. त्यानंतर आपली सूचना लवकर अभिप्राय पाठविणेची आली, त्यामुळे विचारपूर्वक ग्रंथवाचन झाले नाहीं. आपातत: ग्रंथ पाहून ग्रंथासंबधीं झालेला अभिप्राय पाठवीत आहे.

ग्रंथाचा उद्देश चालू क्रांतिकारक नवयुगासाठीं कोणती धर्मतत्त्वे बाहेर पडतात, तिकडे जिज्ञासूचें लक्ष लागून राहिले आहे, यासाठीं आपल्या देशातील आधुनिक धार्मिक चळवळींसबंधीं निवळ मराठी वाचकांस विचार करतां यावा, याकरितां हा हिंदुस्थानांतील आधुनिक धार्मिक चळवळीचा विवेचक इतिहास म्हणून मुद्दाम लिहिलेला आहे. हा आपला प्रयत्न अत्यंत उपयुक्त झाला आहे, व त्यामुळे इंग्रजीचे ज्ञान ज्यांस नाहीं अशा प्राचीन धार्मिक मतानुयायींना गेल्या शे-दीडशे वर्षांत आधुनिक विद्वान् म्हणविणाऱ्या लोकाकडून वैदिकधर्माचीं रुपांतरें कशीं होत गेलीं हे समजण्यास आपल्या या ग्रंथाने मोठ साधन झाले आहे. हे त्यांचेवर मोठे उपकार झाले यांत शंका नाहीं.

प्रथम खडांतील राजा राममोहन राय यांच्या चरित्रापासून देवेंद्रनाथ, राजनारायण, केशवचद्र व हल्लीं हयात असलेले रवींद्रनाथ टागोर यांचेपर्यंत बंगाल्यांत कलकत्ता शहरीं वैदिकधर्मपरिवर्तनाची लाट कशी उत्पन्न झाली, व उत्पन्नकर्त्या व्यक्तींची बुद्धिमत्ता वगैरे गोष्टींचा मराठी वाचकांस चांगला परिचय झाला.त्याचा विचार करता ती वैदिकधर्मपरिवर्तनाची लाट बंगाल्यांत-च थांबून न राहता कमीअधिक प्रमाणाने सर्व हिंदुस्थानांत पसरली, व इंग्रजी

विद्या संपादन केल्यानेंच ज्यांना व्यवहारांत मोठेपणा आलेला होता किंवा आहे ते त्यांचे अनुयायी झाले. असो.

सामान्य नियम असा आहे कीं, कोणत्याही व्यक्तीच्या मनावर प्रथम ज्या धार्मिक विचारांचा आघात होईल त्याची युक्तता त्याचे मनास फार पटते. व ते संस्कार दुसऱ्या कोणत्याही उत्तम धर्मविचाराच्या ग्रहणास प्रतिबंध करतात. अशाच प्रकारची स्थिति राजा राममोहन राय याचेपासून आरंभ झालेली दिसते. राजा राममोहनपासून आजपर्यंत ब्राह्मसमाजाचें जितके नेते झाले किंवा हल्लीं आहेत त्यांपैकीं या पुस्तकांत प्रसिद्ध झालेल्या व्यक्तींबद्दल एकानेही कोणत्याही धर्माचे सांग अध्ययन केले आहे, असे दिसत नाहीं. बुद्धि अतिशय उत्तम असली, तरी कोणत्याही धर्माचे स्वयंभू ज्ञान होणें, भगवद्‌वतार किंवा भगवत्कृपेस पूर्ण पात्र झालेल्या व्यक्तींशिवाय कोणामध्यें असणें शक्य नाहीं. त्याप्रमाणे ब्राह्मसमाजाचे पहिले उत्पादक राजा राममोहन राय यांसही तसें ज्ञान नव्हते त्यांनीं प्रथम महमदी धर्म वाचला, नंतर ख्रिस्ती धर्माचे परिशीलन केले, त्याच्याशीं अतिशय स्नेहसंबंध केला, वैदिकधर्माचेही ज्ञान संपादन केले वगैरे गोष्टी त्यांच्या चरित्रांत आहेत. महंमदीधर्मातील पोशाख त्यांना आवडला. ख्रिस्तीधर्मातील टापटीप व स्वैराचरण आवडले आणि वैदिकधर्म पाहून दुसऱ्यांशीं भांडण्यापुरते वैदिकधर्माचे ज्ञान त्यास झालें. परंतु त्यापैकीं मूर्तिपूजा किंवा दुसरा वैदिक आचार, वर्णाश्रमपद्धति यांपैकीं त्यांस कांहींच आवडले नाहीं; याचे मुख्य कारण "आपल्या सदसद्विवेक-बुद्धीस पटेल तोच धर्म" असे धर्माचे स्वबुद्धीने लक्षण करून त्याप्रमाणे वागावयाचे, व आपण केलेल्या धर्माच्या लक्षणाप्रमाणे इतरांनींही वागावे याकरितां समाज स्थापन करावयाचा असे मनांत आणून त्यानीं जरी कलकत्त्यास ब्राह्मसमाज स्थापन केला व कांहींएक विचार न करतां राजा राममोहन यांचे इतर गुणांस भुलून कांहीं श्रीमान् व थोर मंडळी त्यांस प्रथम-दर्शनीं अनुकूल झाली; तरी राजा राममोहन हे अजरामर नसल्याकारणानें व 'सदसद्विवेकबुद्धीस पटेल तो धर्म' असें धर्माचे लक्षण त्यांनीं ठरविलेले असल्यामुळे, राजा राममोहन राय यांच्या सदसद्विवेकबुद्धीच्या रुळावरूनच त्यांच्या पश्चात् ब्राह्मसमाजाच्या अधिकाऱ्यांच्या बुद्धीची गाडी गेली पाहिजे असा नियम राजा राममोहन राय यांनीं केला नसल्यामुळे, किंवा असा

नियम त्यांनीं केला असता तरी प्रत्येकाची सदसद्विवेकबुद्धि भिन्न असल्यामुळें तो कोणी पाळलाही नसता व पाळलाही नाहीं. प्रत्येक व्यक्तीची सदसद्विवेक-बुद्धीच धर्म ठरूं लागली, तर जितक्या व्यक्ति तितके धर्म असे ओघानेच होते; व तसाच प्रकार ब्राह्मसमाज स्थापन झाल्यापासून आजपर्यंत त्या समाजाचीं मुख्य सूत्रे ज्यांच्या हातांत येत गेलीं त्यांच्या सदसद्विवेकबुद्धी-प्रमाणे धर्मस्वरूपांत होत गेलेल्या पालटावरून दिसतो.

विद्वान् म्हणविल्या जाणाऱ्या मनुष्याची बुद्धि मोकाट सुटल्यानंतर महा-पुरांत बिनदोराच्या नावेची जशी स्थिति होते तशीच त्या बुद्धीची स्थिति होते. म्हणजे कदाचित् ती नाव इच्छित प्राप्यस्थलीं जाईल, कदाचित् प्राप्यस्थाना-पासून पार दूर जाऊन पडेल. कोठे एखाद्या झाडास अडकून राहील, कोठें भोऱ्यात सापडेल. कोठे चिखलात रुतेल व कधीं खडकावर आपटून तुकडे तुकडेही होण्याचे अनेक प्रसंग त्या नावेवर येतील. त्यात महापुरात प्राप्य-स्थलीं जाऊन पोचणे निःसशय अशक्यप्राय आहे. त्याचप्रमाणे वैदिकधर्माच्या अधिकारात ज्यांचा जन्म झाला आहे, अशा उत्तम बुद्धिमान् पुरुषास संप्रदायपूर्वक वैदिकज्ञानाचा योग्य सस्कार होईल तर बाकीच्या कोणत्याही धर्माचा त्यास यत्किंचितही प्रतिष्ठा वाटणार नाही. आपण हिंदु वैदिक धर्मा-भिमानी आहोत, एवढा बलवत्तर सस्कार राजा राममोहन राय यांचे अंतः-करणावर बाल्यावस्थेतच झाला असल्यामुळे, वैदिकधर्माहून अत्यंत भिन्न-धर्मीयांनीं त्याचेवर खिस्ती होण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला तरी त्या बाल-पणच्या संस्कारामुळे त्याचे मनावर परिणाम न होता उलट खिस्ती पाद्यांची लबाडी त्यांना कळून ते त्याच्याशीं फटकूनच वागले. इतकेच नव्हे तर इंग्लंडां-तील मुख्य राजधानीचे लंडन शहरीं त्याचे देहावसान झाले तरीही मरण-कालपर्यंत त्यानीं गळ्यांतील जानवे टाकलें नाहीं. हे त्या बालपणांतील हिंदुत्वाच्या संस्काराचे सामर्थ्य आहे, हे कोणासही नाकबूल करतां यावयाचे नाहीं. पण धर्माच्या बाबतींत व्यक्तीच्या बुद्धीस राजा राममोहन राय यांनींच स्वातंत्र्य दिल्यामुळे, त्याचे पश्चात् केशवचंद्रांचे कारकीर्दींत यज्ञोपवीत काढून टाकणें, घरांतील देव फेकून देणे, वैदिक व्यवहार प्रथम झुगारून देणें, हाच मुख्य धर्म होऊन बसला. व देवेंद्राला, ज्या खिस्तीधर्माचा अत्यंत तिटकारा होता, त्याच खिस्ती धर्माचाराचें प्राबल्य केशवचंद्रांचे कारकीर्दींत

ब्राह्मसमाजांत धर्मत्वानें व मोठ्या झपाट्याने प्रस्थापित झाले. सुदैवाची गोष्ट एवढीच कीं, अद्याप ब्राह्मसमाजाचे अधिकाऱ्यांपैकीं प्रत्यक्ष खिस्ती धर्मदीक्षा घेऊन पवित्र झाल्याचे वाचण्यांत आले नाहीं. बाकी सगळे स्वैर व्यवहार समाजांत सुरू झालेच. या सर्व घोटाळ्याचे एक मुख्य कारण स्वतःच्या वैदिक धर्मग्रंथाचे अध्ययन नाहीं, विशेषतः वेदान्ताचे अध्ययन नसल्यामुळे तत्त्वविचारांत दुसऱ्याचा पाडाव करता येत नाहीं. मनाची खात्री असते कीं, वैदिकधर्मांतील वेदान्तशास्त्रात, अत्यंत गहन, दुसऱ्या धर्मात न सापडणारा, असा विचार आहे; पण आपण त्याचे अध्ययनच करीत नाहीं, ही उणीव एखाद्या विद्वानास जाणवते. दुसऱ्या भागाच्या दहाव्या प्रकरणात पृष्ठ २३९ वर देवेद्रांची मानासिक स्थिति ग्रंथकारानीं दिली आहे. ती अशी:—

"देवेद्रनाथ हे ब्राह्म असून हिंदुधर्माचे कट्टे अभिमानी होते. ते रोज प्रातःकाळीं वेद व उपनिषदे यांचा पाठ नित्यनेमाने करीत. त्याचा खिस्ती-धर्माकडे यत्किंचितूही ओढा नव्हता. इतकेच नव्हे तर राममोहन अगर केशवचद्र याच्याप्रमाणे त्याचा त्या धर्मासंबधीं विशेष आदरही नव्हता. खिस्तीधर्मांतील ईश्वर, स्वर्ग व मुक्ति इत्यादि कल्पना त्यास समत नव्हत्या. धर्माचे बाबतींत आम्हांस पाश्चात्यांजवळ शिकण्यासारखें कांहींच नाहीं. उलट त्यानींच आम्हांजवळ शिकावे, असे असता आमच्यातील कित्येक समंजस माणसाचे स्वधर्मासंबधीं औदासीन्य व परधर्मासबधी ओढा दिसून येतो, याचे कारण वेदान्तशास्त्राविषयीं त्यांचें अज्ञान हे होय. ह्यासाठीं वेदान्तशास्त्राचा सर्वत्र प्रसार केला पाहिजे असे त्याचे म्हणणे आहे." बाकीचे त्याचे आचारविचार कसेही असोत व त्याजबद्दल आमचा कितीही विरोध असला, तरी प्रथम स्वधर्माध्ययनाचा अभाव, हे सगळ्या धर्मऱ्हासाचे कारण आहे, या आमच्या म्हणण्यास देवेद्राचे मत अत्यत पुष्टि देणारे आहे यात शंका नाहीं. असे असूनही प्रस्तुत ब्राह्मसमाजाचे आधिपति पंडित सीतानाथ यांच्या वेळेपर्यंत याचा कोणींच विचार केला नाही. उलट पंडित सीतानाथ उपनिषदांचा, महाभारताचा व पुराणाचा कालविभाग पाहून, हीं सर्व पुराणे व इतिहास काल्पित आहेत, त्यात सत्यांश मुळींच नाहीं, असे प्रतिपादन करून त्यास नवयुगधारी राजा राममोहन राय यानीं व्यासाच्या मुखानेंच लबाडी सिद्ध केली असल्याचा आधार देतात. ज्या व्यासांनीं हीं पुराणे किंवा महाभारत रचलें, ते व्यासच आपल्या तोंडानें

" मयैव प्रोच्यमानस्य मनसा कल्पितस्य च " असे पौराणिक-कथा कल्पित असल्याचे कबूल करतात असे सांगतात.

हे पंडितजींचें पांडित्य विचार करण्यासारखे आहे. एक तर शारीर-सूत्रांतील " तदनन्यत्वं आरंभण शब्दादिभ्य: " या अधिकरणांत ब्रह्मव्यतिरिक्त सर्व जग कल्पित असल्याचे " वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यं " या श्रुतिवाक्याच्या आधाराने सर्व जगत् कल्पित असल्याचे प्रसिद्ध केले आहे. मग त्या जगदंतःपाती कथांना कल्पितत्व व्यासांनीं सांगितले यांत बिघडले कोठे ? कल्पित कथानके सांगून जगतास फसविण्याचा व्यासांचा उद्देश नसून तात्पर्यदृष्टीने अद्वैत ब्रह्मबोध करून देण्यामध्यें होता. ज्या अद्वैतात्मबोधाच्या प्राप्तीने यच्चयावत् सर्व दुःखाचा नाश व परमानंदप्राप्ति होते, त्या अद्वैतात्मबोधाकरितां कल्पित कथानके सांगितलीं हे त्याचे जीवावर महदुपकार आहेत, हे पंडितजी विसरले असे तरी म्हटलं पाहिजे, किंवा हें तत्त्व समजण्याइतके पंडितजींचे पांडित्य नाहीं असे कष्टाने म्हणावे लागेल. दुसरे असे कीं, पंडितजींनी जो श्लोक उद्धृत केला आहे, त्यात " कल्पितस्य च " या पदाच्या मागे " मनसा " हे पद असून त्यांत नञर्थ " अ " आहे तो पंडितजींनीं पाहिला म्हणजे व्यासांवरील कल्पितकथा सांगण्याचा दोष जातो; इतकेच नव्हे, तर आपण सांगितलेल्या कथांवर कोणी थोर पंडित कल्पितत्वाचा आरोप करतील तो त्यांनीं करू नये म्हणून खुद्द भगवान् व्यासांनीं अगोदरच मीं सांगितलेल्या कथा कल्पित नव्हेत, असे सर्वज्ञतेने बजावून ठेविले आहे. शिवाय पंडित सीतानाथ म्हणतात त्याप्रमाणे सर्व कथा कल्पित आहेत असे धरून चालले तरी पंडितजीसारख्या चतुर बुद्धीच्या पुरुषास त्यांतील तात्पर्य घेण्यास कांहींच हरकत नव्हती. इसाबनीतींतील सर्वत्र कोल्ह्याकुत्र्याच्या गोष्टी कल्पित असतात हे सर्वसंमत असले तरी तात्पर्यग्रहणाच्या दृष्टीनें त्या पुस्तकांचा विद्वान् लोक संग्रह करतातच. इतकी तरी व्यासापुरती पूज्यबुद्धि पंडितजींची असावयास पाहिजे होती. ती तर नाहींच; पण त्यानीं पुराणांबद्दल आपलें मत ज्या कुत्सित शब्दांत प्रगट केले त्या शब्दांवरून पंडितजींनीं व्यासांवर मिथ्याभाषणाचा आरोप केला, असेच सिद्ध होते. त्यांतील थोडा नमुना असा कीं, " वासुदेव म्हणजे कृष्ण हा देवकीचा पुत्र आहे व याच्यापासून भागवत धर्मास

मूर्त स्वरूप आले, असे कोणी मानतात ते चूक आहे. वास्तविक वासुदेव हा केवळ एक काल्पनिक वैदिक देव असून कृष्ण यासही ऐतिहासिक सत्यता मुळींच नाहीं. कृष्णाची ऐतिहासिकता सिद्ध करण्याकरितां यादवांची जी वंशावळ पुराणकार दाखवितात ती पोरकट आहे. पुराणातील कथा असंबद्ध व अचरट असल्या तरी त्यांतील कांही विधाने सत्य मानलीं असतीं; परंतु त्यास इतर देशांच्या समकालीन इतिहासाचा दुजोरा मिळत नाही. भागवतातील एका श्लोकांत 'कृष्णस्तुभगवान्स्वय' असे शब्द आहेत खरे; पण ते अगदी तुटक व मागाहून घातल्यासारखे दिसतात. कृष्णोद्धव सवादात मूर्तिपूजेस जो मान्यतेचा शिक्का मिळाला आहे, तो भागवतात कोणी तरी मागून घातला आहे." "दह्या-दुधाची चोरी करणाऱ्या कृष्णाला माझ्या घरच्या चपराशाचीही योग्यता नव्हती, असे राजा राममोहन हे एका पाद्याजवळ बोलले होते.".........प्रत्यक्ष भगवान् कृष्णावताराच्या वेळीं शिशुपालासारखे निंदक होते तर राजा राममोहन आणि त्याचे आतापर्यंतचे झालेले अनुयायी श्रीकृष्णनिंदक आहेत यात आश्चर्य काय ? शिशुपालासारख्या कट्टया द्वेष्टयानीही कृष्णाच्या बाल्यावस्थेतील जारकर्मांचा उल्लेख केला नाहीं. यावरून असे दिसते की, ते जारकर्म मानण्याइतका शिशुपाल मूर्ख नव्हता. इतकेच नव्हे तर बालक्रीडेसारख्या क्षुद्र गोष्टींचा उल्लेख दरबारी भाषणात आपल्यासारख्या राजाने करणे हे मूर्खपणाचे तर खरेच, पण पोरकटपणाचेही दिसते, असे त्या कृष्णद्वेष्टया शिशुपालाने मानले असले पाहिजे. पण खेदाची गोष्ट ही की, भगवान् श्रीकृष्णाशीं निष्कारण द्वेष करणाऱ्या ब्राह्मसमाजाच्या पडिताना इतकी सुद्धा अक्कल नाही, यापेक्षा धर्माचे दुर्भाग्य ते कोणते ?" असे ग्रंथकार म्हणतात, ते बरोबर आहे. रवींद्रनाथ टागोर यानीं सीतास्वयवर, द्रौपदीवस्त्रहरण वगैरे पौराणिक कथावर हिंदुस्थानच्या देशस्थितीचीं रूपके बसविलीं आहेत, व या कथा काल्पनिक आहेत असे म्हटले आहे. पण त्यात पडितजीसारखा कल्पितत्वाचा ध्वनि असला, तरी बोलून चालून रूपक असल्यामुळे भाविकांचे मनास चीड येण्यासारखी भाषा त्यात नाहीं. परतु पडितजींच्या व्याख्यानात भाविकांचे मनांत चीड उत्पन्न होण्यासारखी हलकट भाषा वापरली आहे, हे पंडित म्हणविणाऱ्यास शोभत नाहीं.

बुद्धिस्वातंत्र्याच्या जोरावर ब्राह्मसमाजांतून फुटून " एकेश्वरी ", " देव-समाज " वगैरे अनेक पंथ ब्राह्मसमाजिस्टांनीं काढले, परंतु त्यांपैकीं एकही समाज वैदिक मार्गाचा पुरस्कर्ता निघाला नाहीं. ब्राह्मसमाजासुद्धां सगळेच समाज व्यावहारिक उच्च विषयोपभोगाच्या आड न येतां त्या विषयवासनेला पुष्टि देईल, अशाच तऱ्हेची धर्मरचना पाहिजे अशा उद्देशाने निघाल्यामुळें त्या समाजात झालेले नियम सर्व वेदबाह्य आहेत. जो धर्म एक समाज मानतो तो धर्म दोन चार वर्षांत कांहीं व्यक्तींना नापसंत होऊन दुसरा धर्म बनतो. अशी दोन चार वर्षात धर्माची पालट होणाऱ्या नियमास कोणता विचारी मनुष्य धर्म म्हणेल ? व त्याच्या कर्त्यास शहाणा म्हणेल ? कोणच्याही कालीं बाधित न होणारा असा जर धर्म असेल तर तो एक वैदिक धर्मच आहे.

एखादा रोगी मनुष्य वैद्याकडे जातो. वैद्य त्याच्या रोगाचे निदान ठरवून त्यास औषध देतो व कडक पथ्य करण्यास सांगतो. कडक पथ्याच्या कचाटीं-तून सुटावें या उद्देशाने व आपल्या जिव्हेचे लाड पुरविण्याकरितां थालीपीठ, कडबोळीं खाऊं काय ? असे रोगी विचारीत असता वैद्य खाऊ नको म्हणून सांगतो. यात रोग्याचा हेतु तात्पुरती चैन करण्यास प्रतिबंध होऊं नये असा असतो व वैद्याचा हेतु रोग्यास आरोग्य प्राप्त करून देण्याकडे असतो. अशा स्थितींत मूर्ख रोगी वैद्यास मूर्ख म्हणून त्याच्या औषधाची व पथ्याची निंदा करून त्याचा त्याग करतो, व आपली स्वैर इच्छा परिपूर्ण करण्याकरिता वाटेल तसा आहारविहार करतो आणि यामुळे त्याचा परिणाम त्याला ताबडतोब भोगावा लागला नाहीं तरी परिणामीं अवश्य भोगावा लागतोच. तशीच स्थिति बंगाल्यांतील ब्राह्मसमाजाची झालेली आहे. वैदिक धर्माप्रमाणें आचरण करणे, या स्वैरवृत्तीच्या ब्राह्मसमाजिस्टांस आवडत नसल्यामुळे त्या वैदिक धर्मास झुगारून देऊन, इतकेंच नव्हे तर वैदिक देवतांची निंदा करून दृष्टान्तां-तील रोग्याप्रमाणे स्वतःच धर्मस्थापक बनले, त्याचे परिणाम त्यांना भोगावे लागत आहेत व लागतीलही.

याचें मुख्य कारण कोणताही विद्वान् मनुष्य जीवाचे मुख्य साध्य काय आहे हें ठरवीत नाहीं. वैदिकमताप्रमाणें जीवाचें मुख्य साध्य निश्रेयस (मोक्ष) आहे. आणि गौण साध्य अभ्युदय हें आहे. याशिवाय जीवाचें तिसरें साध्य

ठरणे शक्यच नाहीं. अभ्युदयाचे पोटात स्वराज्यप्राप्ति वगैरे किरकोळ साध्यें येतात. अभ्युदयाकरितां श्रुतिस्मृतींनीं स्वधर्माचरण हा उपाय सांगितला आहे. आणि निश्रेयसाकरिता तत्त्वज्ञानाचा उपाय सांगितला आहे. निश्रेयसाचे अधिकारी फार थोडकेच असतात. बहुतेक सर्व जीव अभ्युदयाचीच इच्छा करतात. त्यास उपाय म्हणून सांगितलेला स्वधर्माचा आचार ठेवण्यात. प्राप्त असलेल्या किंवा होणाऱ्या अविहित अनुकूल विषयाचा त्याग करावाच लागतो, आणि तसे करणे अनेक जन्माच्या दुष्ट संस्कारानीं मरणप्राय वाटते. याविषयी ज्ञानेश्वरमहाराज " मायेपुढोनि बाळक। काळे नेतां एकुलतें एक। का होय जेसे उदक। तुटता मीना ॥१॥ तैसे विषयाचे घर। इंद्रिया सांडिता थोर। युगात होय ते वीर। विराग साहाती ॥२॥ " असे म्हणतात. याचा भावार्थ असा कीं, एकुलता एक असलेला मुलगा जर मृत झाला तर त्या आईस मरणप्राय दुःख होते, ( तथापि ती मरत नाही परंतु ) मत्स्याला उदकाचा वियोग झाला तर त्याला मरणच प्राप्त होते त्याप्रमाणे इंद्रियाचा अनुकूल विषयाशी संबंध तुटला तर जीवाला त्या मातेच्या दुःखाप्रमाणे दुःख होते किंवा मत्स्यासारखे मरणही प्राप्त होते. अशाच प्रकारची स्थिति राष्ट्रातील विद्वान् पुढारी म्हणविणाराची झालेली आहे. त्याना स्वराज्यप्राप्ति किंवा ऐहिक विषयसौख्य जितके अधिक भोगता येईल तितके प्राप्त करून घ्यावे, हेंच त्याचे साध्य ठरले असल्यामुळे आरोग्याची चिंता करणाऱ्या वैद्यास रोगी विचारीत नाहीं किंवा त्याचे औषध वगैरे घेत नाहीं; त्याप्रमाणे वैदिक धर्मास ते मुळीच विचारीत नाहीत, नुसती बोलण्यात काहीजणाची स्वधर्मावर श्रद्धा दिसते ती स्वराज्याच्या प्रीतीमुळेच. म्हणजे स्वराज्यप्राप्तीच्या साधनात स्वधर्माचा काही उपयोग होत असला तर तो करून घ्यावा इतक्याच बुद्धीने ती स्वधर्मावर प्रीति असते. स्वधर्म आपणास अनुष्ठेय आहे, अशा भावनेने स्वधर्मावर प्रीतिच नसते. देशाचे कल्याण करणारे व सरकारातून विद्वत्तेचे छाप बसलेले असेच पुढारी लोक बहुधा या स्वराज्यप्राप्तीच्या खटपटीत असतात. म्हणून सामान्य जनास त्याचे वाक्य आस्तिकाप्रमाणे वेदतुल्य वाटते. त्याच्या हातात वर्तमानपत्रद्वारा एकाद्या विषयाची किंवा व्यक्तीची महती वाढवावी असे मनात आले, तर तशी शक्ति आहे. अशा व्यक्तींच्या नादीं द्रव्य, प्रतिष्ठादिकांच्या इच्छेने काहीं धार्मिक लोक त्याच्या ताटाखालचीं मांजरें बनतात.

त्यांत सामान्य भिक्षुक, शास्त्री शंकराचार्यपद धारण करणाऱ्या व्यक्तीपर्यंत-सुद्धां लोक असल्याचे दृष्टीस पडतें. पुढाऱ्यानाही असे लोक आपल्या बगलेंत हवेच असतात. कारण आपण जें करूं त्याजवर शास्त्रीयत्वाचा शिक्का मारणारा नामधारी शास्त्री किंवा अधिकारी असावा लागतोच. व या उभयताचा व्यवहार "अहोरूपमहो ध्वनिः" या न्यायानें चालतो. त्याचे काम एवढेच की, ते राजकीय कर्णधार ज्याप्रमाणें बिगुल फुंकतील त्याप्रमाणें त्यांनीं तुताऱ्या वाजवीत सुटावयाचे व तें काम ते योग्य तऱ्हेनें बजावीत असतात. हे विचार या ग्रंथातील वे० शा० स० महादेवशास्त्री दिवेकर यांचे एकोणीस कलमाचें मोगलाई फरमान छापिलें आहे, त्यावरून सुचले आहेत. शास्त्रीपदाला न शोभणाऱ्या अशा या फरमानांत बऱ्याच गोष्टी धर्मविरुद्ध सांगितल्या आहेत. त्यात मौजेची एक गोष्ट अशी आहे की, 'साधूंची सैन्यांत भरती करावी'. ते साधुही उलट शास्त्रीबोवांना असे विचारतील की, 'आमची सैन्यात भरती केली तर तुमची रेलवेच्या हमालात भरती कां करू नये?' अशाच तऱ्हेचे काहीं शास्त्र्याचे प्रयत्न आहेत; अन्य अधिकाऱ्याचेही आहेत. धर्माचा दुर्दैवाचा काल आला आहे म्हणावयाचे दुसरे काय?

अशा रीतीनें जुन्या धर्माभिमान्याची मतें सोपपत्तिक व सयुक्तिक असली तरी तीं त्यांस जनतेपुढे नीट मांडतां येत नाहीत. त्यानीं मांडण्याचा प्रयत्न केला तरी ते मोठे धनिक, अधिकारी किंवा इंग्रजी भाषाभिज्ञ नसल्या-मुळे त्यांना किंमतच नाहींशी झाली आहे. प्रस्तुत ज्याला इंग्रजी येत नाहीं त्याला मनुष्यत्वच नाहीं, असे बरेच आधुनिक विद्वान् लोक समजतात. यामुळे त्यांच्या म्हणण्याकडे कोणी फारसे लक्ष देत नाहीं. पक्षकाराला आपली हकीकत कोर्टापुढे कायद्याच्या चौकटींत मांडता येत नसल्यामुळे त्यास वकील द्यावाच लागतो. त्याप्रमाणे या धार्मिक विचाराच्या झगड्यांत ग्रंथकार रा० सदाशिवराव फडके यानीं पुरातन धर्माभिमान्यांचे वकीलपत्र घेऊन त्यांच्या कैफियतीचा एक भाग जगापुढे मांडला हे त्यांचे प्राचीन धर्माभिमान्यावर उपकार आहेत, व त्याजबद्दल त्यांस धन्यतावाद द्यावेत तेवढे थोडेच आहेत.

सदर कैफियत देते वेळेस प्रतिपक्षी आधुनिक धर्मवाद्यांचीं मते मांडून त्यांस जागोजागीं स्पष्ट पण सयुक्तिक चोख जबाब दिलेले आहेत, व त्यांची भाषा अत्यंत सौम्य आहे हे त्यांच्या सौजन्यास साजेसे आहे.

ब्राह्मसमाजिस्टांस ग्रंथाचे शेवटीं पन्नास सूचना केल्या आहेत. त्या तडजोड या दृष्टीनें काही अशीं मान्य असल्या तरी आहे त्या शब्दातच त्या सूचना पुराणमताभिमान्यास मान्य होतील असे वाटत नाहीं. आता ब्राह्मसमाजानें आपल्या समाजाचे 'ब्राह्मसमाज' हे नाव काढून टाकून 'वैदिक धर्मसभा' असे नाव द्यावे, अशी एक सूचना द्यावयास पाहिजे असे आम्हास वाटते. निर्मळ अतःकरणाने ब्राह्मसमाजानें रा० फडके याच्या पन्नास सूचना मान्य केल्या तर ही आमची एक सूचनाही ते मान्य करतील. रा० फडके याच्या पन्नास सूचना मान्य करून आमच्या एकाच सूचनेवर तडजोड मोडत असली तर आम्ही आपली सूचना परत घेऊ.

कै० टिळकानीं नुसत्या गीतेचेच रहस्य काढण्याचा प्रयत्न केला, त्याच्याही पेक्षा रा० फडके वकील यानी मुळात हात घालून वैदिकधर्माचा पथ निश्चित करण्याचा सोपपत्तिक प्रयत्न केला असल्यामुळे गीतारहस्यापेक्षा प्रसिद्ध झालेल्या भागाची व पुढे होणाऱ्याही भागाची किमत ज्यास्त ठरेल यात शका नाहीं. याचकरिता प्रत्येक वैदिकधर्माभिमानी किंवा चिकित्सक बुद्धीने विचार करणारानीं हा ग्रथ अवश्य सग्रही ठेवावा अशी याची योग्यता आहे.

  

— १६ —

## प्रो० **नारायण सीताराम फडके,** एम्. ए.

तत्त्वज्ञानाचे अध्यापक, राजाराम कॉलेज, कोल्हापूर

पनवेल येथील वकील श्री० सदाशिव कृष्ण फडके यांनी आपला "नवयुगधर्म" खण्ड पहिला हा ग्रंथ मला वाचावयास दिला याबद्दल मी त्याचा फार आभारी आहे. या खडांत ब्राह्मसमाज व देवसमाज याचा सविस्तर इतिहास दिला असून या दोन समाजाच्या हातून धर्मसुधारणेचे कार्य कितपत झाले याविषयींचा अभिप्राय ग्रंथकर्त्यांनीं दिला आहे. या समाजाच्या इतिहासाविषयीं ग्रंथकर्त्यांनी शक्य तितक्या साधनाचा सग्रह करून सर्व प्रकारे परिपूर्ण माहिती दिलेली आहे. माहितीच्या तुटपुंजेपणाचा आरोप टाळण्यासाठीं त्यांनी कित्येक ठिकाणीं पाल्हाळिकपणाचाही दोष पदरी

घेण्याची तयारी ठेवलेली दिसते. ब्राह्मसमाज व देवसमाज या नवयुगधर्मा-च्या प्रवर्तकांच्या कार्याचा आढावा घेतांना ग्रंथकर्त्यांनीं बरीच कठोर वृत्ति धारण केलेली दिसली तरी सनातनधर्माचा जाज्वल्य अभिमान ज्याना रुचतो व ब्रह्मानुभवाखेरीज धर्मप्रसाराचे कार्य करणे फोल होय, असे ज्याना मना-पासून वाटते, त्याना ग्रथकर्त्याची ही कठोर टीका धर्मकार्याच्या दृष्टीने सुपरिणामीच वाटेल यात सशय नाहीं. सनातन धर्मात कालानुसार सुधारणा करणे इष्ट असले तरी केवळ खिश्चॅनिटी किंवा इस्लामी धर्मासारख्या पर-धर्माच्या छदाला लागून हिंदु धर्माची वेदपुनीत इमारत उगीच जागोजागीं पाडण्याचा किंवा त्या इमारतीत परधर्मीय उपकरणाची स्थापना करण्याचा अट्टाहास करण्यात कोणतेही लोकहित नाहीं आणि असला अट्टाहास कोणीं केलाच व काहीं काळ त्याचा गाजावाजा झाला तरी कालेकरून त्याची चळवळ मंदगति झाल्यावाचून राहणार नाहीं, हे ग्रथकर्त्यांचे मध्यवर्ति मत आहे. या मताचे प्रतिपादन करताना त्याची भाषा कौतुक करण्यासारखी ओजस्वी व हृदयस्पर्शी झाली असून त्याच्या सनातनधर्माच्या अभिमानाचा विद्युत्प्रवाह वाचकाच्या अगातही सचार पावतो. त्या त्या समाजाच्या धर्मविधींची समग्र माहिती देण्याच्या खटपटीत या मुख्य मताचा ध्वनि जितका अविरत सबद्ध विवेचनात टिकावयास हवा होता तितका तो टिकला नाहीं येवढाच माझ्या अल्पमतीप्रमाणे या ग्रथात दोष आहे. बाकी सर्व दृष्टींनी हा ग्रंथ महा-राष्ट्रीय वाङ्मयास ललामभूत असा झाला आहे, व "नवयुगधर्मा"च्या या खण्डाचे अगत्यपूर्वक स्वागत करून पुढील खण्ड लिहिण्याची स्फूर्ति ग्रंथकर्त्यास मराठी वाचकवर्गाने अवश्य द्यावयास पाहिजे.

  

— १७ —

वे० शा० सं० **नारायणशास्त्री मराठे,**

संस्थापक 'प्राज्ञपाठशाळा-मंडळ', वांई

'नवयुगधर्मा'चा प्रथम खंड आपण पाठविला तो पोंचला. कार्यान्तर-व्यग्रतेमुळे वाचन फारसे झाले नाहीं, तथापि पहिला सर्व भाग, तिसऱ्या भागांतील थोडेबहुत आणि चौथ्या भागांतील शेवटचीं ३।४ प्रकरणें इतके

वाचले. माझ्या ठिकाणीं लेखनकौशल्य असते तर ग्रंथगौरव व्यक्त करतां आले असते परंतु कौशलाभावीं साध्या शब्दानीं मला असे म्हणतां येईल कीं, आचारपरिवर्तन व विचारपरिवर्तन याच्या जोराच्या आवर्तातून आणि नानाविध संशयकल्लोलांतून बाहेर पडण्याचा मार्ग हुडकणाऱ्यांस आपल्या खंडाचा [ खंडचतुष्टयाचा ] फार उपयोग होणार आहे.

या ग्रंथात आदिब्राह्मादि पक्षाची मांडणी तत्तत्पक्षाभिनिवेशाने तत्तत्-पक्षीय विद्वान् जशी करतील तशीच केली असावी असे वाटते, तथापि त्या संप्रदायाचे मूलग्रथ मी वाचले नसल्याने मला याबद्दल नक्की सागतां येत नाही.

क्रमाने त्या पक्षात सुधारणा, विकास किंवा परिवर्तन कसे होत गेले हे स्पष्ट आणि सकारण माडले आहे.

संप्रदायप्रवर्तकाचे चरित्र व चारित्र्य कळल्यास सप्रदायाचे आरंभीचे वास्तव स्वरूप कळण्यास पुष्कळ साहाय्य होईल. तथापि हा ग्रथ चरित्रग्रथ नव्हे हेही लक्षात पाहिजे. प्रस्तुत ग्रंथात या दोनही गोष्टी साभाळून आवश्यक ते चरित्र दिले आहे.

प्रत्येक भागाच्या प्रायः शेवटच्या प्रकरणांत पूर्वप्रकरणांतील विषयाचें सिंहावलोकन करून त्या पथातील गुणदोषाचें विवेचन केलें आहे आणि वैदिक संस्कृतीचे वैशिष्टय कसे आहे याचे दिग्दर्शन केले आहे.

मराठी वाङ्मयात या नवयुगधर्माच्या खडानी फार मोठी महत्त्वाची भर पडणार आहे. नवयुगातील धर्मांचा सगतवार इतिहास व्यक्त करणारा हा ग्रंथ नवविचारकास आणि नवीन पथाचे जनकास मार्गदर्शक होईल यात मला संशय वाटत नाहीं.

  

— १८ —

**श्री० व्यंकटेश त्र्यंबक चाफेकर,** बी.ए., बी. एस्सी., [वैकुंठराय]
'सटीप ज्ञानेश्वरी'चे कर्ते व वारकरी संप्रदायिक

आपला ग्रंथ " नवयुगधर्म " याची एक प्रत गेल्या पंधरवड्यात मजकडे आली. इतक्या अल्पकालात ग्रंथ वाचून होणे शक्य नाही. तो समग्र वाचून पाहण्याची मला अत्यंत उत्कंठा आहे.

तरी पण आतांपर्यंत मीं जीं जीं पाने वाचलीं त्यांवरून आपला ग्रंथ मराठी भाषेत एक अपूर्व होय असे प्रांजलपणे कबूल करण्यास मला फार आनंद वाटतो. इतर समाज व पथ यांतील वैशिष्ट्याचे शब्दचित्र उभे करतांना तिऱ्हाइताच्या वाणीने मुद्धां आर्यधर्माचे महत्त्व व त्यासबंधीं निष्ठा स्पष्ट आढळल्यामुळे हर्षनिर्भरांत मी हे पत्र लिहीत आहे. आपण जो वाग्यज्ञ केला आहे तो स्वयंभू व चिरंजीव असल्यामुळे अभिप्राय व परीक्षण यांची त्याला अपेक्षा नाहीं याबद्दल खात्री बाळगावी आपल्या ग्रथावर अभिप्राय देणे हे लेखनोद्यमात लोकापुढे येण्याचे एक स्वतंत्र साधन त्या लेखकास प्राप्त होत असेल तर होवो बापडे! बालबोध व शुद्ध भाषेत तर्कशुद्ध पद्धतीने परमताचे दिग्दर्शन करीत असता, स्वधर्मविमुखांच्या डोळ्यात अंजन घालन त्यांची दृष्टि स्वधर्मोन्मुख होईल अशी शक्ति दैविकी प्रसादाशिवाय असल्या व्यवसायांत प्राप्त होत नाही, ती आपल्या लेखणींत आहे. शिवाय अशा ग्रंथामुळे परधर्मपुरस्कर्त्यांचे महत्त्व यथायोग्य प्रमाणांत कळते ते वेगळे. असो.

या ग्रथामध्ये आपले छोटेसे का होईना पण एक छायाचित्र घालण्याची व्यवस्था केल्यास ती आम्हांसारख्या दूरस्थांस उपकारक होईल.

  

— १९ —

प्रो० **नरहर गणेश दामले**, एम. ए.

तत्त्वज्ञानाचे अध्यापक, फर्ग्युसन कॉलेज, पुणें

"नवयुगधर्म किंवा हिंदुस्थानातील आधुनिक धार्मिक चळवळींचा विवेचक इतिहास" हा सुमारे ९०० पानांचा विस्तृत ग्रंथ रा० फडके यांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक लिहिला आहे. संस्कृत, मराठी व इंग्रजी भाषेतील अनेक पुस्तके व निबंध यांचा सूक्ष्म अभ्यास करून व निरनिराळ्या धर्मपंथांच्या प्रमुख मंडळींकडून माहिती मिळवून त्याच्या आधारे रा० फडके यांनीं प्रस्तुत ग्रंथाची रचना केली आहे. ह्या पहिल्या खंडांत ब्राह्मसमाज व देवसमाज यांचेच फक्त विवेचन केले असून दुसऱ्यांत प्रार्थनासमाज, आर्यसमाज, थिऑसफी वगैरे संस्थांचा विवेचक इतिहास देण्याचा ग्रंथकाराचा मानस

आहे. प्रस्तुत खंडांत ब्राह्मसमाजाची स्थापना कशी झाली व त्या वेळची परिस्थिति कशी होती, समाजाचे तात्त्विक स्वरूप व प्रमुख सिद्धान्त कशा प्रकारचे होते, त्याचा आचारविचारावर काय परिणाम झाला, समाजसुधारणेसबंधीं ब्राह्मांची काय मते होतीं, हळुहळू समाजांतच फूट पडून भिन्न शाखा कशा उत्पन्न झाल्या, आदि-ब्राह्मसमाज, नवविधान ब्राह्मसमाज, साधारण ब्राह्म-समाज, यातील मतभिन्नता कोणत्या स्वरूपाची होती वगैरे गोष्टींचा ग्रंथकाराने उत्कृष्ट ऊहापोह केला आहे. त्याचप्रमाणे या ग्रथात, समाजाचे थोर प्रवर्तक व प्रमुख अनुयायी ( राममोहन, देवेंद्रनाथ रवींद्रनाथ, केशवचंद्र, ईश्वरचंद्र, आनंदमोहन, पंडित शिवनाथ वगैरे ) याच्या चरित्रातील काहीं मनोरंजक, बोधप्रद व स्फूर्तिदायक प्रसंगाचे फार बहारीचे वर्णन वाचावयास मिळते, तर काही दोषार्ह आणि टीकास्पद अशाही प्रसंगाचे काहीसा भडक रंगात रंगविलेले चित्र पहावयास सापडते. पुस्तकाच्या शेवटच्या भागात देव-समाजाची प्रस्थापना पंडित शिवनारायण ऊर्फ श्रीगुरु भगवान् यानीं १८९८ सालीं कशी केली, त्याचा जीवनक्रम कसा होता, त्याच्या विज्ञानमूलक धर्माचे स्वरूप काय होते याबद्दलची माहिती संकलित केली आहे. जागजागीं ग्रंथकाराने महत्त्वाच्या व आधारभूत अशा उताऱ्याचे फार सुंदर भाषांतर करून दिले आहे. त्यामुळे वाचकाचा मूळ विचारातील महत्त्वाच्या भागाशीं उत्तम परिचय होतो.

रा० फडके याची धार्मिक आस्था व दीर्घ उद्योग प्रशंसनीय असून त्याची सरस भाषापद्धति व विषयाची व्यवस्थित मांडणी हीं वाखाणण्यासारखी आहेत. अशा प्रकारचा एकदृष्टीने 'अपूर्व' ग्रंथ तयार केल्याबद्दल रा० फडके याचे आम्ही मनःपूर्वक अभिनंदन करतो.

रा० फडके यांचे ग्रंथात केवळ ऐतिहासिक कथन नसून टीकात्मक परीक्षणही आहे. इतिहासांत टीकेचा मसाला घातल्याने कांहींना तो अधिक रुचकर लागतो व पथ्यकर वाटतो, तर कांहींना तो मुळींच रुचत व पचत नाहीं. रा० फडके सनातनधर्माचे अभिमानी व शांकरमताचे अनुयायी आहेत. त्याची ब्राह्मपंथ व पुढारी यांजवरील टीका कांहीं ठिकाणी अवास्तव व कठोर वाटते. अशी टीका करताना त्यांचा पुराणमताभिनिवेश दिसून येतो. तरी ती टीका सद्धेतूनें केली असल्याने व आपली टीका अनाठायीं होण्याचा

संभव आहे या जाणिवेने त्यांनीं अगोदरच वाचकाची क्षमा मागितली असल्यामुळे कोणास राग येण्याचे कारण नाहीं. उलट त्यांची निर्भीड व प्रामाणिक टीका सत्यान्वेषण व विचारजागृति करण्याच्या दृष्टीने सध्याच्या विचारस्वातंत्र्याच्या काळात व देशाच्या संक्रमणावस्थेत उपयुक्त वाटेल यात शंका नाहीं. मराठी वाचकवर्ग या पुस्तकाचे योग्य चीज करील असा भरवसा आहे.

  

— २० —

**श्री० गजानन विश्वनाथ केतकर,** बी. ए., एल्एल्. बी.,
सहसंपादक 'केसरी' व 'गीता-धर्म-मंडळा'चे
संस्थापक व चिटणीस

हिंदुस्थानावर इंग्रजी संस्कृतीची व तद्द्वारा पाश्चिमात्य संस्कृतीची लाट उसळल्याला शंभर वर्षे होत आली. दोन भिन्न दिशाचे जलौघ एकत्र आले असता जी खळबळ उडते तशाच प्रकारची खळबळ हिंदुस्थानात धार्मिक, सामाजिक, आर्थिक, वाङ्मयिक व राजकीय अशा सर्व बाबतीत चालू झाली व अजूनही ती चालू असून, स्थिरस्थावर झाले असे म्हणता येत नाही. असल्या खळबळीच्या काळात अनभ्यस्त, उतावीळ व उथळ वृत्तीच्या बड-बडीला ऊत येत असतो. त्यातल्या त्यात आर्थिक व राजकीय क्षेत्राप्रमाणे धार्मिक व सामाजिक क्षेत्रात सत्तेच्या नियंत्रणाचा अभाव असल्यामुळे त्या बाबतींत या उथळ वृत्तीचा संचार अगदीं अप्रतिहत व स्वैर असा असतो. या वृत्तीला आळा घालण्यास अभ्यासी, तत्त्वग्राही व विचारशील अशी स्थिरबुद्धि उत्पन्न करणे हाच एक उपाय होय. श्री० सदाशिव कृष्ण फडके यांचे 'नवयुगधर्म' हे पुस्तक याच उपाययोजनेस अत्यंत उपकारक व पोषक असे झाले आहे. आधुनिक धार्मिक चळवळींच्या या विवेचक इतिहासाचे आणखी तीन खंड होणार असून हा पहिला खंडच सुमारे नऊशे पानाचा झाला आहे. एखाद्या वाचनप्रिय मनुष्याला देखील येवढा मोठा ग्रंथ जड वाटेल, मग केवळ पडल्या-पडल्या वाचन करणाऱ्यास तो एक धोंडच वाटावी यात काय नवल. पण हा प्रथमदर्शनीं होणारा ग्रह बाजूस सारून पुस्तक

एकदा वाचावयास घेतले म्हणजे अधाशीपणाने ते केव्हा वाचून संपवून टाकूं असे जिज्ञासु व विचारशील वाचकांस वाटल्यावाचून रहात नाहीं. कारण विस्तृत आणि मार्मिक ग्रथपरिशीलन, विषयाशी तादात्म्य, सुसंगत मांडणी, मूलग्राहक व सूक्ष्म विचारसरणी व विचारानुरूप सहजाकर्षक अशी भाषा-शैली याचा संगम या ग्रथात झालेला आढळून येईल. धर्मसुधारक आणि समाजसुधारक होऊ इच्छिणाऱ्या तरुणांनी या ग्रंथाचे परिशीलन अवश्यमेव करावे. प्रौढ विद्यार्थ्यांच्या सर्व शिक्षणसंस्थातून हे पुस्तक अवश्य संग्रहित केले जावे. इतकेच नव्हे तर विद्वान व बहुश्रुत अशा महाराष्ट्रीयानाही या पुस्तकातील बरीच माहिती नवीन आहे. या पहिल्या खडात मुख्यतः ब्राह्म-समाजाचा इतिहास आला आहे. सर्व विश्वाला एकाच सत्य व सामान्य धर्माची गवसणी घालू पाहणाऱ्या ब्राह्मांमध्येच तीन चार फळ्या कशा पडल्या व त्यातील अत्यत थोर पुरुषाचे सामर्थ्य या उद्योगात कसकसे खर्ची पडले याचा हा पूर्वानुभव अशाच उद्योगात यापुढे पडू पाहणाऱ्याना बराच उप-कारक होण्यासारखा आहे. साराश, हा ग्रथ केवळ जिज्ञासु ज्ञानसग्राहकासच नव्हे तर व्यावहारिक कार्यकर्त्यासही अत्यत उपयुक्त आणि सग्रहणीय असा झाला आहे.

  

— २१ —

## प्रो० रघुनाथ दामोदर करमरकर, एम्. ए.

संस्कृत भाषेचे अध्यापक, न्यू पूना कॉलेज, पुणें

पनवेल येथील वकील श्रीयुत सदाशिव कृष्ण फडके यानी 'हिंदुस्थाना-तील आधुनिक धार्मिक चळवळीचा विवेचक इतिहास' विस्तृत प्रमाणावर लिहावयाचे योजून सध्या ब्राह्मसमाज व देवसमाज या बगाल प्रातातील दोन धार्मिक समाजाची भरपूर, विश्वसनीय, मनोरजक व उद्बोधक माहिती देणारा प्रथमखंड प्रसिद्ध केला आहे. या प्रथमखंडाची जवळ जवळ नऊशे पाने झाली आहेत. पुस्तकात ब्राह्मसमाज व देवसमाज याच्या निरनिराळ्या धुरीणांचे फोटो घालण्यात आले आहेत. छपाई पुणे येथील सुप्रसिद्ध 'विजय' छापखान्याची आहे एवढे सागितले म्हणजे पुस्तकाचे

बहिरंग चित्ताकर्षक आहे हें सांगण्याची अर्थातच जरूरी नाहीं. पुस्तकाच्या व्याप्तीच्या मानानें किंमत चार रुपये ठेविलेली आहे ती माफकच आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं.

प्रस्तावनेमध्ये 'अशा रीतीचा ग्रंथ मराठी वाङ्मयात अद्याप कोणी लिहिलेला नसावा असे वाटते' असे जे ग्रंथकारांनीं अभिमानपूर्वक लिहिले आहे ते खरे आहे. ग्रंथकार आणखी असलेच तीन खंड प्रसिद्ध करणार आहेत. दुसऱ्या खंडांत प्रार्थनासमाज, आर्यसमाज व थिऑसफी यांचा इतिहास यावयाचा आहे. तिसऱ्या खंडांत सनातन वैदिक धर्माभिमानी साधुसंतांचीं चारित्र्ये व विचार येतील व चवथ्या खंडात धर्मासंबंधी अनेक महत्त्वाच्या मुद्द्यावर तुलनात्मक विवेचन करण्याचा आपला मानस ग्रंथकारांनी प्रस्तावनेत नमूद केला आहे. योजिलेले तीन खंड लवकर प्रसिद्ध होतील अशी आम्हांस उमेद वाटते. असे झाले म्हणजे श्रीयुत फडके यांनीं मराठी वाङ्मयाला चार भरभक्कम ग्रंथाचा आहेर केल्यासारखे होऊन मराठी वाङ्मयाचे एक सुप्रसिद्ध सेवक म्हणून त्यांचे नाव महाराष्ट्रांत चिरकाल दुमदुमेल यात शंका नाही.

असो. आता सध्या प्रसिद्ध झालेल्या प्रथम खंडाकडे वळू. राजा राममोहन राय यांनीं ब्राह्मसमाज कोणत्या परिस्थितींत स्थापन केला याचे प्रथम ऐतिहासिक विवेचन करून नंतर महर्षि देवेंद्रनाथ ठाकूर, राजनारायण बोस, केशवचंद्र सेन, रवींद्रनाथ, रामकृष्ण परमहंस, शिवनाथशास्त्री व सीतानाथ तत्त्वभूषण यांच्या अमदानीत ब्राह्मसमाजाची कशी थारेपालट होत गेली व त्यांतूनच निरनिराळे समाज कसे उत्पन्न झाले याचे चटकदार वर्णन ग्रंथकारांनीं केले आहे. ब्राह्मसमाजाबद्दल महाराष्ट्रात बराच गैरसमज आहे, तो या पुस्तकाच्या वाचनाने दूर होऊन ब्राह्मसमाजाचे यथार्थ स्वरूप वाचकांच्या नजरेस येईल. ब्राह्मसमाजाची मते ज्याना नापसंत वाटतात त्यांनीं तर हें पुस्तक अवश्य वाचावे. गेल्या वर्षी 'प्रार्थनासमाजाचा इतिहास' या नांवाचे एक पुस्तक मुंबईचे रा० वैद्य यांनीं प्रसिद्ध केले, त्यामुळे प्रार्थनासमाजासंबंधीं बऱ्याच गैरसमजुती नाहींशा झाल्या; तसेच या पुस्तकाच्या वाचनाने ब्राह्मसमाजासंबंधांतही होईल असे आम्हांस वाटते. श्रीयुत फडके यांनीं हें पुस्तक सनातन वैदिकधर्मानुयायी या भूमिकेवर आरूढ होऊन लिहिलेलें

आहे, त्यामुळे ब्राह्मांच्या आचारविचारांवर त्यांनीं ठिकठिकाणीं प्रखर प्रहार केलेले आहेत हे युक्तच आहे; पण त्याबरोबरच ब्राह्मपुढाऱ्यामध्ये जे जे गुण दृष्टोत्पत्तीस आले त्याबद्दल त्यांनीं त्या पुढाऱ्यांना धन्यवादही दिलेले आहेत. शंभर वर्षे अस्तित्वांत असून, बंगालमधील बऱ्याचशा विद्वान्, श्रीमंत व कर्तृत्ववान् अशा पुढाऱ्यांचे पाठबळ मिळूनसुद्धा ब्राह्मसमाजाचे अनुयायी इतके थोडे का, याची मीमांसा ग्रंथकर्त्यांनीं यथामति केली आहे ती सर्वसाधारणपणे वाचकांना मान्य होण्यासारखी आहे.

तत्त्वज्ञानासंबंधींही ग्रंथकारांनीं आपले विचार ठिकठिकाणीं नमूद केले आहेत. एवढा मोठा नऊशे पानांचा ग्रंथ लिहिण्यात काहीं ठिकाणीं विचारसंगति सदोष राहणे साहजिक आहे. परंतु ग्रंथ पाहिल्याबरोबर ( व वाचून झाल्यावर निर्विवादपणेच ) ग्रंथकारांनी प्रस्तुत ग्रंथलेखनाच्या कामीं किती आटोकाट मेहनत घेतली आहे हें लक्षांत येऊन श्रीयुत फडके यांचे कौतुक केल्याशिवाय महाराष्ट्रीय जनता राहणार नाही असा आम्हाला भरवसा आहे. ग्रंथातील प्रतिपाद्य विषयाचे अधिक दिग्दर्शन किंवा समालोचन येथे करण्याचे कारण नाहीं एकंदरीत श्रीयुत फडके यांनी हा ग्रंथ प्रसिद्ध करून महाराष्ट्र-वाङ्मयांत एका चांगल्या ग्रंथाची भर निःसंशय टाकली आहे असे निखालस म्हणता येईल.

  

— २२ —

## प्रो० हरि दामोदर वेलणकर, एम्. ए.,

विल्सन् कॉलेजांतील संस्कृतचे प्रोफेसर व
जैनसंस्कृतीचे संशोधक

'धारणाद्धर्म इत्याहुर्धर्मो धारयति प्रजाः' या तत्त्वाच्या अनुरोधाने आपल्या अनुयायास आत्यंतिक निश्रेयसाचा मार्ग सुलभ व निःसंदेह रीतीने दाखवून देण्याच्या कसोटीस आपला धर्म उतरत नाही अशा तीव्र भावनेनें प्रेरित होऊन गेल्या शतकामध्यें पुष्कळ शोधकबुद्धीच्या हिंदुधर्मीय विद्वानांनीं

त्याच्यांत इष्ट ती सुधारणा घडवून आणण्याचा यथामति प्रयत्न केला; पण अशा तऱ्हेचा विशेष प्रयत्न बंगाल्यात झाला असल्यामुळे त्याचा सांगोपांग व चर्चात्मक इतिहास मराठी वाचकांस फारसा वाचावयास मिळत नाहीं; ही मोठी अडचण आपल्या पुस्तकाने निःसंशय दूर झाली आहे. आपल्या सनातन-धर्मामध्ये कोणत्या प्रकारची व किती सुधारणा झाली पाहिजे याचा अन्तर्मुख दृष्टीने मनःपूर्वक विचार करणाऱ्या जिज्ञासु मुमुक्षूला आपल्या पुस्तकात चर्चिलेल्या धार्मिक चळवळींच्या इतिहासाचा फारच उपयोग होईल यात शंका नाही. अशा जिज्ञासु मुमुक्षूला आपल्या प्रयत्नांत व विचारसरणींत कोठे व कोणत्या रीतीने दिशाभूल होण्याचा संभव आहे हे बरोबर माहीत असण्याची फार जरूरी आहे. परधर्मीय लोकांची श्रेष्ठतर ऐहिक उन्नति पाहून त्यांची धार्मिक उन्नतिही अशीच असली पाहिजे असा मनावर झालेला बलवत्तर संस्कार, त्यामुळे आपल्या धर्मातील प्रत्येक लहानमोठ्या गोष्टीबद्दल मनात उत्पन्न झालेला अनादर, परकीयानीं 'स्वतत्र-धर्म-सस्थापक' म्हणून स्वार्थ-बुद्धीने केलेल्या स्तुतीने उत्पन्न झालेली आत्मप्रौढी, निव्वळ काहीतरी नवीन करावयाचे म्हणून कित्येक गोष्टींचा उपक्रम करण्याचा अट्टहास, वगैरे अनेक गोष्टींच्या योगाने पुष्कळ वेळा धर्मसुधारणेच्या कार्याला अत्यंत अनिष्ट असे वळण लागून 'विनायकं प्रकुर्वाणो जनयामास वानर' अशा पद्धतीचे काहीतरी सोंग निर्माण होते. या बाबतींत भाग ४ प्रकरणे २६–२७ यांत मांडलेले आपले विचार माझ्या दृष्टीने मननीय आहेत. प्रत्येक बाबींत पूर्व-परंपरेला साफ झुगारून न देतां जर कार्यसिद्धि होणे शक्य असेल तर तेच अत्यंत इष्ट आहे. खरोखरी नडते काय व त्याचे निराकरण करण्याचा खरा मार्ग कोणता याचा विचार निर्विकार मनाने केला पाहिजे. 'भेद नडत नाहींत द्वेष नडतो' (पृष्ठ ८३४) ही आपली वर्णव्यवस्थेसंबंधाची मीमांसा माझ्या मते बरोबर आहे. मात्र परस्पर द्वेषभावनेला पोषक अशी वर्णव्यवस्थेची उभारणी असूं नये. जेथे वर्णव्यवस्था अशी असेल तेथे जरूर ती सुधारणा व्हावी असें मला वाटते. उपरिनिर्दिष्ट प्रकरणांत ग्रथित केलेले सर्वच विचार माझ्या विचारांशीं जुळते आहेत असें नाहीं. तथापि एकंदरींत धर्ममीमांसेला आपले पुस्तक फार उपयुक्त होईल याबद्दल मला संदेह नाहीं.

— २३ —

**श्री० नारायण भवानराव** ऊर्फ **नानासाहेब पावगी,**

'भारतीय साम्राज्य' व इतर अनेक ग्रंथांचे कर्ते

'नवयुगधर्म' नावाचें पुस्तक मीं बहुतेक वाचून पाहिले व ग्रंथकार श्रीयुत सदाशिव कृष्ण फडके, वकील—पनवेल याच्या उद्योगशीलतेबद्दल मला फार कौतुक वाटलें. शिवाय पुस्तकावलोकनावरून स्वीकृत केलेल्या विषयासंबंधी लेखकाचे वाचन बहुविध आणि विस्तृत असल्याचें दिसलें. त्याचप्रमाणे हातीं घेतलेले कार्य सिद्धीस नेण्यासाठी त्याची उद्योगतत्परताही नजरेस आली. किंबहुना दिनचर्येचें काम सभाळून ग्रंथलेखनाचा व्यवसाय करणे ही सामान्य गोष्ट क्वचितच नाहीं आणि म्हणूनच ग्रंथकाराच्या परिश्रमा-विषयीं नवल वाटते.

ह्या पुस्तकाची भाषा क्लिष्ट नसून सरळ आहे व कठिण नसून सोपी आहे. तीत ओजस्विता आणि पुष्कळ स्थळी प्रसाददेखील दृग्गोचर होतो. त्यांतील विचारसरणीसुद्धा सुबोध असून विनीत आहे व त्यात भलताच आग्रह धरलेला दिसत नाहीं; इतकेंच नव्हे तर साधकबाधक गोष्टींचा सम-तोल बुद्धीनेंच विचार केल्याचें व्यक्त होतें आणि दुसरी बाजूदेखील तुलनार्थ मांडलेली दृष्टीस पडते. मात्र प्रतिपक्षाचा केवळ निष्कारणच झालेला दुराग्रह जेव्हा लेखकास भासमान होतो तेव्हा योग्य अभिमान सकारण व्यक्त झालेला निदर्शनास येतो

या पुस्तकातील विषयप्रतिपादन पुष्कळ ठिकाणी मर्मभेदक असून त्यात विचारस्वातंत्र्याची झाक इतस्ततः स्वयमेव मारते, असें काळजीपूर्वक वाचणाऱ्या-ऱ्या लक्षात सहजीं येईल.

* * *

— २४ —

श्री० **यशवंत व्यंकटेश कोल्हटकर,** बी. ए., एल्एल्. बी.,

'भागवताचा उपसंहार', 'गीतारहस्यखंडन'

इ० ग्रंथांचे कर्ते

'नवयुगधर्म' प्रथम-खंड अभिप्रायार्थ आला तो समग्र पाहिला. सूक्ष्म

विवेचक दृष्टीने जरी तो मला समग्र पाहतां आला नाहीं, तरी विहंगमदृष्ट्या मीं त्याचे अवलोकन केले. ग्रंथकर्त्यांने माहिती मिळविण्याचे प्रयत्न फार केले आहेत असे दिसते. आधुनिक धार्मिक चळवळींच्या इतिहासाचे क्षेत्र श्रीयुत फडके यांनीं जे आखलें आहे ते पृथ्वीतलाएवढे अफाट व विस्तृत आहे. त्याचे पृथ्वीप्रमाणेच चार खंड आहेत. पहिला खंडच नऊशें पानांचा आहे. असे चार खंड म्हणजे तीन हजारांवर पाने होणार. अर्थात् हा ग्रंथ या विषयापुरता एक ज्ञानकोशच होणार. इतके विशाल कार्यक्षेत्र अंगावर घेऊन त्यांनीं ते पार पाडले आहे असें दिसते. फक्त प्रकाशनाचे काम शिल्लक राहिले आहे. अत्यंत भगिरथ प्रयत्नाचा हा ग्रंथ एक उत्कृष्ट मासला आहे. श्रीयुत फडके यांची धार्मिक बुद्धि वाखाणण्यासारखी आहे, यांत शंका नाहीं. मतमतांतरांच्या कानठाळ्या बसविणाऱ्या हलकल्लोळांतून ते शांत निर्विकार चित्ताने बाहेर पडले आहेत. त्यांनीं आपला ग्रंथ श्रीशंकराचार्य यांच्या पुण्य-स्मरणार्थ अर्पण केला आहे. यावरून व ग्रंथांमधील उद्गारांवरून त्यांच्या शांकरमताविषयींच्या पक्षपातित्वाचे पूर्ण आविष्करण होत आहे. हाच वाद हल्लींच्या तत्त्वविचारधुरीणांना पटत चालला आहे. व्यक्तींच्या प्राकृतिक थोरपणाने दिपून न जाता समतोल दृष्टीने धार्मिक मतांचा तौलनिक विचार ते करतील तर मोठेंच कार्य होईल.

ग्रंथाची भाषाही चांगली वठली आहे. कित्येक ठिकाणीं तर ती काव्य-मय झाली आहे. कांहीं ठिकाणीं उपमा अगदीं नव्या व चमत्कृतिजनक आहेत. असो. पुढे ठेवण्याच्या सावधगिरीसंबंधी सूचना पुष्कळच आहेत. त्यांतील मुख्य अशाः —

विषय सुव्यवस्थितपणे मांडला पाहिजे. म्हणजे चरित्र, तत्त्वज्ञान, पूर्वगत मतांशीं साम्य-विरोध, स्वमतविसंगतता इत्यादि प्रकरणे निरनिराळीं हवींत. ग्रंथ वाचताना आपण एका अमर्याद निसर्गजन्य वनांतून जात आहों असा भास होतो. पुष्पांचा ताटवा संपून बाहेर पडतो तो अनेक गगनचुंबित वृक्षांचे निबिड घनदाट रान लागते, तोंच पुन्हा फुलांचा ताटवा, अशी सरसहा भेसळ झाल्याने अभ्यासकास फार कष्ट पडतात, व दिङ्मूढ झाल्या-सारखें होतें. केशवचंद्रआख्यान संपलें असे वाटते तो पुन्हा कांहीं भाग उलटून पुढे यावे तो आपला पुन्हा केशवचंद्र सेन ! पुनःपुन्हा तो पुढे

आहेच. मताचे आविष्करण सुसंगत झालेले नाहीं. ग्रंककर्त्यानें अलोट संपत्ति मिळविली आहे; परतु तिची माडणी सुव्यवस्थित नसल्याने त्या सपत्ति-प्रदर्शनाने पहाणाऱ्याचे मन गोंधळून जाते. भाषा कित्येक ठिकाणीं फारच बहारीची आहे; पण कित्येक ठिकाणी ती तशीच दुर्बोध झाली आहे. सहज वाचतां वाचता अभिप्राय लक्षात येत नाहीं. अर्थनिष्पत्तीकरिता थोडासा वेळ घालवावा लागतो. ग्रथातील पुष्कळशा भाकडकथा रसभग न होता अथवा तत्त्वहानि न होता गाळता आल्या असत्या. असो. एवढ्या सूचनांचा विचार पुढील कार्यापूर्वी श्रीयुत फडके यानीं केल्यास बर होईल.

  

— २५ —

**प्रो० महादेव मल्हार जोशी,** एम्. ए., जुनागड कॉलेज

आपल्या पुस्तकात ब्राह्मसमाज व देवसमाज या दोन सस्थांचा इतिहास साधार व पुरा दिला आहे. याचा उपयोग आपल्या महाराष्ट्रीय लोकास किती होईल याचा संशय आहे. बगाली लोकाचा स्वभाव महाराष्ट्रीय लोकापेक्षा अगदीं निराळा आहे. यामुळेच केशवचंद्र सेन वगैरे सर्व पुढाऱ्याचा ख्रिस्ती-धर्माकडे जास्त ओढा दिसतो व त्याची सर्व सस्था म्हणजे ख्रिस्ती धर्माचेच अनुकरण आहे ही गोष्ट बगाली लोकाच्या देशाभिमानाला कशी पटली याचेच नवल वाटते. दुसऱ्या भागात आपण महाराष्ट्रधर्माविषयीं बरेच लिहाल असे वाटते. ते लिहिताना निस्पृहपणाने महाराष्ट्रधर्मातील दोषही आपणास दाखविले पाहिजेत. विशेषतः चार जातींच्या चार हजार जाती कशा झाल्या व त्या कशा कमी करता येतील याचे उपाय आपण दाखविले-च पाहिजेत. आपण शेवटल्या अध्यायात ज्या सूचना दिलेल्या आहेत त्या चांगल्याच आहेत; पण अधिक स्पष्टपणे आपले दोष दाखवून सर्व ब्राह्मणांचे एकीकरण कसे करावे हे जर आपण स्पष्टपणे दाखवाल तर महाराष्ट्रावर फार उपकार होतील.

आपल्याइकडे वारकरीपंथाने सुधारणा करण्याचा प्रयत्न केला; पण आहेत त्या जाती कायमच ठेवून काय ती सुधारणा करावी असा त्याचा हेतु दिसतो. पण ती पद्धत अर्वाचीन सुधारणेला अनुकूल नाहीं. अर्वाचीन सुधारणेला

अनुकूल अशीच नवीन पद्धति काढली पाहिजे; त्याशिवाय समाजाची प्रगतीच होणार नाहीं. पतितपरावर्तन, शुद्धि आणि संघटन या विषयांवर आपले विचार स्पष्ट रीतीने मांडले पाहिजेत. ही सुधारणा जर झाली नाहीं तर बंगालप्रमाणेच आपले लोक खिस्तीधर्माकडे वळतील हे अगदीं साहजिक आहे. आपला दुसरा भाग फार महत्त्वाचा आहे, हा विचार करून महाराष्ट्र-धर्म हा प्रगतिपर कसा राहील हा आपल्यापुढे प्रश्न आहे व तो ज्या रीतीने आपण सोडवाल त्या रीतीवर सर्व मदार राहील. यापेक्षां जास्त लिहवत नाहीं.

आपला हा पहिला भाग खालीं दिलेल्या टीपामुळे किंचित् कंटाळवाणा झाला आहे असे मला वाटते.

  

— २६ —

## श्री० राजाराम सखाराम भागवत, एम्. ए.,

मराठी थिआसोफी मंडळाचे चालक व धर्मजागृतिकार

'नवयुगधर्म' नावाच्या एका प्रचंड भावी ग्रंथाचा पहिला खंड पाहिला. मराठी भाषेत हा एक महत्त्वाकांक्षेचा प्रयत्न आहे. हिंदुस्थानात गेल्या शंभरसवाशे वर्षांत ज्या जुन्यानव्या वळणाच्या धार्मिक चळवळी झाल्या, त्या सर्वांचे विश्वसनीय वर्णन देण्याची ग्रंथकाराची आकांक्षा आहे, या पुस्तकाचे चार खंड होतील. पैकीं पहिला आमच्या समोर आहे, तो सुमारे नऊशे पृष्ठांचा खंड आहे. त्यात ब्राह्मसमाज व देवसमाज या दोन चळवळीं-चा समग्र इतिहास आहे. पुढील खंड मिळून एकंदर चार खंड व्हावयाचे आहेत. तेही सरासरीने याच आकाराचे होतील असे मानल्यास सुमारे पस्तीसशें पानांचा एकंदर ग्रंथ होईल. ही उडी बरीच मोठी आहे. डॉ० केतकरांचा जसा ज्ञानकोश तशा प्रकारचा हा धार्मिक चळवळीपुरता एक कोश होईल असे म्हटल्यास त्यांत फारशी अतिशयोक्ति नाहीं. नव्या वळणाच्या व जुन्या वळणाच्या सर्व आधुनिक धार्मिक चळवळी या ग्रंथांत समाविष्ट करण्याचा ग्रंथकाराचा हेतु आहे.

ग्रंथाचे बहिरंग ठीक आहे. अंतरंगही तसेच आहे. भाषा सुबोध व चटकदार आहे. ठिकठिकाणचीं वर्णनेही भरपूर आहेत. पुस्तकांत चित्रेही बरींच आहेत. दिलेल्या चळवळींची चांगली समर्पक कल्पना यावी अशा रीतीने पुस्तक लिहिलेलें आहे.

पण पुस्तकांत नुसतीं वर्णनें नसून ठिकठिकाणीं युक्तायुक्ततेची चर्चाही आहे. टीका निर्भिड आहे. ती न्यायाची आहे किंवा कसे याविषयीं मतभेद पुष्कळच होऊ शकेल. आधीं धर्म हा विषय मतभेदास थोडाथोडका अवकाश देतो असे नाहीं. त्यांत निरनिराळ्या धार्मिक चळवळींची चर्चा एका पुस्तकांत आणण्याचें मनांत संकल्पित केल्यावर ते पुस्तक मतभेदास पुष्कळच थारा येईल यांत नवल नाहीं. ग्रंथकाराची दृष्टि एकंदरींत जुन्यास धरून आहे व तींत राष्ट्रीयत्वाचे मिश्रण आहे. अर्थात् ब्राह्मसमाज, देवसमाज या चळवळी जुन्या गोष्टींनीं असंतुष्ट झालेल्यांनीं केल्या असल्यामुळे त्या ग्रंथकारास पटूं नयेत हे साहजिकच आहे. तरीही व्यक्तींचीं चरित्रे देताना ग्रंथकाराने लेखणी समतोल ठेवण्याचा प्रयत्न केलेला आहे.

मराठींत अशा प्रकारचा ग्रथ अपूर्व आहे. निरनिराळ्या धार्मिक चळवळींची तपशीलवार माहिती एकत्र गोळा करण्याचे या ग्रथास श्रेय आहे.

अशा ग्रंथात कांहीं अडचणी अपरिहार्यच असतात. धर्माविषयी स्वतःचे विचार ठाम झाले असल्याविना कोणीही तेजस्वी ग्रंथकार ३५०० पानाचा मराठी ग्रंथ लिहिण्याचा व त्याबरोबर त्यांत स्वतःचे पैसे बुडविण्याचा उद्योग केवळ गमतीखातर करणार नाहीं. अर्थात् असा मनुष्य ठिकठिकाणीं आपले प्रामाणिक मत पुस्तकांत निर्भीडपणे नमूद करील हे साहजिकच आहे. एकाद्या धार्मिक चळवळीसंबंधाने त्या चळवळीच्या बाहेर असणाऱ्या सुशिक्षित माणसास काय वाटते हे स्पष्टपणे नमूद होणे अवश्य आहे. पण पुष्कळदा असलीं मते चुकीचींही असण्याचा संभव उत्पन्न होतो. अशा वेळीं जर त्या चळवळींत असणाऱ्या एकाद्या हुशार माणसास हे पुस्तक अगोदर दाखविले, आणि ग्रंथकाराशीं जेथे मतभेद होईल तेथे खुलाशादाखल त्या माणसाकडून त्या चळवळीच्या समर्थनार्थ छोट्या टीपा लिहवून घेतल्या तर वाचकांस दोन्ही बाजू समजून त्यास स्वतःचा विचार करणे अधिक सोपे जाईल असे

वाटते. या सूचनेचा विचार* ग्रंथकाराने पुढील खंड प्रसिद्ध करण्याचे अगोदर करावा अशी विनंति आहे.

  

— २७ —

## राष्ट्रीय-विद्यामंदिर शारदाभुवन, सत्याग्रहाश्रम

आपले पुस्तक मी पाहिले. सबंध अजून वाचले नाही. तरी पण काही भाग मला मनोरंजक आणि पूर्ण माहितीने भरलेला असा वाटला. महाराष्ट्र साहित्यामध्ये अशा पुस्तकाची खास जरूरी आहे. प्रस्तुत पुस्तकाचे कार्य आपण अंगावर घेतले आहात. ही स्तुत्य गोष्ट आहे. हिंदुस्थानातील सर्व धार्मिक चळवळींचा साद्यंत व चर्चात्मक इतिहास प्रसिद्ध व्हावयास पाहिजे. आजपर्यंत व्याख्यानरूपाने अथवा त्रोटक माहितीरूपानेही कोणी हे कार्य केल्याचे आढळत नाही. असो. आपल्याकडून पुस्तक आल्याबद्दल महात्माजींना ( मद्रास इलाख्यात ) कळवीत आहे.

  

— २८ —

## नवाकाळ, ता. ६।१०।२७

धर्माच्या संरक्षणाची, सजीवनाची चळवळ निरनिराळ्या रूपाने व्यक्तावस्थेस आलेली आपण आज पाहत आहो. ह्या लाटा गेल्या शंभर वर्षांतल्या आहेत, आणि त्यांचा इतिहासही मनोरंजक तसाच बोधप्रद आहे. परंतु मराठी भाषेच्या दुर्दैवामुळे आजवर हा इतिहास नव्हता. आता तो पनवेलचे वकील रा० सदाशिवराव फडके यांनी अत्यंत परिश्रमपूर्वक सविस्तर लिहिण्याला सुरवात केली असून त्याचा प्रथम खंड अभिप्रायार्थ आला आहे.

* हा विचार हा ग्रंथ लिहितांना शक्य तितका केलेला आहे. मतभेदाच्या बाबतींत ब्राह्मांकडून जो जो खुलासा होणे शक्य वाटले त्याचा संग्रह ह्या ग्रंथांत आस्थापूर्वक करण्याची शक्य तो काळजी घेतली आहे. व पुढेही ती अवश्य घेण्यांत येईल. —ग्रंथकार

हा खंड लवकरच प्रसिद्ध होणार असतांही तो नजरेखाली घालण्याची रा० फडके यांनीं आगाऊ संधि दिली याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

या पहिल्या खण्डात ब्राह्मसमाज आणि देवसमाज या दोन समाजाची माहिती आलेली आहे. रा० फडके यान्च्या लेखनाचा विशेष सांगावयाचा म्हणजे त्यांची परिश्रमशीलता आणि वर्ण्यविषयाबद्दल पुष्कळसा मतभेद असतांही दिसून येणारी सहानुभूति ही होय. मुंबईसारख्या अनेक साधन-संपन्न अशा शहरातसुद्धा प्रस्तुत विषयावर एखादा ग्रंथ लिहिण्याचे कोणी मनात आणल्यास त्याला त्रास झाल्याशिवाय राहणार नाहीं, मग पनवेल-सारख्या काहीशा आडबाजूच्या गावी बसून या विषयाची सर्व सामग्री गोळा करणे किती कठिण आहे, याची वाचकाना कल्पना करता येईल. परतु रा० फडके यानी असल्या अडचणीस भीक न घालता शक्य तेवढीं साधने जमवून त्यांचे सूक्ष्म दृष्टीने स्वतःच्या साधकबाधक विवेचनासह अध्ययन करून आपला ग्रथ तयार केला आहे व याला आजच्या वाङ्मयात दुसरी जोड दाखविता येणार नाही, असा आमचा समज आहे. ब्राह्मसमाज आणि देवसमाज या-बद्दलची माहिती यात इतकी विपुल आहे की. एवढे एक पुस्तक जवळ बाळगल्यास या विषयावर दुसरीं पुस्तके पाहण्याची गरज उरणार नाही, असे म्हटल्यास त्यात अतिशयोक्ति होणार नाही पुस्तक फार व्यवस्थित रीतीने छापलेले आहे. विषय गहन असूनही ग्रथकाराने तो सुबोध केला आहे, त्यातूनसुद्धा काही भाग रूक्ष वाटतो, त्याचे कारण विषयाची रूक्षता होय. अशी जबाबदारीची जाणीव राखून लिहिलेलीं पुस्तके महाराष्ट्रात दहावीस वर्षाच्या अंतराने निपजतात. रा० फडके याचा एकदर चार भागांत हा विषय पुरा करण्याचा विचार आहे. पहिल्या खडाची एकदर पृष्ठसंख्या ९००च्या वर आहे, शिवाय त्यात दर्शनीय चित्रे बरीच आहेत. असे असून-देखील किंमत अवघी चार रुपये ठेविली आहे. यावरून ग्रंथकाराचा निरपेक्ष हेतु सहज लक्षात येतो. ग्रथकार शंकराचार्यांच्या अद्वैत मताचे अनुयायी असून शाकरमताच्या अनुरोधानेच त्यांनीं आपले विवेचन केलेले आहे व हा विवेचनाचा भागच विशेष वाचनीय असा आहे. एवढ्या प्रचंड व साधार लिहिलेल्या ग्रंथाचे व्यापक दृष्टीने समग्र परीक्षण करावयाचे म्हणजे दुसरा लहानसा ग्रंथच लिहावा लागेल. स्थलसंकोचास्तव तसे करणे शक्य नाहीं.

स्थूलमानाने जितके सांगतां येण्याजोगे होते तितके थोडक्यांत सांगितले आहे. ज्याला ज्याला म्हणून सध्यां चालू असलेल्या धर्मक्रान्तीचा इतिहास अवगत करून घ्यावयाचा असेल त्या प्रत्येकाने पुस्तक अवश्य संग्रही ठेवावे आणि मननपूर्वक त्याचे वाचन करावे. राजकारणाच्या पोटातून पुष्कळ धार्मिक स्वरूपाच्या चळवळी उत्पन्न झालेल्या दृष्टीस पडतात, त्याचे धागेदोरे लक्षांत येऊन दृष्टि विशद होण्याला या पुस्तकाचा उपयोग झाल्याखेरीज राहणार नाहीं. ग्रथकाराने किमत अगदी स्वल्प ठेविली आहे, तिचा फायदा घेऊन ग्रंथकाराला महाराष्ट्रांतील जनता प्रोत्साहन देईल व पुढचे खंड भराभर बाहेर येऊन ग्रथकाराचे कार्य शेवटास जाईल अशी आम्हांस उमेद आहे. हा ग्रंथ निर्माण केल्याबद्दल रा० फडके साऱ्या महाराष्ट्राच्या अभिनदनास पात्र आहेत.

  

— २९ —

## प्रो० रामचंद्र दत्तात्रेय रानडे, एम्. ए.

पुण्याच्या अध्यात्मपीठाचे प्रमुख आणि हिंदु तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचे एक संपादक

हल्लींच्या परिस्थितींत धर्माकडे लोकाचे लक्ष वेधावे हे साहाजिकच आहे, व या प्रवृत्तीचाच एक परिणाम म्हटला म्हणजे हिंदुधर्माचा ऐतिहासिक दृष्टीने अभ्यास करून ग्रंथद्वारा विचारास चालना देणे हा होय. अशा प्रकारचा एक प्रयत्न श्रीयुत सदाशिव कृष्ण फडके यानीं 'नवयुगधर्म' हे पुस्तक लिहून केला आहे, व तद्द्वारा अलीकडे मराठींत निर्माण होत असणाऱ्या धार्मिक वाङ्मयात निःसंशय भर टाकिली आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. हिंदुस्थानांत इंग्रजी अमल सुरू झाल्यापासून हिंदुधर्माचा व आर्यसस्कृतीचा ख्रिस्तीधर्माशी व युरोपियन संस्कृतीशीं निकट संबध आल्यामुळे हिंदुस्थानांत नवीन युग सुरू झालें. त्या युगास साजेशा नवजीवनयुक्त चळवळींची लोकांस आवश्यकता वाटूं लागली, म्हणून प्रचलित हिंदुधर्मात

सुधारणा करून 'नवधर्मपंथ' स्थापण्यासाठीं ज्या चळवळी झाल्या त्यांत ब्राह्मसमाजाला अग्रिम स्थान आहे. श्रीयुत फडके यांनी प्रस्तुत ग्रंथांत ब्राह्मसमाजाचा व तत्सदृश देवसमाजाचा मराठींत सविस्तर इतिहास दिला आहे. या पुस्तकाचे एकंदर चार भाग आहेत. पहिल्यांत भिन्न धर्म व भिन्न संस्कृतींच्या झगड्यामुळे शंभर वर्षांपूर्वी बंगाल्यात कशी कठिण परिस्थिति निर्माण झाली होती याचे सुरवातीस वर्णन करून, नंतर या परिस्थितींत राजा राममोहन राय यानीं ब्राह्मसमाजाची कशी स्थापना केली, त्यांच्या धर्मसुधारणेच्या चळवळींवर खिस्तीधर्मविचाराचा, विशेषतः खिस्ती एकेश्वरी पंथाचा जबरदस्त पगडा बसला असल्यामुळे त्याच्यावर लोकांचा विश्वास कसा बसला नाहीं व ते सामान्य हिंदुसमाजाच्या सहानुभूतीला कसे पारखे झाले इत्यादि सविस्तर हकीकत दिली आहे. दुसऱ्या भागात महर्षि देवेंद्रनाथ टागोर, राजनारायण बोस व रवींद्रनाथ टागोर याची ब्राह्मसमाजाचे बाबतींत काय कामगिरी झाली हे सांगितले आहे तिसऱ्या भागात केशवचंद्र सेन, ब्राह्मसमाजांत फाटाफूट, नवविधानाची स्थापना इत्यादि विषयाबद्दल माहिती आली आहे. चवथ्या भागात ब्राह्मसमाजाच्या मूलभूत तात्त्विक व सामाजिक शिकवणीसंबंधी चर्चा करून उपनिषदे, अद्वैत व वैष्णवधर्म यांच्या तत्त्वज्ञानाशीं ब्राह्मसमाजाच्या मूलतत्त्वांचा विरोध अगर साम्य दाखविले आहे. याच भागांतील शेवटच्या प्रकरणात चिकित्सक पद्धतीने सर्व सामाजिक व धार्मिक विषयाचे समालोचन केले असून ग्रंथकर्त्याने "काही सूचना" केल्या आहेत. त्या उद्बोधक असून विचार करण्यासारख्या आहेत.

रा० फडके यांनीं हे पुस्तक परिश्रमपूर्वक लिहिले आहे हे वरवर पहाणारासही दिसून येईल. या विषयावरचे मराठींतील पुस्तक असें हें त्यांचेच प्रथमचे आहे. त्याची भाषा चांगली, सरस व चटकदारही आहे. त्यांची पद्धति चिकित्सक व दृष्टि मार्मिक असून तुलनात्मक दृष्टीने साम्यविरोध दाखविण्याची त्यांची हातोटी वाखाणण्याजोगी आहे; परंतु ग्रंथाचा 'धार्मिक चळवळीचा इतिहास' हा मुख्य विषय असल्याने त्यांतील चरित्रात्मक भाग थोडा जास्त विस्तृत झाला आहे असे वाटते. रा० फडके हे आधुनिक धार्मिक चळवळींच्या इतिहासाचे आणखी तीन खंड लिहिणार

आहेत व त्यांत अनुक्रमे प्रार्थनासमाज, आर्यसमाज, थिऑसफी, सनातन-धर्माभिमानी थोर पुरुषाची चरित्रे, व धर्मासंबधीं अनेक महत्त्वाच्या मुद्द्यावर तुलनात्मक विवेचन व विधायक सूचना: हे विषय येणार आहेत. हा त्याचा संकल्प सिद्धीस जाऊन आधुनिक हिंदुधर्माच्या इतिहासावर चागले वाङ्मय निर्माण करण्याचे श्रेय त्यास मिळो अशी आमची मनापासून इच्छा आहे.

  

— 30 —

M. R. JAYAKAR, Esq., M.A., LL.B.
BAR-AT-LAW, M.L.A.

Mr. S. K. Phadke of Panvel has been good enough to send me a copy of his excellent publication "Navayuga Dharma." Part I, and to request that I should state my opinion on the same I have gone through the important parts of that book, and I have great pleasure is congratulating Mr. Phadke on the care and profoundity with which he has dealt with the subject The history of the Brahmo Samaj and allied movements in India forms a very interesting chapter in the evolution of modern religious thought in this country, and although to special students of the subject detailed information about the main personalities and doctrines connected with this religious activity might have been available, there was up to now, so far as I am aware, no handy publication available in Marathi dealing with this question in a satisfactory manner. I am glad to be able to state that Mr. Phadke has satisfied this need in a remarkable way. The details contained in the book and the historic sequence with which they are marshalled, are admirable. He writes with feeling, and though at times he differs from the sentiments and the theories of those whose life he portrays, the difference is couched in terms to which not much reasonable objection can be taken. Mr. Phadke, of course, suffers from a certain

amount of religious preoccupation, which has at times rendered difficult his work of appreciation, but subject to this difficulty, which must have been real, he has performed his duties in a manner which reflects great credit on his critical gifts, as also on his assiduity and scholarship.

The chapters dealing with the Deva-Samaj will be particularly interesting to the Maharashtrian reader because of the personalities concerned with that movement and also their connection with some of the celebrities in the Deccan, who carried on similar pursuits in this part of the country. The evolution of the founder of that Samaj, viz, Maharshi Devendranath Tagore, finds an analogue in the history of one or two personalities with whom we are not unfamiliar in the Deccan, and it is a wonderful commentary upon the way in which individual religious evolution took place in these days and which is not incapable of being repeated even now In places where Mr. Phadke describes the causes which gave to that movement a conbination of *Bhakti* and *Brahma Dharma*, the descriptions are very well written and remind the reader of a similar evolution in the Deccan country. The fillip given to the movement by the objectionable features of Christian missionary activity in Bengal, is well worth a perusal.

I do not wish to go into more details in this short appreciation of the book, which had to be penned with great hurry to suit the date of the publication of Mr. Phadke's book. I feel, however, confident in recommending this book to the student of religious thought. It will repay perusal, as it is full of important information without the possession of which no adequate picture of the present-day religious thought of India is ever possible. I wish Mr. Phadke every success in his endeavour.

